# ॥ श्रीरामचरितमानस ॥

अथवा

# ॥ श्रीतुल[illegible] ॥

( मराठी भाषांतरासहित. )

संपादक

श्रीमंत यादव शंकर जामदार, जहागीरदार,

पेन्शनर सब्‌जज्ज नागपूर.



आवृत्ति दुसरी





शके १८६१ सन १९४०

## पहिल्या आवृत्तीच्या

# प्रकाशकाचे दोन शब्द.

१. श्रीतुलसीरामायण मराठी भाषान्तरासह वाचकांना सादर करण्याचा मंगलकारक प्रसंग श्रीरामचंद्रांचे कृपेनें आज आम्हांला प्राप्त झाला आहे हें आमचें थोर भाग्य होय असें आम्ही समजतों. हें महत् कार्य शिरावर घेण्याचें आम्हीं ठरविलें त्या वेळीं आम्हीं तें केवळ त्या दयाघन प्रभूच्या भरंवशावर ठरविलें आणि आज तें तडीस गेलें तेंही त्याच्याच कृपाप्रसादाचें फल होय अशी आमची दृढ श्रद्धा आहे. " दाता आमुचा रघुनंदन " या श्रीसमर्थांच्या उक्तीवर विश्वास ठेवून आम्हीं कार्याला प्रारंभ केला आणि हळूहळू सर्व जुळवाजुळव होऊन आमच्या अपेक्षेप्रमाणें पुढील स्वरूपांत आज श्रीतुलसीरामायण प्रकट होत आहे. श्रीतुलसीरामायणाच्या कोट्यवधि हिंदी वाचकभक्तांप्रमाणें महाराष्ट्रीय सहृदय वाचक सदरहू आवृत्तीचें भक्तिपूर्वक स्वागत करितील अशी आम्हांला उमेद आहे.

२. पुढील ग्रंथाला मुद्दाम जाड आणि गुळगुळीत कागद वापरला असून टाइपहि कोरा वापरला आहे. अनेक गृहस्थांचे सूचनेवरून ग्रंथाचे दोन भाग न करितां धर्मग्रंथ म्हणून एकच भाग करण्यांत आला आहे. व आजपर्यंत प्रायः कोणत्याहि मराठी ग्रंथाला उपयोगांत न आणलेली फितीची बांधणीची उत्कृष्ट पद्धत सरसहा अमलांत आणल्यामुळें मजबूतीचे बाबतींत वाचकांना कुरकूर करण्यास जागा राहणार नाहीं असें वाटतें. आमच्या माहितीप्रमाणें जेवढीं म्हणून रामायणसंबंधीं चित्रें उपलब्ध होण्यासारखीं होतीं तेवढ्या सर्वांचा पुढील आवृत्तींत समावेश आम्हीं केलेला आहे. व अशा रीतीनें ग्रंथाच्या बाह्यस्वरूपाविषयीं वाचकांची कोणत्याहि प्रकारची अपेक्षा राहूं नये असा हेतुपुरस्सर प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न करीत असतां द्रव्याचा मुळींच संकोच करण्यांत आलेला नाहीं हें वाचकांना सहज कळून येण्यासारखें आहे. वरील परिस्थितीचा महाराष्ट्रांतील काव्यप्रिय, धार्मिक, आणि वाङ्मयहितचिंतक वाचक पूर्ण विचार करून उदार हस्तानें पुढील सर्वमान्य ग्रंथाचा परामर्ष घेतील अशी आम्हांला उमेद आहे.

३. पुढील ग्रंथाचे प्रकाशनाचे बाबतींत अनेकांनीं अनेक प्रकारें प्रेमपूर्वक साहाय्य केलें आहे, त्यांचा नामनिर्देश करून त्या व्यक्तींच्या निरपेक्ष श्रीरामसेवेला गौणत्व आणण्याची आमची इच्छा नाहीं व या बाबतींत त्यांच्या इच्छेप्रमाणें धरलेलें आमचें मौन हेंच आमच्या कृतज्ञतेचें द्योतक आहे असें आम्ही समजतों.

४. अखेरीस ज्या दयाघन प्रभूंनीं आपला त्रिभुवनललाम लीलाविस्तार श्रीतुलसीदासांच्या वाग्द्वारां हिंदी भाषेंत प्रकट केला, त्याच भक्तवत्सल प्रभूंनीं महाराष्ट्रभाषेंत त्याचें प्रकाशन करण्याचें महत् सौभाग्य आम्हांला निमित्तमात्र पुढें करून प्राप्त करून देऊन आमचें कोड पुरविलें त्याच्या त्रैलोक्यवंदित पदकमलीं उत्तरोत्तर अधिकाधिक सेवेची याचना करून पुरें करतों.

पुणें ११६, बुधवार पेठ — गोपाळ हरि पुरोहित.

---

## दुसऱ्या आवृत्तीच्या

# प्रकाशकांचे दोन शब्द

सुमारें २७ वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर आज या नामांकित ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीचा योग येत आहे. हिंदी वाङ्मयांतील हा सर्वोत्कृष्ट भक्तिपूर्ण ग्रंथ आमच्याकडून प्रकाशित होत आहे, याबद्दल आम्हांस फार आनंद वाटतो. पहिल्या आवृत्तीबरहुकूमच ही दुसरी आवृत्ति छापली आहे व पहिल्या आवृत्तींतील सर्व चित्रें जशींच्या तशीं पुनर्मुद्रित केलीं आहेत. मात्र ह्या आवृत्तीचा आकार भाविक वाचकांच्या सोयीसाठीं थोडा बदलला आहे. पूर्वींचा डेमी अष्टपत्री हा आकार तितकासा सुटसुटीत नसल्यामुळें रॉयल अष्टपत्री साइझमध्यें मुद्दाम हा ग्रंथ छापला आहे. कागद, बांधणी, टाइप वगैरेंत इतर कोणताही फेरबदल केला नाहीं. तरी हिंदीप्रेमी व भाविक वाचक या थोर ग्रंथाला पूर्वीप्रमाणेंच उदार आश्रय देतील, अशी आम्हांला उमेद आहे.

ता. १७–२–१९४० — प्रकाशक–चित्रशाळा प्रेस, पुणें.

# प्रथमावृत्तीची प्रस्तावना.

याचें सुप्रेमभवन कवन निववितें सदा बुधा सरसें ।
हें जों जों सेवावें तों तों सेव्यचि गमे सुधासरिसें ॥

श्रीमयूरकवि.

१. श्रीतुलसीरामायण मराठी भाषांतरासहित, महाराष्ट्रवाचकांचे पुढें सादर करण्याचा प्रसंग श्रीपरमेश्वरकृपेनें आज येत आहे ही फार आनंदाची गोष्ट आहे.ही कल्पना बरेच दिवस जरी डोक्यांत घोळत होती तथापि सद्गुरु **श्रीराघोबामहाराज** यांच्या कृपाप्रसादानेंच लाभलेले **श्रीसांईमहाराज,** मुक्काम सादल्लापूर पंजाब, यांनीं जर आपलें आशीर्वादयुक्त प्रोत्साहन या कार्याला दिलें नसतें तर हें कार्य इतक्या लवकर आणि निदान आमच्या अपेक्षेप्रमाणें निःसंशय तडीस गेलें नसतें. आज ज्या स्वरूपांत हा ग्रंथ वाचकांना सादर करण्याचा सुमंगल प्रसंग येत आहे त्या स्वरूपाची रूपरेखादेखील **श्री सांईबावांनींच** काढून ठेविली होती. आज जरी ते हा ग्रंथ प्रसिद्ध झालेला पाहण्यास जडदेहानें विद्यमान नाहींत तथापि मूलारंभापासून आजमितीपर्यंत नानाविध विघ्नांचें निवारण करण्याला आम्हांला जी शक्ति आली तें केवळ त्यांच्या आशीर्वादाचेंच फळ आहे हें येथें कृतज्ञतापूर्वक नमूद केल्यावांचून रहावत नाहीं. हिंदी ग्रंथ महाराष्ट्रभाषेसारख्या हिंदीशीं अपरिचित असलेल्या भाषेंत भाषांतरारूढ देण्याचें जें धाडसाचें काम आम्हीं अंगावर घेतलें तें काम जसें संतांच्या प्रेरणेनेंच घेतलें तसेंच त्यांच्याच प्रेरणेनें तें शेवटासहि गेलें व ज्या वाणीनें उत्तर हिंदुस्थानांतील ८ कोटि हिंदी वाचकांना धर्मतत्त्वें प्रतिपादण्याचा क्रम जवळ जवळ आज साडेतीन शतकें अव्याहत चालू ठेविला आहे, ती वाणी आज महाराष्ट्रवाचकांना परिचित करून देण्याचें भाग्य आम्हांला संतकृपेनें लाभलें याबद्दल आम्हांला अभिमान वाटत आहे. संतांची सेवा मग अत्यंत अल्पांशानें कां होईना, ती अमोघ आणि सद्यःफलदायी आहे, हा सिद्धांत आमच्या अनुभवानें सिद्ध झाला आहे. **श्रीतुलसीदासांच्यासारख्या** संतांची सेवा करण्याला **श्रीसाईबाबासारख्यांची** प्रेरणा व्हावी हा योगायोग या ग्रंथासंबंधानें अपूर्व आहे, व ह्या योजनेची पूर्तता होण्यांत निमित्ताचे रूपानें आमच्या पूर्वजांची पुण्याईच फळास आली असें आम्ही समजतों.

२. श्रीतुलसीरामायणाचें उत्तर हिंदुस्थानांत महत्त्व किती आहे, हें बहुतेक सर्वांना माहीत आहेच. वेदांचे खालोखाल जर कोणत्या ग्रंथाला हिंदी वाचकांत मान असेल तर तो **तुलसीरामायणासच** होय. हिंदी सारस्वतांत ह्या रामायणाइतका लोकप्रिय आणि सर्वोत्कृष्ट असा दुसरा ग्रंथ नाहीं, एवढेंच नव्हे, तर भरतखंडांतील कोणत्याहि भाषेंत कोणत्याहि पुस्तकाचा श्रीतुलसीरामायणाइतका प्रसार नाहीं असें म्हटलें असतां यत्किंचितहि अतिशयोक्ति होणार नाहीं. असा हा सर्वसंमत धर्मग्रंथ महाराष्ट्रभाषेच्या द्वारें सुगम करण्याचा हा प्रयत्न आहे. ज्या ग्रंथानें हिंदी वाचकांना आपल्या जन्मकालापासून आजतागाईत वेडावून सोडिलें आहे तो ग्रंथ महाराष्ट्रीय वाचकांना देखील हालवून सोडील यांत संदेह नाहीं. महाराष्ट्रांत श्रीतुलसीदासांच्या नांवाचीच आजपर्यंत माहिती होती, परंतु आतां त्यांच्या कृतीशीं प्रत्यक्ष परिचय होण्याला हें साधन होईल असें आम्हाला वाटतें, व महाराष्ट्रांतील संतकवींच्या काव्यांचा रसास्वाद घेऊन नित्य आल्हाद पावणाऱ्या सहृदय आणि भक्तिप्रिय महाराष्ट्रीय वाचकांना हा हिंदी वाङ्मयांतील एका नामांकित संतकवींचा काव्यमय धर्मग्रंथ तितकाच हृदयवेधक आणि भक्तिप्रेरक होईल अशी आम्हांला खात्री आहे, व धर्मशिक्षणाची आवश्यकता तीव्रपणें भासूं लागलेल्या सांप्रतच्या कालीं तर तो विशेषच उपयुक्त आहे असें दिसून येईल.

३. हिंदी भाषा ही हिंदी राष्ट्राची विद्यमान भाषेंतील प्रमुख भाषा आहे व श्रीतुलसीरामायण हें हिंदी भाषेंतील अद्वितीय पुस्तक असल्याकारणानें त्या ग्रंथाचा मराठींत अवतार हा हिंदी भाषा एकराष्ट्रीय भाषा

करावी असें मत प्रतिपादन करणाऱ्या विद्वान् धुरीणांच्या मतें एकराष्ट्रीयत्वाला पोषकच होईल, यांत संदेह नाहीं, व या दृष्टीनें महाराष्ट्रवाचक या ग्रंथाचें स्वागत करितील अशी आम्हांला उमेद आहे.

४. आपल्या भाषेंतील श्रीज्ञानेश्वरी, श्रीदासबोध, हे मूलग्रंथ जसे अपपाठ आणि क्षेपक यांनीं दूषित झाले आहेत त्याचप्रमाणें तुलसीरामायणाचीहि दशा झाली आहे. ती इतकी कीं, मूळच्या ७ कांडाला एक ८ वें क्षेपक कांड जोडण्यांत येऊन मध्यंतरीं घातलेल्या क्षेपक कवितेचा भाग मूळाच्या एक षष्ठांशाइतका तरी आहे, परंतु सुदैवानें ज्याप्रमाणें आज **श्रीदासबोधाची** अस्सल प्रत आपणांस मिळत आहे, त्याचप्रमाणें **हिंदीनागरीप्रचारिणी सभेनें** हें महत्कृत्य अंगावर घेऊन श्रीतुलसीरामायणाची शुद्ध प्रत सन १९०३ सालीं प्रसिद्ध केली. ही प्रत अनेक जुन्या प्रतींवरून तयार केली असून बालकांड खुद्द गोसाईजींनीं तपासलेल्या प्रतीवरून घेतलेलें असून अयोध्याकांड तर स्वतःच तुलसीदासांनीं लिहिलेलें उपलब्ध झालें आहे. प्रस्तुत प्रतींत नागरीप्रचारिणी सभेनें प्रसिद्ध केलेल्या रामायणाचाच प्रायः आधार घेतला आहे, व त्याबद्दल आम्ही सभेचें आभार मानितों.

५. श्रीतुलसीदासांचें त्रोटक चरित्रहि सोबत जोडलेलें आहे व अनेक गृहस्थांच्या सूचनेवरून कठिण हिंदी शब्दांचा कोशहि दिला आहे. हिंदी नागरीप्रचारिणी सभेनें यापूर्वीच रामायणाचा कोश प्रसिद्ध केल्यामुळें आमचें काम अत्यंत सुलभ झालें आहे. याबद्दल त्या सभेला धन्यवाद देणें जरूर आहे. तसेंच शेवटीं सूची जोडली आहे, तिचाहि वाचकांना उपयोग झाल्यावांचून राहणार नाहीं अशी उमेद आहे. तसेंच रामायणांतील उत्तमोत्तम अशा उक्तींचा संग्रह ग्रंथाचे शेवटीं केलेला वाचकांस आढळेल. तोहि सुभाषिताप्रमाणें वाचकांस आल्हाद देईल अशी उमेद आहे.

६. सरतेशेवटीं जिनें आपल्या कृपेनें हें कार्य तडीस नेलें त्या **सद्गुरु श्री राघवमाउलीस** अनन्य भावानें शरण जाऊन **श्रीगोस्वामी तुलसीदासजी** व **श्रीसांईमहाराज** यांनीं आमच्याकरवीं ही वेडीवांकडी सेवा करून घेतली ह्याबद्दल त्यांच्या चरणकमलांचें स्मरण करून विराम पावतों.

मु० जबलपूर.<br>
अक्षय्य तृतीया, शके १८३५,<br>
ता० ९-५-१९१३.

**यादव शंकर जामदार.**

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

हे नाथ हे रमानाथ व्रजनाथार्तिनाशन ।
मग्नमुध्दर गोविन्द गोकुलं वृजिनार्णवात् ॥
( भाग. १०-४७-५२ )

मद्राष्ट्र-माते ! तुलसी-पदातें
प्रार्थी त्वरें त्वत्कृपण प्रजेतें ।
रक्षावया या व्यसनीं समर्थें
यावें शिवादिप्रमुखा समेतें ॥

गोसावी-सुत

---

जराहि थोड्या उच्च दर्जाचें साहित्य समोर आलें कीं जबर कपाळदुखी, आणि त्यांतून तें जर का रामकृष्णादि विभूतीस वाहिलेलें निघालें तर प्राणांतिक कानतिडिक हा बव्हंशानें आजच्या कलमकस मनूचा देखील धर्म. अशा आपत्तींत सांस्कृतिक साहित्यिकांचे डोळे व उखळ पांढरें होण्यापरता ते इतर काय अपेक्षिणार ? परंतु इतक्या खालच्या थरास स्थिति पोंचली असतांहि महाराष्ट्र आपला अभिजात साहित्याभिरुचीचा अभिमान जायबंद होऊं देत नाहीं ही मोठयाच अभिमानाची व समाधानाची गोष्ट म्हणविल्याखेरीज राहणार नाहीं हें खास.

परंतु तसें पाहिल्यास हिंदी व मराठी या भाषांचा सुतकसोयराचा देखील दिसण्यांत तादृश संबंध नाहीं. म्हणूनच प्रश्न पडतो कीं इतका जाज्वल्य अभिमान महाराष्ट्रांत आजच तुलसीरामायणासंबंधानें कां जागृत व्हावा ? आम्ही समजतों कीं याचें उत्तर श्रीतुलसीदासजींनीं आगाऊच देऊन ठेविलें आहे, इतकेंच कीं थोड्या आडपड्यानें. तें उत्तर असें:— ( पृ. ११ )

मनि-मानिक-मुकुता-छबि जैसी । अहि-गिरि-गज-सिर सोह न तैसी
नृपकिरीट तरुनीतन पाई । लहहिँ सकल सोभा अधिकाई
तैसेहि सुकवि-कवित बुध कहहीँ । उपजहिँ अनत अनत छबि लहहीँ

( अर्थ:— मणी, माणिक आणि मोतीं ज्याप्रमाणें राजमुकुट किंवा रसभरित युवतीच्या अंगलतिकेवर खरे खरे खुलून उठतात तसे ते साप, पर्वत आणि गज यांच्या माथ्यावर ( अर्थात् त्यांच्या उत्पत्तिस्थानांत ) शोभत नाहींत. हें जसें, तसेंच कविश्रेष्ठांच्या काव्यकलापासंबंधानेंहि रसिक विद्वान् हेंच सांगतात कीं तो काव्यकलाप उपजतो एका ठिकाणीं आणि विकासतो तो भलत्याच ठिकाणीं. )

वरील प्रमेय अर्थशास्त्रास धरून नाहीं असें कोण म्हणेल ? तदनुसार गोसांईजींसहि वाटलें कीं त्यांच्या वाणीच्या पिकास गरम बाजार कोठें तरी अन्यत्रच ( 'अन्यत्र' चा अपभ्रंश 'अनत' मिळेल; ) अर्थात् त्यांच्या काव्याची खरी कदर कोणी अन्यभाषी प्रदेशच करील हाच वरील उक्तीचा आंतरिक भाव दिसतो.

आतां 'अनत' शब्द घालतांना त्यांच्या दृष्टींत भारताचा कोणता भूभाग असूं शकेल हा प्रश्न. इतिहास सांगतो कीं सगळा आर्यावर्त देश यावनी सत्तेनें जरी जवळ जवळ आत्मसात् केला होता तरी महाराष्ट्रानें मात्र आपली आर्यसंस्कृति अत्यंत चिकाटीनें सांभाळली होती. ही स्थिति गोसांईजींच्या तीर्थयात्राप्रसंगीं त्यांच्या विचक्षणचक्षूंत भरली नसेल हें म्हणतांच येत नाहीं. शिवाय, महाराष्ट्राची विद्वत्ता, युक्ति-बुद्धि-चातुर्य, स्वराज्यलालसा आणि कार्यक्षमता यांचाहि त्यांना परताळ पटला असेलच. म्हणून बहुतेक निश्चयसा वाटतो कीं त्यांचा 'अनत' म्हणजे नव्याणव टक्के महाराष्ट्रच.

पुरावा म्हणून थोडेंसें प्रात्यक्षिक पाहूं. तुलसीदासजींच्यां 'राम-चरित-मानसा' वर (तुलसी-रामायणावर) आम्हीं 'मानस-हंस' (अथवा तुलसीरामायणरहस्य) हा टीकात्मक प्रबंध स्वभाषेंत लिहिला आहे. त्यावरील अगदीं थोडेसे अभिप्राय येथें देतों ते पाहून घ्यावेतः—

### मनोरमा ( मासिक )

" पुस्तक को देखकर हम बडे प्रसन्न हुए कि ऐसी ऐसी वस्तुयें भी हिन्दी संसारमें आने लगी हैं। " ( पुस्तक पाहून मोठीच प्रसन्नता वाटते कीं अशा अशाहि वस्तु हिंदीच्या क्षेत्रांत समाविष्ट होऊं लागल्या आहेत. )

### सरस्वती ( मासिक )

" ' मानस ' पर ऐसी सुन्दर आलोचनात्मक पुस्तक लिखने के लिये हिन्दीवालों को लेखक का कृतज्ञ होना चाहिये। " ( मानसा ( तु. रा. ) वर इतका सुंदर आलोचनात्मक प्रबंध लिहिल्याबद्दल हिंदीभाषीयांना लेखकाचे उपकार मानावेच लागतील. )

### कर्मवीर

" जिन विश्वविद्यालयों में तुलसीरामायणका विशद अध्ययन किया जाता है वहां के विद्यार्थियों को ' मानस-हंस ' अवश्य पढना चाहिये, " ( ज्या विश्वविद्यालयांत तुलसीरामायणाचें विशद अध्ययन होत असेल तेथल्या विद्यार्थ्यांना ' मानसहंसा '-चा अभ्यास अगदीं आवश्यक आहे. )

### प्रताप

" हमारी धारणा है इस विषयकी ( तुलसीरामायणकी ) ऐसी अच्छी पुस्तक अभीतक किसी भाषा में प्रकाशित नहीं हुई। हिन्दी साहित्य में तो, जिसका कि रामायण ( तुलसीजीका ) एक अंग है, ऐसी पुस्तक निकली ही नहीं। " ( आमचा निश्चय आहे कीं तुलसीरामायण-विषयक इतकी उत्कृष्ट चर्चा प्रकाशण्याचा आजतागाईत कोणत्याहि भाषेनें मान मिळविला नाहीं. तुलसीरामायण हा जिचा शिरोभाग त्या हिंदी भाषेकडून देखील तीच उपेक्षा होत राहिली. )

### श्रीव्योहार राजेन्द्रसिंह एम्. एल्. सी ( जबलपूर )

" मुझे गौरव इस बातका है कि आपने मराठी भाषा भाषी होते हुए भी हमारे एक कवीको इतना आदर दिया है और उनपर ऐसी विचार और विद्वत्तापूर्ण पुस्तक लिखी। हिन्दी आपके लिये सदा आभारी रहेगी। " ( आपली मातृभाषा मराठी असून देखील आमच्या एका कविललामाचा आपण इतका गौरव करतां आणि त्याच्या काव्याची इतकी विद्वन्मान्य समालोचना लिहितां ही मला गौरवाचीच बाब वाटते. हिंदी भाषेवर आपले हे शाश्वत उपकार होत. )

### कै. रा. सा. रघुवरप्रसाद द्विवेदी, प्रि. हितकारिणी स्कूल, जबलपूर

" विश्वविद्यालयोंके परीक्षार्थी इस समालोचनात्मक पुस्तकसे बहुत लाभ उठावेंगे। हिन्दी में इस श्रेणी की पुस्तकें बहुतही थोडी हैं, उनमें आपकी इस पुस्तक को उच्च पद उपलब्ध होना चाहिये। " ( विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांना या समालोचनात्मक प्रबंधापासून लाभाची लैलूट होत राहील. हिंदी भाषेंत या श्रेणीची आधींच फार थोडीं पुस्तकें, परंतु आपला प्रबंध त्यांचेंहि शिरोरत्न होय. )

वरील अभिप्रायावरून महाराष्ट्रांतच तुलसरिामायणाची खरी खरी चीज झाली असें म्हटल्यास तें गैर कसें ? म्हणूनच म्हणावयास जागा आहे कीं ' अनत '-द्वारा गोसांईजींनीं महाराष्ट्रास आगाऊच आशीर्वाद देऊन ठेवला होता, आणि त्याच्याच पुण्याईनें त्यांचा संकल्प फळास आला.

असो. परिपाठानुसार तुलसीरामायणासंबंधानें थोडेफार तरी धावत्या घोड्याचे हात प्रस्तावनारूपानें मारावयास हवेत हें आम्हीहि जाणतों. परंतु चर्वितचर्वणाचा दोष लादून घेण्याची इच्छा होत नाहीं, येथें आमचा नाइलाज होतो. रामायणाचे पैलु इतके चमत्कारिक, सूक्ष्म आणि विपुल आहेत कीं " विद्यावतां

भांगवते परीक्षा ' हें जितकें खरें तितकेंच खरें ' विद्यावतां तौलसिके, ( तुलसीरामायणे ) परीक्षा ' घरण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. तरीहि जे थोडेथोडके पैलु आमच्या नजरेंत भरूं शकले ते आम्हाकडून ' मानसहंस' रूपानें सादर झालेच आहेत. ते सर्व तर नाहींच, पण त्यांतली निवड देखील भाराभरच होणार. म्हणून या, आणि चर्वितचर्वणाच्या भीतीनें प्रस्तावनेच्या अल्पावकाशांत परिपाठ पाळण्याचें धाडस आमच्यानें करवत नाहीं. तरीहि निव्वळ परिपाठापुरतेंच कर्तव्य म्हणून ' मानस–हंसा ' चा खालील उतारा देऊन पुढचा मार्ग चोखाळणें भाग आहे याबद्दल क्षमा असावी:—

( **मानस–हंस** पा. २१७ )

' शेवटीं सारांशरूपानें सांगावयाचें तें इतकेंच कीं जनदृष्टि अत्युत्कट लालसेनें रामचरितमानसावर झेंपावते याचीं मुख्य कारणें अशीं कीं ' **विप्रधेनुहित संकट सहहीं** । ' ( पा. २७९ ), **जाइ सुराज सुदेश सुखारी** । ' ( पा. ३३५ ), ' **जनु सुराज मंगल चहुँ ओरा** । ' ( पा. ३३६ ), ' **पराधीन सपनेहुँ सुख नाहीं** । ' ( पा. ६६ ), ' **प्रजाबाढजिमि पाइ सुराजा** । ' ( पा. ४३३ ) इ. इ. लोकशिक्षणाचे त्रिकालाबाधित जीवंत धडे स्वधर्मजागृतीसाठीं ( अर्थात् स्वदेशोन्नतीसाठीं ) लोकांसमोर अत्यंत कळकळीनें मांडणारा अर्वाचीन वाङ्मयांत हा ग्रंथ अगदीं पहिलाच होय. हा ग्रंथ काव्यरसिकांना काव्यमय, चिकित्सकांना चिकित्सामय, व्यावहारिकांना व्यवहारमय, राष्ट्रभक्तांना स्वसत्तामय, भोळ्याभाविकांना प्रेममय, उपासकांना मंत्रमय, ज्ञान्यांना ज्ञानमय आणि रामभक्तांना राममय वाटून या सर्वांचेंच तो आजपर्यंत चोज पुरवीत आला आहे, आणि इतउत्तरहि तो ते तसेंच पुरवील. '

' **तुलसीरामायणाचें तात्पर्य** '

' **अछत राम राजा अवध मरिय माँग सब कोउ** । ' ( पा. ३५५ ) ( याचा भावार्थ हा कीं स्वदेशांतल्या स्वतंत्र स्वराज्यांत शेवटचा श्वास संपविण्याची हाव बाळगणें हेंच खरें मानव्य ).

एकंदर अगदींच थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तुलसीदासजी आपल्या रामायणांत साधूपणा शिकवीत किंवा लकीरके फकीर बनवीत बसले नाहींत. त्यांच्या मतानें साधूपणा खऱ्या मानव्याच्या मागोमाग आपसुकच चालत येतो, इतकेंच काय पण प्रत्यक्ष देवदेखील अशा मानव्यावर लट्टू बनून त्याच्या आधीन होऊन राहतो.*

सारांश, तुलसीदासजी श्रीसमर्थांच्या प्रभावळींतले शिरोरत्न ठरतात. एवढें म्हटलें कीं ( मा. हं. पा. १९१ पहा ) सर्व कांहीं म्हटलें गेलें असेंच आम्ही समजतों.

एकीकडून सूचना आली होती कीं तुलसीदासांवर आज उठल्या सुटल्या स्त्रीजातीविषयीं द्वेषाचा आरोप विद्वत्समाजांत देखील बोकळत आहे त्याचा येथें परामर्ष घेण्यांत यावा. ही गोष्ट अगदीं खरी, पण इलाज नाहीं; कारण तो विषय पडला विद्यालयीन चर्चेचा ( Academic discussion चा ). प्रस्तावना हें त्याचें योग्य स्थळ नव्हें शिवाय तो विषय आम्हीं पूर्वींच चर्चून चुकलों आहोंत [ ' विहंगम ' मासिक ( नागपुर ) १९३६ चे मार्च–एप्रिल, जूनचे अंक ( ३३–३४, ३६ ) पहा ].

झाला हा एवढा परिपाठ आमच्या मतानें अगदीं बस् आहे. आतां या दुसऱ्या आवृत्तींत कमजास्त काय तें दाखवितों.

( १ ) सुरवातीची गोष्ट ही कीं भरतचरित्राच्या भागास मुळींच दखल दिलेला नाहीं. तो पूर्वींचाच जसाचा तसा ठेवण्यांत आला आहे. याचें कारण असें कीं पूर्वीं तो भाग आम्ही यथाक्रम भाषांतरित करण्याचा वारंवार कसून प्रयत्न केला तरीहि मूळांतला लोच आमच्या भाषांतरांत मुळींदेखील उतरूं शकेना. शेवटीं निराशेनें त्यास बगल देऊन बाकीचें भाषांतर संपविण्यांत आलें. लगतच पुढें आमचें प्रथम कुटुंब कालवश झालें. आश्चर्य हें कीं आमच्या मनाची ती स्थिति तुलसीदासांना मानवली. भरतभागाचें भाषांतर सूतकाच्या अवघ्या सातआठ दिवसांतच संपादलें गेलें, आणि तेंहि अगदीं मनाजोगें.

---

* हा ' नर करनी करइ सो नर का नारायण होइ ' या कविवाक्याचा अर्थ आहे. त्याचा अन्वय असा:— ' नर करनी ( नरकरनी ) करइ तो नारायण (भी) नर का ( नरके अधीन ) होइ. '

म्हणून आज आमची भावना ही बनली आहे कीं ज्यांचें सूतक फळलें त्यांचेंच तो भाषांतरित भाग स्मारक होय, आणि म्हणूनच त्यांत कानामात्रेचाहि फरक करावयाचा आम्हास अधिकार पोंचत नाहीं. ( आमचें हें मत न रुचणारांस ' न बुद्धिभेदं जनयेत् ' या गीताज्ञेची जाणीव साविनय देऊन ठेवतों. )

( २ ) १९०६ म्हणजे मोठाच सरकारी जोरजरबेचा काळ, आणि तो उत्तरोत्तर जास्तच जरबेचा होत गेलेला. आम्ही तेव्हां मुनसफीवर असल्यानें ' राजपुरुष ' होतों, म्हणजेच ' अर्थस्य पुरुषो दासः ' होतों. अर्थातच सरकारमान्य होण्यासाठीं ' सुदेस ' ( पा. ३३५ ) ' सुराज ' ( पा. ३३५ ), ' सुबस ' ( पा. ३५५ ) वगैरे अत्यंत मार्मिक व महत्त्वाच्या शब्दांचें भाषांतर भाडोत्रीपणानें अर्थात् ढूलेपणानें करावें लागलें. आज मात्र देवाच्या दयेनें ते शब्द त्यांच्या अभिजात तेजानें चमकत असलेले या आवृत्तींत मिळूं शकतील.

( ३ ) तुरळक परभाषीय–विशेषतः यावनीय–शब्द उपयोजिलेले दिसतील, पण बिचकण्याचें कारण नाहीं. कारण हिंदीचा परिचय, करून द्यावयाचा हें जर भाषांतराचें उद्दिष्ट, तर हिंदीनें आत्मसात् केलेलें[1] शब्द घेण्यास काय हरकत ?

शिवाय, जसें राष्ट्राचें तसेंच भाषेचेंहि. मुलुखगिरी केल्याखेरीज दोघांचेहि पांग फिटावयाचे नाहींत. ती न केली तर दोन्हीहि घरकोंबडे बनतील आणि सदाचेच दरिद्री राहतील. मग मुलुखगिरी हा दोष कीं गुण ? गनीमी कावा तर आम्हा महाराष्ट्रीयांच्या रोमारोमांत भिनलेला.

आणखी असेंहि पहा कीं आज आम्ही गुलामराष्ट्रवाले खरे. पण तसे एक कालमानानें बनलों म्हणून भाषेपुरता तरी स्वतंत्र आंतर्राष्ट्रीय व्यवहार करण्यास आमची नालायकी आम्हीं कां दर्शवावी ? परकीय आचारविचारांचे देव्हारे पूजण्यास इकडे जीवाभावानें तयारी, आणि तिकडे एकमात्र उच्चारांवरच तेवढा काट मारावयाचा, हा स्वाभिमान कीं दंडेली, काय म्हणावयाचें ?

( ४ ) कांहीं नवीन शब्द पाडण्याचाहि उपक्रम करण्यांत आला आहे. उदा० ' सूडसई ' (a most unrelenting and remorseless woman ), ' साथेति ' ( स + अथ + इति=साद्यंत ), ' कोन काट ' ( angular animosities ) वगैरे, वगैरे.

( ५ ) कांहीं थोडे आमच्या वैदर्भीय भाषाप्रचारांतले शब्दहि उपयोजिले आहेत, जसें ' वोहाऱ्या ', ' एलावणें,' शेकचिल्ली,' ' एलची ' वगैरे, वगैरे. परप्रांतीयांस ते आलोळ्यांतले नसल्यामुळें कसेसेच वाटण्याचा संभव. परंतु साहित्यनिर्मिति देवघेवीसाठीं असल्याकारणानें आम्ही हा नवा परिपाठ पाडण्याची इच्छा धरली; तरीहि पण बहुतेक इतकें मात्र खास कीं व्युत्पत्ति असलेलेच शब्द प्रायः घेतले आहेत. एखाद दुसरा शब्द तसा नसेलहि कदाचित्. पण त्याच्यांत प्रांतभाषेचा अभिमान तर आहे ? मग काय कोणी या अभिमानास निंद्य म्हणणार ? आमची धारणा तर ठाम हीच आहे कीं स्वधर्म, स्वदेश, स्वकुल आणि स्वभाषा यांचा अभिमान म्हणजे निरभिमानच, आणि तो ज्यास नसेल 'स वै मुक्तोऽथवा पशुः'.

( ६ ) पूर्वार्ध म्हणजे अयोध्याकाण्डापर्यंतचें भाषांतर बहुतेक चुस्त म्हणजे मूळशब्दास धरून करण्यांत आलें आहे. पुढील भागाचें मात्र तें सैल म्हणजे मुक्तहस्त झालेलें आहे. याचें कारण वाचकांचें हिंदी भाषेचें ज्ञान वाढीस लागलें असलेंच पाहिजे हें आम्ही जमेस धरून चाललों. त्यांतल्यात्यांत फिरून ' आविर्भाव ' हेंहि एक प्रमुख कारण आहेच कीं ज्याचा होत असलेला दौरा इतका अचानक होऊन जातो कीं तो मोठ्या चाणाक्ष लेखकाच्याहि लक्षांत येऊं शकत नाहीं.

---

१ श्री. न. चिं. केळकर यांच्या ' स्वराज्याच्या मार्गांतील एक अडचण ' या विषयावरील लेखांक ३ मध्यें ते काय म्हणतात तें पहा ( केसरी ता. २४–११–३९; पान २, उपांत्य परिच्छेदाचें शेवटलें वाक्य ):—

' शिवाय हिंदी व उर्दू यांचें संमिश्रण इतकें दाट आहे कीं उर्दूचा व हिंदीचा प्रांत वेगळा करणें जवळ जवळ अशक्य आहे ! '

( ७ ) ठिकठिकाणीं विशेष उपयुक्त वाटल्यावरून नवीन टींपाहि देण्यांत आल्या आहेत. त्या प्रत्यक्ष दिसणार आहेतच, म्हणून त्या येथें सांगत बसणेंच फजूल.

( ८ ) इतरतितर ठिकाणीं कदाचित् संभव नसला तरी अंगदशिष्टाईच्या ( पा. ४९० ते ५०० ) भागांतली भाषा बरीच सैलानी वाटण्याचा संभव आहे. पण ती भाषा वाचतांना तुलसीदासांचा रावण वाल्मीकि वगैरे कवींचा रावण नसून तो अकबर बादशहा असावा असा आमचा समज आहे ( मानस–हंस—भूमिकापरिचय–पहा ), एवढें मात्र विसरूं नये. राणा प्रतापाच्या एखाद्या अस्सल इमानी, कर्तबगार आणि शूर सरदारानें अकबर बादशहाच्या गालिप्रचुर भाषेवर प्रतिभाषा कोणती वापरली असती इतकी कल्पना असली कीं पुरे. राजनीतीचा हा दंडक ठरलाच आहेः—

‘ धटासी आणावा धट । उद्धटासी पाहिजे उद्धट...
तैशास जैसा जेव्हां भेटे । तेंव्हां मजालसी बरी थाटे ’।

( दा. बो. १९।९।३० व ३१ )

येथवर या आवृत्तीच्या बाऱ्यांत वरप्रमाणें मुख्य सांगावयाचें तें सांगून झालें. आतां ‘ शिमगा सरला पण कवित्व उरलें ’ अशांतलें एक वक्तव्य सांगावेंसें वाटतें. वास्तविक त्याचा प्रस्तावनेशीं संबंध नाहीं, परंतु ‘ अग्ला गिरा पीछला हुषार ’ म्हणूनच त्याचें महत्त्व.

स्वतःच्या ग्रंथाची पुनरावृत्ति निघत असतां कोण्या ग्रंथकाराचा कलीजा आनंदानें तर्र होणार नाहीं? पण अगदीं यथार्थ समजा कीं आमचा हुरूप दृष्टावलेलाच आहे. याचें कारण ‘ **दृढप्रेमा भग्नः......स्मृतिसमुपगतोऽपि व्यथयति** ’ हें एकच. आमच्या पाहिल्या भाषांतराची झालेली कुतरओढ जर का झाली नसती तर ही इतकी विलंबलेली आवृत्ति किती तरी पूर्वींच जन्मास आली असती. पण दुर्दैव ओढवलें. आम्ही सरकारजमा असल्यामुळें त्या आवृत्तीची बुड ते शेंडा सर्व व्यवस्था आपल्या घरोब्याच्या, विश्वासू आणि अङ्कित अशा मंडळीवर आम्ही सोपून दिली. हें मंडळ साहित्यशौकी तर होतेंच पण पैकीं कांहीं धेंडे देशभक्तांतहि मोडत होतीं, पण अखेर काय तर ‘**हा हन्त हन्त नालिनीं गज उज्जहार**.’ हा सुविद्य विषगंड आणि त्याची व्यवस्था व देवघेव सोनेरी टोळीची धाड ठरली. त्या टोळीनें त्या आवृत्तीच्या सर्व नाड्या तर आखुडल्याच, पण तिचा रक्तशोषहि शेवटच्या रक्तबिंदूपर्यंत करून सोडला. तेंव्हांपासून वचक आम्हांस इतका बसली कीं आज देशभक्तीचा पिहितार्थ शिमगा, डल्लेबाजी आणि खाटिकशाही हाच प्रथम समोर उभा राहतो.

शाहाणीं माणसें नेहमीं बोलतात कीं संतांनीं लागवडलेलें पेड देव देखील एकाएकी उखडत नाहीं, मग इतर लुंग्यासुंग्या मिजासी तट्टांची मजाजच काय ? त्याचेंच हें प्रात्यक्षिक कीं आपल्या रामायणाची आवृत्ति श्रीतुलसीजींनीं आज ही काढवून घेतलीच पण तिकडे पहाल तर अखेर पळसास पानें तीनच. एवढी आग भकून देखील आमच्या उमीचंदांचें आणि कलुषांचें पाहूं गेल्यास अंदरऊपर अवघा चंद्रमौळीच प्रायः दिसून येईल–कोणास ‘ **भय रुज सोक वियोग** ’ (पा.६२४), तर कोणी ‘**मूंड मुँडाइ होहिँ संन्यासी** ’ ( पा. ६२४ ) ‘ नियत तशी बरकत ’ हें तत्त्व अशाश्वत ठरणारच कसें? अजून तरी या मळसूत्र्यांना उमगलें आहे काय कीं— ( पा. ३२५ )

**सुनु सुरेश रघुनाथ सुभाऊ । निज अपराध रिसाइ न काऊ**
**जो अपराध भक्त कर करई । रामरोस पावक सो जरई**

तात्पर्य, हरीच्या लालांना उखाड मारणाऱ्यांचा तस्माच गारद व्हावयाचा ही गोष्ट पत्थरची लकीरच समजा.

वरील भाषावेग पाहून चिडखोरपणा वाटण्याचाच जास्त संभव. म्हणून एकदम स्पष्टच जाणवून टाकतों कीं तो खराच तसा आहे. सर्वस्वीं हरतऱ्हेची झीज स्वतःवर घेऊन रामायणाच्या भाषांतरापासून छदामची देखील भरपाई न उगविणाऱ्या मनाचा तो तसा कां न व्हावा ? पारंपरिक संस्कृतांची अल्पसी तरी उपासना

भिकाबाई न भाकतां एकसतत घडत रहावी आणि देवदेशांची थोडी तरी उतराई होत असावी म्हणून नाहीं नाहीं त्या त्रांगड्यांशीं असहाय सामना देऊन इतक्या नांवारूपास आणलेल्या संपूर्ण संस्थेला सुरुंग लावून ' मूले कुठारः' करणारांचा वीट न वाटावयाचा तर मग काय त्यांचा 'एतावानस्य'गात बसावयाचा !

असो. या शोकरसानंतर आतां एक हेंहि आनंदगीत ऐका. या आवृत्तीचा योगायोग अगदीं ध्यानींमनीं नसतां अचानक कसा जुळून आला तो पहा. पुस्तकाबद्दल बाजाराची एकसारखी हाकाटी ऐकून कान किटले तरीहि पण हिरमुसून हात गुंडाळून बसण्यापरता कांहींच शक्य नव्हतें. अशा जडमूढावस्थेंत श्री. प्रो. न. र. फाटक ( मुंबई ) यांच्या भेटीचा योग अगदीं अकस्मात् आला—किंबहुना त्यांनींच तो आणला हेंच म्हणणें जास्त रास्त. लगेंच त्याच भेटींत त्यांनीं आमच्या पांगुळ मनास पाय फोडले. भाषांतराच्या दुसऱ्या आवृत्तीचें तत्काळ ठरलें. थोड्याच अवकाशांत ' **चित्रशाळे** ' चें मुद्रणाहि ठरलें, पण त्याचा हि जरिया तेंच.

भाषांतराच्या या आवृत्तीच्या आशेचा कोठेंहि अंशुक किरणाहि नसतां **प्रो. फाटकांनीं** घरबैठे आम्हांस येऊन भेटणें आणि त्या भेटींतून भाषांतरास दुसरा जन्म मिळणें या घटनेस काकतालीयन्यायाच्या सदरांत घालणारे भलेहि घालोत, पण आम्ही मात्र तो सुरवातीस म्हटल्याप्रमाणें श्रीतुलसीबाबांचा संकल्प आणि आशीर्वादच म्हणूं.

तरीहि पण द्वारपूजा कधींच चुकत नाहीं. ती चुकविणाराची देवपूजाहि चूकच. फार काय, पण मुक्तांना देखील कृतज्ञता सुटूं शकत नाहीं, तेथें इतर पामरांची वार्ताच काय ! आणि म्हणूनच सर्वांना **प्रोफेसरसाहेबांचे** आणि ' **चित्रशाळा प्रेस** 'चे आभार मानणेंच भाग.

स्वतःबद्दल सांगावयाचें म्हणजे आमच्या व्यक्तीवर झालेले त्यांचे उपकार खरेच मोलमापातीत आहेत. याचें कारण हें. वर जी ' उजरे हरख ' ( पा. ५, मसणसोट, उजाडभोपे, समाजकंटक ) सोनेरी टोळी आम्हीं सांगतली तींतला एक पक्का गिरधान असेंहि धूम बेंबाळत सुटला कीं तुलसीरामायण भाषांतरित केलें तें त्यानेंच, आणि आम्ही बट्ट्याबोळ नुसते कुंकवाचे धनी मात्र. **प्रो. फाटकांनीं** आज ' काकः काकः पिकः पिकः ' ठरविलें, त्या पोंड्याच्या नरड्यांत पक्का दाट भरला, आणि प्रत्यक्ष सूर्य दाखवून जयद्रथाची कुर्ची भरली. झालें हें जरी कोणास मृच्छकटिकापरी दिसत असलें तरी आमचा आत्माराम **प्रो. साहेबांना** काय दुवा देत असेल तें सांगणें केव्हांहि शक्य नाहीं. त्यांच्या तुलसीरामायणसंबंधीं प्रेमानुष्ठानाच्या श्रेयाचा प्रश्न सोडविण्यास समर्थ एक श्रीतुलसीबाबाच आहेत, आणि त्यांनाच तो सोडविण्याची आमची प्रार्थना आहे. स्वतंत्रपणें आमच्यासारख्या शून्यप्रायाकडून परमकृतज्ञतापूर्वक एका ' नमः ' च्या पलीकडे आमच्यांत आवच काय !

परंतु वरील आभारप्रदर्शनामुळें जी एक फार जबर त्रुटि डाचते तिजमुळें आम्ही आणि श्री. फाटकमहाशय उभयतांहि निःसंशय दुःखी होणारच. याचें कारण आम्ही उभयतांचे अत्यंत लडिवाळ स्नेही **कै. कवी जयकृष्णपंत उपाध्ये**—ज्यांच्या माध्यमानें आमचा उभयान्वय घडवून आणला ते—आज अव्यय स्वरूपांत आहेत. त्या अव्यय रूपानेंच आमच्या पाहिल्या भाषांतराच्या आवृत्तीस या आवृत्तिद्वारा अव्यय केलें हेंच वस्तुदृष्ट्या खरें. आणि म्हणून आम्हांस अगदीं प्रथम नुन्यहे तेच.

अगदीं अखेर सांगावयाचें म्हणजे या आवृत्तीचे वेळीं आमची साठी उलटून वर जवळ जवळ एका दशकाच्या पुढ्यांत आम्ही शिरलेलों. वयाचे गुणदोष बुद्धीस साधकबाधक होणारच, आणि अर्थातच ते अक्षरसमाम्नायावर उमटणारच. म्हणून विनवणी ही कीं निसर्गाकडेस जरा डोळेझाक करून महाराष्ट्रानें आमच्या पाहिल्या आवृत्तीस जसें आपुलकीनें पाहिलें तसेंच या आवृत्तीसहि वर्तवून घ्यावें. ' विषवृक्षोऽपि संवर्ध्य स्वयं छेत्तुमसाम्प्रतम् ' आहे ना ? मग हा आवृत्ति तर अमृतवल्लीच ! तीस आमच्या वैय्यक्तिक दोषास्तव इंद्राय स्वाहा तक्षकाय स्वाहा म्हणून महाराष्ट्र उपेक्षिणार काय ?

झाली, प्रस्तावना येथें उरकली. आतां सद्गुरु आणि संत यांच्या पादपोषांचे आभार मानून शेवट करावयाचा. याचें कारण असें. तुलसीरामायणासारखा पदीं पदीं इतक्या अनिर्वाच्य प्रेमानें साद्यंत ओथंबलेला काव्यबद्ध चरित्रग्रंथ मराठी भाषेंत दुर्मिळ असें विचारांतीं आमचें ठरतें. ह्याची योग्यता खुद्द कवीनें

म्हटल्याप्रमाणें अगदीं तंतोतंत उतरते. ' रामभगत अब अमिय अघाहू। कीन्हेहु सुलभ सुधा वसुधाहू ' (पा. ३२० यांतला 'अब' (= आतां ) अत्यंत मार्मिक आणि महत्त्वाचा आहे ) ही ती योग्यता. संसाराचा गाडा जन्मभर घाण्याच्या बैलासारखा वाहून आणि स्त्रीपुत्रविरहादि नाना यातनांनीं जळून पोळून अगदीं अखेरच्या काळांत देव, देश आणि संस्कृति यांची सेवा एवढी तरी भाषांतराच्या दोन आवृत्ति-रूपानें ज्यांनीं घडविली त्या पादपोषांचे उपकार स्मरल्यावांचून कृतज्ञ मनाची खरख कशी बरें बुजणार ?

नागपुर पौष कृ. ८ गुरुवार शके १८६१ } यादव शंकर जामदार
ता. १।२।१९४० } भाषांतरकार.

# श्री गोस्वामी तुलसीदासजी यांचें जीवन--चरित्र

श्रीवाल्मीकिचि झाला श्रीतुलसीदास रामयश गाया ।
तरिच प्रेमरसाची खाणी वाणी तशीच वश गा या ॥

श्रीमयूरकवि.

श्रीतुलसीदासजींच्या चरित्रासंबंधानें मिळावी तशी सुसंगत, एकत्रित व विश्वसनीय अशी माहिती मिळत नाहीं ही फार खेदाची गोष्ट आहे. त्यांच्या समग्र ग्रंथांत स्वतःविषयीं म्हणण्यालायक वृत्तांत अथवा उल्लेख त्यांनीं केलेला आढळत नाहीं. त्यांच्या मातापितरांचीं नांवें, त्यांचा वंशवृत्तांत, तसेंच आप्तसंबंध याविषयींचा किंवा गोसांईजींच्या स्वतःच्या जीवनक्रमाविषयींचा कालबद्ध इतिहास एखाद्याहि दोह्यांत किंवा चौपाईंत ग्रथित केलेला सांपडत नाहीं. अथवा याबद्दल आश्चर्य वाटण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. प्रभु श्री. रामचंद्राच्या अनन्य भक्तींत ज्यांची चित्तवृत्ति अखंड रममाण झाली, किंबहुना, सागरांत ज्याप्रमाणें जल-बिंदु अभेदस्वरूपानें राहतो त्याप्रमाणें परमात्मस्वरूपीं नित्य विलीन झालेल्या तुलसीदासासारख्या स्थितप्रज्ञांना स्वतःविषयीं वर्णनपर लिहिण्यास अवसर सांपडूं नये यांत कांहींच नवल नाहीं. ऐतिहासिक दृष्ट्या ह्यांच्या जीवनचरित्राच्या अभावामुळें जरी वाचकांना थोडी हळहळ वाटली तथापि त्यामुळें तुलसीदासांच्या साधुत्वा-विषयीं आणि निरभिमानतेविषयींचा त्यांचा आदर सहस्रपटीनें वाढल्यावांचून राहणार नाहीं.

तुलसीदासांचा जन्म इ. स. १५३३ त झाला. त्यांच्या जन्मस्थानाविषयीं पुष्कळ मतें प्रचलित आहेत, तथापि उत्तर हिंदुस्थानांतील राजापूर येथें अस्तित्वांत असलेलीं गोसांईजींचीं स्थानें आणि विशेषतः त्यांच्या ग्रंथांतील भाषेचें राजापुरी भाषेशीं असलेलें साम्य इत्यादि कारणांमुळें बहुतेक हिंदी पंडित राजा-पुरासच तुलसीदासाचे जन्मस्थानाचा मान देतात. तुलसीदास हे पराशरगोत्री शरयूपारी ब्राह्मण असून त्यांचें उपनांव दुबे होतें. त्यांच्या पित्याचें नांव आत्माराम असून आईचें नांव हुलसी होतें. व त्यांचें मूळ नांव रामबोला असें होतें. तुलसीदासांचा जन्म अभुक्तमूल योगावर झाला. महाराष्ट्र संतकवि श्रीएकनाथाप्रमाणें त्याचा बालपणींच मातापितरांपासून वियोग झाला. मग जन्मतःच त्यांचे मातापिता मृत्यु पावले असोत किंवा आपल्या मूळावर अवतरलेल्या या पराक्रमी मुलाचें मुखावलोकनहि झाल्यास अनर्थकारक होईल या भीतीनें त्यांनीं तुलसीदासांचा त्याग केलेला असो. तुलसीदासांचे ग्रंथांत बालपणापासून मातृपितृवियोग झाल्याचे उल्लेख सांपडतात. यावरून त्यांस मातृसुख आणि पितृशिक्षा यांचा लाभ घडला नाहीं ही गोष्ट निर्विवाद ठरते. आत्माराम दुबे हे अकबर बादशहाचे चाकरींत असून महान् धर्मशील आणि पुण्यचरित होते आणि तुलसीदासांची मनोभूमिका या आनुवंशिक संस्कारानें पावन झाली होती.

## श्रीतुलसीदासांचे गुरु.

आईबापांचा वियोग झाल्यावर तुलसीदासांना संतांचा समागम घडला. आणि त्यांच्या सहवासांत ते तीर्थाटन करूं लागले. या प्रवासांतच त्यांनीं श्री नरहरि महाराजांस गुरु केलें असें दिसतें. श्री नरहरि महाराज त्या प्रांतांत प्रसिद्ध सत्पुरुष म्हणून गाजलेले होते व त्यांचा अधिकार फार मोठा होता.

## श्रीतुलसीदासांची परंपरा.

| | | | |
|---|---|---|---|
| १ श्रीमन्नारायण | २ श्रीलक्ष्मी | ३ श्रीधरमुनि | ४ श्रीसेनापतिमुनि |
| ५ श्रीकारिसूनुमुनि | ६ श्रीसैन्यनाथमुनि | ७ श्रीनाथमुनि | ८ श्रीपुंडरीक |
| ९ श्रीराममिश्र | १० श्रीपारांकुश | ११ श्रीयामुनाचार्य | १२ श्रीरामानुजस्वामी |
| १३ श्रीशठकोपाचार्य | १४ श्रीकूरेशाचार्य | १५ श्रीलोकाचार्य | १६ श्रीपराशराचार्य |
| १७ श्रीवाकाचार्य | १८ श्रीलोकाचार्य | १९ श्रीदेवाधिपाचार्य | २० श्रीशैलेषाचार्य |

| | | | |
|---|---|---|---|
| २१ श्रीपुरुषोत्तमाचार्य | २२ श्रीगंगाधरानंद | २३ श्रीरामेश्वरानंद | २४ श्रीद्वारानंद |
| २५ श्रीदेवानंद | २६ श्रीश्यामानंद | २७ श्रीश्रुतानंद | २८ श्रीनित्यानंद |
| २९ श्रीपूर्णानंद | ३० श्रीहर्यानंद | ३१ श्रीश्रय्यानंद | ३२ श्रीहरिवर्यानंद |
| ३३ श्रीराघवानंद | ३४ श्रीरामानंद | ३५ श्रीसुरसुरानंद | ३६ श्रीमाधवानंद |
| ३७ श्रीगिरीबानंद | ३८ श्रीलक्ष्मीदासजी | ३९ श्रीगोपालदासजी | ४० श्रीनरहरिदासजी |
| ४१ श्रीतुलसीदासजी | | | |

वरील परंपरेंत श्रीनाथमुनि, श्रीरामानुज स्वामी,आणि श्रीरामानंद हे परमविख्यात असून रामानुजांचा ग्रंथहि सर्वज्ञात आहे.

## श्रीतुलसीदासांचा गृहस्थाश्रम आणि विरक्ति

तुलसीदासांचा विवाह दीनबंधु पाठक यांची कन्या रत्नावली इच्यार्शी झाला व त्यांना तारक नांवाचा पुत्र होऊन तो बालपणींच मृत्यु पावला. रत्नावलीवर तुलसीदासांचें अत्यंत प्रेम होतें. किंचित्कालहि तिचा वियोग त्यांना सहन होत नसे. एके दिवशीं रत्नावली त्यांना न विचारतां माहेरीं गेली. गोसांईजींना तिचा वियोग सहन न होऊन ते मध्यरात्रीं श्वशुरगृहीं तिला भेटण्याकरितां गेले आणि रत्नावलीस जागृत करून तिच्या सन्मुख उभे राहिले. रत्नावलीस पतीस अशा वेळीं पाहतांच अत्यंत आश्चर्य वाटलें आणि पतीचा धिक्कार करण्याचें उद्देशानें तिनें पुढील उद्गार काढले:—

**दो०—लाज न लागत आपु को दौरे आएहु साथ ।**
**धिक धिक ऐसे प्रेम को कहा कहहुँ मैं नाथ ॥**
**अस्थि-चरम-मय देह मम ता मैं जैसी प्रीति ।**
**तैसी जौं श्रीराम महँ होत न तौ भव भीति ॥**

हे पत्नीचे वाग्बाण गोसाईजींना फार झोंबले व तिच्या ठिकाणीं असलेल्या आसक्तीचा पूर्ण निःपात होऊन त्यांची चित्तवृत्ति तितक्याच उत्कटतेनें आणि एकात्मकतेनें परमेश्वराचे चरणीं लीन झाली. वैराग्यपूर्ण अंतःकरणानें त्यांनीं रत्नावलीचा निरोप घेतला. रत्नावलीनें त्यांना अनेक प्रकारें राहाण्याविषयीं आग्रह केला, परोपरीनें त्यांची विनवणी केली; निदान अन्नग्रहण करून मार्गक्रमण करावें, अशी विनंति केली; परंतु त्यांचे हृदयांत रत्नावलीचे जागीं आतां दुसरी देवता अधिष्ठित झाल्याकारणानें तिच्या प्रेमळ वचनाचा तुलसीदासांचे विरक्त मनावर यत्किंचित्‌हि परिणाम झाला नाहीं.

**दो०—कटे एक रघुनाथ सँग बाँधि जटा सिरकेस ।**
**हम तो चाखा प्रेमरस पत्नी के उपदेश ॥**

या तुलसीदासांच्या दोह्यावरून भार्येच्या वचनाचा त्यांच्या मनावर किती परिणाम झाला हें स्पष्ट दिसतें. रत्नावलीचा परित्याग करून तुलसीदास पावनक्षेत्र काशी येथें आले आणि नंतर प्रयाग, चित्रकूट, कुरुक्षेत्र, वृंदावन, पुरुषोत्तमपुरी (जगन्नाथ),सूकरक्षेत्र,मथुरा, अयोध्या इत्यादि अनेक तीर्थक्षेत्रांचे ठिकाणीं ते राहूं लागले.

## श्रीतुलसीदासांचीं निवासस्थानें.

तुलसीदासांनीं श्रीनरहरिमहाराजांपाशीं ग्रंथाध्ययन केलें. नरहरिमहाराजांशीं त्यांचा संबंध प्रायः बालपणापासूनच होता. ते प्रवासांत राहिले आणि त्यांनीं ग्रंथरचना केली. प्रवासांत असतांना ठिकाठिकाणचे लोकांना त्यांनीं भक्तीचा उपदेश केला. गोसांईजी अयोध्या, चित्रकूट, काशी, वगैरे ठिकाणीं राहत असत. परंतु त्यांचें मुख्य आवडीचें वसतिस्थान काशी हें होय. काशींत त्यांच्या राहण्याच्या चार जागा विशेष प्रसिद्ध आहेत व त्या ठिकाणीं गोसांइजींचीं स्मृतिचिन्हें अजूनहि दाखवितां येतात. ( १ ) " अस्सी. "

येथें तुलसीदासांचा घाट असून हनुमान् मंदिराची स्थापना केलेली आहे. ( २ ) प्रल्हादघाट. ( ३ ) संकटमोचन हनुमान्. ( ४ ) गोपालमंदिर. हे बिंधुमाधवाचे जवळ आहेत. यांपैकीं त्यांचें अत्यंत प्रिय निवासस्थान अस्सी हें होतें. मुसलमान, वल्लभानुयायी, आणि तुलसीदासांचें तेज ज्यांना दुःसह झालेलें होतें, अशा पुष्कळशा लोकांपासून बराच उपसर्ग होत असल्याकारणानें त्यांना हीं स्थानांतरें करावीं लागत. अखेरपर्यंत ते अस्सी घाटावर राहिले; आणि ज्या रामलीलांचा पुढें सर्वत्र प्रसार झाला व ज्यांच्यामुळें रामनामाची गर्जना सर्व उत्तरहिंदुस्थानभर चिरस्थायी झाली त्या रामलीलांचा प्रारंभ तुलसीदासांनीं ह्याच ठिकाणीं केला असें दिसतें. श्रीरामचरितमानसाची पूर्तता अस्सी घाटावरच झाली असें एक पक्ष म्हणतो, तर दुसरा पक्ष त्या पूर्ततेचें श्रेय अयोध्येस देतो.

तुलसीदासजी भृगुआश्रम, हंसनगर, परसिया, वगैरे ठिकाणीं गेले. गायघाटचा राजा गंभीरदेव याचे नगरींत कांहीं दिवस वास करून ते ब्रह्मपूर येथें आले. तेथील महादेवाचें दर्शन घेऊन ते कांतनामक गांवीं गेले. पुढें त्यांची व कांत गांवच्या सांवरू अहीराचा पुत्र मंगरू अहीर याची गांठ पडली. मंगरूनें त्यांचें अपूर्व स्वागत केलें आणि प्रभुचरणारविंदीं दृढविश्वास, आणि वंशवृद्धि असावी असे वर मागितले. त्यावर तुलसीदासांनीं त्याला चौर्यकर्मापासून परावृत्त केलें आणि सन्मार्गोपदेश दिला. तदनंतर गोसांईजी बेलापतौत गांवीं आले, व त्याचें वेडेंवांकडें नांव बदलून त्याला रघुनाथपूर असें भक्तिभावसूचक नांव देऊन तेथील लोकांना भक्तीचा उपदेश केला. फिरतां फिरतां एके दिवशीं तुलसीदास यदृच्छेनें श्वशुरगृहीं प्राप्त झाले. श्वशुरगृहाची ओळख त्यांना न पटल्यामुळें स्ववृत्त्यनुरूप आचरण करण्यांत ते काळ घालवूं लागले. त्यांची पत्नी या समयीं फार वृद्ध झालेली होती. आणि पतिवियोगामुळें तिच्यांत पुष्कळ स्थित्यंतर झालेलें होतें. त्यामुळें गोसांईजींना पत्नीची ओळख पटली नाहीं. रत्नावलीनें मात्र पतीला ओळखलें आणि त्यांना सेवा करूं देण्याविषयीं आग्रहाची विनंति केली. परंतु त्यांनीं तिच्या विनंतीचा अंगीकार केला नाहीं. शेवटीं त्यांच्या पूजेकरितां कर्पूरादि द्रव्य आणण्यासाठीं तिनें स्वजनांस सांगितलें तेव्हां सर्व पूजासामग्री माझे झोळण्यांत सिद्ध आहे असें तुलसीदासांनीं उत्तर दिलें.हा प्रकार पाहून आणि गोसांईजींच्या निःस्पृहतेनें थक्क होऊन रत्नावलीस सदैव पतिसमागमांत राहण्याची आणि अवशिष्ट आयुष्य सत्संगतींत कृतार्थ करण्याची इच्छा उत्पन्न झाली.पूर्ण विचाराअंतीं तिनें पतीस स्वस्वरूपाची जाणीव दिली व आपला मानस व्यक्त केला. तुलसीदासांनीं तिची विनंति अमान्य केली तेव्हां,

**दो०—खरिया खरी कपूर लौं उचित न पिय तिय त्याग।**
**कै खरिया मोहि मेलि कै अचल करहु अनुराग ॥**

या वचनांनीं तिनें त्यांना अडविण्याचा प्रयत्न केला. तेव्हां तुलसीदासांनीं झोळण्यांतील सर्व वस्तु ब्राह्मणांस वांटून दिल्या व रत्नावलीस निरुत्तर केलें. परंतु तिजबद्दल स्वतःची कृतज्ञता अशा रीतीनें अजरामर करण्यास मात्र ते विसरले नाहींत.

**जिमि कुलीन तिय साधु सयानी। पतिदेवता कर्म–मन–बानी**
**रहइ करमबस परिहरि नाहू। सचिवहृदय तिमि दारुनदाहू** ( पा. २८६ )

याप्रमाणें परमेश्वरभक्तींत आणि रामयशोगायनांत आपलें आयुष्य घालवून तुलसीदासांनीं आपला अवतार समाप्त केला. त्यांचे मृत्युसंबंधीं पुढील दोहा प्रसिद्ध आहे.

**दो०—संवत सोरहसे असी असी गंगके तीर।**
**सावन सुक्ला सप्तमी तुलसी तज्यो सरीर ॥**

यावरून श्रावण शुद्ध ७ विक्रम संवत् १६८० त इ० स० १६२३ रोज गुरुवार जुलैचे २४वे तारखेस श्रीक्षेत्र काशी येथें गंगातीरीं आपल्या प्रिय निवासस्थानीं अस्सी घाटावर तुलसीदासांनीं आपली ज्योत ईश्वरी

ज्योतींत विलीन केली. त्यांचें वय मरणसमयीं ९०।९१ वर्षांचें होतें. विशेष नमूद करण्यासारखा अजब योगायोग हा कीं त्या वेळेस टाकळीस श्रीसमर्थांचें गायत्रीपुरश्चरण जोरांत चालू होतें.

## तुलसीदासांचे मित्र व भक्त.

तुलसीदासांचा कीर्तिपरिमल सर्वत्र दरवळल्यानें पुष्कळ लहानथोर पुरुषांनीं त्यांची संगति जोडली. कांहीं त्या काळचे प्रमुख राजकारणी रणशूर पुरुष तुलसीदासांचे मित्रमंडळांत मोडत असत. टोडर नांवाचे एक बडे जमीनदार काशींत होते.त्यांचें पूर्वचरित्र साधुछलांत गेलें.टोडर आणि तुलसीदास हे अत्यंत प्रेमभावानें वागत. टोडरचे मृत्यूनंतर त्याचे मिळकतीविषयीं त्याचे वारसदारांत लढा पडला होता, त्यांत गोसांईजींनीं मध्यस्थाचें काम केलें होतें असें दिसतें.अकबराचे वजीर नबाब खानखाना आणि रजपुतांच्या कुलांत अत्यंत प्रसिद्ध आणि बादशाहा अकबर ह्याचा साह्यकर्ता म्हणून गाजलेला महाराजा मानसिंह आणि मानसिंहाचा बंधु जगत्सिंह हे तुलसीदासांचे परम मित्र होते, असें म्हणतात. तसेंच प्रसिद्ध भगवद्भक्त मिराबाई इनें घरांतील छळामुळें त्रासून तुलसीदासांस उपदेश करण्याविषयीं पत्र लिहिलें आणि त्यांनीं तिला गृहत्याग करण्याचा उपदेश केला, असें म्हणतात. मिराबाई ही मेरताचे राजाची कन्या असून उदेपूरचा राणा संग्रामसिंह याच्या पुत्राशीं तिचें लग्न झालें होतें. परंतु संसाराकडे तिचें लक्ष नसल्यामुळें तिचें व पतीचें पटेना. तिचीं काव्यें सुप्रसिद्ध आहेतच. तसेंच रासपंचाध्यायीचा कर्ता नंददास हा गोसांईचा परममित्र होता.सूरदास, कुंभनदास, परमानंददास, कृष्णदास, शीतस्वामी, गोविंदस्वामी, चतुर्भुजदास, आणि नंददास हे जे हिंदी कविमंडळांतील अष्टक प्रसिद्ध आहे त्यांपैकीं हा एक होता. हा वल्लभानुयायी होता. त्याचप्रमाणें शंकरमतानुयायी मधुसूदनदासांची तुलसीदासांवर सुप्रसन्न मर्जी होती असें म्हणतात. गोसांईजींचा व त्यांचा वादविवाद होत असे. मधुसूदनसरस्वतींनीं त्यांच्या स्तुतिपर केलेला पुढील अनुष्टुप् प्रसिद्ध आहे.

**आनंदकानने कश्चिज्जंगमस्तुलसीतरुः । कवितामंजरी यस्य रामभ्रमरभूषिता ॥**

तुलसीदासकालीन संत आणि कवि नाभादास यांनीं तुलसीदासांचें स्तवन आपल्या "भक्तमाला" ग्रंथांत केलेंच आहे. यांची मैत्री विरोधांत सुरू होऊन पुढें निर्मल प्रेमांत परिणत झाली. त्याचप्रमाणें सुप्रसिद्ध कवि घनःश्याम शुक्ल, प्रयागचे गोस्वामी मुरारजी देवजी, स्वामी दयानंदजी, संडीलचे स्वामी नंदलाल, अयोध्येचे महात्मा मुक्तामणिदास, मंडिआउँचें भीष्म व रसुलाबादचे माधवदास हे तुलसीदासांचे समकालीन मित्र होते. गोसाईजींचा मित्रपरिवार फार मोठा होता, त्या सर्वांचा ह्या ठिकाणीं नामनिर्देश करणेंसुद्धां अशक्य आहे.

## तुलसीदासांचे ग्रंथ.

तुलसीदासांनीं अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांतील कांहीं आज उपलब्ध नाहींत ही दुर्दैवाची गोष्ट आहे. त्यांच्या ग्रंथांची जी नांवनिशी प्रसिद्ध आहे त्याशिवाय आणखीहि ग्रंथ त्यांनीं लिहिले असले पाहिजेत. तुलसीदासांच्या ग्रंथांची जी यादी प्रसिद्ध आहे ती येणेंप्रमाणें:—

१. कवितावली—रामायण
२. छप्पय—रामायण
३. पद्मावली—रामायण
४. छंदावली
५. रामचरितमानस
६. गीतावली—रामायण
७. बरवै—रामायण
८. कुंडलिया—रामायण
९. कडखा—रामायण
१०. झूलना—रामायण
११. रोला—रामायण
१२. रामाज्ञा
१३. रामलला—नहच्छू
१४. पार्वतीमंगल
१५. जानकीमंगल
१६. कृष्ण—गीतावली
१७. हनुमद्बाहुक
१८. संकटमोचन

| | |
|---|---|
| १९. रामसलाका | २५. कलिधर्माधर्मनिरूपण |
| २०. वैराग्यसंदीपनी | २६. ज्ञानकोपरिकरण |
| २१. हनुमान चालीसा | २७. मंगल रामायण |
| २२. रामसतसई | २८. गीताभाष्य |
| २३. विनयपात्रिका | २९. राममुक्तावली |
| २४. दोहावली | ३०. ज्ञानदीपिका |

## तुलसीदासांचे ग्रंथाची भाषा.

तुलसीदासांनीं आपल्या ग्रंथांत विविधप्रकारची भाषा उपयोगांत आणली आहे. परंतु प्राधान्येंकरून त्यांनीं अवधी ( औधी ) भाषेचा उपयोग केला आहे. अवधीभाषेशिवाय व्रजभाषा, प्राकृतसंस्कृतमिश्रित भाषा, वेसवाठी, इत्यादि भाषांचाहि त्यांनीं अवलंब केला आहे. त्यांच्या भाषेंत संस्कृत कविता व संस्कृत शब्द तर आहेतच परंतु आरबी, तुर्की, फारशी शब्दहि आढळतात. आणि क्वचित् प्रसंगीं गांवढळ भाषेचाहि अंगीकार केलेला दिसतो. एकंदरींत भाषेसंबंधीं तुलसीदास निरंकुश होते असें म्हटलें तरी चालेल. मनांतील आशय प्रगट होण्यासाठीं ज्या ज्या भाषाप्रकारांचा व शब्दांचा उपयोग होणें इष्ट होतें त्या त्या भाषांचा व शब्दांचा त्यांनीं उपयोग केलेला आहे, व याचमुळें त्यांच्या काव्यांत सरलता, अकृत्रिमता, आणि अस्खलितपणा इत्यादि गुण उतरले आहेत. त्यांची वाणी प्रासादिक, भाषा सुलभ, व रसोद्दीपक असून हृदयाह्लादनीय आहे. तुलसीदासांची कविता भक्तिरसानें ओथंबलेली आहे. रामचरितरसाचें अहर्निश पान करून मत्त झालेल्या कविकोकिलानें कर्णकठोर आलाप काढणें शक्यच नाहीं.तुलसीदासांची कविता भक्तिरसप्रधान असून नानाभावयुक्त आणि सर्वरसप्रचुर आहे.तुलसीदासांचा काव्यौघ ज्या ज्या रसप्रदेशांतून वाहतो त्या त्या रसप्रदेशांचे गुणधर्मांचा पूर्ण आविर्भाव दाखविल्याशिवाय रहात नाहीं.कवितावलींतील सवाई, घनाक्षरी वगैरे वृत्तांतील अत्यंत जोरदार रचना, हनुमद्बाहुकांतील प्रौढता आणि प्रतिभासंपन्नता, गीतावली रामायणांतलि गंभीर व उदात्त शृंगार आणि अंतःस्फूर्तिकारक वीररस व भाषालालित्य, तसेंच शब्दमाधुर्यादि गुण केवळ प्रशंसनीय आहेत. कृष्णगीतावलींतील बाललीला, उखलबंधन, गोवर्धनधारण, कृष्णस्वरूपवर्णन, मथुरागमन, गोपीविरह, उद्धवसंवाद, द्रौपदीवस्त्रहरण, इत्यादि प्रसंग फारच बहारीचे व चटका लावून सोडणारे आहेत. संस्कृतप्राकृतमिश्रित काव्यें विनयपत्रिकेंत पुष्कळ आहेत. तुलसीदासांनीं संस्कृत काव्यरचनाहि थोडीबहुत केलेली आहे यावरून त्यांचा संस्कृतवाङ्मयांत पाण्डित्यपारिचायक प्रवेश खास होता एवढें सिद्ध होतें. परंतु गोसांईजींच्या सर्व ग्रंथांमधील ग्रंथराज रामचरितमानस अथवा तुलसीरामायण हाच होय. हिंदी सारस्वतांत या ग्रंथाइतका लोकप्रिय दुसरा ग्रंथ नाहीं. हा ग्रंथ गोसांईजींनीं आपल्या ४२ वे वर्षीं लिहिण्यास प्रारंभ केला, पण तो केव्हां संपविला हें मात्र निश्चयानें सांगतां येत नाहीं. हा ग्रंथ त्यांनीं नाना संस्कृतरामायणांच्या आधारें लिहिला असें ग्रंथाचे आरंभींच लिहिलें आहे. तुलसीरामायण आणि वाल्मीकी-रामायण वगैरे यांत कांहीं कथांबद्दल भेद दिसून येतो.

## श्रीतुलसीरामायण.

तुलसीरामायण सर्वगुणांनीं अत्यंत श्रेष्ठ आहे. यमकानुप्रासावर जरी गोसांईजींचें विशेष प्रेम होतें असें दिसत नाहीं, तथापि रामायणांत बहुतेक सर्वत्र वरील अलंकार प्रवाहपतितच आले आहेत. दृष्टान्त-विषयांत तर तुलसीदासांचा हातखंडा आहे. त्यांचें उपमाचातुर्य हिंदी ग्रंथभांडारांत अद्वितीय आहे. अर्थान्तरन्यासादि अलंकारांचीं सुंदर व समुचित उदाहरणें रामायणांत अनेक आहेत. रूपकालंकारप्रावीण्य कित्येक ठिकाणीं उत्तमत्वानें दृष्टीस पडतें. स्वभाववर्णन, निसर्गवर्णन, कालवर्णन, ऋतुवर्णनं, वस्तुवर्णन, इत्यादि फारच चांगलीं साधल्याचीं रामायणांत असंख्य उदाहरणें आहेत. नाना रस व नाना भाव तर दासीप्रमाणें सदर ग्रंथांत उभे आहेत. रामचंद्रांची बाललीला, सीतास्वयंवर, धनुष्यभंग, परशुरामसंवाद, अयोध्याकांडांतील रामभरतसंवाद हे प्रसंग अत्यंत बहारीचे आहेत. भरताचें गुणवर्णन व त्याची रामभक्ति

इतक्या उज्ज्वलतेनें कवींनीं गाइली आहे कीं रामायणांतील नायक भरत आहे कीं रामचंद्र आहेत असा व्यामोह त्या प्रसंगीं उत्पन्न होतो. सेवाधर्माचें ऐहिक व पारमार्थिक रहस्य आणि स्वामिसेवकांचे अनन्य व अन्योन्य संबंध हे तुलसीदासांनीं इतक्या उत्कृष्ट रीतीनें रेखाटले आहेत कीं त्याला हिंदी भाषेंत इतरत्र तोड सांपडणेंच कठीण. रावणाचा पृथ्वी कंपित करणारा उन्माद, दुराग्रह व त्याचें अतुलित शौर्य या सर्वांचे फारच उत्कृष्ट रीतीनें वर्णन आलें आहे. सीतादेवीच्या पातिव्रत्याचा प्रभाव वर्णन करण्यांत भरतखंडांतील प्रत्येक भाषेंतील उत्कृष्ट कवींनीं आपल्या बुद्धीची पराकाष्ठा केली आहे. त्याचप्रमाणें तुलसीदासहि सीतेच्या पतिप्रेमाचें वर्णन करीत असतां रंगून गेलेले दिसून येतात. दशरथाच्या पुत्रप्रेमाचें वर्णन गोसांईजींनीं फारच मनोवेधक व हृदयभेदक अशा रीतीनें केलें आहे. मारुतीची सेव्यभक्ति वर्णन करितांना तुलसीदासांचें तादात्म्य झालेलें दिसून येतें. याशिवाय प्रसंगोपात्त आलेल्या अहिल्योद्धार, सुतीक्ष्णभेट, शबरीभेट, इत्यादि प्रसंगाचें गोसांईजींनीं केलेलें वर्णन वाचलें असतां कवीच्या अंतरंगाचेंच केवळ तें शब्दचित्र आहे, असें वाचकांना वाटल्यावांचून राहणार नाहीं. तुलसीदास हे महान् भगवद्भक्त होते. भक्तीमुळेंच त्यांनीं वैराग्याची आणि ज्ञानाची प्राप्ति करून घेतली, म्हणून रामायणांत जेथें जेथें प्रेमाचा, भक्तीचा, वैराग्याचा व ज्ञानाचा प्रसंग आला आहे तेथें तेथें गोसांईजींनीं त्या त्या भावनेशीं आपली तन्मयवृत्ति किती झाली आहे हें स्पष्ट सिद्ध करून दाखविलें आहे. त्याचप्रमाणें राजनीति आणि प्रजेची इतिकर्तव्यता याविषयींची गोसांईजींची कल्पना उभयपक्षांना इहपर श्रेयस्कर होईल अशीच आहे व रामराज्य हें उभयपक्षीं कर्तव्यजागृति असल्यानें समाजाला कसें सुख मिळतें याचें मूर्तिमंत आदर्शतुल्य उदाहरण आहे. उत्तरकांडांतील भक्तीचें सुरस माहात्म्य आणि कलियुगाची अनिष्ट स्थिति यांचें यथातथ्य वर्णन प्रस्तुत कालीं लोकांनीं अवश्य मनन करण्याजोगें आहे. एतावता तुलसीरामायण हा ग्रंथ व्यावहारिक आणि प्रापंचिक दृष्टीनें देखील प्रत्येक सहृदय माणसानें एकवार मननपूर्वक अवलोकन करण्यासारखा आहे यांत संदेह नाहीं. रामायण ही संतांची वाणी आहे; आणि म्हणूनच त्या वाणीचा अल्पदेखील परिचय झाला असतां तो सुखाला कारणीभूत झाल्यावांचून राहणार नाहीं.

हिंदी सारस्वतांत ज्याप्रमाणें तुलसीदास हे कविशिरोमणि म्हणून विराजमान आहेत त्याप्रमाणें संतमंडळांतहि त्यांची गणना प्रमुखत्वानें केली जाते. महाराष्ट्रांतील प्रमुख कवि ज्याप्रमाणें संत होते त्याचप्रमाणें तुलसीदास हे संतकवि होऊन गेले. परमेश्वरीकृपा ही काव्यस्फूर्तीची खरी जननी होय हा जो सिद्धांत हिंदुस्थानांत सर्वत्र अबाधितपणें दिसून येतो त्याच सिद्धांताला तुलसीदासांची काव्यकुशलता आणि साधुत्व हीं दोन्हींहि पोषक झालीं आहेत. पाण्डित्याची भर घालून वर्गीकरण होऊं घातल्यास मात्र श्रीएकनाथ, वामनपण्डित इत्यादि विद्वत्परिषदेंत उच्चासनाचे अधिकारी असेच तुलसीदास गणले जातील. असो. तुलसीदासांनीं ज्याप्रमाणें आपल्या वाणीनें आर्यधर्माची सेवा केली त्याचप्रमाणें आपल्या आचरणानेंहि ती करून दाखविली. आचार, विचार आणि उच्चार ह्या तिहींचें साहचर्य भरतभूमींत आजवर जेवढे म्हणून संतकवि निर्माण झाले त्या सर्वांमध्यें स्पष्टपणें दिसून येतें. आणि म्हणूनच तुलसीदासांच्या हयातींत त्यांच्या आचरणानें आणि त्यांच्या ग्रंथावलोकनानें धर्मग्लानि हटविण्यास आणि सद्धर्माचीं उच्चतत्त्वें लोकांचें अंतःकरणांत प्रादुर्भूत करण्यास जशी त्या कालीं मदत झाली तशीच ती आज विसाव्या शतकांतहि होत आहे, आणि यापुढेंहि जोंपर्यंत हिंदीभाषा अस्तित्वांत आहे तोंपर्यंत तशीच होत राहणार.

## तुलसीदासांच्या आख्यायिका.

तुलसीदासांना तत्कालीन लोक मारुतीचे अवतार समजत असत व त्यांचे संबंधानें अशी आख्यायिका आहे कीं मारुतीची अनन्यभक्ति पाहून विशेषतः लक्ष्मणाला शक्ति लागली असतां त्यांनीं बजावलेली सेवा पाहून रामचंद्र प्रसन्न झाले व मारुतीस म्हणाले कीं, मला वाल्मीकीनें लिहिल्याप्रमाणें वर्तावें लागतें. त्यावर मारुतीनें आपल्या नखांनीं शिलापृष्ठावर एक रामायण लिहिलें व सहीसाठीं रामचंद्रांचे समोर ठेविलें. त्या ग्रंथाच्या उत्तमत्वाविषयीं वाखाणणी करून श्रीरामचंद्रांनीं सांगितलें कीं, वाल्मीकीचे रामायणावर मी आधीं

सही करून चुकलों आहे तेव्हां तूं ह्या रामायणावर वाल्मीकींची सही घे. वाल्मीकींनीं ग्रंथाची प्रशंसा केली व म्हटलें कीं या ग्रंथाप्रमाणें घडलें तर माझें रामायण नष्ट होईल यासाठीं हनुमानानें आपला आग्रह सोडावा म्हणून वाल्मीकि मारुतीची स्तुतिपूर्वक विनंति करूं लागले. वायुपुत्र प्रसन्न झाल्यावर हा ग्रंथ समुद्रांत बुडवावा असा वाल्मीकींनीं वर मागितला. त्यावर हनुमंतानें आपलें रामायण समुद्रांत तर बुडाविलेंच परंतु सांगितलें कीं कलियुगांत तुलसी नामक ब्राह्मणाच्या जिव्हाग्रीं वास करून त्याचेकडून असें सुंदर व प्रभावशाली रामायण निर्माण करीन कीं त्याचे समोर तुमचें रामायण नष्टप्राय होईल. उत्तर हिंदुस्थानांत तुलसीरामायणाचें जें महत्त्व आहे त्याच्या शतांश देखील वाल्मीकिरामायणाचें महत्त्व आजमितीस नाहीं. श्रीमहीपति, नाभाजी इत्यादि श्रेष्ठ संत कवि आपल्या अच्युत वाणीनें श्रीगोसांईजींस वाल्मीकि–अवतार म्हणतात. केवळ आख्यायिकेपेक्षां असल्या थोर भगवत्प्रेरित ग्रंथकारांचीच उक्ति साधार धरली पाहिजे व आम्ही तीच धरितों. ( आमचा मानसहंसाचा प्रारंभ पहा ).

तुलसीदासांचेवर मारुतीची पूर्ण कृपा होती, व तुलसीदासांना रामचंद्राचें दर्शन मारुतीनेंच करविलें. तो प्रसंग असाः— तुलसीदासांचा प्रातर्विधीसाठीं दूर गंगाकिनाऱ्याचे पलीकडे जाण्याचा परिपाठ असे; व परत आल्यावर भांड्यांतील अवशिष्ट पाणी ते एका आम्रवृक्षाचे बुंध्यावर नित्यशः टाकीत असत.त्या ठिकाणीं एका भूताचा वास होता. एके दिवशीं तुलसीदासांनीं घातलेल्या जलानें तृप्त झालेला तो समंध त्यांचे सन्मुख उभा राहिला व 'कांहीं माग,' असें म्हणाला. गोसांईजींनीं मला श्रीरामचंद्रप्रभुजींचें दर्शन घडो येवढीच मागणी घातली. त्या भूताचा अधिकार तितका नसल्यामुळें त्यानें तुलसीदासांस सांगितलें कीं अमक्या देवळांत रामकथा चालू असते त्या ठिकाणीं एक गलिच्छ पोषाक केलेला महारोगी नित्य सर्वांचे आधीं येत असतो व सर्व श्रोते निघून गेल्यावर निघून जातो. त्यांचे तूं चरण धर व ते साक्षात् हनुमान् असल्यामुळें तुझी इच्छा पूर्ण करतील याबद्दल संशय बाळगूं नको. त्याप्रमाणें तुलसीदासांनीं हनुमंताचें दर्शन घेतलें व मी साधारण मनुष्य आहे असें मारुतीनें अनेकदां बजाविलें, तथापि एकदां घट्ट धरलेले मारुतीचे चरण त्यांनीं सोडिले नाहींत. शेवटीं निरुपाय होऊन मारुतीनें त्यांना दर्शन देऊन चित्रकूटास रामदर्शन होईल असें सांगितलें. त्याप्रमाणें तुलसीदास चित्रकूटास जाऊन राहिले. एके दिवशीं अरण्यांत एका हरिणाचे मागें दोन सुंदर दैदीप्यमान धनुर्बाण धारण केलेले राजकुमार घोड्यावर बसून जातांना त्यांना दिसले. परंतु हेच रामलक्ष्मण असें त्यांना समजलें नाहीं. तदनंतर हनुमान् त्या ठिकाणीं प्रगट झाले व त्यांनीं गोसांईजींना 'कांहीं पाहिलेंस का' म्हणून प्रश्न केला. तेव्हां गोसांईजींनीं घोड्यावर बसून गेलेल्या राजकुमारांची हकीकत सांगितली. प्रत्यक्ष रामलक्ष्मण समोरून गेले असतां आपणांस त्यांच्या सत्य स्वरूपाची ओळख पटली नाहीं ह्याबद्दल त्यांना फार वाईट वाटलें, व फिरून असा प्रमाद होऊं नये ह्या हेतूनें त्यांनीं ह्या रामलक्ष्मणरूपी राजकुमारांचें चित्र आपले हृत्पटलावर कायमचें खोदून ठेविलें.

रामायणाची रचना तुलसीदास करीत असतां बालकांडाच्या ३१ व्या सोरठ्यापर्यंत त्यांची रचना आली व " बूडे सकल समाज " ही पंक्ति लिहितांच त्यांच्या चित्तास अत्यंत उद्वेग उत्पन्न झाला. ज्या समाजांत श्रीरामलक्ष्मण आदिकरून परमेश्वरी अवतार व वसिष्ठविश्वामित्रादि महर्षि आहेत, तो समाज बुडाला असें लिहितांच भयंकर अनर्थ झाला असें वाटून त्यांची चित्तवृत्ति अस्थिर होऊन त्यांची लेखणी पुढें चालेना. त्या समयीं " चढे जो प्रथमहि मोह बस " अशी पंक्ति घालण्याविषयीं मारुतिरायांनीं आज्ञा केली. ही आख्यायिका चांगलीच मूळ धरून बसली आहे. असेलहि ती कदाचित् खरी; पण रामचरितमानसासारखें अजब काव्य सहज लीलेनें निर्माण करणाऱ्या दैवी अंतःस्फूर्तीनें येथे एका ठिकाणीं दगा द्यावा आणि तोहि निष्कारण हें मात्र कसेसेंच वाटतें.

मोंगल बादशहाचे मनांत गोसांईजींचा छळ करावा असें आलें व त्यानें तुलसीदासांस अकस्मात् कैद केलें. तेव्हां तुलसीदासानें मारुतीचा स्तव केला व त्याबरोबर सहस्रावधि वानर शहरावर चालून येऊन कोट वगैरेंचा विध्वंस करूं लागले. यामुळें बादशहा भयभीत होऊन तुलसीदासास शरण आला. तुलसीदासांनीं फिरून मारुतीचा स्तव केल्यामुळें वानरांचा उपसर्ग नाहींसा झाला.

एके दिवशीं काशींत काळोख्या रात्रीं तुलसीदास घरीं परत येत असतां वाटेंत त्यांना चोरांनीं गांठलें. तेव्हां त्यांनीं मारुतीचें स्मरण केलें व त्याबरोबर हनुमान् प्रगट झाले व त्यांनीं चोरांची दाणादाण केली.

तसेंच एके समयीं तुलसीदासांचे घरीं चोरी करण्याकरितां चोर घरांत शिरणार तों एक बालक हातांत धनुष्यबाण धारण करून पहारा करीत आहे, असें त्यानें पाहिलें व लागलीच तो तसाच परत फिरला. नंतर तुलसीदासांस त्यानें तत्संबंधीं प्रश्न केला असतां आपले सुरक्षिततेसाठीं प्रभूस कष्ट झाले तेव्हां ज्या वित्तामुळें देवास कष्ट होतात तें जवळ तरी कशास ठेवावें असा विचार करून गोसांईजींनीं आपलें सर्वस्व लुटविलें. गोसांईजींची ही निर्लोभ वृत्ति पाहून चोरासहि अनुताप झाला व तेव्हांपासून तो त्यांचा शिष्य बनला.

एक ब्राह्मण मृत्यु पावला असतां त्याची पतिव्रता स्त्री सती जाण्यास निघाली.वाटेंत श्रीतुलसीदासांची गांठ पडली व त्या स्त्रीनें गोसांईजींना भक्तिपुरस्सर प्रणाम केला व त्यांनींहि तिला 'सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद दिला.लोकांनीं तुलसीदासांना सर्व हकीकत निवेदन केल्यानंतर तुलसीदासांनीं श्रीरामचंद्राचा धावा केला व तो मृत ब्राह्मण उठून बसला.

दिल्लीहून एकदां तुलसीदास श्रीवृंदावनास गेले व तेथील एका श्रीकृष्णमंदिरांत जाऊन देवासन्मुख त्यांनीं पुढील दोहा म्हटलाः—

**दो०—का बरनउँ छबि आज की भले बिराजेउँ नाथ।**
**तुलसी मस्तक तब नवै धनुष-बान लेउ हाथ॥**

त्याबरोबर श्रीकृष्णांनीं श्रीरामचंद्रस्वरूप प्रगट केलें. तेव्हां तुलसीदासांनीं त्यांना दंडवत घातलें.

प्रांजळपणें सांगावयाचें म्हणजे वरीलसारख्या आख्यायिकांमुळें तुलसीदासांची प्रतिष्ठा विशेष जाहीर वा दृढ होते ही समजच मुळीं गैर. ' न भूतं न भविष्यति ' असें ज्याचें लावण्य आणि ' आसेतुहैमाचलः ' असा ज्याचा पुण्यप्रचार अशा महाकाव्याच्या निर्मात्याची प्रतिष्ठा बुद्धिगम्य नसणाऱ्या आख्यायिकांनीं मापावयाची हें एक अजबच खूळ नव्हे तर काय ! ' ते ( देवाः ) **पुनन्त्युरुकालेन दर्शनादेव साधवः** ' हा अधिकार ज्या संतांना ज्यानें परमादरानें दिला तो ईश्वर त्याचे लडिवाळ हरतऱ्हेनें पुरविणारच. त्यांच्या महतीचें मापन आख्यायिका बापड्या काय करूं शकणार !

अखेर सांगावयाचें म्हणजे ज्या संतांचा प्रत्येक श्वासोश्वास हरिस्मरणांत रंगून निघतो त्यांचें चरित्र कोण कोठवर लिहिणार !आमची तर ठाम समजूत हीच आहे कीं ' भरत—महा महिमा सुनु रानी। जा नहि राम न सकहिँ बखानी ' ( पा० ३६४ ) ही कव्युक्ति सर्वच संतांना सारखीच लागू आहे. आणि म्हणून ' **स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती** ' इतक्यावरच संतचरित्राचें पर्यवसान करणें भाग आहे.

॥ श्री ॥

# अनुक्रमणिका.

## तृतीय सोपान-अरण्यकाण्ड.



## चतुर्थ सोपान-किष्किंधाकाण्ड.

## पंचम सोपान–सुंदरकाण्ड.



## षष्ठ सोपान–लंकाकाण्ड.



## सप्तम सोपान–उत्तरकाण्ड.

# चित्रांची अनुक्रमणिका.



—

॥ श्रीगणेशाय नमः ॥

। श्रीजानकीवल्लभो विजयते ।

# ॥ रामचरितमानस ॥

## अर्थात्

## ॥ श्रीतुलसीरामायण ॥

( मराठी भाषांतरासहित. )

# ( प्रथम सोपान )

( बालकाण्ड )

श्लोकाः ।

**वर्णानामर्थसंघानां रसानां छन्दसामपि । मङ्गलानां च कर्तारौ वन्दे वाणीविनायकौ ॥ १ ॥**

वर्ण, अर्थसमुच्चय, रस, छंद आणि मंगल यांचे कर्ते जे श्रीगणेश व सरस्वती, त्यांना मी वंदन करितों.

**भवानीशङ्करौ वन्दे श्रद्धाविश्वासरूपिणौ । याभ्यां विना न पश्यन्ति सिद्धाः स्वान्तःस्थमीश्वरम् ॥ २ ॥**

ज्यांच्या व्यतिरिक्त सिद्धजनदेखील हृदयस्थ परमात्म्यास पाहूं शकत नाहींत, त्या श्रद्धाविश्वासरूपी श्रीउमामहेश्वरांला मी वंदन करितों.

**वन्दे बोधमयं नित्यं गुरुं शङ्कररूपिणम् । यमाश्रितो हि वक्रोऽपि चन्द्रः सर्वत्र वन्द्यते ॥ ३ ॥**

ज्ञानमय, अविनाशी, केवळ शंकरस्वरूप, कीं ज्याच्या आश्रयानें वक्र असलेला चंद्र देखील सर्वत्र वंद्य झाला, त्या माझ्या श्रीगुरूस मी वंदन करितों.

**सीतारामगुणग्रामपुण्यारण्यविहारिणौ । वन्दे विशुद्धविज्ञानौ कवीश्वरकपीश्वरौ ॥ ४ ॥**

श्रीसीतारामचंद्राच्या गुणसमुच्चयरूप पुण्य-अरण्यांत विहार करणारे असे जे पुण्यात्मे व महान् ज्ञानी कविशिरोमणि वाल्मीकि मुनि व कपीश्वर मारुतीराय यांना मी वंदन करितों.

**उद्भवस्थितिसंहारकारिणीं क्लेशहारिणीम् । सर्वश्रेयस्करीं सीतां नतोऽहं रामवल्लभाम् ॥ ५ ॥**

उत्पत्ति, स्थिति आणि लय यांस कारणीभूत होणारी, तापत्रयाचें हरण करणारी आणि सर्वतोपरी कल्याणदायिनी जी श्रीरामप्रिया वैदेही तीस मी नमस्कार करितों.

**यन्मायावशवर्ति विश्वमखिलं ब्रम्हादिदेवासुराः यत्सत्त्वादमृषेव भाति सकलं रज्जौ यथाऽहेर्भ्रमः । यत्पादप्लव एक एव हि भवाम्भोधेस्तितीर्षावतां वन्देऽहं तमशेषकारणपरं रामाख्यमीशं हरिम् ॥ ६ ॥**

ब्रह्मादिक देव आणि असुरप्रभृति अखिल विश्व ज्याच्या मायेच्या आधीन होऊन वागतें, ज्याच्या प्रादुर्भावानें हा मिथ्याभूत संसार रज्जूचे ठिकाणीं सर्पाचा आभास व्हावा तद्वत् प्रतीयमान होतो, भवसागरांतून तरून जाण्याची इच्छा करणारास ज्याचे चरण हीच कायती एक नौका आहे, अशा त्या सर्व कारणांहून अलिप्त असलेल्या श्रीरामाख्य-भगवान् श्रीहरीस मी वंदन करितों.

**नानापुराणनिगमागमसम्मतं यद्रामायणे निगदितं क्वचिदन्यतोऽपि । स्वान्तः-सुखाय तुलसीरघुनाथगाथा–भाषानिबन्ध-मतिमञ्जुलमातनोति ॥ ७ ॥**

अनेक पुराणें, वेद आणि शास्त्रें यांस संमत असलेली आणि रामायणांत व इतरत्र क्वचित् वर्णन केलेली अशी जी श्रीरघुनाथाची गाथा तिचा प्रबंध स्वभाषेंत अत्यंत मधुर होईल अशा रीतीनें रचून, केवळ स्वात्मसुखासाठीं म्हणून तुलसीदास त्याचा विस्तार करीत आहे.

**सो०—जेहि सुमिरत सिधि होइ गननायक करिबर–वदन । करउ अनुग्रह सोइ बुद्धि-रासि सुभगुन–सदन ॥ १ ॥**

ज्याचें स्मरण केल्यानें कार्य सिद्ध होतें, असा तो बुद्धिराशि, शुभगुणांचें आगर, गजानन श्रीगणराज मजवर अनुग्रह करो.

**सो०—मूक होइ बाचाल पंगु चढइ गिरि-बर गहन । जासु कृपा सो दयाल द्रवउ सकल–कलिमल–दहन ॥ २ ॥**

ज्याच्या कृपेनें मूकही वाचस्पति होतो आणि पंगू देखील अवघड अशा पर्वतावर आरोहण करतो, असा तो सर्व कलिकिल्मिषांचा दाह करणारा दयाळु भगवान् मजवर कृपा करो.

**सो०—नील–सरोरुह-स्याम तरुन–अरुन-बारिज–नयन । करउ सो मम उर धाम सदा छीरसागर-सयन ॥ ३ ॥**

नीलकमलाप्रमाणें ज्याचा श्यामवर्ण असून,कोमल व आरक्त कमलाप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत, असा तो क्षीरसागरावर शयन करणारा भगवान् माझे हृदयांत निरंतर वास करो.

**सो०—कुंद–इंदु–सम देह उमारमन करुना-अयन । जाहि दीन पर नेह करउ कृपा मर्दन मयन ॥ ४ ॥**

कुंदपुष्प आणि चंद्र यांच्या कांतीप्रमाणें ज्याचा देह असून जो दीन जनांवर अनुग्रह करीत असतो तो करुणासागर मदनारि श्रीउमारमण मजवर कृपा करो.

**सो०—बंदउँ गुरु–पद–कंज कृपासिंधु नर-रूप हरि । महा–मोह–तम–पुंज जासु बचन रबि–कर–निकर ॥ ५ ॥**

ज्याच्या वचनप्रभावानें प्रत्यक्ष सूर्यकिरणांच्या समूहाप्रमाणें महामोहरूप निबिड अंधःकाराचा नाश होतो, अशा त्या कृपासागर सद्गुरु नरहरि (तुलसीदासांच्या गुरूचें नांव ) पदकमलांना मी वंदन करितों.

**चौ०–बंदउँ गुरु–पद–पदुम–परागा ।**
**सुरुचि सुबास सरस अनुरागा ।**

भक्तजनाचें श्लाघनीय आश्रयस्थान, परम प्रेमपूर्ण, विज्ञानानंदप्रचुर आणि भक्तवात्सल्ययुक्त अशा सद्गुरूच्या पदकमलपरागास मी वंदन करितों.

**अमिय–मूरि–मय चूरन चारू ।**
**समन सकल–भव–रुज परिवारू ।**

समस्त संसृतिजन्य व्याधिसमूहांना शमविणारें गुरुपदरज म्हणजे एक अलौकिक चूर्ण आहे. कारण, तें अमृत–वल्लींनीं परिपूर्ण आहे.

**सुकृत संभुतन बिमलबिभूती ।**
**मंजुल मंगल–मोदप्रसूती ।**

स्पृहणीय अशा कल्याणाला आणि आनंदाला प्रसविणारी अशी श्रीशंकराच्या अंगावरील पुण्यकारक आणि सोज्ज्वल विभूतीच अशी ही गुरुपदधूळी आहे.

**जन–मन–मंजु–मुकुर–मल–हरनी ।**
**किए तिलक गुन–गन–बस–करनी ।**

ही सद्गुरुपदाची धूळ भक्ताच्या मनोरूप निर्मळ आरशावरील अज्ञानरूप मलाचें हरण करणारी असून, तिचा टिळा लावला असतां ती सद्गुणसमूहास वश करणारी आहे.

**श्रीगुरु–पद–नख–मनि–गन–जोती ।**
**सुमिरत दिव्य दृष्टि हिय होती ।**

श्रीसद्गुरुपदांच्या नखांची प्रभा रत्नराशीप्रमाणें दिव्य असून तिचें स्मरण केलें असतां हृदयांत दिव्य दृष्टि उत्पन्न होते.

**दलन मोहतम सोसुप्रकासू ।**
**बडे भाग उर आवइ जासू ।**

हें दिव्यदृष्टिरूप तेज अज्ञानरूप अंधःकाराचें

१ 'स्वान्तः सुखाय' हें पद अत्यंत गूढाशयाचें आहे.तो आशय आमच्या ' मानस–हंसांत ' स्पष्ट करून दाखविलेला दिसेल. सुरूवा ' कवि–परिचय ' पहा.

निर्दालन करितें. त्यांच्या हृदयांत हें तेज प्रकट होतें ते महद्भाग्यवान् होत.

उघरहिँ बिमलबिलोचन ही के ।
मिटहिँ दोष दुख भवरजनी के ।

त्या तेजानें हृदयांतील दिव्यचक्षु विकास पावतात आणि संसाररूप रात्रीचे (जन्ममरणादि) दोष आणि (तापत्रयांतील) दुःखें लयास जातात.

सूझहिँ रामचरित मनिमानिक ।
गुपुत प्रगट जहँ जो जेहि खानिक ।

त्या प्रकाशानें जेथें जेथें ज्या ज्या खाणींत जीं जीं गुप्त अथवा प्रकट रामचरितरूप हिरेमाणकें असतील तीं तीं दृष्टिगोचर होऊं लागतात.

दो०—जथा सुअंजन अंजि दृग साधक सिद्ध सुजान । कौतुक देखहिँ सैल बन भूतल भूरि निधान ॥ १ ॥

ज्याप्रमाणें मांत्रिक लोक मंत्रसिद्ध अंजन डोळ्यांत घालून पर्वत, अरण्यें, पृथ्वीतल यांतील विशाल द्रव्यसंचय अनायासें करून पाहतात, तद्वत् साधक पुरुष गुरुपदरजोरूप अंजन डोळ्यांत घालून लीलेनें अप्रतिहतचक्षु असे सिद्ध होतात.

चौ०—गुरु–पद–रज–मृदु–मंजुल अंजन ।
नयन अमिय दृग–दोष–बिभंजन ।

गुरुपदधूलिरूप मृदु आणि सुंदर अंजन हें नेत्रांचें अमृत होय. तें नेत्ररोगाचें निर्दालन करितें.

तेहि करि बिमल बिबेक बिलोचन ।
बरनउँ रामचरित भवमोचन ।

त्याच्याच सहाय्यानें आपलें ज्ञानचक्षु शुद्ध करून, संसारापासून मुक्त करणारें असें जें रामचरित्र तें मी वर्णन करितों.

बंदउँ प्रथम मही–सुर–चरना ।
मोह–जनित–संसय सब हरना ।

प्रथमतः अज्ञानजनित सर्व संशयांची निवृत्ति करणारे असे जे ब्राह्मण, त्यांच्या चरणांप्रत मी वंदन करितों.

सुजनसमाज सकल–गुन–खानी ।
करउँ प्रनाम सप्रेम सुबानी ।

सर्व सद्गुणांची खाण असा जो संतसमाज त्यास मी सप्रेम आणि सविनय प्रणाम करितों.

साधु चरित सुभ सरिस कपासू ।
निरस बिसद गुनमय फल जासू ।
जो सहि दुख परछिद्र दुरावा ।
बंदनीय जेहि जग जसु पावा ।

संतचरित्रें हीं कापसाप्रमाणें शुभकारक होत. कापूस हा नीरस जरी आहे, तरी तो अगदीं शुभ्र असून त्याचीं फळें गुणमय (गुणकारी अगर तंतुविशिष्ट) असतात. तो स्वतः त्रास सहन करून दुसऱ्याचें छिद्र झांकतो, म्हणून जगांत त्यास प्रौढी प्राप्त होते आणि तो [1]मान्य होतो.

मुद–मंगल–मय संतसमाजू ।
जो जग जंगम तीरथराजू ।

संतसमाज हा जगांतील जंगम म्हणजे चालताबोलता आनंदमंगलमय, तीर्थराज प्रयाग होय.

रामभगति जहँ सुरसरि–धारा ।
सरसइ ब्रह्मबिचार प्रचारा ।

संतसमाजरूप प्रयागांत रामभक्ति हाच गंगाप्रवाह असून, ब्रह्मविचार हीच त्यांतील सरस्वतीची धार होय.

बिधि–निषेध–मय कलि–मल–हरनी ।
करमकथा रबिनंदिनि बरनी ।

विधिनिषेधात्मक (विधि—'अहरहः संध्यामुपासीत' इत्यादि; निषेध—'मा हिंस्यात् सर्वाणि भूतानि' इत्यादि) कर्मकांडाची चर्चा हीच संतप्रयागतीर्थाची कलिसंबंधि पापांचें प्रक्षालन करणारी रविनंदिनी यमुना नदी होय, असें वर्णन करण्यांत येत असतें.

हरि–हर–कथा बिराजति बेनी ।
सुनत सकल–मुद–मंगल–देनी ।

हरिहरांचा कथारूपी त्रिवेणीसंगम तेथें विराजमान असून, त्यांच्या श्रवणमात्रेंकरून सर्वत्र आनंद आणि कल्याण यांची प्राप्ति होते.

बट बिस्वासु अचल निज धर्मा ।
तीरथराज समाज सुकर्मा ।

स्वधर्मनिष्ठा हाच त्या प्रयागांतला अक्षयवट होय. सदाचारसंपन्न लोक हेच त्या तीर्थराजांतील रहिवासी होत.

---

१ संतचरित्रेंदेखील नीरस म्हणजे सांसारिक रसशून्य असलीं तरी तीं उज्ज्वल अतएव पुण्य–पावन असल्यानें त्यांच्या सेवनानें धर्मार्थ—काम–मोक्षादि फळें प्राप्त होतात. संतजन स्वतः क्लेश सहन करून दुसऱ्याचें उणें सांवरून घेतात व म्हणूनच ते जगास वंदनीय होऊन त्यांची सर्वत्र कीर्ति पसरते.

सबहि सुलभ सब दिन सब देसा ।
सेवत सादर समन कलेसा ।

सर्वांसच हा तीर्थराज सर्वदा आणि सर्वच देशांत सुलभ आहे आणि त्याची श्रद्धापूर्वक सेवा केली असतां तो क्लेशनिवारण करितो.

अकथ अलौकिक तीरथराऊ ।
देइ सद्य फल प्रगट प्रभाऊ ।

हा तीर्थराज अवर्णनीय आणि लोकोत्तर आहे. सद्यःफलदायक असा याचा प्रत्यक्ष महिमा आहे.

**दो०—सुनि समुझहिँ जन मुदितमन मज्जहिँ अति अनुराग। लहहिँ चारि फल अछत तनु साधुसमाजु प्रयाग ॥ २ ॥**

साधुसमाजरूपी प्रयागाचें माहात्म्य श्रवण करून लोक जर मनःपूर्वक प्रसन्न अंतःकरणानें आणि अत्यंत भक्तिभावानें त्याचें स्नान करितील तर ह्याच जन्मांत त्यांना चतुर्विध पुरुषार्थांचा लाभ घडेल.

चौ०—मज्जनफल पेखिय ततकाला ।
काक होहिँ पिक बकउ मराला ।

स्नानाचें फल तत्काळ असें दिसून येईल कीं, कावळ्यांना कोकिळांचा आणि बगळ्यांना हंसांचा दर्जा प्राप्त होईल.

सुनि आचरज करइ जनि कोई ।
सत-संगति-महिमा नहिँ गोई ।

हें ऐकून कोणीही आश्चर्य करूं नये. हे संतसंगतीचें माहात्म्य प्रख्यातच आहे.

बालमीकि नारद घटजोनी ।
निज निज मुखनि कही निजहोनी ।

[1]वाल्मीकि, नारद आणि अगस्त्यमुनी यांनीं आपापल्या मुखांनींच स्वतःचा वृत्तांत सांगितला आहे.

जलचर थलचर नभचर नाना ।
जे जड चेतन जीव जहाना ।
मति कीरति गति भूति भलाई ।
जब जेहि जतन जहाँ जेहि पाई ।
सो जानब सत-संग-प्रभाऊ ।
लोकहु बेद न आन उपाऊ ।

ह्या ब्रह्मांडांत जेवढे म्हणून जलचर, भूचर, खेचर, असे जड अथवा सचेतन जीव आहेत, त्यांपैकीं ज्यांनीं ज्यांनीं ज्या ज्या काळीं, ज्या ज्या स्थळीं, ज्या ज्या यत्नांनीं सद्बुद्धि, सत्कीर्ति, सद्गति, ऐश्वर्य आणि उन्नतत्व मिळविलें आहे, तेच सत्समागमाचा प्रभाव जाणतात. शास्त्रांत अगर लौकिकांतही उन्नतीसाठीं इतर उपाय सांगितलेलाच नाहीं.

बिनु सतसंग बिबेक न होई ।
रामकृपा बिनु सुलभ न सोई ।

संतसंगाखेरीज विवेक उत्पन्न होत नाहीं; आणि असा सत्संग रामकृपेवांचून मुळींच लाभत नाहीं.

सतसंगति मुद-मंगल-मूला ।
सोइ फल सिधि सब साधन फूला ।

सत्संगति ही आनंद आणि कल्याणरूपी वृक्षाचें मूळ आहे. सर्व साधनें हीं त्याचीं फुलें आणि सिद्धी हीं फळें होत.

सठ सुधरहिँ सतसंगति पाई ।
पारस परसि कुधातु सोहाई ।

शठदेखील सत्संग प्राप्त झाला असतां सुधारतात. परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचें देखील सोनें होतें.

बिधिबस सुजन कुसंगति परहीँ ।
फनि-मनि-सम निजगुन अनुसरहीं ।

दैववशात् सज्जनदेखील दुष्टांच्या संगतींत सांपडतात; परंतु सर्पाच्या मस्तकावरील मण्याप्रमाणें आपल्या अंगचा गुण सोडीत नाहींत.

बिधि-हरि-हर-कबि-कोबिद-बानी ।
कहत साधुमहिमा सकुचानी ।
सो मो सन कहि जात न कैसे ।
साकबनिक मनि-गन-गुन जैसे ।

ब्रह्मदेव, विष्णु, शंकर, कवि आणि पंडित यांची

---

१ वाल्मीकींची कथा सर्वश्रुतच आहे, म्हणून ती सांगण्याची आवश्यकता नाहीं. नारदाची कथा भागवतांत प्रथम स्कंधांत दिली आहे. नारदमुनी पूर्वजन्मीं दासीपुत्र असून ब्राम्हणांचे उच्छिष्टांवर निर्वाह करीत असत; त्यायोगानें त्यांचा बुद्धिविकास होऊन त्यांना एवढी महती मिळाली.

एकदां मित्रावरुण तप करीत असतां अंतरिक्षांत जात असलेल्या उर्वशीला पाहून त्यांचा वीर्यपात झाला. तें वीर्य त्यांनीं घटांत स्थापन केलें व त्यापासून अगस्ति ऋषि उत्पन्न झाले. ही कथा शंकरास निवेदन करीत असतां अगस्तिऋषींनीं सांगितलें कीं, कालांतरानें त्यांस संतसमागम झाला आणि तेणेंकरूनच तत्त्वबोध होऊन ते आत्मस्थितीला गेले.

१ सर्पमणि सर्पाच्या संगतींत असतो; परंतु विष उतरविण्यास तो कधींच कमी करीत नाहीं. याचप्रमाणें संतजनांचीही गोष्ट आहे हें तात्पर्य.

देखील वाणी संतमहिमा वर्णन करण्यास संकोच करिते. त्या संतमहिम्याचें मजकडून वर्णन होणें अर्थातच शक्य नाहीं. भाजी विकणाराचे हातून रत्न-परीक्षा होईल काय ?

**दो०—बंदउँ संत समानचित हित अन-हित नहिँ कोउ। अंजुलिगत सुभ-सुमन जिमि सम सुगंध कर दोउ ॥३॥**

संतांचें चित्त नेहमीं समतोल असतें. ओंजळींत घेतलेल्या सुवासिक पुष्पांचा सुगंध दोन्ही हातांस ज्याप्रमाणें सारखाच लागतो, तद्वत् हित अथवा अन्‌हित यांची संतांना वार्तादेखील नसते; अशा त्या संतांना माझें वंदन असो.

**दो०—संत सरलचित जगत हित जानि सुभाउ सनेहु। बालबिनय सुनि करि कृपा राम-चरन-रति देहु ॥ ४ ॥**

अहो संतांनो ! आपण सरळ मनाचे असून, जगाचे हितचिंतक आहां. माझा सद्भाव आणि स्नेह ओळ-खून आणि माझी बालकाची विनंति ऐकून आपण कृपाळु होऊन माझें रामचरणीं प्रेम जडेल असें करावें.

चौ०—बहुरि बंदि खलगन सतिभाये।
जे बिनु काज दाहिनेहु बाये।
पर-हित-हानि लाभ जिन्ह केरे।
उजरे हरष बिषाद बसेरे।

यानंतर मी दुर्जनांना सद्भावानें वंदन करितों. ते सरळ मनुष्यांशीं देखील विनाकारण वांकडे अस-तात. परहितांची हानि होण्यांतच त्यांना लाभ वाटतो, सुस्थित मनुष्याला पाहून विषाद वाटतो आणि एकाद्याचें वाटोळें झालेलें पाहून आनंद होतो.

हरि-हर जस राकेस राहु से।
परअकाज भट सहस बाहु से।
जे परदोष लखहिँ सहसाखी।
परहित घृत जिनके मन माखी।
तेज कृसानु रोष महिषेसा।
अघ-अवगुन-धन-धनी धनेसा।
उदय केतुसम हित सबही के।
कुंभकरन सम सोवत नीके।

१ यः सर्वत्रानभिस्नेहः तत्तत्प्राप्य शुभाशुभं।
नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥
( श्रीमद्भगवद्गीता )

हरिहरकथारूप चंद्रास राहूसारखे, परकार्याचा घात करण्यांत सहस्रबाहूप्रमाणें पराक्रमी, परक्याचे दोष जे इंद्राप्रमाणें सहस्र डोळ्यांनीं पाहतात,परहितरूप घृतावर ज्यांचें मन मक्षिकेप्रमाणें लुब्ध झालेलें असतें, जे उग्रतेंत अग्नीप्रमाणें असून रागीटपणांत महिषासुरा-सारखे असतात, पाप आणि दुर्गुणरूपी संपत्तीवर कुबेराप्रमाणें धनाढ्य जे स्वतःस समजतात, ज्यांचा अभ्युदय धूमकेतूप्रमाणें सर्वांनाच हानिकारक असतो, कुंभकर्णाप्रमाणें जे खूपच निद्राप्रिय असतात.

परअकाजु लगि तनु परिहरहीँ।
जिमि हिम उपल कृषीदल गरहीँ।
बंदउँ खल जस सेष सरोषा।
सहसबदन बरनइ परदोषा।

ज्याप्रमाणें गारा शेताचा नाश करून स्वतःही विरघळून जातात त्याचप्रमाणें जे दुसऱ्याच्या कार्य-विघातासाठीं स्वतःचें शरीरदेखील खर्ची घालण्यास तयार असतात, जे क्रुद्ध झालेल्या शेषाप्रमाणें सहस्र-मुखांनीं परक्याच्या दोषांचें आविष्करण करीत असतात, एवंगुणविशिष्ट खळांस मी वंदनच करितों.

पुनि प्रनवउँ पृथुराजसमाना।
परअघ सुनइ सहसदसकाना।

दुसऱ्यांचीं पापें, पृथुराजाप्रमाणें दहा हजार कानांनीं ऐकणाऱ्या खलजनांस मी फिरूनफिरून प्रणाम करितों.

बहुरि सक्र सम बिनवउँ तेही।
संतत सुरानीक हित जेही।
बचन बज्र जेही सदा पियारा।
सहसनयन परदोष निहारा।

इंद्रास ‘ सुरानीक ’ ( देवसैन्य ) आवडतें, तर दुर्जनांलाही ‘ सुरा नीक ’ ( उत्तम मद्य ) आवडतें; दोघांचेंहि आवडतें शस्त्र एकच, इंद्राचें वज्र आणि खळाचें वाग्वज्र; दोघांचेंहि पाहणें हजार डोळ्यांनीं, पण खल दुसऱ्यांचीं उणींच न्याहाळीत असतात. अशा त्या दुर्जनांना मी इंद्रासमान समजून वंदन करितों.

१ पृथुराजाला असा वर होता कीं, जेथें श्रीमद्भागवत-कथा होईल तेथें तेथें ती त्याला सहस्र कानांनीं ऐकूं येईल.

**दो०—उदासीन–अरि–मीत–हित सुनत जरहिँ खलरीति। जानि पानिजुग जोरि जन बिनती करउँ सप्रीति॥ ५॥**

शत्रु, मित्र आणि उदासीन यांपैकीं कोणाचेंही बरें झालेलें कानीं पडतांच जळफळूं लागणें, ही जी खळांची रीत ती समजूनच दोन्ही हात जोडून, मी सेवकभावानें त्यांस विनंति करितों.

**चौ०–मैँ अपनी दिसि कीन्ह निहोरा।**
**तिन्ह निज ओर न लाउब भोरा।**
**बायस पलिअहि अति अनुरागा।**
**होहिँ निरामिष कबहुँ कि कागा।**

मी माझ्यापरी सविनय प्रार्थना केली आहे. परंतु ते मात्र चुकूनदेखील तिचा अंगीकार करणार नाहींत. कावळ्याला अतिशय प्रेमानें पोसला तरी कावळाच तो, तो कधीं तरी निरामिष ( मांसापासून परावृत्त ) होईल काय ?

**बंदउँ संत असज्जन चरना।**
**दुखप्रद उभय बीच कछु बरना।**

संत आणि दुर्जन या उभयतांमध्यें कांहीं गोष्टी सम-दुःखप्रद अशा सांगण्यांत येतात. म्हणून त्या दोघांच्याहि चरणांस मी वंदन करितों.

**बिछुरत एक प्रान हरि लेहीँ।**
**मिलत एक दारुन दुख देहीँ।**
**उपजहिँ एक संग जग माहीँ।**
**जलज जोंक जिमि गुन बिलगाहीँ।**

एक ( संत ) विभक्त होतेवेळीं प्राण हरण करून घेतात, तर दुसरे ( दुर्जन ) भेटतांक्षणींच भयंकर त्रास देतात. दोघेही जगांत एका काळींच उत्पन्न होतात. परंतु ज्याप्रमाणें कमळ आणि जळू दोघेही जलोत्पन्नच, परंतु त्यांमध्यें गुणसाधर्म्याचा पूर्ण अभाव आहे, तद्वत् सज्जन आणि दुर्जन यांचे गुण अगदींच भिन्न पडतात.

**सुधा सुरा सम साधु असाधू।**
**जनक एक जग जलधि अगाधू।**
**भल अनभल निज निज करतूती।**
**लहत सुजस अपलोक बिभूती।**
**सुधा सुधाकर सुरसरि साधू।**
**गरल अनल कलि–मल–सरि ब्याधू।**

साधु आणि असाधु हे अनुक्रमें अमृत आणि मद्य यांच्यासारखेच होत. आपला हा अगाध समुद्रच दोघांचाहि पिता आहे. परंतु भले आणि वाईट हे आपापल्या करणीनेंच लौकिकाचें किंवा बदलौकिकाचें धन जोडतात. उदाहरणार्थ–सुधा आणि विष, चंद्रमा आणि अग्नि, भागीरथी आणि कर्मनाशा ( जिच्या स्नानानें सर्व सत्कर्मांचा नाश होतो ) नदी, साधु आणि दुष्ट हिंसक.

**गुन अवगुन जानत सब कोई।**
**जो जेहि भाव नीक तेहि सोई।**

सद्गुण आणि दुर्गुण हे सर्वच लोक जाणतात; परंतु ज्याला जो आवडतो त्याला तोच चांगला वाटतो.

**दो०—भलो भलाइहि पै लहइ लहइ निचाइहि नीचु। सुधा सराहिय अमरता गरल सराहिय मीचु॥६॥**

हें मात्र निश्चित आहे कीं, भले ते भलेपणच कमविणार; आणि नीच ते नीचपणाचीच जोड करणार. अमृताचें सेवन केलें कीं, अमरत्व पदरांत पडतें आणि विषप्राशन केलें असतां निश्चयानें मृत्यु येतो.

**चौ०–खल अघ अगुन साधु गुन गाहा।**
**उभय अपार उदधि अवगाहा।**

दुर्जन पातकें आणि दुर्गुण यांचे, आणि सज्जन गुणग्राहकतेचे असे हे दोन अपार व अफाट समुद्र आहेत.

**तेहि तेँ गुन दोष बखाने।**
**संग्रह त्याग न बिनु पहिचाने।**

म्हणून त्यांच्या गुणदोषांचें किंचित् मात्र विवरण मी केलें आहे. तथापि, त्यांचा संग्रह किंवा त्याग हा परीक्षेशिवाय होऊं नये.

**भलेउ पोच सब बिधि उपजाए।**
**गनि गुन दोष बेद बिलगाए।**

भले आणि वाईट हे सगळेच ब्रह्मदेवानें उत्पन्न केले आहेत, आणि वेदांनीं त्यांच्या गुणदोषांचें पृथक् पृथक् विवेचन केलें आहे.

**कहहिँ बेद इतिहास पुराना।**
**बिधिप्रपंच गुन–अवगुन–साना।**
**दुख सुख पाप पुन्य दिन राती।**

साधु असाधु सुजाति कुजाती ।
दानव देव ऊँच अरु नीचू ।
अमिय सजीवनु माहुर मीचू ।
माया ब्रम्ह जीव जगदीसा ।
लच्छि अलच्छि रंक अवनीसा ।
कासी मग सुरसरि कविनासा ।
मरु मारव महिदेव गवासा ।
सरग नरक अनुराग बिरागा ।
निगम अगम गुन-दोष-विभागा ।

वेद, इतिहास आणि पुराणें हेंच प्रतिपादन करितात कीं, ब्रह्मदेवाची सृष्टि ही गुणावगुणांनीं परिप्लुत आहे. [ जसें ] सुख-दुःख, पाप--पुण्य, दिवस-रात्र, सज्जन-दुर्जन, श्रेष्ठ वर्ण व नीच वर्ण, देव-दानव, अमृत-विष, जन्म-मृत्यु, ब्रह्म-माया, जीव-शिव, लक्ष-अलक्ष, राजा-रंक, काशी-मगध, ( येथील स्त्रियांच्या भ्रष्टतेची पुराणप्रसिद्धि आहे. ) भागीरथी-कर्मनाशा, मारवाड-माळवा, ब्राह्मण-म्लेंच्छ, स्वर्ग-नरक, प्रेम-विरक्ति, इत्यादि गुणदोषांचे विभाग, वेद आणि शास्त्रें यांतच आहेत.

दो०—जड चेतन गुन दोष मय बिस्व
कीन्ह करतार। संत हंस गुन गहहिँ
पय परिहरि बारिविकार ॥ ७ ॥

एवंच, हें स्थावरजंगमात्मक विश्व ब्रह्मदेवानें गुणदोषात्मकच केलें आहे. परंतु संतरूप हंस त्यांतील दोषरूप जळाचा त्याग करून गुणरूप पयाचेंच ग्रहण करितात.

चौ०-अस विवेक जब देइ विधाता ।
तब तजि दोष गुनहि मनु राता ।

अशा प्रकारचा विवेक जेव्हां परमेश्वरकृपेनें उत्पन्न होतो, तेव्हांच दोष वगळून गुणांमध्येंच मन रंगून जातें.

कालसुभाउ करम बरियाई ।
भलेउ प्रकृति बस चुकइ भलाई ।
सो सुधारि हरिजन जिमि लेहीँ ।
दलि दुख दोष विमल जसु देहीँ ।

काल, स्वभाव आणि कर्म यांच्या प्राबल्यानें मायावश होऊन, भले लोक देखील आपल्या चांगुलपणांत चुकतात. परंतु ती चूक भगवद्भक्त अशा खुबीनें सुधारून घेतात कीं, दुःखें आणि दोष यांचें निर्दालन करून, त्यांच्या पदरीं निर्मळ यशच बांधतात.

खलउ करहिँ भल पाइ सुसंगू ।
मिटइ न मलिन सुभाउ अभंगू ।
लखि सुवेष जग बंचक जेऊ ।
वेषप्रताप पूजिअहि तेऊ ।
उघरहिँ अंत न होइ निबाहू ।
कालनेमि जिमि रावन राहू ।

सत्समागम प्राप्त झाला असतां खळदेखील सदाचरणाचा आव आणतात. परंतु त्यांच्या नैसर्गिक दुष्ट स्वभावास खळ पडत नाहीं. त्यांचें तें अजब सोंग पाहूनच त्या वेषाच्या प्रभावानें साऱ्या मुलखाचे जे अट्टल बदमाष तेही पण त्यांच्या भजनीं लागतात. तरी पण अखेरीस त्यांचा टिकाव न लागून ते कालनेमी, रावण, राहू यांच्यासारखे चव्हाट्यावर येतातच.

किएहु कुबेषु साधु सनमानू ।
जिमि जग जामवंत हनुमानू ।

उलट अमंगळ वेष करून देखील जगांत जांबुवंत हनुमंताप्रमाणें खऱ्या साधूंचा सन्मानच होतो.

हानि कुसंग सुसंगति लाहू ।
लोकहु बेद बिदित सब काहू ।

कुसंगतीनें हानि आणि सत्संगतीनें लाभ, ही वेदांतील आणि व्यवहारांतली गोष्ट सर्वांस माहीतच आहे.

गगन चढइ रज पवनप्रसंगा ।
कीचहि मिलइ नीच-जल-संगा ।

वाऱ्याच्या संसर्गानें धूळ वर आकाशांत उडतें, आणि खालीं पाण्याशीं गांठ पडली असतां चिखलांत तिचें रूपांतर होतें.

साधु असाधु सदन सुक सारी ।
सुमिरहिँ रामु देहिँ गनि गारी ।

संताच्या [१] घरचे पोपट आणि मैना देखील रामस्मरणच करीत राहतात; तेच दुष्टांच्या घरीं असले म्हणजे मोजून शिव्या देत असतात.

धूम कुसंगति कारिख होई ।
लिखिय पुरान मंजु मसि सोई ।

वाईट संसर्गानें धुराचें काजळ होतें; पण त्याच काजळाच्या चटकदार शाईनें पुराणें लिहिलीं जातात.

सोइ जल अनल अनिल संघाता ।
होइ जलद जग-जीवन-दाता ।

१ गवाशनानां स शृणोति वाक्यं। अहं च तावद्वचनं मुनीनाम्। न तस्य दोषो न च मद्गुणो वा॥ यत्संगजा दोषगुणा भवंति॥

त्याचप्रमाणें पाणी. हवेच्या आणि उष्णतेच्या संगतीनें त्याचेच ढग बनतात, आणि तेच अलम दुनियेस पोसतात.

**दो०—ग्रह भेषज जल पवन पट पाइ कुजोग सुजोग। होहिँ कुबस्तु सुबस्तु जग लखहिँ सुलच्छन लोग ॥ ८ ॥**

नवग्रह, औषधी, पाणी, वारा आणि वस्त्र यांस बरावाईट संसर्ग मिळून ते सुवस्तु किंवा कुवस्तु बनतात, ही गोष्ट जगांत सुज्ञ लोकांच्या निदर्शनास आलेलीच आहे.

**दो०—सम प्रकास तम पाख दुहुँ नाम भेद बिधि कीन्ह। सस पोषक सोषक समुझि जग जस अपजस दीन्ह ॥ ९ ॥**

ब्रह्मदेवानें शुक्ल आणि कृष्ण हे दोन्ही पक्ष समसमान उजेड-अंधाराचे केले आहेत. त्यांच्यांत भेद काय तो नुसत्या नांवाचा आहे. परंतु एक धान्याचा पोषक आणि दुसरा शोषक एवढ्याच समजुतीवर लोक बरीवाईट नांवें ठेवितात.

**दो०—जड चेतन जगजीव जत सकल राममय जानि। बंदउँ सब के पद कमल सदा जोरि जुगपानि ॥ १० ॥**

जगांत जेवढें म्हणून जड-चेतन प्राणिमात्र आहेत ते सर्व राममय समजून त्या सर्वांच्या पदकमलांना करद्वय जोडून मी वंदन करितों.

**दो०—देव दनुज नर नाग खग प्रेत पितर गंधर्ब। बंदउँ किन्नर रजनिचर कृपा करहु अब सर्ब ॥ ११ ॥**

देव, दैत्य, नर, नाग, खग प्रेत, पितर, गंधर्व, राक्षस, किन्नर यांना मी वंदन करितों. सर्वांनीं आतां मजवर कृपा करावी.

**चौ०-आकर चारि लाख चौरासी।**
**जाति जीव जल-थल-नभ-बासी।**
**सीय-राम-मय सब जग जानी।**
**करउँ प्रनाम जोरि जुगपानी।**
**जानि कृपा कर किंकर मोहू।**
**सब मिलि करहु छाडि छल छोहू।**

चौऱ्यायशीं लक्ष योनींतील जळ, स्थळ व आकाश यांत वास करणारे स्वेदज, अंडज, जारज, उद्भिज अशा चतुर्विध खाणींतील जीवात्मक सर्व जग सीताराममय जाणून त्यास मी दोन्ही हात जोडून प्रणाम करितों. मजला आपला दास समजून मजवर कृपा करा आणि सर्वांचा मजवर निष्कपट लोभ असूं द्या.

**निज बुधिबल भरोस मोहि नाहीँ।**
**ताते बिनय करउँ सब पाहीँ।**
**करन चहउँ रघुपति-गुन-गाहा।**
**लघु मति मोरि चरित अवगाहा।**

स्वतःच्या बुद्धिबलाचा मला मुळींच दिवसा वाटत नाहीं, म्हणून सर्वांपाशीं मी विनंति केली आहे. श्रीरामचंद्रांची गुणकथा मी वर्णन करूं इच्छित आहे. परंतु माझी बुद्धि अल्प आणि प्रभुचरित्र अगाध आहे.

**सूझ न एकउ अंग उपाऊ।**
**मन मति रंक मनोरथ राऊ।**
**मति अति नीच ऊँच रुचि आछी।**
**चहिय अमिय जग जुरइ न छाछी।**

मला कोणत्याही बाजूनें उपाय सुचत नाहीं. माझें मन आणि बुद्धि दोन्हीही दरिद्री असून, महत्त्वाकांक्षा मात्र थोर आहे. माझी बुद्धि अत्यंत मुर्दाड पण अभिरुचि मात्र अत्यंत श्रेष्ठ व उत्कट आहे. मला हाव अमृताची, पण लोकांकडून ताक देखील मिळण्याची मला मारामार.

**छमिहहिँ सज्जन मोरि ढिठाई।**
**सुनिहहिँ बालबचन मन लाई।**
**जौँ बालक कह तोतरि बाता।**
**सुनहिँ मुदित मन पितु अरु माता।**

माझ्या या धाष्टर्याबद्दल सज्जन क्षमा करतील, आणि माझे बालकाचें बोल मन लावून ऐकतील. बालक जर तोतरें बोलूं लागला, तर मातापित्यांच्या मनाला आनंद होऊन ते तेंच ऐकत राहतात.

**हँसिहहिँ कूर कुटिल कुबिचारी।**
**जे पर-दूषन-भूषन-धारी।**
**निज कबित्त केहि लाग न नीका।**
**सरस होउ अथवा अति फीका।**

क्रूर, कुटिल आणि कुत्सित मनाचे लोक, जे दुसऱ्यांच्या दोषांचें आविष्करण करण्यांतच भूषण मानतात, ते मात्र हंसतील. परंतु स्वतःचें कवित्व मग ते सरस असो अगर अत्यंत नीरस असो, कोणास गोड लागत नाहीं?

जे परभानिति सुनत हरषाहीँ।
ते बर पुरुष बहुत जग नाहीँ ।

जे दुसऱ्याची उक्ति ऐकून हर्ष पावतील, असे श्रेष्ठ पुरुष जगांत फारसे नाहींतच.

जग बहु नर सुर-सरि-सम भाई ।
जे निज बाढि बढहिँ जल पाई ।
सज्जन सकृत सिंधु सम कोई ।
देखि पूर बिधु बाढइ जोई ।

गंगानदीला जरी दुसरीकडील पाणी मिळत असते, तथापि ती जी वाढीला लागते ती आपल्याच बळावर. तद्वतच जगांतील बहुतेक लोकांची गोष्ट आहे. पूर्णचंद्र पाहून ज्यास भरतें येतें असा समुद्रासारखा महात्मा क्वचितच एकादा असतो.

दो०—भाग छोट अभिलाषु बड करउँ एक बिस्वास । पैहहिँ सुख सुनि सुजन सब खल करिहहिँ उपहास ॥ १२ ॥

माझ्यांत गुण अत्यल्प असून महत्त्वाकांक्षा मात्र फार मोठी आहे. तथापि, माझा एक असा विश्वास आहे कीं ही रामगुणगाथा श्रवण करून, खळ तेवढे उपहास करतील. परंतु सर्व सज्जन लोक त्यांत आनंदच मानतील.

चौ०- खलपरिहास होइ हित मोरा।
काक कहहिँ कलकंठ कठोरा ।
हंसहिँ बक दादुर चातकहि ।
हसहिँ मलिन खल बिमल बतकही ।

खळांच्या उपहासानें माझें हितच होणार आहे. कावळा कोकिळेच्या स्वरास कर्कशच समजतो. बगळे हंसांस आणि बेडूक चातकांस हंसतात, तसे दुरात्मे खळ या उज्ज्वल रामगुणालापांना हांसणारच.

कबित रसिक न राम-पद-नेहू ।
तिन कहँ सुखद हासरस एहू ।

केवळ काव्याचेच रसिक असून ज्यांचें रामपदाचे ठिकाणीं प्रेम नाहीं, त्यांना हास्यरसाचा तरी सुखानुभव घेतां येईलच.

भाषाभनिति भोरि मति मोरी ।
हँसिबे जोग हँसे नाहिँ खोरी

हें काव्यच मुळीं प्राकृत—देशभाषेंत—आहे, त्यांतून माझी कवित्वशक्ति अगदींच शेळपट. अर्थातच हें काव्य हांसण्यालायक होणार, तेव्हां यास कोणी हांसल्यास तो त्यांचा खोडसाळपणा नव्हे.

प्रभु-पद-प्रीति न सामुझि नीकी ।
तिन्हहिँ कथा सुनि लागिहि फीकी ।

प्रभुपदाचे ठिकाणीं ज्यांचें प्रेम नाहीं, तथापि जे बुद्धीनें चाणाक्ष आणि समजदार आहेत, त्यांना ही काव्यरचना ऐकून नीरस लागणार.

हरि-हर-पद-रति मति न कुतरकी ।
तिन्ह कहँ मधुर कथा रघुबर की ।

हरिहरांचे चरणीं प्रेम असून ज्यांची बुद्धि कुतर्कांनें दूषित झाली नाहीं, अशांना मात्र ही कथा रघुवराची म्हणून गोडच लागणार.

राम-भगति-भूषित जिय जानी ।
सुनिहहिँ सुजन सराहि सुबानी ।

सज्जन लोक ही कथा रामभक्तिभूषित आहे, असें मनांत जाणून श्रवण करतील, आणि प्रेमळ शब्दांनीं तिची वाखाणणी करितील.

कबि न होउँ नहिँ बचनप्रबीनू ।
सकल कला सब बिद्याहीनू ।
आखर अरथ अलंकृति नाना ।
छंद प्रबंध अनेक बिधाना ।
भावभेद रसभेद अपारा ।
कबित-दोष-गुन बिबिध प्रकारा ।
कबित बिबेक एक नहिँ मोरे ।
सत्य कहउँ लिखि कागज कोरे ।

मी कवी तर नव्हेंच; पण चांगला वक्ताही नाहीं. सर्वविद्याहीन व सर्वकलाहीन मी आहे. शब्दांचे अर्थ आणि नानाविध अलंकार, अनेक निरनिराळे छंद आणि प्रबंध, असंख्य भावभेद आणि रसभेद असे हे कवितेचे निरनिराळ्या प्रकारचे गुणदोष आहेत. काव्यशक्ति किंवा वरील प्रकारची विद्वत्ता यांतून एकही माझेजवळ नाहीं, हें मी खरोखर कोऱ्या कागदावर देखील ( प्रतिज्ञापूर्वक ) लिहून देतों.

दो०—भनिति मोरि सब-गुन-रहित बिस्व-बिदित गुन एक । सो बिचारि सुनिहहिँ सुमति जिन्ह के बिमल बिबेक ॥ १३ ॥

माझी उक्ति सर्वच गुणांनीं नादान आहे. परंतु तींत जगास विदित असा एकच गुण आहे. त्याचा विचार करून ज्यांची सदसद्विवेकबुद्धि जागृत आहे, असे विचारी लोक मात्र ती श्रवण करितील.

चौ०—एहि महँ रघुपतिनाम उदारा ।
अतिपावन पुरान-स्रुति-सारा ।

मंगलभवन अमंगलहारी ।
उमासहित जेहि जपत पुरारी ।

ह्यांत अत्यंत पावन, पुराणें आणि श्रुति यांचें रहस्य, मंगलांचें निधान, आणि पार्वतीसहवर्तमान त्रिपुरारि शंकर ज्याचा जप करितात, असें रघुपतीचें अमंगलनाशक उदार नाम आहे.

भनिति बिचित्र सु-कवि-कृत जोऊ ।
रामनाम बिनु सोह न सोऊ ।
बिधुबदनी सब भाँति सवाँरी ।
सोह न बसन बिना बर नारी ।

काव्य उत्तम कवीनें केलें असून वैचित्र्यपूर्ण आहे, पण तें जर रामनामाव्यतिरिक्त असेल तर त्याला देखील शोभा येणार नाहीं. सर्वप्रकारें शृंगारलेली व चंद्रमुखी अशी उत्कृष्ट स्त्रीदेखील वस्त्रहीन असलेली शोभत नाहीं.

सब-गुन-राहित कु-कबि-कृत बानी ।
राम-नाम-जस-अंकित जानी ।
सादर कहहिँ सुनहिँ बुध ताही ।
मधुकर सरिस संत गुनग्राही ।

सर्व गुणांनीं रहित आणि कुकवीनें रचलेलें असें काव्य, पण तें रामनामयशानें अंकित आहे, हें जाणूनच ज्ञाते त्याचें आदरपूर्वक पठण व श्रवण करितात; कारण, संत हे भ्रमराप्रमाणें केवळ गुणांचे भोक्ते असतात.

जदपि कबित रस एकउ नाहीँ ।
रामप्रताप प्रगट एहि माहिँ ।
सोइ भरोस मोरे मन आवा ।
केहि न सुसंग बडप्पन पावा ।

यद्यपि यांत काव्यरस यत्किंचितहि नाहीं, तथापि यांत रामप्रताप मात्र प्रत्यक्ष प्रगट आहे. म्हणून माझ्या मनाला एवढ्याच गोष्टीचा भरंवसा वाटत आहे कीं सत्संगतीनें कोणास महती मिळाली नाहीं ?

१ न यद्वचश्चित्रपदं हरेर्यशो जगत्पवित्रं प्रगृणीत कर्हिचित् । तद्वायसं तीर्थमुशंति मानसा न यत्र हंसा विरमंति स्विकक्षयाः ॥

२ तद्वाग्विसर्गो जनताघविप्लवो यस्मिन् प्रतिश्लोकमबद्धवत्यपि । नामान्यनंतस्य यशोऽकितानि शृण्वंति गायंति गृणंति साधवः ॥
(श्रीमद्भागवत)

धूमउ तजइ सहज करुआई ।
अगरुप्रसंग सुगंध बसाई ।
भनिति भदेस बस्तु भलि बरनी ।
रामकथा जगमंगलकरनी ।

अगरु चंदनाच्या सांनिध्यानें धूम्रदेखील आपलें अंगभूत कटुत्व टाकून आपणास सुगंधित करून घेतो. हें काव्य जरी अगदींच टाकाऊ असलें तरी यांतील प्रतिपाद्य विषय श्रेष्ठतम आहे. ही रामकथा आहे, आणि ती जगाचें कल्याणच करील.

छंद–मंगलकरनि कलिमलहरनि तुलसी-
कथा रघुनाथ की । गति कूर कबिता स-
रित की ज्यौँ सरित पावन पाथ की ॥
प्रभु-सुजस-संगति भनिति भलि होइहि
सुजन-मन-भावनी । भवअंग भूति मसान
की सुमिरत सोहावनि पावनी ॥ १ ॥

मंगलकारिणी व कलिमलहारिणी अशी ही राघवाची कथा आहे. पुण्यकारक प्रवाहवती भागीरथीप्रमाणेंच ह्या कवितारूप गंगेची देखील गति कुटिल असणारच; परंतु प्रभूच्या सुयशाची या काव्यनदीस जोड असल्याकारणानें ती सद्भक्तांच्या मनास प्रसन्नच करील. श्रीशंकराच्या अंगावरील विभूति स्मशानांतील प्रेताची खरीच; परंतु शंकराच्या अंगस्पर्शामुळें ती स्मरणीय, सुंदर आणि पवित्र अशी होते.

दो०–प्रिय लागिहि अति सबहि मम भनिति
राम-जस-संग । दारु बिचारु कि करइ
कोउ बंदिय मलय प्रसंग ॥ १४ ॥

रामयशोन्वित असें हें माझें काव्य सर्वांसच अत्यंत प्रिय होईल. मलयागिरीच्या संसर्गाचीच प्रौढी मानावी लागते; तेथें कोणी तरी काष्ठाचा विचार करितो काय ? ( मलयपर्वतावर काष्ठमात्रास चंदनत्व येतें. चंदनत्व आलें कीं काष्ठबुद्धि नष्ट होऊन तें आदरास पात्र होतें. तद्वतच ह्या काव्यासंबंधानें केवल काव्यबुद्धि जाऊन तें भगवद्गुणप्रचुर असल्याकारणानें आदरणीयच होणार. )

दो०–स्याम सुरभि पय बिसद अति गुनद
करहिँ सब पान । गिराग्राम्य सिय-
राम-जस गावहिँ सुनहिँ सुजान ॥१५॥

गाय जरी कपिला ( काळी ) असली तरी पण

तिचें दूध फारच स्वच्छ आणि गुणकर असतें, ह्मणून तें सर्वजण पितात, तद्वतच माझी उक्ति ग्राम्य परंतु सीतारामयशान्वित असल्याकारणानें सुज्ञ जन ती ऐकतील व गातील.

चौ०—मनि-मानिक-मुकुता-छबि जैसी।
अहिगिरिगजसिर सोह न तैसी।
नृपकिरीट तरुनीतनु पाई।
लहहिँ सकल सोभा अधिकाई।
तैसेहि सु-कबि-कबित बुध कहहीँ।
उपजहिँ अनत अनत छबि लहहीँ।

मणी, माणिक आणि मोतीं ज्याप्रमाणें राजमुकुट किंवा तरुण स्त्रीचें शरीरावर अतिशय खुलतात, त्याप्रमाणें सर्प, पर्वत आणि गज ( हीं अनुक्रमें त्यांचीं उत्पत्तिस्थानें असूनहि ) यांच्या मस्तकावर शोभत नाहींत. तद्वतच उत्कृष्ट कवीच्या कवितेसंबंधानेंहि विद्वज्जन हेंच प्रतिपादन करितात कीं, ती उपजते एका ठिकाणीं आणि विकास पावते भलत्याच ठिकाणीं.[1]

भगति हेतु बिधिभवन बिहाई।
सुमिरत सारद आवति धाई।

कविजनांच्या भक्तीस्तव आपला ब्रह्मलोक सोडून स्मरण करितांच सरस्वतीदेखील धांवत येते.

राम-चरित-सर बिनु अन्हवाये।
सो स्रम जाइ न कोटि उपाये।
कबि कोबिद अस हृदय बिचारी।
गावहिँ हरिजस कलि-मल-हारी।

रामचरित्ररूप मानससरोवरांत स्नान घातल्याखेरीज वाग्देवीचें [ ब्रह्मलोकापासून भूलोकापर्यंत धांवत येण्याचें ] परिश्रम कोट्यावधि उपायांनीं देखील परिहारावयाचे नाहींत. अशा प्रकारचा विचार मनांत बाळगून कवी आणि पंडित केवळ कलिमलहारक अशा भगवद्यशाचेंच गान करितात.

१ मराठी मानस-हंस ( तुलसीरामायण–रहस्य ) हें या आशीर्वादाचेंच फळ म्हणवेल. कारण तुलसीदासांच्या उपकारांचें उद्घाटण त्यांत सांगोपांग मिळतें. तसा प्रयत्न इतर कोणत्याहि भाषेंत झालेला नाहीं. म्हणून महाराष्ट्रास धन्यता वाटणें आश्चर्याचें म्हणतां येणार नाहीं.

कीन्हे प्राकृत-जन-गुन-गाना।
सिर धुनि गिरा लागि पछिताना।

प्राकृत जनांचे गोडवे गात राहिल्यास सरस्वती कपाळ बडवून पश्चात्ताप करूं लागते.

हृदय सिंधु मति सीपि समाना।
स्वाती सारद कहहिँ सुजाना।
जौँ बरखइ बरबारी बिचारू।
होहिँ कबित मुकुतामनि चारू।

सुज्ञ लोक हृदयास सिंधूची, बुद्धीस शिंपल्याची आणि सरस्वतीस स्वातीनक्षत्राची उपमा देऊन म्हणतात कीं, जर विचाररूप गुणकारक जलाचा वर्षाव होईल तर त्यापासून अमोल मोतीं निर्माण होतील.

**दो०—जुगुति बेधि पुनि पोहियहि रामचरित बर ताग। पहिरहिँ सज्जन बिमल उर सोभा अतिअनुराग ॥१६॥**

नंतर त्या मोत्यांना खुबीनें वेज पाडून तीं रामयशोरूप उत्तम सूत्रांत ओवावींत म्हणजे मग सज्जन त्यांस आपल्या विमल हृदयावर धारण करितात. त्या मोत्याविषयीं संतांची जी अत्यंत आसक्ति तीच त्यांची खरी शोभा होय.

चौ०-जे जनमे कलिकाल कराला।
करतब बायस बेष मराला।
चलत कुपंथ बेदमग छाँडे।
कपट कलेवर कलिमल भाँडे।
बंचक भगत कहाइ राम के।
किंकर कंचन कोह काम के।
तिन महँ प्रथम रेख जग मोरी।
धिग धरमध्वज धँधरकधोरी।

हंसाचा वेष असून कृति मात्र ज्यांची कावळ्याप्रमाणें आहे, जे वेदमार्गाचा उच्छेद करून कुकर्मानें वर्तणारे आहेत, जे कपटाचे केवळ पुतळेच असून कलिमलाचे आगर आहेत,पण रामाचे सेवक मात्र म्हणतात, परंतु काम क्रोध, आणि कांचन यांचेच खरे सेवक आहेत, असे जे वंचक ह्या कराल कालिकालांत जन्मले आहेत, त्यांच्यामध्यें जगांत मी अग्रगण्य आहे. संतपणाचा टेंभा मिरविणाऱ्या माझ्यासारख्या विषयलंपटास धिक्कार असो !

जौं अपने अवगुन सब कहऊँ।
बाढइ कथा पार नहिँ लहऊँ।

तातें मैं अति अलप बखाने ।
थोरे महँ जानिहहिं सयाने ।

जर मी आपल्या दुर्गुणांचा सर्व पाढा वाचेन तर तेंच पुराण इतकें वाढेल कीं, मला देखील त्याचा अंत लागणार नाहीं; म्हणून ती कर्मकथा मी अगदींच थोडक्यांत सांगितली आहे, सुज्ञांस इशाराच काफी.

समुझि बिबिध बिधि बिनती-मोरी ।
कोउ न कथा सुनि देइहि खोरी ।
एतेहु पर करिहहिं जे संका ।
मोहिं तें अधिक ते जड मति रंका ।

माझी ही उदंड प्रार्थना लक्षांत घेऊन कोणीही हें काव्य ऐकून त्याला दूषण लावणार नाहींत. इतक्या उपरहि जर ते तर्ककुतर्क चालवितीलच तर तें माझ्यापेक्षांहि अधिक जड आणि बुद्धीनें दरिद्री होत.

कबि न होउँ नहिं चतुर कहावउँ ।
मति-अनुरूप रामगुन गावउँ ।
कहँ रघुपति के चरित अपारा ।
कहँ मति मोरि निरत संसारा ।
जेहि मारुत गिरि मेरु उडाहीं ।
कहहु तूल केहि लेखे माहीं
समुझत अमित रामप्रभुताई ।
करत कथा मन अति कदराई ।

मी कवीहि नव्हे आणि स्वतःला चतुरहि पण ह्मणवीत नाहीं. केवळ रामगुण ह्मणूनच ते मी यथामति गात आहे. कोठें रघुपतीचीं तीं अपार चरित्रें आणि कोठें ही माझी संसारासक्त बुद्धि ! ज्या वायूनें मेरु-पर्वताचेदेखील उच्चाटण होईल त्या वायूसमोर, सांगा पाहूं, कापसाचा काय हिशेब ? रामचंद्राच्या अपरंपार माहात्म्याची कल्पना येतांच हें काव्य रचण्यास मन अत्यंत कचरतें.

**दो०—सारद सेष महेस बिधि आगम निगम पुरान । नेति नेति कहि जासु गुन करहिं निरंतर गान ॥ १७ ॥**

शारदा, शेष, महेश ब्रह्मदेव, शास्त्रें, वेद, पुराणें, हीं देखील ‘ नेति नेति ’ ह्मणूनच ज्याचे गुण निरंतर गात असतात,

चौ०—सब जानत प्रभुप्रभुता सोई ।
तदपि कहे बिनु रहा न कोई ।

अशा त्या प्रभूचें प्रभुत्व सर्वच जाणतात. तथापि त्याचें गुणवर्णन केल्याखेरीज कोणीहि राहिला नाहीं.

तहाँ बेद अस कारन राखा ।
भजनप्रभाउ भाँति बहु भाखा ।

वेदांनीं भजनाचा प्रभाव परोपरीं वर्णन केला आहे; आणि त्यासंबंधानें असेंच कारण पुढें केलें आहे कीं,

एक अनीह अरूप अनामा ।
अज सच्चिदानंद परधामा ।
व्यापक बिस्वरूप भगवाना ।
तेहि धरि देह चरित कृत नाना ।
सो केवल भगतन्ह हित लागी ।
परमकृपाल प्रनत अनुरागी ।

एकमेवाद्वितीय, इच्छारहित, अरूप, अनाम, जन्मरहित, सच्चिदानंद, परंधाम, व्यापक, विश्वरूप असा जो भगवान् परमात्मा त्यानें देह धारण करून नानाविध चरित्रें केलीं तीं केवळ भक्तांच्या हिता साठींच होत. कारण, तो परमकृपाळु आणि शरणागतवत्सल आहे.

जेहि जन पर ममता अति छोहू ।
तेहि करुना करि कीन्हि न कोहू ।
गई बहोर गरीब नेवाजू ।
सरल सबल साहिब रघुराजू ।

ज्या दासावर त्याचें अत्यंत प्रेम आणि ममता आहे, त्यावर त्यानें मुळींच कधीं क्रोध न करितां कृपाच केली आहे. श्रीरामचंद्र अनीह अरूप इत्यादि गुणविशिष्ट साक्षात् भगवान् होत ही एक गोष्ट झाली. दुसरी गोष्ट अशी कीं श्रीरामचंद्र हे दीनदयाळ इत्यादि गुणविशिष्ट असून ते नरोत्तम व नृपालश्रेष्ठ अशी व्यक्ति आहेत. तेव्हां दोन्ही दृष्टींनीं पाहिलें असतां ते सरळ आणि समर्थच ठरतात.

बुध बरनहिं हरिजस अस जानी ।
करहिं पुनीत सुफल निज बानी ।
तेहि बल मैं रघुपति-गुन-गाथा ।
कहिहउँ नाइ रामपद माथा ।

१ आकाश अंत न कळोनिहि अंतरिक्षीं । आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी ॥ नामप्रतापहि यथामति याच रीतीं । सीमा न पावति तथापि मुनींद्र गाती ॥ (वा. पंडित)

हें जाणून विद्वज्जन हरियशाचेंच वर्णन करितात, आणि आपली वाणी पवित्र आणि धन्य करून तात. त्याच बळावर मीदेखील रामपदीं मस्तक नमवून रघुपतिगुणगाथा वर्णन करणार आहे.

**मुनिन्ह प्रथम हरिकीरति गाई ।**
**तेहि मग चलत सुगम मोहि भाई**

मुनिजनांनीं पूर्वींच भगवद्यश गायलें आहे. मीहि त्यांचा माग काढीत गेलों असतां, गड्यांनों ! मला देखील सोपें जाईल.

**दो०–अति अपार जे सरितवर जौं नृप सेतु कराहिं । चढि पिपीलिकउ परम लघु बिनु स्रम पारहि जाहिं ॥१८॥**

अतिशय अफाट असलेल्या मोठमोठ्या नद्यांवर राजेलोकांनीं जर पूल बांधून काढले तर अत्यंत क्षुद्र अशी मुंगीदेखील त्या पुलावर चढून बिनदिक्कत पैलतीराला जाईल.

**चौ०–एहि प्रकार बल मनहि देखाई ।**
**करिहउँ रघुपतिकथा सोहाई ।**

ह्या प्रकारें मनास धीर देऊन सुंदर अशी रघुपति-कथा मी रचणार आहें.

**ब्यास आदि कबिपुंगव नाना ।**
**जिन्ह सादर हरिसुजस बखाना ।**
**चरन कमल बंदउँ तिन्ह केरे ।**
**पुरवहु सकल मनोरथ मेरे ।**

ज्यांनीं भगवद्यश आदरपूर्वक वर्णिलें आहे, अशा व्यास आदिकरून अनेक कविपुंगवांच्या चरणकमलांना मी वंदन करितों. ते माझे सर्व मनोरथ पूर्ण करोत.

**कलि के कबिन्ह करउँ परनामा ।**
**जिन्ह बरने रघुपति-गुन-ग्रामा ।**

ज्यांनीं रघुपतीचे गुणग्राम वर्णन केले आहेत, त्या कलिकालांतील कवींना मी प्रणाम करितों.

**जे प्राकृत कबि परम सयाने ।**
**भाषा जिन्ह हरिचरित बखाने ।**
**भये जे अहहिं जे होइहहिं आगे ।**
**प्रनवउँ सबहि कपट सब त्यागे ।**

१ ‘ तरी जन यथामति स्तवुनि जाहले सन्मती ’ ( पंत )

ज्यांनीं स्वदेशभाषेंत भगवंताचीं चरित्रें वर्णिलीं आहेत, अशा मागें झालेल्या, प्रस्तुत असलेल्या आणि पुढें होणाऱ्या अत्यंत कुशल प्राकृत कवींना मी निष्कपट बुद्धीनें प्रणाम करतों.

**होहु प्रसन्न देहु बरदानू ।**
**साधुसमाज भनितिसनमानू ।**

संतसमाजांत ह्या काव्यास सन्मान मिळो, असें आपण प्रसन्न होऊन मला वरदान द्यावें.

**जो प्रबंध बुध नहिं आदरहीं ।**
**सो स्रम बादि बालकबि करहीं ।**
**कीरति भनिति भूति भलि सोई ।**
**सुर-सरि-सम सब कहँ हित होई ।**

ज्या प्रबंधाचा प्राज्ञजन आदर करीत नाहींत, त्याचा कर्ता मूढ म्हणून त्याचे श्रम फुकट होतात. गंगेप्रमाणें सर्वांचेंच ज्यामुळें हित होईल अशाच प्रकारचें काव्य, ऐश्वर्य आणि कीर्ति श्लाघनीय होत.

**राम-सु-कीरति भनिति भदेसा ।**
**असमंजस अस मोहि अँदेसा ।**

रामचंद्राचें यश अत्यंत दैदीप्यमान आणि माझी काव्यरचना अगदींच निकृष्ट, या विवंचनेनें माझें मन आंदोलित होत आहे.

**तुम्हरी कृपा सुलभ सोउ मोरे ।**
**सिअनि सोहावनि टाट पटोरे ।**

तथापि, आपल्याच कृपेनें ही गोष्ट मला सुसाध्य होणार आहे. तरटावर देखील रेशमाचें नक्षीकाम ( गालीचे ) खुपसुरतच दिसतें[१].

**दो०–सरलकबित कीरति बिमल सोइ आदरहिं सुजान । सहज बैर बिसराइ रिपु जो सुनि करहिं बखान ॥ १९ ॥**

जी सरळ कविता आणि विमल कीर्ति ऐकून शत्रूदेखील स्वभावसिद्ध वैर विसरून गोडवेच गात राहतात, तिचाच सुज्ञजन आदर करितात[२].

१ वाङ्मयचौर्य असलें तरी त्यांत स्वतःची कल्पनानिर्मिति प्रामुख्यानें असली तर तें क्षम्य होय हा यातला ध्वनि. तुलसीदासांनीं तेंच केलें हें आमच्या ‘मानसहंसा’ वरून सहज ध्यानांत येईल.

२ किं कवेस्तेन काव्येन किं काण्डेन धनुष्मता ।
परस्य हृदये लग्नं न घूर्णयति यच्छिरः॥ (नलचंपू)

**दो०–सो न होइ बिनु बिमल मति मोहिँ मतिबल अतिथोरि। करहु कृपा हरिजस कहउँ पुनि पुनि करउँ निहोरि॥ २०॥**

वरील प्रकार बुद्धिविकासाव्यतिरिक्त घडत नसतो. माझेजवळ बुद्धीचें बळ अगदींच अल्प आहे. म्हणून मी पुनःपुन्हां प्रार्थना करितों कीं, मी भगवंताचे गुणानुवाद गात असतांना आपली मजवर कृपा असूं द्यावी.

**दो०–कबिकोबिद रघुबरचरित-मानस-मंजु-मराल। बालबिनय सुनि सुरुचि लखि मोपर होहु कृपाल॥ २१॥**

कवि आणि पंडित हे रघुवरचारित्ररूपी मानस-सरोवरामधील सुंदर राजहंस होत. ते माझी बालकाची विनंति ऐकून आणि माझी सदिच्छा लक्षांत आणून मजवर कृपाळु होवोत.

**सो०–बंदउँ मुनि-पद-कंजु रामायन जेहिँ निरमयेउ। सखर सकोमल मंजु दोष रहित दूषन सहित॥ ६॥**

ज्यानें खर, दूषण इत्यादि कठोर राक्षसांच्या कथेसहित असलेलें परंतु अत्यंत कोमल, हृदयंगम आणि सुतराम् निर्दोष असें रामायण निर्माण केलें, त्या महामुनि वाल्मीकीच्या पदकमलांना मी वंदन करितों.

**सो०–बंदउँ चारिउ वेद भव-बारिधि-बोहित सरिस। जिन्हहिँ न सपनेहु खेद बरनत रघुबर बिसद जस॥ ७॥**

रघुवराचें विमल यश वर्णन करीत असतां ज्यांना स्वप्नांतदेखील शीण वाटला नाहीं, त्या भवसागरांतील नौकेप्रमाणें असणाऱ्या वेदचतुष्टयास मी वंदन करितों.

**सो०–बंदउँ बिधि-पद-रेनु भवसागर जेहि कीन्ह जहँ। संत सुधा ससि धेनु प्रगटे खल बिष बारुनी॥ ८॥**

ज्यांत संत, अमृत, चंद्र, धेनु [ आणि तद्विपर्यस्त ] खल, विष आणि वारुणी प्रगट झाले आहेत, असा भवसागर ज्यानें उत्पन्न केला, त्या ब्रह्मदेवाच्या पदरेणूंस मी प्रणाम करितों.

**दो०–बिबुध-बिप्र-बुध-ग्रह-चरन बंदि कहउँ करजोरि। होइ प्रसन्न पुरवहु सकल मंजु मनोरथ मोरि॥ २२॥**

संत, ग्रह, देवता आणि विप्र यांच्या चरणांस हात जोडून मी वंदन करितों. ते प्रसन्न होऊन माझे सर्व शुभ मनोरथ परिपूर्ण करोत.

चौ०–पुनि बंदउँ सारद सुरसरिता।
जुगल पुनीत मनोहरचरिता।
मज्जन पान पाप हर एका।
कहत सुनत एक हर अबिबेका।

मी पुन्हां सरस्वती व भागीरथी यांस प्रणाम करितों. या दोघींचींहि चरित्रें पवित्र आणि हृदयंगम होत. पैकीं मंदाकिनी ही स्नानपानांनीं पापांचें हरण करितें, आणि शारदा ही श्रवणपठणानें अविवेकाचा विध्वंस करिते.

गुरु पितु मातु महेस भवानी।
प्रनवउँ दीनबंधु दिनदानी।

माझे गुरु आणि मातापिता जे शंकरपार्वती त्यांस मी प्रणाम करितों. ते दीनांचे बंधु असून आयुष्याचे दाते होत.

सेवक स्वामि सखा सियपी के।
हित निरुपधि सब बिधि तुलसी के।

ते श्रीसीतारामचंद्राचे सेवक, स्वामी, आणि सखे असून तुलसीदासाचे सर्वप्रकारें अहेतुक हितकर्ते होत.

कलि बिलोकि जग हित हर गिरिजा।
साबर-मंत्र-जाल जिन्ह सिरिजा।
अनमिल आखर अरथ न जापू।
प्रगट प्रभाउ महेसप्रतापू।

कलिकालास अवलोकन करून जगाच्या हितास्तव त्या शंकरपार्वतींनीं शाबरमंत्रजाल उत्पन्न केला. त्या मंत्राच्या अक्षरांत मुळींच कांहीं मेळहि नाहीं आणि अर्थहि नाहीं. परंतु शंकरप्रताप असा आहे कीं केवळ जपानेंच त्यांचा प्रभाव प्रत्यक्ष अनुभवास येतो.

सो महेस मोहिँ पर अनुकूला।
कराहिँ कथा मुद-मंगल-मूला।
सुमिरि सिवा सिव पाइ पसाऊ।
बरनउँ रामचरित चितचाऊ।

तो शंकर मजवर प्रसन्न झाल्यास तोच ही आनंदमंगलमूलक रामकथा तडीस नेईल. त्या शंकर-पार्वतीच्या स्मरणानें जर मजवर त्यांचा प्रसाद होईल तरच हें चित्ताकर्षक रामचरित्र मी वर्णन करूं शकेन.

भनिती मोरि सिवकृपा बिभाती ।
ससिसमाज मिलि मनहुँ सुराती ।
जे एहिं कथहिं सनेह समेता ।
कहिहहिं सुनिहहिं समुझि सचेता ।
होइहहिं राम-चरन-अनुरागी ।
कलि-मळ रहित सुमंगलभागी ॥

चंद्रमंडळाच्या साहचर्यानें ज्याप्रमाणें रात्र रमणीय होते, तद्वत् शिवकृपेनें माझें काव्यहि तसेंच ओजस्वी होईल. जे ह्या कथेचें सप्रेम, अंतःकरणपूर्वक आणि समजूनउमजून पठण अगर श्रवण करितील, ते कलिमलदोषांपासून मुक्त होऊन आनंदाचा अनुभव घेत रामपदाचे ठिकाणीं अनुरक्त होतील.

दो०—सपनेहुँ साचेहु मोहि पर जौं हरगौरी पसाउ । तौ फुर होउ जो कहेउँ सब भाषा भनिति प्रभाउ ॥ २३ ॥

निदान स्वप्नांत तरी जर श्रीउमामहेश्वरांचा अनुग्रह मजवर खरोखरच झाला असेल तरीदेखील मी जें जें ह्मणून बोलेन तें तें सर्व ह्या भाषानिबद्ध कवितेच्या सामर्थ्यानें सत्यच होत जाईल.

चौ०—बंदउँ अवधपुरी अतिपावनि ।
सरजूसरि कलि-कलुष-नसावनि ।

अत्यंत पावन जी अयोध्या नगरी आणि कलिकिल्मिपाचा नाश करणारी जी शरयू नदी त्यांस मी वंदन करितों.

प्रनवउँ पुर-नर-नारि बहोरी ।
ममता जिन्ह पर प्रभुहि न थोरी ।
सियनिंदक अघओघ नसाये ।
लोक बिसोक बनाइ बसाये ।

ज्यांचेवर प्रभुरामचंद्राची ममता थोडीथोडकी नसे, अशा त्या अयोध्यापुरींतील स्त्रीपुरुषांस मी आतां वंदन करितों. त्या अयोध्या नगरींतील सीतेची निंदा करणाऱ्यांच्या पापांचे प्रवाह नष्ट करून प्रभूंनीं त्यांना शोकरहित अशा लोकांप्रत पोचविलें.

बंदउँ कौसल्या दिसि प्राची ।
कीरति जासु सकल जग माँची ।
प्रगटेउ जहँ रघुपति ससि चारू ।
बिस्वसुखद खल कमल-तुसारू ।

जिचे ठायीं सकल जगास सुख देणारा आणि खलरूप कमलास तुषाराप्रमाणें असणारा असा रामरूप रमणीय चंद्रमा उदित झाल्याकारणानें जिची कीर्ति सकल ब्रह्मांडांत दुमदुमून राहिली आहे, त्या कौसल्यारूप प्राची दिशेस मी प्रणाम करितों.

दसरथराउ सहित सब रानी ।
सुकृत-सुमंगल-मूरति मानी ।
करउँ प्रनाम करम मन बानी ।
करहु कृपा सुतसेवक जानी ।
जिन्हहिं बिरचि बड भएउ बिधाता ।
महिमा-अवधि राम-पितु-माता ।

ज्यांना निर्माण करून ब्रह्मदेव महत्त्वास चढला, आणि रामचंद्राचे मातापिता ह्मणून जे निःसीम भाग्याला चढले त्या सर्व राण्यांसहवर्तमान राजा दशरथ याला सुकृताची आणि सुमंगलाची प्रत्यक्ष मूर्तिच मानून, कायावाचामनेंकरून मी प्रणाम करितों. मला पुत्र आणि सेवक समजून ते मजवर कृपा करोत.

सो०—बंदउँ अवधभुआल सत्य प्रेम जेहि रामपद । बिछुरत दीनदयाल प्रिय तनु तृन इव परिहरेउ ॥ ९ ॥

दीनदयाळ प्रभूची ताटातूट होतांच आपली प्रिय तनू देखील तृणाप्रमाणें झिडकारून टाकण्याइतकें ज्याचें रामपदीं निर्वाणीचें प्रेम, त्या अयोध्याधीश राजा दशरथास माझे दंडवत असोत.

चौ०-प्रनवउँ परिजनसहित बिदेहू ।
जाहि रामपद गूढ सनेहू ।
जोग भोग महँ राखेउ गोई ।
राम बिलोकत प्रगटेउ सोई ।

भोगामध्येंच गुप्त राखलेला ज्याचा योग रामाची दृष्टादृष्ट होतांच एकदम प्रगट झाला, असें ज्याचें रामपदीं गूढ प्रेम होतें, त्या विदेहराजा जनकास आणि त्याच्या परिवारास मी प्रणाम करितों.

प्रनवउँ प्रथम भरत के चरना ।
जासु नेम ब्रत जाइ न बरना ।

राम-चरन-पंकज मन जासू।
लुबुध मधुप इव तजइ न पासू।

• ज्याचे नेम आणि व्रत वर्णन करणें शक्य नाहीं आणि ज्याचें मन रामचंद्राच्या चरणकमलीं भ्रमराप्रमाणें लुब्ध होऊन त्यांचें सांनिध्य मुळींच सोडूं इच्छित नाहीं त्या भरताच्या चरणास मी आतां प्रथम प्रणाम करितों.

बंदउँ लछिमन-पद जल-जाता।
सीतल-सुभग-भगत-सुख-दाता।
रघुपतिकीरति बिमल पताका
दंड समान भएउ जस जाका।

रघुपतीच्या कीर्तिरूप विमल पताकेस ज्याचें यश दंडासमान झालें आहे, त्या लक्ष्मणाच्या शीतल, सुभग आणि भक्तसुखदायक पदकमलांस मी वंदन करितों.

सेष सहस्रसीस जगकारन।
जो अवतरेऊ भूमि-भय टारन।
सदा सो सानुकूल रह मोपर।
कृपासिंधु सौमित्रि गुनाकर।

पृथ्वीच्या भयहरणास्तव अवतरलेला जो जगदाधार सहस्रशीर्ष शेष असा तो कृपासागर गुणनिधान सुमित्रापुत्र लक्ष्मण मजवर निरंतर प्रसन्न असो.

रिपु-सूदन-पद-कमल नमामी।
सूर सुसील भरतअनुगामी।

शूर सुशील असा जो भरतानुग शत्रुघ्न त्याच्या पदकमलांस मी वंदन करितों.

महाबीर बिनवँउ हनुमाना।
राम जासु जस आपु बखाना।

रामांनीं देखील ज्याच्या यशाचें स्वतः व्याख्यान केलें आहे त्या महावीर हनुमंतास मी शरण आहे.

सो०--प्रनवउँ पवनकुमार खल--बन--
पावक ज्ञानघन। जासु हृदय आगार
बसहिँ राम सर-चाप--धर॥ १०॥

ज्याच्या हृदयमंदिरावर प्रभु रामचंद्र शरचापांनीं सज्ज होऊन खडा पाहरा बजावीत आहेत, अशा खलरूप काननाला अग्नीप्रमाणें असणाऱ्या त्या महाप्राज्ञ पवनात्मज मारुतिरायास मी प्रणाम करितों.

चौ०- कपिपतिरीछ निसाचर राजा।
अंगदादि जे कीससमाजा।
बंदउँ सब के चरन सोहाए।
अधमसरीर राम जिन्ह पाए

कपिपति सुग्रीव ऋक्षराज जांबुवान, राक्षसराज बिभीषण आणि अंगदप्रभृति जो वानरांचा समुदाय, ज्यांनीं नीच योनींत देखील रामास वश केलें, त्या सर्वांच्या शुचिष्मंत चरणांस मी वंदन करितों.

रघुपति-चरन-उपासक जेते।
खग मृग सुर नर असुर समेते।
बंदउँ पदसरोज सब केरे।
जे बिनु काम राम के चेरे।

पशु, पक्षी, मनुष्य, देव, आणि राक्षस यांच्या सकट जेवढे म्हणून रामचरणाचे उपासक असतील, आणि जे निष्काम रामभक्ति करीत असतील, त्या सर्वांच्या पदकमलांस मी प्रणाम करितों.

सुकसनकादि भगत मुनि नारद।
जे मुनिबर बिज्ञानबिसारद।
प्रनवउँ सबहिँ धरनि धरि सीसा।
करहु कृपा जन जानि मुनीसा।

नारदमुनिप्रभृति भक्त आणि शुकशौनकादि विज्ञानविशारद मुनीश्वर ह्या सर्वांस मी धरणीवर मस्तक ठेवून प्रणाम करितों. हे मुनींद्र हो! मला आपला दास समजून मजवर आपण कृपा करावी.

जनकसुता जगजननि जानकी।
अतिसय प्रिय करुनानिधान की।
ताके जुग पद-कमल मनावउँ।
जासु कृपा निरमल मति पावउँ।

करुणानिधान रामचंद्राची अत्यंत प्रियकर, आणि जिच्या कृपेनें मला निर्मल बुद्धि प्राप्त होईल अशी जगन्माता, जनककन्या जानकी इच्या पदकमलयुगुलांस मी नमन करितों.

पुनि मन बचन कर्म रघुनायक।
चरन कमल बंदउँ सब लायक।
राजिवनयन धरे धनुसायक।
भगत-बिपति-भंजन सुखदायक।

धनुर्बाणधर, भक्तसंकटनिवारक, सुखदायक, कमलनयन, रघुनायकाच्या सर्वसमर्थ अशा चरणकमलांस कायावाचामनें करून मी पुन्हां नमन करितों.

**दो०–गिरा अरथ जल बिचि सम कहियत भिन्न न भिन्न। बंदउँ सीतारामपद जिन्हहिँ परमप्रिय खिन्न ॥ २४ ॥**

शब्द आणि अर्थ, किंवा समुद्र आणि तरंग हे जरी बोलण्यांत भिन्न परंतु वास्तविक भिन्न नव्हत, तद्वत्च सीतारामचंद्र होत. ज्यांना दीनजन हेच पराकाष्ठेचे प्रिय असतात अशा त्या राम आणि सीता यांच्या पदांस मी वंदन करितों.

**चौ०–बंदउँ रामनाम रघुबर को।**
**हेतु कृसानु भानु हिमकर को।**

रघुपतीच्या 'राम'[1] ह्या नामास मी वंदन करितों. तें अग्नि, सूर्य, आणि चंद्र यांचें परम तत्त्व होय.

**बिधि-हरि-हर-मय बेदप्रान सो।**
**अगुन अनूपम गुननिधान सो।**

रामनाम[2] हें ब्रह्माविष्णुमहेशात्मक असून वेदांचा केवळ प्राण आहे. तें त्रैगुण्यरहित, अनुपम आणि गुणनिधान असें आहे.

**महामंत्र जोइ जपत महेसू।**
**कासीं मुकुति हेतु उपदेसू।**

ह्याच रामनामात्मक महामंत्राचा शंकर जप करीत असतात, आणि वाराणशी क्षेत्रांत जीवाच्या मुक्तीस्तव ह्याचाच उपदेश करितात.[1]

**महिमा जासु जान गनराऊ।**
**प्रथम पूजियत नामप्रभाऊ।**

त्या महामंत्राचा प्रभाव गणराज जाणीत आहेत. नामप्रभावानेंच त्यांची अग्रपूजा[2] होत आहे.

**जान आदिकबि नामप्रतापू।**
**भएउ सुद्ध करि उलटा जापू।**

आदिकवि वाल्मीकि नामाचा प्रताप जाणतात. ते नामाचा उलटा जप करूनच सिद्ध बनले.

**सहस-नाम-सम सुनि सिवबानी।**
**जपि जेईं पिय संग भवानी।**
**हरषे हेतु हेरि हर ही को।**
**किय भूषन तियभूषन ती को।**

---

१ 'राम' शब्दांत तीन वर्ण आहेत. र–अ–म. हे तीन वर्ण अनुक्रमें अग्नि, सूर्य, चंद्र यांचें बीज होत. अग्निबीज दाहकत्वात् प्रलयरूप; सूर्यबीज तेजोमयत्वात् उत्पत्तिरूप; आणि चंद्रबीज अमृतत्वात् स्थितिरूप होय.

२ रामनामाचे ठायीं त्रिमूर्तिंचें वास्तव्य करितें तें असें– रकार अग्निबीज,अतएव शिववाचक;अकार सूर्यबीज, अतएव विष्णुवाचक, आणि मकार चंद्रबीज,अतएव विधिवाचक. म्हणून रामनाम विधिहरिहरमय म्हटलें आहे. आतां शिव-शब्द ज्ञानवाच्य, विष्णु उपासनावाच्य, आणि विधि कर्मवाच्य होय. म्हणून रामनाम हें कर्म, उपासना आणि ज्ञान यांचें मूलतत्त्व होय. वेददेखील त्रिकांडमयच–म्हणजे कर्मउपासनाज्ञानात्मक आहेत. म्हणून रामनाम हें जें कर्म, उपासना आणि ज्ञान यांचें आदितत्त्व तें अर्थातच वेदांचा अंतरात्मा होय. हेंच दुसऱ्याहि रीतीनें सिद्ध होतें. वेदांचा प्राण म्हणजे ॐकार; त्यांत अकार, उकार, आणि मकार असे तीन वर्ण आहेत. अकार वासुदेवात्मक, उकार मायात्मक, आणि मकार जीवात्मक. 'राम' शब्दांतील तीन वर्णहि अशाच अर्थाचे वाचक आहेत. रकार मायावाचक, अकार ईश्वरवाचक आणि मकार जीववाचक. एवंच रामनामांतहि ॐकारसिद्धि आहेच. म्हणून तें वेदांचा अगदीं जिव्हाळा होय. ह्या आणि वरील चौपाईचे अधिकारी पुरुषांनीं अनेक अर्थ केले आहेत. ते अनुभाविक अर्थ ज्याचे त्यानेंच जाणले पाहिजेत.

१ श्रीशिव उवाचः–मणिकर्णिका मम क्षेत्रे गंगायां वा तटे पुनः। म्रियते यः प्रभो देहि मुक्तिं नाऽतो वरांतरम् ॥
श्रीराम उवाचः–क्षेत्रेऽस्मिन् तव देवेश यत्रकुत्रापि यो मृतः। कृमिकीटादयोऽप्याशु मुक्तिस्तस्य तु नान्यथा ॥
मुमुक्षोर्दक्षिणे कर्णे यस्य कस्यापि वा स्वयम्। उपदेक्ष्यासि मन्मंत्रं स मुक्तो हि भवेच्छिव ॥
( रामतापिन्युपनिषद् )

२ सर्व देव अग्रपूजेची इच्छा करूं लागले तेव्हां, सर्वांत आधीं पृथ्वीप्रदक्षिणा करील तोच त्या मानास पात्र होईल, असें ब्रह्मदेवानें त्यांस सांगितलें. सर्वांनीं आपापल्या वाहनांचा उपयोग केला. तेव्हां गणपतीनें अर्थातच माघार घेतली! तितक्यांत त्यास नारद भेटले. त्यांच्या उपदेशाप्रमाणें रामनामाक्षरें लिहून गणेशानें त्यांस प्रदक्षिणा घातली, आणि सर्वांच्या आधीं ब्रह्मदेवाकडे परतला. ब्रह्मदेवानें रामनामाचा महिमा जाणून गणपतीस अग्रपूजेचा मान दिला.

एक रामनाम इतर नामसहस्रतुल्य आहे, हें शिवमुखानें ऐकतांच पार्वतीनें त्याचा जप केला, आणि पतिसमागमें भोजन केलें. तिच्या हृदयांतील भाव ओळखून शंकर प्रसन्न झाले, आणि पार्वतीस स्त्रियांमध्यें अग्रगण्य करून त्यांनीं तीस आपली अर्धांगी करून ठेविली.

नामप्रभाउ जान सिव नीको।
कालकूट फल दीन्ह अमी को।

शंकर रामनामाचा प्रभाव उत्कृष्टपणें जाणतात. त्याच्याच योगेंकरून कालकूट विषाचें अमृत झालें.

**दो०—बरषा रितु रघुपतिभगति तुलसी सालि सुदास। रामनाम बरनजुग सावन भादवँ मास॥ २५॥**

रघुपतीची भक्ति हा वर्षाऋतु होय; त्याचे श्रेष्ठ भक्त हेच शाली धान्य होत, आणि रामनामाचे दोन श्रेष्ठ वर्ण ह्म० 'र' आणि 'म' हेच श्रावण आणि भाद्रपद मास होत.[2]

चौ०—आखर मधुर मनोहर दोऊ।
बरन बिलोचन जन जिय जोऊ।
सुमिरत सुलभ सुखद सब काहू।
लोकलाहु पर-लोक-निबाहू।
कहत सुनत सुमिरत सुठि नीके।
राम लखन सम प्रिय तुलसी के।

रामनामांतर्गत अक्षरद्वय मधुर आणि मनोहर आहे. ते दोन वर्ण म्हणजे जनांच्या हृदयाचे दोन नेत्रच आहेत. त्यांच्या स्मरणानें सर्वांसच सर्व कांहीं सुलभ आणि सुखकारक होतें. ते इहलोकांत लाभदायक आणि परलोकांत मुक्तिदायक आहेत. श्रवण, पठण, आणि मनन यांस ते अतिशय चांगले आहेत. मला तुलसीदासाला तर ते रामलक्ष्मणांसारखे प्रिय वाटतात.

---

१ समुद्रमंथनकालीं कालकूट विष बाहेर येतांच त्याच्या ज्वालांनीं ब्रह्मांडाचा दाह होऊं लागला असतां सर्वांच्या प्रार्थनेवरून शंकरांनीं तें आपल्या कंठामध्यें धारण केलें आणि राममंत्राच्या जपानें तें विष शांत झालें.

२ भाव हा कीं, वर्षाऋतूंत श्रावण आणि भाद्रपद मास हे जसे भाताच्या पिकाचे प्राणभूत होत, तशींच रामनामांतील दोन अक्षरें भक्तिमार्गांतील भक्तांचे जीवनतंतु होत.

बरनत बरन प्रीति बिलगाती।
ब्रम्ह जीव सम सहज सँघाती।
नर नारायन सरिस सुभ्राता।
जगपालक बिसेषि जनत्राता।
भगति-सु-तिय कल करनबिभूषन।
जग-हित-हेतु बिमल बिधु पूषन।

ह्या दोन वर्णांचें पृथक् विवेचन झाल्यास त्यांचें परस्परांची जी अंतःस्थ प्रीति आहे ती विभक्त होईल. जीव आणि ईश्वर यांच्याप्रमाणें त्या परस्परांचें निसर्गसिद्ध साहचर्य आहे. बंधुत्वांत ते प्रतिनरनारायण होत. ते जगत्पालक तर आहेतच; परंतु विशेषतः भक्तपालक आहेत. भक्तिरूप स्त्रीरत्नाचें ते दैदिप्यमान कर्णभूषण होत, आणि जगाद्धितार्थ तर ते उज्ज्वल चंद्रसूर्याप्रमाणें आहेत.

स्वाद तोष सम सुगति सुधा के।
कमठ सेष सम धर बसुधा के।
जन-मन-मंजु-कंज-मधुकर से।
जीह जसोमति हरि हलधर से।

ते वर्ण कैवल्यामृताचे आस्वाद आणि तृप्ति या दोन गुणांसारखे आहेत; आणि वसुंधरेस धारण करण्यामध्यें आदिकच्छ आणि शेष यांच्याप्रमाणें आहेत. भक्तांच्या मनोरूप सुंदर कमलास ते भ्रमराप्रमाणें असून जिव्हारूप यशोदेस ते श्रीकृष्ण-बलराम तुल्य होत.

**दो०—एक छत्र एक मुकुटमनि सब बरननि पर जोउ। तुलसी रघुबर नाम के बरन बिराजत दोउ॥ २६॥**

तुलसीदास ह्मणतातः—रघुवराच्या 'राम' या नामाचे दोन वर्ण, 'र' आणि 'म' ह्मणजे सर्व वर्णांचें एकछत्र (कारण, लिहिण्यांत रकार 'रेफस्योर्ध्वगमनं,' या सूत्राच्या आधारानें रेफ ह्मणजे छत्राकार ‍र्‍ लिहिला जातो.) आणि एक मुकुटमणी ('मोऽनुस्वारः' या सूत्राच्या अन्वयानें मकार बिंदूच्या चिन्हानें ह्मणजे मण्याकृतीनें लिहिला जातो.) होत. ते सर्व वर्णांच्या मस्तकावर विराजमान होत असतात.

---

१ यन्नामसंसर्गवशाद्विवर्णौ नष्टस्वरौ मूर्ध्निगतौ स्वराणां। तन्नामपादौ हृदये निधाय देही कथं नोर्ध्वगतिं प्रयाति।

चौ०—समुझत सरिस नाम अरु नामी।
प्रीति परसपर प्रभु अनुगामी।

विचार केला असतां नाम आणि रूप हीं सम-समान होत; आणि ते प्रभूचेच अनुगामी असल्याकारणानें त्यांचें अन्योन्यप्रेमहि आहे.

नाम रूप दुइ ईस उपाधी।
अकथ अनादि सुसामुझि साधी।

नाम आणि रूप हीं दोन्हींहि परमेश्वराचे ठायीं उपाधी होत. परमेश्वर हा अकथनीय आणि अनादि आहे. ( ह्मणून तन्निष्ठ उपाधीदेखील अनिर्वाच्य आणि अनादीच समजल्या पाहिजेत. ) तथापि ब्रह्म-वेत्त्यांनीं त्यांचें निरूपण केलें आहे.

को बड छोट कहत अपराधू।
सुनि गूनभेद समुझिहहिँ साधू।

वरील उपाधींतून कोणती अधिक आणि कोणती न्यून यांचें व्याख्यान करणें ह्मणजे प्रमादच होय. त्यांचे गुणभेद ऐकून सज्जन वाचकच त्यांचा न्यूनाधिक्याचा निवाडा करितील.

देखिअहिँ रूप नामआधीना।
रूपज्ञान नहिँ नामविहीना।

पाहूं गेलें असतां रूप हें नामाच्या अंकित असतें. कारण, नामानिर्देशाव्यतिरिक्त रूपाचा परिचयच व्हावयाचा नाहीं.

रूप बिसेष नाम बिनु जाने।
करतलगत न परहिँ पहिचाने।

नामज्ञानाव्यतिरिक्त रूपविशिष्ट पदार्थ करतलगत असला तरीदेखील त्याचा बोध होऊं शकत नाहीं.

सुमिरिय नाम रूप बिनु देखे।
आवत हृदय सनेह बिसेखे

परंतु तोच नामाचा उल्लेख मात्र झाला कीं, रूप दृष्टीसमोर नसलें तरी तें हृदयांत प्रगट होतें; आणि त्याजवर आसक्ति विशेषच होत जाते.

नाम–रूप–गति अकथ कहानी।
समुझत सुखद न परति बखानी।

एवंच, नाम आणि रूप यांची शक्ति अनिर्वाच्य आहे. त्यांची मीमांसा लक्ष्यांत भरली कीं, ती आनंददायक होते, परंतु त्यांची शक्ति ( महिमा ) शब्दद्वारें मात्र व्यक्त व्हावयाची नाहीं.

अगुन सगुन बिच नाम सुसाखी।
उभयप्रबोधक चतुर दुभाखी।

एतावता, निर्गुण आणि सगुण यांच्या दरम्यान नाम हा एक उत्तम साक्षी आहे. कारण तो उभयतांचें यथार्थ ज्ञान करून देणारा असा चतुर दुभाषी होय.

**दो०—राम-नाम-मनि-दीप धरु जीह देहरी-द्वार। तुलसी भीतर बाहरहुँ जौं चाहसि उँजिआर ॥ २७ ॥**

हे तुलसी ! आंत आणि बाहेर जर तुला प्रकाश हवा असेल तर जिव्हारूप दर्शनीद्वारांत रामनामरूप रत्नदीप ठेव.

चौ०—नाम जीह जपि जागहिँ जोगी।
बिरति बिरंचिप्रपंच बियोगी।
ब्रह्मसुखहि अनुभवहिँ अनूपा।
अकथ अनामय नाम न रूपा।
जाना चहहिँ गूढगति जेऊ।
नाम जीह जपि जानहिँ तेऊ।

योगीजन जिव्हेनें नामाचा जप करून विधात्याच्या प्रपंचापासून अलित होत्साते आपल्या वृत्तीत जागृत असतात; आणि अनुपम, अनिर्वाच्य, अविनाशी, अनाम आणि अमूर्त अशा ब्रह्मसुखाचा अनुभव घेत राहतात. जे कोणी ती गूढगतिक स्वरूपानंद जाणूं इच्छितील त्यांनीं जिव्हेनें नामाचा जप करून त्याचा अनुभव घ्यावा.

साधक नाम जपहिँ लउ लाए।
होहिँ सिद्ध अनिमादिक पाए।
जपहिँ नाम जन आरत भारी।
मिटहिँ कुसंकट होहिँ सुखारी।

साधक जर लय लावून नामाचा जप करील तर त्यास अणिमादि अष्टसिद्धी प्राप्त होऊन तोच सिद्ध बनेल. अत्यंत आर्त असलेले लोक जर नामाचा जप करतील, तर त्यांच्याहि घोर संकटांचा नाश होऊन ते सुखानें नांदत राहतील.

रामभगत जग चारि प्रकारा।
सुकृती चारिउ अनघ उदारा।
चहूँ चतुर कहँ नाम अधारा।
ज्ञानी प्रभुहि बिसेषि पियारा।
चहुँ जुग चहुँ स्रुति नामप्रभाऊ।
कलि बिसेषि नहिँ आन उपाऊ।

जगांत चार प्रकारचे रामभक्त असतात ( आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी आणि ज्ञानी ). चौघेहि पुण्यात्मे, निष्पाप आणि उदार असेच होत. त्या चौघांहि चतुर जनांना नामाचाच आधार असतो; मात्र ज्ञानी हा प्रभूस विशेष प्रिय आहे. चारींहि वेदांत चारींहि युगांसाठीं नामाचाच प्रभाव प्रतिपादन केला आहे, तथापि कलिकालांत नामप्रभावच विशेष आहे; तदितर साधनच नाहीं.

**दो०—सकल-कामना-हीन जे राम-भगति-रसलीन। नाम सुप्रेम-पियूष-ह्रद तिनहुँ किये मन मीन ॥ २८ ॥**

सर्व वासना गळून जाऊन जे रामभक्तिरसांत तल्लीन झाले; त्यांनीं आपलीं मनें सुप्रेमामृतसरोवरांत मीनतुल्य करून सोडलीं.

**चौ०—अगुन सगुन दुइ ब्रह्मसरूपा।**
**अकथ अगाध अनादि अनूपा।**
**मोरे मत बड नाम दुहूँ ते।**
**किय जेहि जुग निजबस निजबूते।**
**प्रौढसुजन जनन जानहिँ जन की।**
**कहउँ प्रतीति प्रीति रुचि मन की।**

निर्गुण आणि सगुण अशीं ब्रह्माचीं दोन स्वरूपें आहेत. तीं दोन्हींहि वर्णनातीत, अगाध, अनादि आणि अनुपम अशीं आहेत. माझ्या मतें दोन्हींपेक्षांहि नामच थोर आहे. कारण त्यानें केवळ स्वतःच्या बळावर तीं दोन्हींहि आपल्या अंकित करून ठेवलीं आहेत. प्रौढ आणि ज्ञाते लोक लोकमत जाणत असतील, तथापि मी माझा स्वतःचा अनुभव, प्रेम आणि आवड यांचें स्पष्टीकरण करतों.

**एक दारुगत देखिय एकू।**
**पावक सम जुग ब्रह्मबिबेकू।**

**उभय अगम जुग सुगम नाम तेँ।**
**कहउँ नाम बड ब्रह्म राम तेँ।**

एक काष्ठगत आणि एक व्यावहारिक असे दोन प्रकारचे अग्नि असतात. परंतु ते दोन्हीहि ज्याप्रमाणें एकच होत तद्वतच सगुण आणि निर्गुण ब्रह्म एकच होय. दोन्हींहि दुर्बोधच आहेत. परंतु दोन्हींहि नाममात्रेंकरून सुबोध होतात. ह्मणून निर्गुण ब्रह्म आणि सगुण ब्रह्म श्रीरामचंद्र ह्यांच्यापेक्षांहि मी नामच श्रेष्ठ आहे असें म्हणतों.

**व्यापक एक ब्रह्म अबिनासी।**
**सत चेतन घन आनँदरासी।**
**अस प्रभु हृदय अछत अबिकारी।**
**सकल जीव जग दीन दुखारी।**
**नामनिरूपन नामजतन तेँ।**
**सोउ प्रगटत जिमि मोल रतन तेँ।**

विश्वव्यापक, अद्वितीय, अविनाशी, सच्चिद्घन, आनंदपुंज, अविकारी असा तो परब्रह्म प्रभु रामचंद्र हृदयांत विराजमान असून देखील जगांत सर्व जीव दीन आणि दुःखी आहेतच. नामाच्या निरूपणानें आणि प्रयत्नपूर्वक नामाचा जप केल्यानें, अशा प्रकारचा तो प्रच्छन्न परमात्मा श्रीरामचंद्र, रत्नापासून जसें मोल [ द्रव्य ] प्रगट होतें तद्वत् प्रगट होतो.

**दो०—निरगुन तेँ एहि भाँति बड नामप्रभाउ अपार। कहउँ नाम बड राम तेँ निज-बिचार-अनुसार ॥ २९ ॥**

अशा रीतीनें नामाचा प्रभाव अपरंपार असल्यामुळें तें निर्गुणापरीसहि श्रेष्ठ ठरतें. आतां मी आपल्या विचारानुसार रामापेक्षांहि नाम श्रेष्ठच म्हणतों.

**चौ०—राम भगत हित नरतनु धारी।**
**सहि संकट किय साधु सुखारी।**
**नाम सप्रेम जपत अनयासा।**
**भगत होहिँ मुद-मंगल-बासा।**

रामास भक्तीसाठीं मनुष्यदेह धारण करावा लागला; आणि नानाप्रकारची यातायात सहन करूनच त्यानें साधुसंत सुखी केले, परंतु नुसत्या नामाचा सप्रेम जप केल्यानेंच भक्तजन अगदीं अनायासें आनंदांत आणि सुखांत सारखे रळत राहतात.

---

१ चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥
तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥
उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ॥
( भगवद्गीता )

२ हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनं।
कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥
( प्रपन्नगीता )

राम एक तापसतिय तारी।
नाम कोटि खल कुमति सुधारी।

रामांनीं एका स्त्रीचा उद्धार केला, पण ती तपस्विनी होती. परंतु नामानें कोट्यवधि खलांची विपरीत बुद्धि ताळ्यावर आणली आहे.

रिषि हित राम सुकेतुसुता की।
सहित-सेन-सुत कीन्ह बिबाकी।
सहित-दोष-दुख दास दुरासा।
दलइ नाम जिमि रवि निसि नासा।

एका विश्वामित्रासाठीं रामांनीं ताटकेचा तिचे पुत्र आणि सैन्य यांसकट चक्काचूर उडविला. परंतु ज्याप्रमाणें सूर्य रात्रीचा नाश करतो, त्याप्रमाणें नाम भक्तांच्या दुराशा त्यांच्या दोषदुःखासकट निवळून टाकतें.

भंजेउ राम आपु भव चापू।
भव-भय-भंजन नामप्रतापू।

'भवां' च्या चापाचा भंग रामास खुद्दच करावा लागला परंतु नामाचा पराक्रम असा आहे कीं तें 'भवाच्या' भीतीचाहि भंग करितें.

दंडकवन प्रभु कीन्ह सोहावन।
जनमन अमित नाम किय पावन।

प्रभूंनीं एक दंडकारण्यच रमणीय केलें. परंतु नामानें अगणित जनांचीं मनें पवित्र केलीं आहेत.

निसि-चर-निकर दले रघुनंदन।
नाम सकल-कलि-कलुष-निकंदन।

रघुनंदनांनीं राक्षससमूहाचें मात्र निर्दालन केलें. पण नाम अजून देखील यच्चयावत् कलिकिल्मिषांचें कंदन करीत आहे.

१ पहिल्या 'भवा' चा अर्थ 'शंकर' असून दुसऱ्याचा 'संसार' असा आहे. भाव हा कीं, नुसत्या चापाचा भंग करण्यास रामास खुद्द अंगमेहनत करावी लागली, तर प्रत्यक्ष भवनाशासाठीं यांना फारच आयास पडणार परंतु नामाचा प्रताप असा कीं, तें भवाचा नाश करितेंच शिवाय भवाचें भयहि नाहींसें करितें.

२ भाव हा कीं, रामानें वनस्थानाचें नुसतें जनस्थान मात्र केलें. परंतु तेथील असंख्य जनांच्या मनास पवित्र करण्याचें जें काम रामाकडूनहि झालें नाहीं तें नामानें केलें. राम जर वसाहत करणारे राजे आहेत तर नाम धर्म, न्याय आणि नीति शिकाविणारा गुरु होय.

**दो०—सबरी गीध सुसेवकनि सुगति दीन्हि रघुनाथ। नाम उधारे अमित खल बेदबिदित गुनगाथ॥ २०॥**

शबरी, जटायू, असल्या निवडक भक्तांनाच काय ती रघुनाथांनीं सद्गति दिली. परंतु नामानें तर अनंत पापीजनांचा उद्धार केला आहे. या त्याच्या गुणमाहात्म्याची साक्ष वेददेखील पटवीत आहेत.

चौ०—राम सुकंठ बिभीषन दोऊ।
राखे सरन जान सब कोऊ।
नाम गरीब अनेक नेवाजे।
लोक बेद बर बिरद बिराजे।

रामानें शरणागत सुग्रीव आणि बिभीषण ह्या दोघांचेंच काय तें संरक्षण केलें. सर्व लोक हें जाणत आहेत. पण नामानें कित्येक गरीबांचा प्रतिपाल केला. हें त्याचें अलौकिक ब्रीद वेदांत आणि लौकिकांत दुमदुमून राहिलें आहे.

राम भालु—कपि—कटक बटोरा।
सेतुहेतु स्रम कीन्ह न थोरा।
नाम लेत भवसिंधु सुखाहीं।
करहु बिचार सुजन मन माहीं।

रामानें ऋक्षकपिसेना मिळवून सेतुबंधासाठीं थोडी थोडकी उलथापालथ केलेली नव्हती. परंतु नामाच्या तर उच्चारासरशीं सबंध भवसागर कोरडा ठणठणीत होतो. ह्याचा विचार सज्जनांनीं आपल्या मनाशींच करावा.

राम सकुल रन रावनु मारा।
सीय सहित निजपुर पगु धारा।
राजा राम अवध रजधानी।
गावत गुन सुर मुनि बरबानी।
सेवक सुमिरत नाम सप्रीती।
बिनु स्रम प्रबल मोहदल जीती।
फिरत सनेहमगन सुख अपने।
नामप्रसाद सोच नहिं सपने।

रामानें रणकंदन माजवून एका रावणाचाच काय तो निर्वंश केला, आणि सीतेस घेऊन तो आपल्या राजधानींत परत आला. नुसत्या अयोध्या राजधानीचे राम हे राजे होत. एवढ्याच गुणावरून देव आणि ऋषी त्यांचे गोडवे गात आहेत. परंतु रामभक्त सप्रेम नामस्मरणानेंच मायेच्या प्रचंड सैन्याचा समूळ

विध्वंस करून स्वानंदसाम्राज्यांत स्वच्छंद संचार करीत राहतो; आणि नामाची कृपा त्याचेवर अशी असते कीं, स्वप्नांतहि शोक करण्याचा त्याला कधीं प्रसंग येत नाहीं.

**दो०—ब्रह्म राम तें नाम बड बर-दायक-बर-दानि। रामचरित सतकोटि महँ लिय महेस जिय जानि॥ ३१॥**

तस्मात् निर्गुण राम आणि सगुण राम ह्या दोन्हीं-पेक्षांहि रामनाम समर्थ असून तें वरदांचेंहि वरद होय. ही खात्री जाणूनच श्रीविश्वेश्वरानें शतकोटी रामायणांतून तेवढें नामच उचलून घेतलें.

**चौ०—नामप्रसाद संभु अबिनासी।**
**साजअमंगल मंगलरासी।**
**सुकसनकादि सिद्ध-मुनि-जोगी।**
**नामप्रसाद ब्रह्म-सुख-भोगी।**
**नारद जानेउ नामप्रतापू।**
**जगप्रिय हरि हरि-हर-प्रिय आपू।**

त्याच नामाच्या प्रसादेंकरून शंभू अमंगलवेष असूनहि अविनाशी मंगलराशि बनला. शुकसनका-दिक सिद्ध मुनी आणि योगी ह्यांना तरी नामाच्याच अनुग्रहानें ब्रह्मसुख भोगण्यास मिळालें. नारदानें नामाचा प्रभाव जाणला; म्हणून तर तो संसारानुबंधी जी माया तिचा परिहार करून खुद्द हरिहरांचाहि जीव कीं प्राण होऊन बसला.

**नाम जपत प्रभु कीन्ह प्रसादू।**
**भगतसिरोमनि भे प्रहलादू।**
**ध्रुव सगलानि जपेउ हरिनाऊँ।**
**पाएउ अचल अनूपम ठाऊँ।**
**सुमिरि पवनसुत पावन नामू।**
**अपने बस करि राखे रामू।**
**अपर अजामिल गज गनिकाऊ।**
**भये मुकुत हरि-नाम-प्रभाऊ।**

नामजपामुळेंच प्रभूंनीं कृपा केली आणि प्रह्लाद भक्तशिरोमणि झाला. ध्रुवानें तर अत्यंत उद्विग्नतेनें भगवन्नाम जपलें होतें, तरीदेखील तो अनुपम व अढळ अशा पदीं जाऊन बसला. हनुमंतांनीं देखील त्या पवित्र नामस्मरणानेंच रामास आत्मवश करून ठेविलें. अजामिळ, गजेंद्र, पिंगला वेश्या, इत्यादिक देखील हरिनामप्रभावानेंच उद्धरून गेले.

**कहउँ कहाँ लगि नामबडाई।**
**राम न सकहिँ रामगुन गाई।**

ह्या नामाची थोरवी मी कोठवर सांगावी! प्रत्यक्ष रामदेखील आपल्या नामगुणांचें वर्णन करूं शकणार नाहींत.

**दो०—नाम राम को कलपतरु कलि कल्याननिवासु। जो सुमिरत भए भाग ते तुलसी तुलसीदासु॥ ३२॥**

ह्या कलिकालांत कल्याणभवन असा कल्पतरु एक रामाचें नामच होय. ज्यांनीं ज्यांनीं त्याचें स्मरण केलें ते भाग्यासच चढले. ( ह्याला प्रमाण कवी स्वतःचेंच देत आहेत. ) आधींचा तुलसी तोच आजमितीस तुलसीदास म्हणून गाजत आहे.

**चौ०—चहुँ जुग तीन काल तिहुँ लोका।**
**भये नाम जपि जीव बिसोका।**
**बेद-पुरान-संत-मत एहू।**
**सकल-सुकृत-फल रामसनेहू।**

चारीहि युगांत, तिन्हीहि काळांत आणि तिन्हीहि लोकांत कोणी जीव जर शोकरहित झाला असेल, तर तो नामजपानेंच होय. वेद, पुराणें आणि संत यांचें मत तरी असेंच आहे कीं, रामभक्ति हेंच सर्व सुकृतांचें फल होय.

**ध्यानु प्रथमजुग मखबिधि दूजे।**
**द्वापर परितोषन प्रभु पूजे।**
**कलि केवल मल-मूल-मलीना।**
**पापपयोनिधि जनमन मीना।**
**नाम कामतरु काल कराला।**
**सुमिरत समन सकल जगजाला।**

कृतयुगांत ध्यानयोगानें, त्रेतायुगांत यज्ञयागानें आणि द्वापारांत पूजाविधीनें प्रभु संतुष्ट होतात. कलि म्हणजे केवळ पापमूल आणि मलिन, त्यांतील लोकांचीं मनें पापसमुद्रांत मीनाप्रमाणें निमग्न झालेलीं, अशा या कराल कलिकालांत नाम हाच कल्पतरु

---

१ कालेंकरूनि धरणीरज मोजणारे। होतील, मोजि-तिलही हिमबिंदु सारे। होती समर्थ गणना किरणीं कराया। तूझे न मोजविति सद्गुण देवराया॥

( वामनपंडित )

स्तवार्थ तुझिया, तुझ्यासम कवी कधीं जन्मती ?॥

( पंत )

असून त्याच्याच स्मरणमात्रेंकरून सकल मायाजालाचा नाश होतो.

रामनाम कलि अभिमतदाता।
हित परलोक लोक पितुमाता।
नहिँ कलि करम न भगतिबिबेकू
राम-नाम अवलंबन एकू।
कालनेमि कलि कपटनिधानू।
नाम सुमति समरथ हनुमानू

रामनाम हें कलींत इच्छित वस्तु देणारें, परलोकींचा सखा, आणि इहलोकींचें मायबाप होय. कलींत कर्म नाहीं, भक्ति नाहीं अथवा ज्ञानहि नाहीं. त्यांत काय तो एक रामाचाच आधार आहे. कलि हा कपटनिधान कालनेमी असून सुबुद्ध आणि बलाढ्य असा हनुमान एक नामच होय.

दो०–राम नाम नरकेसरी कनककसिपु कलिकालु। जापक जन प्रहलाद जिमि पालिहि दलि सुरसालु ॥ २३ ॥

कलिकाल हा हिरण्यकश्यपु असून रामनाम नृसिंहरूप आहे. तें त्या सुरद्वेष्ट्यांचें निर्दालन करून जप करणाऱ्या भक्तजनांचें प्रल्हादाप्रमाणें पालन करितें.

चौ०–भाय कुभाय अनख आलसहूँ।
नाम जपत मंगल दिसि दसहूँ।
सुमिरि सो नाम राम-गुन-गाथा।
करउँ नाइ रघुनाथहि माथा।

सद्भावानें अथवा कुचेष्टेनें, उल्हासानें अथवा आळसानें नाम जपलें असतां सर्व बाजूंनीं कल्याणच होत असतें. अशा त्या नामाचें स्मरण करून आणि राघवास मस्तक नमवून मी आतां रामगुणगाथेस प्रारंभ करितों.

मोरि सुधारिहि सो सब भाँती।
जासु कृपा नहिँ कृपा अघाती।

ज्याच्या कृपेला कृपेचा कधींच कंटाळा नाहीं, तो माझा रामच माझें अधिकउणें सुधरून घेईल.

राम सुस्वामि कुसेवक मो सो।
निज दिसि देखि दयानिधि पोसो।

लोकहुँ बेद सुसाहिबरीती।
बिनय सुनत पहिचानत प्रीती।

मजसारख्या नीच सेवकाचाहि त्या दयानिधीनें प्रतिपाल केला तो केवळ त्यानें स्वतःकडेच पाहून केला. म्हणूनच राम हेच सर्वोत्कृष्ट धनी होत. केवळ नम्र भाषण ऐकूनच सेवकाचें हार्द ओळखणें ही चांगल्या धन्याची रीत व्यवहारांत आणि ग्रंथांतरीं प्रख्यात आहे.

गनी गरीब ग्राम नर नागर।
पंडित मूढ मलीन उजागर।
सुकबि कुकबि निज-मति-अनुहारी
नृपहि सराहत सब नरनारी।

श्रीमंत आणि गरीब, ग्राम्य आणि नागरिक, पंडित आणि मूर्ख, मलिन आणि शुद्ध, सुकवी आणि कुकवी, स्त्रिया आणि पुरुष हे सर्व राजाचीच थोरवी यथामति गात असतात.

साधु सुजान सुसील नृपाला।
ईस-अंस-भव परमकृपाला।

साधु, सुज्ञ, सुशील आणि परमदयाळ असा राजा भगवदंशधारी असतो.

सुनि सुनमानहिँ सबहि सुबानी।
भनिति भगति नति गति पहिचानी।

तसा राजा लोकांची मनोहर वाणी श्रवण करून त्यांची भक्ति, नम्रता, व शील लक्षांत आणून त्या सर्वांचाच गौरव करितो.

यह प्राकृत-महिपाल-सुभाऊ।
जानि सिरोमनि कोसलराऊ।

ही प्राकृत राजांची रीत आहे. कोशलाधिपती तर त्या सुज्ञ राजांचाहि शिरोमणि आहे.

रीझत रामसनेह निसोतेँ।
को जग मंद मलिनमति मो तेँ।

राम हे नुसत्या प्रेमानें रिझतात. (याला प्रत्यंतर[1]) मजपेक्षां मंद आणि पापात्मा या जगांत कोणी तरी आहे काय?

---

१ तुलसीकृत रामायण रामाज्ञेवरून साक्षात् मारुतिरायांनीं शुद्ध केलें आहे, अशी आख्यायिका प्रचलित आहे.

१ केवळ भजनाचिकडे जरि ठेविसि दृष्टि तरि नसे थारा। आपुलिया थोरपणावरि ठेवुनि दृष्टि दीन हा तारा ॥ (पंत)

दो०—सठ सेवककी प्रीति रुचि रखिहहिँ राम कृपालु। उपल किये जलजान जेहिँ सचिव सुमति कपि भालु ॥३४॥

ज्यानें पाषाण देखील नौकेप्रमाणें तरंगावयाला लावलें, आणि कपि व भालु हे देखील आपले सुबुद्ध सचिव केले, तोच माझा दयाघन रामप्रभु माझ्यासारख्या शठ सेवकाची देखील अभिरुचि आणि प्रेम यांचा परिपोष करील.

दो०—हौंहुँ कहावत सब कहत राम सहत उपहास। साहिब सीतानाथ से सेवक तुलसीदास ॥३५॥

भक्तासाठीं राम उपहास सहन करितात, ही म्हण प्राचीनच असून सर्वांना विदितच आहे. ( असें नसतें तर ) रामचंद्रासारखे स्वामी आणि त्यांचा तुलसीदासासारखा सेवक हा योग कधीं तरी जुळता काय ?

चौ०—अति बडि मोरि ढिठाई खोरी।
सुनि अघ नरकहु नाक सिकोरी।
समुझि सहम मोहिँ अपडर अपने।
सो सुधि राम कीन्हि नाहिँ सपने।
सुनि अवलोकि सुचित चख चाही।
भगति मोरि मति स्वामि सराही।

माझें धार्ष्ट्य आणि खोडसाळपणा हा फारच भयंकर आहे. माझीं पातकें अशीं आहेत कीं, तीं कानावर येतांच नरक तर नाकें मुरडीलच, परंतु त्यांची कल्पना मनांत येण्याबरोबर माझें मलाच धस्स होऊन भय वाटतें. परंतु, तशाहि अपराधांची रामचंद्रानें स्वप्नांत देखील आठवण ठेविली नाहीं. माझे दोष या सरळ मनाच्या प्रभूनें ऐकले आणि पाहिलेहि. तथापि, त्यानें माझ्या प्रेमाचें मनमुराद चोज करून माझ्या अकलेचे पोवाडेच गाइले.

कहत नसाइ होइ हिय नीकी।
रीझत राम जानि जन जी की।
रहति न प्रभुचित चूक किये की।
करत सुरति सयबार हिये की।

बोलण्यांत नष्ट परंतु अंतःकरणाचा स्वच्छ असला तर तशा मनुष्याचें इंगित जाणून राम त्याजवर खुष असतात. प्रभूंच्या मनांत त्याच्याकडून झालेली चूक तर रहात नाहींच, पण ते उलट त्याच्या अंतःकरणांतील प्रेमाची शंभरदां आठवण मात्र करीत असतात.

जेहि अघ बधेउ ब्याध जिमि बाली।
फिरि सुकंठ सोई कीन्हि कुचाली।
सोइ करतूति बिभीषन केरी।
सपनेहुँ सो न राम हिय हेरी।
ते भरतहि भेटँत सनमाने।
राजसभा रघुबीर बखाने।

ज्या पापास्तव व्याधाप्रमाणें वाली मारला, तेच कुश्चळ कर्म फिरून सुग्रीवानेंहि केलें; बिभीषणानेंहि तीच कृति केली. परंतु रामानें आपल्या मनांत स्वप्नांतदेखील ती गोष्ट आणिली नाहीं. उलट त्यांची व भरताची भेट करून देऊन, त्यांचा सन्मान केला, आणि राजेलोकांच्या समक्ष रघुपतींनीं त्यांचीं स्तोत्रेंच गायिलीं.

दो०—प्रभु तरुतर कपि डार पर ते किय आपु समान। तुलसी कहूँ न राम से साहिब सीलनिधान ॥ ३६ ॥

प्रभु वृक्षाच्या तळाशीं आणि कपी झाडांच्या डाहळ्यांवर बसत, परंतु त्यांना देखील त्यांनीं आपल्या बरोबरीनें मानलें. हे तुलसी ! रामासारखा शीलनिधान प्रभु अन्यत्र कोठेंहि लाभणार नाहीं.

दो०—राम निकाई रावरी है सबही को नीक। जौं यह साची है सदा तौ नीको तुलसी-क ॥ ३७ ॥

रामाचा भलेपणा आणि त्याचें प्रभुत्व सर्वांसच लाभदायक आहे. हें जर खरें आहे, तर हे तुलसी ! तुझेंहि निरंतरचेंच फावलें.

दो०—एहि बिधि निज गुन दोष कहि सबहि बहुरि सिर नाइ। बरनउँ रघुबर बिसद जसु सुनि कलिकलुष नसाइ ॥३८॥

---

१ 'अति बडिमोरि' इ. चार चौपायांत स्वतः वाल्मीकि असल्याचें तुलसीदासांनीं ध्वनित केलें आहे. कसें तें आमच्या मानसहंस ( अथवा तुलसीरामायण-रहस्य ) या पुस्तकांत अगदीं आरंभासच मिळूं शकेल.

ह्याप्रमाणें आपले स्वतःचे गुणदोष सांगून आणि फिरून सर्वांसमोर मस्तक नमवून, ज्याच्या श्रवणानें कलिकलुषें नष्ट होतात, त्या रघुवराच्या निर्मळ यशाचें वर्णन करितों.

चौ०—जागबालिक जो कथा सोहाई ।
भरद्वाज मुनिबरहि सुनाई ।
कहिहउँ सोइ संबाद बखानी ।
सुनहु सकल सज्जन सुख मानी ।

याज्ञवल्क्यांनीं जी शोभनकथा मुनिश्रेष्ठ भरद्वाजांप्रत कथन केली, तीच संवादरूपानें वर्णन करून मी सांगेन. सर्व सज्जनहो ! ती तुम्ही सुखानें ऐका.

संभु कीन्ह यह चरित सोहावा ।
बहुरि कृपा करि उमहि सुनावा ।
सोइ सिव कागभुसुंडिहि दीन्हा ।
रामभगत अधिकारी चीन्हा ।
तेहि सन जागबलिक पुनि पावा ।
तिन्ह पुनि भरद्वाज प्रति गावा ।

शंकरांनीं हें शोभन चरित्र ( म्हणजे अध्यात्म-रामायण ) निर्माण केलें. तें फिरून त्यांनीं कृपा करून पार्वतीस श्रवण करविलें. तेंच शंकरांनीं काकभृशुंडीस, तो अधिकारी रामभक्त आहे असें ओळखून, अर्पण केलें. त्याजपासूनच तें पुन्हां याज्ञवल्क्यमुनीस प्राप्त झालें. त्यांनीं पुनश्च भरद्वाजांप्रत त्याचें गान केलें,

ते स्रोता बकता समसीला ।
समदरसी जानहिँ हरिलीला ।
जानहिँ तीनि काल निज ग्याना ।
कर-तल-गत आमलक-समाना ।

ते आत्मबोधानें करतलामलकवत् त्रिकालज्ञान बाळगणारे, समदर्शी आणि समानशील श्रोतेवक्ते हरीची लीला जाणत होते.

अउरउ जे हरिभगत सुजाना ।
कहहिँ सुनहिँ समुझहिँ बिधि नाना ।

अवांतर देखील जे सुजाण हरिभक्त होऊन गेले, त्यांनींहि नानाविध हरिलीलांचें पठण, श्रवण, आणि मनन केलें आहे.

**दो०—मैँ पुनि निजगुरु सन सुनी कथा सो सूकरखेत । समुझी नहिँ तसि बालपन तब अति रहेउँ अचेत ॥ ३९ ॥**

आणि मी आपल्या गुरूपासून ही कथा वराहक्षेत्रांत श्रवण केली. त्या कालीं मी फारच अज्ञ होतों, म्हणून बालपणीं ती माझ्या तशी लक्षांत भरली नव्हती.

**दो०—स्रोता बकता ग्याननिधि कथा राम कै गूढ । किमि समुझइ यह जीव जड कलि-मल ग्रसित बिमूढ ॥ ४० ॥**

रामकथा गूढ आहे. [ ती समजण्यास ] श्रोते आणि वक्ते ज्ञाननिधि असावे लागतात. कलिमलानें ग्रस्त झालेला अत्यंत मूढ असा हा मी जडजीव ती कशी जाणणार ?

चौ०—तदपि कही गुरु बारहिँ बारा ।
समुझि परी कछु मतिअनुसारा ।
भाषाबद्ध करबि मैँ सोई ।
मोरे मन प्रबोध जेहि होई ।
जस कछु बुधि-बिबेक-बल मेरे ।
तस कहिहउँ हिय हरि के प्रेरे ।

तथापि, ती गुरुजींनीं अनेकवार सांगितली, म्हणून ती माझ्या बुद्ध्यनुसार मला समजली. तिच्या योगानें माझ्या मनास प्रबोध व्हावा एतदर्थ मी ती भाषाबद्ध करणार. हृदयांत हरीची प्रेरणा झाल्यामुळें माझ्या बुद्धीची व विवेकाची कुवत असेल तदनुसार मी ती कथन करीत आहे.

निज-संदेह-मोह-भ्रम हरनी ।
करउँ कथा भव-सरिता-तरनी ।

स्वविषयक संदेह, मोह आणि भ्रम यांचें हरण व्हावें आणि भवनदी उतरण्यास नौका असावी यासाठीं मी ही कथा रचीत आहे.

बुधबिस्राम सकल-जन-रंजनि ।
रामकथा कलि-कलुष-बिभंजनि ।
रामकथा कलि-पन्नग-भरनी ।
पुनि बिबेकपावक कहँ अरनी ।
रामकथा कलि कामद गाई ।
सुजन-सजीवनि-मूरि सोहाई ।

रामकथा ही प्राज्ञजनांचें विश्रामस्थान असून सर्व जनांचें रंजन करणारी आणि कलिमलाचा विध्वंस करणारी आहे. ही कलिरूप सर्पास भरणी-

१ हा पक्षी सापास पाहून आपलें अंग चोरून पडून राहतो. पुढें सापानें त्यास गिळलें कीं, लागलीच पंख फुलवून त्याचें मस्तक आणि नरडें फोडून बाहेर पडतो.

पत्न्याप्रमाणें असून विवेकरूप अग्नीची अरणी होय. रामकथा ही कलियुगांतील कामधेनु असून संतजनांची गुणकारक संजीवनौषधि होय.

सोइ बसुधातल सुधातरंगिनि ।
भयभंजनि भ्रम-भेक-भुअंगिनि ।
असुर-सेन-सम नरकनिकंदिनि ।
साधु-बिबुध-कुल-हित-गिरि-नंदिनि ।
संत-समाज-पयोधि-रमा सी ।
बिस्व-भार-भर अचल छमा सी।
जम-गन-मुह-मसि जग जमुना सी ।
जीवन-मुकुति-हेतु जनु कासी ।
रामहिँ प्रिय पावनि तुलसी सी ।
तुलसि-दास-हित हिय हुलसी सी ।
सिवप्रिय मेकल-सैल-सुता सी ।
सकल-सिद्धि-सुख-संपति-रासी ।
सद्-गुन-सुर-गन-अंब अदिति सी ।
रघुबर-भगति-प्रेम परमिति सी ।

ती भयभंजक रामकथा पृथ्वीतलावरील अमृतवाहिनी नदी असून भ्रमरूप भेकास भुजंगिणीप्रमाणें आहे. ती असुरसेन राक्षसासारखी नरकवासांतून मुक्त करणारी असून, संत आणि देव ह्यांच्या समाजाचें कल्याण करणारी चंडिकादेवी होय. ती संतसमाजरूप क्षीरसागरांत लक्ष्मीतुल्य असून विश्वाचें धारण आणि पोषण करण्यांत निश्चल पृथ्वीसारखी आहे. ती यमदूतांच्या मुखास सारविण्याची यमुनेसारखी शाई असून जीवन्मुक्तीस्तव तर जणूंकाय इहलोकची काशीच आहे. ती रामास तुलसीप्रमाणें प्रिय आणि पावन असून तुलसीदासाच्या हुलसीमातेप्रमाणें मनोमानसीं हितचिंतक आहे. ती शंकरास पार्वतीप्रमाणें प्रिय असून ती सर्व सिद्धि, सुख, आणि संपत्ति यांची राशि आहे. ती अदितीप्रमाणें सद्गुणांची आणि देवगणांची जननी असून रघुपतीच्या प्रेमाची आणि भक्तीची पराकाष्ठाच आहे.

**दो०—रामकथा मंदाकिनी चित्रकूट चित चारु। तुलसी सुभगसनेह बन सिय-रघुबीर-बिहारु ॥ ४१ ॥**

तुलसीदास म्हणतात, रामकथा ही मंदाकिनी असून चित्त हा रमणीय चित्रकूट पर्वत आहे; आणि सुंदर भक्तिप्रेम हेंच सीतारघुवरांचें विहार करण्याचें उपवन होय.

चौ०—राम-चरित-चिंतामनि चारू ।
संत-सुमति-तिय सुभगसिँगारू ।
जगमंगल गुनग्राम राम के ।
दानि मुकुति धन धरम धाम के ।
सद्गुरु ज्ञान बिराग जोग के ।
बिबुधबैद भव भीम रोग के ।
जननिजनक सिय-राम-प्रेम के ।
बीज सकल व्रत-धरम-नेम के ।
समन पाप-संताप सोक के ।
प्रिय पालक पर-लोक-लोक के।

रामचरित हा एक स्पृहणीय चिंतामणी असून तो संतसुमतिरूप स्त्रीचा रमणीय शृंगार आहे. जगमंगल असा रामाचा गुणसमूह धर्मार्थकाममोक्षांचा दाता आहे. तो ज्ञानवैराग्ययोगांचा सद्गुरु असून भवरूप भयंकर रोगाचा अश्विनीकुमार होय. तो सीतारामासंबंधीं प्रेमाचें उत्पत्तिस्थान असून सर्व व्रतें, धर्म आणि नियम यांचें बीज होय. तो पाप, संताप आणि शोक यांचें शमन करणारा असून इहलोकींचा आणि परलोकींचा प्रियकर पालक आहे.

सचिव सुभट भूपतिबिचार के ।
कुंभज-लोभ-उदधि अपार के ।
काम-कोह-कलि-मल करिगन के ।
केहरि सावक जन-मन-बन के ।
अतिथि पूज्य प्रियतम पुरारि के ।
कामद घन दारिद दवारि के ।
मंत्र-महा-मनि बिषयब्याल के ।
मेटत कठिन कुअंक भाल के ।

तो (गुणसमूह) विचाररूप राजाचा सुभट आणि सचिव असून अपार लोभरूप समुद्राचा ऋषी अगस्ति होय. तो कामक्रोधादि कलिमलरूप गजसमूहाचा भक्तमनोरूप वनांतील बालकेसरी आहे. तो त्रिपुरारि महादेवाचा अत्यंत पूज्य आणि प्रिय असा अतिथि असून दारिद्र्यरूप दावानलावर यथेष्ट वर्षाव करणारा मेघच होय, तो विषयरूप सर्पांचा मंत्रसिद्ध महामणि असून प्रारब्धाची दुष्ट आणि दुर्धर रेषा नष्ट करणारा आहे.

हरन मोहतम दिनकरकर से ।
सेवक-सालि-पाल जलधर से ।

---

१ ह्याच राक्षसाच्या पृष्ठावर गयाक्षेत्रीं विष्णुपदावर पितरोद्धारार्थ पिंडदान होत असतें.

अभिमतदानि देव-तरु बर से
सेवत सुलभ सुखद हरिहर से।
सुकबि-सरद-नभ मन उडुगन से।
राम भगत-जन जीवनधन से।
सकल सुकृतफल भूरि भोग से।
जगहित निरुपधि साधुलोग से।
सेवक-मन-मानस-मराल से।
पावन गंग-तरंग-माल से

ते (रामगुणग्राम) मोहरूप अंधकारास सूर्य-किरणांप्रमाणें असून सेवकरूप शालिधान्याचें पोषण करण्यांत मेघाप्रमाणें होत. ते कल्पवृक्षाप्रमाणें वांछित वस्तु देणारे असून हरिहरांसारखे सेवकांस सुलभ आणि सुखद होत. ते सत्कवींच्या मनोरूप शरदाकाशांत पक्षिगणासारखे असून रामभक्तांना जीवनधनासारखे आहेत. ते सर्व सुकृतांचीं फळें – जे उत्तम भोग – त्यांच्यासारखे असून जगाच्या हितास्तव उपाधिरहित संतजनाप्रमाणें होत. ते सेवकांच्या मनोरूप मानस-सरोवरांतील हंसासारखे असून गंगेच्या तरंगमालिके-सारखे पावन करणारे आहेत.

**दो०–कुपथ कुतरक कुचालि कलि कपट दंभ पाखंड। दहन राम-गुन-ग्राम जिमि इंधन अनल प्रचंड॥ ४२॥**

रामगुणग्राम हा कुपंथ, कुतर्क, दुर्वृत्तता, कलह, कपट, दंभ आणि पाखंड ह्या इंधनाला दहन करणारा प्रचंड अग्निच आहे.

**दो०–रामचरित राकेस–कर–सरिस सुखद सब काहु। सज्जन-कुमुद-चकोर चित हित बिसेषि बड लाहु॥ ४३॥**

रामचरित्रें चंद्रकिरणांप्रमाणें सर्वांसच सुखद आहेत. तथापि सज्जनरूप कमलास आणि त्यांच्या चित्तरूप चकोरास तर तीं विशेषच स्वास्थ्यकारक आणि महान् लाभदायक वाटतात.

चौ०–कीन्हि प्रस्न जेहिं भाँति भवानी।
जेहि बिधि संकर कहा बखानी।
सो सब हेतु कहब मैं गाई।
कथाप्रबंध बिचित्र बनाई।

भवानीनें ज्या रीतीनें प्रश्न केला आणि त्याचें शंकरांनीं जसें सविस्तर निरूपण केलें त्या सर्व प्रसं-गाचें चित्रविचित्र कथाप्रबंधाच्या रूपानें मी पद्यात्मक निवेदन करणार.

जेहि यह कथा सुनी नहिँ होई।
जनि आचरज करइ सुनि सोई।
कथा अलौकिक सुनहिँ जे ग्यानी।
नहिँ आचरज करहिँ अस जानी।
रामकथा कै मिति जग नाहीँ।
असि प्रतीति तिन्ह के मन माहीँ।

ज्यांनीं ही कथा ऐकिली नसेल त्यांनीं ती ऐकून आश्चर्य करूं नये. ही कथाच अशी अलौकिक आहे, हें जाणून ज्ञानी लोक ती ऐकून तिजबद्दल आश्चर्य करीत नाहींत. जगांत रामकथेला मितीच नाहीं. ही त्यांच्या मनाची खात्री असते.

नाना भाँति रामअवतारा।
रामायन सतकोटि अपारा।
कलपभेद हरिचरित सुहाए।
भाँति अनेक मुनीसन्ह गाए।
करिय न संसय अस उर आनी।
सुनिय कथा सादर रति मानी।

रामाचे नानाप्रकारचे अवतार झालेले आहेत, आणि रामायणेंहि शतकोटी म्हणजेच अपरंपार आहेत. कल्पभेदेंकरून भगवंताचीं शोभनचरित्रें अनेक प्रकारचीं झालीं असून, तीं मुनीश्वरांनीं तशींच गायलीं आहेत, असें मनांत आणून शंका न घेतां रामकथा सादर आणि प्रेमपूर्वक ऐकिली पाहिजे.

**दो०–राम अनंत अनंत गुन अमित कथा-बिस्तार। सुनि आचरजु न मानिहहिँ जिन के बिमल बिचार॥ ४४॥**

श्रीराम अनंत म्हणून त्यांचे गुणहि अनंतच, आणि म्हणूनच त्यांच्या कथांचा विस्तारहि अनंतच. ह्याच कारणामुळें ज्यांचे विचार शुद्ध झाले आहेत ते रामकथाभेद ऐकून आश्चर्य मानीत नाहींत.

चौ०–एहि बिधि सब संसय करि दूरी।
सिर धरि गुरु–पद–पंकज–धूरी।
पुनि सबही बिनवउँ कर जोरी।
करत कथा जेहि लाग न खोरी।
सादर सिवहि नाइ अब माथा।
बरनउँ बिसद राम–गुन–गाथा।

ह्याप्रमाणें सर्व संशय दूर करून व गुरुपदकमलधूलि शिरावर धारण करून मी पुन्हां काव्य करीत असतां दोषापत्ति न यावी म्हणून सर्वांसच हात जोडून प्रार्थना करीत आहे. आतां श्रीशंकरास सादर वंदन करून विशद रामगुणगाथा वर्णन करितों.

**संवत सोरह सै इकतीसा।**
**करउँ कथा हरिपद धरि सीसा।**
**नौमी भौमबार मधुमासा।**
**अवधपुरी यह चरित प्रकासा।**

संवत् १६३१ सांत मस्तकीं हरिपद धारण करून मी ही कथा रचीत आहे. चैत्र शुद्ध ९, मंगळवारीं अयोध्येंत हें चरित्र प्रकाशित झालें.

**जेहि दिन रामजनम स्रुति गावहिँ।**
**तीरथ सकल तहाँ चलि आवहिँ।**
**असुर नाग खग नर मुनि देवा।**
**आइ करहिँ रघुनायक सेवा।**
**जनम-महोत्सव रचहिँ सुजाना।**
**करहिँ राम कल कीरति गाना।**

( श्रुत म्हणजे गुरुगम्य, जे जाणणारे ते श्रुति, म्हणजेच संत ) संतपरंपरा सांगते कीं रामजन्माच्या दिवशीं सर्वेचीं सर्व तीर्थें अयोध्येंत चालून येतात. असुर, नाग, खग, नर, मुनि, देव, इत्यादि येऊन रघुनायकाची सेवा बजावतात. संतमंडळी जन्ममहोत्सव करून रामयशाचें मधुर गायन करितात.

**दो०–मज्जहिँ सज्जन बृंद बहु पावन सरजू नीर। जपहिँ राम धरि ध्यान उर सुंदर स्याम सरीर॥ ४५॥**

साधुसंतांचे थवेचे थवे पवित्र शरयूचें स्नान करून रामाच्या श्यामसुंदरमूर्तीचें हृदयांत ध्यान धरून जप करितात.

**चौ०–दरस परस मज्जन अरु पाना।**
**हरइ पाप कह बेद पुराना।**
**नदी पुनीत अमित महिमा अति।**
**कहि न सकइ सारदा बिमलमति।**

जिच्या दर्शनानें, स्पर्शानें, स्नानानें, आणि पानानें पापांचें हरण होतें असें वेदपुराणें सांगतात, त्या पुण्यपावन शरयूचा महिमा अत्यंत थोर आहे. त्याचें वर्णन विमलबुद्धि सरस्वती देखील करूं शकणार नाहीं.

**राम-धाम-दा पुरी सुहावनि।**
**लोक समस्त बिदित जगपावनि।**
**चारि खानि जग जीव अपारा।**
**अवध तजे तन नहिँ संसारा।**

रामधामाला प्राप्त करून देणारी, रमणीय, समस्तलोकविदित, जगाला पावन करणारी आणि अंडजादि जगांतील चतुर्विध अपार जीवांनीं आपला देह जिच्यांत विसर्जन केला असतां ज्यांना मुक्ति मिळते, अशी ही अयोध्यापुरी आहे.

**सब बिधि पुरी मनोहर जानी।**
**सकल सिद्धिप्रद मंगलखानी।**
**बिमल कथा कर कीन्ह अरंभा।**
**सुनत नसाहिँ काम मद दंभा।**

ती पुरी सर्व रीतीनें मनोहर, सिद्धिप्रदें आणि मंगलांचें केवळ केंद्रस्थान आहे. असें जाणून तेथें, जिचें यशःश्रवण केल्यानें काममददंभ वगैरे नष्ट होतात अशा या विमल रामकथेस मीं प्रारंभ केला.

**राम-चरित-मानस एहि नामा।**
**सुनत स्रवन पाइय बिस्रामा।**
**मनकरि बिषय अनलबन जरई।**
**होइ सुखी जौं एहि सर परई।**

ह्या काव्याचें नांव 'रामचरितमानस' असें आहे. ह्याचें श्रवण होतांच कर्ण तृप्त होतील. विषयरूप वणवा पेटलेल्या अरण्यांत दग्ध होत असलेला मनोरूपी गज जर ह्या रामचरितमानससरोवरांत बुडी घेईल तर तो सुखीच होईल.

**राम-चरित-मानस मुनिभावन।**
**बिरचेउ संभु सुहावन पावन।**
**त्रिबिध दोष दुखदारिद दावन।**
**कलिकुचालि कलि-कलुष-नसावन।**

त्रिविध दोष, दुःखदारिद्र्यरूप दावाग्नि, कलह, दुराचार, आणि कलिसंबंधीं पापें ह्या सर्वांचा नाश करणारें, मुनिजनांना रमविणारें, संस्पृहणीय, आणि पावन असें हें 'रामचरितमानस' श्रीशंकरांनीं निर्माण केलें.

**रचि महेस निज मानस राखा।**
**पाइ सुसमउ सिवा सन भाखा।**
**तातेँ राम-चरित-मानस बर।**
**धरेउ नाम हियहेरि हरषि हर।**

१ एकनाथी भागवतहि याचवेळीं रचलें गेलें.

महेश्वरांनीं रचना करून तें आपल्याच मानसांत सांठवून ठेविलें, व योग्य अवसर मिळतांच त्यांनीं तें पार्वतीस कथन केलें. त्यामुळेंच शंकरांनीं मनांत विचार करून आनंदानें त्याचें ' रामचरितमानस ' असें उत्कृष्ट नांव ठेविलें.

कहउँ कथा सोइ सुखद सुहाई।
सादर सुनहु सुजन मन लाई ।

हीच रसाळ आणि सुखद कथा मी आतां कथन करतों. ती सज्जनांनीं मनःपूर्वक आणि सादर ऐकावी.

**दो०–जस मानस जेहि बिधि भयउ जग प्रचार जेहि हेतु । अब सोइ कहउँ प्रसंग सब सुमिरि उमावृषकेतु ॥ ४६ ॥**

तें ' रामचरितमानस ' जसें आणि ज्या प्रकारानें झालें, आणि ज्या उद्देशानें जगांत त्याचा प्रचार झाला, तो सर्व प्रसंग मी आतां शंकरपार्वतीचें स्मरण करून कथन करितों.

चौ०–संभुप्रसाद सुमति हिय हुलसी ।
राम-चरित-मानस कबि तुलसी ।
करइ मनोहर मति अनुहारी ।
सुजन सुचित सुनि लेहु सुधारी ।

श्रीशंकरप्रसादेंकरून हृदयांत सुबुद्धि उल्हासित झाल्याकारणानें मी कवी तुलसीदास स्वबुद्ध्यनुसार मनोहर रामचरितमानस रचीत आहे, तें सुज्ञ जनांनीं चांगलें लक्ष देऊन श्रवण करावें, आणि अधिकउणें पूर्ण करून घ्यावें.

सुमति भूमि थल हृदय अगाधू ।
बेद पुरान उदधि घन साधू ।
बरषहिँ राम सुजस बर बारी ।
मधुर मनोहर मंगलकारी ।

संतरूपी मेघ वेदपुराणादि समुद्राचें [जल शोषून] सुमतिरूप भूमीवरील हृदयरूपी अगाध स्थळीं रामसुयशोरूप मधुर मनोहर आणि मंगलकारक अशा उत्कृष्ट जलाचा वर्षाव करीत.

लीला सगुन जो कहहिँ बखानी ।
सोइ स्वच्छता करइ मल हानी ।
प्रेम भगति जो बरनि न जाई ।
सोइ मधुरता सुसीतलताई ।
सो जल सुकृत सालि हित होई ।
रामभगत जन जीवन सोई ।

संत ज्या सगुण लीलांचा उपन्यास करितात, त्या लीला हृदयांतील मलहरण करून [ मेघजलाप्रमाणें ] बुद्धि निर्मल करितात. अवर्णनीय प्रेम आणि भक्ति हेंच त्या जलाचें माधुर्य आणि सुशीतलत्व होय. तें जल सुकृतरूप शालिधान्यास पथ्यकर होतें. तेंच रामाच्या भक्तजनांचें जीवन होय.

मेधा महिगत सो जल पावन ।
सकिलि स्रवनमग चलेउ सुहावन ।
भरेउ सुमानस सुथल थिराना ।
सुखद सीत रुचि चारु चिराना ।

तें पवित्र जल मेधारूप पृथ्वीतलावर येऊन संकलित होतें, आणि श्रवणमार्गानें सुंदर प्रकारें वाहूं लागतें. तें सन्मानसरूप सुस्थलीं भरून स्थिरावतें, व नंतर संथ होऊन सुखद, शीतल आणि सुरस असें होतें.

**दो०–सुठि सुंदर संवाद बर बिरचे बुद्धि बिचारि। तेइ एहि पावन सुभग सर घाट मनोहर चारि॥ ४७ ॥**

बुद्धिविचारपूर्वक रचलेले जे मुख्य अति हृदयंगम संवाद तेच ह्या पावन व लावण्ययुक्त मानससरोवराचे चार[1] मनोहर घाट होत.

चौ०–सप्त प्रबंध सुभग सोपाना ।
ग्याननयन निरखत मन माना ।
रघुपतिमहिमा अगुन अबाधा ।
बरनब सोइ बर बारि अगाधा ।
रामसीय जस सलिल सुधासम ।
उपमा बीचि बिलास मनोरम ।
पुरइनि सघन चारु चौपाई ।
जुगुति मंजु मनि सीप सुहाई ।
छंद सोरठा सुंदर दोहा ।
सोइ बहुरंग कमलकुल सोहा ।

ह्या सरोवराला सप्तकाण्डात्मक सुंदरसा सोपान आहे. तो ज्ञाननेत्रांनीं पाहिला असतां मन प्रसन्न होईल. रामचंद्राचें अगुण आणि अबाधित माहात्म्य जें मी वर्णन करीन तेंच पूर्वोक्त अगाध आणि उत्तम

१ एक शिवपार्वतीचा, दुसरा भरद्वाज-याज्ञवल्क्याचा तिसरा रामभरताचा, आणि चौथा काकभुशुंडी आणि गरुड यांचा. पहिले दोन बालकांडांत. तिसरा अयोध्या–काण्डांत आणि चौथा उत्तर–काण्डांत असे हे चार संवाद आहेत.

जल होय. सीतारामयशोरूप जल अमृतासमान होय. काव्यांतर्गत उपमा हेंच त्या जलाचें हृदयंगम तरंगचापल्य होय. रामचरितमानसांतील सुंदर चौपाया हीं दाट कमलपत्रें होत; आणि अलंकारादि काव्यवैचित्र्य हे मोत्यांचें रमणीय शिंपले असून, सुंदर छंद, सोरटे आणि दोहे हाच त्यांत नानारंगांचा कमलसमूह शोभत आहे.

अरथ अनूप सुभाव सुभासा।
सोइ पराग मकरंद सुबासा।
सुकृत पुंज मंजुल अलिमाला।
ज्ञान बिराग बिचार मराला।

अनुपम अर्थ, सुंदर भाव, आणि मनोहर भाषा हेंच त्या कमलांतील पराग, मकरंद, आणि सुबंध होत; आणि [ रामायणाच्या पठण–श्रवणानें प्राप्त होणारी ] पुण्यराशि हीच त्या कमलांवर गुंजारव करणारी भ्रमरपंक्ति असून ज्ञानवैराग्याचे उपन्यास-प्रसंग हे त्या सरोवरांतील हंस होत.

धुनि अवरेब कबित गुन जाती।
मीन मनोहर ते बहु भाँती।
अरथ धरम कामादिक चारी।
कहब ज्ञान बिज्ञान बिचारी।
नव रस जप तप जोग बिरागा।
ते सब जलचर चारु तडागा।

ध्वनी, अवरेव इत्यादि काव्यगुणसमूह हाच बहु प्रकारचा मनोहर मीनगण होय. धर्मार्थकामादि चारी पुरुषार्थ, ज्ञानविज्ञान–विचार, नवरस, जपतपयोग, वैराग्य इत्यादि सर्व ह्या मानससरोवरांतील सुंदर जलचर होत.

सुकृती साधु नाम गुन गाना।
ते बिचित्र जल–बिहग समाना।
संत सभा चहुँ दिसि अँबराई।
स्रद्धा रितु बसंत सम गाई।

पुण्यवान साधूंचे नामगुणवर्णनप्रसंग हे त्यांतील चित्रविचित्र जलपक्ष्यांप्रमाणें असून, संतसभा ही चोहोंफेर आंबराई लागलेली आहे, व त्यांची श्रद्धा ही वसंतऋतुप्रमाणें आहे.

भगति निरूपन बिबिध बिधाना।
छमा दया द्रुम लता बिताना।
सम जम नियम फूल फल ज्ञाना।
हरिपद रस बर बेद बखाना।

अउरउ कथा अनेक प्रसंगा।
तेइ सुक पिक बहु बरन बिहंगा।

भक्ति, क्षमा, दया, इत्यादिकांची नानाविध निरूपणें तेथील वृक्ष आणि लतामंडप होत. शम, दम, नियम यांचें कथन पुष्पाप्रमाणें असून ज्ञान-वर्णनें हीं त्यांचीं फळें होत, व वेदोक्त हरिपद–वर्णन–प्रसंग हा त्यांतील श्रेष्ठ रस होय. अवांतर जे अनेक कथा–प्रसंग आहेत, ते नानावर्ण शुकपिकादि विहंगम होत.

**दो०–पुलक बाटिका बाग बन सुख सु-बिहंग बिहारु। माली सुमन सनेह जल सीँचत लोचन चारु ॥ ४८ ॥**

काव्यवाचनानें होणारा रोमांचानुभव हा पुष्प-वाटिका, बागा, आणि वनें यांच्याप्रमाणें असून आनंद हा विहंगविहार होय; आणि तेथें प्रफुल्लित मनोरूपी माळी लोचनरूपी हजाऱ्यानें सुंदर स्नेहरूपी जलाचें सिंचन करीत आहे.

चौ०–जे गावहिँ यह चरित सँभारे।
तेइ एहि ताल चतुर रखवारे।
सदा सुनहिँ सादर नर नारी।
तेइ सुर बर मानस अधिकारी।

जे हें चरित्र आदर–भावानें गातील, तेच या सरोवराचे चतुर रक्षक होत. जे स्त्रीपुरुष ह्याचें नित्य श्रवण करितील, तेच या मानसाचे श्रेष्ठ अधिकारी देव होत.

अति खल जे बिषई बक कागा।
एहि सर निकट न जाहिँ अभागा।
संबुक भेक सेवार समाना।
इहाँ न बिषय कथा रस नाना।
तेहि कारन आवत हिय हारे।
कामी काक बलाक बिचारे।

अत्यंत दुष्ट आणि विषयी असे जे अभागी बगळे आणि कावळे ते ह्या सरोवराच्या सन्निध जाऊं शकत नाहींत. नानाप्रकारच्या विषयरसकथा शंबूक, भेक आणि शृगालासमान असून त्यांचा येथें रिघाव नाहीं. आणि त्याच कारणास्तव विषयलंपट कामीजनरूप कावळे आणि बगळे येथें येण्यास मनांत कचरतात.

आवत एहि सर अति कठिनाई।
रामकृपा बिनु आइ न जाई।

कठिन कुसंग कुपंथ कराला ।
तिन्ह के बचन बाघ हरि ब्याला ।
गृहकारज नाना जंजाला ।
तेइ अति दुर्गम सैल बिसाला ।
बन बहु बिषम मोह मद माना ।
नदी कुतर्क भयंकर नाना ।

त्यांनीं या सरोवरास मोठ्या शिकस्तीनें येण्याचा इरादाच केला, तरी रामकृपेशिवाय त्यांना येववणारच नाहीं. कठिण दुष्टसंग हा भयंकर कुपंथ असून दुर्जनांचीं वचनें हीं व्याघ्र, सिंह, व सर्पांप्रमाणें होत. अनेक गृहकृत्यांची गुंतागुंत हेच अति दुर्गम आणि प्रचंड पर्वत होत. मोह, मद, मान हींच निबिड अरण्यें असून कुतर्क ह्या त्यांतील अनेक भयंकर नद्या होत.

दो०–जे स्रद्धा संबल रहित नहिँ संतन्ह कर साथ। तिन कहँ मानस अगम अति जिनहिँ न प्रिय रघुनाथ ॥४९॥

ज्यांना श्रद्धेचें पाठबळ नाहीं, आणि ज्यांना संतांची सोबत नसून रघुनाथ प्रिय नाहीं, अशांना हें मानससरोवर अत्यंत दुष्प्राप्य होय.

चौ०–जो करि कष्ट जाइ पुनि कोई ।
जातहिं नीँद जुडाई होई ।
जडता जाड बिषम उर लागा ।
गयहु न मज्जन पाव अभागा ।
करि न जाइ सर मज्जन पाना ।
फिरि आवइ समेत अभिमाना ।
जौँ बहोरि कोउ पूछन आवा ।
सरनिंदा करि ताहि बुझावा ।

इतक्यावर देखील दगदग सोसून यदाकदाचित् कोणी जाऊन पोंचलाच तर जाण्यासरशींच तो झोंपेनें घेरला जातो. त्याच्या अंगांत जडतारूप हींव भरतें. म्हणून तेथपर्यंत जाऊन देखील त्या करंट्यांस स्नानसुद्धां घडत नाहीं. त्याच्या हातून त्या सरोवराचें स्नान किंवा पान न घडून तो कोरडी फुशारकी मारीतच माघारा येतो. जर फिरून कोणी त्याचेकडे विचारपूस करण्याकरितां आला तर सरोवराची निंदा करूनच त्याला त्याची समजूत घालावी लागते.

सकल बिघ्न ब्यापहिँ नहिं तेही ।
राम सुकृपा बिलोकहिँ जेही ।
सोइ सादर सर मज्जन करई ।
महाघोर त्रयताप न जरई ।
ते नर यह सर तजहिँ न काऊ ।
जिन्हके रामचरन भल भाऊ ।

ज्यांचेकडे राम कृपादृष्टीनें पाहतात त्यांनाच ह्या अनेक विघ्नांची बाधा होत नाहीं. तेच ह्या सरोवरांत आदरपूर्वक स्नान करूं शकतात, आणि महाघोर त्रितापांनीं दग्ध होत नाहींत. ज्यांचें रामचरणीं उत्कृष्ट प्रेम आहे, ते कांहीं केलें तरी हें सरोवर सोडून जात नाहींत.

जो नहाइ चह एहि सर भाई ।
सो सतसंग करउ मन लाई ।
अस मानस मानस चष चाही ।
भइ कबि बुद्धि बिमल अवगाही ।

बाबांनो ! ह्या सरोवराचें स्नान जर कोणी करूं इच्छित असेल, तर त्यानें मनःपूर्वक सत्संगच केला पाहिजे. अशा ह्या मानसावर मानसचक्षूच असावे लागतात. या कवीची बुद्धि तरी त्याच्या स्नानानेंच निर्मल झाली.

भयउ हृदय आनंद उछाहू ।
उमगेउ प्रेम प्रमोद प्रबाहू ।
चली सुभग कबिता सरिता सी ।
राम बिमल जस जलभरिता सी ।

त्याच्या हृदयांत आनंदाचे कल्लोळ उठले आणि प्रेम आणि हर्ष यांचे प्रवाह उचंबळूं लागले. त्या प्रवाहाचीच रामाच्या विमलयशोरूप जलानें भरलेली अशी सुंदरशी कवितारूप नदी वाहूं लागली.

सरजू नाम सुमंगलमूला ।
लोक-बेद-मत मंजुल कूला ।
नदी पुनीत सुमानस नंदिनि ।
कलि-मल-त्रिन-तरु-मूल-निकंदिनि ।

त्या नदीचें नांव शरयू; सुमंगल-मूल, लोकवेदप्रतिपाद्य, आणि मनोहरतटिनी अशी ही पवित्र मानस-कन्यका कलिमलरूप तृणवृक्षादिकांचें समूळ उत्पाटन करणारी होय.

दो०–स्रोता त्रिबिध समाज पुर ग्राम नगर दुहुँ कूल। संतसभा अनुपम अवध सकल सुमंगलमूल ॥ ५० ॥

त्रिविध ( विषयी, मुमुक्षु, आणि मुक्त ) श्रोतृसमाज हेच तिच्या उभय तटांवरील पुर, नगर आणि

ग्राम होत; व भगवद्भक्तांचे समाज हीच सर्व सुमंगल-मूल अशी अद्वितीय अयोध्या होय.

चौ०—रामभगति सुरसरितहि जाई।
मिली सुकीरति सरजु सुहाई।
सानुज राम-समर-जस पावन।
मिलउ महानद सोन सुहावन।

ती शोभनरामसुकीर्तिरूप (बाल-काण्डांतर्गत रामकथा) शरयू, रामभक्तिरूप (अयोध्यादि काण्डांतर्गत रामकथा) गंगानदीस जाऊन मिळाली, व लक्ष्मणासहवर्तमान रामचंद्राचा समरयशोरूप (लंका-काण्डांतर्गत रामकथा) पावन आणि रमणीय शोणभद्र महानदहि तिला मिळाला.

जुग बिच भगति देव-धुनि-धारा।
सोहति सहित सुबिरति बिचारा।
त्रिबिध-ताप-त्रासक तिमुहानी।
रामसरूप सिंधु समुहानी।
मानस मूल मिली सुरसरिही।
सुनत सुजनमन पावन करिही

दोहोंच्या [ शरयू आणि शोण यांच्या ] मध्यें वैराग्य आणि ज्ञान यांनीं संगत असा भक्तिरूप गंगा-प्रवाह फारच रमणीय भासतो. तो त्रितापनाशक प्रवाह तीन मुखांनीं रामस्वरूपी सागरांत समाविष्ट होतो. हिचा उगम मानसरोवरांत असून ही गंगेला मिळाली आहे. इचें श्रवण केलें असतां ही सज्जनांचीं मनें पावन करिते.

बिच बिच कथा बिचित्र बिभागा।
जनु सरितीर तीर बन बागा।
उमा-महेस-बिबाह-बराती।
ते जलचर अगनित बहु भाँती।
रघुबर-जनम-आनँद-बधाई।
भवँर तरंग मनोहरताई।

स्थलविशेषीं जीं विचित्र कथा-वर्णनें आहेत, तीं शरयूच्या तीरातीरावरील वनें आणि उपवनेंच होत; शिवपार्वतीविवाहाचें वर्णन नानाप्रकारचे असंख्य असे जलचर होत; व रघुपतीच्या जन्ममहोत्सवाचा समारंभ म्हणजे तिच्या प्रवाहांतील भोंवरें आणि तरंग यांचें रमणीयत्व होय.

दो०—बालचरित चहुँ बंधु के बनज बिपुल बहुरंग। नृप रानी परिजन सुकृत मधुकर बारिबिहंग॥ ५१॥

चारी बंधूंचीं बालचरित्रें हीं त्या प्रवाहांतील बहुरंगी विपुल कमलें असून, राजा दशरथ, त्याच्या राण्या, आणि त्यांचे परिजन यांचें सुकृत हे भ्रमर आणि जलपक्षी होत.

चौ०—सीयस्वयंवर कथा सुहाई।
सरित सुहावनि सो छबि छाई
नदी नाव पटु प्रस्न अनेका।
केवट कुसल उतर सबिबेका
सुनि अनुकथन परस्पर होई।
पथिकसमाज सोह सरि सोई।
घोर धार भृगुनाथ रिसानी।
घाट सुबद्ध राम बर बानी।
सानुज राम-बिबाह-उछाहू।
सो सुभ उमग सुखद सब काहू।

सुंदर सीतास्वयंवरकथा हीच त्या शोभनसरितेची प्रच्छन्न शोभा आहे. अनेक कुशल प्रश्न ह्या नदींतील नावा असून त्यांचीं मार्मिक व विचारपूर्व उत्तरें हे नावाडी होत. परस्परांतील संवाद हेच त्या सरितेवरील पथिकसमाज होत. भार्गवरामाचा क्रोध तिची भयंकर धार असून रामचंद्राचें समर्पक भाषण हे तिचे सुबद्ध घाट होत. सानुजरामविवाहोत्सव हाच तिचा सर्वांस सुखदायक असा पवित्र पूल होय.

कहत सुनत हरषहिँ पुलकाहीँ।
ते सुकृती मन मुदित नहाहीँ।

हिच्या पठण-श्रवणानें जे हर्षित आणि पुलकित (रोमांचित) होतात तेच पुण्यात्मे आनंदित अंतःकरणानें तिचें स्नान करितात.

रामतिलक हित मंगलसाजा।
परब जोग जनु जुरे समाजा।
काई कुमति केकई केरी।
परी जासु फल बिपति घनेरी

रामाच्या यौवराज्याप्रीत्यर्थ झालेला मंगल-समारंभ हा जणुं पर्वप्रसंगीं जमलेला मेळा होय. जिच्या योगानें भलभलतीं संकटें उत्पन्न झालीं, अशी कैकेयीची दुर्बुद्धि ही शरयूजलांतील शेवाळें होय.

दो०—समन अमित उतपात सब भरतचरित जपजाग। कलिअघ खल अवगुन कथन ते जलमल बक काग॥ ५२॥

असंख्य उत्पात शमविणारीं अशीं सकल भरत-चरित्रें शरयूतटावर होणारीं जपयागादिक अनुष्ठानें असून कलिपातकांचीं आणि खल-दुर्गुणांचीं वर्णनें शरयूजलावरील मल, बगळे आणि कावळे होत.

चौ०—कीरति सरित छहूं रितु रूरी ।
समय सुहावनि पावनि भूरी ।
हिम–हिमसैल–सुता–सिवब्याहू ।
सिसिर सुखद प्रभु–जनम–उछाहू ।
बरनब राम–बिबाह–समाजू ।
सो मुदमंगलमय रितुराजू ।
ग्रीषम दुसह राम–बन–गवनू ।
पंथ कथा खर आतप पवनू ।
बरषा घोर निशाचररारी ।
सुरकुल सालि सुमंगलकारी ।
राम राजसुख बिनय बडाई ।
बिसद सुखद सोइ सरद सुहाई ।

ही रामकीर्तिरूप शरयू नदी सहाहि ऋतूंत आणि सर्व कालीं अत्यंत रमणीय, सौभाग्ययुक्त आणि पावन असते. तिच्यांतील पार्वतीशिव–विवाह हा हेमंतऋतु होय. रामजन्मोत्सव हा सुखद शिशिरऋतु होय. मी जो रामविवाहसमारंभ वर्णन करीन, तो आनंदमंगलात्मक ऋतुराज वसंत होय. रामाचें वनवासगमन हा दुःसह ग्रीष्मऋतु होय आणि मार्गांतील वनवास–कथा प्रखर सूर्यताप आणि वायु होत. घोर राक्षससंग्राम हा देवगणरूप शालिधान्यास पथ्यकर असा वर्षाकाळ असून, रामराज्यांतील सुख, रामाचा विनय, आणि त्याचा महिमा हीं प्रकरणें विशद आणि सुंदर शरत्समय होत.

सतीसिरोमनि सिय–गुन–गाथा ।
सोइ गुनअमल अनूपम पाथा ।
भरतसुभाउ सुसीतलताई ।
सदा एकरस बरनि न जाई ।

पतिव्रता–शिरोमणि जी जानकी तिचीं गुणचरित्रें हीं त्या नदींतील अनुपम जलाचे निर्मल गुण होत. भरताचें स्वभाव–वर्णन हें तिचें निरंतरचें अखंड आणि अवर्णनीय असें सुशीतलत्व होय.

**दो०—अवलोकनि बोलनि मिलनि प्रीति परसपर हास । भायप भलि चहुँ बंधु की जल माधुरी सुबास ॥ ५३ ॥**

चवघांहि बंधूंचें परस्पर अवलोकन, भाषण, संमेलन, प्रेम, हास्य आणि उत्कृष्ट बंधुत्व हेंच त्या जलाचें माधुर्य आणि सुगंध होत.

चौ०—आरति बिनय दीनता मोरी ।
लघुता ललित सुबारि न खोरी ।
अद्‌भुत सलिल सुनत सुखकारी ।
आस पिआस मनोमलहारी ।
राम सुपेमहि पोषत पानी ।
हरत सकल कलि–कलुष गलानी ।
भव स्रम सोषक तोषक तोषा ।
समन दुरित दुख दारिद दोषा ।
काम कोह मद मोह नसावन ।
बिमल बिबेक बिराग बढावन ।

माझी तळमळ, विनय आणि दीनता हा त्या निर्दोष नदीजलाचा रमणीय असा हलकेपणा[1] होय. त्या अद्‌भुत जलाचें श्रवण, सुखास कारणीभूत होऊन आशा, तृष्णा इत्यादि मानसिक मलांचें परिमार्जन करितें. तें रामसंबंधीं प्रेमाचें पोषक होऊन सर्व कलिकलुष आणि तज्जन्य क्लेश यांचा अपहार करितें. तें जल भवतापाचें शोषक, संतोषाचें पोषक, पाप, दुःख, दारिद्य आणि दोष यांचें शामक, व कामक्रोध-मदमोहादिकांचें नाशक असून विमल विवेक-वैराग्याचें वर्धक होय.

सादर मज्जन पान किए तें ।
मिटहिँ पाप परिताप हिए तें ।
जिन्ह एहि बारि न मानस धोए ।
ते कायर कलिकाल बिगोए ।
त्रिषित निरखि रबिकरभवबारी ।
फिरिहहिँ मृग जिमि जीव दुखारी ।

आदरभावानें त्या जलाचें स्नान आणि पान केल्यानें हृदयांतील पाप आणि परिताप यांचें निर्मूलन होतें. ज्यांनीं ह्या जलानें आपलीं मनें धुतलीं नाहींत, ते अधमाधम कलिकालानें भ्रष्ट झालेले आहेत. वर निर्दिष्ट केलाला तृष्णाव्याप्त जीव सूर्यकिरणरूप संसारजलास पाहून मृगासारखा दुःखी होत्साता (जन्ममरणाच्या) फेऱ्या करीत राहतो.

**दो०—मति अनुहारि सुबारि गुन-गन-गनि मन अन्हवाइ । सुमिरि भवानी संकरहि कह कवि कथा सुहाइ ॥ ५४ ॥**

[1] हलकें पाणी पचनाला सुलभ असतें.

त्या सुंदर जलाचे गुणगण यथामति वर्णन करून आणि त्यांत मनाला स्नान घालून श्रीशंकरपार्वती-स्मरणपूर्वक कवी सुंदर रामकथा कथन करीत आहे.

**दो०—अब रघुपति पद पंकरुह हिय धरि पाइ प्रसाद। कहउँ जुगल मुनिवर्य कर मिलन सुभग संबाद॥ ५५॥**

आतां रघुपतिचरण—कमलांना हृदयांत धारण करून आणि त्यांचा प्रसाद घेऊन मुनिवर्यद्वयांची भेट व त्यांचा मनोहर संवाद मी कथन करितों.

**चौ०—भरद्वाज मुनि बसहिँ प्रयागा।**
**तिन्हहिँ रामपद अति अनुरागा।**
**तापस सम—दम—दया—निधाना।**
**परमारथपथ परम सुजाना।**

रामपदांचे ठायीं अत्यंत अनुरक्त असलेले तपस्वी, शम, दम, व दया यांचें केवळ भांडार, परमार्थ—मार्गांत परमनिष्णात असे भरद्वाजमुनि प्रयागक्षेत्रीं वास्तव्य करीत असत.

**माघ मकरगत रबि जब होई।**
**तीरथपतिहि आव सब कोई।**
**देव दनुज किन्नर नरस्रेनी।**
**सादर मज्जहिँ सकल त्रिबेनी।**
**पूजहिँ माधव—पद—जलजाता।**
**परसि अषय बट हरषहिँ गाता।**

माघमासीं सूर्य जेव्हां मकर—राशीस येतो, तेव्हां तीर्थराजाचे दर्शनास अनेक लोक येत असतात. देव, दैत्य, किन्नर, मानवांचे मेळे, इत्यादि सर्व त्रिवेणी-संगमांत भक्तिभावानें स्नान करितात. श्रीवेणीमाधवाच्या चरणकमलांचें पूजन करितात, आणि अक्षय-वटास स्पर्श करून प्रसन्नगात्र होतात.

**भरद्वाजआश्रम अतिपावन।**
**परम रम्य मुनिवर—मन—भावन।**
**तहाँ होइ मुनि—रिषय—समाजा।**
**जाहिँ जे मज्जहिँ तीरथराजा।**
**मज्जहिँ प्रात समेत उछाहा।**
**कहहिँ परसपर हरि—गुन—गाहा।**

भरद्वाजांचा आश्रम अत्यंत पवित्र परमरमणीय आणि मुनिवरांच्याहि अंतःकरणास स्पृहणीय वाटणारा असा असे. तीर्थराजास स्नानार्थ जाणाऱ्या ऋषींचें व मुनींचें संमेलनच येथें भरत असे. प्रातःस्नान उरकून उल्हासयुक्त होत्साते ते परस्परांत हरिगुण-कथांची चर्चा करीत रहात.

**दो०—ब्रह्मनिरूपन धर्म बिधि बरनहिँ तत्त्व बिभाग। कहहिँ भगति भगवंत कै संजुत-ज्ञान-बिराग॥ ५६॥**

वेदांतशास्त्र, कर्मकांड, पूर्वमीमांसा, धर्म, उत्तर-मीमांसा, तत्त्वविभाग, सिद्धांत, सांख्यशास्त्र आणि ज्ञान, वैराग्य व तद्विशिष्ट भगवद्भक्ति यांचा ते उपन्यास करीत.

**चौ०—एहि प्रकार भरि माघ नहाहीं।**
**पुनि सब निज निज आस्रम जाहीं।**
**प्रति संबत अति होइ अनंदा।**
**मकर मज्जि गवनहिँ मुनिबृन्दा।**

ह्या प्रकारें माघ—महिनाभर स्नानें करून फिरून सर्व मंडळी आपल्या आश्रमास परत जात. प्रत्येक वर्षींच हा महदानंद होत असे व मुनिवृंद मकरस्नान करून परत जात असत.

**एक बार भरि मकर नहाए।**
**सब मुनीस आश्रमन्ह सिधाए।**
**जागबलिक मुनि परम बिबेकी।**
**भरद्वाज राखे पद टेकी।**

कोणे एके प्रसंगीं मकरस्नान करून सर्व मुनींद्र स्वाश्रमीं परतले असतां परमाविवेकवंत याज्ञवल्क्य-मुनींस भरद्वाजमुनींनीं वंदन करून अत्याग्रहपूर्वक ठेवून घेतलें, व—

**सादर चरनसरोज पखारे।**
**अतिपुनीत आसन बैठारे।**
**करि पूजा मुनि सुजस बखानी।**
**बोले अतिपुनीत—मृदु—बानी।**

बहुमानपुरःसर त्यांचीं अत्यंत पवित्र चरणकमलें प्रक्षालन केलीं आणि त्यांस आसनावर बसविलें. भरद्वाजांनीं पूजा करून त्यांच्या विमल यशाची वाखाणणी केली आणि अति पवित्र आणि कोमल अशा वाणीनें ते म्हणाले—

**नाथ एक संसउ बड मोरे।**
**करगत बेदतत्त्व सब तोरे।**
**कहत सो मोहि लाग भय लाजा।**
**जौं न कहउँ बड होइ अकाजा।**

हे नाथ! माझ्या मनांत एक मोठाच संशय

आहे. सर्व वेदतत्त्वें आपणांस करतलगत आहेत. तो संशय सांगण्यास मला भीति व लज्जा वाटते. तथापि, मी जर न बोलेन तर महत् अकार्य होईल.

दो०–संत कहहिँ अस नीति प्रभु स्रुति पुरान मुनि गाव। होइ न बिमल बिबेक उर गुरु सन किये दुराव ॥ ५७ ॥

प्रभो ! गुरूशीं प्रतारणा केल्यानें हृदयांत विशुद्ध ज्ञान प्रकट होत नाहीं, हा सिद्धांत संत सांगत असतात, आणि वेद, पुराणें व मुनिजनहि तसेंच प्रतिपादन करितात.

चौ०–अस बिचारि प्रगटउँ निज मोहू।
हरहु नाथ करि जन पर छोहू।

असा विचार करून मी आपली शंका आपल्या समक्ष मांडणार. हे नाथ ! ह्या दासावर कृपा करून आपण तिचें निरसन करावें.

रामनाम कर अमित प्रभावा।
संत–पुरान–उपनिषद गावा।
संतत जपत संभु अबिनासी।
सिव भगवान ज्ञान–गुन–रासी।

रामनामाचा महिमा अपरंपार आहे म्हणून संत, पुराणें व उपनिषदें सारखा घोष करीत आहेत. ज्ञानगुणराशि व अविनाशी असे भगवान् शिव–शंभु हे देखील त्याच नामाचा सदैव जप करीत असतात.

आकर चारि जीव जग अहहीँ।
कासी मरत परम पद लहहीँ।
सोपि राममहिमा मुनिराया।
सिव उपदेस करत करि दाया।

जगांत चतुःकोशात्मक जीव आहेत. (पैकीं) काशींत मृत्यु पावणारास मोक्षच प्राप्त होतो. मुनिवर्य ! हा तरी रामानामाचाच महिमा होय. (कारण) श्रीकाशीविश्वेश्वर कृपा करून त्यांस नामोपदेश करीत असतात.

रामु कवन प्रभु पूछउँ तोही।
कहिय बुझाइ कृपानिधि मोहीँ।
एक राम अवधेसकुमारा।
तिन्ह कर चरित बिदित संसारा।
नारिबिरह दुख लहेउ अपारा।
भयउ रोष रन रावन मारा।

प्रभो ! तो राम कोणता हें मी आपणास विचारीत आहें. कृपानिधे ! आपण तें मला समजावून सांगितलेंच पाहिजे. एक राम अयोध्याधीश राजा दशरथाचा पुत्र होऊन गेला. त्याचें चरित्र तर सर्व जगास अवगतच आहे कीं, स्त्रीविरहानें पराकाष्ठेचा दुःखित होऊन त्यानें क्रोधेंकरून रावणास रणांगणांत गतप्राण केलें.

दो०–प्रभु सोइ राम कि अपर कोउ जाहि जपत त्रिपुरारि। सत्यधाम सर्बज्ञ तुम्ह कहहु बिबेक बिचारि ॥ ५८ ॥

प्रभो ! ज्याचा त्रिपुरारि शंकर जप करीत असतात, तो तोच राम कीं, अवांतर कोणी आहे ? आपण सत्यनिधान आणि सर्वज्ञ आहांत. आपणच आपल्या विवेकदृष्टीनें मला कथन करावें.

चौ०–जैसे मिटइ मोर भ्रम भारी।
कहहु सो कथा नाथ बिस्तारी।

हे नाथ ! जेणेंकरून माझा महाभ्रम विलयास जाईल, असें कथानक मला विस्तरेंकरून विदित करावें.

जागबलिक बोले मुसुकाई।
तुम्हहि बिदित रघुपतिप्रभुताई।
रामभगत तुम्ह मन क्रम बानी।
चतुराई तुम्हारि मैं जानी।

हें ऐकून याज्ञवल्क्य किंचित् हास्य करून म्हणालेः–तुला रघुपतींचा प्रभाव विदितच आहे. तूं तर कायावाचामनानें रामभक्त आहेस. तुझें चातुर्य मला समजून चुकलें आहे.

चाहहु सुनइ रामगुन गूढा।
कीन्हहु प्रस्न मनहुँ अतिमूढा।
तात सुनहु सादर मन लाई।
कहउँ राम कै कथा सुहाई।

गूढ रामगुण श्रवण करण्याची तुझी इच्छा असल्यामुळें अगदींच अज्ञवत् प्रश्न केला आहेस. हे तात ! आदरपूर्वक आणि एकाग्रतेनें श्रवण कर. तुला सुंदर रामकथा निरूपण करतों.

महा मोह महिषेस बिसाला।
रामकथा कालिका कराला।
रामकथा ससिकिरण समाना।
संत चकोर करहिँ जेहि पाना।

महामोह हा प्रचण्ड महिषासुर असून रामकथा ही रौद्ररूपिणी चंडिका होय. रामकथा ही चंद्रकिरणांप्रमाणें असून संतचकोर त्यांचें सेवन करीत असतात.

ऐसेइ संसय कीन्ह भवानी ।
महादेव तब कहा बखानी ।

हीच शंका पार्वतीनेंहि घेतली होती. त्या प्रसंगीं शंकरांनीं व्याख्यान केलें होतें.

**दो०—कहउँ सो मति अनुहारि अब उमा-संभु-संबाद । भयउ समय जेहि हेतु जेहि सुनु मुनि मिटिहि बिषाद ॥ ५९ ॥**

तो उमाशंभुसंवाद ज्या प्रसंगीं व ज्या कारणास्तव झाला होता, त्याचें आतां मी यथामति निरूपण करतों. मुने ! तो श्रवण कर, म्हणजे तुझा विषाद नष्ट होईल.

चौ०—एक बार त्रेता जुग माहीँ ।
संभु गये कुंभज रिषि पाहीँ ।
संग सती जगजननि भवानी ।
पूजे रिषि अखिलेस्वर जानी ।

एके समयीं त्रेतायुगांत शंभु अगस्त्यऋषीकडे गेले होते. बरोबर जगज्जननी भवानी नामें सती [ पार्वती नव्हे ] होती. ऋषीनें अखिलेश्वर जाणून त्यांची पूजा केली.

रामकथा मुनिबर्ज बखानी ।
सुनी महेस परम सुख मानी ।
रिषि पूछी हरिभगति सुहाई ।
कही संभु अधिकारी पाई ।

मुनिवर्यांनीं रामकथा वर्णन केली. ती ऐकून महेश्वर परमसंतुष्ट झाले. ऋषीनें पावन हरिभक्तीची पृच्छा केली व अधिकारी जाणून शंकरांनीं ती त्यांस निवेदन केली.

कहत सुनत रघुपति-गुन-गाथा ।
कछु दिन तहाँ रहे गिरिनाथा ।
मुनि सन बिदा माँगि त्रिपुरारी ।
चले भवन सँग दच्छकुमारी ।

रामगुणकथेच्या कथनश्रवणांत कैलासनाथ तेथेंच कांहीं दिवस राहिले. नंतर मुनींचा निरोप घेऊन त्रिपुरारि दक्षकुमारीसह स्वस्थानीं जाण्यास निघाले.

तेहि अवसर भंजन महिभारा ।
हरि रघुबंस लीन्ह अवतारा ।
पिताबचन तजि राज उदासी ।
दंडकबन बिचरत अबिनासी ।

त्याच सुमारास भूभार हरण करण्यास्तव अविनाशी श्रीहरी रघुवंशांत अवतीर्ण होऊन आणि पित्याच्या आज्ञेनें राज्यत्याग करून मुनिवृत्तीनें दंडकारण्यांत संचार करीत होते.

**दो०—हृदय बिचारत जात हर केहि बिधि दरसनु होइ । गुप्तरूप अवतरेउ प्रभु गये जान सब कोइ ॥ ६० ॥**

मार्गक्रमण करीत असतां रामदर्शन कोणत्या रीतीनें घडेल याविषयीं शंकर आपले हृदयांत विचार करूं लागले कीं, प्रभु तर गुप्तरूपानें अवतरले; अस. त्यामुळें माझ्या जाण्यानें सर्वांनाच त्यांची परिस्फुटता होईल.

**सो०—संकर उर अति छोभु सती न जानइ मरमु सोइ । तुलसी दरसन लोभु मन डरु लोचन लालची ॥ ११ ॥**

( तुलसीदास म्हणतात ) :—एकीकडे दर्शनोत्कंठेमुळें नेत्र लोलुप झालेले आणि दुसरीकडे मानसिक भय, ह्या दोन कारणांनीं शंकरांच्या मनांत अतिशयच कल्लोळ करून सोडला होता. परंतु तें मर्म सतीच्या लक्षांतच आलें नाहीं.

चौ०—रावन मरन मनुज करजाँचा ।
प्रभु बिधिबचन कीन्ह चह साँचा ।
जौँ नहिँ जाउँ रहइ पछितावा ।
करत बिचारु न बनत बनावा ।

रावणानें मानवहस्तें मृत्यूची याचना केलेली असून, प्रभूंनीं ब्रह्मवाक्य सत्य करण्याचा प्रयत्न केला आहे. ( असा हा योगायोग अनायासें घडून आला असतांही ) जर मी गेलों नाहीं तर पश्चात्ताप मात्र करावा लागेल असा शंकर विचार मात्र करताहेत, परंतु त्याप्रमाणें कृती त्यांच्यानें करवेना.

एहि बिधि भये सोचबस ईसा ।
तेही समय जाइ दससीसा ।
लीन्ह नीच मारीचहि संगा ।
भयउ सुरत सोइ कपट कुरंगा ।

अशा रीतीनें भोलानाथ शोकाविव्हल होताहेत, तों त्या सुमारास नीच मारीच राक्षसास बरोबर

घेऊन रावणही जात होता. तितक्यातच मारीचानें कपटमृगाचें रूप धारण केलें.

करि छल मूढ हरी बैदेही।
प्रभुप्रभाउ तस बिदित न तेही।

मूढ रावणानें कपट करून जानकीचें हरण केलें. त्याला प्रभूंचा प्रभाव तसा त्या वेळेस अवगत झालेला नव्हता. ( जसा पुढें कुळासकट मृत्यु आल्यावर अवगत झाला ).

मृग बधि बंधु सहित हरि आए।
आश्रमु देखि नयन जल छाए।
बिरहबिकल नर इव रघुराई।
खोजत बिपिन फिरत दोउ भाई।

मृगाचा वध करून बंधूसह भगवान् परत येऊन आश्रम पाहतांच त्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. विरहविकल-प्राकृत-मनुष्याप्रमाणें रघुराय आणि बंधु लक्ष्मण असे दोघेही अरण्यांत सीताशुद्धीस्तव भ्रमण करूं लागले.

कबहूँ जोग बियोग न जाके।
देखा प्रगट बिरहदुख ताके।

ज्याला योग अथवा वियोग मुळींच नसावयाचा त्यास पहावें तर तर उघड उघड विरह-दुःख होत आहे. [ पूर्वार्धाचा दुसरा अर्थ ज्याच्या योगास वियोगच नाहीं, ह्मणजे ज्याची प्राप्ति झाली असतां कधींच च्युति नाहीं. 'यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम.' अर्थात् देवभक्तांचा वियोग असंभाव्य होय. जानकी जी साक्षात् लक्ष्मी ती सर्वश्रेष्ठ भगवद्भक्त असून तिची व प्रभूची ताटातूट कदापि देखील संभवत नाहीं, हें कवीनें ध्वनित केलें आहे. ]

**दो०—अतिबिचित्र रघुपतिचरित जानहिँ परम सुजान। जे मतिमंद बिमोहबस हृदय धरहिँ कछु आन॥ ६१॥**

रघुपतिचरित्र अतिविचित्र होय. परम ज्ञानवंतच तें जाणतात. जे जे बुद्धिहीन असून मोहाधीन असतात ते मात्र तत्संबंधानें कांहीं विपरीतच कल्पना करीत बसतात.

चौ०—संभु समय तेहि रामहिँ देखा।
उपजा हिय अतिहरषु बिसेखा।
भरि लोचन छबिसिंधु निहारी।
कुसमय जानि न कीन्ह चिन्हारी।

त्याच समयास शंकरांनीं रामचंद्रास अवलोकन केलें. तेव्हां त्यांच्या अंतःकरणास विशेषच आनंद झाला. तो लावण्यसागर त्यांनीं डोळे भरून पाहिला परंतु अप्रासंगिक समजून त्यांनीं ओळख दिली नाहीं.

जय सच्चिदानंद जगपावन।
अस कहि चलेउ मनोजनसावन।

जय सच्चिदानंदा! जगत्पावना! इतकें म्हणूनच मदनारि चालते झाले.

चले जात सिव सतीसमेता।
पुनि पुनि पुलकत कृपानिकेता।
सती सो दसा संभु कै देखी।
उर उपजा संदेहु बिसेखी।

सतीसहवर्तमान गमन करीत असतां कृपानिधान शिव वारंवार पुलकायमान होत असत. शंभूची ती अवस्था पाहून सतीच्या मनांत विशेषच संदेह उत्पन्न झाला.

संकर जगतबंद्य जगदीसा।
सुर नर मुनि सब नावत सीसा।
तिन्ह नृपसुतहि कीन्ह परनामा।
कहि सच्चिदानंद परधामा।
भये मगन छबि तासु बिलोकी।
अजहुँ प्रीति उर रहति न रोकी।

तिला वाटलें कीं, शंकर हे जगदीश जगद्वंद्य असून सुर, नर, मुनि इत्यादि सर्वच त्यांचेपुढें मस्तक नमवितात. त्यांनीं 'सच्चिदानंद' 'परंधाम' असें आळवून यःकश्चित् राजकुमारास नमस्कार केला आणि त्याचें सौंदर्य पाहूनच इतके तल्लीन झाले कीं त्यांना अजूनदेखील आपल्या हृदयांतील प्रेम आवरतां येत नाहीं.

**दो०—ब्रह्म जो ब्यापक बिरज अज अकल अनीह अभेद। सो कि देह धरि होइ नर जाहि न जानत बेद॥ ६२॥**

परब्रह्म तर व्यापक, मायारहित, कलारहित, इच्छारहित, भेदातीत आणि ज्याचें वेदांनादेखील अनुमान होत नाहीं असें आहे. तें देह धारण करून नररूपानें अवतीर्ण होणें शक्य तरी आहे काय?

चौ०—बिष्णु जो सुर हित नरतनु धारी।
सोउ सर्बज्ञ जथा त्रिपुरारी।
खोजइ सो कि अज्ञ इव नारी।
ज्ञानधाम श्रीपति असुरारी।

विष्णूनीं जरी देवहितास्तव नरावतार धारण केलेला असला तरी तेदेखील महादेवाप्रमाणेंच सर्वज्ञ होत. तो असुरारि श्रीपति ज्ञानधाम असून तो अजागळासारखा स्त्रीचा शोक करीत राहील काय ?

संभुगिरा पुनि मृषा न होई।
सिव सर्बज्ञ जानु सब कोई।
अस संसय मन भयउ अपारा।
होइ न हृदय प्रबोधप्रचारा।

तरीहि पण शंकरांची वाणी असत्य होणार नाहीं. त्यांचें सर्वसाक्षित्व सर्वांना विदितच आहे. सतीचें मन वरीलप्रमाणें संशयानें पूर्णपणें ग्रस्त झाल्या-कारणानें तिच्या अंतःकरणांत ज्ञानाचा मुळींच रिघाव होईना.

जद्यपि प्रगट न कहेउ भवानी।
हर अंतरजामी सब जानी।

सतीनें जरी प्रत्यक्ष बोलून दाखविलें नाहीं, तरी शंभूनीं अंतर्यामींच तें सर्व जाणलें.

सुनहि सती तव नारिसुभाऊ।
संसय अस न धरिय उर काऊ।
जासु कथा कुंभज रिषि गाई।
भगति जासु मैं मुनिहि सुनाई।
सोइ मम इष्ट देव रघुबीरा।
सेवत जाहि सदा मुनि धीरा।

(शंकर ह्मणाले):—हे सती! ऐक. तुझा स्त्री-स्वभाव आहे. असली कोणतीच शंका मनांत बाळगूं नकोस. ज्याच्या लीला अगस्ति–मुनींनीं गाइल्या आणि त्यांना मी ज्याची भक्ति निरूपण करून सांगि-तली व ज्याचें स्थितप्रज्ञ मुनीश्वरदेखील नित्य सेवन करितात, तोच हा माझा उपास्य देव रघुवीर होय!

**छंद—मुनि धीर जोगी सिद्ध संतत बिमल मन जेहि ध्यावहीं। कहि नेति निगम पुरान आगम जासु कीरति गावहीं॥ सोइ राम व्यापक ब्रह्म भुवन निकाय पति मायाधनी। अवतरउ अपने भगत हित निजतंत्र नित रघु-कुळ-मनी॥ २॥**

मुनि, योगी, सिद्ध इत्यादि मतिधीर ज्याचें विमल मनानें निरंतर ध्यान करीत असतात, वेद, शास्त्रें आणि पुराणें 'नेति, नेति' असा घोष करून ज्याचें यशोगान करीत असतात; तोच हा राम होय. तो सर्वव्यापक परब्रह्म, अनेक ब्रह्मांडांचा नायक, मायेचा ईश, नित्य व स्वतंत्र असून आपल्या भक्तांच्या कल्याणासाठीं रघुकुलमणिरूपानें अवतरला आहे.

**सो०—लाग न उर उपदेसु जदपि कहेउ सिव बार बहु। बोले बिहँसि महेसु हरि-माया-बलु जानि जिय॥ १२॥**

शिवांनीं जरी अनेकवार सांगितलें तरी त्यांचा उपदेश सतीच्या बुद्धीला मानवला नाहीं. (अखेरीस) भगवन्मायाच बलवत्तर असें मनांत निश्चित करून शंकर हास्य करून म्हणाले:—

चौ०—जौं तुह्मरे मन अति संदेहू।
तौ किन जाइ परीछा लेहू।
तब लगि बैठ अहउँ बट छाहीँ।
जब लगि तुह्म ऐहहु मोहि पाहीँ।
जैसे जाइ मोह भ्रम भारी।
करेहु सो जतन बिबेक बिचारी।

जर तुझ्या मनांत अत्यंत संदेह उत्पन्न झाला आहे, तर तूं जाऊन शहानिशा कां करीत नाहींस! तूं परतून मजकडे येईपर्यंत मी ह्या वटवृक्षाच्या छायेखालीं बसून मार्गप्रतीक्षा करीत राहीन. तूं मात्र जेणेंकरून तुझा मोह आणि भ्रम निरस्त होईल असा विवेक–बुद्धीनें विचारपूर्वक प्रयत्न कर.

चली सती सिवआयसु पाई।
करइ बिचारु करउँ का भाई।

ह्याप्रमाणें शिवाज्ञा घेऊन सती तर निघाली; परंतु 'आतां काय बरें करावें?' अशा विचारांतच ती घोंटाळली.

इहाँ संभु अस मन अनुमाना।
दच्छसुता कहँ नहिँ कल्याना।
मोरेहु कहे न संसय जाहीँ।
बिधि बिपरीत भलाई नाहीँ।
होइहि सोई जो राम रचि राखा।
को करि तरक बढावइ साखा।

हें पाहून इकडे शंकरांनीं मनांत असें अनुमान केलें कीं, आतां सतीची धडगत दिसत नाहीं. माझ्यादेखील सांगण्यानें तिचा संशय मावळत नाहीं. तिचें दैवच फिरलें. हें बरें नव्हे. रामचंद्रांनीं जें नेमून ठेविलें असेल तें तर होणारच. मग उगीच तर्क काढून त्यास फांटे कोणी फोडीत बसावें?

अस कहि लगे जपन हरिनामा ।
गई सती जहँ प्रभु सुखधामा ।

असें म्हणून ते हरिनामाचा जप करूं लागले. इकडे सती थेट जेथें सुखनिधान प्रभू होते तेथें गेली.

दो०—पुनि पुनि हृदय बिचार करि धरि सीता कर रूप । आगे होइ चलि पंथ तेहि जेहि आवत नरभूप ॥ ६३ ॥

पुनः पुनः विचार करून अखेरीस तिनें सीतेचाच वेष धारण केला. आणि जिकडून रघुवीर येत होते, त्या वाटेनें नीट समोरूनच येऊं लागली.

चौ०—लछिमन दीख उमाकृत बेषा ।
चकित भये भ्रम हृदय बिसेषा ।
कहि न सकत कछु अतिगंभीरा ।
प्रभुप्रभाउ जानत मतिधीरा ।

लक्ष्मणानें ताडलें कीं, सतीनें ही बतावणी केली आहे. हिच्याहि मनास चांगलाच भ्रम पडला म्हणून तोहि चकित झाला. त्यास कांहींच बोलतां येईना. तेव्हां त्यानें अत्यंत गंभीर मुद्रा धारण केली. कारण प्रभूचा प्रभाव जाणत असल्यामुळें तोहि तरी मनाचा खंबीरच होता.

सतीकपटु जानेउ सुरस्वामी ।
सबदरसी सबअंतरजामी ।
सुमिरत जाहि मिटइ अज्ञाना !
सोइ सर्बज्ञ राम भगवाना ।

देवाधिप, विश्वसाक्षी, सर्वांतर्यामी, ज्याच्या स्मरणानेंच अज्ञान नष्ट होतें, तोच तो सर्वज्ञ भगवान् रामचंद्र होय. त्यानें सतीचें कपट ओळखिलें.

सती कीन्ह चह तहहुँ दुराऊ ।
देखहु नारि–सुभाउ–प्रभाऊ ।

परंतु तेथेंदेखील सतीनें लपंडाव करण्याचें मनांत आणलें. [ कवि म्हणतात ] हा स्त्री–स्वभावाचा प्रभाव तर पहा.

निज मायाबल हृदय बखानी ।
बोले बिहँसि राम मृदुबानी ।

आपल्या मायाबलाचा हृदयांत विचार करून रामचंद्र हास्यपूर्वक मृदुवाणीनें बोलूं लागले.

जोरि पानि प्रभु कीन्ह प्रनामू ।
पितासमेत लीन्ह निज नामू ।

कहेउ बहोरि कहाँ बृषकेतू ।
बिपिन अकेलि फिरहु केहि हेतू ।

पित्याच्या नामासहित आपलें नांव उच्चारून प्रभूनें हात जोडून नमस्कार केला; आणि विचारिलें कीं, वृषकेतु कोठें आहेत ? आणि आपण ह्या अरण्यांत एकट्याच कोणत्या हेतुस्तव फिरत आहां ?

दो०—रामबचन मृदु गूढ सुनि उपजा अति संकोचु । सती सभीत महेस पहिँ चली हृदय बड सोचु ॥ ६४ ॥

रामाचें मृदु आणि गूढ भाषण ऐकून सती फारच ओशाळली आणि भयभीत होऊन परत महेशाकडे जाण्यास निघाली. पण तिचें मन तीस फार खाऊं लागलें.

चौ०—मैं संकर कर कहा न माना ।
निज अज्ञान राम पर आना ।
जाइ उतरु अब देइहउँ काहा ।
उर उपजा अतिदारुन दाहा ।

तिला वाटलें, मी शंकरांचें सांगणें न मानतां आपल्या अज्ञानाचा रामावर आरोप केला. ‘ मी आतां उत्तर तरी काय देऊं ?’ या विचारानें तिच्या अंतःकरणाचा फारच दाह होऊं लागला.

जाना राम सती दुख पावा ।
निज प्रभाउ कछु प्रगटि जनावा ।

सती बरमली हें रामांनीं ओळखून तीस आपला प्रभाव थोडासा प्रत्यक्ष जाणविला.

सती दीख कौतुक मग जाता ।
आगे राम सहित श्रीभ्राता ।
फिरि चितवा पाछे प्रभु देखा ।
सहित बंधु सिय सुंदर बेखा ।

मार्गानें जात असतां सतीनें चमत्कार पाहिला कीं, तिच्या लगत पुढें राम आणि बरोबर लक्ष्मण व सीता जात आहेत. फिरून ती मागें वळून पाहूं लागली तों सुंदर वेष धारण केलेले लक्ष्मण व सीतेसहित प्रभु दिसतच आहेत !

जहँ चितवहि तहँ प्रभु आसीना ।
सेवहिं सिद्ध मुनीस प्रबीना ।
देखे सिव बिधि बिष्णु अनेका ।
अमितप्रभाउ एक तें एका ।
बंदत चरन करत प्रभु सेवा ।
बिबिध बेष देखे सब देवा ।

जिकडे सती पाही तिकडे प्रभु बसलेलेच आहेत, आणि सिद्ध व मुनींद्र त्यांच्या सेवेंत तत्पर असून एकापेक्षां एक अतुल प्रभाववंत असे अनेक शिव, ब्रह्मा व विष्णु, प्रभूचें चरण वंदन करून सेवा करीत आहेत, असेंच तिला दिसून आलें व नानाविध वेषांत सर्व देवहि तीस आढळलें.

**दो०—सती विधात्री इंदिरा देखी अमित अनूप । जेहि जेहि वेष अजादि सुर तेहि तेहि तन अनुरूप ॥ ६५ ॥**

जशी ब्रह्मादिक देवांचीं स्वरूपें तिनें पाहिलीं, तशा रूपवती अशा असंख्य आणि अनुमप सती, सावित्री व लक्ष्मी याहि तिच्या दृष्टोत्पत्तीस आल्या.

चौ०—देखे जहँ तहँ रघुपति जेते ।
सक्तिन्ह सहित सकल सुर तेते ।
जीव चराचर जो संसारा ।
देखे सकल अनेक प्रकारा ।

तिनें रामरूपें जितकीं व जेथें जेथें म्हणून पाहिलीं तेथें तेथें तीं सर्व देव व त्यांच्या शक्ति यांचेसहित होतीं. चराचर विश्वांतील अनेक प्रकारचे सर्व प्राणी तिनें पाहिले.

पूजहिँ प्रभुहिँ देव बहु बेखा ।
रामरूप दूसर नहिँ देखा ।
अवलोके रघुपति बहुतेरे ।
सीतासहित न बेष घनेरे ।

नाना प्रकारचे वेषधारी देव प्रभूंची पूजा करीत आहेत असें तीस दिसलें, परंतु अन्य रामरूप मात्र दृग्गोचर झालें नाहीं. सीतेसह रामचंद्र तिनें पुष्कळसेच अवलोकन केले, परंतु त्यांचीं स्वरूपें मात्र पृथक् नव्हतीं !

सोइ रघुबर सोइ लछिमन सीता ।
देखि सती अति भई सभीता ।
हृदय कंप तन सुधि कछु नाहीँ ।
नयन मूँदि बैठी मग माहीँ

तोच रघुवीर, तोच लक्ष्मण व तीच सीता अवलोकन करून सती अत्यंत भयभीत झाली. (इतकी कीं,) तिच्या हृदयाला कंप सुटून तिला शरीराचीसुद्धां शुद्ध उरली नाहीं, व ( अशा स्थितींतच ) ती डोळे मिटून मार्गांतच बसली.

बहुरि बिलोकेउ नयन उघारी ।
कछु न दीख तहँ दच्छकुमारी ।
पुनि पुनि नाइ रामपद सीसा ।
चली तहाँ जहँ रहे गिरीसा ।

पुन्हां डोळे उघडून पाहूं लागली, तों तेथें सतीस कांहींच दिसेना. ( अखेर ) ती रामपदास वारंवार नमस्कार करून जेथें कैलासनाथ होते तेथें गेली.

**दो०—गई समीप महेस तब हँसि पूछी कुसलात । लीन्हि परीछा कवन बिधि कहहु सत्य सब बात ॥ ६६ ॥**

जवळ जातांच महेशांनीं तीस हास्यपूर्वक कुशल वृत्त विचारिलें. [ व ते म्हणाले ] तूं कोणत्या प्रकारें परीक्षा घेतलीस, तें सर्व यथार्थ वर्तमान मला कळूं दे.

चौ०—सती समुझि रघुबीरप्रभाऊ ।
भयबस सिव सन कीन्ह दुराऊ ।

रघुवीराचा प्रभाव समजून भयभीत झाली. तरीहि सतीनें पुन्हां शिवाशीं लपंडाव आरंभले.

कछु न परीछा लीन्हि गोसाईँ ।
कीन्ह प्रनाम तुम्हारिहि नाईँ ।
जो तुम्ह कहा सो मृषा न होई ।
मोरे मन प्रतीति असि सोई ।

[ती म्हणाली] महाराज ! परीक्षा वगैरे कांहींएक केलें नाहीं. आपल्याप्रमाणेंच मीहि प्रणाम केला. आपण जें म्हणाला तें कधींहि असत्य व्हावयाचें नाहीं, ह्याची मला मनोमय प्रतीति येऊन चुकली.

तब संकर देखेउ धरि ध्याना ।
सती जो कीन्ह चरित सब जाना ।
बहुरि राममायहि सिरु नावा ।
प्रेरि सतिहि जेहि झूठ कहावा ।

तेव्हां शंकरांनीं अंतर्ध्यानानें पाहून सतीनें केलेलें सर्व कृत्य जाणलें. नंतर जिच्या प्रेरणेनें सतीस देखील असत्य भाषण करण्यास लाविलें त्या राममायेस प्रभूंनीं मस्तक नमवून वंदन केलें.

हरिइच्छा भावी बलवाना ।
हृदय बिचारत संभु सुजाना ।
सती कीन्ह सीता कर बेषा ।
सिव उर भयउ बिषाद बिसेषा ।
जौ अब करउँ सती सन प्रीती ।
मिटइ भगति पथ होइ अनीती ।

हरीचीच इच्छा भावी आणि बलवत्तर आहे. असा विचार सर्वज्ञ शंकर करीत असतां सतीनें सीतेचें रूप घेतलें. ह्या गोष्टीमुळें तर त्यांच्या मनास विशेषच विषाद वाटला. त्यांना वाटलें जर आतां सतीवर मी पत्नीप्रेम करीन तर भक्तिमार्ग उध्वस्त होऊन अनीति मात्र माजेल.

दो०—परम पुनीत न जाइ तजि किय प्रेम बड पाप । प्रगटि न कहत महेसु कछु हृदय अधिक संताप ।। ६७ ।।

ह्या महासाध्वीचा त्याग करणें शक्य नाहीं व इजवर प्रेम करावें तर महत्पाप होईल हें जाणून महेश प्रत्यक्ष जरी कांहींच बोलले नाहींत, तरी त्यांच्या अंतःकरणाचा अधिकच भडका होऊं लागला.

चौ०—तब संकर प्रभुपद सिरु नावा ।
सुमिरत राम हृदय अस आवा ।
एहि तन सतिहि भेट मोहि नाहीं ।
सिव संकल्प कीन्ह मन माहीं ।

तेव्हा प्रभुपदास वंदन करून रामस्मरण करीत शंकरांच्या मनांत असें आलें कीं, सतीच्या निदान प्रस्तुत देहानें तिची व माझी गांठ पडावयाची नाहीं व त्यांनीं शेवटीं हेंच मनांत निश्चित केलें.

अस बिचार संकर मतिधीरा ।
चले भवन सुमिरत रघुबीरा ।

धैर्यशील प्रभु हा विचार ठाम करून रामस्मरण करीत स्वस्थानीं जाण्यास निघाले.

चलत गगन भइ गिरा सुहाई ।
जय महेस भलि भगति दृढाई ।
अस पन तुम्ह बिनु करइ को आना ।
रामभगत समरथ भगवाना ।

मार्गानें जात असतां स्पष्ट आकाशवाणी झाली कीं, " शंकरांचा जयजयकार असो ! धन्य आहे आपल्या दृढभक्तीची. आपणांव्यतिरिक्त अशी प्रतिज्ञा कोण करूं शकेल ? हे भगवन् ! समर्थ रामभक्त आपणच आहांत ! "

सुनि नभगिरा सती उर सोचा ।
पूछा सिवहिं समेत सकोचा ।
कीन्ह कवन पन कहहु कृपाला ।
सत्यधाम प्रभु दीनदयाला ।

ती आकाशवाणी ऐकून सतीचें हृदय सचिंत झालें. तिनें संकोचपूर्वक शिवास प्रश्न केला कीं, हे सत्यसागर, दीनदयाल, कृपाळु प्रभो ! आपण कोणती प्रतिज्ञा केली ती सांगावी.

जदपि सती पूछा बहु भाँती ।
तदपि न कहेउ त्रिपुरआराती ।

जरी सतीनें पुष्कळ प्रकारें विचारलें तरी महादेवानीं आपली प्रतिज्ञा तिला सांगितली नाहीं.

दो०—सती हृदय अनुमान किय सब जानेउ सर्बज्ञ । कीन्ह कपट मैं संभु सन नारि सहज जड अज्ञ ।। ६८ ।।

[ तेव्हां ] सतीनें मनांत तर्क केला कीं, सर्वज्ञ प्रभूंनीं सर्व जाणलें. मी शंकरांशींहि कपटच केलें ना ! स्त्री, जातीचीच जड आणि अढाऊ असते.

सो०—जल पय सरिस बिकाइ देखहु प्रीति कि रीति भलि । बिलग होइ रस जाइ कपट खटाई परत पुनि ।। १३ ।।

पाणी व दूध एकाच मोलानें विकतात. प्रीतीचा प्रकार तरी हुबेहूब हाच. कपटाचें विरजण पडतांच प्रीति दुभंग होऊन तिच्यांतील माधुरी नाहीशी होते.

चौ०—हृदय सोच समुझत निज करनी ।
चिंता अमित जाइ नहिं बरनी ।
कृपासिंधु सिव परम अगाधा ।
प्रगट न कहेउ मोर अपराधा ।

स्वतःच्या कृतीमुळें सतीच्या हृदयांत तुफान शोक होऊन ती अत्यंत चिंतातुर झाली. [ तीस वाटे, ] कृपासागर शंकर परमगंभीर आहेत. त्यांनीं माझा अपराध उघडपणें बोलून दाखविला नाहीं.

संकररुख अवलोकि भवानी ।
प्रभु मोहि तजेउ हृदय अकुलानी ।
निज अघ समुझि न कछु कहि जाई ।
तपइ अवाँ इव उर अधिकाई ।

शंकरांची चर्या अवलोकन करतांच भवानीनें ताडलें कीं, प्रभूंनीं आपला त्याग केला, व त्यामुळें तर ती फारच व्याकूळ झाली. स्वतःचें कपट लक्षांत येतांच तिच्यानें कांहींच बोलवेना. तिचें हृदय आंव्याप्रमाणें जास्तच भडकूं लागलें.

सतिहि ससोच जानि बृषकेतू ।
कहीं कथा सुंदर सुख हेतू ।

बरनत पंथ बिबिध इतिहासा।
बिस्वनाथ पहुंचे कैलासा।

सती दुःखित झाली असें पाहून, शंकरांनीं तिच्या सांत्वनास्तव रोचक कथा सांगितल्या. वाटेनें विविध-इतिहास-वर्णन करीत विश्वनाथ कैलासाला पोहोंचले.

तहँ पुनि संभु समुझि पन आपन।
बइठे बट तर करि कमलासन।
संकर सहज सरूप सँभारा।
लागि समाधि अखंड अपारा।

तेथेंही फिरून आपल्या प्रतिज्ञेचा विचार करून ते वटवृक्षाखालीं कमलासन घालून बसले. अनायासें स्वस्वरूपांत निमग्न होऊन शंकरास अखंड व अपार समाधि लागली.

**दो०—सती बसहिँ कैलास तब अधिक सोच मन माहिँ। मरमु न कोऊ जान कछु जुग सम दिवस सिराहिँ॥ ६९॥**

सती तेव्हां कैलासावरच राहिली; परंतु तिच्या मनांतला उद्वेग वाढतच चालला. त्याचें मर्म कोणींच जाणलें नाहीं. तिला प्रत्येक दिवस युगाप्रमाणें जाऊं लागला.

चौ०—नित नव सोच सती उर भारा।
कब जइहउँ दुख-सागर-पारा।

सतीच्या हृदयांत नित्य नवीन शोककल्लोळ उत्पन्न होऊं लागल्यामुळें या शोकसागरांतून कधीं पार पडेन असें तिला झालें.

मैँ जो कीन्ह रघुपतिअपमाना।
पुनि पतिबचन मृषा करि जाना।
सो फल मोहिँ बिधाता दीन्हा।
जो कछु उचित रहा सोइ कीन्हा।
अब बिधि अस बूझिय नहिँ तोही।
संकरबिमुख जिआवसि मोही।

( ती स्वगत ह्मणाली ):—मी जो रघुपतीचा अपमान केला आणि शिवाय पतिवचन असत्य मानलें त्याचें फळ, हे विधात्या ! तूं मला दिलेंस, यांत सर्वतोपरी जें उचित होतें तेंच केलेंस; पण हे विधे ! शंकराविन्मुख अशा स्थितींत मला तूं जिवंत ठेवीत आहेस हें तुला अजूनदेखील कां कळत नाहीं ? ( शंकरविन्मुखास मृत्यूच योग्य हें तात्पर्य. )

कहि न जाइ कछु हृदय गलानी।
मन महँ रामहिँ सुमिर सयानी।

सतीच्या मनांतील उद्विग्नतेचें वर्णन करतां येत नाहीं. परंतु ती सुज्ञच होती. ती मनांत रामचंद्राचें स्मरण करून म्हणाली:—

जौँ प्रभु दीनदयाल कहावा।
आरतिहरन बेद जस गावा।
तौ मैँ बिनय करउँ कर जोरी।
छूटउ बेगि देह यह मोरी।
जौँ मोरे सिवचरन सनेहू।
मन क्रम बचन सत्य ब्रत एहू।

प्रभु जर दीनदयाळ म्हणवितात आणि 'शोकमोचन' ह्मणून वेददेखील त्यांचें यश गातात, तर मी हात जोडून विनंति करतें कीं, आतां हा माझा देह त्वरित सुटावा. जर माझें शिवचरणीं प्रेम असेल व कायावाचामनानें माझें हेंच सत्यव्रत असेल:—

**दो०—तौ सबदरसी सुनिय प्रभु करउ सो बेगि उपाइ। होइ मरन जेहि बिनहिं स्रम दुसह बिपत्ति बिहाइ॥ ७०॥**

तर हे समदर्शी प्रभो ! ऐका, आणि सत्वर अशी योजना करा कीं, जेणेंकरून ह्या दुःसह विपत्तींतून माझी सुटका होऊन मला अनायासें मृत्यु येईल.

चौ०—एहि बिधि दुखित प्रजेसकुमारी।
अकथनीय दारुन दुख भारी।

अशा रीतीनें ती दक्षकन्या सती शोक करीत असतां तिचें दुःख भयंकर अवर्णनीय झालें.

बीते संबत सहस सतासी।
तजी समाधि संभु अबिनासी।
रामनाम सिव सुमिरन लागे।
जानेउ सती जगतपति जागे।

८७००० वर्षांनंतर अविनाशी शंभूंनीं समाधि विसर्जन केली. शिव रामनाम स्मरूं लागले. शंकर जागृत झाले हें सतीसहि कळलें.

जाइ संभुपद बंदन कीन्हा।
सनमुख संकर आसन दीन्हा।
लगे कहन हरिकथा रसाला।
दच्छ प्रजेस भये तेहि काला।

तिनें जाऊन शंभुपदीं वंदन केलें व शंकरांनींहि तीस आपल्यासमोर आसन दिलें. नंतर ते सुरस हरिकथा सांगूं लागले. त्या काळीं दक्ष प्रजापति झालेला होता.

देखा बिधि बिचारि सब लायक ।
दच्छहिं कीन्ह प्रजापतिनायक ।

ब्रह्मदेवानें दक्षच सर्वथा योग्य आहे असें विचारपूर्वक ठरवून त्यासच प्रजापतींचा नायक केला होता.

बड अधिकार दच्छ जब पावा ।
अतिअभिमान हृदय तब आवा ।
नहिँ कोउ अस जनमा जग माहीँ ।
प्रभुता पाइ जाहि मद नाहीँ ।

श्रेष्ठ अधिकारापन्न होतांच दक्षाच्या मनांत खूपच 'ग' ची बाधा झाली. प्रभुत्वास चढल्यावर ज्यास मद मुळींच चढला नाहीं असा ह्या जगांत कोणीच जन्मास आला नसेल.

दो०—दच्छ लिये मुनि बोलि सब करन लगे बड जाग । नेवते सादर सकल सुर जे पावत मष भाग ॥ ७१ ॥

त्या वेळीं दक्षानें मुनि-मंडळ बोलावून मोठाच यज्ञ आरंभिला होता, आणि यज्ञभागाचे अधिकारी अशा सर्व देवांना सादर निमंत्रण केलें होतें.

चौ०—किन्नर नाग सिद्ध गंधर्बा ।
बधुन्ह समेत चले सुर सर्बा ।
बिष्णु बिरंचि महेस बिहाई ।
चले सकल सुर जान बनाई ।

किन्नर, नाग, सिद्ध, गंधर्व व देव हे सर्व आपल्या स्त्रियांसह जात होते. विष्णु, ब्रह्मदेव आणि महेश वगळून सर्व आपापलीं वाहनें सज्ज करून जाते झाले.

सती बिलोके ब्योम बिमाना ।
जात चले सुंदर बिधि नाना ।
सुरसुंदरी करहिँ कल गाना ।
सुनत स्रवन छूटहिँ मुनिध्याना ।

सतीनें आकाशांतून जात असलेलीं नानाप्रकारचीं सुंदर विमानें पाहिलीं. त्यांतून जें ऐकतांच मुनींचें देखील ध्यान सुटेल असें सुस्वर गायन अप्सरा करीत होत्या.

पूछेउ तब सिव कहेउ बखानी ।
पिताजग्य सुनि कछु हरषानी ।
जौँ महेस मोहि आयसु देहीँ ।
कछु दिन जाइ रहउँ मिस एहीँ ।

तेव्हां सतीनें प्रश्न केला असतां शिवांनीं सविस्तर वृत्त सांगितलें. पिता यज्ञ करीत आहे हें ऐकून सतीस आनंद झाला. [ ती मनांत म्हणाली, ] महेश आज्ञा देतील तर ह्या तरी मिषानें कांहीं दिवस माहेरीं जाऊन राहण्यास सांपडेल.

पतिपरित्याग हृदय दुखु भारी ।
कहइ न निज अपराध बिचारी ।
बोली सती मनोहर बानी ।
भय संकोच प्रेम रस सानी ।

पतिपरित्यागामुळें हृदयांत अत्यंत दुःखित झालेली सती स्वतःच्या अपराधाचा विचार करून कांहींच बोलेना. [ अखेर ] तिनें भय, संकोच व प्रीति यांनीं परिपूर्ण अशा मधुर वाणीनें म्हटलें:—

दो०—पिताभवन उत्सव परम जौँ प्रभु आसु होइ । तौ मैँ जाउँ कृपायतन सादर देखन सोइ ॥ ७२ ॥

हे कृपाळो ! पितृगृहीं महोत्सव होत आहे. स्वामींची आज्ञा होत असल्यास तो माझ्या इतमामानें अवलोकन करण्यास मीहि जाईन.

चौ०—कहेहु नीक मोरेहु मन भावा ।
यह अनुचित नहिँ नेवत पठावा ।
दच्छ सकल निज सुता बोलाई ।
हमरे बयर तुम्हउ बिसराई ।

( हें ऐकून शंकर म्हणाले ) तूं म्हणतेस तें ठीकच आहे व मलाहि तें संमत आहे, परंतु तुला निमंत्रण केलेलें नाहीं, ही एकच काय ती खरी अडचण. दक्षानें आपल्या सर्व मुलींना बोलावलें, परंतु माझ्या शत्रुत्वास्तव त्यानें तुला वगळलें.

ब्रम्हसभा हम सन दुखु माना ।
तेहि ते अजहुँ करहिँ अपमाना ।
जौँ बिनु बोलेँ जाहु भवानी ।
रहइ न सीलु सनेहु न कानी ।

ब्रह्मसभेंत माझ्या वर्तनामुळें जो खटका उडाला त्याच कारणामुळें तो आज आपला अपमान करीत आहे. हे भवानी ! अनाहूत गेलीस तर शील, प्रेम, आणि मर्यादा यांना मात्र मुकावें लागेल.

१ एकदां ब्रह्मसभेंत ब्रह्मा, विष्णु, शिवप्रभृति सर्व देव जमले असतां दक्ष जेव्हां आला तेव्हां त्रिमूर्तींखेरीज करून सर्वांनीं अभ्युत्थान दिलें. त्यावरून दक्षास क्रोध आला व त्यानें शाप दिला कीं, तिघेही यज्ञभागविवर्जित रहाल.

जदपि मित्र–प्रभु–पितु–गुरु–गेहा।
जाइय बिनु बोलेहु न सँदेहा।
तदपि बिरोध मान जहँ कोई।
तहाँ गये कल्यान न होई।

मित्र, धनी, पिता व गुरू यांच्या घरीं निःशंक मनानें व बिनबोलावतांहि गेलेलें चालेल, तरींहि पण त्यांच्यापैकीं जेव्हां कोणीहि वैर करीत असेल तेव्हां मात्र त्यांचे घरीं गेल्यानें कल्याण होत नसतें.

भाँति अनेक संभु समुझावा।
भावीबस न ज्ञान उर आवा।
कह प्रभु जाहु जो बिनहिँ बोलाये।
नहिँ भलि बात हमारे भाये।

शंभूंनीं अनेक प्रकारें समजूत घातली तरी भवितव्यतावश सतीच्या हृदयांत तो उपदेश ठसेना. प्रभूंनीं पुन्हां बजाविलें कीं, अनाहूत गेलीस तर आमच्या मतें इष्टापत्ति होणार नाहीं.

**दो०—काहि देखा हर जतन बहु रहइ न दच्छकुमारी। दिये मुख्य गन संग तब बिदा कीन्ह त्रिपुरारि॥ ७३॥**

शंभूंनीं हरप्रयत्न करून सांगून पाहिलें, पण सती राहीचना. तेव्हां त्रिपुरारींनीं मुख्य गण तिच्याबरोबर देऊन तिची रवानगी केली.

चौ०—पिताभवन जब गई भवानी।
दच्छत्रास काहु न सनमानी।
सादर भलेहि मिली एक माता।
भगिनी मिली बहुत मुसुकाता

पितृगृहीं गेल्यावर दक्षभयानें भवानीस कोणीहि मान दिला नाहीं. नाहीं म्हणावयाला तिची आई तेवढी तिला सन्मानपूर्वक भेटली. बाहिणी भेटल्या, परंतु त्यांनीं बरींच नाकें मुरडलीं.

दच्छ न कछु पूछी कुसलाता।
सतिहि बिलोकि जरे सब गाता।

दक्षानें तर मुळीं विचारपूस केली नाहीं ती नाहींच. उलट सतीला पाहून त्याच्या सर्वांगाची लाही मात्र झाली.

सती जाइ देखेउ तब जागा।
कतहुँ न दीख संभु कर भागा।
तब चित चढ़ेउ जो संकर कहेऊ।
प्रभु अपमान समुझि उर दहेऊ।

नंतर सतीनें जाऊन यज्ञ पाहिला, तो शंभूचा भाग तिला कोठेंच आढळला नाहीं. त्या वेळेस मात्र शंकराच्या उपदेशाचें तिला खाडकन् स्मरण झालें, आपण पतीची वंचना केली, हें मनांत येतांच तिचा तिळपापड झाला.

पाछिल दुख न हृदय अस व्यापा।
जस यह भयउ महा परितापा।

तिच्या हृदयावर या वेळीं संतापाचा जो कहर गुदरला तसा तो पूर्वीच्या दुःखानेंहि गुदरविला नव्हता.

जद्यपि जग दारुन दुख नाना।
सब तेँ कठिन जाति अपमाना।
समुझि सो सतिहि भयउ अतिक्रोधा।
बहु बिधि जननी कीन्ह प्रबोधा।

जगांत जरी अनेक दारुण दुःखें आहेत तरी सर्वांत स्वजनापमानाचें दुःख दुर्धर होय. तो अपमान होतांच सती अत्यंत उफाणली. तिच्या आईनें अनेक प्रकारें तिची समजूत घातली.

**दो०—सिवअपमान न जाइ सहि हृदय न होइ प्रबोध। सकल सभहिं हठि हटकि तब बोली बचन सक्रोध॥ ७४॥**

परंतु जेव्हां शिवाचा अपमानहि सहन होईना व हृदयांत विचारहि जम धरीना. तेव्हां ती ताणाताणानें सभेस उद्देशून चवताळून म्हणाली.

चौ०—सुनहु सभासद सकल मुनिंदा।
कही सुनी जिन्ह संकरनिंदा।
सो फलु तुरत लहब सब काहू।
भली भाँति पछिताब पिताहू।

ती म्हणाली, हे सभासदहो ! हे सकल मुनींद्रहो! ऐका. ज्या तुम्हीं शंकरांची अवहेलना केली किंवा ऐकिली त्या तुम्हां सर्वांना सरकसकट तिचें फळ लवकरच मिळेल. हा माझा पितादेखील चांगलाच पश्चात्तापांत पडेल.

संत-संभु-श्रीपति अपबादा।
सुनिय जहाँ तहँ असि मरजादा।
काटिय तासु जीभ जो बसाई।
स्रवन मूँदि न त चलिय पराई।

[कारण] मर्यादा आहे कीं, जेथें संत, शंभु किंवा विष्णु यांची निंदा ऐकण्यांत येतें, तेथें जर बसावयाचें असेल तर त्या निंदकाची जीभच कापून काढली

पाहिजे, नाहींतर कानांत बोटें घालून तडक निघून तरी गेलें पाहिजे.

जगदातमा महेस पुरारी।
जगतजनक सब के हितकारी।
पिता मंदमति निंदत तेही।
दच्छ-सुक्र-संभव यह देही।
तजिहउँ तुरत देह तेहि हेतू।
उर धरि चंद्रमौलि बृषकेतू।

जगदात्मा, महेश, त्रिपुरारि हे जगज्जनक असून सर्वांचे हितकर्ते होत. त्यांची निंदा करणारा हा मंदमति दक्ष माझा पिता आणि ह्याच्या वीर्यापासून उत्पन्न झालेली ही मी ! ह्याच कारणास्तव चंद्रमौली वृषकेतूस हृदयांत धारण करून ह्या देहाचें मी तावडतोब विसर्जन करणार !

अस कहि जोगअगिनि तनु जारा।
भयउ सकल मख हाहाकारा।

असें बोलून तिनें योगाग्नीनें शरीर दग्ध करून घेतलें. तेव्हां सर्व यज्ञांत हाहा:कार उडाला.

**दो०—सतीमरन सुनि संभुगन लगे करन मख खीस। जग्यविधंस बिलोकि भृगु रच्छा कीन्हि मुनीस॥ ७५॥**

सतीचें मरण ऐकून शंभुगण यज्ञविध्वंस करूं लागले. तो यज्ञविघात अवलोकन करून भृगुऋषींनीं त्याचें रक्षण केलें.

चौ०—समाचार सब संकर पाए।
बीरभद्र करि कोप पठाए।
जग्यबिधंस जाइ तिन्ह कीन्हा।
सकल सुरन्ह बिधिवत फल दीन्हा।

जेव्हां तें वर्तमान शंकरास समजलें तेव्हां त्यांनीं क्रुद्ध होऊन, वीरभद्रास पाठविलें. त्यानें जाऊन यज्ञाचा विध्वंस केला व सर्व देवतांना यथायोग्य प्रायश्चित्त दिलें.

भइ जगबिदित दच्छगति सोइ।
जसि कछु संभु बिमुख कै होई।

शंकरांशीं विरोध करणाराची जी गति होते, तीच एवढा विख्यात दक्ष पण त्यासहि भोगावी लागलीच.

यह इतिहास सकल जग जाना।
तातें मैं संछेप बखाना।

हा इतिहास सर्व जगाला विदित आहे, म्हणून मी तो संक्षेपतःच वर्णन केला.

सती मरत हरि सन बर माँगा।
जनम जनम सिवपद अनुरागा।
तेहि कारन हिमगिरिगृह जाई।
जनमीं पारबती तनु पाई।

सतीनें मरणसमयीं श्रीपतीस वर मागितला कीं, जन्मोजन्मीं शिवपदींच प्रीति असावी. त्याच कारणामुळें ती पार्वतीचा देह पावून हिमालयाचे घरीं जन्मास आली.

जब तें उमा सैलगृह जाई।
सकल सिद्धि संपति तहँ छाई।
जहँ तहँ मुनिन्ह सुआस्रम कीन्हे।
उचित बास हिमभूधर दीन्हे।

हिमालयाचे सदनीं उमा जन्मल्यापासून सर्व सिद्धि आणि संपत्ति तेथें छाऊन राहिल्या. ठिकठिकाणीं मुनिजनांनीं पवित्र आश्रम केले. हिमालयानें त्यांस योग्य स्थलें दिलीं.

**दो०—सदा सुमन फल सहित सब द्रुम नव नाना जाति। प्रगटीं सुंदर सैल पर मनिआकर बहु भाँति॥ ७६॥**

त्या सुंदर पर्वतावर नानाप्रकारचे सर्वकाळीं फुलपुष्पान्वित असलेले नूतन वृक्ष निर्माण झाले व अनेक प्रकारच्या रत्नांच्या खाणी प्रकट झाल्या.

चौ०—सरिता सब पुनीत जल बहहीं।
खग मृग मधुप सुखी सब रहहीं।
सहज बयर सब जीवन त्यागा।
गिरि पर सकल करहिं अनुरागा।

सर्व नद्या पुण्यजलानिशीं वाहूं लागल्या. पक्षी, हरिण व भ्रमर सर्व सुखानें नांदूं लागले. सर्व जीवांनीं परस्परांतील स्वाभाविक शत्रुत्व टाकून दिलें व सर्वच हिमालय पर्वतावर प्रीति करूं लागले.

सोह सैल गिरिजा गृह आये।
जिमि जन रामभगति के पाये।
नित नूतन मंगल गृह तासू।
ब्रम्हादिक गावहिं जस जासू।

गिरजेचा घरांत जन्म झाल्यापासून, मनुष्य रामभक्तीच्या प्राप्तीनें जसा शोभतो, तसा हिमालयहि शोभूं लागला. त्याच्या घरीं नित्य नवीन भाग्योत्साह

होऊं लागले व ब्रह्मादिकदेखील त्याचें यश गाऊं लागले.

नारद समाचार सब पाये।
कौतुकही गिरिगेह सिधाये।

हें एकंदर वर्तमान ऐकून नारदमुनि कौतुकानें हिमालयाच्या घरीं गेले.

सैलराज बड आदर कीन्हा।
पद पषारि बर आसन दीन्हा।
नारिसहित मुनिपद सिरु नावा।
चरनसलिल सब भवनु सिचावा।

हिमालयानें त्यांचा फार सन्मान करून चरण-प्रक्षालनपूर्वक त्यांस श्रेष्ठ आसन दिलें. स्त्रीसहवर्तमान त्यानें मुनिचरणांस प्रणाम केला आणि त्यांचें चरण-तीर्थ सर्व घरभर सिंचन केलें.

निज सौभाग्य बहुत गिरि बरना।
सुता बोलि मेली मुनिचरना।

हिमालयानें आपल्या उच्चतर भाग्याची फार प्रशंसा केली, व त्यानें मुलीस बोलावून तिला मुनींच्या चरणांवर घातली.

**दो०–त्रिकालग्य सर्वग्य तुम्ह गति सर्वत्र तुम्हारि। कहहु सुता के दोष गुन मुनिबर हृदय बिचारि ॥ ७७ ॥**

हिमालय म्हणाला, आपण त्रिकालज्ञ असून सर्वज्ञ आहांत. शिवाय आपला संचार सर्वत्र असतो. हे मुनिश्रेष्ठ ! या कन्येचे गुणदोष आपण विचारपूर्वक कथन करावे.

चौ०–कह मुनि बिहँसि गूढ मृदु बानी।
सुता तुह्मारि सकल गुनखानी।
सुंदर सहज सुसील सयानी।
नाम उमा अंबिका भवानी।
सब लच्छनसंपन्न कुमारी।
होइहि संतत पियहि पियारी।

हें ऐकून हास्य करून मुनि मृदु व गूढ भाषेंत म्हणालेः—ही तुझी कन्या सर्व गुणांची खाण आहे. ही सुंदर, जात्याच सुशील आणि सुज्ञ आहे. ही अंबिका, भवानी व उमा अशा नांवानें प्रख्यात होईल. सर्वतोपरी सुलक्षण अशी ही तुझी कन्या पतीला सर्वदा प्रियकर होईल.

सदा अचल एहि कर अहिवाता।
एहि तें जसु पइहहिं पितु माता।
होइहि पूज्य सकल जग माहीं।
एहि सेवत कछु दुर्लभ नाहीं।
एहि कर नाम सुमिरि संसारा।
तिय चढिहहिं पतिब्रत असिधारा।

इचें सौभाग्य सर्वदा अखंड राहील. हिच्यामुळे हिच्या मातापित्यांस यशाची जोड मिळेल. ही त्रैलोक्यांत देखील पूज्य होईल. हिच्या सेवेनें कांहींच दुर्लभ राहणार नाहीं. ब्रह्माण्डांतील सर्व स्त्रिया इच्या नामस्मरणानेंच पातिव्रत्यरूप असिधाराव्रत पार पाडतील.

सैल सुलच्छनि सुता तुह्मारी।
सुनहु जे अब अवगुन दुइ चारी।

हिमालया ! ही तुझी कन्या अशी सुलक्षण आहे. आतां जीं दोनचार इचीं कुलक्षणें आहेत तीं ऐक.

अगुन अमान मातुपितुहीना।
उदासीन सब संसयछीना।

**दो०–जोगी जटिल अकाम मन नगन अमंगलबेख। अस स्वामी एहि कहँ मिलिहि परी हस्त असि रेख ॥ ७८ ॥**

निर्गुण, मानरहित, मातापिताहीन, उदासीन, निःशंक, योगी, जटिल, निष्काम, नग्न, अमंगलवेष असा पती मिळावा अशी इची हस्तरेषा पडली आहे.

चौ०–सुनि मुनिगिरा सत्य जिय जानी।
दुख दंपतिहिं उमा हरषानी।
नारदहू यह भेदु न जाना।
दसा एक समुझब बिलगाना।

ही नारदाची वाणी ऐकून व ती सत्य होणार असा भरंवसा वाटून, हिमालयास व त्याच्या कुटुंबास दुःख झालें; पण उमेस मात्र हर्ष झाला. सकृद्दर्शनी तिघांचीहि एकच अवस्था झाली असें दिसलें. ( कारण तिघांच्याहि डोळ्यांत अश्रु आले. ) परंतु त्यांच्या मनोवृत्ती मात्र भिन्न होत्या, हें इंगित नारदाच्याहि ध्यानांत आलें नाहीं.

सकल सखी गिरिजा गिरि मैना।
पुलक सरीर भरे जल नैना।

सर्व सखीजन, पार्वती, हिमालय व त्याची पत्नी मैना या सर्वांच्या शरीरावर रोमांच उभे राहिले आणि त्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले.

होइ न मृषा देवरिषि भाखा।
उमा सो बचन हृदय धरि राखा।
उपजेउ सिवपदकमल सनेहू।
मिलन कठिन मन भा संदेहू।

देवर्षि नारद म्हणाले कीं, हें कधींहि टळावयाचें नाहीं. तें वचन उमेनें हृदयांत कोरून ठेविलें. शंभुपदकमलाचे ठायीं तिच्या हृदयांत प्रेम उत्पन्न झालें, पण तें दुष्प्राप्य अशी शंका तिच्या मनानें घेतली.

जानि कुअवसरु प्रीति दुराई।
सखीउछंग बैठि पुनि जाई।

कुवेळ म्हणून तिनें आपलें प्रेम दावलें, आणि ती आपल्या सख्यांजवळ फिरून जाऊन बसली.

झूठ न होइ देवरिषिबानी।
सोचहिँ दंपति सखी सयानी।
उर धरि धीर कहइ गिरिराऊ।
कहहु नाथ का करिय उपाऊ।

नारदवाक्य असत्य व्हावयाचें नाहीं म्हणून तें दंपत्य व तिच्या चतुर सख्या विवंचनेंत पडल्या. हिमालयानें धैर्य धरून विचारलें कीं, हे नाथ ! यास उपाय तरी काय करावा तें सांगावें.

**दो०—कह मुनीस हिमवंत सुनु जो बिधि लिखा लिलार। देवदनुज नर नाग मुनि कोउ न मेटनहार ॥ ७९ ॥**

तेव्हां मुनींद्र म्हणाले—हिमवंता ! ऐक. विधीनें जे योग लिहिले असतील ते देव, दैत्य, नर, नाग, मुनी, कोणीहि पुसून टाकूं शकणार नाहीं.

चौ०—तदपि एक मैं कहउँ उपाई।
होइ करइ जौं दैव सहाई।
जस बर मैं बरनेउँ तुम्ह पाहीँ।
मिलिहि उमहिँ तस संसय नाहीँ।

तथापि, एक उपाय मी सांगतों. दैव अनुकूल असेल तर मात्र तो फलद्रूप होईल. मी बोललों त्याप्रमाणें उमेस पती निःसंशय मिळणार.

जे जे बर के दोष बखाने।
ते सब सिव पहिँ मैं अनुमाने।
जौं बिबाहु संकर सन होई।
दोषउ गुन सम कह सबु कोई।

मी वराचे जे जे दोष सांगितले, त्या सर्वांचें शिवाचे ठायीं अनुमान होत आहे. जर इचा शंकरांशीं विवाह झाला तर सर्व लोक दोषांना गुणाप्रमाणेंच लेखतील.

जौं अहिसेज सयन हरि करहीँ।
बुध कछु तिन्हकर दोषु न धरहीँ।
भानु कृसानु सर्व रस खाहीँ।
तिन्ह कहँ मंद कहत कोउ नाहीँ।
सुभ अरु असुभ सलिल सब बहई।
सुरसरि कोउ अपुनीत न कहई।
समरथ कहँ नहि दोष गोसाईँ।
रवि पावक सुरसरि की नाईँ।

श्रीपति शेषाचे मंचकीं शयन करतात. पण त्यांना पण्डितदेखील दोष देत नाहींत. रवि आणि अग्नि सर्वच रसांचा आस्वाद घेतात, परंतु त्यांना कोणीहि पागल समजत नाहींत. हे शैलपते ! गंगा पवित्र आणि अपवित्र सर्वच प्रकारचें जल वाहून नेते. पण तिलादेखील कोणीच अपवित्र म्हटलेलें नाहीं. रवि, अग्नि, आणि गंगा यांच्याप्रमाणेंच समर्थांना देखील दोष नाहीं.

**दो०—जौं अस हिसिषा करहिँ नर जड बिबेक-अभिमान। परहिँ कलप भरि नरक महँ जीव कि ईस समान ॥ ८० ॥**

जो मूर्ख मनुष्य ज्ञानाच्या अभिमानानें आपणहि (त्यांच्याचप्रमाणें) वर्तन करण्याची हांव धरील, तो कल्पपर्यंत नरकांत पचत राहील. जीव हा परमेश्वराची बरोबरी करूं शकेल काय ?

चौ० सुरसरिजलकृत बारुनि जाना।
कबहुँ न संत करहिँ तेहि पाना।
सुरसरि मिले सो पावन जैसे।
ईस अनीसहि अंतर तैसे।

जरी गंगाजलानें तयार केलेल्या अनेकविध वारुणी असल्या, तरी संत कधींहि त्यांचें पान करीत नाहींत. ( तद्वतच जीव जरी ईश्वरांश असला तरी अज्ञानामुळें तो देहाश्रयी बनल्याकारणानें त्यास ईश्वरत्व नाहीं. ) तीच वारुणी पुन्हां गंगेस मिळाली म्हणजे पावन होते. तद्वतच ईश्वर आणि जीव

यांच्यांतलें अंतर आहे. ( जीवाचें अज्ञान नष्ट होऊन ज्ञानानें सच्चिदानंदानुभव झाल्याशिवाय त्यास ईशत्व नाहीं हा भाव. )

**संभु सहज समरथ भगवाना।**
**एहि बिवाह सब बिधि कल्याना।**

शंभु भगवान् हे स्वाभाविकपणेंच सामर्थ्यवंत आहेत. त्यांच्याशीं विवाह होणें हें सर्वथा कल्याणप्रदच होणार आहे.

**दुराराध्य पै अहहिँ महेसू।**
**आसुतोष पुनि किये कलेसू।**

पण महेश दुराराध्य आहेत ( फार कष्टानें प्रसन्न होणारे आहेत, ) तरी कष्ट केले असतां ते सत्वरच प्रसन्नहि होतात.

**जौँ तपु करइ कुमारी तुम्हारी।**
**भाविउ मेटि सकहिँ त्रिपुरारी।**
**जद्यपि बर अनेक जग माहीँ।**
**एहि कहँ सिव तजि दूसर नाहीँ।**

तुझी ही पोर जर तप करील तर शिव भवितव्यतेलाहि मार्गे सारण्यास समर्थ आहेत. ( तात्पर्य इतर वर जर इच्या नशीबीं असला तर तसें न होऊं देतां स्वतःच इच्याशीं विवाह करण्यास ते समर्थ आहेत. ) जगांत जरी अनेक वर आहेत, तरी इला अनुरूप असा शंकराव्यतिरिक्त इतर कोणीहि नाहीं.

**बरदायक प्रनतारतिभंजन।**
**कृपासिंधु सेवक-मन-रंजन।**
**इच्छित फल बिनु सिव अवराधे।**
**लहिय न कोटि जोग जप साधे।**

शंकर हे वरदायक, शरणागतांचें दुःख निवारण करणारे, कृपासागर आणि भक्तांचें मनोरंजन करणारे आहेत. शिवाराधनेशिवाय कोटयवधि योग किंवा जप करून देखील इच्छितफल प्राप्त होत नाहीं.

**दो०-अस कहि नारद सुमिरि हरि गिरिजहि दीन्हि असीस। होइहि यह कल्यान अब संसय तजहु गिरीस॥ ८१॥**

इतकें बोलून व हरीचें स्मरण करून नारदांनीं गिरिजेस आशीर्वाद दिला, [ आणि म्हणाले ] हे गिरीशा ! शंका ठेवूं नकोस. इचें आतां कल्याणच होईल.

**चौ०-कहि अस ब्रम्हभवन मुनि गयऊ।**
**आगिल चरित सुनहु जस भयऊ।**

असें बोलून नारद सत्यलोकास गेले. पुढील वर्तमान यथाभूत श्रवण करावें.

**पतिहि एकांत पाइ कह मैना।**
**नाथ न मैँ समुझे मुनिबैना।**

पतीला एकांतांत गाठून मैना म्हणाली, महाराज मला मुनिवाक्याचा बोध झाला नाहीं.

**जौँ घरु बरु कुलु होइ अनूपा।**
**करिय बिबाहु सुता अनुरूपा।**
**नत कन्या बरु रहउ कुआँरी।**
**कंत उमा मम प्रानपियारी।**

जर कुलवान, घरंदाज, अनुपम्य आणि कन्येस अनुरूप असा पति मिळेल, तरच तिचा विवाह करावा. नाहींतर मुलगी कुमारीच राहिलेली पत्करेल. उमा मला माझ्या प्राणाहूनदेखील प्रिय आहे.

**जौँ न मिलिहि बरु गिरिजहि जोगू।**
**गिरि जड सहज कहिहि सब लोगू।**
**सोइ बिचारि पति करेहु बिबाहू।**
**जेहि न बहोरि होइ उर दाहू।**

गिरिजेला अनुरूप वर जर न मिळेल तर स्वभावतःच आपण [ हिमालय ] जड आहां असीं लोक नांवें ठेवतील. ह्याचा विचार करून, महाराज जेणेंकरून पुन्हां मनाला पश्चात्ताप होणार नाहीं असा प्रकारें विवाह केला पाहिजे.

**अस कहि परी चरन धरि सीसा।**
**बोले सहित सनेह गिरीसा।**
**बरु पावक प्रगटइ ससि माहीँ।**
**नारदबचन अन्यथा नाहीँ।**

असें म्हणून तिनें पतीचे चरणीं मस्तक नमविलें. तेव्हां हिमालय तीस प्रेमपूर्वक म्हणाला कीं, कदाचित् चंद्रांत देखील अग्नि प्रगट होईल, परंतु नारदाचें वचन असत्य व्हावयाचें नाहीं.

**दो०-प्रिया सोचु परिहरहु सब सुमिरहु श्रीभगवान। पारबतिहि निरमयउ जेहिं सोइ करिहि कल्यान॥ ८२॥**

प्रिये ! सर्व शोकांचा त्याग करून भगवंताचें चिंतन कर. ज्यानें पार्वतीस निर्माण केलें तोच तिचें कल्याण करील.

चौ०—अब जौं तुमहि सुता पर नेहू ।
तौ अस जाइ सिखावन देहू ।
करइ सो तपु जेहि मिलहिँ महेसू ।
आन उपाय न मिटिहि कलेसू ।

आतां जर तुझें कन्येवर प्रेमच असेल तर जेणेंकरून ती तपाला प्रवृत्त होईल असाच तिला उपदेश कर, म्हणजे तिला शंकराची प्राप्ति होईल. इतर उपायांनीं दुःखाचें निवारण होणें शक्य नाहीं.

नारदवचन सगर्भ सहेतू ।
सुंदर सब-गुन-निधि बृषकेतू ।
अस बिचारि तुम्ह तजहु असंका ।
सबहि भाँति संकर अकलंका ।

नारदांचें वचन सकारण आणि गर्भितार्थयुक्त असावयाचें. वृषकेतु हे सुंदर असून सर्व गुणांचे निधि होत. सर्वतोपरी चंद्रमौली निष्कलंक आहेत, असा विचार करून तूं हा त्रागा सोडून दे.

सुनि पतिबचन हरषि मन माहीं ।
गई तुरत उठि गिरिजा पाहीं ।
उमहि बिलोकि नयन भरि बारी ।
सहित सनेह गोद बैठारी ।

पतीचें वचन श्रवण करून मैना हर्षित होत्साती सत्वर उठून गिरिजेकडे गेली. उमा दृष्टीस पडतांच तिचे नेत्र अश्रूंनीं डबडबले आणि तिनें तीस ममतेनें मांडीवर घेतलें.

बारहिँ बार लेति उर लाई ।
गदगद कंठ न कछु कहि जाई ।
जगतमातु सर्बज्ञ भवानी ।
मातुसुखद बोलीं मृदुबानी ।

तिनें तिला वारंवार उराशीं धरून कवटाळलें व कंठ भरून आल्याकारणानें तिच्यानें कांहींच बोलवेना. तेव्हां जगन्माता सर्वज्ञ भवानी आईला सुखविण्या-साठीं मृदुवाणीनें म्हणालीः—

दो०—सुनहि मातु मैं दीख अस सपन सुनावउँ तोहि । सुंदर गौर सुबिप्रबर अस उपदेसेउ मोहि ॥ ८३ ॥

आई ! मी एक स्वप्न पाहिलें, तें तुला सांगतें; ऐक. एका सुंदर गौर ब्राह्मणश्रेष्ठानें मला असा उपदेश केला कीं,

चौ०—करहि जाइ तपु सैलकुमारी ।
नारद कहा सो सत्य बिचारी ।
मातुपितहि पुनि यह मत भावा ।
तपु सुखप्रद दुख दोष नसावा ।

"हे गिरजे! तप करण्यास जा. नारदानें जें सांगितलें तें विचारपूर्वक सांगितलें असून सत्य आहे. शिवाय तप हें सुखप्रद व दुःखदोषनाशक होईल असेंच तुझ्या आईबापांचें देखील मत आहे.

तपबल रचइ प्रपंच बिधाता ।
तपबल बिष्णु सकल-जग-त्राता ।
तपबल संभु करहिँ संहारा ।
तपबल सेष धरइ महिभारा ।
तपअधार सब सृष्टि भवानी ।
करहि जाइ तपु अस जिय जानी ।

तपोबलेंकरूनच ब्रह्मदेव सृष्टीची रचना करतो, तपोबलानेंच विष्णु जगाचें पालन करतो आणि तपाच्याच सामर्थ्येंकरून महादेव सृष्टीचा संहार करितो. तपःशक्तीनेंच शेष पृथ्वीचा भार सहन करितो. हे भवानी ! तपच सर्व सृष्टीला आधार होय, असा हृदयांत निर्धार करून तप करण्यास्तव जा."

सुनत बचन बिसमित महतारी ।
सपन सुनायउ गिरिहि हँकारी ।
मातुपितहि बहु बिधि समुझाई ।
चलीं उमा तप हित हरषाई ।

कन्येचें वचन ऐकून मैना विस्मित झाली, व हिमालयास बोलावून तिनें तें स्वप्न त्यासही ऐकविलें. आईबापांची अनेकप्रकारें समजूत घालून उमा तपार्थ हर्षानें गमन करती झाली.

प्रिय परिवार पिता अरु माता ।
भये बिकल मुख आव न बाता ।

तिचे इष्टजन परिवार, पिता व माता व्याकुळ झाल्यामुळें त्यांच्या मुखांतून शब्द निघेना.

दो०—बेदसिरा मुनि आइ तब सबहिं कहा समुझाइ । पारबतीमहिमा सुनत रहे प्रबोधहि पाइ ॥ ८४ ॥

तेव्हां वेदशिरा मुनी आले व त्यांनीं सर्वांची समजूत घातली. पार्वतीचा महिमा ऐकून त्यांस विवेक उत्पन्न झाला व ते स्वस्थ राहिले.

चौ०—उर धरि उमा प्रान—पति—चरना ।
जाइ बिपिन लागी तप करना ।
अतिसुकुमार न तनु तपजोगू ।
पतिपद सुमिरि तजेउ सब भोगू ।

उमा प्राणपतीचें चरण हृदयांत ठेवून अरण्यांत तपाचरण करण्याकरितां जाऊं लागली. ती अत्यंत सुकुमार असल्यामुळें तिचा देह तपास योग्य नव्हता. तथापि, पतिचरणांस स्मरून तिनें भोगांचा त्याग केला.

नित नव चरन उपज अनुरागा ।
बिसरी देह तपहि मन लागा ।

शिवचरणीं नित्य नवीन प्रेम उत्पन्न होऊन तिचें मन त्यांतच गढून गेलें आणि तिला देहाचा विसर पडला.

संबत सहस मूल फल खाये ।
सागु खाइ सत बरष गवाँये ।
कछु दिन भोजन बारि बतासा ।
किये कठिन कछु दिन उपबासा ।

तिनें हजार वर्षेंपर्यंत मुळें व फळें भक्षण केलीं; शंभर वर्षें वनस्पति खाऊन काढलीं; कांहीं दिवस जलपान व वायुभक्षण करून काढले आणि कांहीं दिवस तर तिनें कडक निराहार केले.

बेलपाति महि परइ सुखाई ।
तीनि सहस संबत सोइ खाई ।
पुनि परिहरे सुखानेउ परना ।
उमहि नाम तब भयउ अपरना ।

जमिनीवर पडून सुकून गेलेलीं बेलाचीं पानें खाऊन तिनें तीन हजार वर्षें काढलीं. फिरून तिनें शुष्क पर्णांचाहि त्याग केला. तेव्हांपासून तिचें 'अपर्णा' हें नांव पडलें.[1]

देखि उमहिं तप खीनसरीरा ।
ब्रम्हगिरा भइ गगन गँभीरा ।

तेव्हां तपामुळें उमा शरीरानें कृश झालेली पाहून आकाशांत गंभीर देववाणी झाली:—

दो०—भयउ मनोरथ सुफल तव सुनु गिरिराजकुमारि । परिहरु दुसह कलेस सब अब मिलिहहिं त्रिपुरारि ॥ ८५ ॥

" हे गिरिराजकुमारी, ऐक. तुझे मनोरथ सफल झाले. सर्व दुःसह क्लेशांचा आतां समारोप कर. आतां तुला त्रिपुरारीची प्राप्ति होईलच होईल. "

चौ०—अस तपु काहु न कीन्ह भवानी ।
भये अनेक धीर मुनि ज्ञानी ।
अब उर धरहु ब्रम्ह बर बानी ।
सत्य सदा संतत सुचि जानी ।

हे भवानी ! आजपर्यंत अनेक धीर व ज्ञानी मुनि होऊन गेले, परंतु असें तप कोणीच केलेलें नाहीं. आतां ही ब्रह्मप्रसादवाणी मात्र सदा सत्य व सदा पवित्र आहे, असा हृदयांत विश्वास असूं दे.

आवहिं पिता बुलावन जबही ।
हठ परिहरि घर जायहु तबही ।
मिलहिँ तुम्हहिं जब सप्तरिषीसा ।
जानेहु तब प्रमान बागीसा ।

पिता बोलावण्यास येईल तेव्हां हट्ट सोडून घरीं जा. जेव्हां तुला सप्तर्षींचें दर्शन घडेल तेव्हां देववाणी प्रमाणभूत समज.

सुनत गिरा बिधि गगन बखानी ।
पुलकगात गिरिजा हरषानी ।

आकाशगत ब्रह्मवाणी ऐकून गिरिजा हर्षानें रोमांचित झाली.

उमाचरित सुंदर मैँ गावा ।
सुनहु संभु कर चरित सुहावा ।

(तुलसीदास म्हणतात) येथवर मी उमा-चरित्र गाइलें. [आतां] मनोहर शंभु—चरित्र ऐका.

जब तेँ सती जाइ तनु त्यागा ।
तब तेँ सिवमन भयउ बिरागा ।
जपहिँ सदा रघुनायकनामा ।
जहँ तहँ सुनहिँ राम—गुन—ग्रामा ।

सतीनें जाऊन प्राणत्याग केल्यापासून तर शिवाचें मन विरक्तच झालें होतें. त्यांनीं सदा रामनाम जपावें आणि जेथें तेथें रामकथा ऐकावी.

---

[1] सत्याग्रह आणि हट्टाग्रह यांतला फरक येथें दिसूं शकेल. तपःप्रधान असला तरच तो सत्याग्रह, नाहींतर दुराग्रह. म्हणूनच भरताचा सत्याग्रह रामानें चालू दिला नाहीं.

दो०—चिदानंद सुखधाम सिव बिगत-मोह-मद-काम। बिचरहिँ महि धरि हृदय हरि सकल-लोक-अभिराम ॥ ८६ ॥

चैतन्यरूप, सुखाचें आगर, निर्मोह, मदरहित आणि निष्काम असे शिव आपल्या हृदयांत सकल लोकांभिराम—श्रीहरीस धारण करून पृथ्वीवर स्वेच्छेनें संचार करूं लागले.

चौ०—कतहुँ मुनिन्ह उपदेसहिँ ग्याना।
कतहुँ रामगुन करहिँ बखाना।
जदपि अकाम तदपि भगवाना।
भगत बिरह दुख दुखित सुजाना।

ते कोठें मुनींना ज्ञानोपदेश करीत असत तर कोठें रामकथाच वर्णन करीत असत. जरी ते स्वतः निष्काम होते, तरी कृतज्ञ प्रभु भगवान शिवभक्ताच्या विरहदुःखानें दुःखित झाले होते.

एहि बिधि गयउ काल बहु बीती।
नित नव होइ रामपद प्रीती।
नेमु प्रेमु संकर कर देखा।
अबिचल हृदय भगति कै रेखा।
प्रगटे रामु कृतज्ञ कृपाला।
रूप-सील-निधि तेज बिसाला।

ह्याप्रमाणें बहुत काल व्यतीत झाला. त्यांची प्रीति रामपदांचे ठायीं नित्य नवीन वाढूं लागली. शंकरांचें नित्य अभिनव प्रेम पाहून व त्यांच्या हृदयांतील निश्चल अशी भक्तीची मर्यादा [ सतीचे पार्वतीरूपानें आली तरीहि ती अपरिग्रहणीय होय ही मर्यादा ] पाहून कृतज्ञ, दयाळू, रूपशीलनिधान व अमित-तेजस्वी श्रीरामचंद्र प्रकट झाले.

बहु प्रकार संकरहिं सराहा।
तुम्ह बिनु अस ब्रतु को निरबाहा।
बहु बिधि राम सिवहिं समुझावा।
पारबती कर जनम सुनावा।
अतिपुनीत गिरिजा कै करनी।
बिस्तर सहित कृपानिधि बरनी।

रामचंद्रांनीं शंकरांची अनेक प्रकारें प्रशंसा केली. [ ते म्हणाले, ] तुम्हांव्यतिरिक्त असलें व्रत तडीस नेण्यास कोण समर्थ आहे! रामांनीं शिवाची पुष्कळ रीतींनें समजूतहि घातली व पार्वतीचा जन्म निवेदन करून गिरिजेच्या अत्यंत पवित्र तपाचरणाचें दया-निधीनें सविस्तर वर्णन केलें.

दो०—अब बिनती मम सुनहु सिव जौं मो पर निज नेहु। जाइ बिबाहहु सैलजहिं यह मोहि माँगे देहु ॥ ८७ ॥

( राम म्हणाले, ) शंकरा! आतां माझी विनंति ऐकावी. जर आपलें मजवर प्रेम आहे, तर आपण जाऊन पार्वतीस वरावें. इतकेंच मागणें मला द्यावें.

चौ०—कह सिव जदपि उचित अस नाहीँ।
नाथबचन पुनि मेटि न जाहीँ।
सिर धरि आयसु करिय तुम्हारा।
परम धरम यह नाथ हमारा।
मातु पिता गुरु प्रभु कै बानी।
बिनहिँ बिचार करिय सुभ जानी।
तुम्ह सब भाँति परम-हित-कारी।
अग्या सिर पर नाथ तुम्हारी।

( तेव्हां शिव म्हणाले—) हें जरी गैर, तरी स्वामींची आज्ञा मोडणें शक्य नाहीं. आपली आज्ञा शिरसा-वंद्य करून त्याप्रमाणें वर्तन करावें हाच, हे स्वामिन्! आमचा परम धर्म होय. मातापिता, प्रभु व गुरु यांची आज्ञा श्रेयस्कर जाणून विचार न करितांच पालन करावी. आपणच माझे सर्वतोपरी हितकर्ते आहांत. महाराज! आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे.

प्रभु तोषेउ सुनि संकरबचना।
भगति बिबेक धरमजुत रचना।
कह प्रभु हर तुम्हार पन रहेऊ।
अब उर राखेहु जो हम कहेऊ।

शंकरांचें तें भक्ति, विवेक व धर्म यांनीं युक्त असलेलें वचन ऐकून प्रभु संतुष्ट झाले. ( पुनः ) प्रभु म्हणाले—शंकरा! आपली प्रतिज्ञा कायम राहिली. आतां मी जें बोललों तें ध्यानांत असूं द्यावें.

अंतरधान भये अस भाखी।
संकर सोइ मूरति उर राखी।
तबहिँ सप्तरिषि सिव पहिँ आये।
बोले प्रभु अति बचन सुहाये।

इतकें बोलून प्रभु अंतर्धान पावले. प्रभूंची तीच मूर्ति शंकरांनीं हृदयांत धारण केली. त्याच वेळीं सप्तर्षि शिवाकडे ( दर्शनास ) आले. त्यांस प्रभु वैचक्याच शब्दांत म्हणाले:—

**दो०—पारबती पहिँ जाइ तुम्ह प्रेमपरीछा लेहु । गिरिहि प्रेरि पठयेहु भवन दूरि करेहु संदेहु ॥ ८८ ॥**

तुम्ही पार्वतीकडे जाऊन तिच्या प्रेमाची शहानिशा करा, आणि हिमालयास सांगून तिला घरीं पाठवा व तिच्या संशयाचें निवारण करा.

**चौ०—तब रिषि तुरत गौरि पँह गयऊ ।**
**देखि दसा मुनि बिसमय भयऊ ।**
**रिषिन गौरि देखी तहँ कैसी ।**
**मूरतिवंत तपस्या जैसी ।**

तेव्हां ऋषी तसेच पार्वतीकडे गेले. तिची ती स्थिति पाहतांच मुनींनाहि आश्चर्यच वाटलें. त्या ठिकाणीं तिला पाहतांच ही मूर्तिमंत तपश्चर्याच आहे असें त्यांना भासलें.

**बोले मुनि सुनु सैलकुमारी ।**
**करहु कवन कारन तप भारी ।**
**केहि अवराधहु का तुम्ह चहहू ।**
**हम सन सत्य मरमु किन कहहू ।**

मुनि म्हणाले—हे गिरिकन्ये ! ऐक. हें उग्र तप तूं कोणत्या हेतूस्तव आरंभिलें आहेस ? तूं आराधना कोणाची मांडली आहेस ? तुला हवें तरी काय ? आम्हांला तूं आपलें खरें खरें हितगुज सांगशील काय?

**सुनत ऋषिनके बचन भवानी ।**
**बोली गूढ मनोहर बानी ।**
**कहत बचन मनु अति सकुचाई ।**
**हँसिहहु सुनि हमारि जडताई ।**
**ननु हठ परा न सुनइ सिखावा ।**
**चहत बारि पर भीति उठावा ।**

( गिरिजा म्हणाली ) ऋषींचें वचन ऐकून भवानी मनोहर पण गूढ प्रत्युत्तर देती झाली. माझें हृद्गत बोलून दाखविण्यास मनाला फार संकोच वाटतो. माझा अल्लडपणा ऐकूनच आपणाला हंसें येईल. हें माझें मन हट्टास पेटलें आहे. तें दुसऱ्याचा उपदेश ऐकेनासेंच झालें आहे. तें पाण्यावर भिंत उभारूं पहात आहे.

**नारद कहा सत्य सोइ जाना ।**
**बिनु पंखन हम चहहिँ उडाना ।**
**देखहु मुनि अबिबेक हमारा ।**
**चाहिय सदा सिवहि भरतारा ।**

नारदांचे वचनावर मी विश्वास ठेविला आहे. पंखावांचून मीं उडण्याची हांव धरीत आहे. मुने! माझा अविचार तर पहा. मी शंकरच माझे भ्रतार असावेत अशी नेहमीं इच्छा करते.

**दो०—सुनत बचन बिहँसे रिषय गिरिसंभव तव देह । नारद कर उपदेस सुनि कहहु बसेउ को गेह ॥ ८९ ॥**

तिचें बोलणें ऐकून ऋषी हंसले [ व म्हणाले, ]- तुझा देह गिरीपासून जन्मलेला ! [ अर्थात् बापाप्रमाणें तूंहि जड हा भाव.] नारदाचा उपदेश ऐकून आजपर्यंत सांग कीं, कोणी तरी आपल्या घरीं नांदत आहे कां? [सर्व आपल्या घराला पारखे झाले हा भाव]

**चौ०—दच्छसुतन्ह उपदेसिन्हि जाई ।**
**तिन फिरि भवन न देखा आई ।**
**चित्रकेतु कर घर उन घाला ।**
**कनककसिपु कर पुनि अस हाला ।**

दक्षपुत्रांना[1] त्यानें उपदेश केला तर त्यांनीं परतून पुनः घराचें दर्शनदेखील घेतलें नाहीं. चित्रकेतूचेंहि[2] घर त्यानेंच पालथें घातलें. हिरण्यकश्यपूचीहि[3] फिरून तीच अवस्था.

---

१ दक्षानें सृष्टिविस्तारास्तव पुष्कळ पुत्र उत्पन्न केले आणि त्यांस आज्ञा केली कीं, सृष्टि उत्पन्न करा. त्याकरितां ते तपार्थ गेले तों नारदांचें त्यांना दर्शन घडलें. नारदाच्या उपदेशानें ते सर्व विरक्त झाले. ते फिरून घरी परत आले नाहींत; त्यामुळें दक्षानें नारदास शाप दिला कीं ' आपण निरंतर जगभर भ्रमण करीत रहाल.'

२ चित्रकेतु-राजास शेंकडों राण्या असूनहि पुत्रसंतान नव्हतें. बरेच दिवसांनीं धाकट्या पत्नीस मुलगा झाला. त्याचेवर राजाचें अत्यंत प्रेम असल्यामुळें मत्सरानें इतर राण्यांनीं त्या मुलास विष घालून मारलें. राजा शोकाकुल झाला व प्रेत घेऊन विलाप करीत असतां नारद तेथें गेले. त्यांनीं ज्ञानोपदेश केला व चित्रकेतु विरक्त होऊन तपोवनास गेला.

३. हिरण्यकश्यपूची स्त्री कयाधू गर्भवती असतांना नारदांनीं तीस ज्ञानोपदेश केला. तें ज्ञान गर्भानें ऐकलें. तोच भक्तश्रेष्ठ प्रल्हाद निपजला. त्याचा छल होत असतां भगवंतानें नृसिंहरूप धारण करून हिरण्यकश्यपूस ठार मारलें.

नारदासिष जे सुनहिँ नर नारी।
अवसि होहिँ ताजि भवन भिखारी।
मन कपटी तन सज्जन चीन्हा।
आपु सरिस सबही चह कीन्हा।

स्त्री अथवा पुरुष जो कोणी नारदांचा उपदेश मान्य करील तो अवश्य घरदार सोडून भिक्षांदेहीसच लागला पाहिजे. नारद ह्मणजे वेषानें मात्र आहेत साधु पण मनाचा मात्र अट्टल भोंदू. आम्ही त्यास ओळखून आहोंत. सर्वांस आपल्या सारखेच करण्याची त्याला फार हाव.

तोहि के बचन मानि बिस्वासा।
तुह्म चाहहु पति सहज उदासा।
निर्गुन निलज कुबेष कपाली।
अकुल अगेह दिगंबर व्याली।

त्याच्या वचनानें हुरळून, तूं नित्य उदास, निर्गुण, निःशंक, कुत्सित वेष धारण करणारा, नरकपाली, कुलहीन, वस्त्रहीन, व सर्प धारण करणारा अशा पतीची इच्छा करतेस होय?

कहहु कवन सुख अस बर पाये।
भल भूलिहु ठग के बौराये।
पंच कहे सिव सती बिबाही।
पुनि अवडेरि मरायेन्हि ताही।

सांग तर कीं, तुला असा पति मिळाल्यावर सुख तें काय होणार? त्या ठगाच्या भुलथापांना तूं फारच हुरळून गेलीस! लोकवार्ता ती हीच ना कीं शिवांनीं सतीशीं विवाह केला आणि फिरून तीस धुत्कारून लावली व तिचा जीव घेवविला.

**दो०—अब सुख सोवत सोचु नहिँ भीख माँगि भव खाहिँ। सहज एकाकिन्ह के भवन कबहुँ कि नारि खटाहिँ ॥९०॥**

आतां तर शंभु सुखानें झोंप घेतात, कारण कसल्याहि प्रकारची त्यांच्या मनाला दिक्कत उरली नाहीं. भिक्षा मागतात आणि निर्वाह करतात. मूळचाच जो असा फटिंग अशाला घरीं स्त्री कधीं तरी खपेल काय?

चौ०—अजहूँ मानहु कहा हमारा।
हम तुम्ह कहँ बर नीक बिचारा।
अति सुंदर सुचि सुखद सुसीला।
गावहिँ बेद जासु जसलीला।
दूषनरहित सकल-गुन-रासी।
श्रीपति पुर बैकुंठ निवासी।

अजून तरी आमचें सांगणें ऐक. आम्ही तुजसाठीं उत्तम वराची योजना करून ठेविली आहे. जो अति सुस्वरूप, पवित्र, सुखकर, सुशील, ज्याच्या यशाची लीला वेददेखील गात असतात, जो निर्दोष, सकल गुणांचें आगर, वैकुंठपुरनिवासी लक्ष्मीकांत—

अस बर तुम्हहि मिलाउब आनी।
सुनत बिहँसि कह बचन भवानी।

असा पति आम्ही आणून तुला भेटवितों. तें ऐकतांच भवानी हास्य करून म्हणालीः—

सत्य कहेहु गिरिभव तनु एहा।
हठ न छूट छूटइ बरु देहा।
कनकउ पुनि पषान तेँ होई।
जारेहु सहजु न परिहर सोई।

हा देह गिरिसंभूत आहे, हें आपण यथार्थ बोललांत. म्हणूनच तर प्राण गेला तरी बेहेत्तर, पण माझा निग्रह मात्र अढळ! सुवर्ण तरी पाषाणापासूनच उत्पन्न होतें, पण तें जाळलें तरी आपला अंगभूत गुण टाकीत नाहीं.

नारदबचन न मैं परिहरऊँ।
बसउ भवन उजरउ नहिँ डरउँ।
गुरु के बचन प्रतीति न जेही।
सपनेहु सुगम न सुख सिधि तेही।

नारदाची आज्ञा मी कधींहि मोडणार नाहीं. माझें घर नांदो अगर बेचिराख होवो, मी लेचीपेची नाहीं. गुरूच्या वाक्यावर ज्यांचा विश्वास नाहीं, त्यांस स्वप्नांतहि सुख अथवा सिद्धि प्राप्त होत नसतात.

**दो०—महादेव अवगुन भवन बिष्णु सकलगुनधाम। जेहि कर मनु रम जाहि सन तेहि तेही सन काम ॥९१॥**

महादेव सर्व दुर्गुणांचें आगर असले व विष्णु सर्व सद्गुणांचें भांडार असले, तरी ज्याचें मन ज्याच्याशीं रमेल त्यास काम त्याच्याशींच.

चौ०—जौ तुह्म मिलतेहु प्रथम मुनीसा।
सुनतिउँ सिख तुह्मारि धरि सीसा।
अब मैं जनम संभु हित हारा।
को गुन दूषन करइ बिचारा।

मुनींद्रहो ! मला पहिल्यांदाच जर आपलें दर्शन घडलें असतें, तर आपलाच उपदेश शिरसावंद्य करून मी त्याप्रमाणें वागलें असतें. एकवार शंकरास जन्म अर्पण होऊन चुकल्यावर आतां त्यांच्या गुण-दोषांचा विचार कोण करीत बसतो ?

जौं तुम्हरे हठ हृदय बिसेषी ।
रहि न जाइ बिनु किए बरेषी ।
तौ कौतुकिअन्ह आलस नाहीं ।
बर कन्या अनेक जग माहीं ।

जर मनोमानसीं आपला विशेष आग्रहच असेल व योग्य जोडपें जमविल्याखेरीज जर आपणाला चैनच पडत नसेल, तर चैनीखातर नसत्या उठाठेवी करणारांना आळस मुळींच नसतो आणि जगांतहि पुष्कळसे नवरे व पुष्कळशा नवऱ्यामुली आहेतच. ( तेव्हां कोठें तरी जुळवून मजा पाहा हा भाव.)

जनम कोटि लगि रगरि हमारी ।
बरउँ संभु न तु रहउँ कुआँरी ।
तजउँ न नारद कर उपदेसू ।
आपु कहहिं सतबार महेसू ।

कोट्यवधि जन्मांत देखील माझी हीच अट राहील कीं, मी वरीन तर शंकरालाच नाहींतर कुमारीच राहीन; परंतु नारदाचा उपदेश मात्र मी झुगारणार नाहीं, मग खुद्द शंकरदेखील शतवार कां सांगोतना.

मैं पा परउँ कहइ जगदंबा ।
तुम्ह गृह गवनहु भयउ बिलंबा ।
देखि प्रेम बोले मुनि ग्यानी ।
जय जय जगदंबिके भवानी ।

( अखेर ) जगदंबा म्हणाली—" मी आपल्या पायां पडते. आधींच विलंब झाला आहे, तेव्हां आपण आश्रम जवळ करावा. " ते ज्ञानवंत मुनी तिचें तें प्रेम पाहून म्हणाले—हे जगदंबे भवानी ! तुझा जयजयकार असो.

**दो०—तुम्ह माया भगवान सिव सकल-जगतपितुमातु । नाइ चरन सिर मुनि चले पुनि पुनि हरषत गातु ॥ ९२ ॥**

शिव हे भगवान् असून तूंच त्यांची माया आहेस; तुम्हीच सर्व जगाचे मातापिता आहांत. उमेच्या चरणीं मस्तक ठेवून पुनःपुनः रोमांचित होत्साते सप्तर्षि चालते झाले.

चौ०—जाइ मुनिन्ह हिमवंत पठाये ।
करि बिनती गिरि जहिं गृह ल्याये ।
बहुरि सप्तरिषि सिव पहिं जाई ।
कथा उमा कै सकल सुनाई ।

मुनींनीं जाऊन हिमालयास पाठविलें व त्यांनी विनंती करून गिरिजेस घरीं आणलें. फिरून सप्तर्षि शिवांकडे गेले व त्यांनीं उमेचा सर्व वृत्तांत त्यांस कळविला.

भये मगन सिव सुनत सनेहा ।
हरषि सप्तरिषि गवने गेहा ।
मनु थिरु करि तब संभु सुजाना ।
लगे करन रघुनायकध्याना ।

तिचें प्रेम ऐकून शिव तल्लीन झाले. सप्तर्षि आनंदानें स्वाश्रमीं परत गेले. फिरून मन स्थिर करून सर्वज्ञ शिव श्रीरामचंद्रांचें ध्यान करूं लागले.

तारकु असुर भयउ तेहि काला ।
भुजप्रताप बल तेज बिसाला ।
तेइ सब लोक लोकपति जीते ।
भये देव सुख संपति रीते ।

त्याच सुमारास तारकासुर उत्पन्न झाला होता. त्याच्या बाहूंचा प्रताप, बल, आणि तेज प्रचंड होतें. त्यानें सर्व लोक व लोकपाल पादाक्रांत केल्यामुळें देव दुःखी आणि दरिद्री झाले होते.

अजर अमर सो जीति न जाई ।
हारे सुर करि बिबिध लराई ।
तब बिरंचि सन जाइ पुकारे ।
देखे बिधि सब देव दुखारे ।

तो जरा व मरणरहित असून अजिंक्य होता. सर्व देव लढाई करकरून दमले; तेव्हां त्यांनीं ब्रह्मदेवाकडे आपलें गाऱ्हाणें नेलें. ब्रह्मदेवानें सर्व देव दुःखी आहेत असें पाहिलें.

**दो०—सब सन कहा बुझाइ बिधि दनुज-निधन तब होइ । संभु-सुक्र-संभूत सुत एहि जीतइ रन सोइ ॥ ९३ ॥**

ब्रह्मदेवानें सर्वांस समजावून सांगितलें कीं, "जेव्हां शंकराच्या तेजांशानें पुत्र उत्पन्न होईल तेव्हांच त्याचा नाश होईल व तोच त्यास रणांत जिंकूं शकेल.

चौ०—मोर कहा सुनि करहु उपाई ।
होइहि ईस्वर करिहि सहाई ।
सती जो तजी दच्छमख देहा ।
जनमी जाइ हिमाचलगेहा ।

मी सांगतों त्याप्रमाणें युक्ति करा.परमेश्वर करील तर डाव सीधा पडेल. जिनें दक्षयज्ञांत देह विसर्जन केला, तीच सती हिमालयाच्या गृहीं जन्मास आली आहे.

तेइ तपु कीन्ह संभु पति लागी ।
सिव समाधि बैठे सब त्यागी ।
जदपि अहइ असमंजस भारी ।
तदपि बात एक सुनहु हमारी ।

तिनें शंभु पति मिळावा ह्मणून तप केलें आहे. पण शिवांनीं सर्वसंगपरित्याग करून समाधि घेतली आहे. अतिशय कठीण तर खरीच पण माझी एक गोष्ट ऐका.

पठवहु काम जाइ सिव पाहीँ ।
करइ छोभ संकर मन माहीँ ।
तब हम जाइ सिवहिं सिर नाई ।
करवाउब बिवाहु बरिआई ।

तुह्मी जाऊन मदनास शिवाकडे पाठवा. त्यानें जाऊन शंकरांचे मनाचा क्षोभ करावा. नंतर आह्मी जाऊन शिवास नमस्कार करून त्यांना आग्रहानें विवाह करण्यास प्रवृत्त करूं.

एहि बिधि भलेहि देवहित होई ।
मत अतिनीक कहइ सब कोई ।
अस्तुति सुरन कीन्हि अतिहेतू ।
प्रगटेउ विषमबान झखकेतू ।

या रीतीनें देवांचें चांगलेंच हित होईल." सर्वांनाच ती मसलत पूर्णपणें पटली. देवांनीं आपल्या कार्यास्तव कामदेवाची उत्कट स्तुति केली असतां विषमबाणधारी मीनध्वज कामदेव प्रगट झाला.

दो०—सुरन्ह कही निज बिपति सब सुनि मन कीन्ह बिचार । संभु बिरोध न कुसल मोहि बिहँसि कहेउ अस मार ॥ ८४ ॥

तेव्हां देवांनीं त्यास आपलें संकट निवेदन केलें. तें ऐकून मदनानें मनांत विचार केला आणि तो हंसून ह्मणाला—शंकरांशीं विरोध केल्यानें माझें कल्याण व्हावयाचें नाहीं.

चौ०—तदपि करब मैँ काज तुह्मारा ।
स्रुति कह परम धरम उपकारा ।
परहित लागि तजइ जो देही ।
संतत संत प्रसंसहिँ तेही ।

तरीहि मी तुमचें कार्य करीन. श्रुतींत परापकार हा सर्वांत श्रेष्ठ धर्म सांगितला आहे. जो परहितासाठीं आपला देह बळी देतो, त्याची संतदेखील निरंतर प्रशंसाच करतात.

अस कहि चलेउ सबहिँ सिर नाई ।
सुमनधनुष कर सहित सहाई
चलत मार अस हृदय बिचारा ।
सिवबिरोध ध्रुव मरन हमारा ।

असें सांगून तो सर्वांस वंदन करून हातांत पुष्पधनुष्य सज्ज करून सैन्यासहवर्तमान निघाला. मार्गानें जात असतां मदनानें हृदयांत विचार केला कीं, शिवाशीं शत्रुत्व केल्यानें माझें मरण खास ओढवणार.

तब आपन प्रभाउ बिस्तारा ।
निजबस कीन्ह सकल संसारा ।
कोपेउ जबहिँ बारि-चर-केतू ।
छन महँ मिटे सकल स्रुतिसेतू ।

नंतर त्यानें आपल्या शक्तीचा आविष्कार केला, आणि सर्व विश्व आपल्या अंकित केलें. मीनकेतु मदन कोपला असतां क्षणार्धांत सर्व वेदमर्यादा लोपली.

ब्रह्मचर्ज ब्रत संजम नाना ।
धीरज धरम ज्ञान बिज्ञाना ।
सदाचार जप जोग बिरागा ।
सभय बिबेक कटक सब भागा ।

ब्रह्मचर्यव्रत, नानाप्रकारचे संयम, धृति, धर्म, ज्ञान, विज्ञान, सदाचार, जप, योग, वैराग्य इत्यादि सर्व विवेकसैन्य भयभीत होऊन पलायन करूं लागलें.

छंद—भागेउ बिबेक सहाइ सहित सो सुभट संजुग महि मुरे । सदग्रंथ पर्वत कंदरन्हि महुँ जाइ तेहि अवसर दुरे ॥ होनिहार का करतार को रखवार जग खरभरु परा । दुइ माथ केहि रतिनाथ जेहि कहुँ कोपि कर धनुसर धरा ॥ ३ ॥

विवेकानें सैन्यासह पळ काढला. त्याचे झुंजार योद्धे समरभूमीवर पतन पावले. त्या वेळीं सद्ग्रंथ गिरिकंदरीं जाऊन लपले. आतां पुढें होणार तरी काय ? आणि कर्तबगार असा कोणता पुढारी आतां

आमचें रक्षण करणार ? हाच सर्व जगभर खळबळाट माजला कीं असा कोण आगळा [ दोन मस्तकांचा ] जगांत उत्पन्न झाला आहे कीं, ज्याच्यासाठीं मदनानें क्रुद्ध होऊन हातीं धनुष्यबाण घेतले आहेत ?

**दो०–जे सजीव जग चर अचर नारि पुरुष अस नाम। ते निज निज मरजाद तजि भये सकल बस काम ॥ ९५ ॥**

स्त्रीपुरुषनाममात्र जेवढे म्हणून जीवधारी होते, तेवढे सर्वच आपापली मर्यादा सोडून कामांकित झाले.

**चौ०–सब के हृदय मदन अभिलाखा।**
**लता निहारि नवहिँ तरु साखा।**
**नदी उमागि अंबुधि कहुँ धाई।**
**संगम करहिँ तलाव तलाई।**

सर्वांच्याच हृदयांत कामवासना उफाणल्या. लतांना पाहून वृक्ष आपल्या शाखा वांकवूं लागले. नद्या क्षुब्ध होऊन सागराकडे धांव घेऊं लागल्या. तलाव व तळीं संगम करूं लागलीं.

**जहँ असि दसा जडन की बरनी।**
**को कहि सकइ सचेतन्ह करनी।**
**पसु पच्छी नभजलथलचारी।**
**भये कामबस समय बिसारी।**

जैथें जडजीवांची ही दुर्दशा तेथें सचेतनांची दशा कोण वर्णन करूं शकेल ? आकाशांत पाण्यांत व जमिनीवर संचार करणारे पशु, पक्षी, काळवेळ विसरून कामक्रीडेवरच फिदा झाले.

**मदनअंध ब्याकुल सब लोका।**
**निसि दिन नहिँ अवलोकहिँ कोका।**
**देव दनुज नर किन्नर ब्याला।**
**प्रेत पिसाच भूत बेताला।**
**इन्ह की दसा न कहेउँ बखानी।**
**सदा काम के चेरे जानी।**

त्रैलोक्य मदांध आणि व्याकुल झालें. त्यांना दिवस–रात्र हा भेद न उरून ते कोकशास्त्र पाहूं लागले. देव, दैत्य, नर, किन्नर, सर्प, प्रेत, पिशाच, भूत, वेताळ हे तर सदैव कामाचे गुलामच बनले. त्यांच्या दशेचा मी उगाच पाल्हाळ लावीत नाहीं.

**सिद्ध बिरक्त महा मुनि जोगी।**
**तेपि कामबस भये बियोगी।**

सिद्ध, विरक्त, महामुनी व योगी हेदेखील काम किंकर होत्साते योगभ्रष्ट झाले.

**छंद–भये काम बस जोगीस तापस पामरन की को कहै। देखहिँ चराचर नारिमय जे ब्रह्ममय देखत रहै॥ अबला बिलोकहिँ पुरुषमय जग पुरुष सब अबलामयम्। दुइ दंड भरि ब्रम्हांड भीतर काम कृत कौतुक अयम्॥ ४॥**

योगींद्र, तपस्वी हेहि कामवश झाले. [ मग ] इतर पामरांची कथा काय ? जे चराचर विश्व ब्रह्ममय पहात असत, तेदेखील तें नारीमय पाहूं लागले ! स्त्रिया जग पुरुषमय पाहूं लागल्या व पुरुष सर्व स्त्रीमय पाहूं लागले ! हा कामकृत चमत्कार दोन घटकांपर्यंत सर्व ब्रह्मांड व्यापून राहिला.

**सो०–धरा न काहू धीर सब के मन मनसिज हरे। जे राखे रघुबीर ते उबरे तेहि काल महँ॥ १४॥**

मदनानें सर्वांचींच मनें काबीज केलीं. सर्वांचाच मनोनिग्रह वेशीवर टांगला गेला. रघुवीरांनींच ज्यांना वांचविलें तेच तेवढे त्या प्रसंगीं वांचले.

**चौ०–उभय घरी अस कौतुक भयऊ।**
**जब लगि काम संभु पहँ गयऊ।**

मदन शंकराजवळ पोहोंचेपर्यंत दोन घटका ही चेष्टा चालू राहिली.

**सिवहिं बिलोकि ससंकेउ मारू।**
**भयउ जथाथिति सब संसारू।**
**भये तुरत जग जीव सुखारे।**
**जिमि मद उतरि गये मतवारे।**

महादेवाला अवलोकन करतांच मदन चपापला. सर्व जग यथास्थित झालें. मदांध जसे मद उतरतांच शांत होतात तसे जगांतील सर्व लोक ताबडतोब स्थिरस्थावर झाले.

**रुद्रहिं देखि मदन भय माना।**
**दुराधर्ष दुर्गम भगवाना।**
**फिरत लाज कछु कहि नहिँ जाई।**
**मरन ठानि मन रचेसि उपाई।**

दुराधर्ष आणि अजिंक्य अशा भगवान् रुद्राकडे पाहतांच मदनाला धडकी भरली. त्याला परत फिर-

त्याची इतकी लाज वाटली कीं सांगतां पुरवत नाहीं. त्यानें मरण्याचा निश्चय करून मनांत युक्ति योजिली.

प्रगटेसि तुरत रुचिर रितुराजा ।
कुसुमित नव तरु राज बिराजा ।
बन उपबन बापिका तडागा ।
परम सुभग सब दिसाबिभागा ।
जहँ तहँ जनु उमगत अनुरागा ।
देखि मुएहु मन मनसिज जागा ।

तत्काल सुंदर वसंतऋतु प्रकट झाला. नूतन सुपुष्पित वृक्षराजी शोभूं लागली. वनें, उपवनें, वापी, तडाग ह्यांनीं सर्वच बाजूंचा प्रदेश अत्यंत रमणीय वाटूं लागला. जणूंकाय चोहोंकडून प्रेमास भरतेंच उफाळलें आहेसें वाटलें. तें पाहून मरणोन्मुखांचेंहि मनांत काम उद्दीपित व्हावा असें भासे.

छंद—जागइ मनोभव मुएहु मन बन सुभगता न परइ कही । सीतल सुगंध सुमंद मारुत मदन अनल सखा सही ।। बिकसे सरन्हि बहु कंज गुंजत पुंज मंजुल मधुकरा । कलहंस पिक सुक सरस रव करि गान नाचहिँ अपछरा ।। ५ ।।

मुमुर्षूंच्या मनांत देखील काम जागृत झाला. वनश्रीचें वर्णन करणें तर दुरापास्तच आहे. मंद, सुगंधित आणि शीतल अशा वायूनें आपलें कामाग्नीशीं असलेलें सख्य पुरतेंच प्रत्ययास आणून दिलें. [ स्वयमेवहि वातोऽग्नेः सारथ्यमनुकुर्वते—कालिदास ] सरोवरांत अनेक कमलें विकसित झालीं. मधुकरांचे समुदाय मंजुळ गुंजारव करूं लागले. राजहंस, मैना, पोपट इत्यादिकांनीं मधुर आलाप सुरू केले. अप्सरा गायन व नृत्य करूं लागल्या.

दो०—सकल कला करि कोटि बिधि हारेउ सेन समेत । चली न अचल समाधि सिव कोपेउ हृदय निकेत ।। ९६ ।।

कोट्यवधि प्रकारांनीं आपलें सर्व कलाकौशल्य प्रकट करूनहि कामदेव सैन्यासकट पराभूत झाला. शंकरांची अचल समाधि चळली नाहीं. तेव्हां मदन चांगलाच फणफणला.

चौ०—देखि रसाल बिटपबरसाखा ।
तेहि पर चढेउ मदन मन माखा ।
सुमनचाप निज सर संधाने ।
अतिरिसि ताकि स्रवन लगि ताने ।
छाडेउ बिषम बान उर लागे ।
छूटि समाधि संभु तब जागे ।

तो मदन आवेशानें एका विशाल आम्रवृक्षाच्या शाखेवर चढला. पुष्पधनुष्यावर पंचबाणांचें अनुसंधान करून तें धनुष्य आकर्ण ओढून आणि अत्यंत क्रोधानें अनुलक्षून त्यानें ते बाण सोडले. ते हृदयास लागतांच शंभु समाधीचा भंग होऊन जागृत झाले.

भयउ ईस मन छोभ बिसेखी ।
नयन उघारि सकल दिसि देखी ।
सौरभपल्लव मदन बिलोका ।
भयउ कोप कंपेउ त्रयलोका ।

प्रभूंचें मन अत्यंत प्रक्षुब्ध झालें. नेत्र उघडून त्यांनीं सर्वत्र दृष्टि फेकली. आम्रपल्लवांत असलेल्या मदनाला पाहतांच ते क्रोधानें संतप्त झाले. तेव्हां त्रैलोक्य डळमळूं लागलें.

तब सिव तीसर नयन उघारा ।
चितवत काम भयउ जरि छारा ।

तेव्हां शिवांनीं आपला तृतीय नेत्र उघडून त्याजकडे पाहतांक्षणींच मदन जळून खाक झाला.

हाहाकार भयउ जग भारी ।
डरपे सुर भये असुर सुखारी ।
समुझि कामसुख सोचहिं भोगी ।
भये अकंटक साधक जोगी ।

जगांत फार हाहाःकार उडाला. देव भयभीत झाले, दैत्यांना आनंद झाला. विषयीजनांस कामसुखाची आठवण होऊन ते शोक करूं लागले, पण साधक व योगी निष्कंटक झाले.

छंद—जोगी अकंटक भये पतिगति सुनति रति मुरछित भई । रोदति बदति बहु भाँति करुना करति संकर पहिँ गई ।। अतिप्रेम करि बिनती बिबिध बिधि जोरि कर सनमुख रही । प्रभु आसुतोष कृपाल सिव अबला निरखि बोले सही ।। ६ ।।

योगी निर्भय झाले. रति पतीचें निधन ऐकून

मूर्च्छित झाली. शोक व आक्रोश करीत व अनेक प्रकारें करुणा भाकीत ती शंकराकडे गेली. तेव्हां सन्मुख होऊन व हात जोडून तिनें पुष्कळ प्रकारें अत्यंत प्रेमपूर्वक विनंति केली. ती अबला आहे, असें पाहून शीघ्रसंतोषी दयाळु भगवान् शिव ह्मणालेः—

**दो०—अब तें रति तव नाथ कर होइहि नाम अनंग । बिनु बपु ब्यापिहि सबहि पुनि सुनु निज मिलन प्रसंग ॥ ९७ ॥**

" हे रति ! अतःपर तुझ्या पतीचें नांव ' अनंग ' होऊन, देहाशिवायच तो सर्व जग व्यापील. पुनश्च तुझी व त्याची गांठ पडण्याचा प्रसंग ऐक.

**चौ०—जब जदुबंस कृष्णअवतारा ।**
**होइहि हरन महा महिभारा ।**
**कृष्णतनय होइहि पति तोरा ।**
**बचन अन्यथा होई न मोरा ।**

जेव्हां यदुवंशांत कृष्ण अवतार घेऊन पृथ्वीचा महान् भार हरण करील, तेव्हां तुझा पति कृष्णपुत्र होईल. हें माझें वाक्य अन्यथा होणार नाहीं. "

**रति गवनी सुनि संकर बानी ।**
**कथा अपर अब कहउँ बखानी ।**

शंकरांची ती वाणी ऐकून रति चालती झाली. आतां निराळाच कथाविस्तार पाहूं.

**देवन समाचार सब पाये ।**
**ब्रह्मादिक बैकुंठ सिधाये ।**
**सब सुर बिष्णु बिरंचि समेता ।**
**गये जहाँ सिव कृपानिकेता ।**
**पृथक पृथक तिन्ह कीन्ह प्रसंसा ।**
**भये प्रसन्न चंद्रअवतंसा ।**

देवांनीं जेव्हां मदननिधनाचें वृत्त ऐकिलें तेव्हां ब्रह्मादिक देव वैकुंठास गेले व ब्रह्मा—विष्णु यांना घेऊन कृपानिधान शंकर जेथें होते तेथें ते सर्व आले. त्या प्रत्येकांनीं निरनिराळ्या प्रकारें स्तुति केली असतां चंद्रमौली प्रसन्न झाले.

**बोले कृपासिंधु बृषकेतू ।**
**कहहु अमर आये केहि हेतू ।**

कृपासागर वृषकेतू ह्मणालेः—देवहो ! आपण कोणत्या उद्देशानें आला आहां तें कथन करा.

**कह बिधि तुम्ह प्रभु अंतरजामी ।**
**तदपि भगति बस बिनवउँ स्वामी ।**

हें ऐकून ब्रह्मदेव म्हणालेः—" हे प्रभो ! आपण सर्वांतर्यामी आहांत; तथापि, भक्तीच्या आधीन असतां, म्हणून मी प्रभूस एक विनंति करीत आहे.

**दो०—सकल सुरन्ह के हृदय अस संकर परम उछाहु । निज नयनन्हि देखा चहहिं नाथ तुम्हार बिबाहु ॥ ९८ ॥**

प्रभो ! आपल्या डोळ्यांनीं तुमचा विवाह पहावा अशी सर्व देवांच्या मनांत, हे नाथ ! उत्कट लालसा झाली आहे.

**चौ०—यह उत्सव देखिय भरि लोचन ।**
**सोइ कछु करहु मदन-मद-मोचन ।**
**काम जारि रति कहँ बर दीन्हा ।**
**कृपासिंधु यह अति भल कीन्हा ।**

हे मदनगर्वहरणा ! जेणेंकरून हा आनंदोत्सव डोळे भरून देवांना पाहतां येईल असेंच आपण केलें पाहिजे. कामास दग्ध करून रतीस वर दिला, हें दयासागरांनीं फारच उत्कृष्ट केलें.

**सासति करि पुनि करहिं पसाऊ ।**
**नाथ प्रभुन्ह कर सहज सुभाऊ ।**
**पारबती तप कीन्ह अपारा ।**
**करहु तासु अब अंगीकारा ।**

शासन करून पुनः अनुग्रह करणें हा, हे प्रभो! समर्थांचा सहज—स्वभाव होय. पार्वतीनें अपार तप केलें आहे, तिचा आपण आतां अंगीकार करावा."

**सुनि बिधि बिनय समुझि प्रभु बानी ।**
**ऐसइ होउ कहा सुख मानी ।**
**तब देवन दुंदुभी बजाई ।**
**बरषि सुमन जय जय सुरसाईं ।**

ही ब्रह्मदेवाची विज्ञप्ति ऐकून व प्रभुरामचंद्रांची आज्ञा मनांत आणून शंकर आनंदानें ' तथास्तु ' म्हणाले. तेव्हां देवांनीं दुंदुभी वाजविल्या आणि पुष्पवृष्टिपूर्वक सुरस्वामींचा जयजयकार केला.

**अवसर जानि सप्तरिषि आये ।**
**तुरतहि बिधि गिरिभवन पठाये ।**

इतक्यांत अवसर जाणून सप्तर्षि आले. ब्रह्मदेवानें त्यांना मागल्याच पायीं हिमालयाकडे पाठविलें.

प्रथम गये जहँ रही भवानी ।
बोले मधुर वचन छलसानी ।

प्रथम ते भवानीकडे गेले आणि तिशीं मधुर पण छद्मी भाषण करूं लागले:—

दो०—कहा हमार न सुनेहु तब नारद के उपदेस । अब भा झूठ तुम्हार पन जारेउ काम महेस ॥ ९९ ॥

तेव्हां आमचें ह्मणणें मानलें नाहींस आणि नारदाचा उपदेश मनांत धरून बसलीस. आतां मात्र तुझी प्रतिज्ञा खोटी ठरली. ( कारण ) महेशांनीं कामदेवासच जाळून टाकलें.

चौ०—सुनि बोली मुसुकाइ भवानी ।
उचित कहेहु मुनिबर बिज्ञानी ।

तें ऐकून भवानी हंसली व म्हणाली:—" हे ज्ञानवंत मुनिश्रेष्ठहो ! आपण यथायोग्य भाषण केलेंत.

तुम्हरे जान काम अब जारा ।
अब लगि संभु रहे सविकारा ।
हमरे जान सदा सिव जोगी ।
अज अनवद्य अकाम अभोगी ।

तुमच्या मतें त्यांनीं आतां काम जाळला. मग आजपर्यंत शंभु सविकारच होते तर ! माझ्या दृष्टीनें तर शिव सर्वदा योगी असून ते स्वयंभू, निर्दोष, निष्काम आणि भोगरहित आहेत.

जौं मैं सिव सेयउँ अस जानी ।
प्रीति समेत करम मन बानी ।
तौ हमार पन सुनहु मुनीसा ।
करिहहिं सत्य कृपानिधि ईसा ।

जर मी अशा भावनेनें, मनानें, कर्मानें आणि वाणीनें प्रेमपूरःसर शंकराची सेवा केली असेल तर हे मुनीश्वर हो ! ऐकून ठेवा कीं, तो दयासागर प्रभु माझी प्रतिज्ञा सत्य करीलच करील.

तुम्ह जो कहेहु हर जारेउ मारा ।
सो अति बड अबिबेक तुम्हारा ।

शंकरांनीं काम भस्म केला, असें जें आपण ह्मणाला तें आपलें अत्यंत थोर अज्ञान होय.

तात अनल कर सहज सुभाऊ ।
हिम तेहि निकट जाइ नहिं काऊ ।
गये समीप सो अवसि नसाई ।
असि मनमथ महेस कै नाई ।

महाराज ! अग्नीचा हा नैसर्गिकच गुण आहे कीं, शैत्य त्याच्या सन्निध जाऊं शकत नाहीं व गेलेंच तर तें अवश्य, नष्ट होतें. आणि मदनमहेश्वरांची गोष्ट हें त्याचेंच " गमक समजावयाचें. "

दो०—हिय हरषे मुनि बचन सुनि देखि प्रीति बिस्वास । चले भवानी नाइ सिर गये हिमाचल पास ॥ १०० ॥

तिचें भाषण ऐकून व तिची प्रीति आणि निर्धार पाहून मुनींच्या हृदयांत हर्ष होऊन, ते भवानीस वंदन करून निघाले व हिमाचलाकडे गेले.

चौ०—सब प्रसंग गिरिपतिहिं सुनावा ।
मदन दहन सुनि अति दुख पावा ।
बहुरि कहेउ रति कर बरदाना ।
सुनि हिमवंत बहुत सुख माना ।

त्यांनीं गिरिपतीस सर्व वृत्तांत निवेदन केला. मदन-दहन श्रवण करून हिमराज फार दुःखित झाला. परंतु पुनश्च रतीला मिळालेला वर ऐकतांच हिमालयाला अत्यंत आनंद झाला.

हृदय बिचारि संभु प्रभुताई ।
सादर मुनिवर लिये बोलाई ।
सुदिन सुनखत सुघरी सोचाई ।
बेगि बेदबिधि लगन धराई ।

शंकरांच्या प्रभुत्वाचा विचार करून त्यानें इतर मुनीश्वरांना आदरपूर्वक बोलावून घेतलें. शुभदिन, शुभनक्षत्र आणि शुभघटि पाहून तावडतोब त्यानें वेदविधिपूर्वक लग्न-निश्चय केला.

पत्री सप्तरिषिन्ह सोइ दीन्ही ।
गहि पद बिनय हिमाचल कीन्ही ।

तीच लग्नपत्रिका सप्तर्षींस दिली व त्यांचे पाय धरून हिमालयानें विनंती केली.

जाइ बिधिहि तिन्ह दीन्हि सो पाती ।
बाँचत प्रीति न हृदय समाती ।

त्याप्रमाणें त्यांनीं जाऊन ब्रह्मदेवास ती पत्रिका दिली. ती वाचीत असतां त्याचा आनंद हृदयांत मावेना.

लगन बाँचि अज सबहि सुनाई ।
हरषे मुनि सब सुरसमुदाई ।
सुमनबृष्टि नभ बाजन बाजे ।
मंगल कलस दसहुँ दिसि साजे ।

ब्रह्मदेवानें लग्नपत्रिका वाचून ती सर्वांस निवेदन केली. सर्व देवसमुदाय हर्षित झाला. आकाशांत पुष्पवृष्टि होऊन वाद्यें वाजूं लागलीं. दशदिशांस मंगलकलश सजविण्यांत आले.

**दो०—लगे सवाँरन सकल सुर बाहन बिबिध बिमान। होहिँ सगुन मंगल सुखद करहिँ अपछरा गान॥१०१॥**

सर्व देव नानाप्रकारचीं वाहनें व विमानें सज्ज करूं लागले, शुभकारक मंगल शकून होऊं लागले व अप्सरा आलापदारी छेडूं लागल्या.

**चौ०—सिवहिँ संभुगन करहिँ सिँगारा।**
**जटामुकुट अहिमौर सँवारा।**
**कुंडल कंकन पहिरे ब्याला।**
**तन बिभूति पट केहरिछाला।**
**ससि ललाट सुंदर सिर गंगा।**
**नयन तीनि उपबीत भुजंगा।**
**गरल कंठ उर नर-सिर-माला।**
**असिव बेष सिवधाम कृपाला।**
**कर त्रिसूल अरु डमरु बिराजा।**
**चले बसह चढि बाजहिँ बाजा।**

शंभुगणांनीं शंकरांचा शृंगार केला. [ तो असा ] मस्तकीं जटांचा मुकुट बनविला. त्यावर सर्पांचा मोर तयार केला. सर्पांचींच कुंडलें व कंकणें घातलीं. शरीरास भस्मविलेपन, सिंहचर्माचें वस्त्रपरिधान, ललाटभागीं चंद्र, मस्तकीं सुंदर गंगाप्रवाह, तीन नेत्र, भुजंगाचें यज्ञोपवीत, कंठाचे ठायीं गरल-धारण, वक्षःस्थलावर नरमुण्डमालेची आभा, हातांत त्रिशूल व डमरू, अशा प्रकारें अभद्र वेषानें विराजित झालेले, ते कल्याण कृपाधाम शिव नंदिकेश्वरावर आरूढ होऊन वाद्यांचे गजरांत चालूं लागले.

**देखि सिवहिँ सुरत्रिय मुसुकाहीँ।**
**बरलायक दुलहिनि जग नाहीँ।**

शिवास पाहून देवस्त्रिया हंसूं लागल्या व म्हणाल्या कीं, अशा वराला लायक अशी वधू सर्व जगांत देखील मिळावयाची नाहीं.

**बिष्णु बिरंचि आदि सुरब्राता**
**चढि चढि बाहन चले बराता।**
**सुरसमाज सब भाँति अनूपा।**
**नहिँ बरात दूलहअनुरूपा।**

विष्णु, ब्रह्मदेव आदिकरून देवसमुदाय वाहनारूढ झाला, व वरात चालूं लागली. देवसमाज सर्वप्रकारें अप्रातिम होता परंतु [ कांहीं म्हणत कीं, ] वरात मात्र वराच्या थाटाची नव्हती.

**दो०—बिष्णु कहा अस बिहँसि तब बोलि सकल दिसिराज। बिलग बिलग होइ चलहु सब निजनिज सहित समाज॥१०२॥**

तेव्हां विष्णूनें सर्व दिक्पालांस बोलावून विनोदानें सांगितलें कीं, आपल्या समाजासहित सर्व पृथक् पृथक् होऊन चालूं लागा. [ कारण ]

**चौ०—बर अनुहारि बरात न भाई।**
**हँसी करइहउ परपुर जाई।**

बाबांनो ! वराला अनुरूप अशी ही वरात नाहीं. दुसऱ्याच्या गांवीं जाऊन आपलें हंसें मात्र करून घ्याल.

**बिष्णु बचन सुनि सुर मुसुकाने।**
**निज निज सेन सहित बिलगाने।**

विष्णूचें वचन ऐकून देवहि हंसले व ते आपल्या समाजासहित वेगवेगळे झाले.

**मनहीँ मन महेस मुसुकाहीँ।**
**हरि के ब्यंग बचन नहिँ जाहिँ।**

भोलानाथ मनांतल्या मनांत हंसले व ते म्हणाले कीं श्रीहरीचा विनोद सुटावयाचा नाहीं.

**अतिप्रिय बचन सुनत प्रिय केरे।**
**भृंगिहि प्रेरि सकल गन टेरे।**
**सिव अनुसासन सुनि सब आये।**
**प्रभुपदजलज सीस तिन्ह नाये।**

आपल्या प्रियकर श्रीपतीचें तें मजेदार भाषण ऐकतांच शंकरांनीं भृंगीस पाठवून सर्व गणांना बोलावून घेतलें. शिवाज्ञा ऐकतांच सर्वजण आले व त्यांनीं प्रभुपदकमलीं नमस्कार केला.

**नाना बाहन नाना बेखा।**
**बिहँसे सिव समाज निज देखा।**

नानाप्रकाचीं वाहनें व तऱ्हतऱ्हांनीं नटलेला आपला समाज पाहून खुद्द शंकरांनाच हंसें कोसळलें.

**कोउ मुखहीन बिपुलमुख काहू।**
**बिनु पद कर कोउ बहु पद बाहू।**

बिपुलनयन कोउ नयनबिहीना ।
रिष्ट पुष्ट कोउ अति तनखीना ।

कोणी मुखहीन तर कोणी बहुमुख, कोणी पद-करहीन तर कोणी बहुबाहुपाद, कोणी बहुनेत्र तर कोणी अंध, कोणी धष्टपुष्ट तर कोणी अस्थिपंजर,

**छंद—तनखीन कोउ अतिपीन पावन कोउ अपावन गति धरे । भूषन कराल कपाल कर सब सद्य सोनित तन भरे ॥ खर-स्वान-सुअर-सृगाल-मुख गन बेष अगनित को गनै । बहु जिनि समेत पिसाच जोगि जमात बरनत नहिं बनै॥७॥**

कोणी कृशगात्र तर कोणी अत्यंत पुष्ट, कोणी पवित्र तर कोणी अपवित्र, कोणी शरीरावर अलंकार धारण केलेले तर कोणी भयानक दिसणारे, कोणी हातांत नरकपाल घेतलेले, तर कोणी सर्वांगास ताजें रक्त फासलेलें, कोणी श्वानमुख, कोणी सूकरमुख, कोणी जंबुकमुख, तर कोणी गर्दभमुख अशा त्या असंख्य वेषान्वित गणांची कोण गणना करूं शकेल ? त्यांत अनेक जातींचे प्रेत, पिशाच, योगी, यांचे समुदायहि होते. ते सर्व सांगण्याची सोय नाहीं.

**सो०—नाचहिँ गावहिँ गीत परम तरंगी भूत सब । देखत अति बिपरीत बोलहिँ बचन बिचित्र बिधि ॥ १५ ॥**

कोणी नाचत, कोणी गाणें गात, आणि कोणी विचित्र भाषा बोलत. अवघाच भूतगण पराकाष्ठेचा मतवाला बनला होता. एकंदरींत तो सबंध देखावाच अजब दिसला.

चौ०—जस दूलह तसि बनी बराता ।
कौतुक बिबिध होहिं मग जाता ।
इहाँ हिमाचल रचेउ बिताना ।
अति बिचित्र नहिँ जाइ बखाना ।

जसा वर तशीच ती वरातहि थाटली. मार्गानें जात असतांना अनेक गमती उडत. इकडे हिमालयानें अत्यंत चित्रविचित्र मंडप शृंगारला. त्याचें वर्णन करणेंच शक्य नाहीं.

सैल सकल जहँ लगि जग माहीँ ।
लघु बिसाल नहिँ बरनि सिराहीँ ।
बन सागर सब नदीं तलावा ।
हिम गिरि सब कहँ नेवति पठावा ।

लहानमोठे म्हणून जेवढे जगांत आहेत कीं, ज्यांचें वर्णन कधींहि संपणार नाहीं, असे पर्वत, अरण्यें, नद्या, समुद्र, तळीं इत्यादि सर्वांनाच हिमालयानें आमंत्रणें पाठविलीं.

काम रूप सुंदर तनु धारी ।
सहित समाज सोह बर नारी ।
आए सकल हिमाचल गेहा ।
गावहिँ मंगल सहित सनेहा ।

स्वेच्छेनुरूप रूप पालटणारे ( किंवा केवळ मदनाच्या पुतळ्याप्रमाणें सुंदर शरीरें धारण करणारे ) सर्वजण सस्त्रीक आणि सपरिवार हिमालयाच्या घरीं प्रेमानें मंगल–गाणीं म्हणत म्हणत गेले.

प्रथमहिँ गिरि बहु गृह सवँराये ।
जथाजोग जहँ तहँ सब छाये ।
पुर सोभा अवलोकि सुहाई ।
लागइ लघु बिरंचिनिपुनाई ।

आधींच हिमालयानें पुष्कळशीं घरें थाटून ठेवलीं होतीं, आणि त्यांत सर्वच व्यवस्था यथायोग्य केली होती. हिमगिरीच्या नगराची सर्वोत्कृष्ट शोभा पाहून ब्रह्मदेवाचें कौशल्य त्यापुढें तुच्छ भासूं लागलें.

**छंद—लघु लागि बिधि की निपुनता अवलोकी पुरसोभा सही । बन बाग कूप तडाग सरिता सुभग सब सक को कही॥ मंगल बिपुल तोरन पताका केतु गृह गृह सोहहीँ । बनिता पुरुषसुंदर चतुर छबि देखि मुनि मन मोहहीँ ॥ ८ ॥**

नगरशोभा पाहून त्यापुढें विधीचें नैपुण्य खरो-खरच फिकें पडूं लागलें. वनें, उपवनें, विहिरी, तळीं, नद्या ह्या इतक्या सुशोभित केल्या होत्या कीं, त्यांचें वर्णन करण्यास कोणीहि समर्थ होणार नाहीं. घरोघरीं तोरणें, पताका, ध्वज इत्यादि मंगलचिन्हें विपुल शोभत होतीं. सुंदर व चतुर स्त्रीपुरुषांचें सौंदर्य पाहून तर मुनींच्याहि मनास मोह होत होता.

**दो०—जगदंबा जहँ अवतरी सो पुर बरनि कि जाइ । रिद्धि सिद्धि संपत्ति सुख नित नूतन अधिकाइ ॥ १०३ ॥**

जेथें जगदंबेनें अवतार घेतला त्या नगराचें वर्णन कसें करणार ? तेथें ऋद्धिसिद्धि व सर्व संपत्ति नित्य, नवीन व वाढत्या प्रमाणावर होत्या.

चौ०—नगर निकट बरात सुनि आई।
पुर खरभर सोभा अधिकाई।
करि बनाव सब बाहन नाना।
चले लेन सादर अगवाना।

वरात नगराजवळ आली हें ऐकून तर शहरांत उत्सवाची एकच गर्दी उडाली. अनेक वाहनें सज्ज करून, वऱ्हाडी मंडळींचें मानपानानें स्वागत करण्याकरितां सर्व मंडळी थाटमाट करून सामोरी गेली.

हिय हरषे सुरसेन निहारी।
हरिहिं देखि अति भये सुखारी।
सिवसमाज जब देखन लागे।
बिडरि चले बाहन सब भागे।

देवसमाजास पाहून मंडळीस आनंद झाला. श्रीविष्णूंस पाहून तर त्यांस अत्यंत हर्ष झाला. मात्र जेव्हां ते शंकराचा समाज पाहूं लागले, तेव्हां त्यांचीं सर्वच वाहनें भीतीनें पळूं लागलीं!

धरि धीरज तहँ रहे सयाने।
बालक सब लइ जीव पराने।

पोक्त होते ते तेथें धैर्य धरून राहिले, पण मुलें मात्र जिव घेऊन पळालीं.

गये भवन पूछहिँ पितु माता।
कहहिँ बचन भय कंपित गाता।
कहिय कहा कहि जाइ न बाता।
जम कर धारि किधौँ बरिआता।
बर बौराह बरद असवारा।
ब्याल कपाल बिभूषन छारा।

घरीं गेल्यावर आईबापांनीं विचारपूस केली असतां भयानें लटलट कांपत तीं मुलें ह्मणालीं— "सांगावें तरी काय? सांगण्याची कांहीं सोयच उरली नाहीं! हें यमसैन्य आहे कीं, वऱ्हाड आहे? नवरा मुलगा तर वेडापीरच दिसतो. स्वारी बैलावर आरूढ होऊन आली आहे! अंगावर सापांचे व नरकपालांचे अलंकार असून सर्वांगाला राख फासली आहे!!

**छंद—तन छार ब्याल कपाल भूषन नगन जटिल भयंकरा। सँग भूत प्रेत पिसाच जोगिनि बिकटमुख रजनीचरा॥ जो जियत रहिहि बरात देखत पुन्य बड तेहि कर सही। देखिहि सो उमाबिबाह घर घर बात असि लरिकन्ह कही॥ ९॥**

अंगाला राख फांसलेली शरीरावर सापांचे आणि नरकपालांचे दागिने, नग्न असून जटा वाढविलेल्या, दिसावयाला भयंकर उग्र अक्राळविक्राळ तोंडांचे भूत, प्रेत, पिशाच, योगिनी व राक्षस यांचा समुदाय समागमें घेतलेला, असला म्हणे नवरदेव! वरात पाहून जो धडपणीं जिवंत राहील तो खरोखरीच महा भाग्यवान् आणि तोच पार्वतीचें लग्न पाहील!" अशा प्रकारच्या गोष्टी मुलें सांगूं लागलीं.

**दो०—समुझि महेस समाज सब जननि जनक मुसुकाहिँ बाल बुझाये बिबिध बिधि निडर होहु डर नाहिँ॥ १०४॥**

महेशांचा परिवार ऐकून सर्व आईबाप हंसूं लागले. त्यांनीं मुलांना पुष्कळ प्रकारें समजूत सांगितलें कीं—तुह्मी निर्भय असा—भिण्याचें कांहीं कारण नाहीं.

चौ०—लइ अगवान बरातहि आये।
दिये सबहि जनवास सुहाये।

सामोरें गेलेली मंडळी वऱ्हाडी मंडळींस घेऊन आली आणि त्यांनीं सर्वांस नीट जानवसे दिले.

मैना सुभ आरती सवाँरी।
संग सुमंगल गावहिँ नारी।
कंचनथार सोह बरपानी।
परिछन चली हरहिं हरषानी।

मैनेनें मंगलारती तयार केली. बरोबरच्या स्त्रिया मंगल गाणीं गाऊं लागल्या. त्यांच्या गोंडस हातांत सुवर्णाचीं तबकें झळकत होतीं. त्या आनंदानें शंकरास ओंवाळण्यास निघाल्या.

बिकटबेष रुद्रहिं जब देखा
अबलन्ह उर भय उभय बिसेखा।
भागि भवन पैठीँ अतित्रासा।
गये महेस जहाँ जनवासा।

रुद्राचा भयंकर वेष पाहतांच स्त्रिया अत्यंत भयभीत झाल्या. त्यांनीं पळ काढला. आणि त्या घाबरून घरीं जाऊन बसल्या. इकडे महेश्वर जानवशाच्या जागीं जाऊन पोंहचले.

मैना हृदय भयउ दुख भारी।
लीन्ही बोलि गिरीसकुमारी

अधिक सनेह गोद बैठारी ।
स्यामसरोज नयन भरि बारी ।
जेहि बिधि तुम्हहिँ रूप अस दीन्हा ।
तेहि जड बर बाउर कस कीन्हा ।

मैनेच्या हृदयांत तर दुःखाचा कळस झाला. तिनें पार्वतीस बोलावून अति प्रेमानें अंकावर बसविलें. मैनेचे नीलकमलासारखे नेत्र अश्रूंनीं डबडबले [ ती म्हणाली, ] ज्या विधात्यानें तुला हें असें रूप दिलें त्या खुळ्यानें तुझा पति असा बाळवट गे ! कसा निर्माण केला ?

छंद—कस कीन्ह बर बौराह बिधि जेहि तुम्हहिँ सुंदरता दई । जो फलु चहिय सुरतरुहिँ सो बरबस बबूरहिँ लागई ॥ तुम्हसहित गिरि ते गिरउँ पावक जरउँ जलनिधि महँ परउँ । घर जाउ अपजस होउ जग जीवत बिवाह न हौं करउँ ॥१०॥

ज्या विधात्यानें तुला असें सौंदर्य दिलें त्यानें तुझ्या कपाळीं असा वेडा नवरा कसा नेमला ? जें फळ कल्पतरूलाच लागलें पाहिजे तें बळजबरीनें कधींतरी बाभळीवर जमेल काय ? तुझ्यासकट मी पर्वतावरून कडेलोट करून घेईन किंवा समुद्रांत उडी घालीन, घरादारावर तुळशीपत्र ठेवीन, जगांत अपकीर्ति झाली तरी बेहेत्तर; परंतु जिवंतपणीं ह्या वराच्या पदरीं तुला कधींहि बांधणार नाहीं.

दो०—भईँ बिकल अबला सकल दुखित देखि गिरनारि । करि बिलाप रोदति बदति सुतासनेह सँभारि ॥ १०५ ॥

सर्व स्त्रिया मैनेस दुःखित पाहून विव्हल झाल्या. मैना कन्येच्या प्रेमभरानें विलाप करून रडूं लागली व म्हणाली—

चौ०—नारद कर मैँ कहा बिगारा ।
भवन मोर जिन्ह बसत उजारा ।
अस उपदेस उमहिँ जिन्ह दीन्हा ।
बौरे बरहि लागि तप कीन्हा ।

नारदाचें मी काय असें घोडें मारलें कीं, त्याचा सूड म्हणून त्यानें माझ्या नांदत्या घरावर निखारा ठेविला ! त्यानेंच उमेस हा असला उपदेश केला आणि ह्या पिसाट नवऱ्यासाठीं तप करविलें.

सांचेहु उन्हके मोह न माया ।
उदासीन धन धाम न जाया ।
पर-घर-घालक लाज न भीरा ।
बाँझ कि जान प्रसव की पीरा ।

खरोखरच त्याला लोभहि नाहीं आणि मायाहि नाहीं. स्वतः फटिंग असल्यामुळें त्याला घराची, संपत्तीची अगर स्त्रीची कांहींच कदर नाहीं. दुसऱ्याच्या घराचें वाटोळें करण्यांत त्याला लाजहि नाहीं आणि भीडहि नाहीं. प्रसववेदना वांझोटीस काय कळणार ?

जननिहिँ बिकल बिलोकि भवानी ।
बोली जुत बिबेक मृदुबानी ।

माता शोकाकुल झालेली पाहून भवानी विवेक-युक्त आणि मृदु असें भाषण करूं लागली—

अस बिचारि सोचहि मति माता ।
सो न टरइ जो रचइ बिधाता ।
करम लिखा जौं बाउर नाहू ।
तौ कत दोष लगाइय काहू ।
तुम्ह सन मिटहिं कि बिधि के अंका ।
मातु व्यर्थ जनि लेहु कलंका ।

" आई ! विधात्याचा नेमानेम कधींहि टळावयाचा नाहीं, असा विचार करून शोक करूं नकोस. प्रारब्धांतच जर पागल नवरा लिहिला असेल, तर इतरास दोष काय म्हणून लावावयाचा ? तुझ्यानें ललाटरेषा पुसून टाकवेल काय ? माते ! नाहक बद्दू बनूं नकोस.

छंद—जिनि लेहु मातु कलंक करुना परिहरहु अवसर नहीँ । दुख सुख जो लिखा लिलार हमरे जाब जहँ पाउब तहीँ ॥ सुनि उमाबचन बिनीत कोमल सकल अबला सोचहीँ । बहु भाँति बिधिहि लगाइ दूषन नयन बारि बिमोचहीँ ॥११॥

माते ! बदनाम होऊं नकोस आणि मोह सावर. हा शोकाचा प्रसंग नव्हे. माझ्या कपाळीं जें सुखदुःख लिहिलें आहे, तें मी जेथें जाईन तेथें मला मिळणारच." उमेचें तें नम्र व कोमल भाषण ऐकून सर्व स्त्रिया दुःखित झाल्या आणि अनेक प्रकारें विधात्यास दूषणें देऊन डोळ्यांतून अश्रू गाळूं लागल्या.

**दो०—तेहि अवसर नारद सहित अरु रिषि-सप्त समेत। समाचार सुनि तुहिनागिरि गवने तुरित निकेत॥ १०६॥**

तितक्यांत नारदमुनी आणि सप्तर्षिसहित इतरहि ऋषी विवाहवार्ता ऐकून हिमाचलाच्या सदनीं शीघ्र येते झाले.

**चौ०—तब नारद सबही समुझावा।**
**पूरब-कथा-प्रसंग सुनावा।**

तेव्हां नारदांनीं सर्वांची समजूत घालून त्यांना पूर्वकथाप्रसंग निवेदन केला.

**मैना सत्य सुनहु मम बानी।**
**जगदंबा तव सुता भवानी।**
**अजा अनादि सक्ति अबिनासिनि।**
**सदा संभु अरधंग निवासिनि।**
**जग-संभव-पालन-लय-कारिनि।**
**निज इच्छा लीला-बपु-धारिनि।**

मैने! मी सत्य सांगतों. ऐक. अनादि, स्वयंभू, शक्तिरूप, अनंत, सदा शंकराच्या अर्धांगावर वास करणारी, जगताची उत्पत्ति, स्थिति व लय करणारी, स्वेच्छेनें लीलावपु धारण करणारी, अशी ही तुझी कन्या जगज्जननी भवानी होय.

**जनमी प्रथम दच्छगृह जाई।**
**नाम सती सुंदर तनु पाई।**
**तहँउ सती संकरहि बिवाहीँ।**
**कथा प्रसिद्ध सकल जग माहीँ।**

प्रथम ही दक्षगृहीं जन्मास आली होती. त्या वेळीं प्राप्त झालेल्या इच्या सुंदर देहाचें नांव ' सती ' होतें. तेथेंहि तरी तिनें शंकरासच वरिलें होतें. ही कथा जगत्प्रसिद्धच आहे.

**एक बार आवत सिव संगा।**
**देखेउ रघुकुल-कमल-पतंगा।**
**भयउ मोह सिव कहा न कीन्हा।**
**भ्रमबस बेष सीय कर लीन्हा।**

एके प्रसंगीं शिवासहवर्तमान गमन करीत असतां रघुकुलकमलसूर्य रामचंद्रास अवलोकन करून ती शंकित झाली. शिवांनीं सांगितल्याप्रमाणें न वागतां भ्रमामुळें तिनें सितेचें रूप घेतलें.

**छंद—सियबेष सती जो कीन्ह तेहि अपराध संकर परिहरी। हरबिरह जाइ बहोरि पितु के जग्य जोगानल जरी॥ अब जनमि तुम्हरे भवन निजपति लागि दारुन तपु किया। अस जानि संसय तजहु गिरिजा सर्बदा संकर प्रिया॥ १२॥**

सती सीता बनली या अपराधास्तव शंकरांनीं तिचा त्याग केला. तदतंनर शंभुविरहानें पित्याच्या यज्ञांत जाऊन योगाग्नीनें तिनें आपणास दग्ध करून घेतलें. आतां हिनें तुमच्या घरीं जन्म घेऊन आपल्या पतीकरितां उग्र तपश्चर्या केली, हें जाणून संशयाचा त्याग कर. ही पार्वती सर्वदा शंकरप्रियाच असणार.

**दो०—सुनि नारद के बचन तब सब कर मिटा बिषाद। छन महँ ब्यापेउ सकल पुर घर घर यह संबाद॥ १०७॥**

हें नारदाचें वचन ऐकल्यानंतर सर्वांचीच तळमळ गेली. एका क्षणांत ही वार्ता शहरभर घरोघरीं पसरली.

**चौ०—तब मैना हिमवंत अनंदे।**
**पुनि पुनि पारबतीपद बंदे।**
**नारि पुरुष सिसु जुबा सयाने।**
**नगर लोग सब अति हरषाने।**

तेव्हां मैना व हिमवान् आनंदानें पार्वतीचें वारंवार चरण-वंदन करूं लागले. स्त्री, पुरुष, मुलें, तरुण, वृद्ध, व नागरिक लोक अत्यंत हर्षित झाले.

**लगे होन पुर मंगल गाना।**
**सजे सबहि हाटकघट नाना।**

शहरांत मंगल गायन होऊं लागलें. अनेक सुवर्णकलश सर्वांनीं सिद्ध करून ठेविले.

**भाँति अनेक भई जेवनारा।**
**सूपसास्त्र जस कछु ब्यवहारा।**
**सो जेवनार कि जाइ बखानी।**
**बसहिँ भवन जेहि मातु भवानी।**

सूपशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें तऱ्हातऱ्हांचीं खाद्यें तयार करण्यांत आलीं. ज्या घरांत जगज्जननी अन्नपूर्णाच प्रत्यक्ष वास करीत होती, तेथील पदार्थांचें वर्णन तरी करवेल काय?

**सादर बोले सकल बराती।**
**बिष्णु बिरंचि देव सब जाती।**

विष्णु, ब्रह्मदेव प्रभृति देवसमाज आणि सर्व वऱ्हाडी मंडळी आदरपूर्वक बोलावण्यांत आली.

बिबिध पाँति बैठी जेवनारा ।
लगे परोसन निपुन सुआरा ।
नारिबृंद सुर जेँवत जानी ।
लगीँ देन गारी मृदुबानी ।

जेवणारांच्या अनेक पंक्ती बसल्या. कुशल वाढपी वाढूं लागले. देव जेवताहेत असें पाहून स्त्रियांनीं मृदुवाणीनें थट्टावजा कोट्या करण्यास आरंभ केला.

**छंद—गारी मधुर सुर देहिँ सुंदरि ब्यंग बचन सुनावहीँ । भोजन करहिँ सुर अति बिलंब बिनोद सुनि सचुपावहीँ । जेँवत जो बढ्यौ अनंद सो मुख कोटिहू न परइ कह्यौ । अँचवाइ दीन्हे पान गवने बास जहँ जाको रह्यौ ॥ १३ ॥**

स्त्रिया मधुर स्वरानें कोट्या करीत व एकमेकांच्या उखाळ्यापाखळ्या काढीत. देव जेवण्यास उशीर करीत आणि त्यांचा विनोद ऐकून गंमत मानीत. भोजन-प्रसंगीं जो आनंद प्रवर्तला तो कोटिमुखांनींहि वर्णन करणें शक्य नाहीं. आंचवल्यानंतर तांबूलग्रहण झालें. नंतर मंडळी आपाआपल्या जानवश्याच्या जागीं गेली.

**दो०—बहुरि मुनिन्ह हिमवंत कहँ लगन सुनाई आइ । समय बिलोकि बिबाह कर पठये देव बोलाइ ॥ १०८ ॥**

नंतर मुनिजन हिमवंतास मुहूर्त सांगण्याकरितां आले. विवाहमुहूर्त पाहून त्यांनीं देवांस बोलावणें पाठविलें.

चौ०—बोलि सकल सुर सादर लीन्हे ।
सबहिँ जथोचित आसन दीन्हे ।
बेदी बेदबिधान सवाँरी ।
सुभग सुमंगल गावहिँ नारी ।

सर्व देवांना अगत्यपूर्वक बोलावून आणले, आणि सर्वांस यथायोग्य आसनें देण्यांत आलीं. वेद-विधियुक्त वेदी तयार करण्यांत आली होती व स्त्रिया सुंदर मंगलगीतें गात होत्या.

सिंहासन अतिदिब्य सुहावा ।
जाइ न बरनि बिचित्र बनावा ।
बैठे सिव बिप्रन्ह सिर नाई ।
हृदय सुमिरि निज प्रभु रघुराई ।

अत्यंत दिव्य बोहलें ( वेदी ) घालण्यांत आलें होतें. त्याची विचित्र बनावट अवर्णनीय होती. ब्राम्हणांना वंदन करून व इष्टदेवता श्रीरामचंद्र यांचें हृदयांत स्मरण करून महादेव सिंहासनावर आरूढ झाले.

बहुरि मुनीसन्ह उमा बोलाई ।
करि सिंगार सखी लेइ आई ।

नंतर मुनिवरांनीं उमेस बोलावणें पाठविलें. तिच्या सख्यांनीं तिचा शृंगार करून तिला आणिलें.

देखत रूप सकल सुर मोहे ।
बरनइ छबि अस जग कबि को है ।
जगदंबिका जानि भवबामा ।
सुरन्ह मनहिँ मन कीन्ह प्रनामा ।
सुंदरतामरजाद भवानी ।
जाइ न कोटिन बदन बखानी

तें रूप पाहून सर्व देव मोहित झाले. पार्वतीचें सौंदर्य वर्णन करूं शकेल असा जगांत कोण कवी आहे ? शिवाची अर्धांगी आणि विश्वाची जननी असें जाणून देवांनीं मनांतल्या मनांत तिला प्रणाम केला. भवानी ही सौंदर्याची सीमाच म्हणून कोट्यवधि मुखांनीं देखील तिचें वर्णन करितां यावयाचें नाहीं.

**छंद—कोटिहु बदन नहिँ बनइ बरनत जगजननी-सोभा महा । सकुचहिँ कहत स्रुति सेष सारद मंदमति तुलसी कहा ॥ छबिखानि मातु भवानि गवनि मध्य मंडप सिव जहाँ । अवलोकि सकइ न सकुचि पति-पद-कमल मन मधुकर तहाँ ॥ १४ ॥**

कोट्यवधि मुखांनीं देखील जें अनिर्वाच्य असें तें जगज्जननीचें अप्रतिम लावण्य वर्णन करण्यास श्रुति, शेष, नारद यांनाहि संकोच उत्पन्न होईल. मग तेथें मंदमति तुलसीदासाची काय कथा ? सौंदर्याची खाण अशी ती माता भवानी जेथें शिव होते त्या मंडपांत गेली. तिचा मनोरूपी भृंग जेथें गुंगून गेला होता अशी ती पतीचीं पदकमलें लज्जेस्तव पाहूं शकेना.

दो०—मुनि अनुसासन गनपतिहिँ पूजेउ संभु भवानि । कोउ सुनि संसय करइ जानि सुर अनादि जिय जानि ॥ १०९ ॥

मुनींच्या आज्ञेनुसार शंभु—भवानींनीं गणपतीचें पूजन केलें. हें ऐकून कोणींहि शंका घेण्याचें कारण नाहीं, [ कारण ] देव अनादि आहेत हें लक्षांत ठेवावें.

चौ०—जसि बिबाह कै बिधि स्तुति गाई ।
महामुनिन्ह सो सब करवाई ।
गहि गिरीस कुस कन्या पानी ।
भवहि समरपी जानि भवानी ।

महामुनींनीं वेदांत वर्णन केल्याप्रमाणें सर्व विवाह-विधि उरकला. हिमालयानें हातांत कुश घेऊन व कन्येचा हात धरून ती भवानी समजून शंकरास अर्पण केली.

पानिग्रहन जब कीन्ह महेसा ।
हिय हरषे तब सकल सुरेसा ।

महेशांनीं जेव्हां पाणिग्रहण केलें, तेव्हां सर्व देवांच्या मनास हर्ष झाला.

वेदमंत्र मुनिबर उच्चरहीँ ।
जय जय जय संकर सुर करहीँ ।
बाजहिँ बाजनि बिबिध बिधाना ।
सुमनबृष्टि नभ भइ बिधि नाना ।
हर गिरिजा कर भयउ बिबाहू ।
सकल भुवन भरि रहा उछाहू ।

मुनिवर वेदमंत्रोच्चार करूं लागले. देवांनीं शंकरांचा जयजयकार केला. अनेक प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं व आकाशांतून नानाविध पुष्पांचा वर्षाव झाला. अशा प्रकारें शिवपार्वतीचा विवाह झाला. त्रैलोक्यांत आनंदी आनंद भरून गेला.

दासी दास तुरग रथ नागा ।
धेनु बसन मनि बस्तु बिभागा ।
अन्न कनकभाजन भरि जाना ।
दाइज दीन्ह न जाइ बखाना ।

दास, दासी, अश्व, रथ, हत्ती, धेनु, वस्त्रें, रत्नें व इतर वस्तु, भूमिभाग, सुवर्णपात्रें भरून अन्न, वाहनें इत्यादि अवर्णनीय देणगी वरास देण्यांत आली.

छंद—दाइज दियो बहुभाँति पुनि कर जोरि हिमभूधर कह्यौ । का देउँ पूरनकाम संकर चरनपंकज गहि रह्यौ ॥ सिव कृपासागर ससुर कर संतोष सब भाँतिहि कियो । पुनि गहे पदपाथोज मैना प्रेम-परिपूरन हियो ॥ १५ ॥

अनेक प्रकारची देणगी देण्यांत आली. नंतर हिमालय हात जोडून म्हणालाः—या पूर्णकाम शंकरास मी काय द्यावें ? ( असें म्हणून ) तो शंकरांचीं चरणकमलें धरून राहिला. कृपासागर शंकरांनीं श्वशुराचा सर्वतोपरीं संतोष केला. नंतर प्रेमपूर्ण अंतःकरणपूर्वक मैनेनें त्यांच्या पदकमलांस मिठी मारली.

दो०—नाथ उमा मम प्रान सम गृहकिंकरी करेहु । छमेहु सकल अपराध अब होइ प्रसन्न बर देहु ॥ ११० ॥

( मैना म्हणाली ) हे प्रभो ! ही उमा मला माझ्या प्राणासमान आहे; हिला आपण गृहकिंकरी करावी. आतां सर्व अपराधांची क्षमा करून प्रसन्न होऊन वर द्यावा.

चौ०—बहु बिधि संभु सासु समुझाई ।
गवनी भवन चरन सिर नाई ।

शंकरांनीं बहुतप्रकारें सासूची समजूत घातली. तेव्हां मैना त्यांच्या चरणीं नमस्कार करून अंतःपुरांत गेली.

जननी उमा बोलि तब लीन्ही ।
लेइ उछंग सुंदर सिख दीन्ही ।

नंतर मैनेनें उमेस बोलावून आणि तीस अंकावर घेऊन योग्य उपदेश केला.

करेहु सदा संकर—पद—पूजा ।
नारि धरम पति देव न दूजा ।
बचन कहत भरि लोचन बारी ।
बहुरि लाइ उर लीन्हि कुमारी ।

( ती म्हणाली ) " सर्वदा शंकरपदांची सेवा करीत ऐस. पतीला दैवत मानणें हाच स्त्रीधर्म होय. स्त्रीला अन्य दैवतच नाहीं. " असें बोलत असतां तिच्या डोळ्यांत अश्रू आले नंतर तिनें कन्येस उराशीं कवटाळलें ( आणि म्हणाली ):—

कत बिधि सृजी नारि जग माहीँ ।
पराधीन सपनेहु सुख नाहीँ ।

" विधात्यानें स्त्रियांस जगांत कशाकरितां उत्पन्न केल्या कोण जाणे ! परतंत्रांना स्वप्नांतहि कधीं सुख मिळावयाचें नाहीं ! "

भइ अति प्रेम बिकल महतारी
धीरज कीन्ह कुसमय बिचारी ।
पुनि पुनि मिलति परति गहि चरना ।
परम प्रेम कछु जाइ न बरना ।
सब नारिन्ह मिलि भेँटि भवानी ।
जाइ जननिउर पुनि लपटानी ।

अत्यंत प्रेमामुळें मैना विव्हल झाली. पण हा समय दुःखाचा नव्हे असा विचार करून तिनें मन घट्ट केलें. ती वरचेवर पायांवर पडून मिठी मारूं लागली. तिचें अपरिमित प्रेम वर्णन करतां येणें शक्य नाहीं. भवानी सर्व स्त्रियांस कवटाळून भेटली, व फिरून जाऊन तिनें मातेच्या उरास मिठी घातली.

छंद–जननी बहुरि मिलि चली उचित असीस सब काहू दईँ । फिरि फिरि बिलोकति मातुतन तब सखीं लेइ सिव पहँ गईँ । जाचक सकल संतोषि संकर उमा सहित भवन चले । सब अमर हरषे सुमन बरषि निसान नभ बाजे भले ॥ १६ ॥

ती आईस वरचेवर कवटाळूं लागली. ती चालूं लागली असतां तीस सर्वांनींच योग्य आशीर्वाद दिले. फिरफिरून ती आईकडे पहात असे. अखेर तिच्या सख्या तिला शंकराकडे घेऊन गेल्या. सर्व याचकांस संतुष्ट करून उमेसहवर्तमान शंकर स्वगृहाप्रत जाण्यास निघाले. सर्व देव हर्षित होऊन पुष्पवृष्टि करूं लागले. आकाशांत दुंदुभींचा नाद दुमदुमून गेला.

दो०–चले संग हिमवंत तब पहुँचावन अति हेतु। बिविध भाँति परितोष करि बिदा कीन्ह बृषकेतु ॥ १११ ॥

तेव्हां हिमवान् त्यांना पोंचविण्यास अत्यंत अगत्यपूर्वक गेला. अनेकप्रकारें संतुष्ट करून त्यानें वृषकेतूस रवाना केलें.

चौ०–तुरत भवन आये गिरिराई ।
सकल सैल सर लिये बोलाई ।
आदर दान बिनय बहु माना ।
सब कर बिदा कीन्ह हिमवाना ।

त्वरितच गिरिराज घरीं परतले. त्यांनीं पर्वतसरोवरादि सर्वांनाच बोलावून घेतलें व त्यांस देणग्या, विनय व बहुमान यांनीं गौरवून रवाना केलें.

जबहिँ संभु कैलासहि आये ।
सुर सब निज निज लोक सिधाये ।

जेव्हां शंकर कैलासास पोंचले तेव्हां सर्व देवांनीं आपापल्या लोकीं गमन केलें.

जगतमातुपितु संभु भवानी ।
तेहि सिंगारु न कहउँ बखानी ।
करहिँ बिबिध बिधि भोग बिलासा ।
गनन्ह समेत बसहिँ कैलासा ।
हर–गिरिजा–बिहार नित नयऊ ।
एहि बिधि बिपुल काल चलि गयऊ ।

शंकरपार्वती हे त्रैलोक्याचे जनकजननी होत. ह्यास्तव त्यांच्या शृंगाराचा मी विस्तार करीत नाहीं. ते नानाप्रकारचे भोगविलास भोगूं लागले. आणि कैलासावर गणांसहवर्तमान वास करूं लागले. ते उभयतां नित्य नवीन असे विहार करूं लागले. याप्रमाणें त्यांचा बराच काल लोटला.

तब जनमेउ षट–बदन कुमारा ।
तारकु असुरु समर जेहि मारा ।
आगम निगम प्रसिद्ध पुराना ।
षणमुखजनम सकल जग जाना ।

नंतर षण्मुख कुमारस्वामी कार्तिकेय जन्मास आले. त्यांनींच तारकासुराचा रणांगणांत वध केला. ही कथा वेदशास्त्रांत व पुराणांतरीं प्रसिद्ध आहे. षण्मुखाचें जन्मकर्म जगाला विदित आहेच.

छंद—जगु जान षणमुखजनमु करम प्रताप पुरुषारथ महा । तेहि हेतु मैँ बृष-केतु-सुत कर चरित संछेपहि कहा ॥ यह उमा-संभु-बिबाहु जे नर नारि कहहिँ जे गावहीँ । कल्यान काज बिबाह मंगल सर्वदा सुख पावहीँ ॥ १७ ॥

षण्मुखाचें जन्मकर्म, प्रताप व महान् पुरुषार्थ सर्व जगास विदित आहे. ह्मणूनच मी त्या शंकरतनयाचें चरित्र संक्षेपानें वर्णन केलें. ही शंकरपार्वती-विवाहाची कथा जे स्त्रीपुरुष ऐकतील किंवा गातील त्यांचें कल्याण

होईल व मनोरथ परिपूर्ण होतील. त्यांची विवाहादिक मंगलकार्यें होतील व ते सदा अगणचैन राहतील.

**दो०—चरितसिंधु गिरिजारमन बेद न पावहिँ पारु । बरनइ तुलसीदास किमि अति-मति-मंद गवाँरु ॥ ११२ ॥**

गिरिजारमण हे लीलावैभवाचे सागर होत. वेदांनाहि त्यांचा थांग लागत नाहीं, मग अत्यंत मतिमंद आणि गांवढळ असा हा तुलसीदास त्यांचें कसें वर्णन करूं शकेल ?

चौ०—संभुचरित सुनि सरस सुहावा ।
भरद्वाजमुनि अतिसुख पावा ।
बहुलालसा कथा पर बाढी ।
नयनु नीरु रोमावलि ठाढी ।
प्रेमबिबस मुख आव न बानी ।
दसा देखि हरषे मुनि ज्ञानी ।

सुंदर आणि रसभरित असें शंभुचरित्र ऐकून भरद्वाजमुनी अत्यंत हर्षित झाले. त्या कथेवर त्यांचें प्रेम अधिकाधिक वाढूं लागलें. त्यांचे नेत्र सजल होऊन त्यांच्या अंगावार रोमांच थरारले. प्रेमभरानें त्यांच्या मुखांतून शब्द निघेना. ती त्यांची दशा पाहून याज्ञवल्क्य मुनीस आनंद झाला.

अहो धन्य तव जनम मुनीसा ।
तुह्महि प्रान सम प्रिय गौरीसा ।
सिव-पद-कमल जिन्हहिँ रति नाहीँ ।
रामहिँ ते सपनेहुँ न सुहाहीँ ।
बिनु छल-बिस्व नाथ-पद नेहू ।
रामभगत कर लच्छन एहू

( याज्ञवल्क्य ह्मणाले ) हे मुनिवरा ! ज्याअर्थी तुला पार्वतीरमण प्राणाप्रमाणें प्रिय वाटत आहेत, त्याअर्थी तुझा जन्म धन्य होय. ज्यांचें शंकरचरणारविंदीं प्रेम नाहीं, ते रामास स्वप्नांतहि प्रिय नाहींत. शंकरचरणीं निर्व्याज प्रेम असणें हेंच रामभक्ताचें लक्षण होय.

सिव सम को-रघु-पति-व्रत-धारी ।
बिनु अघ तजी सती असि नारी ।
पन-करि रघुपतिभगति दृढाई ।
को सिव सम रामहिँ प्रिय भाई ।

ज्यांनीं सतीसारख्या निष्कलंक स्त्रीचा देखील त्याग केला आणि प्रतिज्ञापूर्वक रामभक्ति दृढ केली, त्या शंकरासारखा रघुपतीचा उपासक कोण आहे! बाबा रे ! शंकरासारखा रामास इतर कोण प्रिय आहे!

**दो०—प्रथमहिँ मैँ कहि सिवचरित बूझा मरमु तुम्हार । सुचि सेवक तुम्ह राम के रहित समस्त बिकार ॥ ११३ ॥**

मी प्रथमच शिवचरित्र गाऊन तुझें मर्म ओळखिलें कीं, तूं सर्व विकाररहित असून रामाचा पवित्र भक्त आहेस.

चौ०—मैँ जाना तुह्मार गुन सीला ।
कहउँ सुनहु अब रघु-पति-लीला ।
सुनु मुनि आजु समागम तोरे ।
कहि न जाइ जस सुख मन मोरे ।

मी तुझे गुण व शील जाणलें. आतां मी रामलीलेचें वर्णन करतों, तें ऐक. हे मुने ! आज तुझ्या समागमानें मनाला जें सुख होत आहे, तें आतां सांगतां पुरवत नाहीं.

रामचरित अति अमित मुनीसा ।
कहि न सकहिँ सतकोटि अहीसा ।
तदपि जथाश्रुत कहउँ बखानी ।
सुमिरि गिरापति प्रभु धनुपानी ।

हे मुनींद्र ! रामचरित्र अति अपार आहे. शतकोटि शेषांसहि तें सांगणें शक्य नाहीं. तथापि, मी जसें ऐकलें तसें, वाग्देवीचा स्वामी जो धनुष्यपाणी प्रभु रामचंद्र, त्याचें स्मरण करून वर्णन करतों.

सारद दारुनारि सम स्वामी ।
राम सूत्रधर अंतरजामी ।
जेहि पर कृपा करहिँ जनु जानी ।
कबि-उर-अजिर नचावहिँ बानी ।

वाग्देवी सरस्वती ही काष्ठाच्या बाहुलीप्रमाणें असून तिचीं सूत्रें अंतर्यामी प्रभु श्रीरामचंद्र स्वतः धारण करीत असतात. ते आपला दास समजून ज्यावर कृपा करतील त्याच कवीच्या हृदयरूपी अंगणांत ते वाग्देवतेस नाचवितील.

प्रनवउँ सोइ कृपाल रघुनाथा ।
बरनउँ बिसद तासु गुनगाथा ।

त्याच दयाघन श्रीरामचंद्रास मी प्रणाम करून त्याचे उज्ज्वल गुणानुवाद वर्णन करतों.

परमरम्य गिरिबर कैलासू ।
सदा जहाँ सिव-उमा-निवासू ।

जेथें निरंतर शंकरपार्वती निवास करितात तो गिरिश्रेष्ठ कैलास अत्यंत रमणीय आहे.

**दो०–सिद्ध तपोधन जोगिजन सुर किन्नर मुनिबृंद । बसहिँ तहा सुकृती सकल सेवहिँ सिव सुखकंद ॥ ११४ ॥**

सिद्ध, तपोधन, योगी, देव किन्नर, मुनिवृंद आणि पुण्यात्मे तेथें वास करीत असून आनंदकंद शंकराची आराधना करीत असतात.

चौ०–हरि–हर–बिमुख धरमरति नाहीँ ।
ते नर तहँ सपनेहूँ नहिँ जाहीँ ।

धर्मश्रद्धारहित व हरिहरपराङ्मुख नर स्वप्नांतदेखील तेथें जाऊं शकत नाहींत.

तेहि गिरि पर बट बिटप बिसाला ।
नित नूतन सुंदर सब काला ।
त्रिबिध समीर सुसीतल छाया ।
सिव–बिस्राम–बिटप स्रुति गाया ।

त्याच पर्वतावर एक नित्यप्रफुल्लित, अक्षय आणि रमणीय असा विशाल वटवृक्ष आहे. त्रिविधवायु आणि अत्यंत शीतल छाया यांनीं युक्त असलेला तो वटवृक्ष शंकरांचें आरामस्थान होय असें श्रुती सांगतात.

एक बार तेहि तर प्रभु गयऊ ।
तरु बिलोकि उर अति सुख भयऊ ।
निज कर डासि नाग–रिपु–छाला ।
बैठे सहजहिँ संभु कृपाला ।

एके काळीं त्याच वृक्षाच्या छायेखालीं प्रभु गेले आणि त्या वृक्षास पाहून सुप्रसन्न झाले व आपल्याच हातानें सिंहचर्मासन पसरून त्यावर दयाघन शंभु सहज मौजेनें जाऊन बसले.

कुंद–इंदु–दर–गौर–सरीरा ।
भुज प्रलंब परिधन मुनिचीरा ।
तरुन–अरुन–अंबुज–सम चरना ।
नखदुति भगत–हृदय–तम–हरना ।
भुजग–भूति–भूषन त्रिपुरारी ।
आनन सरद–चंद–छबि–हारी ।

कुंदपुष्प, चंद्र व शंख यांप्रमाणें ज्याची शरीरकांति गौर आहे, जो आजानुबाहु असून ज्यानें मुनिवस्त्र परिधान केलें आहे, ज्याची चरणकांति नुकत्याच उमललेल्या रक्तकमलासारखी आहे, ज्याच्या नखांची कांति भक्तहृदयांतील अज्ञान हरण करीत आहे, ज्याचा देह सर्प आणि भस्म यांनीं विभूषित झाला आहे, ज्याची मुखश्री शरच्चंद्राच्या लावण्यास देखील लाजवीत आहे.

**दो०–जटामुकुट सुरसरित सिर लोचननलिन बिसाल । नीलकंठ लावन्यनिधि सोह बालबिधु भाल ॥ ११५ ॥**

चौ०–बैठे सोह कामरिपु कैसे ।
धरे सरीर सांतरस जैसे ।

ज्याच्या मस्तकीं जटाजूट व गंगा शोभत आहेत, कमलाप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल असून ज्याच्या ललाटप्रदेशीं बालचंद्र झळकत आहे, असा तो नीलकंठ, त्रिपुरारी, लावण्यनिधान, मदनारि, तेथें विराजमान झाला असतां शान्तरसानें मूर्तिमंत देह धारण केल्याप्रमाणें शोभूं लागला.

पारबती भल अवसरु जानी ।
गईँ संभु पहँ मातु भवानी ।
जानि प्रिया आदरु अति कीन्हा ।
बामभाग आसन हर दीन्हा ।

भवानी माता पार्वती तो योग्य अवसर जाणून शंकरासमीप गेली. शंकरांनीं प्रियेस अवलोकून तिचा आदर केला व तिला डावीकडेस आसन दिलें.

बैठीँ सिवसमीप हरषाई ।
पूरब–जनम–कथा चित आई ।
पति–हिय–हेतु अधिक अनुमानी ।
बिहँसि उमा बोलीँ प्रियबानी ।

पार्वती शंकरासमीप आनंदानें बसली असतां तीस पूर्व-जन्म वृत्तांताची आठवण झाली. पतीची अत्यंत प्रसन्न मुद्रा जाणून पार्वती हास्यपूर्वक मधुरवाणीनें बोलण्यास प्रवृत्त झाली.

कथा जो सकल–लोक–हित–कारी ।
सोइ पूछन चह सैलकुमारी ।

अखिल विश्वाचें कल्याण करणारी अशी कथा विचारण्याची पार्वतीचे मनांत इच्छा उत्पन्न झाली.

बिस्वनाथ मम नाथ पुरारी ।
त्रिभुवन महिमा बिदित तुह्मारी ।
चर अरु अचर नाग नर देवा ।
सकल करहिँ पद–पंकज–सेवा ।

( ती ह्मणाली, ) " हे प्राणनाथ ! विश्वपते ! त्रिपुरारे ! आपला महिमा त्रिभुवनांत प्रख्यात आहे.

नाग, नर, देव इत्यादि सर्व चराचर विश्व आपल्या चरणकमलांची सेवा करीत असतें.

**दो०—प्रभु समरथ सर्वज्ञ सिव सकल-कला-गुन-धाम। जोग-ज्ञान-वैराग्य-निधि प्रनतकलपतरु नाम ॥ ११६ ॥**

हे शंभो! आपण समर्थ, प्रभु, सर्वज्ञ, सकल कला व गुण यांचें भाण्डार आणि योग, ज्ञान, वैराग्य यांचें आगर आहांत व आपलें नामस्मरण शरणागतांना कल्पतरूप्रमाणें [ इष्टकामना प्राप्त करून देणारें ] आहे.

चौ०—जौं मोपर प्रसन्न सुखरासी।
जानिय सत्य मोहि निज दासी।
तौ प्रभु हरहु मोर अज्ञाना।
कहि रघुनाथकथा बिधि नाना।

हे सुखनिधान! जर आपण मजवर प्रसन्न असून मला आपली खरी दासी समजत आहां तर नानाविध रघुनाथचरित्रें सांगून, हे प्रभो! माझें अज्ञान आपण दूर केलें पाहिजे.

जासु भवन सुरतरु तर होई।
सह कि दरिद्रजनित दुख सोई।
ससिभूषन अस हृदय बिचारी।
हरहु नाथ मम मतिभ्रम भारी।

कल्पवृक्षातळीं ज्याचें घर आहे, तो दारिद्याचे बाखे सहन करीत राहील काय? हे चंद्रमौले नाथा! याचा आपण मनांत विचार करून माझा गहन बुद्धिभ्रम आपणच हरण केला पाहिजे.

प्रभु जे मुनि परमारथबादी।
कहहिं राम कहँ ब्रह्म अनादी
सेष सारदा बेद पुराना।
सकल करहिं रघुपति-गुन गाना।

प्रभो! परमार्थाचे वक्ते मुनिजन देखील रामचंद्रास अनादि ब्रह्म म्हणतात. शेष, शारदा, वेद, पुराणें इत्यादि सर्वच रामकथांचें गान करतात.

तुम्ह पुनि राम राम दिन राती।
सादर जपहु अनंगअराती।

हे मदनारे! आपणसुद्धा अहर्निश अत्यादरानें रामनामच जपत असतां.

रामु सो अवध-नृपति-सुत सोई।
की अज अगुन अलखगति कोई।

तो ( पूर्वी पाहिलेला ) राम नुसता अयोध्याधीशाचा पुत्रच कीं अज, निर्गुण आणि अलक्ष्य अशी वस्तु ( ब्रह्म ) होय?

**दो०—जौं नृपतनय तौ ब्रह्म किमि नारिबिरह मतिभोरि। देखि चरित महिमा सुनत भ्रमति बुद्धि अति मोरि ॥ ११७ ॥**

जर राजपुत्र असेल तर तो ब्रह्म कसा असूं शकेल? त्यास तर स्त्रीविरहानें बुद्धिभ्रम झाला होता. त्याचें चरित्र पाहून व त्याचा महिमा श्रवण करून माझ्या बुद्धीस तर फारच संशय उत्पन्न होत आहे.

चौ०—जौं अनीह व्यापक बिभु कोऊ।
कहहु बुझाइ नाथ मोहि सोऊ।
अज्ञ जानि रिस उर जनि धरहू।
जेहि बिधि मोह मिटइ सोइ करहू।

जर निष्काम, सर्वव्यापी, विभु अशी जी वस्तु ती राम असेल तर हे नाथ! मला समजून सांगावें, मी अज्ञ आहे, असें समजून मजवर कोप करूं नये आणि जेणेंकरून माझ्या मोहाचें निरसन होईल तीच योजना करावी.

मैं बन दीख रामप्रभुताई।
अति-भय-बिकल न तुम्हहिं सुनाई।
तदपि मलिनमन बोध न आवा।
सो फलु भली भाँति हम पावा।

मला अरण्यांतच रामाचें प्रभुत्व कळून चुकलें. परंतु भयानें भान सुटल्यामुळें मी तें आपणांस सांगितलें नाहीं. तथापि, माझें चित्त मलिन असल्यामुळें मी शुद्धीवर आलें नाहीं, त्याचें फल मला चांगल्याच रीतीनें भोगावें लागलें.

अजहूँ कछु संसय मन मोरे।
करहु कृपा बिनवउँ करजोरे।
प्रभु तब मोहि बहुभाँति प्रबोधा।
नाथ सो समुझि करहु जनि क्रोधा।

अजूनदेखील माझ्या मनांत थोडासा संशय आहेच. मी हात जोडतें. मजवर अनुग्रह करावा. ते समयीं देखील प्रभूंनीं माझी पुष्कळ प्रकारें समजूत घातली होती. तें मनांत आणून प्रभूंनीं मजवर क्रोध करूं नये.

तब कर अस बिमोह अब नाहीं। 
रामकथा पर रुचि मन माहीं। 
कहहु पुनीत राम-गुन-गाथा। 
भुजग-राज-भूषन सुरनाथा।

तेव्हां इतका संशय आतां उरला नाहीं कारण हल्लीं राम-कथेची माझे मनांत आवड उत्पन्न झाली आहे. हे भुजंगराज-भूषण सुरनाथ! आपण मला पवित्र रामगुण-गाथा कथन करावी.

**दो०—बंदउँ पद धरि धरनि सिरु बिनय करउँ कर जोरि। बरनहु रघुबर-बिसद-जस स्रुतिसिद्धांत निचोरि॥ ११८॥**

आपल्या चरणीं सांष्टाग प्रणिपात करून व हात जोडून मी विनंति करितें कीं, आपण वेदांतसिद्धांतांचें सार काढून रामचंद्रांच्या उज्ज्वल यशाचें वर्णन करावें.

चौ०—जदपि जोषिता नहिं अधिकारी। 
दासी मन क्रम बचन तुह्मारी।

मी स्त्री असल्यामुळें जरी अनधिकारी आहे, तरी मनानें, कर्मानें आणि वाणीनें आपलीच एक पाईक आहे.

गूढउ तत्त्व न साधु दुरावहिं। 
आरत अधिकारी जहँ पावहिं। 
अतिआरति पूछउँ सुरराया। 
रघुपतिकथा कहहु करि दाया।

आर्त ( जिज्ञासु ) आणि अधिकारी जेव्हां प्राप्त होतो तेव्हां संतजन परमार्थाचीं गूढ तत्त्वें प्रच्छन्न ठेवीत नाहींत. हे सुरश्रेष्ठा! मी अत्यंत आतुरतें विचारीत आहे, मला कृपा करून रामकथा निवेदन करण्यांत यावी.

प्रथम सो कारन कहहु बिचारी। 
निर्गुन ब्रह्म सगुन बपु धारी। 
पुनि प्रभु कहहु रामअवतारा। 
बालचरित पुनि कहहु उदारा।

प्रथम निर्गुण असून त्यानें सगुण देह धारण केला, याचें कारण विचारपूर्वक सांगावें. प्रभो! नंतर रामजन्म सांगून त्या उदाराचें बालचरित्र वर्णन करावें.

कहहु जथा जानकी बिबाहीं। 
राज तजा सो दूषन काहीं। 
बन बसि कीन्हे चरित अपारा। 
कहहु नाथ जिमि रावन मारा। 
राज बैठि कीन्ही बहु लीला। 
सकल कहहु संकर सुखसीला।

मग जानकीविवाह यथावृत्त सांगावा. रामानें राज्यत्याग केला यांत दोष कोणाचा तें सांगावें. त्यांनीं वनवासांत अपार लीला केल्या आहेत. प्रभो! त्यांनीं रावणाचा कसा वध केला तें कथन करावें. राज्यारूढ झाल्यावरहि त्यांनीं अनेक लीला केल्या. हे सुखशील शंकरा! हें सर्व मला निवेदन करावें.

**दो०—बहुरि कहहु करुनायतन कीन्ह जो अचरज राम। प्रजासहित रघु-बंस-मनि किमि गवने निजधाम॥ ११९॥**

हे करुणानिधान! आणखीहि रामांनीं जे चमत्कार केले ते, व प्रजासहित रामचंद्र निजधामास कसे गेले तें सर्व आपण मला सांगावें.

चौ०—पुनि प्रभु कहहु सो तत्त्व बखानी। 
जेहि बिज्ञान मगन मुनि ग्यानी। 
भगति ग्यान बिज्ञान बिरागा। 
पुनि सब बरनहु सहित बिभागा। 
अउरउ रामरहस्य अनेका। 
कहहु नाथ अतिबिमल बिबेका। 
जो प्रभु मैं पूछा नहिं होई। 
सोउ दयाल राखहु जनि गोई।

शिवाय हे प्रभो! ज्या विज्ञानामध्यें ज्ञानी व मुनी निमग्न असतात, तें तत्त्व मला समजून सांगावें. आणखी भक्ति, ज्ञान, विज्ञान, वैराग्य हे सर्व त्यांच्या विभागासहित वर्णन करावे. ज्याच्या योगानें अत्यंत शुद्ध विवेक उत्पन्न होतो, तीं रामसंबंधीं अनेक रहस्यें देखील सांगावीं. हे प्रभो! याशिवाय मी जें विचारलें नसेल तेंदेखील आपण दयावंतांनीं मजपासून गुप्त ठेवूं नये.

तुह्म त्रिभुवनगुरु बेद बखाना। 
आन जीव पावँर का जाना।

आपण त्रैलोक्याचे स्वामी आहांत असें वेद सांगतात. इतर पामर जीव काय जाणूं शकतील?

प्रस्न उमा के सहज सुहाई। 
छलबिहीन सुनि सिवमन भाई।

पार्वतीचे ते सरळ, सुंदर आणि निष्कपट प्रश्न ऐकून शंकराच्या मनास ते फार आवडले.

हरहिय रामचरित सब आये ।
प्रेम पुलक लोचन जल छाये ।
श्री–रघुनाथ–रूप उर आवा ।
परमानंद अमितसुख पावा ।

शंकराचे हृदयांत सर्व रामलीला प्रकट झाल्या. प्रेमामुळें त्यांच्या शरीरावर रोमांच उभे राहून त्यांचे नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून आले. हृदयांत रामरूप प्रकट होऊन त्या परमानंदांत ते अपार सुख अनभवूं लागले.

**दो०–मगन ध्यानरस दंड जुग पुनि मन बाहेर कीन्ह । रघुपतिचरित महेस तब हराषित बरनइ लीन्ह ॥ १२० ॥**

त्या ध्यानरसांत दोन घटका निमग्न होऊन फिरून त्यांनीं आपलें मन त्यांतून बाहेर काढलें. नंतर शंकरांनीं आनंदित होऊन रघुवीर-चरित्र वर्णन करण्यास प्रारंभ केला.

चौ०–झूठउ सत्य जाहि बिनु जाने ।
जिमि भुजंग बिनु रजु पहिचाने ।
जेहि जाने जग जाइ हेराई ।
जागे जथा सपनभ्रम जाई ।
बंदउँ बालरूप सोइ रामू ।
सब सिधि सुलभ जपत जिसु नामू ।

जसें रज्जूला ओळखल्याशिवाय तो भुजंगच आहे असें भासतें, ज्याचें ज्ञान न झाल्याकारणानें असत्य ( अचेतन ) विश्व, सत्य ( चैतन्य ) रूप प्रतीयमान होतें, जागृति उत्पन्न झाली ह्मणजे ज्याप्रमाणें स्वप्नभ्रम नष्ट होतो, तसेंच ज्याचें ज्ञान झालें असतां जगाचें मिथ्यात्व अनुभवास येतें, ज्याच्या नामाचा जप केला असतां सर्व कर्में सुलभ होतात, त्या बालरूप रामास मी वंदन करितों.

मंगलभवन अमंगलहारी ।
द्रवउ सो दसरथ–अजिर–बिहारी ।

मंगलधाम, अमंगल–नाशन, राजा दशरथाच्या अंगणांत विहार करणारा असा तो माझा राम मजवर कृपेची धार धरो.

करि प्रनाम रामहिँ त्रिपुरारी ।
हरषि सुधासम गिरा उचारी ।

त्रिपुरारी, रामास प्रणाम करून, हर्षित होत्साते अमृतप्राय वाणीनें बोलूं लागले.

धन्य धन्य गिरि–राज–कुमारी ।
तुम्ह समान नहिँ कोउ उपकारी ।
पूछेहु रघुपति–कथा–प्रसंगा ।
सकल लोक जग पावनि गंगा ।
तुम्ह रघुबीर–चरन–अनुरागी ।
कीन्हिहु प्रस्न जगतहित लागी ।

“ हे गिरिराजकन्यके ! तूं अत्यंत धन्य आहेस. तुझ्यासारखी उपकारकर्त्री कोणीच नाहीं. तूं जो रघुपति–कथा–प्रसंग विचारीत आहेस, तो सर्व लोकांना गंगेप्रमाणें पावन करणारा आहे. तुझें रामचरणीं प्रेम आहे, ह्मणूनच तूं जगाच्या कल्याणासाठीं असे प्रश्न केलेस.

**दो०–रामकृपा तें पारबति सपनेहु तव मन माहिँ । सोक मोह संदेह भ्रम मम बिचार कछु नाहिँ ॥ १२१**

पार्वती ! मला असें वाटतें कीं, रामचंद्राच्या कृपेनें स्वप्नांतदेखील तुझ्या मनांत शोक, मोह, संशय, भ्रम वगैरे कांहींच उरलें नाहीं.

चौ०–तदपि असंका कीन्हिहु सोई ।
कहत सुनत सब कर हित होई ।

तथापि, तूं शंका काढली आहेस आणि तिच्या श्रवणपठणानें सर्वांचेंच हित होणारें आहे.

जिन्ह हरिकथा सुनी नहिँ काना ।
स्रवनरंध्र अहिभवन समाना ।
नयनन्हि संतदरस नहिँ देखा ।
लोचन मोरपंख कर लेखा
ते सिर कटुतुंबरि सम तूला ।
जे न नमत हरि–गुरु–पद–मूला ।
जिन्ह हरिभगति हृदय नहिँ आनी ।
जीवत सव समान तेइ प्रानी ।
जो नहिँ करइ राम-गुन-गाना ।
जीह सो दादुरजीह समाना ।
कुलिसकठोर निठुर सोइ छाती ।
सुनि हरिचरित न जो हरषाती ।

ज्या कानांनीं हरिकथा श्रवण केली नाहीं, ते वारुळाच्या बिळाप्रमाणें होत. ज्या डोळ्यांनीं संतांचीं दर्शनें घेतलीं नाहींत, ते मयूरपिच्छावरील नेत्र–रेषेप्रमाणें होत. जे हरि व गुरुजन यांच्या चरणीं नम्र होत नाहींत त्या मस्तकाची कडू भोपळ्याइतकीच योग्यता

आहे. ज्यांनीं हरिभक्ति हृदयांत आणली नाहीं ते प्राणी जिवंत असूनहि प्रेताप्रमाणें होत. जी जिव्हा रामगुणाचें गान करीत नाहीं, ती बेडकाच्या जिभेप्रमाणेंच समजावी. जी छाती रामचरित्रें ऐकून हर्षायमान होत नाहीं, ती वज्राप्रमाणें कठिण आणि निष्ठुर होय.

गिरिजा सुनहु राम कै लीला ।
सुरहित दनुज-बिमोहन-सीला ।

गिरिजे ! देवांचें कल्याण करणारी आणि दैत्यांना भ्रम करणारी अशी श्रीरामाची लीला ऐक.

**दो०—रामकथा सुरधेनु सम सेवत सब-सुख दानि । सतसमाज सुर लोक सब को न सुनइ अस जानि ॥ १२२ ॥**

रामकथा ही कामधेनूसारखी होय. तिचें सेवन घडलें असतां सर्व सुखें प्राप्त होतात. सर्व संतसमाज हा देवलोकाप्रमाणें होय. इतकें ठसल्यावर रामकथा कोण श्रवण करणार नाहीं?

चौ०—रामकथा सुंदर करतारी ।
संसयबिहग उडावनहारी ।
रामकथा कलि—बिटप कुठारी ।
सादर सुनु गिरिराजकुमारी ।

रामकथा ही सुंदर हाताच्या टाळीप्रमाणें असून ती संशयरूप पक्ष्याला उडविते. रामकथा कलिरूप वृक्षास कुठाराप्रमाणें होय. हे पार्वति ! तूं ती सादर ऐक.

राम-नाम-गुन चरित सुहाये ।
जनम करम अगनित स्रुति गाये ।
जथा अनंत राम भगवाना ।
तथा कथा कीरति गुन नाना ।

वेदांनीं रामाचीं सुंदर नामें, गुण, चरित्रें, जन्म व कर्में अपार गाइलीं आहेत. जसे राम भगवान् अनंत आहेत, तद्वतच त्यांचे गुण, यश आणि चरित्र हेंहि अनंतच आहे.

तदपि जथाश्रुत जसि मति मोरी ।
कहिहउँ देखि प्रीति अति तोरी ।
उमा प्रस्न तव सहज सुहाई ।
सुखद संतसंमत मोहि भाई ।

तथापि तुझें अत्यंत प्रेम पाहून यथाश्रुत यथामति मी हें तुला सांगत आहें. पार्वती ! तुझे सहजसुंदर प्रश्न सुखकारक व संतसंमत आहेत, ते मलाहि आवडले.

एक बात नहिँ मोहि सुहानी ।
जदपि मोहबस कहेहु भवानी ।
तुम्ह जो कहा राम कोउ आना ।
जेहि स्रुति गाव धरहिँ मुनि ध्याना ।

परंतु भवानी ! जरी तूं मोहवश होऊन बोललीस, तरी ज्याचें मुनि ध्यान करतात व श्रुति गान करतात तो राम अन्य कोणी आहे काय ? हें जें तूं मला ह्मणालीस तें मात्र मला बरें वाटलें नाहीं.

**दो०—कहहिँ सुनहिँ अस अधम नर ग्रसे जे मोहपिसाच। पाखंडी हरि-पद-बिमुख जानहिँ झूठ न साच ॥ १२३ ॥**

जे मूढ पिशाच्चग्रस्त,अधम,पाखंडी हरिपदविन्मुख सत्यासत्य न जाणणारे असेच लोक असें बरळलेले असतात.

चौ०—अज्ञ अकोबिद अंध अभागी ।
काई बिषय मुकुरमन लागी ।
लंपट कपटी कुटिल बिसेखी ।
सपनेहु संतसभा नहिँ देखी ।
कहहिँ ते बेद असंमत बानी ।
जिन्ह के सूझ लाभ नहिँ हानी ।

जे अज्ञ, मूढ, अंध, भाग्यहीन असून ज्यांच्या मनोरूपी दर्पणावर विषयरूप शेवाळ जमलें आहे, जे लंपट, कपटी, कुटिल आहेत, ज्यांनीं विशेषेंकरून संतसमाज स्वप्नांतहि पाहिलेला नाहीं, ज्यांना लाभ किंवा हानि यांची शुद्धच नाहीं, तेच अशी वेदविरुद्ध वाणी बोलतात.

मुकुर मलिन अरु नयनबिहीना ।
रामरूप देखहिँ किमि दीना ।

ज्यांची आरशी मुळींच अंधक, ज्यांच्या डोळ्यांच्या खांचा झालेल्या आहेत, ते बापडे रामरूप कसें पाहूं शकणार ?

जिन्ह के अगुन न सगुन बिबेका ।
जल्पहिँ कल्पित बचन अनेका ।
हरि—माया—बस जगत भ्रमाहीँ ।
तिन्हहिँ कहत कछु अघटित नाहीं ।

ज्यांना निर्गुण व सगुण यांचा बोधच नाहीं ते अनेक कल्पना करून आपली जीभ उधळतात.त्यांच्या बरळ-

ण्याचें कांहीं आश्चर्य नाहीं कारण भगवंताच्या मायेमुळें हें सर्व जगच ( संशयावर्तात ) भ्रममाण होत आहे.

बातुल भूत बिबस मतवारे।
ते नहिँ बोलहिँ बचन बिचारे।

ज्यांना उन्माद वायु झाला आहे, किंवा पिशाच्चबाधा झाली आहे, अगर जे मद्यपान करून उल्लू बनले आहेत, अशांचे बोल कधींहि शुद्धींत अगर विचारपूर्वक निघत नाहींत.

जिन्ह कृत महा–मोह–मद–पाना।
तिन्ह कर कहा करिय नहिँ काना।

ज्यांनीं महामोहरूपी मदाचें पान केलें आहे, त्यांचे प्रलाप कानांवरच घेऊं नयेत.

**सो०—अस निज हृदय बिचारि तजु संसय भजु रामपद। सुनु गिरि-राज-कुमारि भ्रम-तम-रबि-कर बचन मम ॥ १६ ॥**

असा हृदयांत विचार करून हे पार्वति! भ्रमरूपी अंधकारास केवळ रविकिरणाप्रमाणें असलेलें हें माझें वाक्य तूं श्रवण कर आणि संशय टाकून देऊन रामचरणीं शरण जा.

चौ–सगुनहिँ अगुनहिँ नहिँ कछु भेदा।
गावहिँ मुनि पुरान बुध बेदा।
अगुन अरूप अलख अज जोई।
भगत–प्रेम–बस सगुन सो होई।

सगुणांत आणि निर्गुणांत मुळींच भेद नाहीं असें मुनि, पुराणें, पंडित व वेद ध्वनित करतात. जो निर्गुण, अरूप, अलक्ष्य व जन्मरहित तोच भक्तांच्या प्रेमाला भुलून सगुण रूप घेत असतो.

जो गुन रहित सगुन सोइ कैसे।
जलु हिम उपल बिलग नहिँ जैसे।

ज्याप्रमाणें जल आणि गार हीं पृथक् नव्हत, तद्वतच सगुण आणि निर्गुण हीं एकच होत. ( गारही जलाची विकृति असून तिच्यांत व जलांत भिन्नत्व नाहीं).

जासु नाम भ्रम–तिमिर–पतंगा।
तेहि किमि कहिय बिमोहप्रसंगा।

ज्याचें नाममात्र भ्रमरूप अंधकारास नष्ट करणाऱ्या सूर्याप्रमाणें आहे, त्याचे ठायीं व्यामोहप्रसंगाची वार्ता तरी कशी संभवेल?

राम सच्चिदानंद दिनेसा।
नहिँ तहँ मोह निसा–लव–लेसा।

राम सच्चिदानंदरूप सूर्य होत. मोहरूप रात्री[१] लवलेश देखील त्यांचे ठायीं नसतो.

सहज प्रकासरूप भगवाना।
नहिँ तहँ पुनि बिज्ञानबिहाना।

तो भगवान् सहज प्रकाशरूप आहे.तेथें विज्ञानरू प्रातःकालाची पुनरावृत्ति नाहीं

हरष बिषाद ज्ञान अज्ञाना।
जीव धरम अहमिति अभिमाना।
राम ब्रह्म व्यापक जग जाना।
परमानंद परेस पुराना।

हर्ष, विषाद, ज्ञान, अज्ञान,अहंममत्वादि अभिमान हे अज्ञानविशिष्ट जीवाचे धर्म होत. राम व्यापक परब्रह्म, परमानंदरूप, परमेश्वर व सनातन आहे हें सर्व जगास विदित आहे.

**दो०–पुरुष प्रसिद्ध प्रकासनिधि प्रगट परावरनाथ। रघु-कुल-मनि मम स्वामि सोइ कहि सिव नायउ माथ ॥ १२४ ॥**

आदिपुरुष, स्वयंभू, प्रकाशनिधि जो प्रत्यक्ष मायेचा व ब्रह्मांडाचा ईश्वर तोच माझा स्वामी रघुकुलमणि होय." असें म्हणून शिवांनीं नमस्कार केला.

चौ०–निज भ्रम नहिँ समुझहिँ अज्ञानी।
प्रभु पर मोह धरहिँ जड प्रानी।

अज्ञानी जडजीव स्वतःचा व्यामोह न समजू प्रभूवर मोहाचा आरोप करीत असतात.

जथा गगन घनपटल निहारी।
झाँपेउ भानु कहहिँ कुबिचारी।
चितव जो लोचन अंगुलि लाये।
प्रगट जुगल ससि तेहि के भाये।

आकाशांत मेघमंडळ पाहून अविचारी लोक म्हणतात कीं, सूर्य लपून बसला आहे. बोट डोळ्या

[१] रात्रीचा अंत म्हणजे दिवसाचा प्रारंभ.रात्रीचा असंभव म्हणजे दिवसाचें सातत्य. अर्थातच जेथें निशागम आहे तेथें तिचें निर्याणहि असंभवनीय आहे. भगवंताचे ठायीं विज्ञानरूप प्रकाशाचें अनित्यत्व नाहीं. तेव्हां अर्थातच विज्ञानाचा पुनरुदय परमेश्वराचे ठायीं आरोपित करणें दोषास्पद होय.

समोर ठेवून पाहिलें कीं चंद्र प्रत्यक्ष दोन आहेत, अशी भावना होते.

उमा रामविषयक अस मोहा ।
नभ तम धूम धूरि जिमि सोहा ।

पार्वति ! जसें तम, धूम, धूलि हीं आकाशांत दिसतात म्हणून तीं आकाशाचे गुण आहेत असें भासतें ( वस्तुतः आकाश त्यापासून अलिप्त असतें ) तद्वतच रामविषयक मोह होय.

विषय करन सुर जीव समेता ।
सकल एक तें एक सचेता ।
सब कर परम प्रकासक जोई ।
राम अनादि अवधपति सोई ।

विषय, इंद्रियें, त्यांच्या देवता आणि जीव यांच्यासकट सर्वांनाच एकमेकांपासून चैतन्य प्राप्त होत असतें. ( उदाहरणार्थ, दीप. दीपाचा विषय तेज. त्याची प्रतीति चक्षुरिंद्रियद्वारां होते; म्हणजे दीपाचे ठिकाणीं चैतन्य नेत्रांपासून आलें. पण नेत्रांचें चैतन्य सूर्यदेवताजन्य होय आणि देवतांस चैतन्य जीवद्वारां होत असतें हें तात्पर्य.) परंतु या सर्वांना चैतन्य देणारे अनादि अयोध्यापति श्रीरामचंद्रच होत.

जगत प्रकास्य प्रकासक रामू ।
मायाधीस ज्ञान–गुन–धामू ।
जासु सत्यता तें जड माया ।
भास सत्य इव मोहसहाया ।

तस्मात् हें जगत् प्रकाश्य असून श्रीरामचंद्र त्याचे प्रकाशक होत. ज्यांच्या सत्तेनें जड माया अज्ञानामुळें सत्यवत् प्रतीयमान होते, ते मायाधीश ज्ञानगुणधाम श्रीरामचंद्रच होत.

**दो०–रजत सीप महुँ भास जिमि जथा भानु कर बारि । जदपि मृषा तिहु काल सोइ भ्रम न सकइ कोउ टारी ॥ १२५ ॥**

उदाहरणार्थ, शिंपेंत रजताचा किंवा सूर्यकिरणांत जलाचा आभास जरी सर्वकाळ मिथ्याच असला तरी तो भ्रम कोणींच दूर करूं शकत नाहीं.

चौ०–एहि बिधि जग हरि आस्रित रहई ।
जदपि असत्य देत दुख अहई ।

अशा प्रकारें हें विश्व परमेश्वराच्या आश्रयानें राहतें. वास्तविक तें असत्यच आहे. तथापि तें ( सत्यवत् प्रतीत होऊन ) दुःखास मात्र कारणीभूत होत असतें.

जौं सपने सिर काटइ कोई ।
बिनु जागे न दूरि दुख होई ।

आपलें मस्तक कोणी कापीत आहे असें ज्यास स्वप्नांत दिसत असतें त्याचें दुःख तो जागा झाल्याखेरीज जात नसतें.

जासु कृपा अस भ्रम मिटि जाई ।
गिरिजा सोइ कृपालु रघुराई ।
आदि अंत कोउ जासु न पावा ।
मति अनुमान निगम अस गावा ।

पार्वति ! असा हा जगाच्या सत्यत्वाचा भ्रम ज्याच्या कृपेनें नष्ट होतो, तो एक दयाघन रघुराजच होय. त्याचा आदि किंवा अंत कोणी देखील अजमावलेला नाहीं. वेददेखील यथामति अनुमान करून असेंच प्रतिपादन करितात कीः—

बिनु पद चलइ सुनइ बिनु काना ।
कर बिनु करम करइ बिधि नाना ।
आननरहित सकल–रस भोगी ।
बिनु बानी बकता बड जोगी ।
तन बिनु परस नयन बिनु देखा ।
ग्रहइ घ्रान बिनु बास असेखा ।
असि सब भाँति अलौकिक करनी ।
महिमा जासु जाइ नहिं बरनी ।

तो पायावांचून चालतो, कानावांचून ऐकतो, हातावांचून अनेकविध कर्में करितो, मुखावांचून सर्व रसांचा आस्वाद घेतो, वाणीवांचून वक्तृत्व करितो आणि महान् योगी बनतो, देहावांचून स्पर्श करितो, नेत्रावांचून पाहतो, आणि नासिकेवांचून सर्व गंध ग्रहण करितो. अशी त्याची सर्वच करणी अलौकिक असून त्याचा महिमा अवर्णनीय आहे.

**दो०–जेहि इमि गावहिं बेद बुध जाहि धरहिं मुनि ध्यान । सोइ दसरथसुत भगत हित कोसलपति भगवान ॥ १२६ ॥**

ह्याप्रमाणें वेद व पंडित ज्याचें वर्णन करितात आणि मुनि ध्यान करतात, तोच भगवान् भक्तांच्या हितासाठीं दशरथपुत्र अयोध्याधीश ह्या रूपानें अवतीर्ण झाला.

चौ०–कासी मरत जंतु अवलोकी ।
जासु नामबल करउँ बिसोकी ।

सोई प्रभु मोर चराचरस्वामी।
रघुबर सब उर अंतरजामी।

काशींत मरणाऱ्या प्राण्यास पाहून त्यास ज्याच्या नामबलेंकरून मी शोकरहित [ म्हणजे जन्ममरणादि दुःखरहित ] करितों, तोच हा रघुनाथ, चराचर विश्वाचा स्वामी, सर्वांतरसाक्षी माझा प्रभु होय.

बिबसहु जासु नाम नर कहहीं।
जनम अनेक संचित अघ दहहीं।
सादर सुमिरन जे नर करहीं।
भवबारिधि गोपद इव तरहीं।

मायाविवश नरानें देखील ज्याचें नामस्मरण केलें असतां त्याचा अनेक जन्मींचा पापसंचय दग्ध होतो आणि ज्याचें आदरपूर्वक स्मरण करणारे लोक भव-सागर गोष्पदासारखा सहज तरून जातात.

राम सो परमातमा भवानी।
तहँ भ्रम अति अबिहित तव बानी।
अस संसय आनत उर माहीं।
ज्ञान बिराग सकल गुन जाहीं।

हे भवानी! तोच परमात्मा श्रीराम होय. त्याच्या-संबंधानें तुझा संशयात्मक प्रश्न अत्यंत अनुचित आहे. असा संशय मनांत आणणाराचे ज्ञानवैराग्यादि सर्व सद्गुण लयास जातात.

सुनि सिव के भ्रमभंजन बचना।
मिटि गइ सब कुतरक कै रचना।
भइ रघुपति-पद-प्रीति प्रतीती।
दारुन असंभावना बीती।

शंकराचें तें संशयनाशक असें भाषण श्रवण करून, पार्वतीच्या सर्व भ्रमपटलाचें निरसन झालें, व तिच्या हृदयांत रघुपति-चरणांचे ठायीं प्रीति व विश्वास उत्पन्न होऊन, तिच्या दारुण व कुत्सित भावनेचा ऱ्हासहि झाला.

**दो०—पुनि पुनि प्रभु पद-कमल गहि जोरि पंकरुहपानि। बोलीं गिरिजा बचन बर मनहुँ प्रेमरस सानि॥ १२७॥**

वारंवार प्रभुपदकमलांना मिठी मारून व हस्त-कमलें जोडून पार्वती जगूंकाय प्रेमरसाचीं पुटें चढविलीं आहेत, असें उत्कृष्ट भाषण करूं लागली.

चौ०—ससिकर सम सुनि गिरा तुम्हारी।
मिटा मोह सरदातप भारी।
तुम्ह कृपाल सबु संसय हरेऊ।
रामसरूप जानि मोहिँ परेऊ।

आपलें चंद्रकिरणाप्रमाणें भाषण करून माझा शरदातपतुल्य महामोह शांत झाला. हे दयाघन! आपण सर्व संशयांचा निरास केल्यामुळें आतां मला रामस्वरूपाचा बोध झाला.

नाथकृपा अब गयउ बिषादा।
सुखी भइउँ प्रभु-चरन-प्रसादा।

प्रभूंच्या कृपेनें माझा विषाद नष्ट झाला, आणि स्वामींच्या चरणप्रसादें करून मी सुखी झालें.

अब मोहि आपनि किंकरि जानी।
जदपि सहज जड नारि अयानी।
प्रथम जो मैं पूछा सोइ कहहू।
जौं मो पर प्रसन्न प्रभु अहहू।

जरी मी स्वभावतः जड व अज्ञ स्त्री आहे, तरी मला आतां आपली पाईक समजून मी जें प्रथम विचारलें तें, हे प्रभो! जर मजवर आपण सुप्रसन्न असाल तर मजप्रत कथन करावें.

राम ब्रह्म चिन्मय अबिनासी।
सर्ब रहित सब-उर-पुर-बासी।
नाथ धरेउ नरतनु केहि हेतू।
मोहि समुझाइ कहहु बृषकेतु।

राम जर ब्रम्ह, चिन्मय, अविनाशी, निर्गुण व सर्वांच्या हृदयपुरांत वास करणारे आहेत, तर हे वृषकेतो भगवान्! त्यांनीं नरदेह कोणत्या हेतूस्तव धारण केला हें मला समजावून सांगावें.

उमाबचन सुनि परम बिनीता।
रामकथा पर प्रीति पुनीता।

**दो०—हिय हरषे कामारि तब संकर सहज सुजान। बहु बिधि उमहि प्रसंसि पुनि बोले कृपानिधान॥ १२८॥**

उमेचें तें परम विनययुक्त वचन श्रवण करून व तिचें रामकथेवर जडलेलें पवित्र प्रेम पाहून, नित्य-

१ श्रद्धया हेलया नाम वदन्ति मनुजा भुवि।
तेषां नास्ति भयं पार्थ रामनामप्रसादतः॥
प्रमादादविसंस्पृष्टो यथानलकणो दहेत्।
तथौष्ठपुटसंस्पृष्टं रामनाम दहेदघम्॥ आदिपुराण.

विवेकी, मदनारि, दयाघन शंकर मनांत हर्षित झाले आणि ते अनेक प्रकारें पार्वतीची प्रशंसा करून फिरून ह्मणालेः—

**सो०—सुनु सुभ कथा भवानि राम चरित मानस बिमल। कहा भुसुंडि बखानि सुना बिहगनायक गरुड ॥ १७ ॥**

" हे पार्वति, शुभ व पवित्र असें रामचरितमानस ऐक. ही कथा काकभृशुंडीनें वर्णन करून सांगितली व विहंगपति गरुडानें ऐकली.

**सो०—सो संबाद उदार जेहि बिधि भा आगे कहब। सुनहु रामअवतार चरित परम सुंदर अनघ ॥ १८ ॥**

तो उत्कृष्ट [ काकगरुड ] संवाद ज्याप्रमाणें झाला तो पुढें [ उत्तर—कांडांत ] वर्णन करूं. प्रथम परमसुंदर व पावन रामावतार—चरित्र श्रवण कर.

**सो०—हरिगुन नाम अपार कथारूप अगनित अमित। मैं निज-मति-अनुसार कहउँ उमा सादर सुनहु ॥ १९ ॥**

हरीचे गुण व नामें आणि त्याच्या कथा व रूपें अपार, अगणित आणि अपरिमित आहेत. पार्वति ! मी यथामति जें निवेदन करीन तें तूं सद्भावानें श्रवण कर.

चौ०—सुनु गिरिजा हरिचरित सुहाये।
बिपुल बिसद निगमागम गाये।

हे गिरिजे ! ऐक. वेदशास्त्रांनीं उज्ज्वल हरिचारित्रें विपुल गाइलीं आहेत.

हरि अवतार हेतु जेहि होई।
इदमित्थं कहि जाइ न सोई।
राम अतर्क्य बुद्धि मन बानी।
मत हमार अस सुनहि सयानी।

हरीचा अवतार ज्या हेतूस्तव होतो तो हेतु नेमका अमुकच आहे, असें सांगणें शक्य नाहीं. तूं सुज्ञच आहेस, पण माझ्या मतें बुद्धीनें, मनानें किंवा वाणीनें रामचंद्र अतर्क्य आहेत.

तदपि संत मुनि बेद पुराना।
जस कछु कहहिँ स्व—मति—अनुमाना।
तस मैं सुमुखि सुनावउँ तोही।
समुझि परइ जस कारन मोही।

हे सुमुखि ! तथापि स्वबुद्धीला अनुसरून संत, मुनि, वेद व पुराणें यांनीं जसें वर्णन केलें आहे व मला जसें समजलें आहे, त्याप्रमाणें रामावताराचें कारण मी तुला निवेदन करितों.

जब जब होइ धरम कै हानी।
बाढहि असुर अधम अभिमानी।
करहिँ अनीति जाइ नहिँ बरनी।
सीदहिँ बिप्र धेनु सुर धरनी।
तब तब प्रभु धरि बिबिध सरीरा।
हरहि कृपानिधि सज्जनपीरा।

जेव्हां जेव्हां ह्मणून धर्माची ग्लानि होते, दुष्ट व उन्मत्त राक्षस यांचा उदय होऊन ते अनिर्वाच्य प्रकारेंकरून नीतिबाह्य वर्तन करूं लागतात आणि ब्राम्हण, गाई, देव, व पृथ्वी हीं संत्रस्त होतात, तेव्हां तेव्हां दयासागर प्रभु नानाविध शरीरें धारण करून सज्जनांची पीडा हरण करितात.

**दो०—असुर मारि थापहिँ सुरन्ह राखहिँ निज स्रुति सेतु। जग बिस्तारहिँ बिषद जस रामजनम कर हेतु ॥ १२९ ॥**

असुरांचा वध करून देवांची स्थापना करणें व आपल्या वेदरूप सेतूचें रक्षण करून आपल्या सोज्ज्वळ यशाचा जगांत प्रसार करणें हाच रामजन्माचा हेतु होय.

चौ०—सोइ जस गाइ भगत भव तरहीँ।
कृपासिंधु जन हित तनु धरहीँ।

भक्तजन त्याच यशाचें गान करून भवसागर तरून जातात. [ अतएव ] कृपासागर प्रभु जनांच्या कल्याणाकरितांच देह धारण करितात (हें स्पष्ट होतें).

रामजनम कै हेतु अनेका।
परम बिचित्र एक तें एका।
जनम एक दुइ कहउँ बखानी।
सावधान सुनु सुमति भवानी।

रामजन्माचीं कारणें अनेक आहेत व तीं एकापेक्षां एक परमविचित्र आहेत. त्यांपैकीं एखादा दुसरा जन्म मी सविस्तर सांगतों. हे सुमति पार्वति ! तूं सावधान चित्तेंकरून ऐक.

द्वारपाल हरि के प्रिय दोऊ।
जय अरु बिजय जान सब कोऊ।

विप्रस्राप तेँ दूनउँ भाई ।
तामस असुर देह तिन्ह पाई ।

जय आणि विजय या नांवाचे श्रीहरीचे द्वारपाळ सर्वांना विदितच आहेत. ते दोघेहि बंधु विप्रशापानें दैत्यदेह पावले.

कनककसिपु अरु हाटकलोचन ।
जगत विदित सुर-पति-मद-मोचन ।
बिजई समर बीर बिख्याता ।
धरि बराह बपु एक निपाता ।
होइ नरहरि दूसर पुनि मारा ।
जन प्रह्लादसुजस बिस्तारा ।

तेच हिरण्यकश्यपु आणि हिरण्याक्ष होत. त्यांनीं सुरपति इंद्राचाहि गर्व हरण केला, हें सर्व जगाला महशूरच आहे. ते प्रख्यात वीर रणांत नेहमीं यशस्वीच होत असत. त्यांच्यापैकीं हिरण्याक्षाचा भगवंतानें वराहरूप घेऊन वध केला. नरहरिरूपानें प्रकट होऊन श्रीहरीनें दुसऱ्याचाहि वध केला व भक्त प्रह्लादाची कीर्ति जगांत गाजविली.

**दो०—भये निसाचर जाइ तेइ महाबीर बलवान। कुंभकरन रावन सुभट सुरबिजई जग जान ॥ १३० ॥**

पुढें ते दोघे राक्षसयोनींत जाऊन महावीर, बलाढ्य, जगत्प्रसिद्ध, सुरविजयी, युद्ध-कुशल रावण-कुंभकर्ण झाले.

चौ०—मुकुत न भये हते भगवाना ।
तीनि जनम द्विजबचन प्रमाना ।

भगवंतांनीं त्यांचा वध केला तरी ते मुक्त झाले नाहींत; कारण ऋषिशाप तीन जन्मांपर्यंतचा होता.

एक बार तिन्ह के हित लागी ।
धरेउ सरीर भगतअनुरागी ।

कस्यप अदिति तहाँ पितु माता ।
दसरथ कौसल्या बिख्याता ।

म्हणून पुन्हां एकवार त्यांच्या हितास्तव भक्त-वत्सल प्रभूनें अवतार घेतला. त्या वेळीं कश्यप व अदिती हे प्रख्यात दशरथ-कौसल्या होऊन, त्यांचे पोटीं भगवंतांनीं जन्म घेतला.

एक कलप एहि बिधि अवतारा ।
चरित पवित्र किए संसारा ।

एका कल्पांत याप्रकारें अवतार घेऊन, भग-वंतांनीं जगास पवित्र करणारीं चरित्रें केलीं.

एक कलप सुर देखि दुखारे ।
समर जलंधर सन सब हारे ।
संभु कीन्ह संग्राम अपारा ।
दनुज महाबल मरइ न मारा ।
परम सती असुराधिपनारी ।
तेहि बल ताहि न जितहिँ पुरारी ।

एका कल्पांत सर्व देव जालंधर-दैत्याशीं युद्ध करीत असतां पराभूत झाले. त्यांचें दुःख पाहून महादेवांनींहि त्याच्याशीं युद्ध केलें. तो महाबलाढ्य दैत्य कांहीं केल्या मरेना. कारण त्या दैत्यराजाची स्त्री महान् पतिव्रता असे. तिच्या तपोबलामुळें महादेवाला देखील त्याला जिंकतां येईना.

**दो०—छल करि टारेउ तासु ब्रत प्रभु सुर-कारज कीन्ह। जब तेहि जानेउ मरम तब साप कोप करि दीन्ह ॥ १३१ ॥**

परंतु प्रभु महाविष्णूंनीं कपट करून तिचा व्रतभंग केला आणि सुरकार्य केलें. जेव्हां त्या पतिव्रतेनें

---

१ एके प्रसंगीं सनकादिऋषी वैकुंठलोकीं श्रीहरीच्या दर्शनाकरितां गेले. जयविजयांनीं त्यांना अटकाव केला. ते म्हणाले कीं, भगवंताची आज्ञा विचारून मग तुम्हांला आंत सोडतों. त्यामुळें ऋषींस विषाद वाटला आणि त्यांनीं शाप दिला कीं, तुम्ही दैत्य व्हाल. तेव्हां जयविजय शरण गेले असतां ऋषींनीं उःशाप दिला कीं, तुम्ही दैत्य व्हालच; तथापि प्रत्येक जन्मीं तुमच्या मरणाकरितां परमेश्वरास अवतार घ्यावा लागेल आणि अशा प्रकारें तिसऱ्या जन्मीं तुम्हीं मुक्त व्हाल.

१ जालंदराची स्त्री वृंदा. ती निःसीम पतिव्रता होती. महादेवासहि जेव्हां युद्धांत यश मिळेना तेव्हां विष्णु तिच्याकडे ब्राह्मणवेषानें गेले. तिनें युद्धवार्ता विचारिली. इतक्यांत मायिक हस्तपादादिक अवयव तिच्या समोर येऊन पडले. तीं पतीचीं गात्रें आहेत असें पाहून वृंदा विलाप करूं लागली. तेव्हां विष्णु म्हणाले— रडतेस कां? तूं पतिव्रता आहेस; अंगें जोडून पतीस सजीव कर. तिनें तसेंच केलें व त्या पुरुषाची सेवा करीत बसली. तो परपुरुष. अर्थात् तिच्या पाति-व्रत्याचा भंग झाला. तिकडे शत्रूंनीं जालंदराचा वध केला. हें कपट वृंदेनें लवकरच जाणलें. तेव्हां तिनें विष्णूस शाप दिला कीं, आपणांस जन्म घ्यावा लागेल. आपली स्त्री माझा पति हरण करील व आपण स्त्रीविरहानें दुःखित व्हाल.

हें सर्व मर्म ओळखिलें तेव्हां तिनें क्रुद्ध होऊन शाप दिला.

चौ०—तासु साप हरि दीन्ह प्रवाना।
कौतुकनिधि कृपाल भगवाना।
तहाँ जलंधर रावन भयऊ।
रन हति राम परम पद दयऊ।
एक जनम कर कारन एहा।
जेहि लगि राम धरी नर देहा।

कौतुकनिधि दयाळू भगवंतांनीं तिच्या शापाचा अंगीकार केला. तदनुसार जालंधर रावण झाला. त्याचा रणांत वध करून रामांनीं त्यास कैवल्यपदीं नेलें. एका जन्मीं रामाला ज्याकरितां नरदेह धारण करावा लागला त्याचें कारण हें आहे.

अतिअवतार कथा प्रभु केरी।
सुनु मुनि बरनी कबिन्ह घनेरी।

भरद्वाजा! ऐक. प्रभूच्या प्रत्येक अवतारांतील कथा कवींनीं बहुविध वर्णिल्या आहेत.

नारद साप दीन्ह एक बारा।
कलप एक तेहि लगि अवतारा।

एके वेळीं नारदानें शाप दिला होता त्या कारणास्तव एका कल्पांत रामावतार झाला.

गिरिजा चकित भई सुनि बानी।
नारद बिष्णुभगत मुनि ज्ञानी।
कारन कवन साप मुनि दीन्हा।
का अपराध रमापति कीन्हा।
यह प्रसंग मोहि कहहु पुरारी।
मुनिमन मोह आचरज भारी।

हें ऐकतांच पार्वतीस आश्चर्य वाटलें. (ती म्हणाली) " नारदमुनि तर महाज्ञानी व विष्णुभक्त असून त्यांनीं शाप देण्यास काय कारण झालें? रमापतींनीं त्यांचा असा कोणता अपराध केला होता? हे पुरारे! ह्या प्रसंग मला कथन करावा. मुनींच्या चित्तासहि मोह हें मोठेंच आश्चर्य. "

**दो०—बोले बिहँसि महेस तब ज्ञानी मूढ न कोइ। जेहि जस रघुपति करहिँ जब सो तस तेहि छन होइ ॥ १३२ ॥**

तेव्हां शंकर हंसून म्हणाले कीं, या जगांत कोणी ज्ञानीहि नाहींत व मूढहि नाहींत. रघुपती ज्या रीतीनें, जी गोष्ट, ज्या वेळीं करतील, तीच तशीच त्याच क्षणीं घडत असते.

**सो०—कहउँ राम-गुन-गाथ भरद्वाज सादर सुनहु। भवभंजन रघुनाथ भजु तुलसी तजि मान मद ॥ २० ॥**

हे भरद्वाजा! मी रामगुणकथा निवेदन करितों, ती सादर श्रवण कर. हे तुलसीदासा! रघुनाथ हे भवसागरांतून सोडविणारे आहेत. अभिमान व उन्मत्तपणा सोडून त्यांचीच आराधना कर.

चौ०—हिम-गिरि-गुहा एक अति पावनि।
बह समीप सुरसरी सुहावनि।
आस्रम परम पुनीत सुहावा।
देखि देवरिषि मन अति भावा।

हिमालयावर एक अत्यंत पवित्र गुहा आहे. तिच्या समीपच सुंदर गंगा वहात आहे. तें परमपवित्र व मनोहर स्थान पाहून देवर्षि नारदांच्या मनास तें फार आवडलें.

निरखि सैल सरि बिपिनबिभागा।
भयउ रमा-पति-पद अनुरागा।
सुमिरत हरिहि सासगति बाधी।
सहज बिमल मन लागि समाधी।

पर्वत, गंगा व विपिन-प्रदेश पाहून त्यांचे हृदयांत हरिपदीं प्रेम उसळलें. हरीचें स्मरण करितां करितां त्यांची श्वासगति रुद्ध झाली व स्वभावतःच मन शुद्ध असल्यामुळें त्यांस समाधि लागली!

मुनिगति देखि सुरेस डेराना।
कामहिँ बोलि कीन्ह सनमाना।
सहित सहाय जाहु मम हेतू।
चलेउ हरषि हिय जल—चर—केतू।

नारदांची स्थिति पाहून इंद्रास भय वाटलें. त्यानें मदनास आदरपूर्वक बोलावलें. [ तो म्हणाला, ] माझ्यासाठीं तूं सैन्य घेऊन जा. [ त्याप्रमाणें ] मदन हर्षित अंतःकरणानें निघाला.

सुनासीरमन महँ असि त्रासा।
चहत देवरिषि मम पुर बासा।
जे कामी लोलुप जग माहीँ।
कुटिल काक इव सबहि डेराहीँ।

इंद्राच्या मनांत अशी विवंचना उत्पन्न झाली कीं देवर्षि माझ्या इंद्रपदाची इच्छा करीत आहेत.

जगांत जे कामी व लोभी असतात, ते कुटिल काकाप्रमाणें सर्वांशींच आगळीक करीत सुटतात.

**दो०—सूख हाड लेइ भाग सठ स्वान निरखि मृगराज । छीनी लेइ जनि जानि जड तिमि सुरपतिहि न लाज ॥ १३३ ॥**

सिंहास अवलोकन करितांच श्वान शुष्क अस्थि देखलि मूर्खत्वामुळें घेऊन पळत सुटतो. जणूं काय सिंह तें हिरावूनच घेईल असें त्या मूर्खास वाटत असतें. त्याप्रमाणेंच इंद्रालाहि [ नारदाविषयीं चित्तांत विकल्प ठेवण्यास ] लाज वाटली नाहीं.

**चौ०—तेहि आस्रमहि मदन जब गयऊ ।**
**निज माया बसंत निरमयऊ ।**

मदन जेव्हां त्यांच्या आश्रमाजवळ जाऊन पोहोंचला तेव्हां त्यानें आपल्या मायेनें वसंत ऋतु निर्माण केला.

**कुसुमित बिबिध बिटप बहुरंगा ।**
**कूजहिँ कोकिल गुंजहिँ भृंगा ।**
**चली सुहावनि त्रिबिध बयारी ।**
**कामकृसानु बढावनिहारी ।**
**रंभादिक सुरनारि नबीना ।**
**सकल असम-सर-कला-प्रबीना ।**
**करहिँ गान बहु तान तरंगा ।**
**बहु बिध क्रीडहिँ पानि पतंगा ।**

अनेक रंगांचे नानाविध वृक्ष प्रफुल्लित झाले. कोकिल मधुर स्वरानें कूजन करूं लागले. मधुकर गुंजारव करूं लागले. मनोहर त्रिविध वायु वाहूं लागला. कामाग्नीस प्रज्वलित करणाऱ्या कामसंबंधीं सकल कलांत प्रवीण आणि सदा यौवनभरांत असलेल्या अशा रंभादिक अप्सरा बहुतानतरंगयुक्त गायन करूं लागल्या; व पाणिपतंगादिक [ पतंग उडविण्याचा भाव दाखवून नाचणें, चेंडू खेळणें इत्यादि ] नानाविध क्रीडा करूं लागल्या.

**देखि सहाय मदन हरषाना ।**
**कीन्हेसि पुनि प्रपंच बिधि नाना ।**

ती जय्यत तयारी पाहून मदनास आनंद लोटला. त्यानें स्वतःच्या मायालाघवाची शिकस्त करून सोडली.

**कामकला कछु मुनिहि न व्यापी ।**
**निज भय डरेउ मनोभव पापी ।**

( तथापि ) नारदमुनी त्या कामकुसरीनें अणुमात्र देखील डगमगले नाहींत. तेव्हां मात्र तो पापी मदन स्वतःबद्दल भयभीत झाला.

**सीम कि चाँपि सकइ कोउ तासू ।**
**बड रखवार रमापति जासू ।**

रमापतीच ज्याचा निधडा रक्षक त्याचें शेत कोण खाऊं शकेल ?

**दो०—सहित सहाय सभीत अति मानि हारि मन मैन । गहेसि जाइ मुनिचरन तब कहि सुठि आरत बैन ॥ १३४ ॥**

सैन्यासह भयभीत होऊन व आपला पराजय कबूल करून, मदनानें महर्षीकडे जाऊन त्यांचे चरणांवर लोटांगण घातलें आणि दीनवाणीनें तो त्यांची करुणा भाकूं लागला.

**चौ०—भयउ न नारद मन कछु रोषा ।**
**कहि प्रिय बचन काम परितोषा ।**
**नाइ चरन सिरु आयसु पाई ।**
**गयउ मदन तब सहित सहाई ।**

नारदांच्या मनांत मुळींच क्रोध नव्हता. त्यांनीं प्रियवचनें बोलून कामदेवाचें सांत्वन केलें. तेव्हां त्यांच्या चरणीं मस्तक ठेवून कामदेव आपल्या काफल्यासह त्यांची आज्ञा घेऊन पसार झाला.

**मुनि सुसीलता आपनि करनी ।**
**सुर-पति-सभा जाइ सब बरनी ।**
**सुनि सब के मन अचरज आवा ।**
**मुनिहि प्रसंसि हरिहि सिरु नावा ।**

नारदांनीं आपल्या सौजन्याचें व व्रताचें वर्णन इंद्रसभेंत जाऊन सविस्तर रीतीनें केलें. तें ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. त्या सर्वांनीं मुनींची प्रशंसा करून श्रीहरीस नमन केलें.

**तब नारद गवने सिव पाहीँ ।**
**जिता काम अहमिति मन माहीँ ।**
**मारचरित संकरहि सुनाये ।**
**अतिप्रिय जानि महेस सिखाये ।**

नंतर मी काम जिकला अशा आढ्यतेनें नारदमुनी शंकराकडे गेले व त्यांना मदनाचें सर्व चरित्र सांगितलें. नारदास अत्यंत प्रिय समजून शंकरांनीं उपदेश केला कीं,—

बार बार बिनवउँ मुनि तोही।
जिमि यह कथा सुनायहु मोही।
तिमि जनि हरिहि सुनायहु कबहूँ।
चलेहु प्रसंग दुरायहु तबहूँ।

हे मुने ! मी तुला वारंवार विनंति करितों कीं, जसा हा वृत्तांत तूं मला सांगितलास, तसा श्रीहरीसमोर मात्र कधींहि सांगूं नकोस. [ कदाचित् चुकून बोलशील तर ] प्रसंग ओढवेल आणि प्रभु तुला दुरावतील.

दो०—संभु दीन्ह उपदेस हित नहिँ नारदहि सुहान। भरद्वाज कौतुक सुनहु हरिइच्छा बलवान ॥ १३५ ॥

शंकरांनीं हितोपदेश केला, पण तो नारदास मानवला नाहीं. हे भरद्वाजा ! हरीची इच्छा प्रबल आहे. पुढील मौज ऐक.

चौ०—राम कीन्ह चाहहिँ सोइ होई।
करइ अन्यथा अस नहिँ कोई।
संभुबचन मुनि मन नहिँ भाये।
तब बिरंचि के लोक सिधाये।

रामाच्या इच्छेनुसारच सर्व कांहीं घडून येणार. त्यांची इच्छा अन्यथा करण्यास कोणीच समर्थ नाहीं. शंकरांचा उपदेश मुनींच्या मनास रुचला नाहीं. नंतर ते ब्रह्मलोकास गेले.

एक बार करतल बर बीना।
गावत हरि गुन गानप्रबीना।
छीरसिंधु गवने मुनिनाथा।
जहँ बस श्रीनिवास स्रुतिमाथा।

एके समयीं हातांत सुंदर वीणा घेऊन हरीचे गुण गात गात गायनप्रवीण नारद मुनीश्वर जेथें वेदशीर्ष श्रीहरि वास करितात, त्या क्षीरसिंधूप्रत गमन करते झाले.

हरषि मिलेउ उठि रमानिकेता।
बैठे आसन रिषिहि समेता।
बोले बिहँसि चराचरराया।
बहुते दिनन्ह कीन्हि मुनि दाया।

नारदास श्रीहरि उत्थानपूर्वक आनंदानें भेटले, आणि नारदासह आसनावर अधिष्ठित झाले. चराचराचे स्वामी श्रीरमापति स्मितहास्य करून म्हणाले—आज मुनींनीं बहुत दिवसांनीं आमचेवर अनुग्रह केला.

काम चरित नारद सब भाखे।
जद्यपि प्रथम बरजि सिव राखे।

नारदांनीं सर्व कामचरित्र, जरी शंकरांनीं सांगूं नको म्हणून बजाविलें होतें, तरी श्रीहरीला सांगून टाकलेंच.

अतिप्रचंड रघुपति कै माया।
जेहि न मोह अस को जग जाया।

रघुपतीची माया अति प्रचंड आहे. त्या मायेनें ज्याला मोह घातला नाहीं असा मायेचा पूत या जगांत कोण आहे ?

दो०—रूख बदन करि बचन मृदु बोले श्रीभगवान। तुम्हरे सुमिरन तें मिटहिँ मोह मार मद मान ॥ १३६ ॥

रुक्ष वदन करून भगवंत मृदुवाणीनें म्हणाले—"तुमच्या नामस्मरणमात्रेंकरूनच मोह, मद, अभिमान हे गळून जातील. ( मग प्रत्यक्ष तुमचा काम जर नष्ट झाला तर त्यांत नवल तें काय ? ).

चौ०—सुनु मुनि मोह होइ मन ताके।
ग्यान बिराग हृदय नहिँ जाके।
ब्रह्मचरज-ब्रत-रत मतिधीरा।
तुम्हहिँ कि करइ मनोभव पीरा।

मुने ! ऐका. ज्यांच्या हृदयांत ज्ञान किंवा वैराग्य यांना रीघ मिळत नाहीं त्यांच्याच मनांत मोहाला वाव मिळतो. तुम्ही तर नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रती आणि स्थितप्रज्ञ आहांत. तुम्हाला मदन काय पीडा करूं शकणार ? "

नारद कहेउ सहित अभिमाना।
कृपा तुम्हारि सकल भगवाना।

[ हे ऐकून ] नारद अभिमानानें म्हणाले, भगवन् ही सर्व आपली कृपा आहे.

करुनानिधि मन दीख बिचारी
उर अंकुरेउ गर्बतरु भारी।
बेगि सो मैँ डारिहउँ उखारी।
पन हमार सेवकहितकारी।
मुनि कर हित मम कौतुक होई।
अवसि उपाय करबि मैँ सोई।

करुणानिधींनीं मनांत विचार करून पाहिलें कीं, नारदाच्या हृदयांत विशाल गर्वतरु अंकुरित झाला आहे व तो मला लवकरच उपटून काढला पाहिजे.

कारण सेवकाचें हित करणें हें माझें ब्रीद आहे. अशीच योजना आतां अवश्य केली पाहिजे कीं, जेणेंकरून मुनीचें हित होऊन माझाहि विनोद होईल.

तब नारद हरिपद सिरु नाई ।
चले हृदय अहमिति अधिकाई ।
श्रीपति निज माया तब प्रेरी ।
सुनहु कठिन करनी तेहि केरी ।

नंतर नारद हरिचरणीं वंदन करून आणि मनांत अहंकारानें जास्तच फुल्लून जाऊन गमन करते झाले. तेव्हां श्रीपतींनीं आपल्या मायेस प्रेरणा केली. आतां तिचें गचगचीचें कारस्थान ऐक.

दो०–बिरचेउ मगु महुँ नगर तेहि सत-
जोजन बिस्तार । श्री-निवास-पुर तें
अधिक रचना बिबिध प्रकार ॥ १३७ ॥

त्या मायेनें नारदांच्या मार्गांतच शंभर योजनें विस्तीर्ण असें एक नगर निर्माण केलें. त्याची रचना वैकुंठापेक्षांहि पुष्कळ पटीनें सरस होती.

चौ०–बसहिँ नगर सुंदर नर नारी ।
जनु बहु मनसिज रति तनुधारी ।

त्या नगरांत राहणारे स्त्रीपुरुष इतके सुंदर कीं, जणूंकाय ते मूर्तिमंत रतिमदनच वाटत.

तेहि पुर बसइ सीलनिधि राजा ।
अगनित हय गय सेन समाजा ।
सत सुरेस सम बिभव बिलासा ।
रूप तेज बल नीति निवासा ।

त्या नगरांत राजा शीलनिधि राज्य करीत होता. त्याजपाशीं हत्ती, घोडे, सैन्य व समाज अगणित होता. त्याचे ऐश्वर्यविलास शत-इंद्रांप्रमाणें असून, रूप तेज, बल व नीति यांचें तर तो केवळ आगरच होता.

बिस्वमोहनी तासु कुमारी ।
श्री बिमोह जेहि रूप निहारी ।
सोइ हरि माया सब–गुन–खानी ।
सोभा तासु कि जाइ बखानी ।

त्याच्या कन्येचें नांव विश्वमोहिनी होतें. तिचें रूप पाहून लक्ष्मीदेखील खजिल होई. तीच सर्व गुणांची खाण अशी भगवन्माया होय. तिचें सौंदर्य कोण वर्णन करूं शकेल ?

करइ स्वयंबर सो नृपबाला ।
आये तहँ अगनित महिपाला ।

राजानें कन्येचें स्वयंवर मांडलें होतें व तन्निमित्त तेथें अनेक राजे गोळा झाले होते.

मुनि कौतुकी नगर तेहि गयऊ ।
पुरबासिन्ह सब पूछत भयऊ ।

नारद मजेखातर त्या नगरांत शिरले आणि शहरच्या लोकांजवळ चौकशी करूं लागले.

सुनि सब चरित भूपगृह आये ।
करि पूजा नृप मुनि बैठाये ।

सर्व वर्तमान ऐकल्यानंतर नारद राजमंदिरांत आले. राजानें त्यांना आसन देऊन त्यांची पूजा केली.

दो०–आनि देखाई नारदहि भूपति राज-
कुमारि । कहहु नाथ गुन दोष सब
एहि के हृदय बिचारि ॥ १३८ ॥

राजानें नारदास कन्या आणून दाखविली. ( तो म्हणाला ) महाराज, आपण विचार करून इचे गुणदोष सर्व कथन करावेत.

चौ०–देखि रूप मुनि बिरति बिसारी
बडी बार लगि रहे निहारी ।
लच्छन तासु बिलोकि भुलाने ।
हृदय हरष नहिँ प्रगट बखाने ।

तिचें रूप पाहतांच नारदांचें वैराग्य मावळलें व ते बराच वेळ तिजकडे पहातच राहिले. तिचीं लक्षणें पाहून ते हुरळून गेले. त्यांच्या हृदयांत अत्यानंद झाला, परंतु तो त्यांनीं बोलून प्रगट केला नाहीं.

जो एहि बरइ अमर सोइ होई ।
समरभूमि तेहि जीत न कोई ।
सेवहिँ सकल चराचर ताही ।
बरइ सीलनिधि कन्या जाही ।

( ते ह्मणाले ) हे शीलनिधे ! जो इला वरील तो अमर होईल, व समरभूमीवर त्याला कोणीहि जिंकूं शकणार नाहीं. ही ज्याचें पाणिग्रहण करील त्याच्या सर्व चराचर विश्व अंकित होऊन राहील.

लच्छन सब बिचारि उर राखे ।
कछुक बनाइ भूप सन भाखे ।

सुता सुलच्छन कहि नृप पाहीं ।
नारद चले सोच मन माहीं ।

एकंदर सर्व लक्षणांचा विचार त्यांनीं आपल्या मनांतच गुप्त ठेविला; फक्त कांहीं थोड्याशा गोष्टी बनवून राजाला सांगितल्या. कन्या सुलक्षणी आहे असें राजास सांगून नारद चालते झाले. त्यांच्या मनांत विचार घोळूं लागले कीं :—

करउँ जाइ सोइ जतन बिचारी ।
जेहि प्रकार मोहि बरइ कुमारी ।
जब तप कछु न होइ तेहि काला ।
हे विधि मिलइ कवन बिधि बाला ।

जेणेंकरून ही कुमारी मलाच माळ घालील अशा प्रयत्नास आतांच जाऊन निश्चयानें लागलें पाहिजे. या वेळेस तर मला जप-तप कांहींएक सुचेनासें झालें आहे. हे विधे ! ही बाला कोणत्या उपायानें माझ्या हातीं लागेल बरें ?

**दो०—एहि अवसर चाहिय परम सोभा रूप बिसाल । जो बिलोकि रीझइ कुअँरि तब मेलइ जयमाल ॥ १३९ ॥**

ह्या प्रसंगीं खरी आवश्यकता ह्मणजे सर्वोत्कृष्ट लावण्याची आणि अलौकिक सौंदर्याचीच आहे. तें पाहून जर ही भाळली तर खात्रीनें मलाच जयमाळ घालील.

चौ०—हरि सन मागउँ सुंदरताई ।
होइहि जात गहरु अति भाई ।
मोरे हित हरि सम नहिं कोऊ ।
एहि अवसर सहाय सोइ होऊ ।

मी श्रीहरीपासूनच सौंदर्य उसनें घेऊन येईन, पण अहो ! जाण्यायेण्यांतच सारा वेळ निघून जाणार ! माझा हितचिंतक हरीइतका कोणीच नाहीं. ह्या वेळेस माझी बाजू तोच सावरून धरो !

बहु बिधि बिनय कीन्हि तेहि काला ।
प्रगटेउ प्रभु कौतुकी कृपाला ।
प्रभु बिलोकि मुनिनयन जुडाने ।
होइहि काजु हिये हरषाने ।

त्या वेळीं नारदांनीं परोपरीनें प्रभूस आळविलें. त्याप्रमाणें विनोदप्रिय दयाघन प्रभु आविर्भूत झाले. त्यांच्या दर्शनानें नारदाचे नेत्र शीतल झाले व आपलें कार्य आतां होणारच म्हणून त्यांच्या हृदयास हर्ष झाला.

अतिआरति कहि कथा सुनाई ।
करहु कृपा करि होहु सहाई ।
आपन रूप देहु प्रभु मोहीं ।
आन भाँति नहिं पावउँ ओही ।
जेहि बिधि नाथ होइ हित मोरा ।
करहु सो बेगि दास मैं तोरा ।

अत्यंत काकुळतीनें सर्व वृत्तान्त सांगून ते म्हणाले—प्रभो ! मजवर दया करावी आणि माझी बूज राखावी. प्रभो ! आपलें स्वरूप आपणच मला द्यावें, इतर मार्गानें तें मला साध्य नाहीं. हे नाथ ! जेणेंकरून माझें हित होईल तेंच सत्वर आपण केलें पाहिजे. मी आपला दास आहे.

निज मायाबल देखि बिसाला ।
हिय हँसि बोले दीनदयाला ।

आपल्या मायेचें विशाल बल पाहून व मनांतल्या मनांत हंसून दीनदयाळ म्हणाले:—

**दो०—जेहि बिधि होइहि परमहित नारद सुनहु तुम्हार । सोइ हम करब न आन कछु बचन न मृषा हमार ॥ १४० ॥**

नारदा ! ऐका. जेणेंकरून तुमचें परमहित साधेल तेंच मी करीन, अवांतर कांहींएक करणार नाहीं. माझें वाक्य अन्यथा होणार नाहीं.

चौ०—कुपथ माँग रुजब्याकुल रोगी ।
बैद न देइ सुनहु मुनि जोगी ।
एहि बिधि हित तुह्मार मैं ठयऊ ।
कहि अस अंतरहित प्रभु भयऊ ।

हे योगी मुने ! व्याधिग्रस्त रोगी कुपथ्य मागतो, पण वैद्य तें देत नाहीं, हें ऐकून ठेवा. त्याचप्रमाणें मीहि तुमचें हित निश्चित केलें आहे. इतकें सांगून प्रभु अंतर्धान पावले.

मायाबिबस भये मुनि मूढा ।
समुझी नहिं हरिगिरा निगूढा ।
गवने तुरत तहाँ रिषिराई ।
जहाँ स्वयंबरभूमि बनाई ।

मायेनें ग्रस्त झालेला तो नारदमुनि हतबुद्ध झाला होता. प्रभूंची अत्यंत खोचदार वाणी त्याच्या लक्षांत

आली नाहीं. तो मुनिश्रेष्ठ मोठ्या लगबगीनें जेथें स्वयंवरमंडप उभारला होता तेथें गेला.

निज निज आसन बैठे राजा।
बहु बनाव करि सहित समाजा।

राजे लोक आपापल्या आसनावर आपल्या परिवारासहित खूपच नटून थटून बसले होते.

मुनिमन हरष रूप अति मोरे।
मोहि तजि आनहि बरिहि न भोरे।

सर्वांत माझेंच रूप श्रेष्ठ म्हणून मला टाकून ही वधू चुकून देखील दुसऱ्यास वरणार नाहीं याच आनंदांत मुनीचें मन चूर होतें.

मुनिहित कारन कृपानिधाना।
दीन्ह कुरूप न जाइ बखाना।

मुनींच्या कल्याणास्तव कृपाघन प्रभूनें त्यास अजब कुरूप केलें होतें.

सो चरित्र लखि काहु न पावा।
नारद जानि सबहि सिर नावा।

ही गोष्ट कोणाच्याच लक्षांत आली नाहीं. नारद जाणून त्यास सर्वांनीं वंदन केलें.

**दो०—रहे तहाँ दुइ रुद्रगन ते जानहिँ सब भेउ। बिप्रबेष देखत फिरहिँ परम कौतुकी तेउ॥ १४१॥**

तेथें दोन रुद्रगण होते. त्यांनीं मात्र सर्व बिंग जाणलें. तेहि फार हौशी असल्यामुळें ब्राह्मणवेषानें मौज पहात फिरत होते.

चौ०—जेहि समाज बैठे मुनि जाई।
हृदय रूपअहमिति अधिकाई।
तहँ बैठे महेसगन दोऊ।
बिप्रबेष गति लखइ न कोऊ।

आपल्याच रूपाच्या घमेंडींत चूर असलेले नारद ज्या मंडळींत जाऊन बसले तेथेंच ते दोघे रुद्रगणहि आपणांस कोणी पाहूं नये म्हणून ब्राह्मण—वेषांत जाऊन बसले.

करहिँ कूटि नारदहि सुनाई।
नीकि दीन्हि हरि सुंदरताई।
रीझिहि राजकुअँरि छबि देखी।
इन्हहिँ बरिहि जानि बिसेखी।

हरीनें सौंदर्य तर खूपच दिलें आहे. राजकन्या हें रूप पाहून खास भाळलीच पाहिजे. बहुतेक श्रीहरि समजून यांनाच ती माळ घालणार. [ अशा प्रकारें ] ते रुद्रगण नारदास ऐकूं जाईल इतक्या बेतानें त्यांची आडून टर उडवूं लागले.

मुनिहि मोह मन हाथ पराये।
हँसहि संभुगन अति सचुपाये।
जदपि सुनहिँ मुनि अटपटि बानी।
समुझि न परइ बुद्धि—भ्रम—सानी।

मुनीस मोह झाल्या कारणानें त्यांचें मन दुसऱ्याच्या ( राजकन्येच्या ) तावडींत सांपडलें होतें. शंभुगण मात्र चोरून लपून हंसत. जरी त्यांचें कुजबुजणें नारद ऐकत होते, तरी त्यांची बुद्धि भ्रांत झाल्यामुळें त्यांस तें उमगेना.

काहु न लखा सो चरित बिसेखा।
सो सरूप नृपकन्या देखा।
मर्कटबदन भयंकर देही।
देखत हृदय क्रोध भा तेही।

हें चरित्र बहुधा कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं. राजकन्येची मुनींच्या त्या स्वरूपाकडे दृष्टि गेली. त्यांचें मर्कटवदन व भयंकर देह पाहून ती चांगलीच फणफणली.

**दो०—सखी संग लेइ कुअँरि तब चलि जनु राजमराल। देखत फिरहि महीप सब करसरोज जयमाल॥ १४२॥**

तेव्हां करकमलाचे ठिकाणीं जयमाला घेतलेली अशी ती राजहंसी कुमारी आपल्या सख्यांस बरोबर घेऊन सर्व नृपसमाजाचें निरीक्षण करीत चालूं लागली.

चौ०—जेहि दिसि बैठे नारद फूली।
सो दिसि तेहि न बिलोकी भूली।
पुनि पुनि मुनि उकसहिँ अकुलाहीं।
देखि दसा हरगन मुसुकाहीं।

ज्या दिशेस नारद मोठ्या आढ्यतेनें बसले होते, त्या दिशेस तर तिनें चुकूनहि ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं. [ तिनें आपणाकडेच पाहावें म्हणून ] नारद वरचेवर चुळबुळ करीत आणि मान तुकावीत पण [ ती मुळीं पाहीचना तेव्हां मात्र ते ] खट्टू होत. त्यांची ती मौज पाहून रुद्रगणांस हंसें येई.

धरि नृपतनु तहँ गयउ कृपाला ।
कुअँरि हरषि मिलेउ जयमाला ।
दुलहिनि लेइ गे लच्छिनिवासा ।
नृपसमाज सब भयउ निरासा ।

दयाघन श्रीहरि नृपतनु धारण करून तेथें गेले. राजकन्येनें त्यांस आनंदानें जयमाला घातली. श्रीपति वधूस घेऊन चालते झाले व बाकीचें सर्व राजमंडळ निराश झालें.

मुनि अतिबिकल मोहमति नाँठी ।
मनि गिरि गई छूटि जनु गाँठी ।

नारद फारच उद्विग्न झाले आणि जणूंकाय गांठींचें रत्न सुटून हरवल्याप्रमाणें मोहानें त्यांची बुद्धि नष्ट झाली.

तब हरगन बोले मुसुकाई ।
निज मुख मुकुर बिलोकहु जाई ।
अस कहि दोउ भागे भय भारी ।
बदन दीख मुनि बारि निहारी ।

तेव्हां शंभुगण नारदास हंसून म्हणाले कीं, आपला मुखडा एकदां आरशांत तरी जाऊन पहा. इतकें बोलून ते दोघेहि नारदास फार भिऊन पळून गेले. नारदांनीं आपला चेहरा पाण्यांत पाहिला.

वेष बिलोकि क्रोध अति बाढा ।
तिन्हहिँ सराप दीन्ह अति गाढा ।

तें रूप पाहून नारदास अत्यंत क्रोध चढला, आणि त्यांनीं रुद्रगणांस अति भयंकर शाप दिला.

**दो०—होहु निसाचर जाइ तुम्ह कपटी पापी दोउ । हँसेहु हमहिँ सो लेहु फल बहुरि हँसेहु मुनि कोउ ॥ १४३ ॥**

कपटी व पापी असे तुम्ही दोघेहि निशाचर होऊन पडाल मला तुम्ही हंसलांत त्याचें हें फल घ्या. फिरून कधीं कोणा मुनीस हंसाल काय ?

चौ०—पुनि जल दीख रूप निज पावा ।
तदपि हृदय संतोष न आवा ।
फरकत अधर कोप मन माहीँ ।
सपदि चले कमलापति पाहीँ ।

नारदांनीं पुन्हां पाण्यांत पाहिलें. तों आपलेंच पूर्वरूप त्यांना दिसलें तरीदेखील त्यांचें मन स्वस्थ होईना. मनांत कोप दाटल्याकारणानें त्यांचे ओंठ फुरफुरूं लागले, व ते मागच्या पायींच श्रीपतीकडे जाण्यास निघाले.

देइहउँ साप कि मरिहउँ जाई ।
जगत मोरि उपहास कराई ।

श्रीपतीस शाप तरी देईन किंवा प्राणत्याग तरी करीन त्यांनींच माझी साऱ्या जगभर छीथू केली.

बीचहिं पंथ मिले दनुजारी ।
संग रमा सोइ राजकुमारी ।
बोले मधुर बचन सुरसाईँ ।
मुनि कहँ चले बिकल की नाईँ

मध्यें मार्गांतच त्यांस श्रीहरी भेटले. बरोबर लक्ष्मी व तीच राजकुमारी होती. प्रभु मधुर शब्दांनीं म्हणाले, अहो मुनि, असे हताश झाल्यासारखें चालला तरी कोठें ?

सुनत बचन उपजा अतिक्रोधा ।
मायाबस न रहा मन बोधा ।

ते शब्द ऐकतांच नारदांचे हृदयांत अत्यंत क्रोध संचरला. मायेचा पगडा बसल्यामुळें त्यांच्यांत विचार शक्ति मुळींच उरली नव्हती.

परसंपदा सकहु नहिँ देखी
तुम्हरे इरिषा कपट बिसेखी ।
मथत सिंधु रुद्रहि बौरायहु ।
सुरन्ह प्रेरि बिषपान करायहु ।

[ ते म्हणाले ] दुसऱ्याचा उत्कर्ष तुम्हांला सहन होत नाहीं. ईर्षा आणि कपट हीं तुमच्यांत विशेष भरलीं आहेत. तुम्हीं समुद्रमंथनकालीं शंकरास फसाविलें आणि देवांस चिथवून त्यांचेकडून विष-प्राशन करविलें.

**दो०—असुर सुरा बिष संकरहि आपु रमा मनि चारु । स्वारथसाधक कुटिल तुम्ह सदा कपटब्यवहारु ॥ १४४ ॥**

दैत्यांना सुरा, शंकरांना हालाहल, आणि स्वतःला मात्र लक्ष्मी आणि कौस्तुभमणी ! तुम्ही स्वार्थसाधु आणि कुटिल; तुमचा व्यवहार म्हटला म्हणजे नेहमीं घातपाताचाच असावयाचा.

चौ०—परमस्वतंत्र न सिर पर कोई ।
भावइ मनहिँ करहु तुम्ह सोई ।
भलेहि मंद मंदेहि भल करहू ।
बिसमय हरष न हिय कछु धरहू ।

तुम्ही पूर्ण अरेराव; तुमच्या शिरावर कोणीच नाहीं. मन मानेल त्याप्रमाणें तुम्ही वागणार ! खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें करण्याचा तर तुमच्या मनाला कांहीं हर्षविषादच नाहीं.

डहँकि डहँकि परिचेहु सब काहू ।
अतिअसंक मन सदा उछाहू ।

सर्वांचींच बिंगें हुडकून हुडकून तुम्हीं काढीत असतां तुमच्या मनास सदोदित तोच हव्यास. तुम्ही पक्के बेडर बनला आहां.

करम सुभासुभ तुह्महिँ न बाधा ।
अबलगि तुह्महिँ न काहू साधा ।
भले भवन अब बायन दीन्हा ।
पावहुगे फल आपन कीन्हा ।

शुभाशुभ कर्म तर तुम्हांला बाधावयालाच नको. तुम्हांला अद्याप कोणी वस्ताद मिळाला नाहीं. परंतु आजचें वाण मात्र चांगल्याच घरीं पोचलें आहे. कृतकर्मांचीं फळें भोगण्यावांचून आतां तुम्हांला गत्यंतर नाहीं.

बंचेहु मोहि जवनि धरि देहा ।
सोइ तनु धरहु साप मम एहा ।

ज्या देहाला धारण करून तुम्ही माझी वंचना केली, तोच [ नर ] देह तुम्ही धारण कराल—हा माझा तुम्हांला शाप आहे.

कपिआकृति तुम्ह कीन्हि हमारी ।
करिहहिँ कीस सहाय तुह्मारी ।
मम अपकार कीन्ह तुह्म भारी ।
नारि बिरह तुह्म होब दुखारी ।

माझें तुम्ही वानररूप केलें. [ म्हणून ] वानरच तुमचें साहाय्य कारितील. मजवर तुम्ही महान् अपकार केला. [ स्त्री मिळूं दिली नाहीं ] म्हणून स्त्रीविरहानें तुम्हीहि विव्हळतच राहाल.

**दो०—साप सीस धरि हरषि हिय प्रभु सुर-
कारज कीन्हि। निज माया कै प्रबलता
करषि कृपानिधि लीन्हि ॥ १४५ ॥**

प्रसन्नांत:करणानें नारदशाप मस्तकीं धारण करून, [ कालांतरानें ] प्रभूंनीं देवकार्य साधलें. आपल्या मायेचा प्रभाव कृपानिधीनें आखुडला.

चौ०—जब हरिमाया दूर निवारी ।
नहिँ तहँ रमा न राजकुमारी ।

हरिमाया जेव्हां निवृत्त झाली, तेव्हां तेथें रमाहि नाहीं व राजकुमारीहि नाहीं.

तब मुनि अतिसभीत हरिचरना ।
गहे पाहि प्रनतारतिहरना ।
मृषा होउ मम साप कृपाला ।
मम इच्छा कह दीनदयाला ।
मैं दुर्बचन कहे बहुतेरे ।
कह मुनि पाप मिटिहि किमि मेरे ।

तेव्हां अत्यंत भयभीत होऊन मुनींनीं हरिचरण धरिले. ( ते म्हणाले ) हे शरणागतक्लेशहारिन् ! माझें रक्षण कर. हे दयाळा माझा शाप वृथा होवो. (यावर) दीनदयाळ म्हणाले, ही तरी माझीच इच्छा. मुनी म्हणाले, मी आपणांस बहुत दुरुत्तरें बोललों, त्या माझ्या पापाचें क्षालन कसें होणार ?

जपहु जाइ संकर–सत–नामा ।
होइहि हृदय तुरत बिस्रामा ।
कोउ नहिँ सिव समान प्रिय मोरे ।
असि परतीति तजहु जनि भोरे ।

( श्रीहरि ह्मणाले ) जा, आणि शंकरनामाचा शतवार जप कर, ह्मणजे मन तत्काल प्रशांत होईल. शिवाइतका मला कोणीच प्रिय नाहीं. हा विश्वास चुकूनहि सोडूं नको.

जेहि पर कृपा न करहिँ पुरारी ।
सो न पाव मुनि भगति हमारी ।
अस उर धरि महि बिचरहु जाई ।
अब न तुह्महि माया नियराई ।

शंकर ज्यावर कृपा करणार नाहींत त्यास, हे मुने ! माझी भक्ति दुर्लभ आहे, हें लक्षांत ठेवून जा, आणि पृथ्वीवर संचार करीत रहा. अतःपर माझी माया तुझ्या वाऱ्यालाहि उभी रहावयाची नाहीं.

**दो०—बहु बिधि मुनिहि प्रबोधि प्रभु तब
भये अंतरधान। सत्यलोक नारद चले
करत राम-गुन-गान ॥ १४६ ॥**

नंतर मुनींची अनेक प्रकारें समजूत करून प्रभु अंतर्धान पावले; आणि नारद रामगुणगान करीत सत्यलोकाप्रत जाते झाले.

चौ०—हरगन मुनिहि जात पथ देखी ।
बिगत मोह मन हरष बिसेखी ।
अतिसभीत नारद पहिँ आये ।

गहि पद आरत बचन सुनाये ।
हरगन हम न विप्र मुनिराया ।
बड अपराध कीन्ह फलु पाया ।
साप अनुग्रह करहु कृपाला ।
बोले नारद दीनदयाला ।

मोहरहित आणि अत्यंत प्रसन्न असे नारदमुनी मार्गानें जात आहेत, असें पाहून, हरगण त्यांच्या-जवळ भीतभीत आले, आणि त्यांचे चरण कवटाळून आर्तस्वरानें म्हणाले, हे मुनिराय ! आम्ही ब्राह्मण नसून शिवाचे गण आहोंत. आम्ही महदपराध केला. त्याचें फळ पावलों. [ आतां ] हे कृपालो ! आम्हांला उःशाप द्यावा. तेव्हां दीनदयाळ नारद म्हणालेः—

निसिचर जाइ होहु तुम्ह दोऊ ।
बैभव बिपुल तेज बल होऊ ।
भुजबल बिस्व जितब तुम्ह जहिआ ।
धरिहहिँ बिष्णु मनुजतनु तहिआ ।
समर मरन हरिहाथ तुह्मारा ।
होइहहु मुकुत न पुनि संसारा ।

तुम्ही दोघेहि राक्षस तर व्हालच; पण वैभव तेज आणि बल यांनीं संपन्न असे व्हाल व आपल्या बाहु-बलानें जेव्हां सर्व विश्व जिंकाल तेव्हां श्रीहरि मानवावतार घेईल. प्रभूच्या हातून तुम्हांला समरांत मृत्यु येऊन तुम्ही मुक्त व्हाल व नंतर मग तुम्हांला पुनरावृत्ति नाहीं.

चले जुगल मुनिपद सिरु नाई ।
भये निसाचर कालहि पाई ।

मुनिपदास वंदन करून ते दोघेहि निघाले व यथा-कालीं राक्षसांच्या जन्माला गेले.

**दो०–एक कलप एहि हेतु प्रभु लीन्ह**
**मनुजअवतार । सुररंजन सज्जनसुखद**
**हरि भंजन–भुबि–भार ॥ १४७ ॥**

एका कल्पांत ह्याच कारणामुळें सुररंजन, सज्जन-सुखदाता भूभारहारी श्रीहरिप्रभूनें मनुष्यावतार ग्रहण केला होता.

चौ०–एहि बिधि जनम करम हरि केरे ।
सुंदर सुखद बिचित्र घनेरे ।
कलप कलप प्रति प्रभु अवतरहीँ ।
चारु चरित नाना बिधि करहीँ ।
तब तब कथा मुनीसन्ह गाई ।
परम पुनीत प्रबंध बनाई ।
बिबिध प्रसंग अनूप बखाने ।
करहिँ न सुनि आचरजु सयाने ।

अशा प्रकारें हरीचीं जन्मकर्में सुंदर, सुखद, विचित्र आणि विपुल आहेत. प्रतिकल्पाचे ठायीं प्रभु अव-तार घेऊन अनेक सुंदर चरित्रें करितात. त्या त्या कल्पाच्या कथा परमपवित्र कवित्वरूपानें मुनींद्रांनीं गाइलेल्या आहेत. त्यांत अनेक प्रसंग अलौकिक वर्णिले आहेत, ते ऐकून सुज्ञ अश्रद्ध बनत नाहींत.

हरि अनंत हरिकथा अनंता ।
कहहिँ सुनहिँ बहुबिधि सब संता ।
रामचंद्र के चरित सुहाये ।
कलप कोटि लगि जाहिँ न गाये ।

हरि जसा अनंत आहे, तशा त्याच्या कथाहि अनंतच आहेत. सर्व संत त्यांचें अनेक प्रकारें श्रवण आणि कीर्तन करितात. रामचंद्राच्या सुंदर कथा कल्पकोटीपर्यंतहि गाऊन सरणार नाहींत.

यह प्रसंग मैँ कहा भवानी ।
हरिमाया मोहहिँ मुनि ज्ञानी ।
प्रभु कौतुकी प्रनत–हित–कारी ।
सेवत सुलभ सकल दुखहारी ।

हे भवानी मी जो हा प्रसंग सांगितला यावरून समजावयाचें हें कीं मुनी व ज्ञानी यांस देखील हरीची माया व्यामोह उत्पन्न करिते. प्रभु मात्र भक्तांचें कौ-तुक करणारे, शरणागतांचें कल्याण करणारे, सेवकांस सेवा केली असतां सुलभपणें सर्व दुःख निवारण करणारे असेच आहेत.

**सो०–सुर नर मुनि कोउ नाहिँ जेहि न**
**मोह माया प्रबल । अस बिचारि मन**
**माहिँ भजिय महा–माया–पतिहि ॥२१॥**

सुर, नर, मुनी यांतून असा एकहि उरला नाहीं कीं, ज्यास प्रबल मायेनें मोहित केलें नाहीं असा विचार मनांत आणून त्या महामायापति श्रीरामाचें भजनच करीत असावें.

चौ०–अपर हेतु सुनु सैलकुमारी ।
कहउँ बिचित्र कथा बिस्तारी ।
जेहि कारन अज अगुन अरूपा ।
ब्रह्म भयउ कोसल–पुर–भूपा ।

हे पार्वति ! अज, अगुण, अनुपम असें ब्रह्म ज्या

कारणास्तव अयोध्याधीश झालें, असा आणखी एक विचित्र कथाविस्तार तुला सांगतों तो ऐक. रामावताराचें हें दुसरें कारण आहे.

जो प्रभु बिपिन फिरत तुह्म देखा।
बंधु समेत धरे मुनिबेखा।
जासु चरित अवलोकि भवानी।
सतीसरीर रहिहु बौरानी।
अजहुँ न छाया मिटति तुह्मारी।
तासु चरित सुनु भ्रम–रुज–हारी।

अरण्यांत फिरत असतां ज्या प्रभूस बंधुसमवेत मुनिवेष धारण केलेले तूं पाहिलेंस व, हे भवानि! तूं सतीच्या देहानें ज्याचें चरित्र पाहून भ्रमिष्ट झालीस–ती इतकी कीं, तुझी त्या भ्रमाची छाया अजून देखील नष्ट होत नाहीं–त्या प्रभूचें भ्रमव्याधिनिवारक चरित्र श्रवण कर.

लीला कीन्हि जो तेहि अवतारा।
सो सब कहिहउँ मति अनुसारा।

त्या अवतारांत रामानें ज्या लीला केल्या, त्या सर्व मी यथामति निवेदन करितों.

भरद्वाज सुनि संकरबानी।
सकुचि सप्रेम उमा मुसुकानी।

हे भरद्वाजा! शंकराची वाणी श्रवण करून, पार्वतीनें संकोचून प्रेमयुक्त हास्य केलें.

लगे बहुरि बरनइ बृषकेतू।
सो अवतार भयउ जेहि हेतू।

ज्या कारणास्तव तो अवतार झाला ती कथा शंकर फिरून सांगूं लागले—

**दो०–सो मैं तुम्ह सन कहउँ सब सुनु मुनीस मन लाइ। रामकथा कलि-मल-हरनि मंगलकरनि सुहाइ॥ १४८॥**

हे मुनींद्र! तें सर्व मी तुला कथन करितों. तें तूं चित्त देऊन ऐक. रामकथा ही पवित्र, मंगलकारक आणि कलिमलहारक आहे.

चौ०–स्वायंभूमनु अरु सतरूपा।
जिन्ह तें भइ नरसृष्टि अनूपा।
दंपति धरम आचरन नीका।
अजहूँ गाव स्रुति जिन्ह कै लीका।

ज्यांच्यापासून ही अनुपम सृष्टि निर्माण झाली, ते स्वयंभु मनु व त्यांची स्त्री शतरूपा हे दोघेहि सद्धर्माचारसंपन्न होते. अजूनहि विद्वान् त्यांच्या धर्ममर्यादेची श्लाघाच करीत आहेत.

नृप उत्तानपाद सुत तासू।
ध्रुव हरिभगत भयउ सुत जासू।
लघुसुत नाम प्रियब्रत ताही।
बेद पुरान प्रसंसहिं जाही।

त्यांचाच पुत्र राजा उत्तानपाद होय. यांच्या पोटीं हरिभक्त ध्रुव उत्पन्न झाला. ज्याची वेदपुराणें देखील प्रशंसा करितात तो प्रियव्रत नांवाचा त्याचा कनिष्ठ पुत्र होता.

देवहूति पुनि तासु कुमारी।
जो मुनि कर्दम कै प्रिय नारी।
आदि देव प्रभु दीनदयाला।
जठर धरेउ जेहि कपिल कृपाला।
सांख्यसास्त्र जिन्ह प्रगट बखाना।
तत्त्व बिचार निपुन भगवाना।

स्वायंभुव मनूची कन्या देवहुती ही कर्दममुनींची प्रियपत्नी होय. तिनें आपल्या कुक्षींत दीनदयाळ, आदिदेव, कृपाळु, तत्त्वविवेकनिपुण, ज्यांनीं सांख्यशास्त्र व्याख्यानरूपानें प्रगट केलें, त्या भगवान् कपिलप्रभूस धारण केलें.

तेहिं मनु राज कीन्ह बहु काला।
प्रभुआयसु सब बिधि प्रतिपाला।

त्या मनूनें बहुत काल राज्य केलें, आणि प्रभु-आज्ञेचें अनेक प्रकारानें पालन केलें.

**सो०–होइ न बिषय बिराग भवन बसत भा चौथपनु। हृदय बहुत दुख लाग जनम गयउ हरिभगति बिनु॥ २२॥**

घरीं राहून राहून वार्धक्यहि आलें, तरी विषयापासून विरक्ति होत नाहीं, आणि सारा जन्म हरिभक्तीवांचूनच गेला, या विचारानें मनूच्या चित्तास फारच तळमळ लागली.

चौ०–बरबस राज सुतहि तब दीन्हा।
नारि समेत गवन बन कीन्हा।

तेव्हां आग्रहानें पुत्रास राज्य देऊन त्यानें भार्येसह तपोवनांत गमन केलें.

तीरथ बर नैमिष बिख्याता।
अतिपुनीत साधक–सिधि–दाता।

बसहिँ तहाँ मुनि-सिद्ध-समाजा ।
तहँ हिय हरषि चलेउ मनुराजा ।
पंथ जात सोहहिँ मतिधीरा ।
ज्ञान भगति जनु धरे सरीरा ।

अत्यंत पुनीत, साधकांस सिद्धिप्रद, जेथें मुनि-सिद्धांचे वृंद वास करितात, अशा प्रख्यात नैमिष तीर्थाप्रत मनुराज प्रसन्नांतःकरणानें जाऊं लागले, तेव्हां अशा प्रकारें ते मतिधीर मार्गामध्यें जणूंकाय ज्ञान आणि भक्ति यांनींच देह धारण केलेले आहेत असे शोभूं लागले.

पहुँचे जाइ धेनु-मति-तीरा ।
हरषि नहाने निरमल नीरा ।
आये मिलन सिद्ध मुनि ज्ञानी ।
धरमधुरंधर नृपरिषि जानी ।

ते गोमतीनदीच्या तीरास जाऊन पोंहचले, व त्यांनीं तिच्या निर्मल जलांत आनंदानें स्नान केलें. सिद्ध, मुनी व ज्ञानी त्या धर्मधुरंधरास राजर्षि समजून भेटण्यास आले.

जहँ जहँ तीरथ रहे सुहाये ।
मुनिन्ह सकल सादर करवाये ।
कृससरीर मुनिपट परिधाना ।
सतसमाज नित सुनहिँ पुराना ।

जेथें जेथें ह्मणून पावन तीर्थें होतीं, तेथील यात्रा सर्व मुनींनीं त्यांच्याकडून सादर करविल्या. ते मुनि-वल्कलें धारण करून व कृशगात्र होत्साते संतमंडळींत बसून नित्य पुराणचर्चा श्रवण करीत.

**दो०-द्वादस अच्छर मंत्र पुनि जपहिँ सहित अनुराग । बासुदेव-पद-पंकरुह दंपतिमन अति लाग ॥ १४९ ॥**

द्वादशाक्षरी ( ॐ नमो भगवते वासुदेवाय ) मंत्राचा ते प्रेमपूर्वक जप करीत असत. वासुदेवाच्या पदकमलीं त्या दंपत्याचें मन अत्यंत लुब्ध होत चाललें.

चौ०-करहिँ आहार साक फल कंदा ।
सुमिरहिँ ब्रह्म सच्चिदानंदा ।

कंदफलपर्ण इत्यादिकांचा आहार करून ते सच्चिदानंद परब्रह्माचें अखंड चिंतन करीत असत.

पुनि हरि हेतु करन तप लागे ।
बारिअधार मूल फल त्यागे ।

पुन्हां फलमूलादिकांचा त्याग करून फक्त जल सेवन करूनच परमेश्वरप्राप्त्यर्थ त्यांनीं तप आरंभिलें.

उर अभिलाष निरंतर होई ।
देखिय नयन परम प्रभु सोई ।
अगुन अखंड अनंत अनादी ।
जेहि चिंतहिँ परमारथबादी ।
नेतिनेति जेहि बेद निरूपा ।
चिदानंद निरुपाधि अनूपा ।
संभु बिरंचि बिष्णु भगवाना ।
उपजहिँ जासु अंस तें नाना ।

त्यांची निरंतर मनीषा हीच होती कीं, परमार्थ-वेत्ते निर्गुण, नित्य, अनंत, अनादि , म्हणून ज्याचें चिंतन करितात, ' नेति नेति ' ह्मणून वेद ज्याचें निरूपण करितात, जो चिदानंद, निरुपाधि व अद्वितीय असून ज्याच्या अंशापासून अनेक ब्रह्मा, विष्णु, शिव भगवान् उत्पन्न होतात त्या श्रेष्ठ प्रभूस आपल्या दृष्टीनें पहावें.

ऐसेउ प्रभु सेवकबस अहई ।
भगत हेतु लीला तनु गहई ।
जौं यह बचन सत्य स्रुति भाषा ।
तौ हमार पूजिहि अभिलाषा ।

तो प्रभु सेवकांना वश होऊन भक्तांच्या हेतूस्तव केवळ लीलेनें देह धारण करितो हें वेदवाक्य जर खरें असेल तर आमची ही इच्छा परिपूर्ण होईल.

**दो०-एहि बिधि बीते बरष षट सहस बारिआहार । संबत सप्त सहस्र पुनि रहे समीरअधार ॥ १५० ॥**

ह्याप्रमाणें केवळ जलाहार करण्यांत सहा हजार वर्षें गेलीं. पुन्हां ते सात हजार वर्षें वायु भक्षण करून राहिले.

चौ०-बरष सहस दस त्यागेउ सोऊ ।
ठाढे रहे एकपग दोऊ ।

वायुभक्षणहि टाकून दहा हजार वर्षें ते दोघेहि एका पायावर उभे राहिले.

बिधि-हरि-हर तप देखि अपारा ।
मनु समीप आये बहु बारा ।
माँगहु बर बहु भाँति लोभाये ।
परम धीर नहिँ चलहिँ चलाये ।

तें अपार तप पाहून ब्रह्मा, विष्णु, महेश अनेक-

वार मनुसन्निध येऊन ' वर माग ' म्हणून त्यांनीं त्याला अनेक प्रकारें लोभ दाखविला, पण ते परम-धृतिशील चळले नाहींत.

अस्थिमात्र होइ रहे सरीरा ।
तदपि मनाग मनहिँ नहिँ पीरा ।

शरीर अस्थिमात्रावशेष होऊन गेलें, तथापि त्यांच्या मनांत उद्वेगाचा लवलेशहि उत्पन्न झाला नाहीं.

प्रभु सर्बज्ञ दास निज जानी ।
गति अनन्य तापस नृप रानी ।
माँगु माँगु बर भइ नभबानी ।
परम गँभीर कृपामृत सानी ।
मृतकजिआवनि गिरा सुहाई ।
स्रवनरंध्र होइ उर जब आई ।
हृष्ट पुष्ट तन भये सुहाये ।
मानहुँ अबहिँ भवन तेँ आये ।

राजा आणि राणी हे आपले अनन्यगतिक भक्त आहेत अशी सर्वज्ञ प्रभूची खात्री झाली. ' वरं ब्रूहि, वरं ब्रूहि ' म्हणून फार गंभीर आणि कृपामृतपूर्ण अशी आकाशवाणी झाली. मृतसंजीवनी अशी ती मनोहर वाणी कर्णविवरानें हृदयांत जेव्हां प्रविष्ट झाली तेव्हां राजा व राणी यांचे देह हृष्ट, पुष्ट व तुकतुकीत झाले. जणुंकाय ते नुकतेच राजमंदिरांतून आले आहेत, असें वाटलें.

**दो०—स्रवन-सुधा-सम बचन सुनि पुलक प्रफुल्लित गात । बोले मनु करि दंडवत प्रेम न हृदय समात ॥ १५१ ॥**

श्रवणामृततुल्य अशी ती वाणी श्रवण करून त्यांचे देह रोमांचांनीं प्रफुल्लित होऊन त्यांच्या हृदयांत प्रेम माईनासें झालें. मनु दंडवत घालून म्हणाला:—

चौ०—सुनु सेवक-सुर-तरु सुरधेनू ।
बिधि-हरि-हर-बंदित-पद-रेनु ।
सेवत सुलभ सकल-सुखदायक ।
प्रनतपाल स-चराचर-नायक ।
जौँ अनाथहित हम पर नेहू ।
तौ प्रसन्न होइ यह बर देहू ।

हे भक्तकल्पद्रुम ! तूं कामधेनु आहेस. ब्रह्मा, विष्णु, महेश तुझ्याच पदरजांचें वंदन करितात. सेवेच्या योगानें तूं सुलभ होऊन सकल सुखें प्राप्त करून देतोस. हे शरणागतप्रतिपालक ! हे चराचरनायक ! हे अनाथहितचिंतक ! जर आम्हांवर आपली कृपा आहे, तर प्रसन्न होऊन एवढा वर द्यावा.

जो सरूप बस सिवमन माहीँ ।
जेहि कारन मुनि जतन कराहीँ ।
जो भुसुंडि-मन-मानस-हंसा ।
सगुन अगुन जेहि निगम प्रसंसा ।
देखहिँ हम सो रूप भरि लोचन ।
कृपा करहु प्रनतारति मोचन ।

जें स्वरूप शंकराच्या हृदयांत वास करितें, ज्याच्या प्रीत्यर्थ मुनी यत्न करीत असतात, जें भुशुंडीच्या मनोमानसांतील हंस असून वेद ज्याचें निर्गुण व सगुण असें दोहोंप्रकारें व्याख्यान करितात, तें रूप आम्ही डोळे भरून पाहण्याची इच्छा करीत आहों. हे शरणागतदुःखविमोचन ! आमचेवर एवढी कृपा करावी.

दंपतिबचन परम प्रिय लागे ।
मृदुल बिनीत प्रेम-रस पागे ।
भगतबछल प्रभु कृपानिधाना ।
बिस्वबास प्रगटे भगवाना ।

त्या दंपत्याचें तें मृदु, नम्र व रसपरिप्लुत भाषण अत्यंत प्रिय वाटून भक्तवत्सल, सर्वसत्ताधीश, कृपानिधान, विश्वव्यापक भगवान् प्रगट झाले.

**दो०—नीलसरोरुह नीलमनि नील-नीर-धर-स्याम । लाजहिँ तनुसोभा निरखि कोटि कोटि सत काम ॥ १५२ ॥**

नीलकमल, नीलरत्न व नीलमेघ यांच्यासारखी प्रभूच्या शरिराची श्याम शोभा होती. ती शोभा पाहून कोट्यनुकोटी शत कामदेव देखील लज्जित होतील.

चौ०—सरद-मयंक-बदन छबिसींवाँ ।
चारु कपोल चिबुक दर ग्रीवाँ ।
अधर अरुन रद सुंदर नासा ।
बिधु कर-निकर-बिनिंदक हासा ।
नव-अंबुज-अंबक-छबि नीकी ।
चितवनि ललित भावती जी की ।
भकुटि मनोज-चाप-छबि-हारी ।
तिलक ललाटपटल दुतिकारी ।

कुंडल मकर मुकुट सिर भ्राजा ।
कुटिल केस जनु मधुपसमाजा ।
उर श्रीबत्स रुचिर बनमाला ।
पदिक हार भूषन मनिजाला ।
केहरिकंधर चारु जनेऊ ।
बाहुबिभूषन सुंदर तेऊ ।
करि–कर–सरिस सुभग भुजदंडा ।
कटि निषंग कर सर कोदंडा ।

सौंदर्याची केवळ सीमाच असें शरच्चंद्राप्रमाणें वदन, अत्यंत रमणीय कपोल आणि हनुवटी, शंखासारखी मान, आरक्त ओठ, सुबक दंत आणि नासा, चंद्रकिरणांच्या समूहासहि तुच्छ करणारें हास्य, मनोहर, स्पृहणीय व हृदयंगम दृष्टिक्षेप करणारे नवकमलासारखे शोभिवंत नेत्र, मदनचापाच्या सौंदर्यास लाजविणारी भृकुटी, ललाटपटलावर लकाकणारा टिळा, मकराकृती कुंडलें, भ्रमरपंक्तितुल्य केशकलाप, श्रीवत्सयुक्त वक्षावरील सुरेख वनमाला, रत्नहार आणि रत्नभूषणें, सिंहस्कंधारील तेजस्वी यज्ञोपवीत, नीटनेटकीं बाहुभूषणें, गजशुंडेसारखे पीन भुजदंड, कमरेचे भाते, हातांत इषु आणि इष्वासन,—

**दो०—तडितबिनिंदक पीतपट उदर रेख बर तीनि । नाभि मनोहर लेति जनु जमुन-भवँर-छबि छीनि ॥ १५३ ॥**

विद्युल्लतेसहि लाजविणारा पीतांबर, रेखात्रयांकित उदरप्रदेश, यमुनाजलाच्या आवर्ताची शोभाच हरण करणारी अशी मनोहर नाभि—

चौ०—पदराजीव बरनि नहिँ जाहिँ ।
मुनि-मन-मधुप बसहिँ जिन्ह माहीँ ।
बामभाग सोभति अनुकूला ।
आदिसक्ति छबिनिधि जगमूला ।

मुनींचाहि मनोभृंग रमविणारें अवर्णनीय पदकमल, सौंदर्याची केवळ खाण आणि जगताची आदिमाता अशा सेवातत्पर आदिशक्तीनें वामभाग शोभविलेला—

जासु अंस उपजहिँ गुनखानी ।
अगनित लच्छि उमा ब्रह्मानी ।
भृकुटिबिलास जासु जग होई ।
राम बामदिसि सीता सोई ।

जिच्या अंशापासून गुणखनि अशा अगणित उमा, रमा आणि ब्रह्माणी उत्पन्न होतात, आणि जिच्या केवळ भृकुटिविलासानेंच ब्रह्मांड निर्माण होतें, त्या वामभागीं असणाऱ्या सीतेसह राम प्रगट झाले.

छबिसमुद्र हरिरूप बिलोकी ।
एकटक रहे नयनपट रोकी ।
चितवहिँ सादर रूप अनूपा ।
तृप्ति न मानहिँ मनुसतरूपा ।

शोभासागर असें तें हरिरूप पाहून पापण्या न हलवितां ते दोघेहि एकसारखे टक लावून पाहत राहिले. मनु व शतरूपा तें अद्वितीय रूप सोत्कंठ पहातच होते, परंतु त्यांची तृप्ति होईना.

हरषबिबस तनुदसा भुलानी ।
परे दंड इव गहि पद पानी ।
सिर परसे प्रभु निज-कर-कंजा ।
तुरत उठाये करुनापुंजा ।

ते दोघेहि हर्षविवश होत्साते देहस्थिति विसरले व काष्ठदंडाप्रमाणें पडून त्यांनीं प्रभूचे पाय हातांनीं घट्ट धरले. करुणानिधान प्रभूनें आपल्या हस्तकमलांनीं त्यांच्या मस्तकास स्पर्श करून त्यांस तत्काळ उचलून धरिलें.

**बोले कृपानिधान पुनि अति प्रसन्न मोहि जानि । माँगहु बर जोइ भाव मन महादानि अनुमानि ॥ १५४ ॥**

नंतर दयाघन ह्मणाले, मी प्रसन्न आहें व महान् वरद आहें असें जाणून इच्छेस येईल तो वर तुम्ही मागा.

चौ०—सुनि प्रभुबचन जोरि जुग पानी ।
धरि धीरज बोले मृदु बानी ।
नाथ देखि पदकमल तुह्मारे ।
अब पूरे सब काम हमारे ।

प्रभुवाक्य श्रवण करून ते करद्वय जोडून व धैर्य धरून नम्रतेनें म्हणाले, हे नाथ, आपलीं पदकमलें पाहूनच आज आमचे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले आहेत.

एक लालसा बडि उर माहीँ ।
सुगम अगम कहि जाति सो नाहीँ ।
तुह्महिँ देत अति सुगम गोसाईँ ।
अगम लाग मोहि निज कृपनाईँ ।

आमच्या मनांत जी एक बलवत्तर इच्छा आहे ती सुलभहि आहे व दुर्लभहि आहे, सबब ती सांगतां

येत नाहीं. हे स्वामी ! ती पूर्ण करतांना आपणांला जड जाणार नाहीं; तथापि, माझ्या कार्पण्यास्तव मला ती दुष्कर वाटते.

जथा दरिद्र बिबुधतरु पाई ।
बहु संपति माँगत सकुचाई ।
तासु प्रभाउ जान नहिँ सोई ।
तथा हृदय मम संसय होई ।

ज्याप्रमाणें दरिद्री मनुष्य कल्पवृक्ष भेटला असतां देखील विपुल संपत्ति मागण्यास संकोचतो व त्याचा प्रभाव त्याच्या लक्षांत येत नाहीं, तसाच माझ्याहि हृदयांत संशय होत आहे.

सो तुम्ह जानहु अंतरजामी ।
पुरवहु मोर मनोरथ स्वामी ।

आपण अंतर्यामी माझा मनोरथ ओळखून आहांतच, हे प्रभो ! तो आपण पुरवावा.

सकुच बिहाइ माँगु नृप मोही ।
मोरे नहिँ अदेय कछु तोही ।

(प्रभु म्हणाले) हे राजा ! संकोच टाकून दे आणि काय पाहिजे तें माग; तुला न देण्यासारखें असें मला कांहींच नाहीं.

**दो०—दानिसिरोमनि कृपानिधि नाथ कहउँ सतभाउ । चाहउँ तुम्हहिँ समान सुत प्रभु सन कवन दुराउ ॥ १५५ ॥**

हे दातृशिरोमणि ! हे कृपानिधे ! हे प्रभो ! मी सद्भावानें सांगतों कीं, आपल्यासारखा पुत्र असावा हीच माझी मनीषा आहे. प्रभूपासून छपवून काय ठेवतां येईल ?

चौ०—देखि प्रीति सुनि बचन अमोले ।
एवमस्तु करुनानिधि बोले ।
आपु सरिस खोजउँ कहँ जाई ।
नृप तव तनय होब मैँ आई ।

त्याचें प्रेम पाहून व त्याचे अमोलिक शब्द ऐकून करुणानिधि 'तथास्तु' म्हणून बोलूं लागले कीं, माझ्यासारखा पुत्र मी कोठें जाऊन शोधूं ? हे राजा, मीच तुझ्या पोटीं पुत्ररूपानें येतों.

सतरूपहि बिलोकि करजोरे ।
देबि माँगु बरु जो रुचि तोरे ।

शतरूपा हात जोडून उभी आहे असें पाहून देव म्हणाले, हे देवि तूंहि तुझा अभीष्ट वर मागून घे.

जो बरु नाथ चतुर नृप माँगा ।
सोइ कृपाल मोहि अति प्रिय लागा ।
प्रभु परंतु सुठि होति ढिठाई ।
जदपि भगत हित तुम्हहिँ सुहाई ।

हे दयाघन नाथ ! माझ्या चतुर पतीनें जो वर मागितला तोच मला अत्यंत प्रिय आहे. तथापि प्रभो ! (अधिक बोलण्याचें) जरी निव्वळ धाष्ट्य होत आहे, तथापि आपणांस भक्तांचें हित अभीष्ट आहे.

तुम्ह ब्रह्मादि जनक जगस्वामी ।
ब्रह्म सकल-उर-अंतरजामी ।
अस समुझत मन संसय होई ।
कहा जो प्रभु प्रवान पुनि सोई ।

आपण ब्रह्मादि सकल विश्वाचे स्वामी असून सर्वांतर्यामी परब्रह्म आहांत ह्याचा विचार केला असतां बोलण्यास मन कचरतें. तथापि, प्रभूची आज्ञाच मला प्रमाण आहे.

जे निज भगत नाथ तव अहहीँ ।
जो सुख पावहिँ जो गति लहहीँ ।

हे प्रभो ! आपल्या अनन्य भक्तांना जें सुख मिळतें व त्यांना जी गति प्राप्त होते—

**दो०—सोइ सुख सोइ गति सोइ भगति सोइ निज चरन सनेहु । सोइ बिबेक सोइ रहनि प्रभु हमहिँ कृपा करि देहु ॥१५६॥**

तेंच सुख, तीच गति, तीच भक्ति, तीच प्रभुचरणप्रीति, तोच विवेक आणि तेंच शील प्रभूनें कृपा करून मला द्यावें.

चौ०—सुनि मृदु गूढ रुचिर बचरचना ।
कृपासिंधु बोले मृदुबचना ।
जो कछु रुचि तुम्हरे मन माहीँ ।
मैँ सो दीन्ह सब संसय नाहीँ ।
मातु बिबेक अलौकिक तोरे ।
कबहुँ न मिटिहि अनुग्रह मोरे ।

त्या वराची मृदु, गूढ व सुंदर रचना ऐकून कृपासागर मधुर शब्दानें म्हणाले, तुझ्या मनांत जी जी वांछा आहे ती ती सर्व मी निःसंशय पूर्ण करीन. माते ! माझ्या अनुग्रहानें तुला अलौकिक विवेक उत्पन्न होऊन तो कदाकाळींहि नष्ट होणार नाहीं.

बंदि चरन मनु कहेउ बहोरी ।
अउर एक बिनति प्रभु मोरी ।
सुत बिषयिक तव पद रति होऊ ।
मोहि बड मूढ कहइ किन कोऊ ।
मनि बिनु फनि जिमिजल बिनु मीना ।
मम जीवन तिमि तुम्हहिँ अधीना ।

मनु पुन्हां चरणवंदन करून म्हणाला, हे प्रभो ! माझी आणखी एक विनंति आहे. मला लोक महामूर्ख कां म्हणेनात, परंतु आपल्या चरणीं माझें प्रेम पुत्रविषयकच असावें. जसा मणिविरहित सर्प किंवा जलविरहित मत्स्य तद्वतच माझेंहि जीवन आपल्या आधीन असावें.

अस बरु माँगि चरण गहि रहेऊ ।
एवमस्तु करुनानिधि कहेऊ ।
अब तुम्ह मम अनुसासन मानी ।
बसहु जाइ सुर-पति-रजधानी ।

असा वर मागून राजानें प्रभुचरणांस मिठी मारली. करुणानिधि म्हणाले, 'तथास्तु', आतां तुम्ही माझ्या आज्ञेप्रमाणें इंद्रलोकीं जाऊन रहा.

सो०—तहँ करि भोग बिसाल तात गये कछु काल पुनि। होइहहु अवधभुआल तब मैं होब तुम्हार सुत ॥ २३ ॥

हे तात ! तेथें विशाल भोग भोगून फिरून कांहीं काळ लोटल्यावर तुम्ही अयोध्येचे भूपाल व्हाल व मी तुमचा पुत्र होईन.

चौ०—इच्छामय नरवेष सवाँरे ।
होइहउँ प्रगट निकेत तुम्हारे ।
अंसन्ह सहित देह धरि ताता ।
करिहउँ चरित भगत-सुख-दाता ।
जेहि सुनि सादर नर बडभागी ।
भव तरिहहिँ ममता मद त्यागीं ।

इच्छामय नरवेष घेऊन मी तुमच्या सदनीं प्रगट होईन, व हे तात ! अंशांसहित देह धारण करून भक्तसुखद लीला करीन. त्या लीलांचें जे नर आदरपूर्वक श्रवण करितील ते महा भाग्यवान् अहंकार-ममतादिकांचा त्याग करून भवसागर तरून जातील.

आदिसक्ति जेहि जग उपजाया ।
सोउ अवतरिहि मोरि यह माया ।
पुरउब मैं अभिलाष तुम्हारा ।
सत्य सत्य पन सत्य हमारा ।
पुनि पुनि अस कहि कृपानिधाना ।
अंतरधान भये भगवाना ।

ज्या आदिशक्तीनें हें विश्व उत्पन्न केलें, ती माझी मायाहि अवतार घेईल. मी तुमचें अभीष्ट पूर्ण करीन. ही प्रतिज्ञा त्रिवार सत्य समजा, असें वारंवार सांगून दयाघन प्रभु अंतर्धान पावले.

दंपति उर धरि भगति कृपाला ।
तेहि आस्रमनि बसे कछु काला ।
समय पाइ तनु तजि अनयासा ।
जाइ कीन्ह अमरावतिबासा ।

त्या दंपत्यानें दयाघन भगवंताची भक्ति हृदयांत बाळगून त्याच आश्रमांत कांहीं काळ काढला, व समय येतांच अनायास देहत्याग करून ते इंद्रलोकीं जाऊन वास करिते झाले.

दो०—यह इतिहास पुनीत अति उमहि कहा बृषकेतु । भरद्वाज सुनु अपर पुनि रामजनम कर हेतु ॥ १५७ ॥

हा अत्यंत पावन इतिहास शंकरांनीं पार्वतीस सांगितला. हे भरद्वाज ! रामजन्माचें आणखी दुसरें कारण श्रवण कर.

चौ०—सुनु मुनि कथा पुनीत पुरानी ।
जो गिरिजा प्रति संभु बखानी ।

मुने ! ही शंकरानें पार्वतीस कथन केलेली पावन पुराणप्रसिद्ध कथा ऐक.

बिस्वबिदित एक कैकय देसू ।
सत्यकेतु तहँ बसइ नरेसू ।
धरमधुरंधर नीतिनिधाना ।
तेज प्रताप सील बलवाना ।

जगत्प्रसिद्ध असा एक कैकय देश आहे. तेथें सत्यकेतु राजा राज्य करीत असे. तो धर्मात्मा, नीतिमान्, तेजस्वी, प्रतापी, शीलवान् व बलवान् असे.

तेहि के भये जुगलसुत बीरा ।
सब-गुन-धाम महारन-धीरा ।
राजधनी जो जेठ सुत आही ।
नाम प्रतापभानु अस ताही ।
अपर सुतहि अरिमर्दन नामा ।
भुजबल अतुल अचल संग्रामा ।

त्याला सर्वगुणसंपन्न, महारणधीर व वीर असे दोन पुत्र झाले. राज्याधिकारी जो श्रेष्ठ पुत्र त्याचें प्रतापभानु असें नांव होतें. कनिष्ठ पुत्र नामें अरिमर्दन ह्याचें बाहुबल अतुल असून तो संग्रमांत निश्चळ असे.

भाइहि भाइहि परम समीती।
सकल दोष छल बरजित प्रीती।
जेठे सुतहि राज नृप दीन्हा।
हरि हित आपु गवन बन कीन्हा।

त्या भावाभावांची पूर्ण निष्कपट प्रीति असून त्यांच्यांत परम ऐक्य होतें. ज्येष्ठ पुत्रास राज्य अर्पण करून राजा परमेश्वर—प्राप्तीसाठीं तपोवनांत गेला.

**दो०—जब प्रतापरबि भयउ नृप फिरी दोहाई देस। प्रजा पाल अतिबेद बिधि कतहुँ नहीँ अघलेस॥ १५८॥**

प्रतापभानु राजा होतांच सर्व देशभर द्वाही फिरली. तो अगदीं वेदविहित मार्गानें प्रजेचें पालन करी; त्यामुळें त्याच्या राज्यांत पापाचा लवलेशहि नसे.

चौ०—नृप-हित-कारक सचिव सयाना।
नाम धरमरुचि सुक्र समाना।
सचिव सयान बंधु बलबीरा।
आपु प्रतापपुंज रनधीरा।

धर्मरुची नांवाचा त्याचा सचिव असे. तो फार सुज्ञ असून शुक्राचार्यासारखा राजाचा अत्यंत हितैषी होता. सुज्ञ मंत्री, बलवान् व वीर बंधु आणि स्वतः राजाहि प्रतापी आणि रणशूर असा हा अपूर्व योग जुळला होता.

सेन संग चतुरंग अपारा।
अमित सुभट सब समर जुझारा।
सेन बिलोकि राउ हरषाना।
अरु बाजे गहगहे निसाना।

राजाजवळ अपार चतुरंग सैन्य असे. त्यांत असंख्य उत्तम लढवय्ये व सर्वच समरझुंझार असे लोक होते. दुंदुभी आदिकरून रणवाद्यें कडाक्यानें वाजताहेत अशी ती सेना पाहून प्रतापभानु राजास हर्ष झाला.

बिजय हेतु कटकई बनाई।
सुदिन साधि नृप चलेउ बजाई।
जहँ तहँ परी अनेक लराई।
जीते सकल भूप बरिआई।

दिग्विजयाच्या हेतूनें सैन्य सिद्ध करून व सुदिन साधून राजा रणवाद्यांच्या गजरांत चालूं लागला. ठिकठिकाणीं अनेक रणकंदनें माजलीं. त्यानें सर्व राजांना जेरीस आणून जिंकलें.

सप्त दीप भुजबल बस कीन्हे।
लेइ लेइ दंड छाडि नृप दीन्हे।
सकल-अवनि-मंडल तेहि काला।
एक प्रतापभानु महिपाला।

सप्तद्वीपवती पृथ्वी त्यानें आपल्या बाहुबलानें जिंकून आणि खंडणी घेऊन राजांना सोडून दिलें. त्या वेळीं भूमंडळांत प्रतापभानु हाच सार्वभौम होता.

**दो०—स्वबस बिस्व करि बाहुबल निज पुर कीन्ह प्रबेसु। अरथ-धरम-कामादि सुख सेवइ समय नरेसु॥ १५९॥**

बाहुबलानें जग जिंकून राजानें आपल्या राजधानींत प्रवेश केला व तो धर्मार्थकामादिक पुरुषार्थांचें यथाकाल सेवन करीत राहिला.

चौ०—भूप-प्रतापभानु-बल पाई।
कामधेनु भइ भूमि सुहाई।
सब-दुख-बरजित प्रजा सुखारी।
धरमसील सुंदर नर नारी।

राजा प्रतापभानूच्या बलाच्या आश्रयानें पृथ्वी कामधेनूप्रमाणें सुखदायक होऊन सर्व प्रजा दुःखरहित आणि सुखी झाली. तेथील स्त्रीपुरुष अत्यंत धर्मशील असत.

सचिव धरमरुचि हरि-पद-प्रीती।
नृप-हित-हेतु सिखव नित नीती।
गुरु सुर संत पितर महिदेवा।
करइ सदा नृप सब कै सेवा।

अमात्य धर्मरुची हरिभक्त असल्या कारणानें तो राजाच्या हितास्तव त्यास नित्य नीति शिकवीत असे. तो राजा गुरु, देव, संत, पितर व ब्राह्मण या सर्वांची सदोदित सेवा करी.

भूप-धरम जे बेद बखाने।
सकल करइ सादर सुख माने।
दिन प्रति देइ बिबिध बिधि दाना।
सुनइ सास्त्रबर बेद पुराना।

तो राजा जेवढे म्हणून वेदविहित धर्म आहेत ते

सर्व आदरपूर्वक व उल्हासानें करी. रोज अनेक दानें देई, आणि सच्छास्त्र, वेद व पुराण यांचें श्रवण करी.

नाना बापी कूप तडागा।
सुमनबाटिका सुंदर बागा।
बिप्रभवन सुरभवन सुहाये।
सब तीरथन्ह बिचित्र बनाये।

त्यानें अनेक सुंदर वापी, कूप, तडाग, पुष्पवाटिका व बागबगीचे केले होते. ब्राह्मणांचीं घरें, देवालयें आणि सर्व तीर्थें सुंदर आणि चित्रविचित्र बांधून काढलीं.

दो०—जहँ लगि कहे पुरान स्रुति एक एक सब जाग। बार सहस्र सहस्र नृप किये सहित अनुराग॥ १६०॥

वेदपुराणांतरीं जे जे म्हणून पृथक् पृथक् यज्ञ सांगितले आहेत, ते सर्व प्रतापभानूनें हजारहजारदां प्रेमपूर्वक केले.

चौ०—हृदय न कछु फल अनुसंधाना।
भूप बिबेकी परमसुजाना।
करइ जे धरम करम मन बानी।
बासुदेव अरपित नृप ग्यानी।

त्या परम सुज्ञ आणि ज्ञानी राजानें कर्मफलाची अपेक्षा मनांत मुळींच आणली नाहीं. जें जें म्हणून कर्म किंवा धर्म तो मनानें किंवा वाचेनें करी तें तें तो ज्ञानी राजा कृष्णार्पण करी.

चढि बरबाजि बार एक राजा।
मृगया कर सब साजि समाजा।
बिंध्याचल गँभीर बन गयऊ।
मृग पुनीत बहु मारत भयऊ।

एके समयीं राजा मृगयेचा सर्व सरंजाम तयार करून आणि उत्कृष्ट घोड्यावर स्वार होऊन विंध्यपर्वतावरील गर्द झाडींत शिरला, व तेथें त्यानें अनेक मेध्य मृगांची शिकार केली.

फिरत बिपिन नृप दीख बराहू।
जनु बन दुरेउ ससिहि ग्रसि राहू।
बड बिधु नहिँ समात मुख माहीँ।
मनहूँ क्रोधबस उगिलत नाहीँ।

अरण्यांत संचार करीत असतां तेथें त्या राजाच्या दृष्टीस एक वराह पडला. [ तो वराह म्हणजे ] जणुंकाय राहूच चंद्राचा ग्रास करून त्या वनांत लपला होता. परंतु चंद्र मोठा असल्यामुळें तो मुखांत मावेना, तरी देखील क्रोधामुळें त्यास तो ओकून टाकीना असें वाटें. ( येथें दातांना चंद्राची उपमा दिली आहे. )

कोल–कराल–दसन–छबि गाई।
तनु बिसाल पीवर अधिकाई।
घुरघुरात हय आरव पाये।
चकित बिलोकत कान उठाये।

ही त्या वराहाच्या भयंकर दाढांची छटा सांगितली. त्याचें शरीर खूपच विशाल असून अत्यंत पुष्ट होतें. घोड्याचा फुरफुराट ऐकून तो वराह कावराबावरा होऊन कान टवकारून पाहूं लागला.

दो०—नलि-महीधर-सिखर-सम देखि बिसाल बराहु। चपरि चलेउ हय सुटुकि नृप हाँकि न होइ निबाहु॥ १६१॥

नील पर्वताच्या शिखरासारख्या त्या धिप्पाड वराहावर नजर जातांच राजानें चाबुक हाणून घोडा तर बेसुमार दाबलाच, कारण त्याशिवाय गतीच नव्हती.

चौ०—आवत देखि अधिक रव बाजी।
चले बराह मरुतगति भाजी।
तुरत कीन्ह नृप सरसंधाना।
महि मिलि गयउ बिलोकत बाना।

घोडा अधिकाधिक खिंकाळत येत आहे, असें पाहून, तो वराहहि झपाट्यानें वाऱ्यासारखा निघाला. तेव्हां राजानें तावडतोब शरसंधान केलें. परंतु बाण येत आहे, असें पाहतांच तो वराह भुईसपाट झाला.

तकि तकि तीर महीस चलावा।
करि छल सुअर सरीर बचावा।
प्रगटत दुरत जाइ मृग भागा।
रिसबस भूप चलेउ सँग लागा।

राजा नेम धरून बाण सोडी आणि वराह शिताफीनें अंग चोरी. तो केव्हां दिसे तर केव्हां पळून जाऊन नाहींसा होई. तेव्हां राजा चिडून त्याचा पाठलाग करूं लागला.

गयउ दूरि घन गहन बराहू।
जहँ नाहिँ न गज–बाजि–निबाहू।
अति अकेल बन बिपुल कलेसू।
तदपि न मृगमग तजइ नरेसू।

जेथें हत्ती अगर घोड्यास रीघ मिळणें शक्य नव्हतें अशा लांब व किर्र झाडींत वराह निघून गेला. राजा अगदींच एकटा आणि झाडी अत्यंत गर्द, तरीदेखील तो सावजाचा पिच्छा सोडीना.

कोल बिलोकि भूप बड धीरा ।
भागि पैठ गिरिगुहा गँभीरा ।
अगम देखि नृप अति पछिताई ।
फिरेउ महाबन परेउ भुलाई ।

राजाची विलक्षण चिकाटी पाहून तो वराह धापा टाकीत डोंगराच्या खोल दरींत शिरला. पुढें माग लागेना म्हणून राजास फार खंत वाटली. तो परत फिरला. पण त्या गर्द झाडींत वाट चुकला.

**दो०—खेद खिन्न छुद्धित तृषित राजा बाजिसमेत । खोजत ब्याकुल सरित सर जल बिनु भयउ अचेत॥ १६२ ॥**

श्रमानें खिन्न झालेला, व घोड्यासुद्धां तृषेनें आणि क्षुधेनें व्याकुळ झालेला तो राजा नदी अगर तलाव आढळेल म्हणून शोध करूं लागला. पाण्यावांचून तर तो अगदींच गळला.

चौ०—फिरत बिपिन आस्रम एक देखा ।
तहँ बसनृपातिकपट—मुनि- बेखा ।
जासु देस नृप लीन्ह छुडाई ।
समर सेन तजि गयउ पराई ।

अरण्यांत फिरतां फिरतां त्यास एक आश्रम दिसला. तेथें कपटमुनिवेषानें एक राजा राहत होता. त्याचें राज्य प्रतापभानूनें खालसा केलें होतें व तो समरांत सैन्य सोडून पळून गेला होता.

समय प्रतापभानु कर जानी ।
आपन अति असमय अनुमानी ।
गयउ न गृह मन बहुत गलानी ।
मिला न राजहि नृप अभिमानी ।
रिसि उर मारि रंक जिमि राजा ।
बिपिन बसइ तापस के साजा ।

प्रतापभानूस काल अनुकूल व आपणांस प्रतिकूल आहे असें जाणून, तो राजा अत्यंत विमनस्क होत्साता घरीं राजधानींतहि गेला नाहीं आणि स्वाभिमानास्तव प्रतापभानूसहि भेटला नाहीं. आपला राग मनांतल्या मनांतच दाबून ठेवून भिकाऱ्यासारखा तो तापसवेषानें वनांत राहूं लागला.

तासु समीप गवन नृप कीन्हा ।
यह प्रतापरबि तेहि तब चीन्हा ।
राउ तृषित नहिँ सो पहिचाना ।
देखि सुबेष महामुनि जाना ।
उतरि तुरग तेँ कीन्ह प्रनामा ।
परम चतुर न कहेउ निजनामा ।

राजा त्याचे जवळ जाऊन पोंचला. त्यानें हा प्रतापभानू म्हणून तेव्हांच ओळखलें, परंतु प्रतापभानू तृष्णाव्याकुळ असल्यामुळें त्यानें मात्र त्यास ओळखलें नाहीं. (इतकेंच नव्हे तर) त्याचा सुवेष पाहून त्यास तो कोणी महात्माच समजला. लागलाच घोड्यावरून उतरून प्रतापभानूनें त्यास प्रणाम केला. पण प्रतापभानू अत्यंत चतुर असल्यामुळें त्यानें आपलें नांव मात्र कळविलें नाहीं.

**दो०—भूपति तृषित बिलोकि तेहि सरबर दीन्ह देखाइ । मज्जन पान समेत हय कीन्ह नृपति हरषाइ ॥ १६३ ॥**

प्रतापभानू तृषित आहे असें ओळखून त्यास त्यानें सरोवर दाखवून दिलें. प्रतापभानूनें आनंदानें आपल्या घोड्यासह स्नान आणि जलपान केलें.

चौ०—गै स्रम सकल सुखी नृप भयऊ ।
निजआस्रम तापस लेइ गयऊ ।
आसन दीन्ह अस्तरबि जानी ।
पुनि तापस बोलेउ मृदुबानी ।

राजाच्या सर्व श्रमांचा परिहार झाल्यामुळें तो स्वस्थ झाला. अस्तमान जाणून तापसानें त्यास आश्रमांत नेलें व आसन देऊन नंतर मधुर शब्दानें तो त्यास म्हणाला:—

को तुम्ह कस बन फिरहु अकेले ।
सुंदर जुबा जीव परहेले ।
चक्रबर्ति के लच्छन तोरे ।
देखत दया लागि अति मोरे ।

तूं कोण व या वनांत एकटा कां फिरत आहेस ? तूं सुंदर व तरुण असून जिवावर असा उदार कां झाला आहेस ? तुझी लक्षणें चक्रवर्ती राजाचीं दिसत असून तुला पाहतांच मला तुझी फार दया येते.

नाम प्रतापभानु अवनीसा ।
तासु सचिव मैँ सुनहु मुनीसा ।
फिरत अहेरे परेउँ भुलाई ।
बडे भाग देखेउँ पद आई ।

हम कहँ दुरलभ दरस तुह्मारा ।
जानत हौं कछु भल होनिहारा ।

हे मुनींद्र, ऐका. प्रतापभानू नांवाच्या चक्रवर्ती राजाचा मी सचिव आहे. शिकारीच्या नादांत मी रस्ता चुकलों, पण माझें भाग्य थोर म्हणून येथें मला हे पाय लाभले. आमच्यासारख्याला आपलें दर्शनच दुर्लभ आहे. [तें ज्याअर्थी घडलें त्याअर्थी] मला वाटतें कीं, माझें कांहीं तरी कल्याणच व्हावयाचें असेल.

कह मुनि तात भयउ अँधियारा ।
जोजन सत्तरि नगर तुह्मारा ।

मुनी म्हणाला, बाबा रे ! आतां अंधार पडला असून तुझें नगर येथून सत्तर योजनें दूर आहे.

दो०–निसा घोर गंभीर बन पंथ न सूझ सुजान । बसहु आजु अस जानि तुम्ह जायहु होत बिहान ॥ १६४ ॥

काळोख भयंकर पडला असून या किर्र झाडींतून पुऱ्या माहितगारास देखील मार्ग सांपडण्याची मुष्किल. याचा तूंच विचार कर, आणि एवढी रात्र येथेंच घालवून उजाडतांच तूं वाटेला लाग.

दो०–तुलसी जसि भवितव्यता तैसी मिलइ सहाइ । आपु न आवइ ताहि पहिं ताहि तहाँ लेइ जाइ ॥ १६५ ॥

हे तुलसि, भवितव्यतेप्रमाणेंच परिस्थितिहि घडून येत असते. भवितव्यता आपण होऊन व्यक्तिमात्राकडे जात नाहीं, ती त्यासच आपणाकडे खेंचून आणते.

चौ०–भलेहि नाथ आयसु धरि सीसा ।
बाँधि तुरग तरु बैठ महीसा ।
नृप बहु भाँति प्रसंसेउ ताही ।
चरन बंदि निज भाग्य सराही ।

'ठीक आहे, महाराज' असें म्हणून आणि मुनीची आज्ञा शिरसावंद्य करून राजानें घोडा झाडाशीं बांधला, आणि आपण मुनीजवळ बसला. राजानें मुनीची परोपरीनें प्रशंसा केली आणि त्याचे चरणांस वंदन करून तो आपल्या भाग्याची वाखाणणी करूं लागला.

पुनि बोलेउ मृदुगिरा सुहाई ।
जानि पिता प्रभु करउँ ढिठाई ।
मोहि मुनीस सुत सेवक जानी ।
नाथ नाम निज कहहु बखानी ।

पुन्हां तो राजा अत्यंत नम्रतेनें म्हणाला, आपण माझे पिता आणि प्रभु आहां असें समजून मी धाष्ट्र्य करीत आहे. मुनींद्रांनीं मला सुत समजून आपलें नांव यथार्थ कळविलें पाहिजे.

तेहि न जान नृप नृपहि सो जाना ।
भूप सुहृद सो कपटसयाना ।

राजानें त्यास ओळखलें नाहीं, परंतु त्या मुनीनें मात्र राजास ओळखलें होतें. राजा सरळ मनाचा, पण तो मात्र धूर्त व कपटी होता.

बैरी पुनि छत्री पुनि राजा ।
छल बल कीन्ह चहइ निज काजा ।
समुझि राजसुख दुखित अराती ।
अवाँ अनल इव सुलगइ छाती ।

तो मुनि आधींच वैरी, फिरून क्षत्रिय आणि त्यांतूनही राजा होता. त्यानें गहरें कारस्थान उबविलें, कारण त्यास आपला डाव साधावयाचा होता. गतवैभवाच्या सुखाकडे, स्वतःच्या दुर्दशेकडे आणि त्या राजाकडे पाहतांच अग्नीनें ज्याप्रमाणें आवा भडकतो तशी त्याची छाती भडकून गेली.

सरलबचन नृप के सुनि काना ।
बयर सँभारि हृदय हरषाना ।

राजाचें तें सरळ बोलणें कानीं पडतांच त्यास वैराची आठवण होऊन फार आनंद झाला.

दो०–कपट बोरि बानि मृदुल बोलेउ जुगुतिसमेत । नाम हमार भिखारि अब निर्धन रहित निकेत ॥ १६६ ॥

तो मुनि युक्तिपूर्वक आणि मृदु अशी कपटवाणी बोलूं लागलाः–आमचें नांव भिकारी ! आमचे जवळ अडका ना अटका.

चौ०–कह नृप जे बिज्ञाननिधाना ।
तुह्म सारिखे गलित अभिमाना ।
रहहिं अपनपौ सदा दुराये ।
सब बिधि कुसल कुबेष बनाये ।
तेहि तें कहहिं संत स्रुति टेरे ।
परम अकिंचन प्रिय हरि केरे ।

राजा ह्मणाला, आपणासारखे विज्ञाननिधि व गलिताभिमान नेहमींच गुप्तपणानें राहातात व

मोठ्या सावधगिरीनें अमंगल असा वेष करितात. म्हणून तर भगवंताला अत्यंत दरिद्रीच प्रिय असतो, असें संत व वेद बजावून सांगत आहेत.

तुम्ह सम अधन भिखारि अगेहा।
होत बिरंचि सिवहि संदेहा।

आपणासारखे निर्धन, दरिद्री, आणि गृहरहित यांचा शिवब्रह्मादिकांनाहि संशय पडतो.

जोऽसि सोऽसि तव चरन नमामी।
मो पर कृपा करिय अब स्वामी।

आपण कोणीहि असा; मी मात्र आपल्या चरणांस नमन करितों. मजवर आतां स्वामींनीं कृपा करावी.

सहज प्रीति भूपति कै देखी।
आपु बिषय बिस्वास बिसेखी।
सब प्रकार राजहि अपनाई।
बोलेउ अधिक सनेह जनाई।
सुनु सतिभाउ कहउँ महिपाला।
इहाँ बसत बीते बहु काला।

आपणांविषयीं राजाचें असलेलें स्वाभाविक प्रेम आणि दृढ विश्वास पाहून त्यास सर्वस्वीं आपलासा करण्याकरितां तो मुनी जास्तच मानभावीपणा करून म्हणाला, हे राजा, ऐक मी सत्यभावानें सांगतों. मला येथें राहून पुष्कळच काळ लोटला.

दो०—अब लगि मोहि न मिलेउ कोउ मैं न जनावउँ काहु। लोकमान्यता अनल-सम कर तपकानन दाहु ॥ १६७ ॥

आजपावेतों मला येथें कोणीहि भेटला नाहीं, व मीहि कोणाजवळ स्वतःला प्रगट केलें नाहीं. लोकमान्यता तपोरूप काननाचा अग्नीप्रमाणें दाह करिते.

सो०—तुलसी देखि सुबेखु भूलहिँ मूढ न चतुर नर। सुंदर केकिहि पेखु बचन सुधासम असन अहि ॥ २४ ॥

सुवेष पाहून मूर्खासच भुरळ पडते, चतुरास पडत नाहीं. पहा कीं, मोर हा खरोखरच सुंदर, त्याची केकाहि अमृततुल्य पण त्याचें खाद्य मात्र सर्प !

चौ०—ता तें गुपुत रहउँ जग माहीँ।
हरि तजि किमपि प्रयोजन नाहीँ।
प्रभु जानत सब बिनहि जनाये।
कहहु कवन सिधि लोक रिझाये।

म्हणूनच जगांत मी झांकून असतों. श्रीहरीखेरीज मला कशाचीहि पर्वा नाहीं. प्रभु न सांगतांहि सर्व जाणतच आहे. मग तूंच सांग पाहूं कीं, लोकांचें रंजन करून निष्पन्न तें काय होणार ?

तुम्ह सुचि सुमति परमप्रिय मोरे।
प्रीतिप्रतीति मोहि पर तोरे।
अब जौं तात दुरावउँ तोही।
दारुन दोष घटइ अति मोही।

तूं मनाचा अगदीं निर्मळ असल्यामुळें मला फारच आवडलास. तुझेंदेखील मजवर प्रेम व विश्वास आहे. आतां जर मी स्वतःला तुझ्यापासून गुप्त ठेवीन तर मला अति भयंकर पाप लागेल.

जिमि जिमि तापस कथइ उदासा।
तिमि तिमि नृपहि उपज बिस्वासा।
देखा स्वबस करम–मन–बानी।
तब बोला तापस बगध्यानी।

तो तपस्वी वैराग्याची जसजशी फुशारकी मारी तसतसा राजाचा विश्वासहि दुणावे. कायावाचामनें-करून राजा आपल्या कचाट्यांत सांपडला आहे असें जाणून तो बकध्यानी बुवा म्हणाला,—

नाम हमार एकतनु भाई।
सुनि नृप बोलेउ पुनि सिरु नाई।

बाबा रे ! माझें नांव एकतनु. तें ऐकतांच पुन्हां राजा मस्तक नमवून म्हणाला—

कहहु नाम कर अरथ बखानी।
मोहि सेवक अति आपन जानी।

आपला निस्सीम सेवक जाणून मला या नांवाचा इत्थंभूत अर्थ सांगावा.

दो०—आदि सृष्टि उपजी जबहि तब उतपाति भइ मोरि। नाम एकतनु हेतु तेहि देह न धरी बहोरि ॥ १६८ ॥

( मुनी म्हणाला ) आदिसृष्टीबरोबरच माझीहि उत्पत्ति झाली. मी पुन्हां दुसरा देह घेतला नाहीं, म्हणूनच माझें नांव एकतनु.

चौ०—जानि आचरजु करहु मन माहीँ।
सुत तप तेँ दुर्लभ कछु नाहीँ।
तपबल ते जग सृजइ बिधाता।
तपबल बिष्णु भये परित्राता।

तपबल संभु करहिँ संहारा।
तप तेँ अगम न कछु संसारा।

तूं मनांत आश्चर्य करूं नये. बच्चा ! तपाला दुर्लभ असें कांहींच नाहीं. ब्रम्हदेव तपोबलानेंच सृष्टि निर्माण करितो, विष्णु जगताचें पालन करितो आणि शिव संहार करितो. तपानें या सृष्टींत कठिण असें कांहींच नाहीं.

भयउ नृपहि सुनि अतिअनुरागा।
कथा पुरातन कहइ सो लागा।
करम धरम इतिहास अनेका।
करइ निरूपन बिरति बिबेका।
उद्भव-पालन-प्रलय-कहानी।
कहेसि अमित आचरज बखानी।

हें ऐकून राजाची त्याजवर फारच भक्ति जडली. नंतर तो मुनी पूर्वकथा सांगूं लागला. कर्म, धर्म, अनेक इतिहास, वैराग्य व ज्ञान इत्यादि विषयांवर त्यानें व्याख्यान झोडलें. त्यानें जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांवरहि बाता झोकल्या. एवंच, त्यानें बेसुमार आश्चर्यकारक गप्पाष्टक केलें.

सुनि महीप तापसबस भयऊ।
आपन नाम कहन तब लयऊ।

तें ऐकून तर तो राजा त्या तापसाच्या तावडींत पूर्णपणें सांपडला, व लागलीच त्यानें आपलें खरें नांव त्याला सांगण्याकरितां उच्चारिलें.

कह तापस नृप जानउँ तोही।
कीन्हेहु कपट लाग भल मोही।

मुनी म्हणाला, हे राजा ! मी तुला ओळखतों. तूं उडवाउडवी केलीस तेंसुद्धां मला आवडलें.

**सो०—सुनु महीस असि नीति जहँ तहँ नाम न कहहिँ नृप। मोहि तोहि पर अति प्रीति सोइ चतुरता बिचारि तव॥२५॥**

राजा ! ऐक. राजानें जेथें तेथें आपलें नांव सांगत सुद्धां नये अशी ही राजनीतीच आहे. तुझें चातुर्य पाहून तुझ्याविषयीं मला फारच प्रेम वाटत आहे.

चौ०—नाम तुह्मार प्रतापदिनेसा।
सत्यकेतु तव पिता नरेसा।
गुरुप्रसाद सब जानिय राजा।
कहिय न आपन जानि अकाजा।
देखि तात तव सहज सुधाई।
प्रीतिप्रतीति नीति निपुनाई।
उपजि परी ममता मन मोरे।
कहउँ कथा निज पूछे तोरे।
अब प्रसन्न मैँ संसय नाहीँ।
माँगु जो भूप भाव मन माहीँ।

राजा ! तुझें नांव प्रतापभानु असून तुझा पिता सत्यकेतु होय. गुरुप्रसादेंकरून मी सर्व जाणतों. परंतु या गोष्टी बोलण्यांत हानि होते, सबब आपलें आपणच बोलत सुद्धं नये. वत्सा ! तुझी स्वाभाविक बुद्धिमत्ता, तुझी प्रीति, तुझा विश्वास आणि तुझें नीतिनैपुण्य पाहून माझ्या अंतःकरणांत ममता उत्पन्न झाली, ह्मणून तूं प्रश्न करतांच माझा वृत्तांत मी तुला कळविला. आतां मी तुजवर निःसंशय प्रसन्न आहे. राजा ! मनास मानेल तें माग.

सुनि सुवचन भूपति हरषाना।
गहि पद बिनय कीन्हि बिधि नाना।

त्या मुनीचें तें मधुर भाषण ऐकून राजा हर्षित झाला व त्याचे पाय धरून अनेक रीतीनें विनवूं लागला.

कृपासिंधु मुनि दरसन तोरे।
चारि पदारथ करतल मोरे।
प्रभुहि तथापि प्रसन्न बिलोकी।
माँगि अगम बरु होउँ असोकी।

हे कृपासागर मुने ! आपल्या दर्शनानेंच चतुर्विध पुरुषार्थ माझ्या हस्तगत झाले आहेत. तथापि, आपण प्रसन्न आहांत असें पाहून मी एक दुर्लभ वर मागतों, तेणेंकरून मी पूर्णपणें शोकरहित होईन.

**दो०—जरा मरन दुख रहित तनु समर जितइ जनि कोउ। एकछत्र रिपुहीन महि राज कलप सत होउ॥ १६९॥**

माझा देह जरामरणदुःखरहित असावा. रणांत मी अजिंक्य असावें. पृथ्वीवर माझें राज्य एकछत्री, निष्कंटक आणि कल्पशतपर्यंत चालावें.

चौ०—कह तापस नृप ऐसेइ होऊ।
कारन एक कठिन सुनु सोऊ।
कालउ तव पद नाइहि सीसा।
एक बिप्रकुल छाडि महीसा।

तापस ह्मणाला, राजा ! तसेंच होईल. परंतु एक कर्म कठिण आहे. तें ऐक. राजा ! एक ब्रह्मकुल

वगळून प्रत्यक्ष काळदेखील तुझ्या पायावर मस्तक ठेवील.

तपबल विप्र सदा बरिआरा।
तिन्ह के कोप न कोउ रखवारा
जौँ बिप्रन्ह बस करहु नरेसा।
तौ तव बस बिधि बिष्णु महेसा।

ब्राह्मण तपोबलानें सदैवच बलिष्ठ आहेत. त्यांच्या कोपापासून परित्राण करणारा कोणीच नाहीं. राजा! जर ब्राह्मणांस वश करिशील तर ब्रह्माविष्णुमहेशहि तुला वशच आहेत, असें समज.

चल न ब्रह्मकुल सन बरिआई।
सत्य कहउँ दोउ भुजा उठाई।
बिप्रसाप बिनु सुनु महिपाला।
तोर नास नहिँ कवनेहुँ काला।

ब्रह्मकुलाशीं वरचढपणा करणें शक्य नाहीं, हें मी तुला प्रतिज्ञेनें [ दोन्ही हात वर करून ] खरें सांगतों. राजा एक विप्रशापाखेरीज कोणत्याहि काळीं तुझा नाश व्हावयाचा नाहीं.

हरषेउ राउ बचन सुनि तासू।
नाथ न होइ मोर अब नासू।
तव प्रसाद प्रभु कृपानिधाना।
मो कहँ सर्बकाल कल्याना।

त्याचें वचन ऐकून राजा हर्षित होऊन म्हणाला, हे नाथ, आतां माझा नाश व्हावयाचा नाहीं. हे दयाळू प्रभो, आपल्या कृपेनें माझें सर्वकाल कल्याणच असणार.

**दो०—एवमस्तु कहि कपटमुनि बोला कुटिल बहोरि। मिलब हमार भुलाब निज कहहु त हमहिँ न खोरि ॥ १७० ॥**

तो पक्का बिलंदर बुवा ' तथास्तु ' असें पुन्हां म्हणाला. मात्र ही आपली परस्परांची भेट जर जाहीर झाली तर आमच्याकडेस दोष नाहीं.

चौ०—ता तेँ मैँ तोहि बरजउँ राजा।
कहे कथा तव परम अकाजा।
छठेँ स्रवन यह परत कहानी।
नास तुम्हार सत्य मम बानी।

राजा! यास्तव ही गोष्ट फोडण्याची मी तुला मनाई करतों. जर फुटली तर फारच घात होईल. ही वार्ता षट्कर्णी झाल्यास तुझा नाशच होईल, हें माझें सांगणें सत्य समज.

यह प्रगटे अथवा द्विजसापा।
नास तोर सुनु भानुप्रतापा।
आन उपाय निधन तव नाहीँ।
जौँ हरि हर कोपहिँ मन माहीँ।

हे भानुप्रतापा! ही गोष्ट प्रगट झाल्यानें अगर द्विजशापानें तुझा नाश होणार हें लक्षांत ठेव. एरवीं हरिहर जरी मनांत कोपले तरी अन्य रीतीनें तुला मृत्यु येणार नाहीं.

सत्य नाथ पद गहि नृप भाखा।
द्विज-गुरु-कोप कहहु को राखा।
राखइ गुरु जौँ कोप बिधाता।
गुरुबिरोध नहिँ कोउ जगत्राता।

राजा त्या मुनीचे पाय धरून म्हणाला, आपण सत्य बोललांत. द्विज व गुरु यांच्या क्रोधापासून वांचविणारा कोण आहे तें सांगा पाहूं! ब्रह्मदेव जर कोपला तर गुरु रक्षण करील. पण गुरूशीं विरोध आला तर मात्र जगांत कोणीदेखील त्राता नाहीं.

जौँ न चलब हम कहे तुम्हारे।
होउ नास नहिँ सोच हमारे।
एकहि डर डरपत मन मोरा।
प्रभु महि-देव-साप अतिघोरा।

जर मी आपल्या सांगण्याप्रमाणें न वागलों तर माझा नाश झाल्यास त्याचें मला मुळींच दुःख वाटणार नाहीं. फक्त एकाच भीतीनें माझें मन कचरत आहे. प्रभो! ब्रह्मशाप अति दारुण असतो.

**दो०—होहिँ बिप्र बस कवन बिधि कहहु कृपा करि सोउ। तुम्ह तजि दीनदयाल निज हितू न देखउँ कोउ ॥ १७१ ॥**

विप्र कशानें वश होतील तें कृपा करून कळवावें. हे दीनदयाळ! आपणांखेरीज माझा हितचिंतक मला कोणीच दिसत नाहीं.

चौ०—सुनु नृप बिबिध जतन जग माहीँ।
कष्टसाध्य पुनि होहिँ कि नाहीँ।
अहइ एक अतिसुगम उपाई।
तहाँ परंतु एक कठिनाई।

राजा, ऐक. ( विप्र साध्य करण्यास ) जगांत अनेक उपाय आहेत; पण ते कष्टसाध्य असून

अनिश्चित आहेत. अत्यंत सुगम असा एकच तेवढा उपाय आहे; पण त्यांतहि एक अडचण आहेच.

मम आधीन जुगुति नृप सोई ।
मोर जाब तव नगर न होई ।
आजु लगे अरु जब तें भयउँ ।
काहू के गृह ग्राम न गयऊँ
जौं न जाउँ तब होइ अकाजू ।
बना आइ असमंजस आजू ।

राजा ! तो उपाय फक्त मजकडूनच होणार आहे. पण तुझ्या नगरांत माझें जाणें होत नाहीं. मी जन्मापासून आजपर्यंत कोणाच्याच घरीं किंवा ग्रामीं गेलों नाहीं. परंतु आतां मी जर न जावें तर तुझी मात्र मोठीच हानि होणार. आज हा अवघडच पेंच येऊन पोंचला आहे.

सुनि महीस बोलेउ मृदु बानी ।
नाथ निगम असि नीति बखानी ।
बडे सनेह लघुन्ह पर करहीं ।
गिरि निज सिरन्हि सदा तृन धरहीं ।
जलधि अगाध मौलि बह फेनू ।
संतत धरनि धरत सिरु रेनू ।

तें ऐकून राजा नम्र वाणीनें म्हणाला, महाराज ! शास्त्रांत अशी नीति सांगितली आहे कीं, मोठे लहानावर कृपाच करितात. पर्वत आपल्या मस्तकावर नेहमीं तृण धारण करितो. समुद्र अगाध, पण तोहि आपल्या पृष्ठावर फेंस धारण करितो, व ही पृथ्वी निरंतर धूळ डोक्यावर घेते.

**दो०—अस कहि गहे नरेस पद स्वामी होहु कृपाल । मोहि लागि दुख सहिय प्रभु सज्जन दीनदयाल ॥ १७२ ॥**

असें बोलून राजानें त्याचे पाय धरिले, आणि म्हणाला, महाराज ! दया करा. सज्जन दीनदयाळ असतात. प्रभो ! आपण माझ्यासाठीं दुःख सहन करावें.

चौ०—जानि नृपहि आपन आधीना ।
बोला तापस कपटप्रबीना ।
सत्य कहउँ भूपति सुनु तोही ।
जग नाहिँ न दुर्लभ कछु मोही ।

राजा आपल्या सांपळ्यांत सांपडला असें जाणून तो महाचाई जोगडा म्हणाला, राजा ! तुला खरें सांगतों ऐक. जगांत मला दुर्लभ असें कांहीं देखील नाहीं.

अवसि काज मैं करिहउँ तोरा ।
मन तन बचन भगत तैं मोरा ।
जोग जुगुति तप मंत्रप्रभाऊ ।
फलइ तबहिँ जब करिय दुराऊ ।

तूं माझा कायावाचामनेंकरून भक्त आहेस. मी तुझें काम अवश्य करीन. योग, युक्ति, तप, मंत्र, यांचा प्रभाव जेव्हां यत्न करावा तेव्हांच फळास येतो.

जौं नरेस मैं करउँ रसोई ।
तुम्ह परुसहू मोहि जान न कोई ।
अन्न सो जोइ जोइ भोजन करई ।
सोइ सोइ तव आयसु अनुसरई ।

राजा ! मी स्वतः पाक तयार करावा व तूं स्वतः तो वाढावा, परंतु मला कोणी ओळखतां कामा नये. असें जर होईल तर जो जो कोणी ह्या अन्नाचें भोजन करील तो तुझा पूर्ण आज्ञांकित होऊन राहील.

पुनि तिन्ह के गृह जेवइ जोऊ ।
तव बस होइ भूप सुनु सोऊ ।
जाइ उपाय रचहु नृप एहू ।
संबत भरि संकलप करेहू ।

राजा ! फिरून हेंहि लक्षांत ठेव कीं, त्याच्या घरीं जो कोणी जेवील तोहि तुला वशच होईल; तर तूं जा आणि अशी योजना करून एक संवत्सरात्मक संकल्प कर.

**दो०—नित नूतन द्विज सहस सत बरेहु सहित परिवार । मैं तुम्हरे संकलप लगि दिनहिँ करब जेवनार ॥ १७३ ॥**

नित्य नवीन एक लक्ष ब्राह्मण सपरिवार बोलावीत जा. संकल्प—कालापर्यंत मी रोज तुझ्या येथें पाकनिष्पत्ति करीन.

चौ०—एहि बिधि भूप कष्ट अति थोरे ।
होइहहिँ सकल बिप्र बस तोरे ।
करिहहिँ बिप्र होम मख सेवा ।
तेहि प्रसंग सहजहिँ बस देवा ।

राजा ! ह्यांत तुला फारच थोडे कष्ट पडून सर्व ब्राह्मण तुला वश होतील. ब्राह्मण होमहवन करून

यज्ञसेवा करितात, व त्या योगानें देवता त्यांस साहजिकच प्रसन्न असतात.

अउर एक तोहि कहउँ लखाऊ।
मैं एहि बेष न आउब काऊ।
तुह्मरे उपरोहित कहँ राया।
हरि आनब मैं करि निज माया।
तपबल तेहि करि आपु समाना।
रखिहउँ इहाँ बरष परवाना।
मैं धरि तासु बेष सुनु राजा।
सब बिधि तोर सवाँरब काजा।

आणखी एक गोष्ट तुला सांगून ठेवितों कीं, मी ह्या वेषानें तेथें कधींच येणार नाहीं. राजा! तुझ्या पुरोहितास मी आपल्या मायेनें येथें हरण करून आणीन व तपोबलेंकरून त्यास आपणासारखा करून एक वर्षपर्यंत येथेंच ठेवीन आणि राजा! मी त्याचें रूप घेऊन सर्व प्रकारें तुझा कार्यभाग उरकीन.

गइ निसि बहुत सयन अब कीजे।
मोहि तोहि भूप भेंट दिन तीजे।
मैं तपबल तोहि तुरग समेता।
पहुँचइहउँ सोवतहिँ निकेता।

रात्र फार झाली, आतां निद्रा कर. राजा! माझी व तुझी गांठ यापुढें तीन दिवसांनीं होईल. तपःसामर्थ्यानें तुझ्या घोड्यासुद्धां निद्रित असतांनाच तुला तुझ्या घरीं मी पोंचवितों.

**दो०—मैं आउब सोइ बेष धरि पहिचानेउ तब मोहि। जब एकांत बुलाइ सब कथा सुनावउँ तोहि॥ १७४॥**

मी तोच वेष घेऊन येईन, व जेव्हां एकांतांत बोलावून तुला सर्व वृत्तांत सांगेन तेव्हां तूं मला ओळख.

चौ०—सयन कीन्ह नृप आयसु मानी।
आसन जाइ बैठ छलज्ञानी।
स्रमित भूप निद्रा अति आई।
सो किमि सोव सोच अधिकाई।

त्या मुनीची आज्ञा घेऊन राजा निद्रित झाला व तो अट्टल लफंगा आपल्या आसनावर जाऊन बसला. थकल्यामुळें राजास तर गाढ झोंप लागली, परंतु त्या तपस्व्याला झोंप कशाची लागते? त्याला तर जास्तच विवंचना लागली.

कालकेतु निसिचर तहँ आवा।
जेहि सूकर होइ नृपहि भुलावा।
परममित्र तापसनृप केरा।
जानइ सो अति कपट घनेरा।

ज्यानें वराहरूप घेऊन राजास भुलविलें तो कालकेतु राक्षस तेथें आला. तो त्या तापसी राजाचा जिवलग मित्र असून कपटविद्येंत अगदीं तरबेज असे.

तेहि के सत सुत अरु दस भाई।
खल अति अजय देव-दुख-दाई।
प्रथमहिँ भूप समर सब मारे।
बिप्र संत सुर देखि दुखारे।

त्यास शंभर पुत्र व दहा बंधु होते. तेहि महादुष्ट, अजिंक्य आणि देवपीडक होते. ब्राह्मण, संत व देव हे त्रस्त झाले आहेत असें पाहून त्या सर्वांचें राजा प्रतापभानूनें आधींच रणांत पारिपत्य केलें होतें.

तेहि खल पाछिल बयरु सँभारा।
तापस नृप मिलि मंत्र बिचारा।
जेहि रिपुछय सोइ रचेन्हि उपाऊ।
भावी बस न जान कछु राऊ।

त्या दुष्टानें मागचा दावा साधला, आणि तापसी राजास भेटून खलबत केलें, व जेणेंकरून शत्रूचा नाश होईल असा उपाय योजला परंतु राजा भवितव्यतेला वश होऊन यांपैकीं कांहींच जाणत नव्हता.

**दो०—रिपु तेजसी अकेल अपि लघु करि गनिय न ताहु। अजहुँ देत दुख रबि-ससिहि सिर अवसेषित राहु॥ १७५॥**

तेजस्वी रिपू जरी एकटा असला तरी त्यास क्षुल्लक म्हणून समजूं नये. राहूचें मस्तकच अवशिष्ट आहे, पण अजूनदेखील तो चंद्रास पीडा देतच आहे.

चौ०—तापस नृप निज सखहि निहारी।
हरषि मिलेउ उठि भयउ सुखारी।
मित्रहि कहि सब कथा सुनाई।
जातुधानु बोला सुख पाई।

तो तापसी राजा आपला मित्र आला आहे असें पाहतांच आनंदानें उठून त्यास भेटला व संतुष्ट झाला, व त्यानें त्याला सर्व गोष्टी सांगितल्या. राक्षस हर्षभरित होऊन म्हणाला—

अब साधेउँ रिपु सुनहु नरेसा।
जौं तुम्ह कीन्ह मोर उपदेसा।

परिहरि सोच रहहु तुम्ह सोई ।
बिनु ओषध बिआधि बिधि खोई ।

राजा ! ज्याअर्थी तूं माझ्या सल्ल्याप्रमाणें वागलास त्याअर्थी आतां हा शत्रु गांठलाच असें समज. दैवयोगानें औषधावांचूनच रोग गेला असें समजून तूं आतां निर्धास्त झोंप घे.

कुलसमेत रिपुमूल बहाई ।
चौथे दिवस मिलब मैं आई ।
तापसनृपहि बहुत परितोषी ।
चला महाकपटी अतिरोषी ।

रिपूचीं कुळासकट पाळेंमुळें खणून चवथ्याच दिवशीं मी तुला भेटण्यास येतों. तापस राजाचें बहुतप्रकारें समाधान करून तो अत्यंत खुनशी आणि महान् कावेबाज राक्षस चालता झाला.

भानुप्रतापहि बाजिसमेता ।
पहुचायेसि छन माँझ निकेता ।
नृपहि नारि पहिँ सयन कराई ।
हयग्रह बाँधेसि बाजि बनाई ।

त्या राक्षसानें घोड्यासह भानुप्रतापास निजलेलाच एका क्षणांत त्याच्या मंदिरांत पोंचता केला, आणि त्यास अंतःपुरांत निजवून घोडा पागेंत बांधला.

**दो०—राजा के उपरोहितहि हरि लेइ गयउ बहोरि । लेइ राखेसि गिरिखोह महँ माया करि मति भोरि ॥ १७६ ॥**

तसेंच राजाच्या पुरोहितासहि त्यानें उचलून नेलें आणि त्यास मायेनें निश्चेष्ट करून गिरिकंदरांत नेऊन ठेविलें.

चौ०—आपु बिरचि उपरोहितरूपा ।
परेउ जाइ तेहि सेज अनूपा ।

आपण पुरोहिताचें रूप घेऊन तो राक्षस त्याच्या अनुपम शय्येवर जाऊन पडला.

जागेउ नृप अनभये बिहाना ।
देखि भवन अति अचरजु माना ।
मुनिमहिमा मन महँ अनुमानी ।
उठेउ गवहिँ जेहि जान न रानी ।

उजाडण्यापूर्वींच राजा जागा झाला, तों मंदिराकडे पाहून त्यास फारच आश्चर्य वाटलें; व हा मुनीचा प्रभाव आहे असें मनांत समजून तो राणीस नकळत उठून गेला.

कानन गयउ बाजि चढि तेही ।
पुर नरनारि न जानेउ केही ।
गये जामजुग भूपति आवा ।
घर घर उत्सव बाज बधावा ।

त्याच घोड्यावर बसून शहरांतील कोणाहि स्त्रीपुरुषांस न कळत तो राजा वनांत गेला, व तो दोन प्रहरांनीं परत आल्यावर घरोघरीं उत्सवप्रदर्शक वाद्यांचा गजर होऊं लागला.

उपरोहितहि देख जब राजा ।
चकित बिलोक सुमिरि सोइ काजा ।

पुरोहितावर जेव्हां राजाची नजर गेली, तेव्हां आश्चर्यचकित होऊन त्यास त्याच्या कार्याची आठवण झाली.

जुगसम नृपहि गये दिन तीनी ।
कपटी मुनिपद रहि मति लीनी ।
समय जानि उपरोहित आवा ।
नृपहि मते सब कहि समुझावा ।

राजाला ते तीन दिवस तीन युगांप्रमाणें गेले. या भामट्या बोवाच्या चरणीं त्याची बुद्धीच अगदीं गहाण पडली होती. योग्य वेळीं पुरोहितानें येऊन राजास एकांतांत सर्व वृत्त समजावून सांगितलें.

**दो०—नृप हरषेउ पहिचानि गुरु भ्रमवस रहा न चेत । बरे तुरत सतसहस बर बिप्र कुटुंबसमेत ॥ १७७ ॥**

तो गुरु आहे असें जाणून राजा हर्षित झाला. भ्रमामुळें त्यास मुळींच विचारशक्ति उरली नव्हती. त्यानें उत्कृष्ट लक्षावधि ब्राह्मणांस त्वरित निमंत्रण केलें.

चौ०—उपरोहित जेवनार बनाई ।
छरस चारि बिधि जसि स्रुति गाई ।
मायामय तेहि कीन्ह रसोई ।
बिंजन बहु गनि सकइ न कोई ।

पुरोहितानें शास्त्रोक्तरीत्या षड्रस व चतुर्विध पाकनिष्पत्ति केली. त्यानें आपल्या मायेच्या योगानें उत्तम पाक केला. त्यांत इतक्या प्रकारच्या भाजाचटण्या होत्या कीं, त्यांची गणतीहि करितां येत नव्हती.

बिबिध मृगन्ह कर आमिष राँधा ।
तेहि महँ बिप्रमासु खल साँधा ।
भोजन कहँ सब बिप्र बोलाये ।
पद पखारि सादर बैठाये ।

अनेक प्रकारच्या मृगांचें मांस शिजविलें होतें. त्यांतच त्या चांडाळानें विप्रमांसहि मिळविलें होतें. राजानें ब्राह्मण-मंडळींना भोजनास बोलाविलें आणि त्यांचें पादप्रक्षालन करून त्यांस आदरपूर्वक बसविलें.

परुसन जबहिँ लाग महिपाला ।
भइ अकासबानी तेहि काला ।
बिप्रबृंद उठि उठि गृह जाहू ।
है बडि हानि अन्न जनि खाहू ।

राजा जेव्हां वाढूं लागला तेव्हां एकदम आकाश-वाणी झाली कीं, " विप्रवृंद हो ! एकदम उठून आपापल्या आश्रमास चालते व्हा, कारण भयंकर घात आहे; अन्न खाऊं नका.

भयउ रसोईं भू-सुर-मासू ।
सब द्विज उठे मानि बिश्वासू ।

विप्रमांसाचा पाक केला आहे. " त्या वाणीवर विश्वास ठेवून सर्व विप्रवृंद उठले.

भूप बिकल मति मोह भुलानी ।
भावी बस न आव मुख बानी ।

राजा विव्हल झाला व मोहानें त्याची मति मूढ झाली. भवितव्यतेला वश झाल्यामुळें त्याच्या मुखावाटें शब्द निघेना !

दो०-बोले बिप्र सकोप तब नहिँ कछु कीन्ह बिचार । जाइ निसाचर होहु नृप मूढ सहित परिवार ॥ १७८ ॥

तेव्हां ब्राह्मण क्रोधानें म्हणाले, " हे राजा ! तूं मुळींच कीं रे विचार केला नाहींस ! मूढा ! सर्व परिवारासहित राक्षस हो. "

चौ०-छत्रबंधु तैँ बिप्र बोलाई ।
घालै लिये सहित समुदाई ।
ईस्वर राखा धरम हमारा ।
जइहसि तैँ समेत परिवारा ।
संबत मध्य नास तव होऊ ।
जलदाता न रहिहि कुल कोऊ ।

हे क्षत्रियाधमा ! ब्राम्हणांना निमंत्रण करून त्यांच्या कुटुंबासुद्धां त्यांजवर घाला घालीत होतास; परंतु परमेश्वरानें आमचा धर्म राखला. परिवारासहित तुझा नायनाट होईल. एका वर्षांतच तूं नामशेष होऊन तुझ्या कुळांत कोणी ( पितरांस पाणी देण्या-साहि ) उरणार नाहीं.

नृप सुनि साप बिकल अतित्रासा ।
भइ बहोरि बरगिरा अकासा ।
बिप्रहु साप बिचारि न दीन्हा ।
नहिँ अपराध भूप कछु कीन्हा ।

तो शाप ऐकून राजा अत्यंत शोकविव्हल झाला. तेव्हां पुन्हां गंभीर अशी आकाशवाणी झाली कीं, विप्र हो ! तुम्ही विचारपूर्वक शाप दिला नाहीं. ( वास्तविक ) राजानें कांहींच अपराध केला नव्हता.

चकित बिप्र सब सुनि नभबानी ।
भूप गयउ जहँ भोजनखानी ।
तहँ न असन नहिँ बिप्र सुआरा ।
फिरेउ राउ मन सोच अपारा ।
सब प्रसंग महिसुरन्ह सुनाई ।
त्रसित परेउ अवनी अकुलाई ।

ती आकाशवाणी ऐकून सर्व ब्राह्मण अगदीं चकित झाले. राजा पाकशाळेंत जाऊन पाहतो तों तेथें पाकहि नाहीं. तेव्हां राजाच्या मनांत अपार दुःख होऊन तो परत फिरला आणि सर्व वृत्तांत ब्राह्मणांस निवेदन करून तो त्रस्त होत्साता. अगदीं व्याकुळ होऊन धरणीवर पडला.

दो०-भूपति भावी मिटइ नहिँ जदपि न दूषन तोर । किये अन्यथा होइ नहिँ बिप्रसाप अतिघोर ॥ १७९ ॥

( ब्राह्मण म्हणाले ) राजा ! होणार तें चुकत नाहीं. जरी यांत तुझा दोष नाहीं तरी विप्रशाप अति दारुण, तो अन्यथा करूं गेल्यासहि होणार नाहीं.

चौ०-अस कहि सब महिदेव सिधाये ।
समाचार पुरलोगन्ह पाये ।
सोचहिँ दूषन दैवहि देहीँ ।
बिचरत हंस काग किय जेहीँ ।

असें बोलून सर्व ब्राम्हण मार्गस्थ झाले. नंतर सर्व लोकांस तें वर्तमान समजलें. तेव्हां ते शोकग्रस्त होऊन विहार करीत असलेल्या राजहंसाला कावळा बनविणाऱ्या दुर्दैवाला बोल ठेवूं लागले.

उपरोहितहि भवन पहुँचाई ।
असुर तापसहि खबरि जनाई ।
तेहि खल जहँ तहँ पत्र पठाये ।
सजि सजि सेन भूप सब धाये ।

घेरेन्हि नगर निसान बजाई ।
बिबिधभाँति नित होइ लराई ।
जूझे सकल सुभट करि करनी ।
बंधुसमेत परेउ नृप धरनी ।

राक्षसानें पुरोहितास घरीं पोंचवून तापसराजास वर्दी दिली. त्या दुष्टानें जिकडे तिकडे खलिते रवाना केले. सर्व राजे आपापलीं सैन्यें तयार करून धांवत सुटले आणि त्यांनीं शहरास शह दिला. रणवाद्यें दुमदुमूं लागलीं. नित्य अनेक प्रकारें रणकंदन माजूं लागलें. प्रमुख प्रमुख योद्धे शिकस्त करून झुंजले. अखेरीस राजा प्रतापभानु बंधूसह मारला गेला.

सत्य-केतु-कुल कोउ नहिँ बाँचा ।
बिप्रसाप किमि होइ असाँचा ।
रिपु जिति सब नृप नगर बसाई ।
निज पुर गवने जय जस पाई ।

सत्यकेतूच्या कुळांत कोणीच उरला नाहीं. विप्रशाप मिथ्या कसा होणार ? प्रतापभानूस जिंकून आणि शहरांत शांतता करून राजे लोक आपापल्या राजधानीस कीर्ति आणि जय घेऊन परत गेले.

**दो०—भरद्वाज सुनु जाहि जब होइ विधाता बाम । धूरि मेरुसम जनक जम ताहि ब्यालसम दाम ॥ १८० ॥**

हे भरद्वाज ! ऐक. एकाद्यास दैव जेव्हां प्रतिकूल होतें तेव्हां त्यास धूळ मेरुसमान, पिता यमतुल्य, आणि पुष्पहार सर्पवत् होतात !

चौ०—काल पाइ मुनि सुनु सोइ राजा ।
भयउ निसाचर सहित समाजा ।
दस सिर ताहि बीस भुजदंडा ।
रावन नाम बीर बरिबंडा ।

मुने ! ऐक. वेळ येतांच तोच राजा परिवारासहित राक्षस झाला. त्यास दहा शिरें आणि वीस भुजदंड होते. त्याचें नांव रावण असून तो फारच प्रचंड वीर होता.

भूपअनुज अरि-मर्दन-नामा ।
भयउ सो कुंभकरन बलधामा ।
सचिव जो रहा धरमरुचि जासू ।
भयउ बिमात्र बंधु लघु तासू ।
नाम बिभीषन जेहि जगु जाना ।
बिष्णुभगत बिज्ञाननिधाना ।

अरिमर्दन नांवाचा राजाचा धाकटा भाऊ बलाढ्य कुंभकर्ण झाला. धर्मरुची नांवाचा त्याचा सचिव त्याचा बिभीषण नांवाचा कनिष्ठ बंधु झाला. त्याला विष्णुभक्त व ब्रम्हवेत्ता म्हणून सर्व जग जाणत आहे.

रहे जे सुत सेवक नृप केरे ।
भये निसाचर घोर घनेरे ।
कामरूप खल जिनिस अनेका ।
कुटिल भयंकर बिगतबिबेका ।
कृपारहित हिंसक सब पापी ।
बरनि न जाइ बिस्वपरितापी ।

राजाचे पुत्र आणि सेवक होते तेहि अनेक भयंकर राक्षस झाले. ते दुष्ट, मायावी, अघोर, कुटिल, भयंकर आणि अविचारी होते. सर्वच जण पापबुद्धि, निर्दय, हिंसक आणि जगाला अनिर्वाच्य पीडा देणारे झाले.

**दो०—उपजे जदपि पुलस्त्यकुल पावन अमल अनूप । तदपि मही-सुर-साप-बस भये सकल अघरूप ॥ १८१ ॥**

जरी त्यांचा जन्म अनुपम, पावन आणि शुद्ध अशा पुलस्त्यकुळांत झाला होता, तथापि ब्राम्हण-शापवशात् सर्वच पापरूप निपजले.

चौ०—कीन्ह बिबिध तप तीनिउँ भाई ।
परम उग्र नहिँ बरनि सो जाई ।
गयउ निकट तप देखि बिधाता ।
माँगहु बर प्रसन्न मैँ ताता ।

तिघाहि भावांनीं अत्यंत उग्र व अवर्णनीय असें नानाविध तप केलें. त्यांचें तप पाहून ब्रम्हदेव त्यांचेकडे जाऊन म्हणाले, बाबांनो ! मी प्रसन्न आहे; वर मागा.

करि बिनती पद गहि दससीसा ।
बोलेउ बचन सुनहु जगदीसा ।
हम काहू के मरहिँ न मारे ।
बानर मनुज जाति दुइ बारे ।
एवमस्तु तुम्ह बड तप कीन्हा ।
मैँ ब्रह्मा मिलि तेहि बर दीन्हा

रावण त्यांचे चरण धरून अत्यंत विनयानें म्हणाला, हे जगदीश ! ऐका. वानर व मनुष्य या दोन योनी खेरीजकरून मी कोणाकडूनहि वध्य असूं

नये. यावर ब्रम्हदेव म्हणाले, तथास्तु; तूं भयंकर तप केलेंस, म्हणूनच मी ब्रम्हदेवानें तुला भेटून वर दिला आहे.

पुनि प्रभु कुंभकरन पहिँ गयऊ।
तेहि बिलोकि मन बिसमय भयऊ।

फिरून ब्रम्हदेव कुंभकर्णाकडे गेले व त्यास पाहून ते मनांत अगदीं चकित झाले.

जौँ एहि खल नित करब अहारू।
होइहि सब उजारि संसारू।
सारद प्रेरि तासु मति फेरी।
माँगेसि नीँद मास षट केरी।

हा खल जर नित्य आहार करील तर सारें जग उजाड होईल, म्हणून सरस्वतीस आज्ञा करून त्यांनीं त्याचा बुद्धिभ्रंश करविला. तेव्हां त्यानें षाण्मासिक निद्रा मागितली.

**दो०–गए बिभीषन पास पुनि कहेउ पुत्र बर माँगु। तेहि माँगेउ भगवंत-पद-कमल अमल अनुरागु ॥ १८२ ॥**

नंतर ब्रम्हदेव बिभीषणाकडे गेले, व म्हणाले वत्सा! वर माग. त्यानें हरिपदकमलाचे ठिकाणीं विमल भक्ति मागितली.

चौ०–तिन्हहिँ देइ बर ब्रह्म सिधाये।
हरषित ते अपने गृह आये।

त्यांना वर देऊन ब्रम्हदेव निघाले, व हर्षित होऊन आपल्या सत्यलोकाप्रत आले.

मयतनुजा मंदोदरिनामा।
परमसुंदरी नारिललामा।
सोइ मय दीन्हि रावनहिं आनी।
होइहि जातुधानपति जानी।
हरषित भयउ नारि भलि पाई।
पुनि दोउ बंधु बिआहेसि जाई।

मयराक्षसाची अत्यंत सुंदर, स्त्रीललाम अशी मंदोदरी नांवाची कन्या होती. ती त्यानें रावणास आणून अर्पण केली. पुढें तीच रावणाची पट्टराणी झाली. उत्तम स्त्री मिळाली म्हणून रावण संतुष्ट झाला. नंतर जाऊन त्यानें दोघाहि भावांचा विवाह केला.

गिरि त्रिकूट एक सिंधु मँझारी।
बिधिनिर्मित दुर्गम अति भारी।
सोइ मयदानव बहुरि सवाँरा।
कनकरचित मनिभवन अपारा।

समुद्रामध्यें विधिनिर्मित, अत्यंत दुर्गम असा त्रिकूट नांवाचा विशाल पर्वत आहे, तोच मयराक्षसानें सुवर्णरचित अनेक रत्नभवनांनीं खूप शृंगारला.

भोगावति जस अहि-कुल-बासा।
अमरावति जसि सक्रनिवासा।
तिन्ह तेँ अधिक रम्य अति बंका।
जगबिख्यात नाम तेहि लंका।

सर्पकुलनिवास जशी भोगावती किंवा शक्रनिवास जशी अमरावती त्याहीपेक्षां तो त्रिकूटनिवास अधिक रम्य आणि सर्वोत्कृष्ट झाला. त्याचें जगप्रसिद्ध नांव लंका होतें.

**दो०–खाईँ सिंधु गँभीर अति चारिहु दिसि फिरि आव। कनककोट मनिखचित दृढ बरनि न जाइ बनाव ॥ १८३ ॥**

चारी बाजूंनीं घेरून राहिलेला समुद्राचा खंदक, आणि सुवर्णाचा कोट असलेल्या त्या रत्नखचित व अभेद्य लंकेची बांधणी सांगणेंच मुष्किल आहे.

**दो०–हरिप्रेरित जेहि कलप जोइ जातुधानपति होइ। सूर प्रतापि अतुलबल दलसमेत बस सोइ ॥ १८४ ॥**

प्रभूची आज्ञा अशी असे कीं, ज्या कल्पांत जो कोणी शूर, प्रतापी, आणि अतुलबल राक्षसाधिपति होत जाईल तोच लंकेंत सैन्यासह वास करील.

चौ०–रहे तहाँ निसिचर भट भारे।
ते सब सुरन्ह समर संहारे।
अब तहँ रहहिँ सक्र के प्रेरे।
रच्छक कोटि जच्छपति केरे।

पूर्वीं तेथें राक्षस-वीरांचा समुदाय असे त्या सगळ्यांचा देवांनीं युद्धांत निःपात केला. या वेळीं तेथें इंद्राज्ञेनें कुबेराचे कोट्यवधि रक्षक रहात असत.

दसमुख कतहूँ खबरि असि पाई।
सेन साजि गढ घेरेसि जाई।
देखि बिकट भट बडि कटकाई।
जच्छ जीव लेइ गयउ पराई।

एकदां रावणास ही वार्ता कळली व त्यानें सैन्य

सिद्ध करून लंकेच्या किल्ल्यास वेढा दिला. तें प्रचंड सैन्य आणि त्यांतील ते अक्राळविक्राळ वीर पाहूनच यक्ष जीव घेऊन पळून गेले.

फिरि सब नगर दसानन देखा ।
गयउ सोच सुख भजउ बिसेखा ।
सुंदर सहज अगम अनुमानी ।
कीन्हि तहाँ रावन रजधानी ।

रावणानें सर्व नगर फिरून पाहिलें. त्याची काळजी दूर होऊन त्यास विशेष आनंद झाला. किल्ला सुंदर असून निसर्गतःच दुर्गम असलेला पाहून रावणानें तेथेंच आपली राजधानी स्थापिली.

जेहि जस जोग बाँटि गृह दीन्हे ।
सुखी सकल रजनींचर कीन्हे ।
एक बार कुबेर पर धावा ।
पुष्पकजान जीति लेइ आवा ।

त्यानें ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें त्यांना तेथील घरें वांटून दिलीं, आणि सर्व राक्षसांना सुखी केलें. एके प्रसंगीं त्यानें कुबेरावर स्वारी करून त्याचें पुष्पकविमान जिंकून आणलें.

**दो०—कौतुकहीं कैलास पुनि लीन्हेसि जाइ उठाइ । मनहुँ तौलि निज बाहुबल चला बहुत सुख पाइ ॥ १८५ ॥**

त्यानंतर पुन्हां एकदां चैनीखातर जाऊन त्यानें कैलास पर्वतच उचलला, आणि स्वतःच्या मनगटाचा जोर मनांत अजमावून तो हर्षित होत्साता चालता झाला.

चौ०—सुख संपति सुत सेन सहाई ।
जय प्रताप बल बुद्धि बडाई ।
नित नूतन सब बाढत जाई ।
जिमि प्रतिलाभ लोभ अधिकाई ।

रावणाचे घरीं सुख, संपत्ति, पुत्र, मित्र, सैन्य, जय, प्रताप, बल, बुद्धि, महत्त्व हीं सर्व, प्रत्येक लाभागणिक लोभ जसा वाढीस लागतो, तशीं नित्य नवीन वाढीस लागलीं.

अतिबल कुंभकरन अस भ्राता ।
जेहि कहुँ नहिँ प्रतिभट जग जाता ।
करइ पान सोवइ षटमासा ।
जागत होइ तिहूँ पुर त्रासा ।

ज्याच्या जोडीचा योद्धा जगांत उत्पन्नच झाला नव्हता असा अत्यंत बलवान् भ्राता कुंभकर्ण मद्यपान करून सहा महिने घोरत पडे. तो जागा झाला म्हणजे मात्र त्रैलोक्यास पीडा होई.

जौँ दिन प्रति अहार कर सोई ।
बिस्व बेगि सब चौपट होई ।
समरधीर नहिँ जाइ बखाना ।
तेहि सम अमित बीर बलवाना ।

जर तो नित्य आहार करिता तर ब्रह्मांडांतले जीव लवकरच नामशेष झाले असते. रणांगणांत तर तो इतका अचाट पराक्रमी होता कीं, त्याचें वर्णन करवत नाहीं. सारांश, बिभीषण इ० अमित बलाढ्य वीर होते.

बारिदनाद जेठ सुत तासू ।
भट महँ प्रथम लीक जग जासू ।
जेहि न होई रन सनमुख कोई ।
सुरपुर नितहि परावन होई

रावणाला मेघनाद म्हणून ज्येष्ठ पुत्र होता. जगांतील वीरांच्या पहिल्या श्रेणींत तो पहिला असे. समरांगणांत कोणीहि त्याच्यासमोर ठरत नसे. [ इतकेंच नव्हे तर ] देवलोकांतहि त्याच्यामुळें सदैव पळापळ होत असे.

**दो०—कुमुख अकंपन कुलिसरद धूमकेतु अतिकाय । एक एक जग जीति सक ऐसे सु-भट निकाय ॥ १८६ ॥**

कुमुख, अकंपन, वज्रदंत, धूम्रकेतु, अतिकाय इत्यादि एकएकटेहि सारें जग जिंकण्यास समर्थ असे बलाढ्य वीर रावणापाशीं होते.

चौ०—कामरूप जानहिँ सब माया ।
सपनेहुँ जिन्ह के धरम न दाया ।

ते इच्छारूपधारी, अत्यंत मायावी, ज्यांच्या स्वप्नींहि कधीं धर्म किंवा दया नाहीं, असे असत.

दसमुख बैठ सभा एक बारा ।
देखि अमित आपन परिवारा ।
सुतसमूह जन परिजन नाती ।
गनइ को पार निसाचरजाती ।
सेन बिलोकि सहज अभिमानी ।
बोला बचन क्रोध-मद-सानी ।

एके समयीं रावण सभेंत बसला असतां पुत्रपौत्र, व नोकरचाकर वगैरे आपला अपार परिवार पाहून आणि आपल्या अगणित राक्षससेनेस अवलोकन

करून, जात्याच अभिमानी असलेला तो रावण क्रोधयुक्त व उन्मत्तपणें भाषण करूं लागला.

सुनहु सकल रजनी-चर-जूथा।
हमरे बैरी बिबुधबरूथा।
ते सनमुख नहिँ करहिँ लराई।
देखि सबल रिपु जाहिँ पराई।
तिन्ह कर मरन एक बिधि होई।
कहउँ बुझाइ सुनहु अब सोई।

हे सकल राक्षस हो! ऐका. देवगण आपला खरा वैरी आहे. ते उघड सामना देऊन कधीं लढत नाहींत आणि शत्रु बलाढ्य आहे असें पाहून पळ काढतात. त्यांचें मरण एका गोष्टींत आहे, तें मी तुम्हांस समजावून सांगतों, ऐका.

द्विजभोजन मख होम सराधा।
सब कै जाइ करहु तुम बाधा।

तुम्ही जाऊन ब्राह्मणभोजन, यज्ञ, होम, श्राद्ध इत्यादि सर्वांचाच विध्वंस करीत सुटा.

दो०—छुधाछीन बलहीन सुर सहजहिँ मिलिहहिँ आइ। तब मारिहउँ कि छाडिहउँ भली भाँति अपनाइ॥ १८७॥

म्हणजे क्षुधेनें व्याकूल होऊन बलहीन झालेले देव आपोआपच शरण येतील. मग त्यांना मारून टाकूं किंवा बऱ्या बोलानें आपल्याला शरण आले तर सोडून देऊं.

चौ० मेघनाद कहँ पुनि हँकरावा।
दीन्ही सिख बल बयरु बढावा।

नंतर रावणानें मेघनादास हाक मारून त्याच्या पराक्रमास आणि (देवांविषयींच्या) वैरास प्रोत्साहन मिळेल असा त्यास बोध केला.

जे सुर समरधीर बलवाना।
जिन के लरिबे कर अभिमाना।
तिन्हहिँ जीति रन आनेसु बाँधी।
उठि सुत पितु अनुसासन काँधी।

(रावण म्हणाला) जेवढे म्हणून रणशूर आणि बलाढ्य देव असतील व ज्यांना लढण्याची खुमखुम असेल, त्यांना युद्धांत जिंकून बांधून आण. मुला! ऊठ, व आपल्या पित्याची ही आज्ञा मान्य कर.

एहि बिधि सबही आज्ञा दीन्ही।
आपुन चलउ गदा कर लीन्ही।

चलत दसानन डोलति अवनी।
गर्जत गर्भ स्रवहिँ सुररवनी।
रावन आवत सुनेउ सकोहा।
देवन्ह तके मेरु-गिरि-खोहा।

ह्याप्रमाणें सर्वांस आज्ञा करून रावण स्वतः हातांत गदा घेऊन निघाला. तो चालत असतां पृथ्वी डळमळूं लागली. त्याच्या गर्जनेनें देवस्त्रियांचे गर्भपात होऊं लागले. रावण क्रुद्ध होऊन येत आहे असें ऐकून देवांनीं मेरुपर्वतावरील गुहांचा आश्रय केला.

दिगपालन्ह के लोक सुहाये।
सूने सकल दसानन पाये।
पुनि पुनि सिंहनाद करि भारी।
देइ देवतन्ह गारि प्रचारी।

दिक्पालांच्या लोकांवर मुलूखगिरी रावणानें केली, तेव्हां त्यांस तेथें सर्व शून्य आढळलें! तो वारंवार भयंकर सिंहनाद करी, आणि देवांचीं नांवें घेऊन शिव्या देई.

रन-मद-मत्त फिरइ जग धावा।
प्रतिभट खोजत कतहुँ न पावा।

रणमदानें उन्मत्त झालेला तो रावण सर्व जगभर हुतुतु घालीत आपल्याला जोडीदार असा योद्धा शोधीत होता, पण तसा त्याला कोणीच आढळला नाहीं.

रबि ससि पवन बरुन धनधारी।
अगिनि काल जम सब अधिकारी।
किन्नर सिद्ध मनुज सुर नागा।
हठि सबही के पंथहिं लागा।

रवि, चंद्र, वायु, वरुण, कुबेर, अग्नि, काल, यम, दिक्पालादि सर्व अधिकारी, किन्नर, सिद्ध, मानव, देवता, इत्यादि सर्वांच्याच मागें तो हात धुऊन लागत असे.

ब्रह्मसृष्टि जहँ लागि तनुधारी।
दस-मुख-बस-बर्ती नर नारी।
आयसु करहिँ सकल भयभीता।
नवहिँ आइ नित चरन बिनीता

जेथवर म्हणून स्त्रीपुरुषात्मक देहधारी ब्रह्मसृष्टि होती, ती सर्व रावणानें पादाक्रांत केली. सर्व भयभीत होऊन त्याचे अंकित होऊन वागत, व नित्यनियमानें येऊन त्याच्या पायांवर लोटांगणें घालीत असत.

दो०—भुजबल बिस्व बस्य करि राखेसि कोउ न स्वतंत्र । मंडलीकमनि रावन राज करइ निजमंत्र ॥ १८८ ॥

भुजबलानें विश्व आज्ञांकित करून रावणानें स्वतंत्र असा कोणीहि ठेविला नाहीं व तो मांडलिकशिरोमणी [ चक्रवर्ती ] होऊन स्वच्छंदपणें राज्य करूं लागला.

दो०—देव-जच्छ-गंधर्व-नर–किन्नर–नाग–कुमारि । जीति बरीं निज-बाहु-बल बहु-सुंदर–बर–नारि ॥ १८९ ॥

देव, यक्ष, गंधर्व, नर, किन्नर व नाग यांच्या अत्यंत सुंदर आणि स्त्रीजातिललाम अशा कन्यांना त्यानें आपल्या बाहुबलानें जिंकून वरिलें.

चौ०—इंद्रजीत सन जो कछु कहेऊ ।
सो सब जनु पहिलेहि करि रहेऊ ।

इंद्रजिताला जें कांहीं सांगितलें होतें तें सर्व त्यानें जणुंकाय आधींच करून ठेविलें होतें.

प्रथमहिँ जिन कहँ आयसु दीन्हा ।
तिन्ह कर चरित सुनहु जो कीन्हा ।
देखत भीमरूप सब पापी ।
निसि–चर–निकर देवपरितापी ।
करहिँ उपद्रव असुरनिकाया ।
नानारूप धरहिँ करि माया ।

[ याज्ञवल्क्य म्हणतात, ] रावणानें ज्यांना प्रथमतः आज्ञा दिली होती, त्यांनीं जे उपद्व्याप केले ते ऐक. दिसण्यांत अक्राळविक्राळ आणि पापिष्ठ असा सर्व राक्षसांचा समुदाय देवांस भंडावून सोडूं लागला. त्या राक्षससमूहानें आपल्या मायेनें नानारूपें घेऊन धुंडावा आरंभिला.

जेहि बिधि होइ धरमनिर्मूला ।
सो सब करहिँ बेदप्रतिकूला ।
जेहि जेहि देस धेनु द्विज पावहिँ ।
नगर गाउँ पुर आगि लगावहिँ ।

जेणेंकरून धर्म निर्मूल होईल, असे सर्व वेदबाह्य प्रकार ते करीत सुटले. ज्या ज्या प्रदेशांत त्यांना गाई व ब्राह्मण आढळत तें तें नगर, ग्राम, पुर त्यांनीं जाळून फस्त करावें.

सुभ आचरन कतहुँ नहिँ होई ।
देव बिप्र गुरु मान न कोई ।
नहिँ हरिभगति जज्ञ जप दाना ।
सपनेहुँ सुनिय न बेद पुराना ।

सदाचारास कोठेंच वाव राहिला नाहीं. देव, विप्र व गुरु यांना कोणीदेखील मान देईना. हरिभक्ति, यज्ञ, जप व दान कोठेंहि उरलें नाहीं, व वेद आणि पुराणें स्वप्नांतहि कोठें ऐकूं येईनात.

छंद—जप जोग बिरागा तप मखभागा स्रवन सुनइ दससीसा । आपुन उठि धावइ रहइ न पावइ धरि सब घालइ खीसा ॥ अस भ्रष्ट अचारा भा संसारा धरम सुनिय नहिँ काना । तेहि बहु बिधि त्रासइ देस निकासइ जो कह बेद पुराना ॥ १८ ॥

जप, योग, वैराग्य, तप, यज्ञ, ज्ञान इत्यादि लुप्त झाले. त्यांचें नांव ऐकतांच रावण स्वस्थ न बसतां स्वतःच उठून धांवत जाई, आणि त्यांचें अनुष्ठान करणाऱ्या सर्वांसच पकडून त्यांचा चूर उडवी. अशा रीतीनें साऱ्या जगभर भ्रष्टाकार माजला. धर्माचें नांव देखील कानावर येईना. वेद–पुराण पठण करणारांना देखील तो अनेक प्रकारांनीं त्रासवून हद्दपार करी.

सो०—बरनि न जाइ अनीति घोर निसाचर जो करहिँ । हिंसा पर अति प्रीति तिन्ह के पापहिं कवनि मिति ॥ २६ ॥

दुष्ट राक्षस जी भयंकर आग पाखडीत असत ती वर्णवत नाहीं. जे हिंसेवर अत्यंत ललचावलेले त्यांच्या पापांला बांध काय असणार ?

चौ०—बाढे खल बहु चोर जुआरा ।
जे लंपट पर–धन–पर–दारा ।
मानहिँ मातु पिता नहिँ देवा ।
साधुन्ह सन करवावहिँ सेवा ।
जिन्ह के यह आचरन भवानी ।
ते जानहु निसिचर सब प्रानी ।

खल, चोर, जुगारी, परधन आणि परस्त्रीविषयीं लंपट, अशांची संख्या फार फुगत चालली. आईबाप व देव यांची तर कांहींच किंमत राहिली नाहीं. साधु–लोकांकरवीं सेवा घेतली जात असे. हे पार्वति,

ज्यांचा आचार हा असा असतो ते प्राणीदेखील तूं राक्षसच समज.

अतिसय देखि धरम कै ग्लानी।
परमसभीत धरा अकुलानी।
गिरि सरि सिंधु भार नहिँ मोही।
जस मोहि गरुअ एक परद्रोही।
सकलधरम देखइ बिपरीता।
कहि न सकइ रावन भयभीता।

धर्माची अत्यंत ग्लानि झालेली पाहून पृथ्वी फारच भयभीत आणि व्याकुळ झाली. [ ती म्हणे कीं, ] " जसा मला एखाद्या परपीडकाचा भार होतो तसा पर्वत, नद्या, समुद्र इत्यादिकांचाहि होत नाहीं. " सर्वच आचार तिला विपरीत दिसे, पण रावणाच्या भयानें तिला कांहीं बोलवेना.

धेनुरूप धरि हृदय बिचारी।
गई तहाँ जहँ सुर-मुनि-झारी।
निजसंताप सुनायसि रोई।
काहू तेँ कछु काज न होई।

मनांत विचार करून पृथ्वीनें गाईचें रूप धारण केलें, आणि जेथें सर्व देव आणि ऋषि होते तेथें ती गेली, व त्यांना आपलें दुःख सांगून ती रुदन करूं लागली. पण कोणांसहि कांहींहि तोड सुचेना.

**छंद—सुर मुनि गंधर्बा मिलि करि सर्बा गे बिरंचि के लोका। सँग गो-तनु-धारी भूमि बिचारी परम बिकल भय सोका॥ ब्रह्मा सब जाना मन अनुमाना मोर कछू न बसाई। जा करि तैँ दासी सो अबिनासी हमरउ तोर सहाई॥ १९॥**

सुर, मुनि, गंधर्व वगैरे सर्व मिळून सत्य-लोकास गेले. भयानें व शोकानें अत्यंत कष्टी झालेली बिचारी गोरूपधारी पृथ्वीहि त्यांच्या समागमें गेली. ब्रह्मदेवांनीं सर्व ताडलें. पण त्यांनीं मनांत विचार करून म्हटलें कीं, माझ्या स्वाधीन तर कांहींच नाहीं. ज्याची तूं दासी आहेस, तो अनंतच माझा आणि तुझाहि त्राता होईल.

**सो०—धरनि धरहि मन धीर कह बिरंचि हरिपद सुमिरु। जानत जन की पीर प्रभु भंजहिँ दारुन बिपति॥ २७॥**

हरिपदाचें स्मरण करून ब्रम्हदेव म्हणाले, हे भूदेवि! मनांत धीर धर. प्रभु आपल्या भक्तांचें दुःख जाणीतच आहे. तोच विपत्तीचें हरण करील.

चौ०—बैठे सुर सब करहिँ बिचारा।
कहँ पाइय प्रभु करिय पुकारा।
पुर बैकुंठ जान कह कोई।
कोउ कह पयनिधि महँ बस सोई।
जा के हृदय भगति जस प्रीती।
प्रभु तहँ प्रगट सदा तेहि रीती।

सर्व देव मिळून विचार करूं लागले कीं, प्रभु कोठें भेटतील आणि त्यास हाक तरी कोठें मारावी? कोणी म्हणत भगवंताचें वैकुंठपुर प्रसिद्धच आहे. कोणी म्हणाले, ते क्षीरसमुद्रांत वास करितात, परंतु ज्याच्या अंतःकरणांत जशी प्रीति आणि भक्ति असते, त्याप्रमाणें प्रगट होणें, हा त्याचा अबाधित नियम आहे.

तेहि समाज गिरिजा मैँ रहेउँ।
अवसर पाइ बचन एक कहेउँ।

हे पार्वति! मीहि त्या सभेंत होतों. प्रसंग पाहून मीहि जरासें बोललों.

हरि व्यापक सर्वत्र समाना।
प्रेम तेँ प्रगट होहिँ मैँ जाना।
देस काल दिसि बिदिसिहु माहीँ।
कहहु सो कहाँ जहाँ प्रभु नाहीँ।
अग-जग-मय सबरहित बिरागी।
प्रेम तेँ प्रभु प्रगटइ जिमि आगी।

प्रभु सर्वत्र सारखा व्यापलेला असून तो प्रेमानें प्रगट होतो, असा माझा तरी अनुभव आहे. देश, काल, दिशा, उपदिशा ह्यांतून जेथें प्रभु नाहीं असें कोणतें ठिकाण आहे, तें सांगा पाहूं. चराचरमय, सर्वरहित आणि उदासीन असा प्रभु! काष्ठांतील अग्निप्रमाणें भक्तीपासूनच प्रगट होतो.

मोर बचन सब के मन माना।
साधु साधु करि ब्रह्म बखाना।

माझें वचन सर्वांसच मान्य झालें. आणि ब्रम्हदेवानें तें 'उत्तमोत्तम' म्हणून वाखाणिलेंहि.

१. ह्या वर्णनाचें मर्म आमच्या मानस-हंसांत 'तुलसी-रामायणकालीन देशस्थिति' या मथळ्यांत सुरवातीसच मिळूं शकेल.

दो०—सुनि बिरंचि मन हरष तन पुलकि नयन बह नीर । अस्तुति करत जोर कर सावधान मतिधीर ॥ १९० ॥

ते ऐकून ब्रम्हदेवाच्या मनाला हर्ष वाटून त्याची तनु रोमांचित झाली व नेत्र अश्रुपूर्ण झाले. फिरून तो मतिधीर ब्रम्हदेव सावधान होऊन हात जोडून स्तुति करूं लागला.

छंद—जय जय सुरनायक जन-सुख-दायक प्रनतपाल भगवंता । गो-द्विज-हित-कारी जय असुरारी सिंधु-सुता-प्रिय-कंता ॥ पालन सुर धरनी अदभुतकरनी मरम न जानइ कोइ । जो सहज कृपाला दीन-दयाला करउ अनुग्रह सोई ॥ २० ॥

हे सुरनायका जनसुखदायका, प्रणतपालका भगवंता ! तुझा जयजयकार असो. हे गोद्विजहित-करा ! असुरारे ! लक्ष्मीप्रियपते ! हे देवधरापालका ! तुझी करणी अद्भूत असून तिचें मर्म कोणासहि कळत नाहीं. जो सहज कृपाळु आणि दीनांचा दयाळु तोच आम्हांवर कृपा करो.

छंद—जय जय अविनासी सब-घट-वासी व्यापक परमानंदा । अबिगत गोतीतं चरितपुनीतं मायारहित मुकुंदा ॥ जेहि लागि बिरागी अतिअनुरागी बिगतमोह मुनिबृंदा । निसिबासर ध्यावहिँ गुनगन गावहिँ जयति सच्चिदानंदा ॥ २१ ॥

हे भगवान् ! तूं अविनाशी असून सर्वघटवासी आहेस. तूं सर्वव्यापक असून परमानंद—स्वरूप आहेस. तूं अगम्य असून इंद्रियातीत आहेस. तूं पुण्यचारित्र असून मायारहित आहेस. हे मुकुंदा ! तुझा जयजय-कार असो. विरक्त व मोहरहित मुनिवृंद अत्यंत अनुरागानें ज्याचें अहोरात्र ध्यान करितात आणि गुण-गण गात असतात, त्या सच्चिदानंदाचा विजय असो.

छंद—जेहि सृष्टि उपाई त्रिबिध बनाई संग सहाय न दूजा । सो करउ अघारी चिंत हमारी जानिय भगति न पूजा ॥ जो भव-भय-भंजन मुनि-मन-रंजन खंडन बिपतिबरूथा । मन बच क्रम बानी छाडि सयानी सरन सकल-सुर-यूथा ॥ २२ ॥

ज्यानें इतर साहाय्याव्यतिरिक्त त्रिगुणात्मक सृष्टि निर्माण केली तो अघनाशक आमची चिंता करो. आम्ही भक्ति अगर उपासना कांहींच जाणीत नाहीं. जो भवभयाचें भंजन, जनमनाचें रंजन, व विपत्ति-समूहाचें कंदन करितो त्यास हा सर्व देवसमाज कायावाचामनें करून व त्यक्ताभिमान होत्साता शरणागत आहे.

छंद—सारद स्रुति सेषा रिषय असेषा जा कहँ कोउ नहिँ जाना । जेहि दीन पियारे बेद पुकारे द्रवउ सो श्रीभगवाना ॥ भव-बारिधि-मंदर सब बिधि सुंदर गुनमंदिर सुखपुंजा । मुनि सिद्ध सकल सुर परम भयातुर नमत नाथ पदकंजा ॥ २३ ॥

शारदा, वेद, शेष, ऋषी इत्यादिकांतूनहि ज्याला कोणींच जाणलें नाहीं, ज्यांच्या दीनवात्सल्याची वेद गर्जना करीत आहेत, त्या श्रीभगवानाला आम्हां-विषयीं द्रव येवो ! हे भवसागरमंदर, सर्वसुंदर, गुण-मंदिर सुखनिधान प्रभो ! हे सर्व मुनी, सिद्ध व देव अत्यंत भयाकुल होत्साते आपल्या पदपंकजांस वंदन करीत आहेत.

दो०—जानि सभय सुर भूमि सुनि बचन समेत सनेह । गगनगिरा गंभीर भइ हरनि सोकसंदेह ॥ १९१ ॥

देव, भूमि व मुनि हे भयातुर झाले आहेत असें जाणून, व त्यांचा भक्तियुक्त स्तव श्रवण करून दुःख व संशय यांचा परिहार करणारी अशी गंभीर आकाशवाणी झाली.

चौ०—जनि डरपहु मुनि सिद्ध सुरेसा ।
तुम्हहि लागि धरिहउँ नरबेसा ।
अंसन्ह सहित मनुजअवतारा ।
लेइहउँ दिन—कर—बंस—उदारा ।

मुनिसिद्धदेवेंद्र हो ! निर्भय असा. तुम्हांकरितां मी मनुष्यावतार धारण करतों. थोर अशा सूर्यवंशांत मी आपल्या अंशासहवर्तमान मनुष्यावतार घेणार आहे.

कश्यप अदिति महातप कीन्हा।
तिन्ह कहँ मैं पूरब बर दीन्हा।
ते दसरथ कौसल्या रूपा।
कोसलपुरी प्रगट नरभूपा।

कश्यप आणि आदिति यांनीं पूर्वी महान् तप केलें होतें व त्या वेळीं मी त्यांना वर देऊन ठेविला आहे. ते अयोध्येंत दशरथ-कौसल्यारूपानें राज्य करीत आहेत.

तिन्ह के गृह अवतरिहउँ जाई।
रघु-कुल-तिलक सो चारिउ भाई।

त्यांच्या सदनांत जाऊन रघुकुलतिलक असे चवघे बंधू आम्ही जन्म घेणार.

नारदवचन सत्य सब करिहउँ।
परम सक्तिसमेत अवतरिहउँ।
हरिहउँ सकल भुमिगरुआई।
निर्भय होहु देवसमुदाई।

मी नारदाचें वचन सर्व सत्य करीन, व परमशक्तिसहित अवतार घेऊन सर्व भूभार हरण करीन. देव हो! तुम्ही निश्चिंत असा.

गगन ब्रह्मबानी सुनि काना।
तुरत फिरे सुर हृदय जुडाना।
तब ब्रह्मा धरनिहि समुझावा।
अभय भई भरोस जिय आवा।

ती आकाशवाणी कानीं पडतांच देवांचीं अंतःकरणें शांत झालीं व ते तसेच मागें परतले. नंतर ब्रह्मदेवानें पृथ्वीची समजूत घातली, तेव्हां ती निर्भय होऊन तिच्या जीवांत जीव आला.

**दो०—निज लोकहि बिरंचि गे देवन्ह इहइ सिखाइ। बानरतनु धरि धरनि महँ हरिपद सेवहु जाइ॥ १९२॥**

'वानरदेह धारण करून पृथ्वीवर प्रभुपदाची सेवा करण्यास तुम्ही जा' अशी देवांस आज्ञा करून ब्रह्मदेव सत्यलोकीं गेले.

चौ०—गये देव सब निज निजधामा।
भूमिसहित मन कहँ बिस्रामा।
जो कछु आयसु ब्रह्मा दीन्हा।
हरषे देव बिलंब न कीन्हा

पृथ्वीसुद्धां सर्व देव स्वस्थ होऊन आपापल्या ठिकाणीं गेले व ब्रह्मदेवानें जी आज्ञा केली ती देवांनीं हर्षानें व अविलंबेकरून अमलांत आणली.

बन-चर-देह धरी छिति माहीँ।
अतुलित बल प्रताप तिन्ह पाहीँ।
गिरि-तरु-नख-आयुध सब बीरा।
हरिमारग चितवहिँ मतिधीरा।
गिरि कानन जहँ तहँ भरि पूरी।
रहे निज निज अनीक रचि रूरी।

देवांनीं पृथ्वीवर वनचरदेह धारण केले. त्यांचें बल व प्रताप अतुल होते. गिरि, तरु, आणि नखें हींच त्या वीरांचीं आयुधें होतीं. पर्वतावर व अरण्यांत ठिकठिकाणीं आपापलें भरपूर सैन्य सज्ज करून संघटितपणें ते मतिधीर भगवंताची मार्गप्रतीक्षा करीत राहिले.

यह सब रुचिर चरित मैं भाषा।
अब सो सुनहु जो बीचहिँ राषा।

हीं सर्व सुंदर चरितें मी सांगितलीं. आतां जें मध्येंच सुटलें तें श्रवण कर.

अवधपुरी रघु-कुल-मनि-राऊ।
बेदबिदित तेहि दसरथ नाऊ।
धरम-धुरं-धर गुननिधि ज्ञानी।
हृदय भगति मति सारँगपानी

अयोध्यानगरींत वेदविख्यात रघुकुलमुकुटमणी असा दशरथ नांवाचा राजा होता. तो धर्मात्मा गुणानिधि विचारवान् असून अंतःकरणापासून हरिभक्तिपरायण असे.

**दो०—कौसल्यादि नारि प्रिय सब आचरन पुनीत। पतिअनुकूल प्रेम दृढ हरि-पद-कमल बिनीत॥ १९३॥**

कौसल्यादि दशरथाच्या प्रिय राण्या शुभाचारसंपन्न, पत्यनुकूल, आणि नम्र असून हरिपद-कमलाचे ठिकाणीं दृढभक्ति करणाऱ्या अशा असत.

चौ०—एक बार भूपति मन माहीँ।
भइ गलानि मोरे सुत नाहीं।
गुरुगृह गयेउ तुरत महिपाला।
चरन लागि करि बिनय बिसाला।
निज दुख सुख सब गुरुहि सुनायउ।
कहि बसिष्ठ बहु बिधि समुझायउ।

एके वेळीं आपणांस पुत्रसंतान नाहीं म्हणून मनास उद्विग्नता वाटून राजा दशरथ लागलीच गुरु-

गृहीं गेला, आणि अति नम्रतेनें गुरूस वंदन करून त्यानें आपलें सुखदुःख गुरूप्रत निवेदन केलें. राजाची नानाप्रकारें समजूत घालून वसिष्ठ म्हणाले:—

धरहु धीर होइहहिँ सुतचारी।
त्रि–भुवन–विदित भगत–भय–हारी।

धीर धर. त्रिभुवनविख्यात आणि भक्तभयानिवारक असे चार पुत्र तुला होतील.

सृंगीरिषिहि बसिष्ठ बोलावा।
पुत्रकाम सुभ जज्ञ करावा।
भगतिसहित मुनि आहुति दीन्हे।
प्रगटे अगिनि चरू कर लीन्हे।

वसिष्ठानें शृंगऋषीस पाचारिलें, व त्याच्याकडून पुत्रकामेष्टि यज्ञ करविला. ऋषीनें भक्तिपूर्वक आहुति देतांच हस्ताचे ठायीं चरु ग्रहण करून अग्निनारायण प्रगट झाले. ( ते म्हणाले )–

जो बसिष्ठ कछु हृदय बिचारा।
सकलकाज भा सिद्ध तुम्हारा।
यह हबि बाँटि देहु नृप जाई।
जथाजोग जेहि भाग बनाई।

वसिष्ठानें जो कांहीं मनांत विचार केला होता त्याप्रमाणें तुझें सर्व कार्य सिद्ध झालें आहे. राजा! जा, आणि या हवीचे यथायोग्य भाग करून आपल्या स्त्रियांस वांटून दे.

**दो०–तब अदृस्य पावक भये सकल सभहि समुझाइ। परमानंदमगन नृप हरष न हृदय समाइ ॥ १९४ ॥**

सर्व सभेसमक्ष इतकें बोलून नंतर अग्निनारायण अदृश्य झाले. राजा परमानंदांत निमग्न होऊन त्याचा हर्ष अंतःकरणांत मावेनासा झाला.

चौ०–तबहि राय प्रियनारि बोलाई।
कौसल्यादि तहाँ चलि आई।

नंतर राजानें आपल्या प्रियपत्न्यांना बोलाविलें, व त्याप्रमाणें कौसल्यादि राण्या तेथें आल्या.

अरधभाग कौसल्याहि दीन्हा।
उभय भाग आधे कर कीन्हा।
कैकेई कहँ नृप सो दयऊ।
रहेउ सो उभय भाग पुनि भयऊ।
कौसल्या कैकई हाथ धरि।
दीन्ह सुमित्राहि मन प्रसन्न करि।

राजानें अर्धा भाग कौसल्येस दिला, व बाकीच्या अर्ध्याचे दोन भाग करून, त्यांपैकीं एक कैकेयीस दिला व बाकी राहिलेल्याचे पुन्हां दोन भाग केले व ते कौसल्या व कैकेयी यांनीं आपल्या हातीं घेऊन प्रसन्न अंतःकरणानें सुमित्रेस दिले.

एहि बिधि गर्भसहित सब नारी।
भईँ हृदय हरषित सुख भारी।

ह्याप्रमाणें सर्व राण्या गर्भवती झाल्या व त्यांना अत्यंत सुख होऊन त्या आनंदित झाल्या.

जा दिन तेँ हरि गर्भहि आये।
सकललोक सुख संपति छाये।

ज्या दिवसापासून प्रभूंनीं उदरांत वास केला तेव्हांपासून सर्व लोकांत संपत्ति आणि सुखें दरवळून राहिलीं.

मंदिर महँ सब राजहिँ रानी।
सोभा सील तेज की खानी।
सुखजुत कछुक काल चलि गयऊ।
जेहि प्रभु प्रगट सो अवसर भयऊ।

सर्व राण्या आपापल्या महालांत शोभा, शील व तेज यांच्या केवळ खाणीच अशा शोभूं लागल्या. अशा सुखांत कांहीं काल गेल्यावर परमात्मा प्रगट होण्याचा काळ प्राप्त झाला.

**दो०–जोग लगन ग्रह बार तिथि सकल भये अनुकूल। चर अरु अचर हरषजुत रामजनम सुखमूल ॥ १९५ ॥**

योग, लग्न, ग्रह, वार, तिथी वगैरे सर्व अनुकूल झाले व चराचर विश्व हर्षयुक्त झालें. श्रीरामचंद्राचा जन्मच सुखाचें मूळ होय.

चौ०–नवमी तिथि मधुमास पुनीता।
सुकल पच्छ अभिजित हरिप्रीता।
मध्य दिवस अति सीत न घामा।
पावन काल लोकबिस्रामा।

नवमी तिथी, पावन चैत्रमास, शुक्ल पक्ष, हरिप्रिय अभिजित योग, मध्यान्ह, समशीतोष्ण असा तो लोकांस विश्रामकारक पुण्यकाल प्राप्त झाला.

सीतल मंद सुरभि बह बाऊ।
हरषित सुर संतन्ह मन चाऊ।
बन कुसुमित गिरिगन मनिआरा।
स्रवहिँ सकल सरितामृतधारा।

शीतल, मंद आणि सुगंधित असा वायु दरवळूं लागला. देव आनंदित व संत उल्लासित झाले. वनें प्रफुल्लित झालीं. पर्वतसमुदाय रत्नांनीं प्रकाशमान झाला. सर्व नद्यांतून अमृतासारखा जलप्रवाह वाहूं लागला.

सो अवसर बिरंचि जब जाना।
चले सकल सुर साजि बिमाना।
गगन बिमल संकुल सुरजूथा।
गावहिँ गुन गंधर्बबरूथा।

ब्रह्मदेवानें रामजन्माचा तो काल जाणल्यावर सर्व देव आपापलीं विमानें सजवून जाऊं लागले. आकाश निरभ्र होऊन देवगणांनीं अगदीं भरून गेलें, व गंधर्वांनीं आलापदारी आरंभिली.

बरषहिँ सुमन सुअंजलि साजी।
गहगहि गगन दुंदुभी बाजी।
अस्तुति करहिँ नाग मुनि देवा।
बहु बिधि लावहिँ निज-निज-सेवा

देव ओंजळी भरभरून फुलें उधळूं लागले. आकाशांत दुंदुभींचा नाद दुमदुमून गेला. नाग, मुनी व देव स्तुति करून अनेक प्रकारें आपापल्यापरी सेवा बजावूं लागले.

दो०—सुरसमूह बिनती करि पहुँचे निज-निज-धाम। जगनिबास प्रभु प्रगटे अखिल-लोक-बिस्राम ॥ १९६ ॥

देवसमाज स्तुति करून आपापल्या ठिकाणीं तिकडे परत गेला. आणि इकडे जगन्निवास व अखिललोकविश्राम असे प्रभु प्रगट झाले.

छंद—भये प्रगट कृपाला परमदयाला कौ-सल्या-हित-कारी। हरषित महतारी मुनि-मन-हारी अद्भुतरूप बिचारी ॥ लोचन अभिरामं तनुघनस्यामं निजआयुध भुज चारी। भूषण बनमाला नयन-बिसाला सोभासिंधु खरारी ॥ २४ ॥

कृपाळु, दीनदयाळ व कौसल्याहितकारी प्रभु प्रगट झाले. नयनाभिराम, घनश्यामतनु, सायुध चतुर्भुज वनमालाविभूषित, विशालाक्ष, शोभासागर, अशा मुनिमनहारी व अद्भुतरूपधारी खरशत्रूस अवलोकन करून कौसल्येस आनंदाचें भरतें लोटलें.

छंद—कह दुइ कर जोरी अस्तुति तोरी केहि बिधि करउँ अनंता। माया-गुन-ज्ञानातीत अमाना बेद पुरान भनंता ॥ करुना सुख-सागर सब-गुन-आगर जेहि गावहिँ स्रुति संता। सो मम हित लागी जन अनुरागी भयउ प्रगट श्रीकंता ॥ २५ ॥

दोन्ही कर जोडून कौसल्या म्हणाली, हे अनंता! मी तुझी स्तुति कशी करावी? वेद व पुराणें तर तुला प्रमाणरहित आणि माया, गुण व ज्ञान याहूनहि पर असें म्हणतात. हे करुणासागर, अखिल-गुणनिधान! ज्या तुझें श्रुति व संत गान करतात, तो तूं भक्तवत्सल लक्ष्मीकांत माझ्या कल्याणास्तव प्रगट झाला आहेस.

छंद—ब्रह्मांडनिकाया निर्मित माया रोम रोम प्रति बेद कहै। मम उर सो बासी यह उपहासी सुनत धीरमति थिर न रहै ॥ उपजा जब ज्ञाना प्रभु मुसुकाना चरित बहुतबिधि कीन्ह चहै। कहि कथा सुहाई मातु बुझाई जेहि प्रकार सुतप्रेम लहै ॥२६॥

ज्याच्या प्रत्येक रोमरंध्रांत मायानिर्मित अनेक ब्रह्मांडें वास करितात असें वेद म्हणतात, त्या तूं माझ्या कुक्षींत वास केलास हें म्हणणें उपहासास्पदच होय. तो उपहास ऐकून विवेकवंतांचींहि मनें स्थिर राहाणार नाहींत. कौसल्येस ज्ञान झालेलें पाहून प्रभु हांसले. त्यांना अनेक प्रकारचें चरित्र कर्तव्य होतें, म्हणून आईचे ठिकाणीं पुत्रप्रेम उत्पन्न होण्याकरितां भगवंतांनीं तिला पूर्वजन्मवृत्त समजावून सांगितलें.

छंद—माता पुनि बोली सो मति डोली तजहु तात यह रूपा। कीजिय सिसु-लीला अति-प्रिय-सीला यह सुख परम अनूपा। सुनि बचन सुजाना रोदन ठाना होइ बालक सुरभूपा। यह चरित जे गाव-हिँ हरिपद पावहिँ ते न परहिँ भवकूपा॥२७॥

कौसल्येची मति मोहित होऊन ती पुन्हां म्हणाली, हे तात! हें स्वरूप आटोपून घे आणि अत्यंत प्रेमळ अशा बाललीला कर. कारण, तेंच सुख परम अनुपम आहे. त्या सुज्ञ सुरश्रेष्ठानें मातेचें वचन

ऐकतांच बालरूप धारण करून रुदन आरंभिलें. हें चरित्र जे कोणी गातील ते भवकूपांत पतन न पावतां हरिपदाप्रत प्राप्त होतील.

**दो०—बिप्र-धेनु-सुर-संत हित लीन्ह मनुजअवतार । निज इच्छा-निर्मित तनु माया-गुन-गो-पार ॥ १९७ ॥**

मायागुणइंद्रियातीत प्रभूनें स्वेच्छेनें ब्राह्मण, गाई, देव व संत यांच्या कल्याणास्तव मनुष्यावतार धारण केला.

चौ०—सुनि सिसुरुदन परम प्रिय बानी ।
संभ्रम चलि आईं सब रानी ।
हरषित जहँ तहँ धाईं दासी ।
आनँदमगन सकल पुरबासी ।

बालक रडूं लागल्याची परमप्रिय वार्ता श्रवण करितांच सर्व राण्या लगबगीनें आल्या. दासी जिकडे तिकडे आनंदानें धांवत सुटल्या, व सर्व नगरवासी लोक आनंदांत निमग्न झाले.

दसरथ पुत्रजनम सुनि काना ।
मानहुँ ब्रह्मानंदसमाना ।
परमप्रेम मन पुलक सरीरा ।
चाहत उठन करत मति धीरा ।

पुत्रजन्मवार्ता कानीं पडतांच दशरथावर जणूंकाय ब्रह्मानंदच लोटला. त्याच्या हृदयांत अत्यंत प्रेम उचंबळून शरीर रोमांचित झालें. तें प्रेम वारंवार अनावर होऊं लागलें; तथापि, राजा विवेकानें तें आवरी.

जा कर नाम सुनत सुभ होई ।
मोरे गृह आवा प्रभु सोई ।
परमानंद पूरि मन राजा ।
कहा बोलाइ बजावहु बाजा ।

ज्याच्या नामश्रवणमात्रेंकरून कल्याण होतें तो परमात्माच माझ्या घरीं आला, अशा विचारानें राजाच्या मनांत परमानंदाचा पूर लोटला. त्यानें वाजंत्र्यांस बोलावून मंगलवाद्यें वाजविण्यास आज्ञा केली.

गुरु बासिष्ठ कहँ गयउ हँकारा ।
आये द्विजन्ह सहित नृपद्वारा ।
अनुपम बालक देखिन्हि जाई ।
रूपरासि गुन कहि न सिराई ।

गुरु-वसिष्ठास निमंत्रण गेलें व तेहि ब्रह्मवृंदासह राजद्वारीं आले. त्यांची त्या अनुपम बालकावर दृष्टि ठरेना, आणि त्या सौंदर्यनिधानाचे गुण वर्णन करितां करितां त्यांना हायसेंच वाटेना.

**दो०—तब नंदीमुख स्राद्ध करि जातकरम सब कीन्ह । हाटक धेनु बसन मनि नृप बिप्रन्ह कहँ दीन्ह ॥ १९८ ॥**

नंतर नांदीश्राद्ध करून सर्व जातकर्मविधि आटोपला, व राजानें सुवर्ण, वस्त्रें धेनु, अलंकार इत्यादिकांचीं दानें ब्राह्मणांस समर्पण केलीं.

चौ०—ध्वज पताक तोरन पुर छावा ।
कहि न जाइ जेहि भाँति बनावा ।
सुमनबृष्टि अकास तें होई ।
ब्रह्मानंदमगन सब लोई ।

ध्वज, पताका, तोरणें सर्व शहरभर उभारलीं गेलीं. त्या देखाव्याचें वर्णन करितां येणें शक्य नाहीं. आकाशांतून पुष्पवृष्टि होऊं लागली. सर्व लोक ब्रह्मानंदांत निमग्न झाले.

बृंदबृंद मिलि चली लोगाईं ।
सहज सिँगार किये उठि धाईं ।
कनककलस मंगल भरि थारा ।
गावत पैठहिं भूपदुआरा ।
करि आरति नेवछावरि करहीं ।
बार बार सिसुचरनन्हि परहीं ।

सहजशृंगारयुक्त अशा स्त्रिया धांवत सुटल्या. त्यांचे थवेच्या थवे चालूं लागले. त्या स्त्रिया ताटांमध्यें सुवर्णाचे मंगलकलश ठेवून गात गात राजवाड्यांत शिरल्या. त्या मंगलारति करून त्या मुलावरून नजरणा ओंवाळून टाकीत आणि वारंवार त्यास नमस्कार करीत.

मागध सूत बंदि गुनगायक ।
पावन गुन गावहिं रघुनायक ।

मागध, सूत, बंदीजन इत्यादि गुणपाठक रघुनायकाचें पावन यश गाऊं लागले.

सरबस दान । दीन्ह सब काहू ।
जेहि पावा राखा नहिं ताहू ।

एकुणएक सर्वांनाच देणग्या देण्यांत आल्या. परंतु ज्यांनीं त्या घेतल्या त्यांनींहि त्यांचा संग्रह केला नाहीं. ( त्या इतरांस वांटून टाकिल्या. )

मृग-मद-चंदन-कुंकुम-कीचा ।
मची सकल बीथिन्ह बिच बीचा ।

कस्तुरी, चंदन व कुंकुम यांच्या सड्याचा तर रस्त्यांत ठिकठिकाणीं चिखल झाला.

**दो०-गृह गृह बाज बधाव सुभ प्रगटे सुखमाकंद । हरषवंत सब जहँ तहँ नगर नारि-नर-बृंद १९९ ॥**

सुखकंद प्रभु प्रगट झाले. घरोघरीं मंगलवाद्यें गर्जू लागलीं. नगरांत जिकडे तिकडे अवघा स्त्रीपुरुष-समाज आनंदांत डूब झाला.

चौ०-कैकयसुता सुमित्रा दोऊ ।
सुंदर सुत जनमत भइँ ओऊ ।
वोह सुख संपति समय समाजा ।
कहि न सकइ सारद अहिराजा ।

कैकेयी व व सुमित्रा या दोघींहि सुंदर पुत्र प्रसवल्या. त्या वेळच्या सुखाचा व ऐश्वर्याचा थाट सरस्वती व शेष यांना देखील वर्णवावयाचा नाहीं.

अवध पुरि सोहइ एहि भाँती ।
प्रभुहि मिलन आई जनु राती ।
देखि भानु जनु मन सकुचानी ।
तदपि बनी संध्या अनुमानी ।

अयोध्या त्या वेळेस अशी दिसली कीं, प्रभूस भेटण्याकरितां जणुंकाय रात्रच आली आहे! परंतु तिला सूर्य दिसल्यामुळें ती जणूंकाय मनांत ओशाळली. तथापि तिनें संध्येचें [ संध्याकाळचें ] रूप घेतलें आहे असें वाटे. कारण—

अगरधूप बहु जनु अँधियारी ।
उडइ अबीर मनहुँ अरुनारी ।
मंदिर-मनि-समूह जनु तारा ।
नृप-गृह-कलस सो इंदु उदारा ।

अगरु, धूप हाच जणूंकाय संध्याकाळचा दाट अंधकार असें दिसे. गुलाल उधळला जात होता तीच संध्याकाळची लाली भासत होती. प्रासादावरील रत्नें हींच जणूंकाय तारांगणें असून राजवाड्यावरील सुवर्णकळस हाच उदार चंद्रमा होता.

भवन-बेद-धुनि अति मृदु बानी ।
जनु खग -मुखर-समय जनु सानी ।

घरोघरीं होणारा मंजुल वेदघोष हाच जणुंकाय त्या समयास उचित असा पक्ष्यांचा सुखकर किलकिलाट होता.

कौतुक देखि पतंग भुलाना ।
एक मास तेइ जात न जाना ।

तें कौतुक पाहिल्यावर सूर्यासदेखील भुरळ पडून एक महिना कसा गेला हें देखील त्यास कळलें नाहीं.

**दो०-मासदिवस कर दिवस भा मरम न जानइ कोइ । रथसमेत रबि थाकेउ निसा कवन बिधि होइ ॥ २०० ॥**

तीस दिवसांचा एक दिवस झाला; परंतु हें मर्म कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं. रथासहित सूर्यच स्थिर झाला होता; मग रात्र होणार तरी कशी?

चौ०-यह रहस्य काहू नहिँ जाना ।
दिनमनि चले करत गुनगाना ।
देखि महोत्सव सुर मुनि नागा ।
चले भवन बरनत निज भागा ।

हें रहस्य कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं. सूर्य रामयशाचें गान करीत चालूं लागला. तो महोत्सव पाहून देव, ऋषी, नाग हे देखील आपल्या भाग्याचें वर्णन करीत स्वस्थानास परतले.

अउरउ एक कहउँ निज चोरी ।
सुनु गिरिजा अतिदृढ मति तोरी ।

पार्वति! तुझी श्रद्धा अत्यंत दृढ आहे, म्हणून मी आपली आणखी एक गुज गोष्ट सांगतों ती श्रवण कर.

काकभुसुंडि संग हम दोऊ ।
मनुजरूप जानइ नहिँ कोऊ ।
परमानंद प्रेम-सुख-फूले ।
बीथिन्ह फिरहिँ मगन मन भूले ।

मी माझ्या बरोबरचा काकभुशुंडी असे उभयता मनुष्यरूपानें तेथें गेलों, पण आम्हांस कोणींच ओळखलें नाहीं. प्रेमसुखाच्या परमानंदानें प्रफुल्लित होऊन आम्ही दोघेहि देहभान विसरून रस्तोरस्तीं भटकूं लागलों.

यह सुभ चरित जान पै सोई ।
कृपा राम कै जापर होई ।

ह्या सर्व गोष्टी रामाची कृपा ज्यावर होईल, तोच जाणील.

---

१ कवीनें हें एक कोडें घातलेलें दिसतें. उद्देश अर्थातच हा कीं तें वाचकांनीं उलगडावें.

२ हेंहि एक कोडेंच आहे.

तेहि अवसर जो जेहि बिधि आवा ।
दीन्ह भूप जो जेहि मन भावा ।
गज रथ तुरग हेम गो हीरा ।
दीन्हे नृप नाना बिधि चीरा ।

त्या वेळेस जो जसा आला त्यास त्याच्या इच्छेनुसार राजानें देणग्या व दानें दिलीं. रथ, गज, अश्व, गाई, सुवर्ण, रत्नें आणि वस्त्रें इत्यादि अनेक प्रकारचा देकार झाला.

दो०—मन संतोष सबन्हि के जहँ तहँ देहिँ असीस । सकल तनय चिरजीवहु तुलसिदास के ईस ॥ २०१ ॥

सर्वांचीं मनें संतुष्ट होऊन सर्वत्र आशीर्वाद देत कीं, तुलसीदासाचें दैवत असे हे सर्व राजपुत्र चिरंजीव होवोत.

चौ०—कछुक दिवस बीते एहि भाँती ।
जात न जानिय दिन अरु राती ।
नामकरन कर अवसर जानी ।
भूप बोलि पठये मुनि ज्ञानी ।
करि पूजा भूपति अस भाखा ।
धरिय नाम जो मुनि गुनि राखा ।

ह्याप्रमाणें कांहीं दिवस लोटले. दिवसरात्र केव्हां जाई ह्याचेंहि भान राहीना. नामकरणाची वेळ आली असें जाणून राजानें ज्ञाननिष्ठ वसिष्ठ गुरूस निमंत्रण पाठविलें व त्यांची पूजा करून तो म्हणाला, मुनींनीं योजिलीं असतील तींच नांवें ठेवावींत.

इन्ह के नाम अनेक अनूपा ।
मैं नृप कहब स्वमति अनुरूपा ।

( वसिष्ठ म्हणाले ) राजा ! यांचीं नांवें अनेक व अनुपम आहेत. तथापि, तीं मी यथामति सांगतों.

जो आनंदसिंधु सुखरासी ।
सीकर तें त्रैलोक सुपासी ।
सो सुखधाम राम अस नामा ।
अखिललोक दायक बिस्रामा ।

जो आनंदाचा सागर, सुखाचें निधान, अणूपासून ब्रह्मांडापर्यंत सर्वांचा सांभाळ करणारा, आणि सौख्याचें केवळ माहेरघर असा, हा राम होय, आणि हेंच त्याचें अखिल लोकांस विश्राम देणारें असें नाम आहे.

बिस्वभरन पोषन कर जोई ।
ता कर नाम भरत अस होई ।
जा के सुमिरन तें रिपुनासा ।
नाम सत्रुहन बेद प्रकासा ।

हा जो विश्वाचें पालनपोषण करणारा ह्याचें नांव 'भरत' असें प्रसिद्ध होईल. ज्याच्या स्मरणानें शत्रुनाश होतो त्या ह्याचें वेदप्रसिद्ध शत्रुघ्न असें नांव आहे.

दो०—लच्छन धाम रामप्रिय सकल-जगत-आधार । गुरु बसिष्ठ तेहि राखा लछिमन नाम उदार ॥ २०२ ॥

सद्गुणांचें आगर, रामाचा प्रियकर, व सर्व जगाचा आधार अशा त्या उदाराचें (शेषावताराचें) वसिष्ठ गुरुजींनीं लक्ष्मण हें नांव ठेविलें.

चौ०—धरे नाम गुरु हृदय बिचारी ।
बेदतत्त्व नृप तव सुत चारी ।
मुनिधन जनसरबस सिव प्राना ।
बाल-केलि-रस तेहि सुख माना ।

गुरुजींनीं विचारपूर्वक नांवें ठेविलीं. [ ते म्हणाले ] राजा ! हे तुझे चौघे पुत्र म्हणजे वेदांचें तत्त्वच होत. हे मुनींचें वित्त, जनांचें सर्वस्व, शिवाचे प्रत्यक्ष प्राण, बाललीलांचा मूर्तिमंत रस होत. [ हे शब्द ऐकून ] राजास आनंद वाटला.

बारेहि तें निज हित पति जानी ।
लछिमन राम-चरन-रति मानी ।
भरत सत्रुहन दूनउ भाई ।
प्रभुसेवक जसि प्रीति बडाई ।

लक्ष्मणानें बालपणापासूनच आपले हितकर्ते आणि स्वामी जाणून रामचरणाचे ठिकाणीं प्रेम जोडलें. भरत आणि शत्रुघ्न या दोन बंधूंचें स्वामी आणि सेवक या भावनेनें परस्पर प्रेम जडलें.

स्याम गौर सुंदर दोउ जोरी ।
निरखहिँ छबि जननीं तृन तोरी ।

श्याम, गौर व सुंदर अशा त्या दोन जोड्या पाहून त्यांच्या माता त्यांचेवरून तृण ओंवाळून टाकीत असत. ( तनसड उतरून टाकणें ही दृष्ट काढण्याची तद्देशीय पद्धत आहे. )

चारिउ सील-रूप-गुन धामा ।
तदपि अधिक सुखसागर रामा ।

चारीजण शील, रूप व गुण यांचें निधानच होतें.

तथापि, त्यांतल्या त्यांत श्रीरामचंद्र फारचफार लोचदार वाटत.

हृदय अनुग्रह इंदु प्रकासा।
सूचत किरन मनोहर हासा।

[ कारण, ] रामहृदयांत दयेचा चंद्र प्रकाशमान असल्याकारणानें त्याचीं किरणें मनोहर हास्यरूपानें स्वाभाविकच प्रगट होत.

कबहुँ उछंग कबहुँ बरपलना।
मातु दुलारहिँ कहि प्रिय ललना।

कधीं मांडीवर तर कधीं झोकदार पाळण्यांत अशा प्रकारें कौसल्या गोड व लडिवाळ शब्दांनीं रामास प्रेमानें आळवी आणि खेळवी.

दो०—ब्यापक ब्रह्म निरंजन निर्गुन बिगत-
बिनोद। सो अज प्रेम-भगति-बस
कौसल्या के गोद॥ २०३॥

व्यापक, परब्रह्म, निरंजन, निर्गुण असा जो अजन्मा ह्या प्रभूनें देखील स्वतःच्या भक्तवात्सल्यास्तव कौसल्येच्या उत्संगाचा आश्रय करावा, आणि स्वतः विगतविनोद ( यतो वाचो निवर्तन्ते ) असूनहि विशेषतया ( गत विनोद म्हणजे ) गोड गमजा करण्यास लागावें ना !

चौ०—काम—कोटि—छबि स्याम सरीरा।
नील कंज बारिद गंभीरा।
अरुन—चरन—पंकज—नखजोती।
कमलदलन्हि बैठे जनु मोती।

राम कोटीमदनाप्रमाणें सुंदर असून नीलकमल व सांद्रमेघाप्रमाणें त्याचे शरीराचा वर्ण होता; व आरक्त चरणकमलांची नखप्रभा पाहिली म्हणजे जणूंकाय कमलदलावर मोतींच जडले आहेत असें वाटे.

रेख कुलिस ध्वज अंकुस सोहइ।
नूपुर धुनि सुनि मुनिमन मोहइ।
कटि किंकिनी उदरत्रय रेखा।
नाभि गँभिर जान जिन्ह देखा।

त्याच्या पदतलावर वज्र, ध्वज, अंकुश इत्यादि रेषा शोभत होत्या. नूपुरांचा ध्वनि ऐकून मुनींच्याहि मनास मोह पडत असे. कटिभागीं असलेल्या किंकिणी, उदरावरील रेखात्रय, व गंभीर नाभि, यांची शोभा ज्यांना दृष्टिगोचर झाली तेच खरे तिचे जाणकार.

भुज बिसाल भूषन जुत भूरी।
हिय हरिनख अति सोभा रूरी।
उर मनिहारपदिक की सोभा।
बिप्रचरन देखत मन लोभा।

अनेक अलंकारांनीं मंडित असे रामाचे विशाल बाहू व सिंहनखांची हृदयावरील शोभा अतिशयच खुलत होती. वक्षःस्थलावरील रत्नहाराच्या पदकाची आणि भृगुपद चिन्हाची शोभा पाहतांच मन मोहून जात असे.

कंबु कंठ अति चिबुक सुहाई।
आनन अमित—मदन छबि छाई।
दुइ दुइ दसन अधर अरुनारे।
नासा तिलक को बरनइ पारे।

शंखाप्रमाणें रामाचा कंठ असून हनुवटी फारच मोहक होती. मुखावर असंख्य मदनांचें सौंदर्य एकवटलेलें होतें. दोन दोन दांत, आरक्त ओष्ठ, नासिका व तिलक हे वर्ण्यविषय करण्याचें सामर्थ्य कोणास आहे !

सुंदर स्रवन सुचारु कपोला।
अति प्रिय मधुर तोतरे बोला।
नीलकमल दोउ नयन बिशाला।
बिकट भ्रुकुटि लटकन बर भाला।
चिक्कन कच कुंचित गभुआरे।
बहु प्रकार रचि मातु सवाँरे।
पीत झगुलिया तनु पहिराई।
जानु—पानि—बिचरनि मोहि भाई।

सुबक कान, गोंडस गाल, गोडगोड बोबडे बोल, नीलकमलवत् विशाल नेत्रद्वय, टपोऱ्या भिवया, कपाळावरील पिंपळपान, मातेनें परोपरीनें नीटनेटकें सावरलेलें असें चिक्कण कुरळ आणि काळेभोर जावळ, अंगांत केशरी झगा, हातावर व गुडघ्यावर रांगणें, अशा ह्या रामरूपावरच मन जास्त ललचावतें.

रूप सकहिँ नहिँ कहि स्रुति सेखा।
सो जानहिँ सपनेहुँ जिन्ह देखा।

१ ‘ मंगल भवन अमंगलहारी। द्रवउ सो दशरथ अजिरविहारी ’ ( पा. ७२ ) या नांदीचें हें विस्तृत वर्णन होय.

श्रुति व शेष हेंदेखील त्या रूपानें मुग्ध होतात. निदान स्वप्नांत तरी ज्यांनीं तें रूप पाहिलें असेल त्यांनाच तें जाणतां येईल.

दो०—सुखसंदोह मोहपर ज्ञान–गिरा–गोतीत । दंपति परम प्रेमबस कर सिसुचरित पुनीत ॥ २०४ ॥

सुखसार, मोहरहित, ज्ञान, वाणी आणि इंद्रियें त्यांच्याहूनहि पर असा श्रीराम दशरथकौसल्येच्या खऱ्या जिव्हाळ्याच्या प्रेमभक्तीनें आकळला जाऊन पावन बालक्रीडा करूं लागला.

चौ०—एहि बिधि रामजगत–पितु–माता ।
कोसल-पुर-बासिन्ह सुखदाता ।

ह्याप्रमाणें विश्वाचा मायबाप श्रीरामचंद्र अयोध्या-वासी जनांस आनंदवूं लागला.

जिन्ह रघुनाथचरन रति मानी ।
तिन्ह की यह गति प्रगट भवानी ।
रघुपतिबिमुख जतन कर कोरी ।
कवन सकइ भवबंधन छोरी ।

हे पार्वति ! जे रामचरणाचे ठायीं अनुरक्त झाले, त्यांनाच ह्या सुखाचा प्रत्यय लाभला. रघुनाथाशीं विमुख होऊन कोट्यवधि यत्न केले तरी भवपाशांतून कोण सुटूं शकणार ?

जीव चराचर बस कै राखे ।
सो माया प्रभु सों भय भाखे ।
भृकुटिबिलास नचावइ ताही ।
अस प्रभु छाडि भजिय कहु काही ।
मन क्रम बचन छाडि चतुराई ।
भजत कृपा करिहहिं रघुराई ।

चराचर जीवमात्र जिनें आत्मवश करून ठेविला ती माया भयभीत होऊन ज्या प्रभूचें आर्जव करीत असते आणि जो अशा मायेस केवळ भ्रुकुटिविलासानें नाचवितो अशा प्रभूस सोडून कोणास भजावयाचें सांग बरें ? कायावाचामनेंकरून आणि अहंतेचा त्याग करून भक्ति केल्यास रघुनाथ कृपा करीलच करील.

एहि बिधि सिसु बिनोद प्रभु कीन्हा ।
सकल–नगर–बासिन्ह सुख दीन्हा ।
लेइ उछंग कबहुँक हलरावइ ।
कबहुँ पालने घालि झुलावइ

ह्याप्रकारें प्रभूनें बाललीला केल्या, आणि सर्व नगरवासी जनांस सुख दिलें. कधीं मांडीवर घेऊन हलवावें तर कधीं पाळण्यांत घालून झोंके द्यावे,—

दो०—प्रेममगन कौसल्या निसि दिन जात न जान । सुत-सनेह-बस माता बालचरित कर गान ॥ २०५ ॥

अशा रीतीनें प्रेमांत मग्न झालेल्या कौसल्येस दिवसरात्र कसे जात हेंदेखील कळत नसे. ती पुत्रप्रेमांतच दंग होऊन त्याच्या बालक्रीडेचींच गाणीं गात राही.

चौ०—एक बार जननी अन्हवाये ।
करि सिँगार पलना पौढाये ।

एकदां कौसल्येनें रामास न्हाऊ घालून आणि ईटदीट वगैरे करून पाळण्यांत निजविलें.

निज–कुल–इष्ट–देव भगवाना ।
पूजा हेतु कीन्ह असनाना ।
करि पूजा नैवेद्य चढावा ।
आपु गई जहँ पाक बनावा ।
बहुरि मातु तहवाँ चलि आई ।
भोजन करत देख सुत जाई ।

आपलें कुलदैवत जो भगवान् महादेव त्याच्या पूजेसाठीं स्नान केलें. पूजा करून तिनें नैवेद्य समर्पण केला आणि आपण मुदबखांत गेली. फिरून कौसल्या देवघरांत परत आली आणि पाहते तों राम जेवीत आहे !

गइ जननी सिसु पहिँ भयभीता ।
देखा बाल तहाँ पुनि सूता ।
बहुरि आइ देखा सुत सोई ।
हृदय कंप मन धीर न होई ।

ती घाबऱ्या घाबऱ्याच पाळण्याकडे गेली तों मूल चांगलें झोंपलेलें तिनें पाहिलें. फिरून देवघरांत येऊन पाहते तों मूल जेवीतच आहे. तेव्हां तिच्या हृदयाचा थरकांप झाला व तिचें धैर्य गळालें.

इहाँ उहाँ दुइ बालक देखा ।
मति भ्रम मोर कि आन बिसेखा ।
देखि राम जननी अकुलानी ।
प्रभु हँसि दीन्ह मधुर मुसुकानी ।

कौसल्येला असें वाटलें कीं, आपण दोन ठिकाणीं दोन मुलें पाहिलीं. हा माझा बुद्धिचळ किंवा इतर

कांहीं तरी विशेष ! आई घाबरली आहे असें पाहून रामांनीं मुरकून गोजिरवाणें हास्य केलें.

**दो०—देखरावा मातहि निज अद्भुत रूप अखंड । रोम रोम प्रति लागे कोटि कोटि ब्रह्मंड ॥ २०६ ॥**

त्यांनीं रोमरोमाच्या ठिकाणीं कोट्यानकोटी ब्रह्मांडें लगटलेलीं आहेत असें आपलें अद्भुत व अखंड स्वरूप आईस दाखविलें.

चौ०—अगनितरबिससिसिवचतुरानन ।
बहुगिरिसरितसिंधुमहिकानन ।
काल करम गुन ज्ञान सुभाऊ ।
सोउ देखा जो सुना न काऊ ।

असंख्य सूर्य, चंद्र, शिव, ब्रह्मदेव, अगणित पर्वत, नद्या, समुद्र, भूगोल, अरण्यें, काल, कर्म, गुण, ज्ञान, स्वभाव, सारांश कौसल्येनें जें इतर कोणीं ऐकिलें देखील नसेल असें सर्व पाहिलें.

देखी माया सब बिधि गाढी ।
अतिसुभीत जोरे कर ठाढी ।
देखा जीव नचावइ जाही ।
देखी भगति जो छोरइ ताही ।

सर्वतोपरी अतर्क्य तरीहि अत्यंत भयभीत होऊन हात जोडून उभी असलेली अशी मायाहि तिला दिसली. माया ज्यास नाचवीत आहे असा जीव आणि त्या जीवास सोडविणारी भक्ति हेहि तिच्या नजरेस पडले.

तन पुलकित मुख बचन न आवा ।
नयन मूँदि चरनहि सिरु नावा ।
बिसमयवंति देखि महतारी ।
भये बहुरि सिसुरूप खरारी ।

कौसल्येच्या शरीरावर रोमांच उभे राहून तिच्या मुखावाटें शब्द निघेना. तिनें डोळे मिटून रामचरणीं मस्तक नम्र केलें. मातेस आश्चर्यचकित पाहून पुनरपि त्या खरांतकानें बालरूप धारण केलें.

अस्तुति करि न जाइ भय माना ।
जगतपिता मैं सुत करि जाना ।

तिच्यानें स्तुतिहि करवेना. जगज्जनकास मी आपला पुत्र समजलें म्हणून तिला भय वाटलें.

हरि जननी बहुबिधि समुझाई ।
यह जनि कतहुँ कहसि सुनु माई ।

प्रभूनें मातेची परोपरीनें समजूत घातली व सांगितलें, माते ! ऐक. ह्याचा वाच्यांश देखील कोठें करूं नको.

**दो०—बार बार कौसल्या बिनय करइ कर जोरि । अब जनि कबहूँ ब्यापइ प्रभु मोहि माया तोरि ॥ २०७ ॥**

कौसल्या वारंवार हात जोडून विनंति करूं लागली कीं, प्रभो ! अतःपर कधींहि आपल्या मायेनें मला मोहित करूं नये.

चौ०—बालचरित हरि बहुबिधि कीन्हा ।
अति आनँद दासन्ह कहँ दीन्हा ।

श्रीहरीनें अनेक प्रकारची बालक्रीडा केली व सेवकांना बहुत आनंद दिला.

कछुक काल बीते सब भाई ।
बडे भये परिजन-सुख-दाई ।
चूडाकरन कीन्ह गुरु जाई ।
बिप्रन्ह पुनि दछिना बहु पाई ।

कांहीं काल लोटल्यावर परिजनांस सुख देणारे असे ते सर्व बंधु मोठे झाले. गुरु वसिष्ठांनीं येऊन त्यांचें चूडाकर्म केलें. ब्राह्मणांस विपुल दक्षणा मिळाली.

परम मनोहर चरित अपारा ।
करत फिरत चारिउ सुकुमारा ।
मन-क्रम-बचन-अगोचर जोई ।
दशरथ अजिर बिचर प्रभु सोई ।

ते चौघे सुंदर कुमार परममनोहर अशी अपार लीला करीत फिरत. मनाला, कर्माला आणि वाचेला अगोचर अशा ह्या प्रभूनें दशरथाच्या अंगणांत क्रीडा करावी.

भोजन करत बोल जब राजा ।
नहिँ आवत तजि बालसमाजा ।
कौसल्या जब बोलन जाई ।
ठुमुकि ठुमुकि प्रभु चलहिँ पराई ।

राजानें भोजनसमयीं बोलाविलें तरी आपल्या सवंगड्यांना सोडून राम येत नसे. जेव्हां कौसल्या बोलावयास जाई तेव्हां तर ठुमकत ठुमकत पळून जाई.

निगम नेति सिव अंत न पावा ।
ताहि धरइ जननी हठि धावा ।

वेद ज्यास ' नेति नेति ' म्हणती व ज्याचा अंत शंकरासहि लागला नाहीं, त्यास कौसल्या धांवत जाऊन जबरदस्तीनें धरून आणी.

धुसर धूरि भरे तनु आये ।
भूपति बिहँसि गोद बैठाये ।

धुळीनें भरलेल्या अंगानेंच राम येई, आणि राजा दशरथ हास्यपूर्वक त्याला आपल्या मांडीवर घेई.

**दो०—भोजन करत चपल चित इत उत अवसरु पाइ । भाजि चले किलकत मुख दधिओदन लपटाइ ॥ २०८ ॥**

जेवतांना देखील खेळांत चित्त म्हणून सर्वांची नजर चुकवून दहींभातानें ओषटलेल्या तोंडानेंच राम आरोळ्या ठोकीत पळून जाई.

चौ०—बालचरित अतिसरल सुहाये ।
सारद सेष संभु स्रुति गाये ।

शारदा, शेष, शंभु आणि श्रुति यांनीं प्रभूचीं बालचरित्रें अति सरळ व सुंदर गायिलीं आहेत.

जिन्ह कर मन इन्ह सन नहिँ राता ।
ते जन बंचित किये बिधाता ।

त्या बाललीलांनीं ज्यांचीं मनें रंगत नाहींत ते लोक ब्रह्मदेवानें करंटे जन्मविलेले होत.

भये कुमार जबहिँ सब भ्राता ।
दीन्ह जनेऊ गुरु-पितु-माता ।
गुरुगृह गये पढन रघुराई ।
अलप काल बिद्या सब पाई ।
जाकी सहज स्वास स्रुति चारी ।
सो हरि पढ यह कौतुक भारी ।

सर्व बंधु जेव्हां कौमार्यदशेस प्राप्त झाले तेव्हां मातापिता व गुरु यांनीं त्यांचीं मौंजीबंधनें केलीं. नंतर रामचंद्र अध्ययनासाठीं गुरुगृहीं गेले. अल्प कालांतच त्यांस सर्व विद्या प्राप्त झाली. ज्याच्या नुसत्या निःश्वासाबरोबर चारी वेद प्रकट होतात त्या प्रभूनें अध्ययन करणें हेंच मुळीं महदाश्चर्य !

बिद्या-बिनय-निपुन गुनसीला ।
खेलहिँ खेल सकल नृपलीला ।
करतल बान धनुष अति सोहा ।
देखत रूप चराचर मोहा ।

विद्याविनयनिपुण आणि गुणशील असे ते सर्वजण राजत्वाचे सर्व खेळ खेळूं लागले. त्यांच्या हातांत धनुष्यबाण फारच शोभत. त्यांचें रूप पाहतांच चराचर विश्वास मोह पडे.

जिन्ह बीथिन्ह बिहरहिँ सब भाई ।
थकित होहिँ सब लोग लुगाई ।

ज्या वाटेनें त्या सर्वांनीं निघावें तिकडच्या सर्व स्त्रीपुरुषांनीं त्यांना पाहूनच थक्क व्हावें.

**दो०—कोसल-पुर-बासी नर नारि बृद्ध अरु बाल । प्रानहुँ तें प्रिय लागत सब कहँ राम कृपाल ॥ २०९ ॥**

अयोध्येंतील सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुषांस कृपाळु रामचंद्र प्राणाहून प्रिय असत.

चौ०—बंधु सखा संग लेहिँ बोलाई ।
बन मृगया नित खेलहिँ जाई ।
पावनमृग मारहिँ जिय जानी ।
दिन प्रति नृपहिँ देखावहिँ आनी ।

रामचंद्रांनीं सर्व बंधूंना आणि सोंगड्यांना बोलावून घेऊन वनांत शिकार खेळण्याला जात असावें, मेध्य मृग कोणते याचा विचार करून त्यांसच मारावें, व ते रोज राजास आणून दाखवावें.

जे मृग रामबान के मारे ।
ते तनु तजि सुरलोक सिधारे ।

जे मृग रामबाणांनीं मरत, ते कुडी टाकून देवलोकास जात असत.

अनुज सखा सँग भोजन करहीँ ।
मातु पिता अज्ञा अनुसरहीँ ।
जेहि बिधि सुखी होहिँ पुरलोगा ।
करहिँ कृपानिधि सोइ संजोगा ।

कृपानिधींनीं बंधु व मित्र यांसहवर्तमान भोजन करावें, आईबापांच्या आज्ञेंत वागावें, आणि जेणेंकरून सर्व लोक सुखी होतील अशीच वागणुक ठेवावी.

बेद पुरान सुनहिँ मन लाई ।
आपु कहहिँ अनुजन्ह समुझाई ।

त्यांनीं वेदपुराणें लक्ष्यपूर्वक ऐकावीं आणि तीं स्वतः आपल्या बंधूंस समजावून द्यावीं.

प्रातकाल उठि कै रघुनाथा ।
मातु पिता गुरु नावहिँ माथा ।

आयसु माँगि करहि पुरकाजा।
देखि चरित हरषइ मन राजा।

रघुनाथानें प्रातःकालींच उठून मातापिता व गुरु त्यांस वंदन करावें, आणि त्यांची आज्ञा घेऊन अयोध्येंतील कामकाज करावें. हें त्याचें वर्तन पाहून राजा दशरथानें मनांत हर्षित व्हावें.

**दो०—व्यापक अकल अनीह अज निर्गुन नाम न रूप। भगत हेतु नाना बिधि करत चरित्र अनूप ॥२१०॥**

सर्वव्यापक, कलारहित, इच्छारहित, जन्मरहित, नामरूपगुणरहित, असे श्रीरामचंद्र भक्तांच्या लडिवाळास्तव नानाप्रकारचीं व अनुपम्य अशीं चरित्रें करीत असत.

चौ०—यह सब चरित कहा मैं गाई।
आगिलि कथा सुनहु मन लाई।
बिस्वामित्र महामुनि ज्ञानी।
बसहिँ बिपिन सुभ आस्रम जानी।

ही सर्व कथा मी सविस्तर सांगितली. आतां पुढील वृत्तांत मन लावून ऐक. विश्वामित्र म्हणून एक परमज्ञानी मुनी होते. त्यांनीं अरण्यासच पवित्र आश्रम समजून तेथें वास करावा.

जहँ जप जज्ञ जोग मुनि करहीँ।
अति मारीच सुबाहुहि डरहीँ।
देखत जज्ञ निसाचर धावहिँ।
करहिँ उपद्रव मुनि दुख पावहिँ।

मुनींनीं जेथें म्हणून जप व यज्ञ वगैरे करावे तेथें तेथें मारीच, सुबाहू, इत्यादि राक्षस त्यांस फार पीडा देत. यज्ञ पाहतांच राक्षस धांवत जात, तेथें पीडा करीत, व त्यामुळें मुनींस दुःख होई.

गाधि-तनय मन चिंता व्यापी।
हरि बिनु मरिहि न निसिचर पापी।
तब मुनिबर मन कीन्ह बिचारा।
प्रभु अवतरेउ हरन महिभारा।

विश्वामित्राचें चित्त चिंतातुर झालें कारण हे दुष्ट राक्षस परमेश्वराशिवाय मरावयाचे नाहींत. हें जाणून त्यानें मनांत विचार केला कीं, पृथ्वीचा भार उतरविण्याकरितां प्रभु अवतरले आहेत.

एहू मिस देखउँ पद जाई।
करि बिनती आनउँ दोउ भाई।
ज्ञान-बिराग-सकल-गुन-अयना।
सो प्रभु मैं देखब भरि नयना।

तेव्हां ह्या मिषानें तरी मला प्रभुपदाचें दर्शन घडेल. मी विनंति करून त्या दोघांहि बंधूंस घेऊन येईल आणि ज्ञानवैराग्यादि सर्व गुणांचें धाम अशा प्रभूस डोळे भरून पाहीन.

**दो०—बहु बिधि करत मनोरथ जात लागि नहिँ बार। करि मज्जन सरजूजल गये भूप दरबार ॥२११॥**

असे अनेक प्रकारचे मनोरथ करीत विश्वामित्र निघाले. त्यांस पोंचण्यास मुळींच वेळ लागला नाहीं. ते शरयूजलाचें स्नान करून राजसभेंत गेले.

चौ०—मुनि आगमन सुना जब राजा।
मिलन गयउ लेइ बिप्रसमाजा।
करि दंडवत मुनिहि सनमानी।
निज आसन बैठारेन्हि आनी।

विश्वामित्रांचें आगमन कळतांच विप्रसमाज घेऊन राजा सामोरा गेला, मुनींस दंडवत घालून त्यानें त्यांचा सन्मान केला, आणि त्यांस आणून आपल्या सिंहासनावर बसविलें.

चरन पखारि कीन्हि अति पूजा।
मो सम आजु धन्य नहिँ दूजा।
बिबिध भाँति भोजन करवावा।
मुनिबर हृदय हरष अति पावा।

चरणप्रक्षालनपूर्वक त्यांची त्यानें उत्कृष्ट पूजा केली; आणि आज माझ्यासारखा धन्य कोणीहि नाहीं (असें म्हणाला). राजानें मुनींस तऱ्हतऱ्हांचें भोजन घातलें. मुनिवरांच्याहि मनास फार आनंद झाला.

पुनि चरनन्हि मेले सुत चारी।
राम देखि मुनि देह बिसारी।
भये मगन देखत मुख सोभा।
जनु चकोर पूरनससि लोभा।

नंतर त्यानें आपले चारीहि पुत्र मुनींच्या पायांवर घातले. रामचंद्रास पाहून मुनी देहभान विसरले. ती मुखश्री पाहतांच पूर्णचंद्रावर जणूंकाय चकोरच लुब्ध व्हावा इतके ते तल्लीन झाले.

तब मन हरषि बचन कह राऊ।
मुनि अस कृपा न कीन्हेहु काऊ।

केहि कारन आगमन तुम्हारा ।
कहहु सो करत न लावउँ बारा ।

तेव्हां राजा प्रसन्न अंतःकरणानें म्हणाला, मुने ! आपण आजपर्यंत असा कधींच अनुग्रह केला नव्हता. किंनिमित्त आपलें हें आगमन झालें तें आपण लवकर कळाविलें पाहिजे.

असुरसमूह सतावहि मोही ।
मैं जाचन आयउँ नृप तोहि ।
अनुजसमेत देहु रघुनाथा ।
निसि-चर-बध मैं होब सनाथा ।

( मुनी म्हणाले ) राक्षससमुदाय मला फार पीडा देत आहे; सबब राजा मी तुजजवळ एक याच्या करण्यास आलों आहे. लक्ष्मणासहवर्तमान राघवास माझ्या स्वाधीन कर, म्हणजे राक्षसवधही होईल व व मीहि सनाथ होईन.

**दो०—देहु भूप मन हरषित तजहु मोह अज्ञान । धर्म सुजस प्रभु तुम कौं इन्ह कहँ अति कल्यान ॥ २१२ ॥**

राजा ! मोह व अज्ञान सोडून देऊन प्रसन्न मनानें उभयतांस माझ्या हवालीं कर. त्यामुळें तुलाहि धर्म व सत्कीर्ति यांची जोड मिळून यांचेंहि अतिशय कल्याण होईल.

चौ०—सुनि राजा अति अप्रिय बानी ।
हृदय कंप मुखदुति कुम्हिलानी ।
चौथेपन पायउँ सुत चारी ।
बिप्र बचन नहिँ कहेहु बिचारी ।

मुनीची ती अत्यंत अप्रिय वाणी कानीं पडतांच राजाच्या हृदयाचा थरकांप झाला व त्याच्या तोंडचें पाणीच पळालें.

ब्रह्मन् ! आपल्या या आज्ञेंत माझ्या अंतकाळां-तलीं हीं चार अपत्यें होत. या गोष्टीचा विचार झालेला नाहीं.

माँगहु भूमि धेनु धन कोसा ।
सरबस देउँ आजु सह रोसा ।
देह प्रान ते प्रिय कछु नाहीँ ।
सोउ मुनि देउँ निमिष एक माहीँ ।

मुने ! भूमि, धेनु, धन, कोश कांहींहि मागा, मी सर्व आतांच आनंदानें समर्पण करितों. देह आणि प्राण यांपेक्षां प्रियकर तर कांहींच नाहींना, पण तेदेखील निमिषमात्रांत मी आपल्या स्वाधीन करतों.

सब सुत प्रीय प्रान की नाईँ ।
राम देत नहिँ बनइ गोसाईँ ।
कहँ निसिचर अति घोर कठोरा ।
कहँ सुंदर सुत परम किसोरा ।

सर्वच पुत्र मला प्राणासारखे प्रिय आहेत. तरी हे स्वामिन् ! रामास मात्र माझ्यानें देववत नाहीं. कोठें ते अति क्रूर व कठोर आदमखोर आणि कोठें हीं सुकुमार चिमकुलीं मुलें ?

सुनि नृपगिरा प्रेम-रस-सानी ।
हृदय हरष माना मुनि ज्ञानी ।
तब बसिष्ठ बहु बिधि समुझावा ।
नृपसंदेह नास कहँ पावा ।

राजाचें तें प्रेमरसानें ओथंबलेलें भाषण ऐकून ज्ञानवंत विश्वामित्रांच्या चित्तास हर्षच वाटला. नंतर वसिष्ठांनीं राजाची अनेक प्रकारें समजूत केली, तेव्हां राजाची शंका निवळली.

अति आदर दोउ तनय बोलाये ।
हृदय लाइ बहुभाँति सिखाये
मेरे प्राननाथ सुत दोऊ ।
तुम्ह मुनि पिता आन नहिँ कोऊ ।

अत्यंत आदरानें दोघांहि मुलांना बोलावून व त्यांस पोटाशीं धरून राजानें त्यांना बहुतप्रकारें पढविलें, व तो म्हणाला मुने ! हे दोन्ही पुत्र माझ्या प्राणांचे धनी होत. आतां आपणापरता यांचा पिता अन्य कोणीहि नाहीं.

**दो०—सौंपे भूप रिषिहि सुत बहुबिधि देइ असीस । जननीभवन गये प्रभु चले नाइ पद सीस ॥ २१३ ॥**

उदंड आशीर्वाद देऊन राजानें मुलें ऋषींच्या स्वाधीन केलीं. नंतर प्रभु मातेच्या मंदिरांत जाऊन आणि तिच्या चरणांवर मस्तक ठेवून जाण्यास निघाले.

**सो०—पुरुषसिंह दोउ बीर हरषि चले मुनि-भय-हरन । कृपासिंधु मतिधीर अखिल-बिस्व-कारन-करन ॥ २८ ॥**

कृपासागर, अखिल विश्वाचें कारण ( जनक असे राम ) आणि करण ( विश्वस्थितीला साधन असे लक्ष्मण ) असे ते दोघे पुरुषसिंह वीर मुनींच्या भय-हरणास्तव उल्हासानें जाऊं लागले.

चौ---अरुन नयन उर बाहु बिसाला।
नीलजलज तनु स्याम तमाला।
कटि पट पीत कसे बरभाथा।
रुचिर-चाप-सायक दुहुँ हाथा।
स्याम गौर सुंदर दोउ भाई।
बिस्वामित्र महानिधि पाई।

नेत्र आरक्त, वक्षःस्थल व हस्त विशाल, नील-कमल व तमाल पुष्पाप्रमाणें श्यामतनू, कमरेला पीतांबर शोभलेला, सुरेख भाते कसलेले, आणि दोन्ही हातांत सुंदर धनुष्यबाण घेतलेले असे ते सुस्वरूप, श्याम आणि गौरवर्ण दोघे बंधु विश्वमित्राला दोन महा-निधीच सांपडले.

प्रभु ब्रह्मन्य देव मैं जाना।
मोहि निति पिता तजेउ भगवाना।

( विश्वामित्र म्ह०— ) हा प्रभु साक्षात् परमेश्वर होय, हें मी ओळखिलें. ह्या भगवंतास दशरथानें मजवर उपकार करण्याकरितांच दूर केलें.

चले जात मुनि दीन्हि देखाई।
सुनि ताडका क्रोध करि धाई।
एकहि बान प्रान हरि लीन्हा।
दीन जानि तेहि निज पद दीन्हा

मार्गानें जातां जातांच मुनींनीं रामांना ताटका दाखविली. त्यांचे शब्द ऐकतांच ताटका चवताळून धांवली. रामांनीं एकाच बाणानें तिचें प्राणहरण केलें, आणि ती दीन म्हणून तिला मुक्ति दिली.

तब रिषि निजनाथहि जिय चीन्ही।
बिद्यानिधि कहँ बिद्या दीन्ही।
जा तें लाग न छुधा पिपासा।
अतुलितबल तन तेज प्रकासा।

तेव्हां ऋषींनीं आपल्या मालकास ओळखून त्या विद्यानिधीस स्वतःची विद्या ओपली. ( भाव हा कीं फिरून त्या विद्येचा आसरा घ्यावयाचा नाहीं. ) जेणेंकरून क्षुत्पिपासेचें हरण होऊन शरीरांत अपूर्व बल आणि तेज प्रकट व्हावें अशी ती विद्या होती.

**दो०—आयुध सर्व समर्पि कै प्रभु निज-आस्रम आनि। कंद मूल फल भोजन दीन्ह भगत हित जानि॥ २१४॥**

पुढें त्यांनीं प्रभूस आपल्या आश्रमीं आणून व त्यास भक्तकैवारी जाणून सर्व आयुधें समर्पण केलीं, आणि कंदमूलफलादिकांचें त्यांस भोजन दिलें.

चौ०—प्रात कहा मुनि सन रघुराई।
निर्भय जज्ञ करहु तुम्ह जाई।
होम करन लागे मुनिझारी।
आपु रहे मख की रखवारी।

प्रातःकालीं रघुरायानें मुनीस सांगितलें कीं, आपण निर्धास्तपणें यज्ञ चालू करावा. सर्व मुनी होम करूं लागले. राम स्वतः यज्ञरक्षण करीत राहिले.

सुनि मारीच निसाचर कोही।
लेइ सहाय धावा मुनिद्रोही।
बिनु फर बान राम तेहि मारा।
सत जोजन गा सागरपारा।

क्रोधी व ब्राह्मणद्रोही मारीचानें हें ऐकतांच आपल्या सांथीदारांसह हल्ला केला. तेव्हां रामचंद्रानें त्यास एकच व तोहि बिनफळाचा बाण मारतांच तो मारीच समुद्रापलीकडे शंभर योजनें दूर जाऊन आदळला.

पावकसर सुबाहु पुनि मारा।
अनुज निसाचर कटकु सँघारा।
मारि असुर द्विज-निर्भय कारी।
अस्तुति करहिं देव-मुनि-झारी

नंतर त्यानें एकाच अग्निशरानें सुबाहूचा प्राण घेतला; व लक्ष्मणानें बाकीच्या राक्षस-सैन्याचा फडशा पाडला. राक्षसांस मारून ब्राह्मणांस निर्भय करणाऱ्या रघुवीराची सर्व देव आणि मुनी यांनीं स्तुति केली.

तहँ पुनि कछुक दिवस रघुराया।
रहे कीन्हि बिप्रन्ह पर दाया।
भगतिहेतु बहु कथा पुराना।
कहे बिप्र जद्यपि प्रभु जाना।

नंतर कांहीं दिवस तेथेंच राहून रघुरायानें ब्राह्मणांवर अनुग्रह केला. प्रभूस जरी सर्व ज्ञात होतें तरी ब्राह्मणांनीं पुष्कळ कथापुराणें भक्तिभावानें त्यांस सांगितलीं.

तब मुनि सादर कहा बुझाई।
चरित एक प्रभु देखिय जाई।
धनुषजज्ञ सुनि रघुकुल-नाथा।
हरषि चले मुनिबर के साथा।

पुढें मुनी प्रभूस अनुलक्षून आदरपूर्वक म्हणाले कीं, एक विशेष प्रसंग पाहण्यास जाऊं. धनुषयज्ञ ऐकून रघुवीर सर्व मुनिवृंदासह आनंदानें निघाले.

आस्रम एक दीख मग माहीँ ।
खग मृग जीव जंतु तहँ नाहीँ

मार्गात त्यांना एक आश्रम दृष्टीस पडला. तेथें चिटपांखरूंहि नव्हतें.

पूछा मुनिहि सिला प्रभु देखी ।
सकल कथा मुनि कही बिसेखी ।

तेथें एक शिला दिसली, तेव्हां प्रभूंनीं मुनीस प्रश्न केला व ऋषींनीं सर्व कथा विस्तारपूर्वक सांगितली.

दो०—गौतमनारि सापबस उपल--देह धरि धीर । चरन-कमल-रज चाहति कृपा करहु रघुबीर ॥ २१५ ॥

(मुनि म्हणाले) हीच ती शापवश शिलारूप गौतम-पत्नी, जी धैर्य धरून आपल्या चरणकमलरजांची आकांक्षा करीत आहे. रघुवीरा ! इजवर कृपा करावी.

छंद—परसत पद पावन सोकनसावन प्रगट भई तपपुंज सही । देखत रघुनायक जन–सुख–दायक–सनमुख होइ कर जोरि रही ॥ अतिप्रेम अधीरा पुलक सरीरा मुख नहिँ आवइ बचन कही । अतिसय बडभागी चरनन्हि लागी जुगल नयन जलधार बही ॥ २८ ॥

त्या शोकनाशक पवित्र पदाचा स्पर्श होतांच तपःपुंज अशी अहल्या प्रकट झाली. आणि भक्तसुखदायक अशा रघुनायकास पाहून व त्याच्या सन्मुख होऊन ती हात जोडून उभी राहिली. अत्यंत प्रेमानें अधीर होऊन तिच्या शरीरावर रोमांच थरारले. तीस जीभही उचलवेना. जेमतेम अत्यंत महाभागिनी इतकेंच म्हणून तिनें चरणांवर लोट मारला. तिच्या नेत्रांतून अश्रुधारा सारख्या वाहूं लागल्या.

छंद—धीरज मन कीन्हा प्रभु कहँ चीन्हा रघुपतिकृपा भगति पाई । अति निर्मल बानी अस्तुति ठानी ज्ञानगम्य जय रघुराई ॥

मैं नारि अपावन प्रभु जगपावन रावनरिपु जन-सुख-दाई । राजीवबिलोचन भव-भय-मोचन पाहि पाहि सरनहि आई ॥२९॥

तिनें मन घट्ट करून प्रभूस खूप निहारलें. रामकृपेनें तिचे ठिकाणीं भक्ति उत्पन्न झाली. तिनें निर्मळ वाणीनें स्तुति करण्यास आरंभ केला. हे रघुराज ! आपली जाणीव फक्त ज्ञानानेंच व्हावयाची, मी स्त्री म्हणून अपवित्र आहे. आपण प्रभु जगत्पावन आहां. हे रावणारे ! हे जनसुखदातारा ! हे राजीवलोचना ! भवभयमोचना ! माझें रक्षण करा ! मी शरणागत आहे. आपला जयजयकार असो.

छंद—मुनि साप जो दीन्हा अति भल कीन्हा परम अनुग्रह मैं माना । देखेउँ भरि लोचन हरि भवमोचन इहइ लाभ संकर जाना ॥ बिनती प्रभु मोरि मैं मतिभोरी नाथ न माँगउँ बर आना । पद-कमल-परागा रस अनुरागा मम मन मधुप करइ पाना ॥३०॥

मुनींनीं शाप दिला हें त्यांनीं फारच चांगलें केलें. तो मी अनुग्रहच समजतें. कारण, त्यामुळेंच भवमोचक प्रभु मी आज डोळे भरून पाहत आहे. ह्या लाभाची महती एक शंकरच जाणतात. हे नाथ ! मी मूढ आहे. मी इतर कोणताहि वर मागत नाहीं. प्रभो ! माझी विनंति एवढीच कीं, माझा मनोभृंग आपल्या पद-कमलपरागाचे ठायीं अनुरक्त असावा, आणि त्याच्याच रसाचें त्यानें पान करीत असावें.

छंद—जेहि पद सुरसरिता परमपुनीता प्रगट भई सिव सीस धरी । सोई पदपंकज जेहि पूजत अज मम सिर धरेउ कृपाल हरी ॥ एहि भाँति सिधारी गौतमनारी बार बार हरि चरन परी । जो अति मन भावा सो बर पावा गइ पतिलोक अनंद भरी ॥३१॥

ज्या चरणांपासून शंकरांनीं मस्तकीं धारण केलेली परमपवित्र मंदाकिनी प्रगट झाली, व ज्यांचें ब्रह्मदेव देखील पूजन करितात, तींच हीं चरणकमलें आपण माझ्या मस्तकावर ठेविलीं ! आपण कृपालु आणि अघहारक आहां ! अशा प्रकारें स्तुति करून ती प्रभु-चरणीं वांरवार लोटांगण घालूं लागली, आणि अत्यंत अभीष्ट असा वर पावून आनंदानें पतिलोकास गेली.

---

१ गौतम ऋषीची पत्नी अहल्या इच्याशीं इंद्र गौतम-रूपानें रममाण झाला म्हणून गौतमानें 'शिला होशील' असा शाप दिल्याची कथा आहे.

२ विश्वामित्राची आज्ञा रजस्पर्शाची होती. म्हणून पदस्पर्शाचा अर्थ पदरजस्पर्श घ्यावयाचा.

**दो०अस प्रभु दीनबंधु हरि कारनरहित दयाल। तुलसिदास सठ ताहि भजु छाडि कपट जंजाल ॥ २१६ ॥**

असा तो श्रीहरी प्रभु दीनबंधु असून निर्हेतुक दया करणारा आहे. हे शठा! तुळसीदासा, हा मिथ्या संसारजाल सोडून तूं त्याचीच भक्ति कर.

चौ०—चले राम लछिमन मुनि संगा।
गये जहाँ जगपावनि गंगा।
अनुज सहित प्रभु कीन्ह प्रनामा।
बहु प्रकार सुख पायउ रामा।
गाधिसूनु सब कथा सुनाई।
जेहि प्रकार सुरसरि महि आई।

मुनींच्या समवेत रामलक्ष्मण चालूं लागले, आणि जगतास पावन करणाऱ्या गंगानदीवर आले. ज्या कारणानें गंगा पृथ्वीवर अवतीर्ण झाली तो सर्व इतिहास विश्वामित्रांनी रामास निवेदन केला.

तब प्रभु रिषिन्ह समेत नहाये।
बिबिध दान महिदेवन्ह पाये।
हरषि चले मुनि–बृंद–सहाया।
बेगि बिदेह नगर नियराया।

नंतर प्रभूंनी ऋषींसमवेत स्नानें केलीं. ब्राह्मणांस अनेक दानें मिळालीं. प्रभु आनंदानें मुनिवृंदांबरोबर चालून सत्वर विदेह नगराजवळ येऊन पोंचले.

पुररम्यता राम जब देखी।
हरषे अनुज समेत बिसेखी।

नगरशोभा पाहिली तेव्हां रामलक्ष्मणांना विशेषच आनंद झाला.

बापी कूप सरित सर नाना।
सलिल सुधासम मनिसोपाना।
गुंजत मंजु मत्त रस भृंगा।
कूजत कल बहुबरन बिहंगा।
बरन बरन बिकसे बनजाता।
त्रिबिध समीर सदा सुखदाता।

त्या नगरांत वापी, कूप, नद्या, सरोवरें अनेक होतीं. त्यांचें जल अमृततुल्य असून त्यांस रत्नांचे घाट होते. त्यांजवर मधुमत्त भ्रमर मंजुल गुंजारव करीत होते. रंगारंगाच्या पक्ष्यांचा किलकिलाटहि होत होता. अनेक रंगांचीं कमलें त्यांत प्रफुल्लित झालीं होतीं, आणि सुखकर असा त्रिविध वायु एकसारखा वहात होता.

**दो०—सुमनवाटिका बाग बन बिपुल बिहंग निवास। फूलत फलत सुपल्लवत सोहत पुर चहुँ पास ॥ २१७ ॥**

फलपुष्पपल्लवांनीं समृद्ध असून ज्यांवर अनेक पक्षी राहतात अशा पुष्पवाटिका, बगीचे व वनें चोहोंकडे शहरास शोभा देत होतीं.

चौ०—बनइ न बरनत नगरनिकाई।
जहाँ जाइ मन तहइँ लोभाई।

शहराची शोभा इतकी अवर्णनीय होती कीं, जिकडे मन जाई तेथेंच तें लुब्ध होई.

चारु बजार बिचित्र अँबारी।
मनिमय बिधि जनु स्वकर सवाँरी।
धनिक बनिक बर धनद समाना।
बैठे सकल बस्तु लेइ नाना।

बाजार मनोहर असून अंबारखाने तर विचित्रच होते. जणुंकाय ब्रह्मदेवानें स्वतःच त्यांचें जडावकाम केलें आहे. सावकार आणि वाणी तर कुबेरासारखे धनाढ्य असून सर्वजण नाना प्रकारच्या वस्तु घेऊन बसत असत.

चौहट सुंदर गली सुहाई।
संतत रहहिं सुगंध सिँचाई।
मंगलमय मंदिर सब केरे।
चित्रित जनु रतिनाथ चितेरे।

राजमार्ग तर सुंदर होतेच. परंतु आडमार्गदेखील सुबक होते. त्यांजवर सर्वकाळ सुवासिक सडे शिंपले जात. सर्वांचीं घरें मंगलयुक्त असून त्यांवरील चित्रकाम जणुं मदनानेंच काढल्यासारखें दिसत होतें.

पुर–नर–नारि सुभग सुचि संता।
धरमसील ग्यानी गुनवंता।
अति अनूप जहँ जनकनिवासू।
बिथकहिँ बिबुध बिलोकि बिलासू।

शहरांतील स्त्रीपुरुष भाग्यवान्, शुचिष्मंत, शिष्ट, धर्मशील, सुशिक्षित आणि गुणवान् असत. राजवाडा तर अगदीं अप्रातिम. त्यांतील विलास पाहून देवदेखील थक्क होऊन जात.

होत चकित चित कोट बिलोकी।
सकल–भुवन–सोभा जनु रोकी।

शहराभोंवतालचा कोट पाहून मन चकित होऊन जाई. जणुंकाय त्यामध्यें त्रैलोक्याची शोभा एकवटली होती.

**दो०—धवलधाम मनि--पुरट--पट--सुघटित नाना भाँति । सियनिवास सुंदर सदन सोभा किमि कहि जाति ॥ ॥२१८॥**

अनेक प्रकारचीं मंदिरें बाहेरून शुभ्र असून त्यांचा आंतील भाग रत्नें आणि सुवर्णपत्रे यांनीं सुबक मढविला होता. ज्या सुंदर मंदिरांत सतिचा वास होता त्याचें वर्णन कोणत्या प्रकारें होऊं शकणार ?

चौ०—सुभग द्वार सब कुलिस कपाटा ।
भूप भीर नट मागध भाटा ।
बनी बिसाल बाजि–गज–साला ।
हय–गय–रथ–संकुल सब काला ।
सूर सचिव सेनप बहुतेरे ।
नृपगृहससरिस सदन सब केरे ।
पुर बाहिर सर सरित समीपा ।
उतरे जहँ तहँ बिपुल महीपा ।

[ त्या नगराचे ] वेशीचे दरवाजे सुंदर असून सर्वांसच वज्राप्रमाणें मजबूत कपाटें केलीं होतीं. त्या दरवाज्यांवर राजे, नट, मागध आणि भाट इत्यादिकांची सदैव गर्दी असे. घोड्यांच्या पागा आणि हत्तींचीं ठाणीं फार विस्तर्णि असून नेहमीं घोडे, हत्ती व रथ यांनीं गच्च भरलेलीं असत. योद्धे, मंत्री व सेनापती अनेकच होते व त्या सर्वांचीं घरें अगदीं राजवाड्यासारखीं होतीं. शहराच्या बाहेर नदी, तलाव यांचे कांठीं जिकडे तिकडे अनेक राजे उतरले होते.

देखि अनूप एक अँबराई ।
सब सुपास सब भाँति सुहाई ।
कौसिक कहेउ मोर मन माना ।
इहाँ रहिय रघुबीर सुजाना ।

सर्वप्रकारें सोइस्कर आणि सर्वथैव रमणीय अशी एक अप्रतिम आंबराई पाहून विश्वामित्र म्हणाले, ही जागा मला फार आवडते. हे सुज्ञ रघुवीरा ! येथेंच आपण उतरूं.

भलेहि नाथ कहि कृपानिकेता ।
उतरे तहँ मुनि–बृंद–समेता ।
बिस्वामित्र महामुनि आये ।
समाचार मिथिलापति पाये ।

कृपानिधान राम " ठीक आहे महाराज " असें म्हणाले व सर्व मुनिवृंदासह तेथेंच उतरले. महामुनि विश्वामित्र आल्याची वर्दी जनकराजास पोंचली.

**दो०—संग सचिव सुचि भूरिभट भूसुर बर गुरु ज्ञाति । चले मिलन मुनिनायकहि मुदित राउ एहि भाँति ॥ २१९ ॥**

मंत्री, अनेक शुचिष्मंत ब्राह्मण, योद्धे, गुरु, आणि इतर परिवारासमवेत राजा विश्वामित्रांना भेटण्यासाठीं मोठ्या हर्षानें निघाला.

चौ०—कीन्हि प्रनाम चरन धरि माथा ।
दीन्हि असीस मुदित मुनिनाथा ।
बिप्रबृंद सब सादर बंदे ।
जानि भाग्य बड राउ अनंदे ।

राजानें त्यांना प्रणाम करून त्यांचे चरण आपल्या मस्तकीं धारण केले. मुनिश्रेष्ठांनीं प्रसन्न होऊन आशीर्वाद दिला. नंतर राजानें इतर ब्रह्मवृंदांनाहि अत्यंतादरानें प्रणाम केला. आपलें महद्भाग्य जाणून राजास संतोष वाटला.

कुसल प्रस्न कहि बारहिँ बारा ।
बिस्वामित्र नृपहि बैठारा ।

वारंवार कुशल प्रश्न विचारून विश्वामित्रांनीं राजास बसविलें.

तेहि अवसर आये दोउ भाई ।
गये रहे देखन फुलवाई ।
स्याम गौर मृदु बयस किसोरा ।
लोचन सुखद बिस्व–चित–चोरा ।

श्याम आणि गौर, कोमल आणि अल्पवयी नेत्रसुखद आणि विश्वचित्ताकर्षक असे ते दोघे राजपुत्र फुलबाग पाहण्यास गेले होते तेहि त्याच सुमारास तेथें आले.

उठे सकल जब रघुपति आये ।
बिस्वामित्र निकट बैठाये ।

रघुपति येतांच सर्वांनीं त्यांस उत्थापन दिलें व विश्वामित्रांनीं त्यांस आपल्याजवळ बसविलें.

भये सब सुखी देखि दोउ भ्राता ।
बारि बिलोचन पुलकित गाता ।
मूरति मधुर मनोहर देखी ।
भयउ बिदेहु बिदेहु बिसेखी ।

उभय बंधूंस पाहून सर्वांनाच संतोष झाला आणि त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रू येऊन अंगावर रोमांच

उभे राहिले, पण रामाची ती गोंडस व लोभस मूर्ति पाहून राजा विदेह तर विशेषच 'विदेह' [देहभानरहित] झाला.

**दो०—प्रेममगन मन जानि नृपु करि बिबेकु धरि धीर। बोलेउ मुनिपद नाइ सिरु गदगद गिरा गँभीर॥ २२०॥**

आपलें मन प्रेमांत निमग्न झालें आहे असें पाहून राजानें विवेकपूर्वक धैर्य धरिलें, आणि तो मुनिचरणीं आपलें शिर नमवून गंभीर व सद्गदित वाणीनें म्हणाला,—

**चौ०—कहहु नाथ सुंदर दोउ बालक।**
**मुनि-कुल-तिलक कि नृपकुलपालक।**
**ब्रह्म जो निगम नेति कहि गावा।**
**उभय बेष धरि की सोइ आवा।**
**सहज बिरागरूप मन मोरा।**
**थकित होत जिमि चंदचकोरा।**

हे नाथ! हे दोघे सुंदर बालक मुनिकुलतिलक आहेत किंवा नृपकुलपालक आहेत हें कथन करावें. वेदांनीं 'नेति नेति' म्हणून गायलेलें ब्रम्ह तेंच ह्या दोघांच्या रूपानें आलें आहे काय? माझें मन स्वभावतःच वैराग्ययुक्त, तथापि तेंदेखील चंद्रचकोराप्रमाणें थक होत आहे.

**ता तें प्रभु पूछउँ सतिभाऊ।**
**कहहु नाथ जनि करहू दुराऊ।**
**इन्हहिँ बिलोकत अति अनुरागा।**
**बरबस ब्रह्मसुखहि मन त्यागा।**

यास्तव मी प्रभूंस सद्भावानें विचारतों. तें महाराजांनीं गुप्त न ठेवतां मला सांगावें. ह्यांना पाहून माझ्या ठिकाणीं प्रेम अतिशय दाटत आहे आणि मन हट्टानें ब्रह्मानंदविमुख होत आहे.

**कह मुनि बिहसि कहहु नृप नीका।**
**बचन तुह्मार न होइ अलीका।**
**ये प्रिय सबहि जहाँ लगि प्रानी।**
**मन मुसुकाहिँ राम सुनि बानी।**

मुनि हास्यपूर्वक म्हणाले, राजा! तूं रास्त बोललास. तुझें बोलणें कधींहि गैर असावयाचें नाहीं. जेथवर म्हणून प्राणिमात्र आहेत त्या सर्वांसच हे प्रिय होत. तो संवाद ऐकून राम मनांत हंसले.

**रघु-कुल-मनि दसरथ के जाये।**
**मम हित लागि नरेस पठाये।**

हे रघुकुलमणी दशरथाचे पुत्र असून माझ्या हितास्तव यांना दशरथानें पाठविलें आहे.

**दो०—रामु लषन दोउ बंधु बर रूप-सील-बल-धाम। मख राखेउ सब साखि जगु जिते असुर संग्राम॥ २२१॥**

हा राम व हा लक्ष्मण हे दोघेहि बंधु असून रूप, शील आणि बल यांचें सर्वश्रेष्ठ निधीच होत. यांनींच राक्षसांस युद्धांत जिंकून माझ्या यज्ञाचें रक्षण केलें याबद्दल सर्व जग साक्ष आहे.

**चौ०—मुनि तव चरन देखि कह राऊ।**
**कहि न सकउँ निज पुन्यप्रभाऊ।**

राजा म्हणाला मुने! ज्याअर्थी मला ह्या आपल्या चरणाचें दर्शन घडलें त्याअर्थी माझ्या महापुण्याचा प्रभाव मी अवर्णनीय समजतों.

**सुंदर स्याम गौर दोउ भ्राता।**
**आनँदहू के आनँददाता।**
**इन्ह कै प्रीति परसपर पावनि।**
**कहि न जाइ मन भाव सुहावनि।**
**सुनहु नाथ कह मुदित बिदेहू।**
**ब्रह्म जीव इव सहज सनेहू।**

सुंदर, श्याम आणि गौर असे हे दोघे बंधु आनंदालाहि आनंदप्रद आहेत. यांची परस्परपावन प्रीति अवर्णनीय असून तिचें सौष्ठव फक्त मनालाच गम्य असणार. राजा विदेह फिरून आनंदाच्या भरांत म्हणाला, हे नाथ! ऐका. ब्रह्म व जीव यांच्यासारखें यांचें स्वभावसिद्ध प्रेम दिसतें.

**पुनि पुनि प्रभुहि चितव नरनाहू।**
**पुलक गात उर अधिक उछाहू।**

राजा वारंवार प्रभु रामचंद्राकडे पाही, व त्याचें शरीर रोमांचित होऊन त्याच्या अंतःकरणास अधिकच उल्हास होई.

**मुनिहि प्रसंसि नाइ पद सीसू।**
**चलेउ लिवाइ नगर अवनीसू।**
**सुंदर सदन सुखद सब काला।**
**तहाँ बास लेइ दीन्ह भुआला।**
**करि पूजा सब बिधि सेवकाई।**
**गयउ राउ गृह बिदा कराई।**

मुनींचा गौरव करून व त्यांचे चरणीं मस्तक ठेवून राजा त्यांस नगरांत घेऊन गेला. सुंदर आणि

सर्व कालीं सुखद अशा सदनांत राजानें त्यांस नेऊन ठेविलें. पूजादि सर्व प्रकारें त्यांची सेवा करून व मुनींचा निरोप घेऊन राजा आपल्या मंदिरांत गेला.

**दो०–रिषय संग रघु-बंस--मनि करि भोजन बिस्राम । बैठे प्रभु भ्रातासहित दिवस रहा भरि जाम ॥ २२२ ॥**

ऋषींच्या बरोबर त्या रघुकुलभूषणांनीं भोजन केलें व विश्रांति घेतली. प्रहरभर दिवस उरला असतां प्रभु लक्ष्मणासह बसले असतां,

चौ०–लषनहृदय लालसा बिसेखी ।
जाइ जनकपुर आइय देखी ।
प्रभुभय बहुरि मुनिहि सकुचाहीँ ।
प्रगट न कहहिँ मनहिँ मुसुकाहीँ ।

लक्ष्मणाच्या मनांत मिथिला नगरी पाहून येण्याची उत्कट इच्छा झाली. परंतु प्रभूंची भीति आणि त्यांतून मुनींचाहि संकोच म्हणून तो उघड बोलण्यास धजेना. तो मनांतल्या मनांतच हुरळला.

राम अनुजमन की गति जानी ।
भगतवछलता हिय हुलसानी ।
परमबिनीत सकुचि मुसुकाई ।
बोले गुरुअनुसासन पाई ।

रामांनीं लक्ष्मणाच्या मनांतील आशय जाणला. त्यांच्या हृदयांत भक्तवात्सल्य उल्लसित झालें. अत्यंत विनयानें संकोचपूर्वक व किंचित् हास्य करून गुरूची आज्ञा घेऊन ते म्हणाले—

नाथ लषन पुर देषन चहहीँ
प्रभुसकोच डर प्रगट न कहहीँ ।
जौँ राउर आयसु मैँ पावउँ ।
नगर देखाइ तुरत लेइ आवउँ ।

महाराज ! लक्ष्मण शहर पाहण्याची इच्छा करीत आहे, परंतु प्रभूच्या भयानें व संकोचानें त्यास बोलवत नाहीं. जर महाराजांची आज्ञा होत असेल, तर शहर दाखवून मी त्यास लवकरच परत घेऊन येतों.

सुनि मुनीस कह बचन सप्रीती ।
कस–न–राम तुम्ह राखहु नीती ।
धरम–सेतु–पालक तुम्ह ताता ।
प्रेमबिबस सेवक–सुख–दाता ।

तें ऐकून मुनींद्र प्रेमळ शब्दांनीं म्हणाले, रामा ! ही मर्यादा तूं कसा न पाळशील ? हे तात ! तूं धर्मसेतूचा पालक असून प्रेमांकित होऊन सेवकांना सुख देणारा आहेस.

**दो०–जाइ देखि आवहु नगरु सुखनिधान दोउ भाइ । करहु सुफल सब के नयन सुंदर बदन देखाइ ॥ २२३ ॥**

हे सुखनिधान ! तुम्ही दोघेहि बंधु जाऊन नगर पाहून या, आणि आपलीं सुंदर वदनें दाखवून सर्वांचे नेत्र सफल करा.

चौ०–मुनि–पद–कमल बंदि दोउ भ्राता ।
चले लोक–लोचन–सुख–दाता ।
बालकबृंद देखि अति सोभा ।
लगे संग लोचन मनु लोभा ।

लोकांच्या नेत्रांना सुख देणारे असे ते दोघे बंधु मुनिपदकमलांस वंदन करून निघाले. त्यांचें तें रमणीय स्वरूप पाहतांच नेत्र व मन लुब्ध होऊन मुलांचे थवे त्यांच्या मागोमाग जाऊं लागले.

पीतबसन परिकर कटि भाथा ।
चारु चापसर सोहत हाथा ।
तन अनुहरत सुचंदन खोरी ।
स्यामल गौर मनोहर जोरी ।

कमरेला पीतांबर आणि भाते बांधलेले, हातांत सुंदर चापबाण, अंगास यथायोग्य उत्कृष्ट चंदनाची उटी अशी ती शोभिवंत श्याम आणि गौरवर्ण जोडी प्रेक्षकांच्या मनाचा अपहार करीत होती.

केहरिकंधर बाहु बिसाला ।
उर अति रुचिर नाग–मनि–माला ।
सुभग सोन सरसी–रुह–लोचन ।
बदन मयंक ताप–त्रय–मोचन ।

त्यांचे स्कंध सिंहासारखे असून बाहु विशाल होते, व हृदयावर अत्यंत सोज्ज्वल असा रत्नहार रुळत होता. त्यांचे नेत्र कमलाप्रमाणें आरक्त व सुंदर असून त्यांचा मुखचंद्रमा तापत्रयापासून मुक्त करणारा होता.

कानन्हि कनकफूल छबि देहीँ ।
चितवत चितहि चोरि जनु लेहीँ

१ हा प्रवेश कोणत्याहि रामायणांत नाहीं. तो नाटकवजा आहे. त्याचा उद्देश आम्ही मानसहंसांतल्या काव्यसमालोचनेंत दिला आहे.

चितवनि चारु भृकुटि बर बाँकी।
तिलक-रेख-सोभा जनु चाकी।

त्यांच्या कर्णांतलीं सुवर्णपुष्पें आपल्या तेजानें जणुंकाय पहाणारांचें चित्तच हरण करीत होतीं. आधीं दृष्टीच हृदयंगम, त्यावर वक्र भ्रुकुटी, त्यांत फिरून भर कपाळावरील तिलकरेषांची, म्हणून एकंदर शोभा फारच खुलून उठली.

**दो०-रुचिर चौतनी सुभग सिर मेचक कुंचित केस। नख-सिख-सुंदर बंधु दोउ सोभा सकल सुदेस॥ २२४॥**

त्यांच्या सुंदर मस्तकावर सुरेख चतुष्कोण टोपी, आणि केस तकतकीत, कुरळे आणि काळेभोर असे ते नखशिखांत सुंदर बंधुद्वय सौंदर्याचें केवळ केंद्रस्थानच वाटे.

चौ०-देखन नगर भूपसुत आये।
समाचार पुरबासिन्ह पाये।
धाये धाम काम सब त्यागी।
मनहुँ रंक निधि लूटन लागी।

ते राजकुमार नगर पाहण्यास आले आहेत, ही बातमी ऐकतांच सर्व लोक आपापल्या घरचें कामकाज सोडून जणुंकाय दरिद्री लोक खजिना लुटण्यासच धांवत सुटले आहेत असे धावत सुटले.

निरखि सहज सुंदर दोउ भाई।
होहिँ सुखी लोचन फल पाई।
जुबती भवनझरोखन्हि लागीँ।
निरखहिँ रामरूप अनुरागीँ।

त्या सहजसुंदर बंधुद्वयास पाहतांच आपल्या नेत्रांचें साफल्य झालें असें वाटून लोक हर्षित होत. स्त्रिया घरांच्या झरोक्यांशीं येऊन रामरूप पाहतांच अनुरक्त होत.

कहहिँ परस्पर बचन सप्रीती।
सखि इन्ह कोटि-काम-छबि जीती।
सुर नर असुर नाग मुनि माहीँ।
सोभा असि कहुँ सुनियति नाहीँ।

त्या प्रेमानें एकमेकींशीं कुजबुजत कीं गडे, यांनीं तर कोटिमदनांचें लावण्यच हिरावून घेतलें आहे. सुर, नर, असुर, नाग आणि मुनी यांच्यांतहि असें लावण्य असलेलें ऐकिवांत नाहीं.

बिष्णु चारि भुज बिधि मुख चारी।
बिकटबेख मुख पंच पुरारी।
अपर देव अस कोउ न आही।
यह छबि सखी पटतरिय जाही।

विष्णूस चार हात, ब्रह्मदेवास चार तोंडें, शंकरास तर पांच तोंडें असून वेषहि भेसूर, म्हणून ह्या सौंदर्यास ज्याची उपमा साजेल असा गडे! त्या देवांतहि एकदेखील नाहीं.

**दो०-बयकिसोर सुखमासदन स्यामगौर सुखधाम। अंग अंग पर वारियहिं कोटिकोटिसत काम॥ २२५॥**

बालवयी, सौंदर्याचें केवळ निधान, श्याम आणि गौर अशा या सुखनिधानांच्या प्रत्येक अवयवावरून कोट्यानुकोटि कामदेव देखील ओंवाळून टाकावेत.

चौ०-कहहु सखी अस को तनु धारी।
जो न मोह अस रूप निहारी।
कोउ सप्रेम बोली मृदुबानी।
जो मैं सुना सो सुनहु सयानी।

गडे! सांग तर असा कोण जन्मास आला आहे कीं, जो हें रूप पाहून मोहित होणार नाहीं! दुसरी एक स्त्री प्रेमयुक्त व गोड शब्दांनीं म्हणाली, अग शहाण्यांनो! मी जें ऐकिलें आहे तें तर ऐका.

ए दोऊ दशरथ के ढोटा।
बालमरालन्ह के कल जोटा।।
मुनि-कौसिक-मख के रखवारे।
जिन्ह रनअजिर निसाचर मारे।

हे दोघे राजा दशरथाचे पुत्र म्हणजे छोटेखानी राजहंसांचीच मोहक जोडी. ज्यांनीं रणांत अजिंक्य राक्षस मारून विश्वामित्रांच्या यज्ञाचें रक्षण केलें ते हेच!

स्यामगात कल कंजबिलोचन।
जो मारीच-सुभुज-मद-मोचन।
कौसल्यासुत सो सुखखानी।
नाम राम धनुसायक पानी।

हा जो श्यामगात्र, सुंदर, राजीवाक्ष, मारीच, सुबाहु इत्यादिकांचा नूर उतरविणारा, सुखाची केवळ खाण आणि हातांत धनुष्यबाण धारण केलेला तो कौसल्येचा पुत्र. ह्याचें नांव राम आहे.

गौर किसोर बेष बर काछे
कर सरचाप राम के पाछे।

लछिमन नाम राम–लघु–भ्राता ।
सुनु सखि तासु सुमित्रा माता ।

हा जो गोरापान, चिमुकला, चुस्त पोशाखी, धनुर्बाणधारी आणि रामाचा पृष्ठरक्षक, याचें नांव लक्ष्मण बरें. गडे ! ऐकलेंस ना, ह्याची आई सुमित्रा, पण हा रामाचा धाकटा भाऊच आहे.

**दो०–विप्रकाजु करि बंधु दोउ मग मुनि-बधू उधारि । आये देखन चापमख सुनि हरषीँ सब नारि ॥ २२६ ॥**

हे दोघे बंधु विश्वामित्र ऋषींचा कार्यभाग उरकून आणि वाटेंतच गौतम पत्नीचा उद्धार करून धनुष्ययज्ञ पाहण्यासाठीं येथें आले आहेत. हें ऐकून सर्व स्त्रियांस आनंदीआनंद झाला.

चौ०–देखि रामछबि कोउ एक कहई ।
जोगु जानकिहि यह बरु अहई ।
जो सखि इन्हहिँ देख नरनाहू ।
पन परिहरि हठि करइ बिबाहू ।

रामाचें स्वरूप पाहून एकजण म्हणाली जानकीस योग्य असा हाच वर होय. गडे ! राजा जर याला पाहील तर आपला पण देखील विसरून तो बळेंच जानकीचें याच्याशीं लग्न लावून टाकील.

कोउ कह ए भूपति पहिचाने ।
मुनिसमेत सादर सनमाने ।
सखि परंतु पन राउ न तजई ।
बिधिबस हठि अबिबेकहि भजई ।

दुसरी एक म्हणाली राजानें यांस ओळखलें, आणि मुनिसमवेत त्यानें यांचा गौरव व सन्मानहि केला; पण सखे ! राजा कांहीं आपला पण सोडीत नाहीं. दुर्दैवानें आणि अविचारानें आपलाच हेका धरून तो बसला आहे.

कोउ कह जौँ भल अहइ बिधाता ।
सब कहँ सुनिय उचित–फल-दाता ।
तौ जानकिहि मिलिहि बरु एहू ।
नाहिँ न आलि इहाँ संदेहू ।

तिसरी म्हणाली, ब्रह्मदेव जर समंजस आणि सर्वांस यथायोग्य फल देणारा असेल तर ऐकून ठेव कीं, जानकीस हाच वर मिळेल. सखे ! यांत मुळींच संशय नाहीं.

जौँ बिधिबस अस बनइ सँजोगू ।
तौ कृतकृत्य होहिँ सब लोगू ।
सखि हमरे आरति अति ता ते ।
कबुहुँक ए आवहिँ एहि नाते ।

सुदैवानें हा योग जुळून आला तर सर्वच लोक कृतकृत्य होतील. सखे ! ही आमची उत्कट इच्छा एवढ्याचसाठीं कीं ह्यामुळें तरी हे कधींना कधीं येथें येत राहतील.

**दो०–नाहिँ त हम कहुँ सुनहु सखि इन्ह कर दरसन दूरि । यह संघट तब होइ जब पुन्य पुराकृत भूरि ॥ २२७ ॥**

एरवीं आपणांस यांचें दर्शन घडणें दुरापास्तच आहे. गडे ! आपण पूर्वजन्मीं जर कांहीं पुण्य जोडलें असेल तरच हें जुळून यावयाचें.

चौ०–बोली अपर कहेहु सखि नीका ।
एहि बिवाह अतिहित सबही का ।
कोउ कह संकरचाप कठोरा ।
ए स्यामल मृदुगात किसोरा ।
सब असमंजस अहइ सयानी ।
यह सुनि अपर कहइमृदुबानी ।

एकजण म्हणाली गडे ! तूं म्हणालीस तेंच खरें. हा विवाह म्हणजे सर्वांच्याच मनाजोगा होणार आहे. दुसरी एक म्हणाली, शिवचाप तर खूपच बोजड आणि ही सांवळी गोंडस मूर्ति तर अगदींच कोंवळी; मिळून गडे, साराच घोंटाळा दिसतो. त्यावर एकजण मृदु वाणीनें म्हणाली,—

सखि इन्ह कहँ कोउ कोउ अस कहहीँ ।
बड प्रभाउ देखत लघु अहहीँ ।
परसि जासु पद–पंकज–धूरी ।
तरी अहिल्या कृत–अघ–भूरी ।
सो कि रहिहि बिनु सिवधनु तोरे ।
यह प्रतीति परिहरिय न भोरे ।
जेहि बिरंचि रचि सीय सवाँरी ।
तेहि स्यामल बरु रचेउ बिचारी ।

सखे ! हे दिसण्यांत मात्र लहान दिसतात पण पराक्रमांत खूपच भडक आहेत असेंहि कोणी कोणी म्हणतात. ज्याच्या पदकमलरजाच्या स्पर्शानें महापातकी अहल्या देखील उद्धरिली तो काय शिवचाप तोडल्याशिवाय राहणार ? अचुक प्रचीति असूं दे कीं

ज्या ब्रह्मदेवानें सीतेला अशी गोजिरवाणी घडविली त्यानेंच तिला हा सांवळा वर विचारपूर्वक योजला आहे.

**तासु बचन सुनि सब हरषानीं।**
**ऐसइ होउ कहहिँ मृदुबानी।**

तिचें तें बोलणें ऐकून सर्वांनाच आनंद झाला व त्या कळवळून म्हणाल्या, तथास्तु!

**दो०–हिय हरषहिँ बरषहिँ सुमन सुमुखि–सुलोचनि–बृंद। जाहिँ जहाँ जहँ बंधु दोउ तहँ तहँ परमानंद॥ २२८॥**

त्या सुमुखी आणि सुलोचनी स्त्रियांच्या मनास आनंद होऊन त्या फुलें उधळूं लागल्या. ते दोघे बंधु जेथें जेथें जात तेथें तेथें आनंदाची लयलूट उडे.

**चौ०–पुर पूरब दिसि गे दोउ भाई।**
**जहँ धनु–मख–हित भूमि बनाई।**

शहराच्या पूर्वेस जिकडे धनुर्यज्ञासाठीं जागा तयार केली होती तिकडे ते दोघे बंधु गेले.

**अतिबिस्तार चारु गच ढारी।**
**बिमलबेदिका रुचिर सवाँरी।**

ती भूमि अत्यंत विस्तृत, सुबक, मजबूत व फरसबंदीची केली होती. मध्यवेदिका ( धनुष्य ठेविण्यासाठीं केलेला उंच ओटा ) देखील सुरेख साधलेली होती.

**चहुँ दिसि कंचनमंच बिसाला।**
**रचे जहाँ बैठहिँ महिपाला।**
**तेहि पाछे समीप चहुँ पासा।**
**अपर मंचमंडली बिलासा।**
**कछुक ऊँचि सब भाँति सुहाई।**
**बैठहिँ नगर लोग जहँ जाई।**

चोहों बाजूंला राजे लोकांस बसण्यासाठीं सोन्याचे मोठमोठाले तख्त ठेविले होते. त्यांच्या मागील बाजूस इतरांकरितां साधे बांक मांडले होते. शहरच्या सर्व मंडळींनीं येऊन बसावें म्हणून कांहीं उंच आणि सर्वतोपरी व्यवस्थेशीर अशा माड्या ( ग्यालरी ) केल्या होत्या.

**तिन्ह के निकट बिसाल सुहाये।**
**धवलधाम बहुबरन बनाये।**
**जहँ बैठे देखहि सब नारी।**
**जथाजोग निजकुल अनुहारी।**

स्त्रियांनीं आपापल्या कुलाच्या योग्यतेनुरूप बसून पहावें म्हणून त्या माड्यांच्या जवळच विशाल, सोइस्कर आणि शुभ्र वगैरे अनेक रंगांच्या बैठकी केल्या होत्या.

**पुर बालक कहि कहि मृदुबचना।**
**सादर प्रभुहि देखावहिँ रचना।**

शहरांतील मुलें मृदु वाणीनें आणि नम्रतापूर्वक ती एकंदर रचना प्रभूस दाखवूं लागलीं.

**दो०–सब सिसु एहि मिस प्रेमबस परसि मनोहर गात। तन पुलकहिँ अति हरष हिय देखि देखि दोउ भ्रात॥२२९॥**

त्या निमित्तानें सर्व मुलांनीं अत्यंत प्रेमानें त्या उभय बंधूंच्या मनोहर शरीरास स्पर्श करून त्यांना वारंवार न्याहाळून पहावें, व—

**चौ०–सिसु सब राम प्रेमबस जाने।**
**प्रीतिसमेत निकेत बखाने।**
**निज निज रुचि सब लेहिँ बोलाई।**
**सहित सनेह जाहिँ दोउ भाई।**

रामदेखील प्रेमवश आहेत असें समजून सर्व मुलांनीं त्यांना तीं स्थानें दाखवावीं. तीं मुलें आपापल्या रुचीप्रमाणें त्यांना बोलावीत व रामलक्ष्मण आत्मीयतेनें त्यांचेजवळ जात.

**रामु देखावहिँ अनुजहि रचना।**
**कहि मृदु मधुर मनोहर बचना।**

राम मृदु, मधुर व मनोहर वचनांनीं लक्ष्मणास तेथील रचना दाखवीत.

**लवनिमेष महँ भुवननिकाया।**
**रचइ जासु अनुसासन माया।**
**भगति हेतु सोई दीन दयाला।**
**चितवत चकित धनुष–मख–साला।**

ज्याच्या आज्ञेनुसार माया निमिषार्धांत अनेक ब्रह्मांडें निर्माण करिते तो दीनदयाल प्रभु भक्तांच्या हेतूस्तव ती धनुर्यज्ञशाला पाहून आश्चर्य करूं लागला.

**कौतुक देखि चले गुरु पाहीँ।**
**जानि बिलंबु त्रास मन माहीँ।**

ती मौज पाहतां पाहतां विलंब झाला. म्हणून मनांत भीति वाटून ते उभयतां गुरूकडे जाण्यास निघाले.

जासु त्रास डर कहँ डर होई।
भजनप्रभाउ देखावत सोई।

ज्याच्या भयानें भयासहि भय उत्पन्न व्हावयाचें तो भक्तिमहिम्याचें प्रदर्शन करूं लागला.

कहि बातैं मृदु मधुर सुहाई।
किये बिदा बालक बरिआई।

मृदु, मधुर आणि रोचक गोष्टी बोलून रामचंद्रानें मुलांना बळेंच निरोप दिला.

**दो०—सभय सप्रेम बिनीत अति-सकुच-सहित दोउ भाइ। गुरु-पद-पंकज नाइ सिर बैठे आयसु पाइ ॥ २३० ॥**

त्या विनयसंपन्न अशा दोघां बंधूंनीं सप्रेम परंतु संकोचपूर्वक व भीतभीत गुरुजींच्या चरणकमलांवर आपलीं मस्तकें नमवून नंतर त्यांच्या आज्ञेनें ते बसले.

चौ०—निसिप्रबेस मुनि आयसु दीन्हा।
सबहीं संध्यावंदन कीन्हा।
कहत कथा इतिहास पुरानी।
रुचिर रजनि जुगजाम सिरानी।

संध्याकाळ झाल्यामुळें मुनींच्या आज्ञेनुसार सर्वांनीं संध्यावंदन केलें. नंतर प्राचीन इतिहास कथन करण्यांत रात्रीचे दोन प्रहर टेर झाले.

मुनिबर सयन कीन्ह तब जाई।
लगे चरन चाँपन दोउ भाई।

नंतर विश्वामित्रांनीं शयन केलें व ते दोघे बंधु त्यांचे पाय चेपूं लागले.

जिन्ह के चरनसरोरुह लागी।
करत बिबिध जप जोग बिरागी।
तेइ दोउ बंधु प्रेम जनु जीते।
गुरु–पद–कमल पलोटत प्रीते।

ज्यांच्या चरणकमलाप्रीत्यर्थ वैराग्यवंत लोक नाना प्रकारचे जप व योग करितात असे ते दोघे बंधु जणुंकाय प्रेमाचे गुलाम बनून गुरूंचीं पदकमलें प्रीतिनें चेपूं लागले.

बार बार मुनि अज्ञा दीन्ही।
रघुबर जाइ सयन तब कीन्ही।

विश्वामित्रांनीं अनेक वेळां आज्ञा केल्यावर रामांनीं जाऊन शयन केलें.

चाँपत चरन लषन उर लाये।
सभय सप्रेम परम सचुपाये।

पुनि पुनि प्रभु कह सोवहु ताता।
पौढे धरि उर पदजलजाता।

लक्ष्मण रामाचे पाय चेपूं लागला. त्यानें भीतभीत ते पाय आपल्या हृदयास लावून अत्यंत आनंदित व्हावें. "बाळ! नीज कीं रे आतां" असें त्यास प्रभु वरचेवर म्हणत, तेव्हां त्याच चरणकमलांचें ध्यान करीत तो निद्रिस्त झाला.

**दो०—उठे लषन निसि बिगत सुनि अरुन-सिखा धुनि कान। गुरु तें पहिलेहि जगतपति जागे राम सुजान ॥ २३१ ॥**

कोंबडा आरवलेला ऐकतांच रात्र संपली म्हणून लक्ष्मण उठला. ज्ञानी विश्वप्रभु रामचंद्रहि गुरूच्या पूर्वींच जागे झाले.

चौ०—सकल सौच करि जाइ नहाये।
नित्य निबाहि मुनिहि सिर नाये।
समय जानि गुरुआयसु पाई।
लेन प्रसून चले दोउ भाई।

सर्व प्रातःकर्में उरकून त्यांनीं स्नानें केलीं, व नित्य कर्में आटोपून गुरूस वंदन केलें. पूजासमय समीप आला असें जाणून गुरूंच्या आज्ञेनें पुष्पें आणण्यास दोघेहि बंधु निघाले.

भूपबाग बर देखेउ जाई।
जहँ बसंतरितु रही लोभाई।
लागे बिटप मनोहर नाना।
बरन बरन बर बेलिबिताना।

त्यांनीं राजाची चिमणबाग पाहिली. तेथें वसंतऋतु लुब्ध होऊन राहत असे. त्या बागेंत अनेक रमणीय वृक्ष व तऱ्हेतऱ्हेच्या उत्तम वेलींचे मंडप लागलेले होते.

नव पल्लव फल सुमन सुहाये।
निज संपति सुररूख लजाये।
चातक कोकिल कीर चकोरा।
कूजत बिहग नटत कल मोरा।

नूतन पल्लवफलपुष्पें आपल्या शोभासंपत्तीनें कल्पवृक्षास देखील लाजवीत होतीं. चातक, कोकिल,

---

१ हा कथाभाग मूळ संस्कृत रामायणांतला नाहीं. तो नाटकवजा आहे, पण त्यांत कवीची कला आहे. आमचा 'मानसहंस' ती दाखवील.

पोपट, चकोर इत्यादि पक्षिगण कूजन करीत असून मोर ऐटींत नृत्य करीत होते.

मध्य बाग सर सोह सुहावा।
मनिसोपान बिचित्र बनावा।
बिमलसलिल सरासिज बहुरंगा।
जलखग कूजत गुंजत भृंगा।

बागेच्या मध्यभागीं एक रमणीय सरोवर होतें. त्यास चित्रविचित्र खड्यांच्या पायऱ्या बांधल्या होत्या. त्यांतलें पाणी स्वच्छ असून त्यांत विविध रंगांचीं कमळें होतीं, आणि जलपक्ष्यांचें कूजित व भृंगांचा गुंजारव चालला होता.

**दो०—बागुतडाग बिलोकि प्रभु हरषे बंधुसमेत। परमरम्य आराम यह जो रामहि सुख देत॥ २३२॥**

ती बाग व तें सरोवर पाहून लक्ष्मणासह रामचंद्र खूष झाले. ज्यानें रामास देखील आराम दिला तेंच खरें आरामस्थान होय.

चौ०—चहुँ दिसि चितइ पूछि मालीगन।
लगे लेन दल फूल मुदितमन।
तेहि अवसर सीता तहँ आई।
गिरिजापूजन जननि पठाई।
संग सखीं सब सुभग सयानी।
गावहिँ गीत मनोहर बानी।

माळ्याला विचारून चोहोंकडे पहात पहात ते पत्रपुष्पें आनंदानें तोडूं लागले. त्याच समयास सीताहि तेथें आली. तिला तिच्या आईनें जगदंबेच्या पूजेसाठीं तेथें पाठविलें होतें. तिच्याबरोबर सुंदर व चतुर अशा तिच्या सर्व सख्या आल्या होत्या त्या मधुर गाणीं गात.

सरसमीप गिरिजागृह सोहा।
बरनि न जाइ देखि मन मोहा।

त्या सरोवराचे कांठीं दुर्गेचें एक अवर्णनीय मंदिर होतें. तें पाहतांच पाहणाराचें मन मोहित होई.

मज्जन करि सर सखिन्ह समेता।
गई मुदितमन गौरिनिकेता।
पूजा कीन्हि अधिक अनुरागा।
निजअनुरूप सुभग बर माँगा।

त्या सरोवरांत स्नान करून सीता आपल्या सख्यांसहवर्तमान आनंदानें मंदिरांत गेली. तिनें अत्यंत भक्तिपूर्वक देवीची पूजा करून आपल्याला अनुरूप असा उत्कृष्ट पति मिळावा म्हणून वर मागितला.

एक सखी सिय संग बिहाई।
गई रही देखन फुलवाई।
तेइ दोउ बंधु बिलोके जाई।
प्रेमाबिबस सीता पहिँ आई।

सीतेच्या सख्यांपैकीं एक सखी तिला सोडून फुलबाग पाहण्यासाठीं गेली होती. तेथें तिनें रामलक्ष्मणांस पाहिलें व प्रेमविवश होत्सातीं ती सीतेकडे परत आली.

**दो०—तासु दसा देखी सखिन्ह पुलक गात जल नयन। कहु कारन निजहरष कर पूछहिँ सब मृदुबयन॥ २३३॥**

तिचें शरीर रोमांचित झालें असून तिच्या नेत्रांत आनंदाश्रु आले आहेत, अशी तिची स्थिति तिच्या मैत्रिणींनीं पाहिली. तेव्हां सर्वजणी तिला हळूच विचारूं लागल्या कीं या एवढ्या आनंदाचें कारण तरी एकदां आम्हांला कळूं दे.

चौ०—देखन बाग कुअँर दुइ आये।
बयकिसोर सब भाँति सुहाये।
स्याम गौर किमि कहउँ बखानी।
गिरा अनयन नयन बिनु बानी।

(ती म्हणाली,) बाग पाहण्यास दोन कुमार आले आहेत. ते बालवयी असून सर्वतोपरी सुंदर आणि श्याम व गौर आहेत. त्यांचें वर्णन तरी मी कसें करणार? कारण वाचेला डोळे नाहींत आणि डोळ्यांना वाचा नाहीं![1]'

सुनि हरषीँ सब सखीं सयानी।
सियहिय अति उतकंठा जानी।
एक कहइ नृपसुत तेइ आली।
सुने जे मुनि सँग आये काली।
जिन्ह निजरूप मोहनी डारी।
कीन्हे स्वबस नगर–नर–नारी।
बरनत छबि जहँ तहँ सब लोगू।
अवसि देखियहि देखन जोगू।

तें ऐकून त्या सर्व चतुर सख्यांना हर्ष झाला.

---

१ विचाराचाच प्रश्न आहे कीं मग खरा पुरावा तरी कोणता? द्रष्टा वक्ता नाहीं आणि वक्ता द्रष्टा नाहीं तर कोणतीहि साक्ष खोटीच समजावयास नको काय? म्हणजे प्रत्यक्ष (direct) पुराव्याची एकंदरींत तारांबळच उडते.

सीतेचें मन फार उत्कंठित झालें आहे असें पाहून एक सखी म्हणाली गडे! मी ऐकिलें आहे कीं, काल विश्वामित्रांचे बरोबर दोन राजकुमार आले आहेत तेच हे! ह्यांनीं तर आपल्या रूपांनीं जणुंकाय मोहनी घालून नगरांतील सर्व स्त्रीपुरुष आपल्या नादीं लाविले आहेत. जिकडे तिकडे सर्व लोक ह्यांच्याच खुबसूरतीचे गोडवे गात आहेत. मला वाटतें, अशा त्या दर्शनीय राजकुमारांना आपणहि अवश्य पाहिलें पाहिजे.

तासु बचन अति सियहि सुहाने।
दरस लागि लोचन अकुलाने।
चली अग्र करि प्रिय सखि सोई।
प्रीति पुरातनि लखइ न कोई।

हें त्या सखीचें बोलणें सीतेस फारच रुचलें. तिचे नेत्र दर्शनोत्सुक झाले. सीता त्याच प्रियसखीस पुढें घालून चालूं लागली. तिचें पुरातन प्रेम कोणासहि ओळखतां आलें नाहीं.

**दो०—सुमिरि सीय नारदबचन उपजी प्रीति पुनीत। चकित बिलोकति सकल दिसि जनु सिसु मृगी सभीत॥ २३४॥**

सीतेला नारदवचनाचें[1] स्मरण होऊन तिच्या मनांत पवित्र प्रेम उत्पन्न झालें. ती चकित होऊन भयभीत झालेल्या बालमृगीप्रमाणें चोहोंकेर पाहूं लागली.

**चौ०—कंकन-किंकिनि-नूपुर-धुनि सुनि।
कहत लषन सन राम हृदय गुनि।
मानहुँ मदन दुंदुभी दीन्ही।
मनसा बिस्वबिजय कहँ कीन्ही।**

कंकण, किंकिणी व नूपुर यांचा ध्वनि ऐकून राम मनांत विचार करून लक्ष्मणास म्हणाले कीं, मला वाटतें, विश्व जिंकण्यासाठीं मदनानें हा मुद्दाम दुदुंभीच वाजविला आहे.

**अस कहि फिरि चितये तेहि ओरा।
सिय-मुख-ससि भये नयन चकोरा।
भये बिलोचन चारु अचंचल।
मनहुँ सकुचि निमि तजे दृगंचल।**

इतकें बोलून पुन्हां रामांनीं तिकडे पाहिलें तों त्यांचे नेत्र सीतेच्या वदनचंद्राचे चकोर बनले! त्यांचे ते सुंदर नेत्र अगदीं उत्पक्ष्म झाले; जणुंकाय संकोचास्तव[1] निमीनें दृग्वस्त्राचा त्याग केला.

**देखि सीयसोभा सुख पावा।
हृदय सराहत बचनु न आवा।
जनु बिरंचि सब निजनिपुनाई।
बिरचि बिस्व कहँ प्रगटि देखाई।**

सीतेचें सौंदर्य पाहून रामास संतोष वाटला व ते मनांत तिच्या सौंदर्याची वाखाणणी करूं लागले; परंतु ते बोलून दाखविण्यास त्यांस शब्द सुचेनात. जणुंकाय ब्रह्मदेवानें तिला घडवून आपल्या सर्व नैपुण्याचें जगांत प्रदर्शनच मांडलें होतें.

**सुंदरता कहँ सुंदर करई।
छबिग्रह दीपसिखा जनु बरई।
सब उपमा कबि रहे जुठारी।
केहि पटतरउँ बिदेहकुमारी।**

ज्याप्रमाणें शोभागृहाचीहि शोभा चिरांगणानें झळकून उठते त्याप्रमाणें सीतेचें सौंदर्य सौंदर्यालाहि सौंदर्यप्रद होतें. सर्वच उपमा कवींनीं उच्छिष्ट करून ठेवल्या आहेत, तेव्हां मी सीतेस उपमावें तरी कसें?

**दो०—सियशोभा हिय बरनि प्रभु आपनि दसा बिचारि। बोले सुचि मन अनुज सन बचन समयअनुहारि॥ २३५॥**

---

१ सीतेस नारदाचा वर होता कीं तिचा पती प्रथम त्याच बागेंत भवानीच्या पूजेसमयीं दृष्टीस पडेल.

१ निमी हा शब्द द्वयर्थी घेऊन रामचंद्रांच्या नेत्र-ताटस्थ्यावर कवीनें उत्प्रेक्षालाघव केलें आहे. निमी म्हणजे पापणी व निमी म्हणजे निमी राजा; हा जनकाचा पूर्वज होय. निमी शब्द निमीराजवाचक घेऊन कवी उत्प्रेक्षा करितात कीं, जणुंकाय निमी राजानें आपल्या मुलीचा ( सीतेचा ) व जामाताचा ( रामाचा ) प्रेम-शृंगारप्रसंग जाणून आपलें पापणी हें स्वस्थान सोडलें. ह्मणून नेत्रांचें निमीलोन्मीलन बंद पडलें.—अशी कथा आहे कीं, एकदां निमी राजानें यज्ञ आरंभून वसिष्ठांस आमंत्रण केलें. परंतु वसिष्ठ इंद्राकडे गेले असल्यामुळें वेळीं आले नाहींत. याचें राजास वैषम्य वाटलें. वसिष्ठ उशीरा आले; पण राजा त्यांस भेटला नाहीं. तेव्हां त्यास वसिष्ठांनीं शाप दिला कीं, तुझें शरीर नष्ट होईल. राजानेंहि वसिष्ठांस उलट तोच शाप दिला. तेव्हां वसिष्ठांनीं दुसरें शरीर धारण केलें. राजासहि त्याच्या पुरोहितानें दुसरें शरीर देण्याचा प्रयत्न केला. त्यावेळीं राजा ह्मणाला मी देहाविरहित मनुष्याच्या पापण्यांवरच वास करीन.

प्रभूंनीं सीतेच्या लावण्याचें मनांत वर्णन करून आणि स्वस्थितीचाहि विचार करून ते शुद्ध अंतःकरणानें लक्ष्मणाजवळ म्हणाले—

चौ०–तात जनकतनया यह सोई।
धनुषजज्ञ जेहि कारन होई।
पूजन गौरि सखीं लेइ आई।
करत प्रकास फिरइ फुलवाई।

बा लक्ष्मणा! जिच्यासाठीं हा धनुर्यज्ञ होत आहे ती जनकसुता हीच होय. हिच्या सख्या हिला दुर्गेच्या पूजेसाठीं घेऊन आल्या आहेत. तीच ही बागेंत फिरून प्रकाश पाडीत आहे.

जासु बिलोकि अलौकिक सोभा।
सहज पुनीत मोर मन छोभा।
सो सब कारन जान बिधाता।
फरकहिँ सुभग अंग सुनु भ्राता।

हिचें लोकोत्तर लावण्य पाहून स्वभावतःच पवित्र अशा माझ्याहि मनाला क्षोभ होत आहे. ह्याचें खरें कारण विधाताच जाणे. लक्ष्मणा! ऐक. माझीं शुभांगें स्फुरण पावत आहेत.

रघुबंसिन्ह कर सहज सुभाऊ।
मनु कुपंथ पगु धरैँ न काऊ।
मोहि अतिसय प्रतीति मन केरी।
जेहि सपनेहु परनारि न हेरी।

रघुवंशीयांचा हा तर प्रकृतिगुणच आहे कीं, त्यांचें मन कुमार्गांत म्हणून कधींहि पाऊल टाकावयाचें नाहीं. ज्यानें स्वप्नांत देखील परस्त्री कशी ती पाहिली नाहीं त्या माझ्या मनासंबंधानें मलाहि पण पूर्ण खात्रीच आहे.

जिन्ह कै लहहिँ न रिपु रन पीठी।
नहिँ लावहिँ परतिय मन डीठी।
मंगन लहहिँ न जिन्ह कै नाहीं।
ते नरबर थोरे जग माहीँ।

रणांत ज्यांची पाठ शत्रूला कधींहि दिसावयाची नाहीं, जे परस्त्रीवर कधींहि दृष्टि टाकावयाचे नाहींत व ज्यांच्याकडून याचकास नकार मिळावयाचाच नाहीं असे नरश्रेष्ठ जगांत विरळ असतात.

**दो०–करत बतकही अनुज सन मन सियरूप लुभान। मुख–सरोज–मकरंद–छबि करइ मधुप इव पान॥२३६॥**

रामचंद्र लक्ष्मणाशीं जरी संभाषण करीत होते तरी त्यांचें मन मात्र सीतेच्या रूपावर लुब्ध होऊन तें तिच्या मुखारविंदाचें मकरंदरूपी सौंदर्य भ्रमराप्रमाणें पान करीत होतें.

चौ०–चितवति चकित चहूँ दिसि सीता।
कहँ गये नृपकिसोर मन चिंता।
जहँ बिलोकि मृग–सावक–नयनी।
जनु तहँ बरिस कमल-सित-स्रेनी।

ते राजकुमार कोठें गेले असावेत अशी चिंता वाटून सीता चकित होत्साती सर्व दिशांकडे पाहूं लागली. ती बालहरिणाक्षी जेथें दृष्टिक्षेप करीत असे तेथें जणुं शुभ्र कमलपंक्तींचा वर्षावच होत होता.

लता ओट तब सखिन लखाये।
स्यामल गौर किसोर सुहाये।
देखि रूप लोचन ललचाने।
हरषे जनु निजनिधि पहिचाने।

तेव्हां लतामंडपाच्या आड असलेले ते श्याम, गौर व सुंदर कुमार सख्यांनीं सीतेला दाखविले. ते पाहून सीतेचे नेत्र आसक्त झाले; जणुंकाय स्वतःची (दुरावलेली) ठेव अचानक मिळाल्याचा त्या नेत्रांना आनंद झाला.

थके नयन रघु-पति-छबि देखे।
पलकन्हिहू परिहरीँ निमेखे।
अधिक सनेह देह भइ भोरी।
सरदससिहि जनु चितव चकोरी।

रघुपतींचें नेत्रसौंदर्य पाहून सीतेचे नेत्र निवले. तिच्या पापण्या मिटेनाशा झाल्या. प्रेमाधिक्यानें तीस देहाची विस्मृति झाली. त्या वेळीं शरच्चंद्राकडे जणुंकाय चकोरीच पाहत आहे असाच तें दृश्य म्हणावयाचें.

लोचनमग रामहिँ उर आनी।
दीन्हे पलककपाट सयानी।
जब सिय सखिन्ह प्रेमबस जानी।
कहि न सकहिँ कछु मन सकुचानीँ।

ती शहाणी अशी कीं तिनें नेत्रमार्गानें रामास हृदयांत कोंडून पापण्यारूप कपाटें लावून घेतलीं. जेव्हां सख्यांनीं सीता प्रेमांत चूर आहे, असें ओळखलें तेव्हांतर ती फारच संकोचली, आणि तिची बोबडी वळली.

**दो०—लताभवन तें प्रगट भये तेहि अव-सर दोउ भाइ। निकसे जनु जुग बिमलविधु जलदपटल बिलगाइ ॥२३७॥**

इतक्यांत ते दोघे बंधु लतामंडपांतून बाहेर पडले; जणुंकाय मेघडंबर वितळून ते दोन निर्मल चंद्रच प्रगट झाले.

चौ०—सौभासीवँ सुभग दोउ बीरा।
नील–पीत–जलजाभ–सरीरा।
मोरपंख सिर सोहत नीके।
गुच्छा बिच बिच कुसुमकली के।

ते दोघेहि वीर सौंदर्याची परमावधि म्हणून अत्यंत मनोहर होते. एकाची नीलमलाप्रमाणें व दुसऱ्याची पीतकमलाप्रमाणें कांति होती. त्यांच्या मस्तकावर सुंदर मयूरपिच्छें आणि मधून मधून पुष्पांच्या कळ्यांचेहि गुच्छ शोभत होते.

भाल तिलक स्रमबिंदु सुहाये।
स्रवन सुभग भूषन छबि छाये।
बिकट भृकुटि कच घूघरवारे।
नवसरोज लोचन रतनारे।
चारु चिबुक नासिका कपोला।
हासबिलास लेत मन मोला।
मुखछबि कहि न जाइ मोहि पाहीँ।
जो बिलोकि बहु काम लजाहीँ।

त्यांच्या ललाटभागीं सुंदर तिलक आणि घर्मबिंदु शोभत. कर्णांतील दैदीप्यमान अलंकारांची कांति गर्द फांकत होती. भोंवया टपोऱ्या व केश कुरळे, नेत्र नूतनकमलाप्रमाणें आरक्त होते. नाक, हनुवटी, आणि गाल यांच्या डौलांत खुबसूरत हास्याची भर पडली. ती मौज चाखणारास स्वतःच्या मनाचें मोल द्यावें लागे. अनेक मदनदेखील जिला पाहून लाजतील अशा त्या मुखश्रीपुढें तर माझी बोबडीच वळते.

उर मनिमाल कंबुकल ग्रीवाँ।
काम–कलभ–कर भुज बलसीवाँ।
सुमनसमेत बामकर दोना।
साँवर कुअँर सखी सुठि लोना।

त्यांच्या वक्षःस्थलावर रत्नमाला झळकत असून त्या उभयतांचा मान शंखाप्रमाणें नितळ होती. त्यांचे बाहु कामकुंजराच्या शुंडप्रमाणें असून अत्यंत बळकट होते. एक सखी म्हणाली, डाव्या हातांत पुष्पांनीं भरलेला द्रोण घेतलेला हा सावळा राजबिंडा तर गडे! फारच खुलून दिसत आहे.

**दो०—केहरिकटि पट पीत धर सुखमा–सील–निधान। देखि भानु-कुल-भूष-नहि बिसरा सखिन्ह अपान ॥ २३८ ॥**

सिंहकटी, पीतवसनधारी व शोभाशीलसागर अशा त्या भानुकुलभूषणास पाहून सर्वच सख्या आपलें देहभान विसरल्या.

चौ०—धरि धीरज एक आलि सयानी।
सीता सन बोली गहि पानी।
बहुरि गौरि कर ध्यान करेहू।
भूपकिसोर देखि किन लेहू।

एक चतुर सखी धैर्यानें सीतेचा हात धरून म्हणाली, अजून तूं गौरीचेंच ध्यान करीत आहेस नों? ह्या राजकुमारास एकदां पाहून कां घेत नाहींस?

सकुचि सीय तब नयन उघारे।
सनमुख दोउ रघुसिंह निहारे।
नखसिख देखि राम कै सोभा।
सुमिरि पितापन मन अति छोभा।
परबस सखिन्ह लखी जब सीता।
भये गहरु सब कहहिँ सभीता।

तेव्हां सीतेनें लज्जेनें डोळे उघडले तों तीस दोघेहि रघुकुलसिंह अगदीं समोरच दिसले. रामचंद्राचें नखशि–खांत सौंदर्य पाहून व आपल्या पित्याच्या पणाचें स्मरण होऊन तिचें मन अत्यंत व्यग्र झालें. सख्यांनीं सीता अगदीं परवश झाली आहे असें पहातांच त्या सर्व भयभीत होऊन म्हणाल्या, किती तरी वेळ निघून गेला बरें!

पुनि आउब एहि बिरियाँ काली।
अस कहि मन बिहँसी एक आली।

फिरून उद्यांहि याच वेळेस आपण येथें येऊं असें म्हणून दुसरी एक सखी आपल्या मनांत हंसली.

गूढ गिरा सुनि सिय सकुचानी।
भयेउ बिलंब मातुभय मानी।
धरि बडि धीर राम उर आने।
फिरि आपनपौ पितुबस जाने।

---

१ सखी हें खोचून बोलत आहे. कारण वस्तुतः सीता रामस्वरूपाचेंच ध्यान करीत होती.

त्या सखीचें तें खोंचून बोललेलें ऐकून सीता ओशाळली, आणि विलंब झाला म्हणून आईची तिला भीतिहि वाटली. परंतु तिनें पुष्कळ धीर धरून रामरूप हृदयांत सांठविलें. पुन्हां तिचें तिलाच वाटलें कीं, आपण तर पित्याच्या स्वाधीन आहोंत!

**दो०—देखन मिस मृग बिहँग तरु फिरइ बहोरि बहोरि। निरखि निरखि रघुबीरछबि बाढ़इ प्रीति न थोरि ॥२३९॥**

मृग, पक्षी, वृक्ष, वगैरे पाहण्याच्या मिषानें ती इकडे तिकडे फिरत वरचेवर रामरूप न्याहाळून पाही, त्यामुळें तर तिच्या प्रेमाला अधिकच भरतें येऊं लागलें.

चौ०—जानि कठिन सिवचाप बिसूरति।
चली राखि उर स्यामलमूरति।

शिवचाप भयंकर अवजड या कल्पनेनें तर सीतेचा नूरच उतरला. रामाची श्यामल मूर्ति हृदयांत ठेवून ती जाऊं लागली.

प्रभु जब जात जानकी जानी।
सुख सनेह सोभा गुन खानी।
परम-प्रेम-मय मृदुमसि कीन्ही।
चारु चित्त भीती लिखि लीन्ही।

सुख, स्नेह, शोभा व गुण यांची केवळ खाणच अशी जानकी जात आहे असें जेव्हां प्रभूंनीं पाहिलें, तेव्हां त्यांनीं आपल्या परमप्रेमरूप मृदु शाईनें सुंदर चित्तरूपी भिंतीवर तिची तसबीर रेखून ठेविली.

गई भवानीभवन बहोरी।
बंदि चरन बोली करजोरी।

सीता फिरून दुर्गेच्या मंदिरांत गेली, आणि दुर्गेस वंदन करून हात जोडून तिचें स्तवन करूं लागली.

जय जय गिरि-बर-राज-किसोरी।
जय महेस-मुख-चंद-चकोरी।
जय गज-वदन-षडानन-माता।
जगतजननि दामिनि-दुति-गाता।
नहिँ तव आदि मध्य अवसाना।
अमितप्रभाव बेद नहिँ जाना।
भव-भव-बिभव-पराभव-कारिनि।
बिस्वबिमोहनि स्व-बस-बिहारिनि।

हे गिरिराजकन्यके! तुझा जयजयकार असो. हे महेशमुखचंद्रचकोरी! तुझा उदो! हे गणेशकार्तिकेय-जननी! जगदंबे! विद्युद्द्युतिगात्रे! तुझा विजय असो. तुला आदि, मध्य आणि अंत नाहीं. तुझा अमित प्रभाव वेदांसहि अतर्क्य आहे. तूं संसाराच्या उत्पत्तीची, वैभवाची व लयाची कर्त्री आहेस. तूं विश्वास विमोहित करणारी असून स्वतंत्र विहरणारी आहेस.

**दो०—पतिदेवता सुतीय महँ मातु प्रथम तव रेख। महिमा अमित न सकहिँ कहि सहस सारदा सेख ॥२४०॥**

श्रेष्ठ अशा पतिव्रता स्त्रियांमध्यें, हे जगदंबे! तूंच अग्रगण्य आहेस. तुझ्या अनंत प्रभावाचा उच्चार करण्यास सहस्रावधि सरस्वती आणि शेष देखील मुखस्तंभ बनतात.

चौ०—सेवत तोहि सुलभ फल चारी।
बरदायिनि त्रिपुरारि पियारी।
देबि पूजि पदकमल तुम्हारे।
सुर नर मुनि सब होहिँ सुखारे।

हे वरदायिनी! त्रिपुरारिप्रिये! तुझी सेवा केली असतां चतुर्विध पुरुषार्थ सुलभ होतात. हे अंबे! तुझ्याच पदकमलाच्या उपासनेनें देव, मानव, मुनी हे सर्व सुखी होत असतात.

मोर मनोरथ जानहु नीके।
बसहु सदा उरपुर सबही के।
कीन्हेउँ प्रगट न कारन तेही।
अस कहि चरन गहे बैदेही।

माझा मनोरथ तुला पूर्ण अवगत आहे, कारण तुझा वास सर्वकाल सर्वांच्या हृदयपुरांत असतो. अतएव, मी आपली वांछा प्रकट केली नाहीं. याप्रमाणें स्तुति करून सीतेनें दुर्गेचे चरण घट्ट धरिले.

बिनय-प्रेम-बस-भई भवानी।
खसी माल मूरति मुसुकानी।
सादर सियप्रसाद सिर धरेऊ।
बोलि गौरि हरषु उर भरेऊ।

सीतेच्या विनयपूर्वक भक्तीनें भवानी प्रसन्न होऊन तिनें हास्य केलें, आणि तिचा हार गळून पडला. तोच भगवतीचा प्रसाद म्हणून सीतेनें आदरपूर्वक शिरावर धरिला. गिरिजा हर्षभरित अंतःकरणानें म्हणाली—

सुनु सिय सत्य असीस हमारी ।
पूजिहि मनकामना तुह्मारी ।
नारदबचन सदा सुचि साचा ।
सो बर मिलिहि जाहि मन राचा ।

सीते ! ऐक. तुझी मनःकामना परिपूर्ण होईलच असा माझा तुला सत्य आशीर्वाद आहे. नारदाचें वचन सदैव शुभ आणि सत्यच असणार. ज्याचे ठिकाणीं तुझें मन रमलें आहे तोच पति तुला मिळेल.

छंद–मन जाहि राचेउ मिलिहि सो बर सहज सुंदर साँवरो । करुनानिधान सुजान सीलसनेह जानत रावरो ॥ एहि भाँति गौरि असीस सुनि सियसहित हिय हरषित अली । तुलसी भवानिहि पूजि पुनि पुनि मुदितमन मंदिर चली॥३२॥

तुझें मन ज्यावर बसलें आहे, तोहि सहज-सुंदर, श्यामल, करुणानिधान व चतुर राजबिंडा तुझें शील व प्रेम जाणून आहे. म्हणून तो तुला मिळणारच. तुलसीदास ह्मणतात, ह्याप्रकारें दुर्गेचा वर ऐकून सीतेसहित सख्या हर्षभरित झाल्या आणि पुनः-पुन्हां भवानीची पूजा करून प्रसन्न अंतःकरणानें राजमंदिरांत निघून गेल्या.

सो॰—जानि गौरि अनुकूल सिय-हिय-हरष न जात कहि । मंजुल–मंगल–मूल बाम अंग फरकन लगे ॥ २९ ॥

गौरी प्रसन्न आहे असें जाणून सीतेस अनिर्वचनीय आनंद झाला व तिचें कोमल वामांग मंगलसूचक रीतीनें स्फुरण पावूं लागलें.

चौ॰–हृदय सराहत सीय लोनाई ।
गुरुसमीप गवने दोऊ भाई ।
राम कहा सब कौसिक पाहीँ ।
सरल सुभाव छुआ छल नाहीँ ।

मनांत सीतेची प्रशंसा करीत, फुलें तोडल्यानंतर रामलक्ष्मण गुरूकडे गेले. तेथें गेल्यावर सरळ स्वभावाच्या निष्कपट रामांनीं सर्व वर्तमान विश्वामित्रांना विदित केलें.

सुमन पाइ मुनि पूजा कीन्ही ।
पुनि असीस दुहुँ भाइन्ह दीन्ही ।
सुफल मनोरथ होहिँ तुम्हारे ।
राम लषन सुनि भये सुखारे ।

तीं पुष्पें घेऊन मुनींनीं पूजा केली; आणि तुमचे मनोरथ परिपूर्ण होतील असा त्या दोघांहि बंधूंस आशीर्वाद दिला. तो ऐकून रामलक्ष्मण संतुष्ट झाले.

करि भोजन मुनिबर बिज्ञानी ।
लगे कहन कछु कथा पुरानी ।
बिगतदिवस गुरुआयसु पाई ।
संध्या करन चले दोउ भाई ।

भोजनोत्तर ते विज्ञानवंत मुनि कांहीं पुराणकथा सांगूं लागले. दिवस मावळल्यावर मुनींची आज्ञा घेऊन दोघेहि बंधु संध्यावंदन करण्यास निघाले.

प्राचीदिसि ससि उयेउ सुहावा ।
सिय–मुख–सरिस देखि सुख पावा ।
बहुरि बिचार कीन्ह मन माहीँ ।
सीय–बदन–सम हिमकर नाहीँ ।

पूर्वदिशेस आल्हादकारक चंद्रमा उगवला होता. तो सीतेच्या मुखासारखा वाटून रामास आनंद झाला पण पुन्हां विचार करितां त्यांस वाटलें कीं, सीतेच्या मुखासारिखा हा चंद्र नव्हे. कारण—

दो॰–जनम सिंधु पुनि बंधु बिष दिन मलीन सकलंकु । सिय–मुख–समता पाव किमि चंद बापुरो रंकु ॥ २४१ ॥

ह्या चंद्राचा बाप क्षारसमुद्र, हालाहल विष ह्याचा भाऊ, हा दिवसा मलिन आणि रात्रीं देखील कलंकितच ( एकंदरींत ह्याचें कुलशील व आकृति सर्वच ब्द. ) हा गरीब बापडा चंद्र त्या सीतेच्या मुखाची सर पावेलच कशी ?

चौ॰–घटइ बढइ बिरहिनि–दुख–दाई ।
ग्रसइ राहु निज संधिहि पाई ।
कोक–सोक–प्रद पंकजद्रोही ।
अवगुन बहुत चंद्रमा तोही ।
बैदेही–मुख–पटतर दीन्हे ।
होइ दोष बड अनुचित कीन्हे ।

बा चंद्रा ! तुला क्षयवृद्धिरूप रोग जडलेले, तूं विरही जनास पोळणारा, संधि साधून राहूदेखील तुला गिळीत असतो, चक्रवाक पक्ष्यांस तूं पीडणारा, सूर्यविकासी कमलांचा तूं द्वेष्टा, एकूण अनेक दुर्गुणांची तूं वखारच आहे. तुझी उपमा जानकीच्या

मुखास दिल्यास अन्याय केल्यासारखें होऊन मोठेंच पातक लागेल.

सिय-मुख-छबि बिधुब्याज बखानी।
गुरु पहिँ चले निसा बडि जानी।
करि मुनि-चरन-सरोज प्रनामा।
आयसु पाइ कीन्ह बिस्रामा।

रामानें सीतेची मुखश्री चंद्राशीं तुलना करून वर्णन केली. रात्र बरीच झाली आहे असें जाणून ते गुरूंकडे गेले आणि गुरुपदकमलांस वंदन करून व त्यांची आज्ञा घेऊन त्यांनीं शयन केलें.

बिगतनिसा रघुनायक जागे।
बंधु बिलोकि कहन अस लागे।
उयेउ अरुन अवलोकहु ताता।
पंकज–लोक–कोक–सुख–दाता।

रात्र संपतांच राम जागृत झाले व लक्ष्मणास पाहून ह्मणूं लागले, बा लक्ष्मणा! हा पहा कमल, लोक आणि चक्रवाक यांना सुखविणारा अरुण उगवला आहे.

बोले लषन जोरि जुग पानी।
प्रभु-प्रभाव-सूचक मृदुबानी।

लक्ष्मण दोन्ही हात जोडून प्रभूंचें सामर्थ्य व्यक्त करणारी अशी मंगल वाणी वदूं लागला.

दो०—अरुनउदय सकुचे कुमुद उडु–गन–
जोति मलीन। तिमि तुम्हार आगमन
सुनि भये नृपति बलहीन॥ २४२॥

अरुणोदय होतांच कुमुदिनी म्लान होतात आणि तारागणांचें तेज फिकें पडतें, तद्वत् आपलें आगमन ऐकतांच सर्व नृपति हतवीर्य झाले आहेत.

चौ०—नृप सब नखत करहिँ उँजियारी।
टारि न सकहिँ चापतम भारी।
कमल कोक मधुकर खगनाना।
हरषे सकल निसा अवसाना।
ऐसेहि प्रभु सब भगत तुह्मारे।
होइहहिँ टूटे धनुष सुखारे।

सर्व राजे नक्षत्रांप्रमाणें आपापल्यापरी लुकलुकत आहेत, तथापि, चापरूपी गाढ अंधकार नाहींसा करण्यास ते समर्थ नाहींत. निशावसान झाल्यामुळें कमलें, चक्रवाक, भृंग आणि नानाप्रकारचे पक्षी यांना हर्ष झाला आहे. प्रभो! ह्याचप्रमाणें आपण धनुष्यभंग केला ह्मणजे आपल्या सर्व भक्तांना आनंदी आनंद होईल.

उयेउ भानु बिनु स्रम तम नासा।
दुरे नखत जग तेज प्रकासा।
रबि निज-उदय-ब्याज रघुराया।
प्रभुप्रताप सब नृपन्ह दिखाया।
तव भुज-बल-महिमा उदघाटी।
प्रगटी धनु बिघटनपरिपाटी।

सूर्य उगवतांच अनायासेंच अंधकार नाहींसा झाला आहे, नक्षत्रें लोपलीं आणि सर्वत्र लख्ख प्रकाश पडला आहे. हे प्रभो! सूर्यानें आपल्या उदयाच्या मिषानें सर्व राजेलोकांपुढें प्रभुप्रतापाचें निदर्शन केलें आहे. त्यानें आपल्या बाहुबलाच्या महिम्याचें उद्घाटन केलें असून आपल्या धनुष्यभंगाच्या निश्चितीचें आविष्करण केलें आहे.

बंधुबचन सुनि प्रभु मुसुकाने।
होइ सुचि सहज पुनीत नहाने।
नित्यक्रिया करि गुरु पहिँ आये।
चरनसरोज सुभग सिर नाये।

लक्ष्मणाची उक्ति ऐकून प्रभूनें किंचित् हास्य केलें. नंतर त्या नित्यपवित्रांनीं स्नानें केलीं व ते शुचिर्भूत झाले. नित्यकर्मे आटोपून ते गुरुसन्निध आले आणि त्यांच्या चरणकमलांवर त्यांनीं आपलीं मस्तकें नमविलीं.

सतानंद तब जनक बोलाये।
कौसिक मुनि पहिँ तुरत पठाये।
जनकबिनय तिन्ह आनि सुनाई।
हरषे बोलि लिये दोउ भाई।

तिकडे जनकानें शतानंदास बोलावून त्यास विश्वामित्राकडे त्वरित पाठविलें. त्याप्रमाणें त्यानें येऊन जनकाची प्रार्थना निवेदन केली. विश्वामित्रांनीं हर्षभरित होऊन उभय बंधूंस बोलावून घेतलें.

दो०—सतानंदपद बंदि प्रभु बैठे गुरु पहिँ
जाइ। चलहु तात मुनि कहेउ तब
पठएउ जनक बोलाइ॥ २४३॥

शतानंदास वंदन करून प्रभु गुरुपाशीं जाऊन बसले. विश्वामित्र म्हणाले, वत्सांनो! जनकानें बोलावणें पाठविलें आहे तरी आपण जाऊं या, आणि—

चौ०–सीयस्वयंवर देखिय जाई।
ईस काहि धौं देइ बडाई।

सीतेच्या स्वयंवरांत ईश्वर कोणास महती देतो तें तरी पाहूं या.

लषन कहा जसभाजन सोई।
नाथ कृपा तव जा पर होई।

लक्ष्मण म्हणाला हे नाथ! ज्यावर आपण कृपा कराल तोच यशाला पात्र होईल.

हरषे मुनि सब सुनि बरबानी।
दीन्ह असीस सबहि सुख मानी।
पुनि मुनि–बृंद–समेत कृपाला।
देखन चले धनुष–मख–साला।

ती लक्ष्मणाची उत्कृष्ट वाणी ऐकून सर्व ऋषींस आनंद झाला, आणि सर्वांनीं प्रसन्न होऊन त्यास आशीर्वाद दिला. नंतर मुनिवृंदासहवर्तमान दयाघन रामचंद्र धनुर्यज्ञशाला पाहण्यास निघाले.

रंगभूमि आये दोउ भाई।
असि सुधि सब पुरबासिन्ह पाई।
चले सकल गृहकाज बिसारी।
बाल जुवान जरठ नर नारी।

यज्ञमंडपांत ते दोघेहि बंधु आले हें वर्तमान नगरांतील सर्व लोकांस कळल्यावर बाल, वृद्ध व तरुण स्त्रीपुरुष घरांतील कामधंदे विसरून सूधे मंडपाकडे वळले.

देखी जनक भीर भइ भारी।
सुचि सेवक सब लिये हँकारी।
तुरत सकल लोगन्ह पहिं जाहू।
आसन उचित देहु सब काहू।

जनकानें चिकार गर्दी झालेली पहातांच आपल्या सर्व सभ्य सेवकांना बोलावून त्यांस आज्ञा केली कीं, तुम्ही त्वरित सर्वांकडे जाऊन त्यांना यथोचित जागीं बसवा.

**दो०–कहि मृदुवचन बिनीत तिन्ह बैठारे नर नारि। उत्तम मध्यम नीच लघु निज निज थल अनुहारि ॥ २४४ ॥**

त्या सेवकांनीं मृदु व नम्र शब्द बोलून उत्तम, मध्यम, नीच व कनिष्ठ अशा स्त्रीपुरुषांस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें बसविलें.

चौ०–राजकुअँर तेहि अवसर आये।
मनहुँ मनोहरता तन छाये।

इतक्यांत रामलक्ष्मणहि आले. तेव्हां असें वाटलें कीं, जणुंकाय सौंदर्याच्या मूर्तीच प्रगटल्या.

गुनसागर नागर बरबीरा।
सुंदर स्यामल–गौर–सरीरा।
राजसमाज बिराजत रूरे।
उडुगन महँ जनु जुग बिधु पूरे।

गुणसागर, चतुर, महावीर, सुंदर, श्याम व गौर शरीरधारी असे ते बंधुद्वय नक्षत्रगणांत जणुं दोन पूर्ण चंद्र तसे राजमंडळांवर आपली छाप पाडूं लागले.

जिन्ह कै रही भावना जैसी।
प्रभुमूरति तिन्ह देखी तैसी।

ज्यांची जशी भावना होती त्याप्रमाणें त्यांना प्रभुमूर्ति दिसली.

देखहिं भूप महा रनधीरा।
मनहुँ बीररस धरे सरीरा।
डरे कुटिल नृप प्रभुहि निहारी।
मनहुँ भयानकमूरति भारी।
रहे असुर छल छोनिप बेखा।
तिन्ह प्रभु प्रगट कालसम देखा।
पुरबासिन्ह देखे दोउ भाई।
नरभूषन लोचन–सुख–दाई।

महारणधीरांना वाटलें कीं मूर्तिमंत वीररसच देहरूपानें अवतरला आहे. कपटी राजे प्रभूला पाहतांच गर्भगळित झाले, कारण त्यांना वाटलें कीं भयानक रसाची ही प्रचंड मूर्तिच आहे. राजवेषांत दडून बसलेल्या राक्षसांना तर प्रभु प्रत्यक्ष काळाप्रमाणें भासले. नगरवासी जनांना ते दोघे बंधु नेत्रांस आनंददेणारे आणि नरजातीस ललामभूत असे दिसले.

**दो०–नारि बिलोकहिं हरषि हिय निज–निज–रुचि अनुरूप। जनु सोहत सृंगार धरि मूरति परमअनूप ॥ २४५ ॥**

स्त्रिया हर्षित अंतःकरणानें आपापल्या आवडीप्रमाणें त्यांजकडे पाहूं लागल्या. त्यांस वाटे कीं, जणुंकाय शृंगाररसच अत्यंत अनुपम देह धारण करून शोभत आहे.

चौ०–बिदुषन प्रभु बिराटमय दीसा।
बहु–मुख–कर–पग–लोचन–सीसा।

पंडितांना प्रभु अनेक मुख, बाहु, चरण, नेत्र आणि मस्तकें यांनीं युक्त असलेल्या विराट्-पुरुषा-प्रमाणें दिसले.

जनकजाति अवलोकहिँ कैसे ।
सजन सगे प्रिय लागहिँ जैसे ।
सहित बिदेह बिलोकहिँ रानी ।
सिसुसम प्रीति न जाइ बखानी ।

जनकाच्या कुटुंबीयांना प्रभु आप्तस्वकीयसे प्रिय वाटूं लागले. राणीसह जनकास तर प्रभूच्या ठिकाणीं अनिर्वचनीय पुत्रप्रेमाचा प्रत्यय येऊं लागला.

जोगिन्ह परम–तत्त्व–मय भासा ।
सांत–सुद्ध–सम–सहज प्रकासा ।
हरिभगतन देखे दोउ भ्राता ।
इष्टदेव इव सब–सुख–दाता ।

योग्यांना रामरूप शांत, शुद्ध, सम, सहजप्रकाश-रूप, परम तत्त्वमय वाटलें. हरिभक्तांना ते उभय बंधु सर्वसुखदायक अशा आपल्या उपास्य देवतेप्रमाणें दिसले.

रामहिँ चितव भाव जेहि सीया ।
सो सनेह सुख नहिँ कथनीया ।
उर अनुभवति न कहि सक सोऊ ।
कवन प्रकार कहइ कबि कोऊ ।

रामास पाहतांच सीतेला जें प्रेम वाटलें, तें कवीच्या वाणीस केव्हांहि अगोचरच, कारण जें प्रेम ती अंतःकरणांत अनुभवीत होती तें खुद्द तीच सांगूं शकेना. तेव्हां इतर कोणत्याहि कवीला तें कसें सांगतां यावें ?

जेहि बिधि रहा जाहि जस भाऊ ।
तेहि तस देखेउ कोसलराऊ ।

अशा प्रकारें ज्याचा जसा भाव तसे त्याला प्रभु दिसले.

**दो०–राजत राजसमाज महँ कोसल–राज–किसोर । सुंदर-स्यामल-गौर-तनु बिस्व–बिलोचन–चोर ॥ २४६ ॥**

आपल्या सुंदर, श्यामल व गौर तनूंनीं अखिल विश्वाचे नेत्र आकर्षित करणारे ते कोशलराजकिशोर राजसमाजांत विराजित झाले.

चौ०–सहज मनोहरमूरति दोऊ ।
कोटि-काम-उपमा लघु सोऊ ।

त्या सहजसुंदर मूर्तिद्वयास कोट्यवधि मदनाची उपमादेखील गौण होईल.

सरद-चंद-निंदक मुख नीके ।
नीरजनयन भावते जी के ।
चितवनि चारु मार-मद-हरनी ।
भावत हृदय जात नहिँ बरनी ।
कलकपोल स्रुतिकुंडल लोला ।
चिबुक अधर सुंदर मृदु बोला ।
कुमुद बंधु-कर-निंदक हाँसा ।
भृकुटी बिकट मनोहर नासा ।
भालबिसाल तिलक झलकाहीँ ।
कच बिलोकि अलि-अवलि लजाहीँ ।
पीत चौतनी सिरन्ह सुहाई ।
कुसुमकली बिच बीच बनाई ।
रेखा रुचिर कंबु कलग्रीवाँ ।
जनु त्रिभुवनसोभा की सीवाँ ।

शरदृतूंतील चंद्रास देखील तुच्छ करणारे त्यांचे ते गोंडस चेहरे, चित्तास प्रसन्न करणारे ते कमलनेत्र, मदनाचाहि मद जिरविणारी, आणि बुद्धीस गम्य पण वाणीस अगम्य अशी ती सुंदर दृष्टि, ते गुलाबी गाल, ते कानांत लटकणारे डूल, ती बाकी हनुवटी, लुसलुशीत ओंठ, तें मृदु भाषण, तें चंद्रासहि लाजविणारें हास्य, ती टपोरी भुंवई, तें लोचदार नाक, तें भव्य कपाळ आणि त्यावरील तो तकाकदार टिळा, ज्यांना पाहून भ्रमरपंक्तिहि लाजेल असे ते केश, मधूनमधून फुलांच्या कळ्या खोंवलेली ती मस्तकावरील पिंवळी चौकोनी टोपी, ती पोटावरील रेखीव त्रिवळी, शंखासारखी नितळ आणि जणुंकाय त्रिभुवनाच्या शोभेची सीमाच अशी ती मान—

**दो०–कुंजर-मनि-कंठाकलित उरन्ह तुल-सिकामाल । वृषभकंध केहरिठवनि बलनिधि बाहु बिसाल ॥ २४७ ॥**

वक्षःस्थलावरील ती तुळशीची माळ आणि तो गजमौक्तिकांचा कंठा, ते वृषोन्नत स्कंध, ती सिंहाची ऐट, शक्तीचें केन्द्र असे ते विशाल बाहु,

---

१ मल्लानामशनिर्नृणां नरवरः स्त्रीणां स्मरो मूर्तिमान् । गोपानां स्वजनो सतां क्षितिभुजां शास्ता स्वपित्रोः शिशुः ॥ मृत्युर्भोजपतेर्विराडविदुषां तत्त्वं परं योगिनां । वृष्णीनां परदेवतेति विदितो रंगंगतः साग्रजः ॥ १ ॥

श्रीमद्भागवत.

चौ०—कटि तूनीर पीत पट बाँधे।
कर सर धनुष बाम बर काँधे।
पीत-जज्ञ-उपबीत सोहाये।
नखसिख मंजु महा छबि छाये।
देखि लोग सब भये सुखारे।
एकटक लोचन टरत न टारे।

तो कंबरेचा पीतांबर आणि भाते, ते हातांतील बाण व डाव्या खांद्यावरील तें भक्कम धनुष्य, तें सुंदर पीतयज्ञोपवीत, असें तें अप्रतिम नखशिखांत लावण्य प्रतिबिंबित झालेलें पाहून सर्व लोक आनंदित झाले. त्यांची नजर त्यांजवर जी एकदा लगटली ती फिरवतां फिरेना.

हरषे जनक देखि दोउ भाई।
मुनि-पद-कमल कहे तब जाई।
करि बिनती निजकथा सुनाई।
रंगअवनि सब मुनिहि देखाई।

उभय बंधूंस पाहून जनकास हर्ष झाला. नंतर त्यानें विश्वामित्राचीं चरणकमलें धरून विनयपूर्वक त्यांस आपली प्रतिज्ञा कथन केली, आणि त्यांना सर्व रंगभूमि दाखविली.

जहँ जहँ जाहिँ कुअँरबर दोऊ।
तहँ तहँ चकित चितव सब कोऊ।
निज निज रुख रामहिँ सब देखा
कोउ न जान कछु मरम बिसेखा।

ते कुमारश्रेष्ठ जिकडे जिकडे जात तिकडे तिकडे लोक थक्क होऊन त्याचेकडे पहातच रहात. आपापल्या रुचीप्रमाणें सर्वांनीं रामास पाहिलें. परंतु विशेषतः त्यांचें मर्म यत्किंचित् देखील कोणाच्याहि लक्षांत आलें नाहीं.

भलि रचना मुनि नृप सन कहेऊ।
राजा मुदित महासुख लहेऊ।

विश्वामित्र जनकास ह्मणाले, रंगभूमीची रचना उत्तम साधली आहे. तेव्हां राजास आनंद होऊन त्यास महत् सौख्य वाटलें.

**दो०—सब मंचन्ह तें मंच एक सुंदर बिसद बिसाल। मुनिसमेत दोउ बंधु तहँ बैठारे महिपाल ॥ २४८ ॥**

सर्वांपेक्षांहि सुंदर, दिव्य आणि भव्य असें एक सिंहासन होतें. त्यांवर राजानें मुनिसमवेत त्या उभयबंधूंस बसविलें.

चौ०—प्रभुहि देखि सब नृप हिय हारे।
जनु राकेस उदय भये तारे।
अस प्रतीति सब के मन माहीँ।
राम चाप तोरब सक नाहीँ।
बिनु भंजेहु भवधनुष बिसाला।
मेलिहि सीय रामउर माला।

ज्याप्रमाणें चंद्रोदय झाला असतां तारे निस्तेज होतात त्याप्रमाणें प्रभूस पाहतांच सर्व राजे निस्तेज झाले. सर्वांच्याच मनाची अशी खात्री झाली कीं, रामांत धनुष्यभंग करण्याची जरी धमक नसली तरी तें विशाल शिवधनुष्य भंगल्यावांचूनहि सीता रामाच्याच गळ्यांत माळ घालील.

अस बिचारि गवनहु घर भाई।
जस प्रताप बल तेज गवाँई।

असेंच असेल तर ( कांहीं राजे म्हणत ) बाबांनो! याचा विचार करून घरीं जाऊं या. कारण येथें राहिल्यानें आपलें यश, प्रताप, बल व तेज आपण गमावणार.

बिहँसे अपर भूप सुनि बानी।
जे अबिबेक अंध अभिमानी।
तोरेहु धनुष ब्याहु अवगाहा।
बिनु तोरे को कुअँरि बियाहा।
एक बार कालहु किन होऊ।
सियहित समर जितब हम सोऊ।

ती वाणी ऐकून अविवेकामुळें अंध व गर्विष्ठ झालेले कांहीं इतर राजे हंसले, आणि म्हणाले, धनुष्यभंग करूनहि जर ( सीतेशीं ) विवाह होण्याची वानवा, तर धनुष्यभंग न करितांहि तिला कोण वरणार ? प्रत्यक्ष काळ कां असेना, परंतु सीतेस्तव त्याच्याशीं देखील झुंज करून आह्मी त्याला लोळवूं.

यह सुनि अपर भूप मुसुकाने।
धरमसील हरिभगत सयाने।

तें ऐकून धर्मशील, हरिभक्त व विवेकी असे इतर राजे हंसले, आणि म्हणाले—

**सो०—सीय बियाहब राम गरब दूरि करि नृपन्ह को। जीति को सक संग्राम दसरथ के रनबाँकुरे ॥ ३० ॥**

तुम्हां सर्व राजांच्या गर्वाला अर्धचंद्र देऊन सीतेस रामचंद्रच वरणार. ह्या दशरथाच्या या रणझुंजारांना युद्धांत जिंकण्यास कोणाची ताकद आहे ?

चौ०—बृथा मरहु जनि गाल बजाई ।
मनमोदकन्हि कि भूख बुताई ।
सिख हमार सुनि परम पुनीता ।
जगदंबा जानहु जिय सीता ।

वल्गना करून उगीच मरूं नका. मनांतल्या मनांत मोदक खाल्ल्यानें भूक शमत नसते. आमचा उपदेश तुमच्या अत्यंत हिताचा आहे. सीता ही साक्षात् जगदंबा आहे अशी आपल्या मनाशीं खुणगांठ बांधा.

जगतपिता रघुपतिहि बिचारी ।
भरि लोचन छबि लेहु निहारी ।
सुंदर सुखद सकल-गुन-रासी ।
ए दोउ बंधु संभु-उर-बासी ।

रामचंद्रास जगत्पिता समजून त्यांचें सुरूप डोळे भरून पाहून घ्या. सुंदर, सुखद व सर्व सद्‌गुणांचें भांडार असे हे उभय बंधु शंभुहृदयांत वास करणारे होत.

सुधासमुद्र समीप बिहाई ।
मृगजल निरखि मरहु कत धाई
करहु जाइ जा कहँ जोइ भावा ।
हम तौ आजु जनमफल पावा ।

परसांतला अमृतसमुद्र टाकून मृगजळ पाहून त्याचे मागें धांवधांवून कां मरतां ? जा ! ज्याला जें वाटेल तें करा. आम्ही तर आज आपल्या जन्माचें सार्थक पावलों.

अस कहि भले भूप अनुरागे ।
रूप अनूप बिलोकन लागे ।
देखहिँ सुर नभ चढे बिमाना ।
बरषहिँ सुमन करहिँ कल गाना ।

असें बोलून ते सद्भक्त राजे रामाचें अनुपम स्वरूप प्रीतिपूर्वक पाहून तल्लीन झाले. देव विमानांत बसून आकाशांतून पाहूं लागले आणि मधुर गीतें गाऊन पुष्पवृष्टि करूं लागले.

**दो०—जानि सुअवसर सीय तब पठई जनक बोलाइ । चतुरसखी सुंदर सकल सादर चलीँ लेवाइ ॥ २४९ ॥**

तेव्हां योग्य अवसर जाणून जनकानें सीतेस बोलावणें पाठविलें. त्याप्रमाणें तिच्या सर्व सुंदर व चतुर सख्या तिला तिच्या इतमामानें घेऊन आल्या.

चौ०—सियसोभा नहिँ जाइ बखानी ।
जगदंबिका रूप-गुन-खानी ।
उपमा सकल मोहि लघु लागी ।
प्राकृत-नारि-अंग-अनुरागी ।
सीय बरनि तेहि उपमा देई ।
कुकबि कहाइ अजस को लेई ।

सीता साक्षात् रूपगुणखनी जगदंबाच असल्यामुळें तिचें सौंदर्य वर्णन करणें शक्य नाहीं. तिच्या संबंधानें मला सर्वच उपमा गौण वाटत आहेत. कारण त्या उपमा प्राकृत स्त्रियांच्या अंगाशींच संलग्न झाल्या आहेत. अतएव सीतेच्या वर्णनाकडे देखील त्याच उपमा योजून 'झब्बू कवी' म्हणवून घेण्याचें अपयश कोणीं पदरीं बांधावें ?

जौँ पटतरिय तीय महँ सीया ।
जग अस जुबति कहाँ कमनीया ।
गिरा मुखर तनुअरध भवानी ।
रति अतिदुखित अतनु पति जानी ।
बिष बारुनी बंधु प्रिय जेही ।
कहिय रमासम किमि बैदेही ।

सीतेस स्त्रियांपैकींच जर उपमा द्यावी तर ब्रह्मांडांत तरी अशी रमणीय युवती आहे कोठें ? (कारण) सरस्वती वाचाळ, पार्वती (शिवाच्या अर्धांगीं असल्यामुळें) अर्धतनु, रती देहविरहित तिचा पती म्हणून अत्यंत दुःखी आणि लक्ष्मी विष आणि मदिरा या बंधुभगिनींचे लळे पुरविणारी, एकंदरींत कोणाची तरी उपमा जानकीला कशी देतां येईल ?

जौँ छबि-सुधा-पयो-निधि होई ।
परम-रूप-मय कच्छप सोई ।
सोभा रजु मंदरु सिंगारु ।
मथइ पानिपंकज निज मारू ।

सौंदर्य हाच सुधासमुद्र, पराकाष्ठेचें लावण्य हाच कच्छप, शोभा ही रज्जू, शृंगार हा मंदराचल, हें जर संभवेल आणि कामदेव जर स्वहस्तकमलानें मंथन करील—

**दो०—एहि बिधि उपजइ लच्छि जब सुंदरता-सुख-मूल । तदपि सकोचसमेत कबि कहहिँ सीय सम तूल ॥ २५० ॥**

व अशा रीतीनें सौंदर्यसुखमूल अशी नवीन लक्ष्मी जेव्हां निर्माण होईल तेव्हां ती कदाचित् सीतेच्या तुलनेला योग्य ठरेल हेंदेखील कवीस भीतभीतच म्हणतां येईल.

चौ०—चली संग लइ सखी सयानी।
गावति गीत मनोहरबानी।

मधुर स्वरानें गाणीं गात सीतेच्या चतुर सख्या तिला बरोबर घेऊन चालल्या.

सोह नवलतनु सुंदर सारी।
जगतजननि अतुलित छबि भारी।
भूषन सकल सुदेस सुहाये।
अंग अंग रचि सखिन्ह बनाये।
रंगभूमि जब सिय पगु धारी।
देखि रूप मोहे नर नारी।

जिच्या अभिनव तनूवर उंची पातळ शोभत आहे, व सख्यांनीं सर्वांगावर नीटनेटकेपणानें उत्कृष्ट अलंकार घालून जिचा शृंगार केला आहे अशा त्या अनुपमकांति जगन्माता जानकीनें जेव्हां रंगभूमवर पाय ठेविला तेव्हां तिचें रूप पाहून स्त्रीपुरुष छक् झाले.

हरषि सुरन्ह दुंदुभी बजाई।
बरषि प्रसून अपछरा गाई।

तेव्हां देवांनीं हर्षित होऊन दुंदुभी वाजविल्या, आणि अप्सरा गान करूं लागल्या.

पानिसरोज सोह जयमाला।
अवचट चितये सकल भुआला।

तिच्या हस्तकमलांत जयमाला शोभत होती. तिनें सर्व राजांकडे उगीच किंचित पाहिलेसें केलें.

सीय चकितचित रामहि चाहा।
भये मोहबस सब नरनाहा।

सीतेची इच्छा रामास पाहण्याची होती. ( परंतु राम एकाएकीं न दिसल्यामुळें ) ती मनांत चकित झाली. इकडे सर्व राजांना मात्र भुरळ पडली.

मुनिसमीप देखे दोउ भाई।
लगे ललकि लोचन निधि पाई।

मुनिसमवेत ते दोघे बंधु बसले होते. सीतेच्या नेत्रांची ती ठेव सांपडतांच ते तिजवरच अनुरक्त होऊन तेथेंच गुंगून राहिले.

**दो०—गुरु-जन-लाज समाज बड देखि सीय सकुचानि। लगी बिलोकन सखिन्ह तन रघुबीरहि उर आनि॥ २५१॥**

गुरुजनांच्या लाजेमुळें आणि मोठा समाज पाहून सीतेस संकोच वाटला. तेव्हां ती हृदयांतच रघुवीरास आणून ती आपल्या सखीजनांकडे पाहूं लागली.

चौ०—रामरूप अरु सियछबि देखी।
नरनारिन्ह परिहरीं निमेखी।
सोचहिँ सकल कहत सकुचाहीँ।
बिधि सन बिनय करहिँ मन माहीँ।

रामसीतेचें लावण्य पाहतांच स्त्रीपुरुषांच्या नेत्रांनीं निमीलोन्मीलन सोडलें. सर्वच चिंतातुर झाले, परंतु ते बोलून दाखविण्यास संकोचून विधात्याची मनांतल्या मनांतच प्रार्थना करूं लागले.

हरु बिधि बेगि जनकजडताई।
मति हमार असि देहि सुहाई।
बिनु बिचार पन तजि नरनाहू।
सीय राम कर करइ बियाहू।
जग भल कहिहि भाव सब काहू।
हठ कीन्हे अंतहु उर दाहू।

हे विधात्या! जनकाचें बुद्धिमांद्य सत्वर हरण करून त्यास आमच्या सारखीच अशी उत्कृष्ट बुद्धि दे कीं जेणेंकरून राजा अगदीं विचार न करितां आपला पण सोडील आणि सीतारामाचा विवाह करील. अशानें जगदेखील त्यास भलेच म्हणेल, आणि सर्वांनाच तें कृत्य पसंत पडेल. तो जर हट्टासच पेटेल तर शेवटीं त्याला मनांत पश्चात्तापच करावा लागेल.

एहि लालसा मगन सब लोगू।
बर साँवरो जानकी जोगू।

हा सांवळाच वर जानकीस योग्य आहे, या एकाच रंगांत सर्व लोक दंग होते.

तब बंदीजन जनक बोलाये।
बिरदावली कहत चलि आये।
कह नृप जाइ कहहु पन मोरा।
चले भाट हिय हरष न थोरा।

नंतर जनकानें बंदीजन बोलाविले, व त्याप्रमाणें ते ब्रीदावळीचा उच्चार करीत आले. त्यांस राजानें आज्ञा केली कीं जा आणि माझा पण जाहीर करा. तेव्हां ते मोठ्याच हिरारीनें निघाले.

**दो०—बोले बंदी बचनबर सुनहु सकल महिपाल। पन बिदेह कर कहहिँ हम भुजा उठाइ बिसाल॥ २५२॥**

बंदीजन योग्य शब्दांनीं म्हणाले, अहो ! सर्व महीपाल हो ! आह्मी हीं विशाल भुजा वर करून राजा विदेहाचा पण जाहीर करीत आहों. तो आपण श्रवण करावा.

चौ०–नृप–भुज बलु–बिधु सिवधनु राहू ।
गरुअ कठोर बिदित सब काहू ।
रावन बान महाभट भारे ।
देखि सरासन गवहिँ सिधारे ।

नृपाच्या बाहुबलरूप चंद्राला हें शिवधनुष्य राहूच समजा.तें अत्यंत जड व प्रचंड आहे हें सर्वांना विदितच आहे. रावण,बाणासुर वगैरे गण्य बलाढ्य योध्यांनीं देखील हें धनुष्य पहातांच आपापल्या गांवची वाट सुधरली.

सोई पुरारिकोदंड कठोरा ।
राजसमाज आजु जेइ तोरा ।
त्रि–भुवन–जय–समेत बैदेही ।
बिनहिँ बिचार बरइ हठि तेही ।

तेंच हें कठोर शिवधनुष्य राजसमाजांत जो तोडील त्यास त्रिभुवनविजयासहित ही वैदेही कसलाहि विचार न करितां संतोषानें माळ घालील.

सुनि पन सकल भूप अभिलाषे ।
भट मानी अतिसय मन माषे ।
परिकर बाँधि उठे अकुलाई ।
चले इष्टदेवन्ह सिरु नाई ।
तमकि ताकि तकि सिवधनु धरहीँ ।
उठइ न कोटि भाँति बल करहीँ ।

हा पण ऐकतांच सर्वच राजे हुरळले परंतु त्यांत जे घमेंडखोर आणि आपल्या पराक्रमाची ऐट मिरविणारे होते ते मात्र कंबर कसून अटीतटीनें उठले, आणि इष्टदेवतेस नमस्कार करून पुढें सरसावले. त्यांनीं आवेशाचा आव घालून आणि ऐटीनें न्याहाळून पाहून शिवचापावर हात घातला आणि कोट्यवधी प्रकारांनीं शक्ति लढविली. तथापि, तें चाप उचलेचना.

जिन्ह के कछु बिचार मन माहीँ ।
चापसमीप महीप न जाहीँ ।

ज्यांच्या मनांत कांहीं तरी विचारशक्ति होती ते राजे त्या धनुष्याजवळ देखील गेले नाहींत.

**दो०–तमकि धरहिँ धनु मूढ नृप उठइ न चलहिँ लजाइ । मनहुँ पाइ भट-बाहु-बल अधिक अधिक गरुआइ ॥२५३॥**

ते मूर्ख राजे उगीचच आविर्भाव आणून धनुष्य उचलण्याची धडपड करीत, व तें उचलतां आलें नाहीं ह्मणजे लाजून परत जात. जणूंकाय असें वाटे कीं, त्या वीरांचें बाहुबल हिरावून घेऊन तें धनुष्य अधिकाधिकच जड होत होतें.

चौ०–भूप सहसदस एकहिँ बारा ।
लगे उठावन टरइ न टारा ।
डगइ न संभुसरासन कैसे ।
कामीबचन सतीमन जैसे ।

दहा सहस्र राजे ते धनुष्य उचलण्यासाठीं एकदम भिडले, तरीदेखील तें हलतां हलेना. कामी पुरुषांच्या लघळपणानें जसें सतीचें मन चंचल होत नाहीं तद्वत् शिवचाप त्यांच्यानें हलेना.

सबनृप भये जोग उपहासी ।
जैसे बिनु बिराग संन्यासी ।
कीरति बिजय बीरता भारी ।
चले चापकर बरबस हारी ।
श्रीहत भये हारि हिय राजा ।
बैठे निज निज जाइ समाजा ।

वैराग्यहीन संन्याशाप्रमाणें ते सर्व राजे उपहासास्पद ठरले. त्यांनीं आपली थोर कीर्ति, विजय, आणि शौर्य बळेंच त्या चापास वाहून ते परत फिरले. त्या राजांच्या मनांचे मनोरे ढासळल्यामुळें ते काळेठिक्कर पडले, आणि आपापल्या जमावांत जाऊन बसले.

नृपन्ह बिलोकि जनक अकुलाने ।
बोले बचन रोष जनु साने ।
दीप दीप के भूपति नाना ।
आये सुनि हम जो पन ठाना ।
देव दनुज धरि मनुजसरीरा ।
बिपुलबीर आये रनधीरा ।

त्या राजांकडे पाहून जनक चिडला, आणि त्वेषानें ह्मणाला, मी जो पण ठाणला तो ऐकून द्वीपांतरींचे अनेक राजे येथें आले आहेत. ह्या मंडळींत देव आणि दैत्य देखील मनुष्यरूप धारण करून बसले आहेत. तसेच रणधीर ह्मणविणारे असेहि पुष्कळच वीर जमले आहेत.

**दो०–कुअँरि मनोहर बिजय बडि कीरति**

**अतिकमनीय । पावनिहार बिरंचि जनु रचेउ न धनुदमनीय ॥ २५४ ॥**

ह्या धनुष्याचा भंग करून मनोहर कुमारी, दिगंत विजय आणि अतिसंस्पृहणीय अशी कीर्ति ह्यांची जोड करून घेणारा जणुंकाय ब्रह्मदेवानें कोणी निर्माणच केलेला नसावा कीं काय ?

चौ०—कहहु काहि यह लाभ न भावा ।
काहु न संकरचाप चढावा ।
रहउ चढाउब तोरब भाई ।
तिल भरि भूमि न सके छुडाई ।

शिवचाप एकानें देखील चढविलें नाहीं. म्हणून म्हणतों कीं कोणाला हा लाभ आवडला नसेल तर तसें सांगा. भाई हो ! चाप चढविणें आणि तोडणें तर बाजूलाच राहिलें; परंतु आपणांस तें जमिनीपासून तिळभर देखील सोडवितां येऊं नये !

अब जनि कोउ माखइ भट मानी ।
बीरविहीन मही मैं जानी ।
तजहु आस निज–निज–गृह जाहू ।
लिखा न बिधि बैदेहिबिबाहू ।

इतःपर तरी कोणी स्वतःस वीर समजून प्रौढी मिरवूं नये. ही पृथ्वी निर्वीर झाली अशी माझी खाली झाली आहे. आतां आशा सोडा आणि आपापल्या घरचा मार्ग धरा. सीतेच्या प्राक्तनीं विवाहच लिहिलेला दिसत नाहीं.

सुकृत जाइ जौं पन परिहरऊँ ।
कुअरि कुआँरि रहउ का करऊँ ।
जौं जनतेउँ बिनु भट भुबि भाई ।
तौ पन करि होतेऊँ न हँसाई ।

जर मी आपली प्रतिज्ञा सोडीन तर माझ्या सुकृतावर विरजण पडेल. आतां कन्या कुमारी राहील त्याला माझा काय इलाज ! अहो ! ही पृथ्वीच निःपौरुष आहे असें जर मी जाणलें असतें तर प्रतिज्ञा करून हें असें हंसें करूनच घेतलें नसतें.

जनकबचन सुनि सब नरनारी ।
देखि जानकिहि भये दुखारी ।

जनकाचें भाषण ऐकतांच सर्व स्त्रीपुरुष जानकीकडे पाहून तळमळूं लागले.

माखे लषन कुटिल भइँ भौंहे ।
रदपट फरकत नयन रिसौंहें ।

तें जनकाचें वचन श्रवण करतांच लक्ष्मणाची भृकुटि त्वेषानें चढली, ओंठ स्फुरण पावूं लागले, आणि नेत्र क्रोधानें आरक्त झाले.

**दो०–कहि न सकत रघु–बीर–डर लगे बचन जनु बान । नाइ राम-पद-कमल सिर बोले गिरा प्रमान ॥ २५५ ॥**

जनकाचें वचन त्यास बाणासारखें झोंबलें. परंतु रामाच्या भीतीनें त्यास बोलण्याची छाती होईना. अखेरीस त्याला राहवेना, तेव्हां रामपदकमलीं वंदन करून तो समयोचित भाषण करूं लागला.

चौ०–रघुबंसिन्ह महँ जहँ कोउ होई ।
तेहि समाज अस कहइ न कोई ।
कही जनक जसि अनुचितबानी ।
बिद्यमान रघु-कुल-मनि जानी ।

रघुकुलमुगुटमणी प्रत्यक्ष विद्यमान आहे हें जाणूनहि राजा जनकानें ज्या प्रकारची अभद्र वाणी उच्चारली तशी वाणी जेथें म्हणून कोणीहि रघुवंशीय असेल अशा समाजांत कोणीहि देखील उच्चारणार नाहीं.

सुनहु भानु-कुल-पंकज-भानू ।
कहउँ सुभाव न कछु अभिमानू ।
जौं तुम्हार अनुसासन पावउँ ।
कंदुक इव ब्रह्मांड उठावउँ ।
काँचे घट जिमि डारउँ फोरी ।
सकउँ मेरु मूलक इव तोरी ।
तव प्रतापमहिमा भगवाना ।
का बापुरो पिनाक पुराना

हे भानुकुलकमलभानो ! ऐका. मी स्वाभाविक बोलत आहे, त्यांत अभिमानाचा लवलेशहि नाहीं. जर आपली आज्ञा मिळेल तर हें ब्रह्मांड मी चेंडूप्रमाणें उचलून तें कांचेच्या घड्याप्रमाणें फोडून टाकीन, व मेरुपर्वतदेखील कमलनालाप्रमाणें चिरडून टाकीन. हे भगवन् ! आपल्या प्रतापबलापुढें ह्या बापड्या कुचक्या पिनाकाची कथा ती काय ?

नाथ जानि अस आयसु होऊ ।
कौतुक करउँ बिलोकिय सोऊ ।
कमलनाल जिमि चाप चढावउँ ।
जोजन सत प्रमान लेइ धावउँ ।

हें जाणून प्रभूंनीं आज्ञा करावी म्हणजे मी एक सहज मौज करून दाखवितों ती आपण पहावी. कमलाच्या

देंठाप्रमाणें हें शिवचाप मीं चढावितों, आणि तें शतयोजनपर्यंत घेऊन धांवतों.

**दो०–तोरउँ छत्रकदंड जिमि तव प्रतापबल नाथ। जौँ न करउँ प्रभु-पद-सपथ कर न धरउँ धनु भाथ॥ २५६॥**

हे स्वामिन्! आपल्या प्रतापबलानें ह्या चापाचे छत्रकाच्या देठाप्रमाणें (पावसाळ्यांत उगविणारी छत्रीच्या आकाराची शुभ्र वनस्पति) तुकडे तुकडे करून टाकतों. मी प्रभुपदाची शपथ घेऊन सांगतों कीं, हें जर माझ्या हातून घडलें नाहीं, तर मी फिरून हातांत धनुष्य धरणारच नाहीं.

चौ०–लषन सकोप बचन जब बोले।
डगमगानि महि दिग्गज डोले।
सकल लोक सब भूप डेराने।
सिहहिय हरष जनक सकुचाने।

अशा प्रकारें क्रोधयुक्त होऊन जेव्हां लक्ष्मण बोलूं लागला तेव्हां पृथ्वी डळमळूं लागली, दिग्गजांस कांपरें भरलें, आणि सर्व लोकांना आणि भूपालांना धडकी भरली. जनकास ओशाळल्यासारखें झालें, परंतु सीतेचें मन मात्र आनंदानें गुदगुदलें.

गुरु रघुपति सब मुनि मन माहीँ।
मुदित भये पुनि पुनि पुलकाहीँ।
सयनहिँ रघुपति लषन निवारे।
प्रेमसमेत निकट बैठारे।

गुरु विश्वामित्र, रामचंद्र आणि सर्व मुनी हे हृदयांत हर्षित होऊन वारंवार रोमांचित होऊं लागले. रामांनीं खुणेनेंच लक्ष्मणास मना करून प्रेमपूर्वक जवळ बसविलें.

बिस्वामित्र समय सुभ जानी।
बोले अति–सनेह–मय बानी।
उठहु राम भंजहु भवचापा।
मेटहु तात जनकपरितापा।

तो अवसर योग्य जाणून विश्वामित्र अत्यंत प्रेमानें म्हणाले, बा रामा! ऊठ आणि भवचापाचा भंग करून जनकाच्या चिंतेचें काहूर दूर सार कीं.

सुनि गुरुबचन चरन सिरु नावा।
हरष बिषाद न कछु उर आवा।
ठाढ भये उठि सहज सुभाये।
ठवनि जुबा मृगराज लजाये।

गुरूंची आज्ञा ऐकतांच रामांनीं त्यांचे चरणीं मस्तक ठेविलें. रामाचे मनांत हर्षविषाद कांहीं एक वाटला नाहीं. अगदीं सहज व स्वाभाविकपणें ते उठून उभे राहिले, तथापि त्यांची ऐट सिंहाच्याहि छाव्यास लाजवीत होती.

**दो०–उदित उदय–गिरि–मंच पर रघुबर बालपतंग। बिगसे संतसरोज सब हरषे लोचनभृंग॥ २५७॥**

सिंहासनरूप उदयाचलावर रघुपतिरूप बालसूर्य उदय पावतांच संतरूपीं कमलें विकसित होऊन त्यांवरील सर्व लोचनरूपी भृंग हर्षित झाले.

चौ०–नृपन्ह केरि आसा निसि नासी।
बचन नखत अवली न प्रकासी।
मानी महिप कुमुद सकुचाने।
कपटी भूप उलूक लुकाने।

राजे लोकांची आशारूप निशा नष्ट होऊन त्यांच्या प्रलापरूप नक्षत्रमाळेची लुकलुक पूर्ण मावळली. अभिमानी भूपतिरूप (चंद्रविकासिनीं) कमलें कोमेजलीं आणि कपटी भूपरूप उलूक जागच्याजागींच दडले.

भये बिसोक कोक मुनि देवा।
बरषहिँ सुमन जनावहिँ सेवा।
गुरुपद बंदि सहित अनुरागा।
राम मुनिन्ह सन आयसु माँगा।

मुनिदेवरूप चक्रवाकपक्षी शोकरहित होऊन पुष्पवृष्टिरूप सेवा करूं लागले. रामांनीं गुरुपदीं प्रेमयुक्त वंदन करून ऋषिमंडळींचीहि आज्ञा मागितली.

सहजहिँ चले सकल–जग–स्वामी।
मत्त–मंजु–बर–कुंजर–गामी।

भरज्वान, मस्त आणि ऐटदार अशा गजराजांप्रमाणें गमनशील असा तो अखिल ब्रह्मांडाचा स्वामी सहजगत्या रेखीव पैऱ्यांनीं बढूं लागला.

चलत राम सब पुर–नर-नारी।
पुलक–पूरि–तन भये सुखारी।
बंदि पितर सब सुकृत सँभारे।
जौँ कछु पुन्य प्रभाव हमारे।
तौ सिवधनु मृनाल की नाईँ।
तोरहिँ राम गनेस गोसाईँ।

राम चालत असतां नगरवासी सर्व स्त्रीपुरुषांचे देह रोमांचपूर्ण होऊन ते हर्षित झाले. पितरांस वंदन करून आणि सर्व सुकृतांचें स्मरण करून ते म्हणाले, जर आमच्या पुण्याईचा कांहीं प्रभाव असेल तर, हे प्रभो गजानना ! कमलनालाप्रमाणें राम शिवचापाचा भंग करोत.

**दो०–रामहिँ प्रेम समेत लखि सखिन्ह समीप बोलाइ । सीतामातु सनेहबस बचन कहइ बिलखाइ ॥ २५८ ॥**

रामाकडे प्रेमयुक्त पाहून सीतेची माता स्नेहानें गजबजून गडबडली. तिनें सख्यांना जवळ बोलावून त्यांना काकुळतीनें झटलें,

चौ०–सखि सब कौतुक देखनिहारे ।
जेउ कहावत हितू हमारे ।
कोउ न बुझाइ कहइ नृप पाहीँ ।
ए बालक अस हठ भल नाहीँ ।

सख्यांनो ! जे आमचे हितू झणवितात तेदेखील कसे तमासगीर बनले आहेत पहा. कोणी एक देखील महाराजांना सल्ला सांगत नाहीं कीं, हें अगदींच लहान बालक म्हणून हा असला गहजब बरा नव्हे.

रावन बान छुआ नहिँ चापा ।
हारे सकल भूप करि दापा ।
सो धनु राज–कुअँर–कर देहीँ ।
बालमराल कि मंदर लेहीँ ।

रावण, बाणासुरासारखे देखील या धनुष्यास शिवले नाहींत. सर्व राजांनींहि शिकस्त करून माघार घेतली, आणि असलें हें चाप ह्या राजकुमाराच्या हातीं देणार ? बालहंस म्हणे मंदराचल उचलणार होय ?

भूपसयानप सकल सिरानी ।
सखि बिधिगति कछु जाति न जानी ।

एकंदरीत राजांच्या अक्कलेचें वाटोळें झालें आहे. सख्यांनो ! ही तरी एक दैवगतीच झणावी कीं बुद्धि आणि वाणी यांना येथें वावच नाहीं.

बोली चतुरसखी मृदु बानी ।
तेजवंत लघु गनिय न रानी ।
कहँ कुंभज कहँ सिंधु अपारा ।
सोखेउ सुजस सकलसंसारा ।
रबिमंडल देखत लघु लागा ।
उदय तासु त्रि–भुवन–तम भागा ।

एक चतुर सखी अदबीनें हळूच झणाली, राणीसाहेब ! तेजस्विता वयावर नाहीं. कोठें अगस्ति आणि कोठें अपार समुद्र ! परंतु अगस्ति ऋषींनें तो कोरडा ठणठणीत करून सोडला आणि सर्व जगांत उत्कृष्ट कीर्ति गाजविली. ज्याचा उदय होतांच त्रिभुवनांतील काळोख लयाला जातो त्या सूर्याचें बिंब तरी दिसण्यांत चिमुकलेंच दिसतें.

**दो०–मंत्र परमलघु जासु बस बिधि हरि हर सुर सर्ब । महा–मत्त–गज–राज कहँ बस कर अंकुस खर्ब ॥ २५९ ॥**

ब्रह्मा, विष्णु, महेश वगैरे सर्व देव जेणेंकरून वश होतात, ते मंत्र तरी अगदीं सूत्रवत् असतात. मदोन्मत्त झालेल्या गजराजास वठणीवर आणणारा अंकुशहि पण छोटेखानीच असतो कीं.

चौ०–काम कुसुम–धनु–सायक लीन्हे ।
सकल भुवन अपने बस कीन्हे ।
देबि तजिय संसय अस जानी ।
भंजब धनुष राम सुनु रानी ।

कामदेवाचे धनुष्यबाण देखील फुलांचेच पण त्यानें सर्व त्रिभुवन आपल्या मुठींत आणून सोडलें आहे. राणीसाहेब ! हें जाणून आपण निश्चिंत असा आणि ऐकून ठेवा कीं रामच धनुष्य तोडणार.

सखीबचन सुनि भइ परतीती ।
मिटा बिषाद बढी अतिप्रीती ।

तें सखिवचन ऐकून राणीस विश्वास वाटला, व तिचा विषाद विरघळून तिला प्रेमाचें भरतें आलें.

तब रामहिँ बिलोकि बैदेही ।
सभय हृदय बिनवति जेहि तेही ।

त्या वेळीं रामाकडे पाहून सीताहि भयभीत झाली, आणि ती ज्या त्या देवाचा मनांत धांवा करूं लागली.

मनहीँ मन मनाव अकुलानी ।
होउ प्रसन्न महेस भवानी ।
करहु सुफल आपन सेवकाई ।
करि हित हरहु चापगरुआई ।

मनांतल्या मनांत काकुळतीनें ती स्तवन करूं लागली. हे महेशभवानींनों ! मजवर प्रसन्न व्हा,

आणि मी केलेल्या सेवेचें सार्थक करा. माझें अभीष्ट चिंतून ह्या धनुष्याचा भार हलका करा.

गननायक बरदायक देवा ।
आजु लगे कीन्हेउँ तव सेवा ।
बार बार सुनि बिनती मोरी ।
करहु चापगरुता अतिथोरी ।

हे वरदायका ! प्रभो गणनायका ! आजवर मी तुझी सेवा केली. माझी वारंवार प्रार्थना ऐकून चापाच्या भाराचा खुर्दा उडवून टाक.

**दो०–देखि देखि रघु–बीर–तन सुर मनाव धरि धीर। भरे बिलोचन प्रेमजल पुलकावली सरीर ॥ २६० ॥**

रामाकडे पुनःपुनः पाहून व देवांचा स्तव करून सीता आपल्या मनाला धीर देई. तरीहि तिचे नेत्र प्रेमाश्रूंनीं डवडवून तिच्या शरीरावर रोमांच थरारत.

चौ०–नीके निरखि नयन भरि सोभा ।
पितु पनु सुमिरि बहुरि मन छोभा ।

तें रूप चांगलें डोळे भरून पाहून फिरून पित्याच्या पणाचें स्मरण होतांच तिचें मन कासावीस होई.

अहह तात दारुनहठ ठानी ।
समुझत नहिँ कछु लाभ न हानी ।
सचिव सभय सिख देइ न कोई ।
बुधसमाज बड अनुचित होई ।

हर हर ! बाबा ! आपण हा अति दारुण असा पण मांडला आहे. लाभ आणि हानि कांहींच आपणांस कळेनासें झालें आहे. हे मंत्री भ्याड म्हणून खरी सल्ला कोणीच देत नाहीं. पंडितांच्या सभेंत हा मोठाच अपस्मार होत आहे.

कहँ धनु कुलिसहु चाहि कठोरा ।
कहँ स्यामल मृदुगात किसोरा ।
बिधि केहि भाँति धरउँ उरधीरा ।
सिरिस–सुमन–कन बेधिय हीरा ।

वज्राहूनहि अत्यंत कठोर असें हें धनुष्य कोठें आणि ही सावळी सुकुमार कुमारमूर्ति कोठें ? हे देवा ! मी कोणत्या प्रकारें तरी आतां मन घट्ट करावें ? शिरीषपुष्पाच्या कळीनें हिऱ्याचा वेध का करावयाचा ?

सकलसभा कै मति भइ भोरी ।
अब मोहि संभु–चाप गति तोरी ।

निजजडता लोगन्ह पर डारी ।
होहु हरुअ रघुपतिहि निहारी ।

सर्वच सभेच्या बुद्धीचें दिवाळें वाजलें ! बा शंभुचापा ! आतां माझा खरा वाली एक तूंच. रघुपतीस पाहून तरी आपली जडता ह्या सभेंत वाटून तूं हलुवार हो.

अतिपरिताप सीयमन माहीँ ।
लवनिमेष जुगसय सम जाहीँ ।

सीतेच्या मनाची फारच तारांबळ उडाली. तिला लवनिमेष देखील शतयुगाप्रमाणें जात.

**दो०–प्रभुहि चितइ पुनि चितइ महि राजत लोचन लोल। खेलत मनसिज–मीन–जुग जनु बिधुमंडल डोल ॥ २६१ ॥**

तिनें एकदां प्रभूकडे पहावें व नंतर जमिनीकडे पहावें. तिचे ते चंचल नेत्र असे शोभत कीं, जणुंकाय कामदेवाचे दोन मत्स्यच चंद्रमंडलामध्यें झोंके खेळत आहेत.

चौ०–गिराअलिनि मुखपंकज रोकी ।
प्रगट न लाजनिसा अवलोकी
लोचनजल रह लोचनकोना ।
जैसे परम कृपन कर सोना ।

सीतेच्या मुखरूप कमलानें (गुरुजनसमाजाची) लज्जारूप रात्र अवलोकिल्यामुळें तिचे शब्दरूप भ्रमर रुद्ध होऊन त्यांस मुक्त होतां येईना. जशी अत्यंत कृपणाची ठेव (घराच्या कोंपऱ्यांत असते) तसे सीतेचे अश्रु (लज्जेस्तव) तिच्या नेत्रांच्या कोंपऱ्यांतच दडले.

सकुची ब्याकुलता बडि जानी ।
धरि धीरज प्रतीति उर आनी।

आपल्या अत्यंत व्याकुलतेकडे पाहून ती संकोचली. तथापि, धैर्य धरून तिनें मनाचा निर्धार केला.

तन मन बचन मोर पन साचा ।
रघु-पति-पद-सरोज चितु राचा ।
तौ भगवान सकल-उर-बासी ।
करिहहिँ मोहि रघुबर कै दासी ।
जेहि के जेहि पर सत्य सनेहू ।
सो तेहि मिलइ न कछु संदेहू ।

कायावाचामनेंकरून जर माझा पण खरा असेल आणि माझें चित्त जर रघुपतिपदकमलीं रंगलें असेल

तर सर्वांतर्यामी भगवान् मला रघुपतीचीच दासी करील. ज्याचें ज्यावर खरें प्रेम असतें त्याची त्याला प्राप्ति होते यांत किमपिहि संदेह नाहीं.

प्रभुतन चितइ प्रेमपन ठाना।
कृपानिधान राम सब जाना।
सियहि बिलोकि तकेउ धनु कैसे।
चितव गरुड लघुब्यालहि जैसे।

सीतेनें प्रभूकडे पाहून जी प्रेमप्रतिज्ञा केली ती कृपानिधान रामांनीं सर्व जाणली. सीतेकडे न्याहाळून रामचंद्रांनीं गरुड ज्याप्रमाणें सापाच्या पिलाकडे पाहतो तद्वत् त्या धनुष्याकडे दृष्टि फेंकली.

दो०-लषन लखेउ रघु बंस-मनि ताकेउ हरकोदंड। पुलकि गात बोले बचन चरन चाँपि ब्रह्मंड ॥ २६२ ॥

रघुवंशमणी रामानें हरकोदंडावर दृष्टि फेंकली हें लक्ष्मणानें पाहतांच पायानें ब्रह्मांड दाबून तो पुलकित-गात्र होत्साता म्हणाला,—

चौ०—दिसिकुंजरहु कमठ अहि कोला।
धरहु धरनि धरि धीर न डोला।
राम चहहिँ संकरधनु तोरा।
होहु सजग सुनि आयसु मोरा।

अहो दिग्गज—कच्छ—शेष—वराह हो! धीर धरून पृथ्वीला सावरून धरा, खबरदार ती डळमळली तर; राम शंकरधनुष्य तोडूं इच्छित आहेत, म्हणून माझी आज्ञा ऐकून सावध रहा.

चापसमीप राम जब आये।
नरनारिन्ह सुर सुकृत मनाये।

राम धनुष्याजवळ येतांच सर्व स्त्रीपुरुषांनीं आपापल्या इष्ट देवतेचें व पुण्याईचें स्मरण चालविलें.

सब कर संसय अरु अज्ञानू।
मंदमहीपन्ह कर अभिमानू।
भृगुपति केरि गरबगरुआई।
सुर-मुनि-बरन्ह केरि कदराई।
सिय कर सोच जनकपछितावा।
रानिन्ह कर दारुन-दुख-दावा।
संभुचाप बड बोहित पाई।
चढे जाइ सब संग बनाई।

सर्वांचेच संशय आणि अज्ञान, बुद्धिहीन राजांचा अभिमान, परशुरामाचा गर्व व गुरुत्व, देव आणि मुनीश्वर यांची कातरता, सीतेचा शोक, जनकाचा पश्चात्ताप, राणीचा दारुण दुःखानल ह्या सर्वांचेच गांठोडें शंभुचापरूप विस्तीर्ण जहाजाच्या वेशीवर टांगून रामचंद्र जाऊन त्याजवर चढले.

राम-बाहु-बल-सिंधु अपारू।
चहत पार नहिँ कोउ कनहारू।

रामाच्या बाहुबलरूप अपार समुद्राच्या पार जाण्यास जहाज तयार आहे, पण खलाशी कोणीच नाहीं. ( म्हणून रामासच खलाशी व्हावें लागलें हा भाव. )

दो०—राम बिलोके लोग सब चित्र लिखे से देखि। चितई सीय कृपायतन जानी बिकल बिसेखि ॥ २६३ ॥

रामांनीं पाहिलें तेव्हां सर्व लोक त्यांना चित्राप्रमाणें दिसले. कृपासागरांनीं सीतेकडे पाहिलें तेव्हां ती विशेषच विकल झाली आहे असें दिसलें.

चौ०—देखी बिपुल बिकल बैदेही।
निमिष बिहात कलपसम तेही।

रामांनीं जानकी इतकी विकल झालेली पाहिली कीं, तिला एक एक निमिष कल्पाप्रमाणें जात होतें.

तृषित बारि बिनु जो तनु त्यागा।
मुये करइ का सुधातडागा।
का बरषा जब कृषी सुखाने।
समय चुके पुनि का पछिताने।
अस जिय जानि जानकी देखी।
प्रभु पुलके लखि प्रीति बिसेखी।

तृषित झालेला जर पाण्यावांचून मेला तर प्राण गेल्यावर अमृतसरोवराचा तरी काय उपयोग? शेतें सुकून गेल्यावर पावसाचें काय प्रयोजन? आणि प्रसंग निघून गेल्यावर मग पश्चात्ताप करण्यांत काय हांशील? असा मनांत विचार करून प्रभूंनीं जानकीकडे पाहिलें, आणि तिचें असाधारण प्रेम पाहून ते रोमांचित झाले.

गुरुहि प्रनाम मनहिँ मन कीन्हा।
अतिलाघव उठाइ धनु लीन्हा।

गुरूंस मनानेंच प्रणाम करून रामांनीं तें धनुष्य सहज लीलेनें उचललें.

दमकेउ दामिनि जिमि जब लयऊ।
पुनिनभ—धनु—मंडल—सम भयऊ।

ज्याप्रमाणें वीज लकन् चमकून मेघडंबरांत लय

पावते त्याप्रमाणें तें धनुष्य रामांनीं चढविलें तोंच तें इंद्रधनुष्याप्रमाणें मंडलाकार झालें.

लेत चढावत खैंचत गाढे।
काहु न लखा देख सब ठाढे।
तेहि छन राम मध्य धनु तोरा।
भरेउ भुवन धुनि घोर कठोरा।

तें धनुष्य घेतांना, उचलतांना व चढवितांना कोणाच्या देखील लक्षांत आलें नाहीं. सर्वजण उभे राहून पाहणार इतक्यांत रामानें धनुष्य मध्येंच तोडूनहि टाकिलें. त्या धनुष्यभंगाचा घडघडाट ब्रह्मांडांत भरून गेला.

छंद—भरे भुवन घोर कठोर रव रविबाजि तजि मारग चले। चिक्करहिँ दिग्गज डोल महि अहि कोल कूरम कलमले॥ सुर असुर मुनि कर कान दीन्हे सकल बिकल बिचारहीँ। कोदंड खंडेउ राम तुलसी जयति बचन उचारहीँ॥ ३३॥

या घोर घडघडाटानें आकापाताळ एक करून सोडलें, सूर्याच्या रथाचे वारू सैरावैरा उधळले, दिग्गज चीत्कारले, पृथ्वी डळमळली आणि शेष, वराह व कूर्म कळमळले. सुर, असुर आणि मुनि एकदम दचकले आणि कानांवर हात देऊन सर्वजण विचारांत पडले. तुलसीदास सांगतात कीं कोदंडाचीं खांडकें जेव्हां त्यांच्या प्रत्यक्ष नजरेस पडलीं तेव्हां कोठें ते शुद्धीवर येऊन त्यांनीं रामाचा जयजयकार आरंभला.

सो०—संकरचाप जहाज सागर रघुबर–बाहु–बल। बूड सो सकल समाज चढे जो प्रथमहिँ मोहबस॥ ३१॥

रघुपतिबाहुबलरूप समुद्रांतील शंकरचापरूप जहाजांत जे प्रथमच मोहवश होऊन चढले होते तेवढेच काय ते बुडाले. ( अर्थात् रामाच्या खलाशीपणांतले सर्व तरले. )

चौ०—प्रभु दोउ चापखंड महि डारे।
देखि लोग सब भये सुखारे।

प्रभूंनीं चापाचे दोन तुकडे करून ते जमिनीवर फेंकून दिले. तें पाहून सर्व लोक हर्षित झाले.

कौसिक–रूप–पयोनिधि पावन।
प्रेमबारि अवगाह सुहावन।
राम–रूप–राकेस निहारी।
बढत बीचि पुलकावलि भारी।

त्या वेळीं रामरूप चंद्रास पाहून कौशिकरूप पावन पयोनिधीचे रामसंबंधीं पवित्र आणि अगाध प्रेमरूप जलास रोमांचरूपी भरती अधिकाधिक येऊं लागली.

बाजे नभ गहगहे निसाना।
देवबधू नाचहिँ करि गाना।
ब्रह्मादिकसुर सिद्ध मुनीसा।
प्रभुहि प्रसंसहिँ देहिँ असीसा।
बरषहिँ सुमन रंग बहु माला।
गावहिँ किन्नर गीत रसाला।

आकाश दुंदुभींच्या गजरानें दुमदुमून गेलें; अप्सरा नृत्यगायन करूं लागल्या; ब्रह्मादिक देव, सिद्ध आणि मुनीश्वर प्रभूंची प्रशंसा करून आशीर्वाद देऊं लागले; नाना रंगांच्या पुष्पमालांचा वर्षाव होऊं लागला; किन्नरगण मधुर गायन करूं लागले.

रही भुवन भरि जय जय बानी।
धनुष–भंग–धुनि जात न जानी।
मुदित कहहिँ जहँ तहँ नर नारी।
भंजेउ राम संभुधनु भारी।

अखिल वातावरण जयजयकारानें मुखरित झालें. धनुष्यभंगाचा ध्वनि झाल्याचेंदेखील कोणास स्मरेना. रामांनीं कठोर शिवचापाचा भंग केला हीच वार्ता सर्वमुखीं होऊन स्त्रीपुरुषांचा आनंद वारेमाप फोंफावला.

दो०—बंदी मागध सूतगन बिरद बदहिँ मतिधीर। करहिँ निछावरि लोग सब हय गय मनि धन चीर॥ २६४॥

बंदी, मागध, सूत ही मंडळी मतिधीर श्रीरामचंद्राचीं ब्रीदावळी उच्चारूं लागली. सर्व लोक अश्व, गज, धन, रत्नें आणि वस्त्रें रामावरून ओंवाळून टाकूं लागले.

चौ०—झाँझि मृदंग संख सहनाई।
भेरि ढोल दुंदुभी सुहाई।
बाजहिँ बहु बाजने सुहाये।
जहँ तहँ जुबतिन्हँ मंगल गाये।

झांज, मृदंग, शंख, सनई, भेरी, ढोल, दुंदुभी

इत्यादि अनेक मंगलवाद्यें सर्वत्र वाजूं लागलीं. ठिकठिकाणीं युवतीजन मंगल गाणीं गाऊं लागला.

सखिन्ह सहित हरषीं सब रानी।
सूखत धानु परा जनु पानी।
जनक लहेउ सुख सोच बिहाई।
पैरत थके थाह जनु पाई।

सर्व सख्यांसहवर्तमान राणीस इतका आनंद झाला कीं, जणूं काय सुकूं लागलेल्या पिकावर पाऊसच पडला. पोहतां पोहतां थकलेल्याला थारा मिळाल्याप्रमाणें जनक शोकरहित होऊन संतुष्ट झाला.

श्रीहत भये भूप धनु टूटे।
जैसे दिवस दीपछबि छूटे।
सीयसुखहि बरनिय केहि भाँती।
जनु चातकी पाइ जलस्वाती।

ज्याप्रमाणें दिवसा दिव्याचा प्रकाश नाहींसा होतो त्याप्रमाणें धनुष्यभंग होतांच तिकडे राजे लोक फिक्के पडले तर इकडे चातकीस स्वातीजल मिळाल्याप्रमाणें सीतेचें मन तर्र झालें. तें सुख कसें वर्णन करितां येईल ?

रामहि लषन बिलोकत कैसे।
ससिहि चकोरकिसोरकु जैसे।
सतानंद तब आयसु दीन्हा।
सीता गमन राम पहिँ कीन्हा।

चंद्राकडे ज्याप्रमाणें चकोराचें पिल्लूं पाहतें तद्वत् रामचंद्राकडे लक्ष्मण पाहूं लागला. नंतर शतानंदानें आज्ञा केली तेव्हां सीता रामाच्या समीप जाण्यास निघाली.

**दो०—संग सखी सुंदर चतुर गावहिँ मंगलचार। गवनी बाल–मराल–गति सुखमा अंग अपार॥ २६५॥**

बरोबरच्या सुंदर सख्या सुरेल मंगल गाणीं गात आहेत अशी ती अपरिमित शोभनांगी सीता बालहंसगतीनें चालूं लागली.

चौ०—सखिन्ह मध्यसिय सोहति कैसी।
छबि-गन-मध्य महाछबि जैसी।

सौंदर्यामध्यें ज्याप्रमाणें पराकोटीचें लावण्य शोभावें तशी सखीजनामध्यें सीता शोभत होती.

करसरोज जयमाल सुहाई।
बिस्व–बिजय–सोभा जनु छाई।
तन सकोच मन परमउछाहू।
गूढ़प्रेम लखि परइ न काहू।

तिच्या करकमलांतली सुंदर जयमाला जणुंकाय विश्व जिंकणारी शोभाच शोभत होती. तिच्या देहावर संकोच दिसून येई, पण मनांत परम उत्साह होता. तिचें गूढ प्रेम कोणासच कळून आलें नाहीं.

जाइ समीप रामछबि देखी।
रहि जनु कुअँरि चित्रअवरेखी।
चतुरसखीं लखि कहा बुझाई।
पहिरावहु जयमाल सुहाई।

जवळ जाऊन सीता रामरूप न्याहाळूं लागली तेव्हां ती जणुंकाय चित्रांतली बाहुली बनली. ती तिची स्थिति पाहून तिच्या चतुर सख्यांनीं तिला समजावून सांगितलें कीं, ही सुंदर जयमाला रामचंद्राच्या गळ्यांत घाल.

सुनत जुगलकर माल उठाई।
प्रेमबिबस पहिराइ न जाई।

हें ऐकतांच दोन्ही हातांनीं तिनें माळ वर केली परंतु प्रेमांत मस्त असल्यामुळें हातांतली माळच सुटेना.

सोहत जनु जुगजलज सनाला।
ससिहि सभीत देत जयमाला।

जणुंकाय देंठासकट दोन कमलें भीत भीत चंद्रास जयमाळ घालीत आहेत, असें तें दृश्य दिसलें.

गावहिँ छबि अवलोकि सहेली।
सिय जयमाल रामउर मेली।

सख्या गाऊं लागल्या. सीतेनें रामाच्या गळ्यांत माळ घातली.

**सो०—रघुबरउर जयमाल देखि देव बरषहिँ सुमन। सकुचे सकल भुआल जनु बिलोकि रबि कुमुदगन॥ ३२॥**

रामाच्या गळ्यांत जयमाळ घातलेली पाहून देव पुष्पवृष्टि करूं लागले. सूर्यदर्शनानें ज्याप्रमाणें कुमुदगण कोमेजून जातो त्याप्रमाणें सर्व राजांचीं तोंडें उतरून गेलीं.

चौ०—पुर अरु ब्योम बाजने बाजे।
खल भये मलिन साधु सब राजे।
सुर किन्नर नर नाग मुनीसा।
जय जय जय कहिँ देहिँ असीसा।

नाचहिँ गावहिँ बिबुधबधूटी।
बार बार कुसुमावलि छूटी।

मिथिला नगरींत आणि स्वर्ग–लोकांत वाद्यें वाजूं लागलीं. दुर्जन काळवंडले.सर्व सज्जन प्रफुल्लित झाले. देव, किन्नर, नर, नाग, मुनींद्र इत्यादि सर्व 'जय-जय' म्हणून आशीर्वाद देऊं लागले. देवांगना नृत्य-गायन करूं लागल्या. वरचेवर पुष्पांचा वर्षाव होऊं लागला.

जहँ तहँ बिप्र बेदधुनि करहीँ।
बंदी बिरदावलि उच्चरहीँ।
महि पाताल नाक जसु ब्यापा।
राम बरी सिय भंजेउ चापा।

जिकडे तिकडे ब्राह्मण वेदघोष करूं लागले. भाट ब्रीदावली उच्चारूं लागले. रामांनीं चापाचा भंग करून सीतेला वरिलें. हें त्याचें यश पृथ्वी, स्वर्ग आणि पाताळ सर्वत्र दुमदुमून राहिलें.

करहिँ आरती पुर–नर–नारी।
देहिँ निछावरि बित्त बिसारी।
सोहति सीय राम कै जोरी।
छबि सृंगार मनहुँ एक ठोरी।

नगरवासी स्त्रीपुरुष मंगलारती करूं लागले, आणि देहभान विसरून किंमती वस्तु ओवाळून टाकूं लागले. सीतारामाची जोडी जणुंकाय शृंगार आणि सौंदर्यच एकवटले आहेत, अशी शोभूं लागली.

सखी कहहिँ प्रभुपद गहु सीता।
करत न चरनपरस अतिभीता।

सख्या म्हणाल्या, सीते! प्रभूंचे चरण धर. परंतु अत्यंत भीतीमुळें ती चरणस्पर्श करीना.

**दो०–गौतम-तिय-गति सुरति करि नहिँ परसति पग पानि। मन बिहँसे रघु-बंसमनि प्रीति अलौकिक जानि ॥२६६॥**

गौतमपत्नीच्या उद्धाराचें स्मरण होऊन सीता रामचरणांस हात लावीना. तिचें तें अलौकिक प्रेम पाहून रघुवंशमणी राम मनांत हंसले!

१ सीतेचा भाव असा कीं, तिच्या हातांतील रत्न-कंकणादि अलंकारांस रामचरणस्पर्श झाला तर रत्नें हीं पाषाणच असल्यामुळें त्यांतूनहि स्त्रिया उत्पन्न होतील. अर्थात् आपण आपल्या करणीनेंच सेवकसमूह निर्माण केल्यासारखें होईल, आणि परिणामीं रामसेवेपासून वंचित राहण्याची पाळी स्वतःवर ओढवून घ्यावी लागेल.

चौ०–तब सिय देखि भूप अभिलाषे।
कूर कपूत मूढ मन माषे।
उठि उठि पहिरि सनाह अभागे।
जहँ तहँ गाल बजावन लागे।

नंतर सीतेस पाहून मत्सरी, कुलांगार, व उल्लू अशा राजांना अभिलाष उत्पन्न होऊन ते चिडले. त्या अभागी लोकांनीं उठउठून व चिलखतें चढवून एकसारखी कुतरभुकी चालविली.

लेहु छँडाइ सीय कह कोऊ।
धरि बाँधहु नृपबालक दोऊ।
तोरे धनुष चाँड नहिँ सरई।
जीवत हमहिँ कुअँरि को बरई।
जौँ बिदेह कछु करइ सहाई।
जीतहु समर सहित दोउ भाई।

कोणी ह्मणाले, सीतेस हिरावून घ्या आणि ह्या दोघांहि भावांना धरून बांधून ठेवा. नुसतें धनुष्य तोडल्यानेंच कार्यभाग संपत नाहीं. आह्मी जीवंत असतांना ह्या कुमारीस कोण वरणार? जनक राजा जरी ह्यांना सहाय असला तरी त्याच्यासकट ह्या दोघां भावांस आपण युद्धांत जिंकून टाकूं.

साधुभूप बोले सुनि बानी।
राजसमाजहिँ लाज लजानी।
बलु प्रतापु बीरता बडाई।
नाक पिनाकहि संग सिधाई।
सोइ सूरता कि अब कहुँ पाई।
असि बुधि तौ बिधि मुह मसि लाई।

ती त्यांची अर्वाच्यता ऐकून कांहीं सज्जन राजे होते ते ह्मणाले, तुम्ही आपल्या निलाजरेपणानें एकंदर राजसमाजाला लाजवीत आहां.

पिनाकचापाबरोबरच तुमच्या बल, प्रताप, शौर्य आणि यश यांची स्वर्गास बोळवण होऊन चुकली. तुमची शूरता पहिली होती तीच आहे ना? कीं आतां कोठून तिला उजळा मिळाला आहे? या बुद्धीनें विधात्याकडून तुमच्या तोंडास डांबर फासलें जात आहे मात्र.

**दो०–देखहु रामहिँ नयन भरि तजि इरषा मद कोहु। लषन-रोष-पावक-प्रबलु जानि सलभ जनि होहु ॥२६७॥**

ईर्षा, मद, मोह यांचा त्याग करून रामास डोळे

भरून पहा. लक्ष्मणाच्या क्रोधरूपी धगधगीत अग्नीत तुह्मी पतंगाप्रमाणें उड्या घेऊं नका.

चौ०—बैनतेयबलि जिमि चह कागू ।
जिमि सस चहइ नाग-अरि-भागू।
जिमि चह कुसल अकारनकोही।
सब संपदा चहइ सिवद्रोही।
लोभी लोलुप कीरति चहई ।
अकलंकता कि कामी लहई।
हरि–पद–बिमुख परमगति चाहा।
तस तुम्हार लालच नरनाहा।

ज्याप्रमाणें गरुडाच्या बळीची कावळ्यानें इच्छा करावी, किंवा सशानें सिंहाच्या भागाची हाव धरावी, अगर निष्कारण क्रोधी माणसानें आपल्या हिताची वांच्छा धरावी, अथवा शिवद्वेष्ट्यानें सुख व संपत्तीची आशा बाळगावी, लोभी व लंपट अशांनीं कीर्तीची अपेक्षा करावी किंवा श्रीहरिपदविन्मुखानें मोक्षाची लालसा धरावी, तद्वतच हे राजांनो ! ही तुमची लालुच आहे. व्यभिचार आणि निष्कलंकत्व यांचें समीकरण बसेल काय ?

कोलाहल सुनि सीय सकानी।
सखी लेवाइ गईँ जहँ रानी।
राम सुभाय चले गुरु पाहीँ।
सियसनेहु बरनत मन माहीँ।

तो कोलाहल ऐकून सीता साशंक झाली. तिच्या सख्या तिला राणीकडे घेऊन गेल्या. राम आपल्या मनांत सीतेच्या प्रेमाचें वर्णन करीत सहजगत्याच गुरूकडे गेले.

रानिन्ह सहित सोचबस सीया ।
अब धौँ बिधिहि काह करनीया ।

राण्यांसहवर्तमान सीता शोकवश झाली. ( त्या म्हणत ) आतां ह्या दैवाला काय तरी करावें ?

भूपबचन सुनि इत उत तकहीँ ।
लषन रामडर बोलि न सकहीँ ।

राजांच्या वल्गना ऐकून लक्ष्मण इतस्ततः पाहूं लागला, परंतु रामाच्या भीतीमुळें त्यास कांहीं बोलतां येईना.

**दो०—अरुननयन भृकुटीकुटिल चितवत नृपन्ह सकोप। मनहुँ मत्त–गज–गन निरखि सिंहकिसोरहि चोप ॥ २६८ ॥**

त्याचे नेत्र लालबुंद होऊन भुंवया चढल्या. लक्ष्मण क्रोधयुक्त होऊन राजांकडे पहात असतां असें वाटे कीं, मदोन्मत्त हत्तींचा कळप पाहून सिंहाच्या छाव्यास आवेशच चढला आहे.

चौ०—खरभर देखि बिकल पुरनारी।
सब मिलि देहिँ महीपन्ह गारी ।

ती खळबळ पाहून स्त्रीपुरुष विव्हल झाले व सर्व मिळून राजे लोकांना शिव्या हांसडूं लागले.

तेहि अवसर सुनि सिव–धनु–भंगा ।
आये भृगु-कुल-कमल-पतंगा।
देखि महीप सकल लकुचाने ।
बाज झपट जनु लवा लुकाने ।

त्याच सुमारास शिवधनुष्यभंगाचें वर्तमान ऐकून भृगुकुलकमलसूर्य परशुराम तेथें दाखल झाले. ज्याप्रमाणें श्येनपक्ष्यास पहातांच लावी पक्षी दडूं लागतो तसे सर्व राजे परशुरामास पहातांच नामोहरम झाले.

गौरसरीर भूति भलि भ्राजा।
भालबिसाल त्रिपुंड बिराजा ।
सीस जटा ससिबदन सुहावा।
रिसिबस कछुक अरुन होइ आवा।
भृकुटीकुटिल नयन रिस राते।
सहजहुँ चितवत मनहुँ रिसाते।
वृषभ कंध उर बाहु बिसाला।
चारु जनेउ माल मृगछाला ।
कटि मुनिवसन तून दुइ बाँधे।
धनु सर कर कुठार कल काँधे।

गौर शरीरावर शुभ्र विभूति शोभत असून विशाल भालावर त्रिपुंड रेखलें आहे, मस्तकीं जटाभार धारण केला असून मुखश्री चंद्राप्रमाणें सुंदर परंतु क्रोधामुळें किंचित् आरक्त झाली आहे, भृकुटी कुटील असून नेत्र रागानें लाल झाले आहेत, दृष्टि स्वभावतःच रागावल्यासारखी असून स्कंध वृषभासारखे आहेत, वक्षःस्थल आणि बाहु विशाल असून गळ्यांत सुंदर यज्ञोपवीत आणि माला शोभत आहेत, कांखेंत मृगचर्म असून कमरेला मुनिवल्कल आणि

[१] परशुरामाचें गर्वहरण मूळ रामायणांत विवाहानंतर वरात परत जातांना आहे. कवीनें तें आधीं ओढलें. आमच्या ' मानस–हंसां 'त ह्याचें कारण मिळेल (काव्य–समालोचना पहा. )

दोन भाते कसलेले आहेत; हातांत धनुष्यबाण असून खांद्यावर तेजस्वी परशु लकाकत आहे;

**दो०—संत बेष करनी कठिन बरनि न जाइ सरूप । धरि मुनितनु जनु बीररस आयउ जहँ सब भूप ॥ २६९ ॥**

वेष संताचा पण करणी मात्र जहाल असें तें परशुरामाचें स्वरूप अवर्णनीय होतें. जणुंकाय भूपसमाजांत मुनिवेष धारण करून वीररसच अवतरला असें वाटे.

**चौ०—देखत भृगु-पति-बेषु कराला ।**
**उठे सकल भयबिकल भुआला ।**
**पितुसमेत कहि निज निज नामा ।**
**लगे करन सब दंडप्रनामा ।**

भार्गवाचा तो विक्राळ वेष पाहतांच सर्व राजांची घाबरगुंडी मचून ते तडक उठले, आणि पित्याच्या नामासहित आपलें नाम सांगून सर्व साष्टांग दंडवत घालूं लागले.

**जेहि सुभाय चितवहिँ हित जानी ।**
**सो जानइ जनु आइ खुटानी ।**

प्रसन्नतापूर्वक देखील ते भार्गवराम ज्याचेकडे पहात त्यासहि आपलें आयुष्य संपुष्टांत आलेंसें वाटे.

**जनक बहोरि आइ सिरु नावा ।**
**सीय बोलाइ प्रनाम करावा ।**
**आसिष दीन्हि सखी हरषानी ।**
**निजसमाज लेइ गइ सयानी ।**

नंतर जनकानें येऊन वंदन केलें, आणि सीतेस बोलावून तिजकडून नमस्कार करविला. भार्गवानें सीतेस आशीर्वाद दिला, तेव्हां तिच्या शाहण्या सख्या मोठ्या आनंदानें तिला आपल्या मंडळींत घेऊन गेल्या.

**बिस्वामित्र मिले पुनि आई ।**
**पदसरोज मेले दोउ भाई ।**
**राम लषन दसरथ के ढोटा ।**
**देखि असीस दीन्ह भल जोटा ।**
**रामहिँ चितइ रहे भरि लोचन ।**
**रूप अपार मार-मद-मोचन ।**

नंतर विश्वामित्र सरसावले. त्यांनीं भार्गवांच्या पदकमलांवर उभयबंधूंस घातलें, आणि सांगितलें कीं, हे राजा, दशरथाचे पुत्र रामलक्ष्मण होत. ते सुंदर बंधुद्वय पाहून भार्गवानें त्यांस आशीर्वाद दिला. रामाचें तें मदनाचाहि गर्व हरण करणारें अपार लावण्य पाहून भार्गवराम त्याजकडे एकसारखे एकच नजरेनें पाहूं लागले.

**दो०—बहुरि बिलोकि बिदेह सन कहहु काह अति भीर । पूछत जानि अजान जिमि ब्यापेउ कोप सरीर ॥ २७० ॥**

भार्गवाचें शरीर क्रोधानें व्याप्त झालें होतें. तेव्हां हा एवढा घोळका व खटाटोप कसला असा जाणून-बुजून अजाणासारखा त्यानें जनकाकडे पाहून सवाल टाकला.

**चौ०—समाचार कहि जनक सुनाये ।**
**जेहि कारन महीप सब आये ।**
**सुनत बचन तब अनत निहारे ।**
**देखे चापखंड महि डारे ।**

ज्या कारणानिमित्त सर्व राजे गोळा झाले होते तो वृत्तांत जनकानें त्यास सांगितला. जनकाचें भाषण ऐकून पुन्हां त्यानें दुसरीकडे पाहिलें तों शिपचापाचे तुकडे जमिनीवर पडलेले त्याच्या दृष्टीस पडले.

**अतिरिस बोले बचन कठोरा ।**
**कहु जड जनक धनुष केइ तोरा ।**
**बेगि देखाउ मूढ न त आजू ।**
**उलटउँ महि जहँ लगि तव राजू ।**

भार्गवराम अत्यंत क्रुद्ध होऊन तार स्वरानें म्हणाले, हे जडबुद्धि जनका ! धनुष्य कोणीं तोडलें तें सांग. मूढा ! धनुर्भंग करणारास लवकर हजर कर नाहीं तर जेथवर तुझें राज्य तेथवर पृथ्वी पालथी घालीन.

**अतिडर उतर देत नृप नाहीँ ।**
**कुटिलभूप हरषे मन माहीँ ।**
**सुर मुनि नाग नगर-नर-नारी ।**
**सोचहिँ सकल त्रास उर भारी ।**

जनक अत्यंत भेदरल्यामुळें उत्तर देईना. कुटाळ राजांच्या मनाला मात्र फार खुषी झाली, पण देव, मुनी, नाग, आणि नगरनरनारी या सर्वांच्या मनाला अत्यंत वैताग वाटला.

**मन पछिताति सीयमहतारी ।**
**बिधि अब सबरी बात बिगारी ।**
**भृगुपति कर सुभाव सुनि सीता ।**
**अरधनिमेष कलपसम बीता ।**

सीतेची माता मनांत विवंचना करूं लागली. ( ती ह्मणे ) नशीबानें आतां तर सर्वच काम बिनसलें. भृगुपतीचा स्वभाव कळून आल्यावर सीतेस निमिषार्ध कल्पाप्रमाणें जाऊं लागलें.

**दो०-सभय बिलोके लोग सब जानि जानकी भीर । हृदय न हरष बिषाद कछु बोले श्रीरघुबीर ॥ २७१ ॥**

सर्व लोक घाबरलेले पाहून आणि जानकी भ्यालेली जाणून मनांत कांहींहि हर्षविषाद न धरितां श्रीरघुवीर म्हणाले—

चौ०-नाथ संभु-धनु-भंजनि-हारा ।
होइहि कोउ एक दास तुह्मारा ।
आयसु काह कहिय किन मोही ।
सुनि रिसाइ बोले मुनि कोही ।

हे नाथ ! शिवचापाचा भंग करणारा कोणी तरी आपलाच एकादा दास असला पाहिजे. आपली आज्ञा काय ती आपण मला कां कथन करीत नाहीं ? तें ऐकतांच ते शीघ्रकोपी मुनी कडकून वर्दळीवर आले व म्हणाले—

सेवक सो जो करइ सेवकाई ।
अरिकरनी करि करिय लराई ।
सुनहु राम जेइ सिवधनु तोरा ।
सहस-बाहु-सम सो रिपु मोरा ।
सो बिलगाउ बिहाइ समाजा ।
नत मारे जइहैँ सब राजा ।

जो सेवा करितो तोच खरा सेवक. जो शत्रूसारखी करणी करितो त्याच्याशीं तर दोन हात झालेच पाहिजेत. रामा ! ऐक. ज्यानें शिवधनुष्य तोडलें त्याला मी सहस्रबाहूप्रमाणें[1] शत्रु समजतों. त्यानें ह्या मंडळीस सोडून अलग पडावें नाहींतर राजांची ही अवघीच दावण कत्तल होणार.

सुनि मुनिबचन लषन मुसुकाने ।
बोले परसुधरहि अपमाने ।

तें मुनिवचन श्रवण करून लक्ष्मण हसला आणि त्यानें परशुरामाची चांगलीच हडसूनखडसून हजेरी घेतली.

बहु धनुहीँ तोरी लरिकाईँ ।
कबहुँ न असि रिस कीन्हि गोसाईँ ।
एहि धनु पर ममता केहि हेतू ।
सुनि रिसाइ कह भृगु-कुल-केतू ।

आह्मी बाळपणीं किती तरी धनुष्यें तोडलीं,[1] परंतु महाराज कधींच इतके लाल झाले नाहींत. ह्याच धनुष्यावर आपला एवढा लळा तो काय म्हणून ? तें ऐकून भृगुकुलकेतु परशुराम संतापून म्हणाले—

**दो०-रे नृपबालक कालबस बोलत तोहि न सँभार । धनुही सम त्रि-पुरारि धनु बिदित सकलसंसार ॥ २७२ ॥**

अरे ए राजकुमारा ! तुला काळानें पछाडलें आहे म्हणून बोलण्याची शुद्धि उरली नाहीं. सर्व जगतांत प्रख्यात असें हें त्रिपुरारीचें धनुष्य इतर फालतू धनुष्याप्रमाणेंच समजतोस काय ?

चौ०-लषन कहा हँसि हमरे जाना ।
सुनहु देव सब धनुष समाना ।
का छति लाभु जून धनु तोरे ।
देखा राम नयन के भोरे ।
छुवत टूट रघुपतिहु न दोषू ।
मुनि बिनु काज करिय कत रोषू ।

---

१ परशुरामाचे वडील जमदग्नि यांचेजवळ सहस्रबाहूनें एकदां त्यांची कामधेनु मागितली. त्यांनीं सांगितलें कीं, ती त्यांची धेनु नसून दुसऱ्याची केवळ उसनी आणली आहे. सहस्रबाहू क्रुद्ध झाला व जमदग्नीचा वध करून तो कामधेनु वळवून नेऊं लागला. कामधेनु इंद्रलोकास पळाली. परशुरामाला तें वर्तमान मागाहून कळलें. त्यांनीं राजा सहस्रबाहूचा निःपात करून, निःक्षत्रिय पृथ्वी करण्याची प्रतिज्ञा करून, २१ वेळां ती निःक्षत्रिय केली.

१ सर्व क्षत्रियांचा निःपात करून त्यांचीं धनुष्यें भार्गवांनीं एकत्र जमवून ठेविलीं होतीं. परंतु पृथ्वीस त्यांचा भार झाला, तेव्हां शेषास आपल्या मुलाचें रूप देऊन ती त्यांचेकडे गेली. तेथें मुलाचे सर्व अपराध क्षमा करावे या अटीवर तिनें भार्गवाची सेवा पतकरली. इकडे मुलानें धनुष्यें तोडण्याचा क्रम सारखा चालू ठेवून सर्व धनुष्यें संपविलीं. हीं धनुष्यें जर राक्षसांच्या हातीं पडतीं तर अनर्थ झाला असता असा विचार करून भार्गवानें मुलास अपराधाबद्दल क्षमा केली. तेव्हां शेष प्रकट होऊन म्हणाला, एक शिवचाप राहिलें आहे तें राम तोडील.

लक्ष्मण हंसत हंसत म्हणाला, प्रभो ! ऐका. धनुष्य तेथून सर्व सारखेंच. हें एक किरकोळ कसरलेलें जून धनुष्य तोडण्यांत हानि किंवा लाभ तो कोणता ? रामांनीं त्याजवर एक ओझरती नजर फेकली, व पुढें रघुपतींचा स्पर्श होतांच त्याचे आपसुकच तुकडे झाले. ह्यांत त्यांच्याकडे मुळींच दोष नाहीं. मुने ! आपण उगाचिच काय म्हणून वरदळीवर येतां ?

बोले चितइ परसु की ओरा ।
रे सठ सुनेहि सुभाउ न मोरा ।
बालक बोलि बधउँ नहिँ तोही ।
केवल मुनि जड जानहि मोही ।

भार्गवराम आपल्या परशूकडे पाहून म्हणाले—अरे उर्मटा ! माझा स्वभाव तुला कळलाच नाहीं तर ? अरे, तूं एवढासा बच्चा म्हणून मी तुझ्या मानगुटीस चाप लावली नाहीं. तुला काय मी एखादा गबाळभटजी वाटतो होय ?

बालब्रह्मचारी अतिकोही ।
बिस्वबिदित छत्रिय–कुल–द्रोही ।
भुजबल भूमि भूप बिनु कीन्ही ।
बिपुल बार महिदेवन्ह दीन्ही ।
सहस–बाहु–भुज–छेदनि–हारा ।
परसु बिलोकु महीपकुमारा ।

बालब्रह्मचारी, अतिक्रोधी, जगविख्यात क्षत्रिय-कुलांचा शत्रु व आपल्या बाहुबलानें पृथ्वी अनेक वेळां भूपविरहित करून ती ब्राह्मणांस दान देणारा तो हा मी सहस्रबाहूच्या बाहूंचे खांडोरे पाडणारा परशुराम ! अरे राजकुमारा ! हा परशु पाहून ठेव कीं रे !

**दो०—मातुपितहि जनि सोचबस करसि महीपकिसोर । गरभन के अरभकदलन परसु मोर अतिघोर ॥ २७३ ॥**

अरे राजपुत्रा ! तूं आपल्या आईबापांना विनाकारण दुःखांत ढकलूं नकोस गर्भांतील अर्भकांनाहि कापणारा हा माझा परशु निर्दयपणांत अगदीं ताण समज.

चौ०—बिहँसि लषन बोले मृदुबानी ।
अहो मुनीस महाभट मानी ।
पुनि पुनि मोहि देखाव कुठारू ।
चहत उडावन फूँकि पहारू ।

इहाँ कुम्हडबतिया कोउ नाहीँ ।
जे तरजनी देखि मरि जाहीँ ।

लक्ष्मण हास्यपूर्वक हळूंच म्हणाला, अहो मुनींद्र ! आपण तर आपल्याला महान् योद्धे समजतां, आणि वारंवार मला परशु दाखवितां; तर नुसती फुंकर घालून पर्वत उडविण्याची तुमची इच्छा आहेसें दिसतें ? तर्जनी दाखविल्यानें गळून पडेल असा येथें कोणीहि तोंवडा[1] भोपळा नाहीं !

देखि कुठार सरासन बाना ।
मैं कछु कहँउ सहित अभिमाना ।
भृगुकुल समुझि जनेउ बिलोकी ।
जो कछु कहेहु सहउँ रिस रोकी ।

परशु, धनुष्य वगैरे आपला पेपा पाहून मी कांहींसा अभिमानपूर्वक बोललों. परंतु आतां आपण भृगु-कुलांतील आहां असें जाणून आणि आपलें जानवें पाहून ( क्षत्रियांच्या व ब्राह्मणांच्या जानव्यांत भेद असतो. ) आपलीं मुक्ताफळें मी आपला राग मनांतल्यामनांत जिरवून सहन करीन.

सुर महिसुर हरिजन अरु गाई ।
हमरे कुल इन्ह पर न सुराई ।
बधे पाप अपकीरति हारे ।
मारतहू पा परिय तुह्मारे ।

देवता, ब्राह्मण, संत आणि गाई यांची खटाई काढण्याची परंपरा आमच्या कुळांत नाहीं. ह्यांचा वध करण्यांत पातक तर आहेच, परंतु यांना नुसतें जिंकण्यांत देखील बदनामी आहे. आतां आपण जरीं मला मारलेंहि तरी मी आपल्या पायींच पडेन.

कोटि–कुलिस–सम बचन तुह्मारा ।
व्यर्थ धरहु धनु बान कुठारा ।

आपलें वचनच तर कोटि–वज्रांप्रमाणें आहे; मग हें धनुष्य, बाण आणि परशु या लटांबरीचा उगीचच हव्यास कशाला ?

**दो०—जो बिलोकि अनुचित कहेउँ छमहु महामुनि धीर । सुनि सरोष भृगु-बंस-मनि-बोले गिरा गँभीर ॥ २७४ ॥**

मी जर कांहीं नादान बोललों असेन तर तें हा

[1] तांवडा भोपळा वेलावर असतां त्यास बोट दाखविल्यानें तो सुकून गळून पडतो अशी समजूत आहे.

आपला शिपाईबाणा पाहून बोललों. हे धीर मुनीश्वर! आपण क्षमा करावी. 'मुनि' संबोधन ऐकतांच भृगुवंशमणी संतापून गर्जना करीत म्हणाले,—

चौ०–कौसिक सुनहु मंद यह बालक ।
कुटिल कालबस निज–कुल–घालक ।
भानु–बंस–राकेस–कलंकू ।
निपट निरंकुस अबुध असंकू ।

अहो विश्वामित्र ! ऐका ! ह्या मूर्ख चौंबड्या पोराचें मरण ओढवलें आहे. हा कुलघातक, निपटारा, निरंकुश, मूढ, निःशंक रघुवंशरूप चंद्राचा कलंक आहे.

कालकवलु होइहि छन माहीँ ।
कहउँ पुकारि खोरि मोहि नाहीँ ।
तुह्म हटकहु जौँ चहहु उबारा ।
कहि प्रताप बल रोष हमारा ।

एका क्षणांत हा मृत्यूचा कलेवा होणार हें मी बजावून सांगतों. ह्यांत माझ्याकडे दोष नाहीं. हा जगावा अशी जर आपली इच्छा असेल तर माझें सामर्थ्य, प्रताप आणि क्रोध तुम्हीच सांगून ह्यांस आवरा.

लषन कहेउ मुनि सुजस तुह्मारा ।
तुम्हहिँ अछत को बरनइ पारा ।
अपने मुह तुम्ह आपनि करनी ।
बार अनेक भाँति बहु बरनी ।

लक्ष्मण म्हणाला, मुने ! तुमचें सुयश तुमचे तुम्ही प्रत्यक्ष असतां यथासांग अन्य कोण वर्णन करणार ! तुम्ही आपल्या मुखानें आपला पोवाडा कितीदां तरी उदंड गायला आहे.

नाहि संतोष तौ पुनि कछु कहहू ।
जनि रिस रोकि दुसह दुख सहहू ।
बीरवृत्ति तुम्ह धीर अछोभा ।
गारी देत न पावहु सोभा ।

अजूनहि तृप्ति झाली नसल्यास पुन्हां चालूं द्या. राग गिळण्याच्या असह्य वेदना सोसत बसूं नये. आपण वीरपणाचा बाणा बाळगणारे आणि अचाट धैर्यवान् म्हणविणारे गालिप्रदान करितां हें मात्र आपल्यासारख्यास शोभत नाहीं.

**दो०–सूर समर करनी करहिँ कहि न जनावहिँ आपु । विद्यमान रिपु पाइ रन कायर करहिँ प्रलापु ॥ २७५ ॥**

शूर समरांत कृति करून दाखवितात. ते स्वतःचि जाणीव अशा वल्गनांनीं करून देत नसतात. रणामध्यें रिपु समोर उभा असतांना भेकड मात्र बाष्कळ बाता करीत बसतात.

चौ०–तुम्ह तौ काल हाँक जनु लावा ।
बार बार मोहि लागि बोलावा ।

तुम्ही तर जणुंकाय काळाला हाकूनच आणलें आहे. म्हणून तर वारंवार मजसाठीं त्यास हाका मारीत आहां.

सुनत लषन के बचन कठोरा ।
परसु सुधारि धरेउ कर घोरा ।
अब जनि देइँ दोष मोहि लोगू ।
कटुबादी बालक बधजोगू ।
बाल बिलोकि बहुत मैँ बाँचा ।
अब यह मरनहार भा साचा ।

लक्ष्मणाचें तें सणसणीत भाषण ऐकतांच भार्गवांनीं आपला भयंकर परशु उगारून हातांत घेतला, व ते म्हणाले, आतां लोकांनीं मला बोल ठेवूं नये. हा जहरी कारटा साफच व्हावयास हवा. बालक म्हणून मी याला आतांपर्यंत पुष्कळच निभविलें. आतां मात्र हा खात्रीनें मेला समजा.

कौसिक कहा छमिय अपराधू ।
बाल–दोष–गुन गनहिँ न साधू ।

विश्वामित्र म्हणाले, अपराधांची क्षमा करावी. बालकांच्या गुणदोषांकडे जाणकारानें कानाडोळाच केला पाहिजे.

कर कुठार मैँ अकरुनकोही ।
आगे अपराधी गुरुद्रोही ।
उतर देत छाँडउँ बिनु मारे ।
केवल कौसिक सील तुह्मारे ।
न तु एहि काटि कुठार कठोरे ।
गुरहि उरिन होतेउँ स्रम थोरे ।

तेव्हां परशुराम म्हणाले—माझ्यासारखा निष्कारण क्रोधी, व त्यांतून परशु हातांत असल्यावर व हा गुरुद्रोही माझा अपराधी माझ्यासमोर तोंड टाकून कुचेष्टा करीत असतांना देखील मी त्याला जीवंत सोडतों तें केवळ, हे कौशिक मुने ! तुमच्याच मुर्वतीं-खातर ! नाहींतर ह्या दांडग्या परशूनें ह्याचे तुकडे उडवून अल्प प्रयासांतच गुरूच्या ऋणांतून मुक्त झालों असतों.

**दो०–गाधिसूनु कह हृदय हँसि मुनिहि हरि- अरइ सूझ। अयमय खाँड न ऊखमय अजहुँ न बूझ अबूझ ॥ २७६ ॥**

विश्वामित्र मनांतल्या मनांत हंसून म्हणाले, अरेरे, ह्या मुनीस सारी हराळीच दिसत आहे. पिनाक धनुष्य ह्मणजे पोलादी तुळई. तें कांहीं उसाचें थोट नव्हे! अजूनदेखील हा याचा अडमुठेपणा सुटूं नयेना!

चौ०–कहेउ लषन मुनि सील तुम्हारा।
को नहिँ जान बिदित संसारा।
माता पितहि उरिन भये नीके।
गुररिन रहा सोच बड जी के।

लक्ष्मण म्हणाला, मुने! तुमची नेकी कोणास ठाऊक नाहीं? ती सर्व जगास जाहीर आहे. आई-बापांच्या ऋणांतून आपण शाबासकीनें पार पडलों. आतां गुरूंचें ऋण राहिलें. त्याची मात्र तुमच्या जीवाला फारच जळफळ लागलेली दिसते.

सो जनु हमरेहि माथे काढा।
दिन चलि गयेउ ब्याज बहु बाढा।
अब आनिय ब्यवहरिया बोली।
तुरत देउँ मैं थैली खोली।

तें ऋण जणुंकाय आपण माझ्याच माथीं मारलें असावें, आणि दिवसगत झाल्यामुळें त्याचें व्याज देखील बरेंच डोईजड झालें असेल. असो. आतां आपण धनकोस (गुरूस) बोलावून आणावें, म्हणजे मी आतांच्या आतां थैली मोकळी करून तें ऋण चुकतें करितों.

सुनि कटुबचन कुठारु सुधारा।
हाय हाय सब सभा पुकारा।
भृगुबर परसु देखावहु मोही।
बिप्र बिचारि बचउ नृपद्रोही।
मिले न कबहुँ सुभट रन गाढे।
द्विज देवता धरहिँ के बाढे।

ती तिखट भाषा ऐकतांच भार्गवानें परशु उगारला. सर्व सभेंत हाहाःकार उडाला. लक्ष्मण म्हणाला, हे भृगुश्रेष्ठा! मला परशु तुम्ही दाखवितां होय? तुम्ही राजद्रोही आहांत, तथापि ब्राह्मण म्हणून मी तुम्हांस वगळतों. तुम्हांला रणांत कोणी चांगला बेंजड मारगीर मिळालाच नाहीं असें वाटतें. ब्राह्मण आणि देवता ह्यांची प्रतिष्ठा घरांतल्या घरांत असते.

अनुचित कहि सब लोग पुकारे।
रघुपति सैनहिँ लषन निवारे।

हें भाषण बेताल म्हणून सर्वांनींच ओरड केली. रामांनीं लक्ष्मणास इशाऱ्यानें आवरलें.

**दो०–लषनउतर आहुतिसरिस भृगु-बर-कोप कृसानु। बढत देखि जलसम बचन बोले रघु-कुल-भानु ॥ २७७ ॥**

लक्ष्मणाच्या प्रत्युत्तररूपी आहुतीनें भार्गवाचा कोपाग्नि वाढलेला पाहून रघुकुलभानु जलसम वचन बोलते झाले.

चौ०–नाथ करहु बालक पर छोहू।
सूध दूधमुख करिय न कोहू।
जौं पै प्रभुप्रभाउ कछु जाना।
तौ कि बराबरि करइ अयाना।

हे नाथ! बालकावर कृपा करावी. तो केवळ दुग्धमुख आहे (अद्याप त्याचे दुधाचे दांत देखील पडले नाहींत.) त्यावर क्रोध करूं नये. जर प्रभूचा प्रभाव त्याला कांहीं माहीत असता तर तो अशी बरोबरी करिता काय? तो अल्लड आहे.

जौं लरिका कछु अचगरि करहीँ।
गुरु पितु मातु मोद मन भरहीँ।
करिय कृपा सिसु सेवकु जानी।
तुह्मसम सील धीर मुनि ज्ञानी।

बालकानें जरी कांहीं खोडी केली तरी गुरु, पिता, माता ह्यांचें मन हर्षभरितच होतें. आपणासारख्या सच्छील, धीर व ज्ञानी मुनींनीं त्यास आपला बालक व सेवक समजून त्यावर दयाच केली पाहिजे.

रामबचन सुनि कछुक जुडाने।
कहि कछु लषन बहुरि मुसुकाने।
हँसत देखि नखसिख रिस ब्यापी।
राम तोर भ्राता बड पापी।

---

१ पित्रर्णासाठीं कार्तवीर्य मारला व एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली. भार्गवाची आई रेणुका ही एकदां पाणी आणण्यास गेली असतांना तेथें गंधर्वमैथुन पाहात उभी राहिल्यामुळें तिला वेळ लागला. जमदग्नीनें त्या पापाच्या प्रायश्चित्तादाखल तिचा वध करण्याची आपल्या पुत्राला आज्ञा केली. त्याप्रमाणें परशुरामानें मातेचा वध करून तो तिच्या ऋणांतून मुक्त झाला. हा खोंच.

रामाचें वचन ऐकून परशुराम किंचित् थंडावले. पुन्हां लक्ष्मण कांहीं बोलला आणि हंसला. तो हंसत आहे असें पहातांच भार्गव नखशिखांत क्रुद्ध झाले आणि ह्मणाले, रामा ! तुझा हा भाऊ कमालीचा द्वाड आहे.

गौर सरीर स्याम मन माहीँ ।
काल–कूट–मुख पयमुख नाहीँ ।
सहज टेढ अनुहरइ न तोही ।
नीच मीचसम देख न मोही ।

हा शरीरानें गोरा पण मनांतून काळाकुट्ट आहे. हा दुधखुळा नसून विषओक्या आहे. हा जात्याच चटोर असून तुझ्या वळणावर मुळींच नाहीं. काळासारखा हा मी, पण हा नीच मलाहि कस्पट समजतो.

दो०–लषन कहेउ हँसि सुनहु मुनि क्रोध पाप कर मूल । जेहि बस जन अनुचित करहिँ चरहिँ विस्वप्रतिकूल ॥ २७८ ॥

लक्ष्मण हंसून म्हणाला, हे मुने ! ऐका. क्रोध म्हणजे पापाचें मूळच. त्याच्या तडाक्यांत सांपडलेला मनुष्य अनुचित कर्म करूं लागून अवघ्या जगास त्राहि भगवान् करून सोडतो.

चौ०–मैँ तुह्मार अनुचर मुनिराया ।
परिहरि कोप करिय अब दाया ।
टूट चाप नहिँ जुराहि रिसाने ।
बैठिय होइहहिँ पाय पिराने ।
जौँ अतिप्रिय तौ करिय उपाई ।
जोरिय कोउ बड गुनी बोलाई ।

अहो मुनिराया ! मी आपला दास आहे. आपण कोप आवरून आतां दया करावी. भग्न झालेलें धनुष्य आपल्या ताव खाण्यानें कधींच जुळावयाचें नाहीं. आपण जरा बसा तरी. उभें राहून राहून पायास गोळे येतील. हें धनुष्य जर आपल्यास जीव कीं प्राण असेल तर एखादा सुगड कारागीर बोलावून तें जोडूनहि पाहण्याचा उपाय करतां येईल.

बोलत लषनहिँ जनक डेराहीँ ।
मष्ट करहु अनुचित भल नाहीँ ।
थर थर कापहिँ पुर–नर–नारी ।
छोट कुमार खोट बड भारी ।

लक्ष्मण बोलत असतां जनक भयभीत झाला. तो म्हणाला, पुरें करा. हें अद्वातद्वा बोलणें चांगलें नव्हे. नगरवासी स्त्रीपुरुष थरथर कांपूं लागले. ते ह्मणत कीं, हें पोर एवढेंसें पण भारीच तिखट [१] !

भृगुपति सुनि सुनि निर्भय बानी ।
रिस तन जरइ होइ बलहानी ।

लक्ष्मणाची ती बेडर भाषा पुनःपुनः ऐकून भार्गवाचा देह क्रोधानें आंतल्याआंत जळूं लागला, आणि त्यामुळें त्यांची शक्ति क्षीण होऊं लागली.

बोले रामहिँ देइ निहोरा ।
बचउँ बिचारी बंधु लघु तोरा ।
मन मलीन तनु सुंदर कैसे ।
विष–रस–भरा कनकघट जैसे ।

रामाकडे रोंख वळवून भृगुपति म्हणाला, हा तुझा धाकटा भाऊ आहे ह्मणूनच मी त्याची गय करीत आहे. सुवर्णघटांत जसें विष तसा हा आंतून काळा आणि वरूनच तेवढा गोरा दिसतो.

दो०–सुनि लछिमन बिहँसे बहुरि नयन तरेरे राम । गुरु समीप गवने सकुचि परिहरि बानी बाम ॥ २७९ ॥

हें ऐकून लक्ष्मण पुन्हां हंसला. तेव्हां रामांनीं डोळे वटारले. तेव्हां लक्ष्मण दबला आणि तो आपलें दंडेफटकार भाषण बंद करून विश्वामित्राजवळ गेला.

चौ०–अतिबिनीत मृदु सीतल बानी ।
बोले राम जोरि जुगपानी ।

राम दोन्ही हात जोडून अति नम्र, कोमल आणि सौम्य शब्दांत म्हणाले.

सुनहु नाथ तुह्म सहज सुजाना ।
बालकबचन करिय नहिँ काना ।
बररै बालक एक सुभाऊ ।
इन्हहिँ न संत बिदूषहिँ काऊ ।

हे नाथ ! ऐकावें. आपण स्वभावतःच ज्ञाते आहांत. तेव्हां लेंकराचे बोल कानावर घेऊं नयेत. बरळणें हा पोरांचा सरसहा स्वभावच असतो. जाणकार लोक त्यांचें सोयरसुतक मानीत नसतात.

तेहि नाहीँ कछु काज बिगारा ।
अपराधी मैँ नाथ तुह्मारा ।

---

[१] यावरून स्पष्टच म्हणतां येतें कीं लक्ष्मणाची तिखट भाषा वापरणें हा त्याचा शत्रूवर मात करण्याचा पहिला डाव होता आणि त्यांत राम हे सिद्धसाधक होते.

कृपा कोप बध बंध गोसाईँ ।
मो पर करिय दास की नाईँ ।
कहिय बेगि जेहि बिधि रिस जाई ।
मुनिनायक सोइ करउँ उपाई ।

ह्याच्या हातून कोणतेंच काम बिघडलें नाहीं. महाराज ! आपला अपराधी असा मीच. स्वामींनीं मला सेवक समजून कृपा, कोप, वध किंवा बंध जें काय कर्तव्य असेल तें करावें. आपला राग कशानें शांत होईल तें शीघ्र कथन करा, म्हणजे, मुनिनायका ! मी तोच उपाय अमलांत आणीन.

कह मुनि राम जाइ रिस कैसे ।
अजहुँ अनुज तव चितव अनैसे ।
एहि के कंठ कुठार न दीन्हा ।
तौ मैँ काह कोप करि कीन्हा ।

मुनी ह्मणाले, रामा,हा राग कसा जावा ? अद्यापहि तुझा भाऊ माझ्याकडे तेढ्या आखेनें पाहतच आहे. त्याच्या मानगुटीवर जर हा कुठार घातला नाहीं तर मी क्रुद्ध होऊन तरी काय मिळाविलें ?

दो०-गर्भ स्रवहिँ अवनिपरवँनि सुनि कुठारगति घोर। परसु अछत देखउँ जितय बैरी भूपकिसोर ॥ २८० ॥

राजांच्या स्त्रियांचे गर्भ या माझ्या भयंकर परशूची फेरी ऐकतांच पतन पावतात. तो हा परशु माझ्या हातांत असून मी हा माझा वैरी, यःकश्चित् राजाचें पोर, जिवंत पाहत आहे ! !

चौ०-बहइ न हाथ दहइ रिस छाती ।
भा कुठार कुंठित नृपघाती ।
भयेउ बाम बिधि फिरेउ सुभाऊ ।
मोरे हृदय कृपा कसि काऊ ।
आजु दैव दुख दुसह सहावा ।
सुनि सौमित्रि बहुरि सिरु नावा ।

माझी छाती क्रोधानें जळत आहे तरी या कारट्यावर माझा हातच वाहत नाहीं. अरे नृपहिंसका ! कुठारा ! तूंहि थंडावलासना ! प्राक्तना, तूं देखील उलटलास! माझा स्वभावच पालटला.माझ्या हृदयांत, आणि दया ! हें आहे तरी काय ? विधे ! आज तूं मला दारुण दुःख सहन करण्यास लाविलेंस! हें ऐकतांच लक्ष्मण हंसला आणि नमस्कार करून ह्मणाला,—

बाउकृपा मूरति अनुकूला ।
बोलत बचन झरत जनु फुला ।

ह्या वरदमूर्तीचे बोलतांना जे उचाळ निघतात ते जणुंकाय कृपारूप वायूनें फुलेंच झडत आहेत असें वाटतें.

जौँ पै कृपा जरहिँ मुनि गाता ।
क्रोध भये तन राखु बिधाता ।

मुने ! दयेनें जर आपलीं गात्रें जळूं लागतात तर आपण क्रुद्ध झाल्यावर मात्र आपल्या देहाचा वाली एक परमेश्वरच.

देखु जनक हठि बालक एहु ।
कीन्ह चहत जड जमपुर गेहु ।
बेगि करहु किन आँखिन ओटा ।
देखत छोट खोट नृपढोटा ।

त्यावर भार्गवराम ह्मणाले, जनका ! पहा तर खरें हें अढाऊ कारटें ! हा बजरबट्टू यमपुरींत आपलें घर करण्याची इच्छा करीत आहे. ह्याला झटकन् माझ्या दृष्टीच्या आड तरी कां करीत नाहींस ? हा राजाचा कारटा दिसण्यांत कुसळ, पण आहे खरा मुसळच.

बिहँसे लषन कहा मुनि पाहीँ ।
मुँदे आँखि कतहुँ कोउ नाहीँ ।

लक्ष्मण हंसून मुनीस ह्मणाला, डोळे मिटले कीं कोठेंच कोणी दिसावयास नको.

दो०-परसुराम तब राम प्रति बोले उर अतिक्रोध । संभुसरासन तोरि सठ करसि हमार प्रबोध ॥ २८१ ॥

नंतर परशुराम रामास उद्देशून भरभक्कम चवताळून म्हणाले, अरे इब्लिसा ! शंभुचाप तोडून वर मला ज्ञानाच्या गोष्टी सांगत आहेस काय ? ( माझा गुरु बनतोस हा भाव. )

चौ०-बंधु कहइ कटु संमत तोरे ।
तूँ छल बिनय करसि कर जोरे ।
करु परितोष मोर संग्रामा ।
नाहिँ त छाडू कहाउव रामा ।

तुझ्याच चिथावणीनें तुझा बंधु माझ्या ह्या कुचाळ्या करीत आहे. तूंहि तरी हात जोडून आणि विनंति करून माझी प्रतारणाच आरंभिली आहेस. युद्धानेंच

---

१ लक्ष्मणाचा डाव कोठवर साधला याची ही कबुली आहे.

आतां माझी शांति कर, नाहींतर आपल्या राम या नांवाची सोडचिठ्ठी दे.

छल तजि करहि समर सिवद्रोही।
बंधुसहित न त मारउँ तोही।
भृगुपति बकहिँ कुठार उठाये।
मन मुसुकाहिँ राम सिर नाये।

अरे, शिवद्वेष्ट्या ! हा चाईपणा सोडून आतां तूं युद्धच कर. नाहींतर बंधुसकट तुला उडवतो. पहा परशुराम केवळ परशु उगारून बकतच, ह्मणून राम मनांतल्या मनांत हंसून त्यांना नमस्कार करीत.

गुनहु लषन कर हम पर रोषू।
कतहुँ सुधाइहु ते बड दोषू।

( राम म्हणाले. ) बदी लक्ष्मणाची आणि चीड मजवर ! प्रसंगाविशेषीं माधुरीहि माधुरी म्हणूनच घातुक ठरते तर.

टेढ जानि बंदइ सब काहू।
बक्र चंद्रमहि ग्रसइ न राहू।

अणदार[1] ह्मणूनच सर्व लोक चंद्राला वंदन करितात. राहू तरी तशा चंद्राला गिळीत नाहीं.

राम कहेउ रिस तजहु मुनीसा।
कर कुठार आगे यह सीसा।
जेहि रिस जाइ करिय सोइ स्वामी।
मोहि जानिय आपन अनुगामी।

राम म्हणाले, हे मुनींद्र ! आपण राग आवरा. आपल्या हातीं हा परशू आहे आणि माझें हें शिर समोर आहे. महाराज ! जेणेंकरून आपला राग शांत होईल तेंच आपण अवश्य करा. मी अगदीं आपल्या मर्जीप्रमाणें वागणार हीं आपल्या मनांत गांठ बांधून ठेवा.

**दो०—प्रभु सेवकहि समर कस तजहु विप्रवर रोसु। बेष बिलोकि कहेसि कछु बालकहू नहिँ दोसु ॥ २८२ ॥**

प्रभु आणि सेवक यांचें युद्ध कसें होणार ? ( ब्राह्मण सेव्य असून क्षत्रिय त्यांचे सेवक होत. ) हे विप्रश्रेष्ठ ! आपण रागास अगदीं हकलून लावा. आपला बाण लक्षून लक्ष्मण बोलला यांत मुलाकडे कांहींच कसूर नाहीं.

चौ०—देखि कुठार-बान-धनु-धारी।
भइ लरिकहि रिस बीरु बिचारी।
नाम जान पै तुम्हहिँ न चन्हिा।
बंससुभाव उतरु तेइ दीन्हा।

आपण परशु, बाण व चाप धारण केल्यामुळें कोणी वीर आहां असें वाटून त्या लेंकरासहि ईर चढली. त्यास आपलें नुसतें नांव मात्र माहीत, प्रत्यक्ष ओळख मुळींच नाहीं. त्यामुळें त्यानें आपल्या आनुवंशिक[1] स्वभावाप्रमाणें भाषा वापरली.

जौं तुम्ह अवतेहु मुनि की नाईं।
पदरज सिर सिसु धरत गोसाईं।
छमहु चूक अनजानत केरी।
चहिय विप्रउर कृपा घनेरी।

जर आपण केवळ मुनिवेषानें आला असता, तर महाराज ! आपली पायधूळ त्या लेंकरानें देखील आपल्या मस्तकावरच घेतली असती. अजाणपणामुळें चूक झाली त्याबद्दल क्षमा करावी. ब्राह्मणांच्या हृदयांत दया विपुल असली पाहिजे.

हमहिँ तुम्हहिँ सरवर कस नाथा।
कहहु न कहाँ चरन कहँ माथा।

हे नाथ ! आपली व आमची बरोबरी कशी होईल सांगा बरें ! कोठें मस्तक आणि कोठें चरण !

राम मात्र लघु नाम हमारा।
परसुसहित बड नाम तुह्मारा।

माझें नांव नुसतें 'राम' च परंतु आपलें नांव इतकें प्रभावी कीं, त्याच्या मागें 'परशू' चा पहारा लावावा लागतो.[2]

देव एकगुन धनुष हमारे।
नवगुन परम पुनीत तुह्मारे।

---

[1] पौर्णिमेखेरीज इतर तिथीला चंद्राची अणीदार कोर गळ्याला रुतेल म्हणून राहू त्याला गिळीत नाहीं. असा कविसंकेत.

[1] येथें वंश हा शब्द द्व्यर्थी आहे. एक सर्पकुल व दुसरें रघुकुल.

[2] रामास आपलें नांव सोडून देण्याविषयीं परशुराम बोलले होते, त्यावर हें उत्तर आहे. राम म्हणतात, माझ्या लहानशा नांवाचा जर आपणाला कंटाळा असेल तर आपल्या दहशत घालणाऱ्या नांवाचा आपणांस विशेषच कंटाळा आला पाहिजे. तेव्हां आपणच आपलें नांव आधीं सोडायला हवें.

महाराज ! आमच्यांत गुण काय तो एकच, आणि तो म्हटला म्हणजे आमचें धनुष्य. आपले ठिकाणीं तर अत्यंत पवित्र असे नऊ गुण आहेत.

सब प्रकार हम तुम्ह सन हारे।
छमहु बिप्र अपराध हमारे।

मी सर्व प्रकारें आपल्यासमोर जेर आहे. हे विप्रवर ! माझ्या अपराधांची आपण माफी द्यावी.

दो०—बार बार मुनि बिप्रवर कहा राम सन राम। बोले भृगुपति सरुष होइ तहूँ बंधुसम बाम ॥ २८३ ॥

रामांनीं परशुरामास वारंवार मुनी, विप्रवर अशा रीतीनें संबोधल्याकारणानें संतप्त होऊन परशुराम म्हणाले, तूंहि आपल्या बंधूसारखाच कुभांडी आहेस तर.

चौ०—निपटहि द्विज करि जानहि मोही।
मैं जस बिप्र सुनावउँ तोही।

मला तूं निवळ ब्राह्मण समजलास होय ? मी ब्राह्मण कसा तें तुला सांगतों.

चाप स्रुवा सर आहुति जानू।
कोप मोर अतिघोर कृसानू।
समिधि सेन चतुरंग सुहाई।
महामहीप भये पसु आई।
मैं यह परसु काटि बलि दीन्हे।
समरजज्ञ जग कोटिक कीन्हे।

लक्षांत ठेव; माझें धनुष्य हाच स्रुवा ( यज्ञपात्र ), शर ही आहुती, माझा कोप हा अतिप्रखर अग्नि, आणि उत्तम चतुरंग दळें ह्या समिधा होत. यज्ञपशु होऊन आलेल्या मोठमोठ्या राजांना मीं ह्याच परशूनें कापून काढून यांचीं अवदानें दिलीं आहेत. असे कोट्यावधी रणयज्ञ मीं या जगांत केले आहेत.

मोर प्रभाव बिदित नहिं तोरे।
बोलसि निदरि बिप्र के भोरे।
भंजेउ चाप दाप बड बाढा।
अहमिति मनहुँ जीति जग ठाढा।

१ ब्राह्मगुण तोहे 'शमो दमस्तपः शौचं शांतिरार्जवमेव च। ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं'. शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनं। दानमीश्वरभावश्च ॥ ( भगवद्गीता ). हे सर्व क्षात्रियांचे गुण धनुष्याश्रयी असल्याकारणानें धनुष्य हाच प्रधान गुण येथें धरला आहे.

माझा तडाखा तुला माहीत नाहीं, म्हणून तूं तुच्छतेनें विप्र वगैरे संबोधनें देतोस. धनुर्भंग केल्यामुळे तुला फार गुर्मी चढली आहे म्हणूनच तूं जगज्जेता स्वतःस समजतोस आणि दिमाख दाखवितोस.

राम कहा मुनि कहहु बिचारी।
रिस अति बडि लघु चूक हमारी।
छुवतहि टूट पिनाक पुराना।
मैं केहि हेतु करउँ अभिमाना।

राम म्हणाले मुने ! विचारपूर्वक तरी बोला. आमची चूक असल्यास ती यत्किंचित् पण आपला क्रोध मात्र प्रमाणाबाहेर आहे. तें जुनकट गंजलेलें पिनाक तर स्पर्श करितांक्षणींच दुभंगलें, त्यांत मला मस्ती चढण्याचें कारणच काय ?

दो०—जौं हम निदरहिं बिप्र बदि सत्य सुनहु भृगुनाथ। तौ अस को जग सुभट जेहि भयबस नावहिं माथ ॥२८४॥

हे भृगुनाथ ! आम्ही विप्र वगैरे निर्वाल्यानें आपली टर उडवीत आहों असें जर आपणांस वाटत असेल तर जगांत असा कोण शहाजोग वीर आहे कीं, ज्यास भेदरून जाऊन आम्हीं आपली मान वाकवावी.

चौ०—देव दनुज भूपति भट नाना।
समबल अधिक होउ बलवाना।
जौं रन हमहिं प्रचारइ कोऊ।
लरहिं सुखेन काल किन होऊ।

देव, दैत्य, राजे इत्यादि अनेक वीर आमच्या बरोबरीचे असोत किंवा आह्मांहून बलानें वरचढ असोत, परंतु त्यांपैकीं जर कोणी आह्मांला युद्धासाठीं आव्हान देईल तर त्याच्याशीं—मग तो प्रत्यक्ष काळदेखील असेना—आह्मी आनंदानें झुंजूं.

छत्रियतनु धरि समर सकाना।
कुलकलंक तेहि पावर जाना।
कहउँ सुभाव न कुलहि प्रसंसी।
कालहु डरहिं न रन रघुबंसी।

क्षात्रदेह धारण करून क्षात्रियानें युद्धास भिणें हा क्षात्रकुलास कलंक आहे. अशास नीच आत्मघातकी समजावें. मी ही स्वकुळाची प्रशंसा अर्थवाद म्हणून करीत नाहीं तर केवळ कुळाचा खरा स्वाभाविक धर्म सांगतों कीं, एकवेळ रणांत काळहि कदाचित्

नांगी टाकील परंतु रघुवंशी कदापिदेखील शत्रूचा मिंधा बनणार नाहीं.

विप्रबंस कै असि, प्रभुताई ।
अभय होइ जो तुम्हहि डेराई ।

विप्रकुलाचा महिमाच असा आहे कीं, तुम्हांस जो वचकून राहील तो निर्भय होईल.

सुनि मृदुबचन गूढ रघुपति के ।
उघरे पटल परसु–धर–मति के ।
राम रमापति कर धनु लेहू ।
खैंचहु मिटइ मोर संदेहू ।

तें मृदु परंतु ' गूढ ' असें रघुपतीचें भाषण ऐकून परशुरामाच्या बुद्धीवरील पटल दूर झालें; व ते ह्मणाले रामा ! हे रमापतीचें धनुष्य घे आणि ओढ, म्हणजे माझा संशय तरी फिटेल.

देत चाप आपुहि चलि गयेऊ ।
परशुराम मन बिसमय भयेऊ ।

धनुष्य देतांक्षणींच तें आपोआपच चढलें. परशुरामाच्या मनाला त्याचा विस्मय वाटला.

दो०–जाना रामप्रभाव तब पुलक प्रफुल्लित गात । जोरि पानि बोले बचन हृदय न प्रेम समात ।। २८५ ।।

तेव्हां त्यांनीं रामचंद्राचा प्रभाव जाणला. त्यांचा देह रोमांचानीं प्रफुल्लित होऊन त्यांचें प्रेम हृदयांत मावेना. नंतर ते हात जोडून म्हणाले,—

चौ०–जय रघुबंस-बनज-बन-भानू ।
गहन-दनुज-कुल-दहन कृसानू ।
जय सुर–बिप्र–धेनु–हित–कारी ।
जय मद–मोह–कोह–भ्रम–हारी ।
बिनय–सील–करुना–गुन–सागर ।
जयति बचनरचना अतिनागर ।
सेवकसुखद सुभग सब अंगा ।
जय सरीरछबि कोटिअनंगा ।

हे रघुवंश कमलवनभानो ! हे दुष्टदैत्यदहन–कृशानो ! हे सुरविप्रधेनुहितकारी ! हे मदमोहक्रोधभ्रमहारी ! तुझा विजय असो. हे विनयशील करुणागुणसागरा ! हे वाग्विलासातिकुशला ! हे सेवकसुखदा! हे सर्वांगमनोहरा ! हे कोटयनंगसुंदरा ! तुझा जयजयकार असो.

करउँ काह मुख एक प्रसंसा ।
जय महेस–मन–मानस–हंसा ।
अनुचित बचन कहेउँ अज्ञाता ।
छमहु छमामंदिर दोउ भ्राता ।
कहि जय जय जय रघु–कुल–केतू ।
भृगुपति गये बनहि तप हेतू ।

मी एका मुखानें तुझी काय स्तुति करावी ? हे महेशमनमानसहंसा ! तुझा विजय असो. अज्ञानेंकरून मी अनुचित बोललों त्याची, हे क्षमासागरबंधूंनों ! क्षमा करा. ह्याप्रमाणें रघुकुलकेतूचा जयजयकार करून भृगुकुलकेतु वनांत तपास्तव निघून गेले.

अपभय सकल महीप डेराने ।
जहँ तहँ कायर गवहिं पराने ।

जे कुत्सित राजे निर्धास्त होते ते भेदरून गेले, आणि त्यांनीं स्वतःची पांगापांग करून घेतली.

दो०–देवन दीन्ही दुंदुभी प्रभु पर बरषहिं फूल । हरषे पुर–नर–नारि सब मिटा मोहमय सूल ।। २८६ ।।

देवांनीं दुंदुभी त्राहाटिल्या आणि प्रभूवर पुष्पवृष्टि केली. नगरवासी स्त्रीपुरुष सर्व आनंदित होऊन त्यांची मोहमय चिंता निवारण झाली.

चौ०–अति गहगहे बाजने बाजे ।
सबहिं मनोहर मंगल साजे ।
जूथ जूथ मिलि सुमुखि सुनयनी ।
करहिं गान कल कोकिलबयनी ।

वाद्यांचा कडकडाट होऊं लागला. सर्व मनोहर मंगलसाहित्य सिद्ध झालें. सुंदर स्त्रिया आपापले मेळे करून कोकिलस्वरानें मधुर गायन करूं लागल्या.

सुख बिदेह कर बरनि न जाई ।
जनमदरिद्र मनहुँ निधि पाई ।
बिगतत्रास भइ सीय सुखारी ।
जनु बिधु उदय चकोरकुमारी ।

जन्मदरिद्याला गडंत लाभल्याप्रमाणें राजा विदेहाचा आनंद अवर्णनीय झाला. चंद्रोदयामुळें ज्याप्रमाणें चक्रवाकी हर्षित होते तशी सीता विगतशोक होत्साती सुखी झाली.

१ या शब्दावरून भृगुचिन्हाकडेस रामाचा अङ्गुलीनिर्देश सूचित होतो. त्यास आधार पुढील चौपाई.

जनक कीन्ह कौसिकहि प्रनामा ।
प्रभुप्रसाद धनु भंजेउ रामा ।
मोहि कृतकृत्य कीन्ह दुहुँ भाई ।
अब जो उचित सो कहिय गोसाईँ ।

जनक कौशिकास प्रणाम करून म्हणाले, प्रभूंच्या प्रसादानेंच रामांनीं धनुष्यभंग केला, आणि उभय बंधूंनीं मला कृतार्थ केलें. आतां जें उचित दिसेल तें स्वामींनीं करावें.

कह मुनि सुनु नरनाथ प्रबीना ।
रहा बिबाह चापआधीना ।
टूटतही धनु भयेउ बिबाहू ।
सुर नर नाग बिदित सब काहू ।

मुनी म्हणाले, राजा, ऐक. तूं चतुरच आहेस. विवाह हा धनुष्यभंगावर अवलंबून होता. तो होतांच विवाह होऊन चुकला. ह्यास सुरनरनाग इत्यादि सर्व साक्षी आहेत.

दो०—तदपि जाइ तुह्म करहु अब जथा-
बंस-ब्यवहारु । बूझि बिप्र कुल बृद्ध
गुरु बेदबिदित आचारु ॥ २८७ ॥

तथापि, आतां जाऊन विप्र, कुलवृद्ध आणि गुरु यांच्या संमतीनें वैदिक पद्धतीनें आपल्या कुळास उचित असा व्यवहार कर.

चौ०—दूत अवध पुर पठवहु जाई ।
आनहिँ नृप दसरथहि बोलाई ।
मुदित राउ कहि भलेहि कृपाला ।
पठये दूत बोलि तेहि काला ।

जा, आणि अयोध्येस हलकारा पाठवून राजा दशरथास बोलावून आण. ' बरें आहे महाराज ! ' असें म्हणून राजानें आनंदानें त्याच वेळेस अयोध्येला दूत रवाना केले.

बहुरि महाजन सकल बोलाये ।
आइ सबन्हि सादर सिरु नाये ।
हाट बाट मंदिर सुरबासा ।
नगर सवाँरहु चारिहु पासा ।

नंतर राजानें सर्व शेटसावकार—मंडळी बोलाविली. सर्वांनीं येऊन लवून मुजरे केले. बाजार, रस्ते, घरें, वगैरे चहुतर्फा शहर शृंगारण्याची त्यांना आज्ञा झाली.

हरषि चले निज निज गृह आये ।
पुनि परिचारक बोलि पठाये ।

रचहु बिचित्र बितान बनाई ।
सिर धरि बचन चले सचुपाई ।

मंडळी आनंदानें आपल्या घरीं परतली. नंतर राजानें कारागीर मंडळीस बोलावणें केलें, आणि चित्रविचित्र मंडप तयार करण्यास त्यांना आज्ञा दिली. ती आज्ञा मान्य करून ते आनंदानें निघाले.

पठये बोलि गुनी तिन्ह नाना ।
जे बितान-बिधि-कुसल सुजाना ।
बिधिहि बंदि तिन्ह कीन्ह अरंभा ।
बिरचे कनककदलि के खंभा ।

त्यांनीं मंडप उभारण्याच्या कामीं चतुर आणि कुशल असे अनेक तज्ञ बोलाविले. त्यांनीं शास्त्र-विधिपूर्वक प्रारंभ केला व सुवर्णमय केळीचे खांब उभारले.

दो०—हरितमनिन्ह के पत्र फल पदुमराग
के फूल । रचना देखि बिचित्र अति
मन बिरंचि कर भूल ॥ २८८ ॥

पानें व केळीं पाचेचीं केलीं व पद्मरागांचीं केळफुलें केलीं. ती अत्यंत विचित्र रचना पाहून ब्रह्मदेवाच्याहि मनाला भुरळ पडली.

चौ०—बेनु हरित-मनि-मय सब कीन्हे ।
सरल सपरन परहिँ नाहिँ चीन्हे ।
कनककलित अहिबेलि बनाई ।
लखि नहिँ परइ सपरन सुहाई ।

सर्व कळकाचीं झाडें पाचेचीं केलीं होतीं, तीं सरळ असून पानांसकट होतीं व तीं ओळखलीं जात नव्हतीं. सोन्याच्या तारेच्या सुंदर नागवेली पानांसकट बनविल्या होत्या त्याही ओळखतां येईनात.

तेहि के-रचि पचि बंध बनाये ।
बिच बिच मुकुता दाम सुहाये ।
मानिक मरकत कुलिस पिरोजा ।
चीरि कोरि पचि रचे सरोजा ।

सोन्याच्या तारेचींच बंधनें दाट पच्ची केलीं होतीं. मधून मधून मोत्यांचे सर सोडले होते. माणीक, नीळ, हिरे, पाच हे चिरून त्यांच्या पत्त्या गच्च बसवून त्यांचीं कमळें बनविलीं होतीं.

किये भृंग बहुरंग बिहंगा ।
गुंजहिँ कूजहिँ पवनप्रसंगा ।
सुरप्रतिमा खंभन्हि गढि काढी ।

मंगलद्रव्य लिये सब ठाढी।
चौके भाँति अनेक पुराई।
सिंधुर–मनि–मय सहज सुहाई।

भ्रमर आणिक अनेक रंगांचे पक्षी केलेले होते. ते वाऱ्याच्या जोरावर शब्द करीत असत. खांबांमध्यें सर्व देवतांच्या प्रतिमा मंगलद्रव्यें घेऊन उभ्या आहेत अशा सुबक कोरल्या होत्या. तऱ्हेतऱ्हेचे स्वस्तिकाचे चौरंग माणकें जडवून फारच सुंदर केले होते.

दो०–सौरभपल्लव सुभग सुठि किये नील–मनि–कोरि। हेमबौर मरकत बवरि लसत पाटमय डोरि॥ २८९॥

नीलमण्यांचीं आंब्याचीं पानें सुंदर बनविलीं होतीं. सोन्याचीं बोरें आणि नीळांच्या कयऱ्या रेशमाच्या दोरींत ओंवल्यामुळें फारच सुंदर दिसत होत्या.

चौ०–रचे रुचिर बर बंदनवारे।
मनहुँ मनोभव फंद सवाँरे।
मंगल कलस अनेक बनाये।
ध्वजपताक पट चँवर सुहाये।
दीप मनोहर मनिमय नाना।
जाइ न बरनि बिचित्र बिताना।

तोरणें अशीं सर्वोत्कृष्ट उभारलीं होतीं कीं जणुंकाय ते मदनाचे पाशच आहेत, असें वाटे. अनेक मंगल कलश ठेविले असून ध्वज, पताका, रेशमी झेंडे आणि चौऱ्या हींहि झळकत होतीं. अनेक मनोहर रत्नदीप लाविले असून त्या मंडपाची चित्रविचित्र शोभा अवर्णनीय होती.

जेहिं मंडप दुलहिनि बैदेही।
सो बरनइ अस मति कबि केही।
दूलह राम रूप-गुन-सागर।
सो बितान तिहुँ लोक उजागर।

ज्या मंडपांत जानकी ही वधू आणि रूपगुणसागर राम हा वर, तो त्रैलोक्यांतहि अद्वितीय होय. त्याचें वर्णन करण्यास कोणच्या कवीची बुद्धि समर्थ आहे?

जनकभवन कै सोभा जैसी।
गृह गृह प्रति पुर देखिय तैसी।
जेहिं तिरहुति तेहि समय निहारी।
तेहि लघु लगत भुवन दस चारी।
जो संपदा नीचगृह सोहा।
सो बिलोकि सुरनायक मोहा।

जनकाच्या राजवाड्याची शोभा गांवांतील प्रत्येक घरीं दृग्गोचर होत होती. त्या वेळीं ज्यांनीं म्हणून जनकाचें राज्य पाहिलें होतें त्याला चतुर्दश भुवनेंहि तुच्छ वाटत असत. तेथील एकाद्या नीच गृहांत जी संपत्ति वसत होती ती पाहून इंद्रदेखील मोहित होत होता.

दो०–बसइ नगर जेहि लच्छि करि कपट नारिबर बेषु। तेहि पुर कै सोभा कहत सकुचहिँ सारद सेषु॥ २९०॥

ज्या नगरांत सुंदर कपट स्त्रीवेष घेऊन साक्षात् महालक्ष्मी नांदत होती त्याचें सौंदर्य वर्णन करण्यास सरस्वती आणि शेष देखील संकोचतील.

चौ०–पहुँचे दूत रामपुर पावन।
हरषे नगर बिलोकि सुहावन।
भूपद्वार तिन्ह खबर जनाई।
दसरथ नृप सुनि लिये बोलाई।

इकडे जनकाचे दूत पावन अशा अयोध्येंत जाऊन पोंचले. तें रम्य नगर पाहतांच ते हर्षित झाले. त्यांनीं राजद्वारीं जाऊन आपण आल्याची वर्दी दिली. ती ऐकून राजा दशरथानें त्यांस बोलाविलें.

करि प्रनाम तिन्ह पाती दीन्ही।
मुदित महीप आपु उठि लीन्ही।
बारि बिलोचन बाँचत पाती।
पुलक गात आई भरि छाती।
राम लषन उर कर बर चीठी।
रहि गये कहत न खाटी मीठी।
पुनि धरि धीर पत्रिका बाँची।
हरषी सभा बात सुनि साँची।

दूतांनीं मुजरा करून पत्र देण्यास काढिलें तों तें राजानें आनंदानें स्वतः उठून घेतलें. पत्र वाचीत असतां राजाच्या नेत्रांत आनंदाश्रु आणि अंगावर रोमांच येऊन त्याचें हृदय भरून आलें. हृदयांत रामलक्ष्मण आणि हातांत ती रोचक पत्रिका अशा स्थितींत राजा बरेंवाईट कांहींहि न बोलतां मुग्धच राहिला. त्यानें पुन्हां धीर धरून पत्र वाचलें. ऐकलेलीच गोष्ट खरी म्हणून सभा हर्षित झाली.

खेलत रहे तहाँ सुधि पाई।
आये भरत सहित हित भाई।
पूछत अतिसनेह सकुचाई।
तात कहाँ तेँ पाती आई।

भरत शत्रुघ्न खेळत होते तेथेंच ही खुषखबर त्यांना कळल्यामुळें तेहि आपल्या जिगरी दोस्तासह तेथें आले व अतिप्रेमानें पण मर्यादापूर्वक त्यांनीं विचारलें, बाबा ! हें पत्र कोठून आलें ?

**दो०—कुसल प्रानप्रिय बंधु दोउ अहहिँ कहहु केहि देस । सुनि सनेहसाने बचन बाँची बहुरि नरेस ॥ २९१ ॥**

आमचे जीवलग दोघेहि बंधु कुशल आहेतना ? ते कोणत्या देशांत आहेत ? सांगा कीं हो एकदां. त्यांचे ते प्रेमभरित प्रश्न ऐकून राजानें फिरून एकदां पत्र वाचलें.

**चौ०—सुनि पाती पुलके दोउ भ्राता ।**
**अधिक सनेह समात न गाता ।**
**प्रीति पुनीत भरत कै देखी ।**
**सकलसभा सुख लहेउ बिसेखी ।**

पत्रांतील मजकूर ऐकून दोघेहि बंधु रोमांचित झाले. त्यांचा प्रेमातिशय त्यांच्या हृदयांत मावेना. भरताचें अत्यंत पुनीत प्रेम पाहून सर्व सभेस विशेषच आनंद झाला.

**तब नृप दूत निकट बैठारे ।**
**मधुर मनोहर बचन उचारे ।**

नंतर राजानें दूतांस जवळ बसविलें आणि त्यांच्याशीं तो गोड व मोहक असें भाषण करूं लागला.

**भैया कहहु कुसल दोउ बारे ।**
**तुम्ह नीके निजनयन निहारे ।**
**स्यामल गौर धरे धनुभाथा ।**
**बय किसोर कौसिकमुनि साथा ।**
**पहिचानहु तुम्ह कहहु सुभाऊ ।**
**प्रेमबिबस पुनि पुनि कह राऊ ।**

बाबांनो ! माझ्या दोन्हीहि कुमारांचें कुशल वर्तमान सांगा. तुम्ही स्वतः डोळ्यांनीं ते श्यामल, गौर, धनुष्य व भाते घेतलेले, किशोरवयी, विश्वामित्र ऋषींच्या समवेत असलेले चांगले पाहिलेत ना ? तुम्ही त्यांना ओळखलें असेल तर सांगा पाहूं. प्रेमविवश होत्साता तो स्वाभाविकपणेंच तेच ते प्रश्न विचारूं लागला.

**जा दिन तें मुनि गये लेवाई ।**
**तब तें आजु साँचि सुधि पाई ।**
**कहहु बिदेह कवन बिधि जाने ।**
**सुनि प्रिय बचन दूत मुसुकाने ।**

विश्वामित्र त्यांना घेऊन गेल्या दिवसापासून आजच त्यांची खात्रीलायक खबर मिळाली. जनकानें त्यांस कसें ओळखलें तें सांगा. तें प्रियवचन ऐकून दूत हंसूं लागले.

**दो०—सुनहु मही–पति–मुकुट–मनि तुम्ह सम धन्य न कोउ । राम लषन जिन्ह के तनय बिस्वबिभूषन दोउ ॥ २९२ ॥**

हे भूपालमुकुटमणे ! श्रवण करा. विश्वाला ललामभूत असे रामलक्ष्मण ज्याचे पुत्र त्या आपल्यासारखा धन्य कोणीच नाहीं.

**चौ०—पूछन जोग न तनय तुम्हारे ।**
**पुरुषसिंह तिहुँ पुर उँजियारे ।**
**जिन के जस प्रताप के आगे ।**
**ससि मलीन रबि सीतल लागे ।**

आपले पुत्र ( —प्रताप ) विचारून सांगतां येण्यासारखे नाहींत. ज्यांच्या यशःप्रतापासमोर चंद्र मलिन व सूर्य शीतल वाटतो त्या पुरुषसिंहांनीं त्रैलोक्य दिपविलें आहे.

**तिन्ह कहँ कहिय नाथ किमि चीन्हे ।**
**देखिय रबि कि दीप कर लीन्हे ।**
**सीयस्वयंबर भूप अनेका ।**
**सिमिटे सुभट एक तें एका ।**
**संभुसरासन काहु न टारा ।**
**हारे सकल बीर बरियारा ।**

त्यांना आमच्या महाराजांनीं कसें ओळखलें असें आपण विचारिलें. पण सूर्यास पहाण्यास दिवा घ्यावा लागतो काय ? सीतास्वयंवरासाठीं एकाहून एक खंदे वीर असे अनेक राजे जमले होते, परंतु शिवचापाचा भंग एकाच्याहि हातून झाला नाहीं. सर्व राजांना नाइलाजास्तव हार खावी लागली.

**तीनि लोक महँ जे भट मानी ।**
**सब कै सकति संभुधनु भानी ।**
**सकइ उठाइ सुरासुर मेरू ।**
**सोउ हिय हारि गयेउ करि फेरू ।**
**जेइ कौतुक सिवसैल उठावा ।**
**सोउ तेहि सभा पराभव पावा ।**

त्रैलोक्यांतील सर्व अहंमन्य वीरांची शक्ति शंभु-

चापानें आटवून टाकली. देव व दैत्य मेरूपर्वत उचलूं शकले, पण तेदेखील मनांत कच खाऊन त्याला प्रदक्षिणा घालून परत फिरले. ज्यानें सहज लीलेनें कैलासपर्वत उचलला तो देखील त्या सभेंत पराभूतच झाला.

**दो०–तहाँ राम रघु–बंस–मनि सुनिय महामहिपाल । भंजेउ चाप प्रयास बिनु जिमि गज पंकजनाल ।। २९३ ।।**

हे चक्रवर्ती महाराज ! श्रवण करा. गजराज ज्याप्रमाणें कमलनाल सहज उपटतो तद्वत् त्या सभेंत रघुवंशमणी रामचंद्रानें अगदीं लीलेनें त्या चापाचा भंग केला.

चौ०–सुनि सरोष भृगुनायक आये ।
बहुत भाँति तिन्ह आँखि देखाये ।
देखि रामबलु निजधनु दीन्हा ।
करि बहु बिनय गवन बन कीन्हा ।

धनुर्भंग ऐकतांच भार्गव संतप्त होऊन तेथें आले, व त्यांनींहि रामलक्ष्मणांस अनेक प्रकारें दटावलें. अखेरीस रामाचें बळ अजमावण्यासाठीं आपलें धनुष्य त्याचे हातांत दिलें; परंतु सरतेशेवटीं भार्गव रामचंद्राची खूप स्तुति करून तपोवनांत निघून गेले.

राजन राम अतुलबल जैसे ।
तेजनिधान लषन पुनि तैसे ।
कंपहिँ भूप बिलोकत जा के ।
जिमि गज हरिकिसोर के ताके ।

महाराज ! जसे राम अप्रतिम बलवान् आहेत तसे लक्ष्मणदेखील तेजोनिधानच होत. सिंहाच्या छाव्याला पाहातांच ज्याप्रमाणें गज कांपूं लागतात तद्वत् राजे लक्ष्मणास पाहूनच भयकंपित होत होते.

देव देखि तव बालक दोऊ ।
अब न आँखि तर आवत कोऊ ।
दूत–बचन–रचना प्रिय लागी ।
प्रेम–प्रताप–बीर–रस–पागी ।

सरकार ! आपले उभय बालक पाहिल्यानंतर पृथ्वींत इतर कोणीच आतां डोळ्यांत भरत नाहीं. राजास दूतांची ती प्रेमप्रतापवीररसपरिप्लुत बोलण्याची शैली आवडली.

सभासमेत राउ अनुरागे ।
दुतन्ह देन निछावरि लागे ।
काहि अनीति ते मूदहिँ काना ।
धरमु बिचारि सबहिँ सुख माना ।

सभेसकट राजा संतुष्ट झाला, व त्यानें दूतांस देण्याकरितां इनामें काढिलीं. परंतु हा अधर्म असें ह्मणून दूतांनीं कानांवर हात ठेविले. तो त्यांचा धर्मविचार पाहून सर्वांसच आनंद झाला.

**दो०–तब उठि भूप बसिष्ठ कहँ दीन्हि पत्रिका जाइ । कथा सुनाई गुरुहि सब सादर दूत बोलाइ ।। २९४ ।।**

नंतर राजा उठून वसिष्ठांकडे गेला, व त्यानें त्यांस ती पत्रिका दिली, आणि दूतांस बोलावून सर्व वृत्तांत गुरुजींस सादर ऐकविला.

चौ०–सुनि बोले गुरु अति सुख पाई ।
पुन्यपुरुष कहँ महि सुख छाई ।
जिमि सरिता सागर महुं जाहीँ ।
जद्यपि ताहि कामना नाहीँ ।
तिमि सुख संपत्ति बिनहिँ बोलाये ।
धरमसील पहिँ जाहिँ सुभाये ।

तो ऐकून मुनी अपार हर्षित होऊन ह्मणाले, पुण्यपुरुषांसाठीं पृथ्वी सुखांनींच नेहमीं भरलेली असते. समुद्रास इच्छा नसूनहि जशा नद्या त्यास जाऊन मिळतात तद्वतच धर्मशील पुरुषाकडे सुख व संपत्ति अनाहूत आणि स्वाभाविकपणेंच लोटतात.

तुम्ह गुरु–बिप्र–धेनु–सुर सेबी ।
तसि पुनीत कौसल्या देबी ।
सुकृती तुम्ह समान जग माहीँ ।
भयउ न है कोउ होनउ नाहीँ ।

तूं गुरु, ब्राह्मण, देव व गाई ह्यांचा उपासक आहेस, व राणी कौसल्यादेखील तशीच पुण्यशील आहे. तुझ्यासारखा पुण्यवान् सध्यां विद्यमान नाहीं, मागें झाला नाहीं व पुढेंहि कोणी होणार नाहीं.

तुम्ह तेँ अधिक पुन्य बड का के ।
राजन राम सरिस सुत जा के ।
बीर बिनीत धरम–ब्रत–धारी ।
गुनसागर बर बालक चारी ।
तुम्ह कहँ सर्बकाल कल्याना ।
सजहु बरात बजाइ निसाना ।

हे राजा ! ज्याचे रामासारखे वीर, विनीत, धर्मधुरंधर व गुणसागर असे चार उत्तम पुत्र त्या

तुझ्यापरीस अधिक मोठें पुण्य कोणाचें आहे ? तुझं सर्वदा कल्याणच असणार. तेव्हां वरात सिद्ध कर आणि वाद्यगजर होऊं दे.

दो०—चलहु बेगि सुनि गुरुबचन भलेहि नाथ सिरु नाई। भूपति गवने भवन तब दूतन्ह बास देवाई॥ २९५॥

गुरुजींची आज्ञा ऐकतांच राजा 'ठीक आहे महाराज!' म्हणून त्यांस वंदन करून सत्वर निघाला, व दूतांच्या बिऱ्हाडाची व्यवस्था करावयास सांगून अंतःपुरांत गेला.

चौ०—राजा सब रनिवास बोलाई।
जनकपत्रिका बाँचि सुनाई।
सुनि संदेस सकल हरषानी।
अपरकथा सब भूप बखानी।

सर्व राण्यांस बोलावून राजानें जनकाची पत्रिका त्यांना वाचून दाखविली. पत्रिकेंतील वर्तमान ऐकून सर्वांस आनंद झाला. बाकीची सर्व हकीकत राजानें स्वतःच सांगितली.

प्रेमप्रफुल्लित राजहिँ रानी।
मनहुँ सिखिनि सुनि बारिदबानी।
मुदित असीस देहिँ गुरुनारी।
अति–आनंद–मगन महतारी।

राण्या प्रेमानं प्रफुल्लित दिसूं लागल्या. असें वाटे कीं, मयूरांनीं मेघगर्जनाच ऐकिली आहे. वृद्ध अरुंधती अत्यानंदांत निमग्न होऊन प्रेमानें आशीर्वाद देऊं लागली.

लेहिँ परसपर अतिप्रिय पाती।
हृदय लगाइ जुडावहिँ छाती।
राम लषन कै कीरति करनी।
बारहिँ बार भूप बर बरनी।

त्या एकमेकीं ती अत्यंत प्रियपत्रिका घेत व ती छातीशीं धरून हृदय शांत करीत. राजा दशरथ रामलक्ष्मणाच्या कृतींचें व यशाचें वारंवार रसाळ वर्णन करी.

मुनिप्रसाद कहि द्वार सिधाये।
रानिन्ह तब महिदेव बोलाये।
दिये दान आनंदसमेता।
चले बिप्रबर आसिष देता।

हा मुनींचाच प्रसाद असें म्हणून राजा राजद्वारीं गेला. नंतर राण्यांनीं ब्राह्मण बोलावून त्यांना आनंदानें दानें दिलीं. ब्राह्मण आशीर्वाद देऊन निघून गेले.

सो०—जाचक लिय हँकारि दीन्हि निछावरि कोटि बिधि। चिरजीवहु सुत चारि चक्रवर्ति दसरत्थ के॥३३॥

याचकांना बोलावून आणून त्यांनाहि कोट्यवधी दानें वाटलीं. चक्रवर्ती राजा दशरथाचे चारीहि पुत्र चिरंजीव होवोत—

चौ०—कहत चले पहिरे पट नाना।
हरषि हने गहगहे निसाना।
समाचार सब लोगन्ह पाये।
लागे घर घर होन बधाये।
भुवन चारि दस भयउ उछाहू।
जनक–सुता–रघु–बीर–बिबाहू।
सुनि सुभकथा लोग अनुरागे।
मग गृह गलीं सवाँरन लागे।

असें म्हणत नानाविध वस्त्रें पांघरून ते आनंदानें चालते झाले. निशाणें कडाक्यानें वाजूं लागलीं. सर्व लोकांना ही वार्ता कळल्यावर घरोघरीं उत्साह थाटूं लागला. श्रीसीतारामाचा विवाहोत्सव चतुर्दश भुवनांत भरून गेला. ती शुभवार्ता ऐकून लोक प्रेमानें घरें, रस्ते व आडमार्गीहि शृंगारूं लागले.

जद्यपि अवध सदैह सुहावनि।
रामपुरी मंगलमय पावनि।
तदपि प्रीति कै रीति सुहाई।
मंगलरचना रची बनाई।

रामाची नगरी म्हणून अयोध्या जरी सर्वदांच रमणीय, मंगलमय आणि पावन अशी होती, तथापि या वेळीं आपल्या आन्तरिक प्रेमाच्या भरांत लोकांनीं त्या नगरीची सुंदर रचना विशेषच खुलविली होती.

ध्वज पताक पट चामर चारू।
छावा परमबिचित्र बजारू।
कनककलस तोरन मनिजाला।
हरद दूब दधि अच्छत माला।

सुंदर ध्वज, पताका, पट, चामरें, सुवर्णकलश, तोरणें, मण्यांच्या जाळ्या, हळद, दूर्वा, दहीं, अक्षता, पुष्पहार, इत्यादि अत्यंत चित्रविचित्र वस्तूंची एकच गर्दी उडाली होती.

दो०—मंगलमय निज–निज–भवन लोगन्ह रचे बनाइ। बीथी सीची चतुरसम चौके चारु पुराइ ॥ २९६ ॥

सर्व लोकांनीं आपापलीं घरें शृंगारून सोडलीं होतीं. रस्ते मोठ्या चातुर्यानें सारखे सिंचित केले होते, आणि चौक सुंदर शृंगारले होते.

चौ०—जहँ तहँ जूथजूथ मिलि भामिनि।
सजि नवसप्त सकल-दुति दामिनि।
बिधुबदनी मृग–सावक–लोचनि।
निजसरूप रति–मान–बिमोचनि।
गावहिँ मंगल मंजुल बानी।
सुनि कलरव कलकंठ लजानी।

जिकडेतिकडे षोडश शृंगारयुक्त विजेप्रमाणें चमकणाऱ्या चंद्रमुखी, बालमृगाक्षी, रूपानें रतीचा मान हरण करणाऱ्या अशा युवतींचे थवेच्या थवे जमून सर्व मंजुल स्वरानें मंगल गाणीं गाऊं लागले. त्यांचा तो मधुर कंठ ऐकून कोकिळादेखील लाजत.

भूपभवन किमि जाइ बखाना।
बिस्वबिमोहन रचेउ बिताना।
मंगलद्रव्य मनोहर नाना।
राजत बाजत बिपुल निसाना।
कतहुँ बिरद बंदी उच्चरहीं।
कतहुँ बेदधुनि भूसुर करहीं।

राजवाड्यासंबंधानें बोलायचेंच काय ? विश्वास छक् करणारा असा मंडप घातलेला होता. अनेक मनोहर मंगलद्रव्यें जमविलीं होतीं. नानाप्रकारचीं निशाणें वाजत होतीं. कोठें बंदीजन ब्रीदावळी म्हणत, तर कोठें ब्राह्मण वेदघोष करीत.

गावहिँ सुंदरि मंगलगीता।
लेइ लेइ नाम राम अरु सीता।
बहुत उछाहु भवन अति थोरा।
मानहुँ उमगि चला चहुँ ओरा।

राम आणि सीता यांचीं नांवें घेऊन स्त्रिया मंगल गाणीं म्हणत असत. उत्साह अवाढव्य आणि स्थळ अत्यंत संकोचित असल्यामुळें असें वाटे कीं, तो चारीहि दिशांनीं फुटून वाहून चालला आहे.

दो०—सोभा दसरथ भवन कै को कबि बरनइ पार। जहाँ सकल-सुर-सीस-मनि राम लीन्ह अवतार ॥ २९७ ॥

ज्या दशरथाच्या राजमंदिरांत सकलदेवशिरोमणी रामचंद्रानें अवतार घेतला त्याची अपार शोभा कोणत्या कवीला वर्णवेल ?

चौ०—भूप भरत पुनि लिये बोलाई।
हय गय स्यंदन साजहु जाई।
चलहु बेगि रघु–बीर–बराता।
सुनत पुलक पूरे दोउ भ्राता।

राजानें भरतास बोलावून आज्ञा केली कीं, जाऊन हय, गज, रथ तयार ठेव. रामाची वरात लवकरच निघाली पाहिजे. तें ऐकून भरतशत्रुघ्न रोमांचपूर्ण झाले.

भरत सकल साहनी बोलाये।
आयसु दीन्ह मुदित उठि धाये।
रचि रुचि जीन तुरग तिन्ह साजे।
बरन बरन बरबाजि बिराजे।

भरतानें सर्व गजपती, हयपती, इत्यादिकांना बोलावून आज्ञा केली. तेव्हां ते हर्षित होऊन झपाट्यानें निघाले. त्यांनीं आपापल्या रुचीप्रमाणें खोगीर कसून घोडे सज केले, रंगारंगांचे खासे घोडे शृंगारले.

सुभग सकल सुठि चंचलकरनी।
अय इय जरत धरत पग धरनी।
नाना जाति न जाहिँ बखाने।
निदरि पवनु जनु चहत उडाने।

सर्वच घोडे नखरेदार, ऐटबाज आणि चपळ असत. तापलेल्या पोलादाप्रमाणें ते घोडे जमिनीवर टाप ठेवीत. त्यांच्या अनेक जाती सांगतां पुरवत नाहींत. ते जणुंकाय वाऱ्यासहि मागें सारून उडून जाऊं पाहत असत.

तिन्ह सब छैल भये असवारा।
भरतसरिस बय राजकुमारा।
सब सुंदर सब भूषनधारी।
कर सरचाप तून कटि भारी।

त्या सर्वांवर भरतासारखे समवयस्क सर्व राजपुत्र स्वार झाले. सर्वच सुरतबाज असून सर्वांनींच नखरेदार नग चढविले होते. सर्वांच्या हातांत मारदस्त धनुष्यबाण असून कमरेस भाते होते.

दो०—छरे छबीले छैल सब सूर सुजान नबीन। जुग–पद–चर असवारप्रति जे असि–कला–प्रबीन ॥ २९८ ॥

डीलडौल, शानशकल, नूरबफा, अकलकुवत यांनीं

मुसमुसलेले ते सर्व जवान गड्डु घोड्यावर स्वार होऊन आणि दोन दोन बहादर पटाईत पुढयास घेऊन भरताच्या कड्यांत उतरले.

चौ०—बाँधे बिरद बीर रनगाढे।
निकसि भये पुर बाहिर ठाढे।
फेरहिं चतुर तुरग गति नाना।
हरषहिं सुनि सुनि पनव निसाना।

रणधुरंधर वीर ब्रीदें (सन्मानाच्या खुणा) चढवून निघाले आणि शहराच्या बाहेर येऊन उभे राहिले. त्यांनीं कुशलतेनें तऱ्हेतऱ्हेच्या गतींनीं घोड्यांना फेर द्यावे, आणि पणवनिशाणादिकांचा गडगडाट ऐकून खुष व्हावें.

रथ सारथिन्ह बिचित्र बनाये।
ध्वज पताक मनि भूषन लाये।
चवँर चारु किंकिनि धुनि करहीं।
भानु—जान—सोभा अपहरहीं।

सारथ्यांनीं रथ चित्रविचित्र सजविले, व ध्वजपताका,रत्नभूषणें त्यांवर घातलीं. त्यांवर सुरेख चवऱ्या ढाळल्या जात होत्या, व घंटांचा नाद होत होता. त्यांनीं सूर्यरथाची शोभाच हिरावून घेतली आहे असें वाटे.

स्यामकरन अगनित हय होते।
ते तिन्ह रथन्ह सारथिन्ह जोते।
सुंदर सकल अलंकृत सोहे।
जिन्हहिं बिलोकत मुनिमन मोहे।
जे जल चलहिं थलहि की नाईं।
टाप न बूड बेग अधिकाईं।

अगणित श्यामकर्ण घोडे होते. ते सारथ्यांनीं त्या रथांस जुंपले. घोडे सुंदर आणि त्यांवर साजदेखील सुंदरच. त्यांना पाहून मुनींचीं देखील मनें आकर्षित होत असत. अगदीं जमिनीप्रमाणें ते पाण्यावर चालत, आणि भरधांव निघाले तरींदेखील त्यांच्या टापा भिजत नसत.

अस्त्र सस्त्र सब साज बनाई।
रथी सारथिन्ह लिये बोलाई।

शस्त्रास्त्रांची सर्व जय्यत तयारी करून सारथ्यांनीं आपापल्या मालकास बोलावून आणिलें.

**दो०—चढि चढि रथ बाहिर नगर लागी जुरन बरात। होत सगुन सुंदर सबन्हि जो जेहि कारज जात ॥ २९९ ॥**

रथांत बसून नगराबाहेर मिरवणूक जुळूं लागली. जो ज्या कार्यास्तव निघे त्यास उत्तमच शकुन होत.

चौ०—कलित करिबरन्हि परीं अँबारी।
कहि न जाइ जेहि भाँति सवाँरी।
चले मत्तगज घंट बिराजी।
मनहुँ सुभग सावन—घन—राजी।

धजबाज अशा मोठमोठाल्या हत्तींवर अंबाऱ्या चढल्या. ती मजा तर कांहीं औरच होता. मदोन्मत्त हत्ती चालूं लागले. म्हणजे त्यांच्या घंटा वाजत असत. त्यांना पाहून असें भासे कीं जणुंकाय श्रावणमासांतील सुंदर मेघपंक्तीच वळल्या आहेत.

बाहन अपर अनेकबिधाना।
सिबिका सुभग सुखासन जाना।
तिन्ह चढि चले बिप्र-बर-बृंदा।
जनु तनु धरे सकल-स्रुति-छंदा।

पालख्या वगैरे अनेक प्रकारचीं सुबक आणि सोइस्कर वाहनें होतीं. जणुंकाय सकल श्रुति आणि छंद यांनींच अवतार घेतले आहेत असा प्रतिष्ठित ब्रह्मवृंद त्यांत आरूढ होऊन निघाला होता.

मागध सूत बंदि गुनगायक।
चले जान चढि जो जेहि लायक।

मागध, सूत, बंदीजन इत्यादि स्तुतिपाठक आपापल्या योग्यतेनुरूप वाहनांवर स्वार होऊन निघाले.

बेसर ऊँट बृषभ बहु जाती।
चले बस्तु भरि अगनित भाँती।
कोटिन्ह काँवरि चले कहारा।
बिबिधबस्तु को बरनइ पारा।
चले सकल—सेवक—समुदाई।
निज—निज—साजु—समाजु बनाई।

खेचरें, उंट, बैल अशा अनेक जातींच्या वाहनांवर असंख्य प्रकारच्या वस्तु लादून रवाना झाल्या. ढिवरांच्या कोट्यवधी कावडी चालूं लागल्या. त्यांतील अनेक वस्तूंचें वर्णन करणें कसें पुरवेल ? सर्व सेवकमंडळी आपापली वर्दी चढवून व जमाव करून चालूं लागली.

**दो०—सब के उर निर्भर हरषु पूरित पुलक सरीर। कबहि देखिबइ नयन भरि राम लषन दोउ बीर ॥ ३०० ॥**

रामलक्ष्मण हे दोघे वीर आपण डोळे भरून केव्हां

एकदां पाहूं म्हणून सर्वजण हृदयांत हर्षनिर्भर होऊन त्यांचीं शरीरें रोमांचित झालीं होतीं.

चौ०—गरजहिँ गज घंटाधुनि घोरा।
रथरव बाजिहिंस चहुँ ओरा।
निदरि घनहिँ घुम्मरहिँ निसाना।
निज पराइ कछु सुनिय न काना।

गजघंटांचे नाद कडाक्यानें होत होते. चोहींकडे गाड्यांचा घडघडाट व घोड्यांचें खिंकाळणें चालू होतें. निशाणादि वाद्यांचा कडकडाट मेघनादालाहि मागें सारीत असे. आपपर कांहींच कानास ऐकूं येईना.

महाभीर भूपति के द्वारे।
रज होइ जाइ पषान पबारे।
चढी अटारिन्ह देखहिँ नारी।
लिये आरती मंगलथारी।
गावहिँ गीत मनोहर नाना।
अतिआनंद न जाइ बखाना।

राजद्वारीं इतकी भयंकर गर्दी उडाली कीं गर्दीमुळें फरसबंदीचाहि चूर उडाला. तबकांत मंगलारती घेऊन स्त्रिया माडीवर चढून पाहत आणि अनेक सुस्वर गाणीं गात. तो अत्यानंद वाखाणण्याची सोयच नाहीं.

तब सुमंत्र दुइ स्यंदन साजी।
जोते रबि–हय–निंदक बाजी।
दोउ रथ रुचिर भूप पहिँ आने।
नहिँ सारद पहिँ जाहिँ बखाने।
राजसमाज एक रथ साजा।
दूसर तेजपुंज अतिभ्राजा।

नंतर सुमंतानें दोन रथ सजवून त्यांस सूर्याश्वांनाहि मागें सारणारे घोडे जुंपले, व ते दोन्ही रथ त्यानें राजाकडे आणले. त्यांचें वर्णन सरस्वतीच्यानेंहि व्हावयाचें नाहीं. एक रथ राजसमाजाकरितां सिद्ध केला होता, व दुसरा अतिदैदीप्यमान आणि तेजःपुंज असा होता.

**दो०—तेहि रथ रुचिर बसिष्ठ कहँ हरषि चढाइ नरेसु। आपु चढेउ स्यंदन सुमिरि हर गुरु गौरि गनेसु ॥ ३०१ ॥**

त्या दुसऱ्या सर्वोत्कृष्ट रथांत राजानें वसिष्ठांस आनंदानें बसविलें, आणि तो स्वतःहि हर, गुरु, गौरी आणि गणेश ह्यांचें स्मरण करून त्यांत बसला.

चौ०—सहित बसिष्ठ सोह नृप कैसे।
सुर–गुरु–संग पुरंदर जैसे।

बृहस्पतीबरोबर जसा इंद्र तसा राजा वसिष्ठांबरोबर शोभूं लागला.

करि कुलरीति बेदबिधि राऊ।
देखि सबहि सब भाँति बनाऊ।
सुमिरि राम गुरुआयसु पाई।
चले महीपति संख बजाई।

कुलरीति आणि वैदिक आचार करून आणि सर्वांची सर्वतोपरी व्यवस्था पाहून राजा समस्मरणपूर्वक शंखादिकांच्या गजरांत गुरुजींची आज्ञा घेऊन चालूं लागला.

हरषे बिबुध बिलोकि बराता।
बरषहिँ सुमन सु–मंगल–दाता।

ती मिरवणूक पाहून देवांसहि आल्हाद झाला व ते मंगलप्रद होत्साते पुष्पवृष्टि करूं लागले.

भयउ कोलाहल हय गय गाजे।
ब्योम बरातबाजने बाजे।
सुर नर नाग सुमंगल गाई।
सरस राग बाजहिँ सहनाई।

हत्ती, घोडे, इत्यादिकांच्या कल्लोळानें एकच कोलाहल माजला. आकाशांत वरातीचीं वाद्यें वाजूं लागलीं. सुरनरनाग मंगलगायन करूं लागले. सनयांतून रसाळ रागदारी वाजूं लागली.

घंट–घंटि–धुनि–बरनि न जाहीँ।
सरव करहिँ पायक फहराहीँ।
करहिँ बिदूषक कौतुक नाना।
हासकुसल कलगान सुजाना।

घंटा आणि किंकिणी यांचा झणत्कार अवर्णनीय होता. पटाईत पट्टे फिरवूं लागले. खुषमस्करे आणि संगीतपटु भांड नानाप्रकारें नकला वगैरे गुलहौशीपणा करूं लागले.

**दो०—तुरग नचावहिँ कुअँर बर अकनि मृदंग निसान। नागर नट चितवहिँ चकित डगहिँ न ताल बँधान ॥ ३०२ ॥**

मृदंग व निषाण यांच्या तालावर राजपुत्र घोडे नाचवीत. ते यत्किंचित् देखील ताल चुकवीत नसत. तें पाहून नाट्यपटूंनीं देखील आश्चर्यच मानावें.

चौ०—बनइ न बरनत बनी बराता ।
होहिँ सगुन सुंदर सुभदाता ।
चारा चाषु बाम दिसि लेई ।
मनहुँ सकल मंगल कहि देई ।
दाहिन काग सुखेत सुहावा ।
नकुलदरस सब काहू पावा ।

ती मिरवणूक अवर्णनीय होती. सुखकारक व मंगल असे शकुन होऊं लागले. नीलकंठ डावे बाजूस चारा खाऊं लागले, जणुंकाय सर्व गोष्टी मंगलमय होणार असें ते सुचवीत. डावे बाजूस कावळे सुक्षेत्रीं बसलेले असत. नकुलदर्शन सर्वांसच होत होतें.

सानुकूल बह त्रिबिध बयारी ।
सघट सवाल आव बरनारी ।
लोवा फिरि फिरि दरस देखावा ।
सुरभी सनमुख सिसुहि पियावा ।

वायु त्रिविध आणि अनुकूल वाहूं लागला. कडेवर घागर असलेल्या सवत्स कुलीन सुवासिनी समोर येत असत. लावी पक्ष्यानें वारंवार दृष्टीस पडावें. गायींनीं समोरच वासरें पाजावीं.

मृगमाला फिरि दाहिनि आई ।
मंगलगन जनु दीन्ह देखाई ।
छेमकरी कह छेम बिसेखी ।
स्यामा बाम सुतरु पर देखी ।
सनमुख आयउ दधि अरु मीना ।
करपुस्तक दुइ बिप्र प्रबीना ।

मृगांचे कळप उजवीकडे येऊन जणुंकाय त्यांनीं मंगलच सूचित केलें. क्षेमकरी पक्ष्यांनीं क्षेम जाणविलें. डावे बाजूस श्यामा सुंदर वृक्षावर दृष्टीस पडली. दहीं आणि मासे दृष्टीस पडून हातांत पुस्तक घेतलेले असे विद्वान् ब्राह्मण जोडीजोडीनें समोर आले.

**दो०—मंगलमय कल्यानमय अभिमत-फल-दातार । जनु सब साँचे होन हित भये सगुन एक बार ॥ ३०३ ॥**

मंगलमय, कल्याणमय आणि वांछित फलदायक असे शकुन आपली सत्यता स्थापित व्हावी म्हणूनच कीं काय सर्वांचा एकसमयावच्छेदेंकरूनच समारोह होऊं लागला.

चौ०—मंगल सगुन सुगम सब ता कें ।
सगुन ब्रह्म सुंदर सुत जा के ।
रामसरिस बर दुलहिनि सीता ।
समधी दसरथ जनक पुनीता ।
सुनि अस ब्याहु सगुन सब नाँचे ।
अब कीन्हे बिरंचि हम साँचे ।

सगुण ब्रह्मच ज्याचा सुंदर पुत्र त्यास सर्वच मंगल शकुन सुलभ होतात. रामासारखा वर, सीतेसारखी वधू, व दशरथ-जनकासारखे महात्मे व्याही असा विवाहोत्सव ऐकून सर्व शकुन ब्रह्मदेवानें आतां आपणास वास्तवता दिली असें म्हणत नाचूं लागले.

एहि बिधि कीन्ह बरात पयाना ।
हय गय गाजहिँ हने निसाना ।

अशा रीतिनें ती मिरवणूक चालूं लागली. अश्वगजांचा कल्लोळ उसळून वाद्यें दुमदुमूं लागलीं.

आवत जानि भानु-कुल-केतू ।
सरितन्हि जनक बँधाये सेतू ।
बीच बीच बरबास बनाये ।
सुर-पुर-सरिस संपदा छाये ।

भानुकुलशिरोमणी राजा दशरथ येणार म्हणून जनकानें नद्यांवर पूल बांधले, व मार्गांत जागोजाग उत्तम पडाव उभारून त्यांत स्वर्गतुल्य ऐषआराम सांठविले.

असन सयन बर बसन सुहाये ।
पावहिँ सब निज निज मन भाये ।
नित नूतन सुख लखि अनुकूले ।
सकल बरातिन्ह मंदिर भूले ।

खाद्य, शय्या, उंची वस्त्रें वगैरे मिळाल्यानें सर्व लोक बालंबाल खुष झाले. नित्य नवीं सुखें हाताशीं पाहून सर्व लोकांना आपापल्या घरांचाहि विसर पडला.

**दो०—आवत जानि बरातबर सुनि गहगहे निसान । साजि गज रथ पदचर तुरग लेन चले अगवान ॥ ३०४ ॥**

वाद्यांचा गजर ऐकतांच वरात आली असें समजून घोडे, पायदळ, रथ वगैरे सज्ज करून जनक त्यांना घेण्यासाठीं सामोरा गेला.

चौ०—कनककलस भरि कोपर थारा ।
भाजन ललित अनेकप्रकारा ।
भरे सुधासम सब पकवाने ।
भाँति भाँति नहिँ जाहिँ बखाने ।

फल अनेक बरबस्तु सुहाई ।
हरषि भेँट हित भूप पठाई ।

सुवर्णकलश, पराती, ताटें वगैरे अनेक प्रकारच्या झगझगीत भांड्यांतून अवर्णनीय अशीं तऱ्हेतऱ्हेचीं अनेक अमृतप्राय पक्कान्नें, फळफळावळ व नानाविध उत्तमोत्तम पदार्थ जनकानें आनंदानें पुढें रवाना केले.

भूषन बसन महामानि नाना ।
खग मृग हय गय बहुबिधि जाना ।
मंगल सगुन सुगंध सुहाये ।
बहुत भाँति महिपाल पठाये ।
दधि चिउरा उपहार अपारा ।
भरि भरि काँवरि चले कहारा ।

नाना प्रकारचीं भूषणें, रत्नें, वस्त्रें, खगमृगहयगज, नानाविध यानें, मंगल द्रव्यें, उत्तम सुवासिकें वगैरे अनेक उत्तमोत्तम भोग जनकानें पाठविले. दहीं, पोहे इत्यादि तऱ्हेतऱ्हेचें फराळाचें सामान कावडींत भरभरून ढिवर चालले.

अगवानन्ह जब दीखि बराता ।
उर आनंद पुलक भर गाता ।
देखि बनाव सहित अगवाना ।
मुदित बरातिन्ह हने निसाना ।

वऱ्हाडी मंडळींनीं जेव्हां आपल्याला सामोरे आलेल्या लोकांना पाहिलें तेव्हां मनांत हर्षित होऊन ती रोमांचित झाली. सीमोल्लंघनाच्या मिरवणुकीचा थाटमाट पाहतांच वऱ्हाडी मंडळींनीं आनंदानें वाद्यें बाजविलीं.

दो०–हरषि परसपर मिलनहित कछुक चले बगमेल । जनु आनंदसमुद्र दुइ मिलत बिहाइ सुबेल ॥ ३०५ ॥

आनंदानें जणुंकाय दोन समुद्रच आपली मर्यादा सोडून भेटताहेत, अशाप्रमाणें दोहींकडील मंडळी परस्परांस भेटण्यासाठीं किंचित् दूरवर चालून गेलीं.

चौ०–बरषि सुमन सुरसुंदरि गावहिँ ।
मुदित देव दुंदुभी बजावहिँ ।
बस्तु सकल राखी नृप आगे ।
बिनय कीन्ह तिन्ह अतिअनुरागे ।
प्रेमसमेत राय सब लीन्हा ।
भइ बकसीस जाचकन्हि दीन्हा ।

आनंदभरांत देवांगना फुलें उधळून गाऊं लागल्या, आणि देव दुंदुभी वाजवूं लागले. जनकानें सर्व नजराणा राजा दशरथापुढें ठेवून अत्यंत सद्गदित होऊन प्रार्थना केली, व दशरथानेंहि प्रेमपूर्वक त्या सर्व भेटींचा अंगीकार केला. याचकांची संभावना करण्यांत आली.

करि पूजा मान्यता बडाई ।
जनवासे कहँ चले लेवाई ।
बसन बिचित्र पाँवडे परहीँ ।
देखि धनद धनमद परिहरहीँ ।

सीमांतपूजा, मान आणि सत्कार झाल्यावर जनकानें मंडळींस जानवशाचे ठिकाणीं नेलें. चित्रविचित्र कापडाच्या पायघड्या घातल्या होत्या, त्या पाहून कुबेराचा देखील संपत्तिमद उतरत असे.

अतिसुंदर दीन्हेउ जनवासा ।
जहँ सब कहँ सब भाँति सुपासा ।

जानवशाचें ठिकाणहि अत्यंत सजावटीचें होतें, व तेथें सर्वांचीच सर्वतोपरी सोय केलेली होती.

जानी सिय बरात पुर आई ।
कछु निजमहिमा प्रगटि जनाई ।
हृदय सुमिरि सब सिद्धि बोलाई ।
भूप पहुनई करन पठाई ।

वरात शहरांत दाखल झाली हें जाणून सीतेनें आपल्या प्रभावाची किंचित् चुणुक दाखविली. हृदयांत स्मरण करून सर्व सिद्धि तिनें बोलावल्या, आणि त्यांना दशरथाचा पाहुणचार करण्यास लावून दिलें.

दो०–सिधि सब सियआयसु अकनि गईँ जहाँ जनवास । लिये संपदा सकल-सुख सुर–पुर–भोग–बिलास ॥ ३०६ ॥

ऋद्धिसिद्धि सीतेची आज्ञा ऐकतांच सर्व स्वर्गीय सुखसंपत्ति, भोग आणि विलास घेऊन जानवशांत शिरवूं लागल्या.

चौ०–निज निज बास बिलोकि बराती ।
सुरसुख सकल सुलभ सब भाँती ।
बिभवभेद कछु कोउ न जाना ।
सकल जनक कर करहिँ बखाना ।

वऱ्हाडी मंडळी आपापल्या बिऱ्हाडांत सर्व प्रकारचीं स्वर्गसुखें उशापायथ्याशीं लोळत आहेत आणि वैभवदृष्ट्या कोणासहि कांहींच न्यूनाधिक्य नाहीं असें पाहून सर्वजण जनकाची तारीफ करूं लागले.

सियमहिमा रघुनायक जानी ।
हरषे हृदय हेतु पहिचानी ।

रघुनायक सीतेचें तें कर्तृत्व जाणून आणि तिचें तें मनोगत ओळखून मनांत संतुष्ट झाले.

पितुआगमन सुनत दोउ भाई ।
हृदय न अतिआनंद समाई ।
सकुचन्ह कहि न सकत गुरु पाहीँ ।
पितु-दरसन-लालच मनु माहीँ ।

पित्याचें आगमन ऐकतांच उभय बंधूंच्या मनांत अत्यानंद मावेना. पितृदर्शनाची जरी मनांत उत्कंठा होती तरी मर्यादेस्तव ते गुरूपाशीं तीं बोलण्यास धजले नाहींत.

बिस्वामित्र बिनय बडि देखी ।
उपजा उर संतोष बिसेखी ।
हरषि बंधु दोउ हृदय लगाये ।
पुलक अंग अंबक जल छाये ।
चले जहाँ दसरथ जनवासे ।
मनहुँ सरोबर तकेउ पिपासे ।

त्यांचा तो थोर ल्याहाज पाहून विश्वामित्रांच्या हृदयांत विशेषच संतोष झाला. आनंदामुळें त्यांचा देह रोमांचित होऊन त्यांचे नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून आले, व त्यांनीं रामलक्ष्मणांस आपल्या हृदयाशीं धरून कवटाळलें. जणुंकाय तृषार्तास सरोवरच गवसावें तद्वत् ते दशरथाच्या जानवशाच्या ठिकाणीं जाण्यास निघाले.

**दो०—भूप बिलोके जबहिँ मुनि आवत सुतन्ह समेत । उठेउ हरषि सुखसिंधु महुँ चले थाह सी लेत ॥ २०७॥**

पुत्रांसहित विश्वामित्रमुनींना आपल्याकडे येतांना जेव्हां दशरथानें पाहिलें तेव्हां तो हर्षानें उठला आणि आनंदसागराचा ठाव घेत सुटला.

चौ०—मुनिहिँ दंडवत कीन्ह महीसा ।
बार बार पदरज धरि सीसा ।
कौसिक राउ लिये उर लाई ।
कहि असीस पूछी कुसलाई ।
पुनि दंडवत करत दोउ भाई ।
देखि नृपति उर सुख न समाई ।

सुत हिय लाइ दुसह दुख मेटे ।
मृतकसरीर प्रान जनु भेँटे ।

राजानें मुनींस दंडवत घातलें आणि त्यांची पदधूळी तो वारंवार आपल्या मस्तकावर धारण करूं लागला. विश्वामित्रानेंहि राजास उचलून पोटाशीं धरिलें, आणि आशीर्वाद देऊन त्याचें कुशल विचारलें. नंतर रामलक्ष्मण आपणास दंडवत करीत असतांना पाहून राजाच्या हृदयांत आनंद मावेनासा झाला. त्यानें मुलांस हृदयाशीं कवटाळून आपल्या (पुत्रवियोगजनित) दुःखाचा शेवट करून टाकला. (ती पितापुत्राची भेट म्हणजे) मृत शरीरांत जणुं-काय पुन्हां प्राणप्रतिष्ठाच समजावयाची.

पुनि बसिष्ठपद सिर तिन्ह नाये ।
प्रेममुदित मुनिबर उर लाये ।
बिप्रबृंद बंदे दुहुँ भाई ।
मनभावती असीसैँ पाई ।

नंतर रामलक्ष्मणांनीं वसिष्ठांचें चरण-वंदन केलें. मुनिवरांनींहि त्यांस प्रेमानें हृदयाशीं धरिलें. उभय बंधूंनीं विप्रवृंदास नमन करून इच्छित आशीर्वाद मिळविले.

भरत सहानुज कीन्ह प्रनामा ।
लिये उठाइ लाइ उर रामा ।
हरषे लषन देखि दोउ भ्राता ।
मिले प्रेम-परि-पूरित गाता ।

नंतर शत्रुघ्नासह भरतानें रामचंद्रास प्रणमिलें. रामांनीं त्यांना उचलून आलिंगिलें. लक्ष्मण उभय बंधूंस पाहतांच हर्षित होऊन प्रेमपरिपूर्णगात्र होत्साता त्यांस भेटला.

**दो०—पुरजन परिजन जातिजन जाचक मंत्री मीत । मिले जथाबिधि सबहि प्रभु परमकृपालु बिनीत ॥ २०८ ॥**

नंतर नागरिक, आप्त, स्वकीय, याचक, अमात्य, मित्र इत्यादि सर्वत्रांस परमकृपालु विनीत प्रभु यथोचित रीतीनें भेटले.

चौ०—रामहिँ देखि बरात जुडानी ।
प्रीति कि रीति न जाति बखानी ।

रामचंद्रास पाहून वऱ्हाडी मंडळी प्रसन्न झाली. ती प्रेमाची प्रौढी अवर्णनीय होती.

१ हें मनोगत रामाच्या आणि त्यांच्या प्रियपरिवाराच्या सेवेखेरीज अन्य कोणतें असूं शकेल ?

नृपसमीप सोहहिँ सुत चारी।
जनु धनधरमादिक तनुधारी।
सुतन्ह समेत दसरथहि देखी।
मुदित नगर-नर-नारि बिसेखी।
सुमन बरषि सुर हनहिँ निसाना।
नाकनटी नाचहिँ करि गाना।

जणुंकाय धर्मार्थादि चतुर्विध पुरुषार्थांनीं देह धारण केले आहेत अशांसारखे ते चार पुत्र दशरथाजवळ शोभूं लागले. पुत्रांसहित दशरथास पाहून नगरांतील स्त्रीपुरुष विशेषच आनंदित झाले. देव पुष्पवर्षाव करून वाद्यांचा गजर करूं लागले, व अप्सरांनीं नृत्यगायन आरंभिलें.

सतानंद अरु बिप्र सचिवगन।
मागध सूत बिदुष बंदीजन।
सहित बरात राउ सनमाना।
आयसु माँगि फिरे अगवाना।

शतानंद आणि विप्रवृंद तसेंच मंत्रिमंडळ, मागध, सूत, विदूषक, बंदिजन इत्यादि सर्व सामोरे गेलेली मंडळी वरातीसहवर्तमान राजा दशरथाचा सन्मान करून आणि त्याचा निरोप घेऊन परतली.

प्रथम बरात लगन तें आई।
ता तें पुर प्रमोद अधिकाई।
ब्रह्मानंद लोग सब लहहीं।
बढहुदिवस निसि बिधि सन कहहीं।

लग्नाच्या बऱ्याच आधीं वरात उतरली म्हणून शहरांत अधिकच आनंद उसळला. सर्व लोक ब्रह्मानंदाचा अनुभव घेऊं लागले, आणि दिवसरात्र वाढविण्यासाठीं विधात्याजवळ प्रार्थना करूं लागले.

**दो०—रामु सीय सोभाअवधि सुकृत अवधि दोउ राज। जहँ तहँ पुरजन कहहिँ अस मिलिनर-नारि-समाज॥३०९॥**

सर्व शहरांतील स्त्रीपुरुषांचे जमाव जमून जिकडे तिकडे हेंच ह्मणत कीं, राम व सीता हे दोघे लावण्याची सीमा आणि दशरथ व जनक हे दोघे पुण्याची परमावधि होत.

चौ०—जनक-सुकृत-मूरति बैदेही।
दसरथसुकृत रामु धरे देही।
इन्ह सम काहु न सिव अवराधे।
काहु न इन्ह समान फल लाधे।

इन्ह सम कोउ न भयउ जग माहीं।
है नहिँ कतहूँ होनेउ नाहीं।

सीतारूपानें जनकाचें सुकृत आणि रामरूपानें दशरथाचें पुण्य अवतरलें आहे. ह्यांच्यासारखी शंकराची आराधना कोणींच केली नाहीं, व यांच्यासारखें फळहि कोणाला लाभलें नाहीं. या जगांत यांच्यासारखे कोणी झाले नाहींत, सध्यां विद्यमान नाहींत व पुढें होणारहि नाहींत.

हम सब सकल सुकृत कै रासी।
भये जग जनमि जनक-पुर-बासी।
जिन्ह जानकी-राम-छबि देखी।
को सुकृती हम सरिस बिसेखी।
पुनि देखब रघु-बीर-बिबाहू।
लेब भली बिधि लोचनलाहू।

आह्मींहि सर्व सुकृतराशीच आहोंत, ह्मणून तर जगांत जन्मून जनकपुरींत आमचा वास झाला. ज्या आम्हीं आज श्रीरामचंद्र आणि सीता यांचें लावण्य पाहिलें, त्या आम्हांपेक्षां अधिक पुण्यवान् कोण आहे! त्यांतून आणखी आम्ही रघुवीराचा विवाह पाहणार आणि उत्तम प्रकारें आपल्या नेत्रांचें साफल्य करणार.

कहहिँ परस्पर कोकिलबयनी।
एहि बिबाह बड लाभ सुनयनी।
बडे भाग बिधि बात बनाई।
नयनअतिथि होइहहिँ दोउ भाई।

कोकिलस्वनी स्त्रिया आपापसांत म्हणत, बाई ग! हा विवाह ह्मणजे एक कपिलाषष्ठी पर्वच समजा. आपलें भाग्य थोर म्हणून विधात्यानें हा योग जुळवून आणला. अतःपर हे दोघेहि बंधु आपल्या नेत्रांचे अतिथी होत राहणार.

**दो०—बारहिँ बार सनेहबस जनक बोलाउब सीय। लेन आइहहिँ बंधु दोउ कोटि-काम-कमनीय॥ ३१०॥**

वारंवार जनक प्रेमानें सीतेस माहेरीं आणीत जाईल, आणि तिला परत नेण्यास हे कोटिमदनांप्रमाणें रमणीय असे उभयबंधु येथें येत जातील.

चौ०—बिबिध भाँति होइहि पहुनाई।
प्रिय न काहि अस सासुर माई।
तब तब राम लषनहिँ निहारी।
होइहहिँ सब पुरलोग सुखारी।

कारण, जेथें नानातऱ्हेचा पाहुणचार होणार अशी सासुरवाडी, बाई, कोणास आवडणार नाहीं ? त्या त्या वेळीं रामलक्ष्मणांस पाहून नगरचे आपण सर्व लोक सुखास्वाद घेत राहूं.

सखि जस राम लषन कर जोटा।
तैसेइ भूप संग दुइ ढोटा।
स्याम गौर सब अंग सुहाये।
ते सब कहहिँ देखि जे आये।

सखे! ही जशी रामलक्ष्मणांची जोडी आहे, तसेच दशरथाजवळ आणखी दोन पुत्र आहेत. तेहि एक श्याम आणि दुसरा गौर असून सर्वांगसुंदर आहेत. त्यांना जे पाहून आले ते सर्व असेंच सांगत आहेत.

कहा एक मैँ आजु निहारे।
जनु बिरंचि निजहाथ सवाँरे।
भरतु रामही की अनुहारी।
सहसा लखि न सकहिँ नरनारी।
लषन सत्रुसूदन एकरूपा।
नखसिख तेँ सब अंग अनूपा।
मन भावहि मुख बरनि न जाहीँ।
उपमा कहुँ त्रिभुवन कोउ नाहीँ।

एकजण सांगत होता कीं त्यानें ते आजच पाहिले. जणुंकाय ते ब्रह्मदेवानें खुद्द स्वहस्तें घडविले असावेत. राम व भरत हुबेहुब एकसारखे आहेत. स्त्रीपुरुषांना एकदम ते ओळखतां येणार नाहींत. लक्ष्मण आणि शत्रुघ्न हेहि एकरूप असून नखशिखांत त्यांची आगलट अप्रतिम आहे. त्यांस पाहून होणारें सुख मनासच ठाऊक; तें बोलांत बसण्यासारखें नाहीं. त्यांच्या उपमेला त्रैलोक्य उणें पडतें.

छंद—उपमा न कोउ कह दास तुलसी कतहुँ कबिकोबिद कहहिँ। बल-बिनय-बिद्या-सील-सोभा-सिंधु इन्ह से एइ अहहिँ॥ पुरनारि सकल पसारि अंचल बिधिहि बचन सुनावहीँ। ब्याहियहु चारिउ भाइ एहि पुर हम सुमंगल गावहीँ ३४

तुलसीदास म्हणतात, उपमाच जर उपलब्ध नाहीं, तर कितीहि कल्पक कवी असला तरी तो वर्णन कसें करणार ? ( तेव्हां हें म्हणणेंच प्राप्त आहे कीं, ) बल, विनय, विद्या, शील, शोभा यांचे समुद्र असे त्यांच्यासारखे तेच होत. नगरांतील सर्व स्त्रिया विधात्यास पदर पसरून हीच प्रार्थना करीत असत कीं, ह्याच नगरांत या चौघाहि भावांचीं लग्नें व्हावींत, आणि आम्हींच त्यांचीं मंगलगाणीं गावींत.

सो०—कहहिँ परसपर नारि बारिबिलोचन पुलकतन। सखि सब करब पुरारि पुन्य-पयो-निधि भूप दोउ ॥ ३४ ॥

स्त्रिया सजलनयन आणि पुलकितगात्र होत्सात्या परस्परांत बोलत कीं, गडे! शंकर सर्वच कांहीं करील. हे दोघे राजे पुण्याचे पयोनिधि आहेत.

चौ०—एहि बिधि सकल मनोरथ करहीँ।
आनंद उमगि उर भरहीँ।

ह्याप्रमाणें सर्वच स्त्रिया इच्छा करूं लागल्या, व त्यांच्या हृदयांत राहून राहून आनंदाच्या लाटा उसळूं लागल्या.

जे नृप सीयस्वयंबर आये।
देखि बंधु सब तिन्ह सुख पाये।
कहत रामजसु बिसद बिसाला।
निज निज भवन गए महिपाला।

जे राजे सीतास्वयंवरार्थ जमले होते ते सर्व त्या बंधूंच्या दर्शनानें सुखी होऊन अत्यंत उज्ज्वल रामयश गात गात आपापल्या स्थानीं परत गेले.

गये बीति कछु दिन एहि भाँति।
प्रमुदित पुरजन सकल बराती।

ह्याप्रमाणें पुरजन आणि सर्व वऱ्हाडी यांचे कांहीं दिवस आनंदांत निघून गेले.

मंगलमूल लगनदिन आवा।
हिमरितु अगहनमासु सुहावा।
ग्रह तिथि नखत जोगु बर बारू।
लगन सोधि बिधि कीन्ह बिचारू।
पठइ दीन्हि नारद सन सोई।
गनी जनक के गनकन्ह जोई।

मंगलकारक लग्नदिवस येऊन ठेपला. त्या वेळीं हेमंतऋतु व पवित्र मार्गशीर्ष मास होता. ग्रह, तिथी, नक्षत्र, योग, वार आणि उत्तम मुहूर्त शोधून व निश्चित करून ब्रह्मदेवानें नारदाकरवीं पाठवून दिला. इकडे तोच मुहूर्त जनकाच्या ज्योतिष्यांनींहि धरला होता.

सुनी सकल लोगन यह बाता।
कहहिँ जोतिषी आहिँ बिधाता।

ही गोष्ट ऐकून सर्व त्या ज्योतिष्यांस अपरब्रह्मदेव ह्मणूं लागले.

**दो०-धेनु-धूलि-बेला बिमल सकल-सुमंगल-मूल। बिप्रन्ह कहेउ बिदेह सन जानि सगुन अनुकूल ॥ ३११ ॥**

सकल सुमंगलमूल असा तो पवित्र गोरज मुहूर्त ब्राह्मणांनीं विदेहास विदित केला. तोच योग्य आणि अनुकूल जाणून—

चौ०-उपरोहितहि कहेउ नरनाहा।
अब बिलंब कर कारन काहा।

जनकानें पुरोहितांस विचारिलें कीं, आतां विलंब किंनिमित्त ?

सतानंद तब सचिव बोलाये।
मंगल सकल साजि सब ल्याये।
संख निसान पवन बहु बाजे।
मंगलकलस सगुन सुभ साजे।
सुभग सुआसिनि गावहिँ गीता।
करहिँ बेदधुनि बिप्र पुनीता।

तेव्हां शतानंदानें सचिवास बोलाविलें व त्यानें सर्व मंगलद्रव्यें सिद्ध करून आणलीं. शंख, निषाण, पणव इत्यादि वाद्यांचा गजर सुरूं झाला. मंगल कलश वगैरे शुभ शकुन सिद्ध झाले. सुवासिनी मंगलगीतें सुस्वर गाऊं लागल्या व शुचिष्मंत विप्र वेदघोष करूं लागले.

लेन चले सादर एहि भाँती।
गये जहाँ जनवास बराती।
कोसलपति कर देखि समाजू।
अति लघु लाग तिन्हहिँ सुरराजू।

अशा समारंभानें वरास आणण्यासाठीं मंडळी निघाली ती जानवशाच्या ठिकाणीं पोंचली. दशरथाचा तो समारोह पाहून त्यांना इंद्रदेखील अगदीं तुच्छ वाटूं लागला.

भयउ समउ अब धारिय पाऊ।
यह सुनि परा निसानहि घाऊ।
गुरुहि पूछि करि कुलबिधि राजा।
चले संग मुनि-साधु-समाजा।

वेळ होत आला, आतां निघालेंच पाहिजे, अशी मंडळींनीं दशरथास विनंती केली. ती ऐकतांच चौघडा झडूं लागला. गुरूंच्या विचारानें कुलविधी आटोपून राजा मुनिमंडळी आणि इतर समाज घेऊन निघाला.

**दो०-भाग्यबिभव अवधेस कर देखि देव ब्रह्मादि। लगे सराहन सहसमुख जानि जनम निज बादि ॥ ३१२ ॥**

ब्रह्मादिक देवदेखील राजा दशरथाचें भाग्य आणि वैभव पाहून त्याची प्रशंसा करूं लागले. सहस्रमुख शेष मात्र आपला जन्म व्यर्थ आहे असें मानूं लागला. ( कारण, त्याला इतरांप्रमाणें मस्तकावरील पृथ्वी टाकून तो विवाहोत्सव पहाण्यास जातां येईना. )

चौ०-सुरन्ह सुमंगलअवसरु जाना।
बरषहिँ सुमन बजाइ निसाना।
सिव ब्रह्मादिक बिबुधबरूथा।
चढे बिमानन्हि नाना जूथा।
प्रेम-पुलक-तन हृदय उछाहू।
चले बिलोकन रामबिआहू।

देवांनीं तो मंगलसमय जाणून फुलें उधळलीं, आणि वाद्यगजर केला. शिवब्रह्मादिक देवसमुदाय प्रचंडसमुदायानिशीं विमानांत बसून रामविवाह पहाण्यासाठीं प्रेमपुलकितगात्र आणि उल्हसितचित्त होत्साता निघाला.

देखि जनकपुर सुर अनुरागे।
निज निज लोक सबहि लघु लागे।
चितवहिँ चकित बिचित्र बिताना।
रचना सकल अलौकिक नाना।

जनकपुरी पाहून देवहि मोहित झाले, व त्यांना आपापले लोक तुच्छ वाटूं लागले. मंडपाची रचना एकंदरींत अलौकिक आणि सर्वतोपरी विचित्र पाहून ते एकदम चाकाटलेच.

नगर-नारि-नर रूपनिधाना।
सुघर सुधरम सुसील सुजाना।
तिन्हहिँ देखि सब सुर-सुर-नारी।
भये नखत जनु बिधु उँजियारी।
बिधिहि भयउ आचरजु बिसेखी।
निज करनी कछु कतहुँ न देखी।

तेथील नागरिक स्त्रीपुरुष सर्वच सुस्वरूप, घरंदाज, धर्मात्मे, सच्छील, आणि सुशिक्षित असे पाहून स्वर्गांतील सर्व देवदेवता, चंद्र क्षितिजावर येतांच

ज्याप्रमाणें नक्षत्रें दिपून जातात तद्वत्, दिपून गेल्या. स्वतःची कृती कोठेंच कांहीं दिसेना म्हणून ब्रह्मदेवाची तर विशेषच तिरपिट उडाली.

**दो०—सिव समुझाये देव सब जनि आचरज भुलाहु । हृदय बिचारहु धीर धरि सिय–रघु–बीर–बिआहु ॥ ३१३ ॥**

तेव्हां शंकरांनीं सर्व देवांची समजूत घातली कीं, आश्चर्यचकित न होतां धीर धरून व मनांत विचार करून पहा कीं हा विवाह सीतारामचंद्रांचा होय.

चौ०—जिन्ह कर नामु लेत जग माहीँ ।
सकल-अमंगल-मूल नसाहीँ ।
करतल होहिँ पदारथ चारी ।
तेइ सिय रामु कहेउ कामारी ।

ज्यांच्या केवल नामोच्चारानेंच सकल अमंगलाचें मूल नष्ट होतें आणि चतुर्विध पुरुषार्थ करतलगत होतात ते हे सीतारामचंद्र होत, असेंहि शंकरांनीं सांगितलें.

एहि बिधि संभु सुरन्ह समुझावा ।
पुनि आगे बरबसह चलावा ।
देवन्ह देखे दसरथ जाता ।
महामोदु मन पुलकित गाता ।

ह्याप्रमाणें देवांची समजूत घातल्यावर शंकरांनीं पुन्हां आपला नंदिकेश्वर पुढें ढकलला. देवांनीं दशरथ जात आहे असें पाहतांच त्याच्या मनांत अत्यानंद होऊन अंगावर रोमांच उभे राहिले.

साधु समाजु संग महिदेवा ।
जनु तनु धरे करहिँ सुर सेवा ।
सोहत साथ सुभग सुत चारी ।
जनु अपबरग सकल तनुधारी ।
मरकत–कनक–बरन बर जोरी ।
देखि सुरन्ह भइ प्रीति न थोरी ।

दशरथाबरोबर संतमंडळी आणि ब्राह्मण होते. ते जणुंकाय मानवदेह धारण करून देवच सेवा करीत आहेत असें दिसलें. त्याच्याबरोबर असलेले महाभाग्यवान चारी पुत्र मूर्तिमंत चतुर्विध मोक्षाप्रमाणें शोभत होते. इंद्रनील आणि सुवर्ण यांच्या वर्णाप्रमाणें त्या सुंदर दोन जोड्या पाहून देवांस प्रेमाचें भरतें आलें.

पुनि रामहिँ बिलोकि हिय हरषे ।
नृपहि सराहि सुमन तिन्ह बरषे ।

फिरून रामाकडे पाहून देवांच्या अंतःकरणास हर्ष झाला. ते दशरथाची स्तुति करून फुलें उधळूं लागले.

**दो०—रामरूप नख-सिख-सुभग बारहिँ बार निहारि । पुलक गात लोचन सजल उमासमेत पुरारि ॥ ३१४ ॥**

नखशिखांत परमरमणीय असें तें रामरूप वारंवार न्याहाळून पार्वतीसहित त्रिपुरारी पुलकितगात्र आणि सजलनेत्र होत होते.

चौ०—केकि-कंठ-दुति स्यामल अंगा ।
तडितबिनिंदक बसन सुरंगा ।
ब्याहबिभूषन बिबिध बनाये ।
मंगलमय सब भाँति सुहाये ।
सरद-बिमल-बिधु-बदन सुहावन ।
नयन नवल–राजीव–लजावन ।
सकल अलौकिक सुंदरताई ।
कहि न जाइ मनहीँ मन भाई ।

मयूरकंठाच्या कांतीप्रमाणें श्याम देह, विद्युल्लतेसहि लाजविणारा पीतांबर, अनेक प्रकारचे मंगलमय आणि सर्वतोपरी सुंदर असे विवाहालंकार, उज्ज्वल शरच्चंद्राप्रमाणें सुरम्य वदन, नूतन कमलांसहि लाजविणारे नेत्र, हें सर्व अलौकिक सौंदर्य अवर्णनीय होय. तें मनाचें मनानेंच जाणावें.

बंधु मनोहर सोहहिँ संगा ।
जात नचावत चपल तुरंगा ।
राजकुअँर बरबाजि देखावहिँ ।
बंसप्रसंसक बिरद सुनावहिँ ।

बरोबर मनोहर बंधु शोभत होते व तेहि चपळ घोडे नाचवीत चालले होते. बरोबरीचे राजकुमारहि आपआपले घोडे नाचवीत आणि बंदिजन वंशप्रशंसापर ब्रीदावळी ऐकवीत.

जेहि तुरंग पर रामु बिराजे ।
गति बिलोकि खगनायकु लाजे ।
कहि न जाइ सब भाँति सुहावा ।
बाजिबेषु जनु काम बनावा ।

ज्या अश्वावर रामचंद्र विराजमान झाले होते त्याची धाटी पाहून तर गरुडदेखील खजील झाला. तो अश्व सर्वतोपरी इतका अनिर्वचनीय सुंदर कीं जणुंकाय कामदेवानेंच त्याची भूमिका स्वीकारली होती असें वाटे.

छंद—जनु बाजिबेषु बनाइ मनसिजु रामहित अतिसोहई। आपने बय बल रूप गुन गति सयल भुवन बिमोहई॥ जगमगत जीन जराव जोति सुमोति मनि मानिक लगे। किंकिनि ललाम लगामु ललित बिलोकि सुर नर मुनि ठगे॥ ३५॥

जणुंकाय मदनच श्रीरामचंद्रासाठीं अश्वरूप धारण करून अत्यंत मिठ्या अशा आपल्या वय, बल, रूप, गुण आणि गति यांनीं त्रिभुवनास मोहित करूं लागला. त्यावरील खोगीर झगझगीत असून त्यास मौल्यवान् मोतीं, रत्नें, माणकें इत्यादि जडविलीं होतीं. त्याचें सुस्वर पैंजण आणि झोंकदार लगाम पाहून देव, मुनि आणि नर ह्यांना भ्रम होई.

दो०—प्रभुमनसहिँ लयलीन मनु चलत बाजि छबि पाव। भूषितउडगन तडितघन जनु बर बरहि नचाव॥ ३१५॥

जणुंकाय तारांगण आणि विद्युत् यांनीं विभूषित असा मेघच मत्तमयूरास नाचवीत आहे, अशाप्रमाणें प्रभूंच्या मनांत आपलें मन तल्लीन करून तो घोडा चालत असतां शोभूं लागला.[1]

चौ०—जेहि बर बाजि रामु असवारा। तेहि सारदउ न बरनइ पारा।

अशा ज्या सुंदर अश्वावर राम आरूढ झाले होते त्याची मिठाज सरस्वतीदेखील वर्णन करून पार पडणार नाहीं.

संकर राम-रूप-अनुरागे। नयन पंचदस अतिप्रिय लागे।

शंकर रामरूपांत पक्केच रंगून गेले. त्यांस त्यांचे पंधराहि[2] नेत्रांची खरी गोडी त्या वेळेस कळून आली.

हरि हितसहित रामु जब जोहे। रमासमेत रमापति मोहे। निरखि रामछबि बिधि हरषाने। आठै नयन जानि पछिताने। सुर-सेनप-उर बहुत उछाहू। बिधि तें डेवढ सु-लोचन-लाहू।

त्या मनोज्ञ अश्वासह जेव्हां रामास पाहिलें तेव्हां लक्ष्मीसहवर्तमान रमापतिहि गुंग झाले. रामरूपाचें अवलोकन करितांना ब्रह्मदेवास हर्ष तर झालाच, परंतु आपल्याला फक्त आठच डोळे आहेत याबद्दल त्यांना दिलगिरीहि वाटली. स्वामी कार्तिकेय मनांत जास्त उल्हसित झाले. कारण, ब्रह्मदेवाच्या दिढीनें त्यांना नेत्रलाभ घडला. ( कारण यांचे डोळे बारा ).

रामहिँ चितव सुरेस सुजाना। गौतमसाप परमहित माना। देव सकल सुरपतिहि सिहाहीँ। आजु पुरंदरसम कोउ नाहीँ।

इंद्रास खरी अकल त्या प्रसंगानें फोडली, कारण त्या वेळची रामाची मिठाज पाहून त्यास गौतमशाप मोठ्यांत मोठा अनुग्रह वाटला. सर्व देव त्याची तारीफ करून म्हणूं लागले कीं, आज इंद्राशारखा आगळा भाग्यवान् कोणीहि नाहीं.

मुदित देवगन रामहिँ देखी। नृपसमाज दुहुँ हरष बिसेखी।

रामास पाहून देवगण प्रमुदित झाला. दोन्ही राजसमाजांत तर विशेषच आनंद उसळला.

छंद—अतिहरष राजसमाजु दुहुँ दिसि दुंदुभि बाजहिँ घनी। बरषहिँ सुमन सुर हरषि कहि जयजयति जय रघु-कुल-मनी॥ एहि भाँति जानि बरात आवत बाजने बहु बाजहीँ। रानी सुआसिनि बोलि परिछन हेतु मंगल साजहीँ॥ ३६॥

दोन्ही राजसमाजांत अत्यंत हर्ष लोटला. उभय बाजूंनीं दुंदुभी गर्जूं लागल्या. देव ‘ जयजयजय रघुकुलमणी ’ अशी गर्जना करून फुलें उधळूं लागले. ह्याप्रमाणें अनेक वाद्यांचा गजब कडकडाट ऐकून वरात येत आहे असें समजून राणीनें सुवासिनी बोलाविल्या आणि मंगलारतीचें सामान सिद्ध केलें.

दो०—सजि आरती अनेक बिधि मंगल सकल सवाँरि। चलीँ मुदित परिछन करन गजगामिनि बरनारि॥ ३१६॥

आरती आणि तऱ्हातऱ्हांचीं सर्व मंगलें सिद्ध

[1] येथें तारांगण आणि रत्नविभूषणें, विद्युत् आणि रामाचा पीतांबर, मेघ आणि रामाचा अंगरंग, मयूर आणि अश्व यांचा उपमान-उपमेय संबंध जाणावा.

[2] शंकरांस पांच मुखें असून प्रत्येक मुखास तीन नेत्र याप्रमाणें १५ नेत्र आहेत.

करून कुलीन स्त्रिया परीक्षण करण्यास ( आरती ओंवाळण्यास ) आनंदानें गजगतीनें जाऊं लागल्या.

विधुबदनी सब सब मृगलोचनि ।
सब निज तनछबि रति-मद-मोचनि ।
पहिरे बरन बरन बर चीरा ।
सकल बिभूषन सजे सरीरा ।
सकल सुमंगल अंग बनाये ।
करहिँ गान कलकंठ लजाये ।
कंकन किंकिनि नूपुर बाजहिँ ।
चाल बिलोकि कामगज लाजहिँ ।

त्या सर्व स्त्रिया चंद्रमुखी, बालहरिणाक्षी, आपल्या अंगकांतीनें रतीचाहि गर्व हरण करणाऱ्या, रंगारंगांचीं मौल्यवान वस्त्रें धारण केलेल्या, शरीरावर ठाकठीक अलंकार घातलेल्या, मंगल द्रव्यांनीं सजलेल्या, आणि आपल्या गायनानें कोकिलांस लाजविणाऱ्या अशा होत्या. त्यांचें कंकण, किंकिणी आणि नूपूर चालतांना वाजत असत. त्यांची ती चाल पाहून मदनास आणि गजासहि लाज वाटे.

बाजहिँ बाजन बिबिधप्रकारा ।
नभ अरु नगर सुमंगलचारा ।

अनेक प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं. आकाशांत व नगरांत मंगलोपचार सुरूं झाले.

सची सारदा रमा भवानी ।
जे सुरतिय सुचि सहज सयानी ।
कपट-नारि-वर-बेष बनाई ।
मिलीँ सकल रनिवासहिँ जाई ।
करहिँ गान कल मंगलबानी ।
हरषाबिबस सब काहु न जानी ।

स्वभावतःच चतुर आणि पवित्र अशा इंद्राणी, सरस्वती, लक्ष्मी, पार्वतीप्रभृति देवस्त्रियांनीं कपट-नारीवेष धारण करून जमावानें जनकाच्या अंतःपुरांत प्रवेश केला, आणि त्या सुस्वरानें मंगलगीतें गाऊं लागल्या. सर्व अंतःपुर आनंदांत धुंद असल्यामुळें त्यांस कोणीच ओळखलें नाहीं.

**छंद—को जान केहि आनंदवस सब ब्रह्म बर परिछन चलीँ।कलगान मधुर निसान बरषहिँ सुमन सुर सोभा भलीँ॥ आनंद-कंद बिलोकि दूलह सकल हिय हरषित भईँ। अंभोज-अंबक-अंबु उमगि सुअंग पुलकावलि छईँ ॥ ३७ ॥**

कोण कोणास ओळखतो ? सर्वच आनंदांत चूर होऊन परब्रह्म वराला ओंवाळण्यास निघाल्या. मंजुळ गाणीं चाललीं आहेत, सुस्वर वाद्यें वाजत आहेत, देव पुष्पवर्षाव करीत आहेत, अशा त्या थाटाच्या गर्दींत आनंदकंद अशा वरास पाहतांच सर्वजणी आनंदानें डोलूं लागल्या. त्यांच्या कमल-नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागले, आणि त्यांचे कोमलदेह रोमांचांनीं व्याप्त झाले.

**दो०—जो सुख भा सिय-मातु-मन देखि राम-बर-बेष । सो न सकहिँ कहि कलप-सत सहस सारदा सेष ॥ ३१७ ॥**

रामचंद्राचा सुंदर वेष पाहून सीतेच्या मनास जें सुख झालें तें सहस्रावधी शेष आणि शारदा यांच्यानें कल्पशतपर्यंत देखील सांगवणार नाहीं.

चौ०—नयन नीर हटि मंगल जानी ।
परिछन करहिँ मुदित मन रानी ।
बेदबिहित अरु कुलआचारू ।
कीन्ह भली बिधि सब ब्यवहारू ।

राणीच्या नेत्रांत प्रेमाश्रु आले. परंतु मंगलसमय जाणून तिनें ते कष्टानें आवरले, आणि ती आनंदानें आरती ओंवाळूं लागली. तिनें वेद आणि कुलाचार यांस युक्त सर्व कर्में व्यवस्थित रीतीनें आटोपलीं.

पंच सबद सुनि मंगल गाना ।
पट पाँवडे परहिँ बिधि नाना ।

( बंदी, शंख, निषाण, जयघोष आणि वेद असे ) पंचध्वनी आणि मंगल गायन सुरू झालें. नाना प्रकारच्या वस्त्रांच्या पायघड्या पडल्या.

करि आरती अरघ तिन्ह दीन्हा ।
राम गवन मंडप तब कीन्हा ।

राणीनें आरती करून पाय धुतले; तेव्हां रामांनीं मंडपप्रवेश केला.

दशरथ सहित समाज बिराजे ।
बिभव बिलोकि लोकपति लाजे ।
समय समय सुर बरषहिँ फूला ।
सांति पढहिँ महिसुर अनुकूला ।

आपल्या समाजासहवर्तमान दशरथ विराजमान झाला. त्याचें वैभव पाहून लोकपाल लज्जित झाले. देवांनीं वेळोवेळीं फुलें उधळलीं आणि ब्राह्मणांनीं प्रसंगोचित शांतिसूक्ताचे पाठ आरंभिले.

नभ अरु नगर कोलाहल होई ।
आपन पर कछु सुनइ न कोई ।
एहि बिधि राम मंडपहिँ आये ।
अरघु देइ आसन बैठाये ।

त्या उत्सवानें जमीनअस्मान एक केलें. आपपर कोणींच कांहीं ऐकेना. अशा थाटांत राम मंडपांत आले. अर्घ्य देऊन त्यांस आसनावर बसविलें.

छंद—बैठारि आसन आरती करि निरखि बरु सुख पावहीँ । मनि बसन भूषन भूरि वारहिँ नारि मंगल गावहीँ ॥ ब्रह्मादि सुरबर बिप्रबेष बनाइ कौतुक देखहीँ । अवलोकि रघु-कुल-कमल-रवि-छवि सुफल जीवन लेखहीँ ॥ ३८ ॥

आसनावर बसवून स्त्रियांनीं वरास ओंवाळलें. त्यास पाहून त्यांना अत्यानंद झाला. त्यांनीं रत्नें, वस्त्रें व भूषणें अनेक ओंवाळून टाकिलीं, आणि त्या मंगलगायन करूं लागल्या. ब्रह्मादिक देव ब्राह्मणवेष घेऊन तें कौतुक पाहून व रविकुलकमलरवी श्रीरामचंद्राचें लावण्य अवलोकन करून आपलें जीवितसाफल्य झालें असें ते मानूं लागले.

दो०—नाऊ बारी भाट नट रामनिछावरि पाइ । मुदित असीसहिँ नाइ सिर हरषु न हृदय समाइ ॥ ३१८ ॥

नापित, तांबोळी, भाट, नट, रामाची ओंवाळणी घेऊन संतुष्ट झाले. त्यांच्या हृदयांत आनंद मावेनासा होऊन ते मुजरे करून आशीर्वाद देऊं लागले.

चौ०—मिले जनकु दशरथु अतिप्रीती ।
करि बैदिक लौकिक सब रीती ।
मिलत महा दोउ राज बिराजे ।
उपमा खोजि खोजि कबि लाजे ।
लही न कतहुँ हारि हिय मानी ।
इन्ह सम एइ उपमा उर आनी ।

सर्व वैदिक व लौकिक आचार करून आणि शिष्टसांप्रदायास अनुसरून जनक आणि दशरथ या व्याह्यांची सप्रेम उरभेट झाली. त्या वेळीं ते उभयतां महाराजे फारच शोभूं लागले. त्या भेटीच्या वर्णनास्तव उपमा शोधून शोधून कवी लज्जित झाला. ती कोठेंच न मिळाल्याकारणानें कवीनें मनांत हार खाऊन 'त्यांच्यासारखे तेच' ही एकच उपमा योजिली.

सामध देखि देव अनुरागे ।
सुमन बरषि जसु गावन लागे ।
जगु बिरंचि उपजावा जब तेँ ।
देखे सुने ब्याह बहु तब तेँ ।
सकल भाँति सम साज समाजू ।
सम समधी देखे हम आजू ।

त्या व्याह्यांना पाहून देव अनुरक्त झाले व फुलें उधळून त्यांचें यशोगान करूं लागले. ते म्हणाले, ब्रह्मसृष्टि झाली तेंव्हांपासून आम्हीं अनेक विवाहसमारंभ पहात आलों व ऐकतहि आलों; परंतु सर्वप्रकारें समृद्ध असा थाट आणि समारोह आणि असे एकतोलाचे व्याही आम्ही आजच पाहिले.

देवागिरा सुनि सुंदर साँची ।
प्रीति अलौकिक दुहुँ दिसि माँची ।
देत पावँडे अरघु सुहाये ।
सादर जनकु मंडपहिँ ल्याये ।

देवांचें तें सत्य आणि खुबीदार भाषण[1] ऐकून दोन्ही समाजांत लोकोत्तर प्रेम माजून राहिलें. सुंदर पायघडया आणि अर्घ्य देत देव जनकानें दशरथास अत्यंत आदरानें मंडपांत आणलें.

छंद—मंडप बिलोकि बिचित्ररचना रुचिरता मुनिमन हरे । निजपानि जनक सुजान सब कहुँ आनि सिंहासन धरे ॥ कुल-इष्ट-सरिस बसिष्ठ पूजे बिनय करि आसिष लही । कौसिकहिँ पूजत परमप्रीति कि रीति तौ न परइ कही ॥ ३९ ॥

मंडपाची ती चित्रविचित्र रचना आणि शोभा पाहून मुनींचींहि मनें तल्लीन झालीं. समयज्ञ जनकानें सर्वांना हात धरून सिंहासनावर बसविलें. कुलदेवतेप्रमाणें महात्म्या वसिष्ठांची त्यानें सविनय पूजा करून

---

१ खुबी ही कीं देवाचा हवा तो अवतार घ्याल आणि पहाल तर निश्चय हा एकच होईल कीं, अगदीं समसमान अशा व्याह्यांचा सोहळा फक्त एका रामावतारांतच झालेला दिसून येतो. मच्छकच्छादि अवतार तर राहोतच, पण कृष्णावतारांत देखील तो तसा दिसणार नाहीं. कारण वसुदेव राजा नव्हता आणि कृष्ण राजपुत्र नव्हता. कवीच्या चाणाक्ष नजरेचें हें एक प्रतीक समजावयाचें.

त्यांचा आशीर्वाद घेतला. परंतु विश्वामित्रांची पूजा करितेवेळेस जनकाच्या हृदयांत पराकाष्ठेच्या प्रेमाचा जो आविर्भाव झाला तो मात्र सांगतां पुरवत नाहीं.

**दो०—वामदेवआदिक रिषय पूजे मुदित महीस। दिये दिव्य आसन सबहि सब सन लही असीस ॥ ३१९ ॥**

वामदेवप्रभृति ऋषींचें जनकानें संतोषपूर्वक पूजन केलें. त्या सर्वांस त्यानें दिव्य आसनें दिलीं, आणि सर्वांचे आशीर्वाद घेतले.

चौ०—बहुरि कीन्ह कोसलपति पूजा।
जानि ईससम भाव न दूजा।
कीन्हि जोरि कर बिनय बडाई।
कहि निज भाग्य बिभव बहुताई।

नंतर जनकानें राजा दशरथाची ईश्वरांत आणि त्याच्यांत अभेद जाणून पूजा केली, व हात जोडून विनयानें स्तुति केली, आणि (हा संबंध जुळून आल्यामुळें) स्वतःच्या थोर भाग्योत्कर्षाची प्रशंसा केली.

पूजे भूपति सकलबराती।
समधीसम सादर सब भाँती।
आसन उचित दिये सब काहू।
कहउँ कहा मुख एक उछाहू।
सकलबरात जनक सनमानी।
दान मान बिनती बर बानी।

जनकानें सर्व वऱ्हाडी मंडळींचेंहि राजा दशरथाप्रमाणें अनेक प्रकारें स्वागत करून त्यांची पूजा केली आणि सर्वांनाच योग्य आसनें दिलीं. त्या उत्सवाचें मी एका मुखानें काय वर्णन करावें ? जनकानें सर्व वऱ्हाडी मंडळींचा दानानें, मानानें, विनयानें आणि मृदु वाणीनें गौरव केला.

बिधि हरिहर दिसिपति दिनराऊ।
जे जानहिँ रघु–बीर–प्रभाऊ।
कपट–बिप्र–बर–बेषु बनाये।
कौतुक देखहिँ अति सचुपाये।
पूजे जनक देवसम जाने।
दिये सुआसन बिनु पहिचाने।

ब्रह्मा, विष्णु, महेश, अष्ट दिक्पाल, सूर्य इत्यादि रघुवीराचा प्रभाव जाणणारे सर्व देव कपटब्राह्मणवेषानें अत्यंत प्रेमपूर्वक व स्तब्धतेनें कौतुक पहात होते. राजा जनकानें त्यांना ओळखलें नाहीं तरी देवाप्रमाणेंच मानून त्यांचें पूजन केलें आणि त्यांस आसनें दिलीं.

**छंद—पहिचान को केहि जान सबहि अपान सुधि भोरी भई। आनंदकंद बिलोकि दूलह उभय दिसि आनँदमई ॥ सुर लखे राम सुजान पूजे मानसिक आसन दये। अवलोकि सीलु सुभाउ प्रभु को बिबुधमन प्रमुदित भये ॥ ४० ॥**

तेथें कोण कोणाला ओळखतो ? कारण स्वतःची स्वतःलाच कोणाला शुद्ध राहिली नव्हती. आनंदकंद रामास पाहून दोहींकडचे लोक आनंदांत गर्क झाले होते. सर्वज्ञ रामचंद्रांनीं मात्र देवांस ओळखून त्यांची मानसिक पूजा केली व त्यांस आसनें दिलीं. प्रभूंचें शील व स्वभाव पाहून देवांचीं मनें प्रमुदित झालीं.

**दो०—रामचंद्र-मुख-चंद्र-छबि लोचन चारु-चकोर। करत पान सादर सकल प्रेम प्रमोद न थोर ॥ ३२० ॥**

श्रीरामचंद्राच्या मुखचंद्राची शोभा सर्व लोक आपल्या सुंदर नेत्रचकोरांनीं आदरपूर्वक व अत्यंत प्रेमानंदानें सेवन करूं लागले.

चौ०—समउ बिलोकि बासिष्ठ बोलाये।
सादर सतानंद मुनि आये।
बेगि कुअँरि अब आनहु जाई।
चले मुदित मुनिआयसु पाई।

योग्य अवसर जाणून वसिष्ठांनीं शतानंदास पाचारविलें. तो निरोप ऐकतांच ते आदरपूर्वक जवळ आले. ( वसिष्ठ म्हणाले, ) आतां जाऊन मुलीस लवकर घेऊन या. याप्रमाणें आज्ञा होतांच शतानंद आनंदानें गेले.

रानी सुनि उपरोहितबानी।
प्रमुदित सखिन्ह समेत सयानी।
बिप्रबधू कुलबृद्ध बोलाई।
करि कुलरीति सुमंगल गाई।

पुरोहितांचा निरोप ऐकून राणी चतुर सख्यांसहवर्तमान हर्षित झाली. तिनें ब्राह्मण, सुवासिनी आणि कुलवृद्ध स्त्रियांना बोलावून व आपले कुलाचार करून मंगल गाणीं आरंभिलीं.

नारिबेष जे सुरबर बामा।
सकल सुभाय सुंदरी स्यामा।
तिन्हहिँ देखि सुख पावहिँ नारी।

बिनु पहिचानि प्रान तेँ प्यारी ।
बार बार सनमानहिँ रानी ।
उमा-रमा-सारद-सम जानी ।

नारीवेषानें आलेल्या निसर्गसुंदर आणि रमणीय अशा देवांगना पाहून इतर सर्व स्त्रियांना आनंद झाला, आणि त्यांचा परिचय नसतांहि त्यांस त्या प्राणाहूनहि प्रिय वाटूं लागल्या. राणी त्यांस उमा, रमा आणि सरस्वती ह्यांच्याप्रमाणें लेखून त्यांचा वारंवार सत्कार करूं लागली.

सीय सवाँरि समाज बनाई ।
मुदित मंडपहिँ चलीँ लेवाई ।

सीतेचा शृंगार करून आणि तिच्याभोंवतीं जमून तिच्या सख्या तीस आनंदानें मंडपांत घेऊन चालल्या.

छंद—चलि ल्याइ सीतहि सखी सादर सजि सुमंगल भामिनी । नवसप्त साजे सुंदरी सब मत्त-कुंजर-गामिनी ॥ कलगान सुनि मुनि ध्यान त्यागहिँ काम कोकिल लाजहीँ । मंजीर नूपुर कलित कंकन तालगति बर बाजहीँ ॥ ४१ ॥

सुमंगलवेष केलेल्या, सुंदर, षोडशशृंगारवती, मत्त-गजगामिनी व नवयुवती अशा सीतेच्या सर्व सख्या तिला शृंगारून थाटामाटानें घेऊन चालल्या. त्यांचें मधुर गान ऐकून मुनींच्या ध्यानाचा भंग झाला, आणि कामदेव व कोकिळ लज्जित झाले. त्यांचीं नूपुरें, पैंजण आणि कंकणें यांचा मधुर आवाज तालावर ठसक्यानें होऊं लागला.

दो०—सोहति बनितावृंद महँ सहज सुहावनि सीय । छबि-ललना-गन मध्य जनु सुखमातिय कमनीय ॥ ३२१ ॥

त्या युवतिसमाजांत सहज लावण्यवती सीता जणुंकाय सौंदर्यरूप स्त्रियांच्या समुदायांत सर्वातिरिक्त सुंदर अशी सुंदरतारूप स्त्रीच शोभूं लागली.

चौ०—सिय सुंदरता बरनि न जाई ।
लघुमति बहुत मनोहरताई ।

सीतेचें सौंदर्य वर्णवलेंच जावयाचें नाहीं. कारण तें अपार आणि कवीची बुद्धि मात्र अत्यल्प.

आवत दीखि बरातिन्ह सीता ।
रूपरासि सब भाँति पुनीता ।
सबहि मनहिँ मन किये प्रनामा ।
देखि राम भये पूरनकामा ।

लावण्यखाणी व सर्वथैव पवित्र अशी सीता येत आहे असें पाहतांच वऱ्हाडी मंडळींनीं मनांतल्या मनांत तिला प्रणाम केला. तिला पाहून राम पूर्णकाम झाले.

हरषे दसरथ सुतन्ह समेता ।
कहि न जाइ उर आनँद जेता ।
सुरप्रनामु करि बरिसहिँ फूला ।
मुनि-असीस-धुनि मंगलमूला ।
गान-निसान-कोलाहलु भारी ।
प्रेम-प्रमोद-मगन नरनारी ।

पुत्रासहवर्तमान दशरथास जो आनंद झाला तो सांगतां येणें शक्य नाहीं. देवांनींहि तिला प्रणाम करून फुलें उधळलीं. मुनींच्या मंगलकारक आशीर्वादांची रेलचेल झाली. गायनाची आणि वाद्यांची सपाटून गर्दी उडाली. स्त्रीपुरुष प्रेमानंदांत तरंगूं लागले.

एहि बिधि सीय मंडपहि आई ।
प्रमुदित सांति पढहिँ मुनिराई ।
तेहि अवसर कर बिधि व्यवहारू ।
दुहुँ कुलगुरु सब कीन्ह अचारू ।

अशा रीतीनें सीतेनें मंडपांत प्रवेश केला. मुनिवर्य आनंदानें ( विघ्ननिवारणार्थ ) शांतिसूक्तें म्हणूं लागले. त्या वेळचीं विधियुक्त आणि व्यवहारोक्त कर्में उभय पक्षांच्या कुलगुरूंनीं केलीं.

छंद—आचार करि गुरु गौरि गनपति मुदित बिप्र पुजावहीँ । सुर प्रगटि पूजा लेहिँ देहिँ असीस अतिसुख पावहीँ ॥ मधुपर्क मंगलद्रव्य जो जेहि समय मुनि मन महँ चहहिँ । भरे कनककोपर कलस सो तब लिये परिचारक रहहिँ ॥४२॥

तीं केल्यावर गुरु, गौरी आणि गणपतीची ब्राह्मणांनीं आनंदानें पूजा करविली. देव प्रत्यक्ष प्रकट होऊन पूजा ग्रहण करीत, आशीर्वाद देत, आणि आनंद मानीत. मधुपर्कानिमित्त ज्या ज्या वेळीं जीं जीं मंगल द्रव्यें मुनींना लागणार तीं सर्व सुवर्णाच्या ताटांत आणि कलशांत भरून घेऊन शागीर्द मंडळी तयार झाली.

छंद—कुलरीति प्रीतिसमेत रबि कहि देत सबु सादर कियो। एहि भाँति देव पुजाइ सीतहि सुभग सिंहासन दियो॥ सिय-राम-अवलोकनि परसपर प्रेम काहु न लखि परइ। मन-बुद्धि-बर बानी-अगोचर प्रगट कबि कैसे करइ॥ ४३॥

( रघुकुलाचा मूळ पुरुष ) सूर्य आपल्या कुळाचे आचार प्रेमयुक्त होत्साता प्रत्यक्ष सांगूं लागला, आणि त्याप्रमाणें ते सर्व आदरपूर्वक करण्यांत आले. अशा-प्रकारें देवतापूजन होऊन सीतेस सुंदर सिंहासन देण्यांत आलें. सीतेच्या आणि रामचंद्राच्या परस्पर दृष्टिक्षेपांतील प्रेम कोणासच दृग्गोचर झालें नाहीं. तें मन, बुद्धि आणि वाणी यांना अनाकलनीय असल्या-मुळें तें कवीस कसें प्रकट करितां येईल ?

दो०—होम समय तनु धरि अनलु अतिसुख आहुति लेहिँ। बिप्रबेष धरि बेद सब कहि बिबाहबिधि देहिँ॥ ३२२॥

होमकालीं अग्निनारायणांनीं मूर्तिमंत प्रकट होऊन अत्यानंदपूर्वक आहुतीचा स्वीकार केला. त्याचप्रमाणें सर्व वेदांनीहि ब्राह्मणरूपें घेऊन वैवाहिक प्रयोग म्हटले.

चौ०—जनक-पाट-महिषी जग जानी।
सीयमातु किमि जाइ बखानी।
सुजस सुकृत सुख सुंदरताई।
सब समेटि बिधि रची बनाई।
समउ जानि मुनिबरन्ह बोलाई।
सुनत सुआसिनि सादर ल्याई।
जनक-बाम-दिसि सोह सुनयना।
हिमगिरि संग बनी जनु मयना।

जगत्प्रसिद्ध जनकाची पट्टराणी आणि सीतेची माता इचें वर्णन कसें करवणार ? सुयश, सुकृत, सौख्य आणि सौंदर्य हे सर्व पूर्णांशानें संमिश्र करून ब्रह्म-देवानें तिची मूर्ति घडविली होती. योग्य समयीं तिला मुनीश्वरांनीं बोलाविलें. निरोप ऐकतांच सुवा-सिनींनीं तिला आदरपूर्वक आणलें. हिमगिरीबरोबर ज्याप्रमाणें मैना शोभली तद्वत् ती सुनयना जनकाच्या वामभागीं शोभूं लागली.

कनककलस मनिकोपर रूरे।
सुचि-सुगंध-मंगल-जल-पूरे।
निजकर मुदित राय अरु रानी।
धरे राम के आगे आनी।

पवित्र, सुगंधित आणि मंगलजलानें भरून आणलेले सुवर्णकलश आणि तेजस्वी रत्नतबकें राजा-राणींनीं स्वतः रामचंद्रासमोर ठेविलीं.

पढहिँ बेद मुनि मंगलबानी।
गगन सुमन झरि अवसर जानी।
बर बिलोकि दंपति अनुरागे।
पाय पुनीत पखारन लागे।

मुनिजन मंगलवाणीनें मंगल वेदपाठ करीत आहेत आणि आकाशांतून वेळोवेळीं पुष्पांचा वर्षाव चालूच आहे अशा थाटांत रामरूपीं अनुरक्त झालेलें तें दंपत्य त्या रघुरायाच्या पवित्र चरणांचें प्रक्षालन करूं लागलें.

छंद—लागे पखारन पायपंकज प्रेम तनु पुलकावली। नभ नगर गान-निसान-जय-धुनि उमगि जनु चहुँ दिसि चली॥ जे पदसरोज मनोज-अरि-उर-सर सदैव बिराजहीँ। जे सुकृत सुमिरत बिमलता मन सकल कलिमल भाजहीँ॥४४॥

जीं चरणकमलें मदनारीच्या मानससरोवरांत अखंड विराजित असतात, आणि पुण्यश्लोकरून ज्यांचें स्मरण झालें असतां मनास विमलता येऊन सर्व कलिकिल्मिष नष्ट होतें, तीं पदपंकजें प्रक्षालन करीत असतां राजाराणींच्या देहांवर प्रेमरोमांचावलि उभी राहिली. आकाशांत व नगरांत गीत, वाद्य आणि जयजयकार यांच्या नादाचा कडेलोट होऊनच कीं काय सर्व वातावरण मुखरित झालें.

छंद—जे परसि मुनिबनिता लही गति रही जो पातकमई। मकरंद जिन्हको संभुसिर सुचिताअवधि सुरबरनई॥ करि मधुप मुनि मन जोगिजन जे सेई अभिमत गति लहहिँ। ते पद पखारत भाग्यभाजन जनक जय जय सब कहहिँ॥ ४५॥

ज्या पदकमलांच्या स्पर्शानें केवळ पापाची पुतळी अशी गौतमपत्नी अहल्या उद्धरून गेली, श्रीशंकरांनीं मस्तकावर धारण केलेली आणि पवित्रपणाची केवळ सीमाच अशी स्वर्गंगा ही ज्याच्या चरणांचा मकरंद

होय, मुनी आणि योगीजन ज्यांचे ठिकाणीं आपलीं मनें भृंगवत् रमवून ज्यांच्या सेवनानें वांछित गति प्राप्त करून घेतात, ते चरण प्रक्षालन करीत असतां भाग्याचा केवळ पुतळाच अशा राजा जनकाचा सर्व लोक जयजयकार करूं लागले.

छंद—बर-कुअँरि-करतल जोरि साखोचार दोउ कुलगुरु करहिँ । भयो पानिगहन बिलोकि बिधि सुर मनुज मुनिआनँद भरहिँ ॥ सुखमूल दूलह देखि दंपति पुलक तनु हुलस्यौ हियो । करि लोक-बेद-बिधान कन्यादान नृपभूषन कियो ॥४६॥

वधूवरांचें पाणिग्रहण करवून उभय कुलगुरूंनीं वंशोच्चार केला. पाणिग्रहण झालेलें पाहून ब्रह्मदेव, देव, नर आणि मुनी आनंदानें प्रफुल्लित झाले. आनंदकंद अशा वराकडे पाहून त्या दंपत्याचे देह रोमांचित आणि अंतःकरणें उल्हासित झालीं. नृपभूषण जनकानें शास्त्र आणि व्यवहाररीतीला अनुसरून कन्यादान केलें.

छंद—हिमवंत जिमि गिरिजा महेसहि हरिहि श्री सागर दई । तिमि जनक रामहि सिय समरपि बिस्व कल कीरति नई ॥ क्यौं करहिँ बिनय बिदेह कियो बिदेह मूरति सावँरी । करि होम विधिवत गाँठि जोरी होन लागी भावँरी ॥ ४७ ॥

ज्याप्रमाणें हिमालयानें श्रीशंकरास पार्वती आणि सागरानें श्रीहरीस लक्ष्मी अर्पण केली त्याप्रमाणें राजा जनकानें श्रीरामचंद्रास सीता समर्पण करून त्रैलोक्यांत आपली अभिनव यशोनदी वाहविली. आतां विदेहानें रामाची प्रार्थना कशी करावी ? कारण, त्या घनश्याम मूर्तीनें जनकास ' विदेह ' ( देहभावरहित ) केलें होतें. विधिपूर्वक लाजाहोम आटोपून ( वधूवरांच्या वस्त्रांची ) गांठ मारण्यांत आली आणि नंतर सप्तपदीस प्रारंभ झाला.

दो०—जयधुनि बंदी—बेद—धुनि मंगलगान निसान । सुनि हरषहिँ बरषहिँ बिबुध सुर-तरु-सुमन सुजान ॥ ३२३ ॥

जयघोष, बंदिजनघोष, वेदघोष, मंगलघोष आणि वाद्यघोष ऐकून समयज्ञ देवांनीं प्रसन्न होऊन कल्पवृक्षांच्या फुलांचा वर्षाव केला.

चौ०—कुअँरु कुअँरि कल भावँरि देहीँ ।
नयनलाभ सब सादर लेहीँ ।
जाइ न बरनि मनोहर जोरी ।
जो उपमा कछु कहउँ सो थोरी ।

वधूवरांची ती रम्य सप्तपदी चालू असतां सर्वजण आतुरतेनें आपल्या नेत्रांचें साफल्य करूं लागले. तें मनोहर युग्म अवर्णनीय होय, कारण त्यांना जी उपमा द्यावी ती गौणच ठरेल.

राम सीय सुंदर प्रतिछाहीँ ।
जगमगाति मनि खंभन्ह माहीँ ।
मनहुँ मदन रति धरि बहु रूपा ।
देखत रामबिबाहु अनूपा ।

सीतारामचंद्रांचीं सुंदर प्रतिबिंबें मणिस्तंभांत तळपूं लागलीं. तेव्हां जणूंकाय रति आणि मदनच अनेक रूपें धारण करून तो अप्रतिम लग्नसोहळा पहात आहेत असें भासे.

दरसलालसा सकुच न थोरी ।
प्रगटत दुरत बहोरि बहोरी ।

रतिमदनांस रामदर्शनाची लालसा तर होतीच, परंतु त्यांना बराच संकोचहि वाटत होता. ते स्तंभांत अनेक रूपांनीं प्रकट होत असत. ( परंतु सीतारामांचे वेष घेतल्याबद्दल भीति किंवा स्वतःच्या सौंदर्यन्यूनत्वाबद्दलची कल्पना मनांत आल्याबरोबर ) ते वारंवार गुप्तहि होत असत.

भये मगन सब देखनिहारे ।
जनकसमान अपान बिसारे ।

सर्व प्रेक्षक मंडळी तल्लीन होऊन जनकाप्रमाणेंच देहभान विसरली.

प्रमुदित मुनिन्ह भावँरी फेरी ।
नेगसहित सब रीति निबेरी ।
राम सीयसिर सेँदुर देहीँ ।
सोभा कहि न जात बिधि केहीँ ।

पुरोहितांनीं आनंदानें वधूवरांकडून सप्तपदी करविली. दक्षिणेसहित सर्व कर्में आटोपलीं. रामांनीं सीतेच्या भांगांत शेंदूर पेरला. त्या शोभेचें कशाहि रीतीनें वर्णन करतां येत नाहीं.

अरुनपराग जलजु भरि नीके ।
ससिहि भूष अहि लोभ अमीके ।

( तथापि कवी म्हणतात, ) कमलांत अरुणपराग

भरलेला असल्यामुळें त्यास जसें रमणीयत्व येतें तद्वत् रामाच्या करसंपुटास शेंदुरानें शोभा आणली. (शिवभूषण) सर्प जसा अमृताच्या लोभानें चंद्राचा भुकेला असतो त्याप्रमाणें रामाचा भुज सतीच्या सौंदर्यलोभानें तिच्या मुखाचे ठिकाणीं लोलुप झाला.

बहुरि बसिष्ठ दीन्ह अनुसासन ।
बर दुलहिनि बैठे एक आसन ।

नंतर वसिष्ठांनीं आज्ञा केल्यावर वधूवर एकासनावर बसले.

छंद—बैठे बरासन राम जानकि मुदित मन दसरथ भये । तनु पुलक पुनि पुनि देखि अपने सुकृत-सुर-तरु-फल नये ॥ भरि भुवन रहा उछाहु रामबिबाहु भा सबही कहा । केहि भाँति बरनि सिरात रसना एक यह मंगल महा ॥ ४८ ॥

राम आणि सीता एकाच सिंहासनीं बसलेले पाहून दशरथ मनांत संतुष्ट झाला. आपल्या सुकृतरूपी कल्पतरूस अनपेक्षित गोड फळ आलेलें पाहून त्याचें शरीर वरचेवर रोमांचित होऊं लागलें. रामाचा विवाह झाला ह्मणून सर्वांनीं एकच गजर केला. त्या आनंदगजरानें सर्व भुवनें व्यापून टाकलीं. कवीची ही एक रसना अशा त्या महामंगल प्रसंगाचें साकल्यवर्णन कसें करणार ?

छंद—तब जनक पाइ बसिष्ठ आयसु ब्याह-साज सवाँरिकै । मांडवी स्रुतिकीर्ति उर्मिला कुअँरि लईं हँकारिकै ॥ कुस-केतु-कन्या प्रथम जो गुन-सील-सुख-सोभा मई । सब रीति-प्रीति-समेत करि सो ब्याहि नृप भरतहि दई ॥ ४९ ॥

नंतर जनकानें वसिष्ठांची आज्ञा घेऊन विवाहसामग्री सिद्ध करून मांडवी, श्रुतकीर्ति आणि उर्मिला या मुलींना बोलावून आणिलें व गुण, शील, सुख आणि सौंदर्य यांनीं परिपूर्ण अशी जी ज्येष्ठ कुशकेतुकन्या मांडवी तिचें भरताशीं सर्वविधिपूर्वक आणि सप्रेम पाणिग्रहण करविलें.

छंद—जानकी-लघु-भगिनी सकल सुंदरि सिरोमनि जानि कै । सो तनय दीन्ही ब्याहि लषनहि सकल बिधि सनमानि कै ॥ जेहि नाम स्रुतिकीरति सुलोचनि सुमुखि सब गुनआगरी । सो दई रिपुसूदनहि भूपति रूप सील उजागरी ॥ ५० ॥

जानकीची धाकटी बहीण जी उर्मिला ती सकलसौंदर्यशिरोमणी जाणून सकलविधिपूर्वक व अत्यादरानें लक्ष्मणाला दिली. श्रुतकीर्ति नांवाची सुलोचनी, सुमुखी, सर्व सद्‌गुणांचें भांडार आणि रूप व शील यांनीं प्रख्यात अशी तिसरी कुमारी राजानें शत्रुघ्नास दिली.

छंद—अनुरूप वर दुलहिनि परसपर लखि सकुचि हिय हरषहीं । सब मुदित सुंदरता सराहहिँ सुमन सुरगन बरषहीं ॥ सुंदरी सुंदर बरन्ह सह सब एक मंडप राजहीं । जनु जीव अरु चारिउ अवस्था बिभुन सहित बिराजहीं ॥ ५१ ॥

त्या सर्व वधू प्रत्येकीस अनुरूप वर मिळालेले पाहून वरून जरी संकोचित दिसत तरी मनांत हर्षित होत्या. सर्व लोक आनंदानें वधूवरांचें सौंदर्य वाखाणूं लागले व देव पुष्पवर्षाव करूं लागले. ज्याप्रमाणें जीव आणि त्याच्या चारीहि अवस्था (जाग्रति, स्वप्न, सुषुप्ति आणि तुर्या) आपापल्या विभूंसहित (विश्व, तैजस, प्राज्ञ, आणि ब्रह्म) शोभतात, तद्वत् त्या सुंदर वधू आपापल्या सुंदर पतींसहवर्तमान एकाच मंडपांत शोभूं लागल्या.

दो०—मुदित अवधपति सकलसुत बधुन्ह समेत निहारि । जनु पाये महि-पाल-मनि क्रियन्ह सहित फल चारि ॥ ३२४ ॥

राजा दशरथ आपले सर्व पुत्र सपत्नीक पाहून हर्षित झाला. जणुंकाय त्यास चार क्रियां (सेवा, श्रद्धा, तपस्या आणि भक्ति) सहित चतुर्विध फळेंच (धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष) प्राप्त झालीं.

चौ०—जसि रघुबीर ब्याहबिधि बरनी ।
सकलकुअँर ब्याहे तेहि करनी ।

ज्याप्रमाणें रघुवीराच्या लग्नप्रसंगाचें वर्णन केलें, तशाच धूमधडाक्यानें सर्व पुत्रांचा विवाह झाला.

कहि न जाइ कछु दाइज भूरी ।
रहा कनकमनि मंडप पूरी ।

आंदण इतकें भरपूर होतें कीं, तें सांगण्याची मुळीं सोयच नाहीं. सुवर्ण व रत्नें यांनीं मंडप भरून गेला.

कंबल बसन बिचित्र पटोरे ।
भाँति भाँति बहुमोल न थोरे ।
गज रथ तुरग दास अरु दासी ।
धेनु अलंकृत कामदुहा सी ।
बस्तु अनेक करिय किमि लेखा ।
कहि न जाइ जानहिँ जिन्ह देखा ।

चित्रविचित्र व बहुमोल तऱ्हेतऱ्हेच्या शालजोड्या व इतर वस्त्रें थोडींथोडकीं नव्हतीं. गज, रथ, अश्व, दास, दासी, सालंकृत कामधेनु वगैरे उदंड वस्तूंची यादी कोठवर द्यावी ? त्यांचें वर्णन करणें शक्य नाहीं. ज्यांनीं त्या पाहिल्या त्यांनाच त्या माहीत !

लोकपाल अवलोकि सिहाने ।
लीन्ह अवधपति सब सुख माने ।

त्या पाहून लोकपालदेखील आश्चर्य करूं लागले. दशरथानें त्यांचा आनंदानें स्वीकार केला.

दीन्ह जाचकन्हि जो जेहि भावा ।
उबरा सो जनवासहिँ आवा ।

दशरथानें त्या वस्तु याचकांस मनमुराद वांटल्या व त्यांतून शिल्लक उरल्या त्या जानवशाच्या ठिकाणीं आणल्या.

तब कर जोरि जनक मृदुबानी ।
बोले सब बरात सनमानी ।

नंतर जनक हात जोडून प्रेमळ शब्दांनीं सर्व वऱ्हाड्यांना सन्मानपूर्वक म्हणाला,

**छंद—सनमानि सकल बरात आदर दान बिनय बडाइ कै । प्रमुदित महा मुनिबृंद बंदे पूजि प्रेम लडाइ कै ।। सिरनाइ देव मनाइ सब सन कहत करसंपुट किये । सुर साधु चाहत भाव सिंधु कि तोष जल अंजलि दिये ।। ५२ ।।**

आदरपूर्वक देणग्या देऊन सर्व वऱ्हाड्यांचा विनय आणि स्तुतिपूर्वक गौरव केल्यानंतर प्रमुदित अंतःकरणानें त्यानें प्रेमपूर्वक तेथल्या महान् मुनीश्वरांचें पूजन केलें, आणि त्यांस प्रणाम करून व देवांस नमस्कार करून तो बद्धांजलि होऊन सर्वांस म्हणाला, देव आणि संत केवळ भावाचे भुकेले असतात; एरवीं अंजलीभर उदक दिल्यानें समुद्राचा संतोष होतो काय ?

**छंद—करजोरि जनक बहोरि बंधुसमेत कोसलराय सोँ । बोले मनोहर बयन सानि सनेह सील सुभाय सोँ ।। सनबंध राजन रावरे हम बडे अब सबबिधि भये । यह राज साज समेत सेवक जानिबी बिनु गथ लये ।। ५३ ।।**

फिरून तो बांधवांसहवर्तमान कोशलराजास हात जोडून, स्वाभाविक शील आणि प्रेम यांनीं स्निग्ध अशा मनोहर वाणीनें म्हणाला, महाराजांनीं हा संबंध घडवून आणल्यामुळें आज मी सर्व प्रकारें श्रेष्ठ झालों आहे. ह्या राज्यवैभवासकट मला आपण आपला निष्काम सेवक समजावा.

**छंद—ए दारिका परिचारिका करि पालबी करुनामई । अपराध छमिबो बोलि पठये बहुत हौँ ढीठ्यो कई ।। पुनि भानु-कुल-भूषन सकल-सनमान-निधि समधी किये । कहि जात नहिँ बिनति परसपर प्रेम परिपूरन हिये ।। ५४ ।।**

ह्या दयनीय मुलींना परिचारिका मानून आपण त्यांचें पालन करावें. आपणांस बोलावणें पाठविलें हें मीं मोठेंच धाष्ट्य केलें. ह्या माझ्या अपराधाबद्दल मला क्षमा असावी. नंतर राजा दशरथानेंहि जनकाचा पराकाष्ठेचा गौरव केला. त्या उभयतांच्या प्रेमपरिपूर्ण अंतःकरणांतला विनय अवर्णनीय होता.

**छंद—बृंदारकागन सुमन बरषहिँ राउ जनवासहिँ चले । दुंदुभी जयधुनि बेदधुनि नभ नगर कौतूहल भले ।। तब सखी मंगलगान करत मुनीसआयसु पाइ कै । दूलह दुलहिनिन्ह सहित सुंदरि चलीँ कोहबर ल्याइ कै ।।५५।।**

राजा दशरथ जानवशाकडे जाऊं लागला असतां देवतागण पुष्पवृष्टि करूं लागला. आकाशांत आणि नगरांत वाद्यघोष, जयघोष आणि वेदघोष यांचा एकच गजर झाला. नंतर मुनिवर्य वसिष्ठांच्या आज्ञेनें

मंगलगान करीत सीतेच्या सुंदर सख्या वधूसहवर्तमान वरांना गौरीहराकडे घेऊन चालल्या.

**दो०–पुनि पुनि रामहिँ चितव सिय सकुचति मन सकुचै न। हरत मनोहर–मीन–छबि प्रेम पियासे नैन॥ ३२५॥**

सीता वारंवार रामाकडे पाही, आणि (वरून) संकोचित होई; पण तिचें मन मात्र संकोचत नसे. सीतेचे ते प्रेमतृषित नेत्र (आपल्या दृष्टिक्षेपानें) मनोहर मीनांचें चांचल्यच हिरावून घेत असत.

चौ०–स्याम सरीर सुभाय सुहावन।
सोभा कोटि–मनोज–लजावन।
जावकजुत पदकमल सुहाये।
मुनि–मन–मधुप रहत जिन्ह छाये।
पीत पुनीत मनोहर धोती।
हरत बाल-रबि–दामिनि–जोती।

प्रभूंचें निसर्गसुंदर श्यामशरीर आणि त्यांचें लावण्य कोटिमदनांस देखील लाजवीत असे. मुनींचीं मनें ज्यांवर भ्रमराप्रमाणें रुंजी घालीत असतात, तीं यवादिचिन्हांकित पदकमलें फारच सुशोभित दिसत. पवित्र आणि मनोहर असा तो प्रभूंचा पीतांबर बालसूर्याची आणि विद्युल्लतेची सर्व आभाच हरण करीत होता.

कल किंकिनि कटिसूत्र मनोहर।
बाहु बिसाल बिभूषन सुंदर।
पीत जनेउ महाछबि देई।
करमुद्रिका चोरि चित लेई।
सोहत ब्याहसाज सब साजे।
उर आयत भूषन उर राजे।
पियर उपरना काँखा सोती।
दुहुँ आचरन्हि लगे मनि मोती।

मधुर किंकिणी, मनोहर कटिसूत्र, सुंदर अलंकार आणि पीत यज्ञोपवीत हीं अत्यंत रमणीय दिसत. बोटांतील मुद्रिका तर चित्तच चोरीत होत्या. लग्नाचा तो सर्व शृंगार फारच खुलून दिसे. प्रभूंचें विशाल वक्षःस्थल सर्व भूषणें शोभवीत होतें. केशरी शेला कांखेंतून लटकत होता. त्याच्या कांठाला व पदरांला रत्नें व मोतीं गुंफलें होते.

नयन कमल कल कुंडल काना।
बदनु सकल सौंदर्जनिधाना।
सुंदर भृकुटि मनोहर नासा।
भालतिलकु रुचिरता निवासा।
सोहत मौर मनोहर माथे।
मंगलमय मुकुतामनि गाथे।

कमलासारखे नेत्र, दिव्य कर्णकुंडलें, सकल सौंदर्याचें माहेरघरच असें वदन, सुरम्य भृकुटी, सुरेख नासिका आणि भालप्रदेशीं शोभणारा सौंदर्यनिधान असा तिलक व मस्तकीं असलेला मोर फारच शोभत होता. त्या मोराला मंगलकारक माणिकमोतीं जडविलेलीं होतीं.

**छंद—गाथे महामनि मौर मंजुल अंग सब चितचोरहीं। पुरनारि सुरसुंदरी बराहि बिलोकि सब तृन तोरहीं॥ मनि बसन भूषन वारि आरति करहिँ मंगल गावहीं। सुर सुमन बरिसहिँ सूत मागध बंदि सुजस सुनावहीं॥ ५६॥**

त्या मोरावर बहुमोल रत्नें जडविलीं होतीं. वरांचीं तीं दिव्य शरीरें सर्वांच्या चित्तांचें आकर्षण करीत होतीं. देवांगना आणि पुरस्त्रिया वरांस अवलोकन करून (गवताची काडी तोडून) त्यांची दृष्ट काढीत असत. रत्नें, वस्त्रें आणि अलंकार त्यांचेवरून उतरून त्या त्यांची आरती करीत आणि मंगल गाणीं गात, देव फुलें उधळीत, आणि सूत, मागध व बंदिजन त्यांचें सद्यश ऐकवीत.

**छंद—कोहबरहिँ आने कुअँर कुअँरि सुआसिनिन्ह सुख पाइ कै। अतिप्रीति लौकिक रीति लागीँ करन मंगल गाइ कै॥ लहकौरि गौरि सिखाव रामहिँ सीय सन सारद कहहिँ। रनिवासु हास-बिलास-रस-बस जनम को फल सब लहहिँ॥ ५७॥**

वधूवरांस गौरीहराजवळ आणिलें. सुवासिनींना आनंद होऊन त्या अत्यंत प्रेमानें मंगल गाणीं गात गात लौकिक चालरीती करूं लागल्या. पार्वती रामास आणि सरस्वती सीतेस (घास देणें, विड्या तोडणें, इत्यादि) हास्यविलास शिकवीत असत. सर्व राण्या त्या हास्यविलासरसांत गर्क होऊन आपल्या जन्माचें साफल्य पावत.

छंद--निज पानि-मनि महँ देखि प्रतिमूरति सु-रूप-निधान की। चालति न भुजवल्ली बिलोकनि-बिरह-भय-बस जानकी ॥ कौतुक बिनोद प्रमोद प्रेम न जाइ कहि जानहिँ अली। बर कुअँरि सुंदर सकल सखी लिवाइ जनवासहिँ चली ॥ ५८ ॥

आपल्या हातांतील रत्नकंकणांत लावण्यनिधान रामाचीं प्रतिबिंबें पाहून जानकी विरहाच्या भीतीनें आपले गोंडस हात अगदीं निश्चल धरून ठेवी. ( कारण, हात हालला तर प्रतिबिंबित मूर्ति दिसेनाशी होऊन तिला रामाविरहाची भीति पडे. ) तें कौतुक, तो विनोद, तो आनंद आणि तें प्रेम अवर्णनीय होतें. तें सीतेच्या सखीजनांसच ठाऊक. नंतर त्या सकलसुंदर वधूवरांची जानवशाकडे रवानगी झाली.

छंद--तेहि समय सुनिय असीस जहँ तहँ नगर नभ आनँद महा। चिरजिअहु जोरि चारु चार्‍यौ मुदितमन सवही कहा॥ जोगींद्र सिद्ध मुनीस देव बिलोकि प्रभु दुंदुभि हनी। चले हरषि बरषि प्रसून निज-निज-लोक जय जय जय भनी ॥ ५९ ॥

त्या समयीं नगरांत आणि नभोमंडलांत महदानंद छाऊन जिकडेतिकडे आशीर्वचनेंच ऐकूं येऊं लागलीं. ह्या चारीहि सुंदर जोडप्यांना उदंड आयुष्य असो असें सर्वजण प्रसन्न अंतःकरणानें ह्मणूं लागले. योगींद्र, सिद्ध, मुनीश्वर आणि देव यांनीं प्रभूस अवलोकन करून दुदुंभी वाजविल्या, आणि हर्षानें पुष्पवर्षाव करीत जयजयकार करून आपापल्या लोकीं गमन केलें.

दो०—सहित वधु टिन्ह कुअँर सब तब आये पितु पास। सोभा मंगल मोद भरि उमगेउ जनु जनवास ॥ ३२६ ॥

नंतर वधूंसहवर्तमान सर्व वर दशरथाकडे आले. तेव्हां जणुंकाय शोभा, मंगल आणि आनंद यांना पूर येऊन जानवसा तरंगूं लागला.

चौ०—पुनि जेवनार भई बहुभाँती।
पठये जनक बोलाइ बराती।
परत पावँडे बसन अनूपा।
सुतन्ह समेत गवन किय भूपा।

नंतर जेवणावळींचीहि खूप चंगळ उडाली. जनकानें वर्‍हाडी मंडळीस बोलावणें पाठविलें. अमोल वस्त्रांच्या पायघड्या पडल्या व राजा दशरथ पुत्रांसहवर्तमान चालूं लागला.

सादर सब के पाय पखारे।
जथाजोग पीढन बैठारे।
धोये जनक अवध-पति-चरणा।
सील सनेहु जाइ नहिँ बरना।

जनकानें आदरपूर्वक सर्वांचे पाय धुतले, आणि योग्यतेनुरूप त्यांस पाटावर बसविलें. नंतर त्यानें दशरथाचे पाय धुतले. त्या वेळचें त्याचें शील व प्रेम अवर्णनीय होतें.

बहुरि राम-पद-पंकज धोये।
जे हर हृदयकमल महँ गोये।
तीनिउ भाइ रामसम जानी।
धोये चरन जनक निजपानी।

नंतर शंकरांच्या हृदयकमलांत सन्निविष्ट असणारें श्रीरामाचें पदपंकज जनकानें प्रक्षालन केलें. रामाप्रमाणेंच तिघांहि बंधूंस समजून त्यांचेंहि त्यानें स्वहस्तें पाय धुतले.

आसन उचित सबहिं नृप दीन्हे।
बोलि सूपकारी सब लीन्हे।
सादर लगे परन पनवारे।
कनककील मनिपान सवाँरे।

राजानें सर्वांस उचित आसनें दिलीं. सर्व आचार्‍यांस बोलावून व्यवस्थेशीर पात्रें मांडण्यास प्रारंभ झाला. तीं पात्रें रत्नांचीं असून त्यांना सुवर्णाच्या चुका मारिल्या होत्या.

दो०—सूपोदन सुरभी सरपि सुंदर स्वाद पुनीत। छन महँ सब के परुसि गे चतुर सुआर बिनीत ॥ ३२७ ॥

कुशल व त्याहाजदार अशा आचार्‍यांनीं सुंदर, स्वादिष्ट आणि स्वच्छ खिचडी ( डाळभात ) आणि गाईचें तूप एक क्षणांत सर्वांस वाढलें.

चौ०—पंचकवलि करि जेवन लागे।
गारि गान सुनि अतिअनुरागे।
भाँति अनेक परे पकवाने।
सुधासरिस नहिँ जाहिँ बखाने।
परुसन लगे सुआर सुजाना।
बिंजन बिबिध नाम को जाना।

पंचप्राणाहुती होऊन भोजनास सुरुवात झाली.

औपहासिक गाणीं ऐकून सर्वजण फार खुष झाले. मागाहून अनेक प्रकारचीं अवर्णनीय लज्जतदार पक्वान्नें वाढण्यांत आलीं. चपळ वाढपी खंडोगणती चटण्याकोशिंबरी वाढीत. त्यांचीं नांवें तरी कोणास माहीत आहेत ?

चारि भाँति भोजन बिधि गाई।
एक एक बिधि बरनि न जाई।
छरस रुचिर बिंजन बहु जाती।
एक एक रस अगनित भाँती।

सूपशास्त्रानें चतुर्विध अन्न सांगितलें आहे. (भक्ष्य, भोज्य, लेह्य आणि चोष्य.) त्यांपैकीं एक-एक प्रकार देखील वर्णन करवावयाचा नाहीं. षड्रस अशा अनेक प्रकारच्या रुचिकर चटण्या असून प्रत्येक रसाचे अगणित प्रकार होते.

जेवँत देहिँ मधुर धुनि गारी।
लेइ लेइ नाम पुरुष अरु नारी।
समय सुहावनि गारि बिराजा।
हँसत राउ सुनि सहित समाजा।

भोजन चालू असतां स्त्रिया स्त्रीपुरुषांचीं नांवें घेऊन रसील्या आवाजांनीं उखाणे घेत असत. प्रसंगाची शोभा म्हणून त्या उखाण्यांचीहि मौज वाटे आणि ते ऐकून राजा दशरथ मंडळींसह हंसे.

एहि बिधि सबहीं भोजन कीन्हा।
आदरसहित आचमन दीन्हा।

अशा थाटांत सर्वांचीं भोजनें आटोपल्यावर व्यवस्थितपणें सर्वांचें आंचवणें झालें.

**दो०—देइ पान पूजे जनक दसरथ सहित समाज। जनवासे गवने मुदित सकल-भूप-सिरताज ॥ ३२८ ॥**

नंतर तांबूलदान होऊन जनकानें दशरथास त्याच्या सर्व मंडळींसह हारतुरे दिले, व सकलभूप-शिरोमणी राजा दशरथ आनंदानें आपल्या बिऱ्हाडीं गेला.

चौ०—नित नूतन मंगल पुर माहीँ।
निमिषसरिस दिन जामिनि जाहीँ।

शहरांत नित्य नवीन समारंभाची झोड चालली होती. दिवसरात्र क्षणाप्रमाणें निघून जात.

बडे भोर भू-पति-मनि जागे।
जाचक गुनगन गावन लागे।
देखि कुअँर बर बधुन्ह समेता।
किमि कहि जात मोद मन जेता।

मोठ्या पहाटेस दशरथ उठला. याचकजन त्याचे गुणगण गाऊं लागले. स्नुषांसहवर्तमान आपल्या पुत्रांना पाहून त्याच्या मनाला जो आनंद झाला तो कसा वर्णावा ?

प्रातक्रिया करि गे गुरु पाहीँ।
महाप्रमोद प्रेम मन माहीँ।
करि प्रनाम पूजा कर जोरी।
बोले गिरा अमिय जनु बोरी।

प्रातःकर्मे सारून मनांत अत्यंत प्रेमप्रमुदित होत्साता तो वसिष्ठांकडे गेला. त्यांना प्रणाम करून, त्यांची पूजा करून आणि हात जोडून अमृतमय वाणीनें तो म्हणाला.

तुम्हरी कृपा सुनहु मुनिराजा।
भयउँ आजु मैँ पूरनकाजा।
अब सब बिप्र बोलाइ गोसाईँ।
देहु धेनु सब भाँति बनाई।

हे मुनीश्वर ! ऐका. केवळ आपल्याच कृपा-प्रसादानें मी आज कृतकृत्य झालों. प्रभो ! आतां सर्व ब्राह्मणांना बोलावून सर्वतोपरी शृंगारलेल्या अशा धेनु दान द्याव्या.

सुनि गुरु करि महिपाल बडाई।
पुनि पठये मुनिबृंद बोलाई।

तें ऐकून वसिष्ठांनीं राजाची प्रशंसा करून मुनि-वृंदांना बोलावणें केलें.

**दो०—बामदेव अरु देवरिषि बालमीक जाबालि। आये मुनि-बर-निकर तब कौसिकादि तपसालि ॥ ३२९ ॥**

वामदेव, नारद, वाल्मीकि, जाबाली, विश्वामित्र आणि इतर तपस्वी असा मुनीश्वरांचा समाज तेथें प्राप्त झाला.

चौ०—दंड प्रनाम सबहि नृप कीन्हे।
पूजि सप्रेम बरासन दीन्हे।
चारि लच्छ बरधेनु मँगाई।
काम-सुरभि-सम सील सुहाई।
सब बिधि सकल अलंकृत कीन्ही।
मुदित महिप महिदेवन दीन्ही।

राजानें सर्वांस दंडप्रणाम करून त्यांस श्रेष्ठासन दिलें व त्यांची प्रेमपूर्वक पूजा केली. गुणांनीं आणि रूपांनीं कामधेनुतुल्य अशा चार लक्ष अव्वल खानदानी गायी मागवून राजानें त्या सर्व रीतीनें अलंकृत केल्या आणि आनंदानें त्या ऋषिमंडळींत वाटल्या.

करत बिनय बहुबिधि नरनाहू ।
लहेउँ आजु जग जीवनलाहू ।
पाइ असीस महीस अनंदा ।
लिये बोलि पुनि जाचकबृंदा ।

राजा बहुतप्रकारें विनयानें म्हणाला, "आज माझ्या जन्माचें सार्थक झालें." मुनिवरांचे आशीर्वाद घेतल्यानंतर त्यानें आनंदानें भिक्षुकांची कोंडी भरविली.

कनक बसन मनि हय गय स्यंदन ।
दिये बूझि रुचि रबि-कुल-नंदन ।
चले पढत गावत गुनगाथा ।
जय जय जय दिन-कर-कुल-नाथा ।

सुवर्ण, रत्न, गज, अश्व, रथ, वस्त्रें इत्यादि ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणें याचकांना दशरथानें दान केलें; नंतर ते राजाचे गुण गुणगुणत आणि "दिनकरकुलनाथाचा जयजयकार असो" असा आशीर्वाद देत निघून गेले.

एहि बिधि-राम-बिबाह-उछाहू ।
सकइ न बरनि सहसमुख जाहू ।

ह्याप्रमाणें रामाचा विवाहोत्सव संपला. त्याचें सहस्रमुख शेषाच्यानेंहि वर्णन करवणार नाहीं.

**दो०—बार बार कौसिकचरन सीसु नाइ कह राउ । यह सब सुख मुनिराज तव कृपा–कटाच्छ–प्रभाउ ॥ ३३० ॥**

राजा विश्वामित्रांच्या चरणांस वारंवार वंदन करून म्हणाला, हे मुनींद्र ! हा सर्व सोहळा आपल्या कृपाकटाक्षाच्या प्रभावानें दिसला.

चौ०—जनक सनेह सीलु करतूती ।
नृपु सब भाँति सराह बिभूती ।

दशरथ जनकाचें प्रेम, शील, करणी आणि ऐश्वर्य यांची सर्वतोपरी वाहवा गाऊं लागला.

दिन उठि बिदा अवधपति माँगा ।
राखहिँ जनक सहित अनुरागा ।
नित नूतन आदर अधिकाई ।
दिनप्रति सहस भाँति पहुनाई ।
नित नव नगर अनंद उछाहू ।
दसरथगवँन सुहाइ न काहू ।
बहुत दिवस बीते एहिं भाँती ।
जनु सनेहरजु बँधे बराती ।

प्रतिदिन सकाळीं उठून दशरथानें जाण्यास परवानगी मागावी आणि जनकानें त्यास प्रेमानें ठेवून घ्यावें. नित्य नवीन आणि अधिकाधिकच आदरसत्कार होत जाई. दररोज सहस्रपट पाहुणचार चालू होता. नगरांत नित्य नवा आनंदोत्सव चालू असे. दशरथाचें प्रयाण कोणासहि रुचेना. अशा प्रकारें बहुत दिवस लोटले. जणुंकाय जनकानें सर्व मंडळी आपल्या स्नेहपाशानें बद्धच करून टाकली होती.

कौसिक सतानंद तब जाई ।
कहा बिदेह नृपहि समुझाई ।
अब दसरथ कहँ आयसु देहू ।
जद्यपि छाँडि न सकहू सनेहू ।
भलेहिँ नाथ कहि सचिव बोलाये ।
कहि जय जीव सीस तिन्ह नाये ।

शेवटीं विश्वामित्र शतानंदाकडे गेले. नंतर शतानंदानें विदेहास समजावून सांगितलें कीं, जरी तुला आपलें प्रेम आवरतां येत नाहीं, तरी पण आतां दशरथास निरोप दे. त्यावर 'ठीक आहे महाराज' असें म्हणून जनकानें सचीवास बोलाविलें. सचिवानें येऊन 'जय जीव' म्हणून मस्तक नमविलें.

**दो०—अवधनाथ चाहत चलन भीतर करहु जनाउ । भये प्रेमबस सचिव सुनि बिप्र सभासद राउ ॥ ३३१ ॥**

(जनक म्हणाला), अयोध्यापति जाऊं इच्छित आहेत. तर अंतःपुरांत खबर द्या. हें ऐकतांच सचिव, ब्राह्मण, सभासद आणि इतर बडी बडी मंडळी प्रेमानें गुळमुळली.

चौ०—पुरबासी सुनि चलिहि बराता ।
पूछत बिकल परसपर बाता ।
सत्य गवँन सुनि सब बिलखाने ।
मनहुँ साँझ सरसिज सकुचाने ।

वऱ्हाडी मंडळी परत जात आहेत असें नगरवासी लोकांनीं ऐकिल्यानंतर ते दुःखित होऊन एकमेकांस नक्की बातमी विचारूं लागले. मंडळी जाणार हें

नक्की समजतांच सर्व उदास झाले, तेव्हां असें वाटे कीं, जणुंकाय सायंकाळ झाल्यामुळें कमळेंच कोमेजलीं आहेत.

जहँ जहँ आवत बसे बराती।
तहँ तहँ सिद्ध चला बहुभाँती।
बिबिधभाँति मेवा पकवाना।
भोजनसाज न जाइ बखाना।
भरि भरि बसह अपार कहारा।
पठये जनक अनेक सुआरा।

वरात येतांना जेथें जेथें पडाव होते तेथें तेथें अनेक प्रकारची रसद रवाना झाली. नानाप्रकारचे मेवे आणि मिठाया व मुत्पाकाचें सर्व सामान जनकानें अनेक बैल आणि कहार यांच्याद्वारें बेअंदाज रवाना केलें. तसेंच कित्येक आचारीहि पाठाविण्यांत आले.

तुरग लाख रथ सहस पचीसा।
सकल सवाँरे नख अरु सीसा।
मत सहस दस सिंधुर साजे।
जिन्हहिँ देखि दिसिकुंजर लाजे।
कनक बसन मनि भरि भरि जाना।
माहिषी धेनु बस्तु बिधि नाना।

नखशिखांत सजलेले असे एक लक्ष घोडे, पंचवीस हजार रथ, ज्यांना पाहतांच दिग्गज देखील लज्जित होतील असे सालंकृत दहा हजार मदोन्मत्त हत्ती, गाड्या भरभरून सुवर्ण, कापड आणि रत्नें, म्हशी, गाई आणि नानाप्रकारच्या वस्तु,

**दो०–दाइज अमित न सकिय कहि दीन्ह बिदेह बहोरि। जो अवलोकत लोकपति-लोक-संपद थोरि॥ ३३२॥**

सारांश, ज्याला पाहून लोकपालांनाहि आपल्या लोकांतली संपत्ति क्षुद्र वाटेल असें अगणित आणि अवर्णनीय आंदण विदेहानें दिलें.

चौ०–सब समाजु एहि भाँति बनाई।
जनक अवधपुर दीन्ह पठाई।

ह्याप्रमाणें सर्व देणगी सिद्ध करून जनकानें अयोध्येस पाठवून दिली.

चलिहि बरात सुनत सब रानी।
बिकल मीनगन जनु लघु पानी।
पुनि पुनि सीय गोद करि लेहीँ।
देइ असीस सिखावन देहीँ।

वऱ्हाडी जाणार हें ऐकतांच सर्व राण्या जलविरहित माशाप्रमाणें तळमळूं लागल्या. त्यांनीं वरचेवर सीतेस अंकावर घ्यावें, तिला आशीर्वाद द्यावे आणि बोध करावा.

होयेहु संतत पियहि पियारी।
चिर अहिवात असीस हमारी।
सासु-ससुर-गुरु-सेवा करेहू।
पतिरुख लखि आयसु अनुसरेहू।

( त्यांनीं म्हणावें ) सीते ! तूं आपल्या नवऱ्याची निरंतर लाडकी होऊन तुझें सौभाग्य अखंड होवो हाच आमचा तुला आशीर्वाद आहे. सासुसासरे आणि गुरुजन यांची सेवा करीत जा, आणि आपल्या पतीची मर्जी पाहून त्याच्या आज्ञेनुसार वागत रहा.

अति-सनेह बस सखी सयानी।
नारिधरमु सिखवहिँ मृदुबानी।

राण्यांच्या पोक्त सख्यांनींहि अत्यंत स्नेहवश होऊन प्रेमळ शब्दांनीं सीतेला स्त्रीधर्म शिकविले.

सादर सकल कुअँरि समुझाई।
रानिन्ह बार बार उर लाई।
बहुरि बहुरि भेटहिँ महतारी।
कहहिँ बिरंचि रची कत नारी।

राण्यांनीं प्रेमपूर्वक सर्व मुलींची समजूत करून त्यांना वारंवार उराशीं कवटाळलें. त्यांच्या आया त्यांना वारंवार भेटत, आणि म्हणत कीं, विधात्यानें स्त्रीजाति घडविली तरी कशाला ?

**दो०–तेहि अवसर भाइन्ह सहित राम भानु-कुल केतु। चले जनकमंदिर मुदित बिदा करावन हेतु॥ ३३३॥**

त्याच वेळीं बंधूंसहवर्तमान भानुकुलकेतु श्रीरामचंद्र निरोप घेण्यासाठीं जनकमंदिराकडे निघाले.

चौ०–चारिउ भाइ सुभाय सुहाये।
नगर–नारि–नर देखन धाये।

निसर्गसुंदर अशा त्या चौघांहि बंधूंस पाहण्यास नागरिक स्त्रीपुरुष उधळत सुटले.

कोउ कह चलन चहत हहिँ आजू।
कीन्ह बिदेह बिदा कर साजू।
लेहु नयन भरि रूप निहारी।
प्रिय पाहुने भूपसुत चारी।
को जानइ केहि सुकृत सयानी।
नयनअतिथि कीन्हे बिधि आनी।

कोणी म्हणत, हे आज जाण्याच्या विचारांत आहेत व जनकानें त्यांची बोळवण करण्याचीहि तयारी केली आहे. हे चारीहि राजपुत्र आपले आवडते पाहुणे आहेत. यांचीं रूपें डोळा भरून पाहून घेऊं या. मग शहाण्यांनों ! कोणास ठाऊक कोणत्या आपल्या पूर्वपुण्याईमुळें ब्रह्मदेवानें यांना येथें आणून आपल्या नेत्रांचे अतिथी केलें !

मरनसील जिमि पाव पियूखा ।
सुरतरु लहइ जनम कर भूखा ।
पाव नारकी हरिपद जैसे ।
इन्ह कर दरसन हम कहँ तैसे ।
निरखि रामसोभा उर धरहू ।
निज–मन–फनि मूरति–मनि–करहू ।

मरणोन्मुखास जसें अमृत, आजन्म क्षुधितास जसा कल्पवृक्षाचा लाभ, किंवा पाप्यास जशी हरिपदाची जोड तसाच आम्हांस ह्यांचा दर्शनलाभ होय. आपण हें रामरूप पाहून हृदयांत सांठवून ठेवूं या आणि आपल्या मनोरूप सर्पाचे मस्तकीं राममूर्तिरूप मणी बसवूं या.

एहि बिधि सबहि नयनफल देता ।
गये कुअँर सब राजनिकेता ।

ह्याप्रमाणें सर्वांच्या नेत्रांचें साफल्य करीत करीत ते सर्व कुमार राजमंदिरांत शिरले.

**दो०–रूपसिंधु सबबंधु लखि हरषि उठेउ रनिवासु । करहिँ निछावरि आरती महामुदितमन सासु ॥ ३३४ ॥**

अंतःपुरांतील सर्व स्त्रियांनीं रूपसागर अशा त्या सर्व बंधूंस पाहून आनंदानें उत्थापन दिलें. सासवांच्या मनांत महदानंद होऊन त्यांनीं दृष्ट काढून त्यांच्यावरून सत्के ओवाळून टाकले.

चौ०–देखि रामछबि अति अनुरागीँ ।
प्रेमबिबस पुनि पुनि पद लागीँ ।
रही न लाज प्रीति उर छाई ।
सहज सनेह बरनि किमि जाई ।

रामरूप पाहून राणीस अत्यंत प्रेम दाटलें. तिचें तें प्रेम अनिवार होऊन ती वारंवार रामाच्या पायांवर लोटूं लागली. हृदय प्रेमानें व्याप्त झाल्यामुळें मर्यादेची तीस दरकार उरली नाहीं. तें अकृत्रिम प्रेम अवर्णनीय होतें.

भाइन्ह सहित उबटि अन्हवाये ।
छरस असन अतिहेतु जेँ–वाये ।

तिनें सर्व बंधूंसहवर्तमान रामास उटणीं लावून व स्नानें घालून अत्यंत प्रेमानें त्यांस षड्रस अन्नें जेवूं घातलीं.

बोले रामु सुअवसर जानी ।
सील–सनेह–सकुच–मय बानी ।
राउ अवधपुर चहत सिधाये ।
बिदा होन हम इहाँ पठाये ।
मातु मुदितमन आयसु देहू ।
बालक जानि करब नित नेहू ।

योग्य अवसर जाणून रामचंद्र शील, स्नेह आणि संकोचपूर्ण वाणीनें म्हणाले, आमचे सरकार अयोध्येस जाऊं इच्छित आहेत, व त्यांनीं आम्हांस आपला निरोप मागण्यास्तव पाठविलें आहे. आईसाहेब ! प्रसन्न मनानें आम्हांस आज्ञा द्यावी, आणि आपलीं मुलें समजून निरंतर आम्हांवर आपला लोभ असूं द्यावा.

सुनत बचन बिलखेउ रनिवासू ।
बोलि न सकहिँ प्रेमबस सासू ।
हृदय लगाइ कुअँरि सब लीन्हीं ।
पतिन्ह सौंपि बिनती अति कीन्ही ।

तें वचन कानीं पडतांच सर्व अंतःपुर विव्हल झालें. प्रेमवश झाल्यामुळें सासवांच्या तर मुखांतून शब्द निघेना. त्यांनीं सर्व मुलींना पोटाशीं कवटाळून त्यांना त्यांच्या पतींना ओपलें आणि त्यांची अनेक प्रकारें विनवणी केली.

**छंद–करि बिनय सिय रामहिँ समरपी जोरि कर पुनि पुनि कहइ । बलि जाउँ तात सुजान तुम कहँ बिदित गति सब की अहइ ॥ परिवार पुरजन मोहि राजहि प्रानप्रिय सिय जानिबी । तुलसी सुसील सनेह लखि निज किंकरी करि मानिबी ॥**

सीता रामाचे स्वाधीन करून व वारंवार हात जोडून सुनयना विनयानें म्हणाली, हे सर्वज्ञ रामा ! ( बलिजाउ ) मी हा देह तुम्हावरून ओवाळून टाकितें. आपण सर्वांचेंच मनोगत जाणतां; आमच्या सर्व परिवाराची, पुरजनांची, महाराजांची आणि माझी ही सीता प्राणांहूनहि प्रिय आहे, हें जाणून आणि इच्या सुशीलतेकडे आणि प्रेमाकडे लक्ष देऊन हिला आपली दासी मानून घ्यावी.

**सो०–तुम परिपूरनकाम जान सिरोमनि भाव प्रिय। जन–गुन–गाहक राम दोषदलन करुनायतन॥ ३५॥**

रामा! आपण परिपूर्णकाम, ज्ञानाशिरोमणी, भावप्रिय, जनगुणग्राहक, दोषहारक आणि कारुण्यनिधि आहां हो!

चौ०–अस कहि रहीं चरन गहि रानी।
प्रेमपंक जनु गिरा समानी।
सुनि सनेहसानी बरबानी।
बहु बिधि राम सासु सनमानी।

असें म्हणून राणीनें रामचरणाला मिठी मारली. तेव्हां तिची वाणी तर जणुंकाय प्रेमपंकांतच रुतून बसली. तें स्नेहपूर्ण आणि सलक्षण भाषण ऐकून रामांनीं सासूचा अनेक प्रकारें गौरव केला.

राम बिदा माँगा कर जोरी।
कीन्ह प्रनाम बहोरि बहोरी।
पाइ असीस बहुरि सिरु नाई।
भाइन्ह सहित चले रघुराई।

रामांनीं हात जोडून आणि वारंवार प्रणाम करून निरोप मागितला. फिरून तिला वंदन करून आणि तिचे आशीर्वाद घेऊन सर्व बंधूंसहवर्तमान रघुराय परतले.

मंजु–मधुर–मूरति उर आनी।
भईं सनेह सिथिल सब रानीं।
पुनि धीरज धरि कुअँरि हँकारी।
बार बार भेटहिँ महतारी।
पहुँचावहिँ फिरि मिलहिँ बहोरी।
बढी परसपर प्रीति न थोरी।

सर्व राण्या रामाची ती रमणीय आणि मनोहर मूर्ति हृदयांत आठवून प्रेमानें शिथिल झाल्या. परंतु पुन्हां धैर्य धरून त्यांनीं मुलींना बोलाविलें आणि त्यांस वारंवार कवटाळलें. कांहीं दूरवर पोंचविल्यानंतर त्यांनीं त्यांना पुन्हां भेटावें, अशाप्रमाणें मायलेकींचें परस्पर प्रेम अत्यंत वृद्धिंगत झालें.

पुनि पुनि मिलति सखिन्ह बिलगाई।
बाल बच्छ जिमि धेनु लवाई।

छोटीं वासरें ज्याप्रमाणें गाईस भेटतात तद्वत् त्या मुली आपल्या (मातेच्या) सख्यांस फिरफिरून कवटाळूं लागल्या.

**दो०–प्रेमबिबस नरनारि सब सखिन्ह सहित रानिवास। मानहुँ कीन्ह बिदेहपुर करुना–बिरह–निवास॥ ३३५॥**

त्यावेळीं सख्यांसहवर्तमान राण्या आणि अंतःपुरांतले सर्व स्त्रीपुरुष प्रेमविव्हल झाले; तेव्हां असें वाटलें कीं, मिथिलानगरी करुणा आणि विरह यांनीं आपलें निवासस्थानच केलें आहे.

चौ०–सुक सारिका जानकी ज्याये।
कनकपिंजरन्हि राखि पढाये।
व्याकुल कहहिँ कहाँ बैदेही।
सुनि धीरजु परिहरइ न केही।
भये बिकल खग मृग एहि भाँती।
मनुजदसा कैसे कहि जाती।

जानकीनें पाळलेल्या आणि सुवर्णपंजरांत घालून पढविलेल्या शुकसारिका व्याकुल होऊन "जानकी कोठें ग तूं" असें ओरडून आक्रोश करूं लागल्या. तो आक्रोश ऐकून कोणाचा धीर पिचणार नाहीं! अशाप्रकारें जेथें पशुपक्ष्यांची देखील अवस्था झालेली तेथें मनुष्यांची दशा काय वर्णावी!

बंधुसमेत जनकु तब आये।
प्रेम उमगि लोचन जल छाये।
सीय बिलोकि धीरता भागी।
रहे कहावत परमबिरागी।
लीन्हि राय उर लाइ जानकी।
मिटी महामरजाद ज्ञान की।

मागाहून बंधूसहवर्तमान जनक आला. त्याचेंहि प्रेम उचंबळून नेत्र अश्रूंनीं भरून आले. सीता समोर येतांच त्याचें धैर्य शाबूत राहूं शकलें नाहीं. तो नांवाचाच जीवन्मुक्त उरला. सीतेस त्यानें पोटाशीं धरलें तेव्हां तर त्याचें एवढें बेसुमार अध्यात्म पण त्यासदेखील पक्का खोडा बसला.

समुझावत सब सचिव सयाने।
कीन्ह बिचारु अनवसर जाने।
बारहिँ बार सुता उर लाई।
सजि सुंदर पालकी मँगाई।

सर्व सुजाण सचिवांनीं राजाची समजूत घातली. शोक अप्रासंगिक जाणून राजानेंहि विवेक केला. राजा वरचेवर जानकीला उराशीं धरी. उत्कृष्ट पालख्या सिद्ध करून बोलविल्या.

दो०–प्रेमबिबस परिवार सब जानि सुलगन नरेस । कुअँरि चढ़ाई पालकिन्ह सुमिरे सिद्ध गनेस ॥ ३३६ ॥

राजाचा सर्व परिवारहि प्रेमविवश झाला. राजानें सुमुहूर्त पाहून आणि सिद्धिविनायकाचें स्मरण करून मुलींना पालख्यांमध्यें बसाविलें.

चौ०–बहुबिधि भूप सुता समुझाई ।
नारिधरम कुलरीति सिखाई ।
दासीं दास दियें बहुतेरे ।
सुचि सेवक जे प्रिय सिय केरे ।

राजानें मुलींचें परोपरीनें सांत्वन केलें आणि त्यांस स्त्रीधर्म आणि कुलीन आचारविचार यांचा बोध केला, व सीतेच्या प्रिय आणि विश्वासू दास-दासींना तिच्या पाठराखणीस दिलें.

सीय चलत व्याकुल पुरबासी ।
होहिं सगुन सुभ मंगलरासी ।
भूसुर सचिव समेत समाजा ।
संग चले पहुँचावन राजा ।

सीता जाऊं लागतांच नगरवासीजन व्याकुल झाले. मंगलकारक शुभशकुन जाणवले. ब्राह्मण, सचिव इत्यादि मंडळींसह राजा त्याला पोंचविण्यास निघाला.

समय बिलोकि बाजने बाजे ।
रथ गज बाजि बरातिन्ह साजे ।
दसरथ बिप्र बोलि सब लीन्हे ।
दान मान परिपूरन कीन्हे ।

प्रसंगानुसार वाद्यें वाजूं लागलीं. वऱ्हाड्यांनीं रथ, हत्ती, घोडे वगैरे सिद्ध केले. दशरथानें सर्व ब्राह्मणांना बोलावून त्यांस दानमानानें खुष केलें.

चरन–सरोज–धूरि धरि सीसा ।
मुदित महीपति पाइ असीसा ।
सुमिरि गजानन कीन्ह प्रयाना ।
मंगलमूल सगुन भये नाना ।

त्यांच्या चरणकमलाची धूळी मस्तकावर ठेवून आणि त्यांचे आशीर्वाद घेऊन राजा प्रसन्न मनानें गजाननाचें स्मरण करून प्रयाण करूं लागला. तेव्हां अनेक मंगल शकुन झाले.

दो०–सुर प्रसून बरषहिँ हरषि करहिँ अपछरा गान । चले अवधपति अवधपुर मुदित बजाइ निसान ॥ ३३७ ॥

दशरथ अयोध्येस जाऊं लागला असें पाहून देवांनीं आनंदानें वाद्यें वाजविलीं आणि पुष्पवर्षाव केला. अप्सरांनीं हर्षित होऊन गायन आरंभिलें.

चौ०–नृप करि बिनय महाजन फेरे ।
सादर सकल माँगने टेरे ।
भूषन बसन बाजि गज दीन्हे ।
प्रेम पोषि ठाढे सब कीन्हे ।

दशरथानें विनंतिपूर्वक पोंचवावयास आलेल्या थोर थोर मंडळींना परताविलें. आणि सर्व याचक मंडळींना आदरपूर्वक बोलावून आणि त्यांना भूषणें, वस्त्रें, अश्व, गज इत्यादि देऊन प्रेमानें त्या सर्वांचा परिपोष केला.

बारबार बिरदावलि भाखी ।
फिरे सकल रामहि उर राखी ।
बहुरि बहुरि कोसलपति कहहीं ।
जनक प्रेमबस फिरन चहहीं ।

वारंवार रामचंद्राच्या ब्रीदाचें वर्णन करून आणि त्यास हृदयांत ठेवून सर्वजण परत फिरले. दशरथ जरी वरचेवर परत फिरवी तथापि प्रेमवशतेमुळें जनकाला परतण्याची इच्छा होईना.

पुनि कह भूपति बचन सुहाये ।
फिरिय महीप दूरि बडि आये ।
राउ बहोरि उतरि भये ठाढे ।
प्रेमप्रवाह बिलोचन बाढे ।
तब बिदेहु बोले कर जोरी ।
बचन सनेहसुधा जनु बोरी ।
करहुँ कवन बिधि बिनय बनाई ।
महाराज मोहि दीन्हि बडाई ।

दशरथ पुन्हां प्रेमळपणें म्हणाला, "राजेसाहेब ! आपण फार लांबवर आलां; आतां परतावें." शेवटीं दशरथ खालीं उतरून उभा राहिला. त्याच्या नेत्रांतून प्रेमाश्रूंचा प्रवाह वाहूं लागला. तेव्हां विदेह हात जोडून जणुंकाय प्रेमामृतानें माखलेल्या अशा शब्दांनीं बोलूं लागला, महाराजांची संभावना मीं कोणत्या प्रकारें करावी ? महाराजांनींच मला सर्व प्रकारें पदवीस चढाविलें.

दो०–कोसलपति समधी सजन सनमाने सब भाँति । मिलनि परसपर बिनय अति प्रीति न हृदय समाति ॥ ३३८ ॥

दशरथानें व्याही आणि त्यांची आप्तमंडळी यांचा सर्व प्रकारें सन्मान केला. दशरथ आणि जनक परस्पर अत्यंत विनयानें भेटले. त्यांच्या हृदयांत प्रेम मावेना.

चौ०—मुनिमंडलिहि जनक सिरु नावा।
आसिरबाद सबहि सन पावा।
सादर पुनि भेँटे जामाता।
रूप-सील-गुन-निधि सब भ्राता।

जनकानें मुनिमंडळीस वंदन करून सर्वांचे आशीर्वाद घेतले. नंतर तो रूपशीलगुणनिधि अशा सर्व जांवयांना आदरपूर्वक भेटला.

जोरि पंक-रुह-पानि सुहाये।
बोले बचन प्रेम जनु जाये।

त्यानें आपले सुंदर कमलहस्त जोडून मूर्तिमंत प्रेमच प्रकट झाल्याप्रमाणें भाषण केलें.

राम करउँ केहि भाँति प्रसंसा।
मुनि-महेस-मन-मानस-हंसा।
करहिँ जोग जोगी जेहि लागी।
कोह मोह ममता मद त्यागी।
व्यापक ब्रह्म अलख अबिनासी।
चिदानंद निरगुन गुनरासी।
मनसमेत जेहि जान न बानी।
तरकि न सकहिँ सकल अनुमानी।
महिमा निगम नेति कहि कहई।
जो तिहुँ काल एकरस अहई।

हे मुनिमहेशमनमानसहंसा रामा! तुझा स्तव मला कोणत्या प्रकारें करितां येईल? ज्याच्याप्रीत्यर्थ क्रोध, मोह, ममता आणि मद यांचा त्याग करून योगिजन योग साधीत असतात, मनासहित वाणीनेंहि ज्याला जाणतां येणें शक्य नाहीं, सर्व नैय्यायिकांचा देखील जेथें तर्क कुंठित होतो, वेददेखील 'नेति नेति' म्हणूनच ज्याचा महिमा वर्णन करितात, जो तिन्ही काळीं समरस असून व्यापक, कूटस्थ, अलक्ष्य, चिदानंद, निर्गुण, गुणनिधान परब्रह्मच असतो.

**दो०—नयनबिषय मो कहँ भयउ सो समस्त-**
**सुख-मूल। सबहि लाभ जगजीव कहँ**
**भये ईस अनुकूल॥ ३२९॥**

तो तूं सर्व आनंदाचा कंद मला दृष्टिगोचर झालास. तूं भगवंत अनुकूल झाल्यासच ह्या मायिक जीवास अखिल लाभांची लैलूट व्हावयाची.

चौ०—सबहि भाँति मोहिँ दीन्हि बडाई।
निजजन जानि लीन्हि अपनाई।

सर्वच प्रकारें तूं मला थोरपण दिलेंस, आणि आपला दास समजून मला पदरांत घेतलेंस.

होहिँ सहस दस सारद सेषा।
करहिँ कलपकोटिक भरि लेखा।
मोर भाग्य राउर गुनगाथा।
कहि न सिराहिँ सुनहु रघुनाथा।

हे रघुनाथा! ऐक. दशसहस्र शारदा आणि शेष एकवटून कोट्यवधी कल्पपर्यंत जरी गणित करीत राहिले तरी त्यांच्यानें देखील माझें भाग्य आणि तुझे गुणगण सांगून सरणार नाहींत.

मैँ कछु कहहुँ एक बल मोरे।
तुम्ह रीझहु सनेह सुठि थोरे।
बारबार मागउँ कर जोरे।
मनु परिहरइ चरन जनि भोरे।

तूं अगदीं अत्यल्प प्रेमानें देखील वश होतोस एवढ्या एकाच गोष्टीवर माझी सर्व भिस्त असून तिच्याच जोरावर मी एक प्रार्थना करीत आहे. वारंवार हात जोडून मी हेंच मागणें मागतों कीं, चुकून देखील माझ्या मनानें इतःपर आपले चरण सोडूं नयेत.[1]

सुनि बरबचन प्रेम जनु पोषे।
पूरनकाम राम परितोषे।
करि बर बिनय ससुर सनमाने।
पितु कौसिक बसिष्ठ सम जाने।

प्रेमांत जणुं काय घोळलेलेंच अशी ती जिव्हाळ्याची भाषा ऐकून पूर्णकाम रामचंद्र संतुष्ट झाले, व जनकास दशरथ, वसिष्ठ आणि विश्वामित्र यांच्याप्रमाणें समजून अत्यंत शालीनतेनें रामानें त्याचा गौरव केला. (दशरथासारखें प्रेम, कौशिकासारखी तपश्चर्या आणि वसिष्ठासारखें ज्ञान जनकाच्या ठिकाणीं एकवटलें होतें असें कवीनें येथें दर्शित केलें आहे.)

---

१ कवीनें पूर्वीं म्हटलें आहे कीं जनकाच्या अध्यात्मास सीता पाहतांच खो बसला. पण त्याची जागा कोणी भरली हा प्रश्नच होता. तो कवीनें येथें सोडविला. कसा तें स्वतःच्या विचारानें पाहावें.

विनती बहुरि भरत सन कीन्हा ।
मिलि सप्रेम पुनि आसिष दीन्हा ।

जनकानें नंतर भरताची प्रार्थना केली आणि अत्यंत प्रेमानें भेटून आशीर्वाद दिला.

**दो०–मिले लषन रिपुसूदनहि दीन्हि असीस महीस । भये परसपर प्रेमबस फिरि फिरि नावहिँ सीस ॥ ३४० ॥**

राजा जनकानें लक्ष्मण आणि शत्रुघ्न यांनाहि भेटून आशीर्वाद दिले; तेव्हां ते परस्पर प्रेमवश होऊन पुनःपुनः मस्तक नमवूं लागले.

चौ०–बारबार करि बिनय बडाई ।
रघुपति चले संग सब भाई ।

वारंवार प्रार्थना आणि प्रशंसा करून रघुपति सर्व बंधूंसहवर्तमान चालूं लागले.

जनक गहे कौसिकपद जाई ।
चरनरेनु सिर नयनन्हि लाई ।
सुनु मुनीसबर दरसन तोरे ।
अगम न कछु प्रतीति मन मोरे ।

नंतर जनकानें जाऊन विश्वामित्रांचे पाय धरिले, आणि त्यांची चरणधूलि त्यानें आपल्या डोळ्यांस आणि मस्तकांस लावून म्हटलें, हे मुनींद्रश्रेष्ठा ! आपल्या दर्शनानें दुर्लभ असें कांहींच नाहीं अशी माझ्या मनाची पूर्ण खात्री होऊन चुकली.

जो सुख सुजस लोकपति चहहीँ ।
करत मनोरथ सकुचत अहहीँ ।
सो सुख सुजस सुलभ मोहि स्वामी ।
सब सिधि तव दरसन अनुगामी ।
कीन्हि बिनय पुनि पुनि सिरु नाई ।
फिरे महीस आसिषा पाई ।

ज्या सुखाची आणि सद्यशाची लोकपती इच्छा करितात, परंतु ती इच्छा जम धरतांच त्यांची त्यांनाच ( अनाधिकारित्वामुळें ) लाज वाटते, तें सुख व तें सद्यश, हे स्वामिन् ! मला मात्र सुलभ झालें आहे. एवंच खास हेंच कीं आपल्या दर्शनाच्या पाठोपाठच सर्व सिद्धि चालू लागतात. अशा प्रकारें पुनःपुनः विनय आणि वंदन करून व कौशिकांचा आशीर्वाद घेऊन जनक परत फिरला.

चली बरात निसान बजाई ।
मुदित छोट बड सब समुदाई ।
रामहिँ निरखि ग्राम–नर–नारी ।
पाइ नयनफल होहिँ सुखारी ।

वरात चालूं लागतांच डंक्यावर टिपरूं पडलें. वऱ्हाडांतल्या सर्व लहानथोर मंडळीस आनंद झाला. नगरांतील स्त्रीपुरुष रामास पाहून नेत्राचें साफल्य झाल्यामुळें हर्षित झाले.

**दो०–बीच बीच बर बास करि मगलोगन्ह सुख देत । अवध समीप पुनीत दिन पहुँची आइ जनेत ॥ ३४१ ॥**

मध्यंतरीं सोइस्कर ठिकाणीं मुक्काम करीत व मार्गांतील लोकांना संतोषवीत सुमुहूर्तावर अयोध्येनजीक वरात येऊन थडकली.

चौ०–हने निसान पनव बर बाजे ।
भेरि–संख–धुनि हय गय गाजे ।
झाँझि भेरि डिंडिमी सुहाई ।
सरसराग बाजहिँ सहनाई ।

चौघडे आणि नगारे बरसूं लागले, भेरी आणि शंख निनादूं लागले, हत्ती, घोडे फुरफुराटूं लागले, झांज, मृदंग आणि डिमडिम झणाणूं लागले आणि सनईंतून सुस्वर रागदारी रंगूं लागली.

पुरजन आवत अकनि बराता ।
मुदित सकल पुलकावलि गाता ।
निज निज सुंदर सदन सवाँरे ।
हाट बाट चौहट पुर द्वारे ।
गली सकल अरगजा सिँचाई ।
जहँ तहँ चौकें चारु पुराई ।

वरात आलेली ऐकून अयोध्या नगरींतील लोकांना आनंद झाला आणि सर्वांच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. त्यांनीं आपापलीं घरें लज्जतदार शृंगारलीं. बाजार, राजमार्ग, चव्हाटे, नगरच्या वेशी इत्यादि सर्वत्र अर्गजाचे सडे शिंपण्यांत आले. ठिकठिकाणीं चमन चौक तयार करण्यांत आले.

बना बजारु न जाइ बखाना ।
तोरन केतु पताक बिताना ।
सफल पूगफल कदलि रसाला ।
रोपे बकुल कदंब तमाला ।
लगे सुभग तरु परसत धरनी ।
मनिमय आलबाल कलकरनी ।

बाजाराचा देखावा अवर्णनीय होता. तोरणें, ध्वज, पताका, छत्तें उभारलीं गेलीं. फळांसह पोफळ,

केळी, आंबा, बकुल, कदंब, तमाल, इत्यादि वृक्ष लावण्यांत आले. झाडें अशीं खुबीनें लाविलीं होतीं कीं, त्यांच्या घडामुळें फांद्या जमिनीस लागाव्या. त्यांच्या सभोंवतालची आळी रंगीन पाषाणांच्या उत्कृष्ट कारागिरीची होती.

दो०—बिबिध भाँति मंगलकलस गृह गृह रचे सवाँरि। सुर ब्रह्मादि सिहाहिँ सब रघु–बर–पुरी निहारि॥ ३४२॥

घरोघरीं तऱ्हेतऱ्हेच्या मंगल कलशांची टुमदार रचना केली होती. ती रामनगरी पाहून ब्रह्मादिक देवही तीस वाखाणूं लागले.

चौ०—भूपभवन तेहि अवसर सोहा।
रचना देखि मदनमन मोहा।
मंगल सगुन मनोहरताई।
रिधि सिधि सुख संपदा सुहाई।

त्या प्रसंगीं राजवाडा अत्यंतच नखरेदार सजविला होता. त्याची सजावट पाहून मदनाच्याहि मनास मोह पडे. तेथील उत्कृष्ट मंगलकारक शकुन, सौंदर्य आणि संपत्ति हीं ऋद्धिसिद्धींनींच निर्माण केलीं होतीं.

जनु उछाह सब सहज सुहाये।
तनु धरि धरि दसरथगृह आये।
देखन हेतु रामबैदेही।
कहहु लालसा होइ न केही।

त्या वेळेस असें वाटलें कीं, जणुंकाय उत्सव स्वेच्छेनेंच निरनिराळे देह धारण करून बनून ठनून दशरथाच्या घरीं श्रीसीतारामचंद्राच्या दर्शनेच्छेनें आले आहेत. कारण अशी इच्छा कोणाला होणार नाहीं सांगा पाहूं ?

जूथजूथमिलि चलीँ सुआसिनि।
निजछबिनिदरहिँ मदनबिलासिनि।
सकल सुमंगल सजे आरती।
गावहिँ जनु बहुबेष भारती।

आपल्या सौंदर्यानें मदनासहि तुच्छ करणाऱ्या अशा विलासवती सुवासिनी स्त्रियांच्या झुंडीच्या झुंडी आरती आणि मंगलकलश घेऊन देवीसरस्वतीनेंच जणु अनेक वेष धारण केले आहेत अशा प्रकारें गात गात जाऊं लागल्या.

भूपतिभवन कोलाहल होई।
जाइ न बरनि समउ सुख सोई।
कौसल्यादि राममहतारीं।
प्रेमबिबस तनुदसा बिसारीं।

राजवाड्यांत एकच गर्दी उडाली. त्या वेळचा तो आनंद अवर्णनीय होता. कौसल्यादि राममाता प्रेमविवश होऊन देहभान विसरल्या.

दो०—दिये दान बिप्रन्ह बिपुल पूजि गनेस पुरारि। प्रमुदित परमदरिद्र जनु पाइ पदारथ चारि॥ ३४३॥

चतुर्विध पुरुषार्थ प्राप्त झाल्यामुळें अत्यंत दरिद्यास जसा हर्ष होतो तद्वत् त्या राण्यांना आनंद होऊन त्यांनीं श्रीशंकरगणपतींचें पूजन केलें आणि ब्राह्मणांस विपुल दानें दिलीं.

चौ०—मोद-प्रमोद-बिबस सब माता।
चलहिँ न चरनसिथिल भयेगाता।

आनंदीआनंदांत गुंग झालेल्या राण्यांना पाऊलहि पुढें फुटेना; त्यांचें सर्वांग शिथिल झालें.

रामदरस हित अतिअनुरागीं।
परिछनि साजु सजन सब लागीं।
बिबिधबिधान बाजने बाजे।
मंगल मुदित सुमित्रा साजे।

रामदर्शनासाठीं अत्यंत उतावीळ झाल्यामुळें सर्वजणी ओवाळणीच्या तयारीस लागल्या. नानातऱ्हेचीं वाद्यें वाजूं लागलीं. सुमित्रा आनंदानें मांगल्याच्या तयारीस लागली.

हरद दूब दधि पल्लव फूला।
पान पूगफल मंगलमूला।
अच्छत अंकुर रोचन लाजा।
मंजुल मंजरि तुलसि बिराजा।
छुहे पुरटघट सहज सुहाये।
मदन सकुच जनु नीड बनाये।

हळद, दूर्वा, दहीं, पल्लव, फुलें, विड्याचीं पानें, सुपाऱ्या, अक्षता, अंकुर (भाताचे लोंब), गोरोचन, लाह्या, तुलसीच्या कोमल मंजरी वगैरे मंगलसामग्री सिद्ध झाली. (हळदकुंकवाचीं बोटें ओढलेले) सुवर्णकलश साहजिकच असे दिसत कीं, जणुंकाय (रामरूपास) लाजून मदनानें (लपून रामरूप पहावें म्हणून आंत बसण्यासाठीं) घरटींच बनविलीं आहेत.

सगुन सुगंध न जाइ बखानी ।
मंगल सकल सजहिँ सब रानी ।
रची आरती बहुत बिधाना ।
मुदित करहिँ कल मंगल गाना ।

शकुनकारक आणि सुगंधित पदार्थ अवर्णनीय होते. सर्व राण्या मनमुराद मंगलें सिद्ध करूं लागल्या आणि मुबलग आरत्या तयार करून प्रेमानें सुस्वर मंगल गाणीं गाऊं लागल्या.

**दो०–कनकथार भरि मंगलन्हि कमल करनि लिये पात। चलीँ मुदित परिछन करन पुकलपल्लवित गात ॥ ३४४ ॥**

मंगल द्रव्यांनीं भरलेलीं सुवर्णतबकें स्वहस्तकमलांत घेऊन राण्या आनंदानें पुलकपल्लवितगात्र होत्सात्या ओवाळण्यास निघाल्या.

चौ०–धूपधूम नभ मेचक भयऊ ।
सावन घनघमंड जनु ठयऊ ।
सुर–तरु–सुमन–माल सुर बरषहिँ ।
मनहुँ बलाकअवलि मनु करषहिँ ।

धूपाच्या धुरानें आकाश जणुंकाय श्रावणांतील मेघडंबरानें व्याप्त झाल्याप्रमाणें कृष्णवर्ण झालें. कल्पवृक्षांच्या पुष्पमालांची वृष्टि देव करूं लागले; तेव्हां त्या बगळ्यांच्याच पंक्ती आहेत असें वाटून चित्ताकर्षण करीत.

मंजुल मनिमय बंदनवारे ।
मनहुं पाक–रिपु–चाप सवाँरे ।
प्रगटहिँ दुरहिँ अटन पर भामिनि ।
चारु चपल जनु दमकहि दामिनि ।

लकाकदार रत्नतोरणें पाहून असें वाटे कीं हीं इंद्रधनुष्येंच पसरलीं आहेत. जणुंकाय चंचल आणि उज्ज्वल विद्युल्लताच चमकत आहेत अशा त्या विलासिनी स्त्रिया माड्यांवर क्षणैक दृश्य होत व क्षणैक अदृश्य होत.

दुंदुभिधुनि घनगरजनि घोरा ।
जाचक चातक दादुर मोरा ।

दुंदुभीचा घनगर्जनेसारखा घोर नाद होत असून याचक मंडळींचा चातक, मोर आणि दर्दुर यांच्यासारखा ध्वनि होत होता.

सुर सुगंध सुचि बरषहिँ बारी ।
सुखी सकल ससि पुर-नर-नारी ।

देव शुद्ध आणि सुगंधित उदकाच्या सरीवर सरी सोडीत होते. त्यामुळें पिकें आणि नगरांतलि सर्व स्त्रीपुरुष सुखी होत.

समय जानि गुरु आयसु दीन्हा ।
पुर प्रबेस रघु-कुल-मनि कीन्हा ।
सुमिरि संभु गिरिजा गनराजा ।
मुदित महीपति सहित समाजा ।

वसिष्ठांनीं मुहूर्त पाहून आज्ञा देतांच रघुकुलमणींनीं शंकर, पार्वती व गणपती यांचें स्मरण करून पुरप्रवेश केला. मंडळीसहवर्तमान राजा हर्षित झाला.

**दो०–होहिँ सगुन बरषहिँ सुमन सुर दुंदुभी बजाइ। बिबुधबधू नाचहिँ मुदित मंजुल मंगल गाइ ॥ ३४५ ॥**

शुभशकुन होऊं लागले, देव पुष्पवृष्टि आणि वाद्यगजर करूं लागले, व अप्सरा मंजुळ स्वरानें मंगलगाणीं गाऊन आनंदानें नृत्य करूं लागल्या.

चौ०–मागध सूत बंदि नट नागर ।
गावहिँ जस तिहुँ लोक उजागर ।
जयधुनि बिमल बेद-बर-बानी ।
दस दिसि सुनिय सु-मंगल-सानी ।
बिपुल बाजने बाजन लागे ।
नभ सुर नगर लोग अनुरागे ।

कुशल मागध, सूत, बंदिजन आणि नट त्रैलोक्यविख्यात असें रामयश गाऊन जयघोष करूं लागले. दशदिशांनीं मंगलांची केवळ खाण असे पवित्र आणि उज्ज्वल वेदघोष ऐकूं येऊं लागले. अनेक वाद्यें वाजूं लागलीं. आकाशांत देव आणि नगरांत लोक प्रसन्न झाले.

बने बराती बरनि न जाहीँ ।
महामुदित मन सुख न समाहीँ ।

वऱ्हाडाचा थाट अवर्णनीय होता. वऱ्हाडी मंडळींना अत्यानंद होऊन त्यांचें सुख त्यांच्या हृदयांत मावेनासें झालें.

पुरबासिन्ह तब राउ जोहारे ।
देखत रामहिँ भये सुखारे ।
करहिँ निछावरि मनिगन चीरा ।
बारि बिलोचन पुलक सरीरा ।

प्रजाजनांनीं नंतर दशरथास मुजरे केले आणि ते रामचंद्रास पाहून हर्षित झाले. अनेक रत्नें व वस्त्रें

यांचे सत्के झाले. त्यांचे नेत्र सजळ होऊन शरीरेंहि रोमांचित झालीं.

आरति करहिँ मुदित पुरनारी।
हरषहिँ निरखि कुअँर बर चारी।
सिबिका सुभग उहार उघारी।
देखि दुलहिनिन्ह होहिँ सुखारी।

नगरांतील स्त्रिया हर्षित होऊन आरती करीत आणि त्या सुंदर चारीहि राजबिंड्यांना आनंदानें निरखून पाहत. त्या भाग्यवती स्त्रिया पालख्यांचे पडदे सारून नवऱ्या मुलींना पाहून खुष होत.

**दो०—एहि विधि सबही देत सुख आये राजदुआर। मुदित मातु परिछन करहिँ बधुन्ह समेत कुमार॥ ३४६॥**

अशा रीतीनें सर्व लोकांना आनंदवीत वधूवर राजद्वारीं आले, आणि राण्या त्यांस आनंदानें ओवाळूं लागल्या.

चौ०—करहिँ आरती बारहिँ बारा।
प्रेम प्रमोद कहइ को पारा।

त्या वारंवार आरतीच ओवाळीत राहिल्या. त्यांच्या प्रेमानंदाचें वर्णन कोणास करवेल?

भूषण मनि पट नाना जाती।
करहिँ निछावरि अगनित भाँती।
बधुन्ह समेत देखि सुत चारी।
परमानंदमगन महतारी।
पुनि पुनि सीय-राम-छबि देखी।
मुदित सुफल जग जीवन लेखी।

त्या तऱ्हेतऱ्हेचे अगणित रत्नवस्त्रालंकार ओवाळून टाकूं लागल्या. आपल्या चारीहि कुमारांना सपत्नीक पाहून राण्या परमानंदांत निमग्न झाल्या. पुनः पुनः सीतारामांचें सौंदर्य पाहून त्या आनंदित होत व त्यांना जगांत जन्म घेतल्याचें सार्थक वाटे.

सखीं सीयमुख पुनि पुनि चाही।
गान करहिँ निजसुकृत सराही।

राण्यांच्या सख्या सीतेच्या मुखावलोकनाची वरचेवर इच्छा करीत, गाणीं गात, आणि आपल्या पूर्वपुण्याईची प्रशंसा करीत.

बरषहिँ सुमन छनहिँ छन देवा।
नाचहिँ गावहिँ लावहिँ सेवा।

देवगण क्षणोक्षणीं सुमनवृष्टीनें आणि नृत्यगीतानें सेवा बजावी.

देखि मनोहर चारिउ जोरी।
सारद उपमा सकल ढढोरी।
देत न बनहिँ निपट लघु लागी।
एकटक रहीं रूपअनुरागी।

तीं चार टिकलस जोडपीं पाहून सरस्वतीनें सर्व उपमा धुंडाळून पाहिल्या. परंतु त्या सर्व अत्यंत गौण वाटल्यामुळें तिच्या मनांत एकहि भरेना; तेव्हां मात्र ती एकसारखी टक लावून पहात राहिली, आणि (पहातां पहातां) त्या रूपांतच रंगून गेली.

**दो०—निगमनीति कुलरीति करि अरघ पावँडे देत। बधुन्ह सहित सुत परिछि सब चलीँ लेवाइ निकेत॥ ३४७॥**

शास्त्राचार आणि कुलसांप्रदाय करून चौघांहि जोडप्यांना अर्घ्य देऊन पायघड्या घालीत घालीत आणि दृष्ट काढीत काढीत सर्व राण्या त्यांना अंतःपुरांत घेऊन गेल्या.

चौ०—चारि सिंहासन सहज सुहाये।
जनु मनोज निजहाथ बनाये।
तिन्ह पर कुअँरि कुअँर बैठारे।
सादर पाय पुनीत पखारे।
धूप दीप नैवेद्य बेदबिधि।
पूजे बरदुलहिनि मंगलनिधि।
बारहिँ बार आरती करहीँ।
ब्यजन चारु चामर सिर ढरहीँ।

जणुंकाय मदनानें स्वहस्तानेंच घडविलीं आहेत अशीं सहजसुंदर चार सिंहासनें मांडून त्यांवर वधूवरांना बसविलें. नंतर त्यांच्या पवित्र चरणांचें आदरयुक्त प्रक्षालन करून वैदिक पद्धतीनें त्या मंगलनिधान वधूवरांची धूपदीपनैवेद्यांनीं पूजा केली. वारंवार त्यांचेवरून आरत्या ओवाळून त्यांच्या मस्तकांवर सुंदर पंखे आणि चवऱ्या ढाळण्यांत आल्या.

बस्तु अनेक निछावरि होहीँ।
भरीं प्रमोद मातु सब सोहीं।
पावा परमतत्त्व जनु जोगी।
अमृत लहेउ जनु संतत रोगी।
जनमरंक जनु पारस पावा।
अंधहि लोचनलाभु सुहावा।

मूकबदन जस सारद छाई।
मानहुँ समर सूर जय पाई।

सर्व माता आनंदपूर्ण होत्सात्या उत्फुल्ल झाल्या आणि त्यांनीं अनेक वस्तूंचा सत्कार केला. जणुंकाय योगनिष्ठास परमतत्त्वच प्राप्त व्हावें अगर दीर्घ रोग्यास अमृतच लाभावें किंवा जन्मदरिद्र्यांस परिसाची जोड व्हावी अथवा अंधास दिव्य दृष्टीच मिळावी, वा मुक्याच्या जिव्हेवर जसें कांहीं सरस्वतीनें नाचावें, किंवा समरांगणांत शूराचा जय व्हावा.

दो०–एहि सुख तें सत-कोटि-गुन पावहिँ मातु अनंदु। भाइन्ह सहित बिआहि घर आये रघु-कुल-चंदु॥ ३४८॥

ह्या एकंदर सुखांपेक्षांहि शतकोटिगुणित आनंद राण्यांस झाला. असो. आपल्या भ्रात्यांसहवर्तमान स्वतांचा विवाह करून रघुकुलचंद्र घरीं परत आले.

दो०–लोकरीति जननीं कराहिँ बर दुलहिनि सकुचाहिँ। मोद बिनोद बिलोकि बड राम मनहिँ मुसुकाहिँ॥ ३४९॥

राण्या लौकिक चालीरीती करीत असतां ते वधूवर लाजूं लागले. तो महदानंद आणि विनोद-सुखसोहळा पाहून राम मनांतल्या मनांत हसत.

चौ०–देव पितर पूजे बिधि नीकी।
पूजी सकल बासना जी की।
सबहि बंदि माँगहिँ बरदाना।
भाइन्ह सहित रामकल्याना।
अंतरहित सुर आसिष देहीँ।
मुदित मातु अंचल भरि लेहीँ।

पुण्याहवाचन यथासांग आटोपलें. सर्वांच्या मनः-कामना पूर्ण झाल्या. सर्वजणी देवतांना वंदन करून हेंच मागणें मागत कीं बंधूंसहवर्तमान रामचंद्र सुखी असोत. अंतरिक्षांतून देव आशीर्वाद देत व त्यांचा राण्या आनंदानें पदर पसरून स्वीकार करीत.

भूपति बोलि बराती लीन्हे।
जान बसन मनि भूषन दीन्हे।
आयसु पाइ राखि उर रामहिँ।
मुदित गये सब निज निज धामहि।

दशरथानें वऱ्हाडीमंडळींना बोलावून त्यांना अहेरांत त्यानें वस्त्रें, रत्नें व भूषणें दिलीं. राजाची आज्ञा घेऊन आणि रामचंद्रास आपल्या हृदयांत ठेवून सर्व मंडळी आनंदानें आपापल्या घरीं रवाना झाली.

पुर-नर-नारि सकल पहिराये।
घर घर बाजन लगे बधाये।
जाचक जन जाचहिँ जोइ जोई।
प्रमुदित राउ देहिँ सोइ सोई।
सेवक सकल बजनियाँ नाना।
पूरन किये दान सनमाना।

नगरच्या सर्व स्त्रीपुरुषांना अहेर करण्यांत आले. घरोघर वाजंत्र्यांचा घडघडाट होऊं लागला. भिक्षुक जें जें कांहीं मागत त्यांस तें तें राजा मोठ्या आनंदानें देई. सर्व सेवक लोक, वाजंत्री आणि इतर नानाविध मंडळी दशरथानें गौरवपूर्वक दानें देऊन तृप्त केली.

दो०–देहिँ असीस जोहारि सब गावहिँ गुन-गन-गाथ। तब गुरु-भूसुर-सहित गृह गवन कीन्ह नरनाथ॥ ३५०॥

सर्वजण राजास मुजरा करून व अभीष्ट चिंतून त्याचे अनेक गुणानुवाद गाऊं लागले. नंतर गुरु वसिष्ठ आणि ब्रह्मवृंद यांच्यासहवर्तमान राजानें गृह-प्रवेश केला.

चौ०–जो बसिष्ठ अनुसासन दीन्हा।
लोक बेद बिधि सादर कीन्हा।

वसिष्ठांनीं जी जी आज्ञा केली ती ती राजानें शास्त्ररूढीमार्गानें आदरपूर्वक पाळली.

भू-सुर-भीर देखि सब रानी।
सादर उठीँ भाग्य बड जानी।
पाय पखारि सकल अन्हवाये।
पूजि भली बिधि भूप जेवाँये।
आदर दान प्रेम परिपोषे।
देत असीस चले मन तोषे।

ब्राह्मणांची गर्दी झालेली पाहतांच आपलें महद्भाग्य समजून सर्व राण्या आनंदानें उठल्या, व सर्वांचें पादप्रक्षालन करून त्यांनीं त्यांस अभ्यंगस्नानें घातलीं; दशरथानें योग्य रीतीनें त्यांची पूजा करून त्यांस भोजन घातलें; आणि मान, दान आणि प्रेम इत्यादिकरून त्यांस संतुष्ट केलें. ब्राह्मण आशीर्वाद देत देत प्रसन्न मनानें प्रस्थानले.

बहु बिधि कीन्ह गाधि-सुत-पूजा।
नाथ मोहि सम धन्य न दूजा।
कीन्हि प्रसंसा भूपति भूरी।
रानिन्ह सहित लीन्हि पगधूरी।
भीतर भवन दीन्ह बरबासू।
मन जोगवत रह नृपरानिवासू।

राजानें अनेक प्रकारें विश्वामित्राची पूजा केली, ( आणि म्हटलें कीं ) महाराज,मजसारखा धन्य अन्य कोणीहि नाहीं. त्यानें त्यांचा परोपरीनें स्तव करून त्यांची पदधूलि स्त्रियांसहवर्तमान मस्तकावर धारण केली व विश्वामित्रांची खास महालांत राहण्याची व्यवस्था करून राण्यासह तो त्यांची मनःपूर्वक शुश्रूषा करीत राहिला.

पूजे गुरु-पद-कमल बहोरी।
कीन्ह बिनय उर प्रीति न थोरी।

नंतर राजानें वसिष्ठचरणकमलांचें पूजन केलें, आणि अत्यंत प्रेमानें त्यांची प्रार्थना केली.

दो०—बधुन्ह समेत कुमार सब रानिन्ह सहित महीस। पुनि पुनि बंदत गुरुचरन देत असीस मुनीस ॥ ३५१ ॥

सपत्नीक असे सर्व राजकुमार आणि राण्यांसहवर्तमान राजा वसिष्ठचरणांस वारंवार वंदन करूं लागले, तेव्हां वसिष्ठहि त्यास आशीर्वाद देऊं लागले.

चौ०—बिनय कीन्ह उर अतिअनुरागे।
सुत संपदा राखि नृप आगे।
नेग माँगि मुनि नायक लीन्हा।
आसिरबाद बहुतबिधि दीन्हा।
उर धरि रामहिँ सीयसमेता।
हरषि कीन्ह गुरु गवन निकेता।

राजानें अत्यंत प्रेमयुक्त अंतःकरणानें वसिष्ठांचीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं, आणि पुत्रवित्तादि सर्वस्व त्यांचे पुढें ठेविलें. मुनिश्रेष्ठांनीं आपली दक्षणा ( त्यांतून ) मागून घेतली, आणि अनेकशः आशीर्वाद दिले. नंतर सीतेसहित राममूर्ति हृदयांत ठेवून वसिष्ठमुनी आनंदानें स्वस्थानीं गमन करिते झाले.

बिप्रबधू सब भूप बोलाई।
चैल चारुभूषन पहिराई।
बहुरि बोलाइ सुआसिनि लीन्ही।
रुचि बिचारि पहिरावनि दीन्ही।

नेगी नेग जोग सब लेहीँ।
रुचि अनुरूप भूपमनि देहीँ।

राजानें सर्व विप्रवधूंना बोलावून त्यांस बहुमोल वस्त्राभरणांनीं मंडित केलें. तदनंतर त्यानें सुवासिनी स्त्रिया बोलावून त्यांच्या इच्छेनुसार त्यांस वस्त्रप्रावरणें लेवविलीं. सर्व वृत्तिवान् लोक ( ग्रामजोशी वगैरे ) आपापल्या योग्यतेप्रमाणें आपापला हक्क सांगूं लागले. तेहि त्या भूपचूडामणीनें त्यांच्या इच्छेनुरूप पूर्ण केले.

प्रिय पाहुने पूज्य जे जाने।
भूपति भलीभाँति सनमाने।
देव देखि रघु-बीर-बिबाहू।
बरषि प्रसून प्रसंसि उछाहू।

इष्टमित्र, पाहुणे आणि मानकरी मंडळी यांचा राजानें उत्तम रीतीनें गौरव केला. रघुवीरविवाह अवलोकन करून देव त्या उत्सवाची प्रशंसा करीत पुष्पवृष्टि करूं लागले.

दो०—चले निसान बजाइ सुर निज-निज-पुर सुख पाइ। कहत परसपर रामजस प्रेम न हृदय समाइ ॥ ३५२ ॥

देवगण हर्षित होत्साते आपापल्या लोकांप्रत वाद्यगजरांत जाऊं लागले. ते परस्परांत रामयशासंबंधानें बोलत असतां त्यांच्या हृदयांत प्रेम मावेनासें होई.

चौ०—सब बिधि सबहि समदि नरनाहू।
रहा हृदय भरि पूरि उछाहू।

सर्व तऱ्हांनीं सर्वांची समबुद्धिपूर्वक बोळवण झाल्यामुळें राजाचे हृदयांत पूर्ण समाधान भरून राहिलें.

जहँ रनिवाँस तहाँ पगु धारे।
सहित बधूटिन्ह कुअँर निहारे।
लिये गोद करि मोदसमेता।
को कहि सकइ भयउ सुख जेता।

नंतर राजानें अंतःपुरांत पाय ठेवितांच वधूंसह सर्व कुमार त्याच्या दृष्टीस पडले. त्यानें त्यांना आनंदानें आपल्या अंकावर घेतलें; त्या वेळच्या त्याच्या सुखास्वादाचें वर्णन कोणाला करितां येईल !

बधू सप्रेम गोद बैठारी।
बारबार हिय हरषि दुलारी।

राजा सुनांना लडिवाळपणें अंकावर घेऊन हर्षित अंतःकरणानें त्यांना वारंवार गोंजरूं लागला.

देखि समाज मुदित रनिवासू ।
सब के उर आनँद कियो बासू ।
कहेउ भूप जिमि भयउ बिवाहू ।
सुनि सुनि हरष होइ सब काहू ।

सर्व मंडळी आणि अंतःपुरांतील स्त्रिया सर्वजण आनंदांत गर्क झालेले पाहून राजानें विवाहाचें इत्थंभूत वर्णन केलें. तें ऐकून सर्वांनाच हर्ष होत असे.

जनकराजगुन सील बडाई ।
प्रीति रीति संपदा सुहाई ।
बहुविधि भूप भाट जिमि बरनी ।
रानी सब प्रमुदित सुनि करनी ।

दशरथानें जनक राजाचे गुण, शील, माहात्म्य, प्रेम, प्रौढी व संपत्ति ह्याचें भाटाप्रमाणें खूपच गुलजारीचें वक्तृत्व केलें. जनकाचें तें कर्तृत्व ऐकून सर्व राण्या हर्षित झाल्या.

**दो०—सुतन्ह समेत नहाइ नृप बोलि बिप्र गुरुज्ञाति । भोजन कीन्ह अनेक बिधि घरी पंच गइ राति ॥ ३५३ ॥**

राजानें पुत्रासहवर्तमान स्नान करून व गुरु, विप्र आणि स्वजनमंडळीस बोलावून घेऊन तऱ्हेतऱ्हेच्या पदार्थांचें भोजन केलें तों पांच घटिका रात्र होऊन गेली.

चौ०—मंगलगान करहिँ बरभामिनि ।
भइ सुखमूल मनोहर जामिनि ।
अँचइ पान सब काहू पाये ।
स्रग-सुगंध-भूषित छबि छाये ।
रामहिँ देखि रजायसु पाई ।
निज निज भवन चले सिर नाई ।

कुलस्त्रिया मंगलगायन करीत असतां ती वेळ फार मनोहर आणि सुखकारक वाटूं लागली. आंचविल्यानंतर पानदान, हार-तुरे, अत्तर-गुलाब ह्यांची फैर उडाली. रामदर्शन घेऊन राजाज्ञेनें मंडळी नमस्कार करून आपापल्या घरीं जाऊं लागली.

प्रेम प्रमोद बिनोद बडाई ।
समउ समाज मनोहरताई ।
कहि न सकहिँ सत सारद सेसू ।
बेद बिरंचि महेस गनेसू ।
सो मैँ कहउँ कवन बिधिबरनी ।
भूमिनाग सिर धरइ कि धरनी ।

त्या वेळचें त्या मंडळींतील प्रेम, प्रमोद, विनोद, गांभीर्य आणि रमणीयता ह्यांचें वर्णन करण्यास शतावधी शारदा, शेष, वेद, विरंचि, महेश आणि गणपति हेदेखील समर्थ होणार नाहींत; मग त्यांचें वर्णन मी कोणत्या प्रकारें करणार? वारुळांतील सापकुलांना आपल्या मस्तकावर पृथ्वीला धारण करितां येईल काय?

नृप सबभाँति सबहि सनमानी ।
कहि मृदुवचन बोलाई रानी ।
बधू लरिकिनी परघर आईँ ।
राखेहु नयनपलक की नाईँ ।

नंतर राजानें गौरव करून सर्व राण्यांना बोलावून व सर्वतोपरी त्यांचा गौरव करून तो त्यांस उद्देशून प्रेमळ वाणीनें म्हणाला, ह्या सुना तरी मुलीच असून परक्या घरीं आल्या आहेत; तेव्हां यांना नेत्रांना जशा पापण्या जपतात तसें जपलें पाहिजे.

**दो०—लरिका स्रमित उनीदवस सयन करावहु जाइ । अस कहि गे बिस्रामगृह रामचरन चितु लाइ ॥ ३५४ ॥**

मुलें तरी दमून अगदीं झोपेस टेकलीं आहेत, आतां यांना जाऊन निजवावें; इतकें सांगून राजा रामचरणीं चित्त ठेवून आपल्या शयनागारांत गेला.

चौ०—भूपबचन सुनि सहज सुहाये ।
जटित कनकमनि पलँग डसाये ।
सुभग-सुरभि-पय-फेनु समाना ।
कोमल कलित सुपेती नाना ।
उपबरहन बर बरनि न जाहीँ ।
स्रग सुगंध मनिमंदिर माहीँ ।
रतन दीप सुठि चारु चँदोवा ।
कहत न बनइ जान जेइ जोवा ।
सेज रुचिर रचि राम उठाये ।
प्रेमसमेत पलँग पौढाये ।

राजाचें तें सहजसुंदर भाषण ऐकून राण्यांनीं रत्नखचित सुवर्णमंचकावर नितळ व शुद्ध गोक्षीराच्या फेंसाप्रमाणें शुभ्र, मृदु आणि उज्ज्वल अशा तऱ्हेतऱ्हेच्या गाद्यागिरद्या आंथरून व रत्नमंदिरांत पुष्पमाला सुगंधित पदार्थ, रत्नदीप वगैरे ठेवून, प्रत्यक्ष पाहिल्यावांचून ज्याची कल्पनाहि करितां यावयाची नाहीं असें अपूर्व छत लावून तयार असलेल्या सुखशेजेवर रामास उठवून प्रेमानें पलंगावर पहुडविलें.

अज्ञा पुनि पुनि भाइन्ह दीन्ही ।
निज-निज-सेज सयन तिन्ह कीन्ही ।

रामांनीं बंधूंना जेव्हां वारंवार आग्रह केला तेव्हां त्यांनींहि आपापल्या शय्येवर निद्रा केली.

देखि स्याम मृदु मंजुल गाता ।
कहहिँ सप्रेम बचन सब माता ।
मारग जात भयावन भारी ।
केहि बिधि तात ताडिका मारी ।

रामाचा तो श्याम, रम्य आणि कोमल देह पाहून सर्व माता त्यास प्रेमानें विचारूं लागल्या, बाळा! मार्गानें जात असतां ती मेली कर्दनकाळ ताटका तूं कशी रे ! मारलीस ?

**दो०-घोर निसाचर बिकट भट समर गनहिँ नहिँ काहु । मारे सहित सहाय किमि खल मारीच सुबाहु ॥ ३५५ ॥**

युद्धांत जे मोठमोठ्या शूरांना देखील आटोपावयाचे नाहींत अशा त्या दुष्ट आणि दांडग्या मारीच सुबाहुराक्षसांचा सैन्यासकट तूं कसा रे फडशा पाडलास ?

चौ०-मुनिप्रसाद बलि तात तुम्हारी ।
ईस अनेक करवरे टारी ।

बाळा ! हा जीव तुझ्यावरून ओवाळून टाकावा. केवळ ही मुनिकृपाच म्हणून या इडापिडा परमेश्वरानें टाळल्या.

मखरखवारी करि दुहुँ भाई ।
गुरुप्रसाद सब बिद्या पाई ।
मुनि तिय तरी लगत पग धूरी ।
कीरति रहि भुवन भरि पूरी ।
कमठ पीठि पबिकूट कठोरा ।
नृप समाज महँ सिवधनु तोरा ।
बिस्व बिजय जसु जानकि पाई ।
आये भवन ब्याहि सब भाई ।
सकल अमानुष करम तुम्हारे ।
केवल कौसिककृपा सुधारे ।

केवळ तुम्हीं दोघां भावांनींच मुनींच्या यज्ञाचें रक्षण केलें. गुरुकृपेंकरून सर्व विद्या संपादिली, केवळ पदरजाच्या स्पर्शानें मुनिपत्नीचा उद्धार झाला, ही तुझी कीर्ति सर्व ब्रह्मांडांत दुमदुमून राहिली आहे. कच्छपपृष्ठाप्रमाणें अभेद्य, व इंद्रवज्रतुल्य कठोर अशा शिवचापाचा देखील भर राजसभेंत भंग करून जणुं विश्वविजय यशतुल्य ही जानकी मिळविलीस, आणि आपल्या सर्व भावंडांचींहि लग्नें करून तूं घरीं परत आलास. हीं सर्व कर्मे अमानुष होत. केवळ कौशिकांच्या आशीर्वादानेंच तीं तुझ्या हातून घडून आलीं.

आजु सुफल जग जनम हमारा ।
देखि तात बिधुबदन तुम्हारा ।
जे दिन गये तुम्हहिँ बिनु देखे ।
ते बिरंचि जनि पारहिँ लेखे ।

हे तात ! तुझा वदनचंद्र पाहून जगांत आमच्या जन्माचें आज सार्थक झालें आहे. तुला पाहिल्यावांचून आमचे जे हे दिवस गेले ते मात्र ब्रह्मदेवानें जमेस धरूं नयेत.

**दो०-राम प्रतोषी मातु सब कहि बिनीत बर बैन । सुमिरि संभु-गुरु बिप्र-पद किये नींदबस नैन ॥ ३५६ ॥**

नम्र आणि प्रेमळ अशा भाषणानें रामांनीं सर्व मातांचें समाधान केलें आणि शंभु, गुरु आणि विप्र यांच्या पदांचें स्मरण करून ते निद्रावश झाले.

चौ०-नींदहु बदन सोह सुठि लोना ।
मनहुँ साँझ सरसीरुह सोना ।

झोंपेमध्यें देखील तें श्रीमुख जणुंकाय सायंकाळीं निमीलित झालेल्या कमलाप्रमाणें सुवर्णसुंदर आणि गोजिरवाणें शोभूं लागलें.

घर घर करहिँ जागरन नारी ।
देहिँ परसपर मंगल गारी ।
पुरी बिराजति राजति रजनी ।
रानी कहहि बिलोकहु सजनी ।

घरोघरीं बायका जाग्रणें करून परस्पर मजेदार उखाणे घालूं लागल्या. राण्या म्हणत, गडे ! ही रात्र तर रमणीय खरीच, परंतु हेंही बघा कीं आजची अयोध्यादेखील कशी लज्जतदार दिसत आहे.

सुंदरि बधुन्ह सासु लेइ सोई ।
फनिकन्ह जनु सिर मनि उर गोई ।

निजतांना भुजंग आपल्या मस्तकावरील लाल ज्याप्रमाणें पोटांत लपवून ठेवितात, त्याप्रमाणें सासवा आपल्या सुंदर सुना पुढ्यांत घेऊन निजल्या.

प्रात पुनीतकाल प्रभु जागे ।
अरुनचूड बर बोलन लागे ।

बंदि मागधन्ह गुनगन गाये ।
पुरजन द्वार जोहारन आये ।

उषःकालीं अमृतमुहूर्तावर प्रभु जागृत झाले. कुक्कुट मधुर ध्वनि करूं लागले. बंदी आणि मागध रामाचे गुणानुवाद गाऊं लागले, व नगरवासीजन देवडीवर मुजऱ्यास आले.

बंदि विप्र गुरु सुर पितु माता ।
पाइ असीस मुदित सब भ्राता ।
जननिन्ह सादर बदन निहारे ।
भूपतिसंग द्वार पगु धारे ।

माता, पिता, देव, गुरु आणि ब्राह्मण ह्यांस वंदन करून सर्व बंधूंनीं त्यांचे आशीर्वाद घेतले. ते आनंदात आहेत असें पाहून माता प्रेमानें त्यांचीं मुखें न्याहाळूं लागल्या. नंतर राजाबरोबर त्यांनींहि राजद्वारीं गमन केलें.

**दो०—कीन्ह सौच सब सहज सुचि सरित पुनीत नहाइ । प्रातक्रिया करि तात पहिँ आये चारिउ भाइ ॥ ३५७ ॥**

नंतर नित्यशुचिष्मंत असे ते चवघेहि बंधु सर्व प्रातर्विधि आटोपून व पवित्र शरयूचें स्नान करून आणि प्रातःसंध्यावंदनादि कर्में सारून पित्याकडे आले.

चौ०—भूप बिलोकि लिये उर लाई ।
बैठे हरषि रजायसु पाई ।
देखि राम सब सभा जुडानी ।
लोचन-लाभ-अवधि अनुमानी ।

राजानें त्यांस अवलोकन करितांच उचलून उराशीं धरिलें. नंतर राजाज्ञेनें ते आनंदानें बसले असतां, रामास पाहून सर्व सभा प्रसन्न झाली, आणि आपल्या नेत्रलाभाची शिकस्त झाली असें सर्वांना वाटलें.

पुनि बसिष्ठ मुनि कौसिक आये ।
सुभग आसनन्हि मुनि बैठाये ।
सुतन्ह समेत पूजि पद लागे ।
निरखि राम दोउ गुरु अनुरागे ।

नंतर वसिष्ठविश्वामित्रादि ऋषिमंडळी आली. त्यांना श्रेष्ठासनीं बसविण्यांत आलें. पुत्रांसहवर्तमान राजानें त्यांचें पूजन आणि पदवंदन केलें. रामास अवलोकितांच दोघांहि गुरुमूर्तींस प्रेमाचें भरतें भरलें.

कहहिँ बसिष्ठ धरम इतिहासा ।
सुनहिँ महीप सहित रनिवासा ।
मुनिमन अगम गाधि-सुत-करनी ।
मुदित बसिष्ठ बिपुलबिधि बरनी ।

वसिष्ठांनीं धर्म व इतिहास ह्यांचा प्रस्ताव आरंभिला, व राजा राण्यांसह तें श्रवण करूं लागला. वसिष्ठांनीं मुनिमनासहि अतर्क्य असा विश्वामित्राचा प्रताप मोकळ्या मनानें व आनंदानें वर्णन केला.

बोले बामदेव सब साँची ।
कीरति कलित लोक तिहुँ माँची ।
सुनि आनंद भयउ सब काहू ।
राम-लषन-उर अधिक उछाहू ।

वामदेव म्हणाले, हें सर्व वर्णन अगदीं यथार्थ आहे. ह्यांचा कीर्तिदुंदुभी त्रैलोक्यांत गाजत आहे. तें ऐकून सर्वांना आनंद तर झालाच, परंतु रामलक्ष्मणांचीं हृदयें मात्र अधिकच उल्हसित झालीं.

**दो०—मंगल मोद उछाह नित जाहिँ दिवस एहि भाँति । उमगी अवध अनंद भरि अधिक अधिक अधिकाति ॥ ३५८ ॥**

ह्याप्रमाणें नित्य मंगल, आनंद आणि उत्सव ह्यांतच दिवस निघून जात. अयोध्येंत आनंदाचे पूर लोटून ते अधिकाधिकच फोफावूं लागले.

चौ०—सुदिन सोधि कलकंकन छोरे ।
मंगल मोद बिनोद न थोरे ।
नित नव सुख सुर देखि सिहाहीँ ।
अवध जनम जाचहिँ बिधि पाहीँ ।

सुमुहूर्त पाहून लग्नकंकणें विसर्जिलीं. तेव्हांचा आनंद, विनोद आणि उत्साह अपूर्व होता. नित्य अभिनव सोहळा पाहून देव संतुष्ट होत, व अयोध्येंतच पुन्हां जन्म मिळावा असें ब्रह्मदेवापाशीं मागणें मागत.

बिस्वामित्र चलन नित चहहीँ ।
राम-सनेह-बिनय-बस रहहीँ ।
दिन दिन सयगुन भूपतिभाऊ ।
देखि सराह महा-मुनि राऊ ।

विश्वामित्र रोज बिदा मागत, परंतु रामाच्या प्रेमाग्रहानें आकळून त्यांना राहणें भाग पडे. दिवसानुदिवस राजा दशरथाची आपणाविषयींची भक्ति शतपट वाढती पाहून तो महामुनीश्वर राजाची प्रशंसा करी.

माँगत बिदा राउ अनुरागे ।
सुतन्ह समेत ठाढ भये आगे ।
नाथ सकल संपदा तुम्हारी ।
मैँ सेवक समेत सुत नारी ।

करबि सदा लरिकन्ह पर छोहू।
दरसन देत रहब मुनि मोहू।

अखेर विश्वामित्रांनीं निरोप मागितला असतां राजा गहिंवरून आपल्या पुत्रांसकट त्यांचे समोर उभा राहून म्हणाला, हें सर्व वैभव महाराजांचें आहे, आणि मी पुत्रकलत्रांसह आपला ताबेदार आहे. हे मुनींद्र ! ह्या पुत्रांवर आपला सदोदित लोभ असावा, आणि मला आपलें दर्शन होत असावें.

अस कहि राउ सहित सुत रानी।
परेउ चरन मुख आव न बानी।
दीन्हि असीस बिप्र बहुभाँती।
चले न प्रीति रीति कहि जाती।

इतकें बोलून तो पुत्रकलत्रांसह त्यांच्या चरणीं लोळूं लागला. त्याच्या मुखावाटें शब्द निघेनासे झाले. तो ब्रह्मर्षी त्यांस अनेक प्रकारें आशीर्वाद देऊन जाण्यास निघाला. तो प्रेमाचा प्रकर्ष अवर्णनीय होता.

राम सप्रेम संग सब भाई।
आयसु पाइ फिरे पहुँचाई।

राम सर्व बंधूंसमवेत त्यांना प्रेमानें पोंचविण्यास गेले व त्यांची आज्ञा घेऊन परत फिरले.

**दो०—रामरूप भूपतिभगति ब्याह उछाह अनंद। जात सराहत गनहिँ मन मुदित गाधि-कुल-चंद ॥ ३५९ ॥**

तो गाधिकुलचंद्र मार्गक्रमण करीत असतां रामरूप, दशरथभक्ति आणि विवाहानंदोत्सव यांची मनांतल्या मनांत श्लाघा करून तबियत भरून डोलूं लागे.

चौ०—बामदेव रघु-कुल-गुरु ज्ञानी।
बहुरि गाधिसुत कथा बखानी।
सुनि मुनि सुजस मनहिँ मन राऊ।
बरनत आपन पुन्यप्रभाऊ।
बहुरे लोग रजायसु भयऊ।
सुतन्ह समेत नृपति गृह गयऊ।

नंतर वसिष्ठवामदेवादि ज्ञाननिष्ठांनीं विश्वामित्राचें चरित्र वर्णन केलें. त्या महात्म्याचें सद्यश श्रवण करून राजा मनांतल्या मनांत आपल्या पूर्वपुण्याईच्या प्रभावाची वाखाणणी करूं लागला. नंतर सभा विसर्जन करून राजा पुत्रांसमवेत आपल्या मंदिरांत जाता झाला.

जहँ तहँ रामब्याह सब गावा।
सुजस पुनीत लोक तिहुँ छावा।
आये ब्याहि राम घर जब तें।
बसे अनंद अवध सब तब तें।

जिकडे तिकडे रामविवाह हाच सर्वांचा वाग्विषय होऊन बसला. त्या पावन यशानें त्रैलोक्य व्यापून गेलें. रामचंद्र विवाह करून स्वगृहीं आल्यापासून अयोध्येमध्यें सर्व प्रकारच्या आनंदांनीं ठाणें घेतलें.

प्रभुविबाह जस भयउ उछाहू।
सकहिँ न बरनि गिरा अहिनाहू।
कबि-कुल-जीवन-पावन जानी।
राम-सीय-जस मंगलखानी।
तेहि तें मैं कछु कहा बखानी।
करन पुनीत हेतु निज-बानी।

प्रभुविवाहोत्सवाचें इत्थंभूत वर्णन करण्यास वाग्देवी आणि सर्पराज शेष हेदेखील समर्थ नाहींत. तथापि सीतारामचंद्राचें यश ही मंगलांची खाण आणि कविकुलाचें पवित्र जीवनरहस्य आहे असें जाणून स्वतःची वाणी पवित्र करण्याच्या हेतूनें मीं त्याचें किंचित् व्याख्यान केलें आहे.

**छंद—निज-गिरा-पावनि-करन कारन रामजस तुलसी कह्यौ। रघु-बीर-चरित अपार बारिधि पार कबि कौने लह्यौ॥ उपबीत ब्याह उछाह मंगल सुनि जे सादर गावहीँ। बैदेहि-राम-प्रसाद ते जन सर्वदा सुख पावहीँ॥ ६१॥**

आपली वाणी पवित्र करण्याच्या हेतूनें म्यां तुलसीदासानें हें रामयश वर्णिलें आहे. रघुवीरचरित्र हा अपार सागर आहे. याच्या पार कोणत्या कवीच्या आवाक्यांत आहे ? मौंजीबंधन, विवाह इत्यादि मंगलोत्सवप्रसंगाचें जे सादर श्रवण करून पठण करितील ते जन सीतारामप्रसादेंकरून सदासर्वदा सुखच पावतील.

**सो०—सिय-रघु-बीर-विबाह जे सप्रेम गावहिँ सुनहिँ। तिन कहँ सदा उछाह मंगलायतन रामजस ॥ ३६ ॥**

सीताराम विवाहाचें जे कोणी भक्तिपूर्वक श्रवण अथवा पठण करितील त्यांना नित्य आनंदाचाच लाभ होईल, कारण रामयश हें मंगलांचें केवळ निवासस्थान आहे.

इति श्रीमद्रामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने विमलसन्तोषसम्पादनो नाम प्रथमः सोपानः समाप्तः ॥

श्रीगणेशाय नमः।

। श्रीजानकीवल्लभो विजयते ।

# ॥ रामचरितमानस ॥

## अर्थात्

## ॥ श्रीतुलसीरामायण ॥

( मराठी भाषांतरासहित. )

# ( द्वितीय सोपान )

## ( अयोध्याकाण्ड )

श्लोकाः ।

वामाङ्के च विभाति भूधरसुता देवापगा मस्तके
भाले बालविधुर्गले च गरलं यस्योरसि व्यालराट् ।
सोऽयं भूतिविभूषणः सुरवरः सर्वाधिपः सर्वदा
शर्वः सर्वगतः शिवः शशिनिभः श्रीशङ्करः पातु माम् ॥ १ ॥

ज्याच्या वामांकीं हिमाचलकन्यका पार्वती विराजित आहे, ज्याच्या मस्तकाचे ठायीं गंगा, ललाटपटलाचे ठायीं बालचंद्र, कंठप्रदेशीं हालाहल व हृद्भागीं सर्पराज शोभत आहेत, तो हा चिताभस्मविभूषित, देवश्रेष्ठ, विश्वनाथ, चिरंतन, सर्वांतर्यामी, कल्याणकारी, चंद्रतुल्य ( गौरकांति, परमाल्हादक, आणि शांति व अमृत-मोक्ष-देणारा ) शर्व श्रीमहादेव माझें रक्षण करो.

प्रसन्नतां या न गताभिषेकतस्तथा न मम्ले वनवासदुःखतः ।
मुखाम्बुजश्रीरघुनन्दनस्य मे सदाऽस्तु सा मञ्जुलमङ्गलप्रदा ॥ २ ॥

जी राज्याभिषेकानें उल्हसित झाली नाहीं आणि वनवासदुःखानें म्लानहि झाली नाहीं, अशी ती श्रीरामचंद्राच्या मुखारविंदाची शोभा मजला निरंतर स्पृहणीय कल्याणाची दात्री होवो.

नीलाम्बुजश्यामलकोमलाङ्गं सीतासमारोपितवामभागम् ।
पाणौ महासायकचारुचापं नमामि रामं रघुवंशनाथम् ॥ ३ ॥

ज्याचें अंग नीलकमलाप्रमाणें श्याम आणि कोमल आहे, ज्याच्या वामभागीं जानकी विराजित आहे, ( किंवा ज्यानें आपला वामभाग जानकीच्या अंगावर टेकलेला आहे ), ज्याच्या हस्ताचे ठायीं प्रखर बाण आणि उज्ज्वल चाप शोभत आहेत, अशा त्या रघुकुलनाथ श्रीरामचंद्रास मी नमस्कार करितों.

दो०—श्रीगुरु चरन-सरोज-रज निज-मनु मुकुर सुधारि । बरनउँ रघुबर-बिमल-जसु जो दायकु फलचारि ॥ १ ॥

श्रीगुरुचरणारविंदाच्या धूळीनें आपला मनोदर्पण स्वच्छ करून चतुःपुरुषार्थ साध्य करून देणारें असें जें रघुपुंगवाचें उज्ज्वल यश तें मी वर्णन करितों.

---

१ कवीस बहुतेक हाच अर्थ अभिप्रेत असावा असें वाटतें, कारण काव्यप्रकाशाच्या नियमानुसार या नान्दींतून मुख्य नायकाचा पुढील वृत्तान्त सूचित होतो.

चौ०-जब तें रामब्याहि घर आये ।
नित नवमंगल मोद बधाये ।

रामचंद्र विवाह करून अयोध्येस आल्यापासून नित्य अभिनव मंगलयुक्त आनंदप्रसंग घडून येत असत.

भुवन चारि दस भूधर भारी ।
सुकृत मेघ बरषहिँ सुखबारी ।
रिधिसिधि संपति नदी सुहाई ।
उमगि अवध अंबुधि कहुँ आई ।

चतुर्दश भुवनरूप महान् पर्वतावर पुण्यरूप मेघ सुखरूप जलाचा वर्षाव करूं लागला. त्यामुळें ऋद्धि, सिद्धि आणि संपत्तिरूप सुंदर नद्यांस पूर येऊन त्या अयोध्यारूप सागराकडे धांव घेऊं लागल्या.

मुनिगन पुर-नर-नारि-सुजाती ।
सुचि अमोल सुंदर सब भाँती ।
कहि न जाइ कछु नगरबिभूती ।
जनु एतनिअँ बिरंचि करतूती ।

(अयोध्यारूप सागरांत) पुरवासी स्त्रीपुरुषरूप सर्वतोपरी पवित्र, अमोल, सुंदर आणि जातिवंत रत्नें निपजूं लागलीं. अयोध्येचें ऐश्वर्य किंचिन्मात्र देखील सांगतां येत नाहीं. जणुंकाय ब्रह्मदेवाचें कर्तृत्व येथें संपलें (सीमा झाली) असें वाटे.

सबबिधि सब पुरलोग सुखारी ।
रामचंद-मुख-चंदु निहारी ।
मुदित मातु सब सखी सहेली ।
फलित बिलोकि मनोरथ बेली ।
राम-रूप-गुन-सीलु-सुभाऊ ।
प्रमुदित होहिँ देखि सुनि राऊ ।

सर्व प्रजा रामचंद्राचा मुखचंद्र अवलोकन करून सर्वप्रकारें सुखी होत असत. सर्व राममाता, त्यांच्या सख्या आणि सहचरी, आपल्या मनोरथरूप वेलींस फळें आलेलीं पाहून संतुष्ट होत असत. राजा दशरथ तर रामचंद्राचें रूप, गुण, शील आणि स्वभाव पाहून तल्लीन होत असे.

**दो०-सब के उर अभिलाषु अस कहहिँ मनाइ महेसु । आपु अछत जुबराज पदु रामहिँ देउ नरेसु ॥ २ ॥**

राजा दशरथानें आपल्या देखत रामास युवराजपद द्यावें, अशी सर्वांची अंतःकरणापासून इच्छा होऊं लागली. त्यांचे असे उद्गारहि निघत आणि त्याप्रमाणें ते शंकराची प्रार्थनाहि करीत.

चौ०-एक समय सब सहित समाजा ।
राजसभा रघुराजु बिराजा ।
सकल-सुकृत-मूरति नरनाहू ।
रामसुजसु सुनि अतिहि उछाहू ।
नृप सब रहहिँ कृपा अभिलाषे ।
लोकप रहहिँ प्रीतिरुख राखे ।
त्रिभुवन तीनिकाल जग माहीँ ।
भूरि भाग दसरथसम नाहीँ ।
मंगलमूल रामु सुत जासू ।
जो कछु कहिय थोर सबु तासू ।
राय सुभाय मुकुरु कर लीन्हा ।
बदनु बिलोकि मुकुटु सम कीन्हा ।

सर्व सुकृतांची केवळ अपरप्रतिमाच असा शोभणारा, रामचंद्राचें सद्यश ऐकून ज्यास अतिशयच आनंद लोटत आहे, सर्व राजे ज्याच्या कृपेची आकांक्षा बाळगून वागत आहेत, इंद्रादि लोकपाल देखील ज्याची प्रीति आणि वृत्ति संभाळून असतात, ब्रह्मांडत्रयात्मक विश्वांत ज्या दशरथासारखा भाग्यवान् कालत्रयांतहि झालेला नाहीं, मंगलायतन श्रीरामचंद्रच ज्याचा पुत्र असल्यामुळें ज्याचे संबंधानें जेवढें म्हणून बोलावें तेवढें अल्पच ठरणार, अशा रघुराज दशरथानें कोणे एके वेळीं, सर्व मंडळींसहवर्तमान सभागृहांत विराजमान असतां सहजगत्या हातांत आरसा घेतला आणि त्यांत आपलें मुखावलोकन करून मस्तकावरचा मुकुट सारखा केला.

स्रवनसमीप भये सितकेसा ।
मनहुँ जरठपनु अस उपदेसा ।
नृप जुवराज राम कहुँ देहू ।
जीवन जनम लाहु किन लेहू ।

कर्णप्रदेशावरील केस पांढरे झालेले पाहून त्यास वाटलें कीं, वार्द्धक्य आपणांस कानांत असा उपदेश करीत आहे कीं, हे राजा ! रामास यौवराज्य अर्पण करून आपल्या जन्माचें व जीविताचें सार्थक करून कां घेत नाहींस ?

**दो०-यह बिचारु उर आनि नृप सुदिनु सुअवसरु पाइ । प्रेम पुलकि तन मुदित मन गुरुहि सुनायेउ जाइ ॥ ३ ॥**

हा विचार मनांत आणून व चांगली दिवसवेळ

साधून, प्रेमानें पुलकितगात्र आणि प्रसन्नचित्त होत्साता राजा गुरुजींस जाऊन सांगूं लागला.

चौ०–कहइ भुआल सुनिय मुनिनायक ।
भये राम सब बिधि सब लायक ।
सेवक सचिव सकल पुरबासी ।
जे हमरे अरि मित्र उदासी ।
सबहिँ रामुप्रिय जेहि बिधि मोही ।
प्रभु असीस जनु तनु धरि सोही ।
बिप्र सहित परिवार गोसाईँ ।
करहिँ छोहु सब रउरहि नाईँ ।

राजा म्हणाला "हे मुनिनायका ! ऐकावें, राम सर्वप्रकारें सर्वकार्यक्षम झाला आहे. राम जसा मला प्रिय आहे, तसाच तो इतर सेवक, मंत्रिमंडळ, सर्व पुरवासी जन, आमचे शत्रु, मित्र व उदासीन ह्या सर्वांनाहि प्रिय झाला आहे. राम म्हणजे जणुंकाय मूर्तित्वास आलेले आपणा समर्थांचे आशीर्वादच होत. स्वामिन् ! विप्रमंडळी देखील आपापल्या परिवारांसह रामावर महाराजाप्रमाणेंच लोभ ठेवितात.

जे गुरु–चरन–रेनु सिर धरहीँ ।
ते जनु सकल बिभव बस करहीँ ।
मोहि सम यहु अनुभयउ न दूजे ।
सबु पायेउँ रज पावनि पूजे ।

जे जन गुरुचरणांची धूळ मस्तकावर धारण करितात ते यच्चयावत् वैभव आपले अंकित करून घेतात. ह्याचा अनुभव माझ्यासारखा इतर कोणालाच आला नसेल. ह्याच पवित्र पदरजांच्या सेवनानें मला सर्व कांहीं मिळून चुकलें आहे.

अब अभिलाषु एकु मन मोरे ।
पूजिहि नाथ अनुग्रह तोरे ।
मुनि प्रसन्न लखि सहज सनेहू ।
कहेउ नरेसु रजायसु देहू ।

हे नाथ ! आतां माझ्या मनोमानसीं एकच आवड उरली आहे; आणि ती तरी आपल्याच कृपेनें सफल होणार." मुनींची प्रसन्नता आणि त्यांचें आपणावरील स्वाभाविक प्रेम पाहून दशरथ म्हणालाः– ' मला बोलण्यास आज्ञा असावी. '

**दो०–राजन राउर नामु जसु सब अभिमतदातार । फलअनुगामी महिपमनि मन अभिलाषु तुह्मार ॥ ४ ॥**

तेव्हां वसिष्ठ म्हणाले, "हे राजा ! तुझें नाम आणि यश हींच तर सर्व कामना पुरविणारीं आहेत. राजेंद्रा ! तुझे मनोद्दिष्ट फलानुगामीच असावयाचें" ( तुझ्या वासनांच्या पाठोपाठ फळें हीं आपोआप चालत येतात. )

चौ०–सब बिधि गुरुप्रसन्न जिन जानी ।
बोलेउ राउ रहसि मृदुबानी ।
नाथ रामु करियहि जुबराजू ।
कहिय कृपा करि करिय समाजू ।

गुरु पूर्ण प्रसन्नचित्त आहेत असें जाणून, राजा प्रेमळ शब्दांनीं हळूंच म्हणालाः—"हे नाथ ! रामास युवराज करावें. कृपा करून मला आज्ञा द्यावी म्हणजे मी समारंभ भरवितों.

मोहि अछत यहु होइ उछाहू ।
लहहिँ लोग सब लोचन लाहू ।
प्रभुप्रसाद सिव सबइ निबाहीँ ।
यह लालसा एक मन माहीँ ।
पुनि न सोच तनु रहउ कि जाऊ ।
जेहि न होइ पाछे पछिताऊ ।

माझ्या डोळ्यांदेखत एवढा हा सोहळा उरकला म्हणजे सर्व प्रजेला त्यांच्या नेत्रांचें साफल्य अनुभवण्यास सांपडेल. प्रभुप्रसादानें श्रीशंकरांनीं सर्व कांहीं निभावलेंच आहे. ही एकच कायती मनाची हौस उरली आहे. ती झाली कीं फिरून काळजीच नको. देह जावो अगर राहो, मागाहून पश्चात्तापाची पाळीच नको."

सुनि मुनि दसरथ बचन सुहाये ।
मंगल–मोद–मूल मन भाये ।
सुनु नृप जासु बिमुख पछिताहीँ ।
जासु भजन बिनु जरनि न जाहीँ ।
भयउ तुह्मार तनय सोइ स्वामी ।
रामु पुनीत प्रेम–अनुगामी ।

दशरथाचें तें प्रेमळ, कल्याणकारक आणि आनंदजनक भाषण मुनींच्याहि मनास पटलें (व ते म्हणाले) "राजा ! श्रवण कर. ज्याशीं विन्मुख झालें असतां, जीवास दुःखपरंपरा भोगाव्याच लागतात, आणि ज्याच्या भजनाव्यतिरिक्त जीवाचा ताप शांत होतच नाहीं, तोच पुनीत प्रेमानुगामी स्वामी रामचंद्र तुझ्या पुत्रत्वानें अवतीर्ण झाला आहे.

**दो०—बेगि बिलंबु न करिय नृप साजिय सबुइ समाजु। सुदिनु सुमंगलु तबहिँ जब रामु होहिँ जुबराजु ॥ ५ ॥**

राजा! अगदीं मुळींदेखील विलंब न लावतां सर्व समारंभाच्या सिद्धतेस लाग. राम युवराज होईल तोच सुदिन आणि तेंच सुमंगल."

चौ०—मुदित महीपति मंदिर आये।
सेवक सचिव सुमंत्रु बोलाये।
कहि जय जीव सीस तिन्ह नाये।
भूप सुमंगल बचन सुनाये।

(हें ऐकून) राजा आनंदानें महालांत आला आणि त्यानें सेवकाकरवीं सुमंत प्रधानास बोलावणें पाठविलें. त्यानें येऊन 'जय जीव' म्हणून नमस्कार केला. राजानें ती शुभवार्ता त्याला निवेदन केली.

प्रमुदित मोहि कहेउ गुरु आजू।
रामहिँ राय देहु जुबराजू।
जौं पंचहि मत लागइ नीका।
करहु हरषि हिय रामहिँ टीका

(राजा म्हणाला,) "आज गुरुमहाराजांनीं प्रसन्न होऊन मला आज्ञा केली कीं, राजा! रामास यौवराज्य दे. दरबाराच्या मतानें हें जर पसंत ठरेल तर उल्हसित अंतःकरणानें रामास राज्याभिषेक करण्यांत यावा."

मंत्री मुदित सुनत प्रियबानी।
अभिमत बिरव परेउ जनु पानी।

उभ्या रोपड्यावर जणुंकाय अगदीं ऐनवेळीं मोजकाच पाऊस पडल्याप्रमाणें ती प्रिय वार्ता ऐकतांच सुमंतास आनंद झाला.

बिनती सचिव करिहिँ कर जोरी।
जियहु जगत पति बरिस करोरी।
जगमंगल भल काजु बिचारा।
बेगिय नाथ न लाइय बारा।

सुमंत हात जोडून विनंति करूं लागला, "चक्रवर्ती राजा चिरंजीव असो! जगाचें ज्यांत कल्याण आहे असेंच इष्टकार्य आपण निश्चित केलें आहे. सरकार! त्वरा केली पाहिजे. कार्य लांबणीवर लोटूं नये."

नृपहिँ मोदु सुनि सचिव सुभाखा।
बढत बौंड जनु लही सुसाखा।

सुमंताचे हे आनंदोद्गार ऐकून वाढीस लागलेल्या रोपड्यास जणुंकाय सुरेखशा फांद्या फुटाव्या अशाप्रमाणें राजास आनंद झाला.

**दो०—कहेउ भूप मुनिराज कर जोइ जोइ आयसु होइ। राम-राज-अभिषेक-हित बेगि करहु सोइ सोइ ॥ ६ ॥**

राजा म्हणाला—"रामाच्या अभिषेकासाठीं मुनिराजांची जसजशी आज्ञा होईल तसतशी तीं त्वरेनें पार पाडावी."

चौ०—हरषि मुनीस कहेउ मृदुबानी।
आनहु सकल सु-तीरथ-पानी।
औषध मूल फूल फल पाना।
कहे नाम गनि मंगल नाना।
चामर चरम बसन बहु भाँती।
रोग पाट पट अगनित जाती।
मनिगन मंगलवस्तु अनेका।
जो जग जोगु भूपअभिषेका।

मुनिराज हर्षानें आणि मृदु वाणीनें म्हणाले—सर्व प्रसिद्ध तीर्थांचीं जलें आणवा. औषधि, मूल, फल, पुष्प, पत्र, चामर, चर्म, प्रकारप्रकारचीं सोवळ्याचीं वस्त्रें, अनेक प्रकारचें लोंकरी, रेशमी व सुती कापड, रत्नें इत्यादि अनेक शास्त्रोक्त वस्तु, सारांश, राज्याभिषेकाकरितां प्रचारांत असलेल्या आवश्यक आणि मंगल वस्तूंची यादी देऊन (मुनिवर्यांनीं) त्या सर्वांची सिद्धता करण्यास सांगितलें.

बेदबिदित कहि सकल बिधाना।
कहेउ रचहु पुर बिबिधबिताना।
सफल रसाल पूँगफल केरा।
रोपहु बीथिन्ह पुर चहुँ फेरा।
रचहु मंजु मनि चौकइ चारू।
कहहु बनावन बेगि बजारू।
पूजहु गनपति गुरु कुलदेवा।
सब बिधि करहु भूमि-सुर-सेवा।

नंतर त्यांनीं अभिषेकाचें वेदोक्त विधानाच्या सामुग्रीचीहि यादी दिली आणि फिरून आज्ञा केली, "शहरांत निरनिराळ्या प्रकारचे मंडप उभारले जावेत. फणस, आंबे, पोफळी, केळीं ह्यांचीं झाडें शहरांत चोहोंकिरू रस्तोरस्तीं लावावीं. बहुमोल

रत्नांचीं सुंदर स्वस्तिकें घडवावीं. बाजार शृंगारण्यास तावडतोब हुकूम सोडावेत. गणपति, गुरु, कुलदेवता यांच्या अर्चा सुरू कराव्या. परोपरीनें ब्राह्मणसंतर्पण चालू ठेवावें.

**दो०—ध्वज पताक तोरन कलस सजहु तुरग रथ नाग। सिर धरि मुनिवर बचन सबु निज-निज-काजहिँ लाग ॥ ७ ॥**

ध्वज, पताका, तोरणें, कलश, अश्व, रथ, हत्ति हेहि सजून सिद्ध असावेत. " मुनिवरांची ही आज्ञा शिरसामान्य करून सर्व आपापल्या कामांत गुंतले.

चौ०—जो मुनीस जेहि आयसु दीन्हा।
सो तेहि काजु प्रथम जनु कीन्हा।

मुनींद्रांनीं ज्यास जी आज्ञा केली त्यानें तें काम जणुंकाय पूर्वींच करून ठेवल्याप्रमाणें केलें.

बिप्र साधु सुर पूजत राजा।
करत रामहित मंगलकाजा।
सुनत रामअभिषेक सुहावा।
बाज गहागह अवध बधावा।

राजानें देव, ब्राह्मण आणि संत यांचीं समाराधनादिक मंगलानुष्ठानें रामाच्या प्रीत्यर्थ आरंभिलीं. रामाभिषेकाची मंगलवार्ता ऐकून अयोध्येंत घरोघरीं वाद्यें वाजूं लागलीं.

राम-सीय-तन सगुन जनाये।
फरकहिँ मंगल अंग सुहाये।

सीतारामचंद्रांच्या देहास शुभशकुन जाणवूं लागले. त्यांच्या शुभांगांचें मंगलस्फुरण होऊं लागलें.

पुलकिं सप्रेम परसपर कहहीँ।
भरत—आगमनु—सूचक अहहीँ।
भये बहुत दिन अतिअवसेरी।
सगुन प्रतीति भेँट प्रिय केरी।
भरतसरिस प्रिय को जग माहीँ।
इहइ सगुनफलु दूसर नाहीँ।

ते प्रेमरोमांचित होत्साते परस्परांस म्हणत कीं, हीं भरताचीं आगमनसूचक चिन्हें होत. दिवसगत झाल्यानें त्यास अगदीं विसंबल्यासारखें आपणांस झालें आहे. ह्या शकुनावरून त्या आपल्या लाडक्याची भेट होईल असें निर्धारानें वाटतें. भरतासारखा प्रिय ह्या जगांत तरी आपणास कोण आहे ? शकुनाचें फळ इतर कांहीं नसून हें एकच असावें.

रामहिँ बंधुसोचु दिन राती।
अंडन्हि कमठ हृदय जेहि भाँती।

कासविणीस जशी तिच्या अंड्याची ( आदि-कच्छपाच्या मनास जशी ब्रह्माण्डाची ) तशी रामचंद्राला भरताची रात्रंदिवस काळजी वाटे.

**दो०—एहि अवसर मङ्गलु परम सुनि रहसेउ रनिवासु। सोभत लखि बिधु बढत जनु बारिधि बीचिबिलासु ॥ ८ ॥**

वर्धमान चंद्रास सुशोभित पाहून समुद्रांत लाटांचा जसा हलकल्लोळ माजून जातो, तसा त्या प्रसंगीं अभिषेकाची मंगलवार्ता ऐकून अंतःपुरांत आनंद लोटला.

चौ०—प्रथम जाइ जिन्ह बचन सुनाये।
भूषन बसन भूरि तिन्ह पाये।
प्रेम पुलकि तन मन अनुरागीँ।
मंगलकलस सजन सब लागीं।

अगदीं प्रथम ज्यांनीं राण्यांना खबर कळविली त्यांनीं त्यांजकडून वस्त्रालंकारादि लयलूट बक्षिसें उपटलीं. मनांत प्रेम दाटून येऊन व देह प्रेमरोमांचित होऊन अवघें अंतःपुर मंगलकलशादि साहित्याच्या तयारीस लागलें.

चौकइ चारु सुमित्रा पूरी।
मनिमय बिबिधभाँति अतिरूरी।

सुमित्रेनें सुरेख स्वस्तिकें भरलीं. तीं निरनिराळ्या जातींच्या रत्नांनीं फार खुबीदार केलेलीं होतीं.

आनँद मगन राममहतारी।
दिये दाम बहु बिप्र हँकारी।
पूजीं ग्रामदेबि सुर नागा।
कहेउ बहोरि देन बलिभागा।
जेहि बिधि होइ राम कल्यानू।
देहु दया करि सो बरदानू

राममाता कौसल्या आनंदांत अगदीं डूब झाली. तिनें ब्राह्मण बोलावून त्यांना यथास्थित दानें वांटलीं. ग्रामदेवता, जलस्थलादि देवता, नागदेवता यांच्याहि पूजा बांधल्या आणि त्यांना बलि आणि भाग नेमून दिले. " जेणेंकरून माझ्या रामाचें कल्याण होईल असा वरप्रसाद तुम्ही कृपा करून द्या " हीच एक तिची सर्वांस प्रार्थना होती.

गावहिँ मंगल कोकिलबयनी।
बिधुबदनी मृग—सावक—नयनी।

इंदुवदन आणि बालमृगाक्ष स्त्रीजन कोकिलस्वरानें मंगलगायन करूं लागला.

दो०—राम-राज-अभिषेकु सुनि हिय हरषे नरनारि। लगे सुमंगल सजन सब बिधि अनुकूल बिचारि ॥ ९ ॥

रामाचा राज्याभिषेक ऐकून सर्व स्त्रीपुरुषांचीं मनें आनंदित झालीं, आणि उद्दिष्ट कार्य आणि स्वतःची अनुकूलता यांचा विचार करून ते मंगल-प्रसंग साजरा करण्याच्या तयारीस लागले.

चौ०—तब नरनाह बसिष्ठ बोलाये।
रामधाम सिख देन पठाये।

नंतर राजानें वसिष्ठमुनींस आणवून त्यांस रामाच्या महालांत जाऊन रामास व्रतोपवासादि नियम सांगण्यास सांगितलें.

गुरुआगमनु सुनत रघुनाथा।
द्वार आइ पद नायेउ माथा।
सादर अरघ देइ घर आने।
सोरहभाँति पूजि सनमाने।

गुरुआगमनाची वर्दी येतांच त्या राघवश्रेष्ठानें द्वारावर येऊन त्यांच्या चरणांवर मस्तक ठेविलें, प्रेमादरानें अर्घ्य अर्पण करून त्यांना आंत आणिलें आणि षोडशोपचार पूजा करून त्यांचा सन्मान केला.

गहे चरन सियसहित बहोरी।
बोले रामु कमल कर जोरी।

नंतर सीतेसह रामांनीं त्यांचे चरण धरून आणि कमलहस्त जोडून बोलण्यास प्रारंभ केला.

सेवकसदन स्वामिआगमनू।
मंगलमूल अमंगलदमनू।
तदपि उचित जन बोलि सप्रीती।
पठइय काज नाथ असि नीती।
प्रभुता तजि प्रभु कीन्ह सनेहू।
भयउ पुनीत आजु यह गेहू।
आयसु होइ सो करउँ गोसाईँ।
सेवकु लहइ स्वामिसेवकाई।

" सेवकाच्या सदनाप्रत स्वामींचें आगमन म्हणजे मंगलकारक आणि अमंगलहारकच होय. तथापि दासास बोलावून कृपा करून कार्यनियुक्त केलें असतें तरी तेंदेखील न्यायोचितच होतें. प्रभुता टाकून ही प्रभूंनीं दयाच केली. आज हें मंदिर पुनीत झालें. स्वामिन्! आपली आज्ञा होईल तें मी करीन. स्वामींची सेवा सेवकास घडलीच पाहिजे. "

दो०—सुनि सनेहसाने बचन मुनि रघुबरहि प्रसंस। राम कस न तुम्ह कहहु अस हंस-बंस-अवतंस ॥ १० ॥

तें स्नेहस्निग्ध भाषण ऐकून मुनि वसिष्ठ रघुवराचें अभिनंदन करून म्हणाले, हे हंसवंशावतंसा! रामा! तुम्ही हें असें कसें न बोलाल!

चौ०—बरनि राम गुन सील सुभाऊ।
बोले प्रेम पुलकि मुनिराऊ।
भूप सजेउ अभिषेकसमाजू।
चाहत देन तुम्हहिँ जुबराजू।
राम करहु सब संजम आजू।
जौँ बिधि कुसल निबाहइ काजू।

रामचंद्राचे गुण, शील आणि स्वभाव यांचें वर्णन करून मुनिराय प्रेमपुलकित होत्साते म्हणालेः— " राजानें अभिषेकसमारंभ योजिला आहे. त्याची इच्छा तुम्हांला यौवराज्य द्यावें अशी आहे. रामा! विधाता जर कार्य निर्विघ्नपणें पार पाडणार असेल तर आज तुम्ही संयमानें रहावें. "

गुरु सिख देई राय पहिँ गयऊ।
राम हृदय अस बिसमय भयऊ।

इतकें सांगून गुरुराज राजाकडे गेले. इकडे रामाच्या अंतःकरणास विस्मय वाटला कीं—

जनमे एक संग सब भाई।
भोजन सयन केलि लरिकाई।
करनबेध उपबीत बियाहा।
संग संग सब भयउ उछाहा।
बिमलबंस यह अनुचित एकू।
बंधु बिहाइ बडेहिँ अभिषेकू।

आम्ही सर्वच भावंडें एकाचेच पोटीं जन्माला आलों. आमचें खाणें, निजणें, खेळणें वगैरे सर्व बाळपण एकमेकांच्या संगतींत गेलें. कर्णवेध, मौंजीबंधन, विवाह वगैरेदेखील प्रसंग सर्वांचे बरोबर झालेले. असें असूनहि आमच्या ह्या असल्या विमलवंशांत कनिष्ठास वगळून ज्येष्ठासच राज्याभिषेक व्हावयाचा हा तरी एक अप्रशस्तच प्रकार म्हणावयाचा.

प्रभु सप्रेम पछितानि सुहाई ।
हरउ भगतमन कै कुटिलाई ।

ह्या प्रेममूलक व समयोचित विमनस्कतेनें प्रभूंनीं भक्तांच्या मनांतील कौटिल्याचें परिमार्जन केलें.

**दो०–तेहि अवसर आये लषन मगन प्रेम आनंद । सनमाने प्रिय बचन कहि रघु-कुल-कैरव-चंद ॥ ११ ॥**

इतक्यांत प्रेमानंदांत मग्न होत्साता लक्ष्मण आला. त्यास रघुकुलकमलचंद्रानें प्रियवचन बोलून गौरविलें.

चौ०–बाजहिँ बाजन बिविधबिधाना ।
पुरप्रमोद नहिँ जाइ बखाना ।
भरतआगमनु सकल मनावहिँ ।
आवहिँ बेगि नयनफल पावहिँ ।

अनेक प्रकारचीं वाद्यें वाजूं लागलीं. शहरांत बेहद्द आनंद लोटला. भरताच्या आगमनाची सर्वच वाट पहात होते. त्यानें मागल्या पायींच येऊन आपल्या डोळ्यांचें पारणें फेडावें, हीच सर्वांची इच्छा होती.

हाट बाट घर गलीं अथाई ।
कहहि परसपर लोक लोगाई ।
कालि लगन भलि केतिक बारा ।
पूजिहि बिधि अभिलाषु हमारा ।
कनकसिँहासन सीयसमेता ।
बैठहिँ रामु होइ चित चेता ।

बाजारांत, रस्त्यांवर, घरोघरीं, आळीआळींत आणि आडरस्त्यांनीं बायकापुरुषांत ( पुढीलप्रमाणें ) गोष्टी होत असत. " उद्यांचा मुहूर्त ठरला हें ठीकच झालें, पण अद्याप किती तरी वेळ जायचा आहे ! परमेश्वरा ! आमची इच्छा पुरविशील ना ! सुवर्णसिंहासनावर जानकीसहवर्तमान राम जेव्हां आरूढ झालेले आम्ही पाहूं, तेव्हांच आमच्या जिवांत जीव येईल. "

सकल कहहिँ कब होइहि काली ।
बिघन मनावहिँ देव कुचाली ।

उद्यां केव्हां उजाडेल, हेच उद्गार सर्वांचे मुखांतून निघत होते. तिकडे कुलंगडेखोर देव विघ्न चिंतूं लागले.

तिन्हहि सुहाइ न अवध बधावा ।
चोरहिँ चंदिनि राति न भावा ।
सारद बोलि बिनय सुर करहीँ ।
बारहि बार पाँय लै परहीँ ।

त्यांना अयोध्येंतला समारंभ गोड लागेना, कारण चोराला चांदणीरात्र खपत नाहीं. सरस्वतीचें आवाहन करून आणि तिच्या पायीं वरचेवर लोटांगण घालून देव काकुळतीनें तीस म्हणूं लागले—

**दो०–बिपति हमारि बिलोकि बडि मातु करिय सोइ आजु । रामु जाहिँ बन राजु तजि होइ सकल सुरकाजु ॥ १२ ॥**

" माते, आमची ही भयंकर दैना लक्षांत घेऊन जेणेंकरून रामचंद्र राज्यत्याग करून वनास जातील, आणि आम्हां देवांचें कार्य तडीस जाईल, तेंच प्रस्तुत प्रसंगीं त्वां घडवून आणलें पाहिजे. "

चौ०–सुनि सुरबिनय ठाढि पछिताती ।
भइउँ सरोजबिपिन हिमराती ।

देवांची ती काकुळत ऐकून ' कमलवनावर हिमस्राव करणारी रात्र मला हे उपटसुंभ देव बनविणार ' या विचारांत पश्चात्तापानें हळहळत ती अगदीं तटस्थ झाली.

देखि देव पुनि कहहिँ निहोरी ।
मातु तोहि नहिँ थोरिउ खोरी ।
बिसमय-हरष-रहित रघुराऊ ।
तुम्ह जानहु सब रामप्रभाऊ ।
जीव करमबस सुख-दुख-भागी ।
जाइय अवध देवहित लागी ।

तिजकडे पाहून देव तिची पुनः प्रार्थना करून म्हणालेः " माते, तुजकडे अणुमात्रदेखील दोष येत नाहीं. रघुराज हर्षविषादरहित आहेत. तूंहि रामाचा प्रभाव पूर्ण ओळखून आहेस. कर्मानुबंधानें जीव सुखदुःखांचा विभागी होतच असतो. देवांवर उपकार करण्यास्तव त्वां अयोध्येंत गेलेंच पाहिजे. "

बारबार गहि चरन सँकोची ।
चली बिचारि बिबुधमति पोची ।
ऊँच निवासु नीचि करतूती ।
देखि न सकहिँ पराइ बिभूती ।
आगिल काजु बिचारि बहोरी ।
करिहहिँ चाह कुसल कबि मोरी ।

देवांनीं वारंवार तिचे पाय धरल्याकारणानें तीस संकोच वाटून, ती निघाली, आणि विचार करून म्हणाली कीं, ह्या देवांची बुद्धि पिचलेली आहे. ह्यांचा अधिकार फक्त उच्च, कृति मात्र नीचच.

दुसऱ्याचें ऐश्वर्य हे देखूं शकत नाहींत. तथापि भावी कार्यावर लक्ष देऊन, महाकवि माझें अभिनंदनच करितील.

हरषि हृदय दसरथपुर आई।
जनु ग्रहदसा दुसह दुखदाई।

हर्षित अन्तःकरणानें ती अयोध्येस आली. तिच्या आगमनानें अयोध्येला दुःसह पीडा करणारी संक्रांतच भोंवली म्हणावयाची!

दो०—नामु मंथरा मंदमति चेरी कैकइ केरि। अजस पेटारी ताहि करि गई गिरा मति फेरि॥ १३॥

कैकेयीची मंथरा नांवाची एक महाखऱ्याळ दासी होती. तिच्या बुद्धीस भ्रंश करून व तिला अपयशाचा खटारा बनवून सरस्वती चालती झाली.

चौ०—दीख मंथरा नगरुबनावा।
मंजुल मंगल बाज बधावा।
पूछेसि लोगन्ह काह उछाहू।
रामतिलकु सुनि भा उरदाहू।

नगरांतील थाटमाट आणि मंजुळ मंगलवाद्यांची गडबज पाहून मंथरेनें लोकांजवळ, हा समारंभ कसला म्हणून विचारपूस केली. रामास अभिषेक होणार, इतकीं अक्षरें तिच्या कानीं पडतांच तिच्या पोटांत कडकडून कळ उठली.

करइ बिचारु कुबुद्धि कुजाती।
होइ अकाजु कवनि बिधि राती।
देखि लागि मधु कुटिल किराती।
जिमि गवँ तकइ लेउँ केहि भाँती।

मधाची पोळी पाहतांच ती कोणत्या युक्तीनें हस्तगत करावी, म्हणून एखादी खुनशी पारधीण जशी तिजकडेच टक लावून पाहात राहते, तशीच जातीनें आणि मनानें हिनकट असलेली मंथरा आज रातोरात कोणता पेंच लढवून हें काम हाणून पाडतां येईल म्हणून विचार करूं लागली.

भरतमातु पहिँ गइ बिलखानी।
का अनमनि हसि कह हँसि रानी।
उतरु देइ नहिँ लेइ उसासू।
नारिचरित करि ढारइ आसू।

ती उदास होऊन कैकयीकडे गेली. तेव्हां, काय गे, अशी आज उदासशी कां? म्हणून राणीनें हंसत हंसत तिला विचारिलें; पण ती जाबच देईना. मात्र बायकांच्या लाघवीपणाला अनुसरून सुस्कारे टाकीत टाकीत ती डोळ्यांतून टिपें गाळूं लागली.

हँसि कह रानि गाल बड तोरे।
दीन्ह लषन सिख अस मन मोरे।
तबहुँ न बोल चेरि बडि पापिनि।
छाडइ स्वास कारि जनु साँपिनि।

राणी हंसतच म्हणाली, तुझी जिभली लघळ, लक्ष्मणानें ती रंगविली असेल? तरीदेखील ती महा खष्टनष्ट बटीक हूं कीं चूं करीना. काळ्या नागिणीप्रमाणें ती सुस्कारे मात्र टाकीत होती.

दो०—सभय रानि कह कहसि किन कुसल रामु महिपालु। लषनु भरतु रिपुदमनु सुनि भा कुबरी उर सालु॥ १४॥

कैकेयी एकाएकीं दचकून म्हणाली, 'बोलत ग कां नाहींस? महाराज, राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न वगैरे खुशाल आहेतना?' हीं नांवें ऐकतांक्षणींच मंथरेच्या पोटांत तिडीक उठली.

चौ०—कत सिख देइ हमहिँ कोउ माई।
गालु करब केहि कर बलु पाई।
रामहिँ छाडि कुसल केहि आजू।
जिनहिँ जनेसु देइ जुबराजू।
भयउ कौसिलहि बिधि अतिदाहिन।
देखत गरब रहत उर नाहिँन।
देखहु कस न जाइ सब सोभा।
जो अवलोकि मोर मनु छोभा।

ती म्हणाली, "आईसाहेब, कोणीही झाला तरी आम्हांला काय म्हणून रंगविणार? जिभलीचा लघळपणा कोणाचें बळ उसनें आणून कां चालत असतो? ज्याला राजेसाहेब स्वतःच युवराजा बनवणार आहेत, त्या रामाखेरीज आज कुशल तरी कोणाचें असणार? कौसल्येचें नशीब तर आज यथास्थित फळफळलें आहे. तिला पाहून मनांत घमेंड मुळीं उरावयासच नको. जी मौज पाहून माझें मन इतकें क्षुब्ध झालें, ती मौज आपण जाऊन अद्याप कशी पाहिली नाहीं?

पूतु बिदेस न सोचु तुह्मारे।
जानति हहु बस नाहु हमारे।
नीँद बहुत प्रिय सेज तुराई।
लखहु न भूप कपट चतुराई।

पोटचें पोर देशोधडीस लागलें, याची आपणांला मुळीं खंतच नाहीं ! कारण महाराज, आपल्या अगदीं मुठींत आहेत, अशी आपली खात्री झालेली आहे. गाद्या, गिरद्या आणि यथेष्ट झोंप ह्यांतच आपण चूर आहांत. सरकारस्वारींचें कृष्ण कारस्थान आपल्या गांवींहि नाहीं ! ''

सुनि प्रिय बचन मलिनमनु जानी ।
झुकी रानि अब रहु अरगानी ।
पुनि अस अबहुँ कहसि घरफोरी ।
तब धरि जीभ कढावउँ तोरी ।

मंथरेची ती लघळ भाषा ऐकून, राणीनें तिच्या पोटांतलें पाप ताडलें आणि ती तिजवर कोसळून म्हणाली " आतां अगदीं गप कशी घरभेदे ! फिरून कधीं असें बकलीस तर ही तुझी जीभलीच धरून उपटवीन.

दो०–काने खोरे कूबरे कुटिल कुचाली जानि । तिय बिसेषि पुनि चेरि कहि भरतमातु मुसुकानि ॥ १५ ॥

तिरवे, लंगडे, कुबडे वगैरे लोक पक्के गाटेंगीळ व कुचर असतात, हें मी अगदीं ओळखून आहे. विशेषेंकरून बायका आणि त्यांतल्यात्यांतहि तुझ्या-सारख्या बटकी–'' इतकें बोलून कैकेयी हंसू लागली.

चौ०–प्रियबादिनि सिख दीन्हिउँ तोही ।
सपनेहु तो पर कोपु न मोही ।
सुदिनु सु-मंगल-दायकु सोई ।
तोर कहा फुर जेहि दिन होई ।
जेठ स्वामि सेवक लघु भाई ।
यह दिन-कर-कुल-रीति सुहाई ।
रामतिलकु जौं साचेहु काली ।
देउँ मागु मनभावत आली ।

( कैकेयी पुढें म्हणाली ) " तूं नेहमींच गोड बोलणारी आहेस, मीं उगीच तुला ही जरब दिली. स्वप्नांत देखील मी तुझ्यावर रागवणारी नाहीं. ज्या दिवशीं तुझे बोल खरे ठरतील, तोच मला खऱ्या खऱ्या सुखाची जोड करून देणारा सुदिन. वडील बंधु, स्वामी, आणि धाकटे बंधु त्याचे सेवक, ही तर आमच्या सूर्यकुलाची पूर्वापार चालच आहे. आणि तीच रास्त आहे. खरोखरच रामाला जर उद्यांच अभिषेक व्हावयाचा असेल तर बोल, तुझे सर्व कोड मी पुरवितें.

कौसल्यासम सब महतारी ।
रामहि सहज सुभाय पियारी ।
मो पर करहिँ सनेहु बिसेखी ।
मैं करि प्रीति परीछा देखी ।
जौं बिधि जनमु देइ करि छोहू ।
होहिँ रामसिय पूतपतोहू ।
प्रान तें अधिक रामु प्रिय मोरे ।
तिन्ह के तिलक छोभु कस तोरे ।

रामास अवघ्याच माता कौसल्येप्रमाणें साहजिक आणि स्वाभाविकपणेंच लोभस वाटतात. मजवर तर तो विशेषच प्रेम करितो. त्याचें प्रेम मीं अजमावूनहि पाहिलें आहे. देवाच्या मनांत जर ( मला पुन्हां ) जन्मासच घालावयाचें असेल, तर त्यानें दया करून राम आणि सीता हींच मूल आणि सून द्यावींत. राम तर मला माझ्या प्राणापरीस देखील अधिक गोड वाटतो. त्याच्या अभिषेकामुळें तुला ग चीड काय म्हणून ?

दो०–भरतसपथ तोहि सत्य कहु परिहरि कपट दुराउ । हरष समय बिसमय करसि कारन मोहि सुनाउ ॥ १६ ॥

तुला भरताचीच शपथ आहे, खरें सांग. पांच-पेंच किंवा लपंडाव सोडून दे. ह्या अशा आनंदाच्या प्रसंगीं तूं जी ही खंत मानीत आहेस, ह्यांतलें बिंग मला तूं सांगितलेंच पाहिजे. ''

चौ०–एकहि बार आस सब पूजी ।
अब कछु कहब जीभ करि दूजी ।
फोरइ जोग कपारु अभागा ।
भलेउ कहत दुख रउरेहि लागा ।

मंथरा म्हणाली, " प्रथमच बोलून सर्व आशा फळली, ह्याउपर नुसता ब्र काढावयाचा, म्हणजे दुसरीच जीभ लाविली पाहिजे. हें माझें टाळकें फोड-ण्याच्याच लायकीचें आहे. बऱ्याचें बोलावें तेंदेखील यजमानणीस खुपूं लागतें !

कहहिँ झूठि फुरि बात बनाई ।
ते प्रिय तुम्हहि करुइ मैं माई ।
हमहुँ कहब अब ठकुरसोहाती ।
नाहिँ त मौन रहब दिनराती ।
करि कुरूप बिधि परबस कीन्हा ।
बवा सो लुनिय लहिय जो दीन्हा ।

आईसाहेब, ! खरें काय आणि खोटें काय खुष मस्करे तेवढे आपणांला गोड वाटतात, आणि मी मात्र कडू वाटतें. ह्याउपर मीदेखील 'जी हुजूर'च करीत जाईन, नाहीतर दिवस-रात्र जीभ तरी गिळून बसेन. देवानेंच मला कुरूप करून गुलामगिरींत लोटिलें आहे. पेरावें तेंच कापावें आणि द्यावें तेंच घ्यावें.

कोउ नृप होउ हमहिँ का हानी ।
चेरि छाँडि अब होब कि रानी ।
जारइ जोगु सुभाउ हमारा ।
अनभल देखि न जाइ तुह्मारा ।
ता तेँ कछुक बात अनुसारी ।
छमिय देवि बडि चूक हमारी ।

कोणी का राजा होईना, मला त्यांत कोणता घाटा? बटीकपणास मुकून मी आतां काय राणी व्हावयाची आहे! जळला मेला माझा स्वभाव. मला आपलें उणें बघवत नाहीं. ह्मणूनच गोष्टीवरून गोष्ट निघून गेली. सरकार! क्षमा असावी. मजकडून जबर कसूर घडला."

**दो०—गूढ-कपट-प्रिय-बचन सुनि तीय अधरबुधि रानि । सुरमाया बस बैरिनिहि सुहृद जानि पतियानि ॥ १७ ॥**

मंथरेचें तें आंतल्या गांठीचें लाघवी बोलणें ऐकून स्त्रीचीच जात अर्थात् चंचळ बुद्धीची ती कैकयी, देवमायेनें पछाडलेल्या आपल्या वैरिणीवर आपल्या खऱ्या कळकळीची समजून हुरळून गेली.

चौ०—सादर पुनि पुनि पूछति ओही ।
सबरीगान मृगी जनु मोही ।
तसि मति फिरी अहइ जसि भाबी ।
रहसी चेरि घात जनु फाबी ।

पारधीणीच्या पुंगीवर जशी हरिणी लुब्ध होते तशी कैकेयी तिजवर माळली आणि तिची मनधरणी करून तीस खोदखोदून विचारूं लागली. भवितव्यतेस अनुसरून तिची बुद्धि मारली गेली; त्यामुळें निवांतपणीं तिजवर घाला घालण्यास त्या बटकीस फावलें.

तुह्म पूछहु मैँ कहत डेराऊँ ।
धरेउ मोर घरफोरी नाऊँ ।
सजि प्रतीति बहुबिधि गढि छोली ।
अवध साढसाती तब बोली ।

(मंथरा ह्मणाली) "आपण विचारतां, परंतु मला तर बोलण्याचाहि अंदेशाच वाटतो, कारण आपण माझें नांवच मुळीं घरभेदी ठेविलें आहे." अशा प्रकारें नीटनेटक्या थापेबाजीचें छत उभारून कैकेयीचें मन काबिज केल्यानंतर अयोध्येच्या या साडेसातीचें तोंड उमललें.

प्रिय सियरामु कहा तुह्म रानी ।
रामहिँ तुह्म प्रिय सो फुरि बानी ।
रहा प्रथम अब ते दिन बीते ।
समउ फिरे रिपु होहिँ पिरीते ।

"राम व सीता आपणांस प्रिय आहेत आणि रामास आपण प्रिय आहां हें जें आपण बोललां तें अगदीं नीटच. पण ती जुनी गोष्ट झाली. तो मनु आतां पालटला. काळ फिरला कीं चाहणारेच बोकांडीस बसतात.

भानु कमल-कुल-पोषनि-हारा ।
बिनु जर जारि करइ सोइ छारा ।
जर तुह्मारि चह सवति उखारी ।
रूँधहु करि उपाउ बरबारी ।

सूर्य कमळांचा पोशिंदा खराच पण तोदेखील पाणी आटलें असतां कमळांना जाळून खाक करितो. आपली सवतच आपलीं पाळेंमुळें खणून काढण्याच्या विचारांत आहे. आपण आपल्या शोकाच्या वाढीस तजविजींनें कुंपण घातलेंच पाहिजे.

**दो०—तुम्हहिँ न सोचु सोहाग बल निजबस जानहु राउ । मन मलीन मुहु मीठ नृपु राउर सरलसुभाउ ॥ १८ ॥**

आपण आपल्या सौभाग्याच्या जोरावर बेफिकीर आहांत. सरकारस्वारी आपल्या काखोटींत आहे अशी आपली पूर्ण खात्री आहे. परंतु सरकार तोंडाचे जितके मिठ्ठे आहेत तितकेच मनाचे काळेकुट्ट आहेत, आपण मात्र स्वभावानें मूळच्याच भाबड्या आहांत.

चौ०--चतुर गँभीर राममहतारी ।
बीचु पाइ निजबात सवाँरी ।
पठये भरतु भूप ननिअउरे ।
राम-मातु-मत जानब रउरे ।

रामाची आई हाडाची मुत्सद्दी. तिनें वेळ साधून आपली डाळ शिजविली. राजानें भरतास आजोळीं

घाडलें, पण आपणांस खात्री असूं द्या कीं ह्यांतहि रामाच्याच आईची मुख्य मख्ली आहे.

सेवहिँ सकल सवति मोहि नीके ।
गरबित भरतमातु बल पी के ।
सालु तुह्मार कौसिलहि माई ।
कपट चतुर नहिँ होइ जनाई ।

तिला वाटतें कीं, अवघ्या सवती माझी पूर्ण बरदास्त ठेवितात, परंतु भरताचीच आई कायती यजमानांच्या बळावर अरेरावीनें वागते. आपल्याबद्दल कौसल्येच्या हृदयांतलें शल्य तें हेंच. पण ती अस्सल चांई असल्याकारणानें तिचें उमगून पडत नाहीं.

राजहि तुह्म पर प्रेमु बिसेखी ।
सवति सुभाउ सकइ नहिँ देखी ।
रचि प्रपंचु भूपहिँ अपनाई ।
राम-तिलक-हित लगन धराई ।

सरकारची मर्जी आपणांवर विशेष बहाल. सवतीमत्सरामुळें कौसल्येला तें बघवत नाहीं. म्हणून खूप मिन्नतवारीनें राजाला आपलासा करून घेऊन तिनें त्याजकरवीं रामाच्या अभिषेकासाठीं मुहूर्त धरविण्याचा हा घाट घातला आहे.

यह कुल उचित राम कहुँ टीका ।
सबहि सुहाइ मोहि सुठि नीका ।
आगिल बात समुझि डर मोही ।
देउ दैव फिरि सो फलु ओही ।

रामास राज्य मिळणें हेंच ह्या कुलपरंपरेला उचित आहे. अवघ्यांनाच त्यांत खुषी असून मला तर तेंच जास्त पसंत आहे. परंतु काळ सोकावणार हें ध्यानांत येतांच मनांत अगदीं चर्र होतें. बा नाशिबा! ते परिणाम तूं तिचे तिलाच भोवूं दे."

**दो०—रचि पचि कोटिक कुटिलपन कीन्हेसि कपटप्रबोधु ॥ कहेसि कथा सत सवति कै जेहि बिधि बाढ बिरोधु ॥ १९ ॥**

तिनें छक्केपंजे लढवून आपल्या गिरधानपणानें शेंकडों कागाळ्यांचें इतकें आटोकाट जाळें विणलें कीं सवतीसंबंधाच्या तेढ आणि लाताडींचा कढ कधीं जिरावयासच नको असा पक्का किंतु कैकेयीच्या मनांत तिनें भरून दिला.

**चौ०—भाबीबस प्रतीति उर आई ।**
**पूछु रानि पुनि सपथ देवाई ।**

भावीवशतेमुळें कैकेयीच्या मनांत तें जमलें व ती तीस फिरून फिरून आणाशपथा घालून विचारूं लागली.

का पूछहु तुह्म अबहु न जाना ।
निज हित अनहित पसु पहिचाना ।
भयउ पाखु दिन सजत समाजू ।
तुह्म पाई सुधि मोहि सन आजू ।

(तेव्हां मंथरा म्हणाली) "विचारतां तरी काय? आपणास अजूनदेखील गंधवार्ता नाहीं? जनावरांनादेखील आपलें बरेंवाईट उमगतें. एक पंधरवडा झाला सारखी तयारी चालली आहे आणि आपणांस मात्र आज हा मजकडून त्याचा छडा लागत आहे!

खाइय पहिरिय राज तुह्मारे ।
सत्य कहे नहिँ दोषु हमारे ।
जौँ असत्य कछु कहब बनाई ।
तो बिधि देइहि हमहिँ सजाई ।

ख्यालीखुशाली भोगून घ्या. आज राज्य तुमचें आहे. खरेंखुरें बोलल्यासच मी पापांतून मोकळी होईन. जर खोट्याच कांहीं तरी थापा मी मारीत असेन तर देव मला अलबत सजा करील.

रामहिँ तिलक कालि जौँ भयऊ ।
तुह्म कहुँ बिपति बीजु बिधि बयऊ ।
रेख खँचाइ कहउँ बल भाखी ।
भामिनि भइहु दूध कइ माखी ।
जौँ सुतसहित करहु सेवकाई ।
तौ घर रहहु न आन उपाई ।

जर रामाला उदयिक राज्याभिषेक झाला तर खास समजा कीं तुमच्यासाठीं हालअपेष्टांचें बीज तुमच्या नशीबानेंच पेरलें. मी प्रतिज्ञेनें रेघ ओढून (लेखी) सांगतें कीं दुधावरच्या माशीची गति तुमची होणार, आणि पोटच्या गोळ्यासुद्धां जर सवतीची गुलामगिरी पत्कराल तरच घरांत तुमचा निभाव लागणार. एरव्हीं गत्यंतरच नाहीं.

**दो०—कद्रू बिनतहि दीन्ह दुख तुम्हहिँ कौसिला देब। भरतु बंदि गृह सेइहहिँ लषनु रामके नेब ॥ २० ॥**

कद्रूनें विनतेस छळछळून सोडिलें, तीच गत तुमची कौसल्या करणार, भरताला कारागृहांत पचावें लागणार आणि लक्ष्मण व रामाची अमनचैन ( बोलबाला ) उडणार,

चौ०—कैकयसुता सुनत कटुबानी।
कहि न सकइ कछु सहमि सुखानी।
तन पसेउ कदली जिमि काँपी।
कुबरी दसन जीभ तब चाँपी।

तिची ती तल्लख वाणी ऐकून कैकेयी सुकूनच गेली आणि तिचा खरकन् चेहराच उतरला. तिच्यानें बोलवेना. केळीप्रमाणें तीस कांपरें भरलें आणि तिचें शरीर घामाघूम झालें. तेव्हां मात्र त्या कुब्जेनें दातानें जीभ चावली.

कहि कहि कोटिक कपटकहानी।
धीरजु धरहु प्रबोधेसि रानी।
कीन्हेसि कठिन पढाइ कुपाठू।
जिमि न नवइ फिरि उकठ कुकाठू।

आणखीही तिनें शेंकडों बदबोहाऱ्यांची भर घालून शेवटीं ' धैर्य धर ' ह्मणून राणीची समजूत घातली; आणि तीस उलटे मंत्र भरवून अशी निगरगट्ट करून सोडली कीं, वाळून कडक झालेल्या काष्ठाप्रमाणें ती फिरून वळेचना.

फिरा करमु प्रिय लागि कुचाली।
बकिहि सराहइ मानि मराली।

१ कद्रू आणि विनता ह्या दोघी सवतीसवती कश्यपाच्या स्त्रिया होत्या. कद्रूचे पुत्र सर्प असून विनतेचा पुत्र गरुड होता. गरुडाचा प्रभाव पाहून कद्रूस चिंता उत्पन्न झाली कीं, हा आपल्या पुत्रांचा फडशा पाडणार, म्हणून तिनें कपट करून विनतेस पणांत गोंविलें. दोघींत अशी पैज लागली कीं, सूर्याच्या रथाच्या अश्वांच्या शेंपट्या जर काळ्या असल्या तर विनतेनें मुलांसकट कद्रूचें दास्य करावें आणि पांढऱ्या असल्या तर कद्रूनें विनतेचें मुलांसकट दास्य करावें. अश्वांच्या शेपट्या पांढऱ्या आहेत हें कद्रू जाणीत होती तथापि पुत्रांच्या भरंवशावर तिनें पण लाविला. सर्प जाऊन शेपट्यांना चिकटले व त्या काळ्याभोर दिसूं लागल्या. अर्थात् कद्रूनें पण जिंकला आणि विनतेला तिचें दास्य करावें लागलें. हें घडलें तेव्हां गरुड गर्भांतच होता. तो जन्मल्यानंतर त्याला मातेचे हाल पाहून फार वाईट वाटलें. पुढें त्यानें सर्पांना अमृत आणून दिलें आणि उभयतांची सुटका करून घेतली.

तिचें कर्मच फुटलें ह्मणून तर तीस ती अवदसा सुचली. हंसीनें बकीची तारीफ करण्याप्रमाणें पुढें ती तिचे गोडवे गाऊं लागली.

सुनु मंथरा बात फुरि तोरी।
दहिनि आँखि नित फरकइ मोरी।
दिन प्रति देखहुँ राति कुसपने।
कहउँ न तोहि मोहबस अपने।
काह करउँ सखि सूध सुभाऊ।
दाहिन बाम न जानउँ काऊ।

( कैकेयी म्हणाली ) मंथरे ! ऐक. तुझेंच ह्मणणें खरें. माझा उजवा डोळा आज एकसारखा लवत आहे. मी रोज रात्रीं वेडींविद्रीं स्वप्नेंही पण पहात आहे. तरी मीं तुजजवळ आपल्याच वेडेपणामुळें कांहींही बोललें नाहीं. गडे ! काय गे करूं ? स्वभावानें मी मेली अगदींच गचाळ ! मला भलेंबुरें कांहींच उमजत नाहीं.

दो०—अपने चलत न आजु लगि अनभल काहु क कीन्ह। केहि अघ एकहि बार मोहि दैव दुसह दुख दीन्ह ॥ २१ ॥

मीं आजतागाईत आपल्या राजवटींत कोणाहीवर आग पाखडली नाहीं. अरेरे दैवा ! माझ्या कोणत्या पापास्तव मजवर असले हे दुर्धर भोगवटे गुदरविलेस बरें ?

चौ०—नैहर जनमु भरब बरु जाई।
जियत न करब सवति सेवकाई।
अरिबस दैव जियावत जाही।
मरनु नीक तेहि जीव न चाही।

यापेक्षां माहेरींच जाऊन मी आपला अख्खा जन्म तेथें घालवीन, परंतु जीवांत जीव आहे तोंपर्यंत निदान सवतीचे पाय चाटणार नाहीं. दुर्दैवानें शत्रूच्या तावडींत आयुष्य कंठण्याचा प्रसंग ज्याचेवर येतो त्यानें बेहत्तर मरावें, परंतु जगण्याची चाड वाहूं नये.

दीनबचन कह बहुबिधि रानी।
सुनि कुबरी तियमाया ठानी।

अशा रीतीनें नाहीं नाहीं तें कैकेयी केविलवाणें बोलूं लागली. तें ऐकून त्या कुब्जेनें स्त्रीसुलभ लाघवीपणाची साखर पुन्हां पेरली.

अस कस कहहु मानि मन ऊना ।
सुख सोहागु तुम्ह कहँ दिन दूना ।
जेइ राउर अतिअनभल ताका ।
सोइ पाइहि यह फलु परिपाका ।

( ती म्हणाली ) " कोतें मन करून आपण असें कसें बोलतां ? आपले तर सुखसोहाळे दिनोदिन दुणावतच राहणार. सरकार ! आपल्या नुकसानीवर जो कोणी टपला असेल त्याच्याच वर त्यांचा बार उलटविला जाईल.

जब तेँ कुमत सुना मैँ स्वामिनि ।
भूख न बासर नींद न जामिनि ।
पूछेउँ गुनिन्ह रेख तिन्ह खाँची ।
भरत भुआल होहिँ यह साँची ।
भामिनि करहु त कहउँ उपाऊ ।
हैँ तुम्हरी सेवावस राऊ ।

धनीसाहेब ! हीं खलबतें ऐकल्यापासून माझी तर दिवसा भूक नाहीं आणि रात्रीं झोंप नाहीं अशी अवस्था झाली आहे. ज्योतिष्यांना विचारलें तर त्यांनीं स्वाक्षरीं सांगितलें कीं भरत राजा होणार हेंच खास ! राणीसाहेब ! कराल तर एक डाव सुचवितें. सरकारस्वारी आपल्याच सेवेवर निरंतर खूष बहाल असते.

**दो०—परउँ कूप तव बचन पर सकउँ पूत पति त्यागि । कहसि मोर दुख देखि बड कस न करब हित लागि ॥ २२ ॥**

( कैकेयी म्हणाली ) तुझ्या एका शब्दावर मी विहीर देखील साजरी करीन, अगर मुलामालकांचा देखील अव्हेर करीन. माझ्या ह्या भयंकर दुःखानें कळंजून जर तूं एखादी छटा माझ्याच सुखासाठीं सुचविलीस तर ती मी कशी बरें झुगारीन ? "

चौ०—कुबरी करि कबूलि कैकेई ।
कपटछुरी उरपाहन टेई ।
लखइ न रानि निकट दुख कैसे ।
चरइ हरित त्रिन बलिपसु जैसे ।
सुनत बात मृदु अंत कठोरी ।
देति मनहुँ मधु माहुर घोरी ।

मंथरेनें कैकेयीची कबूली घेतली, व अशा रीतीनें तिला आपली कपटाची सुरी कैकेयीच्या हृदयरूप सहाणेवर परजण्यास फावलें. यज्ञपशु जसा कोंवळ्या गवतावर बेधडक चरतो त्याप्रमाणें अगदीं अंगास भिडलेलें संकटदेखील कैकेयीच्या ध्यानांत येईना. ती ऐकत असलेल्या गुळचट पण शोकपर्यवसायी गोष्टी म्हणजे मधांत घोळून दिलेलें विषाचें सरबतच होतें.

कहइ चेरि सुधि अहइ कि नाहीँ ।
स्वामिनि कहिहु कथा मोहि पाहीँ ।
दुइ बरदान भूप सन थाती ।
माँगहु आजु जुडावहु छाती ।
सुतहि राजु रामहिँ बनबासू ।
देहु लेहु सब सवतिहुलासू ।

कुब्जा म्हणाली, " राणीसाहेब ! आठवण आहे कीं नाहीं ? आपणच मजजवळ ती हकीकत सांगितली होती. सरकारस्वारींनीं आपणास दोन वर देऊं केले आहेत व ते ठेव म्हणून त्यांचेजवळ आहेत. त्यांची मागणी करा व आजच्या आजच छाती गार करून घ्या. भरतास अभिषेक आणि रामास वनवास मागून घ्या, आणि सवतीचा अवघाच दिमाख उतरवा.

भूपति रामसपथ जब करई ।
तब माँगेहु जेहि बचनु न टरई ।
होइ अकाजु आजु निसि बीते ।
बचनु मोर प्रिय मानेहु जी ते ।

मात्र स्वारी जेव्हां रामाची शपथ घेईल तेंव्हांच मागणी घाला, म्हणजे दिलेलें वचन टाळणें शक्य होणार नाहीं. आजची रात्र संपली कीं,त्यांच्या कामाचा खेळखंडोबा झालाच समजा. मात्र हे माझे शब्द जीवाच्याहि पलीकडे राखून ठेवा.

**दो०—बड कुघातु करि पातकिनि कहेसि कोपगृह जाहु । काजु सवाँरेहु सजग सब सहसा जनि पतियाहु ॥ २३ ॥**

कोपगृहांत (अंधारकोठडींत) जाऊन पडा, काम फार शिताफीनें फत्ते केलें पाहिजे. सहसा कह्यांत जाऊं नका. इत्यादि प्रकारानें शिकवून तर त्या मांगिणीनें आपल्या मांगपणाची अगदीं कमाल केली.

चौ०—कुबरिहि रानि प्रानप्रिय जानी ।
बार बार बडि बुद्धि बखानी ।
तोहि सम हितु न मोर संसारा ।
बहे जात कर भइसि अधारा ।
जौँ बिधि पुरब मनोरथु काली ।
करउँ तोहि चषपूतरि आली ।

त्या कुब्जेस केवळ प्राणप्रिय समजून तिच्या अचाट कल्पकपणाचे कैकेयी एकसारखे पोवाडे गाऊं लागली, व म्हणाली—"ह्या जगांत तरी निदान तुझ्याइतकी माझी हितू कोणीच नाहीं. मी वाहवलें असतांना मला तूंच थारा दिलास. उदयिक सुदैवानें जर माझे हेतू तडीस गेले तर, गडे! मी तुला माझ्या बुबुळांतली बाहुली करून ठेवीन."

बहुबिधि चेरिहि आदरु देई।
कोपभवन गवनी कैकेई।

त्या बटकीचा नानाप्रकारें आदर करून कैकेयी कोपगृहांत शिरली.

बिपति बीजु बरषारितु चेरी।
भुइँ भइ कुमति कैकई केरी।
पाइ कपटजलु अंकुर जामा।
बर दोउ दल दुखफल परिनामा।

विपत्तिरूप बीजास मंथरा ही वर्षाऋतूप्रमाणें झाली, आणि त्यास कैकेयीची कुबुद्धि हें एक शेत सांपडलें व कपटरूप जल मिळून त्यास अंकुर फुटला. दोन वर हेच त्या अंकुरास दोन डिरे फुटले आणि त्यांसच अखेर शोकपर्यवसायी फळें आलीं.

कोपसमाजु साजि सब सोई।
राजु करत निज कुमति बिगोई।

रागाची कडेकोट बतावणी करून कैकेयी निजली, म्हणजे राज्यावर चढलेली ती स्वतःच्या बेबुद्धीनेंच खाईत पडली.

राउनगर कोलाहलु होई।
यह कुचालि कछु जान न कोई।

अयोध्या अगदीं गजबजून राहिली होती. त्यामुळें ह्या कृष्णकारस्थानाचा मुळीं कोणास मागमूसदेखील लागला नव्हता.

**दो०—प्रमुदित पुर नरनारि सब सजहिँ सुमंगल चार। एक प्रबिसहिँ एक निर्गमहिँ भीर भूपदरबार॥ २४॥**

अयोध्येंतील सर्व स्त्रीपुरुष आनंदांत अगदीं रंगून गेले होते, राजाच्या परिचारकांनीं प्रसंगाची सर्व सिद्धता ठेविली होती. माणसांची सारखी आंतबाहेर चालली होती. मुख्य दरबारांत देखील चिकार गर्दी भरली होती.

चौ०—बालसखा सुनि हियँ हरषाहीं।
मिलि दस पाँच राम पहिँ जाहीं।
प्रभु आदरहिँ प्रेमु पहिचानी।
पूछहिँ कुसल षेम मृदुबानी।

राज्याभिषेकाची वार्ता ऐकून रामभद्राच्या बाळमित्रांच्या अंतःकरणांत आनंदाच्या उकळ्या फुटून ते दहादहा पांचपांच मिळून रामाच्या दर्शनास जाऊं लागले. त्यांचें प्रेम ओळखून रामानेंहि त्यांचा मान करावा आणि प्रेमानें त्यांचें कुशलक्षेम विचारावें.

फिरहिँ भवन प्रियआयसु पाई।
करत परसपर रामबडाई।
को रघुबीरसरिस संसारा।
सीलु सनेहु निबाहनिहारा।
जेहिं जेहिं जोनि करमबस भ्रमहीं।
तहँ तहँ ईसु देउ यह हमहीं।
सेवक हम स्वामी सियनाहू।
होउ नात यह ओर निबाहू।

आपल्या जिवलगाचा निरोप घेऊन घरीं परत आल्यावर ते परस्परांत रामाच्या थोरवीची वाखाणणी करीत ह्मणत:—रघुपुंगवासारखा सच्छील, प्रेमळ आणि खरा पाठीराखा ह्या दुनियेंत कोणी तरी आहे काय? आपापल्या संचितानुसार आम्ही ज्या ज्या योनींत फेऱ्या करीत राहूं तेथें तेथें परमेश्वरानें हेंच देणें द्यावें कीं, आह्मी सेवक आणि हा जानकीवल्लभ आमचा स्वामी ह्याच नात्यानें आमचा निर्वाह होत रहावा.

अस अभिलाषु नगर सब काहू।
कैकयसुता हृदय अतिदाहू।
को न कुसंगति पाइ नसाई।
रहइ न नीचमते चतुराई।

अवघ्या शहरांत देखील सर्वांची इच्छा तीच होती. फक्त कैकेयीचेंच काळीज कायतें भडक पेटलेलें होतें. बोहाऱ्या संगतीनें कोणाचें तळपट होणार नाहीं? हलकटांच्या सल्ल्यानें शहाणपणदेखील मातीमोल होणारच.

**दो०—साँझ समय सानंद नृप गयउ कैकई गेह। गवनु निठुरतानिकट किय जनु धरि देह सनेह॥ २५॥**

संध्याकाळची वेळ व आनंदी आनंद अशा

समयीं दशरथ कैकेयीच्या महालांत शिरला. मूर्तिमंत प्रेमानेंच शरीर धारण करून निष्ठुरतेच्या सन्निध गमन करावें अशांतलाच तो देखावा.

चौ०—कोपभवन सुनि सकुचेउ राऊ।
भयबस अगहुड परइ न पाऊ।

कोपगृहाचें नांव ऐकतांच दशरथाच्या उरांत करक भरली. भीतिवश त्याचें पाऊल पुढें पडेना.

सुरपति बसइ बाँहबल जाके।
नरपति सकल रहहिँ रुख ताके।
सो सुनि तियरिस गयउ सुखाई।
देखहु कामप्रताप बडाई।

इंद्रदेखील ज्याच्या मनगटाच्या जोरावर भिस्त घालून असे, सर्व राजे ज्याची मर्जी सारखी झेलीत असत, तो 'स्त्रीरोष' इतकें ऐकण्यासरशी अगदीं चिरमटून जावा ना! पहा तर! ही मदनप्रतापाची कमाल!

सूल कुलिस असि अँगवनिहारे।
ते रतिनाथ सुमनसर मारे।

खड्ग, त्रिशूल, वज्र हेदेखील ज्यांच्या अगदीं अंगवळणीस पडलेले त्यांनादेखील ह्या मदनाच्या पुष्पशरांनीं घायाळ करावें!

सभय नरेसु प्रिया पहिँ गयऊ।
देखि दसा दुख दारुन भयऊ।
भूमिसयन पट मोट पुराना।
दिये डारि तन भूषन नाना।
कुमतिहि कसि कुबेषता फाबी।
अन-अहिवातु-सूच जनु भावी।

राजा अगदीं भीतभीत तिजजवळ गेला. जाडें-भरडें कळकट जुनेरं नेसून व अंगावरील सर्व लेणें फेकून उघड्या जमिनीवरच लोळत पडलेल्या कैकेयीची ती अवकळा पहातांच त्याच्या पोटांत एकदम धस्स झालें! त्या दुष्टबुद्धि कैकेयीचें तें घाणेरडें सोंग म्हणजे पुढें वाढून ठेवलेल्या वैधव्याचें सूचकच म्हणावयाचें.

जाइ निकट नृप कह मृदुबानी।
प्रानप्रिया केहि हेतु रिसानी।

तिच्याजवळ जाऊन राजानें तिला सामोपचारानें विचारलें:—"हे प्राणप्रिये! ह्या रुसव्याचें काय बरें कारण?

छंद—केहि हेतु रानि रिसानि परसत पानि पतिहि निवारई। मानहुँ सरोष भुअंग-भामिनि बिषम भाँति निहारई॥ दोउ बासना रसना दसन बर मरम ठाहरु देखई। तुलसी नृपति भवितव्यता बस काम कौतुक लेखई॥ १॥

प्रिये! इतकें धुसमुसण्यासारखें झालें तरी काय? असें म्हणत राजानें तीस हात घालतांच तिनें त्यास झिडकारून लाविलें. खवळलेली नागीण जणुंकाय अगदीं टवकारून पहात आहे अशी ती दिसे. दोन इच्छा ह्याच तिच्या दोन जिभा होत्या, आणि दोन वर हेच तिचे दोन जहरीले दांत होते. तुलसी-दास म्हणतात:—ती राजाचें मर्मस्थान लक्षीत होती, आणि राजा भवितव्यतेच्या अंकित होऊन तिचें कामकौतुक बघत होता.

सो०—बार बार कह राउ सुमुखि सुलोचनि पिकबचनि। कारन मोहि सुनाउ गजगामिनि निजकोप कर॥ १॥

राजा म्हणाला, हे सुमुखि! सुलोचनि, कोकिल-स्वनि, हे गजगामिनि! तुझ्या रागाचें कारण तर मला कळूं दे, इत्यादि राजा तीस परोपरीनें आळवूं लागला.

चौ०—अनहित तोर प्रिया केइँ कीन्हा।
केहि दुइ सिर केहि जम चह लीन्हा।
कहु केहि रंकहि करउँ नरेसू।
कहु केहि नृपहि निकासउँ देसू।
सकउँ तोर अरि अमरउ मारी।
काह कीट बपुरे नरनारी।

"प्रिये! कोण बरें तुझ्याशीं वदेंळीवर आला? ज्यावर यमानें आपला शह बसविला असा दोन डोक्यांचा तो आहे तरी कोण? सांग कोणत्या रंकाला राजा बनवूं? बोल कोणत्या राजाला देशो-धडीस लावूं? तुझा वैरी, मग तो अमर जरी असला, तरीदेखील त्यास मारण्याची धमक मी बाळगतों, मग बापडीं हीं माणसें तीं काय? तीं तर किटकुलींच.

जानसि मोर सुभाउ बरोरू।
मन तव आनन चंद चकोरू।
प्रिया प्रान सुत सरबसु मोरे।

परिजन प्रजा सकल बस तोरे।
जौं कछु कहउँ कपट करि तोही।
भामिनि राम–सपथ–सत मोही।

हे वरोरु! माझा स्वभाव तुला कळलेलाच आहे. हें तुझें मुख म्हणजे माझ्या मनोरूप चकोराचा चंद्रच. माझे पुत्र, वित्त, परिजन,प्रजा हीं सर्व आणि माझे पंचप्राणदेखील तुला अर्पण आहेत. तुझ्याशीं जर मी कांहीं लबाडीनें बोलत असेन तर, हे विलासिनि! माझ्या रामभद्राचीच मला शतवार शपथ.

बिहँसि मागु मनभावति बाता।
भूषन सजहि मनोहर गाता।
घरी कुघरी समुझि जिय देखू।
बेगि प्रिया परिहरहि कुबेखू।

एकदां हंसतमुखानें तुझ्या मनाजोगी गोष्ट मागून घे आणि तुझें हें मनोहर शरीर अलंकारांनीं सजवून काढ. बऱ्या वाईट वेळेचा विचार तूं आपल्याच मनाशीं करून ह्या अंगावरील चिंध्याचिरगुटांना झटकन् रजा दे.”

**दो०–यह सुनि मन गुनि सपथ बडि बिहँसि उठी मतिमंद। भूषन सजति बिलोकि मृग मनहुँ किरातिनिफंद॥ २६॥**

हें ऐकून आणि राजाच्या मोठ्यांतमोठ्या शपथेचा विचार करून ती वेडीपीर हंसतच उठली, आणि हरिणास पाहून फांसे सावरणाऱ्या पारधिणी-प्रमाणें स्वतःस दागिन्यांनीं मढवूं लागली.

चौ०–पुनि कह राउ सुहृद जिय जानी।
प्रेम पुलकि मृदु मंजुल बानी।

तिचें अंतरंग निर्मळ आहेसें समजून राजा प्रेम-पुलकित होत्साता मृदु आणि मंजुळ शब्दांनीं फिरून तिच्या खुशामतीस लागला.

भामिनि भयउ तोर मनभावा।
घरघर नगर अनंदबधावा।
रामहिँ देउँ कालि जुबराजू।
सजहि सुलोचनि मंगलसाजू।

“भामिनि! झालेंना तुझ्या मनाजोगतें? शहरांत घरोघर आनंदाचे सोहळे चालू आहेत. उद्यां राम-भद्राला युवराज्य द्यावयाचें. सुंदरि! तूंहि त्या मंगल-समारंभाच्या तयारीला लाग.”

दलकि उठेउ सुनि हृदय कठोरू।
जनु छुइ गयउ पाक बरतोरू।

ऐसिउ पीर बिहँसि तेइ गोई।
चोरनारि जिमि प्रगटि न रोई।

हें ऐकतांच ती पाषाणहृदयी, पिकलेल्या गळूस धक्का लागल्याप्रमाणें, ताडकन् उसळली. एवढी तिडीक पण तिनें ती हंसावारी नेऊन दाबली. एखाद्या आंतल्या गांठीच्या बायकोप्रमाणें तिनें वरून हूं कीं चूं देखील केलें नाहीं.

लखी न भूप कपट चतुराई।
कोटि–कुटिल–मनि गुरू पढाई।
जद्यपि नीतिनिपुन नरनाहू।
नारिचरित जलनिधि अवगाहू।

कोटिपट कुटिलशिरोमणि गुरूची पट्टशिष्या ती. तिचें कपटपाटव राजाच्या लक्षांतच आलें नाहीं. राजा दशरथ जरी नीतिनिष्णात तरी स्त्रीचरित्र त्यास एक अगाध समुद्रच झाला.

कपटसनेह बढाइ बहोरी।
बोली बिहँसि नयन मुह मोरी।

नंतर लटकेंच प्रेम दाखवून आणि डोळे व तोंड मुरडून मुरकून ती हंसत हंसत ह्मणाली.

**दो०–माँगु माँगु पै कहहु पिय कबहुँ न देहु न लेहु। देन कहेहु बरदान दुइ तेउ पावत संदेहु॥ २७॥**

“ गडे! माग माग ह्मणून मात्र ह्मणावयाचें होतें, पण कधीं द्यायला नको आणि घ्यायला नको! नुसते मेले ते दोन वर कबूल केले होते तेदेखील मिळण्याची मारामार!”

चौ०–जानेउँ मरम राउ हँसि कहई।
तुम्हहि कोहाब परम प्रिय अहई।
थाती राखि न माँगेहु काऊ।
बिसरि गयउ मोहि भोर सुभाऊ।

ती खूण पटून राजा हंसतच ह्मणाला–“तुह्मांला रुसण्याफुगण्यांतच मोठी मौज वाटते. तूंच ते ठेव ह्मणून ठेविलेस आणि फिरून कधींकाळींहि मागणी केली नाहींस. मी मूळचाच विसराळू, विसरून गेलों!

झूठेहु हमहिँ दोस जनि देहू।
दुइ कै चारि माँगि किन लेहू।
रघु–कुल–रीति सदा चलि आई।
प्रान जाहु बरु बचनु न जाई।

आह्मांला नसता दोष देऊं नकोस. दोन वरांचे ऐवजीं चार कां मागून घेईनास. रघुकुलाची ही रीत सनातन चालत आली आहे कीं, प्राण गेले तरी बेहत्तर परंतु दिलेलें वचन मात्र फिरावयाचें नाहीं.

नहिँ असत्यसम पातकपुँजा ।
गिरिसम होहिँ कि कोटिक गुंजा ।
सत्यमूल सब सुकृत सुहाये ।
बेद पुरान बिदित मुनि गाये ।

असत्यासारखी पापांची पुंजीच नाहीं. कोट्यवधि गुंजांचा ढीग पर्वताएवढा होईल काय? वेदपुराणांचा आणि ऋषींचा निर्णय तरी हाच आहे कीं, एकंदर सुकृतांच्या मूळाशीं सत्य असेल तरच त्यांची शोभा आहे.

तेहि पर राम सपथ करि आई ।
सुकृत–सनेह–अवधि रघुराई ।

त्याउपर मीं रामाचीदेखील शपथ घेतली; आणि माझा रघुराय तर मला माझ्या पुण्याची आणि प्रेमाची सीमाच आहे. ”

बात दृढाइ कुमति हँसि बोली ।
कुमत–कुबिहँग–कुलह जनु खोली ।

राजास वचनांत पक्का गोवून घेतल्यावर ती खवटाळ भुरके मारीत बोलूं लागली. अशा रीतीनें तिनें आपल्या दुष्टहेतुरूप शिकारी पक्ष्याची (शिक्र्याची) जणुं काय आंखपट्टीच खोलली.

**दो०–भूप मनोरथ सुभगवन सुख सु-विहंग-समाजु । भिल्लिनि जिमि छाडन चहति वचन भयंकर बाजु ॥ २८ ॥**

राजाच्या मनोरथरूप रमणीय वनांत संचार करणाऱ्या सुखरूप सुंदर पक्ष्यांच्या समुदायावर कैकेयी जणुं काय किरातिणीच्या रूपानें आपलें क्रूर वचनरूप श्येनपक्षी सोडण्याची इच्छा करूं लागली.

चौ०–सुनहुँ प्रानप्रिय भावत जी का ।
देहु एक बर भरतहि टीका ।
मागउँ दूसर बर करजोरी ।
पुरवहु नाथ मनोरथ मोरी ।
तापसवेष बिसेषि उदासी ।
चौदह बरिस राम बनबासी ।

( कैकेयी म्हणाली ) प्राणप्रिया ! माझ्या अगदीं मनांतून मला जें पाहिजे तें ऐकावें. एका वरानें भरतास राज्य द्यावें. दुसरा वर मी हात जोडून मागून घेतें. नाथांनीं माझी इच्छा पुरविलीच पाहिजे. जोगी आणि पूर्ण फटिंग राहून रामानें चवदा वर्षे वनवास केला पाहिजे.

सुनि मृदुबचन भूपहिय सोकू ।
ससिकर छुअत बिकल जिमि कोकू ।
गयउ सहमि नहिँ कछु कहि आवा ।
जनु सचान बन झपटेउ लावा ।
बिबरन भयउ निपट नरपालू ।
दामिनि हनेउ मनहुँ तरु तालू ।

तिचें वचन मृदु, पण त्यानें राजाचें हृदय मात्र होरपळून निघालें. कोक पक्ष्यास चंद्रकिरणांचा स्पर्श, वनांत लावी पक्ष्यांवर बहिरी ससाण्याची झडप, किंवा तालवृक्षावर विद्युत्पात अशांतलेंच तें हृदय म्हणावयाचें. त्यामुळें राजा गर्भगळित झाला. त्यास बोल फुटेना. तो अजिबात फिका पडला. त्याची वाचाच खुंटली.

माथे हाथ मूँदि दोउ लोचन ।
तनु धरि सोचु लाग जनु सोचन ।
मोर मनोरथ सुर-तरु-फूला ।
फरत करिनि जिमि हतेउ समूला ।
अवध उजारि कीन्हि कैकेई ।
दिन्हेसि अचल बिपति कै नेई ।

डोक्यावर हात टेकून व दोन्ही डोळे मिटून अगदीं जिकीरीस आलेला तो राजा मूर्तिमंत शोकच असा भासला. ( तो आंतल्याआंत म्हणाला ), “ माझा मनोरथरूप कल्पवृक्ष अगदीं फुललेला असतां त्यास ऐन फळें येण्याच्या बेतांतच जणुंकाय हत्तिणीनें धडक मारून त्याला मुळासकट उपटून टाकिलें. कैकेयीनें अयोध्या बेचिराख केली आणि विपत्तीस कायमचें आमंत्रण देऊन टाकिलें. ”

**दो०–कवने अवसर का भयउ गयउँ नारि बिस्वास । जोग-सिद्धि-फल-समय जिमि जतिहि अबिद्यानास ॥ २९ ॥**

“ ही वेळ कोणची आणि झालें काय ! योगसिद्धीच्या फलागमसमयींच यतीचा जसा अविद्येनें नायनाट करावा तद्वत् मी ह्या स्त्रीच्या नादांत गुरफटलों. ”

चौ–एहि बिधि राउ मनहिँ मन झाँखा ।
देखि कुभाँति कुमति मनु माँखा ।

अशा रीतीनें मनांतल्यामनांत मेलेल्या राजाकडे कुऱ्यानें पाहून, दुष्टाव्यानें जिचें मन माखलें आहे अशी ती कैकेयी म्हणाली:—

भरत कि राउर पूत न होहीं ।
आनेहुँ मोल बेसाहि कि मोही ।
जो सुनि सर अस लागु तुह्मारे ।
काहे न बोलहु बचनु सँभारे ।
देहु उतर अरु कहहु कि नाहीं ।
सत्यसंध तुह्म रघुकुल माहीं ।

" भरत आपल्या पोटचा नव्हे कीं काय ? कां मला आपण मोलकरीण किंवा वेश्या म्हणून आणली आहे ? जर नुसत्या ऐकण्यानेंच आपणांस असें बाण झोंबतात तर बोलण्यापूर्वीच कां नीट जपून बोलला नाहींत ? उत्तर द्या, परतां चक्क नाहीं तरी म्हणा ! रघुवंशांतले सत्यप्रतिज्ञ ते हे आपणच ना ?

देन कहेहु अब जानि बरु देहू ।
तजहु सत्य जग अपजस लेहू ।
सत्य सराहि कहेहु बरु देना ।
जानेहु लेइहि माँगि चबेना ।

देतों म्हटल्यावर अजूनदेखील पाहिजे तर नकार भरा आणि आपल्या सत्यावर तिलाञ्जुली सोडून जगाची छीथू पत्करा ! आपल्या सत्यप्रतिज्ञतेच्या मारे बाता झोकून ' वर देतों ' म्हणून म्हणावयालाच तेवढें तयार ! ही कांहीं तरी चिवडाकडबोळीं मागून घेईल असेंच कां आपण समजला ?

सिवि दधीचि बलि जो कछु भाषा ।
तनुधनु तजेउ बचनपन राखा ।

शिबि[1], दधीचि[2], बलि[3] इत्यादिकांनीं आपल्या एका शब्दाकरितां जिनगी तर बरबाद केलीच, पण प्राणहि खर्ची घालून आपल्या वचनाचें चीज केलें."

अति-कटु-बचन कहति कैकेई ।
मानहुँ लोन जरे पर देई ।

कैकेयीचें तें अतिशय मर्मभेदक बोलणें भाजलेल्या जागेवर मीठ साराविण्यासारखेंच झालें.

**दो०—धरम-धुरं-धर धीर धरि नयन उघारे राय । सिर धुनि लीन्हि उसास असि मारेसि मोहि कुठाय ॥ ३० ॥**

नंतर त्या धर्मधुरंधर दशरथ राजानें धैर्य धरून डोळे उघडले. त्याचें मस्तक लटलट कांपूं लागून त्यानें एक दीर्घ श्वास सोडला आणि तो म्हणालाः— ' तूं माझ्या अगदीं वर्मीं घाव घालीत आहेस. '

चौ०—आगे दीखि जरति रिस भारी ।
मनहुँ रोष तरवारि उघारी ।
मूठि कुबुद्धि धार निठुराई ।
धरी कूबरी सान बनाई ।
लखी महीप कराल कठोरा ।
सत्य कि जीवनु लेइहि मोरा ।

अतिशय संतापानें भडकलेल्या कैकेयीस समोर पाहून त्यास असें वाटलें कीं, रागानें जणूं आपली समशेरच उपसली आहे. त्या तरवारीची कुबुद्धि ही मूठ आणि निष्ठुरता ही धार असून मंथरारूप सहा-

१ शिबि हा राजा दशरथाचा पूर्वज होय. त्याचे नव्याण्णव अश्वमेध पूर्ण होऊन शंभराव्याला सुरवात होतांच इंद्राला भीति पडली. तेव्हां इंद्रानें त्याच्या घाताची युक्ति योजून आपण ससाण्याचें रूप घेतलें व अग्नीला खबूतर बनवून दोघेहि यज्ञमंडपांत शिरले. कबूतर राजाच्या पोटाशीं दडून, शरणागताला सांभाळ, म्हणून राजाची करुणा भाकूं लागला. राजानें त्यास अभय दिलें. त्याजवर ससाण्यानें झडप घालतांच राजानें त्याचें निवारण

[ पुढील कॉलम पहा ]

केलें. ससाणा म्हणाला कीं, माझ्या तोंडचें अन्न काढून घेण्यांत महत्पाप आहे. राजानें त्यास दुसरें आमिष देण्याचें कबूल केलें तरी तो ऐकेना, अखेर स्वतःचें मांस कापून तें कबूतराच्या भारंभार राजानें द्यावें असें ठरलें. राजा मांस कापून तोलूं लागला असतां कबूतर जास्त भारावूं लागला. अखेरीस मांस संपून मस्तक कापून देण्याची पाळी आली तेव्हां भगवान् प्रगट झाले. त्यांनीं राजाला सनाथ केलें व इंद्र लज्जित होऊन चालता झाला.

२ दधीचिः—इंद्र आणि वृत्रासुर ह्यांचे युद्धांत इंद्र पराभूत झाला. तो ब्रह्मदेवास शरण गेला असतां त्यांनीं त्यास सांगितलें कीं दधीचि मुनींच्या अस्थींवांचून वृत्रासुरास मृत्यु येणें शक्य नाहीं. इंद्र याचक बनून दधीचि मुनीजवळ आला व त्यानें त्यांच्या अस्थींची याचना केली असतां मुनींनीं त्याची इच्छा पूर्ण केली. त्याच अस्थींचें वज्र बनवून इंद्रानें वृत्रास जिंकलें.

३ बलि—वामनानें त्रिपाद भूमि मागून बलीचें आक्रमण केलें व देवांचा ताप चुकविला ही गोष्ट प्रसिद्धच आहे.

णेवर तिला पाजून ठेविली होती. ती भयंकर तीक्ष्ण तरवार पाहतांच राजास वाटलें कीं, ' ही माझ्या प्राणांचा खास भग घेणार ! '

बोलेउ राउ कठिन करि छाती ।
बानी सबिनय तासु सोहाती ।

राजानें आपली छाती घट्ट करून तीस रिझविण्यासाठीं तो मोठ्या मिनतवारीनें बोलूं लागलाः–

प्रिया वचन कस कहसि कुभाँती ।
भीरु प्रतीति प्रीति करि हाँती ।
मोरे भरत राम दुइ आँखी ।
सत्य कहउँ करि संकर साखी ।
अवसि दूत मैं पठउब प्राता ।
ऐहहिं बेगि सुनत दोउ भ्राता ।
सुदिन सोधि सब साजु सजाई ।
देउँ भरत कहँ राजु बजाई ।

" प्रिये ! असें हें ओंगळवाणें तूं बोलतेंस तरी कशी ? हे भीरु ! प्रेम आणि विश्वास ह्यांना तर तूं बगलच दिलीस ! मी शंकरालाच साक्षी ठेवून खरें सांगतों कीं, राम आणि भरत हे माझे दोन डोळे आहेत. उदयिक प्रातःकाळींच मी जासूद रवाना करितों. माझा निरोप ऐकतांक्षणींच दोघेहि बंधू ताबडतोब निघून येतील. मग चांगला दिवस पाहून आणि जय्यत समारंभ भरवून मीं भरतासच प्रसिद्धपणें राज्य देतों.

**दो०–लोभु न रामहिं राजु कर बहुत भरत पर प्रीति । मैं बड छोड बिचारि जिय करत रहेउँ नृपनीति ॥ ३१ ॥**

रामहि राज्याचा वखवखलेला नाहीं. शिवाय त्याचें भरतावर बेसुमार प्रेम आहे. मीच कायतो वडीलधाकटेपणाचा मनांत विचारकरून राजनीतीला अनुसरून बेत ठरविला होता.

चौ०–राम–सपथ–सत कहउँ सुभाऊ ।
राममातु कछु कहेउ न काऊ ।
मैं सब कीन्ह तोहि बिनु पूछे ।
तेहि तें परेउ मनोरथ छूछे ।
रिस परिहरु अब मंगल साजू ।
कछु दिन गये भरत जुबराजू ।

शतवार रामाचीच शपथ घेऊन मी तुला मन मोकळें करून सांगतों कीं, रामाची आई ह्या बाबतींत चकारशब्द देखील कधीं बोलली नाहीं. सर्व कांहीं केलें तें मीं.मात्र तुला विचारलें नाहीं म्हणूनच माझे सर्व बेत ढासळून पडले. आतां तरी राग आवर आणि आनंदानें तयारीस लाग. थोडक्याच दिवसांत भरत युवराज होईल.

एकहि बात मोहि दुख लागा ।
बर दूसर असमंजस माँगा ।
अजहूँ हृदय जरत तेहि आँचा ।
रिस परिहास कि साँचेहु साँचा ।

मला फक्त एकाच गोष्टीबद्दल दुःख झालें. तूं दुसरा वर फारच अविचाराचा मागितलास. अद्यापदेखील त्याच्या आंचेनें माझें काळीज करपत आहे. खरोखरीच हा तुझा कोप आहे, कीं विनोद ?

कहु तजि रोषु रामअपराधू ।
सब कोउ कहइ रामु सुठि साधू ।
तुहूँ सराहसि करसि सनेहू ।
अब सुनि मोहि भयउ संदेहू ।
जासु सुभाउ अरिहि अनुकूला ।
सो किमि करिहि मातुप्रतिकूला ।

शांत हो आणि रामाचा अपराध तरी कळूं दे ! सर्वच लोक रामाला अगदीं शहाजोग म्हणून वाखाणीत आहेत. तूंहि पण त्याची तारीफ करून त्याजवर पंचप्राण टाकीत होतीस. आतांची तुझी भाषा ऐकून मात्र मला चमत्कार वाटतो. ज्याचा स्वभाव वैऱ्यांनादेखील अनुकूल, तो आपल्या प्रत्यक्ष आईशीं प्रतिकूल वागेल हें संभवतें तरी कसें ?

**दो०–प्रिया हास रिस परिहरहि माँगु बिचारि बिबेकु । जेहि देखउँ अब नयनभरि भरत राज अभिषेकु ॥ ३२ ॥**

प्रिये ! राग अगर थट्टा जें कांहीं असेल तें सोडून सारासारविचारानें आणि दूरदृष्टीनें असा वर माग कीं, जेणेंकरून आतां तरी मला भरताचा राज्याभिषेक डोळे भरून पाहण्यास सांपडेल.

चौ०–जिअइ मीन बरु बारिबिहीना ।
मनि बिनु फनिक जिअइ दुखदीना ।
कहउँ सुभाउ न छल मन माहीं ।
जीवन मोर राम बिनु नाहीं ।
समुझि देखु जिय प्रिया प्रबीना ।
जीवन राम–दरस आधीना ।

एकपरी पाण्यावांचून मासेहि जगतील. मण्यावांचून दीन दुःखी झालेले साप देखील वांचतील, परंतु मीं हें तुला निष्कपट मनानें आणि प्रांजळपणानें सांगून ठेवितों कीं, रामास सोडून माझे प्राण गारच होणार. जिवलगे! तूं सूज्ञ आहेस, तूंच आपल्या ठिकाणीं विचार करून पहा कीं, माझें आयुष्य केवळच रामदर्शनावर अवलंबून आहे."

सुनि मृदुवचन कुमति अति जरई।
मनहुँ अनल आहुती घृत परई।

राजाचें हें केविलवाणें भाषण ऐकून त्या अवदसेचा अगदीं तिळपापड झाला. असें वाटलें कीं, अग्नीवर तुपाचीच आहुति पडली.

कहइ करहु किन कोटिउपाया।
इहाँ न लागिहि राउरि माया।
देहु कि लेहु अजस करि नाहीँ।
मोहि न बहुत प्रपंच सुहाहीँ।
राम साधु तुम्ह साधु सयाने।
राममातु भलि सब पहिचाने।
जस कौसिला मोर भल ताका।
तस फल उन्हहिँ देउँ करि साका।

(कैकेयी म्हणाली,) "सांगा, सवरा, कोटींनीं कां उपाय कराना, पण मजजवळ आतां मात्र आपला हा बाष्कळपणा चालावयाचा नाहीं. एकतर दोन्ही वर द्या, नाहींतर नाहीं म्हणून लौकिक तरी गमवा, आपल्या आणखी बाष्कळपणाची मला मुळींच चाड नाहीं! रामहि नुसता साधूच, पण तुम्ही व रामाची आई दोघेहि साधू आणि सुज्ञ आहांत! बरें झालें कीं, तुम्हां सर्वांना मी तरी खूप ओळखून चुकलें! कौसल्येनें जसें माझें हित चिंतिलें त्याचीं फळें मी तिला चाखावयाला लावीनच लावीन.

**दो०—होत प्रात मुनिबेष धरि जौँ न राम बन जाहिँ। मोर मरनु राउर अजसु नृप समुझिय मन माहिँ॥ ३३॥**

आतां उजडतांच जोगडा बनून जर कां राम वनांत गेला नाहीं तर मात्र महाराज! पक्कें लक्षांत ठेवा कीं, मीहि मेलें आणि आपलें यशहि डागळलें."

**चौ०—अस कहि कुटिल भई उठि ठाढी।**
**मानहुँ रोष तरंगिनि बाढी।**
**पाप पहार प्रगट भइ सोई।**
भरी क्रोध जल जाइ न जोई।
दोउ बर कूल कठिनहठ धारा।
भवँर कुबरी-बचन-प्रचारा।
ढाहत भूपरूप तरुमूला।
चली बिपतिबारिधि अनुकूला।

इतकें बोलून ती कुरांट तडक उठून उभी राहिली तेव्हां ती फोंफावत चाललेली रागाची नदीच आहे असें भासलें. पापरूप डोंगरांत उगम पावून क्रोधरूप जलानें ती अशी भरून चालली होती कीं तिजवर नजर ठरेना. दोन वर ह्याच जिच्या दुथड्या, अनावर हट्ट हीच जिची मुख्य धार, कुब्जेची शिकवण हेच जिच्यांतील अतोनात भोंवरे, अशी ती दशरथरूप वृक्षास मुळासकट उलथून पाडूं पाहणारी नदी विपत्तिरूप समुद्राकडे दुथडी भरून वाहात सुटली.

लखी नरेस बात सब साँची।
तियमिसु मीच सीस पर नाँची।
गहि पद बिनय कीन्हि बैठारी।
जनि दिन-कर-कुल होसि कुठारी।

राजाची खात्री झाली कीं, इच्या चेष्टा मस्करीच्या नसून सर्व खऱ्या आहेत आणि स्त्रीमिषानें आपल्या शिरावर आपला मृत्यूच नाचत आहे. नंतर तिचे पाय धरून आणि तीस मोठ्या मिनतवारीनें बसवून तो म्हणालाः—" सूर्यवंशाची तूं कुऱ्हाड बनूं नकोस.

माँगु माथ अबहीँ देउँ तोही।
रामबिरह जनि मारसि मोही।
राखु राम कहँ जेहि तेहि भाँती।
नाहिँ त जरिहि जनम भरि छाती।

हें माझें मस्तक माग, तेंदेखील मी तुझ्या स्वाधीन करितों. परंतु रामाची ताटातूट करून नको ग मला मारूंस! कोणत्या नाकोणत्या तरी रीतीनें रामास ठेवून घे. नाहींतर जन्मभर काळीज जळत राहील."

**दो०—देखि ब्याधि असाधि नृप परेउ धरनि धुनि माथ। कहत परम आरतबचन राम राम रघुनाथ॥ ३४॥**

ही व्याधि असाध्य जाणून राजा गय खाऊन जमिनीवर पडला. आणि हे राम! हे राम! हे रघुनाथ! अशा रीतीनें आरंबळूं लागला.

चौ०—व्याकुल राउ सिथिल सब गाता।
करिनि कलपतरु मनहुँ निपाता।
कंठ सूख मुख आव न बानी।
जनु पाठीन दीन बिनु पानी।

हस्तिणीनें कल्पतरु उलथून पाडल्याप्रमाणें व्याकुलतेनें राजाचें सर्वांग खिळखिळें झालें. घशाला कोरड पडल्याकारणानें त्याच्या मुखावाटें शब्द निघेना. पाण्याविरहित माशाप्रमाणें तो दीन झाला.

पुनि कह कटु कठोर कैकेई।
मनहुँ घाय महुँ माहुरु देई।

जखमेमध्यें विष भरावें त्याप्रमाणें कैकेयी पुन्हां त्यास निर्दयपणानें खोचून बोलूं लागली.

जौँ अंतहु अस करतब रहेऊ।
माँगु माँगु तुम्ह केहिं बल कहेऊ।
दुइ कि होइ एक समय भुआला।
हँसब ठठाइ फुलाउब गाला।

" माझ्या मागणीचा हाच जर शेवट करावयाचा होता तर मग 'माग माग' म्हणून कशाच्या जोरावर मला म्हणालांत? एकाच काळीं म्हणे दोन राजे! हें होऊं शकतें कसें? माझी टर उडवून आपणच खिदळावयाचें आणि आपणच फिरून गाल फुगवावयाचे.

दानि कहाउब अरु कृपनाई।
होइ कि षेम कुसल रौताई।
छाडहु बचन कि धीरज धरहू।
जनि अबला जिमि करुना करहू।
तनु तिय तनय धाम धनु धरनी।
सत्यसंध कहँ तृनसम बरनी।

" दाता म्हणवून घ्यावयाचें आणि कृति मात्र कृपणाची करावयाची. ऐषआरामांत लोळून थोरपणाचा बडिवार मिरवायला सांपडेल होय? दिलेल्या वचनाला हरताळ तरी फांसा नाहींतर हिंमत तरी धरा. असें बायकोसारखे हेल काढून रडल्यानें भागावयाचें नाहीं. देह, गेह, पुत्र, कलत्र, राज्य, वित्त हीं सर्व सत्यप्रतिज्ञ पुरुष तनसडीप्रमाणें समजतो."

**दो०—मरमबचन सुनि राउ कह कहु कछु दोष न तोर। लागेउ तोहि पिसाच जिमि काल कहावत मोर॥ ३५॥**

तिचे ते बोचक शब्द ऐकून राजा म्हणाला—

" खुशाल बोल! ह्यांत तुझा मुळींच दोष नाहीं. माझा काळच मला बोलावीत आहे आणि त्यानेंच तुला पिशाचाप्रमाणें झपाटलें आहे.

चौ०—चहत न भरत भूपतहि भोरे।
बिधिबस कुमति बसी जिय तोरे।
सो सब मोर पापपरिनामू।
भयउ कुठाहर जेहि बिधि बामू।

भरताला चुकून देखील राजा होण्याची हौस नाहीं. प्राक्तनाचाच फेरा म्हणून तुझ्या मनांत ह्या द्वाड वासनांनीं बिऱ्हाड केलें आहे. हें सर्व माझ्याच पापाचें फळ आहे. ज्यांना ज्यांना म्हणून दैवानें नाडलें त्यांचे असेच कुव्याचे हाल व्हावयाचे.

सुबस बसिहि फिरि अवध सुहाई।
सब गुनधाम राम प्रभुताई।
करिहहिँ भाइ सकल सेवकाई।
होइहि तिहुँ पुर रामबडाई।
तोर कलंक मोर पछिताऊ।
मुयहु न मिटिहि न जाइहि काऊ।

अयोध्या फिरून सुखासमाधानानें वसेल आणि अखिलगुणधाम माझा रामच तिजवर प्रभुत्व चालवील. सर्व बंधु रामाची सेवा करीत राहतील आणि तिन्हीहि लोकांत रामाचाच डंका गाजेल. मात्र तुझा हा कलंक आणि माझा हा पश्चात्ताप हे मात्र आपण उभयतां मेलों तरी कोण्याहि काळीं मिटावयाचे नाहींतच, परंतु पुसावयाचेहि नाहींत.

अब तोहि नीक लाग करु सोई।
लोचनओट बैठु मुह गोई।
जब लगि जिअउँ कहउँ कर जोरी।
तब लगि जनि कछु कहेसि बहोरी।
फिरि पछतैहसि अंत अभागी
मारसि गाइ नहारुहि लागी।

याउपर तुला ठीक वाटेल तें कर, परंतु तोंड टाकून माझ्या दृष्टीआड जाऊन बैस! तुला हात जोडून हीच प्रार्थना, कीं जोंवर मी जिवंत असेन तोंवर फिरून मात्र अवाक्षर काढूं नकोस. करंटे! शेवटीं मात्र तुला पश्चात्ताप होईलच होईल. नुसत्या वादीसाठीं तूं गाय कापीत आहेस!"

**दो०—परेउ राउ कहि कोटिबिधि काहे करसि निदानु। कपटसयानि न कहति कछु जागति मनहुँ मसानु॥ ३६॥**

ह्याप्रमाणें राजानें कैकेयीस परोपरीनें सांगितलें. अखेर 'कां अंत पाहतेस' म्हणून तो धरणीवर लोळूं लागला. परंतु त्या कसलेल्या कावेबाज कैकेयीनें हूं कीं चूं देखील केलें नाहीं. तेव्हां असें भासे कीं, ती जणुं स्मशानच जागवीत आहे.

सौ०—राम राम रट बिकल भुआलू।
जनु बिनु पंख बिहंग बेहालू।
हृदय मनाव भोरु जनि होई।
रामहिँ जाइ कहइ जनि कोई।
उदय करहु जनि रबि रघुकुलगुर।
अवध बिलोकि सूल होइहि उर।

पंखविहीन पक्ष्याप्रमाणें राजा रडकुंडीस येऊन 'राम राम' म्हणून आक्रोश करूं लागला. तो मनांत चिंतूं लागला कीं, आतां उजाडूंच नये, रामाला जाऊन ही गोष्ट कोणींच कळवूं नये, व रविकुलाचा मूळपुरुष जो सूर्य त्यानेंहि उगवूं नये, कारण अयोध्येस पाहून त्याच्याहि हृदयांत वेदना होऊं लागतील.

भूपप्रीति कैकइकठिनाई।
उभयअवधि बिधि रची बनाई।

राजानें कैकेयीविषयींचें प्रेम आणि तिची राजाविषयींची निष्ठुरता ह्या दोन्हींची ही सीमा विधात्यानें फारच खुबीनें घडविली होती.

बिलपत नृपहि भयउ भिनुसारा।
बीना—बेनु—संख धुनि द्वारा।
पढहिँ भाट गुन गावहिँ गायक।
सुनत नृपहि जनु लागहिँ सायक।
मंगल सकल सुहाहि न कैसे।
सहगामिनिहि बिभूषन जैसे।

ह्याप्रमाणें राजाचा विलाप चालला आहे तों पहाट झाली. बीन, सनई, शंख इत्यादींची सूरसुरावट राजद्वारीं ऐकूं येऊं लागली. भाटांच्या सलाम्या सुरूं झाल्या व गवई आलापदारी करूं लागले. तें ऐकून राजास बाण रुपल्यासारखें होई. सहगमन करणाऱ्या पतिव्रतेस जसे अलंकार रुचत नाहींत तद्वत् राजाला तो सर्व मंगलगजर अगदीं नकोसा झाला.

तेहि निसि नींदँ परी नहिँ काहू।
रामदरस लालसा उछाहू।

त्या रात्रीं झोंप म्हणून कोणालाहि लागली नाहीं. कारण सर्वांना रामदर्शनाची उत्कट लालसा झाली होती.

**दो०—द्वार भीर सेवक सचिव कहहिँ उदित रबि देखि। जागे अजहुँ न अवधपति कारन कवन बिसेखि॥ ३७॥**

द्वारांवर जमलेली, सचिव, सेवक इत्यादि मंडळी सूर्य उदयाचलीं आलेला पाहून म्हणूं लागली कीं, "सरकारस्वारी अझून उठली नाहीं त्याचें काय बरें विशेष कारण असावें?

चौ०—पछिले पहर भूपु नित जागा।
आजु हमहिँ बड अचरजु लागा।
जाहु सुमंत्र जगावहु जाई।
कीजिय काज रजायसु पाई।

स्वारी शेवटच्या प्रहरांत नित्य जागृत असते, आजचें हें मात्र आम्हांस भारीच नवल वाटतें. सुमंता! जा, जा, आणि स्वारीस जागें कर. कारण आपणांस राजाज्ञा घेऊन पुढच्या कामास लागलें पाहिजे."

गये सुमंत्र तब राउर पाहीँ।
देखि भयावन जात डेराहीँ।
धाइ खाइ जनु जाइ न हेरा।
मानहुँ बिपाति—विषाद बसेरा।
पूछे कोउ न ऊतरु देई।
गये जेहि भवन भूप कैकेई।

त्यावर सुमंत राजाकडे जावयास निघाला. परंतु सर्व भयाण, जसें कांहीं खाण्यासच धांवत आहेसें पाहून तो जातांना वचकला. त्याच्यानें तिकडे पाहवेना. त्यास असें भासलें कीं, विपत्ति आणि विषाद यांनीं तेथें आपले डेरेच ताणले आहेत. विचारपूस केली तरी त्यास कोणी जबाब देईना. म्हणून दशरथ आणि कैकेयी ज्या खाशा महालांत होते तेथेंच तो शिरला.

कहि जय जीव बैठ सिर नाई।
देखि भूपगति गयउ सुखाई।
सोच बिकल बिबरन महि परेऊ।
मानहुँ कमलमूल परिहरेऊ।
सचिव सभीत सकइ नहिँ पूछी।
बोली असुभभरी सुभछूछी।

(तेथें जाऊन) 'जय जीव' म्हणून नमस्कार करून तो बसला मात्र, तोंच राजाची अवस्था पाहून

त्याचाहि चेहरा उतरला. शोकाविष्ट, कांतिहीन आणि उघड्यावर अस्ताव्यस्त पडलेला राजा त्यास मूळांसकट उपटलेल्या कमळाप्रमाणें भासला. भीतीनें गांगरून गेल्यामुळें त्याला विचारण्याचें धारिष्ट होईना. तेव्हां आपण होऊनच ती मंगलरहित आणि अमंगल-पूर्ण कैकेयी बोलूं लागली.

**दो०–परी न राजहि नींद निसि हेतु जान जगदीसु । रामु रामु रटि भोरु किय कहइ न मरमु महीसु ॥ ३८ ॥**

ती म्हणाली, " परमेश्वर जाणे, काय म्हणून पण स्वारीस सारी रात्र झोंप म्हणून लागली नाहीं. रामाचा सारखा ध्यास लागला आहे. होतांहोतां सकाळहि झाली, पण मनांतलें इंगित स्वारी बोलूनच दाखवीत नाहीं.

चौ०–आनहु रामहिँ बेगि बोलाई ।
समाचार तब पूछेहु आई ।

सुमंता ! रामाला आतांच्या आतांच बोलावून आण आणि मग येऊन चौकशीची किचकाट घालीत रहा.

चलेउ सुमंत्र रायरुख जानी ।
लखी कुचालि कीन्हि कछु रानी ।
सोच बिकल मग परइ न पाऊ ।
रामहिँ बोलि कहिहिँ का राऊ ।
उर धरि धीरज गयउ दुआरे ।
पुछहिँ सकल देखि मनमारे ।
समाधान करि सो सबही का ।
गयउ जहाँ दिन-कर-कुल-टीका ।

राजाचीहि तीच इच्छा आहे असें जाणून सुमंत निघाला. त्यानें ताडलें कीं ह्याच बाईसाहेबांनीं कांहीं तरी खट्याळपणा केला आहे. दुःखानें विकल झाल्या कारणानें त्यास पाऊल फुटेना. (तो मनांत विचार करी कीं,) रामास बोलावून महाराज त्यांस सांगणार तरी काय ? मनाला धीर देऊन तो जेमतेम देवडी-पाशीं आला मात्र तोंच त्यास बदनूर पाहून सर्वांनीं विचारपूस करून भंडावून सोडलें. त्यानें सर्वांनाच स्थिरस्थावर केलें, आणि स्वतः दिनकरकुलावतंस प्रभू रामचंद्राकडे चालता झाला.

राम सुमंत्रहि आवत देखा ।
आदर कीन्ह पितासम लेखा ।
निरखि बदन कहि भूपरजाई ।
रघु-कुल-दीपहिँ चलेउ लेवाई ।
राम कुभाँति सचिवसँग जाहीँ ।
देखि लोग जहँ तहँ बिलखाहीँ ।

सुमंत आलेला पाहून रामांनीं त्याचा पितृतुल्य सत्कार केला. रामाच्या मुखाकडे पाहून त्यानें राजाज्ञा कळविली आणि त्या रघुकुलदीपास घेऊन तो निघाला. सचिवाबरोबर रामचंद्र कसेसेच जात आहेत हें पाहून लोकांत जिकडेतिकडे खळबळ उडाली.

**दो०–जाइ देखि रघु-बंस-मनि नरपति निपट कुसाजु । सहमि परेउ लखि सिंघिनिहि मनहुँ बृद्ध गजराजु ॥ ३९ ॥**

रघुवंशमणि जाऊन पहातात तों राजा अगदींच रंजीस आलेला त्यांस दिसला. सिंहिणीस पाहून वृद्ध गजराज गर्भगळित होऊन पडला आहे असेंच त्यांस भासलें.

चौ०–सूखहिँ अधर जरहिँ सब अंगू ।
मनहुँ दीन मनिहीन भुअंगू ।
सरुख समीप देखि कैकेई ।
मानहुँ मीचु घरी गनि लेई ।

ओंठ सुकून गेलेले आणि सर्वांगाची लाही झालेली असा तो राजा दशरथ त्यास मणिहीन भुजंगाप्रमाणें भासला, आणि त्याच्या समीपच असलेली लाल अंगार झालेली कैकेयी राजाच्या आयुष्याची घटका मोजीत बसलेल्या काळाप्रमाणें वाटली.

करुनामय मृदु राम सुभाऊ ।
प्रथम दीख दुख सुना न काऊ ।
तदपि धीर धरि समउ बिचारी ।
पूछी मधुरबचन महतारी ।

रामराय स्वभावतःच मृदु आणि कारुणिक, दुःख म्हणून कधीं जें त्यांनीं कानांनीं देखील ऐकिलें नव्हतें, तेंच आज डोळ्यांनीं पाहण्याची प्रथमच पाळी त्यांचेवर आली. तरीदेखील वेळेवर लक्ष देऊन व हिंमत बांधून त्यांनीं सौजन्यानें मातेस विचारलें.

मोहि कहु मातु तात-दुख कारन ।
करिय जतन जेहि होइ निवारन ।

" माते ! पित्याच्या दुःखाचें कारण मला

कळीव. त्याचें निवारण करण्याचा यत्न मला करायला हवा. ''

सुनहु राम सब कारन एहू।
राजहिँ तुम्ह पर बहुत सनेहू।
देन कहेन्हि मोहिँ दुइ बरदाना।
माँगेउँ जो कछु मोहिँ सुहाना।
सो सुनि भयउ भूपउर सोचू।
छाडि न सकहिँ तुम्हार सँकोचू।

( हें ऐकून कैकेयी म्हणाली, ) " रामा! ऐक, महाराजांचें तुजवरील अपार प्रेम हेंच एकंदरींत याचे मुळाशीं आहे. मला त्यांनीं दोन वर देऊं केले होते, ते मीं मला वाटलें तसे मागीतले. ते ऐकतांच महाराजांचे पोटांत कालवूं लागलें. कारण तुजवरील ममतेस त्यांना आळा घालतां येत नाहीं.

**दो०—सुत सनेहु इत बचनु उत संकट परेउ नरेसु। सकहु त आयसु धरहु सिर मेटहु कठिन कलेसु ॥ ४० ॥**

इकडे पुत्रप्रेम आणि तिकडे वचन, अशा रीतीनें स्वारी खोड्यांत अडकली आहे; शक्य असल्यास तूं आज्ञा शिरसावंद्य करून ह्यांचे हे दुर्धर क्लेश नाहींसे कर.

चौ०—निधरक बैठि कहइ कटुबानी।
सुनत कठिनता अति अकुलानी।

बसल्याबसल्याच हे विषारी शब्द कैकेयीनें बेधडक उच्चारिले. ते ऐकून क्रूरतादेखील अगदीं विरघळून गेली असावी.

जीभ कमान बचन सर नाना।
मनहुँ महिप मृदु–लच्छ–समाना।
जनु कठोरपनु धरे सरीरू।
सिखइ धनुषबिद्या बरबीरू।

(किंवा) जणुंकाय मूर्तिमंत कठोरताच कैकेयीच्या जिव्हारूप धनुष्याला नानाविध उक्तींचे बाण लावून राजा दशरथाच्या कोमल हृदयावर निशाण धरून श्रेष्ठ धनुर्धर गाजण्यासाठीं, धनुर्विद्येचा व्यासंग करीत असावी.

सब प्रसंगु रघुपतिहि सुनाई।
बैठि मनहुँ तनु धरि निठुराई।

ह्याप्रमाणें एकंदर वर्तमान रघुपतीस ऐकवून ती स्तब्ध बसली तेव्हां असें वाटलें कीं जणूं निर्दयतेनेंच मूर्तिमंत अवतार धारण केला आहे.

मन मुसुकाइ भानु–कुल–भानू।
राम सहज–आनंद–निधानू।
बोले बचन बिगत सब दूषन।
मृदु मंजुल जनु बागबिभूषन।

निजानंदघन, भानुकुलसूर्य श्रीरामचंद्र मनांत हंसले, आणि सर्वथैव निर्व्याज आणि सरस्वतीस केवळ आभरणभूत असें मृदु आणि मंजुळ भाषण करूं लागले.

सुनु जननी सोइ सुत बडभागी।
जो पितु–मातु–बचन–अनुरागी।
तनय मातु–पितु–तोषनि–हारा।
दुर्लभ जननि सकलसंसारा।

ते म्हणाले, "माते ! ऐक, जो पुत्र मातापितरांच्या आज्ञेंत अनुरक्त असतो तोच महाभाग्यवान् होय. मातापितरांस संतुष्ट ठेवणारा असा पुत्र निखिल ब्रह्मांडांतहि पण आढळणें दुरापास्त आहे.

**दो०—मुनिगन मिलनु बिसेषि बन सबहि भाँति हित मोर। तेहि महँ पितुआयसु बहुरि संमत जननी तोर ॥ ४१ ॥**

वनांत विशेषेंकरून मुनिमंडळींचीं दर्शनें होतील.त्यायोगें माझें सर्वपक्षीं कल्याणच होणार आहे. त्यांत ही पित्याची मला आज्ञा आणि त्यांतहि फिरून माते! तुझी संमति.

चौ०—भरत प्रानप्रिय पावहिँ राजू।
बिधि सबबिधि मोहिँ सनमुख आजू।
जौँ न जाउँ बन ऐसेहि काजा।
प्रथम गनिय मोहि मूढसमाजा।

शिवाय माझ्या प्राणप्रिय भरतासहि राज्यलाभ होणार. एवंच माझ्या प्राक्तनानें मला ही एक मोठी पर्वणीच लाभली आहे. अशाहि कार्यासाठीं मी जर वनांत गेलों नाहीं तर मूर्खांच्या पंक्तींत मला अग्रगण्यच गणावें लागेल.

सेवहिँ अरँडु कलपतरु त्यागी।
परिहरि अमृत लेहि बिषु माँगी।
तेउ न पाइ अस समउ चुकाहीँ।
देखु बिचारि मातु मनमाहीँ

कल्पवृक्षास झुगारून एरंडाची जोपासना करणारे आणि अमृतास लोटून विष मागून घेणारेदेखील अशी पर्वणी प्राप्त झाल्यास ती वाया जाऊं द्यावयाचे

नाहींत. ह्याचा, आई ! तूंच आपले ठिकाणीं विचार करून पहा.

अंब एक दुख मोहि बिसेखी ।
निपट बिकल नरनायक देखी ।
थोरिहि बात पितहि दुख भारी ।
होति प्रतीति न मोहि महतारी ।

माते ! हा लोकनायक अत्यंत गलित झालेला पाहून मात्र मला विशेष दुःख होत आहे. क्षुल्लक गोष्टीसाठीं महाराजांना दुःखाचा डोंगर भासावा हें मात्र, आई ! मला पटत नाहीं.

राउ धीरु गुन-उदधि-अगाधू ।
भा मोहि तें कछु बड अपराधू ।
ता तें मोहि न कहत कछु राऊ ।
मोरि सपथ तोहि कहु सतिभाऊ ।

आपले हे महाराज म्हणजे धैर्याचा आणि सद्गुणांचा केवळ अपार सागरच होत. मजकडूनच कांहींना कांहींतरी थोर अपराध घडलेला असावा, आणि म्हणूनच महाराज माझ्याशीं मुळींच बोलेनासे झाले आहेत. तुला माझीच शपथ आहे, खरा प्रकार कळूं दे. ''

**दो०—सहज सरल रघुबरबचन कुमति कुटिल करि जान । चलइ जोंक जिमि बक्रगति जद्यपि सलिल समान ॥ ४२ ॥**

रघुवरांचें भाषण अगदीं पोटांतून सरळ, परंतु तेंदेखील त्या दुष्टबुद्धि कैकेयीस खोडसाळपणाचें वाटलें. पाणी जरी सारख्या सपाटीचें असलें तरी जळू नेहमीं वक्रगतीनेंच चालावयाची.

चौ०—रहसी रानि रामरुख पाई ।
बोली कपटसनेह जनाई ।

मनांत रामाचा कल ओळखून व वरकरणी लोभ दाखवून कैकेयी बोलूं लागली.

सपथ तुह्मार भरत कइ आना ।
हेतु न दूसर मैं कछु जाना ।
तुह्म अपराध जोग नहिं ताता ।
जननी—जनक—बंधु—सुख—दाता ।

ती म्हणाली, '' तुझीच शपथ, आणि भरताचीहि शपथ. मला तरी निदान दुसरें कांहींएक कारण कळलें नाहीं. बा रामा ! तूं अपराधाजोगा मुळीं नाहींसच. तूं तर आई, बाप आणि सर्व गोत यांना सुखविणारा आहेस.

राम सत्य सब जो कछु कहहू ।
तुह्म पितु—मातु—बचन रत अहहू ।
पितहि बुझाइ कहहु बलि सोई ।
चौथे पन जेहि अजसु न होई ।
तुह्म सम सुअन सुकृत जेहि दीन्हे ।
उचित न तासु निरादरु कीन्हे ।

रामा ! तूं जें कांहीं म्हणालास तेंच सर्वस्वीं खरें. तूं मातापित्यांच्या आज्ञेंत नेहमीं तत्पर आहेस. मी तुझ्यावरून आपला जीव ओवाळून टाकतें. तूंच आतां जेणेंकरून म्हातारपणीं नांवाला बट्टा लागणार नाहीं, अशा रीतीनें महाराजांची समजूत घाल. ज्या पूर्वपुण्याईनें तुजसारखा पुत्र पदरांत घातला, तिची अनास्था करणें हें उचित नव्हे.''

लागहिं कुमुख बचन सुभ कैसे ।
मगह गयादिक तीरथ जैसे ।
रामहिं मातुबचन सब भाये ।
जिमि सुरसरिगत सलिल सुहाये ।

तिच्या त्या कुश्चळ मुखांतून हीं शुभ वाक्यें पडणें म्हणजे मगधदेशांत गयादिक तीर्थांच्या आविर्भावाप्रमाणेंच समजावें. गंगेस मिळालेला ओघळहि जसा गंगाजळ मानला जातो तद्वत् मातेच्या नात्यानें म्हणून तिचा एकूणएक शब्द रामास प्रेमळ वाटला.

**दो०—गइ मुरुछा रामहिं सुमिरि नृप फिरि करवट लीन्ह । सचिव रामआगमन कहि बिनय समयसम कीन्ह ॥ ४३ ॥**

इतक्यांतच राजाचीहि मूर्च्छा सांवरली आणि त्यानें 'राम' 'राम' म्हणून कड पालटला. सुमंतानें रामचंद्राचें आगमन कळवून समयोचित सांत्वन केलें.

चौ०—अवनिप अकनि रामु पगु धारे ।
धरि धीरजु तब नयन उघारे ।
सचिव सँभारि राउ बैठारे ।
चरन परत नृप रामु निहारे ।
लिये सनेहबिकल उर लाई ।
गई मनि मनहुँ फनिक फिरि पाई ।

नंतर रामचंद्र दशरथाजवळ गेले. तेव्हां त्यानें धैर्य धरून डोळे उघडले. सुमंतानें दशरथास सावरून बसविलें. आपल्या चरणांस राम नमस्कार करीत आहेसें पाहून त्यानें त्यांस असें गाहिंवरून पोटाशीं

धरिलें कीं जणुंकाय सर्पास हरवलेला मणीच पुन्हां लाधला.

रामहिँ चितइ रहेउ नरनाहू।
चला बिलोचन बारिप्रबाहू।
सोकबिबस कछु कहइ न पारा।
हृदय लगावत बारहिँ बारा।

राजा रामचंद्रास न्याहाळीतच राहिला. त्याच्या नेत्रांतून अश्रूंचे पाट चालले. दुःखानें अगदीं कासावीस झाल्यामुळें त्याच्यानें मुळींच बोलवेना. तो रामास वरचेवर उराशीं आवळून धरूं लागला.

बिधिहि मनाव राउ मनमाहीँ।
जेहि रघुनाथ न कानन जाहीँ।
सुमिरि महेसहि कहइ निहोरी।
बिनती सुनहु सदासिव मोरी।
आसुतोष तुह्म अवढर दानी।
आरति हरहु दीनजन जानी।

राजा मनांतल्या मनांत विधात्यास आळवूं लागला कीं, " जेणेंकरून राम वनांत न जाईल असें कर. उमारमणासहि आठवून तो प्रार्थना करूं लागला कीं, हे अखंडकल्याणकारिन्! माझी प्रार्थना आपण तरी ऐकावी. शीघ्रसंतोषी आणि सढळ दाते एक आपणच आहांत. मला आपला दीन दास जाणून माझ्या दुःखाचें हरण करा.

**दो०–तुम्ह प्रेरक सब के हृदय सो मति रामहिँ देहु। बचन मोर तजि रहहिँ घर परिहरि सील सनेहु॥ ४४॥**

आपण भूतमात्रांच्या हृदयाचे प्रेरक आहांत. आपणच रामाला अशी बुद्धि द्या कीं माझी आज्ञा उल्लंघून आणि स्वतःच्या शालीनतेस आणि प्रेमळपणास झुगारून तो घरींच राहील.

चौ०–अजस होउ जग सुजस नसाऊ।
नरक परउँ बरु सुरपुर जाऊ।
सब दुख दुसह सहावहु मोहीँ।
लोचनओट राम जनि होहीँ।
अस मन गुनइ राउ नहिँ बोला।
पीपर–पात–सरिस मन डोला।

माझ्या सत्कीर्तीवर विरजण पडून माझा दुर्लौकिक झाला तरी होवो, माझा स्वर्गवास जाऊन मी नरकांत पचत राहिलों तरीदेखील बेहेत्तर, अवघीं दुर्धर दुःखेंहि पण आपण मजला भोगविलेलीं चालतील, परंतु माझा राम मात्र माझ्या दृष्टिआड होऊं देऊं नका." असले विचार मनांत घोळत असल्यामुळें राजा कांहींच बोलला नाहीं. त्याचें मन पिंपळाच्या पानाप्रमाणें झोके खाऊं लागलें.

रघुपति पितहि प्रेम बस जानी।
पुनि कछु कहिहि मातु अनुमानी।
देस काल अवसर अनुसारी।
बोले बचन बिनीत बिचारी।

पित्यास प्रेमाविष्ट जाणून, आणि कैकेयी फिरून त्यास कांहींतरी वाक्ताडण करील असा तर्क करून, रघुपतींनीं देशकाल आणि वर्तमान यांला अनुसरून विनयविचारयुक्त अशा भाषणास सुरुवात केली.

तात कहउँ कछु करउँ ढिठाई।
अनुचित छमब जानि लरिकाई।
अति–लघु–बात लागि दुखपावा।
काहु न मोहि कहि प्रथम जनावा।
देखि गोसाइहिँ पूछिउँ माता।
सुनि प्रसंगु भये सीतल गाता।

(रामचंद्र म्हणाले) " बाबा! मी (आज्ञेखेरीज कांहींहि बोललों तरी मजकडे उर्मटपणाचा दोष येणार, तथापि मी लेंकरूं समजून माझ्या अपराधाची आपण क्षमा करावी. अगदींच क्षुल्लक गोष्टीबद्दल आपण विव्हळत आहांत. मजला आधींच कां बरें कळविलें नाहीं? महाराजांची स्थिति अवलोकन करून मीं मातेस विचारलें. सर्व वृत्तांत ऐकून माझा तर रोम रोम निवाला.

**दो०–मंगलसमय सनेहबस सोच परिहरिय तात। आयसु देइय हरषि हिय कहि पुलके प्रभुगात॥ ४५॥**

अशा मंगलप्रसंगीं केवळ ममतेच्या आहारी जाऊन होणारा हा शोक वडिलांनीं दूर सारून प्रसन्न चित्तानें मला आज्ञा दिली पाहिजे." इतकें बोलतांच रामाच्या देहास रोमोद्गम झाला.

चौ०–धन्य जनम जगतीतल तासू।
पितहि प्रमोदु चरित सुनि जासू।
चारि पदारथ करतल ता के।
प्रिय पितुमातु प्रानसम जा के।
आयसु पालि जनमफल पाई।
ऐहउँ बेगिहि होउ रजाई।

बिदा मातु सन आवउँ माँगी।
चलिहउँ बनहिँ बहुरि पग लागी।

(राम पुन्हां म्हणाले,) ह्या पृथ्वीतलावर त्याच पुत्राचा जन्म धन्य कीं, ज्याचा जीवनक्रम ऐकून पिता परमानंदांत झुलत राहतो. ज्या सत्पुत्रास मातापितर स्वतःच्या प्राणाप्रमाणें प्रिय वाटतात त्यास चारी पुरुषार्थ म्हणजे केवळ हाताचा मळ होत. आपल्या आज्ञेचें परिपालन करून व जन्माचें सार्थक करून मी त्वरितच येतों. मला आज्ञा असावी.आतां मी मातेचा निरोप घेऊन आणि फिरून ह्या तातचरणांस वंदन करून वनाप्रत गमन करितों."

अस कहि रामु गवन तब कीन्हा।
भूप सोकबस उतरु न दीन्हा।
नगर ब्यापि गइ बात सुतीछी।
छुअत चढी जनु सब तन बीछी।

इतकें बोलून राम उठून गेले. दुःखावेशानें राजानें उत्तरच दिलें नाहीं. विंचवाचा दंश झाल्यावर ज्याप्रमाणें सर्व शरीरभर भयंकर वेदना पसरतात त्याप्रमाणें ही दुःखकारक बातमी सर्व शहरभर तावडतोब पसरली.

सुनि भये बिकल सकल नर नारी।
बेलि बिटप जिमि देखि दवारी।
जो जहँ सुनइ धुनइ सिरु सोई।
बड बिषाद नहिँ धीरज होई।

ती बातमी ऐकतांच सर्व स्त्रीपुरुष, वृक्षलतादिकांस वणवा लागल्याप्रमाणें, विकळ झाले. ज्यानें ज्यानें ती वार्ता ऐकावी त्यानें त्यानें तेथल्या तेथेंच कपाळ बडवून घ्यावें, आणि पराकाष्ठेच्या वेदना होऊन ज्याचें त्याचें अवसानच गळावें.

**दो०—मुख सुखाहिँ लोचन स्रवहिँ सोक न हृदय समाई। मनहुँ करुन-रस-कटकई उतरी अवध बजाई ॥ ४६ ॥**

लोकांच्या तोंडचें पाणी पळालें, त्यांच्या नेत्रांतून टिपें वाहूं लागलीं व त्यांच्या हृदयांत शोक मावेनासा झाला. कारुण्यरसाचें सैन्यच रणढोल वाजवीत अयोध्येवर चढून आलें आहे असें वाटलें.

चौ०—मिलहि माँझ बिधि बात बिगारी।
जहँ तहँ देहिँ कैकइहि गारी।
एहि पापिनिहि बूझि का परेऊ।
छाइ भवन पर पावक धरेऊ।
निजकर नयन काढि चह दीखा।
डारि सुधा बिष चाहत चीखा।
कुटिल कठोर कुबुद्धि अभागी।
भइ-रघु-बंस-बेनु-बन आगी।
पालव बैठि पेडु एइ काटा।
सुख महँ सोक ठाटु धरि ठाटा।

जिकडेतिकडे लोक मध्येंच भेटले म्हणजे कैकेयीस शिव्याशाप देऊन परस्परांत ह्मणत कीं, "प्राक्तनानें गोष्ट विकोपास नेली. ह्या चांडाळणीला हे डोहाळे होताहेत तरी कसले? चांगल्या नांदत्या घरावर हिनें तर हे निखारेच ठेविले. आपल्याच हातांनीं आपले डोळे फोडून घेऊन फिरून पाहण्याची ही हौस करीत आहे! अमृत फेकून विष चाखण्याची इला हाव उठली आहे! ही कुटिल, निष्ठुर दुष्टबुद्धि आणि हतभागी ह्या रघुवंशरूप कळकाच्या बेटास आग लावीत आहे! डहाळीवर बसून वृक्ष कापण्याची हीस हौस सुटली आहे! भरलेल्या सुखांत दुःख कालविण्याचा हिनें हा चंग बांधला आहे!

सदा राम एहि प्रानसमाना।
कारन कवन कुटिलपनु ठाना।
सत्य कहहिँ कबि नारिसुभाऊ।
सबबिधि अगम अगाध दुराऊ।
निजप्रतिबिंबु बरुक गहि जाई।
जानि न जाइ नारिगति भाई।

राम हिला तर सदैव प्राणासमान, मग हिनें ही दगाबाजी करण्याचें कारण कोणतें? स्त्रीचरित्र सर्वतोपरी अगम्य, अगाध, आणि गूढ असतें. एकपरी स्वतःची सावली धरवेल, परंतु, बाबांनो! बायकांचे चार उमगूनच पडावयाचे नाहींत, ही जी कवींची उक्ति आहे तीच तंतोतंत खरी.

**दो०—काह न पावक जारि सक का न समुद्र समाइ। का न करइ अबला प्रबल केहि जग कालु न खाइ ॥ ४७ ॥**

अग्नि काय जाळूं शकणार नाहीं? समुद्रांत काय समावणार नाहीं? जगांत काळ कोणास खात नाहीं? ह्या नांवाच्या अबला, पण खऱ्या प्रबला काय करूं शकणार नाहींत?

चौ०—का सुनाइ बिधि काह सुनावा।
का देखाइ चह काह देखावा।

दैवानें ऐकवलें काय? आणि आतां तो ऐकवत

आहे काय! दाखवीत होता काय, आणि आज दाखवीत आहे काय!"

एक कहहिँ भल भूप न कीन्हा।
बर बिचारि नहिँ कुमतिहि दीन्हा।
जो हठि भयउ सकल दुखभाजनु।
अबलाबिबस ग्यान गुन गा जनु।

कोणी ह्मणत कीं, "राजानें हें ठीक केलें नाहीं. त्यानें या सूडसईस विचारपूर्वक वर दिला नाहीं. या एकरुख्यानें हेकेखोरपणानें स्वतःस दुःखांत डुबवून घेतलें. यास कारण याचा हाच हा बाईल-बुद्धया. म्हणून तर याच्या गुणविवेकांचें खोबरें झालें.

एक धरमपरमिति पहिचाने।
नृपहि दोसु नहिँ देहिँ सयाने।
सिबि–दधीचि–हरिचंद–कहानी।
एक एक सन कहहिँ बखानी।

कोणी सुज्ञ होते ते मात्र धर्माच्या तत्त्वाचें निरीक्षण करून राजाला दोष ठेवीत नसत. ते शिबि, दधीचि, हरिश्चंद्र वगैरेंच्या इतिहासाचे दाखले देत.

एक भरत कर संमत कहहीँ।
एक उदास भाय सुनि रहहीँ।
कान मूँदि कर रद गहि जीहा।
एक कहहिँ यह बात अलीहा।
सुकृत जाहिँ अस कहत तुह्मारे।
राम भरत कहँ प्रानपियारे।

कोणी ह्मणत कीं ह्यांत भरताचेंहि अंग आहे. तें ऐकून कोणी उगेंच राहत आणि कोणी कानांत बोटें घालून आणि दातांनीं जीभ चावून ह्मणत कीं, हा केवळ खोटा आरोप आहे, तुमच्या या निंदेनें तुमचीं सुकृतें लयास जातील. अहो! भरतास राम ह्मणजे केवळ जीव कीं प्राण.

**दो०–चंद चवइ वरु अनलकन सुधा होइ बिष तूल। सपनेहुँ कबहुँ न करहिँ कछु भरत रामप्रतिकूल ॥ ४८ ॥**

एकपरी चंद्रमा अग्निकणांचा वर्षाव करील आणि अमृतदेखील विषतुल्य होईल; परंतु भरत रामाशीं स्वप्नांतरीं देखील कधींहि आणि कसलीहि आगळीक करणार नाहीं.

चौ०–एक बिधातहि दूषन देहीँ।
सुधा देखाइ दीन्ह बिषु जेहीँ।

दुसरे कित्येक विधात्यासच दूषण देऊन ह्मणत कीं, त्यानें दाखविलें तें अमृत, पण आमच्यापुढें वाढलें तें मात्र विष.

खरभरु नगर सोच सब काहू।
दुसह दाह उर मिटा उछाहू।

शहरभर खळबळाट मचला. सर्वांच्या अंतःकरणांतील उत्साह पार नाहींसे होऊन त्यांची जागा असह्य दुःख आणि संताप यांनीं भरून काढली.

बिप्रबधू कुलमान्य जठेरी।
जे प्रिय परम कैकई केरी।
लगीँ देन सिख सीलु सराही।
बचन बानसम लागहिँ ताही।

कैकेयीच्या अत्यंत लोभांतल्या अशा कुलीन आणि वृद्ध विप्रस्त्रिया तिचें शील वाखाणून तिच्याशीं शिष्टाई करूं लागल्या. परंतु त्यांचे शब्द तीस बाणासारखे रुपूं लागले.

भरत न मोहि प्रिय रामसमाना।
सदा कहहु यह सब जग जाना।
करहु राम पर सहजसनेहू।
केहि अपराध आजु बन देहू।
कबहुँ न कियहु सवति आरेसू।
प्रीतिप्रतीति जान सब देसू।
कौसल्या अब काह बिगारा।
तुह्म जेहि लागि बज्र पुर पारा।

त्या स्त्रिया म्हणाल्या, "भरतदेखील रामाइतका प्रिय नाहीं हे तुझेच नेहमींचे शब्द सर्व जगांत महशूर आहेत.. रामावर तुझें अकृत्रिम प्रेम होतें असें असतां तूंच आज त्यास एकाएकीं कोणत्या आगळीकीदाखल वनांत लोटीत आहेस? सवतीशीं तूं कधींहि मत्सर केला नाहींस. सर्व राष्ट्र तुमच्या परस्पर प्रेमाची आणि एकदिलाची ग्वाही देईल. कौसल्येनें आतांच्या आतां असें काय तुझें घोडें मारलें कीं, त्याचें उट्टें म्हणून तूं अयोध्येवर हा कहर गुजरवावास?

**दो०–सीय कि पिय सँग परिहरिहि लषनु कि रहिहहिँ धाम। राजु कि भूँजब भरत पुर नृपु कि जिइहि बिनु राम ॥४९॥**

सीता पतिसमागम सोडील काय? रामावांचून लक्ष्मण घरांत राहील काय? भरत तरी अयोध्येचें राज्य भोगील काय? आणि रामाचे पश्चात् हा राजा आपले प्राण तरी ठेवील काय?

चौ०—अस विचारि उर छाडहू कोहू ।
सोक कलंक कोटि जनि होहू ।
भरतहि अवसि देहु जुबराजू ।
कानन काह राम कर काजू ।

असा विचार करून हे थेर येथेंच पुरे कर आणि शोकाची आणि कलंकाची ढेर बनूं नकोस. तुझें अगदीं अडलेंच असेल तर भरतासच युवराजा कर, पण बिच्याऱ्या रामाच्या मागें वनवास लावण्याची एवढी खुमखुम काय म्हणून?

नाहिन राम राज के भूखे ।
धरमधुरीन बिषयरस रूखे ।
गुरुगृह बसहिं राम तजि गेहू ।
नृप सन अस बर दूसर लेहू ।

राम तुझ्या राज्याचा मुळींच हपापलेला नाहीं. तो धर्मधुरीण आणि खरा विरक्त आहे. तुझा राजवाडा सोडून रामांनीं गुरुगृहीं रहावें असा तरी राजाकडून दुसरा वर मागून घे.

जौं नहिं लगिहहु कहे हमारे ।
नहिं लागिहि कछु हाथ तुम्हारे ।
जौं परिहास कीन्हि कछु होई ।
तौं कहि प्रगट जनावहु सोई ।

जर आमचें सांगणें तुला रुचत नसेल, तर अखेरीस तुझ्याहि पण हातीं फुक्कीच लागणार. हा तुझा जर कदाचित् कांहीं दिल्लगीचा भाग असेल, तर तसें उघडउघड सांग तरी.

रामसरिस सुत कानन जोगू ।
काह कहिहि सुनि तुम्ह कहुँ लोगू ।
उठहु बेगि सोइ करहु उपाई ।
जेहि बिधि सोक कलंक नसाई ।

रामासारखा पुत्र आणि त्याच्या मागें वनवासाचा बडगा हें ऐकून तुला जन म्हणेल तरी काय ? चल आतां अशीच ऊठ, आणि जेणेंकरून आमच्या दुःखाचा अंत होईल आणि तुझीहि काळिमा धुऊन निघेल असाच कांहीं तरी इलाज अमलांत आण.

**छंद—जेहि भाँति सोक कलंक जाइ उपाय करि कुल पालही । हठि फेरु रामहिं जात बन जनि बात दूसरी चालही ॥ जिमि भानु बिनु दिन प्रान बिनु तनु चंदु बिनु जिमि जामिनी । तिमि अवध तुलसीदास प्रभु बिन समुझि धौं जिय भामिनी॥२।**

जेणेंकरून शोक आणि कलंक यांचा बडगा सुटेल अशीच गोष्ट करून आपल्या कुलाला राख आणि राम वनवासास निघालें असतां हट्टानें त्यांना अडवून धर. एरव्हीं दुसरी गोष्टच करूं नकोस. हे भामिनि ! सूर्यावांचून जसा दिवस, प्राणांखेरीज जशी कुडी, किंवा चंद्राविगळी जशी रात्र, तशीच तुलसीदासप्रभु रामचंद्रावांचून ही अयोध्या ही तूं मनांत पुरतेपणीं याद राख.

**सो०—सखिन्ह सिखावन दीन्ह सुनत मधुर परिनाम हित । तेइ कछु कान न कीन्ह कुटिल प्रबोधी कूबरी ॥ २ ॥**

याप्रमाणें तिच्या मैत्रिणींनीं तिला श्रवणमधुर आणि परिणामीं हितकर असा बोध केला. परंतु कुटिलपणांत कुब्जेची पक्की शार्गिर्द बनलेल्या कैकयीनें तिकडे कानहि केला नाहीं.

चौ०—उतरु न देइ दुसह रिस रूखी ।
मृगिन्ह चितव जनु बाघिनि भूखी ।
ब्याधि असाधि जानि तिन्ह त्यागी ।
चलीं कहत मतिमंद अभागी ।
राज करत यह दैव बिगोई ।
कीन्हेसि अस जस करइ न कोई ।

तिनें जबाब तर दिलाच नाहीं, पण उलट ( त्यांच्या उपदेशामुळें ) तिचा क्रोध मात्र अनावर होऊन ती त्यांचेकडे, बुभुक्षित वाघीण जशी हरणीकडे पाहते, तद्वत् कटाक्षानें पाहूं लागली. हें पाहून त्या स्त्रियांनीं व्याधि असाध्य समजून तिचा पिच्छा सोडला, आणि " चांगली राजवट भोगीत असतां ह्या मुर्दाड करंटीस दुर्दैवानेंच घेरलें. कोणीहि करण्यास धजणार नाहीं, असें हें खूळ इनें माजविलें " असें बोलत बोलत त्या निघून गेल्या.

एहि बिधि बिलपहिं पुर-नर-नारी ।
देहिं कुचालिहि कोटिक गारी ।
जरहिं बिषमजर लेहिं उसासा ।
कवनि राम बिन जीवन आसा ।
बिपुल बियोग प्रजा अकुलानी ।
जनु जल-चर-गन सूखत पानी ।

ह्याप्रमाणें नगरांतील सर्व स्त्रीपुरुष आक्रोश करून त्या सूडसई कैकेयीवर शिव्यांची लाखोली वाहूं लागले. अति तीव्र संतापानें त्यांचा अगदीं भडका

होऊन ते श्वास टाकून म्हणूं लागले कीं, रामावांचून कोणच्या आशेवर आम्हीं जगावें ? पाणी आटून गेल्यावर ज्याप्रमाणें जलचर त्याप्रमाणें भावी दीर्घ वियोगामुळें प्रजा व्याकुळ होऊं लागली.

अतिबिषादबस लोग लोगाई ।
गये मातु पाहिँ राम गोसाईँ ।
मुखप्रसन्न चित चौगुन चाऊ ।
मिटा सोच जानि राखइ राऊ ।

सर्व स्त्रीपुरुष दुःखानें अगदीं विव्हळ झाले. इकडे प्रभु रामचंद्र मातेकडे गेले. त्यांचे मुखावर प्रसन्नता स्पष्ट दिसत असून त्यांच्या चित्ताचा उत्साह चौपट वाढला होता. आपणांस राजाचा अडथळा होणार नाहीं, अशा खात्रीवर ते अगदीं निश्चित होते.

## दो०—नवगयंद रघुबीरमन राजु अलान-समान । छूट जानि बनगवन सुनि उर अनंद अधिकान ॥ ५० ॥

रघुवीराच्या मनास राज्यरूप शृंखला तुटून वनगमनाची आज्ञा ऐकतांच बालगजेंद्राप्रमाणें आंतल्या आंत उत्तरोत्तर आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या.

चौ०--रघु--कुल--तिलक जोरि दोउ हाथा ।
मुदित मातुपद नायउ माथा ।
दीन्हि असीस लाइ उर लीन्हे ।
भूषनबसन निछावरि कीन्हे ।
बारबार मुख चुंबति माता ।
नयन नेहजलु पुलकित गाता ।

त्या रघुकुलतिलकानें आनंदानें दोन्ही हात जोडून मातुःश्रीचे चरणीं मस्तक नमाविलें. तिनें त्यास आशीर्वाद दिला आणि उचलून हृदयाशीं कवटाळिलें. तिनें रामावरून वस्त्रालंकार उतरून टाकिले आणि ती वरचेवर त्याचें मुखचुंबन करूं लागली. तिच्या नेत्रांत प्रेमाश्रू येऊन अंगावर रोमांच उभे राहिले.

गोद राखि पुनि हृदय लगाये ।
स्त्रवत प्रेम रस पयद सुहाये ।
प्रेमप्रमोद न कछु कहि जाई ।
रंक धनदपदबी जनु पाई ।
सादर सुंदरबदन निहारी ।
बोली मधुरबचन महतारी ।

त्यास अंकावर घेऊन फिरून तिनें त्यास आलिंगन दिलें. प्रेमातिरेकामुळें तिच्या स्तनांतून भरारून दुग्धस्राव होऊं लागला. कुबेरपदवीस चढलेल्या रंकाप्रमाणें तिचा प्रेमानंद अगदीं वर्णनातीत झाला. त्या सुंदर वदनाकडे अत्युत्कंठेनें न्याहाळून ती लडिवाळ शब्दांनीं बोलूं लागली.

कहहु तात जननी बलिहारी ।
कबहिँ लगन मुद--मंगल--कारी ।
सुकृत सील सुख सींव सुहाई ।
जनमलाभ कइ अवधि अघाई ।

"बाळा ! बोल कीं रे. हा जीव तुजवरून ओवाळून टाकावा. पुण्यशील, सुखांची केवळ सीमाच आणि जन्मलाभाची केवळ अंतिम मर्यादाच असा तो माझे सुखसोहळे पुरविणारा मुहूर्त तरी केव्हां आहे रे ?

## दो०—जेहि चाहत नरनारि सब अतिआरत एहि भाँति । जिमि चातक चातकि त्रिपित बृष्टि सरद रितु स्वाति ॥ ५१ ॥

शरदृतूंत स्वातीबिंदूची ज्याप्रमाणें तृषार्त चातक मार्गप्रतीक्षा करितात त्याप्रमाणें त्या सुमुहूर्ताची सर्व प्रजाजन अतिशय उत्सुकतेनें वाट बघत आहेत.

चौ०—तात जाउँ बलि बेगि नहाहू ।
जो मन भाव मधुर कछु खाहू ।
पितुसमीप तब जायहु भैया ।
भइ बडि बार जाइ बलि मैया ।

पिल्या ! लवकर जाऊन मंगलस्नान कर आणि तुला आवडेल तें कांहींतरी खा आणि नंतर पित्याकडेस जा. तान्हुल्या ! आधींच उशीर फार झाला आहे. ही मी तुझी आई स्वतःस तुझ्यावरून ओवाळून टाकीत आहे. ( जाइ बलि—ही तद्देशीय स्त्रीजनाची भाषापद्धति आहे. )

मातुवचन सुनि अतिअनुकूला ।
जनु सनेह—सुर—तरु—के फूला ।
सुखमकरंद भरे स्रियमूला ।
निरखि राम—मन—भँवर न भूला ।
धरमधुरीन धरमगति जानी ।
कहेउ मातु सन अति—मृदु—बानी ।

जणूंकाय प्रेमरूपी कल्पवृक्षाचीं फुलेंच झडताहेत असे ते मातेचे अत्यंत लडिवाळ बोल ऐकून आणि त्यांत भरलेला श्रीमूलक सुखरूपी मकरंद सेवन करून देखील रामचंद्रांचा मनोभृंग त्याजवर हुरळला

नाहीं. त्या धर्मधुरंधरानें धर्मपथाचें पर्यालोचन करून अति आर्जवयुक्त वाणीनें भाषणास प्रारंभ केला.

पिता दीन्ह मोहि काननराजू।
जहँ सब भाँति मोर बड काजू।
आयसु देहि मुदितमन माता।
जेहि मुदमंगल कानन जाता।
जनि सनेह बस डरपसि भोरे।
आनँदु अंब अनुग्रह तोरे।

" पित्यानें माझ्या अत्यवश्यक कर्तव्याचें विशाल क्षेत्र असें अरण्याचें राज्य मला अर्पण केलें आहे. माते ! प्रसन्न अंतकरणानें मला आज्ञा दे, म्हणजे तेणेंकरून अरण्यांतहि गेलों असतां तें मला आनंदमय आणि मंगलमय होईल. पुत्रप्रेमाच्या अंकित होऊन चुकून देखील तूं डगूं नकोस. आई ! तुझ्या आशीर्वादानें मी तेथेंहि आनंदांतच राहीन.

दो०—बरष चारि दस बिपिन बसि करि पितु–
बचन–प्रमान। आइ पाय पुनि देखिहउँ
मन जनि करसि मलान ॥ ५२ ॥

चौदा वर्षें अरण्यवास करून आणि पित्याची प्रतिज्ञा सत्य करून मी परत येईन आणि तुझ्या चरणांचें दर्शन घेईन; तूं मात्र आपलें मन उदास करूं नकोस. "

चौ०—बचन बिनीत मधुर रघुबर के।
सरसम लगे मातुउर करके।
सहमि सूखि सुनि सीतलबानी।
जिमि जवास पर पावस पानी।

रघुवराचे त्या मधुर आणि विनीत शब्दांनीं देखील कौसल्येच्या काळजास घरे पडले. ते शब्द शीतलच होते, परंतु ते ऐकतांच ' जवास '[1] च्या झाडावर पावसाचें पाणी पडल्याप्रमाणें होऊन ती विरघळून सुकूनच गेली.

कहि न जाइ कछु हृदय बिषादू।
मनहुँ मृगी सुनि केहरिनादू।
नयन सजल तन थरथर काँपी।
माँजहि खाइ मीन जनु माँपी।

तिच्या अंतःकरणांतलें दुःख सांगतां येणें शक्य नाहीं. सिंहाची गर्जना ऐकून हरिणीची जशी स्थिति होते तद्वतच तिची अवस्था झाली. तिचे नेत्र अश्रूंनीं डबडबले आणि अंगांस थरकांप सुटला. असें वाटे कीं, नव्या पाण्याच्या फेंसांत मासोळीच अडकली आहे.

धरि धीरज सुतबदन निहारी।
गदगदबचन कहति महतारी।

तथापि अवसान आणून तिनें पुत्रमुखाकडे पाहिलें आणि ती सद्गदवाणीनें बोलूं लागली.

तात पितहि तुम्ह प्रानपियारे।
देखि मुदित नित चरित तुम्हारे।
राज देन कहँ सुभदिन साधा।
कहेउ जान बन केहि अपराधा।
तात सुनावहु मोहि निदानू।
को दिनकरकुल भयउ कृसानू।

कौसल्या म्हणाली, " माझ्या पित्या, तुझ्या पित्यास तर तूं प्राणापरीस प्रिय होतास, तुझें चरित्र पाहून त्यास सदोदित हर्ष होत होता, तुला राज्याभिषेक करण्यासाठीं त्यांच्याच कडून शुभ मुहूर्त धरण्यांत आला, असें असूनहि कोणत्या कसूरासाठीं तुला वनांत जाण्याची तिकडची आज्ञा होत आहे ? ह्यांतलें इंगित तरी, माझ्या छबिल्या ! मला कळूं दे ! आमच्या सूर्यकुळाची राखरांगोळी करणारा हा अग्नि कोण प्रसवला ?

दो०—निरखि रामरुख सचिवसुत कारन
कहेउ बुझाइ। सुनि प्रसंग रहि मूक जिमि
दसा बरनि नहिं जाइ ॥ ५३ ॥

हें ऐकून रामाची मर्जी ओळखून अमात्यपुत्रानें कौसल्येला कारण समजावून सांगितलें. तो प्रसंग ऐकतांच ती स्थाणुस्तब्ध झाली. तिच्या त्या दशेचें वर्णन करणें शक्य नाहीं.

चौ०—राखि न सकइ न कहि सक जाहू।
दुहूँ भाँति उर दारुन दाहू।
लिखत सुधाकर गा लिखि राहू।
बिधिगति बाम सदा सब काहू।
धरम सनेह उभय मति घेरी।
भइ गति साँप छछूंदरि केरी।

ती रामास ठेवून घेण्यासहि धजेना व तिच्यानें जाहि म्हणवेना. उभयपक्षीं तिच्या अंतःकरणाचा भयंकर भडका होऊं लागला. ब्रह्मदेव ललाटावर चंद्र काढणार होता, परंतु त्याऐवजीं तो राहूच

[1] जवास ही एक निराळीच वनस्पति आहे. ती जवस नव्हे.

काढून गेला. हे त्याचे खेळ सदाच सर्वांसच नाडतात. स्त्रीधर्म आणि पुत्रवात्सल्य ह्या दोहोंनीं तीस मंत्रमुग्ध केलें. सापचिचुंद्रीप्रमाणें तिची अवस्था झाली.

राखउँ सुतहि करउँ अनुरोधू।
धरम जाइ अरु बंधुबिरोधू।
कहउँ जान बन तौ बडि हानी।
संकठ–सोच–बिबस भइ रानी।

रामाचा निरोध करून त्याला ठेवून घ्यावें तर स्त्रीधर्मास मुकावें लागणार आणि आपसांत दुही माजणार. बरें, जर वनास जाण्याकरितां आज्ञा द्यावी तरीहि (दशरथप्राणभयामुळें) मोठाच घात होणार. ह्याप्रमाणें संकट आणि शोक यांच्या कैचींत कौसल्या सांपडली[२].

बहुरि समुझि तियधरम सयानी।
रामभरत दोउ सुत सम जानी।
सरलसुभाउ राममहतारी।
बोली बचन धीर धरि भारी।

परंतु कौसल्या ही सुज्ञ आणि सरळस्वभावाची होती. रामाचीच आई ती, तिनें अखेर स्त्रीधर्मावरच भिस्त ठेवून, आणि राम व भरत या दोन्ही पुत्रांना समसमान लेखून खूपच हिंमतीनें तिनें बोलण्यास प्रारंभ केला.

तात जाउँ बलि कीन्हेहु नीका।
पितुआयसु सब धरम क टीका।

बच्चू रे! फारच योग्य केलेंस. मी तुजवरून आपला देह ओवाळून टाकतें. पित्राज्ञा पालन करणें हाच सर्व धर्मांत श्रेष्ठ धर्म होय.

**दो०–राजदेन कहि दीन्ह बन मोहि न सो दुखलेसु। तुम्ह बिनु भरतहि भूपतिहि प्रजहि प्रचंड कलेसु॥ ५४॥**

राज्य देतों म्हणून वनवास दिला याबद्दल मला रतिमात्र देखील दिक्कत वाटत नाहीं. परंतु तुझ्या-वांचून भरताला, महाराजांना आणि प्रजेला मात्र प्रचंड क्लेश भोगावे लागणार!

चौ०–जौँ केवल पितुआयसु ताता।
तौ जनि जाहु जानि बडि माता।
जौँ पितुमातु कहेउ बन जाना।
तौ कानन सत–अवध–समाना।

बेटू! जर ही केवळ पित्याचीच आज्ञा असेल तर मातेसच अधिक मानून तूं जाऊंहि पण नकोस. परंतु वनवासाबद्दल जर उभयतांचीहि आज्ञा आहे तर मात्र तुला अरण्यच शंभर अयोध्यांप्रमाणें समजलें पाहिजे.

पितु बनदेव मातु बनदेवी।
खग मृग चरनसरोरुह सेवी।
अंतहु उचित नृपहि बनबासू।
बय बिलोकि हिय होइ हरासू।
बडभागी बन अवध अभागी।
जो रघु–बंस–तिलक तुम्ह त्यागी।

वनांतील देव आणि देवता हेच तुझे मातापिता आणि तेथील पशुपक्षी हेच तुझ्या चरणकमलाचे सेवक होत. राजास वनवास हा योग्यच, परंतु तो उतारवयांत. म्हणूनच तुझ्या वयाकडे पाहून जीवाला अंमळ हुरहूर वाटते! त्वां रघुवंशतिलकानें त्यागिलेली ही अयोध्या आज करंटी होणार आणि वनाचेंच भाग्य खूप खुलणार.

जौँ सुत कहउँ संग मोहि लेहू।
तुम्हरे हृदय होइ संदेहू।
पूत परमप्रिय तुम्ह सबही के।
प्रान प्रान के जीवन जी के।
ते तुम्ह कहहु मातु बन जाऊँ।
मैं सुनि बचन बैठि पछिताऊँ।

बाळ! मलाहि बरोबर घेऊन जाण्याबद्दल मी म्हणेन तर तुझ्याहि मनांत शंका होईल. लाडक्या! परमप्रिय, अखिल प्राणांचाहि प्राण आणि जीवांचाहि जीव, असा तूं 'माते, वनांत जाऊं?' म्हणून विचारीत आहेस आणि ते शब्द ऐकून मी बसल्याच जागीं नुसता दुःखाचा धोंडा उराशीं बांधून जगणार ना!

**दो०–यह बिचारि नहिँ करउँ हठ झूठ सनेह बढाइ। मानि मातु कर नात बलि सुरति बिसरि जनि जाइ॥ ५५॥**

१ अशी म्हण आहे कीं सापानें चिचुंद्रीस गिळिलें तर तो मरतो आणि तिला ओकून टाकली तर तिच्या वासानें त्याचे डोळे जातात.

२ इतर सर्व रामायणापेक्षां तुलसीदास आपल्या कौसल्येस किती उदात्त करतात तें आमच्या मानसहंसांतल्या भूमिका परिचयावरून स्पष्ट होईल.

हाच विचार मनांत आणून मी तुला आग्रह करीत नाहीं. कारण स्नेह वाढविणें हें तरी मिथ्याच आहे, तूं तरी मात्र मातेचें नातें बलिष्ठ समजून आपल्या हृत्पटलावरून आपल्या आईचें नांव खोडून काढूं नकोस. ( मी मातृधर्म सोडला, परंतु तूं तरी पुत्रधर्म सोडूं नकोस असा भाव. )[1]

चौ०—देव पितर सब तुम्हहिँ गोसाईँ ।
राखहु नयन पलक की नाईँ ।
अवधि अंबु प्रियपरिजन मीना ।
तुम्ह करुनाकर धरमधुरीना ।
अस बिचारि सोइ करहु उपाई ।
सबहि जिअत जेहि भेँटहु आई ।

पापणी ज्याप्रमाणें डोळ्याला जपते त्याप्रमाणें देव, पितर, महात्मे, वगैरे सर्व तुला जपीत ! ही चौदा वर्षांची अवधि म्हणजे एक अथाह डोह आहे, तुझा हा प्रियपरिवार त्यांतील मीनाप्रमाणें आहे, आणि तूं स्वतः दयासागर धर्मधुरंधर आहेस, या विचारानें तूं अशीच योजना केली पाहिजे कीं, जेणेंकरून सर्वांच्या जिवंतपणींच तूं येऊन त्यांच्या डोळ्यांचे पांग फेडशील.

जाहु सुखेन बनहिँ बलि जाऊँ ।
करि अनाथ जन-परिजन गाऊँ ।
सब कर आजु सुकृतफल बीता ।
भयउ करालकाल बिपरीता ।

मी हा जीव तुजवरून ओवाळून टाकतें. प्रजा, परिजन आणि अयोध्या ह्या सर्वांस अनाथ करून तूं सुखानें वनांत जावें ! आज सर्वांचीच पुण्याई खलास झाली ! क्रूर काळानेंच आज पलटी खाल्ली आहे ! ”

बहुबिधि बिलपि चरन लपटानी ।
परमअभागिनि आपुहि जानी ।
दारुन—दुसह—दाह उर ब्यापा ।
बरनि न जाइ बिलापकलापा ।
राम उठाइ मातु उर लाई ।
कहि मृदुबचन बहुरि समुझाई ।

असा पुष्कळ प्रकारें विलाप करून आणि स्वतःस अत्यंत दुर्दैवी समजून तिनें रामचरणांस मिठी मारिली. भयंकर व अनावर दुःखानें तिचें हृदय व्याप्त झालें. तिचा तो विशाल विलाप वर्णन करणें शक्य नाहीं. रामानें मातेस उचलून तिला हृदयाशीं धरिलें आणि कळवळ्यानें बोलून तिची समजूत घातली.

**दो०—समाचार तेहि समय सुनि सीय उठी अकुलाइ । जाइ सासु पद-कमल-जुग बंदि बैठि सिरु नाइ ॥ ५६ ॥**

तशांतच तें वर्तमान ऐकून सीता घाबरून उठली आणि ( इकडे कौसल्येकडे ) येऊन सासूच्या पद-कमलयुगुलास नमस्कार करून ती खालीं मान घालून बसली.

चौ०—दीन्हि असीस सासु मृदुबानी ।
अतिसुकुमारि देखि अकुलानी ।

सासूनें तीस प्रेमळ आशीर्वाद दिले. त्या अत्यंत सुकुमारीस पाहून ती फारच कळवळली.

बैठि नमित मुख सोचति सीता ।
रूपरासि पति—प्रेम—पुनीता ।
चलन चहत बन जीवननाथू ।
केहि सुकृती सन होइहि साथू ।
की तनु प्रान कि केवल प्राना ।
बिधि करतब कछु जाइ न जाना ।

खालीं मान घालून बसली असतां ती लावण्य-लतिका पतिप्रिय महासाध्वी सीता विचारांत पडली कीं, ह्या प्राणाचे धनी वनवासास जाण्याच्या तयारींत आहेत, तर कोणत्या पुण्याईनें बरें यांचा समागम घडेल ! देह आणि प्राण ह्या दोघांसहि त्यांचा सहवास घडणार किंवा केवळ एकट्या प्राणा-सच ! ब्रह्मलिखित कांहीं केल्या जाणवत नाहीं.

चारु चरननख लेखति धरनी ।
नूपुरमुखर मधुर कबि बरनी ।
मनहुँ प्रेमबस बिनती करहीँ ।
हमहिँ सीयपद जनि परिहरहीँ ।

सीता आपल्या सुंदर चरणनखांनीं जमीन खरडीत असतां तिच्या पैंजणांचा मधुर आवाज होत होता. ( त्यांवर कवींनीं ही उत्प्रेक्षा केली कीं ) जणुं-काय सीतेच्या चरणांनीं पैंजणांचा त्याग न करावा एतदर्थ ते जे अगदीं काकुळतीनें त्यांचें आर्जव करूं लागले त्यांचीच ती कुजबुज होय.

मंजुबिलोचन मोचति बारी ।
बोली देखि राममहतारी ।

[1] ‘ स्मर्तव्यो महदादरेण भवता यावत्पुनर्दर्शनम् ’ या वचनाला कवीनें हा अत्यंत प्रसंगोचित पहिराव चोज करण्यासारख्या भावानें दिला आहे.

तात सुनहु सिय अतिसुकुमारी ।
सासु–ससुर–परिजनहिँ पियारी ।

ती आपल्या रमणीय नेत्रांतून अश्रु ढाळीत आहे असें पाहून रामजननी कौसल्या म्हणाली, "बा रामा! ऐक; सीता अतिशय सुकुमार सासूसासऱ्यांची आणि इतर सर्व मंडळींची फारच लाडकी,

**दो०–पिता जनक भूपालमनि ससुर भानु–कुल–भानु। पति रवि-कुल-कैरव-बिपिन-बिधु गुन–रूप–निधानु ॥ ५७ ॥**

राजर्षिश्रेष्ठ जनक हिचा पिता, सूर्यकुलांतील अपर सूर्यच असा (दशरथ) हिचा श्वशुर, आणि रघु-कुलरूप कमलवनाला चंद्राप्रमाणें असणारा आणि गुण व रूप यांचें निधान असा तूं हिचा पति आहेस.

चौ०–मैँ पुनि पुत्रबधू प्रिय पाई ।
रूपरासि गुन सील सुहाई ।
नयनपुतरि कर प्रीति बढाई ।
राखउँ प्रान जानकिहिँ लाई ।

माझी ही स्नुषा रूपाची केवळ खाण आणि गुण–शीलांनीं सर्वोत्कृष्ट असल्यामुळें मला अत्यंत प्रिय आहे. डोळ्यांतील बाहुलीप्रमाणें मी तिजवर प्रेम करीत आलें. मी आतां हे प्राण ठेवावयाचे म्हणजे ह्या जानकीच्याच आधारानें.

कलपबेलि जिमि बहुबिधि लाली ।
सीँचि सनेहसलिल प्रतिपाली ।
फूलत फलत भयउ बिधि बामा ।
जानि न जाइ काह परिनामा ।

कल्पलतेप्रमाणें मीं हिचें परोपरीनें लालन केलें आणि प्रेमजलाचें सिंचन करून हिचा प्रतिपाळ केला पण ऐन फुलण्याच्या व फळण्याच्या बेतांतच दैवानें वैर साधिलें! याचा परिणाम काय होईल ह्याचा तर्कच चालत नाहीं.

पलँग पीठ तजि गोद हिँडोरा ।
सिय न दीन्ह पग अवनिकठोरा ।
जिवनमूरि जिमि जोगवत रहऊँ ।
दीपबाति नहिँ टारन कहऊँ ।

पलंगावरून पाटावर आणि मांडीवरून झोपाळ्यावर वागवलेल्या ह्या सीतेनें अजूनपर्यंत ह्या निब्बर भूमीस पायदेखील लावला नाहीं. प्राणसंजीविनीप्रमाणें हीस मी जपत आलें. दिव्याची वात देखील सारण्यास मी हिला सांगितलें नाहीं.

सोइ सिय चलन चहति बन साथा ।
आयसु काह होइ रघुनाथा ।
चंद–किरिन–रस–रसिक चकोरी ।
रबिरुख नयन सकइ किमि जोरी ।

ती ही जानकी, हे रघुनाथा! तुझ्याबरोबर वनाला येण्याचा हव्यास धरीत आहे. तर हिला काय आज्ञा आहे ती सांग. चंद्रकिरणांच्या अमृतरसांत रंगलेली चकोरी सूर्याकडे टक लावून पाहूं शकेल काय?

**दो०–करि केहरि निसिचर चरहिँ दुष्ट जंतु बन भूरि। बिषबाटिका कि सोह सुत सुभग सजीवनि मूरि ॥ ५८ ॥**

अरण्यांत गज, सिंह, राक्षस आणि हिंस्र प्राणी यांचाच सुळसुळाट असतो. बाळा! संजीवनी औषधीच्या नाजूक रोपड्यांस विषारी झाडांची बाग मानवेल काय?

चौ०–बनहित कोल किरात किसोरी ।
रची बिरंचि बिषय–सुख–भोरी ।
पाहन कृमि जिमि कठिन सुभाऊ ।
तिन्हहिँ कलेसु न कानन काऊ ।

ज्यांना भोगविलासाचें वारें देखील ठाऊक नाहीं अशा कोळ्यापारध्यांच्या मुलीबाळीच वनांत राहण्यासाठीं ब्रह्मदेवानें घडविल्या आहेत. कृमि-पाषाणांप्रमाणें ज्या स्वभावतःच कठोर त्यांनाच अरण्यांत कधीं कोणतेहि क्लेश वाटत नाहींत.

कै तापसतिय काननजोगू ।
जिन्ह तपहेतु तजा सब भोगू ।

किंवा ज्यांनीं तपार्थ सर्व भोगांचा त्याग केला आहे अशा तपस्व्यांच्या स्त्रिया अरण्यवासास योग्य होत.

सिय बन बसिहि तात केहि भाँती ।
चित्रलिखित कपि देखि डेराती ।
सुर–सर–सुभग बनज–बन–चारी ।
डाबर जोग कि हंसकुमारी ।
अस बिचारि जस आयसु होई ।
मैँ सिख देउँ जानकिहि सोई ।

रामा! जानकीचा कोणत्या रीतीनें वनांत निभाव लागणार? ती तर माकडाचें चित्र पाहूनदेखील भेदरणारी आहे. मानससरोवरांतील रमणीय कमलवनांत विहार करणारी हंसकुमारी डबक्यांत शोभेल

काय ? असा विचार करून जशी तुझी आज्ञा होईल त्याप्रमाणें मी जानकीस चार गोष्टी सांगेन. ''

जौं सिय भवन रहइ कह अंबा।
मोहि कहँ होइ बहुत अवलंबा।

कौसल्या अखेर म्हणाली कीं, " सीता जरी घरीं राहिली तरीदेखील मला पुष्कळच दिवसा वाटेल."

सुनि रघुबीर मातु–प्रिय–बानी।
सलि सनेह सुधा जनु सानी।

**दो०–कहि प्रियवचन बिबेकमय कीन्ह मातुपरितोष। लगे प्रबोधन जानकिहि प्रगटि बिपिन गुन दोष॥ ५९॥**

शीलस्नेहरूप अमृतानें ओथंबलेली अशी ती मातेची प्रियवाणी ऐकून रघुवीरांनींहि प्रेमळ आणि विवेकयुक्त भाषण करून मातेचें समाधान केलें, आणि जानकीस वनाचे गुणदोष स्पष्ट करून बोध करण्यास सुरुवात केली.

चौ०–मातुसमीप कहत सकुचाहीं।
बोले समउ समुझि मनमाहीं।

मातेच्या समक्ष सीतेशीं बोलण्यास रामाला संकोच वाटला, परंतु मनांत प्रसंगाचा विचार करून त्यांनीं बोलण्यास प्रारंभ केला.

राजकुमारि सिखावन सुनहू।
आन भाँति जिय जनि कछु गुनहू।
आपन मोर नीक जौं चहहू।
बचन हमार मानि गृह रहहू।

राम म्हणाले, हे राजकुमारी! माझा उपदेश ऐक; भलभलतेंच कांहीं तरी मनांत आणूं नकोस. तुझें व माझें हित व्हावें अशी जर तुझी इच्छा असेल, तर माझ्या सांगीला मान देऊन तूं घरींच रहा.

आयसु मोरि सासुसेवकाई।
सबबिधि भामिनि भवन भलाई।
एहि तें अधिक धरमु नहिं दूजा।
सादर सासु–ससुर–पद–पूजा।

तूं सासवांची सेवा करीत रहावें हीच माझी तुला आज्ञा आहे. हे भामिनि! तूं घरीं राहिल्यानेंच सर्वतोपरी तुझें कल्याण आहे. सासूसासऱ्यांच्या चरणांची आदरपूर्वक सेवा करणें ह्यापरता अन्य श्रेष्ठ धर्मच नाहीं.

जब जब मातु करिहि सुधि मोरी।
होइहि प्रेमबिकल मतिभोरी।
तब तब तुम्ह कहि कथा पुरानी।
सुंदरि समुझायेहु मृदुबानी।

जेव्हां जेव्हां म्हणून माझ्या माता माझी आठवण करतील आणि माझ्या प्रेमानें विव्हल होऊन दिङ्मूढ होतील, त्या त्या वेळीं, हे सुंदरि! पुराणकथा सांगून आपल्या रसाळ वाणीनें तूं त्यांचें सांत्वन करीत जा.

कहउँ सुभाय सपथ सत मोही।
सुमुखि मातुहित राखउँ तोही।

मीं अगदीं मनापासून शतवार शपथ घेऊन सांगतों कीं, तुला मी जें ठेवीत आहें तें केवळ ह्या माझ्या मातेच्यासाठींच समज.

**दो०–गुरु-स्रुति-संमत धरमफल पाइअ बिनहिं कलेस। हठबस सब संकट सहे गालव नहुष नरेस॥ ६०॥**

गुरु आणि श्रुति यांना संमत अशा धर्मसाधनाचें जें साध्य तें तुला अनायासेंकरून सिद्ध होत आहे. एकरुखीपणानें गालव मुनि, राजा नहुष इत्यादि सर्वांनीं स्वतःवर संकटेंच ओढवून घेतलीं होतीं.

चौ०–मैं पुनि करि प्रमान पितुबानी।
बेगि फिरब सुनु सुमुखि सयानी।
दिवस जात नहिं लागिहि बारा।
सुंदरि सिखवन सुनहु हमारा।
जौं हठ करहु प्रेमबस बामा।
तौ तुम्ह दुख पाउब परिनामा।

---

१ गालवाची कथा भारतांत उद्योगपर्वांत आहे. त्यानें गुरु निवारण करीत असतांहि हट्टानें गुरुदक्षिणा मागण्याबद्दल त्यांस आग्रह केला. त्याचा हट्ट पाहून गुरूंनीं ८०० श्यामकर्ण अश्व दक्षिणेदाखल मागितले! गरुडाच्या साह्यानें त्यानें गुरुदक्षिणा आणिली, परंतु त्यास अतोनात कष्ट सोसावे लागले. त्याचप्रमाणें राजा नहुषाची कथाहि भारतांत वनपर्वांत आहे. दधीचीच्या मृत्यूनें इंद्रास ब्रह्महत्या लागून त्यास लपून बसावें लागलें, त्याच्या ऐवजीं नहुषास इंद्रपदीं कायम केलें. त्यानें इंद्राणीबद्दल दुराग्रह धरिला आणि अखेरीस अगस्त्यमुनींच्या शापानें तो अजगर होऊन पडला. पुढें युधिष्ठिरानें त्याचा उद्धार केला.

पित्याची वाणी सत्य करून मीहि फिरून लवकरच परततों. प्रिये ! ऐक, तुला कळतेंच आहे. दिवस जाण्यास उशीर लागत नाहीं. सुंदरि ! माझें सांगणें ऐक. इतक्याउप्परहि जर हट्टच धरून प्रेमामुळें माझ्या इच्छेच्या आड येशील तर परिणामीं तुला दुःख भोगावें लागेल.

कानन कठिन भयंकर भारी ।
घोर घाम हिम बारि बयारी ।
कुस कंटक मग काँकर नाना ।
चलब पयादेहिँ बिनु पदत्राना ।
चरनकमल मृदु मंजु तुह्मारे ।
मारग अगम भूमिधर भारे ।
कंदर खोह नदी नद नारे ।
अगम अगाध न जाहिँ निहारे ।
भालु बाघ बृक केहरि नागा ।
करहिँ नाद सुनि धीरज भागा ।

अरण्य म्हणजे अतिशयच दुःसह आणि भयंकर असतें. तेथें ऊन, थंडी, वारा, पाऊस, सगळेच कडक असतात. रस्त्यांत गवत, कांटे, दगड हे रगड आणि त्यांतून पायीं आणि अनवाणीच चालावें लागेल. त्यांतून तुझीं पावलें कमळासारखीं मृदु आणि नाजूक आणि रस्ते अगदींच पहाडी आणि अगम्य असे. दऱ्या, खोरीं, नद्या, नद, नाले हेहि अथाक आणि दुस्तर. कोठें दृष्टिदेखील ठरत नाहीं. अस्वलें, वाघ, सिंह, लांडगे, नाग वगैरे हिंस्र पशू इतक्या भयंकर आरोळ्या ठोकतात, कीं त्या ऐकतांच ऐकणाराची धारण पांचांवर बसते.

**दो०—भूमिसयन बलकलबसन असन कंद—**
**फल—मूल। ते कि सदा सब दिन मिलहिँ**
**समय समय अनुकूल ॥ ६१ ॥**

अरण्यांत निजण्यास भूमि, नेसण्यास वल्कलें आणि खाण्यास कंदमुळें आणि फळें, हा थाट ! तीं तरी नेहमीं एकसारखीं मिळतात ? त्यांचीहि गांठ वेळप्रसंगानेंच पडावयाची.

चौ०—नरअहार रजनीचर चरहीँ ।
कपटवेष बिधि कोटिक करहीँ ।
लागइ अति पहार कर पानी ।
बिपिन बिपति नहिँ जाइ बखानी ।

आदमखोर कोट्यवधि खोटे वेषधारी राक्षसांचा तेथें बुजबजाट असतो. पाणी मिळतें तें डोंगरी आणि विषारी. अरण्यांतील संकटांचें वर्णन करवें शक्यच नाहीं.

ब्याल कराल बिहँग बन घोरा ।
निसि—चर—निकर नारि—नर—चोरा ।
डरपहिँ धीर गहन सुधि आये ।
मृगलोचनि तुह्म भीरु सुभाये ।

अरण्यांतील सर्पहि पण विक्राळच, आणि पक्षी देखील अजस्रच. तेथल्या राक्षसांच्या झुंडीच्याझुंडी बायकापुरुषांनाच चोरून नेत असतात. त्यांची नुसती आठवण झाली तरी अस्सल धीरांनादेखील धडकी भरते. हे मृगाक्षि ! तूं तर जात्याच भीरु.

हँसगवनि तुम्ह नहिँ बनजोगू ।
सुनि अपजसु मोहिँ देइहि लोगू ।

हे हंसगमनी, तूं वनाच्या लायक नव्हेसच; (तुला मी नेत आहे हें) ऐकून लोक मात्र माझी खिल्ली उडवितील.

मानस—सलिल—सुधा प्रतिपाली ।
जिअइ किं लवनपयोधि मराली ।
नव-रसाल-बन बिहरनसीला ।
सोह कि कोकिल बिपिन करीला ।
रहहु भवन अस हृदय बिचारी ।
चंदबदनि दुख कानन भारी ।

मानससरोवरांतील अमृतोदकावर वाढलेली हंसी क्षारससमुद्रावर जगेल काय ? नूतन आम्रवनांत विहार करण्यास सवकलेली कोकिला करील वनांत (कांटेरी झुडपांत) साजेल काय ? असा मनांत विचार करून त्वां घरींच रहावेंस. हे चंद्रानने ! अरण्यांत दुःखांचा अगदीं कळस होतो.

**दो०—सहज सुहृद-गुर-स्वामि-सिख जो न**
**करइ सिर मानि। सो पछिताइ अघाइ**
**उर अवशि होइ हितहानि ॥ ६२ ॥**

गुरु, स्वामी आणि सहज मित्र ह्यांचा उपदेश शिरसा मान्य करून त्याप्रमाणें जो चालत नाहीं, त्याच्या हितसंबंधाची हानि अवश्य होतेच, आणि नंतर मात्र त्याचें अंतःकरण निवळून त्यास पश्चात्ताप करीत रहावें लागतें.

चौ०—सुनि मृदुबचन मनोहर पिय के ।
लोचन ललित भरे जल सिय के ।

सीतलसिख दाहक भइ कैसे ।
चकइहि सरदचंद निसि जैसे ।

प्राणपतीचें तें मृदु आणि मनोहर भाषण श्रवण करतांच सीतेचे नेत्र अश्रूंनीं डवडवले. चक्रवाकीस शरदांतील रात्रीचा चंद्र जसा तापद होतो त्याप्रमाणें रामाचा तो शीतल उपदेशहि सीतेस दाहक झाला.

उतरु न आव बिकल बैदेही ।
तजन चहत सुचि स्वामि सनेही ।
बरबस रोकि बिलोचनबारी ।
धरि धीरज उर अवनिकुमारी ।
लागि सासुपग कह कर जोरी ।
छमबि देबि बडि अबिनय मोरी ।

माझा पवित्र प्राणेश्वर मला मोकलूं इच्छीत आहे असें पाहून जानकी अगदींच बेचैन झाली. तिच्या मुखांतून उत्तर निघेना. तथापि फार शिकस्तीनें तिनें आपले अश्रु आवरून धरिले आणि मनांत धैर्य धरून ती सासूच्या चरणीं वंदन करून हात जोडून म्हणाली, "माईसाहेब ! माझ्या ह्या उनाड धट्टपणाबद्दल क्षमा असावी.

दीन्हि प्रानपति मोहि सिख सोई ।
जेहि बिधि मोर परमहित होई ।
मैं पुनि समुझि दीखि मन माहीं ।
पिय-वियोग-सम दुख जग नाहीं ।

प्राणनाथांनीं मला असाच उपदेश केला कीं, जेणेंकरून माझें सर्वतोपरी कल्याणच व्हावयाचें. परंतु फिरून मीं मनांत विचार करून पाहिलें तों पतिवियोगासारखें जगांत दुःखच नाहीं असेंहि मला वाटतें.

दो०—प्राननाथ करुनायतन सुंदर सुखद सुजान । तुम्ह बिनु रघु-कुल-कुमुद-बिधु सुरपुर नरकसमान ॥ ६३ ॥

हे कारुण्यमंदिरा ! सुंदरा ! सुखदा ! सर्वज्ञा ! हे रघुकुलकमलचंद्रा ! आपणांखेरीज स्वर्गदेखील मला नरकवत् वाटतो हो !

चौ०—मातु पिता भगिनी प्रिय भाई ।
प्रियपरिवार सुहृद समुदाई ।
सासु ससुर गुरु सजन सहाई ।
सुत सुंदर सुसील सुखदाई ।
जहँ लगि नाथ नेह अरु नाते ।
पिय बिनु तियहि तरनिहुँ ते ताते ।

आईबाप, बहीणभाऊ, इष्टमित्र, आप्तगोत, सासूसासरे, वाडवडील, मुलेंमाणसें हीं सर्व मंडळी जरी लोभाची, बाळबोध आणि कोड पुरविणारी असली तरी जोंवर भ्रतार तोंवरच त्यांचें प्रेम आणि नातें समजावें. पतिविरहित पत्नीस ते सूर्यापेक्षांहि तापद होतात.

तन धन धाम धरनि पुरराजू ।
पतिविहीन सब सोकसमाजू ।
भोग रोगसम भूषन भारू ।
जम—जातना—सरिस संसारू ।

पतीच्या अभावीं स्त्रीस, देह, गेह, धन, धरणि, गांव राज्य हीं सर्व शोकाची सामग्री होय. तीस भोगभूक रोगाप्रमाणें, भूषणें भाराप्रमाणें आणि संसार यमयातनेसारखा होय.

प्राननाथ तुम्ह बिनु जग माहीं ।
मो कहँ सुखद कतहुँ कछु नाहीं ।
जिअ बिनु देह नदी बिनु बारी ।
तइसिअ नाथ पुरुष बिनु नारी ।
नाथ सकल सुख साथ तुम्हारे ।
सरद—बिमल—बिधु—बदन निहारे ।

प्राणवल्लभा ! आपणापरतें जगांत मला सुखाचें असें कोठेंच कांहीं नाहीं बरें. प्राणावीण कुडी, जलावीण नदी, अशाचसारखी हे स्वामिन् ! पुरुषाविण स्त्री होय ! हे नाथ ! आपल्या समागमांत आपलें हें शरद्विमल चंद्रवदन पाहण्यांतच माझीं सर्व सुखें एकवटलीं आहेत.

दो०—खग मृग परिजन नगर बन बलकल बिमल दुकूल । नाथसाथ सुर-सदन-सम परनसाल सुखमूल ॥ ६४ ॥

नाथांच्या संगतींत खगमृगादिकच माझे परिजन, वनच अयोध्या, वल्कलेंच उंची शालू आणि पर्णकुटिकाच स्वर्गतुल्य वाटतील आणि तेच माझ्या सुखांचें आगर होतील.

चौ०—बनदेवी बनदेव उदारा ।
करिहहिं सासु—ससुर—सम—सारा ।
कुस—किसलय—साथरी सुहाई ।
प्रभुसँग मंजु मनोजतुराई ।

कंद मूल फल अमिअ अहारू।
अवध-सौध-सत-सरिस पहारू।
छिनुछिनु प्रभु-पद-कमल बिलोकी।
रहिहउँ मुदित दिवस जिमि कोकी।

वनदेव आणि वनदेवता मला माझ्या सासूसासऱ्यांप्रमाणेंच जिव्हाळ्यानें वागवितील, प्रभूंच्या सहवासानें कोंवळ्या कुशपत्रांची शेजच मला कामशय्येप्रमाणें मऊ वाटेल, कंद, मुळें आणि फळें ह्यांचा आहारच मला अमृत वाटेल, आणि तेथील डोंगर मला अयोध्येंतील राजमहालाच्या शतपट सुखकरच वाटतील. दिवसास पाहून चक्रवाकी जशी आनंदांत राहते तशी प्रभूंच्या चरणकमलांस क्षणोक्षणीं न्याहाळून माझाहि काळ आनंदांतच जाईल.

बनदुख नाथ कहे बहुतेरे।
भय बिषाद परिताप घनेरे।
प्रभु-बियोग-लव-लेस-समाना।
सब मिलि होहिँ न कृपानिधाना।

नाथांनीं वनसंबंधी नानाविध दुःख, भय, विषाद आणि त्रास ह्यांचा लांबलचक पाढा वाचला. परंतु हे दयाळो! ह्या सगळ्यांची बेरीज करून देखील तिचें आणि प्रभुवियोगाच्या लवलेशाचेंहि पण समीकरण बसणार नाहीं.

अस जिय जानि सुजान सिरोमनि।
लेइअ संग मोहि छाडिअ जनि।
बिनती बहुत करउँ का स्वामी।
करुनामय उर-अंतर-जामी।

हें ध्यानांत आणून हे सर्वज्ञशिरोमणे, मला न विसरतां बरोबर नेण्याचेंच करावें. मी विशेष प्रार्थना ती काय करणार? हे स्वामिन्! आपण करुणेची केवळ मूर्तीच असून सर्वांचें हृद्गतहि जाणणारे आहांत.

**दो०-राखिअ अवध जो अवधि लगि रहत जानिअहि प्रान। दीनबंधु सुंदर सुखद सील-सनेह-निधान॥ ६५॥**

आपल्या वनवासाच्या मुदतीपर्यंत हे प्राण जगतील अशीच जर आपली तंतोतंत खात्री असेल, तर हे दीनबंधो! सुंदरा! सुखदा! हे शीलस्नेहनिधाना! आपल्या या हिला अयोध्येंतच सोडणें ठीक होईल.

चौ०-मोहि मग चलत न होइहि हारी।
छिनुछिनु चरनसरोज निहारी।
सबहिँ भाँति पिय सेवा करिहउँ।
मारगजनित सकल स्रम हरिहउँ।
पाय पखारि बैठि तरुछाहीँ।
करिहउँ बाउ मुदित मनमाहीँ।
स्रम-कन-सहित स्याम तनु देखे।
कहँ दुखसमउ प्रानपति पेखे।

प्रतिक्षणीं हीं चरणकमलें पाहण्यास मिळाल्यावर वाटेनें चालतांना मला ददातच वाटावयाची नाहीं; सर्वप्रकारें मी स्वारींची व्यवस्था ठेवीन आणि वाटेंत जाणवणारे अवघे शीण नाहींसे करीन. वृक्षाच्या छायेंत बसून मी हे पाय धुईन आणि मनःपूर्वक आनंदानें विंझणा वारीन. श्रमानें घामाघुम झालेली ही श्यामतनु मी पहात असल्यावर, आणि प्राणनाथ मजकडे अवलोकन करीत असल्यावर दुःखाच्या प्रसंगाची विशादच काय?

सम महि तृन-तरु-पल्लव डासी।
पाय पलोटिहि सब निसि दासी।
बारबार मृदुमूरति जोही।
लागिहि ताति बयारि न मोही।
को प्रभुसँग मोहि चितवनि हारा।
सिंघवधुहि जिमि ससक सियारा।
मैं सुकुमारि नाथ बनजोगू।
तुम्हहि उचित तप मो कहँ भोगू।

जमीन सारखी करून आणि वर लुशलुशीत गवत आणि पानें आंथरून ही दासी सारी रात्र पाय चेपीत राहील. घडोघडीं ही सुकुमार मूर्ति न्याहाळीत असतां ऊन किंवा वारा मला मुळींच झोंबावयाचा नाहीं. सिंहिणीकडे जसा क्षुद्र ससा बघूंच शकत नाहीं, तद्वत् माझ्या मालकाच्या पुढ्यांत मी असतांना कोणाचे डोळे मजकडे फिरकूं शकतील? मी नाजुक होय आणि स्वारी मात्र वनास लायक ना! आपण योगी आणि मी भोगी? वः! फार छान्! (मला बरोबर नेण्यानें आपली अपकीर्ति आणि मी घरीं राहण्यानें माझी मात्र कीर्ति हेंच कीं? हा भाव).

**दो०-ऐसेउ बचन कठोर सुनि जौं न हृदय बिलगान। तौ प्रभु-बिषम-बियोग-दुख सहिहहिँ पाउँर प्रान॥ ६६॥**

आपले इतके जहाल शब्द ऐकूनदेखील हें माझें हृदय दुभंगलें नाहीं, म्हणूनच प्रभूंना वाटलें असावें कीं प्रभुवियोगाचें दारुण दुःख हे माझे नीच प्राण खात्रीनें पचविर्तील !

चौ०—अस कहि सीय बिकल भइ भारी ।
बचनबियोग न सकी सँभारी ।
देखि दसा रघुपति जिय जाना ।
हठि राखे नहिँ राखिहि प्राना ।

इतकें बोलून सीता फारच कासावीस झाली. बोलण्यांतला वियोग (कृतींतला नव्हे, म्हणजे 'वियोग' हा शब्द) देखील तिला सहन होईना. तिची ती स्थिति पाहून रघुपति मनांत समजले कीं आतां मात्र इला जर येथें मी इतक्यावरहि सोडलेंच तरही आपल्या प्राणांचीहि दरकार करणार नाहीं.

कहेउ कृपाल भानु-कुल-नाथा ।
परिहरि सोच चलहु बन साथा ।
नहिँ बिषाद कर अवसर आजू ।
बेगि करहु बन-गवन-समाजू ।

दयाघन रामचंद्र म्हणालेः—सीते ! निश्चिंत हो आणि मजबरोबर वनांत चल. आजची वेळ विषादाची नव्हे. हँ, हो तर मग तयार वनांत जाण्यास कशी.

कहि प्रियबचन प्रिया समुझाई ।
लगे मातुपद आसिष पाई ।

याप्रमाणें प्रियवचनानें प्रियेस संतुष्ट केल्यावर त्यांनीं मातेच्या चरणीं वंदन करून तिचे आशीर्वाद घेतले.

बेगि प्रजादुख मेटब आई ।
जननी निठुर बिसरि जनि जाई ।
फिरिहि दसा बिधि बहुरि कि मोरी ।
देखिहउँ नयन मनोहर जोरी ।
सुदिन सुघरी तात कब होइहि ।
जननी जिअत बदनबिधु जोइहि ।

(तेव्हां कौसल्या म्हणाली) "लवकरच परत येऊन प्रजेचीं दुःखें नाहींशीं कर. येथून गेल्यावर ह्या निर्दय मातेला मात्र विसरूं नकोस बरें ! दैवा ! ही माझी अवदशा फिरून पालटेल काय रे ? आणि ही मोहक जोडी ह्या डोळ्यांनीं मी पाहीन काय ? माझ्या लाडक्या ह्या तुझ्या मातेला ज्या वेळीं जीवंतपणीं तुमचे मुखचंद्र पाहण्यास मिळतील तीच खरी आनंदाची वेळ आणि तोच खरा सुदिन समजावयाचा. पण तो कधीं उजाडणार ?

दो०—बहुरि बच्छ कहि लाल कहि रघुपति रघुबर तात । कबहिँ बोलाइ लगाइ हिय हरषि निरखिहउँ गात ॥ ६७ ॥

"हे वत्स ! हे लाल ! रघुपति ! रघुवर !" इत्यादि प्रकारांनीं पुनःपुनः आळवून ती म्हणाली—"तुम्हांला बोलावून आणि उराशीं कवटाळून ह्या तुमच्या मूर्ती मला केव्हां बरें आनंदानें पाहण्यास मिळतील ?"

चौ०—लखि सनेह कातरि महतारी ।
बचन न आव बिकल भइ भारी ।
राम प्रबोध कीन्ह बिधि नाना ।
समउ सनेह न जाइ बखाना ।

ती अतिशयच विव्हल झाली. तिच्या मुखावाटे शब्द निघेना. मातेस स्नेहकातर पाहून रामचंद्रांनीं तिची परोपरीनें समजूत घातली. त्या वेळचा प्रेमकल्लोळ अवर्णनीय होता.

तब जानकी सासुपग लागी ।
सुनिय माय मैँ परम अभागी ।
सेवा समय दैव बन दीन्हा ।
मोर मनोरथ सुफल न कीन्हा ।
तजब छोभ जनि छाडिअ छोहू ।
करम कठिन कछु दोष न मोहू ।

नंतर जानकी सासूच्या पायां पडली आणि म्हणाली, "ऐका, माईसाहेब ! मी पराकाष्ठेची भाग्यहीन म्हणून ऐन आपल्या सेवेच्या कालांतच माझ्या नशीबानें मला वनांत लोटलें आणि माझे मनोरथ निष्फल केले ! आपण मजवर रागावूं नये. लोभ कायम असूं द्या. माझें प्रारब्धच फुटकें, त्यांत माझ्याकडे कांहींच दोष नाहीं."

सुनि सियबचन सासु अकुलानी ।
दसा कवनि बिधि कहउँ बखानी ।
बारहिँ बार लाइ उर लीन्ही ।
धरि धीरजु सिख आसिष दीन्ही ।
अचल होउ अहिवात तुम्हारा ।
जब लगि गंग जमुन-जल-धारा ।

हा सीतेचा निरोप ऐकून कौसल्येस पूर्ण गहिंवर लोटला. (कवि म्हणतात,) तिची ती दशा मी

कोणत्या प्रकारें वर्णन करून सांगणार ? वरचेवर कौसल्या सीतेस घेऊन उराशीं धरी. शेवटीं तिनें धीर धरून आणि सीतेस उपदेश करून आशीर्वाद दिला कीं, ' गंगायमुनयोर्वाहस्तावत्स्वस्त्यस्तु ते पातिः ' ।

**दो०–सीतहि सासु असीस सिख दीन्हि अनेकप्रकार । चली नाइ पदपदुम सिरु अतिहित बारहिं बार ॥ ६८ ॥**

कौसल्येनें सीतेस अनेक प्रकारें उपदेश आणि आशीर्वाद दिल्यावर कौसल्येच्या चरणकमलांस अति आदरभावानें वारंवार नमन करून सीता चालूं लागली.

चौ०–समाचार जब लछिमन पाये ।
व्याकुल बिलषबदन उठि धाये ।
कंप पुलक तन नयन सनीरा ।
गहे चरन अतिप्रेम अधीरा ।

ही गडबड जेव्हां लक्ष्मणास कळली तेव्हां अगदीं घाबरून जाऊन त्याचा नूरच पालटला आणि तो तसाच उठून धांवत आला. त्याच्या अंगावर शहारे थरथरले आणि डोळ्यांतून अश्रुधारा सुटल्या. प्रेमाधिक्यामुळें त्याचा धीर सुटला आणि त्यानें रामाच्या चरणांस मिठी मारली.

कहि न सकत कछु चितवत ठाढे ।
मीन दीन जनु जल ते काढे ।
सोच हृदय बिधि का होनिहारा ।
सब सुख सुकृत सिरान हमारा ।
मो कहँ काह कहब रघुनाथा ।
राखिहहिँ भवन कि लेइहहिँ साथा ।

त्याच्यानें कांहींच बोलवेना. पाण्यांतून काढलेल्या माशाप्रमाणें दीनवाणा होऊन तो नुसता टक लावून पहात उभा राहिला. त्याच्या हृदयांत हीच चिंता कीं–आतां यापुढें दैव गति तरी काय करणार ? आमच्या सर्व सुखांची आणि पुण्याईची ही इतिश्रीच झाली ! हा रघुकुलनाथ मला आज्ञा तरी काय देतो कोण जाणे ! हा मला घरकोंवडा करणार कीं आपला सांगाती ठेवणार ?

राम बिलोकि बंधु करजोरे ।
देह गेह सब सन तृन तोरे ।
बोले बचन राम नयनागर ।
सील–सनेह–सरल–सुख–सागर ।

देहगेहादिकांवर सर्वस्वी तुळसीपत्र सोडून व हात जोडून उभ्या असलेल्या आपल्या बंधूस पाहून, नीतिनिपुण, शील, स्नेह, सरलता आणि सुख यांचे सागर असे श्रीरामचंद्र म्हणाले—

तात प्रेमबस जनि कदराहू ।
समुझि हृदय परिनाम उछाहू ।

" बापा लक्ष्मणा ! प्रेमानें विभोर होऊन असा घाबरूं नकोस. शेवट गोड होणार हें ध्यानांत धरून ऐस.

**दो०–मातु-पिता-गुरु स्वामि-सिख सिर धरि करहिँ सुभाय । लहेउ लाभ तिन्ह जनम कर न तरु जनम जग जाय ॥ ६९ ॥**

माता, पिता, गुरु आणि स्वामी यांची आज्ञा शिरसावंद्य करून जे ती मनोभावानें पार पाडतील तेच आपल्या जन्माचें सार्थक करतील. नाहीं तर जगांत जन्मणेंच फुकट.

चौ०–अस जिय जानि सुनहु सिख भाई ।
करहु मातु–पितु–पद–सेवकाई ।

हें ध्यानांत घेऊन, हे बंधो ! माझें सांगणें ऐक, आणि मातापित्यांच्या चरणांची सेवा करीत रहा.

भवन भरत रिपुसूदनु नाहीँ ।
राउ बृद्ध मम दुख मन माहीँ ।
मैँ बन जाउँ तुम्हहिँ लेइ साथा ।
होइ सबहिं बिधि अवध अनाथा ।
गुरु पितु मातु प्रजा परिवारू ।
सब कहँ परइ दुसह–दुख–भारू ।

येथें भरतशत्रुघ्न नाहींत. वडिलांचा एकतर वृद्धापकाळ आणि त्यांतूनहि त्यांना माझें घोरविघोर दुःख. अशा स्थितींत मी वनांत जाणार; आणि त्यांतहि तुला बरोबर घेतलें तर अयोध्या सर्वच तऱ्हांनीं अनाथ होऊन गुरु, पिता, माता, प्रजा व परिवार ह्या सर्वांनाच असह्य दुःखांत लोटून दिल्यासारखें होईल.

रहहु करहु सब कर परितोषू ।
न तरु तात होइहि बड दोषू ।
जासु राज प्रियप्रजा दुखारी ।
सो नृपु अवसि नरकअधिकारी ।
रहहु तात असि नीति बिचारी ।
सुनत लषन भये व्याकुल भारी ॥

तूं तरी मागें राहून सर्वांचें समाधान कर; नाहीं तर,बाबा रे ! मोठाच घात होणार. ज्याच्या राज्यांतली प्रियप्रजा दुःखी असते, तो राजा अवश्यमेव नरकाचा भागीदार होतो. हे तात ! ह्या नीतीचा विचार करून तूं रहाच. " हें ऐकतांच लक्ष्मण अतिशयच व्याकुळ झाला.

सिअरे बचन सूखि गये कैसे ।
परसत तुहिन तामरस जैसे ।

हिमस्पर्शानें जसें कमल कोमेजून जातें, तद्वत् लक्ष्मण त्या शीतल वचनांनीं देखील सुकून गेला.

दो०—उतर न आवत प्रेमवस गहे चरन अकुलाइ । नाथ दासु मैं स्वामि तुम्ह तजहु त कहा बसाइ ॥ ७० ॥

लक्ष्मणाचे मुखांतून प्रेमवशतेमुळें उत्तर निघेना. त्यानें रामचरणांस मिठी मारली आणि तो कळकळून म्हणाला " हे नाथ ! मी आपला दास आणि आपण माझे स्वामी ! आपणच जर मला दूर लोटून दिलें तर मला जागा तरी कोठें ?

चौ०—दिन्हि मोहि सिख नीकि गोसाईं ।
लागि अगम अपनी कदराई ।
नरवर धीर धरम—धुर—धारी ।
निगम नीति कहँ ते अधिकारी ।
मैं सिसु प्रभु—सनेह—प्रतिपाला ।
मंदर मेरु कि लेहिँ मराला ।

" स्वामींनीं मला उपदेश केला तो वाजवीच आहे; परंतु माझ्या भेकडपणामुळें तो मजला अशक्य वाटतो. धैर्यशाली आणि धर्मधुरंधर असे जे लोकाग्रणी असतील तेच ह्या आपल्या निगमनीतीचे अधिकारी होत. मी तर जाणूनबुजूनच लेंकरूं, धन्याच्या केवळ दयेवर पोसलेलें ! हंस म्हणे मेरुमांदार उचलणार हेंच कीं नाहीं ?

गुरु पितु मातु न जानउँ काहू ।
कहउँ सुभाउ नाथ पतिआहू ।
जहँ लगि जगत सनेह सगाई ।
प्रीतिप्रतीति निगम निजु गाई ।
मोरे सबइ एक तुम्ह स्वामी ।
दीनबंधु उर—अंतर—जामी ।

गुरु, पिता, माता वगैरे कोणासच मी ओळखत नाहीं. मी स्वाभाविकच सांगतों आणि धन्यांनीं विश्वास ठेवावा कीं, जे जे म्हणून प्रापंचिक स्नेहसंबंध आहेत आणि जीं जीं पारमार्थिक प्रेमविश्वासादि रहस्यें सांगितलीं आहेत, तीं तीं सर्व मजकरितां आपले ठिकाणीं एकवटलीं आहेत. दीनाचा दयाळु, कलीजाचा कलीजा, धन्याचा धनी वगैरे सर्व कांहीं मला एक हा माझा रामच काय तो समजा.

धरम नीति उपदेसिअ ताही ।
कीरति—भूति—सुगति—प्रिय जाही ।
मन—क्रम—बचन चरनरत होई ।
कृपासिंधु परिहरिअ कि सोई ।

ज्यांना कीर्ति, वैभव आणि उत्तम लोक वगैरेंची चाड असेल त्यांनाच धर्मशास्त्र आणि नीतिशास्त्र हीं शिकवलीं जावींत. जो कायावाचामनेंकरून एका आपल्या चरणापरता कांहीं जाणतच नाहीं त्याला आपल्यासारख्या दयादर्यावानें फेंटाळून लावावयाचें काय ? "

दो०—करुनासिंधु सुबंधु के सुनि मृदुबचन विनीत । समुझाये उर लाइ प्रभु जानि सनेह सभीत ॥ ७१ ॥

करुणासिंधु रामचंद्रांनीं प्रियबंधूंची तीं लाघवीं आणि नम्र विनंती ऐकून आणि त्यास प्रेमपिसा जाणून उचलून उराशीं धरिलें.

चौ०—माँगहु बिदा मातु सन जाई ।
आवहु बेगि चलहु बन भाई ।
मुदित भये सुनि रघुबर बानी ।
भयउ लाभ बड गइ बडि हानी ।

( रामचंद्र म्हणाले, ) हे बंधो ! जा, आणि आईचा निरोप घेऊन लवकर ये आणि वनांत चल. रघुवराचें तें वचन ऐकतांच मोठाच घात टळून थोर लाभ झाल्याप्रमाणें लक्ष्मण उल्हासला.

हरषित हृदय मातु पहिँ आये ।
मनहुँ अंध फिरि लोचन पाये ।
जाइ जननि पग नायउ माथा ।
मनु रघुनंदन-जानकि-साथा ।

अंधास फिरून डोळे मिळाल्याप्रमाणें त्याच्या हृदयांत आनंदाचें भरतें आलें. तो मातेकडे गेला आणि त्यानें तिच्या पायांवर मस्तक ठेविलें. ( तो शरीरानें मात्र मातेजवळ होता; ) परंतु त्याचें मन सीतारामचंद्रांकडे गुंतलें होतें.

पूछे मातु मलिन मन देखी ।
लषन कहा सब कथा बिसेखी ।

गई सहमि सुनि बचन कठोरा।
मृगी देखि दव जनु चहुँओरा।

त्यास उदास पाहून सुमित्रेनें कारण विचारलें तेव्हां लक्ष्मणानें एकंदर वृत्तांत तिला सांगितला. ती जळजळीत वार्ता कानांवर आदळतांच चोहोंकडून वणव्यानें घेरलेल्या हरिणीप्रमाणें ती अगदीं हताश झाली.

लषन लखेउ भा अनरथ आजू।
एहि सनेह बस करब अकाजू।
माँगत बिदा सभय सकुचाहीं।
जाइ संग बिधि कहिहि कि नाहीं।

लक्ष्मणास वाटलें कीं, हेंही एक अरिष्टच उद्भवलें. ही कदाचित् प्रेमांत गुरफटून मोडता घालील. देव जाणे! मला वनांत रामाबरोबर जाण्यास ही सांगते कीं नाहीं! म्हणून त्यास भीति वाटून तो निरोप घेण्यास मागेंपुढें करूं लागला.

दो०—समुझि सुमित्रा राम-सिय-रूप-सुसील-सुभाउ। नृपसनेह लखि धुनेउ सिर पापिनि दीन्ह कुदाउ॥ ७२॥

सीतारामचंद्राचें अंतर्बाह्य शील आणि सौजन्य ह्यांचा विचार आणि राजाचें प्रेम मनांत येतांच ती मस्तक पिटून म्हणाली, 'चांडाळणी! उभा ग दावा साधलास!'

चौ०—धीरज धरेउ कुअवसर जानी।
सहज सुहृद बोली मृदुबानी।

प्रसंग बिकट जाणून आणि हिंमत बांधून मूळचीच शुद्ध मनाची ती सुमित्रा कोमल शब्दांनीं बोलूं लागली.

तात तुम्हारि मातु बैदेही।
पिता रामु सब भाँति सनेही।
अवध तहाँ जहँ रामनिवासू।
तहइँ दिवसु जहँ भानुप्रकासू।
जौं पै सीय रामु बन जाहीं।
अवध तुह्मार काजु कछु नाहीं।

"मुला! तुझी खरी आई जानकी आणि खरे वडील राम होत. ते सर्वतोपरी तुझ्यावर प्रेम करणारे आहेत. जेथें सूर्य प्रकाशतो तेथेंच ज्याप्रमाणें दिवस समजावयाचा, त्याचप्रमाणें जेथें रामचंद्रांचा वास तीच अयोध्या समजावयाची. जर खचितच सीताराम वनवासास जात असतील तर ह्या अयोध्येंत तुझें कांहींच प्रयोजन उरत नाहीं!

गुरु पितु मातु बंधु सुर साईं।
सेइअहिं सकल प्रान की नाईं।
राम प्रानप्रिय जीवन जी के।
स्वारथरहित सखा सबही के।
पूजनीय प्रिय परम जहाँ ते।
सब मानिअहिं राम के नाते।
अस जिय जानि संग बन जाहू।
लेहु तात जग जीवनलाहू।

गुरु, पिता, माता, बंधु, देव आणि स्वामी हे सर्व प्राणासारखे सेवनीय होत. रामचंद्र प्राणांचेहि प्राण, जीवांचेहि जीवन आणि सर्वांचें निरपेक्ष मित्र होत. त्यांना जेवढे म्हणून प्रिय, पूज्य अथवा श्रेष्ठ असतील, त्या सर्वांना तूं त्यांच्याच नात्यानें लेखलें पाहिजे. मनाचा हाच निग्रह करून, मुला! त्यांच्या सांगातीं तूंहि पण वनासच जा आणि जगांत जगण्याचें सार्थक करून घे.

दो०—भूरि भागभाजन भयहु मोहि समेत बलि जाउँ। जौं तुम्हरे मन छाडि छल कीन्ह रामपद ठाउँ॥ ७३॥

जर तुझ्या मनानें रामपदींच निर्व्याज आश्रय घेतला असेल तर तूं माझ्यासुद्धां महद्भाग्यास पात्र झालास, आणि म्हणूनच मी स्वतःस तुजवरून ओवाळून टाकतें.

चौ०—पुत्रवती जुबती जग सोई।
रघु—पति—भगत जासु सुतु होई।
नतरु बाँझ भलि बादि बिआनी।
रामबिमुख सुत तें हित हानी।

जिचा कुसवा रामभक्तानें भरून काढला तीच स्त्री खरी खरी पोटीं पिकलेली समजावी. नाहीं तर एकपरी वांझ पुरवली; रामाशीं विन्मुख अशा मुलाची आई पोटीं पिकूनहि फुकाचीच, कारण तशा पोरामुळें तिचेंदेखील हित नासतेंच.

तुम्हरेहि भाग राम बन जाहीं।
दूसर हेतु तात कछु नाहीं।
सकल सुकृत कर बडफल एहू।
राम-सीय-पद सहज सनेहू।

हे तात! तुझ्याच भाग्यानें राम वनांत जात

आहेत. एरव्हीं कांहींदेखील कारण नाहीं ! सीतारामपदीं अहेतुक प्रेम उत्पन्न होणें हेंच सर्व सुकृतांचें मोठ्यांत मोठें फळ होय.

राग रोष इरिषा मदु मोहू ।
जनि सपनेहुँ इन्ह के बस होहू ।
सकलप्रकार बिकार बिहाई ।
मन क्रम बचन करेहु सेवकाई

राग, रोष, ईर्षा, मद, मोह ह्यांच्या सांपळ्यांत स्वप्नांतदेखील अडकूं नकोस. सर्वप्रकारें मनाचे दुष्ट मनोरे तुडवून कायावाचामनेंकरून तूं एक रामसेवाच करीत रहा.

तुम्ह कहँ बन सब भाँति सुपासू ।
सँग पितु मातु रामु सिय जासू ।
जेहिं न रामु बन लहहिँ कलेसू ।
सुत सोइ करेहु इहइ उपदेसू ।

ज्या तुझ्या पाठीशीं तुझे मातापिता सीताराम असणार, त्या तुला सर्वतोपरी वन सुखावहच होणार. मुला ! सार ह्मणून इतकेंच समज कीं, जेणेंकरून रामाला वनांत त्रास पडणार नाहीं तेंच त्वां केलें पाहिजे.

छंद—उपदेस यह जेहि जात तुम्हरे राम-सिय सुख पावहीं । पितु मातु प्रिय परिवारु पुर सुख सुरति बन बिसरावहीँ ॥ तुलसी सुतहि सिख देइ आयसु दीन्ह पुनि आसिष दई । रति होउ अबिरल अमल सिय-रघु-बीर-पद नितनित नई ॥३॥

तुला माझा इतकाच उपदेश आहे कीं, तुझ्या जाण्यानें सीतारामचंद्रांना सुख होत असावें, आणि पिता, माता, इष्ट, परिवार, अयोध्या वगैरे ह्यांच्या सुखांच्या आठवणीचा देखील त्यांना विसर पडावा.'' ( तुलसीदास सांगतात ) ह्याप्रमाणें लक्ष्मणास उपदेश करून तिनें निरोप दिला आणि फिरून त्यांस आशीर्वचन दिलें कीं, सीतारामचरणांचे ठायीं तुझे अंतःकरणांत प्रतिक्षणीं अभिनव, शुद्ध आणि अविरल भक्ति तेवत राहो.

सो०—मातुचरन सिर नाइ चले तुरत संकित हृदय । बागुर बिषम तोराइ मनहुँ भाग मृग भागबस ॥ ३ ॥

मातेच्या चरणीं मस्तक ठेवून साशंकमनानें तो मागच्याच पायीं निघाला. तेव्हां असें वाटलें कीं अगदीं आटोकाट पसरलेलें जाळें दैववशात् तोडलें जाऊन हरीण चौकडे भरीत पळत आहे !

चौ०—गये लषन जहँ जानकिनाथू ।
भे मन मुदित पाइ प्रियसाथू ।
बंदि राम-सिय-चरन सुहाये ।
चले संग नृपमंदिर आये ।

लक्ष्मण जेथें जानकीरमण होते, तेथें जाऊन पोहोंचला. प्रियसमागम मिळाल्यानें तो मनांत अगदीं उल्हसित झाला. सीतारामचरणांना वंदन करून तो त्यांचेबरोबर निघाला, आणि नंतर ते सर्व राजमंदिरांत आले.

कहहिँ परसपर पुर-नर-नारी ।
भलि बनाइ बिधि बात बिगारी ।

अयोध्येंत सर्वजण परस्परांत ह्याच गोष्टी करूं लागले कीं, मौजेचा रागरंग अगदीं हातातोंडावर आला असतां दुर्दैवानें अवघाच विचका केला !

तन कृस मन दुख बदन मलीने ।
बिकल मनहुँ माखी मधु छीने ।
कर मीजहिँ सिर धुनि पछिताहीँ ।
जनु बिनु पंख बिहँग अकुलाहीँ ।

( त्या वेळीं अयोध्येंतील लोक) देह कृश झालेले, मनें दुःखावलेलीं आणि चेहेरे काळवंडलेले असे ते मधाच्या पोळीवरून उडवलेल्या माश्यांप्रमाणें गांगरलेले दिसत. पंख गळाल्यानें पक्षी जसे व्याकुळ होतात तद्वत् ते विव्हल होऊन हात चोळूं लागले, आणि दुःखावेगानें ते कपाळ झोडून घेऊं लागले.

भइ बडि भीर भूपदरबारा ।
बरनि न जाइ बिषाद अपारा ।

सरकारदरबारीं एकच गर्दी उसळली; तेथलें दुःख अपार ह्मणून अवर्णनीय आहे.

सचिव उठाइ राउ बैठारे ।
कहि प्रियबचन राम पगु धारे ।
सियसमेत दोउ तनय निहारी ।
ब्याकुल भयउ भूमिपति भारी ।

सुमंतानें दशरथास उठून बसविलें आणि 'राम आले आहेत ' म्हणून हलकेंच कळविलें. सीतेसहित दोघेहि पुत्र पहातांच राजा अत्यंत व्याकुळ झाला.

दो०—सीयसहित सुत सुभग दोउ देखि देखि अकुलाइ । बारहिँ बार सनेहबस राउ लेइ उर लाइ ॥ ७४ ॥

सीतेसहवर्तमान त्या सुंदर पुत्रद्वयास वरचेवर न्याहाळून तो अगदीं बेहाल झाला आणि पुत्रप्रेमानें अगदीं आकळला जाऊन तो त्यांस वरचेवर उराशीं धरून कवटाळूं लागला.

चौ०—सकइ न बोलि बिकल नरनाहू।
सोकजनित उर दारुन दाहू।
नाइ सीस पद अतिअनुरागा।
उठि रघुबीर बिदा तब माँगा।

राजा इतका शोकाकुल झाला कीं त्याच्यानें बोलवेना. दुःखाच्या भडक्यानें त्याचें काळीज करपून गेलें होतें. तेव्हां रघुवीरच उठले आणि अतिप्रेमानें पित्याच्या चरणीं नमस्कार करून त्यांनीं आपण होऊनच आज्ञा मागितली.

पितु असीस आयसु मोहि दीजै।
हरषसमय बिसमउ कत कीजै।
तात किये प्रिय प्रेमप्रमादू।
जस जग जाइ होइ अपबादू।

" बाबा ! मला आपली आज्ञा आणि आशीर्वाद हवेत. प्रसंग तर लड्डू बनण्याचा मग खड्डू कां बरें व्हावयाचें ? बाबा ! आपल्या मनाजोगें केल्यास मजकडून प्रेमप्रमाद होईल आणि उभयतां कीर्तीस मुकून साऱ्या जगांत आपलें हंसें होईल. "

सुनि सनेहबस उठि नरनाहा।
बैठारे रघुपति गहि बाहा।

तें ऐकतांच तशा प्रेमविव्हलतेंतच राजा उठला आणि त्यानें रघुपतींचा हात धरून त्यास बसविलें.

सुनहु तात तुम्ह कहँ मुनि कहहीं।
राम चराचरनायक अहहीं।
सुभ अरु असुभ करम अनुहारी।
ईसु देइ फल हृदय बिचारी।
करइ जो करम पाव फल सोई।
निगम नीति असि कह सब कोई।

( दशरथ ह्मणाला ) " रामा ! ऐक, तुजविषयीं मुनिजन सांगतात कीं, राम हा चराचराचा नियंता होय. तो नियंता ईश्वर शुभाशुभकर्मांला अनुसरूनच न्यायपूर्वक फल देत असतो. जो कोणी जें कर्म करील, त्याचें फळ तोच भोगील असें वेदशास्त्र आणि सर्वहि लोक सांगतात.

दो०—अउर करइ अपराध कोउ अउर पाव फलभोगु। अतिबिचित्र भगवंतगति को जग जानइ जोगु॥ ७५॥

एकानें एखादा अपराध करावा आणि भलत्यानेंच त्याचें प्रायश्चित्त भोगावें हा मात्र ईश्वरी न्याय फारच अजब आहे. तो जाणण्यास जगांत कोण समर्थ ? "

चौ०—राय रामराखन हित लागी।
बहुत उपाय किये छल त्यागी।
लखा रामरुख रहत न जाने।
धरम धुरं-धर धीर सयाने।
तब नृप सीय लाइ उर लीन्ही।
अतिहित बहुत भाँति सिख दीन्ही।

रामास ठेवून घ्यावें एतदर्थ दशरथानें अगदीं निष्कपटपणें जंग जंग पछाडले. परंतु धर्मधुरंधर, धीर, सर्वज्ञ रामचंद्राचा भाव त्यानें ओळखला आणि त्याची खात्री झाली कीं, तो रहात नाहीं. तेव्हां त्यानें सीतेस उचलून पोटाशीं धरिलें आणि तिला हिताच्या गोष्टी सांगून हरपरीनें समजावून सांगितलें.

कहि बन के दुख दुसह सुनाये।
सासु ससुर पितु सुख समुझाये।
सियमन रामचरन अनुरागा।
घरु न सुगम बन बिषम न लागा।

वनांतील असह्य क्लेश आणि सासरमाहेरचीं सुखें तिला सांगितलीं तरी तिचें मन रामचरणीं अनुरक्त झालें असल्यानें तीस घरांत सोम आणि वनांत आबळ हीं वाटतचना.

अउरउ सबहि सीय समुझाई।
कहि कहि बिपिन बिपति अधिकाई।

वरकड सर्वांनीं देखील वनांतील असाधारण क्लेशांचें वर्णन करून तीस समजावून सांगितलें.

सचिवनारि गुरनारि सयानी।
सहित सनेह कहहिँ मृदुबानी।
तुम्ह कहँ तौ न दीन्ह बनबासू।
करहु जो कहहिँ ससुर-गुरु-सासू।

सचिवपत्नी, गुरुपत्नी इत्यादि पोक्त बायकांनींहि तीस प्रेमळ आणि मृदु वाणीनें सांगितलें कीं, तुला कांहीं वनवास दिलेला नाहीं. तूं सासूसासरा आणि वडील माणसें यांच्या आज्ञेप्रमाणें वागायला पाहिजे.

**दो०—सिख सीतलि हित मधुर मृदु सुनि सीतहि न सोहानि। सरद-चंद-चंदिनि लगत जनु चकई अकुलानि ॥ ७६ ॥**

शांत, हितकर, मधुर आणि मृदु असा बोध ऐकूनहि सीतेला तो रुचला नाहीं, आणि शरच्चंद्राच्या चांदण्यांत जशी चक्रवाकीची ओंगळ दशा होते त्याप्रमाणें ती खट्टु झाली.

चौ०—सीय सकुचबस उतर न देई। सो सुनि तमकि उठी कैकेई।
मुनि-पट-भूषन-भाजन आनी। आगे धरि बोलि मृदुबानी।

संकोचास्तव सीतेनें उत्तरच दिलें नाहीं. परंतु तीस केलेले बोध ऐकतांच कैकेयी ताडकन् उठली आणि मुनींचीं वल्कलें, आभरणें ( भस्म, माला इत्यादि ) आणि पात्रें (कमंडलु इत्यादि)आणून समोर ठेवून ती सौम्य वाणीनें बोलूं लागली.

नृपहिँ प्रानप्रिय तुझ रघुबीरा। सलि सनेह न छाडिहि भीरा।
सुकृत सुजस परलोक नसाऊ। तुझहिँ जान बन कहिहि न काऊ।
अस बिचारि सोइ करहु जो भावा। राम जननिसिख सुनि सुख पावा।

" हे रघुवीरा! राजास तुम्हीं प्राणाहूनहि प्रिय असल्यामुळें, स्वतःच्या शील व स्नेहामुळें त्याच्यानें भीड तोडवत नाहीं, आणि सुकृत, सुयश आणि परलोक नष्ट झाले तरीदेखील तुम्हांस वनास जा म्हणून म्हणणें व्हावयाचें नाहीं. हें लक्षांत आणून तुम्हांलाच जें उचित दिसेल तें तुम्हीं करावें. " मातेची आज्ञा श्रवण करून रामचंद्रास संतोष वाटला.

भूपहि बचन बानसम लागे। करहिँ न प्रान पयान अभागे।
लोग बिकल मुरिछित नरनाहू। काह करिय कछु सूझ न काहू।

( परंतु ) ते शब्द राजास शल्याप्रमाणें बोंचले. हे अभागी प्राण एकदांचे निघूनहि जात नाहींत असें वाटून तो मूर्च्छित होऊन पडला. सर्व लोक विव्हल झाले. काय करावें हें कोणासच कांहीं सुचेना.

राम तुरत मुनिबेष बनाई। चले जनक जननिहिँ सिरुनाई।

लागलीच मुनिवेष धारण करून रामचंद्र मातापित्यांस वंदन करून निघाले.

**दो०—सजि बन-साज-समाज सब बनिता-बंधु-समेत। बंदि बिप्र-गुर-चरन प्रभु चले करि सबहि अचेत ॥ ७७ ॥**

स्त्री आणि बंधु यांच्यासहित मुनींची सर्व दीक्षा धारण करून आणि गुरु व विप्र यांच्या चरणीं वंदन करून प्रभु रामचंद्र सर्वांस विमनस्क करीतच जाऊं लागले.

चौ०—निकसि बसिष्ठद्वार भये ठाढे। देखे लोग बिरहदव दाढे।
कहि प्रियबचन सकल समुझाये। बिप्रबृंद रघुबीर बोलाये।
गुरु सन कहि बरषासन दीन्हे। आदर दान बिनयबस कीन्हे।

ते वसिष्ठांच्या द्वारीं येऊन उभे राहिले आणि लोक विरहरूप वणव्यानें होरपळत आहेत असें पहातांच प्रियवचनें बोलून त्यांनीं सर्वांचें समाधान केलें. नंतर रघुवीरांनीं ब्राह्मणमंडळी बोलाविली. आणि गुरूंना सांगून त्यांस वर्षासनें दक्षिणा वगैरे सन्मानपूर्वक अर्पण करून विनयानें अनुकूल करून घेतलें.

जाचक दान मान संतोषे। मीत पुनीत प्रेम परितोषे।

त्यांनीं दानमानादिकांनीं याचकांचा संतोष केला व सन्मित्रांचा परितोष प्रेमानें केला.

दासी दास बोलाइ बहोरी। गुरुहि सौँपि बोले कर जोरी।
सब कै सार सँभार गोसाईँ। करबि जनक जननी की नाईँ।

नंतर दासदासींना बोलावून आणि त्यांस गुरूंवर सोंपवून ते हात जोडून ह्मणाले:—" ह्या सर्वांचा आईबापांप्रमाणें सर्वस्वीं सांभाळ करणारे स्वामी आपणच आहांत. "

बारहिँ बार जोरि जुगपानी। कहत राम सब सन मृदुबानी।
सोइ सब भाँति मोर हितकारी। जेहि तेँ रहइ भुआल सुखारी।

वरचेवर करद्वय जोडून रामचंद्र सर्वांनाच विनवूं लागले कीं, " ज्याच्या योगानें महाराज सुखांत रहातील तोच सर्वतोपरी मी माझा हितकारी समजेन.

दो०—मातु सकल मोरें बिरह जेहि न होहिँ दुख दीन। सोइ उपाउ तुम्ह करेहु सब पुरजन परमप्रबीन ॥ ७८ ॥

हे परमचतुर पुरजन हो! माझ्या सर्व माता माझ्या विरहदुःखानें जेणेंकरून दीन होणार नाहींत असाच बर्ताव तुम्हां सर्वांकडून होत असावा."

चौ०—एहि बिधि राम सबहिँ समुझावा।
गुरु–पद–पदुम–हरषि सिरु नावा।
गनपति गौरि गिरीस मनाई।
चले असीस पाइ रघुराई।

ह्याप्रमाणें सर्वांचें सांत्वन करून, गुरुपदकमलांस आनंदानें प्रणाम करून, गणाध्यक्ष व गौरीशंकर यांचें चिंतन करून आणि सर्वांचे आशीर्वाद घेऊन रघुराज रामचंद्र निघाले.

रामु चलत अति भयउ बिषादू।
सुनि न जाइ पुर आरतनादू।
कुसगुन लंक अवध अतिसोकू।
हरष–बिषाद–बिबस सुरलोकू।

राम जात असतां दुःखाचा कल्लोळ उडाला. गांवकऱ्यांचे आर्तविलाप ऐकवले जाईनात. लंकेंत उल्कापात होऊं लागले, अयोध्येंत हाहाःकार उडाला आणि देवलोक दुःख आणि आनंद यांत मग्न झाला.

गइ मुरुछा तब भूपति जागे।
बोलि सुमंत्रु कहन अस लागे।
रामु चले बन प्रान न जाहीँ।
केहि सुख लागि रहत तन माहीँ।
एहि तेँ कवन ब्यथा बलवाना।
जो दुख पाइ तजिहि तनु प्राना।

नंतर इकडे मूर्च्छा सांवरून राजा शुद्धीवर आला आणि सुमंतास हाक मारून ह्मणूं लागला, "राम वनांत गेले तरी हे माझे प्राण अद्याप जात नाहींत! कोणत्या सुखासाठीं हे ह्या कुडीची आस धरीत आहेत? ह्यापेक्षां बलवत्तर व्यथा कोणती असूं शकेल कीं जिच्या दुःखसंवेदनेनें माझ्या देहप्राणांची ताटातूट होईल?"

पुनि धरि धीर कहइ नरनाहू।
लेइ रथ संग सखा तुम्ह जाहू।

फिरून धैर्य धरून राजा ह्मणाला, "मित्रा सुमंता! तूं रथ घेऊन रामाबरोबर जा."

दो०—सुठि सुकुमार कुमार दोउ जनकसुता सुकुमारि। रथ चढाइ देखराइ बनु फिरेहु गये दिन चारि ॥ ७९ ॥

माझीं दोन सुंदर सुकुमार बाळें आणि जनकाची ती सुकुमार बाळा ह्यांना रथांत घालून चार दिवस वन दाखीव आणि तसाच परत घेऊन ये.

चौ०—जौँ नहिँ फिरहिँ धीर दोउ भाई।
सत्यसंध दृढब्रत रघुराई।
तौ तुम्ह बिनय करेहु कर जोरी।
फेरिय प्रभु मिथिलेसकिसोरी।

ते रघुकुलश्रेष्ठ दोघेहि बंधु, धैर्यशाली, दृढव्रत आणि सत्यप्रतिज्ञ आहेत. ते जर नच परतले तर तूं त्यांना हात जोडून प्रार्थना कर कीं, प्रभो! ह्या जनकबाळेस तरी निदान परत पाठवा.

जब सिय कानन देखि डेराई।
कहेहु मोरि सिख अवसरु पाई।

वन पहातांच सीता जेव्हां भिऊं लागेल, तेव्हां मोका साधून तिला माझा निरोप सांग.

सासु ससुर अस कहेउ सँदेसू।
पुत्रि फिरिय बन बहुत कलेसू।
पितुगृह कबहुँ कबहुँ ससुरारी।
रहेहु जहाँ रुचि होइ तुह्मारी।

सासूसासऱ्यांचा तुला हा असा निरोप आहे कीं, बाळे! तूं परत फीर, वनांत पराकाष्ठेचे क्लेश असतात. कधीं माहेरीं तर कधीं सासरीं ह्याप्रमाणें तुला जेथें आवडेल तेथें तूं काळ काढ.

एहि बिधि करेहु उपायकदंबा।
फिरइ त होइ प्रानअवलंबा।
नाहिँ त मोर मरन परिनामा।
कछु न बसाइ भये बिधि बामा।

ह्याप्रमाणें तडजोड करून पहा. ती जरी परतली तरी माझ्या प्राणास विसावा होईल. एरव्हीं माझें मरण हें ठरलेलेंच आहे. नशिबानें एकदां उलट खाल्ली कीं कांहींच स्वाधीन रहात नाहीं."

अस कहि मुरछि परा महिराऊ।
राम लषन सिय आनि देखाऊ।

अखेर, "राम, लक्ष्मण आणि सीता यांस आणून दाखीव" असें ह्मणून राजा पृथ्वीवर निचेष्ट पडला!

**दो०—पाइ रजायस नाइ सिरु रथु अतिबेग बनाइ। गयउ जहाँ बाहर नगर सिय-सहित दोउ भाइ॥ ८०॥**

आज्ञा होतांच, नमस्कार करून, आणि अति त्वरेनें रथ सज्ज करून नगराबाहेर जेथें सीतेसहवर्तमान दोघे बंधु होते तेथें सुमंत गेला.

चौ०—तब सुमंत्र नृपबचन सुनाये।
करि बिनती रथ राम चढाये।
चढि रथ सीयसहित दोउ भाई।
चले हृदय अवधहि सिरु नाई।

नंतर सुमंतानें राजाज्ञा सांगून विनंतिपूर्वक रामचंद्रास रथांत बसविलें. सीतेसह दोघे बंधू रथांत बसून मनानें अयोध्येस नमस्कार करून जाऊं लागले.

चलत राम लखि अवध अनाथा।
बिकल लोग सब लागे साथा।
कृपासिंधु बहुबिधि समुझावहिँ।
फिरहिँ प्रेमबस पुनि फिरि आवहिँ।

राम गेल्यानें अयोध्येंत रामच नाहींसा पाहून सर्व लोक वैतागून रथाच्या पाठोपाठ निघाले. कृपासिंधूंनीं पुष्कळ प्रकारांनीं त्यांची समजूत घालून त्यांस परतविलें. तरी प्रेमपाशामुळें ते फिरून आलेच.

लागति अवध भयावनि भारी।
मानहुँ कालराति अँधियारी।
घोर जंतुसम पुर-नर-नारी।
डरपहिँ एकहिँ एक निहारी।
घर मसान परिजन जनु भूता।
सुत हित मीत मनहुँ जमदूता।
बागन्ह बिटप बेलि कुम्हिलाहीँ।
सरित सरोवर देखि न जाहीँ।

घोरकाळ्या कालरात्रीप्रमाणें अयोध्या अतिशय भयाण दिसूं लागली. तेथील स्त्रीपुरुष हिंस्र जीवांप्रमाणें एकमेकांस पाहून भिऊं लागले. घरें स्मशानासारखीं, आसपासचे लोक भुतावळ्याप्रमाणें व मुलें, इष्ट आणि मित्र हे यमदूतांसारखे भासूं लागले. बागबगीचे, वृक्षवेली अगदीं कोमेजून गेल्या. नद्या आणि तळीं यांच्याकडेहि पहावेना.

**दो०—हय गय कोटिन्ह केलिमृग पुरपसु चातक मोर। पिक रथांग सुक सारिका सारस हंस चकोर॥ ८१॥**

चौ०—रामबियोग बिकल सब ठाढे।
जहँ तहँ मनहुँ चित्र लिखि काढे।

घोडे, हत्ती, क्रीडामृग, चातक, मोर, पिक, चक्रवाक, पोपट, मैना, सारस, हंस, चकोर इत्यादि असंख्य पाळीव, पशुपक्षी रामवियोगानें अगदीं शिथिल बनून, चित्रवत् तटस्थ झाले.

नगरु सकल बनु गहबर भारी।
खग मृग बिपुल सकल नरनारी।
बिधि कैकई किरातिनि कीन्ही।
जेहि दव दुसह दसहुँ दिसि दीन्ही।
सहि न सके रघु-बर-बिरहागी।
चले लोग सब ब्याकुल भागी।

अवघी अयोध्या म्हणजे एखाद्या निबिड अरण्यासारखी भासून तेथील सर्व स्त्रीपुरुष असंख्य खग-मृगांप्रमाणें वाटूं लागले. ब्रह्मदेवानें तेथें कैकेयीरूपानें किरातीण पाठवून तिजकरवीं दाही दिशांनीं भयंकर वणवा पेटविला. आगीचा तो डोंब सहन न झाल्यामुळें सर्व लोक अगदीं जेरीस येऊन पळत सुटले.

सबहिँ बिचारु कीन्ह मनमाहीँ।
राम लषन सिय बिनु सुख नाहीँ।
जहाँ रामु तहँ सबुइ समाजू।
बिनु रघुबीर अवध नहिँ काजू।

सर्वांनीं मनांत हाच विचार केला कीं, सीताराम-लक्ष्मणांखेरीज सुखच नाहीं, जेथें राम तेथेंच आपण सर्वांनीं गेलें पाहिजे. रघुवीरविरहित अयोध्येंत आपलें कांहींच प्रयोजन उरलें नाहीं.

चले साथ अस मंत्रु दृढाई।
सुरदुर्लभ सुखसदन बिहाई।
राम-चरन-पंकज प्रिय जिन्हहीँ।
बिषयभोग बस करहिँ कि तिन्हहीँ।

हा विचार ठाम करून ते, देवांनींहि दुर्लभ अशा गृहसुखावर लाथ मारून बरोबर जाण्यास निघाले. ज्यांना रामचंद्रांचीं चरणकमलें प्रिय झालीं त्यांना विषयभोग अडवूं शकतील काय ?

**दो०—बालक बृद्ध बिहाय गृह लगे लोग सब साथ। तमसा तीर निवासु किय प्रथम दिवस रघुनाथ॥ ८२॥**

आबालवृद्ध घरदार सोडून रामाच्या पाठोपाठ निघाले. प्रथम दिवशीं रघुनाथांनीं तमसातीरावर तळ ठोकला.

चौ०–रघुपति प्रजा प्रेमबस देखी ।
सदय हृदय दुख भयउ बिसेखी ।
करुनामय रघुनाथ गोसाईं ।
बेगि पाइ अहि पीर पराई ।

प्रजा प्रेमवश झालेली पाहतांच रघुपतीला दुःखाचा कडेलोट झाला. कारण प्रभु रामचंद्र हे करुणेची केवळ मूर्तिच होत. परदुःख त्यांना तत्काळ जाणवतें.

कहि सप्रेम मृदुबचन सुहाये ।
बहुबिधि राम लोग समुझाये ।
किये धरम उपदेस घनेरे ।
लोक प्रेमबस फिरहिँ न फेरे ।
सील सनेह छाडि नहिँ जाई ।
असमंजसबस भे रघुराई ।

प्रेमळ, कोमळ आणि रसाळ अशा भाषणांनीं रामांनीं लोकांची समज घालण्यास जंग जंग पछाडले आणि पुष्कळसा धर्मोपदेशहि केला. परंतु प्रेमवशतेमुळें मंडळी परतवली तरी परतेनात. रामास स्वतःचें शील सोडवेना आणि लोकांचें प्रेमहि तोडवेना. त्यामुळें ते अगदीं पेंचांत पडले.

लोक सोक–स्रम–बस गये सोई ।
कछुक देवमाया मति मोई ।
जबहिँ जामजुग जामिनि बीती ।
राम सचिव सन कहेउ सप्रीती ।
खोज मारि रथ हाँकहु ताता ।
आन उपाय बनिहि नहिँ बाता ।

(अखेर) शोकश्रमामुळें लोक झोंपीं गेले. देवांच्या मायेनेंहि त्यांजवर कांहींशी पाखर घातली. दोन प्रहर रात्र उलटल्यानंतर राम सुमंतास आर्जवपूर्वक ह्मणाले, “ बा सुमंता ! रथ अशा रीतीनें हाकला पाहिजे कीं मागमूसदेखील लागतां कामा नये. एरव्हीं इतर इलाजानें गोष्ट जुळावयाची नाहीं. ”

**दो०–राम लषन सिय जान चढि संभुचरन सिरु नाइ । सचिव चलायउ तुरत रथ इत उत खोज दुराइ ॥ ८३ ॥**

(नंतर) शंकरचरणांस वंदन करून, सीता, राम व लक्ष्मण रथारूढ झाले, आणि सुमंतानें आडवातिडवा, मागमूस न लागेल अशा बेतानें सपासप रथ हांकिला.

चौ०–जागे सकल लोग भये भोरू ।
गे रघुनाथ भयउ अतिसोरू ।
रथ कर खोज कतहुँ नहिँ पावहिँ ।
राम राम कहि चहुँ दिसि धावहिँ ।
मनहुँ बारिनिधि बूड जहाजू ।
भयउ बिकल बड बनिकसमाजू ।

उजाडतांच सर्व मंडळी उठली आणि पहातात तों रामचंद्र नाहींत ! तेव्हां फारच आकांत उडाला. रथाचें चिन्हहि कोठें दिसेना. तेव्हां तर ते ‘ राम राम ’ असा आक्रोश करीत सैरावैरा धांवत सुटले. त्या वेळेस असें वाटलें कीं, जणुं काय समुद्रांत जहाज बुडाल्यानें मोठमोठाल्या व्यापाऱ्यांच्या तांड्यांची अगदीं त्रेधाच मचली आहे.

एकहिँ एक देहिँ उपदेसू ।
तजे राम हम जानि कलेसू ।
निंदहि आपुसराहहिँ मीना ।
धिग जीवन रघु–बीर–बिहीना ।
जौँ पै प्रियबियोग बिधि कीन्हा ।
तौ कस मरन न माँगे दीना ।

एक दुसऱ्यास सांगूं लागला कीं, रामांनीं त्रास मानून आपला त्याग केला. स्वतःची निर्भर्त्सना करून आणि आपल्यापेक्षां श्रेष्ठ असलेल्या माशांच्या प्रेमाची प्रशंसा करून (कारण पाण्याचा वियोग होतांच मासे प्राण सोडतात) ते ह्मणूं लागले:— रामविहीन अशा ह्या जीवितास धिक्कार असो ! विधात्यास जर आमची आणि आमच्या प्रियकराची ताटातूटच करावयाची होती तर त्यानें आह्मांला न मागतांच मरण कां दिलें नाहीं !

एहि बिधि करत प्रलापकलापा ।
आये अवध भरे परितापा ।
बिषमबियोग न जाइ बखाना ।
अवधिआस सब राखहिँ प्राना ।

ह्याप्रमाणें पुष्कळच त्रागा होऊन ते दुःखाचा उरावर धोंडा बांधून अयोध्येस परतले. त्यांचें तीव्र दुःख वर्णन करणें शक्य नाहीं. त्या सर्वांनीं केवळ अवधीच्या (चवदा वर्षांच्या) आशेनें प्राणधारण आरंभिलें.

**दो०–राम–दरस–हित नेम ब्रत लगे करन नरनारि । मनहुँ कोक कोकी कमल दीन बिहीन तमारि ॥ ८४ ॥**

रामदर्शनेच्छेनें स्त्रीपुरुष व्रतनियमादि आचार पाळूं लागले. त्या वेळीं असें वाटे कीं, चक्रवाक, चक्रवाकी आणि कमळेंच सूर्यविरहानें दीन झालीं आहेत.

चौ०–सीता–सचिव–सहित दोउ भाई।
सृंगबेरपुर पहुँचे जाई।
उतरे राम देवसरि देखी।
कीन्ह दंडवत हरख विसेखी।
लषन सचिव सिय किये प्रनामा।
सबहिँ सहित सुख पायउ रामा।

सीता आणि सुमंत यांसुद्धां दोघे बंधु शृंगवेरपुरास जाऊन पोंचले. जान्हवीचें दर्शन होतांच राम रथाखालीं उतरले आणि त्यांनीं तीस हर्षविशिष्ट होऊन दण्डवत घातला. लक्ष्मण, सुमंत आणि सीता यांनींहि तीस प्रणाम केला. सर्वांसह रामचंद्र सुखाप्रत पावते झाले.

गंग सकल–मुद–मंगल–मूला।
सब सुखकरनि हरनि सब सूला।
कहि कहि कोटिक कथाप्रसंगा।
राम विलोकहिँ गंगतरंगा।
सचिवहि अनुजहि प्रियहि सुनाई।
बिबुध–नदी–महिमा अधिकाई।

सर्व आनंदमंगलांची जननी, सर्व सुखांची दात्री आणि सर्व दुःखांची हर्त्री अशी जी भागीरथी तिच्या वीचिविलासाकडे अवलोकन करीत करीत रामचंद्रांनीं सीता, लक्ष्मण, आणि सुमंत यांस त्या देवनदीचा सर्वंकष महिमा सविस्तर कथन केला.

मज्जनु कीन्ह पंथस्रम गयऊ।
सुचि जल पियत मुदित मन भयऊ।
सुमिरत जाहि मिटइ स्रमभारू।
तेहि स्रम यह लौकिकव्यवहारू।

गंगास्नानानें वाटेच्या श्रमांचा परिहार झाला आणि तिच्या पवित्र जलाच्या प्राशनानें त्यांचीं मनें प्रफुल्लित झालीं. ज्याच्या स्मरणमात्रेंकरून संसार-श्रमाचा भार नाहींसा होतो त्यास श्रम होणें हा केवळ त्याचा लौकिक व्यवहार होय.

**दो०–सुद्ध सच्चिदानंदमय कंद भानु–कुल–**
**केतु। चरित करत नरअनुहरत**
**संसृति–सागर–सेतु ॥ ८५ ॥**



भानुकुलकेतु श्रीराम स्वतः शुद्ध सच्चिदानंदमय व आनदकंद आहेत. प्राकृत नराचें अनुकरण करून होणाऱ्या त्यांच्या लीला संसारसागरास केवळ सेतुभूत होत.

चौ०–यह सुधि गुह निषाद जब पाई।
मुदित लिए प्रिय बंधु बोलाई।
लिय फल मूल भेट भरि भारा।
मिलन चलेउ हिय हरष अपारा।
करि दंडवत भेटँ धरि आगे।
प्रभुहि बिलोकत अतिअनुरागे।
सहज–सनेह बिबस रघुराई।
पूछी कुसल निकट बैठाई।

ही वार्ता जेव्हां गुह निषादास कळली तेव्हां त्यानें आनंदानें आपला सलगीचा गोतावळा मिळविला, फळफळावळ वगैरे भेटीचा सरंजाम घेतला आणि अत्यंत उल्हसित अंतःकरणानें तो रामदर्शनास गेला. भेट समोर ठेवून त्यानें साष्टांग दंडवत घातला आणि तो अतिशय प्रेमानें प्रभूस न्याहाळूं लागला. त्याच्या भोळ्या भावास भाळून रघुरायांनीं त्यास आपल्या अगदीं जवळ बसवून कुशल प्रश्न केले.

नाथ कुसल पदपंकज देखे।
भयउँ भागभाजन जन लेखे।
देव धरनि–धन–धाम तुह्मारा।
मैं जन नीच सहित परिवारा।
कृपा करिय पुर धारिय पाऊ।
थापिय जन सब लोग सिहाऊ।

( तेव्हां गुह ह्मणाला ) " हे नाथ ! हीं आपलीं पदकमलें पाहून मी कुशल झालों आणि सर्व लोकांच्या दृष्टीनें देखील थोर भाग्यास चढलों ! हे देव ! हें गृह, धन आणि राज्य आपलें आहे, आणि सहपरिवार मी आपला नीच सेवक आहे. कृपा करून माझ्या नग-राला आपले पाय लावावेत आणि तेथेंच राहून आपला दास ह्मणून जगाकडून मला म्हणवावें. "

कहेहु सत्य सब सखा सुजाना।
मोहि दीन्ह पितु आयसु आना।

( हें ऐकून राम ह्मणाले, ) " मित्रा ! तूं बोललास तें सर्व खरें आहे. परंतु सुज्ञा ! पित्यानें मला निराळीच आज्ञा केली आहे.

**दो०—बरष चारिदस बास बन मुनि—व्रत—बेष—अहारु । ग्रामबास नहिँ उचित सुनि गुहहि भयउ दुखभारु ॥ ८६ ॥**

मुनींच्या व्रत—वेष—आहारानें मला चवदा वर्षें वनांतच राहिलें पाहिजे. म्हणून मला गांवाचा आश्रय करणें उचित नव्हे." हें ऐकतांच गुह दुःखानें अगदीं दडपून गेला.

चौ०—राम-लषन-सियरूप निहारी ।
कहहिँ सप्रेम ग्राम-नर-नारी ।
ते पितु मातु कहहु सखि कैसे ।
जिन्ह पठये बन बालक ऐसे ।

सीता, राम, लक्ष्मण यांच्या मूर्ती पाहून खेडवळ पुरुष, बायका देखील कळवळून म्हणत असत कीं, काय हो ! ज्यांनीं आपलीं असलीं बाळें रानोमाळ हिंडवलीं ते आईबाप तरी कसले ? सांगा बरें !

एक कहहिँ भल भूपति कीन्हा ।
लोचनलाहु हमहिँ बिधि दीन्हा ।

कोणी म्हणूं लागले कीं, राजानें हा आम्हांवर उपकारच केला म्हणून तर आम्हांस आमच्या डोळ्यांचें पांग फेडण्यास सांपडलें.

तब निषादपति उर अनुमाना ।
तरु सिंसुपा मनोहर जाना ।
लेइ रघुनाथहि ठाउँ देखावा ।
कहेउ राम सबभाँति सुहावा ।
पुरजन करि जोहारु घर आये ।
रघुबर संध्याकरन सिधाये ।

नंतर शिंशुपा वृक्ष अतिशय रमणीय आहे असा मनांत विचार करून गुहानें रघुनाथास नेऊन तें स्थळ दाखविलें. रामालाहि तें सर्वोत्कृष्ट वाटलें. गांवकरी लोक जोहार करून घरोघर गेले आणि राम संध्यावंदन करण्यास निघाले.

गुह सवाँरि साथरी डसाई ।
कुस-किसलय-मय मृदुल सुहाई ।
सुचि फल मूल मधुर मृदु जानी ।
दोना भरि भरि राखेसि आनी ।

गुहानें कोवळ्या लुसलुशीत कुशपत्रांची सुरेखशी शेज तयार केली आणि स्वच्छ, मृदु आणि मधुर अशीं आपल्या माहितीचीं फळेंमुळें द्रोण भरभरून आणून ठेविलीं.

**दो०—सिय-सुमंत्र-भ्राता-सहित कंद मूल फल खाइ । सयन कीन्ह रघु-बंस-मनि पाय पलोटत भाइ ॥ ८७ ॥**

सीता, सुमंत आणि लक्ष्मण यांच्यासह कंदमूलफलांचा फराळ करून त्या रघुवंशमणीनें निद्रा केली, आणि लक्ष्मण त्याचे पाय चेपूं लागला.

चौ०—उठे लषनु प्रभु सोवत जानी ।
कहि सचिवहि सोवन मृदुबानी ।
कछुक दूरि सजि बानसरासन ।
जागन लगे बैठि बीरासन ।

प्रभूंना निद्रा लागलीसें पाहून लक्ष्मण उठला त्यानें अगदीं हळूच सुमंतासहि निद्रा करण्यास सांगितलें, आणि स्वतः धनुष्यास बाण लावून व वीरासन घालून तो कांहीं अंतरावर पहारा जागवूं लागला.

गुह बोलाइ पाहरू प्रतीती ।
ठावँ ठावँ राखे अति प्रीती ।
आपु लषन पहिँ बैठेउ जाई ।
कटि भाथा सर चाप चढाई ।

गुहानें मोठ्या प्रीतीनें इमानी शिपाई बोलावून त्यांस जागोजागीं नेमलें. आणि आपण खुद्द कंबरेस भाता मारून आणि धनुष्यास बाण लावून लक्ष्मणापाशीं जाऊन बसला.

सोवत प्रभुहि निहारि निषादू ।
भयउ प्रेमबस हृदय बिषादू ।
तनु पुलकित जल लोचन बहई ।
बचत सप्रेम लषन सन कहई ।

राम(कुशशय्येवर) निजलेले पाहून त्याच्या हृदयांत प्रेम दाटून येऊं लागलें आणि तो दुःखानें अगदीं भांबावून गेला.त्याच्या अंगावर शहारे येऊन त्याच्या डोळ्यांतून टिपें गळूं लागलीं. त्या प्रेमभरांत तो लक्ष्मणास उद्गारला—

भू—पति—भवन सुभाय सुहावा ।
सुर—पति—सदन न पटतर पावा ।
मनि—मय रचित चारु चौबारे ।
जनु रतिपति निजहाथ सवाँरे ।

"दशरथाचें राजमंदिरच मुळीं इतकें प्रेक्षणीय कीं इंद्रभुवनदेखील त्याच्या तुलनेस ओछें पडेल. त्यांतील रत्नखचित बारद्वाऱ्या तर इतक्या मनोहर कीं, जणुंकाय त्या मदनानें स्वहस्तानेंच उभारल्या असाव्या.

दो०–सुचि सुबिचित्र सु-भोग-मय सुमन सुगंध सुबास । पलग मंजु मनिदीप जहँ सब बिधि सकल सुपास ॥ ८८ ॥

चौ०–बिबिध बसन उपधान तुराई ।
छीरफेन मृदु बिसद सुहाई ।
तहँ सियराम सयन निसि करहीं ।
निज छबि रति-मनोज-मद हरहीं ।
ते सियराम साथरी सोये ।
स्रमित बसन बिनु जाहिँ न जोये ।

तऱ्हातऱ्हांचीं ताजीं सुवासिक फुलें, उंची चंदनें, उंची अत्तरें, नक्षीदार छप्परपलंग, रत्नांचे दिवे, अनेक प्रकारचीं वस्त्रें, दुधाच्या फेसाप्रमाणें शुभ्र सरपोसाच्या मऊ गाद्यागिरद्या, इत्यादि सर्व प्रकारची जेथें सर्व समृद्धि, अशा पवित्र, चित्रविचित्र आणि सर्वभोगसंपन्न ठिकाणीं जे सीताराम नित्य आनंदानें शयन करून आपल्या कांतीनें रतिमदनांचाहि गर्व जिरवीत असत, तेच हे सीताराम दमूनभागून ह्या कुशशय्येवर वस्त्रावांचून शयन करीत असलेले बघून हे डोळे फुटत तरी कां नाहींत !

मातु पिता परिजन पुरबासी ।
सखा सुसील दास अरु दासी ।
जोगवहिँ जिन्हहिँ प्रान की नाईँ ।
महि सोवत तेइ राम गोसाईँ ।

माता, पिता, परिजन, प्रजा, मित्र, सुशील दास आणि दासी हे ज्यांना प्राणाप्रमाणें जपत असत, त्या सर्वेश्वर रामाला उघडया जमिनीवर शयन करण्याची पाळी यावी ना !

पिता जनक जग बिदित प्रभाऊ ।
ससुर सुरेससखा रघुराऊ ।
रामचंद्र पति सो बैदेही ।
सोवत महि बिधि बाम न केही ।

लोकविख्यात महात्मा जनक जिचा पिता, इंद्रदेखील ज्याची खुषामत करतो असा रघुश्रेष्ठ दशरथ जिचा श्वशुर आणि रामचंद्र जिचा वल्लभ त्या वैदेहीला भुईवर लोळत पडण्याचा प्रसंग यावा ना ! कोणावरहि प्राक्तन इतकें कंटक झालें नसेल !

सिय रघुबीर कि कानन जोगू ।
करम प्रधान सत्य कह लोगू ।

सीताराम वनवासास लायक काय ! 'कर्मच प्रधान' अशी जी लोकांत म्हण आहे तीच अखेर खरी.

दो०–कैकयनंदिनि मंदमति कठिन कुटिलपन कीन्ह । जेहि रघुनंदन जानकिहिँ सुखअवसर दुख दीन्ह ॥ ८९ ॥

ऐन सुखाच्या रंगांत रघुनंदनजानकीला जिनें दुःखांत लोटलें त्या वात्रट कैकेयीनें दुष्टाव्याची पराकाष्ठाच केली.

चौ०–भइ दिन-कर-कुल-बिटप-कुठारी ।
कुमति कीन्हि सब बिस्व दुखारी ।
भयउ बिषाद निषादहि भारी ।
रामसीय महिसयन निहारी ।

सूर्यकुलरूप वृक्षास ती केवळ कुऱ्हाडच झाली. त्या महंमायेनें सर्व जग भाजून काढलें. सीतारामाचें भूमीवर पहुडणें पाहून निषादाचा विषाद विशेषच वाढला.

बोले लषन मधुर-मृदु-बानी ।
ज्ञान-बिराग-भगति-रस-सानी ।

तेव्हां ज्ञान, वैराग्य आणि भक्तिरस यांनीं परिप्लुत अशा मधुर आणि मृदु वाणीनें लक्ष्मण म्हणाला-

काहु न कोउ सुख दुख कर दाता ।
निजकृत करम भोग सब भ्राता ।
जोग बियोग भोग भल मंदा ।
हित अनहित मध्यम भ्रम फंदा ।

"बंधो ! सुख वा दुःख कोणी कोणाला देत नसतात. जो तो आपापल्या कृतकर्मांचें फल म्हणून तें भोगीत असतो.* संयोग, वियोग आणि भोग त्याचप्रमाणें चांगुलपणा, वाईटपणा, तसेंच शत्रु, मित्र, उदासीन हे सर्व भाव म्हणजे केवळ भ्रमाचा बाजार समज.

जनम मरन जहँ लगि जगजालू ।
संपति बिपति करम अरु कालू ।
धरनि धाम धन पुर परिवारू ।
सरग नरक जहँ लगि ब्यवहारू ।
देखिय सुनिय गुनिय मन माहीँ ।
मोहमूल परमारथ नाहीँ ।

संपत्ति, विपत्ति, कर्म आणि काळ, धर्म, धाम, धन, पुर-परिवार, स्वर्ग, नरक, यच्चयावत् जगांतील व्यवहार, जन्ममरण इत्यादि प्रापंचिक जंजाळ,

* सुखस्य दुःखस्य न कोऽपि दाता ।
स्वकर्मसूत्रग्रथितो हि लोकः ॥

सारांश जेवढें म्हणून दृश्य, श्राव्य किंवा वेद्य आहे, तें सर्व मोहाचेंच अवडंबर आहे. त्यांत मोक्षसाधनाचा संपर्कच नाहीं.

**दो०–सपने होइ भिखारि नृप रंक नाकपति होई। जागे लाभ न हानि कछु तिमि प्रपंच जिय जोई॥ ९०॥**

स्वप्नांत राजाचा रंक होतो आणि रंकाचा इंद्र होतो. जागेपणीं त्यांपासून कांहींच लाभ अगर हानि होत नाहीं. पाहूं गेल्यास हा प्रपंच तद्वतच आहे.

चौ०--अस बिचारि नहिँ कीजिय रोषू।
काहुहि बादि न देइय दोषू।
मोहनिसा सब सोवनिहारा।
देखिय सपन अनेक प्रकारा।

असा विचार करून त्रागा करूं नये आणि व्यर्थ कोणासहि नांवें ठेवूं नयेत. सर्व लोक मोहनिद्रेंत घोरत असून नाना प्रकारचीं स्वप्नें पहात असतात.

एहि जग जामिनि जागहिँ जोगी।
परमारथी प्रपंचबियोगी।
जानिय तबहिँ जीव जग जागा।
जब सब बिषय बिलास बिरागा।
होइ बिबेक मोहभ्रम भागा।
तब रघु--नाथ--चरन अनुरागा।

ह्या जगांत मोहरात्रीचे ठायीं अद्वैतानुभवामुळें प्रपंचापासून अलिप्त राहणारे योगीच जागृत असतात. जेव्हां अखिल विषयोपभोगापासून जीव विरक्त होतो तेव्हांच तो जागृत आहे असें समजावें. विवेक झाल्यानेंच मोह आणि भ्रम हे मावळतात आणि तेव्हांच राघवचरणीं आसक्ति उत्पन्न होते.

सखा परमपरमारथ एहू।
मन--क्रम--बचन रामपद नेहू।
राम ब्रह्म परमारथरूपा।
अबिगत अलख अनादि अनूपा।
सकल--बिकार--रहित गतभेदा।
कहि नित नेति निरूपहिँ बेदा।

मित्रा! जो राम परब्रह्म, परमार्थरूप, अवेद्य, अलक्ष्य, अनादि, अप्रमेय, निर्विकार, अभेद, आणि त्यास आम्ही जाणीत नाहीं असें ज्याचें वेद निरूपण करितात, त्या रामचरणांचे ठायीं कायावाचामनेंकरून प्रेम असणें हेंच परमार्थाचें सारसर्वस्व समज.

**दो०–भगत भूमि भूसुर सुरभि सुर हित लागि कृपाल। करत चरित धरि मनुज तन सुनत मिटहिँ जगजाल॥ ९१॥**

भक्त, भूमि, ब्राह्मण आणि गाई यांच्या परित्राणार्थ कृपाळु रामचंद्र हा मनुष्यावतार धारण करून ज्यांच्या श्रवणानें प्रपंचपाश निस्तरेल अशीं हीं चरित्रें करीत आहे.

चौ०--सखा समुझि अस परिहरि मोहू।
सिय--रघुबीर--चरन रत होहू।

सख्या! हें समजून मोहाचा त्याग कर आणि सीतारामचरणीं रत हो."

कहत रामगुन भा भिनुसारा।
जागे जगमंगल दातारा।
सकल सौच करि राम नहावा।
सुचि सुजान बटछीर मँगावा।
अनुजसहित सिर जटा बनाये।
देखि सुमंत्र नयनजल छाये।

याप्रमाणें रामाचे गुणानुवाद गात असतां सकाळ झाली आणि जगाचा मंगलदाता राम जागृत झाला. सर्व प्रातर्विधि आटोपून त्यानें स्नान केलें आणि त्या शुद्धबुद्धानें वटक्षीर मागवून लक्ष्मणासह आपल्या मस्तकावर जटा वळल्या. तें पाहून सुमंताचे नेत्र अश्रूंनीं डबडबले.

हृदय दाह अति बदन मलीना।
कह कर जोरि बचन अति दीना।
नाथ कहेउ अस कोसलनाथा।
लेइ रथ जाहु राम के साथा।
बन देखाइ सुरसरि अन्हवाई।
आनेहु फेरि बेगि दोउ भाई।
लषन राम सिय आनेहु फेरी।
संसय सकल सँकोच निबेरी।

त्याच्या हृदयाचा दाह होऊन त्याचा चेहरा अगदींच शुष्क झाला व हात जोडून तो अति दीन बनून गळ घालूं लागला:—"नाथा! महाराजांची मला आज्ञा आहे कीं, रामाबरोबर रथ घेऊन जा, वन दाखीव, गंगास्नान करीव आणि फिरून दोघांहि बंधूंना सत्वर आण, सर्व संशय आणि संकोच निवारून सीतारामलक्ष्मणांस परत आणच.

**दो०–नृप अस कहेउ गोसाइँ अस कहिय करउँ बालि सोइ । करि बिनती पायन्ह परेउ दीन्ह बाल जिमि रोइ ॥ ९२ ॥**

महाराज ! सरकारची आज्ञा ही अशी आहे. यावर आपली जशी आज्ञा होईल तीच मला सक्तीनें प्रमाण मानली पाहिजे. " ही विनंति करून त्यानें रामचरणीं लोटांगण घातलें आणि तो अनाथ बालकाप्रमाणें आक्रोशूं लागला.

चौ०–तात कृपा करि कीजिय सोई ।
जा तें अवध अनाथ न होई ।

( सुमंत म्हणाला, ) " महाराज ! कृपा करून जेणेंकरून अयोध्या अनाथ होणार नाहीं तेंच करावें. "

मंत्रिहि राम उठाइ प्रबोधा ।
तात धरममत तुम्ह सब सोधा ।
सिवि दधीच हरिचंद नरेसा ।
सहे धरमहित कोटि कलेसा ।
रंतिदेव बालि भूप सुजाना ।
धरम धरेउ सहि संकट नाना ।

राम सुमंतास उचलून बोध करूं लागलेः–"सुमंत ! धर्मविचारांचा तुम्हीं सर्व शोध केलाच आहे. शिबी, दधीची, राजा हरिश्चंद्र ह्यांनीं धर्मासाटीं दुःखांचे डोंगर सहन केले आहेत. रंतिदेवें, राजा बलि, ह्या तज्ज्ञांनीं अनेक संकटें सोसूनहि धर्माचा प्रतिपाळ केला आहे.

धरम न दूसर सत्यसमाना ।
आगम निगम पुरान बखाना ।
मैं सोइ धरम सुलभ करि पावा ।
तजे तिहूँपुर अपजसु छावा ।

सत्यासारखा अन्य धर्मच नाहीं असें वेदशास्त्रपुराणाचें मत आहे. तो धर्म मला अनायासें प्राप्त झाला आहे. त्याचा त्याग केल्यास त्रैलोक्यांत माझी नामोषी होईल.

संभावित कहुँ अपजसलाहू ।
मरन-कोटि-सम दारुन दाहू ।
तुम्ह सन तात बहुत का कहऊँ ।
दिये उतरु फिरि पातक लहऊँ ।

संभाविताला दुष्कीर्तीत कोटिशः मृत्यूचें दुःख साठवलेलें दिसतें. ( ' संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते '—गीता. ) सुमंत ! तुम्हांशीं मी अधिक काय बोलावें ? तुमच्या तोंडास तोंड देऊन मला दोषांचाच भागीदार व्हावें लागेल.

**दो०–पितुपद गहि कहि कोटि नाति विनय करब कर जोरि । चिंता कवनिहुँ बात कै तात करिय जनि मोरि ॥ ९३ ॥**

पित्याचे चरण धरून आणि माझे अनेक दण्डवत निवेदन करून तुम्हीं त्यांस माझ्या वतीनें हात जोडून विनंति करावी कीं, तातांनीं माझी कोणत्याहि गोष्टीसंबंधानें चिंता करूं नये.

चौ०–तुम्ह पुनि पितुसम अतिहित मोरे ।
विनती करउँ तात कर जोरे ।
सब बिधि सोइ करतव्य तुम्हारे ।
दुख न पाव पितु सोच हमारे ।

शिवाय तुम्ही तरी माझे पित्याप्रमाणेंच अत्यंत हितेच्छू आहांत. म्हणून, हे तात ! तुम्हालाहि मी हात जोडून विनंति करितों कीं, जेणेंकरून आमच्या शोकानें पिता तळमळत न राहील तेंच सर्वतोपरी आपलें कर्तव्य आहे. "

सुनि रघु-नाथ-सचिव-संबादू ।
भयउ सपरिजन बिकल निषादू ।
पुनि कछु लषन कही कटुबानी ।
प्रभु बरजेउ बड अनुचित जानी ।
सकुचि राम निजसपथ देवाई ।
लषनसँदेसु कहिय जनि जाई ।

हा रामसुमंतांचा संवाद ऐकून गुह आणि त्याची मंडळी फार गहिंवरली. नंतर लक्ष्मणानें कांहीं कटूक्ति उच्चारली. परंतु ती अति बेफाम समजून रामांनीं लक्ष्मणाचें तोंड दाबलें, आणि संकोचून व

---

१ राजा रंतिदेव महान् धर्मात्मा होता. त्यानें राज्याचा त्याग करून स्त्रीपुत्रांसह वनांत जाऊन तपश्चर्या आरंभिली. एके समयीं ४८ दिवसांनीं त्याला थोडेंसें अन्न प्राप्त झालें. तेव्हां नैवेद्य अर्पण करून त्यानें त्याचे तीन हिस्से केले. इतक्यांत एक अतिथि येऊन, त्यानें अन्नाची याचना केली असतां राजानें आपला भाग त्याला दिला; परंतु त्यानें अधिक याचना केल्यामुळें स्त्रीपुत्रांचेहि भाग त्याला अर्पण केले व निर्विकार राहून तो भगवच्चिंतन करूं लागला. ही त्याची विदेहस्थिति पहातांच भगवंतानें दर्शन देऊन त्याचा उद्धार केला.

आपली शपथ घालून ते सुमंतास म्हणाले, 'लक्ष्मणाचा हा निरोप आपण बिलकुल सांगू नये.'

कह सुमंत्र पुनि भूप सँदेसू ।
सहि न सकिहि सिय बिपिनकलेसू ।
जेहि बिधि अवध आव फिरि सीया ।
सोइ रघुबरहि तुम्हहि करनीया ।
न तरु निपट अवलंबबिहीना ।
मैं न जियब जिमि जल बिनु मीना ।

सुमंत फिरून राजाचा निरोप सांगू लागलाः—" सीतेला वनांतील क्लेश सहन करवणार नाहींत. जेणेंकरून सीता अयोध्येस परत येईल तेंच राघवांनीं अवश्य केलें पाहिजे. नाहींपेक्षां निव्वळ निराधार होऊन मी जलविहीन माशाप्रमाणें जगणार नाहीं.

दो०—मइके ससुरे सकलसुख जबहि जहाँ मन मान । तहँ तव रहिहि सुखेन सिय जब लगि बिपत बिहान ॥ ९४ ॥

माहेरीं आणि सासरीं सर्वसुखें अनुकूल आहेत. जेव्हां जेथें मन मानेल तेंव्हां तेथें सीतेनें विपत्य-वसान होईपर्यंत रहात जावें.

चौ०—बिनती भूप कीन्ह जेहि भाँती ।
आरति प्रीति न सो कहि जाती ।

ही विनंति राजानें ज्या रीतीनें केली ती काकलुत आणि तो कळवळा सांगतां येत नाहीं. "

पितुसँदेस सुनि कृपानिधाना ।
सियहि दीन्ह सिख कोटि बिधाना ।
सासु ससुर गुर प्रिय परिवारू ।
फिरहु त सब कर मिटइ खँभारू ।

येणेंप्रमाणें पित्याचा निरोप ऐकून कृपासागर रामांनीं सीतेस पुष्कळच सांगून पाहिलें कीं, तुझ्या परतण्यानें सासू, सासरा, वडील, परिवार वगैरे सर्व जिव्हाळ्याच्या माणसांची तळमळ मिटेल.

सुनि पतिबचन कहति बैदेही ।
सुनहु प्रानपति परमसनेही ।
प्रभु करुनामय परमबिबेकी ।
तनु तजि रहति छाँह किमि छेंकी ।
प्रभा जाइ कहँ भानु बिहाई ।
कहँ चंद्रिका चंद तजि जाई ।

पतीचें संभाषण ऐकून जानकी म्हणालीः—" हे परमप्रिय प्राणेश्वरा ! ऐकावें. प्रभु दयेची मूर्ति आणि विवेकाची सीमाच आहेत. पदार्थास सोडून त्याची छाया निराळी कशी बरें होईल ? सूर्यास टाकून प्रभेनें कोठें बरें जावें ? चंद्रास वर्जून चंद्रिकेनें कोणाचा आश्रय करावा ?

पतिहि प्रेममय बिनय सुनाई ।
कहति सचिव सन गिरा सुहाई ।
तुम्ह पितु-ससुर-सरिस हितकारी ।
उतरु देउँ फिरि अनुचित भारी ।

अशा रीतीनें पतीची प्रेमळ प्रार्थना करून ती सुमंतास सौम्य शब्दांनीं म्हणालीः—" तुम्ही तरी माझे, पिता आणि श्वशुर यांच्यासारखेच हितचिंतक आहांत. तेव्हां तुम्हांस मीं प्रत्युत्तर द्यावें ही आपली भारीच अमर्यादा होणार आहे.

दो०—आरतिबस सनमुख भइउँ बिलगु न मानब तात । आरज-सुत-पद-कमल बिनु बादि जहाँ लगि नात ॥ ९५ ॥

महाराज ! केवळ विपत्तिवशात् मी तोंड देत आहे, त्याचा आपण विषाद मानूं नये. आर्यपुत्राच्या पदकमलांखेरीज मी यच्चयावत् नातीं फोल समजतें.

चौ०—पितु-बैभव-बिलास मैं डीठा ।
नृप-मनि-मुकुट मिलत पदपीठा ।
सुखनिधान अस पितुगृह मोरे ।
पियबिहीन मन भावन भोरे ।

ज्याच्या चरणांवर राजेश्वरांच्या किरीटांची पाय-घासणी नित्य होत असते अशा माझ्या पित्याचें वैभव आणि विलास मीं पाहिले आहेत. सुखांचें केवळ घर असें माझें माहेर, परंतु पतीखेरीज तें-देखील माझ्या मनास चुकूनदेखील येत नाहीं.

ससुर चक्कवइ कोसलराऊ ।
भुवन चारिदस प्रगट प्रभाऊ ।
आगे होइ जेहि सुरपति लेई ।
अरधसिंहासन आसन देई ।
ससुर एतादृस अवधनिवासू ।
प्रिय परिवारु मातुसम सासू ।
बिनु रघुपति-पद-पदुम-परागा ।
मोहि कोउ सपनेहु सुखद न लागा ।

ज्यांचा दरारा चतुर्दश भुवनांत गाजत आहे, खुद्द देवेंद्र समोरा होऊन व स्वागत करून ज्यांना आपल्या अर्ध्या सिंहासनावर जागा देत असतो, असे चक्रवर्ती कोशलराज माझे श्वशुर आहेत, अयोध्येच्या सर्व मंडळींना केवळ जीव कीं प्राण वाटणारी मी

आहे, आणि माझ्या सासवा तर मजविषयीं आई-प्रमाणें प्रेम बाळगीत आहेत; तरीहि पण रघुपतींच्या पदकमलपरागांखेरीज स्वप्नांतहि कोणीच मला सुखकारक वाटत नाहीं.

अगम पंथ बन भूमि पहारा।
करि केहरि सर सरित अपारा।
कोल किरात कुरंग बिहंगा।
मोहि सब सुखद प्रान-पति-संगा।

हे अवघड रस्ते, हें अरण्य, हीं दरींखोरीं, हे डोंगर, हे भयंकर प्राणी, हीं हिंस्र श्वापदें, हीं खंडोगणतीं तळीं, ह्या नद्या, हे काळी, पारधी, हे पशुपक्षी हेच अवघे मला माझ्या प्राणेश्वराच्या संगतींत सुखाचे साथी वाटतात.

**दो०—सासु ससुर सन मोरि हुति बिनय करबि परि पाय। मोरि सोचु जनि करिय कछु मैँ वन सुखी सुभाय ॥ ९६ ॥**

माझ्या तर्फेनें सासुसासऱ्यांना पायां पडून विनंति करावी कीं माझी काळजी आपण तिलमात्रहि वाहूं नये. वनांतच मी मनापासून सुखी आहे.

चौ०— प्राननाथ प्रियदेवर साथा।
धीर धुरीन धरे धनु भाथा।
नहिँ मन स्रम भ्रम दुख मन मोरे।
मोहि लगि सोचु करिय जनि भोरे।

माझे प्राणनाथ आणि माझे प्रिय भावोजी ह्या उभयतां वीराग्रणींनीं धनुष्यबाण घेतल्यावर माझ्या मनाला वाटेंत दगदग, भीति किंवा दुःख व्हावयाचेंच नाहीं. मजसाठीं चुकूनदेखील चिंता करूं नये."

सुनि सुमंत्र सिय सीतलबानी।
भयउ बिकल जनु फनि मनिहानी।
नयन सूझ नहिँ सुनइ न काना।
कहि न सकइ कछु अति अकुलाना।

सीतेचे ते प्रशांत उद्गार ऐकून माणि गमावलेल्या नागाप्रमाणें सुमंत विकळ झाला. त्याच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली, त्याला कांहींच ऐकूयेना आणि त्याच्या मुखांतून शब्दहि निघेना. अशा रीतीनें तो अतिशय बेहाल झाला.

राम प्रबोधु कीन्ह बहुभाँती।
तदपि होति नहिँ सीतल छाती।
जतन अनेक साथहित कीन्हे।
उचित उतर रघुनंदन दीन्हे।

रामांनीं परोपरीनें त्याला उपदेश केला, तरीदेखील त्याचें अंतर निवेना. रामांनीं बरोबर न्यावें, म्हणून त्यानें बहुत यत्न करून पाहिला; परंतु प्रत्येक वेळीं रामांनीं त्यास समर्पक उत्तरें दिलीं.

मेटि जाइ नहिँ रामरजाई।
कठिन करमगति कछु न बसाई।
राम--लषन--सिय--पद सिरु नाई।
फिरेउ बनिक जिमि मूर गवाँई।

रामाची आज्ञा अनुल्लंघनीय आणि कर्माची गति अनिवार, त्यावर इलाज नाहीं (हा निश्चय समजून) आणि रामलक्ष्मणसीता यांच्या चरणीं मस्तक नमवून भांडवल गमावलेल्या पेढीवाल्याप्रमाणें सुमंत नादार होऊन फिरला.

**दो०—रथ हाँकेउ हय रामतन हेरि हेरि हिहिनाहिँ। देखि निषाद बिषादबस धुनहिँ सीस पछिताहिँ ॥ ९७ ॥**

त्यानें रथ हांकिला तेव्हां तर घोडेदेखील राममूर्तीकडे न्याहाळून खिंकाळूं लागले. तें पाहून निषादलोक दुःखानें बेहाष होऊन कपाळ बडवून शोक करूं लागले.

चौ०--जासु बियोग बिकल पसु ऐसे।
प्रजा मातु पितु जीहहिँ कैसे।
बरबस राम सुमंत्र पठाये।
सुरसरितीर आप तब आये।

(तुलसीदास म्हणतात,) ज्यांच्या वियोगानें पशूंचीदेखील ही विकलता त्याचे मातापिता आणि प्रजा कसे जगावेत ? रामांनीं सुमंतास जबरीनें परतवून आपण गंगाकांठीं आले.

माँगी नाव न केवट आना।
कहइ तुह्मार मरमु मैँ जाना।
चरन-कमल-रज कहँ सब कहई।
मानुषकरनि मूरि कछु अहई।

रामांनीं नाव मागविली. परंतु गुहानें ती आणली नाहीं. तो म्हणालाः—" आपली मख्खी मी ओळखून आहे. आपल्या चरणकमलांचे रजासंबंधानें सर्व जग साक्ष देईल कीं त्यांच्यांत मनुष्य बनविण्याची कांहीं किमया भरली आहे.

छुअत सिला भइ नारि सुहाई।
पाहन तें न काठ कठिनाई।
तरनिउँ मुनिघरनी होइ जाई।
बाट परइ मोरि नाव उडाई।

ते रज लागतांच शिळेची बाकी बायको बनली. दगडापरीस लाकूड तर केव्हांहि मऊच. तेव्हां ही नाव देखील एकाद्या मुनीची अंतुरी बनेल आणि मी मात्र ना नाव ना रोजमुरा मिळून नंगा बनेन.

एहि प्रतिपालउँ सब परिवारू।
नहिँ जानउँ कछु अउर कबारू।
जौँ प्रभु पार अवसि गा चहहू।
मोहि पदपदुम पखारन कहहू।

हिच्याच भरंवशावर मी आपला संसार थाटतो. इतर काबाड[1] मला माहीतच नाहीं. परपार गाठणें अवश्यच असेल तर प्रभूंनीं आपलीं चरणकमलें धुण्याची मला परवानगी तरी द्यावी.

छंद—पदकमल धोइ चढाइ नाव न नाथ उतराई चहउँ। मोहि राम राउरि आन दसरथसपथ सब साँची कहउँ॥ बरु तीर मारहु लषन पै जब लगि न पाय पखारिहउ। तब लगि न तुलसीदास नाथ कृपालु पारु उतारिहउँ॥ ४॥

पदकमलें धुईन तरच नावेंत चढवीन. हे नाथ! मला उतराईची ( मजुरीची ) गरज नाहीं. मी ह्या माझ्या रामप्रभूंची आणि दशरथ महाराजांची शपथ घेऊन हें सत्य सांगतों. पाहिजे तर लक्ष्मण आपल्या बाणानें माझा जीवदेखील घेवो, परंतु जोंवर मी पाय धुतले नाहींत तोंवर ह्या दयाघन प्रभूस मी पैलतीरावर नेणारच नाहीं.

सो०—सुनि केवट के बैन प्रेम लपेटे अटपटे। बिहँसे करुना ऐन चितइ जानकी-लषन-तन॥ ४॥

प्रेमसंपुटित असे ते गुहाचे अटसंट बोल ऐकून करुणानिधान हंसले आणि सीतालक्ष्मणांकडे पाहूं लागले.

चौ०-कृपासिंधु बोले मुसुकाई।
सोइ करु जेहि तव नाव न जाई।

[1] अत्यंत मार्मिक शब्दचित्र.

बेगि आनु जल पाय पखारू।
होत बिलंब उतारहि पारू।

कृपासागर हंसून म्हणाले:—जेणेंकरून तुझी नाव जाणार नाहीं तेंच कर बरें. आपला लवकर पाणी आण आणि पाय धू कसा. परतीरीं जाण्यास उशीर होत आहे.

जासु नाम सुमिरत एक बारा।
उतरहिँ नर भवसिंधु अपारा।
सोइ कृपालु केवटहि निहोरा।
जेहिँ जग किय तिहुँ पगहुँ तेँ थोरा।

ज्याच्या एकवार नामस्मरणानें नर अपार भवसागरांतून उत्तीर्ण होतो आणि ज्याच्या तीन पावलांस त्रैलोक्य पुरेनासें होतें, तो कनवाळू राम यःकश्चित् कोळ्याचेंहि कोडकौतुक पुरविता झाला!

पदनख निरखि देवसरि हरषी।
सुनि प्रभुबचन मोह मति करषी।

प्रभूंचीं पदनखें पहातांच गंगेस हर्ष दाटला होता; परंतु त्यांचे शब्द ऐकून तिची धांदल उडाली.

केवट रामरजायसु पावा।
पानि कठवता भरि लेइ आवा।
अतिआनंद उमगि अनुरागा।
चरनसरोज पखारन लागा।
बरषि सुमन सुर सकल सिहाहीँ।
एहि सम पुन्यपुंज कोउ नाहीँ।

रामाज्ञा होतांच गुहानें लाकडाची कुंडी भरून पाणी आणलें आणि प्रेमाच्या आणि आनंदाच्या दंगलींत तो चरणकमलें धुऊं लागला. तेव्हां पुष्पवृष्टि करून ह्याच्यासारखा पुण्यात्मा कोणीच नाहीं म्हणून सर्व देव त्याची वाखाणणी करूं लागले.

दो०—पद पखारि जलपान करि आपु सहित परिवार। पितर पारु करि प्रभुहिँ पुनि मुदित गयउ लेइ पार॥ ९८॥

पादप्रक्षालन करून आणि परिवारासहित तीर्थप्राशन करून गुहानें प्रथम आपल्या पितरांचा उद्धार केला, आणि नंतर त्यानें रामप्रभूंचा ( गंगेंतून ) उद्धार केला.

चौ०—उतरि ठाढ भये सुरसरिरेता।
सीय राम गुह लषनसमेता।
केवट उतरि दंडवत कीन्हा।
प्रभुहि सकुच एहि नहिँ कछु दीन्हा।

सीता, लक्ष्मण आणि गुह यांच्यासुद्धां रामचंद्र उतरून गंगेच्या वाळवंटांत उभे राहिले. उतरल्यावर गुहानें दंडवत घातला. आपणाला त्याला कांहींच देतां आलें नाहीं म्हणून प्रभु ओशाळल्यासारखे झाले.

पियहिय की सिय जाननिहारी ।
मनिमुँदरी मन मुदित उतारी ।
कहेउ कृपाल लेहु उतराई ।
केवट चरन गहेउ अकुलाई ।

( हें पाहून ) पतीचें इंगित ओळखणाऱ्या सीतेनें खुषदिलानें बोटांतून रत्नमुद्रिका उतरविली. तेव्हां दयाघन म्हणाले—ही उतराई घे. हें ऐकून गुह त्यांचे चरण धरून काकलुतीनें म्हणाला—

नाथ आजु मैं काह न पावा ।
मिटे दोष-दुख-दारिद-दावा।
बहुत काल मैं कीन्हि मजूरी ।
आजु दीन्ह बिधि बनि भलि भूरी ।
अब कछु नाथ न चाहिय मोरे ।
दीनदयाल अनुग्रह तोरे ।
फिरती बार मोहि जोइ देवा
सो प्रसाद मैं सिर धरि लेवा ।

" हे प्रभो ! आज मला काय मिळालें नाहीं ? आपण तर माझ्या पातक, दुःख आणि दारिद्र्यरूपी दावानलाचा नायनाट केला.पूर्वापार सलग हाच धंदा मी करीत आलों, परंतु दैवानें आज मात्र या कावाडाची भरपूर भरपाई केली. हे नाथ ! आतां मला कशाचीच चाहा उरली नाहीं. हे दीनदयाल ! कृपाच असेल तर परततेवेळीं महाराज मला जें देतील तें मी प्रसाद म्हणून मस्तकावर घेईन."

**दो०—बहुत कीन्ह प्रभु लषन सिय नहिं कछु केवट लेइ । बिदा कीन्ह करुनायतन भगति बिमल बर देइ ॥ ९९ ॥**

राम, लक्ष्मण आणि सीता यांनीं आपणांकडून पुष्कळच मनविलें, परंतु तो कांहींच घेईना. तेव्हां दयाघनांनीं त्यास विशुद्ध भक्तीचा वर देऊन निरोप दिला.

चौ०—तब मज्जन करि रघुकुलनाथा ।
पूजि पारथिव नायउ माथा ।
सिय सुरसरिहिं कहेउ कर जोरी ।
मातु मनोरथ पुरउबि मोरी ।
पति-देवर-सँग कुसल बहोरी ।
आइ करउँ जेहि पूजा तोरी ।

नंतर रघुकुलनाथानें स्नान करून पार्थिवपूजा केली आणि नमस्कार घातला. सीतेनें गंगेस हात जोडून प्रार्थना केली कीं, " माते ! त्वां माझा नवस पूर्ण करावा. पति आणि दीर यांच्यासह मी सुखरूप परतल्यावर तुला मी पूजा देईन. "

सुनि सियबिनय प्रेम-रस-सानी ।
भइ तब बिमल बारि बरबानी ।

सीतेची ती प्रेमपूर्ण प्रार्थना ऐकल्यानंतर निर्मळ गंगाजलांत गंभीर वाणी झाली.

सुनु रघु-बीर-प्रिया बैदेही ।
तब प्रभाउ जग बिदित न केही ।
लोकप होहिं बिलोकत तोरे ।
तोहि सेवहिं सब सिधि कर जोरे ।
तुम्ह जो हमहिं बडि बिनय सुनाई ।
कृपा कीन्हि मोहि दीन्हि बडाई ।
तदपि देबि मैं देबि असीसा ।
सफलहोन हित निजबागीसा ।

" हे रघुवीरवल्लभे वैदेहि ! श्रवण कर. तुझा प्रभाव जगांत कोणास अवगत नाहीं? तुझ्या नुसत्या कटाक्षानें लोकपालत्व प्राप्त होतें. तुझ्या सेवकासमोर तर सर्व सिद्धी हात जोडून असतात. तूं माझ्यापुढें जी एवढी लीनता दाखवून माझा गौरव केलास त्यामुळें तूं मजवर कृपाच केली असेंच मी समजतें. तथापि हे मातुःश्री ! मी आपल्या वाग्देवीस साफल्य आणण्यास्तव तुला आशीर्वाद देतें कीं,

**दो०—प्राननाथ देवरसहित कुसल कोसला आइ । पूजिहि सब मन कामना सुजस रहिहि जग छाइ ॥ १०० ॥**

तूं पति आणि दीर यांच्यासहवर्तमान क्षेमरूप अयोध्येस परत येशील, तुझ्या सर्व मनःकामना परिपूर्ण होतील आणि तुझें सुयश ब्रह्मांडगोलाचें आक्रमण करील. "

चौ०—गंगवचन सुनि मंगलमूला ।
मुदित सीय सुरसरि अनुकूला ।

तें मंगलमूल गांगवाङ्मय श्रवण करून गंगा अनुकूल आहे असें वाटून सीतेस आल्हाद झाला.

तब प्रभु गुहहि कहेउ घर जाहू ।
सुनत सूख मुख भा उर दाहू ।

दीनबचन गुह कह कर जोरी।
विनय सुनहु रघु-कुल-मनि मोरी।

नंतर प्रभूंनीं गुहास घरीं जाण्यास फरमाविलें. तें ऐकतांच त्याच्या उरांत धडकी भरून त्याच्या तोंडचें पाणी पळालें. तो हात जोडून केविलवाणें म्हणालाः— "हे रघुकुलावतंसा माझी विनंति ऐकावी!

नाथ साथ रहि पंथ देखाई।
करि दिन चारि चरनसेवकाई।
जेहि बन जाइ रहब रघुराई।
परनकुटी मैं करबि सुहाई।
तब मोहि कहँ जसि देव रजाई।
सोइ करिहउँ रघु-बीर दोहाई।

(माझी अशी इच्छा आहे कीं,) प्रभूंच्या समागमें राहून मी मार्ग दाखवीत जाईन आणि चार दिवस चरणसेवा करीन. रघुराय ज्या वनांत जाऊन राहतील तेथें मी चांगली सोईस्कर पर्णकुटिका उभारीन आणि नंतर आपल्याच पायांची शपथ—मला आपली जशी आज्ञा होईल तसेंच मी करीन."

सहज सनेह राम लखि तासू।
संग लीन्ह गुह हृदय हुलासू।
पुनि गुह ज्ञाति बोलि सब लीन्हे।
करि परितोष बिदा तब कीन्हे।

त्याचा शुद्ध आणि सरळ भाव पाहून रामांनीं गुहास बरोबर घेतांच त्याच्या मनास अति उल्हास वाटला. नंतर त्यानें आपली सर्व मंडळी बोलावून घेतली आणि त्यांचें समाधान करून त्यांस परत फिरण्यास सांगितलें.

**दो०—तब गनपति सिव सुमिरि प्रभु नाइ सुरसरिहि माथ। सखा-अनुज-सिय-सहित बन गवन कीन्ह रघुनाथ ॥१०१॥**

नंतर गणपति आणि शंकर यांचें स्मरण करून, आणि गंगेस नमस्कार करून, गुह, लक्ष्मण आणि सीता यांच्यासहवर्तमान प्रभु रामचंद्रांनीं वनाप्रत गमन केलें.

चौ०—तेहि दिन भयउ बिटप तर बासू।
लषन सखा सब कीन्ह सुपासू।
प्रात प्रातकृत करि रघुराई।
तीरथराजु देखि प्रभु जाई।

तो दिवस रामांनीं झाडाखालींच काढला. लक्ष्मण आणि गुह यांनीं त्यांची सर्व व्यवस्था ठेविली. सकाळीं प्रातःकर्में आटोपून प्रभु रामराय तीर्थराजाच्या दर्शनास गेले.

सचिव सत्य स्रद्धा प्रियनारी।
माधवसरिस मीत हितकारी।
चारि पदारथ भरा भँडारू।
पुन्य प्रदेस देश अति चारू।
छत्र अगम गढ गाढा सुहावा।
सपनेहुँ नहिं प्रतिपच्छिन्ह पावा।
सेन सकल तीरथ बरबीरा।
कलुष–अनीक–दलन रनधीरा।
संगम सिंहासन सुठि सोहा।
छत्र अषयबट मुनिमन मोहा।
चवँर जमुन अरु गंग तरंगा।
देखि होहिं दुख–दारिद–भंगा।

(कवि तीर्थराज प्रयागाचें वर्णन करितात):— सत्य ज्याचा मुख्य मंत्री, श्रद्धा ज्याची प्रिय राणी, वेणीमाधव ज्याचा हितकर मित्र, चतुःपुरुषार्थ ज्याचें परिपूर्ण भांडार, पुण्यक्षेत्रें ज्याचें सुपीक राष्ट्र (किंवा प्रदेश म्हणजे गंगाजलानिर्धूत प्रदेश), प्रयागसीमान्त क्षेत्र ज्याचा अजिंक्य, सुदृढ, सुंदर आणि स्वप्नांतहि शत्रूला हार न जाणारा असा किल्ला, सर्व तीर्थें हा ज्याचा पापरूप सैन्याचें निर्दालन करणारा रणधीर शूरवीरान्वित दळभार, त्रिवेणीसंगम ज्याचें अत्यंत रमणीय सिंहासन आणि अक्षय वट ज्याचें मुनिमनांस मोहित करणारें छत्र, ज्याच्या दर्शनानें दुःख आणि दारिद्र्य लयास जातात असे गंगायमुनांचे जलतरंग हींच ज्याचीं चामरें,

**दो०—सेवहिं सुकृती साधु सुचि पावहिं सब मन काम। बंदी बेद पुरान-गन कहहिं बिमल गुनग्राम ॥ १०२ ॥**

पवित्र पुण्यात्मे संतजन ज्याच्या सेवनानें अखिल मनःकामना प्राप्त करून घेतात, अखिल वेद आणि पुराणें हे बंदिजन होऊन ज्याचें विमल गुणग्राम वर्णन करितात,

चौ०—को कहि सकइ प्रयागप्रभाऊ।
कलुष–पुंज–कुंजर–मृग–राऊ।

पापपुंजरूप कुंजराचा जो केवळ मृगराज, अशा त्या प्रयागराजाचा महिमा वर्णन करण्यास कोण समर्थ आहे!

अस तीरथपाति देखि सुहावा ।
सुखसागर रघुबर सुख पावा ।
कहि सिय लषनहिँ सखहिँ सुनाई ।
श्रीमुख तीरथ-राज-बडाई ।

असा तो रमणीय तीर्थराज पाहून सुखसागर रघुवराला आल्हाद वाटला, आणि ते तीर्थराजाचें माहात्म्य सीता, लक्ष्मण आणि निषाद यांस श्रीमुखानें सांगूं लागले.

करि प्रनाम देखत बन बागा ।
कहत महातम अतिअनुरागा ।
एहि बिधि आइ बिलोकी बेनी ।
सुमिरत सकल सुमंगल देनी ।
मुदित नहाइ कीन्हि सिवसेवा ।
पूजि जथाबिधि तीरथदेवा ।

श्रीरामांनीं वनोपवनें पहावीं, त्यांस प्रणाम करावा आणि अति प्रेमानें त्यांचें माहात्म्य सांगावें. ह्याप्रमाणें येत येत त्यांनीं, स्मरणमात्रेंकरून सर्व पुरुषार्थ देणारा असा त्रिवेणीसंगम पाहिला; आणि तेथें आनंदानें स्नान आणि लिंगार्चन करून तीर्थ-देवतांचें यथाविधि पूजन केलें.

तब प्रभु भरद्वाज पहिँ आये ।
करत दंडवत मुनि उर लाये ।
मुनि-मन-मोद न कछु कहि जाई ।
ब्रह्मानंदरासि जनु पाई ।

नंतर प्रभु भरद्वाजांकडे आले. त्यांनीं साष्टांग नमस्कार घालतांच भरद्वाजांनीं त्यांस हृदयाशीं कवटाळिलें. त्यांच्या चित्तास असा अनिर्वाच्य आनंद झाला कीं, जणुंकाय ब्रह्मानंदाची राशीच त्यांस हस्तगत झाली.

**दो०-दीन्हि असीस मुनीस उर अति अनंद अस जानि । लोचनगोचर सुकृतफल मनहुँ किये बिधि आनि ॥ १०३ ॥**

ब्रम्हदेवानें आपल्या सुकृतांचीं फळेंच आणून आपल्या डोळ्यांसमोर उभीं केलीं आहेत कीं काय असें वाटून त्यांच्या अंतःकरणांत अत्यानंद लोटला, आणि रामास त्यांनीं आशीर्वाद दिले.

चौ०-कुसलप्रश्न करि आसन दीन्हे ।
पूजि प्रेम परिपूरन कीन्हे ।
कंद मूल फल अंकुर नीके ।
दिये आनि मुनि मनहुँ अमी के ।

सीय-लषन-जन-सहित सुहाये ।
अति रुचि राम मूलफल खाये ।
भये बिगतस्रम राम सुखारे ।
भरद्वाज मृदुबचन उचारे ।

मुनींनीं कुशल विचारून रामचंद्रास आसन दिलें आणि प्रेमानें पूजन करून त्यांस संतुष्ट केलें. मुनींनीं मधुर कंद, मूल, फळें आणि पल्लवांकुर समर्पिले. ते केवळ अमृतप्राय वाटून रामांनीं सीता, लक्ष्मण आणि गुह यांसह अति आवडीनें भक्षिलें. रामचंद्र तृप्त आणि श्रमरहित झाले असतां भरद्वाजांनीं लोचदार भाषणास सुरुवात केली.

आजु सुफल तप तीरथ त्यागू ।
आजु सुफल जप जोग बिरागू ।
सुफल सकल-सुभ-साधन-साजू ।
राम तुम्हहिँ अवलोकत आजू ।
लाभ अवधि सुख अवधि न दूजी ।
तुम्हरे दरस आस सब पूजी ।
अब करि कृपा देहु बर एहू ।
निज-पद-सरसिज सहजसनेहू ।

आज आमचीं सर्व तपें, तीर्थाटनें, दानें फळास आलीं; आज सर्व जप, योग, वैराग्य फलद्रूप झाले; रामा ! आपल्या दर्शनानें आमची सर्व शुभाचार सामग्री कृतकार्य झाली; लाभाची सीमा आणि सुखाची पराकाष्ठा दुसरी उरलीच नाहीं; आपल्या दर्शनानें आमची सर्व आकांक्षा परिपूर्ण झाली. आतां मात्र कृपा करून एवढाच वर द्यावा कीं, आपल्या पद-कमलांचे ठायीं अहेतुक भक्ति आमचे हृदयांत उत्पन्न होवो.

**दो०-करम बचन मन छाँडि छल जब लगि जन न तुम्हार । तब लगि सुख सपनेहुँ नहिँ किये कोटिउपचार ॥ १०४ ॥**

कायावाचामनानें कपटाचें निर्मूलन करून प्राणी जावत्कालपर्यंत आपला सेवक होत नाहीं तावत्कालपर्यंत कोट्यवधि साधनें करून देखील सुख म्हणून त्यास स्वप्नांतरींहि दिसावयाचें नाहीं.”

चौ०-सुनि मुनिबचन राम सकुचाने ।
भाव भगति आनंद अघाने ।
तब रघुबर मुनि सुजस सुहावा ।
कोटि भाँति कहि सबहिँ सुनावा ।

सो बड सो सब-गुन-गन-गेहू।
जेहि मुनीस तुह्म आदर देहू।
मुनि रघुबीर परसपर नवहीँ।
बचन अगोचर सुख अनुभवहीँ।

मुनींचें वचन श्रवण करतांच राम संकोचले, परंतु त्यांचा भाव, भक्ति, आणि आनंद पाहून ते तृप्त झाले. नंतर रामांनीं मुनींच्या उज्ज्वल यशाची अनेक प्रकारें प्रशंसा सर्वांसमक्ष केली. (ते म्हणाले):—"आपण मुनीश्वर ज्याचा गौरव कराल तोच श्रेष्ठ आणि तोच सर्व गुणसमुच्चयाचें भांडार समजलें पाहिजे." याप्रमाणें मुनि आणि राम परस्परांना प्रणाम करीत अनिर्वाच्य सुखाचा अनुभव घेऊं लागले.

यह सुधि पाइ प्रयागनिवासी।
बटु तापस मुनि सिद्ध उदासी।
भरद्वाजआस्रम सब आये।
देखन दसरथसुअन सुहाये।

प्रयागवासी ब्रह्मचारी, तापसी, मुनि, सिद्ध, संन्यासी हे सर्व ही वार्ता श्रवण करतांच त्या मनोहर दशरथपुत्रांच्या दर्शनार्थ भरद्वाजाश्रमीं लोटूं लागले.

राम प्रनाम कीन्ह सब काहू।
मुदित भये लहि लोयन लाहू।
देहिँ असीस परमसुख पाई।
फिरे सराहत सुंदरताई।

रामांनीं सर्वांना प्रणाम केला. डोळ्यांचें सार्थक झालें म्हणून मंडळी आनंदित झाली आणि ते परम संतुष्ट होत्साते आशीर्वाद देत देत आणि त्यांचें सौंदर्य वर्णन करीत करीत परतूं लागले.

**दो०—राम कीन्ह बिस्राम निसि प्रात प्रयाग नहाइ। चलेसहितसिय लषन जन मुदित मुनिहिँ सिरु नाइ॥ १०५॥**

रात्रीं रामांनीं तेथेंच विश्राम केला आणि प्रातःकालीं प्रयागस्नान करून सीता, लक्ष्मण आणि गुह यांसह मुनींस वंदन करून ते आनंदानें जाऊं लागले.

चौ०—राम सप्रेम कहेउ मुनि पाहीँ।
नाथ कहिय हम केहि मग जाहीँ।
मुनि मन बिहँसि राम सन कहहीँ।
सुगम सकल मग तुह्म कहँ अहहीँ।

राम मुनीस प्रेमपूर्वक म्हणाले:—"महाराज! आम्ही कोणच्या वाटेनें जावें तें आपण सांगा." हें ऐकून मुनि मनांत हंसून रामास म्हणाले:—"तुम्हांला सर्वच मार्ग मोकळे आहेत."

साथ लागि मुनि सिष्य बोलाये।
सुनि मन मुदित पचास क आये।
सबन्हि राम पर प्रेम अपारा।
सकल कहहिँ मगु दीख हमारा।
मुनि बटु चारि संग तब दीन्हे।
जिन्ह बहु जनम सुकृत सब कीन्हे।

सोबत म्हणून मुनींनीं शिष्यमंडळीस बोलाविलें. तें ऐकतांच अगदीं मनापासून आनंदित होऊन सुमारें पन्नास शिष्य आले. सर्वांचेंच रामाचे ठायीं अपार प्रेम होतें. ते सर्वच म्हणूं लागले कीं, वाट आमच्या अगदीं सरावांतली आहे. अखेर मुनींनीं ज्यांनीं जन्मजन्मांतरीं अगाध पुण्य केलें होतें असे चार शिष्य बरोबर दिले.

करि प्रनाम रिषि आयसु पाई।
प्रमुदित हृदय चले रघुराई।
ग्राम निकट निकसहिँ जब जाई।
देखहिँ दरस नारिनर धाई।
होहिँ सनाथ जनमफल पाई।
फिरहिँ दुखित मन संग पठाई।

ऋषींना प्रणाम करून आणि त्यांची अनुज्ञा घेऊन रघुराय प्रसन्नचित्तानें निघाले. ते गांवाजवळून जेव्हां निघत, तेव्हां स्त्रीपुरुष धांवत जाऊन त्यांचें दर्शन घेत, जन्माचें सार्थक मिळवून सनाथ होत, आणि आपलीं मनें त्यांच्याबरोबर पाठवून खिन्न होऊन (देहानें मात्र) परतत असत.

**दो०—बिदा किये बटु बिनय करि फिर पाइ मनकाम। उतरि नहाये जमुनजल जो सरीरसम स्याम॥ १०६॥**

रामांनीं गळ घालून निरोप दिल्यावर बटु पूर्णकाम होत्साते परतले. नंतर त्यांनीं उतरून स्वशरीरसम श्याम अशा यमुनाजलांत स्नान केलें.

चौ०—सुनत तीरबासी नरनारी।
धाये निज निज काज बिसारी।
लषन-राम-सिय-सुदरताई।
देखि करहिँ निज भाग्य बडाई।

(रामागमनाची) वार्ता ऐकतांच यमुनातीरवासी नर आणि नारी आपापलीं कामें झुगारून धांवत

आले. राम, लक्ष्मण व सीता यांचें लावण्य पाहून ते आपल्या भाग्याची थोरवी गाऊं लागले.

आति लालसा सबहिँ मन माहीँ ।
नाउँ गाउँ बूझत सकुचाहीँ ।
जे तिन्ह महँ बयबृद्ध सयाने ।
तिन्ह करि जुगुति राम पहिचाने ।
सकलकथा तिन्ह सबहिँ सुनाई ।
बनहि चले पितुआयसु पाई ।

त्यांचें नांवगांव विचारावें अशी सगळ्यांच्याच मनांत उत्कट इच्छा होत होती; परंतु ते विचारण्यास लाजत असत. त्यांपैकीं जे सुज्ञ आणि वयोवृद्ध होते त्यांनीं पर्यायानें रामास ओळखिलें, आणि सर्वांना एकूणएक हकीकत सांगून ते ह्मणाले कीं, हे पित्याच्या आज्ञेप्रमाणें वनोवनीं हिंडत आहेत.

सुनि सबिषाद सकल पछिताहीँ ।
रानी राय कीन्हि भल नाहीँ ।
ते पितु मातु कहहु सखि कैसे ।
जिन्ह पठये बन बालक ऐसे ।
राम–लषन–सिय–रूप निहारी ।
होहिँ सनेह बिकल नरनारी

तें ऐकून सर्वजण अगदीं खिन्न होऊन दुःखानें ह्मणूं लागत कीं, राजाराणीनें हें ठीक केलें नाहीं. राम, लक्ष्मण आणि सीता यांचें स्वरूप पाहून सर्व स्त्रीपुरुष प्रेमानें हळहळं म्हणत कीं, गड्यांनो ! ते आईबाप तरी कसें सांगा पाहूं कीं, ज्यांनीं असल्या आपल्या बाळांची वनांत धिंड काढली.

**दो०–तब रघुबीर अनेकबिधि सखहि सिखावन दीन्ह । रामरजायसु सीस धरि भवन गवँन तेइ कीन्ह ॥ १०८ ॥**

इकडे रघुवीरांनीं गुहास अनेक प्रकारें बोध केला. रामाज्ञा शिरसा मान्य करून गुह घरीं परतला.

चौ०–पुनि सिय राम लषन कर जोरी ।
जमुनहिँ कीन्ह प्रनाम बहोरी ।
चले ससीय मुदित दोउ भाई ।
रबितनुजा कै करत बडाई ।

सीतारामलक्ष्मणांनीं हात जोडून यमुनेस वारंवार प्रणाम केले, आणि ते तिघेहि यमुनेचें माहात्म्य वर्णन करीत चालूं लागले.

पथिक अनेक मिलहिँ मग जाता ।
कहहिँ सप्रेम देखि दोउ भ्राता ।
राजलषन सब अंग तुह्मारे ।
देखि सोच अति हृदय हमारे ।
मारग चलहु पयादेहिँ पाये ।
ज्योतिष झूट हमारेहि भाये

वाटेनें जातांना पुष्कळ वाटसरू भेटत.ते दोघांहि भावांस पाहून अगदीं कळवळून म्हणत कीं, "तुमच्या सर्वांगावर राजचिन्हें पाहून आमचें मन फारच हुरहुरतें. वाटेनें तुम्हांस पायीं अनवाणी चालावें लागत आहे, त्यावरून आमच्या मतानें ज्योतिषशास्त्र मुळींच खोटें ठरतें.

अगम पंथ गिरि कानन भारी ।
तेहि महँ साथ नारि सुकुमारी ।
करि केहरि बन जाइ न जोई ।
हम सँग चलहिँ जो आयसु होई ।
जाब जहाँ लगि तहँ पहुँचाई ।
फिरब बहोरि तुह्महिँ सिर नाई ।

आधींच रस्ते, डोंगर आणि जंगल भारीच बिकट, त्यांतून ही सुकुमार स्त्री बरोबर, ज्यांच्याकडे पाहण्याची देखील छाती नाहीं असे सिंहगजेंद्रादि हिंस्र पशू यांचा अरण्यांत सुळसुळाट म्हणून जर आपली आज्ञा असेल तर आम्ही आपल्या समागमें येऊं. जेथवर आपण जाल तेथवर आपणांस पोंचते करून व आपणांस नमस्कार करून आम्ही फिरून परत येऊं."

**दो०–एहि बिधि पूछहिँ प्रेमबस पुलकगात जल नैन । कृपासिंधु फेरहिँ तिन्हहिँ कहि बिनीत मृदु बैन ॥ १०९ ॥**

सप्रेम, पुलकित आणि सबाष्प होत्साते लोक ह्याप्रमाणें विचारीत असतां त्यांशीं नम्र आणि प्रेमळ भाषणें बोलून कृपासिंधु त्यांस परतवीत.

चौ०–जे पुर गावँ बसहिँ मग माहीँ ।
तिन्हहिँ नाग-सुर-नगर सिहाहीँ ।
केहि सुकृती केहि घरी बसाये ।
धन्य पुन्यमय परम सुहाये ।

ज्या नगरांत किंवा गांवांत त्यांचें रहाणें होई त्यांची स्वर्गपाताळांतील नगरें वाहवा करून म्हणत कीं, अशा धन्य, पुण्य आणि परमरमणीय नगरांना कोण्या पुण्यात्म्यानें कोणत्या सुमुहूर्तावर वसविलें असेल!

जहँ जहँ रामचरन चलि जाहीँ ।
तिन्ह समान अमरावति नाहीँ ।
पुन्यपुंज मग–निकट–निवासी ।

तिन्हहिँ सराहहिँ सुर-पुर-बासी ।
जे भरि नयन बिलोकहिँ रामहिँ ।
सीता-लषन-सहित घनस्यामहिँ ।

ज्या ज्या ठिकाणीं रामचंद्राचे चरण लागत त्या त्या ठिकाणांच्या पासंगास अमरावती देखील पुरणारी नव्हती. सीतालक्ष्मणसहित अशा त्या घनश्याम रामचंद्रास त्या मार्गाच्या आसपास रहाणारे जे लोक डोळे भरून पहात असत तेच खरे पुण्याचे पुतळे होत. स्वर्गस्थ जीवदेखील त्यांस धन्यवाद देत असत.

जे सर सरित राम अवगाहहिँ ।
तिन्हहिँ देव-सर-सरित सराहहिँ ।
जेहि तरुतर प्रभु बैठहिँ जाई ।
करहिँ कलपतरु तासु बडाई ।
परसि राम-पद-पदुम-परागा ।
मानति भूमि भूरि निजभागा ।

ज्या नदीतलावांत रामांनीं स्नान करावें त्यांचे मानसादि सरोवरें आणि गंगादि नद्या यांनीं धन्यवाद गात असावे, आणि ज्या वृक्षछायेखालीं प्रभूंनीं जाऊन बसावें त्यांना कल्पवृक्षांनींहि महतीच द्यावी. रामपदकमलांच्या धूलिस्पर्शानें पृथ्वी आपलें महद्भाग्य वानीत असे.

**दो०—छाहँ कराहिँ घन बिबुधगन बरषहिँ सुमन सिहाहिँ। देखत गिरि बन बिहँग मृग राम चले मग जाहिँ ॥ ११० ॥**

मार्गानें रामचंद्र गिरि, वन, पशु, पक्षी पहात पहात चालले असतां त्यांजवर मेघ छाया करीत आणि देव जयघोष करून त्यांचेवर पुष्पवर्षाव करीत.

चौ०—सीता-लषन-सहित रघुराई ।
गावँ निकट जब निकसहिँ जाई ।
सुनि सब बाल वृद्ध नर नारी ।
चलहिँ तुरत गृह काज बिसारी ।

सीतालक्ष्मणांसहित रघुराय गांवाच्या आजूबाजूनें निघून चालले आहेत असें समजल्याबरोबर सर्व कामें विसरून सर्व आबालवृद्ध स्त्रीपुरुष तावडतोब तिकडेच मोर्चा फिरवीत.

राम-लषन-सिय-रूप निहारी ।
पाइ नयनफल होहिँ सुखारी ।
सजल बिलोचन पुलक सरीरा ।
सब भये मगन देखि दोउ बीरा ।

बरनि न जाइ दसा तिन्ह केरी ।
लहि जनु रंकन्ह सुर-मनि ढेरी ।

त्या त्रिवर्गांचें स्वरूप पाहतांच त्यांस नेत्रांचें साफल्य वाटून ते प्रसन्न होत, आणि सजलनेत्र आणि पुलकितगात्र होत्साते त्या वीरद्वयाकडे पाहतां पाहतां ते सर्वजण तन्मय होऊन जात. कुबेराचें भांडार दरिद्र्याच्या हातीं लागल्यासारखी त्यांची ती स्थिति वर्णन करणें दुरापास्त आहे.

एकन्ह एक बोलि सिख देहीँ ।
लोचनलाहु लेहु छन एहीँ ।
रामहिँ देखि एक अनुरागे ।
चितवत चले जाहिँ सँग लागे ।
एक नयनमग छबि उर आनी ।
होहिँ सिथिल तन मन बरबानी ।

एक दुसऱ्यास म्हणे आणि शिकवी कीं, आपल्या डोळ्यांचें सार्थक पावण्याचा खरा क्षण हाच. कोणी रामास पहात पहात त्यांच्या मागोमाग जात. कोणी नेत्रमार्गानें रामरूप हृदयांत सांठवून कायावाचामनेंकरून अगदीं निर्व्यापार होत असत.

**दो०—एक देखि बटछाहँ भलि डासि मृदुल तृन पात। कहहिँ गवाँइय छिनुकु स्रम गवनब अबहिँ कि प्रात ॥ १११ ॥**

कोणी वडाची गर्द छाया शोधून आणि तेथें कोंवळ्या कोंवळ्या तृणपल्लवांची बिछाईत करून ह्मणत कीं, क्षणैक येथें श्रमपरिहार करून मग किंवा उजाडतांच गमन करावें.

चौ०—एक कलस भरि आनहिँ पानी ।
अँचइय नाथ कहहिँ मृदुबानी ।

कोणी कलश भरून पाणी आणून आर्जवानें ह्मणत कीं, महाराज! आचमन करावें.

सुनि प्रियबचन प्रीति अति देखी ।
राम कृपालु सुसील बिसेखी ।
जानी स्रमित सीय मन माहीँ ।
घरिक बिलम्ब कीन्ह बटछाहीँ ।

त्यांचे ते लडिवाळ बोल आणि उत्कट प्रेम पाहून आणि जानकी दमली आहे हें मनांत समजून लोकोत्तर सुशील आणि कृपालु रामचंद्रांनीं वटछायेखालीं क्षणभर विसावा घ्यावा.

मुदित नारिनर देखहिँ सोभा ।
रूपअनूप नयन मन लोभा ।

एकटक सब सोहहिँ चहुँओरा ।
राम-चंद्र मुख-चंद्र-चकोरा ।

रामाच्या अनुपम रूप आणि सौंदर्यानें सर्व स्त्री-पुरुषांस आनंद वाटून त्यांचीं मनें आणि नेत्र लुब्ध होत असत, आणि ते सर्व तटस्थ झाल्यामुळें रामचंद्राच्या मुखचंद्रासभोंवार चारीहि बाजूंनीं चकोरच जमले आहेत असें भासत असे.

तरुन-तमाल-बरन तनु सोहा ।
देखत कोटि-मदन-मन मोहा ।
दामिनिबरन लषन सुठि नीके ।
नखसिख सुभग भावते जीके ।
मुनिपट कटिन्ह कसे तूनीरा ।
सोहहिँ करकमलनि धनुतीरा ।

सघन आणि तमालवृक्षाच्या वर्णाप्रमाणें रामाचा देह असा शोभिवंत दिसे कीं, अगणित मदनांच्याहि मनास त्यांस पाहतांच वेडच लागावें. विद्युद्वर्ण लक्ष्मण इतका सुंदर आणि मनोहर दिसे कीं, त्याच्या नखशिखांत भरलेल्या लावण्यानें जीव गारीगार होई. वल्कलें नेसलेले, कमरेला भाते कसलेले, करकमलांतल्या धनुष्यबाणांनीं शोभलेले,

**दो०-जटा मुकुट सीसनि सुभग उर भुज नयन बिसाल । सरद-परब-बिधु-बदन बर लसत स्वेद-कन-जाल ॥ ११२ ॥**

मस्तकांवर सुंदर जटाजूट धारण केलेले, भरदार छातीचे, आजानुबाहु, आकर्णनेत्र, घर्मबिंदुपटलानें झळकणाऱ्या शरद्पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें सुंदर वदनाचे

चौ०-बरनि न जाइ मनोहर जोरी ।
सोभा बहुत थोरि मति मोरी ।

असें तें मनोहर बंधद्वय होतें. त्यांचें लावण्य अपार आणि माझी मति मुर्दाड, म्हणून त्यांचें वर्णन मजकडून होणें अशक्य आहे.

राम-लषन-सिय-सुंदरताई ।
सब चितवहिँ चित मन मति लाई ।
थके नारि नर प्रेम पियासे ।
मनहुँ मृगी मृग देखि दियासे ।

त्या त्रिवर्गाचें सौंदर्य सर्व स्त्रीपुरुष, मन, बुद्धि आणि चित्त ह्यांना एक करून पाहूं लागले तरीदेखील ते प्रेमाचे तान्हेलेले असल्यामुळें अखेर थकून मात्र जात. त्यांस पाहून असें वाटे कीं, हे उजेडाचा झोत पाहणारे हरिणाचे कळपच होत.

सीयसमीप ग्रामतिय जाहीँ ।
पूछत अतिसनेह सकुचाहीँ ।
बारबार सब लागहिँ पाये ।
कहहिँ बचन मृदुसरल सुभाये ।

त्या ग्रामस्त्रिया सीतेपाशीं मोठ्या उत्सुकतेनें तिची विचारपूस करण्यास जात; परंतु त्यांस संकोच वाटून देखील सर्वजणी ( आधीं ) तिच्या वारंवार पायां पडत आणि स्वाभाविक प्रेमळ आणि सरळ शब्दांनीं तिला विचारीत असत कीं,

राजकुमारि बिनय हम करहीँ ।
तिय सुभाय कछु पूछत डरहीँ ।
स्वामिनि अबिनय छमबि हमारी ।
बिलगु न मानब जानि गवाँरी ।
राजकुँअर दोउ सहज सलोने ।
इन्ह तेँ लहि दुति मरकत सोने ।

हे राजकुमारि ! आम्हांला कांहींएक विचारावेंसें वाटतें; परंतु स्त्रीस्वभावानुसार विचारण्यास भय वाटतें. बाईसाहेब ! बेआदबीची क्षमा असावी. आम्ही जाणूनबुजून खेडवळ, आमचें बोलणें आपण वावगें मानूं नये. हे दोघे राजपुत्र इतके सहजसुंदर आहेत कीं सुवर्ण आणि नीलरत्न यांनीं त्यांच्याचपासून आपलें तेज उसनें घेतलें असलें पाहिजे.

**दो०-स्यामल गौर किसोर बर सुंदर सुखमा ऐन । सरद-सर्बरी-नाथ-मुख सरदसरोरुह नैन ॥ ११३ ॥**

चौ०-कोटि मनोज लजावनिहारे ।
सुमुखि कहहु को आहिँ तुम्हारे ।

हे सुमुखि ! शरत्पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें ज्यांचे चेहरे, शरदृतूंतील कमलांप्रमाणें ज्यांचे नेत्र, कोट्यवधि मदनांस देखील लाजविणारे, श्याम आणि गौर, शोभा आणि लावण्य यांची केवळ खाणच, असे हे दोघे राजबिंडे आपले कोण आहेत तें आम्हांला कळेल काय ?

सुनि सनेहमय मंजुलबानी ।
सकुचि सीय मन महुँ मुसुकानी ।
तिन्हहि बिलोकि बिलोकति धरनी ।
दुहुँ सकोच सकुचति बरबरनी ।
सकुचि सप्रेम बाल-मृग-नैनी ।
बोली मधुरबचन पिकबैनी ।

त्यांचें तें प्रेमळ आणि लाघवी वचन ऐकून

सीता संकोचून मनांत हंसली. त्यांचेकडे पाहून तिनें फिरून खालीं मान घातली. उभयपक्षीं अडचणच ! ( सांगावें तर पतीची अमर्यादा, न सांगावें तर गरीबांची निराशा ) म्हणून त्या सुवर्णलतिकेस संकोच वाटला. अखेरीस त्यांच्या प्रेमानें अगतिक होऊन ती बालमृगाक्षी कोकिलस्वनी मंजुळ शब्दांनीं बोलूं लागली.

सहज सुभाय सुभग तन गोरे ।
नाम लषन लघुदेवर मोरे ।
बहुरि बदनविधु अंचल ढाँकी ।
पियतन चितइ भौँ-हकरि बाँकी ।
खंजनमंजु तिरीछे नैनानि ।
निज पति कहेउ तिन्हहिँ सिय सैननि ।

" अगकांतीनें सहजस्वाभाविक, सुंदर आणि गोरे असलेले हे, यांचें नांव लक्ष्मण ते माझे धाकटे दीर आहेत. " फिरून आपल्या मुखचंद्रावर पदर ओढून आणि प्रियतमाकडे खुबीदार तिरछ्या भिवईनें पाहिल्यासें करून चिमणीसारख्या तिरव्या नेत्रकटाक्षानें हे माझे यजमान म्हणून तिनें खुणेनें सुचविलें.

भईँ मुदित सब ग्रामबधूटी ।
रंकन्ह रायरासि जनु लूटी ।

हें ऐकून रंकांना राजाचा खजिना लुटण्यास मिळाल्याप्रमाणें सर्व ग्रामवधू बालंबाल खुष झाल्या.

**दो०—अतिसप्रेम सियपाय परि बहुबिधि देहिँ असीस । सदासोहागेनि होहु तुम्ह जब लगि महि अहिसीस ॥ ११४ ॥**

त्या अतिप्रेमानें सीतेच्या पायीं पडल्या. पृथ्वी शेषाच्या मस्तकावर असेपर्यंत आपलें सौभाग्य अढळ असो, वगैरे पुष्कळसेच आशीर्वाद त्यांनीं सीतेवर वर्षिले.

चौ०—पारबतीसम पतिप्रिय होहू ।
देबि न हम पर छाडब छोहू ।
पुनि पुनि बिनय करिय कर जोरी ।
जौँ एहि मारग फिरिय बहोरी ।
दरसन देब जानि निज दासी ।
लखी सीय सब प्रेमापियासी ।
मधुरबचन कहि कहि परितोषी ।
जनु कुमुदिनी कौमुदी पोषी ।

१ किती गोड शब्दचित्र ! लोकसंग्रहाचा किती अजब नमुना हा !

त्या म्हणाल्या, " पार्वतीसारख्या आपणहि आपल्या पतीला प्रिय व्हा. आईसाहेब ! आम्हांवरील आपली दया कमी करूं नका बरें. " त्या फिरून हात जोडून विनवणी करीत कीं ह्याच वाटेनें जर आपण माघारे परतलांत तर आम्हांला आपल्या दासी समजून जरूर दर्शन द्यावें. त्या सर्वजणी प्रेमपिपासित पाहून चांदण्यानें कमलें जगविल्याप्रमाणें सीतेनें त्यांशीं गोडगोड बोलून त्यांना संतुष्ट केलें.

तबहिँ लषन रघुबररुख जानी ।
पूछेउ मगु लोगन्हि मृदुबानी

तितक्यांत लक्ष्मणानें रामाची मनीषा जाणून, लोकांना सौम्यवाणीनें मार्ग विचारला.

सुनत नारिनर भये दुखारी ।
पुलकित गात बिलोचन बारी ।
मिटा मोद मन भये मलीने ।
बिधि निधि दीन्ह लेत जनु छीने ।
समुझि करमगति धीरज कीन्हा ।
सोधि सुगम मगु तिन्ह कहि दीन्हा ।

तें ऐकून सर्वजण विवळले. त्यांच्या अंगावर शाहारे येऊन त्यांचीं टिपें गळूं लागलीं. आनंद पार मावळून त्यांचीं मनें उदास झालीं. त्यांस वाटलें कीं दैवानें दौलत दिली आणि लागलींच छिनूनहि घेतली. कर्मगतीवर भार घालून त्यांनीं धैर्य धरून सरळ मार्ग शोधून तो त्यांस दाखवून दिला.

**दो०—लषन-जानकी-सहित तब गवन कीन्ह रघुनाथ। फेरे सब प्रियबचन कहि लिये लाइ मन साथ ॥ ११५ ॥**

नंतर प्रियवचनें बोलून रामचंद्रांनीं सर्वांना निरविलें, परंतु त्यांचीं अंतःकरणें मात्र आपणांबरोबर खेचून घेऊन रघुपतींनीं जानकीलक्ष्मणांसह वर्तमान प्रयाण केलें.

चौ०—फिरत नारिनर अति पछिताहीँ ।
दैवहि दोषु देहिँ मन माहीँ ।
सहित बिषाद परसपर कहहीँ ।
बिधिकरतब उलटे सब अहहीँ ।
निपट निरंकुस निठुर निसंकू ।
जेहि ससि कीन्ह सरुज सकलंकू
रूख कलपतरु सागर खारा ।
तेहि पठये बन राजकुमारा ।

अवघी मंडळी फिरतांना अतिशय खेद करूं लागली आणि मनांत दैवाला दोष देऊन विषादयुक्त होत्साती आपापसांत बोलूं लागली "विधात्याचे सगळे खेळ विपरीतच आहेत. तो अगदींच निपटारा, निरंकुश, निष्ठुर आणि निःशंक आहे. ज्यानें चंद्र क्षयरोगी आणि कलंकित केला, तसेंच कल्पतरू विनछायेचा आणि समुद्र खारट बनविला, तोच हीं राजस बाळें रानोमाळ हिंडवीत आहे !

जौं पै इन्हहिं दीन्ह बनबासू।
कीन्ह बादि बिधि भोगबिलासू।
ए बिचरहिं मग बिनु पदत्राना।
रचे बादि बिधि बाहन नाना।
ए महि परहिं डासि कुसपाता।
सुभगसेज कत सृजत बिधाता।
तरु-बर-बास इन्हहिं बिधि दीन्हा।
धवलधाम रचि रचि स्रम कीन्हा।

ह्यांना जर त्यानें वनवास दिला तर त्यानें भोगविलास निष्कारण उत्पन्न केले ! ह्यांनीं वाटेनें जर अनवाणी चालावयाचें तर ब्रह्मदेवानें नानाविध वाहनें निरर्थकच घडविलीं ! ह्यांनीं कुशपल्लव आंथरून जर जमिनीवर पडावयाचें तर उंची मृदु शय्या त्यानें निर्माण तरी कशाला केल्या ? ह्यांना त्यानें वृक्षातळीं राहण्यास लावलें त्याअर्थीं स्फटिकाचे महाल उभारून त्यानें व्यर्थ शीण मात्र करून घेतला.

दो०-जौं ए मुनि-पट-धर जटिल सुंदर सुठि सुकुमार। बिबिधभाँति भूषन बसन बादि किये करतार ॥ ११६ ॥

ह्या अत्यंत सुंदर आणि सुकुमार राजसांनीं जर मुनींचीं वल्कलें परिधान करून जटा वाढवावयाच्या तर तऱ्हेतऱ्हेचे पोषाख आणि दागिने ब्रह्मदेवानें उगीचच निर्माण केले !

चौ०-जौं ए कंद मूल फल खाहीं।
बादि सुधादि असन जग माहीं।

ह्यांनीं जर कंदमूलफळें खावयाचीं तर अमृतादि भोग जगांत असूनहि वायांच होत !"

एक कहहिं ए सहज सुहाये।
आप प्रगट भये बिधि न बनाये।
जहँ लगि बेद कही बिधिकरनी।
स्रवन नयन मन गोचर बरनी।



देखहु खोजि भुअन दसचारी।
कहँ अस पुरुष कहाँ असि नारी।

कोणी म्हणाले "हे जातीचेच सुंदर ब्रह्मदेवानें घडविलेले नव्हत. हे स्वच्छंदच अवतरले आहेत. जेथवर म्हणून वेदांत वर्णिलेली ब्रह्मसृष्टि श्रवणादि इंद्रियांनीं प्रतीयमान होते म्हणून सांगितलें आहे, तेथवर सर्व जरी धुंडाळून पाहिलें तरी चौदाहि भुवनांत असे पुरुष तरी कोठें सांपडणार आणि अशी स्त्री तरी कोठें आढळणार ?

इन्हहि देखि बिधि मनु अनुरागा।
पटतर जोग बनावइ लागा।
कीन्ह बहुत स्रम ऐक न आये।
तेहि इरिषा बन आनि दुराये।

ह्यांना पाहून ब्रह्मदेवाचें मन अगदीं तल्लीन झालें आणि तो त्यांच्यासारख्या मूर्ति घडवूं लागला. त्यानें बहुत परिश्रम केले, परंतु कोठें कांहींच जुळेना. केवळ त्या ईर्षेमुळें त्यानें ह्यांना वनांत आणून छपविलें."

एक कहहिं हम बहुत न जानहिं।
आपुहिं परम धन्य करि मानहिं।
ते पुनि पुन्यपुंज हम लेखे।
जे देखहिं देखिहहिं जिन्ह देखे।

एक म्हणाला "आम्हाला विशेष कांहीं समजत नाहीं, परंतु आम्ही स्वतःस मात्र परमधन्य समजतों, आणि आमच्या मतें, ज्यांनीं ह्यांना पाहिलें, जे सध्यां पाहताहेत आणि यापुढें पाहतील तेदेखील पुण्याचे आगरच होत असें आम्ही लेखतों."

दो०-एहि बिधि कहि कहि बचन प्रिय लेहिं नयन भरि नीर। किमि चलिहहिं मारग अगम सुठि सुकुमार सरीर ॥ ११७ ॥

ह्याप्रमाणें प्रेमयुक्त भाषणें करीत असतांना त्यांचे डोळे पाण्यानें डबडबून आले. ते म्हणाले:—"हे काटक रस्ते तुडवितांना ह्यांचे हे अत्यंत लुसलुशीत देह कसे तगतील कोण जाणे !"

चौ०-नारि सनेह बिकलबस होहीं।
चकई साँझ समय जनु सोहीं।
मृदु-पद-कमल कठिन मगु जानी।
गहबरि हृदय कहहिं बरबानी।

रात्रींच्या समयीं ज्याप्रमाणें चक्रवाकीची दशा होते त्याप्रमाणें त्या स्त्रिया प्रेमामुळें विव्हल झाल्या. मार्ग अति बिकट आणि त्यांचीं पदकमलें अति सुकु-

मार याचा विचार मनांत येतांच त्या गहिंवरून काकुळतीनें म्हणाल्या,

परसत मृदुलचरन अरुनारे।
सकुचाति महि जिमि हृदय हमारे।
जौं जगदीस इन्हहिं बनु दीन्हा।
कस न सुमनमय मारग कीन्हा।
जों माँगा पाइय बिधि पाहीं।
ए राखिअहि सखिआखिन्ह माहीं।

"ह्यांच्या आरक्त सुकुमार चरणांचा स्पर्श होतांच पृथ्वीदेखील आमच्या हृदयाप्रमाणेंच मृदु होवो. देवा जगदीशा! ह्यांना जर तूं वनांत दवडलेंस तर मार्ग-देखील फुलांचे कां केले नाहींस? गडे! परमेश्वरा-पाशीं मागितलेलें दान जर मिळत असेल तर त्यानें ह्यांना आमच्या डोळ्यांतल्या बाहुल्या करून ठेवावें."

जे नरनारि न अवसर आये।
तिन्ह सिय राम न देखन पाये।
सुनि सुरूप बूझहिं अकुलाई।
अब लगि गये कहाँ लगि भाई।

जी मंडळी वेळेवर आली नाहीं त्यांना सीता-रामाचें दर्शन घडलें नाहीं. तें त्यांचें सौंदर्य ऐकून हळहळून विचारीत कीं, बाबांनों, एव्हांना ते कोठ-वर पोहोंचले असावेत?

समरथ धाइ बिलोकहिं जाई।
प्रमुदित फिरहिं जनमफल पाई।

धडधाकट होते ते धांवतच जाऊन दर्शन घेऊन आणि जन्माचें सार्थक करून आनंदानें परतत असत, पण

**दो०—अबला बालक वृद्धजन कर मीजहिं पछिताहिं। होहिं प्रेमबस लोग इमि राम जहाँ जहँ जाहिं॥ ११८॥**

बायका, मुलें आणि वृद्ध माणसें मात्र हात चोळीत हळहळतच राहात. रामांनीं जावें तेथें ठिकठिकाणीं लोकांच्या प्रेमाला असेंच भरतें येई.

चौ०—गावँ गावँ अस होइ अनंदू।
देखि भानु-कुल-कैरव-चंदू।
जे यह समाचार सुनि पावहिं।
ते नृपरानिहिं दोष लगावहिं।

भानुकुलरूप कमलाच्या रामरूप चंद्रास पाहून गांवोगांवीं ह्याच आनंद लोटत असे. ज्यांना त्यांचें वर्तमान ऐकण्यास मिळे, त्यांनीं राजाराणीसच बद्दू करावें.

कहहिं एक अतिभल नरनाहू।
दीन्ह हमहिं जेहिं लोचनलाहू।
कहहिं परसपर लोग लोगाईं।
बातैं सरल सनेह सुहाईं।

कोणी म्हणावें कीं, राजा फारच सज्जन; कारण त्यानेंच आम्हांला हा दृष्टिलाभ घडविला. पुरुष आणि बायका यांच्यांत परस्परांत आणखी अशाच अगदीं सरळ प्रेमाच्या गोष्टी होत असतः—

ते पितु मातु धन्य जिन्ह जाये।
धन्य सो नगरु जहाँ तें आये।
धन्य सो देस सैल बन गाऊँ।
जहँ जहँ जाहिं धन्य सोइ ठाऊँ।
सुख पायउ बिरंचि रचि तेही।
ए जेहि के सब भाँति सनेही।

'ज्यांच्या पोटीं हे निपजले, ते मातापिता धन्य होत. हे जेथून आले तें नगरहि धन्य होय. जेथें जेथें ह्यांचें जाणें होत असेल तो तो देश, पर्वत, अरण्य, ग्राम, वगैरे धन्यच होत. ज्यांचे हे सर्वतोपरी स्नेहीं असतील त्यांना निर्माण करून ब्रह्मदेवालाहि स्वतः विषयीं धन्यताच वाटली असली पाहिजे!'

राम-लषन-पथि कथा सुहाई।
रही सकल मग कानन छाई।

रामलक्ष्मण या दरवेशाच्या मनोरंजक गोष्टी अरण्याच्या आणि मार्गाच्या कोनाकोपऱ्यांत दरवळून राहिल्या.

**दो०—एहि बिधि रघु-कुल-कमल-रबि मग लोगन्ह सुख देत। जाहिं चले देखत बिपिन सिय-सौमित्रि-समेत॥ ११९॥**

ह्याप्रमाणें मार्गातील लोकांना सुखवीत आणि अरण्यें पहात रघुकुलकमलसूर्य सितासौमित्रिसहवर्तमान प्रवास करीत असत.

चौ०—आगे राम लषन बने पाछे।
तापसबेष बिराजत काछे।
उभय बीच सिय सोहति कैसी।
ब्रह्म-जीव-बिच माया जैसी।

रामचंद्र पुढें होऊन लक्ष्मण दोघांच्या मागें चालू लागला. त्यांचा तापसवेषहि फारच खुलत होता

ब्रह्म आणि जीव यांच्यामध्यें जशी माया त्याप्रमाणें त्या उभयतांच्या मध्यें सीता शोभूं लागली.

बहुरि कहउँ छबि जसि मन बसई।
जनु मधु–मदन–मध्य रति लसई।
उपमा बहुरि कहउँ जिय जोही।
जनु बुध–बिधु–बिच रोहिनि सोही।

( तुलसीदास म्हणतात ) त्यांच्या छबीची माझी कल्पना मी अशी मांडतों—( रामलक्ष्मणांमध्यें सीता म्हणजे जणूंकाय मदन आणि वसंत यांच्यामध्यें रतीच शोभत आहे. याशिवाय आणखी एक उपमा माझ्या मनाजोगी वाटते ती ही कीं, चंद्र आणि बुध यांच्या मध्यमार्गी जशी रोहिणीची शोभा तीच सीतेची.

प्रभु–पद–रेख बचि बिच सीता।
धरति चरन मग चलति सभीता।
सीय–राम–पद–अंक बराये।
लषन चलहिँ मग दाहिन बायेँ।

मार्गानें जात असतां प्रभुपदांच्या चिन्हांच्या मधोमध सीता आपलें पाऊल अगदीं वचकत वचकत टाकी, आणि सीतारामाच्या पदांचीं चिन्हें वर्जून लक्ष्मण त्यांच्या उजव्या बाजूनें जाई.

राम–लषन–सिय–प्रीति सुहाई।
बचनअगोचर किमि कहि जाई।
खग मृग मगन देखि छबि होहीँ।
लिये चोरि चित राम बटोही।

राम, लक्ष्मण आणि सीता यांचें उज्ज्वल प्रेम अनिर्वाच्य आहे, तेव्हां त्याचें वर्णन कसें करतां येईल ? पशुपक्षीदेखील त्यांचें लावण्य पाहून तन्मय होत, कारण मार्गस्थ रामचंद्र त्यांचीं मनें हिरावून घेत.

**दो०–जिन्ह जिन्ह देखे पथिक प्रिय सिय-समेत दोउ भाइ। भव–मग–अगम अनंद तेइ बिनु स्रम रहे सिराइ ॥ १२० ॥**

सीतेसहित ते दोघे प्रिय पथिक ज्यांनीं ज्यांनीं म्हणून पाहिले, त्यांनीं आपली कष्टमय संसारयात्रा अनायासेंच संपवून टाकली.

चौ०–अजहुँ जासु उर सपनेहु काऊ।
बसहिँ लषन–सिय–राम बटाऊ।
राम–धाम–पथ पाइहि सोई।
जो पथ पाव कबहुँ मुनि कोई।

आज ( ह्या कलिकालांत ) देखील ज्या कोणाच्या हृदयांत स्वप्नांतहि या छबील्या सीतारामलक्ष्मणांचा वास होत असेल त्यास क्वचितच एखाद्या मुनीस कधींकाळीं प्राप्त होणारा सायुज्यमार्ग खात्रीनें प्राप्त होईल.

तब रघुबीर स्रमित सिय जानी।
देखि निकट बट सीतल-पानी।
तहँ बसि कंद–मूल–फल खाई।
प्रात नहाइ चले रघुराई।

सीता श्रमित झालेली जाणून लगतच वटवृक्ष आणि गार पाणी होतें तेथेंच रघुवीर थांबले. तेथें त्यांनीं कंदमूलफलांचा उपहार केला, आणि उजाडतांच स्नान करून ते चालूं लागले.

देखत बन सर सैल सुहाये।
बालमीकिआस्रम प्रभु आये।

सुरम्य वनें, सरोवरें, आणि पर्वत पहात पहात प्रभु वाल्मीकिआश्रमांत उतरले.

राम दीख मुनिबास सुहावन।
सुंदर गिरि कानन जल पावन।
सरनि सरोज बिटप बन फूले।
गुंजत मंजुमधुप रस भूले।
खग मृग बिपुल कोलाहल करहीँ।
बिरहित बैर मुदित मन चरहीँ।

सुंदर गिरि, कानन, पवित्र जल, सरोवरें आणि त्यांतील कमलें, प्रफुल्लित वृक्षराजी, मंजुल गुंजारव करणारे मधुमत्त मधुकर, विपुल कोलाहल करणारे निर्वैर, साल्हाद आणि स्वच्छंद संचार करणारे पशुपक्षी, इत्यादिकांनीं गजबजलेला असा तो मुनींचा रम्य आश्रम रामांनीं अवलोकन केला.

**दो०–सुचि सुंदर आस्रम निरखि हरषे राजिवनैन। सुनि रघुबर-आगमन मुनि आगे आयउ लैन ॥ १२१ ॥**

तो शुचिर्भूत आणि सुरम्य आश्रम अवलोकन करून त्या राजीवनयनांस हर्ष वाटला. रघुवरांचें आगमन श्रवण करून त्यांस घेण्यास वाल्मीकि सामोरे आले.

चौ०–मुनि कहँ राम दंडवत कीन्हा।
आसिरबाद बिप्रबर दीन्हा।
देखि रामछबि नयन जुड़ाने।
करि सनमान आस्रमहिँ आने।

रामांनीं मुनीस दण्डवत घातला आणि ऋषि-श्रेष्ठांनीहि त्यांना आशीर्वाद दिला. रामरूप पाहून मुनींचे नेत्र निवाले आणि त्यांनीं आदरपूर्वक रामास आश्रमांत आणिलें.

मुनिबर अतिथि प्रानप्रिय पाये।
कंद-मूल-फल मधुर मँगाये
सिय सौमित्रि राम फल खाये।
तब मुनि आसन दिये सुहाये।

प्राणप्रिय अतिथि प्राप्त होतांच मुनिवरांनीं मधुर कंदमूलफळें मागविलीं. मुनींनीं रामास उचित आसन दिलें. नंतर सीतारामलक्ष्मणांनीं फलाहार केला.

बालमीकि मन आनँद भारी।
मंगलमूरति नयन निहारी।
तब करकमल जोरि रघुराई॥
बोले बचन स्त्रवन-सुख-दाई।

ती मंगलमूर्ती नेत्रांनीं अवलोकितांच वाल्मीकींच्या मनांत आनंदाचा पूर लोटला. नंतर करकमलें जोडून रघुनाथांनीं श्रवणमधुर अशा भाषणास प्रारंभ केलाः—

तुह्म त्रि-काल-दरसी मुनिनाथा।
बिस्व बदर जिमि तुह्मरे हाथा।
अस कहि प्रभु सब कथा बखानी।
जेहि जेहि भाँति दीन्ह बन रानी।

"हे मुनिनाथ! आपण त्रिकालज्ञाते आहांत. हें विश्व आपणास तळहातावरील बोराप्रमाणें आहे." इतकें बोलून ज्या ज्या रीतीनें कैकेयीनें वनवास घडविला तो सर्व प्रकार त्यांस सांगोपांग विदित करून राम म्हणाले—

**दो०—तात बचन पुनि मातुहित भाइ भरत अस राउ। मो कहँ दरस तुम्हार प्रभु सब मम पुन्यप्रभाउ॥ १२२॥**

"तातांची आज्ञा, त्यांतून मातेची संमति, भरतासारख्या भावाला राज्य आणि प्रभो! मजला आपल्या दर्शनाचा लाभ, हा सर्व प्रकार म्हणजे माझ्या पूर्व पुण्याईचाच प्रभाव म्हणावयाचा.

चौ०—देखि पाय मुनिराय तुह्मारे।
भये सुकृत सब सुफल हमारे।
अब जहँ राउर आयसु होई।
मुनि उदबेग न पावइ कोई।
मुनि तापस जिन्ह ते दुख लहहीं।
ते नरेस बिनु पावक दहहीं।
मंगलमूल बिप्रपरितोषू।
दहइ कोटि कुल भू-सुर-रोषू।
अस जियँ जानि कहिय सोइ ठाऊँ।
सिय-सौमित्रि-सहित जहँ जाऊँ।

हे मुनिवर्य! आपल्या चरणदर्शनानें आमचीं सर्व सुकृतें फळास आलीं. आतां महाराजांची जेथें आज्ञा होईल, आणि कोणत्याहि तपस्वी मुनीस उपसर्ग पोहोंचावयाचा नाहीं—कारण ज्यांच्यापासून मुनितापसादिकांस त्रास होतो ते राजे अग्नि नसतांहि दग्ध व्हावयाचे; ब्राह्मणांचा संतोष सर्व कल्याणांचा जनक होतो आणि त्यांचा रोष कोटिकुलांना दाहक होतो-हें मनांत आणून मला स्थळ सांगावें म्हणजे आम्ही त्रिवर्ग तेथेंच गमन करूं.

तहँ रचि रुचिर परन-तृन-साला।
बास करउँ कछु काल कृपाला।
सहज सरल सुनि रघुबरबानी।
साधु साधु बोले मुनि ज्ञानी।
कस न कहहु अस रघु-कुल-केतू।
तुह्म पालक संतत स्रुतिसेतू।

हे दयानिधे! तेथें एक सुंदर गवताची पर्णकुटिका उभारून आम्ही कांहीं दिवस कालक्रमणा करूं." रघुवराचें तें सहज सरळ भाषण ऐकून ते आत्मरत मुनि त्यांचा धन्यवाद करून म्हणालेः—"हे रघुकुलकेतो! आपणच श्रुतिसेतूचे निरंतरचे पालनकर्ते आहांत, तेव्हां आपण असें कां न वदाल?

**छंद—स्रुति-सेतु-पालक राम तुम्ह जगदीस-माया जानकी। जो सृजति जग पालति हरति रुख पाइ कृपानिधान की। जो सहससीस अहीस महि धरु लषन स-चराचर-धनी। सुरकाज धरि नरराज-तनु चले दलन खल-निसिचर-अनी॥ ५॥**

हे राम! आपण श्रुतिसेतूंचे पालक आहांत, ही जानकी दयाघन प्रभूचें मनोगत ओळखून जगाची उत्पत्ति, पालन आणि संहार करणारी आपली जगदीशाची माया होय, आणि जो सहस्रशीर्ष शेष तोच हा विश्वाचा स्वामी लक्ष्मण होय. सुरकार्यासाठीं दुष्ट राक्षससैन्यसंहारार्थ सर्वश्रेष्ठ मानवदेह धारण करून आपण त्रिवर्ग एव्हां निघाला आहांत.

**सो०-राम सरूप तुम्हार बचनअगोचर बुद्धिपर। अबिगत अकथ अपार नेति नेति नित निगम कह ॥ ५ ॥**

रामा ! आपलें स्वरूप वाणीस अनाकलनीय, बुद्धीहून पर, दुर्विज्ञेय, अनिर्वाच्य, अपरंपार आणि निगमादिकांनींहि 'नेति, नेति,' ह्याच शब्दांनीं नित्य प्रख्यापिलेलें आहे.

चौ०-जग पेखन तुह्म देखनिहारे।
बिधि-हरि-संभु-नचावनिहारे।
तेउ न जानहिँ मरम तुह्मारा।
अउर तुह्महिँ को जाननिहारा।

जग हें एक दृश्य आहे आणि आपण त्याचे द्रष्टे आहांत. ब्रह्मा, विष्णु, सदाशिव यांस देखील आपण नाचवीत असतां. तेच जर तुमचें तत्त्व जाणूं शकत नाहींत, तर मग तेथें इतरांची काय प्राज्ञा ?

सोइ जानइ जेहि देहु जनाई।
जानत तुह्महिँ तुह्महिँ होइ जाई।
तुम्हरिहि कृपा तुम्हहिँ रघुनंदन।
जानहिँ भगत भगत-उर-चंदन।

ज्यास आपण जाणीव द्याल तेच आपणांस जाणतात, व मग तुम्हांस जाणतां जाणतां शेवटीं तेच स्वरूपाकार बनून जातात. हे भक्तहृच्चंद्रा ! रघुनंदना ! तुमच्या कृपेनें तुमचे भक्त मात्र तुम्हांस जाणतात.

चिदानंदमय देह तुह्मारी।
बिगतबिकार जान अधिकारी।
नरतनु धरेउ संत-सुर-काजा।
कहहु करहु जस प्राकृत राजा।

जे अधिकारी आहेत तेच तुमचें चिदानंदमय निर्विकार स्वरूप जाणतात. संत आणि देव ह्यांच्या कार्यार्थ हा नरावतार घेऊन प्राकृत राजाप्रमाणें आपण उच्चार आणि आचार चालविला आहे.

राम देखि सुनि चरित तुह्मारे।
जड मोहहिँ बुध होहिँ सुखारे।
तुम्ह जो कहहु करहु सबु साँचा।
जस काछिय तस चाहिय नाँचा।

हे राम ! तुमच्या लीला अवलोकन करून जड जीव दिङ्मूढ बनतात आणि ज्ञाते मात्र आनंदानें डोलूं लागतात. तुम्ही जें बोलाल आणि कराल तेंच सर्वस्वीं यथार्थ होय. ( किंवा तुम्ही जें बोलाल तेंच सर्वथा खरें करून दाखवाल ). जशी भूमिका असेल त्याप्रमाणें ठाकणें भागच आहे. (किंवा, तुमच्या सूत्रें हलविण्यावर जगास नाच नाचलेच पाहिजेत ).

**दो०-पूछेहु मोहि कि रहउँ कहँ मैं पूछत सकुचाउँ। जहँ न होहु तहँ देहु कहि तुम्हहिँ देखावउँ ठाउँ ॥ १२३ ॥**

कोठें रहावें हा आपण मला प्रश्न विचारलांत, परंतु मी मात्र आपणांस प्रश्न करण्यास संकोचतों. तुम्ही नाहीं कोठें ? तें आधीं मला कळूं द्या म्हणजे मग मी तुम्हांस जावें कोठें तें दर्शवितों.

चौ०-सुनि मुनिबचन प्रेमरस साने।
सकुचि राम मनमहँ मुसुकाने।
बालमीकि हँसि कहहिँ बहोरी।
बानी मधुर अमियरस बोरी।

तें प्रेमरसपूर्ण मुनिवचन ऐकून राम संकोचले आणि मनांतल्या मनात हंसले. वाल्मीकींनींहि हास्य केलें पण त्यांनीं आपलें अमृतरसानें ओथंबलेलें मधुर भाषण पुढें चालू केलें.

सुनहु राम अब कहउँ निकेता।
जहाँ बसहु सिय-लषन-समेता।

हे राम ! सीतासौमित्रांसहित आपल्या वास्तव्यार्थ मीं आतां स्थलनिर्देश करितों, तो श्रवण करावा.

जिन्ह के स्रवन समुद्रसमाना।
कथा तुह्मारि सुभग सरि नाना।
भरहिँ निरंतर होहिँ न पूरे।
तिन्ह के हिय तुह्म कहँ गृह रूरे।

ज्यांच्या समुद्रसम श्रवणसंपुटांत तुमच्या अपार आणि सुभग कथासरिता सदा सर्वकाल सांठवत असूनहि अलंप्रत्यय होत नाहीं, त्यांचीं हृदयें तुम्हांकरितां अनुरूप मंदिरें होत.

लोचन चातक जिन्ह करि राखे।
रहहिँ दरसजलधर अभिलाषे।
निदरहिँ सरित सिंधु सर भारी।
रूपबिंदु जल होहिँ सुखारी।
तिन्ह के हृदयसदन सुखदायक।
बसहु बंधु-सिय-सह रघुनायक।

आपल्या दर्शनरूप मेघाचीच आकांक्षा धरून राहिल्यामुळें, ज्यांनीं आपले नेत्र चातकाप्रमाणें करून ठेविले आहेत आणि जे नदी, सागर, सरोवर

यांना (म्हणजे तीर्थांना) अगदींच तुच्छ मानून आपल्या मूर्तिरूप जलबिंदूनेंच समाधान पावणारे आहेत, अशांच्या सुखदायक हृदयमंदिरांत आपण त्रिवर्गांनीं वास करावा.

दो०–जस तुम्हार मानस बिमल हंसिनि जीहा जासु। मुकताफल गुनगन चुनइ राम बसहु मन तासु॥ १२४॥

हे राम! आपल्या यशोरूप विमल मानससरोवरांत ज्यांची जिव्हा हंसी होऊन प्रभुगुणगणरूप मौक्तिकें वेंचीत असते, त्यांच्या अंतःकरणांत आपण वास करावा.

चौ०–प्रभुप्रसाद सुचि सुभग सुबासा।
सादर जासु लहइ नित नासा।
तुम्हहिँ निबेदित भोजन करहीँ।
प्रभुप्रसाद पट भूषन धरहीँ।
सीस नवहिँ सुर–गुरु–द्विज देखी।
प्रीतिसहित करि बिनय बिसेखी।
कर नित करहिँ रामपद पूजा।
रामभरोस हृदय नहिँ दूजा।
चरन रामतीरथ चलि जाहीँ।
राम बसहु तिन्ह के मन माहीँ।

ज्यांची नासिका प्रभुप्रसाद म्हणून शुचि आणि सुभग असा सुगंध अत्यादरानें ग्रहण करीत असते; जे आपणांस नैवेद्य अर्पण करून भोजन करतात आणि आपला प्रसाद म्हणून वस्त्राभूषणें धारण करतात; जे देव, गुरु आणि ब्राह्मण यांचें दर्शन घडतांच नमस्कार करतात आणि त्यांच्याशीं प्रेम पूर्वक आणि विशेष नम्रतेनें वागतात; ज्यांचे हस्त रामपदाचें नित्य पूजन करतात; ज्यांच्या हृदयांत आपलेच ठिकाणीं अनन्य विश्वास वसत असतो; व ज्यांचे चरण रामतीर्थास चालून जातात, अशांच्या हृदयांत, हे राम! आपण रहावें.

मंत्रराज नित जपहिँ तुम्हारा।
पूजहिँ तुम्हहिँ सहित परिवारा।
तरपन होम करहिँ बिधि नाना।
बिप्र जेवाँइ देहिँ बहुदाना।
तुम्ह तेँ अधिक गुरुहिँ जिय जानी।
सकल भाय सेवहिँ सनमानी।

जे ‘राम’ या महामंत्राचा नित्य जप करतात आणि परिवारासहित आपलें पूजन करितात, अनेकविध हव्यकव्यें आचरतात, ब्राह्मणसंतर्पणें करितात आणि विपुल दानें देतात, मनानें आपणांपेक्षांहि गुरूस वरिष्ठ समजून सर्व भावानें त्यांचा आदर आणि पूजा करितात,

दो०–सब करि माँगहिँ एकु फल राम–चरन–रति होउ। तिन्ह के मनमंदिर बसहु सिय रघुनंदन दोउ॥ १२५॥

आणि सर्व कर्में करून रामचरणीं भक्तिभाव असावा हेंच काय तें एक फळ मागतात, त्यांच्या हृदयमंदिरांत सीतेसहित आपण उभयतां रघुनंदनांनीं वास करावा.

चौ०–काम कोह मद मान न मोहा।
लोभ न छोभ न राग न द्रोहा।
जिन्ह के कपट दंभ नहिँ माया।
तिन्ह के हृदय बसहु रघुराया।

हे रघुनाथ! काम, क्रोध, मद, मान, मोह, लोभ, क्षोभ, राग, द्रोह, कपट, दंभ, माया हीं ज्यांच्या हृदयांत मुळींच नसतात त्यांच्या हृदयांत आपण वास करावा.

सब के प्रिय सब के हितकारी।
दुख–सुख–सरिस प्रसंसा गारी।
कहहिँ सत्य प्रियबचन बिचारी।
जागत सोवत सरन तुम्हारी।
तुम्हहिँ छाँडि गति दूसरि नाहीँ।
राम बसहु तिन्ह के मनमाहीँ।

हे राम! जे सर्वांनाच प्रिय व सर्वांवरच उपकार करणारे असतात, ज्यांना सुखदुःख आणि स्तुतिनिंदा हीं समान वाटतात, जे सत्य, प्रिय, आणि विचारपूर्वक बोलतात, जे जागृतींत अगर निद्रेंत देखील आपणांसच शरण असतात, आपणांपेक्षां ज्यांस दुसरें श्रेयच नसतें, अशांच्या मनांत आपण वास करावा.

जननीसम जानहिँ परनारी।
धन पराव बिष तेँ बिष भारी।
जे हरषहिँ परसंपति देखी।
दुखित होहिँ पराबिपति बिसेखी।
जिन्हहिँ राम तुम्ह प्रान पियारे।
तिन्ह के मन सुभसदन तुम्हारे।

परस्त्रीस जे मातेप्रमाणें लेखतात, परधन जे

विषाहूनहि तीव्र विष मानतात, परोत्कर्ष पाहून जे हर्ष पावतात आणि दुसऱ्याच्या दुःखानें जे विशेष दुःखी होतात, आणि हे राम ! ज्यांना आपण प्राणांहून देखील प्रिय असतां त्यांचीं अंतःकरणें हीं आपलीं शुभनिवासमंदिरें होत.

दो०–स्वामि सखा पितु मातु गुरु जिन के सब तुम्ह तात । मनमंदिर तिन्ह के बसहु सीयसहित दोउ भ्रात ॥ १२६ ॥

हे तात ! ज्यांचे स्वामी, सखा, पिता, माता आणि गुरु सर्वस्वीं तुह्मीच आहात, त्यांच्या मानोमंदिरांत आपण त्रिवर्गांनीं निवास करावा.

चौ०–अवगुन तजि सब के गुन गहहीं ।
विप्र–धेनु–हित संकट सहहीं ।
नीतिनिपुन जिन्ह कइ जग लीका ।
घर तुम्हार तिन्ह कर मन नीका ।

जे दोष टाकून सर्वांचे गुणच घेतात, जे ब्राह्मण आणि गायी ह्यांच्याप्रीत्यर्थ संकटें सोसतात, व ज्यांचें जीवनचरित्र नीतीनेंच परिपूर्ण असतें, त्यांचीं अंतःकरणें हींच तुमचीं प्रशस्त मंदिरें होत.

गुन तुम्हार समुझइ निजदोसा ।
जेहि सब भाँति तुम्हार भरोसा ।
रामभगत प्रिय लागहिँ जेही ।
तेहि उर बसहु सहित बैदेही ।

गुण तेवढे तुमचे आणि दोष तेवढे स्वतःचे हीच ज्यांची समजूत असते, ज्यांना सर्व रीतीनें आपलाच भरंवसा असतो, ज्यांना रामभक्त परमप्रिय वाटतात, अशांच्या हृदयांत जानकीसहवर्तमान आपण रहावें.

जाति पाँति धन धरम बडाई ।
प्रिय परिवार सदन सुखदाई ।
सब तजि तुम्हहिँ रहइ लउ लाई ।
तेहि के हृदय रहहु रघुराई ।

जात, पात, धन, धर्म, प्रतिष्ठा, प्रेम, परिवार, गृह, इत्यादि संसारसुखाचा त्याग करून जे आपणांतच लय लावून रहातात, त्यांच्या हृदयांत रघुरायांनीं वास करावा.

सरग नरक अपबरग समाना ।
जहँ तहँ देख धरे धनुबाना ।
करम–बचन–मन राउर चेरा ।
राम करहु तेहि के उर डेरा ।

हे राम ! स्वर्ग, नरक आणि मोक्ष हीं ज्यांस सारखींच वाटतात, जे सर्वत्र धनुर्बाणधारी अशा आपल्या मूर्तीसच अवलोकन करतात व कायावाचामनानें जे आपले सेवक बनतात त्यांच्या अंतःकरणांत आपण आपलें बिऱ्हाड करावें.

दो०–जाहि न चाहिय कबहुँ कछु तुम्ह सन सहज सनेह । बसहु निरंतर तासु मन सो राउर निजगेह ॥ १२७ ॥

ज्यांना केव्हांहि कशाचीच अपेक्षा नसते आणि आपले ठिकाणीं ज्यांचें अहेतुक प्रेम असतें, त्यांचीं मनें हींच आपलीं सत्तेचीं मंदिरें होतें, आणि तेथेंच आपण निरंतर निवास करावा. ”

चौ०–एहि बिधि मुनिवर भवन देखाये ।
बचन सप्रेम राममन भाये ।
कह मुनि सुनहु भानु-कुल-नायक ।
आस्रमु कहउँ समय सुखदायक ।

ह्याप्रमाणें मुनिवरांनीं स्थलांचा निर्देश केला. त्यांचीं सप्रेम वचनें रामाच्या मनास मानवलीं. मुनि पुन्हां म्हणाले, हे भानुकुलनायका ! प्रस्तुत काळीं सुखकर असें स्थान मी सांगतों तें श्रवण करावें.

चित्रकूट गिरि करहु निवासू ।
तहँ तुम्हार सब भाँति सुपासू ।
सैल सुहावन कानन चारू ।
करि-केहरि-मृग–बिहँग बिहारू ।
नदी पुनीत पुरान बखानी ।
अत्रिप्रिया निज-तप-बल आनी ।
सुरसरिधार नाउँ मंदाकिनि ।
जो सब-पातक-पोतक-डाकिनि ।

चित्रकूट नांवाचा एक पर्वत आहे. तेथें रमणीय अरण्यांत हत्ती, सिंह, मृग, विहंग विहार करीत असतात. पुराणप्रसिद्ध, पवित्र, पातकरूपी बालकास डाकिणीप्रमाणें असणारा देवनदीचा मंदाकिनी नांवाचा प्रवाह अनसूयेनें तेथें आपल्या तपोबलानें आणला आहे. त्या पर्वतावर आपण वास करावा म्हणजे तेथें आपणांस सर्व प्रकारें सोईस्कर वाटेल.

अत्रि–आदि–मुनि–बर बहु बसहीँ ।
करहिँ जोग जप तप तन कसहीँ ।
चलहु सफल स्रम सब कर करहू ।
राम देहु गौरव गिरिबरहू ।

हे राम ! तेथें अत्रिप्रभृति अनेक मुनिवर वास

करीत असून जप, तप, योग इत्यादि साधनांनीं देह कष्टवीत आहेत. तेथें जाऊन आपण त्या सर्वांच्या श्रमाचें चीज करावें आणि गिरिवराचा गौरव करावा.

**दो०—चित्र-कूट-महिमा-अमित कही महामुनि गाइ । आइ नहाये सरितवर सियसमेत दोउ भाइ ॥ १२८ ॥**

महर्षि वाल्मीकींनें चित्रकूटाचें माहात्म्यहि सविस्तर निवेदन केलें. नंतर सीतेसहवर्तमान दोघ बंधूंनीं तेथें येऊन गंगेंत स्नानें केलीं.

चौ०—रघुबर कहेउ लषन भल घाटू ।
करहु कतहुँ अब ठाहर ठाटू ।

राम म्हणाले, "लक्ष्मणा! आतां कोठें तरी चांगल्याशा घाटावर राहण्याची सोय कर."

लषन दीख पय उतर करारा ।
चहुँदिसि फिरेउ धनुष जिमि नारा ।

लक्ष्मणानें पाहिलें तों नदीच्या उत्तरेस पर्वताचा एक कडा तुटलेला आहे आणि त्याच्या सभोंवार पाणी धनुष्याकृति पसरलें आहे, असें त्याला दिसून आलें.

नदी पनच सर सम दम दाना ।
सकलकलुष कलिसाउज नाना ।
चित्रकूट जनु अचल अहेरी ।
चुकइ न घात मार मुठभेरी ।

लक्ष्मण म्हणाला, त्या धनुष्याची नदी ही प्रत्यंचा असून शम, दम, दान, हे शर होत. कसलेल्या शिकाऱ्याप्रमाणें, चित्रकूट हा त्या धनुष्याची प्रत्यंचा मुठीनें खेंचून सर्व कलिसंबंधीं पापरूपी अनेक सावजांची शिकार करीत असतां त्याचा नेम कधीं चुकतच नाहीं.

अस कहि लषन ठाँव देखरावा ।
थल बिलोकि रघुबर सुख पावा ।
रमेउ राममन देवन्ह जाना ।
चले सहित सुरपति परधाना ।
कोल–किरात–बेष सब आये ।
रचे परन–तृन–सदन सुहाये ।

असें सांगून लक्ष्मणानें तें ठिकाण दाखविलें. तें पाहून रामास आनंद झाला. रामाचें मन तेथें वेधलें गेलें असें जाणून इंद्रप्रमुख सर्व देव निघाले आणि कोळी पारधी यांचे वेष घेऊन तेथें येऊन पोंचले. त्यांनींच तेथें सुंदर अशा पर्णतृणशाला उभारल्या.

बरनि न जाहिँ मंजु दुइ साला ।
एक ललित लघु एक बिसाला ।

त्यांनीं दोन अवर्णनीय सुंदर पर्णकुटिका उभारल्या, त्यांपैकीं एक विस्तीर्ण असून दुसरी लहान पण टुमदार अशी होती.

**दो०—लषन-जानकी-सहित प्रभु राजत रुचिर निकेत । सोह मदन मुनिबेष जनु रति–रितु–राज–समेत ॥ १२९ ॥**

त्या सुंदर पर्णशालेंत प्रभु सीतालक्ष्मणांसहवर्तमान विराजित होत असतां, ते रति आणि वसंत यांच्यासहित मुनिवेषधारी मदनाप्रमाणें शोभूं लागले.

चौ०—अमर नाग किंनर दिसि पाला ।
चित्रकूट आये तेहि काला ।
राम प्रनाम कीन्ह सब काहू ।
मुदित देव लहि लोचनलाहू ।
बरषि सुमन कह देवसमाजू ।
नाथ सनाथ भये हम आजू ।
करि बिनती दुख दुसह सुनाये ।
हरषित निज-निज-सदन सिधाये ।

देव, नाग, किंनर, दिक्पाल हेहि त्या समयीं चित्रकूटावर आले. त्या सर्वांनाच रामांनीं प्रणाम केला. लोचनांचें सार्थक झालें म्हणून ते आनंदित झाले. पुष्पवृष्टि करून देवमंडळी म्हणालीः—'हे नाथ! आज आम्ही सनाथ झालों.' त्यांनीं नम्रतापूर्वक आपलीं दुःसह दुःखें निवेदन केलीं आणि आनंदानें ते आपल्या लोकीं परत गेले.

चित्रकूट रघुनंदन छाये ।
समाचार सुनि सुनि मुनि आये ।

चित्रकूटावर रामांनीं वस्ती केली हें वर्तमान ऐकून मुनिजन तेथें येऊं लागले.

आवत देखि मुदित मुनिबृंदा ।
कीन्ह दंडवत रघु-कुल-चंदा ।
मुनि रघुबरहिँ लाइ उर लेहीँ ।
सुफल होन हित आसिष देहीँ ।
सिय सौमित्रि-राम-छबि देखहिँ ।
साधन सकल सफल करि लेखहिँ ।

मुनिवृंदांना येतांना पाहतांच रघुकुलचंद्रानें त्यांस आनंदानें दण्डवत घालावें. मुनींनींहि रघुवरास उचलून हृदयाशीं धरावें आणि आपली वाणी सफल व्हावी एतदर्थ आशीर्वाद द्यावे. रामसीतालक्ष्मणांच्या मूर्ति

अवलोकन करूनच त्यांनीं आपलीं सर्व साधनें फळाला आलीं असें मानावें.

दो०–जथाजोग सनमानि प्रभु बिदा किये मुनिबृंद । करहिँ जोग जप जाग तप निज आस्रमनि सुछंद ॥ १३० ॥

मुनिवृंदांचा यथोचित सन्मान करून प्रभूंनीं त्यांस निरोप द्यावा, आणि त्यांनीं आपापल्या आश्रमांत स्वच्छंदानें योग, जप, याग, तप इत्यादि अनुष्ठानें करीत असावें.

चौ०–यह सुधि कोल किरातन्ह पाई ।
हरषे जनु नवनिधि घर आई ।
कंद मूल फल भरि भरि दोना ।
चले रंक जनु लूटन सोना ।

कोळी, पारधी इत्यादिकांना ही खबर मिळतांच ते घरीं नवनिधि चालून आल्याप्रमाणें हर्षित झाले. कंदमूलफलांचे द्रोण भरभरून, रंकास सोनें लुटावयास सांपडावें अशाप्रमाणें, ते जाऊं लागले.

तिन्ह महँ जिन्ह देखे दोउ भ्राता ।
अपर तिन्हहि पूछहिँ मग जाता ।
कहत सुनत रघुबीर निकाई ।
आइ सबन्हि देखे रघुराई ।

त्यांपैकीं ज्यांनीं त्या बंधुद्वयास पाहिलें होतें त्यांचे जवळ वाटेनें चालतांना इतरांनीं विचारपूस करावी. रामाच्या चांगुलपणाच्या गोष्टी बोलत व श्रवण करीतच त्यांनीं येऊन रघुवरास पहावें.

करहिँ जोहारु भेटँ धरि आगे ।
प्रभुहि बिलोकहिँ अति अनुरागे ।
चित्र लिखे जनु जहँ तहँ ठाढे ।
पुलक सरीर नयन जल बाढे ।

जोहार करून आणि भेट ( नजराणा ) पुढें करून प्रभूस पाहतां पाहतां त्यांना आनंदाचें भरतें येई. सर्वत्र चित्राप्रमाणें ते अगदीं तटस्थ होऊन उभे राहत. त्यांचीं शरीरें रोमांचित होऊन त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंचे पूर लोटूं लागत.

राम सनेहमगन सब जाने ।
कहि प्रियबचन सकल सनमाने ।
प्रभुहि जोहारि बहोरि बहोरी ।
बचन बिनीत कहहिँ कर जोरी ।

सर्वजण प्रेममग्न झाले आहेत असें पाहून रामांनीं अवघ्यांचेंच लोचदार शब्दांनीं स्वागत करावें. प्रभूस वरचेवर हात जोडून आणि जोहार करून त्यांनीं प्रार्थना करावी:—

दो०–अब हम नाथ सनाथ सब भये देखि प्रभुपाय । भाग हमारे आगमन राउर कोसलराय ॥ १३१ ॥

प्रभूंचे चरण पाहून ते सर्व म्हणत ' हे नाथ ! आज आम्ही सर्व सनाथ झालों. आपणा कोसलेश्वर महाराजांचें हें आगमन आमच्या भाग्यानेंच झालें आहे.

चौ०–धन्य भूमि बन पंथ पहारा ।
जहँ जहँ नाथ पाउँ तुम्ह धारा ।
धन्य बिहँग मृग काननचारी ।
सफल जनम भये तुम्हहिँ निहारी ।
हम सब धन्य सहित परिवारा ।
दीख दरस भरि नयन तुम्हारा ।

हे प्रभो ! भूमि, वन, पंथ, पर्वत, वगैरे जेथें जेथें आपण पाय ठेविला असेल तीं तीं स्थलें धन्य होत. आपले दर्शनानें वन्य पशुपक्षीदेखील धन्य होऊन त्यांचे जन्म सफल झाले आहेत. आपलें डोळे भरून दर्शन झाल्यामुळें आम्ही सर्व आपापल्या परिवारासह धन्य झालों.

कीन्ह बास भल ठाउँ बिचारी ।
इहाँ सकल रितु रहब सुखारी ।
हम सब भाँति करबि सेवकाई ।
करि-केहरि-अहि-बाघ बराई ।
बन बेहड गिरि कंदर खोहा ।
सब हमार प्रभु पग पग जोहा ।
जहँ तहँ तुम्हहि अहेर खेलाउब ।
सर निरझर भल ठाउँ देखाउब ।

योग्य स्थळ निवडून आपण येथें वास केला. येथें सर्वच ऋतूंत आनंदानें आपलें राहणें होईल. आम्ही सर्व रीतीनें आपली नोकरी बजावीत जाऊं. हत्ती, सिंह, सर्प, व्याघ्र, वराह येथें आहेतच. येथील झाडी, डोंगर, दऱ्या, खोरीं, बेंजड तर खरेंच, तरीहि पण त्यांचा एकूणएक कानाकोपरा देखील हे प्रभो ! आम्हीं आपल्या पायांखालीं घातलेला आहे. हरएक जागीं आम्ही आपणांस शिकार खेळण्यास नेऊन सरोवरें आणि झरे वगैरे सुंदर दृश्यें दाखवूं.

हम सेवक परिवारसमेता ।
नाथ न सकुचब आयसु देता ।

आम्ही आपल्या परिवारासहित आपले सेवक आहोंत. प्रभूंनीं आज्ञा करण्यांत मात्र संकोचूं नये.

**दो०–बेदबचन मुनिमन अगम ते प्रभु करुना ऐन । बचन किरातन्ह के सुनत जिमि पितु बालकबैन ॥ १३२ ॥**

वेद हीं ज्याचीं वचनें, मुनिमनास देखील जो अगम्य, जो दयेचें भांडार, असा प्रभु रामचंद्र; पिता जसे बालकाचे बोबडे बोल ऐकतो, तद्वत् तीं किरातांचीं भाषणें ऐकूं लागला.

चौ०–रामहिँ केवल प्रेम पियारा ।
जानि लेउ जो जाननिहारा ।

राम हा केवळ प्रेमाचा पाहुणा आहे हें ज्यास समजून घ्यावयाचें असेल त्यानें (प्रस्तुत प्रकरणावरून) खात्री करून घ्यावी. [1]

राम सकल–बन–चर तब तोषे ।
कहि मृदुबचन प्रेम परिपोषे ।
बिदा किये सिरु नाइ सिधाये ।
प्रभुगुन कहत सुनत घर आये ।

नंतर प्रेमळ आणि गोड भाषण करून रामांनीं त्या सर्व जंगली जटांना संतुष्ट केलें आणि त्यांस निरोप दिला. ते रामासमोर मस्तकें लववून परतले आणि प्रभूंचे गुणानुवाद गात घरीं आले.

एहि बिधि सियसमेत दोउ भाई ।
बसहिँ बिपिन सुर-मुनि-सुख-दाई ।

ह्याप्रमाणें सीतेसहित ते दोघे बंधु, सुर, मुनि इत्यादिकांस सुखद होत्साते अरण्यांत राहूं लागले.

जब तेँ आइ रहे रघुनायक ।
तब तेँ भयउ बनु मंगलदायक ।
फूलहिँ फलहिँ बिटप बिधि नाना ।
मंजु-बलित-बर-बेलि–बिताना ।
सुर–तरु–सरिस सुभाय सुहाये ।
मनहुँ बिबुधबन परिहरि आये ।

१ ग्रामसंघटना कार्याची कवीची कल्पना येथें निदर्शित होते म्हटल्यास काय प्रत्यवाय? शिवाय लोकाग्रणींस समाजाच्या अगदीं खालच्या थराची देखील उपेक्षा करतां येत नाहीं हें समर्थितां येणार नाहीं काय?

गुंज मंजुतर मधुकर स्रेनी ।
त्रिबिध बयारि बहइ सुखदेनी ।

रघुनायक वनांत येऊन राहिल्यावेळेपासून तें वन मंगलप्रद झालें. नानाप्रकारचे वृक्ष प्रफुल्ल आणि फलान्वित होऊन, उत्कृष्ट वेलींनीं चोहोंकडून वेष्टिल्यामुळें जागोजाग त्यांचे मंडपच बनून गेले. स्वर्गीय-वृक्षासारखे ते स्वाभाविक सुंदर वृक्ष पाहिले म्हणजे असें वाटे कीं, जणुंकाय नंदनवनास सोडूनच ते येथें आले होते. भ्रमरांचे थवेच्या थवे अतिशय मंजुल शब्दानें गुंजारव करीत असत. त्रिविध वायु वाहून तोहि आनंद देत असे.

**दो०–नीलकंठ कलकंठ सुक चातक चक्क चकोर । भाँति भाँति बोलहिँ बिहँग स्रवनसुखद चितचोर ॥ १३३ ॥**

नीलकंठ, कोकिल, शुक, चातक, चक्रवाक, चकोर इत्यादि पक्षिगण निरनिराळ्या प्रकारचे सुश्राव्य आणि मनोवेधक शब्द करीत असत.

चौ०–करि केहरि कपि कोल कुरंगा ।
बिगतबैर बिचरहिँ सब संगा ।
फिरत अहेर रामछबि देखी ।
होहिँ मुदित मृगबुंद बिसेखी ।

हत्ती, सिंह, कपि, वराह, हरिण इत्यादि पशू निर्वैर होत्साते एकत्र संचार करीत असत. रामचंद्र मृगयेकरितां संचार करीत असतां त्यांचें रूप पाहून मृगवृंद विशेष साल्हाद होत होता.

बिबुधबिपिन जहँ लगि जग माहीँ ।
देखि रामबन सकल सिहाहीँ ।

पृथ्वीवर जेवढीं म्हणून पवित्र अरण्यें आहेत तीं सर्व रामवनास पाहून त्याचीच थोरवी गात असत.

सुरसरि सरसइ दिन–कर–कन्या ।
मेकलसुता गोदावरि धन्या ।
सब सर सिंधु नदी नद नाना ।
मंदाकिनि कर करहिँ बखाना ।

गंगा, सरस्वती, यमुना, नर्मदा, गोदावरीप्रभृति पवित्र नद्या, सर्व सरोवरें आणि अनेक नद व नद्या मंदाकिनीचीच प्रशंसा करीत असत.

उदय अस्त गिरि अरु कैलासू ।
मंदर मेरु सकल–सुर–बासू ।
सैल हिमाचल आदिक जेते ।
चित्रकूटजस गावहिँ तेते ।

लोकालोकपर्वत, कैलास, मंदराचल, मेरु, हिमालय वगैरे जितके देवनिवासाचे पर्वत आहेत ते सर्व चित्रकूटाचेंच यश गात असत.

बिंध मुदितमन सुख न समाई।
स्रम बिनु बिपुल बडाई पाई।

श्रमावांचून थोर महत्त्व प्राप्त झाल्यामुळें विंध्याचलाचा ( चित्रकूट हें विंध्याद्रीचें एक शिखर आहे ) आनंद त्याच्या हृदयांत मावेना.

दो०–चित्रकूट के बिहँग मृग बेलि बिटप तृन जाति। पुन्यपुंज सब धन्य अस कहहिँ देव दिनराति ॥ १३४ ॥

चित्रकूटसंबंधीं पशुपक्षी, लता, वृक्ष, तृणपल्लव, इत्यादिक देखील सर्व महान् भाग्यवान् आणि धन्य होत, असें देवदेखील रात्रंदिवस बोलत असत.

चौ०–नयनवंत रघुबरहिँ बिलोकी।
पाइ जनमफल होहिँ बिसोकी।
परसि चरनरज अचर सुखारी।
भये परमपद के अधिकारी।

रघुपतीस पाहून सर्व डोळस प्राणी जन्माचें सार्थक मिळवून शोकरहित होत असत. त्यांच्या चरणरजांच्या स्पर्शानें स्थावर जीव देखील सुखी होऊन कैवल्यपदाचे अधिकारी होत.

सो बन सैल सुभाय सुहावन।
मंगलमय अति–पावन–पावन।
महिमा कहिय कवन बिधि तासू।
सुखसागर जहँ कीन्ह निवासू।

चित्रकूट आणि तेथील वनभाग हे मूळचेच रमणीय, परंतु ( रामवासामुळें ) ते सुखाचें आणि पावित्र्याचें केंद्र झालें. जेथें सौख्यसागरानेंच निवास केला त्याचा महिमा कोणत्या प्रकारानें वर्णन करावा ?

पयपयोधि तजि अवध बिहाई।
जहँ सिय--लषन--राम रहे आई।
कहि न सकहिँ सुखमा जसि कानन।
जौँ सत सहस होहिँ सहसानन।
सो मैँ बरनि कहौं बिधि केहीँ।
डाबरकमठ कि मंदर लेहीँ।

क्षीरसागर सोडून आणि अयोध्येचा त्याग करून जेथें सीतारामलक्ष्मण हे त्रिवर्ग येऊन राहिले त्या काननाची शोभा वर्णन करण्यास जरी शतसहस्र सहस्रानन शेष आले तरी तेदेखील झब्बूच ठरतील. ती शोभा मी कोणत्या रीतीनें वर्णन करून सांगावी ! डबक्यांतल्या कासवाकडून मंदराचल उचलला जाईल काय ?

सेवहिं लषन करम–मन–बानी।
जाइ न सील सनेह बखानी।

लक्ष्मणानें कायावाचामनानें सेवा चालविली. त्याचें शील आणि प्रेम अवर्णनीय होत.

दो०–छिनु छिनु लखि सिय-राम-पद जानि आपु पर नेह। करत न सपनेहुँ लषन चित बंधु–मातु–पितु–गेह ॥ १३५ ॥

क्षणोक्षणीं सीतारामांचे चरण अवलोकन करून आणि त्यांची आपणांवरील ममता जाणून, बंधु, माता, पिता किंवा गृह यांची, लक्ष्मण स्वप्नांत देखील आठवण करीत नसे.

चौ०–रामसंग सिय रहति सुखारी।
पुर-परिजन-गृह-सुरति बिसारी।
छिनु छिनु पिय-बिधु-बदन निहारी।
प्रमुदित मनहुँ चकोरकुमारी।
नाहनेह नित बढत बिलोकी।
हरषित रहति दिवस जिमि कोकी।

रामसमागमामुळें, पुर, परिजन आणि गृह ह्यांची स्मृति विसरून सीता सुखानें राहूं लागली. क्षणोक्षणीं प्रियतमाचा वदनचंद्र पाहून ती चकोरीप्रमाणें आनंदित होत असे. पतिप्रेम दिवसानुदिवस वाढतें पाहून दिवसा जशी कोकी तशी ती सुखासमाधानानें वावरूं लागली.

सियमन रामचरन अनुरागा।
अवध-सहस-सम बन प्रिय लागा।
परनकुटीप्रिय प्रियतम संगा।
प्रिय परिवारु कुरंग बिहंगा।
सासु-ससुर-सम मुनितिय मुनिवर।
असन अमियसम कंद मूलफर।
नाथसाथ साथरी सुहाई।
मयन–सयन–सय–सम सुखदाई।

सीतेचें अंत:करण रामचरणीं अनुरक्त असल्याकारणानें तिला वनच सहस्रावधि अयोध्येप्रमाणें प्रिय वाटूं लागलें. प्रियतमाच्या संगतींत तीस पर्णकुटिकाच प्रिय वाटे. हरिण आणि पक्षी हेच प्रियपरिवारा-

प्रमाणें वाटत, मुनिश्रेष्ठ आणि मुनिपत्नी हेच सासू-सासऱ्यांप्रमाणें वाटत आणि कंदमूलफलेंच अमृता-प्रमाणें गोड लागत. पतिसहवासानें तृणशय्याच तीस मदनाच्या शतावधि शय्येप्रमाणें मृदु आणि सुखकर लागे.

लोकप होहिँ बिलोकत जासू।
तेहिं कि मोह सक बिषय बिलासू।

जिच्या कृपाकटाक्षानेंच लोकपाल निर्माण होतात तिला विषयविलास चकवूं शकतील काय?

**दो०–सुमिरत रामहि तजहिँ जन तृनसम बिषय बिलासु। रामप्रिया जग जननि सिय कछु न आचरजु तासु॥ १३६॥**

केवळ रामस्मरणानेंच मनुष्य विषयविलास त्यागूं शकतो. जानकी तर त्या रामाची परमवल्लभा आणि विश्वाची जननी होय. (तिनें विषयत्याग केल्यास) त्यांचें कांहींच आश्चर्य नव्हे.

सीयलषन जेहिबिधि सुख लहहीँ।
सोइ रघुनाथ करहिँ सोइ कहहीँ।
कहहिँ पुरातनि कथा कहानी।
सुनहिँ लषन सिय अतिसुख मानी।

जेणेंकरून सीतालक्ष्मणांस सुख होईल तेंच रामांनीं करावें आणि तेंच बोलावेंहि. रामांनीं पुरातन कथा सांगाव्या आणि सीतालक्ष्मणांनीं त्या अति आनंदानें ऐकाव्या.

जब जब राम अवध सुधि करहीँ।
तब तब बारि बिलोचन भरहीँ।
सुमिरि मातु पितु परिजन भाई।
भरत–सनेह–सील–सेवकाई।
कृपासिंधु प्रभु होहिँ दुखारी।
धीरज धरहिँ कुसमउ बिचारी।

जेव्हां जेव्हां रामास अयोध्येची आठवण होई तेव्हां तेव्हां त्यांचे नेत्र अश्रूंनीं डवडवून येत असत. माता, पिता, परिजन, बंधु व भरताचें शील, प्रेम आणि सेवा ह्यांचें दयाघन प्रभूस स्मरण होतांच त्यांस भडभडून येई, परंतु तें बेवख्त समजून हिंमतीनें सावरून घेत.

लखि सिय लषनु बिकल होइ जाहीँ।
जिमि पुरुषहिँ अनुसर परिछाहीँ।
प्रिया-बंधु-गति लखि रघुनंदन।
धीर कृपाल भगत-उर-चंदन।
लगे कहन कछु कथा पुनीता।
सुनि सुख लहहिँ लषनु अरु सीता।

मनुष्याची छाया जशी त्यास अनुसरते त्याप्रमाणें रामास पाहतांच सीता आणि बंधू यांचीहि हालत तीच होत असे. ती पाहून धारिष्टवंत, कृपावंत, भक्त-उरचंदन, अशा रघुनंदनानें कांहींतरी पुण्यकारक कथा सांगण्यास लागावें आणि सीतालक्ष्मणांना फिरून खुषींत आणावें.

**दो०–राम-लषन-सीता-सहित सोहत परननिकेत। जिमि बासव बस अमर-पुर सची–जयंत–समेत॥ १३७॥**

जयंत आणि इंद्राणीसमवेत अमरावतींतल्या इंद्राप्रमाणें लक्ष्मण आणि सीता यांसहवर्तमान रामचंद्र पर्णकुटिकेंत शोभूं लागले.

चौ०–जोगवहिँ प्रभु सियलषनहिँ कैसे।
पलक बिलोचनगोलक जैसे।
सेवहिं लषन सीय रघुबीरहिँ।
जिमि अबिबेकी पुरुष सरीरहिँ।
एहि बिधि प्रभु बन बसहिँ सुखारी।
खग-मृग-सुर-तापस-हित-कारी।

बुबुळांना पापण्याप्रमाणें प्रभूनें सीतालक्ष्मणांस जपत असावें, आणि देहबुद्धिवाल्या प्राकृत जना-प्रमाणें सीता आणि लक्ष्मण यांनीं प्रभूंची शुश्रूषा करीत असावें; अशाप्रकारें खग, मृग, सुर, तापस इत्यादिकांवर उपकार करीत प्रभूंचा वनांत वास सुखानें होत होता.

कहेउँ राम-बन-गवँन सुहावा।
सुनहु सुमंत्र अवध जिमि आवा।
फिरेउ निषाद प्रभुहि पहुँचाई।
सचिवसहित रथ देखेसि आई।

रामाचें वनगमन यथाविस्तर निवेदन केलें. आतां सुमंताचा अयोध्येचा प्रवास यथाभूत ऐकावा. प्रभूस पोहोंचवून गुह परतला. येतांना सचिवासहित रथ त्यास दिसला.

मंत्री बिकल बिलोकिं निषादू।
कहि न जाइ जस भयउ बिषादू।
राम राम सिय लषन पुकारी।
परेउ धरनितल ब्याकुल भारी।

देखि दखिनदिसि हय हिंहिनाहीँ ।
जनु बिनु पंख बिहंग अकुलाहीँ ।

सुमंताला विव्हल झालेला पाहून गुहाची अशी त्रेधा उडाली कीं, ती सांगण्याची सोय नाहीं. हे राम! हे सीते! हे लक्ष्मणा! असा आक्रोश करीत तो अतिशय तळमळत धरणीवर लोळत होता. पंख तुटल्यावर पक्षी जसे आरंबळतात त्याप्रमाणें त्याच्या रथाचे घोडे दक्षिणेकडेस वारंवार डोकावून खिंकाळत असत.

**दो०—नहिँ तृन चरहिँ न पियहिँ जल मोचहिँ लोचनबारि । ब्याकुल भयउ निषाद सब रघु-बर-बाजि निहारि ॥१३८॥**

ते चारा खाईनात व पाणीहि पिईनात, डोळ्यांवाटे टिपें मात्र सारखें ढाळीत असत. असे ते रामाचे घोडे पाहून सर्व निषादमंडळी देखील हळहळूं लागली.

चौ०—धरि धीरज तब कहइ निषादू ।
अब सुमंत्र परिहरहु बिषादू ।
तुम्ह पंडित परमारथज्ञाता ।
धरहु धीर लखि बिमुख बिधाता ।
बिबिधकथा कहि कहि मृदुबानी ।
रथ बैठारेउ बरबस आनी ।

तेव्हां धैर्य धरून गुह म्हणालाः—"हे सुमंत! आतां दुःख बाजूलाच ठेवलें पाहिजे. आपण सुज्ञ असून परमार्थाचेहि वाकबगार जाणणारेहि आहांत. दैव प्रतिकूल आहे इकडे लक्ष देऊन शांति धरली पाहिजे. अशा पुष्कळशा गोष्टी मोठ्या कळकळीनें सांगून त्यानें त्यास बळजबरीनेंच रथांत आणून बसविलें.

सोकसिथिल रथ सकइ न हाँकी ।
रघु-बर-बिरह-पीर उर बाँकी ।
चरफराहिँ मग चलहिँ न घोरे ।
बनमृग मनहुँ आनि रथ जोरे ।
अढुकि परहिँ फिरि हेरहिँ पीछे ।
रामबियोग बिकल दुख तीछे ।

शोकानें अगदीं खिळखिळा झाल्यामुळें रथ हाकणें त्यास मुष्कील झालें. रामविरह त्याच्या अंतःकरणांत सारखा डाचत होता. घोडेदेखील जागच्याजागीं तडफडून मार्गालाच लागेनात. रानहरिणच आणून रथास जुंपले आहेत असें वाटे. ते अडखळून पडत आणि फिरून मागें वळून पहात. रामविरहाच्या तीक्ष्ण वेदनांनीं त्यांचेहि हालहाल मांडले.

जो कह रामु लषन बैदेही ।
हिँकरि हिँकरि हित हेरहिँ तेही ।
बाजि बिरहगति कहि किमि जाती ।
बिनु मनिफनिक बिकलजेहि भाँती ।

राम, लक्ष्मण, जानकी हे शब्द मात्र जे उच्चारीत असत, त्यांस आपला प्राणदाता समजून ते सारखे खिंकाळत व त्यांजकडे पहात रहात. मण्यास मुकलेल्या सर्पाप्रमाणें त्या घोड्यांची ती विरहविकलता कशी वर्णन करावी?

**दो०—भयउ निषाद बिषादबस देखत सचिवतुरंग । बोलि सुसेवक चारि तब दिये सारथीसंग ॥ १३९ ॥**

सुमंताचे घोडे पाहून तर गुहावर दुःखाचा कहरच गुजरला. तेव्हां त्यानें चार वाकबगार नोकर आणि एक सारथी बोलावून त्यांना बरोबर दिलें.

चौ०—गुह सारथिहि फिरेउ पहुँचाई ।
बिरहबिषाद बरनि नहिँ जाई ।
चले अवध लेइ रथहि निषादा ।
होहिँ छनहिँ छन मगन बिषादा ।

सारथ्यास पोंहचवून गुह परतला. त्याच्या विरहदुःखाचें वर्णन करतां येत नाहीं. निषादमंडळी (सारथी आणि नोकर) अयोध्येस रथ घेऊन चालले, परंतु प्रतिक्षणीं तेदेखील दुःखानें गांगरून जात असत.

सोच सुमंत्र बिकल दुखदीना ।
धिग जीवन रघु-बीर बिहीना ।
रहिहि न अंतहु अधमुसरीरू ।
जस न लहेउ बिछुरत रघुबीरू ।
भये अजस-अघ-भाजन प्राना ।
कवन हेतु नहिँ करत पयाना ।
अहह मंद मन अवसर चूका ।
अजहुँ न हृदय होत दुइ टूका ।

शोकानें विकळ झालेला सुमंत दुःखानें अगदीं दीन झाला. (तो स्वगत म्हणे) रघुवरविहीना जीवा! तुला धिक्कार असो! हे अधमा शरीरा! साथ पुरविणारा तूंहि नव्हेसच, परंतु रघुवीराशीं ताटातूट होऊन देखील तूं नांव कमाविलें नाहींस! हे माझे पंचप्राणहो! तुम्हीं देखील अपयशाचे आणि पापाचेच धनी झालांत! तुम्हीहि निघून गेला नाहीं! ह्यांत तुम्ही हेतुतरी कोणता साधलांत? हाय हाय!

हे मूर्खा मना ! फुकट रे वेळ चुकविलीस ! बा हृदया! अद्यापदेखील तुझे दोन तुकडे होत नाहींतच ना ?

मीँजि हाथ सिर धुनि पछिताई ।
मनहुँ कृपिन धनरासि गवाँई ।
बिरद बाँधि बरबीरु कहाई ।
चलेउ समर जनु सुभट पराई ।

तो हात चोळीत आणि कपाळ बडवीतच रडत राहिला. असें वाटे कीं, कृपणाचें डबुलें डुबावें, किंवा ब्रीदें (विजयचिन्हें) मिरविणाऱ्या नांवाजलेल्या शूरास झुंजींतून पाठ फिरविणें भाग व्हावें,

**दो०–विप्र विवेकी बेदबिद संमत साधु सुजाति । जिमि धोखे मद्पान कर सचिव सोच तेहि भाँति ॥ १४० ॥**

किंवा एखाद्या विवेकी, वैदिक, कुलीन, सच्छील आणि प्रतिष्ठित ब्राह्मणास धोक्यानें मद्यपान घडावें, तद्वत् सुमंताची दैना झाली.

चौ०--जिमि कुलीनातिय साधु सयानी ।
पतिदेवता करम-मन बानी ।
रहइ करमबस परिहरि नाहू ।
सचिवहृदय तिमि दारुनदाहू ।

जशी एखादी कुलीन, साध्वी, सुज्ञ, कायावाचामनानें पातिव्रत्य आचरण करणारी स्त्री प्रारब्धगतीनें पतीकडून त्याग घडून असहाय राहते, आणि त्यामुळें तिच्या काळजास जशा भयंकर डागण्या लागतात, तशीच सुमंताच्या मनाची तिरपिट उडाली.[1]

लोचन सजल डीठि भइ थोरी ।
सुनइ न स्रवन बिकल मति भोरी ।
सूखहिँ अधर लागि मुह लाटी ।
जिउ न जाइ उर अवधिकपाटी ।

त्याचे डोळे पाण्यानें भरून आले, त्याची दृष्टि अंधुक झाली, त्याचे कान बधिर झाले आणि त्याचें डोकें फिरल्यासारखें झालें. त्याचे ओंठ सुकून त्याची जीभ आंत ओढूं लागली. तरीपण त्याचा जीव जाईना; कारण हृदयरूपी द्वारास चवदा वर्षांची पाचर ठोकली होती.

---

१ कवीच्या स्त्रीत्यागाची आख्यायिका खरी असावी असा या त्यांच्या उल्लेखावरून विश्वास होतो. एरव्हीं स्वानुभवाखेरीज ही उपमा सुचणें एकदम शक्यसें वाटत नाहीं.

बिबरन भयउ न जाइ निहारी ।
मारेसि मनहुँ पिता महतारी ।
हानि गलानि बिपुल मन ब्यापी ।
जम-पुर-पंथ सोच जिमि पापी ।

तो असा कळाहीन झाला कीं, त्याजकडे पाहवेना. असें वाटे कीं, त्यानें आईबापांची हत्याच केली आहे. यमपुरीच्या वाटेनें पाप्यास जशा टोंचण्या बसतात त्याप्रमाणें हानि आणि ग्लानि ह्यांनीं त्याचें मन पक्कें खिळटलें होतें.

बचन न आव हृदय पछिताई ।
अवध काह मैँ देखब जाई ।
रामरहित रथ देखिहि जोई ।
सकुचिहि मोहि बिलोकत सोई ।

त्यास बोल फुटेना. तो मनांतल्या मनांत चरफडूं लागला:—" अयोध्येंत जाऊन तेथें मी पाहूं तरी काय ? हा माझा रामरहित रथ जो कोणी पाहील तो मजकडे साशंक मुद्रेनेंच बघेल.

**दो०–धाइ पूछिहहिँ मोहि जब बिकल नगर नरनारि । उतरु देब मैँ सबहिँ तब हृदय बज्र बैठारि ॥ १४१ ॥**

जेव्हां नगरांतील स्त्रीपुरुष व्याकुळ होऊन, व धांवत येऊन मला प्रश्न करतील तेव्हां वज्राप्रमाणें हृदय कठोर करूनच मला सर्वांना उत्तर द्यावें लागेल!

चौ०–पुछिहहिँ दीन दुखित सब माता ।
कहब काह मैँ तिन्हहि बिधाता ।
पूछिहि जबहिँ लषनमहतारी ।
कहिहउ कवन संदेस सुखारी ।

अरे दैवा ! दुःखानें दीन झालेल्या सर्व राममाता मला विचारूं लागतीलच तेव्हां त्यांस मी सांगणार तरी काय ? लक्ष्मणाची आई जेव्हां विचारील तेव्हां कोणती खुषखबर मी तिला सांगूं ?

रामजननि जब आइहि धाई ।
सुमिरि बच्छ जिमि धेनु लवाई ।
पूछत उतर देब मैँ तेही ।
गे बन राम लषनु बैदेही ।

सवत्स धेनु आपल्या पाडसास स्मरून जशी धांवपळ करीत सुटते, तशी कौसल्या जेव्हां धांवत येऊन मला विचारील तेव्हां जबाब म्हणून मी तीस हाच देणार ना कीं, राम, सीता आणि लक्ष्मण यांना वनांत सोडून मी हा खुशाल आलों.

जोइ पूछिहि तेहि ऊतरु देबा ।
जाइ अवध अब यह सुख लेबा ।

जो जो विचारील त्यास हाच एक जबाब द्याव-याचा आणि अयोध्येंत जाऊन आतां हेंच सुख घ्यावयाचें ना ?

पूछिहहि जबहिँ राउ दुखदीना ।
जिवन जासु रघुनाथअधीना ।
देइहउँ उतरु कवन मुह लाई ।
आयउँ कुसल कुअँर पहुँचाई ।
सुनत लषन-सिय-राम-सँदेसू ।
तृन जिमि तनु परिहरिहि नरेसू ।

ज्याचे प्राण रामाच्याच केवळ आधारावर आहेत त्या दुःखानें दीन झालेल्या राजा दशरथास, त्यानें मला विचारलें असतां मी कोणतें तोंड उसणें आणून उत्तर देऊं कीं, मी मुलांना सुखरूपपणें वनांत पोंहचवून आलों. त्या त्रिवर्गांचा निरोप ऐकतांच तर तो देहाचें तृणवत् विसर्जन करील.

**दो०—हृदउ न बिदरेउ पंक जिमि बिछुरत प्रीतम नीर । जानत हौँ मोहि दीन्ह बिधि यह जातना सरीर ॥ १४२ ॥**

प्रियतम रामरूपजल शुष्क होऊन गेल्यावर देखील ज्याअर्थी माझें हृदय पंकाप्रमाणें विदीर्ण होत नाहीं त्याअर्थी हेंच निश्चित कीं, देवानें मला हें शरीर ह्या यातना भोगण्याकरितांच दिलें आहे.

चौ०—एहिबिधि करत पंथ पछितावा ।
तमसातीर तुरत रथ आवा ।
बिदा किये करि बिनय निषादा ।
फिरे पाँय परि बिकल बिषादा ।

सुमंत ह्याप्रमाणें वाटेनें दुःख करीत आहे तों रथ लवकरच तमसातीरावर आला. सुमंतानें निषादांस अदबशीर निरोप दिला. निषादहि त्यास मुजरे करून दुःखानें मलूल होऊनच परतले.

पैठत नगर सचिव सकुचाई ।
जनु मारेसि गुरु—बाम्हन—गाई ।
बैठि बिटपतर दिवस गवाँवा ।
साँझ समय तब अवसर पावा ।
अवधप्रबेस कीन्ह अँधियारे ।
पैठ भवन रथ राखि दुआरे ।

शहरांत जाण्यास, गुरु, ब्राह्मण आणि धेनु यांची हत्या केल्याप्रमाणें, त्यास शरम वाटूं लागली. म्हणून गांवाबाहेर दूर एका झाडाखालीं बसूनच त्यानें दिवस काढला. रात्र होतांच संधि साधून त्यानें अंधारांतच शहरांत प्रवेश केला आणि रथ वेशीवर सोडून तो महालांत शिरला.

जिन्ह जिन्ह समाचार सुनि पाये ।
भूपद्वार रथ देखन आये ।
रथ पहिचानि बिकल लखि घोरे ।
गरहिँ गात जिमि आतप ओरे ।
नगर—नारि—नर ब्याकुल कैसे ।
निघटत नीर मीनगन जैसे ।

तें वर्तमान ज्यांना म्हणून कळलें ते रथ पाहण्यास वेशीवर गेले. त्यांनीं रथ तर ओळखला, पण घोडे मात्र त्यांना सपाटून ( उन्हाची तिरीप ) लागल्यामुळें किंवा गारांनीं झोडल्यामुळें अगदीं खिळखिळे झालेले दिसले. त्यामुळें पाहणारांची देखील निपाण्यांतल्या माशासारखी तडफड मचली.

**दो०—सचिवआगमन सुनत सब बिकल भयउ रनिवासु । भवनु भयंकरु लाग तेहि मानहुँ प्रेतनिवासु ॥ १४३ ॥**

सुमंत परत आल्याची वार्ता ऐकतांच सर्व अंतःपुर विव्हल झालें. त्यामुळें त्यांचे महाल स्मशानाप्रमाणें भयाण वाटूं लागले.

चौ०—अतिआरति सब पूछहिँ रानी ।
उतरु न आव बिकल भइ बानी ।
सुनइ न स्रवन नयन नहिँ सूझा ।
कहहु कहाँ नृप जेहि तेहि बूझा ।
दासिन्ह दीख सचिवबिकलाई ।
कौसल्यागृह गईं लेवाई ।

सर्व राण्या अतिशय काकुळतीनें विचारूं लागल्या तरी सुमंताकडून उत्तरच येईना. त्याची मिटकीच वळली. त्याचे कान सुन्न झाले. डोळे लहान बनले. जेमतेम ' सरकार कोठें आहेत, तें सांगा ' एवढेंच कायतें त्यानें मोठ्या कष्टानें विचारलें. दासींनीं त्याची ती दैना अवलोकन करून त्याला कौसल्येच्या महालांत नेलें.

जाइ सुमंत्र दीख कस राजा ।
अमियरहित जनु चंद बिराजा ।
आसन-सयन-बिभूषन-हीना ।
परेउ भूमितल निपट मलीना ।

सुमंत जाऊन पाहतो तों राजा कलाहीन चंद्राप्रमाणें आसन-शयन-अलंकार टाकून निव्वळ काळा ठिक्कर पडून जमिनीवर लोळत पडलेला दिसला.

लेइ उसास सोच एहि भाँती।
सुरपुर तें जनु खसेउ जजाती।
लेत सोच भरि छिनु छिनु छाती।
जनु जरि पंख परेउ संपाती।
राम राम कह राम सनेही।
पुनि कह राम लषन बैदेही।

तो इतक्या दुःखानें उसासे टाकी कीं, जणुंकाय स्वर्गातून ययातीच पतन पावला आहे असें वाटे. क्षणोक्षणीं त्याचे सुस्कारे इतक्या दुःखानें छाती भरभरून निघत कीं जणुंकाय पंख जळालेला संपातीच पडला आहे असें वाटे. "हे राम! हे राम! हे जिवलगा रामा! हे लक्ष्मणा! हे रामा! हे जानकी!" हाच त्यास सारखा सोस लागलेला होता.

**दो०—देखि सचिव जय जीव कहि कीन्हेउ दंड प्रनाम। सुनत उठेउ ब्याकुल नृपति कहु सुमंत्र कहँ राम॥ १४४॥**

राजास पाहून सुमंतानें 'जय जीव' म्हणून दंडप्रणाम घातला. तें ऐकतांच राजा व्याकुळतेनें उठून म्हणालाः—"सुमंता, माझा राम कोठं तें सांग."

चौ०—भूप सुमंत्र लीन्ह उर लाई।
बूडत कछु अधार जनु पाई।
सहित सनेह निकट बैठारी।
पूछत राउ नयन भरि बारी।

रामकुसल कहु सखा सनेही।
कहँ रघुनाथ लषन बैदेही।
आने फेर कि बनहि सिधाये।
सुनत सचिवलोचन जल छाये।

बुडणाऱ्यास कांहीं तरी आधार सांपडल्याप्रमाणें राजानें सुमंतास उराशीं धरून कवटाळलें आणि आपल्या अगदीं सन्निध बसवून आणि डोळ्यांस टिपें आणून विचारलें:—"माझ्या जिवलग रामाचें कुशल वर्तमान सांग कीं, रे! राम, लक्ष्मण, सीता, आहेत तरी कोठें? त्यांना परत आणलेंस का ते वनांतच बसले?" हे शब्द ऐकतांच सुमंताचे डोळे अश्रूंनीं डबडबले.

सोक बिकल पुनि पूछ नरेसू।
कहु सिय-राम-लषन-संदेसू।
राम-रूप-गुन सील सुभाऊ।
सुमिरि सुमिरि उर सोचत राऊ।
राज सुनाइ दीन्ह बनवासू।
सुनि मन भयउ न हरष हरासू।
सो सुत बिछुरत गये न प्राना।
को पापी बड मोहि समाना।

(राम वनांत गेले हें जाणल्यामुळें) दुःखानें कासावीस होऊन राजानें विचारलें कीं "त्या तिघांचा निरोप तरी सांग." रामाच्या रूपाचें, गुणांचें, आणि स्वभावाचें वारंवार स्मरण येऊन राजाच्या पोटांत अगदीं भडभडून आलें. तो म्हणालाः—"मी राज्य देतों म्हणून सांगितलें आणि दिला तो वनवास! तो ऐकून देखील ज्याच्या मनास हर्ष अगर विषाद कांहींच वाटला नाहीं, अशा त्या माझ्या बाळाची ताटातूट होऊन देखील हे प्राण निघरले नाहींत, तेव्हां मजसारखा क्रूर मांग कोण बरें असेल?

**दो०—सखा राम–सिय–लषन जहँ तहाँ मोहि पहुँचाउ। नाहिं त चाहत चलन अब प्रान कहउँ सतिभाउ॥ १४५॥**

हे मित्रा! ते तिघे आतां जेथें असतील तेथें मला पोहोंचतें कर. नाहींपक्षीं मी सत्य आशयानें सांगतों कीं, एव्हांच माझे प्राण जाऊं पाहाताहेत."

चौ०—पुनि पुनि पूछत मंत्रिहि राऊ।
प्रियतम–सुअन–सँदेस सुनाऊ।
करहि सखा सोइ बेगि उपाऊ।
राम–लषन–सिय नयन देखाऊ।

---

१ ययाती—त्यानें अतिपुण्य करून इंद्राचें अर्धें आसन बळकावलें होतें. इंद्रास तें सहन झालें नाहीं. त्यानें त्यास कपटानें विचारलें कीं कोणकोणत्या पुण्यानें तूं या पदाला चढलास? त्यानें सरळपणानें आपलीं पुण्यकर्में सांगितलीं. आत्मस्तुतीमुळें तीं पुण्यें अवक्षीण झालीं आणि इंद्रानें त्यास तत्काल पृथ्वीवर लोटून दिलें.

२—हा जटायूचा ज्येष्ठ बंधू. दोघांनींहि सूर्यमंडलाचें आक्रमण करण्याचा पण मांडला. उडतांउडतां सूर्यतेजाचा ताप असह्य होऊन जटायू खस्त खाऊन खालीं उतरला; परंतु अभिमानाच्या भरीस पडून संपाती पुढें सरसावला. अखेर सूर्यतापानें त्याचे पंख जळून गेले आणि त्यास आरंबळत खालीं घसरावें लागलें.

पुनः पुनः राजा सुमंतास म्हणे, माझ्या प्राणप्रिय पुत्रांचे निरोप तरी मला कळूं दे. मित्रा ! रामलक्ष्मण-जानकी जेणेंकरून माझ्या दृष्टीस पडतील असाच कोणता तरी उपाय त्वरित कर. "

सचिव धीर धरि कह मृदुबानी ।
महाराज तुम्ह पंडित ज्ञानी ।
बीर सुधीर धुरंधर देवा ।
साधुसमाज सदा तुम्ह सेवा ।

हें ऐकून सुमंत धैर्य धरून केविलवाणें म्हणालाः— " महाराज ! आपण विद्वान् व ज्ञाते असून धीरधुरंधर वीर आहांत. प्रभो ! संतसमागमांतच आपण अवघें आयुष्य घालविलें आहे.

जनम मरन सब दुख सुख भोगा ।
हानि लाभ प्रियमिलन बियोगा ।
काल करम बस होहिँ गोसाईँ ।
बरबस राति दिवस की नाईँ ।
सुख हरषहिँ जड दुख बिलखाहीँ ।
दोउ सम धीर धरहिँ मन माहीँ ।
धीरज धरहु बिबेक बिचारी ।
छाडिय सोच सकल हितकारी ।

हे स्वामिन् ! जन्ममरण, सुखदुःखादि भोग,हानि, लाभ, प्रियसंयोग आणि वियोग हे सर्व काल आणि कर्म ह्यांच्याच अनुषंगानें होत असतात आणि त्यांस दिनरात्रिक्रमाप्रमाणें मुळींच खंड पडावयाचा नाहीं. सुखामुळें हर्ष मानणारे आणि दुःखाची खंत करणारे ते अज्ञ होत. धीर पुरुष आपल्या मनांत सुखदुःख दोन्हींहि समसमानच मानीत असतात. विवेकविचारानें आपण धैर्यच धरलें पाहिजे. सर्वांचा टेका एक आपणच. तेव्हां आपण दुःखावर मात केलीच पाहिजे.

दो०—प्रथम बासु तमसा भयउ दूसर
सुरसरि तीर । न्हाइ रहे जलपान करि
सियसमेत दोउ बीर ॥ १४६ ॥

रामचंद्रांचा पहिला मुक्काम तमसातीरीं होऊन दुसरा गंगेच्या कांठीं झाला; दोघेहि वीर सीतेसहवर्तमान स्नान आणि जलप्राशन करूनच राहिले.

चौ०—केवट कीन्ह बहुत सेवकाई ।
सो जामिनि सिँगबैर गवाँई ।
होत प्रात बटछीरु मँगावा ।
जटामुकुट निज सीस बनावा ।
रामसखा तब नाव मँगाई ।
प्रिया चढाइ चढे रघुराई ।
लषन बानधनु धरे बनाई ।
आपु चढे प्रभुआयसु पाई ।

गुहानें फारच चांगली खातर केली. ती रात्र त्यांनीं शृंगवेरपुरांत घालविली. उजाडतांच वटक्षीर मागवून त्यांनीं आपल्या मस्तकावर जटांचा जूट वळला. नंतर गुहानें नाव मागवली. तिजवर सीतेस बसवून नंतर राम बसले. लक्ष्मणानें धनुष्यबाण सज्ज करून घेतले आणि प्रभूंची आज्ञा होतांच तोहि नावेवर चढला.

बिकल बिलोकि मोहि रघुबीरा ।
बोले मधुरबचन धरि धीरा ।
तात प्रनाम तात सन कहेहू ।
बार बार पदपंकज गहेहू ।
करबि पाय परि बिनय बहोरी ।
तात करिय जनि चिंता मोरी ।
बनमग मंगल कुसल हमारे ।
कृपा अनुग्रह पुन्य तुम्हारे ।

मला बेहाल पाहून रघुवीर संथपणानें व सौम्य शब्दांनीं म्हणालेः—' हे तात ! महाराजांचीं पदकमलें अनेकवार ग्रहण करून आणि त्यांना वंदन करून अत्यंत विनयानें कळवा कीं महाराजांनीं मजविषयीं चिंता करूं नये. आपल्या कृपेनें, प्रसादानें आणि पुण्याईनें वनवासांतदेखील आमचें कुशल आणि कल्याणच आहे.

छंद—तुम्हरे अनुग्रह तात कानन जात सब
सुख पाइहउँ । प्रतिपालि आयसु कुसल
देखन पाय पुनि फिरि आइहउँ ॥ जननी
सकल परितोषि परि परि पाय करि
बिनती घनी । तुलसी करेहु सोइ जतन
जेहि कुसली रहहिँ कोसलधनी ॥ ६ ॥

महाराज ! आपल्या प्रसादेंकरून अरण्यसंचार करीत असतां देखील आम्हांला सर्व सुखेंच प्राप्त होतील. आपली आज्ञा पालन करून आपल्या चरणांच्या दर्शनाकरितां आम्ही फिरून क्षेमरूपच परत येऊं. ' ( ते आणखी म्हणाले, ) " सर्व मातांचें समाधान करून आणि त्यांचें वारंवार पदवंदन करून त्यांस माझी विनंति सांगा कीं, जेणेंकरून

अयोध्यापति कुशल राहतील असाच यत्न आपण सर्वांनीं केला पाहिजे. ''

**सो०—गुरु सन कहब सँदेस बार बार पदपदुम गहि। करब सोइ उपदेस जेहि न सोच मोहि अवधपति ॥ ६ ॥**

" गुरुजींचीं पदकमलें वारंवार ग्रहण करून त्यांस माझा असा निरोप कळवा कीं, जेणेंकरून अयोध्येश्वराचे मनांत मद्विषयक शोक उरणार नाहीं असाच त्यांस उपदेश करीत असावें. "

चौ०—पुरजन परिजन सकल निहोरी।
तात सुनायेहु बिनती मोरी।
सोइ सब भाँति मोर हितकारी।
जा तें रह नरनाह सुखारी।

हे तात ! पुरजन आणि परिजन ह्या सर्वांस कृपा करून माझी विनंति कळवा कीं, " ज्याच्या योगानें महाराज सुखी राहतील तोच मी माझा सर्वतोपरी कनवाळु समजेन. "

कहब सँदेसु भरत के आये।
नीति न तजिय राजपद पाये।
पालेहु प्रजहि करम-मन बानी।
सेयेहु मातु सकल सम जानी।
अउर निवाहेहु भायप भाई।
करि पितु-मातु-सुजन सेवकाई।
तात भाँति तेहि राखब राऊ।
सोच मोर जेहि करइ न काऊ।

भरत आल्यानंतर त्याला निरोप कळवा कीं, " राज्यपद प्राप्त झाल्यावर नीतीचा अव्हेर करूं नकोस. कायावाचामनेंकरून प्रजेचें पालन कर. सर्व माता समसमान मानून त्यांची सेवा करीत जा. मातापिता आणि स्वजन यांची सेवा करून आमच्या बंधुप्रेमाचा निर्वाह करीत रहा. बाळा ! जेणेंकरून माझ्याबद्दल महाराज कधींहि शोक करणार नाहींत अशाच रीतीनें त्यांना वागवीत जा. "

लषन कहे कछु बचन कठोरा।
बरजि राम पुनि मोहि निहोरा।
बारबार निज सपथ देवाई।
कहबि न तात लषनलरिकाई।

लक्ष्मण कांहीं लागट भाषा बोलला; परंतु त्याचा रामांनीं निषेध करून विनंतिपूर्वक आणि आपली शपथ वरचेवर घालून मला सांगितलें कीं,' लक्ष्मणाच्या पोरपणाचा महाराजांपाशीं वाच्यांश करूं नका. '

**दो०—कहि प्रनाम कछु कहन लिय सिय भइ सिथिल सनेह। थकित बचन लोचन सजल पुलक पल्लवित देह ॥ १४७ ॥**

सीतेनें आपला प्रणाम सांगितला आणि बोलण्याचा प्रयत्न केला. परंतु प्रेमानें ती अगदीं बेहोष झाली, तिच्या मुखांतून शब्द निघेना. तिच्या नेत्रांत टिपें आलीं आणि अंगावर रोमांच उभे राहिले.

चौ०—तेहि अवसर रघुबररूख पाई।
केवट पारहिं नाव चलाई।
रघु-कुल-तिलक चले एहि भाँती।
देखेउँ ठाढ कुलिस धरि छाती।
मैं आपन किमि कहउँ कलेसू।
जियत फिरउँ लेइ रामसँदेसू।
अस कहि सचिव बचन रहि गयऊ।
हानि गलानि सोच बस भयऊ।

तितक्या अवधींत रामाची मर्जी ओळखून गुहानें नाव पार चालविली. ह्याप्रमाणें रघुकुलतिलक जाऊं लागले तरीहि मी छातीवर वज्र ठेवून पहातच उभा राहिलों. ज्याअर्थीं मी रामाचा निरोप घेऊन जींवत परत येऊं शकलों त्याअर्थीं मी स्वतःस दुःखी तरी कसें म्हणूं ? इतकें बोलून सुमंताचें तोंडच मिटलें, आणि हानि, ग्लानि व शोक ह्यांच्या तो पूर्णपणें आधीन झाला.

सचिव बचन सुनतहि नरनाहू।
परेउ धरनि उर दारुनदाहू।
तलफत बिषम मोह मन मापा।
माँजा मनहुँ मीन कहँ ब्यापा।

सुमंताचें वचन श्रवण करतांच दशरथाचें काळीज अतिशय भडकून तो धरणीवर पडला. त्याचें अंतःकरण असह्य वेदनांनीं व्याप्त होऊन तो पहिल्या पावसाच्या पाण्यांत ( फेसांत ) गुरफटलेल्या माशाप्रमाणें तडफडूं लागला.

करि बिलाप सब रोवहिं रानी।
महाबिपति किमि जाइ बखानी।
सुनि बिलाप दुखहू दुख लागा।
धीरजहू कर धीरज भागा।

सर्व राण्यांनीं रडूनरडून आकांत केला. त्या

महद्दुःखाचें वर्णन कसें करवेल ? तो विलाप ऐकून दुःखालाहि दुःख झालें आणि धैर्याचें देखील धैर्य खचलें !

**दो०–भयउ कोलाहल अवध अति सुनि नृप राउर सोर। बिपुल बिहँगबन परेउ निसि मानहुँ कुलिस कठोर ॥ १४८ ॥**

राजवाड्यांतील तो आकांत ऐकून अयोध्येंत हाहाःकार उडाला. त्या वेळीं असें वाटलें कीं, रात्रीच्या प्रसंगीं असंख्य पक्षिगणावर प्राणघातक वज्रपातच झाला आहे.

चौ०–प्रान कंठगत भगउ भुआलू।
मनिबिहीन जनु ब्याकुल ब्यालू।
इंद्रीं सकल बिकल भईं भारी।
जनु सर सर–सिज–बन बिनु बारी।

राजा दशरथाचे प्राण कंठाशीं आले. मणिविहीन सर्पाप्रमाणें तो कळकळला. त्याचीं सर्व इंद्रियें निर्जल सरोवरांतील कमलसमुदायाप्रमाणें अगदींच निश्चेष्ट झालीं.

कौसल्या नृप दीख मलाना।
रबि–कुल–रबि अथयेउ जिय जाना।
उर धरि धीर राममहतारी।
बोली बचन समय अनुसारी।

राजास अगदीं म्लान पाहून कौसल्या मनांत समजली कीं, हा रविकुलसूर्य अस्तास जात आहे. तेव्हां ती राममाता मन घट्ट करून समयास उचित असें भाषण करूं लागली.

नाथ समुझि मन करिय बिचारू।
राम–बियोग–पयोधि अपारू।
करनधार तुम्ह अवधजहाजू।
चढेउ सकल प्रिय–पथिक–समाजू।
धीरज धरिय त पाइय पारू।
नाहिँ त बूडिहि सब परिवारू।
जौँ जिय धरिय बिनय पिय मोरी।
रामलषन सिय मिलहिँ बहोरी।

" प्राणनाथ ! आपणच मनांत विचार करून पहा कीं, रामवियोग हा अफाट समुद्र आहे, त्यांत अयोध्यारूपी जहाज तरंगत आहे, त्यांत आपली सर्व प्रिय प्रजा हा पथिकसमाज बसलेला आहे आणि केवळ आपणच त्या जहाजाचे कर्णधार आहांत. आपण धैर्य धराल तरच ह्यांतून पार पडतां येईल. नाहींतर सर्व मंडळींना जलसमाधि मिळणार. माझी विनंति जर आपण मनावर घ्याल तर असे राम, लक्ष्मण आणि सीता फिरून कितींदा तरी प्राप्त करून घेतां येतील.

**दो०–प्रिया बचन मृदु सुनत नृप चितयउ आँखि उघारि। तलफत मीन मलीन जनु सींचेउ सीतलबारि ॥ १४९ ॥**

प्रियेचें तें लोचदार भाषण ऐकतांच राजानें डोळे उघडून पाहिलें. तडफडत असलेल्या आसन्नमरण मीनावर कौसल्येनें जणुंकाय (त्या उपदेशाच्या रूपानें) शीतलजलनिक्षेपच केला.

चौ०–धरि धीरज उठि बैठि भुआलू।
कहु सुमंत्र कहँ राम कृपालू।
कहाँ लषन कहँ रामसनेही।
कहँ प्रिय–पुत्र–बधू बैदेही।
बिलपत राउ बिकल बहुभाँती।
भइ जुगसरिस सिराति न राती।

नंतर धैर्य धरून राजा उठून बसला आणि म्हणालाः—" सुमंता ! माझा तो पितृवत्सल राम कोठें रे आहे ? अरे लक्ष्मणा ! तूं तरी कोठें गेलास ? माझा रामसखा कोठें असेल ? हे प्रियस्नुषे जानकी ! तुला तरी कोठें पाहूं ? " अशा रीतीनें बहुत प्रकारें विलाप करीत असतां राजा अगदींच व्याकुळ झाला. ती रात्र त्याला युगासारखी वाटली, ती सरतां सरेना.

तापस–अंध–साप सुधि आई।
कौसल्यहि सब कथा सुनाई।
भयउ बिकल बरनत इतिहासा।
रामरहित धिग जीवनआसा।

अंध तापसाच्या शापाची स्मृति होऊन राजानें तो सर्व वृत्तांत कौसल्येस सांगितला. तो ( श्रावण-शापवृत्तांत ) सांगतां सांगतांच राजा कळाहीन झाला. ( तो म्हणाला, ) " रामरहित ह्या जीवन–आशेस धिःकार असो. "

१ मानसहंसांतल्या 'पात्रपरिचयां' त तुलसीदासांच्या कौसल्येची अध्यात्म आणि वाल्मीकीच्या कौसल्येशीं केलेली तुलना दर्शनीय आढळेल अशी आम्हांस खात्री वाटते. विशेषत–कौसल्येच्या या उक्तीवरून.

सो तनु राखि करब मैं काहा।
जेहिं न प्रेमपनु मोर निबाहा।
हा रघुनंदन प्रानपिरीते।
तुम्ह बिनु जियत बहुत दिन बीते।
हा जानकी लषन हा रघुबर।
हा पितु-हित-चित-चातक-जलधर।

" ज्यानें माझा प्रेमपणच निभविला नाहीं तो हा देह राखून तरी मला काय कर्तव्य! हे प्राणप्रिया रघुनंदना! तुझ्याविण किती तरी दिवस जगलों रे! हे जानकी! हे लक्ष्मणा! हे पितृहित आणि पितृचित्त या चकोरांच्या बलाहका रघुवरा!"

**दो०—राम राम कहि राम कहि राम राम कहि राम। तन परिहरि रघुबरबिरह राउ गयउ सुरधाम॥ १५०॥**

अशा रीतीनें " राम राम " असा सारखा टाहो फोडीत असतां रघुपतिविरहामुळें राजाचें देहावसान होऊन तो देवलोकाप्रत गमन करिता झाला.

चौ०—जियन मरन फल दसरथ पावा।
अंड अनेक अमल जस छावा।
जियत राम-बिधु-बदन निहारा।
रामबिरह मरि मरन सवाँरा।

जगण्याचें आणि मरण्याचें फल दशरथासच मिळालें. अनेक ब्रह्माण्डांत त्याचें उज्ज्वल यश भरून गेलें. जिवंत होता तोंपर्यंत त्यानें रामाचाच मुखचंद्र पाहिला आणि रामाच्या विरहानें मरून मृत्यूस शोभा आणली.

सोकबिकल सब रोवहिं रानी।
रूप सील बल तेज बखानी।
करहिं बिलाप अनेक प्रकारा।
परहिं भूमितल बारहिं बारा।

दशरथाचें रूप, शील, बल आणि तेज यांचें वर्णन करून सर्व राण्या धाय मोकलून रडूं लगल्या. अनेक प्रकारें आक्रोश करीत त्या वरचेवर धरणीवर धडाधड आंग टाकूं लागल्या.

बिलपहिं बिकल दास अरु दासी।
घर घर रुदन करहिं पुरबासी।
अथयेउ आजु भानु—कुल—भानू।
धरमअवधि गुन—रूप—निधानू।
गारी सकल कैकइहि देहीं।
नयनबिहीन कीन्ह जग जेहीं।

दासदासींनींही एकच आकांत मांडला. पुरवासीजन घरोघरीं रडूं लागले. ते म्हणत " हे भानुकुलभानो! आज तूं अस्तास गेलास ना! हे गुणरूपनिधाना! तुझ्याबरोबर आज धर्माची देखील अवधी (शेवट) झाली!" अख्ख्या जगाचे डोळे फोडणारी ही कैकाडीण कैकेयीच झाली, असें म्हणून तिजवर शिव्याश्रापांचा भडिमार करूं लागले.

एहि बिधि बिलपत रैनि बिहानी।
आये सकल महामुनि ज्ञानी।

ह्याप्रमाणें विलाप चालू असतां रात्रीची पहाट झाली. सर्व मोठमोठे ज्ञानसंपन्न मुनिवर्य गोळा झाले.

**दो०—तब बसिष्ठ मुनि समयसम कहि अनेक इतिहास। सोक नेवारेउ सबहिं कर निज बिज्ञान प्रकास॥ १५१॥**

नंतर वसिष्ठ महामुनींनीं समयोचित अशा अनेक पुरातन गोष्टी सांगून आपल्या विज्ञानप्रकाशेंकरून सर्वांच्याच शोकाचें निवारण केलें.

चौ०—तेल नाव भरि नृपतन राखा।
दूत बोलाइ बहुरि अस भाखा।
धावहु बेगि भरत पहिं जाहू।
नृप सुधि कतहुँ कहहु जनि काहू।
एतनेइ कहेहु भरत सन जाई।
गुरु बोलाइ पठयउ दोउ भाई।

नावेंत तेल भरून त्यांत राजाचें प्रेत ठेविलें. नंतर दूतांना बोलावून त्यांना आज्ञा दिली कीं, " तावडतोब भरताकडे धांवत जा आणि राजासंबंधानें कोणास कांहींही न कळवितां भरतास फक्त एवढीच वर्दी द्या कीं, तुम्हा दोघांही बंधूंना गुरूंनीं बोलाविलें आहे."

सुनि मुनिआयसु धावन धाये।
चले बेगि बरबाजि लजाये।

मुनींची आज्ञा ऐकतांच ते दूत धांवतच निघाले, इतके कीं, त्यांचा वेग पाहून तेजस्वी घोड्यांना देखील लाजच वाटेल.

अनरथ अवध अरंभेउ जब तें।
कुसगुन होहिं भरत कहँ तब तें।
देखहिं राति भयानक सपना।
जागि करहिं कटु कोटि कलपना।
बिप्र जेवाँइ देहिं दिन दाना।
सिव अभिषेक करहिं बिधि नाना।

मॉंगहिँ हृदय महेस मनाई ।
कुसल मातु पितु परिजन भाई ।

जेव्हांपासून अयोध्येंत अनर्थ सुरू झाला तेव्हांपासून भरताला अपशकुन जाणवूं लागले. त्यास रात्रीं भयंकर स्वप्नें पडावीं आणि जागें होतांच त्याच्या मनांत नाहीं नाहीं त्या वाईटसाईट असंख्य कल्पना याव्या. त्यानें तन्निमित्त नित्य ब्राह्मणभोजनें घालावीं आणि गरीबांना दानें द्यावीं, अनेक प्रकारांनीं शंकराला अभिषेक करावा आणि मनांत महेश्वराची हीच प्रार्थना करावी कीं, माता, पिता, बंधु आणि कुटुंबांतील सर्व माणसें यांचें क्षेम असावें.

दो०—एहि बिधि सोचत भरत मन धावन पहुँचे आइ । गुरुअनुसासन स्रवन सुनि चले गनेस मनाइ ॥ १५२

ह्याप्रमाणें भरत मनांत विवंचना करीत आहे तोंच जासूद येऊन थडकले. गुरुजींची आज्ञा श्रवण करितांच तो सिद्धिविनायकाचें स्मरण करून निघाला.

चौ०—चले समीरबेग हय हाँके ।
नाघत सरित सैल बन बाँके ।
हृदय सोच बड कछु न सोहाई ।
अस जानहिँ जिय जाउँ उडाई ।
एक निमेष बरषसम जाई ।
एहि बिधि भरत नगर नियराई ।

घोडा अगदीं वाऱ्याच्या वेगानें भरधांव हांकून मोठमोठीं बिकट अरण्यें, डोंगर, नद्या ह्यांचें उलंघन करीत भरत निघाला. मनास अतिशय चुटपुट लागल्यामुळें त्याला चैन पडेना व एकदम उडून जावेंसें त्याच्या मनांत वाटूं लागलें. एक पळ त्यास संवत्सराप्रमाणें वाटूं लागला. ह्याप्रमाणें तो अयोध्येच्या जवळपास आला.

असगुन होहिँ नगर पैठारा ।
रटहिँ कुभाँति कुखेत करारा ।
खर सियार बोलहिँ प्रतिकूला ।
सुनि सुनि होइ भरतमन सूला ।

भरत नगरांत शिरतेवेळीं त्यास अपशकुन होऊं लागले. जीवजंतु भयंकर आणि अमंगल शब्द करूं लागले. खर आणि शृगाल ह्यांचें प्रतिकूळ ओरडणें वरचेवर ऐकून भरताच्या मनांत धडकी भरूं लागली.

श्रीहत सर सरिता बन बागा ।
नगर बिसेषि भयावन लागा ।
खग मृग हय गय जाहिँ न जोये ।
राम—बियोग—कुरोग बिगोये ।
नगर—नारि—नर निपट दुखारी ।
मनहुँ सबन्हि सब संपति हारी ।

तळीं, नद्या, वनें, बाग हीं निस्तेज दिसूं लागलीं. अयोध्या तर विशेषतः भयाण दिसूं लागली. पक्षी, हरिण, हत्ती, घोडे हेदेखील रामवियोगाच्या दुर्धर रोगानें इतके मृतप्राय दिसूं लागले कीं, त्यांचेकडे पहावेना. शहरचे लोक तर अतिशयच उदास झालेले असून जणुंकाय सर्व लोकांनीं आपलें सर्वस्वच गमाविलें आहे असें वाटे.

दो०—पुरजन मिलहिँ न कहहिँ कछु गवहिँ जोहारहिँ जाहिँ । भरत कुसल पूछि न सकहिँ भय बिषाद मन माहिँ ॥१५३॥

शहरचे लोक भरतास भेटले तरी ते नुसता मुजरा करून कांहींएक न बोलतां तसेंच पुढें जात असत. त्यामुळें भरताच्याहि मनांत भय आणि विषाद उत्पन्न होऊन त्याच्यानें देखील त्यांना उलट कुशल विचारवेना.

चौ०—हाट बाट नहिँ जाहिँ निहारी ।
जनु पुर दह दिसि लागि दवारी ।

बाजार आणि रस्ते ह्यांकडेहि पाहवेना. जणुंकाय नगरास दहाहि दिशांनीं आगच लागली आहे असें वाटे !

आवत सुत सुनि कैकयनंदिनि ।
हरषी रबि—कुल—जलरुह—चंदिनि ।
साजि आरती मुदित उठि धाई ।
द्वारहिँ भेँटि भवन लेइ आई ।

पुत्र आल्याचें वर्तमान ऐकतांच ती रविकुल-कमलचंद्रिका कैकेयी हर्षित झाली. आरतीची सिद्धता करून ती मोठ्या आनंदानें धांवतच निघाली आणि दारावरच भरतास भेटून त्यास आंत घेऊन आली.

भरत दुखित परिवारु निहारा ।
मानहुँ तुहिन बनजबन मारा ।
कैकेई हरषित एहि भाँती ।
मनहुँ मुदित दव लाइ किराती ।

बर्फाच्या आघातानें मृतप्राय झालेल्या कमलसमूहाप्रमाणें तेथील मंडळींना पाहून भरत फारच उद्विग्न

झाला. वणवा पेटल्यानंतर ज्याप्रमाणें पारधिणीस हर्ष होतो त्याप्रमाणें कैकेयीस आनंद झाला.

सुतहि ससोच देखि मन मारे।
पूछति नैहर कुसल हमारे।

भरतास दुःखित आणि विमनस्क झालेला पाहून तिनें विचारलें:—माझ्या माहेरची मंडळी तर खुशाल आहेत ना ?

सकल कुसल कहि भरत सुनाई।
पूछी निज–कुल–कुसल भलाई।
कहु कहँ तात कहाँ सब माता।
कहँ सिय राम लषन प्रियभ्राता।

भरतानें सर्वांचें कुशल वर्तमान तीस सांगितलें आणि आपल्या घरच्या मंडळीचें कुशल विचारिलें. ( तो म्हणाला, ) " बाबा कोठें आहेत तें सांग ! सर्व माता कोठें आहेत, सीता आणि माझे प्रिय बंधू रामलक्ष्मण कोठें आहेत ? "

**दो०—सुनि सुतबचन सनेहमय कपटनीर भरि नैन। भरत-स्रवन-मन-सूल सम पापिनि बोली बैन॥ १५४॥**

पुत्राचें तें प्रेमळ भाषण ऐकून त्या पापिणीनें, डोळ्यांत खोटींच आसवें आणून भरताच्या कानाला आणि मनाला अगदीं शूळाप्रमाणें टोंचणारे शब्द बोलण्यास सुरुवात केली.

चौ०—तात बात मैं सकल सवाँरी।
भइ मंथरा सहाय बिचारी।
कछुक काज बिधि बीच बिगारेउ।
भूपति सुर–पति–पुर पगु धारेउ।

( ती म्हणाली, ) " बाळा ! बिचाऱ्या मंथरेच्या सहाय्यानें मीं सर्वच गोष्ट सांवरली होती. परंतु नशिबानें मध्येंच घात केला आणि त्यामुळें महाराजांनीं स्वर्गलोकीं गमन केलें. "

सुनत भरत भयबिबस बिषादा।
जनु सहमेउ करि केहरिनादा।
तात तात हा तात पुकारी।
परे भूमितल ब्याकुल भारी।
चलत न देखन पायउँ तोही।
तात न रामहिँ सौंपेहु मोही।

तें ऐकतांच सिंहाची गर्जना ऐकून हत्ती जसा गर्भगळित होतो तद्वत् भरत भय आणि विषाद यांनीं घाबरून गेला. " हे तात, हे तात ! ताता हो ! " असा हाहाःकार करीत अत्यंत व्याकुळ होत्साता तो धरणीवर लोळूं लागला. ( तो म्हणाला ) " जातेवेळीं आपलें एकवार दर्शनहि घडलें नाहीं ! बाबा ! मला रामाच्याहि पण स्वाधीन करून आपण गेलां नाहीं ! "

बहुरि धीर धरि उठे सँभारी।
कहु पितुमरन हेतु महतारी।

फिरून धैर्य धरून तो सांवरून उठला आणि म्हणाला:—" आई ! बाबांच्या मरणाचें कारण मला सांग. "

सुनि सुतबचन कहति कैकेई।
मरमु पाछि जनु माहुर देई।
आदिहु तें सब आपनि करनी।
कुटिल कठोर मुदितमन बरनी।

भरताचा प्रश्न ऐकून त्यास उत्तर म्हणून त्या कुटिल, क्रूर कैकेयीनें, ओली जखम धुऊन त्यांत विष भरण्याप्रमाणें, आपली आद्योपान्त कर्मकथा अगदीं मनापासून हर्षित होऊन सांगितली.

**दो०—भरतहि बिसरेउ पितु मरन सुनत राम-बन-गौन। हेतु अपनपउ जानि जिय थकित रहे धरि मौन॥ १५५॥**

रामाचें वनप्रयाण ऐकतांच भरत पित्याचें मरण विसरला आणि त्यास कारण केवळ मी झालों, असें मनांत समजून तो चकित होऊन स्तब्ध उभा राहिला.

चौ०—बिकल बिलोकि सुतहि समुझावति।
मनहुँ जरे पर लोन लगावति।

भरतास विव्हल झालेला पाहून, जळलेल्या जागेवर मीठ सारवण्याप्रमाणें ती त्याची समजूत घालूं लागली.

तात राउ नहिँ सोचन जोगू।
बिढइ सुकृत जस कीन्हेउ भोगू।
जीवत सकल जनम फल पाये।
अंत अमर–पति–सदन सिधाये।
अस अनुमानि सोच परिहरहू।
सहित समाज राज पुर करहू।

" बाळा ! राजाबद्दल शोक करणें तुला उचित नाहीं. त्यांनीं भोगावयाचें तें भोगून घेतलें, सुकृत आणि यश यांचा रगड संग्रह केला, जगून जन्माचें सर्व सार्थक मिळविलें, आणि मेल्यानंतरहि पण

स्वर्गलोक साध्य केला. असा विचार करून शोकास रजा दे आणि थाटानें अयोध्येचें राज्य कर.''

सुनि सुठि सहमेउ राजकुमारू।
पाके छत जनु लाग अंगारू।

तें ऐकून पिकलेल्या गळवास कोलीत लागल्याप्रमाणें तो राजकुमार तळमळूं लागला.

धीरज धरि भरि लेहिँ उसासा।
पापिनि सबहि भाँति कुलनासा।
जौँ पै कुरुचि रही अति तोही।
जनमत काहे न मारेसि मोही।
पेड काटि तैँ पालउ सीँचा।
मीनाजियन निति बारि उलीचा।

धैर्य धरून आणि दीर्घ उसासा टाकून (तो म्हणाला):—हे पापिणी! तूं सर्वस्वीं कुलाचा घात केलास! जर असल्या प्रकारची तुझी द्वाड वासना होती तर मला उपजतांच नख कां लावलें नाहीस? मूळावर घाव घालून तूं पालवीवर पाणी शिंपलेंस! मासे जगविण्यासाठीं तूं पाणीच उपसून टाकलेंस!

दो०—हंसबंस दसरथ जनक राम लषन से भाइ। जननी तूँ जननी भई बिधि सन कछु न बसाइ॥ १५६॥

सूर्यासारखें सोज्वल कुल, दशरथासारखा पिता आणि रामलक्ष्मणांसारखे भाऊ मला लाधले असून, त्या माझी तूं आईपरी आई झालीस ना! नशिबावर कांहीं तोंडच नाहीं!

चौ०—जब तैँ कुमति कुमत जिय ठयऊ।
खंड खंड होइ हृदय न गयऊ।
बर माँगत मन भइ नहिँ पीरा।
गरि न जीह मुँह परेउ न कीरा।

हे दुष्टबुद्धि! तुझ्या मनांत ही दुष्टभावना जेव्हां उपजली तेव्हांच तुझ्या काळजाचे तिळातिळ तुकडे कां झाले नाहींत? वर मागतांना तुझ्या मनाला मुळींच कशी दिक्कत वाटली नाहीं? तुझी जीभ गळून पडून तुझ्या तोंडांत किडेहि कसे पडले नाहींत?

भूप प्रतीति तोरि किमि कीन्ही।
मरनकाल बिधि मति हरि लीन्ही।
बिधिहु न नारि हृदयगति जानी।
सकल कपट अघ अवगुन खानी।
सरल सुसील धरमरत राऊ।
सो किमि जानइ तीयसुभाऊ।

राजा तुजवर विश्वसून तरी कसा राहिला? त्याचा मरणकालच येऊन ठेपला म्हणूनच त्याची बुद्धि त्याच्या प्राक्तनानें हिरावून घेतली. ह्या बायका म्हणजे सर्व कपटांच्या, पापांच्या आणि दुर्गुणांच्या केवळ खाणीच होत. ह्यांचें हृद्गत प्रत्यक्ष ब्रह्मदेवाला देखील कळावयाचें नाहीं. मग राजा तर सरळ, बाळबोध आणि धर्मपरायण, त्यास त्यांचें इंगित काय कळणार!

अस को जीव जंतु जग माहीँ।
जेहि रघुनाथ प्रान प्रिय नाहीँ।
भे अति अहित राम तेउ तोहीं।
को तूँ अहसि सत्य कहु मोही।
जो हसि सो हसि मुह मसि लाई।
आँखि ओट उठि बैठहि जाई।

जगांत असा कोण जीवजंतु असेल कीं, ज्याला रघुनाथ प्राणापरताहि प्रिय नाहीं? राम जर तुझ्या हृदयांत इतका सलत आहे तर तूं अशी खरोखर आहेस तरी कोण हें मला कळूं दे तरी. तूं जी असशील ती खुशाल ऐस, मात्र येथून ऊठ आणि तोंड काळें करून माझ्या दृष्टिआड जाऊन बैस.

दो०—राम-बिरोधि-हृदय तेँ प्रगट कीन्ह बिधि मोहि। मो समान को पातकी बादि कहउँ कछु तोहि॥ १५७॥

रामाची दावेदारीण अशा ह्या तुझ्या कुशींतून मला ब्रह्मदेवानेंच निर्माण केलें आहे तेव्हां मजसारखा पापी इतर कोण असणार? आतां तुला कांहींहि बोललों तरी तें फुकटच होय.''

चौ०—सुनि सत्रुघन मातुकुटिलाई।
जरहिँ गात रिस कछु न बसाई।

मातेचें कौटिल्य पाहून संतापानें शत्रुघ्नाच्या अंगाचा तिळपापड झाला, परंतु त्याचें कांहीं चालेना.

तेहि अवसर कुबरी तहँ आई।
बसन बिभूषन बिबिध बनाई।
लखि रिस भरेउ लषन-लघु-भाई।
बरत अनल घृतआहुति पाई।
हुमगि लात तकि कूबर मारा।
परि मुह भरि महि करत पुकारा।

त्याच सुमारास मंथरेची ती धिडका नानाविध वस्त्रालंकारांचा भपका करून तेथें येऊन पोहोंचली. तीस पाहतांच शत्रुघ्नास—लक्ष्मणाच्या धाकट्या

भावास—प्रज्वलित होणाऱ्या अग्नींत तूप सांडल्याप्रमाणें रागाचा झटका येऊन त्यानें तिच्या कुबडावर जोरानें एक लाथ मारली. त्यामुळें ती तोंडघशीं जमिनीवर आदळली आणि आक्रोश करूं लागली.

कूबर टूटेउ फूट कपारू ।
दलितदसन मुख रुधिरप्रचारू ।
आह दइव मैं काह नसावा ।
करत नीक फल अनइस पावा ।

तिचें कुबड तुटून, कपाळ फुटलें; दांतांचा चूर होऊन, तोंडांतून रक्ताच्या गुळण्या येऊं लागल्या. (ती ओरडूं लागली कीं,) " हाय रे दैवा ! मीं ह्याचें असें काय घोडें मारलें कीं, बरें करितां मला हें असें फळ मिळालें ! "

सुनि रिपुहन लखि नख सिख खोटी ।
लगे घसीटन धरि धरि झोंटी ।
भरत दयानिधि दीन्हि छुडाई ।
कौसल्या पहिं गे दोउ भाई ।

तें ऐकून आणि तीस नखशिखांत लबाड जाणून शत्रुघ्नानें तिची वेणी धरली आणि तिला तो फरफटत ओढूं लागला. (हें पाहून) दयाळू भरतानें तिची सुटका केली आणि ते दोघेहि बंधु कौसल्येकडे निघून गेले.

**दो०—मलिनबसन बिबरन बिकल कृस सरीर दुखभारु । कनक-कलप-बर-बेलि-बन मानहुँ हनी तुषारु ॥ १५८ ॥**

मलिन वस्त्र परिधान केलेली, कांतिहीन झालेली, दुःखाचा डोंगर कोसळल्यामुळें शरीरानें अगदीं कृश झालेली, आणि विवळत पडलेली कौसल्या गारांनीं झोडलेल्या सुवर्णाच्या सुंदर कल्पलतेप्रमाणें भासूं लागली.

चौ०—भरतहिं देखि मातु उठिधाई ।
मुरुछित अवनि परी झइँ आई ।
देखत भरत बिकल भये भारी ।
परे चरन तनदसा बिसारी ।

भरतास पाहतांक्षणींच ती जी आनंदानें उठून धावली ती घेरी येऊन जमिनीवर मूर्छित पडली. तें पाहून भरत अतिशय घाबरला आणि देहभान विसरून तोहि तिच्या चरणांवर जाऊन लोटला.

मातु तात कहँ देहि देखाई ।
कहँ सिय रामलषन दोउ भाई ।
केकइ कत जनमी जग माँझा ।
जौं जनमित भइ काहे न बाँझा ।
कुलकलंक जेहि जनमेउ मोही ।
अपजसभाजन प्रिय-जन-द्रोही ।

भरत म्हणाला, " आई ! बाबा कोठें आहेत ते दाखीव ! जानकी आणि माझे दोघेहि बंधु कोठें ग आहेत ? कैकेयी ह्या जगांत कशासाठीं जन्मास आली ! जन्मास येऊन माझ्यासारख्या कुलकलंक, प्रियजनांचा द्रोह करणाऱ्या अपेशी पुत्राला जन्म देण्यापेक्षां ती वांझ तरी कां झाली नाहीं !

को त्रिभुवन मोहि सरिस अभागी ।
गति असि तोरि मातु जेहि लागी ।
पितु सुरपुर बन रघु-बर-केतू ।
मैं केवल सब अनरथहेतू ।
धिग मोहि भयउँ बेनु-बन-आगी ।
दुसह-दाह-दुख-दूषन-भागी ।

आई ! ज्याच्यामुळें तुझी अशी गति झाली त्या माझ्यासारखा करंटा ह्या त्रिभुवनांत तरी कोणी असेल काय ? बाबांना स्वर्गलोकीं पाठवून मीं रघुवंशमणि रामचंद्राला वनवास घडविला. ह्या सर्व अनर्थाला मी एकटा कारणीभूत झालों. असह्य संताप, दुःख आणि दूषण यांना पात्र झालेल्या व वेणुवनास आग लावणाऱ्या मला धिःक्कार असो ! "

**दो०—मातु भरत के बचन मृदु सुनि पुनि उठी सँभारि । लिये उठाइ लगाइ उर लोचन मोचति बारि ॥ १५९ ॥**

भरताचें तें दीनवाणें भाषण ऐकल्याबरोबर कौसल्या सांवरून उठली आणि त्यास उचलून घेऊन व उराशीं कवटाळून जणुंकाय तिनें त्यांजवर दुःखाश्रूंची अभिषेकधारच धरली.

चौ०—सरल सुभाय माय हिय लाये ।
अतिहित मनहुँ राम फिरि आये ।
भेंटेउ बहुरि लषन-लघु-भाई ।
सोक सनेह न हृदय समाई ।
देखि सुभाउ कहत सब कोई ।
राममातु अस काहे न होई ॥

त्या सरळ स्वभावाच्या कौसल्यामातेनें भरतास जेव्हां हृदयाशीं कवटाळलें तेव्हां जणुंकाय रामच परत आल्याप्रमाणें तिला अत्यानंद झाला. नंतर तीस शत्रुघ्न भेटला. त्या वेळेस तिचें दुःख आणि प्रेम तिच्या हृदयांत मावेनासें झालें. तिचा तो स्वभाव पाहून सर्वच लोक म्हणूं लागले कीं, 'ती रामाची आई आहे तेव्हां ती अशी कां असणार नाहीं ?'*

माता भरत गोद बैठारे ।
आँसु पोँछि मृदुबचन उचारे ।

कौसल्येनें भरतास मांडीवर घेतलें आणि त्याचे अश्रु पुसून ती फारच मृदु वाणीनें बोलूं लागली कीं,—

अजहुँ बच्छ बलि धीरज धरहू ।
कुसमउ समुझि सोक परिहरहू ।
जनि मानहु हिय हानि गलानी ।
काल-करम-गति अघटित जानी ।
काहुहि दोस देहु जनि ताता ।
भा मोहि सब बिधि बाम बिधाता ।
जो एतेहु दुख मोहि जिआवा ।
अजहुँ को जानइ का तेहि भावा ।

" बाळ ! आज तुला धैर्यच धरलें पाहिजे; आणि प्रसंग फार बिकट आहे हें जाणून दुःख आवरलेंच पाहिजे. काळ आणि कर्म यांची रचना अघटित असून तूं आपल्या मनांत हुरहूर किंवा चिंता बाळगूं नकोस. वत्सा !दैव सर्वच परीनें मजवर कोपला आहे. तेव्हां तूं कोणासच दोष देऊं नकोस. इतकें दुःख ओढवलें तरीहि जर त्यानें मला जीवंतच ठेविली आहे तर अजून तरी त्याचा मानस काय आहे कोण जाणे !

दो०—पितुआयसु भूषन बसन तात तजे रघुबीर । बिसमउ हरष न हृदय कछु पहिरे बलकल चीर ॥ १६० ॥

बाळ ! पित्याची आज्ञा होतांच रघुवीरानें वस्त्र-भूषणांचा त्याग करून वल्कलवस्त्राचें परिधान केलें. तरी त्याच्या मनाला हर्ष अगर विषाद तिळमात्र देखील झाला नाहीं.

चौ०—मुख प्रसन्न मन राग न रोषू ।
सबकर सब बिधि करि परितोषू ।
चले बिपिन सुनि सिय सँग लागी ।
रहइ न राम-चरन-अनुरागी ।
सुनतहि लषन चले उठि साथा ।
रहहिँ न जतन किये रघुनाथा ।
तब रघुपति सबही सिरु नाई ।
चले संग सिय अरु लघु भाई ।

मनांत राग अगर लोभ न धरितां, प्रसन्न मनानें, सर्वांचें सर्व प्रकारें समाधान करीत राम निघाले असतां त्यांची वनवासवार्ता श्रवण करितांच सीताहि त्यांच्या पाठीस लागली. रामचरणांचे ठिकाणीं अनुरक्त असल्याकारणानें ती राहीचना. तें ऐकून लक्ष्मणदेखील तसाच उठून पाठोपाठ निघाला. रघुनाथानें ( त्यानें न येण्याविषयीं ) यत्न केला तरीहि पण तो राहीना. तेव्हां सीता आणि लक्ष्मण यांना सोबत घेऊन अशा रीतीनें रामानें सर्वांना नमस्कार करून प्रयाण केलें.

राम लषन सिय बनहिँ सिधाये ।
गइउँ न संग न प्रान पठाये ।
एह सब भा इन्ह आँखिन्ह आगे ।
तउ न तजा तनु प्रान अभागे ।

राम, लक्ष्मण व सीता हे वनांत गेले असूनहि त्यांना सोबत म्हणून मीहि गेलें नाहीं आणि माझे प्राणहि पण मीं पाठविले नाहींत. हें सगळें ह्या डोळ्यांदेखत घडूनदेखील ह्या माझ्या कुडीनें हे आपले अभागी प्राण सोडले नाहींत.

मोहि न लाज निजनेह निहारी ।
रामसरिस सुत मैँ महतारी ।
जिअइ मरइ भल भूपति जाना ।
मोर हृदय सत–कुलिस–समाना ।

रामासारखा पुत्र आणि माझ्यासारखी आई ! रामावर असलेली माझी ममता पाहून मला लाजहि वाटत नाहीं ! जगणें आणि मरणें हें खरें खरें महा-राजांनींच जाणलें होतें. माझें काळीज तर शेंकडों वज्रांप्रमाणें कठोर आहे. "

* मानसहंस ( अथवा तु. रामा. रहस्य ) या आमच्या पुस्तकांत दिलेली कौसल्येची भूमिका ( भूमिकापरिचय पहा. ) पाहिल्यास ' राम मातु अस काहे न होई ' या उक्तीचें स्वारस्य कळून येईल.

**दो०—कौसल्या के बचन सुनि भरतसहित रनिवासु। ब्याकुल बिलपत राजगृह मानहुँ सोकनिवासु ॥ १६१ ॥**

याप्रमाणें कौसल्येचे उद्गार ऐकून भरतासकट अंतःपुरांतील सर्व स्त्रिया व्याकुल होऊन विलाप करूं लागल्या. त्या वेळेस तें राजमंदिर शोकगृहच आहे कीं काय असें वाटलें.

चौ०—बिलपहिँ बिकल भरत दोउ भाई।
कौसल्या लिये हृदय लगाई।
भाँति अनेक भरत समुझाये।
कहि बिबेकमय बचन सुनाये।
भरतहु मातु सकल समुझाई।
कहि पुरान स्रुति कथा सुहाई।
छलबिहीन सुचि सरल सुबानी।
बोले भरत जोरि जुगपानी।

भरत आणि शत्रुघ्न, विव्हल होऊन रुदन करीत असतां त्या दोघांहि भावांस कौसल्येनें पोटाशीं धरलें आणि चार विवेकाच्या गोष्टी सांगून त्यांची तिनें परोपरीनें समजूत घातली. वेदपुराणांतील समयोचित कथा सांगून बाकीच्याहि राण्यांनीं भरताची समजूत घातली. नंतर भरतानें हात जोडून आपल्या निष्कपट, शुद्ध, सरळ आणि प्रांजळ अशा भाषणास सुरवात केली.

जे अघ मातु–पिता–सुत मारे।
गाइगोठ महि–सुर–पुर जारे।
जे अघ तिय–बालक–बध कीन्हे।
मीत महीपति माहुर दीन्हे।
जे पातक उपपातक अहहीं।
करम–बचन–मन–भव कबि कहहीँ।
ते पातक मोहि होहु बिधाता।
जौँ एहु होइ मोर मत माता।

तो म्हणाला, " माते! ह्यांत (कैकेयीच्या कृत्यांत) जर माझें कांहीं अंग असेल, तर माता, पिता, पुत्र यांच्या हत्येचें, गाईचे गोठे व ब्राह्मणांचीं गांवें यांना जाळण्याचें, स्त्रीहत्या आणि भ्रूणहत्या केल्याचें, मित्र व राजा यांना विषप्रयोग केल्याचें जें पातक तें आणि जीं कांहीं कविकथित कायिक, वाचिक, व मानसिक वगैरे उपपातकें असतील तीं सर्व, हे भगवंता! माझ्या माथीं पडोत!

**दो०—जे परिहरि हरि-हर-चरन भजहिँ भूतगन घोर। तिन्ह कइ गति मोहि देउ बिधि जौँ जननी मत मोर ॥ १६२ ॥**

आई! ह्यांत जर माझा कांहीं हात असेल तर हरिहरांचे चरण सोडून घोर भूतगणाला साध्य करणाऱ्यांना जी दुर्गति मिळते ती, हे परमेश्वरा! मला प्राप्त होऊं दे!

चौ०—बेचहिँ बेद धरम दुहि लेहीँ।
पिसुन पराय पाप कहि देहीँ।
कपटी कुटिल कलहप्रिय क्रोधी।
बेदबिदूषक बिस्वबिरोधी।
लोभी लंपट लोलुपचारा।
जे ताकहिँ परधनु परदारा।
पावउँ मैँ तिन्ह कै गति घोरा।
जौँ जननी एहु संमत मोरा।

माते! त्यांत जर माझी सल्ला असेल तर वेदविक्रय करणारे, धर्मास दोहून घेणारे (धर्माचें थोतांड माजवून स्वार्थ साधणारे, अगर कन्या आणि गोविक्रय करणारे), दुसऱ्याचीं बिंगें चव्हाट्यावर आणणारे, चहाडखोर, दगेखोर, कुभांडखोर, क्रोधी, वेदांची निंदा करणारे, विश्वाचा द्रोह करणारे, लोभी, लंपट, आपमतलबी, परद्रव्य आणि परकांता यांवर नजर ठेवणारे, अशांना प्राप्त होणारी भयंकर अधोगति मला प्राप्त होईल.

जे नहिँ साधुसंग अनुरागे।
परमारथपथ बिमुख अभागे।
जे न भजहिँ हरि नरतनु पाई।
जिन्हहि न हरि–हर–सुजस सुहाई।
तजि स्रुतिपंथ बामपथ चलहीँ।
बंचक बिरचि बेषु जग छलहीँ।
तिन्ह कइ गति मोहि संकर देऊ।
जननी जौँ एहु जानउँ भेऊ।

आई! मला ह्या गुप्तवार्तेपैकीं यत्किंचितहि भाग नुसता कळलेला जरी असेल तरीदेखील संतसंगावर ज्यांचें प्रेम नाहीं, परमार्थमार्गाचा ज्यांना अगदींच कंटाळा आहे, नरजन्मास येऊनहि जे देवास भजत नाहींत, हरिहरांच्या लीला ज्यांना गोड लागत नाहींत, वेदमार्ग सोडून जे आडमार्गानें चालत असतात, जे नुसत्या वेषानें जगास छळणारे ढोंगी

आहेत, अशांना जी गति प्राप्त होते ती भगवान् महादेवांनीं मला द्यावी ! ''

**दो०—मातु भरत के बचन सुनि साँचे सरल सुभाय। कहति रामप्रिय तात तुम्ह सदा बचन मन काय ॥ १६३ ॥**

सत्य आणि स्वाभाविक सरळ असें तें भरताचें भाषण ऐकून कौसल्या म्हणूं लागलीः—" हे तात ! तूं तर सदोदित वाणीनें, मनानें, आणि देहानें रामप्रिय आहेस.

चौ०—राम प्रान तें प्रान तुह्मारे।
तुह्म रघुपतिहिँ प्रान तें प्यारे।
बिधु बिष चवइ स्रवइ हिमु आगी।
होइ बारिचर बारिबिरागी।
भये ज्ञान बरु मिटइ न मोहू।
तुह्म रामहिँ प्रतिकूल न होहू।

राम तुला प्राणांचेहि प्राण वाटत असून तूंहि रामास प्राणाहूनदेखील प्रिय आहेस. चंद्रापासून विषाचा वर्षाव होईल, हिमापासून अग्नि पाझरेल, पाण्यांतले प्राणी पाण्याशीं वैर करतील, ज्ञान होऊन देखील एकपरी संशय उरेल, परंतु तूं मात्र रामाशीं कधींहि वांकडा व्हावयाचा नाहींस !

मत तुह्मार एह जो जग कहहीँ।
सो सपनेहुँ सुख सुगति न लहहीं।

त्यांत तुझी फूस आहे ही गोष्ट जगांत जो कोणी म्हणेल त्यास स्वप्नांतहि सुख किंवा सद्गति लाधणार नाहीं. ''

अस कहि मातु भरत हिय लाये।
थनपय स्रवहिँ नयनजल छाये।
करत बिलाप बहुत एहि भाँती।
बैठेहि बीति गई सब राती।

इतकें बोलून भरतास कौसल्येनें हृदयाशीं धरलें. तोंच तिला पान्हा फुटला आणि तिचे डोळे पाण्यानें भरून आले. अशा रीतीनें विलाप चालू असतां बसल्याबसल्याच सर्व रात्र उलटून गेली.

बामदेव बसिष्ठ तब आये।
सचिव महाजन सकल बोलाये।
मुनि बहुभाँति भरत उपदेसे।
कहि परमारथ बचन सुदेसे।

नंतर वसिष्ठवामदेव आले व त्यांनीं सर्व सचिव आणि महाजन यांना बोलावलें. मुनींनीं यथावसर परमार्थाच्या गोष्टी सांगून भरतास अनेक प्रकारांनीं उपदेश केला.

**दो०—तात हृदय धीरजु धरहु करहु जो अवसर आजु। उठे भरत गुरुबचन सुनि करन कहेउ सब काजु ॥ १६४ ॥**

मुनि म्हणाले, " बाळा ! आतां मनास धीर दिलाच पाहिजे. आज जो प्रसंग आला आहे त्यास सादर झालेंच पाहिजे. '' याप्रमाणें गुरूपदेश श्रवण करितांच भरत उठला आणि वसिष्ठांनीं त्यास सर्व विधि करण्यास आज्ञा दिली.

चौ०—नृपतनु बेद बिहित अन्हवावा।
परमबिचित्र बिमान बनावा।
गहि पग भरत मातु सब राखी।
रहीँ राम दरसन अभिलाखी।

दशरथाच्या कलेवरास वैदिक रीतीनें स्नान घातलें. अतिशय सुंदर विमान बनविलें होतें. भरतानें सर्व मातांचे चरण धरून त्यांस सती जाऊं दिलें नाहीं. त्याही रामदर्शनाच्या इच्छेनें मागें राहिल्या.

चंदन–अगर–भार बहु आये।
अमित अनेक सुगंध सुहाये।
सरजुतीर रचि चिता बनाई।
जनु सुर–पुर–सोपान सुहाई।

चंदन, अगरु वगैरे नाना प्रकारचा सुगंधिक द्रव्यभार विपुल आणविला. जशी कांहीं स्वर्गारोहण करण्याकरितां सुंदर शिडीच निर्माण केली आहे अशी उत्कृष्ट चिता शरयूतीरीं रचण्यांत आली.

एहि बिधि दाहक्रिया सब कीन्ही।
बिधिवत न्हाइ तिलांजुलि दीन्ही।
सोधि सुमृति सब बेद पुराना।
कीन्ह भरत दसगात बिधाना।

ह्याप्रमाणें सर्व दहनविधि उरकला आणि स्नानानंतर यथाविधि तिलांजली देण्यांत आल्या. वेद, स्मृति, पुराणें इत्यादिकांच्या संमतीप्रमाणें भरतानें दशगात्रविधि आटोपला.

जहँ जस मुनिबर आयसु दीन्हा।
तहँ तस सहस भाँति सब कीन्हा।
भये बिसुद्ध दिये सब दाना।
धेनु बाजि गज बाहन नाना।

मुनिवरांची जेथें जशी आज्ञा होत गेली, तें तें सर्व त्याच वेळीं भरत सहस्त्रपटीनें करीत गेला. धेनु, अश्व, हत्ती, वाहनें इत्यादि सर्व दानें देऊन तो शुद्ध झाला.

**दो०—सिंहासन भूषन बसन अन्न धरनि धन धाम। दिये भरत लहि भूमिसुर भे परिपूरन काम ॥ १६५ ॥**

भरतानें सिंहासन, भूषणें, वस्त्रें, अन्नें, पृथ्वी, धन, गृहें वगैरेहि दान केलीं. तीं घेऊन ब्राह्मण तृप्त झाले.

**चौ०—पितुहित भरत कीन्हि जसि करनी।**
**सोमुख लाख जाइ नहिं बरनी।**

पित्याच्या हिताप्रीत्यर्थ भरतानें जशी कृति केली ती लक्ष मुखांनींहि वर्णन करतां येणें शक्य नाहीं.

**सुदिन सोधि मुनिबर तब आये।**
**सचिव महाजन सकल बोलाये।**
**बैठे राजसभा सब जाई।**
**पठये बोलि भरत दोउ भाई।**

नंतर सुमुहूर्त शोधून मुनिश्रेष्ठ वसिष्ठ आले आणि त्यांनीं सर्व अमात्य आणि लोकांचे पुढारी यांचा दरबार भरविला. सर्व मंडळी येऊन राजाच्या सभागृहांत बसली. नंतर वसिष्ठांनीं भरतशत्रुघ्न दोघांही बंधूंस निमंत्रण पाठविलें.

**भरत बसिष्ठ निकट बैठारे।**
**नीति-धरम-मय बचन उचारे।**
**प्रथम कथा सब मुनिबर बरनी।**
**केकइ कुटिल कीन्हि जसि करनी।**
**भूप धरमब्रत सत्य सराहा।**
**जेहि तनु परिहरि प्रेम निबाहा।**

वसिष्ठांनीं भरतास अगदीं सन्निध बसवून नीति आणि धर्म यांचें केवळ सार असें भाषण केलें. कैकेयीनें आपल्या कुटिलपणाची करणी कशी कशी केली ह्याचें साद्यंपांत वर्णन मुनिवरांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत केलें. ज्यानें देहदेखील बळी घालून आपलें प्रेम अखेरीस सिद्ध केलें, त्या राजा दशरथाच्या धर्मव्रताची आणि सत्यनिष्ठेची त्यांनीं प्रशंसा केली.

**कहत राम-गुन-सील-सुभाऊ।**
**सजल नयन पुलकेउ मुनिराऊ।**
**बहुरि लषन-सिय-प्रीति बखानी।**
**सोक सनेह मगन मुनिज्ञानी।**

रामाच्या गुणशीलस्वभावाचें वर्णन करीत असतां मुनिरायांचे नेत्र अश्रूंनीं भरून येऊन त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले. नंतर लक्ष्मण आणि जानकी यांचें रामाबद्दलचें प्रेम वाखाणीत असतां, वसिष्ठ एवढे ज्ञानी तरी तेदेखील दुःख आणि प्रेम यांत निमग्न झाले !

**दो०—सुनहु भरत भावी प्रबल बिलखि कहेउ मुनिनाथ। हानि लाभ जीवन मरन जस अपजस बिधि हाथ ॥ १६६ ॥**

नंतर वसिष्ठ अगदीं कळवळून म्हणाले:—"बा भरता ! ऐक. भवितव्यता हीच प्रबळ होय. हानि व लाभ, जन्म आणि मरण, यश आणि अपयश हीं एका प्राक्तनाच्याच आधीन असतात.

**चौ०—अस बिचारि केहि देइय दोषू।**
**ब्यरथ काहि पर कीजिय रोषू।**
**तात बिचार करहु मन माहीं।**
**सोचजोग दसरथ नृप नाहीं।**

असा विचार केल्यावर दोष तरी कोणाला ठेवावयाचा आणि व्यर्थ संतापावयाचें तरी कोणावर ! बाळा ! तूंच आपल्या मनांत विचार करून पहा कीं, राजा दशरथ शोचनीय नव्हे.

**सोचिय बिप्र जो बेदबिहीना।**
**तजि निज धरम बिषय लयलीना।**
**सोचिय नृपति जो नीति न जाना।**
**जेहि न प्रजा प्रिय प्रानसमाना।**
**सोचिय बयसु कृपिन धनवानू।**
**जो न अतिथि सिवभगति सुजानू।**

जो स्वधर्माचा त्याग करून विषयलंपट होऊन रहातो आणि जो वेदसंस्काररहित असतो तो विप्र शोचनीय होय. जो नीति जाणीत नाहीं आणि ज्यास

१ येथल्या भरतचरित्रास मूळ रामायणाचा आधार नाहीं. कवीची हें चरित्र स्वतंत्र रचना आहे. म्हणून त्यांतून शोध बोध फार सावधगिरीनें घ्यावयास पाहिजेत. कदाचित् म्हणतांहि येईल कीं त्यांत कवीची आध्यात्मिक आणि प्रापंचिक विचारसरणीहि दडली असेल. हा भरतचरित्राचा भाग काव्याचा अद्वितीय नमुना आहे. आमच्या मानसहंसांत त्याजवर बहुमोल विचार केलेला आढळेल.

आपली प्रजा प्राणाप्रमाणें प्रिय वाटत नाहीं तो राजा शोकास्पद होय. धनाढ्य असूनहि जो कृपणपणा करतो आणि अतिथि आणि शंकर यांचे ठिकाणीं ज्याची भक्ति नाहीं असा वैश्य शोचनीय होय.

सोचिय सूद्र बिप्र अपमानी।
मुखर मानप्रिय ज्ञानगुमानी।
सोचिय पुनि पतिबंचक नारी।
कुटिल कलहप्रिय इच्छाचारी।
सोचिय बटु निजब्रत परिहरई।
जो नहिँ गुरुआयसु अनुसरई।

ब्राह्मणद्वेष्टा, वाचाळ, मानासाठीं हपापलेला, व ज्ञानाचा तोरा मिरविणारा असा शूद्र शोचनीय होय; पतीची अवहेलना करणारी, कुटिल, कलहप्रिय आणि स्वैर वर्तन करणारी स्त्री शोचनीय होय; आपलें व्रत सोडून जो गुरूंच्या आज्ञेचें पालन करीत नाहीं तो ब्रह्मचारी शोचनीय होय.

**दो०—सोचिय गृही जो मोहबस करइ करम-पथ त्याग। सोचिय जती प्रपंचरत बिगत बिबेक बिराग ॥ १६७ ॥**

अज्ञानवश होऊन कर्ममार्गाचा त्याग करणारा गृहस्थ शोचनीय आहे. प्रपंचरत आणि वैराग्यविवेक-शून्य असा संन्यासी शोचनीय होय.

चौ०—बैषानस सोइ सोचन जोगू।
तप बिहाइ जेहि भावइ भोगू।
सोचिय पिसुन अकारनक्रोधी।
जननि-जनक-गुरु-बंधु-बिरोधी।
सबबिधि सोचिय परअपकारी।
निज तनुपोषक निरदय भारी।
सोचनीय सबहीं बिधि सोई।
जो न छाडि छल हरिजन होई।

तपाचा त्याग करून ज्याला भोगाविलास प्रिय वाटतात असा वानप्रस्थ शोचनीय होय. अकारण क्रोध करणारे, माता, पिता, बंधु, गुरु यांचा द्वेष करणारे पिशुन शोचनीय होत. जो परपीडक, अति-निर्दय आणि केवळ स्वपिंडपोषक असतो तो सर्वो-तोपरीच शोचनीय होय. जो कपटाचा त्याग करून भगवद्भक्तिपर होत नाहीं तो तर सर्व तऱ्हेनें अधिकच शोचनीय होय.

सोचनीय नहिँ कोसलराऊ।
भुवन चारिदस प्रगट प्रभाऊ।
भयउ न अहइ न अब होनिहारा।
भूप भरत जस पिता तुम्हारा।
बिधि हरि हर सुरपति दिसिनाथा।
बरनहिँ सब दसरथ-गुन-गाथा।

चतुर्दश भुवनांत ज्याचा प्रभाव दुमदुमत आहे असा तो कोशलेश्वर राजा दशरथ मात्र शोचनीय नव्हे. बा भरता! तुझ्या पित्यासारखा राजा मागें झालाच नाहीं, हल्लींहि विद्यमान नाहीं व पुढेंहि व्हावयाचा नाहीं. विध, हरि, हर, इंद्र, लोकपाल इत्यादि सर्वजण दशरथाचे गुणानुवादच गात आहेत.

**दो०—कहहु तात केहि भाँति कोउ करिहि बडाई तासु। राम लषन तुम्ह सत्रुहन सरिस सुअन सुचि जासु ॥ १६८ ॥**

हे तात! राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न या तुह्मांसारखे पवित्र ज्याचे पुत्र त्या दशरथाची महती कोण आणि कोणत्या प्रकारें वर्णन करूं शकणार, सांग बरें?

चौ०—सब प्रकार भूपति बडभागी।
बादि बिषाद करिय तेहि लागी।
एह सुनि समुझि सोच परिहरहू।
सिर धरि राजरजायसु करहू।

सर्वच रीतीनें राजा दशरथ महद्भाग्यशाली होय. त्याच्यासाठीं दुःख करणें व्यर्थ आहे. (मी म्हणतों) हें ऐकून आणि लक्षांत घेऊन दुःखाचा त्याग कर आणि पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानून त्याप्रमाणें आचरण कर.

राय राजपद तुम्ह कहँ दीन्हा।
पितावचन फुर चाहिय कीन्हा।
तजे राम जेहि बचनहिँ लागी।
तनु परिहरेउ रामबिरहागी।
नृपहिँ बचन प्रिय नहिँ प्रिय प्राना।
करहु तात पितुबचन प्रमाना।

राजानें राज्यपद तुला अर्पण केलें आहे. तेव्हां पित्याची आज्ञा तूं सत्य केलीच पाहिजे. ज्या वचनासाठीं राजानें रामास वनांत पाठवून शेवटीं रामविरहाग्नींत आपल्या देहाची होळी केली, तें वचनच राजाला प्रिय असून त्याचे प्राणदेखील तितके प्रिय नव्हते. अत एव, हे तात! त्वां पित्याचें वचन प्रमाण मानलेंच पाहिजे.

करहु सिसि धरि भूपरजाई ।
यह तुम्ह कह सब भाँति भलाई ।
परसुराम पितुअज्ञा राखी ।
मारी मातु लोग सब साखी ।
तनय जजातिहि जौबन दयऊ ।
पितुअज्ञा अंघ अजस न भयऊ ।

राजाची आज्ञा शिरसावंद्य करून त्याप्रमाणें वाग. यांतच तुझें सर्वतोपरी कल्याण आहे. परशुरामानें मातेचा देखील वध केला; परंतु पित्याच्या आज्ञेचें परिपालन केलें; याची सर्व जग साक्ष देईल. राजा *ययातीस त्याच्या पुत्रानें आपली यौवनावस्था अर्पण केली; परंतु पित्याची आज्ञा होती, एतदर्थ त्यास पातकाचा किंवा अपयशाचा यत्किंचितहि डाग लागला नाहीं.

**दो०—अनुचित उचित बिचारु तजि जे पालहिँ पितु बैन । ते भाजन सुख सुजस के बसहिँ अमरपति ऐन ॥ १६९ ॥**

कार्याकार्याचा विचार एकीकडे ठेवून जे पित्याची आज्ञा पालन करितात, तेच सुख आणि सत्कीर्ति यांस पात्र होतात आणि त्यांसच स्वर्गांत बसण्यास स्थान मिळतें.

चौ०—अवसि नरेस बचन फुर करहू ।
पालहु प्रजा सोक परिहरहू ।
सुरपुर नृप पाइहिँ परितोषू ।
तुम्ह कहँ सुकृत सुजसु नहिँ दोषू ।

पितृवाक्य अवश्यमेव सत्य केलेंच पाहिजे आणि प्रजेचें दुःख निवटून तिचें रक्षण केलें पाहिजे. त्या योगानें स्वर्गांत पित्यास संतोष होऊन तुजला दोष न लागतां पुण्य आणि सत्कीर्तिच लाभेल.

वेदबिहित संमत सबही का ।
जेहि पितु देइ सो पावइ टीका ।
करहु राज परिहरहु गलानी ।
मानहु मोर बचन हित जानी ।
सुनि सुख लहब रामबैदेही ।
अनुचित कहब न पंडित केही ।

पिता ज्यास राज्य देईल तोच राज्याचा अधिकारी होतो हेंच मत वेदविहित आणि सर्वसंमत होय, म्हणून औदासीन्य टाकून राज्य कर. ही माझा आज्ञा हितकर समजून त्याप्रमाणें वाग. तूं राज्य करतोस हें ऐकून सीता आणि राम दोघेहि आनंद मानतील आणि कोणीहि ज्ञाता तुला दोष लावणार नाहीं.

कौसल्यादि सकल महतारी ।
तेउ प्रजासुख होहिँ सुखारी ।
प्रेम तुह्मार राम कर जानिहि ।
सो सब बिधि तुह्म सन भल मानिहि ।
सौँपेहु राज राम के आये ।
सेवा करेहु सनेह सुहाये ।

कौसल्यादि सर्व माता देखील प्रजेच्या सुखानें सुखीच होतील. तुझें प्रेम रामाला विदितच आहे. ते सर्व प्रकारें तुझे गुणानुवादच करतील. राम परत आल्यानंतर मग त्यांचेवर राज्य सोंपवून तूं स्वतः त्यांची प्रेमळभावानें सेवा करीत रहा."

**दो०—कीजिय गुरुआयसु अवसि कहहिँ सचिव कर जोरि । रघुपति आये उचित जस तस तब करब बहोरि ॥ १७० ॥**

मंत्रिमंडळ हात जोडून म्हणालेः—"गुरुमहाराजांची आज्ञा अवश्य अंमलांत आणली पाहिजे. रामचंद्र परत आल्यावर मग खुशाल जें योग्य दिसेल तें करावें."

चौ०—कौसल्या धरि धीरज कहई ।
पूत पथ्य गुरुआयसु अहई ।
सो आदरिय करिय हित मानी ।
तजिय बिषादु कालगति जानी ।

---

१ परशुरामानें रेणुकेचा वध केल्याची कथा सर्वश्रुतच आहे.

* शुक्रकन्या देवयानी आणि दैत्यराज वृषपर्वा याची कन्या शर्मिष्ठा ह्या दोघी शुक्राज्ञेनें ययातीच्या स्त्रिया झाल्या. त्या दोघींत अत्यंत सापत्नभाव होता. शर्मिष्ठेस मुलें होतांच देवयानीला मत्सर वाटून तिनें शुक्राकरवीं राजास शाप देवविला कीं, त्यानें जराग्रस्त व्हावें. राजा शरण आल्यावर फिरून शुक्राचार्यांनीं त्यांस उःशाप दिला कीं, मुलांचें यौवन घेऊन आपली जरा त्यांस दे. त्याप्रमाणें शर्मिष्ठेचा पुत्र जो पुरु त्यानें कबूल केलें. पुढें तोच राज्याचा अधिकारी झाला.

१ वसिष्ठांचा हा राजनीतीचा प्रयोग आहे. त्यांचें भाषण भरताच्या शुद्धीची कसोटी लावण्यासाठीं आहे. भरतानें राज्य घेणें कबूल केलें असतें तर त्याची अशुद्धि आपोआपच बाहेर फुटून निघाली असती.

कौसल्याहि धैर्य धरून म्हणालीः—“ बाळ ! गुरुजींची आज्ञाच पथ्यकर होय. तींतच तुझें कल्याण आहे असें मानून आणि वेळप्रसंग ओळखून व दुःखाचा त्याग करून तिचा आदर कर.

बन रघुपति सुरपुर नरनाहू ।
तुम्ह एहि भाँति तात कदराहू ।
परिजन प्रजा सचिव सब अंबा ।
तुम्हही सुत सब कहँ अवलंबा ।

राम वनांत गेला असून महाराज स्वर्गवासी झाले आहेत, आणि वत्सा ! तूं ह्या रीतीनें माघार घेत आहेस ! आश्रित, प्रजा, सचिव, सर्व माता वगैरे सर्वत्रांस, बाळा ! तुझाच काय तो आतां आधार राहिला आहे.

लखि बिधि बाम कालकठिनाई ।
धीरज धरहु मातु बलि जाई ।
सिर धरि गुरुआयसु अनुसरहू ।
प्रजा पालि पुर–जन–दुख हरहू ।

दैव विपरीत असून काळ कठिण आला आहे हें लक्षांत आणून धैर्य धरलेंच पाहिजे. ही तुझी आई तुजवरून स्वतःस ओवाळून टाकीत आहे. गुरुजींची आज्ञा शिरसावंद्य करून तदनुसार वर्तन कर आणि प्रजेचें पालन करून तिच्या दुःखांचा परिहार कर. ”

गुरु के बचन सचिव अभिनंदन ।
सुने भरत हिय हित जनु चंदन ।
सुनी बहोरि मातु मृदुबानी ।
सील-सनेह-सरल-रस सानी ।

वसिष्ठगुरूंचें भाषण आणि त्यांस सचिवांचें मिळालेलें अनुमोदन हें ऐकून भरताचें हृदय चंदनानुलेपनाप्रमाणें निवालें. त्यांतून फिरून शील, प्रेम, सरळपणा आणि कारुण्य ह्यांनीं ओथंबलेली अशी कौसल्येची मधुरवाणी ऐकून—

**छंद—सानी सरलरस मातुबानी सुनि भरत ब्याकुल भये । लोचनसरोरुह स्रवत सींचत बिरह उर अंकुर नये ॥ सो दसा देखत समय तेहि बिसरी सबहि सुधि देह की । तुलसी सराहत सकल सादर सीँव सहजसनेह की ॥ ७ ॥**

सारल्य आणि कारुण्य यांनीं परिप्लुत अशी मातृवाणी ऐकून तर भरत अगदीं सद्गदित झाला. त्याच्या नेत्रकमलांतून हृदयांतील विरहरूपी नूतन अंकुरावर टपटप अश्रुसिंचन होऊं लागलें. त्या वेळची त्याची ती दशा पाहून सर्वच देहभान विसरले आणि सर्वजण खऱ्या प्रेमाचा कळस झाला असें म्हणून त्याची वाहवा करूं लागले.

**सो०–भरत कमलकर जोरि धीर-धुरं-धर धीर धरि । बचन अमिय जनु बोरि देत उचित उत्तर सबहिँ ॥ ७ ॥**

तेव्हां त्या धैर्यधुरंधर भरतानें धैर्य धरून आणि कमलहस्त जोडून आपल्या अमृतसंपुटित अशा वाणीनें सर्वांस समर्पक उत्तरें दिलीं.

चौ०–मोहि उपदेस दीन्ह गुरु नीका ।
प्रजा सचिव संमत सबही का ।
मातु उचित धरि आयसु दीन्हा ।
अवसि सीस धरि चाहउँ कीन्हा ।
गुरु-पितु-मातु-स्वामि-हित-बानी ।
सुनि मन मुदित करिय भलि जानी ।
उचित कि अनुचित किये बिचारू ।
धरम जाइ सिर पातकभारू ।

तो म्हणाला, “ गुरुमहाराजांनीं मला उपदेश केला तो ठीकच आहे, आणि प्रजा, सचिव वगैरे प्रत्येकाची त्यास संमतिहि आहे. मातेनेंहि ज्याअर्थी तीच आज्ञा योग्य म्हणून केली आहे, त्याअर्थी ती मीं शिरसामान्य करून अगत्य पाळली पाहिजे. कारण माता, पिता, गुरु आणि स्वामी यांची हितकर वाणी ऐकल्यावर तींतच आपलें कल्याण आहे असें समजून मला ती उल्हासपूर्वक अंमलांत आणली पाहिजे. योग्य अयोग्य हा विचार मनांत आणल्यास धर्माचा लोप होऊन शिवाय मस्तकावर पापाचे डोंगर लादले जातील.

तुम्ह तउ देहु सरल सिख सोई ।
जो आचरत मोर भल होई ।
जद्यपि यह समुझत हउँ नीके ।
तदपि होत परितोषु न जी के ।

आपण तर मला असा सरळ उपदेश केला आहे कीं, त्याप्रमाणें वर्तन केलें असतां माझें कल्याणच होईल. ही गोष्ट जरी मी पुरतेपणीं ओळखून आहें तरीदेखील माझ्या जीवास निश्चितपणा वाटत नाहीं.

अब तुम्ह बिनय मोरि सुनि लेहू।
मोहि अनुहरत सिखावन देहू।
उत्तर देउँ छमब अपराधू।
दुखित–दोष–गुन गनहिं न साधू।

आतां आपण माझी विनंति ऐकून घ्यावी आणि मला योग्य तो उपदेश करावा. मी आपणास प्रत्युत्तर देत आहे या अपराधाबद्दल मला क्षमा असावी. दुःखितांचे गुणदोष हे सज्जन मनावरच घेत नसतात.

**दो०–पितु सुरपुर सिय राम बन करन कहहु मोहि राज। एहि ते जानहु मोर हित कै आपन बड काज॥ १७१॥**

महाराज स्वर्गवासी झाले असून सीताराम वनांत गेले आहेत. असें असूनहि, ज्याअर्थी आपण मला राज्य करण्यास सांगत आहांत त्याअर्थी त्यांत आपण माझेंच हित समजत आहांत, किंवा आपण आपलेंच एक मोठें कार्य उरकून घेत आहांत!

चौ०–हित हमार सिय–पति–सेवकाई।
सो हरि लीन्ह मातुकुटिलाई।
मैं अनुमानि दीखि मन माहीं।
आन उपाय मोर हित नाहीं।

माझें हित म्हटलें तर एक सीतापतीची सेवा करण्यांतच आहे, आणि तीस तर मातेच्या कौटिल्यानें मी अंतरलों. मी मनांत पुष्कळ विचार करून पाहिलें; परंतु माझ्या कल्याणाचा इतर कोणताहि मार्ग मला आढळत नाहीं.

सोकसमाज राज केहि लेखे।
लषन-राम-सिय पद बिनु देखे।
बादि बसन बिनु भूषन भारू।
बादि बिरति बिनु ब्रह्मबिचारू।
सरुज सरीर बादि बहु भोगा।
बिनु हरिभगति जाय जप जोगा।
जाय जीव बिनु देह सुहाई।
बादि मोर सब बिनु रघुराई।

सीता, राम, लक्ष्मण यांच्या चरणदर्शनाखेरीज, दुःखाचें केवळ आगर अशा ह्या राज्याची मला क्षितिच नाहीं. वस्त्रविरहित अलंकार आणि वैराग्यविरहित ब्रह्मज्ञान हे केवळ फोल होत. रोगग्रस्त शरीरास अनेक भोगविलास निरर्थक होत. भगवंताच्या भक्तीखेरीज जपयोगादिक शून्यच होत. सुंदर देह असला तरी प्राणविरहित तो वायाच जाणार, ह्याप्रमाणें रघुरायाखेरीज माझें सर्वच व्यर्थ आहे.

जाउँ राम पहिं आयसु देहू।
एकहि आँक मोर हित एहू।
मोहि नृप करि भल आपन चहहू।
सोउ सनेह जडतावस कहहू।

आतां रामासन्निध जाण्याची मला आज्ञा असावी. मी निश्चयानें एकच गोष्ट सांगतों की, ह्यांतच माझें हित आहे. मला राजा करून आपण आपल्या बऱ्याचें जें धोरण बांधलें आहे तें आपण प्रेम आणि अज्ञान याला वश होऊनच केलें आहे.

**दो०–कैकेइसुअन कुटिल मति रामबिमुख गतलाज। तुम्ह चाहत सुख मोहवस मोहि से अधम के राज॥ १७२॥**

कैकेयीचा मुलगा, कुटिलबुद्धि, रामद्रोही आणि निर्लज्ज असाच असावयाचा; त्या मजसारख्या अधमाच्या राज्यांत तुम्हीं सुखाची वाञ्छा धरणें म्हणजे निव्वळ भ्रमच होय.

चौ०–कहउँ साँच सब सुनि पतियाहू।
चाहिय धरमसील नरनाहू।
मोहि राज हठि देइहहु जबहीं।
रसा रसातल जाइहि तबहीं।
मोहि समान को पापनिवासू।
जेहि लगि सीयराम बनवासू।

मी यथार्थ बोलतों त्यावर आपण सर्वांनीं विश्वास ठेवावा कीं, राजा धर्मशीलच असला पाहिजे. हें राज्य मजवर बळजबरीनें लादतांक्षणीं ही पृथ्वी रसातळाला गेली पाहिजे. ज्याच्या प्रीत्यर्थ सीतारामांस रानोमाळ हिंडावें लागत आहे त्या माझ्यासारखा पापी आहे तरी कोण?

राय राम कहँ कानन दीन्हा।
बिछुरत गमन अमरपुर कीन्हा।
मैं सठ सब अनरथ कर हेतू।
बैठ बात सब सुनउँ सचेतू।
बिनु रघुबीर बिलोकिय बासू।
रहे प्रान सहि जग उपहाँसू।

महाराजांनीं रामाला वनवास दिला, परंतु त्याचा वियोग होतांक्षणींच त्यांनीं स्वर्गाचा मार्ग धरिला; आणि सर्व अनर्थाला कारण असा मी शठ सर्व गोष्टी

जीवंत राहूनच ऐकत आहे. हें मंदिर रामशून्य पाहून देखील जगाची निंदा सहन करीत माझे प्राण जगतच आहेत.

राम पुनीत विषयरस रूखे।
लोलुप भूमिभोग के भूखे।
कहँ लगि कहउँ हृदयकठिनाई।
निदरि कुलिसु जेहि लही बडाई।

पुण्यात्मा राम हा तर विषयरसापासून अलिप्तच आहे. जे लोलुप असतात तेच ऐहिक भोगाचे बुभुक्षित असतात. ह्या माझ्या हृदयाचें काठिण्य मीं कोठवर वर्णन करावें ? ह्यानें तर वज्रास देखील मागें सारून आपली महती गाजविली आहे !

**दो०—कारन तें कारज कठिन होइ दोस नहि मोर। कुलिस अस्थि तें उपल तें लोह कराल कठोर ॥ १७३ ॥**

हा तरी माझा दोष नव्हेच. कारण कारणापेक्षां कार्यात सत्त्वांश जास्तच असावयाचा. (उदाहरणार्थ, दधीचि ऋषींच्या) अस्थींपेक्षां वज्र, आणि पाषाणापेक्षां तज्जन्य लोह हीं अतिशय कठोरच असतात.

चौ०—कैकेईभव तनु अनुरागे।
पावँर प्रान अघाइ अभागे।
जौं प्रियबिरह प्रान प्रिय लागे।
देखब सुनब बहुत अब लागे।

माझे हे अभागी पामर प्राण कैकेयीच्या गर्भात उत्पन्न झाल्याचीच तृप्ति मानतात आणि म्हणूनच ते ह्या त्याच्या सहोदर देहावर अत्यासक्त झाले आहेत. आणि ज्या अर्थी माझ्या ह्या प्राणांना सर्वप्रिय रामचंद्राचा विरह अभीष्ट वाटत आहे, त्या अर्थी आतां त्याजसंबंधानें आपल्या पाहण्यांत व ऐकण्यांत पुष्कळसेंच येईल.

लषन—राम—सिय कहँ बन दीन्हा।
पठइ अमरपुर पतिहित कीन्हा।
लीन्ह बिधवपन अपजसु आपू।
दीन्हेउ प्रजहिँ सोकु संतापू।
मोहि दीन्ह सुख सुजस सुराजू।
कीन्ह कैकई सब कर काजू।

सीता, राम आणि लक्ष्मण यांस वनवासांत धाडलें, पतीला स्वर्गी पाठवून त्याचें कल्याण केलें, स्वतः वैधव्य आणि अपयश पत्करिलें, प्रजेस हाल-अपेष्टांची जोड करून दिली, माझ्याहि पदरांत सुख, सत्कीर्ति आणि सुराज्य घातलें, एकंदरींत कैकेयीनें सर्वांचीच संभावना केली !

एहि तें मोर काह अब नीका।
तेहि पर देन कहहु तुम्ह टीका।
कैकईजठर जनमि जग माहीँ।
यह मो कहँ कछु अनुचित नाहीँ।
मोरि बात सब बिधिहि बनाई।
प्रजा पाँच कत करहु सहाई।

ह्यापेक्षां आतां माझें बस्तान बसावयाचें तें कोणतें ? ह्याउपरहि आपण मला राज्य देऊं म्हणत आहांत. एवंच कैकेयीच्या कुशींतून मी जन्मास आलों हें माझ्या संबंधानें तरी बिलकुल अयोग्य नव्हे. परमेश्वरानेंच माझी एकंदर घडी जुळवून ठेविली आहे. तुम्ही लोकप्रतिनिधी माझा पक्ष आणखी तो काय उचलून धरणार ?

**दो०—ग्रहग्रहीत पुनि बातबस तेहि पुनि बीछी मार। ताहि पियाइय बारुनी कहहु कवन उपचार ॥ १७४ ॥**

आधींच ग्रहाचे फेऱ्यांत आलेला, त्यांत उन्मत्त वायूनें पछाडलेला, त्यांतूनहि विंचवानें दंश केलेला, अशाला आणखी मादिरा पाजली, मग सांगा पाहूं आणखी उपचार तो काय उरला ?

चौ०—कैकइसुअन जोग जग जोई।
चतुर बिरंचि दीन्ह मोहि सोई।
दसरथतनय राम—लघु—भाई।
दीन्हि मोहि बिधि बादि बडाई।

कैकेयीस शोभेल अशा पुत्राचे ठिकाणीं चतुर ब्रह्मदेवानें माझी योजना केली. परंतु दशरथाचा पुत्र आणि रामाचा कनिष्ठ बंधु हा मान मात्र मला त्यानें व्यर्थ दिला.

तुम्ह सब कहहु कढावन टीका।
रायरजायसु सब कहँ नीका।
उतरु देउँ केहि बिधि केहि केही।
कहहु सुखेन जथा रुचि जेही।
मोहि कु—मातु—समेत—बिहाई।
कहहु कहिहि के कीन्हि भलाई।

(मला राज्याभिषेक व्हावा म्हणून मीच रामवनवासाचा घाट घातला ही लोकशंका गृहीत धरून भरत म्हणाला,) आतां मी स्वतःस राज्याभिषेक

करून घ्यावा अशी राजाज्ञा असून तीच सर्वांस श्रेयस्कर आहे असें आपलें म्हणणें आहे. आपण तसें खुशाल म्हणत रहा. मी कशा कशा रीतीनें आणि कोणा कोणापाशीं विवाद करीत बसूं? आपण एकदांचें तें बोलून टाकलें हें मात्र ठीक केलें. कारण माझी कुटिल माता आणि मी यांखेरीज असलें सत्कृत्य करणारा तरी कोण आहे? हें आपणच सांगा.

मो बिनु को सचराचर माहीँ।
जेहि सियराम प्रानप्रिय नाहीँ।
परमहानि सब कहँ बड लाहू।
अदिन मोर नहिँ दूषन काहू।
संसय सील प्रेम बस अहहू।
सबइ उचित सब जो कछु कहहू।

ज्यास सीताराम प्रिय नाहींत असा मजसारखा ह्या चराचर विश्वांत इतर कोण असेल? (रामवनवासासारखी) आपली परम हानि झाली असतां देखील मला मोठाच लाभ झाला आहे असा आपल्याला संशय आलाच असेल; परंतु आपण मजवर प्रेम करणारे आहांत म्हणूनच आपण जे (राज्याभिषेकासंबंधानें) म्हणत आहां तें सर्वतोपरी उचितच आहे. ह्यांत आपला कोणाचाहि दोष नाहीं. माझीच दिनचर्या अशी पालटली आहे.

**दो०—राममातु सुठि सरलचित मो पर प्रेम बिसेखि। कहइ सुभाय सनेहबस मोरि दीनता देखि ॥ १७५ ॥**

(कौसल्येस वरीलप्रमाणें शंका नाहीं, परंतु तिचेंहि अनुमोदन सर्वांच्या म्हणण्यास मिळालें; कारण कीं,) कौसल्या ही तर पराकाष्ठेची भोळी असून तिचें मजवरच विशेष प्रेम असल्यामुळें, माझी दीनता पाहून ती सहजच प्रेमानें तसें बोलून गेली.

चौ०—गुरु बिबेकसागर जग जाना।
जिन्हहिँ बिस्व कर–बदर–समाना।
मो कहँ तिलकसाज सज सोऊ।
भये बिधिबिमुख बिमुख सब कोऊ।

आमचे श्रीगुरु वसिष्ठ—ज्यांना हें विश्व तळहातावरील बोराप्रमाणें आहे, ते तर भुवनविख्यात असे विवेकाचे सागरच आहेत. परंतु (त्यांना माझी वस्तुस्थिति माहीत असतांहि) तेदेखील मलाच राज्यतिलक लावण्यास सिद्ध झाले आहेत. एवंच प्राक्तन विपरीत झालें कीं सर्वचजण विपरीत होतात.

परिहरि रामसीय जग माहीँ।
कोउ न कहिहि मोर मत नाहीँ।
सो मैं सुनब सहब सुख मानी।
अंतहु कीँच तहाँ जहँ पानी।

सीतारामचंद्रखेरीज करून यांत माझें अंग नाहीं असें ह्या जगांत तर कोणी म्हणणारा नाहीं. तथापि त्यांचें तें म्हणणें मी ऐकेन आणि आनंदानें सहन करीन. अखेर मात्र जेथें पाणी सांचेल तेथेंच चिखल होतो (हें जगाच्या निदर्शनास येईलच).

डर न मोहि जग कहहि कि पोचू।
परलोकहु कर नाहिँ न सोचू।
एकइ उर बस दुसह दवारी।
मोहि लगि भे सियराम दुखारी।

जग मला अधम म्हणेल त्याची मला मुळींच भीति नाहीं. परलोकाची फिकीर तर मला अगदींच नाहीं. मजप्रीत्यर्थ सीताराम दुःख भोगीत आहेत हीच एक आग माझ्या अंतःकरणांत अनिवार भडकली आहे.

जीवनलाहु लषन भल पावा।
सब तजि रामचरन मन लावा।
मोर जनम रघुबरबन लागी।
झूट काह पछिताउँ अभागी।

सर्वसंग परित्याग करून आणि रामचरणींच चित्त संलग्न करून लक्ष्मणानेंच खरें खरें जन्माचें साफल्य केलें. माझा जन्मच जर रघुनाथाच्या वनवासाकरितां आहे तर म्यां अभाग्यानें लटकेंच दुःख दाखवून उपयोग काय?

**दो०—आपनि दारुन दीनता कहउँ सबहिँ सिर नाइ। देखे बिनु रघु-नाथ-पद जिय कै जरनि न जाइ ॥ १७६ ॥**

मी सर्वांचे पुढें आपलें मस्तक नमवून आपले हृदयांत वसत असलेलें दारुण दुःख सांगतों कीं, रघुनाथपददर्शनावांचून माझ्या जीवाची तळमळ नाहींशी व्हावयाची नाहीं.

चौ०—आन उपाउ मोहि नहिँ सूझा।
को जिय कै रघुबर बिनु बूझा।
एकहि आँक इहइ मन माहीँ।
प्रातकाल चलिहउँ प्रभु पाहीँ।

इतर उपायच मला सुचत नाहींत. माझें अंतरंग

रघुनाथाखेरजि कोण जाणणार? आतां मनांत अखेरचा एकच हेतु आहे, तो हा कीं, उदयिक उजाडतांच प्रभूंच्या दर्शनार्थ जाण्यास निघावें.

जद्यपि मैं अनभल अपराधी।
भइ मोहि कारन सकलउपाधी।
तदपि सरन सनमुख मोहि देखी।
छमि सब करिहहिं कृपा बिसेखी।
सील सकुचि सुठि सरल सुहाऊ।
कृपा–सनेह–सदन रघुराऊ।
अरिहु क अनभल कीन्ह न रामा।
मैं सिसु सेवक जद्यपि बामा।

जरी मी दुष्ट अपराधी आहे आणि मजसाठींच हे सर्व उत्पात झाले आहेत तथापि मला समोर शरणागत पाहून प्रभु माझ्या अपराधांची क्षमा करून मजवर विशेषच कृपा करतील. कारण रघुराज अत्यंत सुशील, भिडस्त आणि सरळ असून दया आणि माया यांचें आगरच होत. रामांनीं प्रत्यक्ष वैऱ्याचें देखील वाईट केलेलें नाहीं. मग मी जरी प्रतिकूल असलों तरी त्यांचाच बालक आणि सेवक आहे.

तुम्ह पै पाँच मोर भल मानी।
आयसु आसिष देहु सुबानी।
जेहि सुनि बिनय मोहि जनु जानी।
आवहिं बहुरि राम रजधानी।

तुम्हासारख्या संमान्य मंडळींनीं माझें हित समजून मला प्रेमळ शब्दांनीं आज्ञा द्यावी आणि असा आशीर्वाद द्यावा कीं, माझी विनंति ऐकून राम मला आपला दास समजतील आणि अयोध्येस परत येतील.

**दो०–जद्यपि जनम कुमातु तें मैं सठ सदा सदोस। आपन जानि न त्यागिहहिं मोहि रघु–बीर–भरोस ॥ १७७ ॥**

यद्यपि कुमातेच्या पोटीं जन्मलेला मीं शठ निरंतरच दोषी आहे, तथापि रघुवीरांचा मला भरंवसा आहे कीं, ते मला आपला समजून दूर लोटणार नाहींत. ”

चौ०–भरत बचन सब कहँ प्रिय लागे।
राम–सनेह–सुधा जनु पागे।
लोग बियोग–बिषम–बिष दागे।
मंत्र सबीज सुनत जनु जागे।

रामाच्या प्रेमामृतानें ओथंबलेलें असें तें भरताचें भाषण सर्वांसच प्रिय वाटलें. वियोगरूप जाज्वल्य विषानें दग्ध झालेली मंडळी सबीज मंत्राप्रमाणें तें भाषण श्रवण करितांच पुनरुज्जीवित झाली.

मातु सचिव गुरु पुर–नर–नारी।
सकल सनेह बिकल भये भारी।
भरतहिं कहहिं सराहि सराही।
राम–प्रेम–मूरति–तनु आही।
तात भरत अस काहे न कहहू।
प्रानसमान रामप्रिय अहहू।

माता, सचिव, गुरु व अयोध्येतील स्त्रीपुरुष इत्यादि सर्व मंडळी प्रेमानें अतिशय विव्हल झाली. ते सर्व भरताची प्रशंसा करून म्हणूं लागले कीं “ रामभक्तीची ही प्रत्यक्ष मूर्तीच आहे. बा भरता, तुझे उद्गार असें कां न निघतील ! रामास तर तूं प्राणाप्रमाणें प्रिय आहेस.

जो पावँरु अपनी जडताई।
तुम्हहिं सुगाइ मातुकुटिलाई।
सो सठ कोटिक–पुरुष–समेता।
बसहिं कलपसत नरकनिकेता।
अहि-अघ-अवगुन नहिं मनि गहई।
हरइ गरल दुख दारिद दहई।

जो पामर स्वतःच्या मूर्खपणानें कैकेयीचें कौटिल्य तुझ्यावर आरोपित करील तो शठ आपल्या कोट्यवधि पूर्वजांसह शतावधि कल्पपर्यंत नरकवासांत पचत राहील. सर्पाचें पाप आणि दुर्गुण त्याचा ( शिरोभागीं असणारा ) मणि ग्रहण करीत नाहीं. ( उलट ) तो विष हरण करतो आणि दुःख आणि दारिद्र्य यांस दग्ध करतो.

**दो०–अवसि चलिय बन राम जहँ भरत मंत्र भल कीन्ह। सोकसिंधु बूडत सबहिं तुम्ह अवलंबनु दीन्ह ॥ १७८ ॥**

भरता ! रामाकडे वनांत अवश्य चलावें. आपण फार उत्कृष्ट सल्ला दिली. शोकसमुद्रांत बुडणाऱ्या आम्हां सर्वांना आपणच आधार दिला. ”

चौ०–भा सब के मन मोद न थोरा।
जनु घनधुनि सुनि चातक मोरा।
चलत प्रात लखि निरनउ नीके।
भरत प्रानप्रिय भे सबही के।

हें ऐकून मेघगर्जना ऐकणाऱ्या चातकाप्रमाणें अथवा मयूराप्रमाणें सर्वांच्याच मनांत अतिशय आनंद झाला. उद्यां गर्गमुहूर्तावर प्रयाण करण्याचें निश्चित झालेलें ऐकतांच भरत सर्वांच्याच आदरास पात्र झाला.

मुनिहिँ बंदि भारतहिँ सिर नाई।
चले सकल घर बिदा कराई।
धन्य भरत जीवन जग माहीँ।
सील सनेह सराहत जाहीँ
कहहिँ परसपर भा बड काजू।
सकल चलइ कर साजहिँ साजू।

वसिष्ठ मुनीस वंदन करून आणि भरतास नमस्कार करून उभयतांचाहि निरोप घेतल्यावर मंडळी घरोघरीं परत जात असतां भरताचें शील आणि स्नेह वाखाणीत होती. ते आपापसांत म्हणत कीं, भरताचेंच जीवित धन्य होय. आज मोठेंच कार्य झालें. ( घरीं पोंचतांच ) सर्व मंडळी बरोबर जाण्याच्या तयारीला लागली.

जेहि राखहिँ रहु घररखवारी।
सो जानइ जनु गरदनि मारी।
कोउ कह रहन कहिय नहिँ काहू।
को न चहइ जग जीवनलाहू।

घरांत राखण राहण्यास ज्या कोणास ठेवीत तो समजे कीं, जणूं काय त्यास फांशींच चढविलें आहे. कोणी म्हणत कीं, कोणालाच राहण्यास सांगूं नये, कारण जगांत जन्मलाभ कोणास नकोसा आहे?

**दो०—जरउ सो संपति सदनसुख सुहृद मातु पितु भाइ। सनमुख होत जो रामपद करइ न सहज सहाइ॥ १७९॥**

जे श्रीरामचरण सन्मुख होत असतां उल्हसित मनानें ( त्या कार्मी ) सहाय्य करीत नाहींत, त्या संपत्तीस, गृहसुखास, मित्रास, मातेस, पित्यास आणि बंधूस आग लागो !

चौ०—घर घर साजहिँ बाहन नाना।
हरष हृदय परभात पयाना।

घरोघरीं अनेक वाहनें सिद्ध होऊं लागलीं. ( लागलीच उद्यां ) सकाळींच चालूं लागावयाचें म्हणून सर्वांच्या मनांत आनंद झाला.

भरत जाइ घर कीन्ह बिचारू।
नगर बाजि गज भवन भँडारू।
संपति सब रघुपति कै आही।
जौँ बिनु जतन चलउँ तजि ताही।
तौ परिनाम न मोरि भलाई।
पापासिरोमनि साइँदोहाई।
करइ स्वामिहित सेवक सोई।
दूषन कोटि देइ किन कोई।

इकडे भरतानें आपल्या मंदिरांत जाऊन विचार केला कीं, नगर, घोडे, हत्ती, राजवाडे, भांडार वगैरे सर्व संपत्ति रघुपतींची आहे. तिची व्यवस्था न लावितां जर तशीच टाकून गेलों, तर मात्र माझा परिणाम शुद्ध न होऊन मी पापशिरोमणि आणि स्वामिद्रोही ठरेन. कोणी कोट्यवधि दूषणें ठेवलीं तरी बेहेत्तर, परंतु जो आपल्या धन्याचें हितच करील तोच खरा सेवक होय.

अस बिचारि सुचि सेवक बोले।
जे सपनेहुँ निजधरम न डोले।
कहि सब मरम धरम सब भाखा।
जो जेहि लायक सो तहँ राखा।
करि सब जतन राखि रखवारे।
राममातु पहिँ भरत सिधारे।

असा विचार करून भरतानें जे स्वप्नांतदेखील स्वकर्तव्यापासून पराङ्मुख व्हावयाचे नाहींत असे प्रामाणिक नोकर बोलाविले व त्यांना त्यांचें इतिकर्तव्य समजावून त्यांतील मर्महि सांगितलें, आणि त्यांच्यापैकीं जो ज्या कामाला लायक होता त्यास त्याच कामावर नेमिलें. अशी सर्व व्यवस्था करून आणि चौक्या-पहारे ठेवून भरत कौसल्येकडे जाण्यास निघाला.

**दो०—आरत जननी जानि सब भरत सनेहसुजान। कहेउ बनावन पालकी सजन सुखासन जान॥ १८०॥**

प्रेमचतुर भरतानें सर्व माता शोकानें क्षीण झाल्या आहेत असें जाणून पालख्या आणि सुखानें बसतां येण्याजोगी अशी यानें सज्ज करण्यास आज्ञा केली.

चौ०—चक्क चाकि जिमि पुर-नर-नारी।
चहत प्रात उर आरत भारी।
जागत सब निसि भयउ बिहाना।
भरत बोलाये सचिव सुजाना।
कहेउ लेहु सब तिलकसमाजू।
बनहिँ देब मुनि रामहिँ राजू।

बेगि चलहु सुनि सचिव जोहारे ।
तुरत तुरग रथ नाग सँवारे ।

नगरांतील स्त्रीपुरुष चक्रवाकमिथुनाप्रमाणें अत्यंत आतुरतेनें उजाडण्याची वाट पाहत राहिले. त्यांनीं ती सर्व रात्र जागून काढली. शेवटीं एकदांचें उजाडलें. भरतानें सुज्ञ सचिवांस बोलावून आज्ञा दिली कीं, "अभिषेकाची सर्व सामग्री बरोबरच असूं द्या. वनांतच गुरुमहाराज रामास राज्याभिषेक करितील. चला, त्वरा करा." तें ऐकतांच सचिवांनीं वंदन केलें आणि लागलीच हत्ती, घोडे, रथ वगैरेंची सिद्धता केली.

अरुंधती अरु अगिनिसमाजू ।
रथ चढि चले प्रथम मुनिराजू ।
बिप्रबृंद चढि बाहन नाना ।
चले सकल तप-तेज-निधाना ।
नगर लोग सब सजि सजि जाना ।
चित्रकूट कहँ कीन्ह पयाना ।
सिबिका सुभग न जाहिँ बखानी ।
चढि चढि चलत भईँ सब रानी ।

अरुंधती आणि अग्निहोत्र ह्यांना रथांत घेऊन वसिष्ठ सर्वांच्या पुढें निघाले. मागून सर्व तपस्तेज-निधान विप्रवृंद अनेक वाहनांवर बसून निघाले. नगरांतील सर्वहि लोक निरनिराळ्या वाहनांत बसून चित्रकूटाकडे जाण्यास निघाले. अवर्णनीय अशा सुंदर शिबिकेंत बसून सर्व राण्याहि निघाल्या.

**दो०-सौँपि नगर सुचि सेवकन सादर सबहिँ चलाइ । सुमिरि राम-सीय-चरन तब चले भरत दोउ भाइ ॥ १८१ ॥**

विश्वासू नोकरांवर नगर सोंपवून आणि सर्वांस आदरपूर्वक पुढें घालून, भरत आणि शत्रुघ्न सीताराम-चरणांचें स्मरण करीत मागाहून चालूं लागले.

चौ०-राम-दरस-बस सब नरनारी ।
जनु करि करिनि चले तकि बारी ।

रामदर्शनोत्सुक झालेले सर्व स्त्रीपुरुष, हत्तीचें जोडपें जलाशय पाहून जसें चालूं लागतें तसें चालूं लागले.

बन सिय राम समुझि मन माहीँ ।
सानुज भरत पयादेहि जाहीँ ।
देखि सनेह लोग अनुरागे ।
उतरि चले हय गय रथ त्यागे ।

लक्ष्मणासहवर्तमान रामचंद्र आणि जानकी वनांत पायींच हिंडताहेत हें मनांत आणून भरत अनवाणीच निघाला. त्याचें प्रेम पाहून लोकांनाहि प्रेम दाटून येऊं लागलें आणि तेहि आपापल्या हत्ती, घोडे, रथ इत्यादि वाहनांचा त्याग करून चालूं लागले.

जाइ समीप राखि निजडोली ।
राममातु मृदुबानी बोली ।
तात चढहु रथ बलि महतारी ।
होइहि प्रिय परिवारु दुखारी ।
तुम्हरे चलत चलिहि सब लोगू ।
सकल सोक कृस नहिँ मग जोगू ।

हें पाहून जवळ जाऊन आणि आपला मेणा थोपवून कौसल्या मृदु वाणीनें म्हणालीः—"बा भरता ! तुजवरून हा जीव ओंवाळून टाकावा. रथांत बैस. हा तुझा प्रिय परिवार कष्टी होत आहे. तूं पायीं चाललास म्हणजे सर्व लोक देखील तसेंच चालणार. परंतु हे अवघेच शोकानें कृश झाल्यामुळें (पायीं) मजल करण्यासारखे नाहींत."

सिर धरि बचन चरन सिरु नाई ।
रथ चढि चलत भये दोउ भाई ।
तमसा प्रथमदिवस करि बासू ।
दूसर गोमतितीर निवासू ।

नंतर मातेची आज्ञा शिरसावंद्य करून आणि तिच्या चरणीं मस्तक ठेवून दोघेहि बंधू रथांत बसून पुढें चालले. पहिल्या दिवशीं तमसातीरावर मुक्काम पडला. दुसरा मुक्काम गोमतीतीरावर झाला.

**दो०-पय अहार फल असन एक निसि भोजन एक लोग । करत रामहित नेम ब्रत परिहरि भूषन भोग ॥ १८२ ॥**

रामचंद्राप्रीत्यर्थ लोक भोगभूषणांचा त्याग करून कोणी दुग्धप्राशन तर कोणी फलाहार, कोणी नक्तव्रत इत्यादि नियमव्रतें पाळूं लागले.

चौ०-सई तीर बसि चले बिहाने ।
सिंगबेरपुर सब नियराने ।
समाचार सब सुने निषादा ।
हृदय बिचार करइ सबिषादा ।

तेथून शरयूतीरावर तळ देऊन आणि सकाळींच

कूच करून सर्व मंडळी शृंगवेरपुरानजीक आली. तें साकल्य वर्तमान गुहास समजतांच अतिशय दुःखी होऊन तो मनाशीं विचार करूं लागला कीं,

कारन कवन भरत बन जाहीँ।
है कछु कपटभाउ मन माहीँ।
जौँ पै जिय न होति कुटिलाई।
तौ कत लीन्ह संग कटकाई।

"भरतास वनांत जाण्याचें कारण काय बरें असावें? अंतर्यामीं कांहींतरी काळें बेरें असलेंच पाहिजे. त्याच्या मनांत खरोखरच जर कपट नसतें तर बरोबर हें लावलष्कर घेतलें तें काय म्हणून?

जानहिँ सानुज रामहिँ मारी।
करउँ अकंटक राज सुखारी।
भरत न राजनीति उर आनी।
तब कलंक अब जीवनहानी।

त्यास वाटत असेल कीं, लक्ष्मणासकट रामास मारून निष्कंटक राज्याचा आपण सुखानें उपभोग घ्यावा. परंतु भरतानें राजनीति ध्यानांतच आणली नाहीं. तेव्हां नुसत्या अपयशावर भागलें; परंतु आतां मात्र प्रश्न प्राणाचाच आहे. (प्राणाशींच गांठ पडणार आहे.)

सकल–सुरासुर जुरहिँ जुझारा।
रामहिँ समर न जीतनिहारा।
का आचरज भरत अस करहीँ
नहिँ विषबेलि अमियफल फरहीँ।

झाडून सर्व सुरासुर जरी जुळले आणि झुंजूं लागले तरीदेखील ते रामास युद्धांत जिंकूं शकणार नाहींत. भरत असें करील यांत काय नवल? विषवेलीला अमृताचीं फळें येतील काय?

**दो०–अस बिचारि गुह ज्ञाति सन कहेउ सजग सब होहु। हथबाँसहु बोरहु तरनि कीजिय घाटारोहु ॥ १८३ ॥**

असा विचार करून गुहानें आपल्या ज्ञातीस हुकूम फरमाविला कीं, "सर्वजण सज्ज असा, वल्ह्यासकट नावा बुडवून टाका आणि घाट रोखून धरा.

चौ०–होहु सँजोइल रोकहु घाटा।
ठाटहु सकल मरइ के ठाटा।
सनमुख लोह भरत सन लेऊँ।
जियत न सुरसरि उतरन देऊँ।

सर्वजण सावध रहा, घाट अडवून धरा व मरण्याच्या तयारीनें असा. हत्यारें सज्ज करून भरताशीं आपण सामना करूं आणि जीवांत जीव असेपर्यंत त्यास आपण गंगा ओलांडूं देणार नाहीं.

समर मरन पुनि सुर–सरि–तीरा।
रामकाज छनभंगु सरीरा।
भरत भाइ नृप मैँ जन नीचू।
बडे भाग असि पाइय मीचू।

युद्धांत मरण, तेंहि फिरून गंगातटाकीं, रामाचें कार्य, क्षणभंगुर शरीर, रामबंधु राजा भरत आणि मी यःकश्चित् ज्ञातिहीन मनुष्य, असल्या मरणाचा योगायोग महद्भाग्यानेंच प्राप्त झाला आहे.

स्वामिकाज करिहउँ रन रारी।
जस धवलिहउँ भुवन दस चारी।
तजउँ प्रान रघु–नाथ–निहोरे।
दुहूँ हाथ मुदमोदक मोरे।

स्वामिकार्यासाठीं रणांत धुमश्चक्री माजवून आणि चतुर्दश भुवनें आपल्या यशानें दुमदुमून सोडून हे प्राण मी राघवाप्रीत्यर्थ खर्ची घालणार. माझ्या दोन्ही हातीं आनंदाचे मोदकच येणार. (मेल्यास सद्गति आणि जगल्यास रामसेवायश–दोन्ही पक्षीं श्रेयस्कर).

साधुसमाज न जा कर लेखा।
राम भगत महँ जासु न रेखा।
जाय जियत जग सो महिभारू।
जननी–जौबन–बिटप कुठारू।

साधुसमाजांत ज्याची गणती नाहीं आणि रामभक्तांत जो मोडला जात नाहीं तो जगांत जन्मून जिवंत राहिल्यास पृथ्वीस केवळ भारभूतच होय. तो आपल्या मातेच्या यौवनरूपी वृक्षास कुठारभूतच होय."

**दो०–बिगतबिषाद निषादपति सबहिँ बढाइ उछाह। सुमिरि राम माँगेउ तुरत तरकस धनुष सनाह ॥ १८४ ॥**

आपल्या उद्विग्नतेस फाटा देऊन निषादपति गुहानें सर्वांचा उत्साह वाढविला आणि रामस्मरण करून तावडतोब भाते, तीरकमठा, आणि चिलखत (स्वतः करितां) मागविले.

चौ०—बेगहि भाइहु सजहु सँजोऊ।
सुनि रजाइ कदराइ न कोऊ।
भलेहि नाथ सब कहहिँ सहरषा।
एकहिँ एक बढावहिँ करषा।
चले निषाद जोहारि जोहारी।
सूर सकल रन रूचइ रारी।

नंतर तो म्हणाला, " मित्रहो, झटपट तयार व्हा. माझा हा हुकूम ऐकून कोणीही कच खाऊं नका, " तेव्हां सर्वजण ' ठीक आहे, धनीसाहेब ! ' असें मोठ्या आनंदानें म्हणून एकमेकांची ईर्षा वाढवूं लागले. शूरच ते सर्व; त्यांना युद्धांत झुंजण्याची हौस वाटून ते गुहास मुजरे करून निघाले.

सुमिरि राम-पद-पंकज-पनही।
भाथा बाँधि चढाइन्हि धनुही।
अँगरी पहिरि कूंडि सिर धरहीँ।
फरसा बाँस सेल सम करहीँ।
एक कुसल अति ओडन खाँडे।
कूदहिँ गगन मनहुँ छिति छाँडे।

रामाच्या पदकमलपादुकांचें स्मरण करून त्यांनीं भाते बांधले, तीरकमठे चढविले, चिलखतें घातलीं, डोक्यावर ( पोलादी ) शिरस्त्राणें ठेवलीं व परशु, भाले, बरच्या वगैरे सर्व हत्यारांची सिद्धता केली. कोणी तरवारीच्या फेंकींत फारच तरबेज होते ते आकाशांत इतकें उंच उड्डाण घेत असत कीं, पाहणारास त्यांनीं ही पृथ्वी कायमचीच सोडली असें वाटे !

निज निज साज समाज बनाई।
गुहराउतहिँ जोहारे जाई।
देखि सुभट सब लायक जाने।
लेइ लेइ नाम सकल सनमाने।

ते आपापल्या टोळ्या बनवून आणि त्यांची तयारी करून गुहसेनापतीच्या सलामीसाठीं गेले. निषादानें ते सर्व लढवय्ये योद्धे तपासून घेतले आणि लायकी-प्रमाणें त्या सर्वांचीं नांवें घेऊन घेऊन गौरव केला.

**दो०—भाइहु लावहु धोख जनि आजु काज बड मोहि। सुनि सरोष बोले सुभट वीर अधीर न होहिँ ॥ १८५ ॥**

गुह म्हणाला, "मित्र हो ! धोका मात्र देऊं नका. आजचें माझें काम फारच महत्त्वाचें आहे. " तें ऐकून ते वीरहि त्वेषानें म्हणालेः—हे वीरा! तूं इतका अधीर होऊं नकोस.

चौ०—रामप्रताप नाथ बल तोरे।
करहिँ कटकु बिनु भट बिनु घोरे।
जीवत पाउ न पाछे धरहीँ।
रुंड-मुंड-मय-मेदिनि करहीँ।

धनीसाहेब ! रामाच्या प्रतापानें आणि आपल्या बलानें शत्रूच्या सैन्यांत एक घोडा अगर एक शिपाई देखील राहूं देणार नाहीं. जीवांत जीव आहे तोंपर्यंत आम्ही आपलें पाऊल माघारीं घेणार नाहीं. ही पृथ्वी रुंडमुंडमय करून टाकूं. "

दीख निषादनाथ भल टोलू।
कहेउ बजाउ जुझाऊ ढोलू।
एतना कहत छीक भइ बाये।
कहेउ सगुनिअन्ह खेत सुहाये।

गुहसेनापतीनें सैन्य जय्यत पाहून हुकूम दिला कीं रणवाद्यांचा कडकडाट होऊं द्या. तो इतकें म्हणत आहे तोंच डावीकडे शिंक झाली तेव्हां शकुन जाणणा-रांनीं सांगितलें कीं, याचा परिणाम ठीक होणार.

बूढ एक कह सगुन बिचारी।
भरतहि मिलिय न होइहि रारी।
रामहिँ भरत मनावन जाहीँ।
सगुन कहइ अस बिग्रह नाहीँ।

तेव्हां एक वृद्ध त्या शकुनाचा विचार करून म्हणालाः—" भरताशीं झुंज न होतां सलोखाच होणार. भरत रामाची समजूत घालण्यास जात आहे. ह्या शकुनाचें फल हेंच कीं युद्ध व्हावयाचें नाहीं."

सुनि गुह कहइ नीक कह बूढा।
सहसा करि पछितातहिँ बिमूढा।
भरत-सुभाउ-सील बिनु बूझे।
बडि हितहानि जानि बिनु जूझे।

तें ऐकून गुह म्हणाला, " वृद्धाचेंच म्हणणें ठीक आहे. भरताचें अंतर्बाह्य इंगित न जाणतांसवरतां साहस करणें आणि मग पश्चात्ताप करीत बसणें हें मूर्खपणाचें होईल; शिवाय तसें केल्यावांचून झुंज घेणें हें आपल्या हितसंबंधासहि फारच धोक्याचें आहे.

**दो०—गहहु घाट भट सिमिटि सब लेउँ मरम मिलि जाइ। बूझि मित्र अरि मध्य गति तब तस करिहउँ आइ ॥ १८६ ॥**

वीरहो, तुम्ही सर्व आपल्या जमावानें असा आणि घाट दाबून बसा. मी खुद्द जाऊन भरताला भेटतों आणि बित्तंबातमी आणतों. शत्रु, मित्र, किंवा उदासीन यांपैकीं जें नातें उमजून पडेल त्याप्रमाणें मग काय करावयाचें तें ठरवितां येईल.

चौ०—लखब सनेहु सुभाय सुहाये ।
बैर प्रीति नहिँ दुरइ दुराये ।

भरताचा स्नेह आणि स्वभाव हीं सहज लक्षांत येतील. वैर किंवा प्रेम कितीहि छपविलें तरी छपत नसतें.

अस कहि भेँट सँजोवन लागे ।
कंद मूल फल खग मृग माँगे ।
मीन पीन पाठीन पुराने ।
भरि भरि भार कहारन्ह आने ।
मिलन साजु सजि मिलन सिधाये ।
मंगलमूल सगुन सुभ पाये ।

इतकें बोलून गुह राजापुढें भेट म्हणून नेण्याजोग्या वस्तू गोळा करूं लागला. त्यानें कंदमुळें, फळें, पक्षी, हरिण वगैरे मागविले. कोळ्यांनीं मोठमोठाले मासे आणि मुरलेले पाठे ( मत्स्यविशेष ) कावडी भरभरून आणले. याप्रमाणें भेटीची सर्व सामग्री तयार झाल्यावर गुह भेटण्यास निघाला असतां त्यास मंगलकारक शुभ शकुन होऊं लागले.

देखि दूरि ते कहि निजनामू ।
कीन्ह मुनीसहिँ दंडप्रनामू ।
जानि रामप्रिय दीन्ह असीसा ।
भरतहिँ कहेउ बुझाइ मुनीसा ।

दुरून पाहातांच त्यानें आपलें नांव सांगून वसिष्ठ ऋषींस दण्डप्रणाम घातला. मुनिवर्यांनींहि त्यास रामप्रिय जाणून आशीर्वाद दिला आणि भरताची त्याची ओळख घालून दिली.

रामसखा सुनि स्यंदनु त्यागा ।
चले उतरि उमगत अनुरागा ।
गाउँ जाति गुह नाउँ सुनाई ।
कीन्ह जोहारु माथ महि लाई ।

'रामसखा' एवढे शब्द ऐकतांच भरतानें रथाचा त्याग केला आणि प्रेमानें उचंबळून येऊन तो पायींच चालूं लागला. गुहानें आपलें नांव, गांव आणि जात कळवून जमिनीस मस्तक टेकून जोहार केला.

**दो०—करत दंडवत देखि तेहि भरत लीन्ह उर लाइ । मनहुँ लषन सन भेँट भइ प्रेम न हृदय समाइ ॥ १८७ ॥**

दण्डवत करितांना पहातांच भरतानें त्यास उचलून उराशीं धरिलें. लक्ष्मणच भेटला असें वाटून भरताचें प्रेम त्याच्या हृदयांत मावेना.

चौ०—भेँटत भरत ताहि अतिप्रीती ।
लोग सिहाहिँ प्रेम कै रीती ।
धन्य धन्य धुनि मंगलमूला ।
सुर सराहिँ तेहि बरिसहिँ फूला ।

भरत त्याशीं आति प्रेमानें भेटत असतां त्याच्या प्रेमाचा प्रकार लोक वाखाणूं लागले. 'धन्य, धन्य' अशा मंगलकारक घोषानें देव भरताची प्रशंसा करून त्याजवर पुष्पवृष्टि करूं लागले.

लोक बेद सब भाँतिहिँ नीचा ।
जासु छाहँ छुइ लेइय सीँचा ।
तेहि भरि अंक राम–रघु–भ्राता ।
मिलत पुलकपरिपूरित गाता ।

वेदांत, लौकिकांत वगैरे सर्व रीतींनें जो नीच, ज्याच्या छायेचा स्पर्श होतांच स्नान केलें पाहिजे, त्यास रामाचा धाकटा बंधु जो भरत तो पुलकप्रपूरितगात्र होत्साता कडकडून भेटला !

राम राम कहि जे जमुहाहीँ ।
तिन्हहिँ न पाप पुंज समुहाही ।
एहि तौ राम लाइ उर लीन्हा ।
कुलसमेत जग पावन कीन्हा ।

'राम राम' म्हणत जे जांभई देतात त्यांचे पापाचे पर्वतदेखील नष्ट होतात. ह्याला तर प्रत्यक्ष रामांनीं उचलून हृदयाशीं कवटाळलें आणि त्याच्या कुळासकट त्यास जगांत पावन केलें.

करम-नास-जल सुरसरि परई ।
तेहि को कहहु सीस नहिँ धरई ।
उलटा नाम जपत जग जाना ।
बालमीकि भये ब्रह्मसमाना ।

कर्मनाशा नदीचें पाणी गंगेंत मिळाल्यावर त्यास मस्तकावर कोण घेणार नाहीं ? रामनाम उलटें जपूनहि वाल्मीकी ब्रह्मरूप झाले ह्यास सर्व जग साक्ष आहे.

दो०—स्वपज सबर खस जनम जड पावँर कोल किरात। राम कहत पावन परम होत भुवन विख्यात ॥ १८८ ॥

चांडाल, शबर, कसाई, यवन, कोळी, किरात इत्यादि नीच दुरात्मेदेखील परमपवित्र अशा रामनामोच्चारानें त्रैलोक्यविख्यात होतात.

चौ०—नहिँ अचरज जुग जुग चलि आई।
केहि न दीन्हि रघुबीर बडाई।
राम-नाम-महिमा सुर कहहीँ।
सुनि सुनि अवध लोग सुख लहहीँ।

हें आश्चर्य नव्हे. हें असें अनादिकालापासूनच चालत आलें आहे. रघुवीरानें कोणास उच्च पदवी दिली नाहीं? ह्याप्रमाणें रामनामाचा महिमा देव वानूं लागले, आणि तो ऐकून ऐकून अयोध्येचे लोक आनंदांत गर्क होऊन गेले.

रामसखहिँ मिलि भरत सप्रेमा।
पूछी कुसल सुमंगल षेमा।
देखि भरत कर सील सनेहू।
भा निषाद तेहि समय बिदेहू।
सकुच सनेह मोद मन बाढा।
भरतहिँ चितवत एकटक ठाढा।

रामसखा म्हणून भरत गुहास प्रेमानें भेटला आणि त्यानें त्याला कुशल आणि मंगल विचारिलें. भरताचें शील आणि प्रेम पाहून तर त्या वेळीं गुह देहभानच विसरून गेला.संकोच, स्नेह आणि आनंद हे त्याच्या मनांत वाढत जाऊन तो एकसारखा भरताकडेच टक लावून पहात राहिला.

धरि धीरज पद बंदि बहोरी।
बिनय सप्रेम करत कर जोरी।
कुसल मूल पदपंकज पेखी।
मैँ तिहुँ काल कुसल निज लेखी।
अब प्रभु परम अनुग्रह तोरे।
सहित कोटि कुल मंगल मोरे।

नंतर धैर्य धरून आणि पादवंदन करून गुह हात जोडून प्रेमानें आणि विनयानें म्हणालाः—" आपलीं हीं क्षेममूलक पदकमलें पाहून मी माझ्या मतें त्रिकाळ कुशल झालों. प्रभो! आतां आपल्या परम अनुग्रहानें कोटिकुळांसहित माझें मंगलच असणार.

दो०—समुझि मोरि करतूति कुल प्रभु महिमा जिय जोइ। जो न भजइ रघु-बीर-पद जग बिधिबंचित सोइ ॥ १८९ ॥

माझें कुल, माझा व्यवसाय आणि प्रभूंचा महिमा ह्या सर्वांचा मनांत विचार करूनहि जो रामपदाचें भजन करणार नाहीं, तो ह्या जगांत खरोखरीच दुर्दैवी समजला पाहिजे.

चौ०—कपटी कायर कुमति कुजाती।
लोक बेद बाहेर सब भाँती।
राम कीन्ह आपन जबही तेँ।
भयउँ भुवन भूषन तबही तेँ।

कपटी, कुत्सित, दुष्टबुद्धि, कुलहीन आणि सर्वप्रकारें लोकवेदबाह्य अशा मला रामांनीं जेव्हांपासून आपलें म्हटलें, तेव्हांपासून मी ह्या जगाचें भूषणच होऊन बसलों आहे."

देखि प्रीति सुनि बिनय सुहाई।
मिलेउ बहोरि भरत-लघु-भाई।
कहि निषाद निज नाम सुबानी।
सादर सकल जोहारीं रानी।
जानि लषनसम देहिँ असीसा।
जियहु सुखी सय लाख बरीसा।

याप्रमाणें गुहाचा जिव्हाळा आणि अतिशय विनय पाहून शत्रुघ्नहि त्यास भेटला. नंतर गुहानें मधुरवाणीनें आपलें नांव सांगून सर्व राण्यांस मोठ्या आदरानें जोहार केला. त्यांस लक्ष्मणाप्रमाणें समजून राण्यांनींहि आशीर्वाद दिला कीं, " चिरंजीव हो आणि सुखानें रहा."

निरखि निषाद नगर-नर-नारी।
भये सुखी जनु लषन निहारी।
कहहिँ लहेउ एहि जीवन लाहू।
भेँटेउ रामभद्र भरि बाहू।
सुनि निषाद निज-भाग-बडाई।
प्रमुदित मन लै चलेउ लेवाई।

गुहास पाहून अयोध्येची मंडळी लक्ष्मणास पाहिल्याप्रमाणें सुखी झाली.ती म्हणूं लागलीः—"रामांनीं ह्यास बाहूंत धरून आलिंगन दिलें.अर्थात् जन्मास आल्याचें सार्थक त्यानेंच मिळविलें." आपल्या भाग्याची चाललेली प्रशंसा ऐकून अतिहर्षित होऊन गुह मंडळीस घेऊन चालला.

दो०—सनकारे सेवक सकल चले स्वामि रुख पाइ। घर तरु तर सर बाग बन बास बनायन्हि जाइ ॥ १९० ॥

सर्व माणसांना गुहाचा इशारा मिळतांच ते धन्याची मर्जी ओळखून, घरें, वृक्षच्छाया, सरोवरें, बागा, वनें इत्यादि ठिकाणीं मंडळीची व्यवस्था करण्यासाठीं निघाले.

चौ०—सृंग-बेर-पुर भरत दीख जब।
भे सनेहबस अंग सिथिल तब।
सोहत दिये निषादहि लागू।
जनु तनु धरे बिनय अनुरागू।

शृंगवेरपुर दिसतांच भरताचें सर्वांग प्रेमावेशेंकरून शिथिल झालें. गुहावर भार टाकून चालतांना तो आणि भरत असे शोभूं लागले कीं, जणुंकाय विनय आणि प्रेम हे मूर्तिमंतच चालले आहेत.

एहि बिधि भरत सेन सब संगा।
दीख जाइ जगपावनि गंगा।
रामघाट कहँ कीन्ह प्रनामू।
भा मन मगन मिले जनु रामू।

ह्याप्रमाणें भरत सर्व सैन्यानिशीं जगत्पावनी गंगेच्या दर्शनास गेला. रामघाटास प्रणाम करितांच रामच भेटल्याप्रमाणें त्याचें मन अगदीं तल्लीन झालें.

कराहिँ प्रनाम नगर-नर-नारी।
मुदित ब्रह्ममय बारि निहारी।
करि मज्जनु माँगहि कर जोरी।
राम-चंद्र-पद प्रीति न थोरी।

गंगाजल पाहतांच अयोध्येच्या स्त्रीपुरुषांनींहि प्रणाम केला आणि ते ब्रह्मानंदांत निमग्न झाले. त्यांनीं स्नानें करून व गंगेस हात जोडून प्रार्थना केला कीं, रामपदीं आमचें अनुपम प्रेम असावें.

भरत कहेउ सुरसरि तव रेनू।
सकल-सुखद सेवक-सुर-धेनू।
जोरि पानि बर मागउँ एहू।
सीय-राम पद सहज सनेहू।

भरत म्हणालाः—"हे गंगे! तुझी रेणू सर्वांना सुखविणारी असून तुझ्या भक्तांची तर ती कामधेनूच आहे. मी तुजला हात जोडून इतकाच वर मागतों कीं, सीतारामपदीं माझें अहेतुक प्रेम जडावें."

दो०—एहि बिधि मज्जन भरत करि गुरु-अनुसासन पाइ। मातु नहानीं जानि सब डेरा चले लेवाइ ॥ १९१ ॥

ह्याप्रमाणें प्रार्थना करून भरतानें स्नान केलें. सर्व मातांचींहि स्नानें झालीं, हें कळतांच गुरूंच्या आज्ञेनें तो तेथील तळ हालवून निघाला.

चौ०—जहँ तहँ लोगन्ह डेरा कीन्हा।
भरत सोधु सबही कर लीन्हा।

(नंतर शृंगवेरपुरांत) जिकडेतिकडे लोकांनीं तळ दिला. भरतानें सर्वांचाच समाचार घेतला.

सुरसेवा करि आयसु पाई।
राममातु पहिँ गे दोउ भाई।
चरन चाँपि कहि कहि मृदुबानी।
जननी सकल भरत सनमानी।
भाइहि सौंपि मातुसेवकाई।
आपु निषादहि लीन्हि बोलाई।

गुरुदेवतार्चन करून आणि त्यांची आज्ञा घेऊन दोघेहि बंधु कौसल्येकडे गेले. तिचें आणि सर्व मातांचें चरणसंवाहन करून आणि त्यांस गोड गोंडस गोष्टी सांगून भरतानें त्यांची सेवा केली. नंतर मातांची व्यवस्था शत्रुघ्नाकडे सोंपवून भरतानें स्वतः गुहास बोलावून आणलें.

चले सखा कर सोँ कर जोरे।
सिथिल सरीर सनेहु न थोरे।
पूछत सखहि सो ठाउँ देखाऊ।
नेकु नयन-मन-जरनि जुडाऊ।
जहँ सिय राम लषन निसि सोये।
कहत भरे जल लोचनकोये।

प्रेमानें अतिशय शिथिलगात्र झाल्यामुळें भरत गुहाच्या हातांत हात घालून चालूं लागून त्यास विचारूं लागला कीं, "जेथें सीता, राम, आणि लक्ष्मण रात्रीं निजले होते ती जागा एकदाची दाखीव म्हणजे मी आपल्या मनाची आणि डोळ्यांची तळमळ तरी निववून घेईन." हें बोलतांना भरताचे नेत्रगोलक अश्रूंनीं भरून आले.

भरतबचन सुनि भयउ बिषादू।
तुरत तहाँ लेइ गयउ निषादू।

भरताचें वचन ऐकतांच गुह उद्विग्न झाला आणि लगेंच ती त्यास (राम निजले होते) तेथें घेऊन गेला.

दो०—जहँ सिंसुपा पुनीततरु रघुबर किय बिस्रामु। अतिसनेह सादर भरत कीन्हे दंड प्रनामु ॥ १९२ ॥

ज्या शिंशुपा वृक्षाच्या तळीं रघुवरांनीं विश्राम केला होता त्या जागेस भरतानें अतिप्रेमानें सादर साष्टांग नमस्कार घातला.

चौ०—कुस साथरी निहारि सुहाई।
कीन्ह प्रनाम प्रदच्छिन जाई।
चरन-रेख-रज आँखिन्ह लाई।
बनइ न कहत प्रीति अधिकाई।
कनकबिंदु दुइ चारिक देखे।
राखे सीस सीयसम लेखे।
सजल बिलोचन हृदय गलानी।
कहत सखा सन बचन सुबानी।

तेथील मृदु कुशशय्या पाहतांच भरतानें तीस प्रदक्षिणा घालून तिला साष्टांग नमस्कार घातला. तेथील रामपदांकित धूलि त्यानें आपल्या नेत्रांस लावली. त्या वेळीं त्याच्या प्रेमास असें भरतें आलें कीं, तें सांगण्याची सोयच नाहीं. दोन चार सुवर्णकण त्याच्या दृष्टीस पडले, ते त्यानें सीतेप्रमाणें लेखून आपल्या मस्तकावर ठेवले. सजलनेत्र आणि दुःखितहृदय अशा स्थितींत तो गहिंवरून गुहास म्हणाला,

श्रीहत सीयाबिरह दुतिहीना।
जथा अवध नरनारि मलीना।
पिता जनक देउँ पटतर केही।
करतल भोग जोग जग जेही।
ससुर भानु-कुल-भानु भुआलू।
जेहि सिहात अमरावतिपालू।
प्रानुनाथ रघुनाथ गोसाईं।
जो बड होत सो रामबडाई।

अयोध्येचे स्त्रीपुरुष जसे कळाहीन झाले आहेत तसेच हे ( सुवर्णरज ) देखील सीतेच्या विरहानें निस्तेज आणि कांतिहीन झाले आहेत. भोग आणि योग दोन्हीहि ज्यास केवळ करतलगत आहेत असा राजा जनक यास उपमा तरी कोणाची द्यावी ! तो जिचा पिता, अमरावतीचा राजा जो देवेंद्र तो ज्याचें आर्जव करण्यांत तत्पर असा सूर्यवंशांतील अपर सूर्यच राजा दशरथ जिचा श्वशुर, जो जो कोणी महत्त्वास चढत असेल तो ज्याच्या कृपेनें चढतो असा स्वामी रघुनाथ जिचा प्राणनाथ,

दो०—पतिदेवता सु-तीय-मनि सीय साथरी देखि। बिहरत हृदय न हहरि हर पबि तें कठिन बिसेखि ॥ १९३ ॥

जी साध्वी स्त्रियांची मुकुटमणि, त्या महापातिव्रता सीतेची ही शय्या पाहून देखील, हे मद्धृदया ! हरहर ! ज्या अर्थी तूं हुरहुरून विदीर्ण होत नाहींस त्या अर्थी तूं वज्राहूनदेखील अधिक कठोर आहेस !

चौ०—लालन जोग लखन लघु लोने।
भे न भाइ अस अहहिं न होने।
पुरजन प्रिय पितु मातु दुलारे।
सिय-रघु-बीरहिं प्रानपियारे।
मृदुमूरति सुकुमार सुभाऊ।
ताति बाउ तन लाग न काऊ।
ते बन सहहिं बिपति सब भाँती।
निदरे कोटि कुलिस एहि छाती।

हा सुंदर लक्ष्मण म्हणजे कटीं खांदीं वाहण्याजोगा लहान आहे. असा बंधु झाला नाहीं, सध्यां नाहीं व पुढेंहि होणार नाहीं. जो शहरच्या सर्व लोकांचा लाडका, आईबापांचा अतिशयच प्रियकर, सीतारामांचा तर जीव कीं प्राणच व ज्याच्या अंगाला ऊन वाऱ्याची झुळुकदेखील लागली नाहीं इतका स्वभावतःच नाजुक आणि गोजिरवाणा तो वनांत सर्व तऱ्हेच्या विपत्ति सहन करीत आहे(हें पाहून ही छाती ज्याअर्थी दुभंगली नाहीं) त्या अर्थी ह्या छातीनें कोटी वज्रांसदेखील मागें सारलें !

राम जनमि जगु कीन्ह उजागर।
रूप सील सुख सब गुनसागर।
पुरजन परिजन गुरु पितु माता।
रामसुभाउ सबहिं सुखदाता।
बैरिउ रामबडाई करहीं।
बोलनि मिलनि बिनय मन हरहीं।
सादर कोटि कोटि सत सेखा।
करि न सकहिं प्रभु-गुन-गन-लेखा।

कौसल्येनें ज्या रामास प्रसवून जगताला महत्त्व आणिलें, जो रूप, शील, सुख इत्यादि सर्व गुणांचा आगर, ज्या रामाचा स्वभाव माता, पिता, गुरु, परिजन, पुरजन इत्यादि सर्वांना सुखविणारा, वैरीदेखील ज्याची स्तुतिच करतात, भेटीमध्यें किंवा बोलतां चालतां जो आपल्या विनयानें सर्वांचीं मनें ओढून घेणारा, कोटिशत शेष ज्या प्रभु रामचंद्राच्या

गुणगणांचा उल्लेख कोट प्रयत्नांनीं देखील करूं शकणार नाहींत,

**दो०—सुखसरूप रघु—बंस—मनि मंगल—मोद—निधान। ते सोवत कुस डासि महि बिधिगति अतिबलवान॥ १९४॥**

जो सुखाची केवळ मूर्ति आणि जो मंगल आणि मोद यांचें केंद्रस्थान त्या ह्या रघुवंशललाम श्रीरामांनें उघड्या जमिनीवर गवत आंथरून निजावें ना! एकंदरींत कर्मगति जबरदस्त होय!

**चौ०—राम सुना दुख कान न काऊ।**
**जीवनतरु जिमि जोगवइ राऊ।**
**पलक नयन फनि मनि जेहि भाँती।**
**जोगवहिँ जननि सकल दिनराती।**
**ते अब फिरत बिपिन पदचारी।**
**कंद—मूल—फल—फूल—अहारी।**

ज्यानें 'दुःख' हा शब्द देखील कानानें ऐकिला नाहीं, ज्यास महाराजांनीं जीवनवृक्षाप्रमाणें जपत असावें, जशी पापण्या डोळ्यांची आणि साप आपल्या मण्याची जोपासना करितात त्याप्रमाणें ज्याची काळजी सर्व मातांनीं घेत असावी, तो हा राम आज कंद, मुळें, फळें, फुलें ह्यावर निर्वाह करून रानोमाळ अनवाणीच हिंडत आहे ना!

**धिग कैकेई अमंगलमूला।**
**भइसि प्रान—प्रियतम—प्रतिकूला।**
**मैं धिगधिग अघउदधि अभागी।**
**सब उतपात भयउ जेहि लागी।**
**कुलकलंकु करि सृजेउ बिधाता।**
**साइँद्रोह मोहि कीन्ह कुमाता।**

प्राणाप्रमाणें प्रियतम अशा रामचंद्रास प्रतिकूल होणाऱ्या अमंगलमूल कैकेयीस धिक्कार असो! ज्याच्यामुळें हा सर्व अनर्थ कोसळला त्या मला, पापसमुद्राला, हतभाग्याला शतवार धिक्कार असो. विधात्यानें मला कुलकलंक करून जन्मास घातलें, आणि त्या सूड घेणाऱ्या मातेनें मला स्वामिद्रोही बनविलें!"

**सुनि सप्रेम समुझाव निषादू।**
**नाथ करिय कत बादि बिषादू।**
**राम तुम्हहिँ प्रिय तुम्ह प्रिय रामहिँ।**
**यह निरदोस दोसु बिधि बामहि।**

भरताचे हे दुःखोद्गार ऐकतांच गुह गहिंवरला आणि त्याची समजूत घालूं लागला कीं, "महाराज! आतां व्यर्थ दुःख तरी किती करावयाचें? राम तुम्हांला प्रिय असून तुम्ही रामाला प्रिय आहांत हीच गोष्ट निर्दोष आहे. हा सर्व दोष विपरीत प्राक्तनाचाच आहे.

**छंद—बिधि बाम की करनी कठिन जेहि मातु कीन्ही बावरी। तेहि राति पुनि पुनि करहिँ प्रभु सादर सराहन रावरी॥ तुलसी न तुम्ह सोँ राम प्रीतम कहत हौँ सौँहैँ किये। परिनाम मंगल जानि अपने आनिये धीरज हिये॥ ८॥**

ज्यानें कैकेयीस बुद्धिभ्रष्ट केलें त्या विपरीत विधीची कृतीच फार कठोर आहे. त्या रात्रीं प्रभु आपली अगदीं मनःपूर्वक प्रशंसा करीत होते. आपण अगदीं खात्री बाळगा कीं, रामाला आपणापरतें कांहींच प्रिय नाहीं, आणि ह्या सगळ्याचा शेवटहि गोडच होणार आहे, हें मी शपथपुरःसर सांगतों. हें जाणून मात्र आपण आपल्या मनास धीर दिला पाहिजे.

**सो०—अंतरजामी राम सकुच सप्रेम कृपायतन। चलिय करिय बिश्राम यह बिचार दृढ आनि मन॥ ८॥**

राम अंतर्यामी, भिडस्त, सप्रेम व कृपानिधान आहेत, हा विचार मनांत दृढ ठेवून विश्रांति घेण्यास परतावें."

**चौ०—सखाबचन सुनि उर धरि धीरा।**
**बास चले सुमिरत रघुबीरा।**

गुहाचें हें भाषण ऐकून व हृदयांत धैर्य धरून भरत रामस्मरण करीत आपल्या मुक्कामावर परत गेला.

**यह सुधि पाइ नगर—नर—नारी।**
**चले बिलोकन आरत भारी।**
**परदछिना करि करहिँ प्रनामा।**
**देहिँ कैकेइहि खोरि निकामा।**
**भरि भरि बारि बिलोचन लेहीँ।**
**बामबिधातहि दूषन देहीँ।**

ही सर्व हकीकत कळतांच अयोध्येची मंडळी अति आतुरतेनें तेंच स्थळ पाहण्यास गेली. त्यांनीं

त्या स्थलास प्रदक्षिणापूर्वक प्रणाम केला, तेव्हां क्षणोक्षणीं त्यांचे डोळे पाण्यानें भरून येत. ते कैकेयीस विनाकारण दोष लावून प्रतिकूल विधात्यासहि नांवें ठेवूं लागले.

एक सराहहिँ भरतसनेहू ।
कोउ कह नृपति निबाहेउ नेहू ।
निंदहिँ आपु सराहि निषादहि ।
को कहि सकइ बिमोहबिषादहि ।

कोणी भरताच्या प्रेमाची तारीफ करीत असत, तर कोणी म्हणत कीं, दशरथानेंच प्रेम निभवावें. कोणी तर स्वतःस तुच्छ मानून गुहास वाखाणीत असत. त्या वेळच्या मोहाचें आणि विषादाचें कोण वर्णन करूं शकेल ?

एहि बिधि राति लोगु सबु जागा ।
भा भिनुसारु गुदारा लागा ।
गुरुहिँ सुनाव चढाइ सुहाई ।
नई नाव सब मातु चढाई ।
दंड चारि महँ भा सब पारा ।
उतरि भरत तब सबहि सँभारा ।

ह्याप्रमाणें सर्व रात्रभर लोकांस जागरण झालें. उजाडतांच ते नदी उतरून जाऊं लागले. त्यांनीं चांगल्या सुरेखशा नावेंत गुरुजींना बसवून सर्व मातांनाहि नवीन नावेंत बसविलें.चार घटिकांत सर्व पैलतिरीं गेले. नंतर भरतानें उतरून सर्वांचा समाचार घेतला.

दो०—प्रात क्रिया करि मातुपद बंदि गुरुहि सिर नाइ । आगे किये निषादगन दीन्हेउ कटक चलाइ ॥ १९५ ॥

सकाळचें आन्हिक आटोपून, मातृपदीं वंदन करून आणि गुरूंस मस्तक नमवून भरतानें निषादमंडळीस अग्रभागीं करून सैन्याची रवानगी केली.

चौ०—कियेउ निषादनाथ अगुआई ।
मातु पालकी सकल चलाई ।
साथ बोलाइ भाइ लघु दीन्हा ।
बिप्रन्ह सहित गवन गुरु कीन्हा ।
आपु सुरसरिहि कीन्ह प्रनामू ।
सुमिरे लषनसहित सियरामू ।
गवने भरत पयादेहि पाये ।
कोतल संग जाहिँ डोरिआये ।

त्यानें गुहास अघाडीला घालून सर्व मातांच्या पालख्या चालूं केल्या. शत्रुघ्नास बोलावून आणून बरोबर दिलें आणि विप्रांसह वसिष्ठांची रवानगी केली. नंतर गंगेस नमस्कार करून व रामलक्ष्मण आणि सीता यांचें स्मरण करून भरत स्वतः पायींच निघाला. बरोबर त्याचा घोडा बागदोर लावून मोकळाच चालूं लागला.

कहहिँ सुसेवक बारहिँ बारा ।
होइय नाथ अस्व असवारा ।
रामु पयादेहि पाय सिधाये ।
हम कहँ रथ गज बाजि बनाये ।
सिरभर जाउँ उचित अस मोरा ।
सब तेँ सेवकधरम कठोरा ।

भरताचे प्रामाणिक सेवक त्यास वारंवार म्हणत कीं, महाराजांनीं घोड्यावर स्वार व्हावें. ( परंतु भरत त्यास म्हणे ) " राम तर पायीं आणि अनवाणीच चालत आहेत आणि माझ्यासाठीं मात्र हे घोडे, हत्ती, रथ बनविले आहेत ! वास्तविक पहातां डोक्यानें चालत जाणें हेंच मला उचित आहे. सर्वांपेक्षां सेवाधर्मच कष्टतर आहे. "

देखि भरतगति सुनि मृदुवानी ।
सब सेवकगन गरहिँ गलानी ।

भरताची ती स्थिति पाहून आणि त्याचें तें प्रेमळ वचन ऐकून सर्व नोकर लोक दुःखानें अगदीं विरघळून गेले.

दो०—भरत तीसरे पहर कहँ कीन्ह प्रवेसु प्रयाग । कहत राम सिय राम सिय उमगि उमगि अनुराग ॥ १९६ ॥

'सीताराम' 'सीताराम' असें भजन चाललें आहे आणि प्रेमाचे पूरचपूर लोटताहेत अशा स्थितींत भरतानें तिसरे प्रहरीं प्रयागप्रवेश केला.

चौ०—झलका झलकत पायन्ह कैसे ।
पंकजकोस ओसकन जैसे ।
भरत पयादेहि आये आजू ।
भयउ दुखित सुनि सकलसमाजू ।

( पायीं चालण्यानें आलेले ) भरताच्या पायावरचे फोड कमळाच्या पाकळ्यांवरील दवाच्या थेंबाप्रमाणें झळकूं लागले. आज भरत सबंध अनवाणीच चालून आले हें ऐकून सर्व दुःखित झाले.

खबरि लीन्ह सब लोग नहाये।
कीन्ह प्रनाम त्रिबेनिहि आये।
सबिधि सितासित नीर नहाने।
दिये दान महिसुर सनमाने

सर्व मंडळीचीं स्नानें झाल्याची खबर कळतांच भरतानें त्रिवेणीसंगमावर येऊन प्रणाम केला व संगमाच्या शुभ्रश्याम जलांत विधियुक्त स्नान केलें आणि दानें देऊन ब्राह्मणांचा सन्मान केला.

देखत स्यामल-धवल-हलोरे।
पुलकि सरीर भरत कर जोरे।
सकल--काम--प्रद तीरथराऊ।
बेदबिदित जग प्रगट प्रभाऊ।
मागउँ भीख त्यागि निजधरमू।
आरत काह न करइ कुकरमू।
अस जिय जानि सुजान सुदानी।
सफल करहिँ जग जाचकबानी।

·गंगायमुनाजलाचे शुभ्र आणि श्याम तरंग पाहून भरताचें शरीर रोमांचित झालें.तो हात जोडून म्हणालाः—हे तीर्थराजा ! तूं सकल कामना पूर्ण करणारा आहेस. तुझा प्रभाव वेदप्रसिद्ध असून जगांत तर तो प्रत्यक्षच दिसतो. मी आपला धर्म सोडून तुजजवळ भिक्षा मागत आहे. दुःखानें आर्त झालेला कोणतें दुष्कर्म करणार नाहीं ? असें मनांत समजून जगांतील ज्ञाते आणि उदार याचकांची याचना पूर्ण करितात.

दो०—अरथ न धरम न काम रुचि गति न चहउँ निरबान। जनम जनम रति रामपद यह बरदानु न आन ॥ १९७ ॥

मला अर्थाची अपेक्षा नाहीं, धर्म आणि काम यांचीहि चाड नाहीं किंवा मोक्षपदाचीहि हांव नाहीं. जन्मोजन्मीं रामपदाचे ठायीं मी अनुरक्त असावें हेंच मला वरदान द्यावें. एरव्हीं मला कांहींहि नको.

चौ०—जानहु राम कुटिल करि मोही।
लोग कहउ गुरु—साहिब—द्रोही।
सीता—राम—चरन रति मोरे।
अनुदिन बढउ अनुग्रह तोरे।

राम मला कुटिल म्हणून समजोत किंवा लोक मला गुरुद्रोही आणि स्वामिद्रोही म्हणोत; तुझ्या कृपेनें माझें सीतारामचरणीं प्रेम दिवसानुदिवस वाढतच राहो.

जलद जनम भरि सुरति बिसारउ।
जाचत जल पबिपाहन डारउ।
चातक रटनि घटे घटि जाई।
बढे प्रेम सब भाँति भलाई।
कनकहि बान चढइ जिमि दाहे।
तिमि प्रिय—तम-पद नेम निबाहे।

मेघ जन्मभर जरी आठवण विसरला, जलाची याचना करीत असतां त्याच्या ऐवजीं तो जरी वज्रपाषाणांची वृष्टि करूं लागला आणि चातकाची ओरड कमी कमी होत होत ती जरी अगदीं नाहींशी झाली तरी त्याचें मेघावरील प्रेम वाढतच जातें आणि त्या योगानें त्याचें सर्वस्वीं कल्याणच होतें. सोन्यास आंच दिल्यानें तें जसें वाणास चढतें तद्वतच माझ्या प्रियतमाच्या चरणीं असलेला प्रेम तूंच निभवून ने.

भरतबचन सुनि माँझ त्रिबेनी।
भइ मृदुबानि सु—मंगल—देनी।
तात भरत तुम्ह सब बिधि साधू।
राम—चरन—अनुराग—अगाधू।
बादि गलानि करहु मन माहीँ।
तुम्ह सम रामहिँ कोउ प्रिय नाहीँ।

भरताचें वचन ऐकून त्रिवेणीमधून मंगलप्रद गंभीर वाणी निघाली:—हे तात भरता ! तूं सर्व रीतीनें सोज्ज्वळ आहेस. रामचरणीं तुझें प्रेम अनंत आहे. तूं आपल्या मनांत उगीच विषाद मानूं नकोस. तुजसारखा रामाचा जिवलग कोणीहि नाहीं.

दो०—तनु पुलकेउ हिय हरष सुनि बेनिबचन अनुकूल। भरत धन्य कहि धन्य सुर हरषित बरषहिँ फूल ॥ १९८ ॥

त्रिवेणीचे ते अनुकूल शब्द ऐकून भरताच्या चित्तास हर्ष वाटून त्याचा देह पुलकित झाला. " भरता ! धन्य रे धन्य तूं " असें म्हणून देव त्याजवर पुष्पवृष्टि करूं लागले.

चौ०—प्रमुदित तीरथ—राज—निवासी।
बैषानस बटु गृही उदासी।

कहहिँ परसपर मिलि दस पाँचा ।
भरत सनेह सील सुचि साँचा ।

प्रयागक्षेत्रीं राहणारे ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी दहादहा पांचपांच जमून परस्परांत आनंदानें बोलत असत कीं, भरताचेंच प्रेम आणि शील तत्त्वतः शुद्ध होय.

सुनत राम-गुन-ग्राम सुहाये ।
भरद्वाज मुनिबर पहिँ आये ।

रामचंद्राचा सुश्राव्य गुणग्राम श्रवण करीत करीत भरत मुनिश्रेष्ठ भरद्वाजांच्या आश्रमीं आला.

दंडप्रनाम करत मुनि देखे ।
मूरतिवंत भाग निज लेखे ।
धाइ उठाइ लाइ उर लीन्हे ।
दीन्हि असीस कृतारथ कीन्हे ।
आसन दीन्ह नाइ सिरु बैठे ।
चहत सकुच गृह जनु भजि पैठे ।

भरतास साष्टांग नमस्कार घालतांना पहातांच मुनि त्यास आपलें मूर्तिमंत भाग्यच आहे असें समजले. त्यांनीं धावून त्यास उचललें आणि हृदयाशीं कवटाळून धरून आणि आशीर्वाद देऊन कृतार्थ केलें व त्याला आसन दिलें. त्यांस नमस्कार करून तो अशा रीतीनें बसला कीं जणूं काय तो घरांतून पळून आल्यावर ( मध्येंच सांपडल्यामुळें ) हिरमुसला होत्साता पुनः घरीं जाऊं इच्छीत आहे.

मुनि पूछब किछु यह बड सोचू ।
बोले रिषि लखि सीलसँकोचू ।
सुनहु भरत हम सब सुधि पाई ।
बिधिकरतब पर किछु न बसाई ।

भरद्वाज ( वनवासप्रकरणीं ) कांहीं तरी विचारपूस करतील हीच त्यास मोठी धास्ती वाटली. त्याचें शील आणि संकोच लक्षांत आणून मुनि म्हणालेः— " बा भरता ! ऐक; आम्हांला सर्व शोध लागला आहे. ईश्वरी घटनेवर कांहीं इलाज चालत नाहीं.

**दो०—तुम्ह गलानि जिय जनि करहु समुझि मातुकरतूति । तात कैकइहि दोष नहिँ गई गिरा मतिधूति ॥ १९९ ॥**

केलें तें सर्व कैकेयीनें केलें असें मानून तूं आपल्या ठिकाणीं शोक करूं नकोस. बा भरता ! कैकेयीकडेही दोष नाहीं. सरस्वतीनेंच तिची बुद्धि पार नष्ट केली होती.

**चौ०—यहउ कहत भल कहिहि न कोऊ ।
लोक बेद बुधसंमत दोऊ ।**

ह्या म्हणण्यास इतर कोणी चांगलें म्हणणार नाहींत. परंतु सिद्धांत आणि व्यवहार हे दोन्ही पंडितांना मान्य असतात. ( कारण त्यांची एकवाक्यता त्यांनाच ज्ञात असते.

तात तुम्हार बिमलजस गाई ।
पाइहि लोकउ बेद बडाई ।

बाबा रे ! तुझें विमल यश गाऊन वेदसिद्धांत देखील व्यवहारांत महत्त्वच पावतील. (तात्पर्य तुझा स्वतःचा व्यवहार इतका पायाशुद्ध आहे कीं सिद्धांत त्याचें पुष्टीकरणच करणार आणि त्या योगें त्यास लोकमान्यता येईल. )

लोक-बेद-संमत सब कहई ।
जेहि पितु देइ राजु सो लहई ।
राउ सत्यब्रत तुम्हहिँ बोलाई ।
देत राज सुख धरम बडाई ।

पिता ज्यास राज्य देईल त्यासच राज्य मिळावयाचें हें मत शास्त्र आणि रूढि या दोहोंनाहि संमत आहे. राजा दशरथ सत्यव्रत असल्याकारणानें तुला बोलावून राज्य, ( आणि तदनुषंगिक ) सुख, धर्म आणि श्रेष्ठता तो तुलाच देणार होता.

रामगवन बन अनरथमूला ।
जो सुनि सकल बिस्व भइ सूला ।
सो भावीबस रानि अयानी ।
करि कुचालि अंतहु पछितानी ।
तहउँ तुम्हार अलप अपराधू ।
कहइ सो अधम अयान असाधू ।
करतेहु राज त तुम्हहिँ न दोषू ।
रामहिँ होत सुनत संतोषू ।

( आतां ) ज्याच्या श्रवणानें अखिल ब्रह्माण्डांत हाहाःकार माजला असा अनर्थकारक रामवनवास खराच—परंतु तो होणार हें ठरलेलेंच होतें. कैकेयी बिचारी अडाणी, तिनें कुचेष्टा केली; परंतु अखेरीस तिलाहि पश्चात्ताप झाला. ह्या बाबतींत तुझा अल्पमात्र देखील अपराध आहे असें कोणी म्हणेल तर तो अधम, अज्ञान आणि दुष्ट होय. तूं राज्य केलें

असतेंस तरीदेखील तुला दोष न लागतां तें ऐकून रामास आनंदच झाला असता.

**दो०—अब अति कीन्हेहु भरत भल तुम्हहिँ उचित मत एहु । सकल-सुमंगल-मूल जग रघु-बर-चरन सनेहु ॥ २०० ॥**

पण आतां तर तूं चांगुलपणाची शिकस्त केलीस. भरता! जगांत सर्व सुमंगलांचें अधिष्ठान ह्मणजे रामपदप्रेम, हा तुझा विचार तुला योग्यच होय.

**चौ०—सो तुह्मार धन जीवनप्राना ।**
**भूरि भाग को तुम्हहिँ समाना ।**
**यह तुह्मार आचरज न ताता ।**
**दसरथसुअन राम-प्रिय-भ्राता ।**

तुझे जीवन आणि प्राण धन्य होत. तुजसारखा महान् भाग्यवान् कोण असणार! हे तात! हें तुझें आश्चर्य नव्हे. कारण, तूं दशरथाचा पुत्र आणि रामाचा प्रियबंधु आहेस.

**सुनहु भरत रघु-पति-मन माहीँ ।**
**प्रेमपात्र तुम सम कोइ नाहीँ ।**
**लषन राम सीतहिँ अतिप्रीती ।**
**निसि सब तुह्महिँ सराहत बीती ।**
**जाना मरम नहात प्रयागा ।**
**मगन होहिँ तुम्हरे अनुरागा ।**

भरता! ऐक. रघुपतीच्या मतानें तुजसारखा प्रेमास्पद कोणचि नाहीं. राम, लक्ष्मण आणि सीता यांनीं ती सर्व रात्र अति प्रेमानें तुझीच प्रशंसा करण्यांत घालविली. प्रयागस्नान करितां करितां देखील तुझें मर्म त्यांच्या लक्षांत येऊन ते तुझ्याच प्रेमांत मग्न झाले.[1]

**तुम्ह पर अस सनेह रघुबर के ।**
**सुख जीवन जग जस जड नर के ।**
**यह न अधिक रघुबीरबडाई ।**
**प्रनत-कुटुंब-पाल रघुराई ।**

जगांत मूढजनांचा जसा आपल्या प्राणावर लोभ असतो तसाच लोभ रामाचा तुजवर आहे. ही ह्मणजे रामासंबंधानें मोठीशी श्लाघा नव्हे; कारण रामराय शरणांगताच्या कुटुंबाचेदेखील पालनकर्ते होत.

१ हें एक शब्दचित्र आहे. त्यांतली कवीची कुशलता व खुबी पाहण्यासारखी आहे.

**तुम्ह तउ भरत मोर मत एहू ।**
**धरे देह जनु रामसनेहू ।**

भरता! माझ्या मतानें तर तूं जणुंकाय देहधारी रामस्नेहच आहेस.

**दो०—तुम कहँ भरत कलंक यह हम सब कहँ उपदेसु । राम-भगति-रस-सिद्ध हित भा यह समय गनेसु ॥ २०१ ॥**

भरता! तुला हा कलंक वाटतो, परंतु आह्मा सर्वांना मात्र हा उपदेशच झाला आहे. रामभक्तिरसाच्या सिद्धीसाठीं ह्या वेळेस हा ओनामाच झाला.[1]

**चौ०—नवबिधु बिमल तात जसु तोरा ।**
**रघु-बर-किंकर-कुमुद-चकोरा ।**
**उदित सदा अथइहि कबहूँ ना ।**
**घटिहि न जग नभ दिन दिन दूना ।**

बा भरता! तुझें विमल यश हा एक अद्‌भुतच चंद्रमा होय आणि रामाचे दास हे कुमुद आणि चकोर होत. हा चंद्र नेहमीं उदितच राहणार, त्यास कधीं अस्त नाहीं किंवा उतरती कळाही नाहीं. विश्वरूप आकाशांत तो दिवसानुदिवस वृद्धिंगतच होत राहणार.

**कोक तिलोक प्रीति अति करही ।**
**प्रभुप्रतापु रवि छबिहि न हरिही ।**
**निसि दिन सुखद सदा सब काहू ।**
**ग्रसिहि न कैकइकरतब राहू ।**

त्रैलोक्यरूपी कोकपक्षी त्याजवर अतिशयच प्रेम करणार. प्रभु रामचंद्राच्या प्रतापरूप रवीलाहि त्याची कांति हिरावून घेतां येणार नाहीं. तो सदासर्वकाळ सर्वत्रांना रात्रंदिवस सुखच देणार. कैकेयीचा कर्तृत्वरूप राहू त्यास ग्रासूं शकणार नाहीं.

**पूरन रामु-सु-प्रेम पियूषा ।**
**गुरुअवमान दोख नहिँ दूषा ।**
**रामभगत अब अमिय अघाहू ।**
**कीन्हेहु सुलभ सुधा बसुधाहू ।**

रामाच्या मधुर प्रेमरूप अमृतानें तो परिपूर्णच राहील. गुरुजनांच्या (चंद्रपक्षीं देवगुरु बृहस्पतींच्या) अपमानरूप (चंद्रपक्षीं गुरुदारागमनरूप) दोषानें तो दूषित होणार नाहीं. अतःपर रामाचे भक्त या

१ रामभक्तीसंबंधानें तूं आमचा गुरु आहेस हा आशय.

अमृतानेंच तृप्त होत राहतील, कारण ह्या पृथ्वीतलावर तें अमृत तूं सुलभ केलें आहेस.

भूप भगीरथ सुरसरि आनी ।
सुमिरत सकल–सु–मंगल–खानी ।
दसरथ–गुन–गन बरनिन जाहीँ ।
अधिक कहा जेहि सम जग नाहीँ ।

**दो०–जासु सनेह–सकोच–बस राम प्रगट भये आइ । जे हर-हिय नयननि कबहुँ निरखे नहीँ अघाइ ॥ २०२ ॥**

( एकंदर तुमचा वंशच अद्भुत व पवित्र आहे ह्या आशयानें ह्मणतात ) केवळ स्मरणमात्रेंकरून जी सर्व सुमंगलांना अर्पण करते ती भागीरथी राजा भगीरथानें पृथ्वीतलावर आणली. ज्याचें दर्शन घेत असतां श्रीसदाशिवाचे ह्ननेत्रदेखील कधींच तृप्त झाले नाहींत असा हा राम ज्याच्या प्रेमाच्या संकोच-वशानें प्रत्यक्ष आविर्भूत झाला, त्या दशरथाच्या गुणाला तर सीमाच नाहीं ( थोडक्यांत त्याजविषयीं सांगावयाचें म्हणजे ) त्याच्या पासंगास देखील जगांत कोणी पुरावयाचें नाहीं. मग त्यापेक्षां वरचढ असा कोठून आढळणार ?

चौ०–कीरति बिधु तुह्म कीन्ह अनूपा ।
जहँ बस राम प्रेम-मृग-रूपा ।

(भगीरथदशरथांच्या कीर्तिचंद्रापेक्षां)तुझा कीर्तिचंद्र अगदींच अद्वितीय होय. कारण त्यांत स्वतः रामचंद्र प्रेमरूप मृगाच्या रूपानें वास करीत आहेत.

तात गलानि करहु जिय जाये ।
डरहु दरिद्रहि पारस पाये ।

बाळा भरता ! इतकें होऊनहि तूं मनांत चिंतातुरच आहेस. परीस मिळूनदेखील तूं दारिद्र्यास भितोसच !

सुनहु भरत हम झूठ न कहहीँ ।
उदासीन तापस वन रहहीँ ।
सब साधन कर सुफल सुहावा ।
लषन–राम–सिय दरसन पावा ।
तेहि फल कर फल दरस तुह्मारा ।
सहित प्रयाग सुभाग हमारा ।

भरता,ऐक. आम्हीं उदासीन, तापसी आणि वनांत रहाणारे असून कधीं असत्य भाषण करणार नाहीं. सर्व साधनांचें अपूर्व फळ ह्मणजे सीतारामलक्ष्मणांचें दर्शन आणि तें आम्हांला प्राप्त झालें. त्या फलाचें फल हें तुझें दर्शन होय. प्रयागासह हें आमचें महद्भाग्य होय.

भरत धन्य तुह्म जग जस जयऊ ।
कहि अस प्रेम मगन मुनि भयऊ ।

भरता ! तूं धन्य आहेस ! जगांत यश तूंच गाज-विलेंस. '' इतकें बोलून मुनी प्रेमांत निमग्न झाले.

सुनि मुनिबचन सभासद हरषे ।
साधु सराहि सुमन सुर बरषे ।
धन्य धन्य धुनि गगन प्रयागा ।
सुनि सुनि भरत मगन अनुरागा ।

मुनिबचन ऐकून सभासद हर्षित झाले. देव 'साधु' 'साधु' असा धन्यवाद देऊन पुष्पवर्षाव करूं लागले. सर्व वातावरणांत आणि प्रयागांत 'धन्य' 'धन्य' हाच ध्वनि भरून राहिला. तो वारंवार ऐकून भरत प्रेमांत निमग्न झाला.

**दो०–पुलकगात हिय राम सिय सजल सरोरुह नैन । करि प्रनाम मुनिमंडिलिहिँ बोले गदगद बैन ॥ २०३ ॥**

भरताचा देह रोमांचित होऊन त्याचीं नेत्रकमलें अश्रूंनीं डबडबलीं आणि हृदयांत सीताराम आविर्भूत झाले ! मुनिमंडलास प्रणाम करून भरत सद्गद वाणीनें म्हणाला—

चौ०–मुनिसमाज अरु तीरथराजू ।
साचिहु सपथ अघाइ अकाजू ।
एहि थल जौँ कछु कहिय बनाई ।
एहि सम अधिक न अघ अधमाई ।
तुह्म सर्वज्ञ कहउँ सतिभाऊ ।
उर–अंतर–जामी रघुराऊ ।

''ह्या तीर्थराजाचे ठिकाणीं, त्यांतून मुनिसमाजांत शपथपूर्वक सत्याचें प्रख्यापन करणें अप्रयोजकपणाचें होय. ह्या स्थळीं कांहींहि गोष्ट रचून सांगणें ह्यासारखें किंवा ह्यापेक्षां अधिक पातक आणि नीचत्व नाहीं. आपण सर्वज्ञ आहांत आणि रघुराय सर्वांतर्यामी आहेत. मीं सत्यभावानें सांगतों.

मोहि न मातुकरतब कर सोचू ।
नहिँ दुख जिय जग जानहिँ पोचू ।

१ हें वर्णन अत्यंत मार्मिक आणि गूढ आहे. मात्र त्यांतले ध्वनि पाहण्यास हवेत. भरतचरित्रविषयक कवीचा आत्मविश्वासहि यांतून ध्वनित होऊं शकतो. पुढील चौपाया पहा, आणि या कांडाच्या अखेरच्या छंदाचें चौथें चरण लक्षांत आणा.

नाहिँ न डरु बिगरहि परलोकू ।
पितहु मरन कर मोहि न सोकू ।

मला मातेच्या कृतीबद्दल शोक वाटत नाहीं, जग मला अधम समजेल त्याची माझ्या मनास खंती वाटत नाहीं. परलोकापासून मी च्युत होईन याचीहि भीति मला नाहीं आणि पित्याच्या मृत्यूचें देखील मला दुःख वाटत नाहीं.

सुकृत सुजस भरि भुवन सुहाये ।
लछिमन–राम–सरिस सुत पाये ।
रामबिरह तजि तन छनभंगू ।
भूप सोच कर कवन प्रसंगू ।

आपल्या श्लाघनीय सुकृतानें आणि सत्कीर्तीनें ब्रह्माण्ड भरून ज्यानें रामलक्ष्मणांसारखे पुत्र प्राप्त करून घेतले आणि रामविरह होतांच ज्यानें आपल्या क्षणभंगुर देहाचा त्याग केला, त्या राजा दशरथाविषयीं शोक करण्याचें प्रयोजनच काय आहे ?

राम-लषन-सिय बिनु पग पनहीँ ।
करि मुनिबेष फिरहिँ बन बनहीँ ।

**दो०–अजिन बसन फल असन महि सयन डासि कुस पात । बसि तरुतर नित सहत हिम आतप बरषा बात ॥ २०४ ॥**

सीता, राम आणि लक्ष्मण अजिनवस्त्र परिधान करून, फलांवर निर्वाह करून, भूमीवर आंथरलेल्या तृणपल्लवांच्या शय्येवर शयन करून, तरुतलाचे ठिकाणीं वास करीत, मुनिवेषानें पायीं पदत्राणांवांचून, शीत, उष्ण, पर्जन्य आणि वायु सदैव सहन करीत वनोवनीं संचार करीत आहेत !

चौ०–एहि दुख दाह दहइ दिन छाती ।
भूख न बासर नीँद न राती ।
एहि कुरोग कर औषध नाहीँ ।
सोधेउँ सकलबिस्व मन माहीँ

ह्या दुःखाग्नीनें ही छाती दिवसरात्र जळत आहे, दिवसा भूक लागत नाहीं आणि रात्रीं झोंप येत नाहीं. मीं आपल्या मनानें सर्व विश्व धुंडाळलें तरीदेखील ह्या दुर्धर रोगावर औषधच आढळलें नाहीं.

मातु कुमत बढई अघमूला ।
तेहि हमार हित कीन्ह बसूला ।
कलि कुकाठ कर कीन्ह कुजंत्रू ।
गाडि अवधि पढि कठिन कुमंत्रू ।

माझ्या मातेची दुर्बुद्धि हिनेंच सुतार बनून त्यानें माझ्या हिताचा वाकस केला आणि त्याच्या सहाय्यानें मत्सररूप अतिचिवट लांकडाचें घातुक यंत्र बनवून तें अघोर मंत्राचा जप करून चौदा वर्षांच्या मुदतीनें गाडून टाकलें.

मांत्रिक लोक जें राज्य किंवा घर उध्वस्त करण्याचें असेल तेथें मंत्रशास्त्रविधानपूर्वक यंत्र करून गाडतात आणि सबीज उच्चाटनमंत्राचें अनुष्ठान करितात. ह्या मांत्रिक विधानावरून वरील रूपक जमविलें आहे.

मोहि लागि यह कुठाटु तेहि ठाटा ।
घालेसि सब जग बारह बाटा ।
मिटइ कुजोग राम फिरि आये ।
बसइ अवध नहिँ आन उपाये ।

मजकरितां तिनें हा सगळा उपद्व्याप घडवून आणला आणि सर्व जगाच्या बारा वाटा झाल्या. राम परत येतील तरच हा कुयोग मिटेल. एरव्हीं अयोध्येची घडी बसावयाची नाहीं. ”

भरतबचन सुनि मुनि सुख पाई ।
सबहिँ कीन्हि बहु भाँति बडाई ।
तात करहु जनि सोचु बिसेखी ।
सब दुख मिटिहि रामपग देखी ।

हें भरताचें भाषण ऐकून भरद्वाजास फार आनंद झाला. सर्व मंडळींनीं त्याची परोपरीनें वाखाणणी केली. ( ते म्हणाले, ) ‘ बाबा रे ! विशेष शोक करूं नकोस. रामपदांच्या दर्शनानेंच सर्व दुःखें नामशेष होतील. ’

**दो०–करि प्रबोध मुनिबर कहेउ अतिथि प्रेमप्रिय होहु । कंद मूल फल फूल हम देहिँ लेहु करि छोहु ॥ २०५ ॥**

असा उपदेश करून भरद्वाज म्हणालेः—“तूं आमचा अगदीं मनापासून आवडता अतिथि हो. आम्ही तुला कंद, मुळें, फळें, जें जें अर्पण करूं तें त्वां कृपा करून स्वीकारलें पाहिजे. ”

चौ०–सुनि मुनिबचन भरत हिय सोचू ।
भयउ कुअवसर कठिण सँकोचू ।
जानि गुरुइ गुरुगिरा बहोरी ।
चरन बंदि बोले कर जोरी ।
सिर धरि आयसु करिय तुह्मारा ।
परमधरम यह नाथ हमारा ।

यांप्रमाणें मुनिवाक्य ऐकून भरताच्या मनांत अशा बिकट प्रसंगीं हें मोठेंच संकट उद्भवलें म्हणून काळजी वाटली. परंतु गुरुजनांची आज्ञा ही श्रेष्ठतर जाणून तो फिरून त्यांच्या चरणांला वंदन करून हात जोडून म्हणालाः—" हे नाथ ! आपली आज्ञा शिरसावंद्य मानून त्याप्रमाणें वर्तन करणें हाच आमचा प्रधान धर्म होय. "

भरतबचन मुनिबर मन भाये।
सुचि सेवक सिष निकट बोलाये।
चाहिय कीन्हि भरतपहुनाई।
कंद मूल फल आनहु जाई।
भलेहि नाथ कहि तिन्ह सिर नाये।
प्रमुदित निज निज काज सिधाये।

हें भरताचें उत्तर मुनिवरांच्या मनास फारच आवडलें. त्यांनीं शुद्ध सेवेकरी शिष्य बोलविले, व " भरताला पाहुणचार केला पाहिजे, तुम्ही जाऊन कंदमूलफळें आणा, " ( अशी त्यांना आज्ञा करितांच ) ' बरें आहे, महाराज ' असें ह्मणून त्यांनीं नमस्कार केला आणि ते आपआपल्या कामास मोठ्या आनंदानें निघून गेले.

मुनिहि सोच पाहुन बड नेवता।
तसि पूजा चाहिय जस देवता।
सुनि रिधिसिधि अनिमादिक आईं।
आयसु होइ सो करहिं गोसाईं।

मुनीस चिंता उत्पन्न झाली कीं, पाहुणा तर मोठा बोलावला, तेव्हां आतां जशी देवता तसाच तिचा सत्कारहि व्हावयाला पाहिजे. हें ऐकून आणि-मादिसिद्धि प्रगट झाल्या ( आणि म्हणाल्या, ) हे प्रभो ! आपली जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें आम्ही करूं.

**दो०—रामबिरह ब्याकुल भरत सानुज सहित समाज । पहुनाई करि हरहु स्रम कहा मुदित मुनिराज ॥ २०६ ॥**

' भरत सानुज आणि सपरिवार रामविरहानें व्याकुळ झाला आहे, त्याचा पाहुणचार करून मंडळींचे श्रम घालविले पाहिजेत. ' असें मुनिश्रेष्ठांनीं आनंदानें त्यांना सांगितलें.

चौ०—रिधिसिधि सिर धरि मुनिबरबानी।
बडभागिनि आपुहि अनुमानी।
कहहिं परसपर सिधिसमुदाई।
अतुलित अतिथि राम-लघु-भाई।
मुनिपद बंदि करिय सोइ आजू।
होइ सुखी सब राजसमाजू।

ऋद्धिसिद्धींनीं मुनिवरांची आज्ञा शिरसावंद्य केली व स्वतःस महान् भाग्यवान् समजून सर्व सिद्धी परस्परांत म्हणूं लागल्या कीं, " हा रामाचा धाकटा भाऊ म्हणजे अद्वितीय पाहुणा घरीं आला आहे. मुनिपदांच्या कृपेनें आज असेंच करूं कीं, जेणेंकरून राजाची ही सर्वच मंडळी सुखांत गर्क होतील. "

अस कहि रचे रुचिर गृह नाना।
जेहि बिलोकि बिलखाहिं बिमाना।
भोग बिभूति भूरि भरि राखे।
देखत जिन्हहिं अमर अभिलाखे।
दासीं दास साजु सब लीन्हे।
जोगवत रहहिं मनहिं मन दीन्हे।

ह्याप्रमाणें बोलून त्यांनीं ज्यांना पाहतांच विमानें देखील लाजूं लागलीं असे भव्य आणि सुंदर वाडे निर्माण केले आणि त्यांत असें अपरिमित ऐश्वर्य आणि विलास भरून ठेवले कीं, देवांनादेखील त्यांजबद्दल अभिलाष उत्पन्न झाला. तेथील दासदासी सर्व सिद्धता करून अगदीं पाहुण्यांच्या मनांत आपलीं मनें घातल्याप्रमाणें त्यांची शुश्रूषा करूं लागल्या.

सब समाज साजि सिधि पल माहीं।
जे सुख सुरपुर सपनेहुँ नाहीं।
प्रथमहिं बास दिये सब केही।
सुंदर सुखद जथारुचि जेही।

जीं सुखें स्वर्गांत देखील स्वप्नांतहि साध्य व्हावयाचीं नाहींत त्यांची सिद्धता सिद्धींनीं एका क्षणांत केली. प्रथमच ज्यांना जशी आवडेल तशी सुंदर आणि सोईस्कर जागा देण्यांत आली.

**दो०—बहुरि सपरिजन भरत कहँ रिषि अस आयसु दीन्ह । बिधि-बिसमय-दायक बिभव मुनिबर तपबल कीन्ह ॥ २०७ ॥**

मुनिवरांनीं भरतास त्याच्या खास मंडळीसुद्धां अशीच ( इतरांप्रमाणें सिद्धिनिर्मित निवासस्थानांत राहण्याची ) आज्ञा दिली. नंतर त्यांनीं ब्रह्मदेवास देखील थक्क करून सोडण्यासारखें वैभव स्वतःसामर्थ्यानें निर्माण केलें.

चौ०—मुनिप्रभाउ जब भरत बिलोका।
सब लघु लगे लोकपति लोका।
सुखसमाज नहिँ जाइ बखानी।
देखत बिरति बिसारहिँ ज्ञानी।

मुनींचा तो प्रभाव जेव्हां भरतानें पाहिला तेव्हां त्यास सर्वच लोकपालांचे लोक तुच्छ वाटूं लागले. तेथील सुखसामुग्री अशी वर्णनातीत होती कीं, तीस पाहतांच ज्ञानवंतांस देखील वैराग्याचें विस्मरण व्हावें.

आसन सयन सुबसन बिताना।
बन बाटिका बिहँग मृग नाना।
सुरभि फूल फल अमियसमाना।
बिमल जलासय बिबिध बिधाना।
असन पान सुचि अमिय अमी से।
देखि लोग सकुचात जमी से।

आसन, शयन, सुंदर वस्त्रें, मंडप, वन, वाटिका, पक्षी, मृग हीं नानाप्रकारचीं होतीं. सुगंधिक पुष्पें, अमृतप्राय फळें, स्वच्छ जलाशय हींहि तऱ्हतऱ्हेचीं होतीं. तेथील खाद्यपेयें शुद्ध अमृताप्रमाणें मधुर होतीं. त्यांस पाहूनच मंडळी संयमनिष्ठाप्रमाणें संकोचूं लागली.

सुरसुरभी सुरतरु सबही के।
लखि अभिलाष सुरेस सची के।
रितु बसंत बह त्रिबिध बयारी।
सब कहँ सुलभ पदारथ चारी।
स्रक चंदन बनितादिक भोगा।
देखि हरख बिसमयबस लोगा।

तेथें कामधेनू आणि कल्पवृक्ष हे सर्वांच्याच घरोघरीं होते. त्यांना पाहून इंद्रइंद्राणी यांनादेखील अभिलाष उत्पन्न होई. वसंतऋतूमुळें त्रिविध वायु वहात होता. सर्वांनाच चतुर्विध पदार्थ सुलभ होते. पुष्पमाला, चंदन, वनिता इत्यादि भोग पाहूनच सर्व मंडळी आनंदांत आणि आश्चर्यांत गुरफटून गेली.

**दो०—संपति चकई भरत चक मुनिआयसु खेलवार। तेहि निसि आस्रमपीँजरा राखे भा भिनुसार ॥ २०८ ॥**

मुनिआज्ञारूप गारुड्यानें भरत आणि संपत्ति हें चक्रवाकचक्रवाकीचें जोडपें त्या रात्रीं मुनींच्या आश्रमरूप पिंजऱ्यांत घालून सूर्योदय होईपर्यंत ठेविलें. ( जसें चक्रवाकचक्रवाकी रात्रीं पिंजऱ्यांत कोंडून ठेवले तरी स्वभावसिद्ध विरहान्वितत्तेमुळें त्यांची एकत्रस्थिति नसते, तसें भरताचें मन तें ऐश्वर्य पाहूनदेखील रामविरहदुःखास्तव तिजपासून विरक्तच राहिलें, हें तात्पर्य. )

चौ०—कीन्ह निमज्जन तीरथराजा।
नाइ मुनिहिँ सिरु सहित समाजा।
रिषिआयसु असीस सिर राखी।
करि दंडवत बिनय बहु भाखी।
पथ—गति—कुसल साथ सब लीन्हे।
चले चित्रकूटहि चितु दीन्हे।

सूर्योदय होतांच तीर्थराजाचें स्नान करून सर्व समाजासहित स्वतः मुनींना नमस्कार करून, ऋषींची आज्ञा आणि आशीर्वाद शिरसावंद्य करून परोपरीनें विनवण्या आणि दण्डवत करून आणि उत्कृष्ट वाटाडे बरोबर घेऊन, भरत चित्रकूटाकडेच लक्ष देऊन चालूं लागला.

रामसखा कर दीन्हे लागू।
चलत देह धरि जनु अनुरागू।
नहिँ पदत्रान सीस नहिँ छाया।
प्रेम नेम व्रत धरम अमाया।
लषन-राम-सिय-पंथ-कहानी।
पूछत सखहि कहत मृदुबानी।

रामाचे सखे भरत आणि गुह हे हातांत हात घालून चालले असतां असें वाटे कीं, ह्या रामविषयक भक्तीच्या दोन मूर्तीच आहेत. अनवाणी, डोकींवर छत्र न घेतलेले, रामावर अकृत्रिम प्रेम हाच ज्यांचा धर्म, नियम व व्रत असे ते दोघे मित्र एकमेकांस प्रेमळ वाणीनें सीतारामलक्ष्मणांच्या वनयात्रेच्या गोष्टी विचारूं व सांगूं लागले.

राम-बास-थल-बिटप बिलोके।
उरअनुराग रहत नहिँ रोके।
देखि दसा सुर बरिषहिँ फूला।
भइ मृदु महि मग मंगलमूला।

रामचंद्राच्या वसतीचीं स्थळें आणि वृक्ष पाहून त्यांच्या अंतर्यामीं प्रेम आवरतां आवरेना. त्यांची ती स्थिति पाहून देव त्यांजवर पुष्पवृष्टि करूं लागले, पृथ्वी मृदु झाली आणि रस्ते सुखकर झाले.

**दो०—किये जाहिँ छाया जलद सुखद बहइ बरवात। तस मयउ न राम कहँ जस भा भरतहिँ जात ॥ २०९ ॥**

त्यांना प्रसन्न करण्यासाठीं मेघ छाया करूं लागले व सुखकारक वारा वाहूं लागला. (एकंदरींत) भरत जात असतां त्यास जसा मार्ग (सुखकर) लाधला तसा रामालाहि लाधला नव्हता.

चौ०—जड चेतन मग जीव घनेरे।
जे चितये प्रभु जिन्ह प्रभु हेरे।
ते सब भये परम-पद-जोगू।
भरतदरस मेटा भवरोगू।

मार्गातील पुष्कळसेच स्थावरजंगम जीव, ज्यांनीं प्रभूंना पाहिलें होतें आणि ज्यांना प्रभूंनीं पाहिलें होतें, ते सर्वच परमपदाचे अधिकारी झाले होते. तरी भरताच्या दर्शनानें त्यांचा भवरोगच हटविला.

यह बडि बात भरत कइ नाहीं।
सुमिरत जिनाहिँ राम मन माहीं।
बारेक राम कहत जग जेऊ।
होत तरन तारन नर तेऊ।

खुद्द रामच मनांत ज्याचें स्मरण करितात त्या भरतासंबंधानें ही गोष्ट म्हणजे फारशी आश्चर्यकारक नव्हे. जगांत जो कोणी रामाचें नांव नुसतें एकवेळ जरी म्हणेल तरी तोदेखील स्वतः उद्धरून जाऊन जगाचा उद्धार करील.

भरत राम प्रिय पुनि लघुभ्राता।
कस न होइ मगु मंगलदाता।
सिद्ध साधु मुनिबर अस कहहीं।
भरतहिँ निरखि हरष हिय लहहीं।

" भरत आधींच रामास प्रिय, त्यांतून त्यांचा तो कनिष्ठ बंधु, तेव्हां त्यास मार्ग मंगलप्रद कसा होणार नाहीं ? " ह्याप्रमाणें सिद्ध, साधु आणि मुनिवर म्हणत असत आणि भरताचें दर्शन घेऊन हृदयांत हर्षभरित होत असत.

देखि प्रभाउ सुरेसहि सोचू।
जग भल भलेहि पोच कहँ पोचू।
गुरु सन कहेउ करिय प्रभु सोई।
रामहिँ भरतहिँ भेँट न होई।

भरताचा तो प्रभाव पाहून इंद्रास चिंता उत्पन्न झाली. जग भल्यासच भलें दिसतें आणि वाईटासच वाईट दिसतें. इंद्र बृहस्पतीस म्हणालाः—"महाराज ! जेणेंकरून रामचंद्राची आणि भरताची गांठच पडणार नाहीं असेच आतां आपण उपाय योजले पाहिजेत.

**दो०—राम सकोची प्रेमवस भरत सप्रेम पयोधि। बनी बात बिगरन चहति करिय जतन छल सोधि॥ २१०॥**

कारण राम भिडस्त आणि प्रेमाच्या अंकित होऊन राहणारे असे असून भरत तर प्रेमाचा केवळ सागरच आहे. अगदीं हाताबोटांवर आलेली गोष्ट बिघडूं पहात आहे, तेव्हां कांहींतरी भानगड उपस्थित करून तिचा प्रयोग केला पाहिजे."

चौ०—बचन सुनत सुरगुरु मुसुकाने।
सहसनयन बिनु लोचन जाने।

इंद्राची ती कल्पना ऐकतांच देवगुरूंस हंसें लोटलें. त्यांना वाटलें कीं हा सहस्रनेत्र असूनहि आंधळाच आहे.

कह गुरु बादि छोभ छल छाडू।
इहाँ कपट कर होइहि भाँडू।
माया-पति-सेवक सन माया।
करइ त उलटि परइ सुरराया।
तब किछु कीन्ह रामरुख जानी।
अब कुचालि करि होइहि हानी।

बृहस्पति म्हणालेः—" उगीच क्षोभ करूं नकोस, हे लपंडाव अगदीं सोडून दे. येथें जर लबाडी चालविलीस तर तुझें कपट बाहेर पडेल. देवेंद्रा ! मायापतीच्या सेवकाशींच जर माया केलीं तर तीच उलट गळ्यांत अडकणार ! त्या वेळेस (राज्याभिषेकप्रसंगीं) जें कांहीं केलेंस तें समजून उमजून रामाच्या मर्जीप्रमाणेंच होतें. आतां ढवळाढवळ केलीस तर मात्र हानि होईल.

सुन सुरेस रघु-नाथ-सुभाऊ।
निजअपराध रिसाहिँ न काऊ।
जो अपराध भगत कर करई।
राम-रोष-पावक सो जरई।

हे सुरेश्वरा ! रघुनाथाचा स्वभाव ऐक. स्वतःच्या अपराधास्तव ते कधींच क्रुद्ध होत नाहींत, परंतु जर त्यांच्या भक्ताची कोणीं खोडी काढली, तर रामाचा क्रोधाग्नि त्यांस जाळून भस्म करितो.

१ बेदविरुद्ध महामुनि सिद्ध ससोक चराचर लोक उजाऱ्यो। और कहा कहुँ सीय हरी तबहूँ करुनानिधि कोप निवाऱ्यो॥ सेवक छोभतेँ छाँडि छमा तुलसि लख्यो राम सुभाउ तुम्हाऱ्यो। तौलौँ न दाबि दल्यो दसकधर जौलौँ बिभीषन लात न माऱ्यो॥ तुलसीदास.

लोकहु बेद बिदित इतिहासा।
यह महिमा जानहिँ दुरबासा।
भरतसरिस को रामसनेही।
जगु जप राम राम जप जेही।

वेदांत आणि प्रचारांत ह्या गोष्टीर्ची प्रत्यंतरें प्रसिद्धच आहेत. ह्या गोष्टीचें महत्त्व ( अंबरीषाचा छल करणारे ) दुर्वास ऋषी उत्तम जाणतात. जग ज्या रामाला जपतें, असा तो राम ज्याला जपतो त्या भरताच्या तोडीचा रामाचा लाडका आहे तरी कोण !

**दो०—मनहुँ न आनिय अमरपति रघु-बर-भगत-अकाजु। अजसु लोक परलोक दुख दिन दिन सोकसमाजु ॥ २११ ॥**

हे अमरपते ! रघुवराच्या भक्ताच्या कार्यांत व्यत्यय आणण्याचें मनांत देखील आणूं नकोस. ( आणशीलच तर ) इहलोकीं अपकीर्ति, परलोकीं दुःख आणि उत्तरोत्तर दुःखांची परंपराच मागें लागणार.

चौ०—सुनु सुरेस उपदेसु हमारा।
रामहिँ सेवक परमपियारा।
मानत सुख सेवकसेवकाई।
सेवकबैर बैरु अधिकाई।

सुरेंद्रा ! माझा उपदेश ऐक. रामाला आपला सेवक ह्मणजे पंचप्राण होय ह्मणून त्यांच्या सेवकाची शुश्रूषा केल्यानें ते प्रसन्न होतात आणि त्यांच्या सेवकार्शी वैर केल्यानें ते ज्यास्तच वैर करूं लागतात.

जद्यपि सम नहिँ राग न रोषू।
गहहिँ न पाप पुन्य गुन दोषू।
करम प्रधान बिस्व करि राखा।
जो जस करइ सो तस फल चाखा।
तदपि करहिँ सम–बिषम–बिहारा।
भगत अभगत हृदय अनुसारा।

राम हे जरी पक्षपातरहित आहेत, त्यांस जरी राग आणि लोभ दोन्हीहि नाहींत, त्यास गुणदोष, पाप-पुण्य इत्यादि भेदाभेद जरी शिवत नाहींत आणि जो जसें करील तसेंच फळ त्यास चाखावें लागेल या न्यायानें सृष्टींत जरी त्यांनीं कर्मच प्रधानभूत करून ठेविलें आहे, तथापि भक्ताभक्तांच्या इच्छेनुरूप त्यांचे व्यवहार समाचे विषमहि होत असतात.

अगुन अलेख अमान एक रस।
रामु सगुन भये भगत–प्रेम–बस।
राम सदा सेवकरुचि राखी।
बेद–पुरान–साधु–सुर–साखी।

राम हे जरी निर्गुण, अलक्ष्य, निराभिमान आणि आनंदैकरस आहेत तरी भक्तांच्या प्रेमास वश होऊन ते सगुण झाले आहेत. रामांनीं नेहमीं आपल्या भक्ताची हौस पुरविली आहे, त्याची साक्ष वेद, पुराणें, संत आणि तुम्ही देवदेखील द्याल.

अस जिय जानि तजहु कुटिलाई।
करहु भरत–पद–प्रीति सुहाई।

हें मनांत ओळखून हा आपला कुटिलपणा सोडून दे आणि भरताच्या चरणीं उत्कृष्ट प्रेमभाव ठेव.

**दो०—राम-भगत पर-हित-निरत परदुख दुखी दयाल। भगतसिरोमनि भरत तेँ जनि डरपहु सुरपाल ॥ २१२ ॥**

रामाचे भक्त दयाळू असल्याकारणानें दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होणारे आणि दुसऱ्याच्या कल्याणासाठीं जीवापाड झटणारे असतात. मग भरत हा तर भक्तांचा मुकुटमणि होय. इंद्रा ! त्याचें तूं भयच मानूं नकोस.

चौ०—सत्यसंध प्रभु-सुर-हित-कारी।
भरत राम–आयसु–अनुसारी।
स्वारथबिबस बिकल तुह्म होहू।
भरत दोसु नहिँ राउर मोहू।

प्रभु रामचंद्र हे सत्यप्रतिज्ञ आणि देवांचे हितकर्ते होत आणि भरत हा रामाज्ञेच्या मागोमाग जाणारा आहे. असें असूनहि तुम्ही केवळ स्वार्थासाठीं विव्हळ झाले आहांत, हा भरताचा दोष नसून तुमचाच आहे."

सुनि सुरबर सुर–गुरु–बर–बानी।
भा प्रमोदु मन मिटी गलानी।

सुरगुरूंचा तो श्लाघ्य उपदेश ऐकून इंद्राच्या मनास अत्यानंद झाला आणि त्याची चिंता नष्ट झाली.

बरषि प्रसून हरषि सुरराऊ।
लगे सराहन भरतसुभाऊ।
एहि बिधि भरत चले मग जाहीँ।
दसा देखि मुनि सिद्ध सिहाहीँ।

इंद्र भरताचा सद्भाव वाखाणूं लागला आणि त्याजवर आनंदानें फुलें उधळूं लागला. ह्याप्रमाणें भरत

मार्गक्रमण करीत असतां त्याची स्थिति पाहून मुनी आणि सिद्ध हे देखील त्यास धन्यवाद देऊं लागले.

जबहिँ रामु कहि लेहिँ उसासा ।
उमगत प्रेम मनहुँ चहुँ पासा ।
द्रवहिँ बचन सुनि कुलिस पषाना ।
पुरजन प्रेम न जाइ बखाना ।

'राम' म्हणून जेव्हां तो उसासे टाकी तेव्हां तर प्रेम चोहोंबाजूंनीं उचंबळून आलें आहे असें वाटे. त्याचे प्रेमोद्गार ऐकून वृक्षपाषाणांना देखील पाझर फुटे. मग खास अयोध्येंतील मंडळीचें प्रेम तर वर्णन करतांच यावयाचें नाहीं.

बीच बास करि जमुनहिँ आये ।
निरखि नीरु लोचन जल छाये ।

मध्येंच एक मुक्काम करून भरत यमुनेवर आला. तिचें जल पाहून त्याच्या डोळ्यांत खळकन् पाणी आलें.

**दो०–रघु–बर–बरन बिलोकि बर बारि समेत समाज । होत मगन बारिधि बिरह चढे बिबेक जहाज ॥ २१३ ॥**

यमुनाजलाचा हुबेहुब रघुवराप्रमाणेंच वर्ण पाहून भरत आपल्या मंडळीसकट रामविरहसमुद्रांत बुडालाच होता; परंतु तो लागलीच विवेकरूप जहाजांत चढून बसला.

चौ०–जमुनतीर तेहि दिन करि बासू ।
भयउ समयसम सबहिँ सुपासू ।

त्या दिवशीं यमुनातीरीं मुक्काम केल्यानें वेळेनुरूप सर्वांसच विश्रांति मिळाली.

रातिहिँ घाट घाट की तरनी ।
आईं अगनित जाहिँ न बरनी ।
प्रात पार भये एकहि खेवा ।
तोषे राम सखा की सेवा ।

रातोरात निरनिराळ्या घाटांवरील नावा इतक्या अगणित आल्या कीं सांगतां पुरवत नाहीं. सकाळीं एकाच खेपेंत मंडळी उतरून पार गेली. ही सेवा घडल्यामुळें गुहासहि संतोष वाटला.

चले नहाइ नदिहि सिरु नाई ।
साथ निषादनाथ दोउ भाई ।
आगे मुनि–बर–बाहन आछे ।
राजसमाज जाइ सब पाछे ।

यमुनेंत स्नानें करून आणि तीस वंदन करून भरत आणि शत्रुघ्न हे दोघे बंधु गुहाबरोबर निघाले. मुनिवरांचा उत्तम रथ आघाडीस होता. ( मध्यें ) राजमंडल होतें, आणि बाकी सर्वजण मागाहून जात होते.

तेहि पाछे दोउ बंधु पयादे ।
भूषन बसन बेष सुठि सादे ।
सेवक सुहृद सचिवसुत साथा ।
सुमिरत लषनु सीय रघुनाथा ।
जहँ जहँ राम–बास–बिस्रामा ।
तहँ तहँ करहिँ सप्रेम प्रनामा ।

त्यांच्या मागोमाग वस्त्रालंकारादि अगदींच साधा पोषाख करून आणि नोकरमाणसें, मित्रमंडळी आणि सचिवपुत्र यांस समागमें घेऊन स्वतः दोघे बंधु सीतारामलक्ष्मणांचें स्मरण करीत आणि जेथें जेथें रामांनीं वास केला किंवा विश्रांति घेतली त्या त्या स्थळांस प्रेमपूर्वक प्रणाम करीत करीत पायींपायींच चालूं लागले.

**दो०–मगबासी नरनारि सुनि धामकाम तजि धाइ । देखि सरूप सनेह सब मुदित जनमफलु पाइ ॥ २१४ ॥**

तें ऐकून मार्गस्थ स्त्रीपुरुष आपलीं गृहकृत्यें तशींच सोडून धांवत सुटले आणि दोघांहि बंधूंचें सुस्वरूप पाहून सर्वजण प्रेमवेश होत्साते जन्मसाफल्य झाल्याप्रमाणें हर्षित झाले.

चौ०–कहहिँ सप्रेम एक एक पाहीं ।
रामुलषनु सखि होहिँ कि नाहीं ।
बय बपु बरन रूपु सोइ आली ।
सीलु सनेहु सरिस सम चाली ।
बेषु न सो सखि सीय न संगा ।
आगे अनी चली चतुरंगा ।
नहिँ प्रसन्नमुख मानस खेदा ।
सखि संदेहु होइ येहि भेदा ।

स्त्रिया प्रेमपूर्वक आपापसांत बोलूं लागल्या. ( त्यांपैकीं एक स्त्री म्हणाली, ) कीं, " गडे ! वय, आंगलट, रंग आणि रूप हे तर अगदीं तेच, शील आणि प्रेम हेहि सारखेच, आणि चालण्याची ढबहि हुबेहूब तीच. तरी गडे ! हे रामलक्ष्मणच आहेत किंवा काय कोण जाणे ! ( कारण ) पोषाख तो

नाहीं, समागमें सीता नाहीं, समोर चतुरंग दळ चाललें आहे, मुख प्रसन्न नसून अंतर्यामीं दुःखी आहेत. ह्या विसंगतपणावरून सखे ! संशय वाटतो."

तासु तरक तियगन मन मानी।
कहहिँ सकल तोहि सम न सयानी।

तिचा तर्क बाकीच्या स्त्रियांनाहि पटला आणि त्या सर्वजणी तीस म्हणाल्या कीं, तुझ्यासारखी शहाणी स्त्रीच नाहीं.

तेहि सराहि बानी फुरि पूजी।
बोली मधुरबचन तिय दूजी।
कहि सप्रेम सब कथाप्रसंगू।
जेहि बिधि राम-राज-रस-भंगू।
भरतहि बहुरि सराहन लागी।
सील सनेह सुभाय सुभागी।

तीस वाखाणून आणि तिच्या बोलण्यास दुजोरा देऊन दुसरी एक स्त्री मधुर शब्दानें बोलूं लागली. रामराज्याभिषेकाच्या रंगाचा भंग कसा झाला त्या प्रसंगाचें संगतवार वर्णन तिनें प्रेमपूर्वक केलें. नंतर ती साध्वी भरताचें शील, प्रेम आणि स्वभाव यांचीहि प्रशंसा करूं लागली.

**दो०—चलत पयादेहि खात फल पिता दीन्ह तजि राजु। जात मनावन रघुबरहिँ भरसरिस को आजु ॥ २१५ ॥**

(ती म्हणाली,) "पित्यानें दिलेलें राज्य झुगारून देऊन नुसत्या फलमूलांवर राहणाऱ्या रघुवराची समजूत घालण्यासाठीं पायींच चालत जात असलेल्या भरतासारखा ह्या घटकेस कोण आहे ?

चौ०—भायप भगति भरत आचरनू।
कहत सुनत दुख-दूषन-हरनू।
जो किछु कहब थोर सखि सोई।
रामबंधु अस काहे न होई।
हम सब सानुज भरतहिँ देखे।
भइन्ह धन्य जुवतीजन लेखे।

भरताचें बंधुप्रेम आणि आचरण ह्यांच्या चर्चेनें आणि श्रवणानें दुःखें आणि पातकें यांचें क्षालन झालेंच पाहिजे. सखे ! त्यांच्यासंबंधानें जेवढें म्हणून बोलावें तेवढें थोडेंच होणार. रामाचाच बंधु तो, तो असा कां असणार नाहीं ? आपण सर्वजणी त्या भरतास बंधूसकट पाहून युवतीजनांच्या दृष्टीनें धन्य झालों आहोंत."

सुनि गुन देखि दसा पछिताहीँ।
कैकेइ-जननि-जोग सुतु नाहीँ।

भरताचे गुण ऐकून आणि त्याची दशा पाहून त्या अगदीं हळहळून ह्मणत कीं, "कैकेयीसारख्या आईस शोभण्याजोगा हा मुलगा नव्हेच."

कोउ कह दूषनु रानिहि नाहिँन।
बिधि सबु कीन्ह हमहिँ जो दाहिन।
कहँ हम लोक-बेद-बिधि-हीनी।
लघुतिय कुल-करतूति-मलीनी।
बसहिँ कुदेस कुगावँ कुबामा।
कहँ यह दरसु पुन्यपरिनामा।

कोणी ह्मणूं लागल्याः—"कैकेयीकडे दोष ह्मणून मुळींच नाहीं. आपलें नशीबच अनुकूल ह्मणून तर त्यानें हें अवघेंच जुळवून आणलें. (नाहींतर) शास्त्रव्यवहाररीतीनें हिणकट, कुळानें आणि राहणीनें मळकट, दुष्ट प्रदेश आणि कुग्राम अशा ठिकाणीं राहणाऱ्या आपण कळकट आणि हीन बायका कोठें आणि हें पुण्यपावनदर्शन कोठें ?"

अस अनंद अचरजु प्रतिग्रामा।
जनु मरुभूमि कलपतरु जामा।

मारवाडांत कल्पतरू उगवल्याप्रमाणें गांवोगांवीं असाच आनंद आणि असेंच कौतुक होऊं लागलें.

**दो०—भरतदरस देखत खुलेउ मग लोगन्ह कर भागु। जनु सिंहलबासिन्ह भयउ बिधिबस सुलभ प्रयागु ॥ २१६ ॥**

भरताचें दर्शन घेत असतांना वाटेंतील लोकांचें भाग्य असें कांहीं खुलत चाललें कीं, जणुंकाय सिंहलद्वीपस्थांना प्रयागच अगदीं सुलभ झालें आहे.

चौ०—निज-गुन-सहित राम-गुन-गाथा।
सुनत जाहिँ सुमिरत रघुनाथा।
तीरथ मुनिआस्रम सुरधामा।
निरखि निमज्जहिँ करहिँ प्रनामा।
मनहीँ मन मागहिँ बर एहू।
सीय-राम-पद-पदुम सनेहू।

निजगुणांसह रामगुणगण श्रवण करीत व रामस्मरण करीत करीत जात असतांना तीर्थें, मुनींचे आश्रम, देवस्थानें, यांचें दर्शन घडतांच भरतानें स्नान करून साष्टांग नमस्कार करावा आणि मनांतल्यामनांत त्यांजजवळ हाच वर मागावा कीं, 'सीतारामपदकमलांचे ठिकाणीं माझी भक्ति राहो.'

मिलहिँ किरात कोल बनबासी।
बैखानस बटु जती उदासी।
करि प्रनामु पूछहिँ जेहि तेही।
केहि बन लषनु रामु बैदेही।
ते प्रभुसमाचार सब कहहीँ।
भरतहिँ देखि जनमफलु लहहीँ।
जे जन कहहिँ कुसल हम देखे।
ते प्रिय राम-लषन-सम लेखे।

वानप्रस्थ, ब्रह्मचारी, यती, उदासी, भिल्ल, कोळी वगैरे वनांत राहणारे लोक भेटले म्हणजे त्या प्रत्येकास प्रणाम करून सीतारामलक्ष्मण कोणत्या वनांत आहेत म्हणून भरतानें विचारावें. त्यांनीं प्रभूंचा समाचार इत्थंभूत निवेदन करावा आणि भरताच्या दर्शनानें जन्माचें साफल्य करून घ्यावें. आम्हीं त्या त्रिवर्गांना सुखरूप पाहिलें असें ज्या ज्या लोकांनीं सांगावें, त्यांना त्यांना भरतानें रामलक्ष्मणां-प्रमाणें प्रिय मानावें.

एहि बिधि बूझत सबहिँ सुबानी।
सुनत राम बन-बास-कहानी।

ह्याप्रमाणें त्यानें प्रेमळ शब्दांनीं रामवनवासाच्या गोष्टी सर्वांनाच विचाराव्या आणि त्यांजकडून त्याच ऐकत असाव्या.

**दो०-तेहि बासर बसि प्रातहीं चले सुमिरि रघुनाथ। रामदरस की लालसा भरत सरिस सब साथ॥ २१७॥**

तो दिवस तेथेंच काढून प्रातःकाल होतांच रामाचें स्मरण करून मंडळी निघाली. भरताप्रमाणेंच सर्व मंडळींना त्या दिवशीं रामदर्शनाची उत्कंठा वाटूं लागली.

चौ०-मंगल सगुन होहिँ सब काहू।
फरकहिँ सुखद बिलोचन बाहू।
भरतहि सहित समाज उछाहू।
मिलिहहिँ रामु मिटिहि दुषदाहू।

सर्वांनाच शुभशकुन जाणवूं लागले. त्यांच्या नेत्रांचें आणि बाहूंचें आनंदसूचक स्फुरण होऊं लागलें. राम भेटावेत आणि आपला शोकाग्नि शमावा हीच भरतासह एकंदर मंडळींस उत्सुकता वाटे.

करत मनोरथ जस जिय जाके।
जाहिँ सनेहसुरा सब छाके।
सिथिल अंग पग मग डगि डोलहिँ।
बिहवल बचन प्रेमबस बोलहिँ।

ज्याचें जसें मन तशीच त्याची प्रवृत्ति होऊं लागली आणि ( त्या प्रवृत्तीच्या भरांत ) ते सर्व प्रेममदिरेनें धुंद होऊन वाटेनें चालत असतां त्यांचे देह अगदीं खिळखिळे झाले. त्यांचे पाय डळमळूं लागले आणि त्या प्रेमाच्या आवेशांतच ते विव्हल होऊन बरळत सुटले.

रामसखा तेहि समय देखावा।
सैलसिरोमनि सहज सुहावा।
जासु समीप सरित-पय-तीरा।
सीयसमेत बसहिँ दोउ बीरा।

तशांतच, ज्याच्या आसमंताद्भागीं पयस्विनी नदी वाहत आहे आणि तिच्या तटावर सीतेसहित दोघे वीर वास्तव्य करीत आहेत असा तो सहज-सुशोभित शैलशिरोमणि चित्रकूट गुहानें दाखविला.

देखि करहिँ सब दंडप्रनामा।
कहि जय जानकिजीवन रामा।
प्रेममगन अस राजसमाजू।
जनु फिरि अवध चले रघुराजू।

त्याला पाहतांच 'जय जानकीजीवना रामा' असें म्हणून सर्वांनीं साष्टांग नमस्कार घातले. त्या वेळेस तो राजसमाज प्रेमांत इतका कांहीं निमग्न होऊन गेला कीं, जणुंकाय रघुराज अयोध्येसच परत चालले आहेत असें वाटे.

**दो०-भरत प्रेम तेहि समय जस तस कहि सकइ न सेषु। कबिहि अगम जिमि ब्रह्मसुख अह-मम-मलिन-जनेषु॥२१८॥**

त्या प्रसंगीं भरताचे अंतःकरणांत जो प्रेमाविर्भाव झाला तो तसाच शब्दांनीं आळविण्याची शेषाची देखील प्राज्ञा नाहीं. अहंममत्वानें कलुषित झालेल्या जीवास ब्रह्मसुख जसें अतर्क्य, तद्वत् भरताचेंहि प्रेम कविकल्पनातीतच होय.

चौ०-सकल सनेह सिथिल रघुबर के।
गये कोस दुइ दिनकर ढरके।
जल थल देखि बसे निसि बीते।
कीन्ह गवन रघु-नाथ-पिरीते।

रघुवराच्या प्रेमामुळें सर्वच शिथिल झाले होते-त्या कारणानें ते दोन कोस जातात तोंच सूर्य

खालावला. तेव्हां पाणी आणि उतार शोधून तळ देण्यात आला. रात्र संपतांच रघुपुंगवाचा तो भक्तमेळा चालूं लागला.

उहाँ रामु रजनीअवसेखा।
जागे सीय सपन अस देखा।
सहित समाज भरत जनु आये।
नाथबियोग ताप तन ताये।
सकल मलिनमन दीन दुखारी।
देखीं सासु आन अनुहारी।

इकडे उत्तररात्रीं राम जागे झाले. (त्याच रात्रीं) सीतेस असें स्वप्न पडलें कीं, जणूं नाथांच्या वियोगतापानें तप्तांग झालेला भरत समाजासह आला आहे. तीस सर्वच मंडळी उदास, दीन आणि दुःखी दिसली, आणि सासवा तर अगदीं कशाशाच दिसल्या.

सुनि सियसपन भरे जल लोचन।
भये सोचबस सोचबिमोचन।
लषन सपन यह नीक न होई।
कठिन कुचाह सुनाइहि कोई।
अस कहि बंधुसमेत नहाने।
पूजि पुरारि साधु सनमाने।

सीतेचें स्वप्न ऐकून, ते जगताचा शोक नाहींसा करणारे रामराय स्वतःच शोकग्रस्त झाले आणि त्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले! ते म्हणाले:— "लक्ष्मणा! हें स्वप्न कांहीं ठीक नाहीं. कोणी ना कोणी कांहींतरी नकोनकोसें वेडेंवांकडें ऐकविणार" असें बोलून रामचंद्रांनीं बंधूसह स्नान केलें आणि शिवार्चन करून संतांचा सत्कार केला.

**छंद—सनमानि सुर मुनि बंदि बैठे उतर दिसि देखत भये। नभ धूरि खग मृग भूरि भागे बिकल प्रभु आस्रम गये॥ तुलसी उठे अवलोकि कारनु काह चित सचकित रहे। सब समाचार किरात कोलन्हि आइ तेहि अवसर कहे॥ ९॥**

रामचंद्र देवपूजा आटोपून आणि मुनींना वंदन करून बसले असतां उत्तरेकडून आकाश धुळीनें व्याप्त झालें असून खगमृग जीव घेऊन भराऱ्या मारीत आश्रमाकडेसच येत आहेत असें प्रभूंच्या दृष्टीस पडलें. तुलसीदास सांगतातः—प्रभु उठले आणि असें होण्याचें काय कारण म्हणून पहात आहेत तोंच ते मनांत अगदीं चकित होऊन गेले. तितक्यांत कोलकिरातांनीं येऊन त्यांस सगळी वर्दी दिली.

**सो०—सुनत सुमंगल बैन मन प्रमोद तन पुलक भर। सरदसरोरुह नैन तुलसी भरे सनेह जल॥ ९॥**

तुलसीदास सांगतातः—ती अत्यंत शुभ वार्ता ऐकतांच त्यांच्या हृदयांत आनंद होऊन व शरीर रोमांचित होऊन त्यांचे शरत्कमलाप्रमाणें असलेले नेत्र प्रेमाश्रूंनीं डवडवून आले.

चौ०—बहुरि सोच बस भे सियरवनू।
कारन कवन भरतआगमनू।

परंतु फिरून भरताच्या येण्याचें प्रयोजन काय असावें असें वाटून सीतारमण अगदीं सचिंत झाले.

एक आइ अस कहा बहोरी।
सेन संग चतुरंग न थोरी।
सो सुनि रामहि भा अति सोचू।
इत पितुबच उत बंधुसँकोचू।
भरतसुभाउ समुझि मन माहीं।
प्रभुचित हितथिति पावत नाहीं।
समाधान तब भा यह जाने।
भरत कहे महँ साधु सयाने।

नंतर एकानें येऊन हेंहि बजावून सांगितलें कीं, भरताच्या समागमें चतुरंग सैन्य देखील भरपूर आहे. तें ऐकून तर रामाला एकीकडे पित्याची आज्ञा आणि दुसरीकडे भरताची भीड अशी दुहेरी विवंचना लागली. भरताच्या स्वभावाची मनांत कल्पना येऊन प्रभूंच्या चित्तास चांगलीशी स्वस्थता वाटेना. परंतु भरत माझ्या एका वचनांत असून तो सुज्ञ आणि समंजस आहे इतकें मनांत येतांच त्यांचें समाधान झालें.

लषन लखेउ प्रभु-हृदय-खभारू।
कहत समयसम नीतिबिचारू।
बिनु पूछे कछु कहहुँ गोसाईं।
सेवकसमय न ढीठ ढिठाई।
तुम्ह सर्बज्ञ सिरोमनि स्वामी।
आपनि समुझि कहउँ अनुगामी।

प्रभूंच्या मनाची चलबिचल लक्षांत आणून लक्ष्मण प्रासंगिक इतिकर्तव्यतेचा विचार बोलूं

लागला. "महाराज ! न विचारतां मीं कांहीं बोलत आहे. स्वामिनिष्ठाचा निर्भीडपणा हा उर्मटपणा नव्हे. स्वामिन् ! आपण सर्वज्ञशिरोमणीच आहांत. तरीपण मी सेवकानेंहि आपल्या अकलेप्रमाणें सुचविलेंच पाहिजे.

दो०—नाथ सुहृद सुठि सरलचित सील–
सनेह–निधान । सब पर प्रीति प्रतीति
जिय जानिय आपु समान ॥ २१९ ॥

हे नाथ ! आपण खुद्द चांगल्या अंतःकरणाचे आणि सरळ मनाचे असून शील आणि स्नेह ह्यांचें केवळ आगरच आहांत. आपलें सर्वांवरच प्रेम आणि विश्वास असल्यामुळें आपण स्वतःप्रमाणेंच सर्वांना लेखीत असतां.

चौ०—बिषयी जीव पाइ प्रभुताई ।
मूढ मोहबस होहिँ जनाई ।
भरत नीतिरत साधु सुजाना ।
प्रभु-पद-प्रेम सकलजग जाना ।
तेऊ आजु राजपदु पाई ।
चले धरममरजाद मेटाई ।

परंतु विषयांध प्राणी मात्र प्रभुत्व पावल्यावर मूढ आणि मोहवश होऊन इतरांस जाचक बनतात. तथापि, भरत म्हणजे साधु, सुज्ञ आणि नीतितत्पर असून त्याचें प्रभुपदीं असलेलें प्रेम सर्व जगाला विदित आहे. असें असूनहि तो आज राज्यपद मिळाल्याबरोबर धर्ममर्यादेचें उल्लंघन करण्यास निघाला आहे.

कुटिल कुबंधु कुअवसरु ताकी ।
जानि राम बनबास एकाकी ।
करि कुमंत्र मन साजि समाजू ।
आये करइ अकंटक राजू ।
कोटिप्रकार कलपि कुटिलाई ।
आये दल बटोरि दोउ भाई ।

हा आमचाच कुटिल आणि दुष्ट भाऊ आम्हांवरील वाईट प्रसंग ओळखून आणि रामास वनवासी आणि एकाकी समजून, निष्कंटक राज्य करण्यासाठीं आमच्या घाताचा हेतु मनांत धरून लावलष्करानिशीं आलेला आहे. कुटिलपणाचे नाहीं नाहीं ते प्रकार कल्पून दोघेहि बंधु फौजफांटा गोळा करून आले आहेत.

जौँ जिय होंति न कपट कुचाली ।
केहि सोहाति रथ-बाजि-गजाली ।
भरतहि दोष देइ को जाये ।
जग बौराइ राजपद पाये ।

जर त्यांच्या मनांत दंगाधोपा किंवा कपट नसतें तर हे हत्ती, घोडे, रथ वगैरेंचें लटांबर कशास हवें होतें ? भरतासच म्हणून दोष द्यावयाला कोण बसलें आहे ? राज्यपद मिळालें कीं, अवघें जगच उल्लू बनतें.

दो०—ससि गुरु-तिय-गामी नहुष चढेउ भूमि-
सुर-जान । लोकबेद तेँ बिमुख भा
अधम न बेनसमान ॥ २२० ॥

चंद्र गुरुपत्नीरत झाला, नहुषानें आपल्या पालखीला ब्राह्मण लावले, व लौकिक आणि शास्त्र यांची पायमल्ली करणाऱ्या वेनराजासारखा[1] अधमच कोणी झाला नाहीं.

चौ०—सहसबाहु सुरनाथ त्रिसंकू ।
केहि न राजमद दीन्ह कलंकू ।

सहस्रार्जुन, देवेंद्र, त्रिशंकु[2], ह्यांतून कोणास राज्यमदानें कलंक लाविला नाहीं ?

भरत कीन्ह यह उचित उपाऊ ।
रिपु रिन रंच न राखब काऊ ।

---

१ हा अंगदेशचा राजा. त्यानें एकदां दवंडी पिटविली कीं; लोकांनीं सर्व कर्मे ब्रह्मार्पण न करितां राजा ( वेना ) सच अर्पण करावीं. ब्राह्मणांचा उपदेश पायाखालीं तुडवून वेन हा त्यांना अपशब्द बोलूं लागला. तेव्हां ऋषींनीं त्या अधमास ठार केलें.

२ त्रिशंकुराजास सदेह स्वर्गी जाण्याची इच्छा उत्पन्न होऊन तो वसिष्ठांनीं झिडकारून टाकल्यावर विश्वामित्रास शरण गेला. त्यांनीं यज्ञ आरंभिला परंतु देवता येईनात. विश्वामित्रांनीं निराळ्याच देवता निर्माण केल्या. पुढें तो स्वर्गी तर गेलाच, परंतु इंद्रानें तेथून त्यास ढकलून दिलें. तो पडत आहे असें पाहतांच विश्वामित्रांनीं मध्येंच थांबण्याची त्यास आज्ञा केली. तेव्हांपासून त्याच्या तपःसामर्थ्यामुळें तो अद्याप नभोमंडलांत मध्येंच चमकत आहे. कर्मनाशानदी ही त्रिशंकूचीच लाळ होय आणि तिच्या स्पर्शानें पुण्याचा ऱ्हास होतो अशी पौराणिक कथा आहे.

एक कीन्हि नहिँ भरत भलाई।
निदरे राम जानि असहाई।
समुझि परिहि सोउ आजु बिसेखी।
समर सरोष राममुख पेखी।

शत्रु आणि ऋण यत्किंचित् देखील शिल्लक राहूं देतां कामा नये म्हणून भरतानें हा अगदीं बिनतोड उपाय योजिला आहे. परंतु राम निव्वळ एकटे आहेत अशा समजुतीवर जो त्यानें त्यांचा धिक्कार केला आहे, तें मात्र भरतानें बरोबर केलें नाहीं. समरांगणांत रामाची सक्रोध मुद्रा पाहून आजच त्याला विशेष काय ती प्रचीति येईल.''

एतना कहत नीतिरस भूला।
रन-रस-बिटप पुलक मिस फूला।
प्रभुपद बंदि सीसरज राखी।
बोले सत्य सहज बल भाखी।

लक्ष्मण इतकें बोलत आहे तोंच तो नीतितत्त्व विसरला आणि पुलकांच्या मिषानें केवळ वीररसाचा वृक्षच फुलल्याप्रमाणें भासला. प्रभुपदांस वंदन करून आणि त्यांचे पदरज मस्तकीं धारण करून आपल्या निसर्गसिद्ध बलाचें प्रख्यापन करून त्यानें प्रतिज्ञा केली.

अनुचित नाथ न मानब मोरा।
भरत हमहिँ उपचार न थोरा।
कहँ लगि सहिय रहिय मन मारे।
नाथसाथ धनु हाथ हमारे।

" प्रभूंनीं माझें म्हणणें अनुचित मानूं नये. भरतानें आमची कांहीं थोडीथोडकी संभावना केली नाहीं. माझे धनी माझ्या पाठीशीं असतां आणि माझ्या हातांत धनुष्य असतां कोठपर्यंत ( अपमान ) सहन करावे आणि निर्बल ( प्रेतवत् ) मनानें रहावें ?

**दो०—छत्रिजाति रघु-कुल-जनम रामअनुज जग जान। लातहुँ मारे चढति सिर नीच को धूरिसमान ॥ २२१ ॥**

मीं जातिवंत क्षत्रिय असून, रघुकुलांत जन्म घेतला आहे; आणि रामाचा मी पाठीचा भाऊ आहे हें सर्व जगाला मशहूर आहे. धुळीसारखी नीच कोण असेल ? परंतु तिला देखील लाथेनें तुडवली असतां, ती डोक्यावरच जाऊन स्वार होते ! ''

**चौ०—उठि कर जोरि रजायसु माँगा।**
**मनहुँ बीररस सोवत जागा।**

बाँधि जटा सिर कसि कटि भाथा।
साजि सरासन सायक हाथा।

( इतकें बोलून ) लक्ष्मण उठला आणि मस्तकावरील जटाभार सावरून, कमरेला भाते कसून आणि हातांत धनुष्यबाण सज्ज करून त्यानें रामाजवळ हात जोडून आज्ञा मागितली. त्या वेळीं लक्ष्मण जणुंकाय घोरत पडलेला वीररसच खडबडून उठला आहे असा भासला.

आजु रामसेवक जसु लेऊँ।
भरतहिँ समर सिखावन देऊँ।
रामनिरादर कर फल पाई।
सोवहु समरसेज दोउ भाई।

लक्ष्मण म्हणाला, " भरताला समरांगणांत धडा घालून देऊन आज मी रामसेवक म्हणून स्वतःस गाजवून घेणार आणि रामाच्या अमर्यादेचें फळ पदरीं बांधून त्या दोघांहि भावांस समरशय्येवर निजाविणार !

आइ बना भल सकलसमाजू।
प्रकट करउँ रिस पाछिल आजू।
जिमि करिनिकर दलइ मृगराजू।
लेइ लपेटि लवा जिमि बाजू।
तैसेहि भरतहि सेनसमेता।
सानुज निदरि निपातउँ खेता।

सर्व जय्यत तयारीनिशीं भरत येत आहे हेंहि फार नामी झालें. आज मीहि आपला मागचा एकंदर सूड उगवून घेईन. ज्याप्रमाणें एकटाच सिंह गजसमूहाचें निर्दालन करतो किंवा ससाणा जसा लावी पक्ष्यास झपाटतो, तद्वत् मीहि भरतास आणि त्याच्या भावास त्यांच्या सैन्यासकट रणमैदानांत तुडवून मारीन.

जौँ सहाय कर संकर आई।
तौँ मारउँ रन रामदोहाई।

त्याच्या सहाय्यार्थ जरी प्रत्यक्ष श्रीशंकर धांवून आले, तरीदेखील रामाचीच शपथ मी त्यांस रणांत लोळवीन. ''

**दो०—अतिसरोष माखे लषन लखि सुनि सपथप्रवान। सभय लोक सब लोकपति चाहत भभरि भगान ॥ २२२ ॥**

याप्रमाणें रागानें अगदींच बेफाम झालेल्या लक्ष्मणास पाहून आणि त्याची शपथपूर्वक प्रतिज्ञा

ऐकून सर्व लोकपालांस धडकी भरून ते भराभर पलायन करण्याचा बेत करूं लागले.

चौ०—जग भयमगन गगन भइ बानी।
लषन-बाहु-बल बिपुल बखानी।
तात प्रतापप्रभाउ तुह्मारा।
को कहि सकइ को जाननिहारा।
अनुचित उचित काज कछु होऊ।
समुझि करिय भल कह सब कोऊ।
सहसा करि पाछे पछिताहीँ।
कहहिँ बेद बुध ते बुध नाहीँ।

सर्व जग भयभीत झालें. तेव्हां आकाशवाणी झाली. तिनें लक्ष्मणाच्या बाहुबलाची बहुत प्रशंसा केली कीं, " बा लक्ष्मणा ! तुझा प्रताप व प्रभाव कोणास जाणवेल ? आणि वर्णन तरी कोणास करवेल ? कोणतेंहि इष्टानिष्ट कार्य समजून घेऊन नंतर करणारास सर्वच लोक चांगले म्हणतात. साहस करून मागाहून पश्चात्ताप करीत बसणारे लोक सुज्ञ नव्हत असा शास्त्रांचा आणि विद्वानांचा सिद्धांत आहे. "

सुनि सुरबचन लषन सकुचाने।
राम सीय सादर सनमाने।

अशाप्रकारें देववाणी ऐकल्यावर लक्ष्मण ओशाळला आणि त्यानें सीतारामांस नम्रपणें नमस्कार केला.

कही तात तुम्ह नीति सुहाई।
सब तेँ कठिन राजमद भाई।
जो अँचवत माँतहिँ नृप तेई।
नाहिँन साधु सभा जेहि सेई।
सुनहु लषन भल भरतसरीसा।
बिधिप्रपंच महँ सुना न दीसा।

तेव्हां ( राम म्हणाले ):—" बा लक्ष्मणा ! तूं उत्कृष्ट राजनीतीच सांगितलीस. बंधो ! राजमद हा सर्वाहून दुर्धर असतो. परंतु ज्यांनीं कधीं सत्संग सेवन केलाच नाहीं असेच राजे त्याच्या सेवनानें उन्मत्त होतात. लक्ष्मणा ! ऐक. भरतासारखा सज्जन साऱ्या ब्रह्मसृष्टींत ऐकिवांत नाहीं अगर पाहण्यांतहि नाहीं.

दो०—भरतहि होइ न राजमद बिधि-हरि-
हर-पद पाइ। कबहुँ कि काँजीसीकरनि
छीरसिंधु बिनसाइ॥ २२३॥

भरत हा विधि, हरि, हर, यांच्या अधिकाराला जरी पोंचला तरी त्याला राज्यमद येणें शक्य नाहीं. कांजीच्या शिंतोड्यानें क्षीरसमुद्र कधीं तरी नासेल काय ?

चौ०—तिमिर तरुन तरनिहि सकु गिलई।
गगन मगन मकु मेघहि मिलई।
गोपद जल बूडहिँ घटजोनी।
सहज छमा बरु छाडइ छोनी।
मसकफूँक मकु मेरु उडाई।
होइ न नृपमद भरतहि भाई।
लषन तुह्मार सपथ पितुआना।
सुचि सुबंधु नहिँ भरतसमाना।

अंधकार हा मध्यान्हींच्या सूर्यास देखील ग्रासूं शकेल, किंबहुना आकाश मेघांत मिसळून त्यांत समाविष्ट होऊन राहील, गोष्पदजलांत ( गाईच्या खुराएवढ्या पाण्यांत ) अगस्त्यऋषि बुडून जातील, पृथ्वी आपली स्वभावसिद्ध क्षमा सोडून देईल आणि मशकांच्या फुंकेसरशीं मेरुपर्वतहि उडून जाईल, परंतु हे बंधो लक्ष्मणा ! भरताला राज्याचा मद येणार नाहीं. लक्ष्मणा, मी तुझी आणि पित्याचीहि शपथ घेऊन सांगतों कीं भरताच्या तोडीचा असा पवित्र आणि प्रेमळ बंधूच नाहीं.

सगुनषीर अवगुनजल ताता।
मिलइ रचइ परपंच बिधाता।
भरत हंस रबि-बंस-तडागा।
जनमि कीन्ह गुन-दोष-बिभागा।
गहि गुन पय तजि अवगुन बारी।
निजजस जगत कीन्हि उँजियारी।

बाळा ! विधात्यानें ह्या प्रपंचाची रचना गुणदोषरूप क्षीरनीराचें संमिश्रण करून केलेली आहे. त्या गुणावगुणांचें पृथक्करण जर कोणीं केलें असेल तर तें ह्या आपल्या रघुवंशरूप मानससरोवरांत जन्मास आलेल्या भरतानेंच केलें आहे. गुणरूप दुग्ध ग्रहण करून आणि अवगुणरूप जलाचा त्याग करून त्यानें आपल्या यशानें हें जग प्रकाशमय करून सोडिलें आहे. "

कहत भरत-गुन-सील-सुभाऊ।
प्रेमपयोधि मगन रघुराऊ।

याप्रमाणें भरताच्या गुणशीलस्वभावाचें वर्णन करीत असतां रघुराय प्रेमसागरांत निमग्न झाले.

दो०–सुनि रघु–बर–बानी बिबुध देखि भरत पर हेतु। सकल सराहत राम सोँ प्रभु को कृपानिकेतु॥ २२४॥

रघुवराची ती वाणी ऐकून आणि त्यांचें भरतावरील प्रेम पाहून, रामाप्रमाणें दयाघन प्रभु कोण आहे? ह्मणून सर्वच देव त्यांची स्तुति करूं लागले कीं,—

चौ०–जौँ न होत जग जनम भरत को।
सकल–धरम–धुर धरनि धरत को।
कबि–कुल–अगम भरत–गुन–गाथा।
को जानइ तुम्ह बिनु रघुनाथा।
लषन राम सिय सुनि सुरबानी।
अतिसुख लहेउ न जाइ बखानी।

"भरताचा जन्मच जर जगांत झाला नसता तर ह्या पृथ्वीवर सर्व धर्मांचें धुरीणत्व कोणीं धारण केलें असतें? भरताची गुणगाथा कविकुलास देखील अगम्य होय. हे रघुनाथ! आपणाविरहित ती कोण बरें जाणणार?" देवांचें हें भाषण ऐकून सीतारामलक्ष्मणांस इतका आनंद झाला कीं, तो सांगतां पुरवत नाहीं.

इहाँ भरत सबसहित सहाये।
मंदाकिनी पुनीत नहाये।
सरितसमीप राखि सब लोगा।
माँगि मातु–गुरु–सचिव–नियोगा।
चले भरत जहँ सियरघुराई।
साथ निषादनाथ लघुभाई।

इकडे भरतानें सर्व मंडळींसह पवित्र मंदाकिनींत यथेच्छ स्नान केलें आणि एकंदर मंडळींना तेथेंच जवळपास थोपवून, आणि माता, गुरु, आणि सचिव यांचा निरोप घेऊन तो शत्रुघ्न आणि गुह यांना मात्र बरोबर घेऊन सीताराम होते त्या ठिकाणीं जावयास निघाला.

समुझि मातुकरतब सकुचाहीँ।
करत कुतरक कोटि मन माहीँ।
राम–लषन–सिय सुनि मम नाऊँ।
उठि जानि अनत जाहिँ तजि ठाऊँ।

आपल्या मातेच्या कर्तबगारीचा विचार मनांत येतांच तो अगदीं थिजूनच जात असे. त्याच्या हृदयांत संशयानें काहूर करून सोडलें. "माझें नांव ऐकतांच राम, लक्ष्मण आणि सीता आपलें स्थान सोडून अन्यत्र तर जाणार नाहींत ना?

दो०–मातु मते महँ मानि मोहि जो किछु कहहिँ सो थोर। अघअवगुन छमि आदरहिँ समुझि आपनी ओर॥२२५॥

मी आईच्याच कटांतला आहे असें जर त्यांनीं गृहीत धरलें असलें तर मात्र तें जें कांहीं म्हणतील तें थोडेंच होय. परंतु मी त्यांच्याच तर्फेचा आहे हें जर त्यांनीं मनांत आणलें तर ते माझीं पापें आणि माझे दुर्गुण यांची क्षमा करून मला जवळच करतील.

चौ०–जौँ परिहरहिँ मलिन मन जानी।
जौँ सनमानहिँ सेवक मानी।
मोरे सरन राम की पनहीँ।
राम सुस्वामि दोष सब जनहीँ।
जग जसभाजन चातक मीना।
नेम प्रेम निज निपुन नबीना।

त्यांनीं कृष्णहृदय समजून जरी माझा त्याग केला किंवा सेवक समजून माझा अंगीकार केला तरी मी मात्र रामचंद्राच्याच पादुकांना शरण जाणार! माझे दोष जरी त्यांच्या पूर्णपणें ध्यानांत येऊन चुकले आहेत तथापि राम हे उदार धनी आहेत तेव्हां ते क्षमाच करतील. यशाला खरेखरें पात्र असे जगांत दोनच प्राणी आहेत. एक चातक आणि दुसरा मीन; कारण त्यांचेंच व्रत आणि प्रेम कायतें नित्य नवीन आणि अखंड असतें.

अस मन गुनत चले मग जाता।
सकुच सनेह सिथिल सब गाता।
फेरति मनहिँ मातुकृत खोरी।
चलत भगतिबल धीरजधोरी।
जब समुझत रघुनाथसुभाऊ।
तब पथ परत उताइल पाऊ।

असल्या विवंचना मनांत घोळत असल्यामुळें वाटेनें चालत असतांना त्याचें सर्वांग संकोचानें आणि प्रेमानें अगदीं शिथिल झालें. मातेकडून घडलेला खोडसाळ प्रकार त्याच्या मनास परत फिरवी; परंतु तो धैर्यधुरंधर केवळ भक्तीच्या बळावर पुढें सरसावत होता. जेव्हां त्याच्या मनांत रामाच्या स्वभावाचा विचार यावा तेव्हां मात्र त्याचीं पावलें वाटेनें उतावीळपणानें पडत असत.

भरतदसा तेहि अवसर कैसी ।
जलप्रवाह जल-अलि-गति जैसी ।
देखि भरत कर सोचु सनेहू ।
भा निषाद तेहि समय बिदेहू ।

जलप्रवाहांत ज्याप्रमाणें जळूची गति होते त्याप्रमाणें त्या वेळीं भरताची झाली. भरताचा शोक आणि प्रेम पाहून गुह तर त्या वेळेस देहभानच विसरला.

**दो०—लगे होन मंगल सगुन सुनि गुनि कहत निषादु । मिटिहि सोच होइहि हरषु पुनि परिनाम बिषादु ॥ २२६ ॥**

मंगल शकुन होऊं लागले, ते ऐकून आणि त्यांचा विचार करून गुह म्हणालाः—' सांप्रत दुःख नाहींसें होऊन हर्ष होणार, परंतु फिरून शेवटीं दुःखच होणार असें दिसतें. '

चौ०—सेवकबचन सत्य सब जाने ।
आस्रमनिकट जाइ नियराने ।

गुहाचें भाकीत भरतास तंतोतंत पटलें. नंतर तो आश्रमाच्या निकट जाऊन पोहोंचला.

भरत दीख बन-सैल-समाजू ।
मुदित छुधित जनु पाइ सुनाजू ।
ईति भीति जनु प्रजा दुखारी ।
त्रिबिध ताप पीडित ग्रहभारी ।
जाइ सुराज सुदेस सुखारी ।
होहिँ भरतगति तेहि अनुहारी ।

तेथील वनपर्वत वगैरे देखावा पाहतांच क्षुधितांस सुग्रास अन्न मिळाल्याप्रमाणें भरतास आनंद लोटला. इति ( अतिवृष्टि, अनावृष्टि, टोळधाड वगैरे दैवी आपत्ति ) आणि भीति ( मानुषी आपत्ति, राजभय, चोरभयादि ) ह्यांनीं पोळलेली आणि त्रिविधताप आणि दुर्धर ग्रहदशा ह्यांनीं पीडलेली प्रजा जशी एखाद्या चांगल्या देशांतील सुराज्यांत जाऊन सुखी होते त्याप्रमाणेंच भरताची स्थिति झाली.

रामबास बनसंपति भ्राजा ।
सुखी प्रजा जनु पाइ सुराजा ।

सुराज्य अनुभवीत असल्यानें जशी प्रजा सुखी दिसते तद्वत रामाच्या सहवासानें तेथील वनश्री प्रफुल्लित दिसत होती.

१ सुदेश=स्वदेश, २ सुराज=स्वराज्य, ३ स्वराज्य.

सचिव बिरागु बिबेकु नरेसू ।
बिपिन सुहावन पावन देसू ।
भट जमनियम सैल रजधानी ।
सांति सुमति सुचि सुंदर रानी ।
सकल अंग संपन्न सुराऊ ।
रामचरनआस्रित चित चाऊ ।

चित्रकूटाच्या सुराज्यांत विवेक हा राजा असून वैराग्य हा त्याचा सचिव असे. सुंदर विपिन हाच त्याचा पवित्र देश होय, यमनियमादिक हेच त्याचे वीर, चित्रकूटपर्वत हीच त्याची राजधानी, शांति आणि सुमति ह्याच त्याच्या सुंदर आणि साध्वी राण्या होत्या. असा तो सर्वांगसंपन्न राजा रामचरणांचा आश्रित असल्याकारणानें तेथें प्रसन्न-चित्तानें रहात असे.

**दो०—जीति मोह-महि-पाल-दल सहित बिबेक भुआलु । करत अकंटक राज्य पुर सुख संपदा सुकालु ॥ २२७ ॥**

मोहरूपराजास त्याच्या सैन्यासकट जिंकून विवेक-रूपराजा निष्कंटक राज्य करीत असतां त्याच्या शहरांत सुख आणि संपत्ति यांचा सुकाळ झाला होता.

चौ०—बनप्रदेस मुनिबास घनेरे ।
जनु पुर नगर गाउँगन खेरे ।
बिपुल बिचित्र बिहँग मृग नाना ।
प्रजासमाज न जाइ बखाना ।

वनप्रदेश आणि मुनींचे अमित आश्रम हींच त्याच्या राज्यांतील पुरें, नगरें, शहरें आणि खेडीं होतीं. नानाप्रकारचे आणि चित्रविचित्र असे मृगांचे व पक्ष्यांचे समूह हीच त्याची प्रजा होती. त्यांचा जमाव इतका प्रचंड असे कीं, सांगतां पुरवत नाहीं.

खगहा करि हरि बाघ बराहा ।
देखि महिष बृष साजु सराहा ।
बयरु बिहाय चरहिँ एक संगा ।
जहँ तहँ मनहुँ सेन चतुरंगा ।
झरना झरहिँ मत्तगज गाजहिँ ।
मनहुँ निसान बिबिधबिधि बाजहिँ ।

गेंडे, हत्ती, सिंह, वाघ, वराह इत्यादि हिंस्रपशु, बैल, रेडे, वगैरेंचे मोठमोठाले कळप पाहून आपलें

१ स्वराज्यांत.

जातिवैर सोडून देऊन त्यांच्याबरोबर मिळूनमिसळून चरत असत. तो देखावा पाहतांच असे वाटे कीं, विवेकराजाची ही चतुरंग सेनाच पसरली आहे. ओढे झुळझुळ वाहत असत. मदोन्मत्त हत्ती गर्जना करीत असत. तेव्हां असें वाटे कीं, निषाणें वगैरे अनेक प्रकारचीं वाद्येंच वाजत आहेत.

चक चकोर चातक सुक पिक गन।
कूजत मंजु मराल मुदितमन।
अलिगन गावत नाचत मोरा।
जनु सुराज मंगल चहुँ ओरा।
बेलि बिटप तृन सफल सफूला।
सब समाज मुद–मंगल–मूला।

चक्रवाक, चकोर, चातक, शुक, मयूर, हंस ह्यांचे समुदाय मोठ्या उल्हासानें मंजुळ शब्द करीत असत. भृंग गुंजारव करीत आणि मोर नृत्य करीत असत. तेव्हां असें वाटे कीं, जणुंकाय चारीहि बाजूंनीं सुराज्यांतला[1] आनंद वाहत चालला आहे. वृक्ष, वेली आणि तृणफलपुष्पान्वित झालेले दिसत. एकंदर सर्वच देखावा आनंद आणि मंगल उत्पन्न करीत होता.

**दो०–रामसैल सोभा निरखि भरतहृदय अतिप्रेमु। तापस तपफल पाइ जिमि सुखी सिराने नेमु ॥ २२८ ॥**

तपःफल प्राप्त झालें असतां व्रतानियमादिकांची परिसमाप्ति होऊन तपस्वी जसा आनंदांत निमग्न होतो त्याप्रमाणें रामशैल जो चित्रकूट त्याची शोभा अवलोकन करून भरताचें हृदय अत्यंत प्रेमाविष्ट झालें.

चौ०–तब केवट ऊँचे चढि धाई।
कहेउ भरत सन भुजा उठाई।
नाथ देखियहि बिटपबिसाला।
पाकरि जंबु रसाल तमाला।

नंतर एका टेकडीवर झपाझप चढून गुह वर हात करून भरतास म्हणालाः—महाराज ! पहा तर हे महान् महान् वृक्ष—हा पाकळ, हा जंबु, हा आम्र आणि हा तमाल !

तिन्ह तरुबरन्ह मध्य बटु सोहा।
मंजु बिसाल देखि मन मोहा।

[1] स्वराज्यांतला.

नील सघन पल्लव फल लाला।
अबिचल छाँह सुखद सब काला।
मानहुँ तिमिर–अरुन–मय रासी।
बिरची बिधि सकेलि सुखमासी।

त्या तरुवरांच्या मध्यभागीं तो जो भला उंच, गर्द आणि सुंदर वटवृक्ष आहे त्यास पाहून तर मन लुब्धच होऊन जातें. त्याचीं तीं निळीं आणि घनदाट पानें, लालभडक फळें आणि गर्द छाया ही सर्वकाल फारच सुखकारक असते. काळा आणि तांबडा हे दोन रंग एकत्र करून ब्रह्मदेवानें एक सुंदर आणि खुबीदार रासच बनविल्याप्रमाणें वटवृक्ष भासत आहे.

ए तरु सरितसमीप गोसाईं।
रघुबर परनकुटी जहँ छाई।
तुलसी तरुबर बिबिध सुहाये।
कहुँ कहुँ सिय कहुँ लषन लगाये।
बटछाया बेदिका बनाई।
सिय निज–पानि–सरोज सुहाई।

महाराज ! हे वृक्ष बहुतेक नदीच्या कांठींच असून तेथेंच ती रघुवराची पर्णकुटी उभारली आहे. नानाप्रकारें सुंदर तुलसीचीं झाडेंहि लावलीं आहेत. तीं कांहीं सीतेनें आणि कांहीं लक्ष्मणानें लाविलीं आहेत. वटवृक्षाच्या छायेतळीं सीतेनें स्वहस्तकमलांनीं सुरेखशी वेदिका ( ओटा, पार ) हि तयार केली आहे.

**दो०–जहाँ बैठि मुनि-गन-सहित नित सिय राम सुजान। सुनहिं कथा इतिहास सब आगम निगम पुरान ॥ २२९ ॥**

तेथेंच मुनिगणांसह बसून सर्वज्ञ सीतारामचंद्र नित्य वेदान्त, शास्त्र, पुराणें, इतिहास वगैरेंची चर्चा ऐकत असतात.

चौ०–सखाबचन सुनि बिटप निहारी।
उमगे भरत बिलोचन बारी।
करत प्रनाम चले दोउ भाई।
कहत प्रीति सारद सकुचाई।

याप्रमाणें गुहाचें वचन ऐकून तो वृक्ष पाहतांच भरताचे डोळ्यांतून प्रेमाश्रूंचे लोट वाहूं लागले. वृक्षाला प्रणाम करून दोघेहि बंधू चालूं लागले. त्यांचें प्रेम वर्णन करण्यास सरस्वतीदेखील असमर्थ होईल.

हरषहिं निरखि राम-पद-अंका।
मानहुँ पारसु पायेउ रंका।
रजसिरधरिहियनयनन्हिलावहिं।
रघु-बर-मिलन-सरिस सुखपावहिं।

दारिद्यास परीस लाधावा अशाप्रमाणें रामपदांचीं चिन्हें त्याहाळून ते हर्षभरित झाले. तीच धूळ मस्तकावर घेऊन आणि उरास व डोळ्यांस लावून प्रत्यक्ष रामच भेटल्याप्रमाणें त्यांस आनंद होत होता.

देखि भरतगति अकथ अतीवा।
प्रेम मगन मृग खग जडजीवा।
सखहिं सनेहबिबस मग भूला।
कहि सुपंथ सुर बरषहिं फूला।

भरताची ती अत्यंत अनिर्वाच्य स्थिति पाहून खग, मृग, पाषाणादि जीव देखील प्रेमांत निमग्न झाले. गुहदेखील प्रेमानें वेडा होऊन वाट चुकला. तेव्हां देवांनीं सरळ वाट सांगून फुलें उधळलीं.

निरखि सिद्धसाधक अनुरागे।
सहजसनेह सराहन लागे।
होत न भूतल भाउ भरत को।
अचर सचर चर अचर करत को।

त्यांचें निष्कलंक प्रेम आणि भक्ति पाहून सिद्ध आणि साधकदेखील त्यांची धन्यता गाऊं लागले कीं:–"भूतलावर जर भरताचा भाव उत्पन्नच झाला नसता तर जडाला चैतन्यत्व व चैतन्याला जडत्व कोणीं दिलें असतें ? ( जडजीवांत भक्तीचा प्रादुर्भाव करून त्यांस—चैतन्यविशिष्ट कोणीं केलें असतें आणि चैतन्यविशिष्ट जीवमात्रास भक्त्यनुशासन करून विदेहस्थितीस कोणीं पोंहचविलें असतें ?)

**दो०–प्रेम अमिय मंदर बिरह भरत पयोधि-गँभीर। मथि प्रगटे सुर-साधु-हित कृपासिंधु रघुबीर ॥ २३० ॥**

कृपासिंधु रघुवीरानें देव आणि संत यांच्या हितार्थ भरतरूप अगाध समुद्राचें विरहरूप मंदराचलानें मंथन करून प्रेमरूप अमृत निर्माण केलें.

चौ०–सखासमेत मनोहर जोटा।
लखेउ न लषन सघन बन ओटा।
भरत दीख प्रभुआस्रम पावन।
सकल-सु-मंगल-सदन सुहावन।
करत प्रवेस मिटे दुखदावा।
जनु जोगी परमारथ पावा।



दाट झाडीच्या आड असलेली गुहासह ती मनोहर जोडी लक्ष्मणास दिसली नाहीं. परंतु सर्व सुमंगलांचें आगर असा सुंदर आणि पवित्र प्रभूंचा आश्रम मात्र भरतास दिसला. तेथें प्रवेश करतांच योग्यास परमार्थाची प्राप्ति झाल्याप्रमाणें भरताचा दुःखाग्नि शमन पावला.

देखे भरत लषन प्रभुआगे।
पूछे बचन कहत अनुरागे।
सीस जटा कटि मुनिपट बाँधे।
तून कसे कर सर धनु काँधे।

मस्तकावर जटाजूट बांधलेला आहे, कंबरेस मुनिवल्कलें गुंडाळलीं आहेत, भाते कसून हातांत बाण व खांद्यावर धनुष्य घेतलें आहे आणि प्रभूंच्या अग्रभागीं त्यांची आज्ञा विचारीत आहे आणि प्रभु त्यास ती प्रेमानें सांगताहेत अशा स्थितींत लक्ष्मणाला भरतानें पाहिलें.

बेदी पर मुनि-साधु-समाजू।
सीयसहित राजत रघुराजू।
बलकल बसन जटिल तनु स्यामा।
जनु मुनिबेष कीन्ह रतिकामा।
करकमलनि धनुसायक फेरत।
जिय की जरनि हरत हँसि हेरत।

वेदीवर मुनिसंतांचा मेळा असून मध्यें वल्कलें परिधान केलेले, जटा बांधलेले, करकमलांनीं धनुष्यबाण फिरवीत असलेले, हास्यानें आणि नेत्रकटाक्षानें जीवाचा संसृतिताप हरण करीत असलेले आणि जणुंकाय रतिमदनांनींच मुनिवेष धारण केले आहेत असे सीतेसहित शोभणारे श्यामतनु रामचंद्र भरतास दिसले.

**दो०–लसत मंजु मुनि-मंडली-मध्य सीय रघुचंद। ज्ञानसभा जनु तनु धरे भगति सच्चिदानंद ॥ २३१ ॥**

मुनिमंडळाच्या मध्यभागीं सीता आणि रामचंद्र असे शोभूं लागले कीं, जणुंकाय ज्ञानसभेंत ( ज्ञान आणि वैराग्यादि तदनुषंगिक सभासदांत ) भक्ति आणि सच्चिदानंद यांनींच देह धारण केले आहेत.

चौ०–सानुज सखा समेत मगन मन।
बिसरे हरष-सोक-सुख-दुख-गन।
पाहि नाथ कहि पाहि गोसाईं।
भूतल परे लकुट की नाईं।

बंधु आणि गुह यांच्यासमवेत भरताचें मन तल्लीन होऊन तो हर्ष, शोक आणि सुखदुःख सर्वच विसरून गेला. "हे नाथ! हे स्वामिन्! पाहि मां, पाहि मां" असें ह्मणत भरत शुष्क काष्ठाप्रमाणें भूतलावर पडला!

बचन सप्रेम लषन पहिचाने।
करत प्रनाम भरत जिय जाने।
बंधुसनेह सरस एहि ओरा।
इत साहिबसेवा बरजोरा।
मिलि न जाइ नहिँ गुदरत बनई।
सुकबि लषनमन की गति भनई।

ते प्रेमोद्गार लक्ष्मणानें ओळखिले आणि हा भरतच प्रणाम करीत आहे अशी त्याची खात्री झाली. परंतु एकीकडे बंधुप्रेमाची जबरदस्त लाट आणि एकीकडे खडतर स्वामिसेवा, अशा स्थितींत लक्ष्मणास त्यांस भेटण्यासहि जाववेना आणि न जावें तर रहावेना अशी त्याची स्थिति झाली. लक्ष्मणाच्या मनाची ती स्थिति एका सन्मान्य कवीनें वर्णन केली आहे ( ती अशी )—

रहे राखि सेवा पर भारू।
चढी चंग जनु खैँच खेलारू।

उंच आकाशांत गेलेल्या वावडीची जशी उडविणारा ओढाताण करितो तद्वत् लक्ष्मणाची गत झाली. परंतु अखेरीस सेवेवरच भिस्त ठेवून तो तसाच राहिला.

कहत सप्रेम नाइ महि माथा।
भरत प्रनाम करत रघुनाथा।
उठे राम सुनि प्रेम अधीरा।
कहुँ पट कहुँ निषंग धनु तीरा।

लक्ष्मण जमिनीवर डोकें नमवून प्रेमपूर्वक ह्मणालाः—"हे रघुनाथ! भरत प्रणाम करीत आहे." तें ऐकतांच प्रेमानें अगदींच उतावीळ झाल्यामुळें कसलें वस्त्र, कसले भाते व कसले धनुष्यबाण, असें होऊन राम तसेच उठले.

**दो०—बरबस लिये उठाइ उर लाये कृपानिधान। भरत राम की मिलनि लखि बिसरे सबहिँ अपान ॥ २३२ ॥**

दयार्णव रामांनीं भरताला बळजबरीनें उचलून घेऊन उराशीं कवटाळलें. रामभरतांची ती भेट पाहून सर्व मंडळी देहभान विसरली.

चौ०—मिलनिप्रीति किमि जाइ बखानी।
कवि-कुल-अगम करम मन बानी।
परम-प्रेम-पूरन दोउ भाई।
मन बुधि चित अहमिति बिसराई।

त्यांच्या भेटींतील प्रेम किती वर्णन करावें? तें प्रेम कविकुलाच्याहि कर्ममनवाणीला अगम्य होय. ( थोडक्यांत ) उभयतां बंधू परमप्रेमपूर्ण झाले, इतकें कीं, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार ह्यांचा त्यांना विसर पडला.

कहहु सुप्रेम प्रगट को करई।
केहि छाया कवि मति अनुसरई।
कबिहिँ अरथ आखर बल साँचा।
अनुहरि ताल गतिहि नट नाचा।

सांगा बरें कीं, तें प्रेम कोण प्रकट करूं शकणार? कोणत्या कवीची बुद्धि त्या प्रेमाच्या छायेच्या छायेला देखील राहूं शकेल? अखेरीस कवीचा अर्थ अक्षरांच्याच भरंवशावर अवलंबून राहणार कीं नाहीं? तालाच्या गतीप्रमाणें नटाला नाचावें लागतें. ( भाव हा कीं, अक्षरास वाच्यत्व आहे म्हणून कवींना अर्थोत्पत्ति करितां येते. अक्षराप्रमाणें प्रेमास वाच्यता नाहीं; तें मूक आहे. म्हणून कवींनाहि त्याच्या वर्णनप्रसंगीं मूक बनावें लागतें. "सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम्" अशी प्रेमाची व्याख्या गीतेंत केली आहे. )

अगमसनेह भरतरघुबर को।
जहँ न जाइ मनु बिधि-हरि-हर-को।
सो मैं कुमति कहउँ केहि भाँती।
बाजु सुराग कि गाँडरताँती।

रामभरतांचें प्रेमच अगम्य आहे. तेथें ब्रह्मविष्णुमहेशांचा देखील मनानें रिघाव होऊं शकत नाहीं. तें प्रेम मी मंदमति कोणत्या रीतीनें वर्णन करणार? पिंजणाची तात सुरेल रागदारी बोलेल काय?

मिलनि बिलोकि भरतरघुबर की।
सुरगन सभय धकधकी धरकी।
समुझाये सुरगुरु जड जागे।
बरषि प्रसून प्रसंसन लागे।

रामभरतांची भेट पाहून देवगण भयभीत झाला आणि त्यास धडकी भरली. त्या मतिमंदांची बृहस्पतींनीं समजूत घातल्यावर ते जागे झाले आणि पुष्पवर्षाव करून प्रशंसा करूं लागले.

दो०—मिलि सप्रेम रिपुसूदनहिँ केवट भेँटेउ राम । भूरि भाय भेँटे भरत लछिमन करत प्रनाम ॥ २३३ ॥

शत्रुघ्नास प्रेमपूर्वक भेटल्यावर राम गुहासहि भेटले. भरत लक्ष्मणास कडकडून भेटला आणि लक्ष्मणानेंहि त्यास प्रणाम केला.

चौ०—भेँटेउ लषन ललकि लघुभाई ।
बहुरि निषाद लीन्ह उर लाई ।
पुनि मुनिगन दुहुँ भाइन्ह बंदे ।
अभिमत आसिष पाइ अनंदे ।

लक्ष्मण शत्रुघ्नास कडकडून भेटला. त्यानें गुहास उचलून आलिंगन दिलें. नंतर भरतशत्रुघ्नांनीं मुनि-मंडळीस प्रणाम केला, आणि ईप्सित आशीर्वाद आनंदानें ग्रहण केले.

सानुज भरत उमगि अनुरागा ।
धरि सिर सिय-पद-पदुम-परागा ।
पुनि पुनि करत प्रनाम उठाये ।
सिर करकमल परसि बैठाये ।

भरतशत्रुघ्नांस प्रेमाचा उमाळा येऊन त्यांनीं सीतेच्या पदकमलाचे रज:कण मस्तकावर धारण केले. ते पुनःपुनः तीस प्रणाम करूं लागले असतां तिनें त्यांस उचलून घेतलें आणि त्यांच्या मस्तकीं आपला कमलहस्त ठेवून त्यांस बसविलें.

सीय असीस दीन्हि मन माहीँ ।
मगन सनेह देहसुधि नाहीँ ।
सबबिधि सानुकूल लखि सीता ।
भे निसोच उर अपडर बीता ।

सीतेनें त्यांस मनांतून आशीर्वाद दिले. ती प्रेमांत इतकी निमग्न झाली कीं, देहाचीदेखील तिला शुद्ध राहिली नाहीं. सीतेस सर्वप्रकारें प्रसन्न पाहून त्या दोघांचींहि मनें शांत आणि निश्चिंत झालीं.

कोउ कछु कहइ न कोउ किछु पूछा ।
प्रेम भरा मन निजगति छूछा ।
तेहि अवसर केवट धीरज धरि ।
जोरि पानि बिनवत प्रनाम करि ।

कोणी कोणांशीं बोलेना आणि कोणी कांहीं विचारीना. सर्वांचींच मनें प्रेमानें भरून गेलीं. सर्व आपापल्याच नादांत दंग झाले. त्या वेळेस गुह अवसान आणून आणि हात जोडून विनंतिपूर्वक म्हणाला—

दो०—नाथ साथ मुनिनाथ के मातु सकल पुरलोग । सेवक सेनप सचिव सब आये बिकल बियोग ॥ २३४ ॥

" हे प्रभो ! मुनिनाथांचे बरोबर सर्व माता, पुरजन, सेवक, सैनिक, सचिवप्रभृति सर्व मंडळी विरहव्याकुल होऊन आलीं आहेत. "

चौ०—सीलसिँधु सुनि गुरुआगवनू ।
सियसमीप राखे रिपुदवनू ।
चले सबेग राम तेहि काला ।
धीर-धरम-धुर दीनदयाला ।

हें ऐकून शीलसागर, धैर्यशाली, धर्मधुरंधर, दीन-दयाल श्रीरामांनीं गुरूंचें आगमन ऐकतांच सीतेच्या संरक्षणार्थ शत्रुघ्नास ठेवून आपण तत्काळ फार लग-बगीनें निघाले.

गुरुहि देखि सानुज अनुरागे ।
दंडप्रनाम करन प्रभु लागे ।
मुनिबर धाइ लिये उर लाई ।
प्रेम उमगि भेँटे दोउ भाई ।

गुरुजींस पाहतांच लक्ष्मणासह प्रभु रामचंद्र अनु-रागयुक्त होत्साते त्यांस साष्टांग नमस्कार घालूं लागले. मुनिवरांनीं धांवत जाऊन प्रेमपूर्वक दोघांहि बंधूंस उचलून हृदयाशीं धरलें.

प्रेम पुलकि केवट कहि नामू ।
कीन्ह दूरि तेँ दंडप्रनामू ।
रामसखा रिषि बरबस भेँटा ।
जनु महि लुठत सनेह समेटा[1] ।

प्रेमपुलकित होऊन आणि स्वनामोच्चार करून गुहानें लांबूनच साष्टांग दण्डवत घातलें. रामाचा तो सखा आहे असें जाणून मुनिराज त्यास बळेंच भेटले. जणुंकाय भूमीवर लोळत असणारें प्रेमच त्यांनीं गोळा केलें.

रघुपति भगति सुमंगल मूला ।
नभ सराहिँ सुर बरिषहिँ फूला ।
एहि सम निपट नीच कोउ नाहीँ ।
बड बसिष्ठसम को जग माहीँ ।

गुहावर देव आकाशांतून पुष्पवृष्टि करून त्यास धन्यवाद देऊं लागले कीं, रघुपतींची भक्ति ही एक

१ ' लुटत ' असाहि पाठ आहे. तदनुसार अर्थ असा:—पृथिवी लुटत असलेला प्रेम वसिष्ठांनींच सावरून घेतला.

सुमंगलांची आदिजननी होय. जगांत ह्यासारखा अत्यंत नीच कोणीच नसून वसिष्ठासारखा श्रेष्ठ तरी कोण आहे ?

**दो०–जेहि लखि लषनहुँ तें अधिक मिले मुदित मुनिराउ। सो सीता-पति-भजन को प्रगट प्रतापप्रभाउ ॥ २३५ ॥**

मुनिराज त्यास पाहतांच लक्ष्मणापेक्षांहि विशेष आनंदानें भेटले. हा प्रताप आणि प्रभाव केवळ जानकीजीवनाच्या भजनाचाच होय हें प्रत्यक्षच सिद्ध होतें.

चौ०–आरत लोग राम सब जाना।
करुनाकर सुजान भगवाना।
जो जेहि भाय रहा अभिलाखी।
तेहि तेहि कै तसि तसि रुख राखी।

करुणाकर सर्वज्ञ भगवान् रामचंद्रांनीं सर्व लोक आर्त जाणून जो ज्या भावाचा भुकेला होता त्याची त्याची तसतशीच वासना पुरविली.

सानुज मिलि पल महुँ सब काहू।
कीन्ह दूरि दुख–दारुन–दाहू।
यह बडि बात राम कै नाहीँ।
जिमि घट कोटि एक रबि छाहीँ।

लक्ष्मणासह सर्वांनाच एका क्षणांत भेटून रामांनीं त्यांच्या दुःखाच्या दारुण वेदनांचा परिहार केला. रामासंबंधानें ही गोष्ट म्हणजे मोठीशी नव्हे. कारण कोट्यवधि जरी घट असले तरीदेखील त्या सर्वांत सूर्य एकसमयावच्छेदेंकरून समसमानच प्रतिबिंबित होतो.

मिलि केवटहि उमागि अनुरागा।
पुरजन सकल सराहहिँ भागा।

सर्व पुरजन गुहास भेटले आणि प्रेमानें उचंबळून येऊन ते त्याच्या भाग्याची वाखाणणी करूं लागले.

देखी राम दुखित महतारी।
जनु सुबेलिअवली हिम मारी।
प्रथम राम भेँटी कैकेई।
सरल सुभाय भगति मति भेई।
पग परि कीन्ह प्रबोधु बहोरी।
काल करम बिधि सिर धरि खोरी।

सुंदर वेलींच्या रांगा थंडीनें अगदीं गारठून जाव्या अशाप्रमाणें सर्व माता दुःखित झालेल्या रामानें अवलोकन केल्या. सर्वांच्या अगोदर राम सरळपणानें आणि प्रेमबुद्धीनें कैकेयीस भेटले, आणि कैकेयीनेंहि त्यांच्या पायांवर लोटांगण घातलें. तेव्हां तिचा दोष काल, कर्म आणि प्राक्तन ह्यांच्या मस्तकीं मारून, त्यांनीं तीस उदंड बोध केला.

**दो०–भेँटी रघुबर मातु सब करि प्रबोध परितोषु। अंब ईसआधीन जग काहु न देइय दोषु ॥ २३६ ॥**

सर्व माता रघुवरास भेटल्या. त्यांचें सांत्वन आणि समाधान करून ते म्हणालेः—मातांनो ! जग हें सर्वस्वीं परमेश्वराधीन आहे. अतएव कोणालाहि दोष देऊं नये.

चौ०–गुरु-तिय-पद बंदे दुहुँ भाई।
सहित बिप्रतिय जे सँग आईँ।
गंग–गौरि–सम सब सनमानी।
देहिँ असीस मुदित मृदुबानी।

अरुंधती आणि त्यांचेबरोबर आलेल्या ब्राह्मण-स्त्रियांचें दोघांहि बंधूंनीं पदवंदन केलें आणि त्या सर्वांचा गंगागौरीप्रमाणें सन्मान केला. त्यांनींहि त्यास आनंदानें आणि मृदुवाणीनें आशीर्वाद दिले.

गहि पद लगे सुमित्राअंका।
जनु भेँटी संपति अति रंका।
पुनि जननीचरननि दोउ भ्राता।
परे प्रेम ब्याकुल सब गाता।

नंतर त्यांनीं सुमित्रेचे चरण धरून तिच्या कंबरेस मिठी मारली, तेव्हां दीर्घ दरिद्री जनांस संपत्तीच मिळाल्याप्रमाणें तिला झालें ! नंतर दोघांहि बंधूंनीं कौसल्येच्या चरणांस मिठी घातली, तेव्हां कौसल्येचें सर्वांग प्रेमानें व्याकुळ झालें.

अतिअनुराग अंब उर लाये।
नयन सनेह सलिल अन्हवाये।
तेहि अवसर कर हरष बिषादू।
किमि कबि कहइ मूक जिमि स्वादू।

कौसल्येनें त्यांस अत्यंत प्रेमानें पोटाशीं धरिलें आणि प्रेमाश्रूंनीं न्हाऊं घातलें. मुक्याला जसा स्वाद तसा त्या वेळचा तो हर्षविषाद कवी झाला तरी तो कसा सांगूं शकणार ?

मिलि जननिहिँ सानुज रघुराऊ।
गुरुसन कहेउ कि धारिय पाऊ।

पुरजन पाइ मुनीसनियोगू ।
जल थल तकि तकि उतरे लोगू ।

लक्ष्मणासह रघुराज जननीस भेटून वसिष्ठांस म्हणाले कीं, 'आश्रमास चरणस्पर्श झाला पाहिजे.' पुरजनांना मुनिवर्यांची आज्ञा होतांच सर्व मंडळी पाणी आणि उतारा पाहून उतरूं लागली.

**दो०—महिसुर मंत्री मातु गुरु गने लोग लिये साथ । पावन आस्रम गवनु किय भरत लषन रघुनाथ ॥ २३७ ॥**

ब्राह्मण, मंत्री, माता, गुरु आणि कांहीं शेलकी मंडळी बरोबर घेऊन भरतरामलक्ष्मणांनीं आपल्या पवित्र आश्रमाप्रत गमन केलें.

चौ०—सीय आइ मुनि–बर–पगलागी ।
उचित असीस लही मनमाँगी ।
गुरुपतिनिहिँ मुनितियन्ह समेता ।
मिली प्रेम कहि जाइ न जेता ।
बंदि बंदि पग सिय सबही के ।
आसिरबचन लहे प्रिय जी के ।

सीतेनें येऊन मुनिवरांचे पाय धरिले आणि त्यांचेकडून इच्छित आणि उचित आशीर्वाद मिळविले. इतर मुनिपत्नींसमवेत गुरुपत्नीस ती ज्या प्रेमानें भेटली तें प्रेम यथावत् वर्णन करणें शक्य नाहीं. सीतेनें सर्वांच्याच चरणीं वंदन करून इष्ट आशीर्वाद घेतले.

सासु सकल जब सीय निहारी ।
मूँदे नैन सहमि सुकुमारी ।
परी बधिकबस मनहुँ मराली ।
काह कीन्ह करतार कुचाली ।
तिन्ह सिय निरखि निपट दुख पावा ।
सो सब सहिय जो दैव सहावा ।

सीतेनें जेव्हां सर्व सास्वा पाहिल्या तेव्हां ती घाबरून जाऊन तिनें डोळेच मिटले. पारध्याच्या पाशांत हंसी अडकल्याप्रमाणें तिची अवस्था झाली. (ती म्हणाली ):—" हे जगन्नियंत्या परमेश्वरा ! काय रे घोर घाला घातलास ! दैवा ! तूं जें जें सहन करण्यास लावशील तें तें सहन केलें पाहिजे." ह्याप्रमाणें सास्वांना पाहून सीतेच्या दुःखाचा अगदीं कळस झाला.

जनकसुता तब उर धरि धीरा ।
नील-नलिन-लोयन भरि नीरा ।
मिली सकल सासुन्ह सिय जाई ।
तेहि अवसर करुना महि छाई ।

शेवटीं सीता धैर्य धरून आपल्या नीलकमलवत् नेत्रांतून टपटप टिपें गाळीत जेव्हां सर्व सास्वांना जाऊन भेटली तेव्हां तर तो भूभाग जणुंकाय कारुण्यरसानें व्याप्त झाला.

**दो०—लागि लागि पग सबनि सिय भेटँति अति अनुराग । हृदय असीसहिँ प्रेमबस रहिहहु भरी सोहाग ॥ २३८ ॥**

सीता पृथक्पृथक्पणें सर्व सास्वांच्या पाया पडत असतां आणि उत्कट प्रेमानें त्यांस भेटत असतां त्यांसहि प्रेम दाटून आल्यामुळें त्यांनीं तीस मनांतल्यामनांतच 'अखंड सौभाग्यवती भव' म्हणून आशीर्वाद दिले.

चौ०—बिकल सनेह सीय सब रानी ।
बैठन सबहिँ कहेउ गुरु ज्ञानी ।
कहि जगगति मायिक मुनिनाथा ।
कहे कछुक परमारथगाथा ।

सीता आणि सर्व राण्या स्नेहविकल जाणून वसिष्ठांनीं सर्वांना बसण्यास सांगितलें. जगाचा खटाटोप हा एकंदर मायेचा पसारा होय असें अवतरण करून मुनिवर्यांनीं ब्रह्मज्ञानाचा किंचित् अनुवाद केला.

नृप कर सुर–पुर–गवन सुनावा ।
सुनि रघुनाथ दुसह दुख पावा ।
मरनहेतु निजनेह बिचारी ।
भे अति बिकल धीर–धुर–धारी ।

(नंतर) त्यांनीं दशरथाचें निर्याण कळविलें. तें ऐकून रामास असह्य दुःख झालें. राजाच्या मृत्यूस केवळ त्याचें आपणावरील असलेलें प्रेम कारणीभूत झालें हा विचार मनांत येऊन तो धैर्यधुरंधर अत्यंत विव्हल झाला.

कुलिसकठोर सुनत कटुबानी ।
बिलपत लषन सीय सब रानी ।
सोक बिकल अति सकल समाजू ।
मानहुँ राज अकाजेउ आजू ।

वज्राप्रमाणें कठोर अशी ती कटुवाणी श्रवण करितांच सीता आणि लक्ष्मण विलाप करूं लागले. सर्व राण्या आणि एकंदर समाजहि शोकाकुल झाला. त्या वेळीं असें वाटलें कीं, राजाचें निधन आजच झालें आहे.

मुनिवर बहुरि राम समुझाये ।
सहित समाज सुरसरित न्हाये ।
व्रत निरंबु तेहि दिन प्रभु कीन्हा ।
मुनिहु कहे जल काहु न लीन्हा ।

मुनिवरांनीं बहुतप्रकारें रामाचें सांत्वन केलें. सर्व मंडळींसह रामांनीं मंदाकिनीचें स्नान केलें. त्या दिवशीं प्रभूंनीं निर्जल व्रत पाळिलें. तेव्हां मुनींनीं सांगितलें असतां देखील कोणीच जलपानहि केलें नाहीं.

**दो०–भोर भये रघुनंदनहिँ जो मुनि आयसु दीन्ह । स्रद्धा-भगति-समेत प्रभु सो सब सादर कीन्ह ॥ २३९ ॥**

दुसरे दिवशीं वशिष्ठांनीं जी आज्ञा दिली ती प्रभुराघवानें यच्चयावत् श्रद्धाभक्तिसमन्वित आणि आदरपूर्वक पाळली.

चौ०–करि पितुक्रिया बेद जसि बरनी ।
भे पुनीत पातक-तम-तरनी ।
जासु नाम पावक अघतूला ।
सुमिरत सकल–सु–मंगल–मूला ।
सुद्ध सो भयउ साधु संमत अस ।
तीरथ आबाहन सुरसरि जस ।

वेदविधानाप्रमाणें पित्याची क्रिया करून तो पातकरूप अंधकाराचा सूर्य शुद्ध झाला. ज्याचें नाममात्र पापरूप कार्पासाला अग्निप्रमाणें दग्ध करितें आणि ज्याचें केवळ स्मरण हेंच सर्व सुमंगलांचें मूल आहे असा तो राम गंगेंत तीर्थाचें आवाहन करण्या-प्रमाणें साधुसंमत मतानें शुद्ध झाला.

सुद्ध भये दुइ बासर बीते ।
बोले गुरु सन राम पिरीते ।

दोन दिवस जाऊन ( मृत्युवार्ता श्रवणाचा एक आणि शिवाय दोन मिळून दिनत्रयानंतर ) शुद्ध झाल्यावर लोकप्रिय रामचंद्र गुरूस म्हणालेः—

नाथ लोग सब निपट दुखारी ।
कंद–मूल–फल–अंबु–अहारी ।
सानुज भरत सचिव सब माता ।
देखि मोहि पल जिमि जुग जाता ।
सबसमेत पुर धारिय पाऊ ।
आपु इहाँ अमरावति राऊ ।
बहुत कहेउँ सब कियउँ ढिठाई ।
उचित होइ तस करिय गोसाईँ ।

" महाराज ! सर्व मंडळी आधींच दुःखानें पूर्ण गांजलेलीं आहेत आणि आणि त्यांत त्यांना येथें कंद, मुळें, फळें आणि पाणी ह्यांवरच केवळ निर्वाह करावा लागत आहे. बंधूसह हा भरत, हे सचिव आणि ह्या सर्व माता, ह्यांच्याकडे पाहून तर प्रत्येक क्षण मला युगाप्रमाणें जात आहे. ह्यास्तव आपण सर्वांसह अयोध्येस परतलें पाहिजे. आपण येथें आणि राजा स्वर्गवासी ! मी महाराजांचें पुढें जास्त बोलणें म्हणजे मोठेंच धारिष्ट आहे. तेव्हां आतां योग्य दिसेल तीच व्यवस्था महाराजांनीं करावी. "

**दो०–धर्मसेतु करुनायतन कस न कहहु अस राम। लोग दुखित दिन दुइ दरस देखि लहहुँ बिस्राम ॥ २४० ॥**

तेव्हां वसिष्ठ म्हणाले, " हे राम ! आपण धर्माचे केवळ सेतु आणि करुणेचें केवळ आगर आहात. तेव्हां आपण असें कां न म्हणाल ? परंतु हे बिचारे दुःखानें कावलेले लोक ( आपण राहूं द्याल तर ) दोन दिवस आपलें दर्शन करून विश्रांति तरी घेतील. "

चौ०–रामबचन सुनि सभय समाजू ।
जनु जलनिधि महँ बिकल जहाजू ।
सुनि गुरुगिरा सु--मंगल--मूला ।
भयउ मनहुँ मारुत अनुकूला ।

रामाचे शब्द ऐकतांच समुद्रांत तुफानांत सांपडलेल्या जहाजाप्रमाणें सर्व मंडळी भयभीत झाली. परंतु वसिष्ठांचें कल्याणकारक भाषण ऐकून मात्र त्यांस अगदीं अनुकूल वारा सुटल्याप्रमाणें झालें.

पावन पय तिहुँ काल नहाहीँ ।
जो बिलोकि अघओघ नसाहीँ ।
मंगलमूरति लोचन भरि भरि ।
निरखहिँ हरषि दंडवत करि करि ।
राम–सैल–बन देखन जाहीँ ।
जहँ सुख सकल सकल दुख नाहीँ ।

सर्व मंडळींनीं, जिच्या दर्शनमात्रेंकरून पापप्रवृत्ती नाश पावते अशा त्या पवित्रजल मंदाकिनीचें त्रिकाल स्नान करावें, मंगलमूर्ति रामाला डोळे भरभरून पहावें आणि आनंदानें पुनःपुनः दण्डवत घालावें, आणि जेथें सर्व सुखेंच असून दुःख म्हणून नांवालाहि नव्हतें अशा त्या रामाच्या पर्वतावरील वनें पाहण्यास जावें.

झरना झरहिँ सुधासम बारी ।
त्रि-विध-ताप-हर त्रिविध बयारी ।
बिटप बेलि तृन अगनित जाती ।
फल प्रसून पल्लव बहु भाँती ।
सुंदर सिला सुखद तरु छाहीँ ।
जाइ बरानि बन छबि केहि पाहीँ ।

तेथें ओढ्यांतून अमृततुल्य पाणी खळखळ वहात होतें व त्रितापहारक असा त्रिविध वायु वहात होता. तेथील असंख्य जातींचे वृक्ष, वेली, तृण, फल, पुष्प, आणि पल्लव, तसेच अनेक प्रकारच्या सुंदर शिला व सुखदायक तरूंची छाया इत्यादि प्रकारची वनश्री कोण वर्णन करूं शकणार ?

**दो०--सरनि सरोरुह जल बिहँग कूजत गुंजत भृंग । बैरबिगत बिहरत बिपिन मृग बिहंग बहुरंग ॥ २४१ ॥**

तेथील सरोवरें, कमलें, जल, पक्ष्यांचें कूजित, भृंगांचा गुंजारव, निरनिराळ्या रंगांचे मृग आणि पक्षी यांचा निर्वैर वनविहार ( कोण वर्णन करूं शकणार ) ?

चौ०–कोल किरात भिल्ल बनबासी ।
मधु सुचि सुंदर स्वादु सुधा सी ।
भरि भरि परनपुटी रचि रूरी ।
कंद मूल फल अंकुर जूरी ।
सबहिँ देहिँ करि बिनय प्रनामा ।
कहि कहि स्वादुभेद गुन नामा ।

कोळी, पारधी, भिल्ल इत्यादि जंगली लोक अमृततुल्य स्वादिष्ट, सुंदर, पवित्र आणि मधुर कंदमुळें, फळें आणि कोंवळ्या पानांच्या जुड्या उत्तम रीतीनें बांधून आणि पानांच्या द्रोणांत व्यवस्थेनें ठेवून आणि त्यांचें स्वादभेद, गुण आणि नांवें सांगत सांगत सर्वांना मोठ्या लीनतेनें आणि प्रणामपूर्वक नजर करीत असत.

देहिँ लोग बहु मोल न लेहीँ ।
फेरत राम दोहाई देहीँ ।
कहहिँ सनेहमगन मृदुबानी ।
मानत साधु प्रेम पहिचानी ।

मंडळींनीं त्यांना त्याबद्दल बरीच किंमत द्यावी. परंतु ती न घेतां त्यांनीं उलट त्यांस रामाची शपथ घालून ती परत करावी आणि प्रेमांत निमग्न होऊन लडिवाळपणानें ह्मणावें कीं, " प्रेम ओळखून संतांनीं सेवेस मान दिलाच पाहिजे.

तुह्म सुकृती हम नीच निषादा ।
पावा दरसन रामप्रसादा ।
हमहिँ अगम अति दरस तुह्मारा ।
जस मरुधरनि देव-धुनि-धारा ।
रामकृपाल निषाद नेवाजा ।
परिजन प्रजउ चहिय जस राजा ।

" आपण पुण्यवान् लोक असून आम्ही नीच हिंस्र लोक आहोंत. केवळ रामाच्या कृपेनेंच आम्हांला आपलें दर्शन घडलें. नाहींतर मारवाडांतील रूक्ष प्रदेशांत गंगेच्या प्रवाहाप्रमाणें तुमचें दर्शन हें आह्मांला अत्यंत दुर्मिळ आहे. दयाळू रामांनीं आम्हा निषादांचा देखील सांभाळच केला. राजाप्रमाणें प्रजा आणि परिजन यांनीं वागलेंच पाहिजे.

**दो०–यह जिय जानि सँकोच तजि करिय छोहु लखि नेहु । हमहिँ कृतारथ करन लगि फल तृन अंकुर लेहु ॥ २४२ ॥**

" हें मनांत समजून, संकोच टाकून आणि आमची भक्ति पाहून आमच्यावर दया केलीच पाहिजे, आणि निदान आम्हांला कृतार्थ करण्यासाठीं तरी आमचे हें फळफळावळ आणि तृणांकुर आपण स्वीकारलेच पाहिजेत.

चौ०–तुह्म प्रिय पाहुन बन पग धारे ।
सेवाजोगु न भाग हमारे ।
देब काह हम तुह्महिँ गोसाई ।
ईँधनु पात किरात मिताई ।
यह हमारि अति बडि सेवकाई ।
लेहिँ न बासनबसन चोराई ।

"आपणांसारखे प्रिय अतिथि आपण होऊन घरीं चालून आले आहेत, परंतु आपल्या सेवेजोगीं आमचीं भाग्येंच नाहींत. महाराज ! आम्हीं आपणांस देणार तें काय ? आमची सगळी संपत्ति काय ती काष्ठपल्लवांची ! [1] आह्मीं आपलीं चिरगुटपांघुरणें लांबविलीं नाहींत, हीच आह्मीं आपली मोठी सेवा बजावली असें समजा.

हम जड जीव जीव-गन-घाती ।
कुटिल कुचाली कुमति कुजाती ।

---

१ मैत्री.

पाप करत निसि बासरजाहीँ ।
नहिँ पट कटि नहिँ पेट अघाहीँ ।
सपनेहुँ धरमबुद्धि कस काऊ ।
यह रघु–नंदन–दरस प्रभाऊ ।
जब तेँ प्रभु–पद–पदुम निहारे ।
मिटे दुसह–दुख–दोष हमारे ।

"आह्मी तर बोलूनचालूनच जड दुरात्मे, जीवाची हत्या करणारे, उलट्या काळजाचे, लबाड, दुष्टबुद्धि आणि कुलहीन आहोंत. आह्मी रात्रंदिवस पापें करकरून देखील आमच्या ढुंगणाला पुरेसें वस्त्र नाहीं आणि पोटाला पुरेसें अन्न नाहीं! धर्मबुद्धि कशी ती स्वप्नांतदेखील माहीत नाहीं! परंतु रघुनंदनाच्या दर्शनाचा प्रभाव असा आहे कीं, प्रभूचीं पदकमलें दृष्टीस पडल्यापासून आमचे दुःसह दोष आणि दुःखें पार लयाला गेलीं."[1]

बचन सुनत पुरजन अनुरागे ।
तिन्ह के भाग सराहन लागे ।

(हें त्या निषादांचें) भाषण ऐकून अयोध्यावासी जनांना देखील प्रेम वाटलें आणि ते त्यांच्या भाग्याची तारीफ करूं लागले.

**छंद—लागे सराहन भाग सब अनुराग बचन सुनावहीँ । बोलनि मिलनि सिय-राम-चरन-सनेह लखि सुख पावहीँ । नरनारि निदरहिँ नेह निज सुनि कोल भिल्लनि की गिरा । तुलसी कृपा रघु-बंस मनि की लोह लेइ नौका तिरा ॥ १० ॥**

सर्व मंडळी त्यांच्या भाग्याची वाखाणणी करून त्यांशीं प्रेमानें बोलूं लागली आणि त्यांच्या शब्दांत आणि भेटींत व्यक्त होणारें सीतारामचरणांबद्दलचें प्रेम पाहून आनंदित होऊं लागली. त्या कोळी-भिल्लांचे ते बोल ऐकून सर्व स्त्रीपुरुष आपल्या राम-विषयक प्रेमाला तुच्छ मानूं लागले. बा तुलसीदासा! रघुवंशमणीचीच ही कृपा कीं तिच्या योगानें नाव लोखंडास घेऊन देखील तरंगते. (ह्मणजे निषादांचें प्रेम अयोध्येंतील लोकांस देखील रामभक्तीच्या मार्गानें नेत आहे ही त्या रामाचीच कृपा होय हें तात्पर्य.)

[1] कवीनें शेवटच्या वाक्यद्वारां लोकामणी किती चारित्र्यवान् असावयास पाहिजे हें ध्वनित केलें.

**सो०--बिरहहिँ बन चहुँ ओर प्रतिदिन प्रमुदित लोग सब । जल ज्योँ दादुर मोर भये पीन पावस प्रथम ॥ १० ॥**

वर्षाकालाच्या प्रथम वृष्टीनें मयूर आणि दर्दुर जसे पुष्ट होऊन संचार करितात, तद्वत् सर्व समाज प्रतिदिनीं प्रमुदित होत्साता वनांत चारी दिशांनीं विहार करूं लागला.

चौ०—पुरजन नारि मगन अति प्रीती ।
बासर जाहिँ पलकसम बीती ।

अयोध्यावासी स्त्रीपुरुष प्रेमभरांत निमग्न झाल्या-मुळें त्यांस दिवस एका क्षणाप्रमाणें जाऊं लागला.

सीय सासु प्रति बेष बनाई ।
सादर करइ सरिस सेवकाई ।
लखा न मरम राम बिनु काहू ।
माया सब सियमाया माहूँ ।
सीय सासु सेवा बस कीन्ही ।
तिन्ह लहि सुख सिख आसिष दीन्ही ।

सीतेनें सास्वांगणिक निरनिराळें रूप धारण करून मोठ्या भक्तीनें त्यांची एकसारखी सेवा आरंभिली. हें मर्म रामखेरीज करून कोणींहि ओळखिलें नाहीं. माया तेवढ्या सर्व सीतेच्याच मायेंतील होत. सीतेनें सास्वांना आपल्या सेवेनें वश करून घेतलें. त्यांना आनंद होऊन त्यांनीं तीस उपदेश आणि आशीर्वाद दिले.

लखि सियसहित सरल दोउ भाई ।
कुटिल रानि पछितानि अघाई ।
अवनि जमहि जाँचति कैकेई ।
महि न बीचु बिधि मीचु न देई ।
लोकहु बेद बिदित कबि कहहीँ ।
राम बिमुख थलु नरक न लहहीँ ।

सीतेसह दोघेहि बंधु आपल्याशीं सरळपणें वागत आहेत असें पाहून त्या कुटिल कैकेयीस अधिकच पश्चात्ताप होऊं लागला. कैकेयी पृथ्वीची आणि यमाची विनवणी करूं लागली कीं, "हे वसुंधरे! तूंदेखील आपल्या पोटांत मला जागा देत नाहींसना! बा यमा! माझ्या दुर्दैवानें तूंदेखील मला जवळ करीत नाहींसना! शास्त्रांत आणि लौकिकांत अशीच प्रसिद्धि आहे आणि कवींचें देखील हेंच सांगणें आहे कीं, रामाच्या वैऱ्याला नरकांतदेखील जागा मिळत नसते."

यम संसउ सब के मन माहीँ ।
रामगवँन बिधि अवध कि नाहीँ ।

आपल्या नशिबानें राम अयोध्येला परत येतात किंवा नाहीं याबद्दल सर्वांच्याच मनांत शंका उत्पन्न झाली.

**दो०–निसि न नीँद नहिँ भूख दिन भरत बिकल सुठि सोच । नीच कीच बिच मगन जसि मीनहिँ सलिल सँकोच ॥२४३॥**

भरतास तर रात्रीं झोंप येईना, दिवसां भूक लागेना. वरून पाण्याची हाकाहाक आणि खालीं दलदल ह्यांच्यामध्यें अडकलेल्या माशाप्रमाणें तो अतिशय दुःखी होऊन तडफड करूं लागला.

चौ०–कीन्हि मातुमिस काल कुचाली ।
ईति भीति जस पाकत साली ।
केहि बिधि होइ रामअभिषेकू ।
मोहि अवकलत उपाउ न एकू ।

(तो मनांत म्हणे कीं,) "मातेच्या मिषानें कालगतीनेंच हा अनर्थ मांडला. ऐन भातांच्या कापणीच्या वेळीं अतिवृष्टीनें जसा घात करावा तद्वत् हें झालें. रामास अभिषेक कोणत्या रीतीनें होईल ? मला तर एकहि मार्ग आकळत नाहीं.

अवसि फिरहिँ गुरुआयसु मानी ।
मुनि पुनि कहब रामरुचि जानी ।
मातु कहेहु बहुरहिँ रघुराऊ ।
रामजननि हठ करबि कि काऊ ।
मोहि अनुचर कर केतिक बाता ।
तेहि महँ कुसमउ बाम बिधाता ।
जौँ हठ करउँ त निपट कुकरमू ।
हरगिरि तेँ गुरु सेवकधरमू ।

"गुरुजींची आज्ञा मानून राम अवश्य परततील. परंतु ते रामाची मर्जी ओळखून बोलणार ! कौसल्येनें सांगितल्यास ते मागें फिरतील. परंतु ती तरी रामाचीच माता, ती असा केव्हां तरी हट्ट धरील काय ? माझी नोकरमाणसाची बिशाद किती ! त्यांतून माझे वाईट दिवस आणि नशीब फिरलेलें ! मी जर हट्ट धरून बसलों तर माझ्या द्वाडपणाची कमालच होणार.कारण सेवाधर्म हा कैलास पर्वतापेक्षांहि अवघड आहे."

एकउ जुगुति न मन ठहरानी ।
सोचत भरतहिँ रैनि बिहानी ।

प्रात नहाइ प्रभुहिँ सिर नाई ।
बैठत पठये रिषय बोलाई ।

( याप्रमाणें विचार करितां करितां ) एकहि क्लृप्ति त्याच्या मनांत ठाम होईना. ह्याच विवंचनेंत भरतानें सारी रात्र घालविली. पहाट होतांच स्नान करून आणि रामचंद्रास नमस्कार करून तो बसला असतां गुरुमहाराजांनीं त्यास बोलाविणें पाठविलें.

**दो०–गुरु-पद-कमल प्रनाम करि बैठे आयसु पाइ । बिप्र महाजन सचिव सब जुरे सभासद आइ ॥ २४४ ॥**

गुरुपदकमलांस वंदन करून व त्यांची आज्ञा घेऊन भरत बसला तोंच ब्राह्मणमंडळी,सरदारमंडळी, प्रधानमंडळी वगैरे सर्व सभासद येऊन दरबार भरला.

चौ०–बोले मुनिबर समयसमाना ।
सुनहु सभासद भरत सुजाना ।
धरमधुरीन भानु--कुल--भानू ।
राजा राम स्वबस भगवानू ।
सत्यसंध पालक स्रुतिसेतू ।
रामजनम जग मंगलहेतू ।
गुरु-पितु-मातु-बचन-अनुसारी ।
खल-दल-दलन देव-हित-कारी ।
नीति प्रीति परमारथ स्वारथ ।
कोउ न रामसम जान जथारथ ।

प्रसंगास अनुलक्षून मुनिश्रेष्ठ म्हणालेः—"अहो ! सभासद हो ! हे सुज्ञ भरता ! धर्मधुरंधर आणि सूर्यकुलांतील सूर्यच असा हा रामराजा प्रत्यक्ष स्वतंत्र भगवान् आहे. हा सत्यप्रतिज्ञ असून श्रुतिसेतूंचा पालक होय. रामाचा अवतार केवळ जगाच्या उद्धाराकरितां झाला आहे. गुरु, माता आणि पिता यांची आज्ञा परिपालन करणारा, दुष्टांच्या सैन्याचें निर्दाळण करणारा आणि देवांचें कल्याण करणारा असा हा राम जसें स्वार्थ अथवा परमार्थ, नीति किंवा प्रीति यांतील रहस्य जाणतो, तसें वस्तुतः इतर कोणीहि जाणीत नाहीं.

बिधि हरि हर ससि रबि दिसि पाला ।
माया जीव करम कुलि काला ।
अहिप महिप जहँ लगि प्रभुताई ।
जोग सिद्धि निगमागम गाई ।
करि बिचार जिय देखहु नीके ।
रामरजाइ सीस सबही के ।

ब्रह्मा, विष्णु, शिव, चंद्र, सूर्य, दिग्पाल, माया, जीव, कलिकाल, सर्पराज शेष, पृथ्वीपति इत्यादि यावत् प्रभुत्व, योग आणि सिद्धि वेदशास्त्रांनीं वर्णन केली आहेत त्या सर्वांचे शिरावर रामाचीच आज्ञा आहे असें पूर्ण विचारांतीं तुम्हांस आढळून येईल.

**दो०–राखे राम रजाइ रुख हम सब कर हित होइ। समुझि सयाने करहु अब सब मिलि संमत सोइ ॥ २४५ ॥**

"रामाची इच्छा आणि आज्ञा पाळण्यांतच आम्हा सर्वांचें हित आहे, ह्याचा सर्व सुज्ञांनीं विचार करून सर्वानुमतानें पुढील कर्तव्याची दिशा ठरवावी.

चौ०–सब कहँ सुखद रामअभिषेकू।
मंगल–मोद–मूल मग एकू।
केहि बिधि अवध चलहिँ रघुराऊ।
कहहु समुझि सोइ करिय उपाऊ।

"रामाला अभिषेक होणें हें सर्वांनाच सुखप्रद असून कल्याण व आनंद यांस कारणीभूत होणारा तो एकच मार्ग आहे. राम अयोध्येप्रत कोणत्या उपायें-करून घेतलि तें मननपूर्वक निर्दिष्ट करावें म्हणजे तशीच योजना करण्यांत येईल."

सब सादर सुनि मुनि–बर–बानी।
नय–परमारथ–स्वारथ–सानी।
उतर न आव लोग भये भोरे।
तब सिरनाइ भरत कर जोरे।

नीति, परमार्थ आणि स्वार्थ यांनीं परिप्लुत असें तें वसिष्ठांचें भाषण मंडळींनीं आदरपूर्वक ऐकून घेतलें. परंतु त्यावर कोणाकडूनच उत्तर येईना. सर्व सभासद गोंधळून गेले. तेव्हां मस्तक नमवून व हात जोडून भरत म्हणाला:--

भानुबंस भये भूप घनेरे।
अधिक एक तेँ एक बडेरे।
जनम हेतु सब कहँ पितु माता।
करम सुभासुभ देइ बिधाता।
दलि दुख सजइ सकल कल्याना।
अस असीस राउरि जग जाना।
सोइ गोसाइँ बिधिगति जेहि छेकी।
सकइ को टारि टेक जो टेकी।

"ह्या सूर्यवंशांत एकापेक्षां एक वरचढ असे पुष्कळच राजे होऊन गेले. त्या सर्वांचे आईबाप हे केवळ जन्माला निमित्तमात्र असून त्यांच्या इष्टानिष्ट कर्मांचा दाता एक ब्रह्मदेवच होय. अनिष्टाचें सर्वतोपरी इष्ट करणें ही कर्तबगारी ज्या श्रेष्ठांच्या आशीर्वादांत आहे ह्मणून सर्वजग साक्ष देईल, त्या ब्रह्मलिखितावर देखील हरताळ फासणाऱ्या, ह्या आमच्या गुरुमहाराजांनीं आज जर अमुक एक प्रतिज्ञा केली तर तिचा भंग करण्याची कोणाची प्राज्ञा आहे!

**दो०–बूझिय मोहि उपाउ अब सो सब मोर अभाग। सुनि सनेह-मय-बचन गुरु उर उमगा अनुराग ॥ २४६ ॥**

"अशा प्रसंगीं महाराजांनीं मला मसलत विचारावी हें एकंदरींत माझें दुर्भाग्यच होय." भरताचें हें भक्तिपूर्ण भाषण ऐकून गुरुमहाराजांचें हृदयांत प्रेम उचंबळूं लागलें.

चौ०–तात बात फुरि राम कृपाहीँ।
रामबिमुख सिधि सपनेहु नाहीँ।
सकुचउँ तात कहत एक बाता।
अरध तजहिँ बुध सरबस जाता।
तुह्म कानन गवँनहु दोउ भाई।
फेरियहि लषन सीय रघुराई।

वसिष्ठ ह्मणाले, "हे तात! सर्व गोष्ट खरी आहे. परंतु ती तरी त्या रामाचीच कृपा समज, रामाशीं विरोध मांडल्यावर सिद्धीची (आशीर्वादाची फलद्रूपता) स्वप्नांतदेखील आशा करूं नये. वत्सा! एक उपाय आहे, परंतु तो सांगण्यास मला संकोच वाटतो. सर्वच जाण्याचा प्रसंग बेतला असतां सुज्ञ लोक अर्ध्याचा त्याग करतात. तुम्ही बंधुद्वयांनीं वनवासाप्रत गमन करून सीतारामलक्ष्मणांस परावृत्त करावें."[1]

सुनि सुबचन हरषे दोउ भ्राता।
भे प्रमोद–परि–पूरन गाता।
मन प्रसन्न तनु तेज बिराजा।
जनु जिय राउ राम भये राजा।

मुनींचें तें मधुर वचन श्रवण करतांच दोघेहि बंधु हर्षित झाले. त्यांच्या शरीरांत आनंदी आनंद भरून गेला. त्यांचें चित्त प्रसन्न होऊन शरीरावर तेज झळकूं लागलें. जणुं राम राज्यारूढ झालें असें त्यांच्या अंतःकरणास वाटलें.

---

१ भरताच्या शुद्धतेची (कैकेयीच्या कटांत नसण्याची) वसिष्ठांची ही दुसरी परीक्षा.

बहुत लाभ लोगन्ह लघु हानी ।
सम दुखसुख सब रोवहिँ रानी ।

मंडळीस अल्पहानि परंतु बहुत लाभ झाला असें वाटलें. परंतु राण्यांना मात्र सारखेंच सुख आणि दुःख होऊन त्या सर्व रुदन करूं लागल्या.

कहहिँ भरत मुनि कहा सो कीन्हे ।
फल जग जीवन्ह अभिमत दीन्हे ।
कानन करउँ जनम भरि बासू ।
एहि तें अधिक न मोर सुपासू ।

तेव्हां भरत म्हणूं लागलाः—"मुनिरायांनीं बोलल्याप्रमाणें केल्यास जगांतील जीवमात्रास त्यांनीं अभीष्टसिद्धीच दिल्याप्रमाणें होईल. सारा जन्मभरदेखील मी अरण्यांतच राहीन. ह्यापेक्षां मला अधिक पथ्यकर असें कांहींच नाहीं.

दो०—अंतरजामी रामसिय तुम्ह सरबज्ञ सुजान । जौं फुर कहहु त नाथ निज कीजिय बचन प्रमान ॥ २४७ ॥

" सीताराम अंतर्यामी आहेत आणि आपण देखील सर्वज्ञ आणि सुज्ञच आहांत. मी बोललों हें जर सत्य असेल तर महाराज आपलें वचन खरें करून दाखवितील. "

चौ०—भरतबचन सुनि देखि सनेहू ।
सभासहित मुनि भयउ बिदेहू ।
भरत-महा-महिमा जलरासी ।
मुनिमति ठाढि तीर अबला सी ।
गा चह पार जतनु हिय हेरा ।
पावति नाव न बोहित बेरा ।

भराताचें भाषण ऐकून आणि त्याची भक्ति पाहून सभासदांसह मुनिराज देहमान विसरले. भरताच्या अगाध महिमारूप समुद्राच्या तीरावर मुनींची मति अबलेप्रमाणें हताश झाली आणि तिनें पार जाण्याच्या इच्छेनें मनांत यत्न करून पाहिला, परंतु तीस जहाज, होडी किंवा नाव कांहींच मिळेना.

अउर करहि को भरत बडाई ।
सर सीपी की सिंधु समाई ।

( वसिष्ठासारखे जर थकले तर ) भरताचा महिमा इतर कोण वर्णन करूं शकणार ? तळ्यांतील शिंपल्यांत समुद्राचा समावेश होईल काय ?

भरत मुनिहि मनभीतर भाये ।
सहितसमाज राम पहिँ आये ।

प्रभु प्रनाम करि दीन्ह सुआसन ।
बैठे सब मुनि मुनिअनुसासन ।

भरत मुनिवसिष्ठांच्या मनाच्या अंतरंगांत प्रविष्ट झाला. नंतर वसिष्ठ समाजासहवर्तमान रामाकडे आले. प्रभूंनीं प्रणाम करून त्यांस योग्य आसन दिलें. मुनींची आज्ञा श्रवण करून सर्वजण बसले.

बोले मुनिबर बचन बिचारी ।
देसकाल अवसर अनुहारी ।
सुनहु राम सरबज्ञ सुजाना ।
धरम-नीति-गुन-ज्ञान-निधाना ।

देशकालवर्तमान यांस अनुसरून मुनिवरांनीं विचारपूर्वक भाषणास प्रारंभ केला. ते म्हणाले, " हे सर्वज्ञ, सुज्ञ आणि धर्मनीतिगुणज्ञाननिधान रामा ! श्रवण करा.

दो०—सब के उरअंतर बसहु जानहु भाउ कुभाउ । पुरजन-जननी-भरत-हित होइ सो कहिय उपाउ ॥ २४८ ॥

सर्वांच्याच अंतर्यामीं आपला वास आहे. आपणांस सर्वांच्याच सदसद्धेतूंचें ज्ञान आहे. म्हणून पुरजन, माता, आणि भरत यांचें सर्वसाधारण हित होईल अशीच योजना आपण सांगितली पाहिजे.

चौ०—आरत कहहिँ बिचारि न काऊ ।
सूझ जुआरिहि आपुन दाऊ ।

" आर्तजनांचें भाषण विचारपूर्वक कधींच नसतें. जुगाऱ्याला आपलाच डाव सुचतो. "

सुनि मुनिबचन कहत रघुराऊ ।
नाथ तुह्मारेहि हाथ उपाऊ ।
सब कर हित रुख राउरि राखे ।
आयसु किये मुदित फुर भाखे ।
प्रथम जो आयसु मो कहँ होई ।
माथे मानि करउँ सिख सोई ।
पुनि जेहि कहँ जस कहब गोसाईँ ।
सो सब भाँति घटिहि सेवकाई ।

याप्रमाणें वसिष्ठांची प्रस्तावना ऐकून राम म्हणालेः—"हे नाथ ! उपाय हा केवळ आपल्याच हातांत आहे. महाराजांची मर्जी संभाळण्यांतच सर्वांचें हित आहे आणि आपली आज्ञा बजावण्यांतच सर्वांना आनंद होईल हें मी प्रतिज्ञापूर्वक सांगतों. प्रथम मला जी कांहीं आज्ञा होत असेल ती मी

शिरसामान्य करून त्याचप्रमाणें वर्तन करीन. नंतर स्वामी ज्याला ज्याला जशी आज्ञा करितील त्याप्रमाणें तो सर्वतोपरी त्याची अमलबजावणी करील.''

कह मुनि राम सत्य तुम्ह भाखा।
भरत-सनेह-बिचार न राखा।
तेहि तें कहउँ बहोरि बहोरी।
भरत-भगति-बस भइ मति मोरी।
मोरे जान भरतरुचि राखी।
जो कीजिय सो सुभ सिव साखी।

हे ऐकून मुनि म्हणालेः—रामा! आपण बोललां तें खरेंच, परंतु भरताच्या प्रेमाचा मात्र विचार केला नाहीं. अतएव मी आपणांस पुनःपुनः सांगतों कीं, भरताच्या भक्तीनें भारून टाकल्यामुळें माझी बुद्धि अगदीं वेडावून गेली आहे. शंकर साक्ष माझ्या समजुतीनें तर भरताची इच्छा कायम राखून जें करण्यांत येईल तेंच श्रेयस्कर होय.

## दो०—भरतबिनय सादर सुनिय करिय बिचार बहोरि। करब साधुमत लोकमत नृपनय निगम निचोरि॥ २४९॥

''भरताची विनंति मनोभावानें ऐकून घ्यावी आणि नंतर विचार करून संतसंमत, लोकप्रतिपाद्य, आणि राजनीति व वेद यांना सारभूत असें जें काय कर्तव्य असेल तें करावें.''

चौ०—गुरुअनुराग भरत पर देखी।
रामहृदय आनंद बिसेखी।
भरतहिँ धरम-धुरं-धर जानी।
निजसेवक तन-मानस-बानी।
बोले गुरु-आयसु-अनुकूला।
बचन मंजु मृदु मंगलमूला।

गुरूंचें भरतावरील प्रेम पाहून रामाच्या अंतःकरणास विशेषच आनंद झाला. भरतास धर्मधुरंधर आणि तनुमनवाणीनें निजसेवक जाणून गुरूंच्या आज्ञेला अनुसरून मंजुल, मृदुल आणि मंगलमूल अशा वाणीनें रामचंद्र म्हणाले—

नाथ सपथ पितु चरन दोहाई।
भयउ न भुवन भरतसम भाई।
जे गुरु-पद-अंबुज-अनुरागी।
ते लोकहुँ बेदहुँ बडभागी।
राउर जा पर अस अनुरागू।
को कहि सकइ भरत कर भागू।

''महाराजांची आणि पितृचरणांची शपथ घेऊन मी सांगतों कीं भरतासारखा बंधु जगांत झाला नाहीं. जे गुरुपदकमलांचे ठायीं भक्ति करितात तेच व्यवहार आणि शास्त्र यांच्या दृष्टीनें महद्भाग्यशाली होत. महाराजांचें ज्याचेवर असें प्रेम आहे त्या भरताचें भाग्य कोण वर्णन करूं शकेल?

लखि लघुबंधु बुद्धि सकुचाई।
करत बदन पर भरतबडाई।
भरत कहहिँ सोइ किये भलाई।
अस कहि राम रहे अरगाई।

''भरत हा कनिष्ठ बंधु असून त्याच्या तोंडावरच मी त्याची स्तुति करीत आहें हें लक्षांत आलें म्हणजे मनाला संकोच वाटतो. भरत म्हणेल त्याप्रमाणेंच करण्यांत चांगुलपणा आहे.'' इतकें बोलून राम स्तब्ध बसले.

## दो०—तब मुनि बोले भरत सन सब सँकोच तजि तात। कृपासिंधु प्रियबंधु सन कहहु हृदय कइ बात॥ २५०॥

तेव्हां मुनी भरतास म्हणालेः—''वत्सा! सर्व संकोच सोडून ह्या कृपासागर प्रियबंधूजवळ आपलें हृद्गत निवेदन कर.''

चौ०—सुनि मुनिबचन रामरुख पाई।
गुरु साहिब अनुकूल अघाई।
लखि अपने सिर सब छरुभारू।
कहि न सकहिं कछु करहिँ बिचारू।

मुनींचें भाषण आणि त्यास मिळालेलें रामाचें अनुमोदन पाहून आणि गुरु आणि प्रभु यांचें पूर्ण आनुकूल्य जाणून व आपल्याच शिरावर हा सर्व भार आहे हें ओळखून भरताच्यानें कांहींच बोलवेना. तो नुसता विचारच करीत राहिला.

पुलकि सरीर सभा भये ठाढे।
नीरजनयन नेहजल बाढे।
कहब मोर मुनिनाथ निबाहा।
एहि तें अधिक कहउँ मैं काहा।

अखेर पुलकितगात्र होत्साता भरत सभेंत उभा राहिला. त्याच्या कमलनेत्रांतून प्रेमाश्रू वाहूं लागले. तो म्हणालाः—''मुनिराजांनीं आधींच माझें म्हणणें मान्य केलें आहे. त्यापेक्षां मी अधिक तें काय म्हणणार?

मैं जानउँ निजनाथ सुभाऊ ।
अपराधिहु पर कोह न काऊ ।
मो पर कृपा सनेह बिसेखी ।
खेलत खुनस न कबहूँ देखी ।
सिसुपन तें परिहरेउ न संगू ।
कबहुँ न कीन्ह मोर मन भंगू ।
मैं प्रभु कृपारीति जिय जोही ।
हारेहु खेल जितावहिं मोही ।

अपराध्यांवर देखील कधींहि क्रोध न करण्याचा माझ्या प्रभूंचा स्वभाव मी जाणून आहें. मजवर तर त्यांची विशेषच कृपा आहे. खेळत असतांना देखील मजवर कधीं ते चिरडीस गेलेले मीं पाहिले नाहींत. बालपणापासून मला कधीं ते सोडून गेले नाहींत व कधीं त्यांनीं माझा मनोभंगहि केला नाहीं. प्रभूंची प्रेमपद्धति मी हृदयांत जाणून आहे. मी डाव जरीं हारलों तरी शेवटीं त्यांनीं मीच डाव जिंकेन असें करावें.

**दो०—महूँ सनेह-सकोच-बस सनमुख कहे न बैन । दरसन तृपित न आजु लगि प्रेम पियासे नैन ॥ २५१ ॥**

मीहि स्वामींच्या प्रेमसंकोचास्तव त्यांच्या समोर अवाक्षर देखील बोललों नाहीं. अद्यापि तरी त्यांच्या दर्शनाविषयींची लालसा तृप्त न होऊन हे माझे नेत्र प्रेमाचे तहानेलेलेच आहेत.

चौ०—बिधि न सकेउ सहि मोर दुलारा ।
नीच बीच जननी मिस पारा ।
यहउ कहत मोहि आजु न सोभा ।
अपनी समुझि साधु सुचि को भा ।

प्रभूंचें मजवरील प्रेम सहन न करून ह्या माझ्या दुर्दैवानें माझ्या मातेचें मध्येंच एक निमित्त उपस्थित केलें. हें म्हणणें मला आज शोभत नाहीं. कारण स्वतःच्या मतावर कोण साधु आणि पवित्र ठरणार ?

मातु मंद मैं साधु सुचाली ।
उर अस आनत कोटि कुचाली ।
फरइ कि कोदव बालि सुसाली ।
मुकता प्रसव कि संबुक ताली ।
सपनेहु दोस कलेस न काहू ।
मोर अभाग उदधिअवगाहू ।

माता दुष्ट आणि मी मात्र साधु आणि सज्जन हें मनांत आणणें म्हणजेच द्वाडपणावर कळस करण्यासारखें आहे. कुरडूच्या तुऱ्यांतून सुवासिक भात निपजेल काय ? तळ्याच्या शिंपल्यांत मोती निर्माण होईल काय ? माझ्या दुःखाबद्दल स्वप्नांत देखील कोणाकडेसहि दोष नाहीं. माझें दुर्दैव म्हणजे एक अगाध समुद्र आहे.

बिनु समुझे निज-अघ-परिपाकू ।
जारिउँ जाय जननि कहि काकू ।
हृदय हेरि हारेउँ सब ओरा ।
एकहि भाँति भलेहि भल मोरा ।
गुरु गोसाइँ साहिब सियरामू ।
लागत मोहि नीक परिनामू ।

हीं माझ्याच पातकांचीं फळें होत, हें न समजून आईला दुःशब्द बोलणें म्हणजे तिला निव्वळ भाजण्यासारखें आहे. मनांत विचार केला असतां सर्व बाजूंनीं मला निराशाच आढळून आली. फक्त एकाच मार्गानें माझें उत्तमोत्तम हित होईल. हे गुरुमहाराज आणि प्रभु सीतारामचंद्र यांच्याच योगानें बरी गत होईल.

**दो०—साधु-सभा गुरु-प्रभु-निकट कहहुँ सुथल सतिभाउ । प्रेम प्रपंच कि झूठ फुर जानहिं मुनि रघुराउ ॥ २५२ ॥**

संतसभेंत, गुरुमहाराज आणि प्रभु सन्निध असतां व अशा पवित्र क्षेत्रांत मी जें बोलत आहें तें सद्भावाचें कीं कुटिलपणाचें, खरें किंवा लटकें, जें काय असेल ते मुनिराज आणि रघुराय जाणतीलच.

चौ०—भूपतिमरन प्रेमपनु राखी ।
जननी कुमति जगत सब साखी ।
देखि न जाहिं बिकल महतारी ।
जरहिं दुसह जर पुर-नर-नारी ।
महीं सकल अनरथ कर मूला ।
सो सुनि समुझि सहेउँ सब सूला ।

राजानें मरण पत्करूनहि आपली प्रेमप्रतिज्ञा कायम राखिली. माझ्या मातेची द्वाड वासना ( त्यांच्या मृत्यूला कारणीभूत झाली ) याबद्दल अवघें जग साक्ष देत आहे. इतर माता दुःखित झालेल्या बघवतदेखील नाहींत. दुःसह रामविरहज्वरानें सर्व प्रजा दग्ध होत आहे. ह्या एकंदर अनर्थास कारण हा

मी, हें ऐकत आणि जाणत असूनहि, सर्व दुःख जीवंत राहून सोशीतच आहें.

सुनि बनगवनु कीन्ह रघुनाथा।
करि मुनिबेष लषन-सिय-साथा।
बिनु पानहिन्ह पयादेहि पाये।
संकरु साखि रहेउँ एहि घाये।
बहुरि निहारि निषादसनेहू।
कुलिस कठिन उर भयउ न बेहू।

रघुनाथांनीं सीतालक्ष्मणांसह मुनिवेष धारण करून वनांत आगमन केलें आणि तेंहि पायीं पायीं आणि अनवाणें ह्याला शंकरच साक्ष आहेत. हा घाव लागून-देखील मी जीवंतच आहे. फिरून निषादाचें प्रेम अवलोकन करूनहि माझी ही वज्राप्रमाणें कठोर छाती दुभंगली नाहीं.

अब सब आँखिन्ह देखेउँ आई।
जियत जीव जड सबइ सहाई।
जिन्हहिँ निरखि मग साँपिनि बीछी।
तजहिँ बिषमबिष तामस तीछी।

" आतां तर येथें येऊन मी सर्व डोळ्यांनींच पहात आहे, आणि हें सर्व माझ्या जडजीवानें जीवंतपणींच सहन केलें. ज्यांना पाहून मार्गांतून विंचूसर्प देखील आपलें जालीम विष आणि तामसी कठोरता झुगारून देतात—

**दो०—तेइ रघुनंदन लषन सिय अनहित लागे जाहि। तासु तनय तजि दुसह दुख दैव सहावइ काहि ॥ २५३ ॥**

ते रघुनंदन, लक्ष्मण आणि सीता जीस हितशत्रू वाटले, तिच्या मुलास सोडून दैव तरी दुःसह दुःख सहन करण्यास कोणास बरें लावील ? "

चौ०—सुनि अतिबिकल भरत-बर-बानी।
आरति-प्रीति-बिनय-नय-सानी।
सोकमगन सब सभा खभारू।
मनहुँ कमलबन परेउ तुषारू।
कहि अनेकबिधि कथा पुरानी।
भरतप्रबोधु कीन्ह मुनि ज्ञानी।

कारुण्य, प्रेम, नम्रता आणि नीति यांनीं परिप्लुत असें तें भरताचें सुंदर आणि केविलवाणें भाषण ऐकून सर्व सभा शोकमग्न होऊन क्षुब्ध झाली. कमलवनावर हिमस्राव झाल्याप्रमाणेंच सर्वांना वाटलें. तेव्हां अनेक प्रकारचे पुराणेतिहास सांगून ज्ञानराज वसिष्ठ मुनींनीं भरताचें समाधान केलें.

बोले उचितबचन रघुनंदू।
दिन-कर-कुल-कैरव-बन-चंदू।
तात जाय जिन करहु गलानी।
ईसअधीन जीवगति जानी।

नंतर सूर्यकुलरूप कमलवनाचा चंद्र जो रामचंद्र तो समयोचित भाषण करूं लागलाः—" वत्सा ! जीवगति ही ईश्वराधीन आहे असें समजून विनाकारण खंत करूं नकोस.

तीनि काल त्रिभुवन मत मोरे।
पुन्यसलोक तात तर[1] तोरे।
उर आनत तुम्ह पर कुटिलाई।
जाइ लोक-परलोक-नसाई।
दोष देहिँ जननिहि जड तेई।
जिन्ह गुरु–साधु–सभा नहिँ सेई।

" हे तात ! माझ्या मतें तर त्रैलोक्यांतील पुण्यश्लोक जन कालत्रयीं तुझ्याच योगानें उद्धरत असतात. मनांत तुजवर कौटिल्याचा आरोप करणारा इहलोकाला मुकून परलोकालाहि आंचवणार ! ज्यांना सद्गुरु आणि संतसमाज यांचें सेवनच घडलें नाहीं, असेच महामूर्ख मातेला तरी दोष देतील.

**दो०—मिटिहहिँ पाप प्रपंच सब अखिल अमंगल भार। लोक सुजस परलोक सुख सुमिरत नाम तुम्हार ॥ २५४ ॥**

" निखिल पातकांच्या राशि आणि सर्व अमंगलाचा भार नामशेष होऊन इहपरत्र सत्कीर्ति आणि सुख हें तुझ्या नामस्मरणानेंच प्राप्त होतात.

चौ०—कहउँ सुभाउ सत्य सिव साखी।
भरत भूमि रह राउरि राखी।
तात कुतरक करहु जनि जाये।
बैर प्रेम नहिँ दुरइ दुराये।
मुनिगुनि निकट बिहँग मृग जाहीँ।
बाधक बधिक बिलोकि पराहीँ।
हित अनहित पसु पच्छिउ जाना।
मानुषतनु गुन–ज्ञान–निधाना।

---

१ ' तर ' चा दुसरा अर्थ ' खालीं ' असाहि होतो. तदनुसार ' सर्व पुण्यश्लोक तुझ्या खालच्या कोटींतले होत ' असाहि अर्थ होतो.

" भरता ! शंकरच साक्ष, मी अगदीं मनःपूर्वक आणि सत्यभावानें सांगतों कीं, तुझ्याचमुळें ह्या पृथ्वीचें रक्षण होत आहे. हे तात! व्यर्थ कुतर्क काढीत बसूं नकोस. वैर आणि प्रेम हीं लपविल्यानेंहि लपत नसतात. पक्षी व मृग हेदेखील ऋषींना पाहून त्यांचे जवळ जातात आणि तेच दुष्ट आणि हिंसक यांस पाहून पळून जातात ! हित-अनहित हें पशु-पक्ष्यांस देखील कळतें. मग नरदेह तर गुण आणि ज्ञान यांचें भांडारच होय.

तात तुह्महिँ मैँ जानउँ नीके ।
करउँ काह असमंजस जी के ।
राखेउ राय सत्य मोहि त्यागी ।
तनु परिहरेउ प्रेमपन लागी ।

" वत्सा ! तुला मी पक्कें ओळखीत आहें. परंतु काय करूं ? माझ्याहि जीवास मोठीच विवंचना लागली आहे. राजानें माझा त्याग करून देखील आपलें सत्य संभाळलें आणि आपल्या प्रेमप्रतिज्ञेस्तव देहाचाहि त्याग केला.

तासु बचन मेटत मन सोचू ।
तेहि तेँ अधिक तुह्मार सँकोचू ।
ता पर गुरु मोहि आयसु दीन्हा ।
अवसि जो कहहु चहउँ सोइ कीन्हा ।

" त्यांची आज्ञा उल्लंघन करण्यास मनापासून वाईट वाटतेंच; परंतु त्याहीपेक्षां तुझा अधिक संकोच वाटतो. इतक्यावर गुरुमहाराजांनीं आज्ञा दिलेलीच आहे त्याअर्थी तूं जें सांगशील तेंच मला अवश्य केलें पाहिजे. "

**दो०—मन प्रसन्न करि सकुच तजि कहहु करउँ सोइ आजु । सत्य-संध-रघुबर-बचन सुनि भा सुखी समाजु ॥ २५५ ॥**

"मन प्रसन्न करून आणि संकोच टाकून तूं बोल मात्र, कीं, त्याप्रमाणेंच मी आतांच्या आतां करीन." सत्यप्रतिज्ञ रघुवराचें हें भाषण ऐकून सर्व मंडळींना आनंद झाला.

चौ०—सुर-गन-सहित सभय सुरराजू ।
सोचहिँ चाहत होन अकाजू ।
बनत उपाउ करत कछु नाहीँ ।
रामसरन सब गे मन माहीँ ।

(रामाचें भाषण ऐकून) देवगणांसह इंद्र भयभीत झाला आणि विघ्न करण्याच्या इच्छेनें चिंतन करूं लागला. त्यानें पुष्कळ विचार केला, परंतु उपाय सुचेना. अखेर तो मनानें रामासच शरण गेला.

बहुरि बिचारि परसपर कहहीँ ।
रघुपति भगत-भगति-बस अहहीँ ।
सुधि करि अंबरीष दुरबासा ।
भे सुर सुरपति निपट निरासा ।

फिरून ते देव आणि देवेंद्र विचार करून परस्परांस ह्मणत कीं, रघुपती हे भक्ताच्या भक्तिपाशानें आकळलेले असतात. अंबरीष आणि दुर्वासऋषींची आठवण होऊन तर देव आणि देवेंद्र अगदींच हताश झाले.

सहे सुरन्ह बहुकाल बिषादा ।
नरहरि किये प्रगट प्रहलादा ।
लगि लगि कान कहहिँ धुनि माथा ।
अब सुरकाज भरत के हाथा ।
आन उपाउ न देखिय देवा ।
मानत राम सु-सेवक-सेवा ।
हिय सप्रेम सुमिरहु सब भरतहिँ ।
निज गुन-सील रामबस करतहिँ ।

ते एकमेकांच्या कानीं लागून आणि मस्तक हलवून म्हणतः—" आपण देवांनीं पुष्कळ कालपर्यंत दुःखें सोसलीं, तेव्हां प्रल्हादानेंच नृसिंहाला प्रकट केलें. आतां देवांचें कार्य भरताचेच हातीं आहे. देव हो ! आतां अन्य उपायाच्या भरीस पडूं नये. राम हे आपल्या एकनिष्ठ सेवकाची सेवा मान्य करीत असतात. अतएव स्वतःच्या गुणशीलांनीं रामास वश करणाऱ्या भरताचेच आपण सर्वांनीं सप्रेम अंतःकरणानें स्मरण केलें पाहिजे. "

**दो०—सुनि सुरमत सुरगुरु कहेउ भल तुह्मार बडभाग । सकल सु-मंगल-मूल जग भरत-चरन-अनुराग ॥ २५६ ॥**

देवांचा तो निश्चय ऐकून देवगुरु म्हणालेः— " धन्य धन्य तुमचें भाग्य ! भरतचरणीं प्रेम असणें हेंच जगांत सर्व सुमंगलांचें मूळ होय.

चौ०—सीता-पति-सेवक सेवकाई ।
काम-धेनु-सय-सरिस सुहाई ।
भरतभगति तुह्मरे मन आई ।
तजहु सोचु बिधि बात बनाई ।
देखु देवपति भरतप्रभाऊ ।
सहज-सुभाय-बिबस रघुराऊ ।

मन थिर करहु देव डर नाहीं ।
भरतहिँ जानि रामपरिछाहीं ।

" सीतापतीच्या सेवकाची सेवा हीच शतकामधेनूंप्रमाणें श्रेयस्कर आहे. ज्याअर्थी भरताची भक्ति तुमच्या मनांत उपस्थित झाली त्याअर्थी तुम्ही शोकाचा त्याग करा. ब्रह्मदेवानेंच तुमची गोष्ट सावरली. हे देवेंद्रा ! ज्याच्या स्वयंसिद्ध स्वभावानें रघुराजदेखील पूर्णपणें बद्ध झाले आहेत त्या भरताचा प्रभाव तर अवलोकन कर. देवहो ! मन स्थिर करा, आणि भरतास रामाचीच अपरप्रतिमा समजा म्हणजे तुम्हांला भयच नाहीं. "

सुनि सुरगुरु–सुर–संमत सोचू ।
अंतरजामी प्रभुहिँ सँकोचू ।
निजसिर भार भरत जिय जाना ।
करत कोटिबिधि उर अनुमाना ।

याप्रमाणें देवांचें आणि देवगुरूंचें ऐकमत्य आणि दुःख श्रवण करून अंतर्यामी प्रभूस संकोच वाटला. स्वतःच्या शिरावरच भार आहे हें जाणून भरत आपल्या मनांत कोट्यवधि कल्पना करूं लागला.

करि बिचार मन दीन्ही ठीका ।
रामरजायसु आपन नीका ।
निजपन तजि राखेउ पन मोरा ।
छोह सनेह कीन्ह नहिँ थोरा ।

विचार करितां करितां त्याच्या मनानें हाच निश्चय केला कीं, रामाच्या आज्ञेंतच आपलें कल्याण आहे. आपला पण सोडून देऊन माझाच पण त्यांनीं तडीस नेला हें त्यांचें प्रेमाचें आणि लाडिवाळपणाचें कृत्य कांहीं अल्पस्वल्प नव्हे.

**दो०–कीन्ह अनुग्रह अमितअति सब बिधि सीतानाथ । करि प्रनाम बोले भरत जोरि जल-ज-जुग-हाथ ॥ २५७ ॥**

सीतापतीनीं सर्व तऱ्हेनें अगणित असेच उपकार केले आहेत. ( हें मनांत धरून ) कमलहस्तयुगुल जोडून भरत प्रणामपूर्वक बोलूं लागला.

चौ०–कहउँ कहावउँ का अब स्वामी ।
कृपा–अंबु–निधि अंतरजामी ।
गुरु प्रसन्न साहिब अनुकूला ।
मिटी मलिन मनकलपित सूला ।

" हे दयासागर अंतर्यामी प्रभो ! आतां बोलावयाचें आणि सांगावयाचें तरी काय ? गुरु प्रसन्न आणि धनीहि अनुकूल, एकंदरीनें माझ्या मनःकल्पित दारुण दुःखाचा अंत झाला.

अपडर डरेउँ न सोच समूले ।
रविहि न दोष देव दिसि भूले ।
मोर अभाग मातकुटिलाई ।
बिधिगति बिषम कालकठिनाई ।
पाउँ रोपि सब मिलि मोहि घाला ।
प्रनतपाल पन आपन पाला ।

" नसत्याच भयानें मी भांबावलों होतों, परंतु आतां माझी चिंता समूळ नाहींशी झाली. दिग्भ्रमाचा दोष रवीस देतां कामा नये. माझें दुर्भाग्य, मातेचें कौटिल्य, दैवाचा दुर्विपाक, कालाचें क्रौर्य ह्या सर्वांनीं मिळून एकमतानें माझ्यावर घाला घातला होता, परंतु दीनवत्सलांनीं आपलें ब्रीद संभाळलें.

यह नइ रीति न राउरि होई ।
लोकहु बेद बिदित नहिँ गोई ।
जग अनभल भल एक गोसाईँ ।
कहिय होइ भल कासु भलाईं ।
देव देव-तरु-सरिस सुभाऊ ।
सनमुख बिमुख न काहुहि काऊ ।

" ही प्रभूंची नीति कांहीं नवीन नाहीं. लोकांत आणि वेदांत ती गुप्त नसून स्पष्ट सांगितली आहे. जग हें दुष्ट असून एक प्रभु कायते सुष्ट होत. तेव्हां सांगा कीं, कोणाच्या चांगुलपणानें कल्याण होईल ! प्रभूंचा स्वभाव कल्पतरूप्रमाणें असून ते एकदां प्रसन्न झाले म्हणजे कधींहि विन्मुख व्हावयाचे नाहींत.

**दो०–जाइ निकट पहिचानि तरु छाहँ समनि सब सोच । माँगत अभिमत पाव जग राउ रंक भल पोच ॥ २५८॥**

" कल्पवृक्षास ओळखून त्याचे सन्निध जाणाराचीं सर्व दुःखें, मग तो राजा असो कीं रंक असो, सज्जन असो अगर दुर्जन असो, त्याच्या छायेनें शांतच होतात, आणि जगांतली कांहींहि इच्छित वस्तु मागतांच ती त्यास प्राप्त होते.

चौ०–लखि सब बिधि-गुरु-स्वामि-सनेहू ।
मिटेउ छोभ नहिँ मन संदेहू ।
अब करुनाकर कीजिय सोई ।
जनहित प्रभुचित छोभ न होई ।

" गुरु आणि स्वामी यांना सर्वप्रकारें मजविषयीं दयार्द्र पाहून माझी चिंता निवाली, आणि मी निश्चिंत झालों. आतां दयावंतांनीं असेंच वागावें कीं, जेणें-करून लोकांचें कल्याण होऊन प्रभूंच्याहि चित्तास क्षोभ होणार नाहीं.

जो सेवक साहिबहि सँकोची।
निजहित चहइ तासु मति पोची।
सेवकहित साहिबसेवकाई।
करइ सकल सुख लोभ बिहाई।

" जो सेवक केवळ स्वार्थबुद्धीनें आपल्या धन्यास भीड घालतो त्याची बुद्धि नीच आहे असें समजावें. सेवकाचा स्वार्थ म्हणजे एक धन्याची सेवा आणि ती त्यानें अवांतर सर्व स्वार्थाला आणि सुखाला लाथाडून केली पाहिजे. "

स्वारथ नाथ फिरे सबही का।
किये रजाइ कोटि बिधि नीका।
यह स्वारथ–परमारथ–सारू।
सकलसुकृत फल सुगति सिंगारू।

" नाथांनीं परतावें यांत सर्वांचाच स्वार्थ आहे; परंतु त्यांची आज्ञा बजावणें हें त्याहीपेक्षां कोटिपट श्रेष्ठ आहे. माझ्या मतानें स्वार्थाचा आणि परमार्थाचा निष्कर्ष हाच आहे. तोच सर्व सुकृतांचें फळ आणि सद्गतीचा शृंगार होय.

देव एक बिनती सुनि मोरी।
उचित होइ तस करब बहोरी।
तिलकसमाजु साजि सब आना।
करिय सुफल प्रभु जौं मनमाना।

" भगवन्! माझी एक प्रार्थना आहे ती ऐकून मग आपणांस जें उचित दिसेल तें करावें. अभिषेकाची सर्व सामुग्री सिद्ध करून आणली आहे. प्रभूंच्या मर्जीस येत असेल तर ती सफल करावी.

**दो०–सानुज पठइय मोहिं बन कीजिय सबहिं सनाथ। नतरु फेरियहि बंधु दोउ नाथ चलउँ मैं साथ॥ २५९॥**

" बंधुसमवेत मला वनांत पाठवावें आणि सर्वत्रांस सनाथ करावें. नाहींपेक्षां दोघांही बंधूंस परत पाठवून द्यावें. प्रभूंच्या समागमें मी येईन.

चौ०–न तरु जाहिं बन तीनिउँ भाई।
बहुरिय सीयसहित रघुराई।

जेहि बिधि प्रभु प्रसन्न मन होई।
करुनासागर कीजिय सोई।

" नाहींपेक्षां आम्ही तिघेहि बंधू वनांत जाऊं. जानकीसह रघुनाथांनीं परतावें. करुणार्णव प्रभूंचें मन ज्या रीतीनें सुप्रसन्न राहील तेंच करण्यांत यावें.

देव दीन्ह सब मोहि सिरभारू।
मोरे नीति न धरम बिचारू।
कहउँ बचन सब स्वारथहेतू।
रहत न आरत के चित चेतू।

" प्रभूंनीं माझ्या शिरावर सर्व भार टाकला. परंतु मला तर धर्म आणि नीति यांची मुळीं कल्पनाहि नाहीं. मी बोलेन तें स्वार्थदृष्टीनें बोलणार. कारण आर्तजनांच्या चित्तांत सदसद्विचारशक्ति उरत नाहीं.

उतर देइ सुनि स्वामिरजाई।
सो सेवक लखि लाज लजाई।
अस मैं अवगुन–उदधि अगाधू।
स्वामि सनेह सराहत साधू।

" स्वामींची आज्ञा ऐकून तिजवर प्रत्युत्तर देणारा जो सेवक त्यास पाहून साक्षात् लज्जेलादेखील लाज वाटते अशा दुर्गुणांचा मी अगाध सागर आहे. परंतु त्या मजलादेखील साधु म्हणून प्रभु प्रेमानें वाखाणीत आहेत.

अब कृपाल मोहि सो मत भावा।
सकुच स्वामि मन जाइ न पावा।
प्रभु–पद–सपथ कहउँ सतिभाऊ।
जग–मंगल–हित एक उपाऊ।

" हे दयानिधे! जेणेंकरून प्रभूंच्या मनास संकोच वाटणार नाहीं तेंच मत मलाहि पण आतां मान्य आहे. प्रभुपदाचीच शपथ, मी सत्य सांगतों कीं, जगाचें कल्याण साधण्याचा केवळ एकच मार्ग आहे, तो हा:—

**दो०–प्रभु प्रसन्नमन सकुच तजि जो जेहि आयसु देव। सो सिर धरि धरि करिहि सब मिटिहि अनट अवरेब॥ २६०॥**

" प्रभु प्रसन्नमनानें संकोच सोडून ज्यास जी आज्ञा करतील ती तो शिरावर घेऊन अंमलांत आणील, आणि त्या योगानेंच सर्वांचीं न टळणारीं दु:खें नष्ट होतील. "

चौ०—भरतवचन सुचि सुनि सुर हरषे।
साधु सराहि सुमन सुर बरषे।
असमंजसबस अवधनिवासी।
प्रमुदित मन तापस-बन-बासी।
चुपहि रहे रघुनाथ सँकोची।
प्रभुगति देखि सभा सब सोची।

भरताची ती पवित्र वाणी ऐकून देवांस आनंद झाला आणि ते 'साधु' 'साधु' असा धन्यवाद देऊन पुष्पवृष्टि करूं लागले. अयोध्यावासी मंडळी अगदीं गोंधळून गेली आणि तापस व वनवासी लोकांच्या मनास अत्यानंद झाला. राघवांस संकोच वाटून ते स्तब्धच राहिले. प्रभूंची ती अवस्था पाहून सर्व सभेस शोक झाला.

जनकदूत तेहि अवसर आये।
मुनि बसिष्ठ सुनि बेगि बोलाये।
करि प्रनाम तिन्ह राम निहारे।
बेष देखि भये निपट दुखारे।

या संधींतच जनकाचे दूत येऊन थडकले. तें ऐकून वसिष्ठमुनींनीं त्यांस ताबडतोब बोलाविलें. दूतांनीं येऊन मुजरे करून रामाकडे पाहिलें, तों त्यांचा वेष पाहून ते अत्यंत दुःखित झाले.

दूतन्ह मुनिबर बूझी बाता।
कहहु बिदेह भूप कुसलाता।
सुनि सकुचाइ नाइ महि माथा।
बोले चरबर जोरे हाथा।
बूझब राउर सादर साईँ।
कुसलहेतु सो भयउ गोसाईं।

वसिष्ठांनीं दूतांना प्रश्न केला कीं, जनकराजाचें कुशल कळवा. तें ऐकून संकोचानें मस्तक जमिनीवर टेंकून आणि हात जोडून ते म्हणाले:— "स्वामिन्! ज्या अर्थीं सरकारस्वारीचें कुशलवर्तमान इतक्या कळकळीनें आपण विचारीत आहां त्या अर्थीं त्यांच्या कुशलतेचें हेंच एक मोठें कारण आहे.

दो०—नाहिँ त कोसलनाथ के साथ कुसल गइ नाथ। मिथिला अवध बिसेष तेँ जगु सब भयउ अनाथ॥२६१॥

"हे प्रभो! एरव्हीं कोसलेश्वरांचेच बरोबर सर्व कुशल संपलें आणि त्यामुळेंच सर्व जग अनाथ झालें. मिथिला आणि अयोध्या तर विशेषच अनाथ झाल्या.

चौ०—कोसलपति गति सुनि जनकौरा।
भे सब लोक सोकबस बौरा।
जेहि देखे तेहि समय बिदेहू।
नाम सत्य अस लाग न केहू।

कोसलपती दशरथमहाराजांची वार्ता ऐकतांच जनकांचे राज्यांतील सर्व लोक दुःखानें वेडावून गेले. जनकास त्या प्रसंगीं ज्यांनीं पाहिलें, त्यांपैकीं कोणासहि त्यांचें 'विदेह' नांव सार्थ वाटलें नसेल.

रानि-कु-चालि सुनत नरपालहि।
सूझ न कछु जस मनि बिनु ब्यालहि।
भरतराज रघु बर-बन-बासू।
भा मिथिलेसहि हृदय हरासू।

राणीचें कौटिल्य ऐकून तर मणि गमाविलेल्या सर्पाप्रमाणें राजास कांहींच सुचेनासें झालें. भरतास राज्य आणि रघुवरास वनवास ह्यामुळें मिथिलेश्वराच्या मनांत दुःखानें काहूर करून सोडिलें.

नृप बूझे बुध-सचिव-समाजू।
कहहु बिचारि उचित का आजू।
समुझि अवध असमंजस दोऊ।
चलिय कि रहिय न कह कछु कोऊ।

आजच्या प्रसंगीं काय करणें उचित आहे तें विचारपूर्वक सांगा,असा राजानें मंत्री आणि प्रधानमंडळास प्रश्न केला. हा प्रश्न अयोध्येसंबंधानें आहे असें समजतांच दोन्ही पक्षांत तारंबळ उडाली. अयोध्येस जावें किंवा स्वस्थ बसावें हें कोणीच कांहीं बोलेना.

नृपहिँ धीर धरि हृदय बिचारी।
पठये अवध चतुर चर चारी।
बूझि भरत सतिभाउ कुभाऊ।
आयहु बेगि न होइ लखाऊ।

राजानें मात्र धैर्य धरून मनांत विचार केला आणि अयोध्येस चार हुषार गुप्त हेर रवाना केले. (त्यांना अशी आज्ञा केली कीं,) भरताचा ह्या कृत्यांत जो काय बरावाईट संबंध असेल तो काढून घेऊन, कोठेंहि उघडकीस न येतां, ताबडतोब परत फिरा.

१ चित्रकूटावर जनकाचा प्रवेश कोण्याहि रामायणांत नाहीं. तो फक्त येथेंच दिसतो. यांतली खुबी काय ती आमच्या 'मानसहंसां'त दिसेल. भूमिकापरिचय पहा.

दो०-गये अवध चर भरतगति बूझि देखि करतूति। चले चित्रकूटहि भरत चार चले तिरहूति ॥ २६२ ॥

ते दूत अयोध्येस गेले. भरताचें हृद्गत लक्षांत आणून त्याची कृतीहि त्यांनीं पाहिली. भरत इकडे चित्रकूटाकडे निघाले आणि ते मिथिलेस परत गेले.

चौ०-दूतन्ह आइ भरत कइ करनी।
जनकसमाज जथामति बरनी।
सुनि गुरु परिजन सचिव महीपति।
भे सब सोच सनेह बिकल अति।

दूतांनीं येऊन भरताची करणी जनकसभेंत वर्णन केली. गुरु, परिजन, सचिव आणि राजा यांनीं ती ऐकतांच ते सर्व दुःखानें आणि प्रेमानें अत्यंत विव्हल झाले.

धरि धीरज करि भरत बडाई।
लिये सुभट साहनी बोलाई।
घर पुर देस राखि रखवारे।
हय गय रथ बहु जान सँवारे।
दुघरी साधि चले ततकाला।
किय बिस्राम न मग महिपाला।

धैर्य धरून सरकारस्वारी भरताची थोरवी गाऊं लागली. त्यांनीं शूर सरदार आणि सैन्य बोलावून महालांत, शहरांत आणि राष्ट्रांत बंदोबस्तासाठीं त्यांची तैनात करून दिली आणि हत्ती, घोडे रथ वगैरे पुष्कळ वहानें सज्ज करून गर्गमुहूर्तावर जी स्वारी तत्काळ निघाली ती कोठेंहि थांबली नाहीं.

भोरहिँ आजु नहाइ प्रयागा।
चले जमुन उतरन सब लागा।
खबरि लेन हम पठये नाथा।
तिन्ह कहि अस महि नायउ माथा।

महाराज! आज प्रातःकालीं प्रयागांत स्नानें करून सर्व मंडळी यमुना उतरण्यास लागली आणि आम्ही खबर घेण्यासाठीं इकडे रवाना झालों." इतकें बोलून त्यांनीं अदबीनें मुजरे केले.

साथ किरात छसातक दीन्हे।
मुनिवर तुरत बिदा चर कीन्हे।

बरोबर सहासात किरातांना देऊन मुनिवरांनीं दूतांना तत्काळ परत जाण्यास सांगितलें.

दो०-सुनत जनकआगवन सब हरषेउ अवधसमाज। रघुनंदनहिँ सकोच बड सोचबिबस सुरराज ॥ २६३ ॥

जनकाचें आगमन ऐकतांच अयोध्येच्या सर्व मंडळीस हर्ष झाला, परंतु रघुनंदनाला मात्र संकट पडलें आणि देवेंद्रालाहि चिंता उत्पन्न झाली.

चौ०-गरइ गलानि कुटिल कैकेई।
काहि कहइ केहि दूषन देई।

कुटिल कैकेयी पश्चात्तापानें झुरणीस लागली. आतां म्हणावें तरी काय? आणि दोष तरी कोणाला द्यावा असें तिला झालें!

अस मन आनि मुदित नरनारी।
भयउ बहोरि रहब दिन चारी।

ठीक झालें, फिरून चार दिवस राहण्यास सांपडलें. असें मनांत आणून सर्व स्त्रीपुरुष हर्षित झाले.

एहि प्रकार गतबासर सोऊ।
प्रात नहान लाग सब कोऊ।
करि मज्जन पूजहिँ नरनारी।
गनपति गौरि पुरारि तमारी।
रमा-रमन-पद बंदि बहोरी।
बिनवहिँ अंजलि अंचल जोरी।

ह्याप्रकारें तो दिवस संपला. सकाळ होतांच सर्व मंडळी स्नानास गेली. स्नानें झाल्यावर गणपति, भवानी, शंकर, सूर्य इत्यादि देवतांची पूजा करून आणि फिरून रमारमणचरणीं वंदन करून, त्यांस हात जोडून आणि पदर पसरून बायकापुरुष मंडळी त्यांस विनवूं लागली कीं,—

राजाराम जानकीरानी।
आनँदअवधि अवधरजधानी।
सुबस[1] बसउ फिरि सहित समाजा।
भरतहिँ राम करहु जुबराजा।
एहि सुखसुधा सींचि सब काहू।
देव देहु जग-जीवन-लाहू।

"राम आणि सीता राजाराणी होऊन त्यांनीं आनंदाची सीमा अशा आपल्या अयोध्या राजधानींत मंडळींसह परतून इच्छामात्रेंकरून रहावें. आणि रामांनीं भरताला युवराज करावें. देवा! हें

---

१ सुबस=स्ववश=पूर्ण स्वातंत्र्यानें.

सौख्यामृत सर्वांसच सिंचन करून त्यांना जगांत जीवंत राहण्याचा लाभ मिळावा.

**दो०—गुरुसमाज भाइन्ह सहित रामराजु पुर होउ । अछत रामराजा अवध मरिय माँग सब कोउ ॥ २६४ ॥**

गुरुजन आणि बंधु यांच्यासह रामाचेंच राज्य अयोध्येंत असावें आणि अयोध्येंत रामराज्य असतांच आपणांस मृत्यु यावा " याप्रमाणें सर्वच लोक देवाजवळ याचना करूं लागले.[1]

चौ०—सुनि सनेहमय पुर–जन–बानी
निंदहिँ जोग बिरति मुनि ज्ञानी ।
एहि बिधि नित्य करम करि पुरजन ।
रामहिँ करहिँ प्रनाम पुलकि तन ।

पुरजनांचें तें प्रेमळ भाषण ऐकून ज्ञानी आणि विरक्त असे मुनींदेखील आपल्या योगास तुच्छ मानूं लागले. ह्याप्रमाणें पुरजनांनीं नित्य कर्में आटोपून, पुलकितगात्र होऊन रामास प्रणाम करावा.[2]

ऊँच नीच मध्यम नर नारी ।
लहहिँ दरस निज निज अनुहारी ।
सावधान सबही सनमानहिँ ।
सकल सराहत कृपानिधानहिँ ।

श्रेष्ठ, मध्यम आणि नीच असे सर्व स्त्रीपुरुष आपापल्या परीनें रामदर्शन घेत असत. रामचंद्र सर्वांवर दृष्टि ठेवून त्यांचा सन्मान करीत असत आणि सर्व मंडळी कृपासागर रामाची प्रशंसा करीत असत.

लरिकाइहि तेँ रघु–बर–बानी ।
पालत नीति प्रीति पहिचानी ।
सील–सँकोच–सिंधु रघुराऊ ।
सुमुख सुलोचन सरलसुभाऊ ।

" लहानपणापासूनच न्यायानें पालन करणें आणि प्रेमाची ओळख ठेवणें हा रघुवराचा बाणा आहे. हा रघुराज सौजन्य आणि भिडस्तपणा यांचा केवळ सागर असून वाणीचा मधुर, दृष्टीचा प्रेमळ आणि स्वभावाचा फार सरळ असा आहे."

कहत राम–गुण–गन अनुरागे ।
सब निजभाग सराहन लागे ।
हम सम पुन्यपुंज जग थोरे ।
जिन्हहिँ राम जानत करि मोरे ।

अशा प्रकारें रामचंद्राच्या गुणगणांचें वर्णन करीत असतां प्रेमाचे भरांत येऊन सर्वजण आपल्याच भाग्याची तारीफ करून म्हणत कीं, ज्यांना हा राम आपले म्हणून समजतो त्या आम्हांइतके पुण्यवान् जगांत विरळाच आढळतील.

**दो०—प्रेममगन तेहि समय सब सुनि आवत मिथिलेसु । सहित सभा संभ्रम उठेउ रवि-कुल-कमल-दिनेसु ॥ २६५ ॥**

त्या वेळीं सर्व मंडळीं प्रेमांत अगदीं निमग्न झाली होती. परंतु राजा जनक येत आहेत असें ऐकतांच रविकुलकमलसूर्य रामचंद्रांच्या उठण्यासरशीं सर्व मंडळी लगबगीनें उठली.

चौ०—भाइ–सचिव-गुरु-पुरजन-साथा ।
आगे गवन कीन्ह रघुनाथा ।

बंधु, सचिव, गुरु आणि परिवार ह्यांसह रघुपति जनकाला सामोरे गेले.

गिरिबर दीख जनकपति जवहीँ ।
करि प्रनाम रथ त्यागेउ तबहीँ ।

जनक राजानें चित्रकूट दृष्टीस पडतांच, तसाच रथ टाकिला आणि प्रणाम केला.

राम–दरस–लालसा–उछाहू ।
पथस्रम लेस कलेस न काहू ।
मन तहँ जहँ रघु–बर–बैदेही ।
बिनु मन तन दुख सुख सुधि केही ।
आवत जनक चले एहि भाँती ।
सहितसमाज प्रेम मति माँती ।

रामदर्शनेच्छेच्या उल्हासामुळें वाटेंतील क्लेश आणि श्रम कोणासहि रतिमात्र भासले नाहींत. कारण त्यांचीं मनेंच रामजानकीपाशीं होतीं. उन्मनी अवस्थेंत देहाच्या सुखदुःखासंबंधीं जाणीव कोणाला असते !

---

१ या प्रार्थनेंतलें गूढ आमच्या ' मानस–हंसांत '( तु. रा. रहस्यांत ) ' लोकशिक्षा ' या प्रकरणांत विस्तारानें पाहण्यास मिळेल.

२ स्वराज्य स्वातंत्र्य आणि मोक्ष यांच्या सौख्याची तुलना पहिल्या चौपाईंत कवीनें फार मार्मिकतेनें ध्वनित केली आहे. दुसऱ्या चौपाईंत नित्यकर्माची फलश्रुति कोणती तें दर्शविलें आहे. रामराज्यांत अर्थात् स्वदेशीच्या स्वतंत्र्य स्वराज्यांत मरणें ही ती फलश्रुति हें कवीचें मत त्यांच्या उक्तींतून ध्वनित होतें.

अशा रीतीनें मनें प्रेमोन्मत्त होऊन जनक आणि त्याची मंडळी वाटेनें येत होती.

आये निकट देखि अनुरागे ।
सादर मिलन परसपर लागे ।
लगे जनक मुनि-जन-पद बंदन ।
रिषिन्ह प्रनामु कीन्ह रघुनंदन ।
भाइन्ह सहित राम मिलि राजहिँ ।
चले लेवाइ समेत समाजहिँ ।

त्यांस जवळ आलेले पाहातांच मंडळी परस्पर प्रेमानें आणि उत्कंठेनें भेटूं लागली. जनकानें (रामाकडील ) मुनिजनांच्या चरणीं वंदन केलें. रघुनंदनांनीं ( जनकाकडील ) ऋषींना प्रणाम केला. बंधूसह रामचंद्र जनकास भेटले आणि त्यांस मंडळीसह घेऊन चालले.

दो०-आस्रम सागर साँतरस पूरन पावन पाथ । सेन मनहुँ करुनासरित लिये जाहिँ रघुनाथ ॥ २६६ ॥

तेव्हां समाजरूप करुणानदीस शांतिरसरूप पवित्र उदकानें भरलेल्या अशा आश्रमरूप समुद्राकडे रामचंद्र घेऊन जात आहेत असें भासलें.

चौ०-बोरति ज्ञान बिराग करारे ।
वचन ससोक मिलत नद नारे ।
सोच उसास समीरतरंगा ।
धीरज तट-तरु-बर कर भंगा ।
बिषम बिषाद तोरावति धारा ।
भय भ्रम भवँर अवर्त अपारा ।
केवट बुध बिद्या बडि नावा ।
सकहिँ न खेइ एक नहिँ आवा ।

त्या करुणानदीस शोकाक्रोश हे नदीनाले मिळून ती ज्ञानवैराग्यरूपी दुथडींस साफ वाहून नेत होती. दुःखाचे उसासे हे तुफान वारे वाहून ते दुतर्फा असलेली धैर्यरूप मोठमोठालीं झाडें पार उलथून पाडीत होते. भयंकर विषाद हीच तिची फोंफावत असलेली मुख्य धार होती. ( भविष्यत्कालासंबंधीं ) भय आणि ( रामाबद्दल ) भ्रम हेच तिच्यांतील असंख्य भोंवरे होते. वसिष्ठादिक ज्ञाननिष्ठ हे नावाडी असून त्यांचें तत्त्वज्ञान ह्या टोलेजंग नावा होत्या. परंतु त्या आंत टाकणें मुष्कील झाल्यामुळें कोणीहि पुढें सरसावेना.

बनचर कोल किरात बेचारे ।
थके बिलोकि पथिक हिय हारे ।
आस्रम उदधि मिली जब जाई ।
मनहुँ उठेउ अंबुधि अकुलाई ।

गरीबबापडे कोळी, पारधी वगैरे जंगली लोक देखील तीस पाहून थक्क झाले. नदी उतरून जाऊं इच्छिणारे वाटसरू यांची तर कंबरच बसली. आश्रमरूपी समुद्रास जाऊन ती पुढें मिळणार इतक्यांत खुद्द सागरच क्षुब्ध होऊन उठला असें वाटलें.

सोक बिकल दोउ राज समाजा ।
रहा न ज्ञान न धीरज लाजा ।
भूप-रूप-गुन-सील सराही ।
रोवहिँ सोकसिंधु अवगाही ।

दोन्हीहि राजसमाज दुःखानें व्याकुल झाले. त्यांस ज्ञान, धैर्य अगर लज्जा मुळींच उरली नाहीं. दशरथाचें रूप, गुण आणि शील यांची प्रशंसा करीत आक्रोश करीत असतां ते त्या शोकसागरांत बुडून गेले.

छंद-अवगाहि सोकसमुद्र सोचहिँ नारि नर ब्याकुल महा । देइ दोष सकल सरोष बोलहिँ बाम बिधि कीन्हो कहा सुर सिद्ध तापस जोगिजन मुनि देखि दसा बिदेह की । तुलसी न समरथ कोउ जो तरि सकइ सरित सनेह की।११।

सर्व स्त्रीपुरुष अत्यंत व्याकुल होऊन शोकसमुद्रांत निमग्न झाले असतां, ते सर्वजण क्रुद्ध होऊन प्राक्तनाला दोष देऊन म्हणूं लागले कीं, हे निर्दय नशीबा ! काय रे हें केलेंस ! विदेहाची ती दशा पाहून सुर, सिद्ध, तापस, योगी, मुनी ह्यांपैकीं कोणीहि त्या करुणानदींतून तरून जाण्यास समर्थ नव्हता.

सो०-किये अमित उपदेस जहँ तहँ लोगन्ह मुनिवरन्ह । धीरज धरिय नरेस कहेउ बसिष्ठ बिदेह सन ॥ ११ ॥

मुनिवरांनीं लोकांना सर्वत्र अमित उपदेश केला. वसिष्ठांनींहि विदेहास म्हटलें कीं, हे राजा ! धैर्य धर.

चौ०-जासु ज्ञानरवि भवनिसि नासा ।
बचकिरन मुनि-कमल बिकासा ।
तेहि कि मोह ममता नियराई ।
यह सिय-राम-सनेह बडाई ।

ज्याचा ज्ञानसूर्य, भवसागररूप रजनीचा नाश करून आपल्या वचनरूप किरणांनीं मुनिरूप कमलें विकासित करतो, त्या राजाच्या वाऱ्यास तरी ममता राहील काय ? परंतु हा सर्व सीतारामप्रेमाचा प्रभाव होय.

बिषयी साधक सिद्ध सयाने।
त्रिबिध जीव जग बेद बखाने।
राम–सनेह–सरस मन जासू।
साधुसभा बड आदर तासू।

विषयी, साधक आणि ज्ञाननिष्ठ सिद्ध असे त्रिविध जीव जगांत असतात असें वेदांत सांगितलें आहे; परंतु रामाच्या प्रेमांत ज्यांचें मन रंगून गेलें आहे त्यांचा मात्र संतमंडळींत मोठा मान असतो.

सोह न रामप्रेम बिनु ज्ञानू।
करनधार बिनु जिमि जलजानू।

जसें नावाड्याखेरीज तारूं, तद्वतच रामप्रेमाविरहित ज्ञान शोभत नाहीं.

मुनि बहुबिधि बिदेह समुझाये।
रामघाट सब लोग नहाये।
सकल–सोक–संकुल नरनारी।
सो बासर बीतेउ बिनु बारी।
पसु खग मृगन्ह न कीन्ह अहारू।
प्रिय परिजन कर कवन बिचारू।

वसिष्ठांनीं विदेहाचें अनेकप्रकारें सांत्वन केलें. नंतर सर्व मंडळींचीं रामघाटावर स्नानें झालीं. सर्व स्त्रीपुरुष शोकग्रस्त होते म्हणून तो दिवस त्यांनीं निर्जल उपोषण करूनच घालविला. पशु, पक्षी आणि मृग यांनींदेखील आहार केला नाहीं. मग प्रिय आणि परिजन यांचें आश्चर्य कसलें ?

**दो०–दोउ समाज निमिराज रघुराज नहाने प्रात। बैठे सब बट-बिटप-तर मन मलीन कृसगात॥ २६७॥**

विमनस्क आणि कृशगात्र झालेले जनक आणि रघुपति या दोघांहीकडील प्रजाजन प्रातःस्नान करून वटवृक्षाखालीं बसले.

चौ०–जे महिसुर दसरथ-पुर-बासी।
जे मिथिला-पति–नगर-निवासी।

हंस–बंस–गुरु जनकपुरोधा।
जिन्ह जग मग परमारथ सोधा।
लगे कहन उपदेस अनेका।
सहित धरम नय बिरति बिबेका।

सूर्यवंशाचे गुरु वसिष्ठ, जनकाचे पुरोहित शतानंद इत्यादिक ज्यांनीं जगांत परमार्थपदाचा शोध केला होता असे अयोध्येंतील आणि जनकनगरींतील ब्राह्मण, धर्मनीतिवैराग्यविवेकपर अनेक उपदेश करूं लागले.

कौसिक कहि कहि कथा पुरानी।
समुझाई सब सभा सुबानी।
तब रघुनाथ कौसिकहिं कहेऊ।
नाथ कालि जल बिनु सब रहेऊ।
मुनि कह उचित कहत रघुराई।
गयउ बीति दिन पहर अढाई।

कौशिकांनीं पुराणेतिहासाचें आपल्या सुंदर वाणीनें व्याख्यान करून सर्व सभेचें समाधान केलें. नंतर रघुराज कौशिकास म्हणाले—"महाराज ! काल सर्वांनींच निर्जल उपोषण केलें." यावर विश्वामित्र म्हणाले:— रघुराजाचें म्हणणें रास्त आहे. अडीच प्रहर दिवस निघून गेला.

रिषि रुख लखि कह तिरहुतिराजू।
इहाँ उचित नहिं असन अनाजू।
कहा भूप भल सबहिं सुहाना।
पाइ रजायसु चले नहाना।

विश्वामित्रांचें धोरण पाहून जनक म्हणाला:—'येथें अन्नाहार प्रशस्त नव्हे.' जनकाचें हें म्हणणें सर्वांसच मानवलें. नंतर मंडळी आज्ञा घेऊन स्नानास निघाली.

**दो०–तेहि अवसर फल फूल दल मूल अनेक प्रकार। लेइ आये बनचर बिपुल भरि भरि काँवरि भार॥ २६८॥**

तितक्या त्या अवधींत वनांत राहणारे लोक कावडी भरभरून अनेक प्रकारचीं फळें, फुलें, अंकुर, कंदमूळें इत्यादि घेऊन आले.

चौ०–कामद भो गिरि रामप्रसादा।
अवलोकत अपहरत बिषादा।
सर सरिता बन भूमि बिभागा।
जनु उमगत आनँद अनुरागा।

---

१ जनक शुक्राचार्यांचे आध्यात्मिक गुरु होत अशी पुराणप्रसिद्धि आहे.

बेलि बिटप सब सफल सफूला।
बोलत खग मृग अलि अनुकूला।

रामकृपेंकरून चित्रकूट त्या प्रसंगीं इच्छित मनोरथ पुरवूं लागला. त्याच्या केवळ अवलोकनानें दुःखांचा अपहार होत असे. तळीं, नद्या, वनें इत्यादि स्थलविशेषांतून जणुंकाय आनंद आणि प्रेम उचंबळून येऊं लागलें. सर्व वृक्षवेली फलपुष्पांनीं गजबजून गेल्या. पक्षी, हरिण आणि मधुकर हे श्रवणमनोहर आलाप घेऊं लागले.

तेहि अवसर बन अधिक उछाहू।
त्रिबिध समीर सुखद सब काहू।
जाइ न बरनि मनोहरताई।
जनु महि करति जनक पहुनाई।

त्या वेळीं वनांत आनंदीआनंद लोटला होता. त्रिविध वायु वाहून सर्वांस सुख देत होता. येथील रमणीयता इतकी अवर्णनीय होती कीं, जणुंकाय पृथ्वी जनकाचा पाहुणचार करीत आहे असें भासे.

तब सब लोग नहाइ नहाई।
राम जनक मुनि आयसु पाई।
देखि देखि तरुबर अनुरागे।
जहँ तहँ पुरजन उतरन लागे।

सर्व मंडळींचीं स्नानें वगैरे आटोपलीं. नंतर मंडळी राम, जनक, आणि वसिष्ठ यांची आज्ञा घेऊन आणि गर्द छाया पाहून जिकडेतिकडे मोठ्या आनंदानें उतरूं लागली.

दल फल मूल कंद बिधि नाना।
पावन सुंदर सुधासमाना।

**दो०–सादर सब कहँ रामगुरु पठये भरि भरि भार। पूजि पितर सुर अतिथि गुरु लगे करन फलहार॥ २६९॥**

रामगुरु वसिष्ठांनीं पवित्र, सुंदर आणि अमृताप्रमाणें मधुर असे अनेक प्रकारचे कंद, मुळें, फळें, आणि भाजीपाला यांच्या मोटाच्या मोटा भरून सर्वांकडे आदरपूर्वक पाठविल्या. मंडळींनीं देव, पितर, आचार्य आणि अतिथि यांचें पूजन करून फलाहारास प्रारंभ केला.

चौ०–एहि बिधि बासर बीतेचारी।
रामु निरखि नरनारि सुखारी।
दुहुँ समाज असि रुचि मन माहीं।
बिनु सियराम फिरब भल नाहीं।

सीताराम संग बनबासू।
कोटि अमर-पुर-सरिस सुपासू।

ह्याप्रमाणें चार दिवस गेले. नित्य रामाचें दर्शन घेऊन लोक सुखी होत. दोहींकडील मंडळींच्या मनोमानसीं हीच इच्छा होती कीं, "सीतारामांस टाकून परत फिरण्यांत अर्थ नाहीं. सीतारामांच्या सहवासांत वनवासदेखील कोट्यवधि स्वर्गांप्रमाणें सुखकर होय.

परिहरि लषन–राम–बैदेही।
जेहि घर भाव बाम बिधि तेही।
दाहिन दैव होइ जब सबही।
रामसमीप बसिय बन तबहीं।

सीतारामलक्ष्मणांस टाकून ज्यांस घरीं जाण्याची उत्सुकता वाटत असेल त्यांचें नशीबच फुटकें असें म्हटलें पाहिजे. जर दैव अनुकूल असेल तरच रामाबरोबर वनांत रहाण्यास सांपडेल.

मंदाकिनिमज्जन तिहुँकाला।
रामदरस मुद–मंगल–माला।
अटन रामगिरि बन तापस थल।
असन अमियसम कंद मूल फल।
सुखसमेत संबत दुइ साता।
पलसम होहिं न जनियहिं जाता।

त्रिकाल गंगास्नान, रामदर्शनाची आनंदोत्सवमालिका, रामपर्वतावरील अरण्यांतील आणि तपस्वी जनांच्या आश्रमांतील संचार, तसेंच अमृततुल्य कंदमूलफलांचा आहार, ह्या एकंदर सुखांत चौदा वर्षें म्हणजे एका पळाप्रमाणें होतील आणि तीं केव्हां निघून जातील तें समजूनदेखील यावयाचें नाहीं.

**दो०–एहि सुख जोग न लोग सब कहहिं कहाँ अस भाग। सहज सुभाय समाज दुहुँ राम-चरन-अनुराग॥ २७०॥**

पण ह्या सुखास सर्व लोक पात्र नसतात. असे भाग्य सर्वांचें कोठून असणार? "रामचरणीं अनुरक्त झाल्यामुळें दोन्ही समाजांत सहजासहजीं हे उद्गार निघत असत.

चौ०–एहि बिधि सकल मनोरथ करहीं।
बचन सप्रेम सुनत मन हरहीं।

ह्याच प्रकारचे विचार सर्वांचे मनांत सारखे

घोळत असत. त्यांचे प्रेमाचे बोल मनाला वेधून टाकीत असत.

सीयमातु तेहि समय पठाई।
दासी देखि सुअवसरु आई।
सावकास सुनि सब सिय सासू।
आयउ जनक-राज-रनिवासू।

त्या वेळेस सीतेच्या मातेनें पाठविलेली दासी अवसर आहे असें जाणून परत गेली. सीतेच्या सर्व सासवा निवांत आहेत हें ऐकतांच राजा जनकाच्या अंतःपुरांतील सर्व स्त्रिया तिकडेच लोटल्या.

कौसल्या सादर सनमानी।
आसन दिये समयसम आनी।

कौसल्येनें त्यांचा आदरसत्कार करून त्यांना बसण्यास प्रसंगानुरूप आसनें दिलीं.

सील सनेह सकल दुहुँ ओरा।
द्रवहिँ देखि सुनि कुलिस कठोरा।
पुलक सिथिल तनुबारि बिलोचन।
महि नख लिखन लगीँ सब सोचन।
सब सिय-राम-प्रीति किसि मूरति।
जनु करुना बहुबेष बिसूरति।

तेथील उभयतांकडील मंडळींचें शील आणि प्रेम पाहून व ऐकून कठोर वज्रास देखील पाझर फुटेल. पुलकित होऊन शिथिलांग झालेल्या, डोळ्यांतून अश्रुधारा गाळीत असलेल्या, आणि दुःखानें विव्हळत असतां नखांनीं जमिनीवर रेषा ओढीत असलेल्या अशा त्या सर्वजणी सीतारामप्रेमाच्या मूर्तीच आहेत असें वाटे, किंवा करुणरसच तितके वेष धारण करून खिन्नमुद्रेनें बसला आहे, असें भासे.

सीयमातु कह बिधिबुधि बाँकी।
जो पयफेनु फोर पबिटाँकी।

सीतेची माता म्हणाली कीं, "ब्रह्मदेव तरी फारच बुद्धिमान असला पाहिजे; कारण कीं, दुधाची साय फोडण्यास त्याला वज्राची टाकी लागते!

**दो०–सुनिय सुधा देखिय गरल सब करतूति कराल। जहँ तहँ काक उलूक बक मानस सकृत मराल ॥ २७१ ॥**

ऐकावें अमृत आणि पहावें विष, अशी त्याची एकंदरच कृति आहे. कोठेंहि कावळे, बगळे आणि दिवाभीतें यांचीच समृद्धि असावयाची. हंस मात्र एकट्या मानससरोवरांतच आढळतात."

चौ०–सुनि ससोच कह देबि सुमित्रा।
बिधिगति बडि बिपरीत बिचित्रा।
जो सृजि पालइ हरइ बहोरी।
बाल-केलि-सम बिधिमति भोरी।

तें ऐकून राणी सुमित्रा दुःख करीत म्हणालीः– "ह्या ब्रह्मदेवाचे चाळे अत्यंत विपरीत आणि विचित्र असतात. तो स्वतःच जन्मास घालतो, पालन करतो आणि अंतीं प्राणहि घेतो. बालकाच्या वेडगळ लीलेप्रमाणेंच ही त्या विधात्याची मति आहे."

कौसल्या कह दोसु न काहू।
करमबिबस दुख सुख छति लाहू।
कठिन करमगति जान बिधाता।
जो सुभ असुभ सकल फलदाता।
ईस रजाइ सीस सबही के।
उतपति थिति लय बिषहु अमी के।

कौसल्या म्हणालीः—"यांत दोष कोणाकडेच नाहीं. सुख, दुःख, हानि, लाभ हीं प्राक्तनाधीन होत. कर्मगति ही गहन असून विधात्यास तिचें ज्ञान असतें आणि तो तदनुसार सर्व शुभाशुभ फळें मात्र देत असतो. मूळ परमेश्वरी इच्छा आणि तीच सर्वांच्याच शिरावर आहे; म्हणून जन्म, जीवन आणि मृत्यु हे वाईटासहि आहेत आणि चांगल्यासहि आहेत.

देबि मोहबस सोचिय बादी।
बिधिप्रपंच अस अचल अनादी।
भूपति जियब मरब उर आनी।
सोचिय सखि लखि निज-हित-हानी।

हे देवि! म्हणून या मायाजाळांत गुंतून तळमळत राहणें हें वृथा आहे. ब्रह्मदेवाची घडामोड ही अनादिकालापासून अशीच अविश्रांत चालू आहे. बाई! यजमानांचें जगणें आणि मरणें मनांत आणून शोक करावयाचा तो केवळ स्वतःचें नुकसान ध्यानांत आणून करावयाचा!"

सीयमातु कह सत्य सुबानी।
सुकृतीअवधि अवध-पति-रानी।

यावर सीतेची माता सुनयना म्हणालीः—"हें आपलें म्हणणें अगदीं अक्षरशः खरें आहे. हे अयोध्येश्वरमहिषी! आपल्या पुण्याईची पराकाष्ठा झाली."

**दो०–लषन राम सिय जाहु बन भल परिनाम न पोच। गहबरि हिय कह कौसिला मोहि भरत कर सोच ॥२७२॥**

हें ऐकून कौसल्या अत्यंत गहिंवरून म्हणाली:— " राम, लक्ष्मण आणि सीता हे वनांत जात आहेत, खुशाल जावोत; परंतु ह्याचा परिणाम चांगला नसून वाईटच होणार आहे. मला भरताचीच चिंता लागली आहे.

चौ०—ईसप्रसाद असीस तुह्मारी ।
सुत-सुत-बधू देव-सरि-बारी ।

देवाच्या दयेनें आणि तुम्हां सर्वांच्या आशीर्वादानें माझीं मुलें आणि सुना तर गंगाजलाप्रमाणें निर्मळ आहेत.

रामसपथ मैं कीन्हि न काऊ ।
सो करि कहउँ सखी सतिभाऊ ।
भरत सील गुन बिनय बडाई ।
भायप भगति भरोस भलाई ।
कहत सारदहु कर मति हीचे ।
सागर सीप कि जाहिँ उलीचे ।

बाई ! रामाची शपथ मी कधींहि घेतलेली नाहीं; परंतु तीदेखील घेऊन मी सत्य सांगतें कीं, भरताचें शील, गुण, विनय, थोरपण, बंधुप्रेम, विश्वास आणि सौजन्य वर्णन करितांना सरस्वतीची देखील बुद्धि कुंठित होईल. शिंपल्यानें समुद्र कोरडा करवेल काय ?

जानउँ सदा भरत कुलदीपा ।
बार बार मोहि कहेउ महीपा ।
कसे कनक मनि पारिखि पाये ।
पुरुष परिखियहि समय सुभाये ।
अनुचित आजु कहब अस मोरा ।
सोक सनेह सयानप थोरा ।

माझी ही नेहमींचीच खात्री आहे कीं, भरत हा कुलदीपक होणार आणि स्वारींचें देखील वरचेवर हेंच सांगणें असे. सोनें कस लावल्यानें, जवाहीर रत्नपारखी भेटल्यानें आणि पुरुष प्रसंगानेंच चांगले पारखले जातात. हें माझें बोलणें गैरच आहे, परंतु दुःख आणि प्रेम ह्यांपुढें शहाणपणाचें कांहीं चालत नाहीं. "

सुनि सुर-सरि-सम पावनि बानी ।
भईं सनेह बिकल सब रानी ।

ती गंगेप्रमाणें पवित्र वाणी श्रवण करून सर्व राण्या प्रेमविव्हल झाल्या.

**दो०—कौसल्या कह धीर धरि सुनहु देबि मिथिलेसि । को बिबेक-निधि-बल्लभहि तुह्महि सकइ उपदेसि ॥ २७३ ॥**

कौसल्या धैर्य धरून म्हणाली:—" हे राणी मिथिलेश्वरि ! ऐक. विवेकसागर राजा जनक जिचा प्राणेश्वर त्या तुला उपदेश कोण करूं शकणार ?

चौ०—रानि राय सन अवसरु पाई ।
अपनी भाँति कहब समुझाई ।
रखियहिँ लषन भरत गवनहिँ बन ।
जौँ यह मत मानइ महीपमन ।
तौ भल जतन करब सुबिचारी ।
मोरे सोच भरत कर भारी ।
गूढसनेह भरत मन माहीँ ।
रहे नीक मोहि लागत नाहीँ ।

बाई ! तुम्ही आपल्याकडून तरी संधि साधून आपल्या यजमानांना समजावून सांगा कीं, लक्ष्मणास ठेवून घेऊन भरतास वनास धाडावें, आणि ही कल्पना जर त्यांना पसंत पडली तर त्यांनीं योग्य तो विचार करून चांगलाच प्रयत्न करावा. मला तर भरताचीच भारी काळजी वाटते. भरताच्या अंतःकरणांतील प्रेम हें एक मोठेंच कोडें आहे. त्याचें राहणें निदान मला तरी ठीक दिसत नाहीं. "

लखि सुभाउ सुनि सरल सुबानी ।
सब भइँ मगन करुनरस रानी ।
नभ प्रसून झरि धन्य धन्य धुनि ।
सिथिल सनेह सिद्ध जोगी मुनि ।

कौसल्येचें प्रेम पाहून आणि तिचें कळवळ्याचें भाषण श्रवण करून सर्व अंतःपुर करुणरसांत निमग्न झालें. सिद्ध, योगी आणि मुनि हेदेखील स्नेहशिथिल झाले आणि आकाशांतून पुष्पांचा वर्षाव होऊन धन्य धन्य असा ध्वनि होऊं लागला.

सब रनिवास बिथकि लखि रहेऊ ।
तब धरि धीर सुमित्रा कहेऊ ।
देवि दंडजुग जामिनि बीती ।
राममातु सुनि उठी सप्रीती ।

अंतःपुरांतील सर्व स्त्रिया चकित होऊन पहात राहिल्या. तेव्हां धैर्य धरून सुमित्रा म्हणाली:— " देवि ! दोन प्रहर रात्र उलटून गेली. " तें ऐकतांच कौसल्या प्रेमपूर्वक उठली.

दो०-बेगि पाय धारिय थलहिँ कह सनेह सतिभाय। हमरे तौ अब ईसगति कै मिथिलेस सहाय॥ २७४॥

नंतर ती खऱ्याखऱ्या कळकळीनें म्हणाली:— "आतां तुम्हीं लवकरच आपल्या बिऱ्हाडीं गेलें पाहिजे. आतां आमचा वाली परमेश्वर असून आमचा पाठिराखा मिथिलेश्वर आहे."

चौ०-लखि सनेह सुनि बचन बिनीता।
जनकप्रिया गहि पाय पुनीता।

कौसल्येचें प्रेम पाहून आणि तिचें तें नम्र भाषण ऐकून सुनयना तिच्या पवित्र चरणीं लागली, (आणि म्हणाली):—

देबि उचित अस बिनय तुह्मारी।
दसरथ-घरनि राम-महतारी।
प्रभु अपने नीचहु आदरहीँ।
अगिनि धूम गिरि सिर तृन धरहीँ।

"देवि! असली ही नम्रता आपणास योग्यच आहे; कारण आपण राजा दशरथाच्या सहधर्मचारिणी आणि रामाच्या जननी आहां! समर्थलोक आपणांहून नीच असलेल्या लोकांचा आदरच करितात. अग्नि धूमास आणि पर्वत तृणास मस्तकावरच धारण करितो.

सेवक राउ करम-मन-बानी।
सदा सहाय महेस भवानी।
रउरे अंग जोगु जग को है।
दीप सहाय कि दिनकर सोहै।

आमचे यजमान आपले कायावाचामनेंकरून सेवक आहेत आणि शंकरपार्वती आपले नेहमींचे पाठिराखे आहेत. आपल्या साहाय्यास शोभेल असा ह्या जगांत तरी कोण आहे? दिव्याच्या साहाय्यानें कधीं सूर्याला अधिक शोभा येईल काय?

राम जाइ बन करि सुरकाजू।
अचल अवधपुर करिहहिँ राजू।
अमर नाग नर राम-बाहु-बल।
सुख बसिहहिँ अपने अपने थल।
यह सब जागबलिक कहि राखा।
देबि न होइ मुधा मुनि भाखा।

रामचंद्र वनांत जाऊन, देवकार्य उरकून, अयोध्येंत सुखानें राज्य करितील आणि रामाच्या बाहुबलावर देव, नाग आणि नर आपापल्या जागीं सुखानें कालक्रमणा करीत राहतील, हें सर्व याज्ञवल्क्यांनीं आधींच भाकीत करून ठेविलें आहे. बाईसाहेब! मुनींचें भाकीत कधीं असत्य व्हावयाचें नाहीं."

दो०-अस कहि पग परि प्रेम अति सिय-हित बिनय सुनाइ। सियसमेत सियमातु तब चली सुआयसु पाइ॥ २७५॥

असें म्हणून सुनयना अत्यंत प्रेमानें कौसल्येच्या पायां पडली आणि सीतेसाठीं तिनें शब्द टाकला. तेव्हां कौसल्येची परवानगी घेऊन सुनयना सीतेस बरोबर घेऊन निघाली.

चौ०-प्रिय परिजनहिँ मिली बैदेही।
जो जेहि जोगु भाँति तेहि तेही।
तापसबेष जानकी देखी।
भा सब बिकल बिषाद बिसेखी।

सीता आपल्या प्रिय परिवारास ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें भेटली. जानकीचा तापसवेष पाहून सर्वजण दुःखानें विशेषच विव्हल झाले.

जनक रामगुर आयसु पाई।
चले थलहिँ सिय देखी आई।
लीन्हि लाइ उर जनक जानकी।
पाहुनि पावन प्रेम प्रान की।

जनक वासिष्ठांची आज्ञा घेऊन स्वस्थळीं गेले. तेथें येतांच सीता आलेली त्यांच्या दृष्टीस पडली. पवित्र प्रेम आणि प्राण यांची आतिथिभूत अशी ती जानकी जनकानें उराशीं धरून कवटाळली.

उर उमगेउ अंबुधि अनुरागू।
भयउ भूपमन मनहुँ प्रयागू।
सियसनेह बटु बाढत जोहा।
तापर राम-प्रेम-सिसु सोहा।
चिरजीवी मुनि ज्ञान बिकल जनु।
बूडत लहेउ बालअवलंबनु।

तेव्हां असें वाटलें कीं, जनकाच्या अंतःकरणांत भरती येऊन तो एक प्रेमाचा सागरच बनला, त्याचें मन प्रयागक्षेत्र बनलें, जानकीविषयक प्रेम हाच तेथें अक्षयवट दिसूं लागला आणि त्यावर रामप्रेमरूप बालक शोभूं लागलें. जनकाचें तत्त्वज्ञान त्या वेळीं मार्कंडेयऋषी बनून, ते त्या प्रेमसागरांत निराधार होऊन गोते खाऊं लागतांच त्यास त्याच (रामप्रेमरूप) बालकाचा आधार सांपडला. (मार्कंडेयाच्या

आग्रहास्तव भगवंतानें त्यास महाप्रलयाचा देखावा दाखविला होता, त्या कथेचें येथें अनुसंधान केलें आहे. )

मोह–मगन मति नहिँ बिदेह की ।
महिमा सिय–रघु–बर सनेह–की ।

विदेहाची मति गुंगणारी नव्हे, परंतु हा सीतारामांच्या प्रेमाचा प्रभाव होय.

**दो०–सिय पितु-मातु-सनेह-बस बिकल न सकी सँभारि । धरनिसुता धीरज धरेउ समउ सुधरमु बिचारि ॥ २७६ ॥**

सीतेला देखील मातापित्यांच्या प्रेमपाशास्तव आपली विकलता आवरवेना. तरीहि तिनें धीर धरून प्रसंगोपात्त धर्माचा विचार केला.

चौ०–तापसबेष जनक सिय देखी ।
भयउ प्रेम परितोष बिसेषी ।
पुत्रि पवित्र किये कुल दोऊ ।
सुजस धवल जग कह सब कोऊ !
जिति सुरसरि कीरतिसरि तोरी ।
गवनु कीन्ह बिधि अंड करोरी ।
गंग अवनिथल[1] तीनि बडेरे ।
एहि किय साधुसमाज घनेरे ।

सीतेची तापसदीक्षा पाहून जनक विशेषच प्रेमसंतुष्ट झाला. (आणि म्हणाला) "बाळे! तूं आपलीं उभय कुळें (मातापित्यांचीं) पवित्र केलींस. तुझ्याच सत्कीर्तीनें जग धवलित झालें आहे असेंच सर्व लोक म्हणत आहेत. तुझ्या कीर्तिरूप सरितेनें देवगंगेस जिंकून कोट्यवधि ब्रह्माण्डें व्यापून टाकलीं आहेत. गंगेनें सकल त्रैलोक्यासच माहात्म्य आणलें; परंतु तुझ्या यशोरूप नदीनें असंख्य संतसमाजास प्रतिष्ठा आणली."

पितु कह सत्य सनेह सुबानी ।
सीय सकुचि महि मनहुँ समानी ।
पुनि पितु मातु लीन्हि उर लाई ।
सिख आसिष हित दीन्हि सुहाई ।

जनक बोलला तें जरी सत्य, प्रेमळ आणि मधुर होतें तरी त्यामुळें पृथ्वीनें जणुंकाय गिळून टाकल्याप्रमाणें सीतेला मात्र संकोच उत्पन्न झाला. फिरून मातापित्यांनीं तीस धरून कवटाळलें आणि सुंदर हितबोध करून आशीर्वाद दिले.

कहति न सीय सकुचि मन माहीँ ।
इहाँ बसब रजनी भल नाहीँ ।
लखि रुख रानि जनायेउ राऊ ।
हृदय सराहत सील सुभाऊ ।

संकोचास्तव सीतेच्यानें बोलवेना; परंतु तिच्या मनांत रात्रीं येथें रहाणें ठीक नव्हे असें वाटे. तिचा भाव ओळखून तो मातेनें जनकास जाणवला. तेव्हां तर राजानें तिच्या शीलस्वभावाची फारच तारीफ केली.

**दो०–बारबार मिलि भेँटि सिय बिदा कीन्हि सनमानि । कही समय सिर भरतगति रानि सुबानि सयानि ॥ २७७॥**

सीता त्यांस वारंवार कडकडून भेटली. नंतर त्यांनीं तीस आदरपूर्वक पोंचतें केलें. नंतर राणी सुनयनेनें मोठ्या कुशलतेनें भरताच्या संबंधानें वेळेवर गोष्ट काढली.

चौ०–सुनि भूपाल भरतब्यवहारू ।
सोन सुगंध सुधा ससिसारू ।
मूँदे सजल नयन पुलके तन ।
सुजस सराहन लगे मुदित मन ।

सुवर्ण, सुगंध आणि चंद्राचें सार जें अमृत ह्याच्यासारख्या त्या भरताच्या गोष्टी ऐकून जनकाच्या डोळ्यांस पाणी आलें आणि त्यानें ते मिटून घेतले. त्याचा देह रोमांचित होऊन तो प्रसन्नचित्तानें भरताचीं स्तुतिस्तोत्रें गाऊं लागला.

सावधान सुनु सुमुखि सुलोचनि ।
भरतकथा भव–बंध–बिमोचनि ।
धरम राजनय ब्रह्मबिचारू ।
इहाँ जथामति मोर प्रचारू ।
सो मति मोरि भरत महिमाहीँ ।
कहइ काह छलि छुअति न छाहीँ ।

जनक म्हणाला, "हे सुमुखि सुनयने! एकचित्त होऊन श्रवण कर. ही भरताची कथा भवपाशापासून मुक्त करणारी आहे. धर्मशास्त्र, राजनीतिशास्त्र आणि वेदांतशास्त्र, ह्यांत यथाशक्ति माझ्या बुद्धीचा प्रवेश आहे. ती ही माझी बुद्धि भरताच्या माहात्म्याच्या छायेसदेखील लपूनछपून सुद्धां स्पर्श करूं शकत नाहीं.

[1] कोणी गंगोत्री, हरिद्वार आणि प्रयाग हीं तीन स्थळें समजतात तेंहि सुसंगत आहे.

बिधि गनपति अहिपति सिवसारद ।
कबि कोबिद बुध बुद्धि बिसारद ।
भरत चरित कीरति करतूती ।
धरम सील गुन बिमल बिभूती ।
समुझत सुनत सुखद सब काहू ।
सुचि सुरसरि रुचि निदर सुधाहू ।

ब्रह्मदेव, गणपति, शेष, श्रीशंकर, सरस्वती, कवि, पंडित, विद्वान् आणि बुद्धिविशारद ह्यांनादेखील भरताचीं चरित्रें, त्याची कीर्ति आणि कृति, त्याचीं धर्मतत्त्वें, त्याचें शील, गुण आणि उज्ज्वल माहात्म्य, त्याचें सर्वच कांहीं श्रवणास व मननास सुखदायक वाटतें. त्याच्या गुणांनीं आपल्या पावित्र्यानें गंगेस आणि रुचीनें अमृतास देखील धिक्कृत करून सोडलें आहे.

**दो०—निरबधि गुननिरुपम पुरुष भरत भरतसम जानि । कहिय समेरु कि सेर-सम कबि-कुल-मति सकुचानि ॥ २७८ ॥**

ज्याच्या गुणास पारावारच नाहीं असा अप्रमेय पुरुष भरतासारखा भरतच. मेरुपर्वतास शेरभर म्हणावा कीं काय अशा समजुतीनें कविवर्गाच्या बुद्धीला ( भरताला उपमा देण्यास ) संकोच वाटतो.

चौ०—अगम सबहिँ बरनत बरबरनी ।
जिमि जलहीन मीन गमु धरनी ।
भरत अमित महिमा सुनु रानी ।
जानहिँ राम न सकहि बखानी ।

निर्जल प्रदेशांत जसा मासा भूमीवर चालूं शकत नाहीं तद्वत् भरताचें माहात्म्य वर्णन करणें सर्वांनाच कठिण आहे. प्रिये ! भरताच्या थोरवीस सीमाच नाहीं. प्रत्यक्ष राम हे जरी ती जाणतात तरी ते देखील तिचें वर्णन करण्यास असमर्थ आहेत हें तूं समजून ऐस.''

बरनि सप्रेम भरत अनुभाऊ ।
तियजिय की रुचि लखि कह राऊ ।
बहुरहिँ लषन भरत बन जाहीँ ।
सब कर भल सब के मन माहीँ ।

याप्रमाणें भरताच्या स्वभावाचें सप्रेम वर्णन करून आणि तिच्या मनांतील अभिप्राय ताडून जनक म्हणालाः—'' लक्ष्मणानें परतावें आणि भरतानें वनास जावें ह्यांत सर्वांचेंच कल्याण आहे आणि तेंच सर्वांच्या मनोमानसींहि पण आहे.

देबि परंतु भरत रघुबर की ।
प्रीति प्रतीति जाइ नहिँ तरकी ।
भरत अवधि सनेह ममता की ।
जद्यपि राम सीँव समता की ।

परंतु प्रिये ! रामभरतांचें परस्परांवरील प्रेम आणि विश्वास हीं अतर्क्य आहेत. राम हे जरी समत्वाची सीमा आहेत तरी भरत हाहि भक्तिभावाचा केवळ कळस आहे.

परमारथ स्वारथ सुख सारे ।
भरत न सपनेहुँ मनहुँ निहारे ।
साधन सिद्धि रामपग नेहू ।
मोहि लखि परत भरतमत एहू ।

परमार्थाच्या किंवा स्वार्थाच्या यत्किंचित् सुखाकडे देखील भरतानें मनांत अगर स्वप्नांत ढुंकूनहि पाहिलें नाहीं. रामचरणीं प्रेम करणें हेंच एक साधन आणि हीच काय ती सिद्धि असा भरताचा सिद्धांत असावा असें मला आढळून आलें आहे.

**दो०—भोरेहुँ भरत न पेलिहहिँ मनसहुँ रामरजाइ । करिय न सोच सनेहबस कहेउ भूप बिलखाइ ॥ २७९ ॥**

रामाज्ञेची जाणूनबुजून अवज्ञा हें भरताच्या हातून चुकूनहि व्हावयाचें नाहीं, तुह्मीं प्रेमवश होऊन उगीच चिंता वाहूं नये. '' असें राजा जनकानें अगदीं कळकळीनें सांगितलें.

चौ०—राम-भरत-गुन गनत सप्रीती ।
निसि दंपतिहिँ पलकसम बीती ।

रामभरतांचे गुण प्रेमभरानें गात असतां त्या दंपत्यास ती रात्र एका क्षणाप्रमाणें गेली.

राजसमाज प्रात जुग जागे ।
न्हाइ न्हाइ सुर पूजन लागे ।
गे नहाइ गुरु पहिँ रघुराई ।
बंदि चरन बोले रुख पाई ।

दोन्हीहि राजसमाज उजाडतांच जागे झाले आणि स्नानें वगैरे आटोपून देवपूजेस लागले. रघुराज स्नान करून गुरूंकडे गेले आणि त्यांचें चरणवंदन करून व आज्ञा मागून बोलूं लागले.

नाथ भरत पुरजन महतारी ।
सोकबिकल बनबास दुखारी ।
सहितसमाज राउ मिथिलेसू ।
बहुत दिवस भये सहत कलेसू ।

उचित होइ सोइ कीजिय नाथा ।
हित सबही कर रउरे हाथा ।

राम म्हणाले, "हे नाथ ! भरत, माता आणि पुरजन हे आधींच शोकविह्वल झाले असून ह्या वनवासानें दुःखी झाले आहेत. राजा जनकदेखील सर्व समाजासहित बरेच दिवस झाले, क्लेश सहन करीत आहेत. महाराज ! आतां उचित दिसेल तें आपणच केलें पाहिजे. सर्वांचें हित केवळ आपल्याच हातीं आहे."

अस कहि अतिसकुचे रघुराऊ ।
मुनि पुलके लखि सील सुभाऊ ।

इतकें बोलून रघुराज फारच संकोचले. त्यांचें तें शील आणि तो स्वभाव पाहून वसिष्ठ रोमांचित होऊन म्हणाले—

तुम्ह बिनु राम सकलसुख साजा ।
नरकसरिस दुहुँ राजसमाजा ।

दो०—प्रान प्रान के जीव के जिव सुख के सुख राम । तुम्ह तजि तात सुहात गृह जिन्हहिँ तिन्हहिँ बिधि बाम ॥ २८० ॥

"रामा ! तुह्माव्यतिरिक्त दोन्हीहि राजसमाजांना आखिल सुखांची समृद्धि जरी असली तरी ती नरकतुल्यच आहे. रामा ! तुम्ही म्हणजे प्राणांचेहि प्राण, जीवांचेहि जीव आणि सुखाचेंहि सुख आहांत. बाबा ! तुला टाकून ज्यांना घर प्रिय वाटत असेल त्यांचें प्राक्तनच विपरीत आहे असें समजलें पाहिजे.

चौ०—सो सुख धरम करम जरि जाऊ ।
जहँ न राम-पद-पंकज भाऊ ।
जोग कुजोग ज्ञान अज्ञानू ।
जहँ नहिँ रामप्रेम परधानू ।
तुम्ह बिनु दुखी सुखी तुम्ह तेही ।
तुम्ह जानहु जिय जो जेहि केही ।

रामा ! आग लागो त्या सुखास, धर्मास आणि कर्मास, कीं ज्यांत तुझ्या पदकमलांचे ठायीं भक्ति नाहीं. ज्यांत तुझ्या प्रेमाचें अधिष्ठान नाहीं तो योग म्हणजे कुयोगच असून तें ज्ञानदेखील अज्ञानच होय. तुझ्याविरहित जे तेच दुःखी आणि जे तुझ्याशीं संलग्न तेच सुखी होत. प्रत्येकाचें हृद्गत जाणणारा असा एक तूंच आहेस.

राउर आयसु सिर सबही के ।
बिदित कृपालहिँ गति सब नीके ।
आपु आस्रमहिँ धारिय पाऊ ।
भयउ सनेहसिथिल मुनिराऊ ।

तुझी समर्थाची आज्ञा सर्वांचे मस्तकीं आहे. तुला दयाघनालाच सर्व भवितव्यता अवगत आहे. आपण आतां आश्रमांत चलावें " इतकें बोलून मुनिराज प्रेमानें अगदीं शिथिल झाले.

करि प्रनाम तब राम सिधाये ।
रिषि धरि धीर जनक पहिँ आये ।
रामबचन गुरु नृपहि सुनाये ।
सील सनेह सुभाय सुहाये ।

नंतर ऋषी धैर्य धरून जनकाकडे आले. त्यांनीं रामाचें भाषण आणि त्याचें मोहक शील आणि स्वभाव राजा जनकास कळविला.

महाराज अब कीजिय सोई ।
सब कर धरमसहित हित होई ।

दो०—ज्ञान निधान सुजान सुचि धरमधीर नरपाल । तुम्ह बिनु असमंजससमन को समरथ एहिकाल ॥ २८१ ॥

मुनी म्हणाले, "हे राजश्रेष्ठा ! आपणच असें कांहीं केलें पाहिजे कीं जेणेंकरून सर्वांचेंच धर्मासह कल्याण होईल. आपण ज्ञाननिधान, सुज्ञ, शुचिष्मन्त आणि धर्मधुरंधर भूपाल आहांत. ह्या प्रसंगीं हें कोडें उलगडण्यास आपणांव्यतिरिक्त कोण समर्थ आहे ?"

चौ०—सुनि मुनिबचन जनक अनुरागे ।
लखि गति ज्ञान बिराग बिरागे ।

हें मुनिवचन श्रवण करून जनक प्रेमांत अगदीं तल्लीन झाला. त्याची ती स्थिति पाहून त्याचें ज्ञान आणि वैराग्य हीं देखील विरक्तच झालीं.

सिथिल सनेह गुनत मन माहीँ ।
आये इहाँ कीन्ह भल नाहीँ ।
रामहिँ राय कहेउ बन जाना ।
कीन्ह आपु प्रिय प्रेमप्रवाना ।
हम अब बन तेँ बनहिँ पठाई ।
प्रमुदित फिरब बिबेक बढाई ।

स्नेहशिथिल होत्साता तो मनांत विचार करूं लागला कीं, "येथें आलों हें आपण ठीक केलें नाहीं. राजा दशरथानें रामास वनांत जाण्यास आज्ञा

केली, परंतु स्वतःस रामाचें प्रेमच्च प्रिय होतें हेंच अखेर त्यानें खरें करून दाखविलें. आह्मी मात्र आतां रामास रानोमाळ हिंडविणार आणि आपल्या शहाणपणाची ऐट मिरवीत मोठ्या आनंदानें परत जाणार ! ''

तापस मुनि महिसुर सुनि देखी ।
भये प्रेमबस बिकल बिसेखी

तपस्वी, मुनीश्वर आणि ब्राह्मण ही जनकाची दशा पाहून प्रेमवश होत्साते अत्यंत विकल झाले.

समउ समुझि धरि धीरज राजा ।
चले भरत पहिँ सहितसमाजा ।
भरत आइ आगे भइ लीन्हे ।
अवसरसरिस सुआसन दीन्हे ।

प्रसंगाचें अवधान ठेवून राजा जनक धैर्य धरून मंडळीसह भरताकडे गेला.भरतानें त्यास सामोरें जाऊन त्याचें स्वागत केलें आणि प्रसंगानुसार बसण्यास आसन दिलें.

तात भरत कह तिरहुतिराऊ ।
तुह्महिँ बिदित रघुबीरसुभाऊ ।

**दो०–राम सत्यव्रत धरमरत सब कर सील सनेहु । संकट सहत सँकोचबस कहिय जो आयसु देहु ॥ २८२ ॥**

जनक म्हणाला:—'' बा भरता ! रघुवीरांचा स्वभाव तुला विदितच आहे. राम हे सत्यव्रत व धर्मरत असून त्यांना सर्वांचेंच प्रेम आणि अगत्य आहे. ह्यामुळें ते संकोचून संकटें सहन करीत आहेत. तेव्हां आतां तूं जी आज्ञा देशील ती आम्ही त्यांस कळवूं. ''

चौ०–सुनि तन पुलकि नयन भरि बारी ।
बोले भरत धीर धरि भारी ।
प्रभु प्रिय पूज्य पितासम आपू ।
कुल गुरु-सम हित माय न बापू ।
कौसिकादिमुनि सचिवसमाजू ।
ज्ञान-अंबु-निधि आपुन आजू ।
सिसु सेवक आयसु अनुगामी ।
जानि मोहि सिख देइय स्वामी ।

हें ऐकतांच भरताच्या शरीरावर रोमांच उभे राहून नेत्रांत अश्रू आले.तो मोठेंच धैर्य धरून म्हणाला:- '' आपण मला प्रभु, प्रिय आणि पित्याप्रमाणें पूज्य आहांत.ह्या गुरुमाउलीसारखे आईबापदेखील हितचिंतक नव्हत.हे कौशिकादि मुनीश्वर,हें सचिवमंडळ,हे आपण,सर्व ज्ञानसागर आहांत.महाराज ! आपला मी आज्ञांकित बालक आणि सेवक जाणून आपणच मला प्रस्तुत प्रसंगीं काय कर्तव्य आहे तें शिकविलें पाहिजे.

एहि समाज थल बूझब राउर ।
मौन मलिन मैँ बोलब बाउर ।
छोटे बदन कहउँ बडि बाता ।
छमब तात लखि बाम बिधाता ।

ह्या समाजांत आणि अशा स्थळीं महाराज मला विचारीत आहेत त्या अर्थीं मला मूकाला–मलीनाला–वेडगळाला बोललेंच पाहिजे. लहान तोंडानें मी मोठमोठ्या गोष्टी सांगणार ह्याची महाराजांनीं, माझ्या दैवदुर्विपाकावर नजर देऊन क्षमा केली पाहिजे.

आगम निगम प्रसिद्ध पुराना ।
सेवाधरम कठिन जग जाना ।
स्वामि धरम स्वारथहिँ बिरोधू ।
बैर अंध प्रेमहिँ न प्रबोधू ।

वेद, शास्त्रें आणि पुराणें यांतहि हेंच प्रसिद्ध आहे आणि सर्व लोकांनाहि हेंच विदित आहे कीं, सेवाधर्म हा कठिण आहे. स्वामीचा धर्म आणि सेवकाचा स्वार्थ यांत परस्परविरोध आहे. वैरांध आणि प्रेमांध यांमध्यें परस्पर सहानुभूति असूंच शकत नाहीं.

**दो०–राखि राम रुख धरमुव्रत पराधीन मोहि जानि । सब के संमत सर्वहित करिय प्रेम परिचानि ॥ २८३ ॥**

रामाची मर्जी, त्यांचा धर्म आणि त्यांचें व्रत यांच्या आड न येतां, मी केवळ परतंत्र आहें हें लक्षांत ठेवून आणि सर्वांची लालसा ओळखून सर्वसंमत आणि सर्वहितकर असें काय असेल तें करावें.''

चौ०–भरतबचन सुनि देखि सुभाऊ ।
सहितसमाज सराहत राऊ ।
सुगम अगम मृदु मंजु कठोरे ।
अरथ अमित अतिआखर थोरे ।
ज्यौँ मुख मुकुर मुकुर निजपानी ।
गहि न जाइ अस अदभुत बानी ।

यांप्रमाणें भरताचें भाषण ऐकून आणि त्याचा सद्भाव पाहून मंडळीसहित राजा त्याची प्रशंसा

करूं लागला. सुबोध असून दुर्बोध, मृदु व मंजुळ असूनहि कठोर, मोजकीं अक्षरें असूनहि अपार अर्थ भरलेली, आणि ( पहाणाराचें ) तोंड आरशांत आणि आरसा त्याच्या हातांत, तरी त्याचें तोंड त्याच्या हातांत यावयालाच नको, अशासारखी भरताची ती वाक्यरचना अगदीं अद्भुत होती.

भूप भरत मुनि साधु समाजू ।
गे जहँ बिबुध-कुमुद-द्विज-राजू ।

नंतर जनक, भरत, वसिष्ठ, मुनिवृंद आणि इतर मंडळी देवगणरूप कमलाचा चंद्र असा जो श्रीरामचंद्र त्याजकडे गेली.

सुनि सुधि सोच बिकल सब लोगा ।
मनहुँ मीनगन नवजल जोगा ।

ती वार्ता ऐकून सर्व मंडळी नवीन पावसाच्या पाण्यांत सांपडलेल्या माशाप्रमाणें दुःखानें विव्हळ झाली.

देव प्रथम कुल-गुरु-गति देखी ।
निरखि विदेह सनेह बिसेखी ।
राम-भगति-मय-भरत निहारे ।
सुर स्वारथी हहरि हिय हारे ।
सब कोउ राम प्रेममय पेखा ।
भये अलेख सोचबस लेखा ।

देवांनीं प्रथम वसिष्ठांची स्थिति अवलोकन केली. नंतर त्यांनीं जनकाचें तें विलक्षण प्रेम पाहिलें. भरत तर त्यांस केवळ रामभक्तीचा पुतळाच आहे असें वाटलें. त्या स्वार्थी देवांचा हिरमोड होऊन ते घाबरून गेले. सर्व मंडळी रामप्रेमांत निमग्न झालेली पाहून देवांना अवर्णनीय दुःख झालें.

**दो०—राम सनेह-सकोच-बस कह ससोच सुरराज । रचहु प्रपंचहि पंच मिलि नाहिँ त भयउ अकाज ॥ २८४ ॥**

तेव्हां देवेंद्र दुःखी होऊन म्हणाला:—" रामचंद्र हे भक्तिसंकोचानें पूर्ण वश होतात. तेव्हां मंडळीनें एकमतानें कांहींतरी कुलंगडें रचिलें पाहिजे. नाहीं तर कार्याचा विघात होणार ! "

चौ०—सुरन्ह सुमिरि सारदा सराही ।
देबि देव सरनागत पाही ।
फेरि भरतमति करि निजमाया ।
पालु बिबुधकुल करि छलछाया ।

नंतर देव शारदेचें आवाहन करून तीस विनवूं लागले कीं, " माते ! आम्ही देव तुला शरण आलों आहोंत. आमचें रक्षण कर. आपल्या मायेनें भरताच्या बुद्धीला भ्रंश कर आणि तिच्याच आश्रयाखालीं ह्या आमच्या देवकुलांस वांचीव.

बिबुधबिनय सुनि देबि सयानी ।
बोली सुर स्वारथ जड जानी ।

ही देवांची विनंति ऐकून आणि देवेंद्रास स्वार्थी शतमूर्ख समजून परमविदुषी वाग्देवी त्यांस संबोधूं लागली:—

मो सन कहहु भरत मति फेरू ।
लोचन सहस न सूझ सुमेरू ।
बिधि-हरि-हर माया बडि भारी ।
सोउ न भरतमति सकइ निहारी ।
सो मति मोहि कहत करु भोरी ।
चाँदिनि कर कि चंदकर चोरी ।
भरतहृदय सिय-राम-निवासू ।
तहँ कि तिमिर जहँ तरनिप्रकासू ।

" देवेंद्रा ! भरताच्या बुद्धीला भ्रंश करण्यास मला सांगतोस काय ? तूं सहस्रनेत्र असूनहि प्रचंड मेरुपर्वत तुला दृग्गोचर कसा होत नाहीं ? विधिहरिहरांची माया एवढी अमोघ बलवत्तर असून देखील भरताच्या बुद्धीची दृष्टादृष्ट करण्यास ती समर्थ नाहीं अशा बुद्धीला मोह घालण्यास मला विनंति करतोस काय ? चंद्राचा अपहार तारकांचें हातून होईल काय ? भरताच्या हृदयांत सीताराम अखंड वास करीत आहेत. जेथें सूर्यप्रकाश आहे तेथें अंधकार संभवेल काय ? "

अस कहि सारद गइ बिधिलोका ।
बिबुध बिकल निसि मानहुँ कोका ।

इतकें बोलून सरस्वती ब्रह्मलोकाप्रत चालती झाली. इकडे देव रात्रीच्या कोकपक्षाप्रमाणें विकल झाले.

**दो०—सुर स्वारथी मलीन मन कीन्ह कुमंत्र कुठाटु । रचि प्रपंच माया प्रबल भय भ्रम अरति उचाटु ॥ २८५ ॥**

अखेर त्या स्वार्थी देवांनीं दुर्मंत्रांचा अव्यापारेषु व्यापार केलाच. त्यांनीं आपल्या जगड्व्याळ मायेनें भय, भ्रम, दुःख आणि उच्चाटन ह्यांचें गौडबंगाल माजविलें.

चौ०–करि कुचालि सोचत सुरराजू।
भरतहाथ सब काजु अकाजू।

इतका प्रकार करून देखील अजूनहि देवांचें कार्य किंवा अकार्य हें भरताच्याच स्वाधीन आहे म्हणून इंद्र मनांत चिंता करीत होता.

गये जनक रघुनाथसमीपा।
सनमाने सब रबि–कुल–दीपा।
समय समाज धरम अबिरोधा।
बोले तब रघु–बंस–पुरोधा।

इकडे जनक रघुनाथाकडे गेले. तेव्हां त्या रविकुलदीपानें सर्वांचा सन्मान केला. नंतर वसिष्ठ समय, समाज आणि धर्म यांना अनुसरून भाषण करूं लागले.

जनक भरत संबाद सुनाई।
भरत कहाउति कहीं सुहाई।

त्यांनीं आधीं भरतजनकांचा संवाद रामास कळविला आणि नंतर भरताच्या पक्षास आपली अनुकूलता दर्शविली.

तात राम जस आयसु देहू।
सो सब करइ मोर मत एहू।

ते म्हणाले, " बा रामा! ह्यावर माझें असें मत आहे कीं, तूंच आज्ञा द्यावी आणि तदनुसार सर्वांनीं वागावें."

सुनि रघुनाथ जोरि जुगपानी।
बोले सत्य सरल मृदु बानी।
बिद्यमान आपुन मिथिलेसू।
मोर कहब सब भाँति भदेसू।
राउर राय रजायसु होई।
राउरिसपथ सही सिर सोई।

हें ऐकून रघुनाथ हात जोडून, मृदु वाणीनें सत्य आणि सरळ असें भाषण करूं लागले:—" आपण आणि मिथिलेश्वर विद्यमान असतां माझें बोलणें सर्वस्वीं अनुचित आहे. आपली आणि महाराजांची आज्ञा होईल—मी आपलीच शपथ घेऊन सांगतों—तीच मला शिरसावंद्य आहे."

**दो०–रामसपथ सुनि मुनि जनक सकुचे सभासमेत। सकल बिलोकत भरतमुख बनइ न ऊतरु देत॥ २८६॥**

रामाची ती शपथ ऐकतांच सर्व समाजासहित वसिष्ठ आणि जनक यांना संकोच वाटला. त्यास उत्तर काय द्यावें हें सुचेना. म्हणून सर्वजण भरताच्या मुखाकडे पाहूं लागले.

चौ०–सभा सकुचबस भरत निहारी।
रामबंधु धरि धीरज भारी।
कुसमउ देखि सनेहु सँभारा।
बढत बिंधि जिमि घटज निवारा।

सभा संकटग्रस्त पाहून रामबंधु भरतानें अतिशय धैर्य धरून वाढत असलेल्या विंध्य पर्वतास निवारण करणाऱ्या अगस्तिऋषीप्रमाणें प्रेमाचा दुष्परिणाम होत आहेसा पाहून त्याला सावरून धरिलें.

सोक कनकलोचन मति छोनी।
हरी बिमल–गुन–गन जग–जोनी।
भरतबिबेक बराह बिसाला।
अनायास उधरी तेहि काला।

शोकरूप हिरण्याक्षानें लोकांच्या मतिरूप पृथ्वीचें हरण चालविलें असतां विमलगुणगणयुक्त, विश्वकारण अशा भरताच्या विवेकरूप विशाल वराहानें तिचा तत्काल सहज लीलेनें उद्धार केला.

करि प्रनाम सब कहँ कर जोरे।
राम राउ गुरु साधु निहोरे।
छमब आजु अतिअनुचित मोरा।
कहउँ बदन मृदु बचन कठोरा।

रामचंद्र, जनक, वसिष्ठ आणि संतवृंद या सर्वांस प्रार्थनापूर्वक हात जोडून व नमस्कार करून तो म्हणाला कीं, " या कोमल मुखानें मला आज कठोर शब्द उच्चारावे लागणार, ह्या माझ्या अत्यंत गैरशिस्तपणाची मला क्षमा असावी."

हिय सुमिरी सारदा सुहाई।
मानस तें मुखपंकज आई।
बिमल बिबेक धरम नय साली।
भरतभारती मंजु मराली।

भरतानें हृदयांत शारदेचें प्रेमपूर्वक चिंतन करितांच ती त्याच्या मानसांतून (मनोरूप मानससरोवरांतून) मुखपंकजावर उपस्थित झाली आणि विवेक, धर्म, नीति आणि शालीनता यांनीं युक्त असल्यामुळें ती भरताची भारती स्पृहणीय हंसीप्रमाणें भासूं लागली.

दो०—निरखि विवेक बिलोचनन्हि सिथिल सनेह समाजु । करि प्रनाम बोले भरत सुमिरि सीय रघुराजु ॥ २८७ ॥

आपल्या विवेकनेत्रांनीं त्या स्नेहशिथिल समाजाकडे अवलोकन करून आणि सीतारामचंद्रांचें ध्यान करून भरतानें प्रणामपूर्वक भाषणाचा उपक्रम केला.

चौ०—प्रभु पितु मातु सुहृद गुरु स्वामी ।
पूज्य परमहित अंतरजामी ।
सरल सुसाहिब सील निधानू ।
प्रनतपाल सर्बज्ञ सुजानू ।
समरथ सरनागत हितकारी ।
गुनगाहक अव–गुन–अघ–हारी ।
स्वामि गोसाइँहि सरिस गोसाईं ।
मोहि समान मैं साइँ दोहाई ।

तो म्हणाला, " हे प्रभो ! मातापिता, सुहृद, गुरु,स्वामी, पूज्य, परमहितैषी, अंतर्यामी,सरल,शीलनिधान, प्रणतपाल, सर्वज्ञ, सुज्ञ, समर्थ, शरणागतहितचिंतक, गुणग्राहक आणि पापदोषहारक असे सर्वश्रेष्ठ धनी एक आपणच आहांत. महाराजांचीच शपथ, महाराजांसारखे स्वामी महाराजच आणि मजसारखा ( अपात्र सेवक ) मीच.

प्रभु–पितु–बचन मोहबस पेली ।
आयेउँ इहाँ समाज सकेली ।

प्रभूंची आणि पित्याची आज्ञा केवळ हट्टानें मोडून मोठ्या बडिवारानें मी येथें आलों.

जग भल पोच ऊँच अरु नीचू ।
अमिय अमरपद माहुर मीचू ।
रामरजाइ मेट मन माहीं ।
देखा सुना कतहुँ कोउ नाहीं ।

जगांत बरें, वाईट, उंच, नीच, अमृत, विष, स्वर्ग, नरक, (अशा परस्परविरुद्ध वस्तु) असतातच; परंतु रामाज्ञेस मनानें देखील धाब्यावर बसविणारा असा कोणीहि आणि कोठेंहि ऐकण्यांत अगर पाहण्यांत नाहीं.

सो मैं सब बिधि कीन्हि ढिठाई ।
प्रभु मानी सनेह सेवकाई ।

अशा प्रकारें मीं सर्वतोपरी आगळीक केली असतां प्रभूंनीं ती देखील एकपरी प्रेमळ सेवाच मानून घेतली.

दो०—कृपा भलाई आपनी नाथ कीन्ह भल मोर । दूषन भे भूषनसरिस सुजस चारु चहुँ ओर ॥ २८८ ॥

हे नाथ ! माझे दोषदेखील भूषणावह मानून आपण माझी दिगंत कीर्ति गाजविली आणि माझें सर्वच गोड मानून घेतलें ही केवळ आपली कृपा आणि आपलें सौजन्य होय.

चौ०—राउरिरीति सुबानि बडाई ।
जगत बिदित निगमागम गाई ।
क्रूर कुटिल खल कुमति कलंकी ।
नीच निसील निरीस निसंकी ।
तेउ सुनि सरन सामुहे आये ।
सकृत प्रनाम किये अपनाये ।
देखि दोष कबहुँ न उर आने ।
सुनि गुन साधुसमाज बखाने ।

नाथांचें हें वळण, त्यांची ही मधुर भाषासरणी आणि ही थोरवी जगाला विदित असून वेदशास्त्रांनीं गाइलेली आहे. क्रूर, कुटिल, दुष्ट, कुमति, कलंकी, नीच, कुलहीन, नास्तिक आणि निर्लज्ज अशांनीं देखील एकवार, आम्हीं सन्मुख शरण आलों आहों, आम्ही प्रणाम करितों, इतकें म्हटलेलें ऐकतांच आपण त्यांस पदरांतच घेतलेलें आहे; आणि त्यांच्या दोषांवर नजर न देतां आणि ते कधींहि मनांत न आणतां त्यांचा ' शरण ' इतका शब्द आपल्या कानावर येतांच आपण त्यांच्या गुणांचे संतसमाजांत देखील गोडवेच गाइले आहेत.

को साहिब सेवकहि नेवाजी ।
आपु समान साज सब साजी ।
निज करतूति न समुझिय सपने ।
सेवक सकुच सोच उर अपने ।
सो गोसाइँ नहिं दूसर कोपी ।
भुजा उठाइ कहउँ पन रोपी ।

स्वतःप्रमाणेंच सेवकाची सर्व तरतूद ठेवणारा, स्वतःच्या उपकाराची स्वप्नांतहि आठवण न करणारा आणि सेवकाच्या संकोचाची स्वतःच्या मनांत काळजी वाहणारा, इतक्या रीतीनें सेवकाचा परामर्श घेणारा असा धनी कोण असणार ? असा धनी एरव्हीं कोणीहि नाहीं हें मी ( हात वर करून ) धडधडीत पैज मारून देखील सांगेन.

पसु नाचत सुक पाठ प्रबीना ।
गुनगति नट पाठक आधीना ।

पशु नाचण्यांत आणि पक्षी बोलण्यांत तरबेज होतात. परंतु त्यांच्यांतील त्या त्या गुणांचा प्रादुर्भाव ( स्वयंस्फूर्त नसून ) तो त्यांच्या शिक्षकांच्या स्वाधीन होय.

दो०–यों सुधारि सनमानि जन किये साधु सिरमोर । को कृपाल बिनु पालिहइ बिरदावलि बरजोर ॥ २८९ ॥

ह्या रीतीनें ह्या दासाचे सर्व गोड मानून घेऊन व त्यास गौरवून आपण त्याला साधूंच्या शिरोभागीं नेऊन बसविलें, हें आपलें श्रेष्ठ ब्रीद आपणां दया-घनाव्यतिरिक्त कोण पाळूं शकेल ?

चौ०–सोक सनेह कि बाल सुभाये ।
आयउँ लाइ रजायसु बायें ।
तबहुँ कृपालु हेरि निजओरा ।
सबहि भाँति भल मानेउ मोरा ।

प्रेमानें, वैतागानें अगर बालबुद्धीनें ( कसेंहि असलें तरी ) मी आलों हें मात्र प्रभूंची आज्ञा बाजूला सारूनच आलों. तरीदेखील दयाळांनीं स्वतःवर नजर देऊन सर्वतोपरी माझें भलें मानून घेतलें.

देखेउँ पाय सु–मंगल-मूला ।
जानेउँ स्वामि सहज अनुकूला ।
बडे समाज बिलोकेउँ भागू ।
बडी चूक साहिबअनुरागू ।
कृपा अनुग्रह अंग अघाई ।
कीन्हि कृपानिधि सब अधिकाई ।
राखा मोर दुलार गोसाईं ।
अपने सील सुभाय भलाई ।

सर्वोत्कृष्ट कल्याणांचें केंद्रस्थान असे हे नाथांचे पाय मला पाहण्यास मिळाले, माझे धनी मजवर स्वभावतःच संतुष्ट आहेत ह्याविषयींहि खात्री झाली, आणि माझी एवढी ढोबळ चूक असूनदेखील धनी मजविषयीं कनवाळूच आहेत हें माझें भाग्य ह्या प्रचंड समाजांत माझ्या निदर्शनास येऊन चुकलें. नाथांच्या ह्या कृपेनें आणि प्रसादानें माझें सर्वांग निवालें. दयार्णवांनीं दयेचा अगदीं कळसच केला. ( किंवा माझें सर्वच कांहीं विशेषच मानून घेतलें, ) स्वामींनीं आपल्या शीलास, स्वभावास आणि थोरपणास अनुसरून माझें कोडच पुरविलें.

नाथ निपट मैं कीन्हि ढिठाई ।
स्वामि समाज सकोच बिहाई ।
अबिनय बिनय जथारुचि बानी ।
छमहि देव अतिआरति जानी ।

हे प्रभो ! मीं स्वामी आणि वडील यांची मर्यादा झुगारून देऊन अत्यंत दांडगाई केली. मी हवेंतसें सभ्य असभ्य बोलत आहे, तरी मीं अत्यंत दुःखार्त जाणून देवांनीं मला क्षमा करावी.

दो०–सुहृद सुजान सुसाहिबहि बहुत कहब बडि खोरि । आयसु देइय देव अब सबइ सुधारिय मोरि ॥ २९० ॥

दयार्द्र आणि सुज्ञ अशा ह्या माझ्या श्रेष्ठ धन्यापाशीं मीं कमीजास्त बोलणें हा तरी एक मोठाच अपराध होत आहे. तेव्हां आतां देवांनींच मला आज्ञा द्यावी आणि माझ्या सर्व गोष्टींना सावरून घ्यावें.

चौ०–प्रभु–पद–पदुम–पराग दोहाई ।
सत्य सुकृत सुखसीँव सुहाई ।
सो करि कहउँ हिये अपने की ।
रुचि जागत सोवत सपने की ।
सहज सनेह स्वामिसेवकाई ।
स्वारथ छल फल चारि बिहाई ।
अज्ञासम न सुसाहिबसेवा ।
सो प्रसाद जन पावइ देवा ।

प्रभुपदकमलपरागाची आणि सत्य, सुकृत व सुख यांची जी अंतिम सीमा असेल तिची शपथ घेऊन मी सांगतों कीं, झोपेंत, जागेपणीं किंवा स्वप्नांतहि माझ्या मनोमानसीं एकच आवड आहे ती ही कीं, स्वार्थ, कपट आणि धर्मार्थकाममोक्ष यांची आस्था न बाळगतां निर्मळ प्रेमानें धन्याची सेवा करावी. परंतु धन्याच्या आज्ञेसारखी एरव्हीं सेवाच नाहीं, म्हणून तो आज्ञेचा प्रसाद महाराजांकडून ह्या दासास मिळण्यांत यावा. ''

अस कहि प्रेमबिबस भये भारी ।
पुलक सरीर बिलोचन बारी ।
प्रभु–पद–कमल गहे अकुलाई ।
समउ सनेह न सो कहि जाई ।

इतकें बोलतांच भरत प्रेमानें अत्यंत विव्हल

झाला. त्याचे शरीरावर रोमांच उभे राहून त्याचे नेत्र अश्रूंनीं डवडवले, आणि कासावीस होऊन त्यानें प्रभुपदकमलांवर लोळण घेतलें. त्याचें तें त्या वेळचें प्रेम अवर्णनीय होतें.

कृपासिंधु सनमानि सुबानी।
बैठाये समीप गहि पानी।
भरतबिनय सुनि देखि सुभाऊ।
सिथिल सनेह सभा रघुराऊ।

कृपासिंधु रामांनीं प्रेमळ भाषणानें भरताचा गौरव केला आणि हातानें कुरवाळून त्याला जवळ बसविलें. भरताचा विनय आणि सद्भाव पाहून रघुराज आणि सर्व सभा स्नेहाशिथिल झाली.

**छंद–रघुराउ सिथिल सनेह साधु समाज मुनि मिथिलाधनी। मन महँ सराहत भरत-भायप-भगति की महिमा घनी॥ भरतहिँ प्रसंसत बिबुध बरषत सुमन मानसमलिन से। तुलसी बिकल सब लोक सुनि सकुचे निसागम नलिन से॥ १२॥**

रघुराज, साधुवृंद, वसिष्ठ, जनक आणि सर्व सभा प्रेमानें अगदीं विरघळून गेली, आणि भरताच्या बंधुप्रीतीच्या आणि भक्तीच्या माहात्म्याची ते मनांतल्या मनांत अतिशय श्लाघा करूं लागले. देव मूळचे जरी कुटिल मनाचे असले तरी तेदेखील भरताची प्रशंसा करून त्याजवर पुष्पांचा वर्षाव करूं लागले. सर्वच लोक भरताचें भाषण ऐकून विकल होत्साते सायंकालच्या कमलाप्रमाणें म्लान झाले.

**सो०–देखि दुखारी दीन दुहुँ समाज नर-नारि सब। मघवा महामलीन मुयेहिँ मारि मंगल चहत॥ १२॥**

दोन्ही समाजांतील एकंदर स्त्रीपुरुष दुःखी आणि दीन झालेले पाहूनहि त्या मृतांस मारून[1] अत्यंत नीच असा इंद्र आपलेंच कल्याण चिंतूं लागला.

चौ०–कपट-कु-चालि-सीवँ सुरराजू।
पर-अकाज-प्रिय आपन काजू।
काकसमान पाक-रिपु-रीती।
छली मलीन कतहुँ न प्रतीती।

इंद्र म्हणजे कपटाची आणि दुष्टपणाची सीमाच होय. त्यास आपला स्वार्थ साधून दुसऱ्याचें अकार्य करण्याची मोठी हौस असून कपट, दुष्टपणा आणि अविश्वास हे सर्व गुण कावळ्याप्रमाणें त्याचे अंगीं खिळलेले आहेत.

प्रथम कुमत करि कपट सँकेला।
सो उचाट सब के सिर मेला।
सुरमाया सब लोग बिमोहे।
रामप्रेम अतिसय न बिछोहे।

दुष्ट सल्ला देऊन घाला घालण्याची सर्व जुळवाजुळव त्यानें अगोदरच ( दोहा २८५ पहा ) केली होती. तोच उच्चाटनप्रयोग त्यानें सर्वांचे भरतकांवर केला. त्या इंद्रजालानें सर्वांना मोह पडला; परंतु रामप्रेमाधिक्यामुळें मात्र ते अगदींच बिथरून गेले नाहींत.

भये उचाटबस मन थिर नाहीँ।
छन बन रुचि छन सदन सुहाहीँ।
दुबिध मनोगति प्रजा दुखारी।
सरित सिंधु संगम जनु बारी।
दुचित कतहुँ परितोष न लहहीँ।
एक एक सन मरम न कहहीँ।

उच्चाटनामुळें लोकांचीं मनें चंचल होऊन क्षणांत वनाची इच्छा आणि क्षणांत घरादाराविषयीं प्रेम त्यांच्या मनांत येऊं लागलें. समुद्रसंगमाजवळ नद्यांचें पाणी जसें दुभंग होतें तद्वत् मनें द्विधा झाल्याकारणानें लोक अगदीं गोंधळून गेले. मनाच्या ह्या ओढाताणीनें त्यांना कोठेंच समाधान वाटेना आणि त्यांना एकमेकांस आपलें मर्महि सांगतां येईना.

लखि हिय हँसि कह कृपानिधानू।
सरिस स्वान मघवान जुबानू।

हें सर्व लक्षांत येऊन कृपानिधान राम मनांत हंसले आणि म्हणाले, श्वान, इंद्र आणि तरुण हे सर्व एकाच माळेंतील मणि होत.[1]

---

[1] ( अगोदरच रामविरहानें दुःखी झालेल्यांना पुन्हां मोहग्रस्त करून विशेष दुःखी करणें हें मृतास मारणेंच होय. )

[1] 'श्वयुवमघोनामतद्धिते' हें पाणिनीय सूत्र आहे. ह्याचा अर्थ हा कीं तद्धितवृत्ति वेगळी करून श्वा, युवा

( पुढील पान ३७२ पहा )

दो०–भरत जनक मुनिजन सचिव साधु सचेत बिहाइ । लागि देवमाया सबहि जथाजोग जन पाइ ॥ २९१ ॥

भरत, जनक, मुनिजन, सचिव, संतमंडळी आणि आत्मनिष्ठ इत्यादिकांना वगळून देवमाया त्या त्या माणसांच्या योग्यतेप्रमाणें सर्वांनाच भोंवली.

चौ०––कृपासिंधु लखि लोग दुखारे।
निजसनेह सुर–पति–छल भारे ।

स्वतःवरील प्रेमानें आणि इंद्राच्या छलभारानें लोक अगदीं रंजीस आले आहेत हें कृपासिंधूंनीं जाणलें.

सभा राउ गुरु महिसुर मंत्री ।
भरतभगति सब कै मति जंत्री ।
रामहिँ चितवत चित्र लिखे से ।
सकुचत बोलत बचन सिखे से ।

सभा, जनक, वसिष्ठ, विप्र, सचिव ह्या सर्वांच्याच बुद्धीवर भरताच्या भक्तीची जादू पसरली. ते रामाकडे चित्राप्रमाणें पाहूं लागले आणि शिकविल्यासारखें लाजत बोलूं लागले.

भरत–प्रीति–नति–बिनय–बडाई ।
सुनत सुखद बरनत कठिनाई ।

भरताचें प्रेम, नीति, विनय आणि प्रभाव हे ऐकण्यास सुखकर असून वर्णन करण्यास मात्र अवघड आहेत.

जासु बिलोकि भगति लवलेसू ।
प्रेममगन मुनिगन मिथिलेसू ।
महिमा तासु कहइ किमि तुलसी ।
भगति सुभाय सुमति हिय हुलसी ।

आपु छोटि महिमा बडि जानी ।
कबिकुल कानि मानि सकुचानी ।
कहि न सकति गुन रुचि अधिकाई ।
मतिगति बालबचन की नाई ।

ज्याच्या भक्तीच्या लवलेशाच्या अवलोकनानें मुनिगण आणि राजा जनक हेदेखील प्रेमांत निमग्न झाले त्याचा महिमा मी तुलसीदास कसा वर्णूं शकेन! त्याच्या भक्तीच्या भावनेनें अंतःकरणांत सद्बुद्धि उल्हास पावते, परंतु आपण क्षुद्र आणि त्याचा महिमा फार थोर हें समजून सर्व कवी आपली इभ्रत जाईल म्हणून संकोच करितात. भरताच्या महिम्यांत गुण आणि आस्वाद यांचा सुकाळ असल्यामुळें त्याचें वर्णन करण्याची शक्ति त्यांच्या बुद्धींत रहात नाहीं व म्हणून ते वर्णन करूं लागले म्हणजे त्यांच्या बुद्धीची गत बालभाषिताप्रमाणें होते.

दो०–भरत-बिमल-जस बिमल बिधु सुमति चकोर कुमारि । उदित बिमल जनहृदय नभ एक टक रही निहारि ॥ २९२ ॥

भरताचा विमलयशचंद्रमा कविजनांच्या विमल हृदयरूप आकाशांत उदय पावतो. परंतु त्यांची सुमतिरूप चकोरकुमारी त्या चंद्राकडे नुसती एकसारखी टक लावून मात्र पाहात राहते.

चौ०–भरतसुभाउ न सुगम निगमहूँ ।
लघुमति चापलता कबि छमहूँ ।

भरताचा सद्भाव वेदशास्त्रांना देखील अगम्य होय. तेव्हां माझ्या अल्प आणि चंचल बुद्धीबद्दल कविजनांनीं मला क्षमाच केली पाहिजे.

कहत सुनत सतिभाउ भरत को ।
सीय–राम–पद होइ न रत को ।
सुमिरत भरतहिँ प्रेम राम को ।
जेहि न सुलभ तेहि सरिस बाम को ।

भरताच्या सद्भावाच्या श्रवणपठणानें सीतारामचरणीं कोण अनुरक्त होणार नाहीं ! भरताच्या स्मरणानें रामाची भक्ति ज्यास सुलभ झाली नाहीं त्यासारखा प्रारब्धहीन कोण असूं शकेल !

देखि दयाल दसा सबही की ।
राम सुजान जानि जन जी की ।
धरमधुरीन धीर नयनागर ।
सत्य सनेह सील सुख सागर ।

---

( पान ३७१ वरून चालू )

आणि मघवा ह्या शब्दांचीं रूपें समान होतात. भाव हा कीं, शब्दशास्त्राच्या अतद्धित वृत्तींत वरील शब्दत्रयास जसें स्वरूपसाम्य असतें तद्वत् यौगिक पद्धतीनें जीवांच्या मानासिक अतद्धित (अ+तत्+हित=अब्रह्मनिष्ठ म्हणजे वैषयिक अर्थात् स्वार्थैकपर) वृत्तींत कृतीचें साम्य वास करितें. हें लक्षांत येऊन रामचंद्रांच्या मनांत पाणिनीय अष्टाध्यायीच्या सूत्राचें व्यावहारिक प्रत्यंतर येऊन हंसें आलें. अर्थात् त्यांना पाणिनीच्या बुद्धीचें मोठें कौतुक वाटलें.

देस काल लखि समयसमाजू ।
नीति–प्रीति–पालक रघुराजू ।
बोले बचन बानि सरबस से ।
हित–परिनाम सुनत ससिरस से ।

सर्व समाजाची ती दशा पाहून आणि त्याचें हार्द जाणून दयाळू, सर्वज्ञ, धर्मधुरीण, धैर्यशाली, नीतिनिपुण, सत्य, स्नेह, शील आणि सुख यांचे सागर, नीति व प्रीति यांचे पालक असे रघुराज श्रीरामचंद्र देशकाल, अवसर आणि समाज यांचेकडे लक्ष देऊन हितपरिणामी, अमृताप्रमाणें श्रवणमधुर आणि वाक्सर्वस्व असें भाषण करूं लागले.

तात भरत तुह्म धरमधुरीना ।
लोक बेद बिद परमप्रबीना ।

रामचंद्र म्हणाले " बा भरता ! धर्मधुरीण, आणि वेद व व्यवहार यांचा परमप्रवीण ज्ञाता असा एक तूंच आहेस.

**दो०–करम बचन मानस बिमल तुह्म समान तुह्म तात । गुरुसमाज लघु-बंधु-गुन कुसमय किमि कहि जात ॥ २९३ ॥**

वत्सा ! कायावाचामनेंकरून तुझ्यासारखा पवित्र तूंच आहेस. ह्या गुरुसमाजांत आणि त्यांतून अशा संकटसमयीं धाकट्या भावाचें गुणवर्णन तरी कसें करून दाखवितां येईल ?

चौ०–जानहु तात तरनि–कुल–रीती ।
सत्यसंध पितु कीरति प्रीती ।
समउ समाज लाज गुरुजन की ।
उदासीन हित अनहित मन की ।
तुम्हहिँ बिदित सबही कर करमू ।
आपण मोर परमहित धरमू ।

हे तात ! आपल्या सूर्यकुलाची सत्यसंधतेची सनातन वहिवाट आणि तिजवर असलेलें पित्याचें प्रेम आणि त्यासंबंधानें त्यांची कीर्ति हें तूं जाणूनच आहेस. प्रसंग, समाज, गुरुजनांची मर्यादा, आपले शत्रु, मित्र आणि उदासीन यांचें मनोगत, आणि आपणां सर्वांचें आणि व्यक्तिशः माझें परमहित आणि धर्म ह्या सर्वच गोष्टींचें रहस्य तुला अवगतच आहे.

मोहि सब भाँति भरोस तुम्हारा ।
तदपि कहउँ अवसर अनुसारा ।
तात तात बिनु बात हमारी ।
केवल गुरु–कुल–कृपा सँभारी ।
न तरु प्रजा पुरजन परिवारू ।
हमहिँ सहित सब होत खुआरू ।

मला तर सर्वस्वी तुझाच भरंवसा आहे. तथापि प्रसंगानुरूप मला बोलणें प्राप्त आहे कीं, बाळा ! पित्याच्या पश्चात् आपली बूज केवळ ह्या गुरुजनांच्या कृपेनेंच कायम राखिली. नाहीं तर तुम्हां-आम्हांसकट सर्व प्रजा, पुरजन आणि परिवार दुःखी झाले असते.

जौँ बिनु अवसर अथव दिनेसू ।
जग केहि कहहु न होइ कलेसू ।
तस उतपात तात बिधि कीन्हा ।
मुनि मिथिलेस राखि सबु लीन्हा ।

सूर्यच जर अकालीं अस्तंगत झाला तर जगांत, सांग पाहूं, कोणाला क्लेश व्हावयाचे नाहींत ? असलाच आघात दुर्दैवानें प्राप्त झाला होता, परंतु बंधो ! ह्या गुरुमाउलीनें आणि ह्या मिथिलेश्वरानें तो सर्व सावरून घेतला.

**दो०–राजकाज सब लाज पति धरम धरनि धन धाम । गुरुप्रभाउ पालिहि सबहिँ भल होइहि परिनाम ॥ २९४ ॥**

राजकारण आणि त्याची सर्व इभ्रत, प्रतिष्ठा, धर्म, राष्ट्र, धन आणि धाम ह्या सर्वांचें रक्षण गुरूंचा प्रभावच करील आणि त्याच योगानें शेवटीं आपलें कल्याण होईल.

चौ०–सहित समाज तुह्मार हमारा ।
घर बन गुरुप्रसाद रखवारा ।
मातु–पिता–गुरु–स्वामि–निदेसू ।
सकलधरम धरनीधर सेसू ।
सो तुम्ह करहु करावहु मोहू ।
तात तरनि–कुल–पालक होहू ।

समाजासहित घरीं तुझें आणि वनांत माझें रक्षण ह्या गुरूंच्या प्रसादानेंच होईल. माता, पिता, गुरु आणि स्वामी ह्यांच्या आज्ञेतच सर्व धर्म एकवटला आहे आणि तीच आज्ञा शेषाप्रमाणें पृथ्वीला आधारभूत आहे. ती ( पित्याची ) आज्ञा तूं शिरसावंद्य मानून माझ्याहि करवीं तिचें पालन कर आणि हे तात ! अशा रीतीनें सूर्यकुलाचें रक्षण कर.

साधक एक सकलसिधि देनी ।
कीरति सुगति भूतिमय बेनी ।

सो बिचार सहि संकट भारी ।
करहु प्रजा परिवार सुखारी ।
बाढी बिपति सबहि मोहि भाई ।
तुम्हहिँ अवधि भरि बडि कठिनाई ।

सर्व सिद्धींचें आणि कीर्ति, सद्गति आणि ऐश्वर्य ह्या त्रिवेणीचें साधक असें ( आज्ञापरिपालन ) हें एकच साधन आहे. असा विचार करून ह्या घोर संकटास तोंड देऊन प्रजा आणि परिवार ह्यांना सुखी कर. ही विपत्ति माझ्या आणि वरकड सर्वत्रांच्या समोर सारखीच वाढून आली आहे. तरी तुला मात्र चवदा वर्षेपर्यंत ही विपत्ति सोसणें फारच जड जाणार आहे.

जानि तुम्हहिँ मृदु कहहुँ कठोरा ।
कुसमय तात न अनुचित मोरा ।
होहिँ कुठाय सुबंधु सहाये ।
ओडियहि हाथ असनि के घाये ।

तुझें कोमल अंतःकरण जाणून देखील मी हें कठोर बोलत आहे. परंतु हे तात ! प्रसंग वाईट आहे हें जाणून माझें भाषण अनुचित आहे असें समजूं नकोस. संकटसमयीं प्रियकर बंधूच उपयोगीं पडतील. तरवारीचा वार हातच चुकवितील.

**दो०–सेवक कर पद नयन से मुख सो साहिब होइ । तुलसी प्रीति की रीति सुनि सुकबि सराहहिँ सोइ ॥ २९५ ॥**

सेवक हे हस्त, पाद, नेत्र इत्यादिकांप्रमाणें असून स्वामी हा मुख होय." तुलसीदास म्हणतात कीं, प्रेमाचें हें लक्षण ऐकून सत्कविजन अशा सेवकाची प्रशंसाच करीत असतात. ( ह्याचा स्पष्ट भाव ३०४ दोह्यांत आहे. )

चौ०–सभा सकल सुनि रघुबर बानी ।
प्रेम–पयोधि-अमिय जनु सानी ।
सिथिलसमाज सनेह समाधी
देखि दसा चुप सारद साधी ।

रघुवराचें भाषण ऐकून सर्व सभा जणुंकाय प्रेमसागरजन्य अमृतांत तल्लीन झाली. सर्व समाज इतका शिथिल झाला कीं, जणुंकाय प्रेमसमाधींत मग्न झाल्याप्रमाणें तो भासला. ती स्थिति पाहून वाग्देवीहि स्तब्ध झाली.

भरतहिँ भयउ परम संतोषू ।
सनमुख स्वामि बिमुख दुख दोषू ।
मुख प्रसन्न मन मिटा बिषादू ।
भा जनु गूँगेहि गिराप्रसादू ।
कीन्ह सप्रेम प्रनाम बहोरी ।
बोले पानिपंकरुह जोरी ।

दुःखदोष नाहींसे होऊन स्वामी आपल्या संन्मुख झाले हें पाहून भरतास पराकाष्ठेचा आनंद झाला. मूकास वाचा फुटावी अशाप्रमाणें भरताच्या मनाची हुरहुर नाहींशी होऊन त्याचें चित्त प्रसन्न झालें. फिरून प्रेमपूर्वक प्रणाम करून आणि हस्तकमलें जोडून तो बोलूं लागला.

नाथ भयउ सुख साथ गये को ।
लहेउँ लाहु जग जनम भये को ।
अब कृपाल जस आयसु होई ।
करउँ सीस धरि सादर सोई ।
सो अवलंब देव मोहिँ देई ।
अवधि पारु पावउँ जेहि सेई ।

भरत म्हणाला, " हे प्रभो ! आपल्या बरोबर येण्याचें सुख मीं अनुभविलें आणि इहलोकीं जन्म घेतल्याचेंहि पूर्ण सार्थक झालें. दयाळा ! आतां आपण जी आज्ञा कराल ती मस्तकीं धारण करून मी आदरपूर्वक त्याप्रमाणें वर्तन करीत राहीन. आतां प्रभूंनीं मला असा कांहींतरी आधार द्यावा कीं, ज्याची जोपासना करीत मी हा चवदा वर्षांचा काल कंठण्यास समर्थ होईन.

**दो०–देव देवअभिषेक हित गुरुअनुसासन पाइ । आनेउँ सब तीरथसलिल तेहि कहँ काह रजाइ ॥ २९६ ॥**

प्रभो ! गुरुजींच्या आज्ञेनुसार महाराजांचे अभिषेकाप्रीत्यर्थ सर्व तीर्थांचें जल आणलें आहे, त्या बाबतींत कांहीं आज्ञा असावी.

चौ०--एक मनोरथ बड मन माहीँ ।
सभय सकोच जात कहि नाहीँ ।

माझ्या मनाची एक मोठी हौस राहिली आहे परंतु ती भीति आणि संकोच यामुळें मला सांगतां येत नाहीं. "

कहहु तात प्रभुआयसु पाई ।
बोले बानि सनेह सुहाई ।
चित्रकूट मुनि थल तीरथ बन ।
खग मृग सरि सर निर्झर गिरिगन ।

प्रभु-पद-अंकित अवनि बिसेखी ।
आयसु होइ त आवउँ देखी ।

' हे तात ! बोल ', म्हणून प्रभूंची आज्ञा होतांच भरत स्नेहसुभग वाणीनें म्हणाला, " ह्या चित्रकूटावरील मुनिजन, त्यांचे आश्रम, तीर्थें, वनें, खग, मृग, नद्या, सरोवरें, निर्झर, डोंगरांच्या रांगा इत्यादि प्रभुपदांनीं मंडित झालेलीं विशिष्ट स्थलें, आज्ञा होत असल्यास मी पाहून येईन. "

अवसि अत्रिआयसु सिर धरहू ।
तात बिगत भय कानन चरहू ।
मुनिप्रसाद बन मंगलदाता ।
पावन परम सुहावन भ्राता ।
रिषिनायक जहँ आयसु देहीं ।
राखेहु तीरथजल थल तेहीं ।

( हें ऐकून राम म्हणाले, ) " अवश्य, अत्रिमहाराजांची आज्ञा शिरसावंद्य करून, बाळा ! अरण्यांत निर्धास्तपणें संचार कर. बंधो ! मुनींच्या कृपेनें हें परमपावन आणि सुंदर वन तुला मंगलप्रदच होईल. ऋषिश्रेष्ठ जेथें आज्ञा देतील तेथेंच ह्या तीर्थजलांची स्थापना करावी. "

सुनि प्रभुबचन भरत सुख पावा ।
मुनि-पद-कमल मुदित सिर नावा ।

ह्याप्रमाणें प्रभूंचें वचन ऐकून भरतास आनंद झाला आणि त्यानें अत्रिमहाराजांच्या चरणकमलांचे ठायीं मस्तक नमविलें.

**दो०-भरत-राम-संवाद सुनि सकल-सुमंगल-मूल । सुर स्वारथी सराहि कुल बरषत सुर-तरु-फूल ॥ २९७ ॥**

भरत आणि रामचंद्र यांचा मनोहर आणि आनंदकारक संवाद ऐकून स्वार्थी देवतांनीं सूर्यकुलाची प्रशंसा करून प्रसन्नचित्तानें पुष्पांचा वर्षाव केला.

चौ०-धन्य भरत जय राम गोसाईं ।
कहत देव हरषत बरिआईं ।
सुनि मिथिलेस सभा सब काहू ।
भरत बचन सुनि भयउ उछाहू ।
भरत-राम-गुन-ग्राम-सनेहू ।
पुलकि प्रसंसत राउ बिदेहू ।

देवांना आनंदाचें भरतें येऊन ते भरताला धन्यवाद देऊन रामप्रभूंचा जयजयकार करूं लागले. वसिष्ठ, जनक, सभाजन ह्या सर्वांनाच भरताचें भाषण ऐकून परमाल्हाद वाटला. राजा विदेह, पुलकित होत्साता, भरत आणि रामचंद्र यांचे गुणगण आणि प्रेम यांची प्रशंसा करूं लागला.

सेवक स्वामि सुभाउ सुहावन ।
नेम प्रेम अति पावन पावन ।
मति अनुसार सराहन लागे ।
सचिव सभासद सब अनुरागे ।

' हे स्वामिसेवक खरे खरे स्वभावशुद्ध आहेत, ह्यांचें व्रत आणि प्रेम हीं पवित्राहूनहि पवित्र होत ' अशा प्रकारें सचिव, सभासद वगैरे सर्व मंडळी प्रेमाविष्ट होऊन यथामति स्तुति करूं लागली.

सुनि सुनि राम-भरत संबादू ।
दुहुँ समाज हिय हरष बिषादू ।
राममातु दुख-सुख-सम जानी ।
कहि गुन राम प्रबोधीं रानी ।
एक कहहिं रघुबीरबड़ाई ।
एक सराहत भरतभलाई ।

रामभरतांचा संवाद ऐकून ऐकून दोन्ही समाजांचीं अंतःकरणें हर्ष आणि विषाद यांनीं युक्त झालीं. कौसल्येस सुखदुःख समसमान वाटून ती रामाचे गुण वर्णन करून इतर राण्यांचें समाधान करूं लागली. कोणी रघुवीराचें महत्त्व गाऊं लागल्या तर इतर कोणी भरताचा चांगुलपणा वाखाणूं लागल्या.

**दो०-अत्रि कहेउ तब भरत सन सैलसमीप सुकूप । राखिय तीरथतोय तहँ पावन अमिय अनूप ॥ २९८ ॥**

नंतर अत्रिऋषि भरतास म्हणाले कीं, " ह्याच पर्वताचे समीप पवित्र आणि अमृतासारखा अनुपम असा एक उत्तमोत्तम कूप आहे तेथें ह्या तीर्थजलांची स्थापना करावी. "

चौ०-भरत अत्रिअनुसासन पाई ।
जलभाजन सब दिये चलाई ।
सानुज आपु अत्रि मुनि साधू ।
सहित गये जहँ कूप अगाधू ।

अत्रिमुनींच्या आज्ञेनुसार भरतानें सर्व तीर्थ-पात्रें पुढें रवाना केलीं आणि स्वतः शत्रुघ्न, अत्रि, वसिष्ठ आणि मुनिमंडळ यांच्या सहवर्तमान त्या अगाध कूपाकडे जाण्यास निघाला.

पावन पाथ पुन्य थल राखा ।
प्रमुदित प्रेम अत्रि अस भाखा ।

तात अनादि सिद्ध थल एहू ।
लोपेउ काल बिदित नहिँ केहू ।

त्या पुण्यस्थळीं तीर्थजलें सांठविल्यानंतर अत्रि-मुनि प्रेमहर्षित होत्साते ह्मणाले, " बाळा भरता ! हें स्थळ अनादिसिद्ध होय.कालमानानें तें लोपलें म्हणून तें हल्लीं कोणासहि अवगत नाहीं.

तब सेवकन्ह सरस थल देखा ।
कीन्ह सुजल हित कूप बिसेखा ।
बिधिबस भयउ बिस्व उपकारू ।
सुगम अगम अति धरम बिचारू ।

तुझ्या सेवकांनींहि केवळ दलदलीची जागा समजून तीच हा कूप तुझ्या तीर्थजलासाठीं त्यांनीं उपसून तयार केला आहे. विधिवशात् अवघ्या जगावरच हा एक उपकार झाला.हा कूप म्हणजे धर्माची एक मोठी महत्वाची बाब असून आजपर्यंत ती लुप्त झाली होती, ती आतां मात्र अगदीं सुलभ झाली.

भरतकूप अब कहिहहिँ लोगा ।
अतिपावन तीरथ जलजोगा ।
प्रेम सनेम निमज्जत प्रानी ।
होइहहिँ बिमल करममनबानी ।

यापुढें लोक ह्यास ' भरतकूप ' ही संज्ञा देतील. तीर्थजलांचे योगानें हा अत्यंत पवित्र झाला आहे. जो कोणी प्राणी ह्याचें प्रेमानें आणि नेमानें स्नान करील तो कायावाचामनेंकरून शुद्ध होईल."

**दो०—कहत कूपमाहिमा सकल गये जहाँ रघुराउ । अत्रि सुनायउ रघुबरहिँ तीरथ-पुन्य-प्रभाउ ॥ २९९ ॥**

याप्रमाणें कूपाचें माहात्म्य वर्णन करीत करीत सर्व मंडळी रामचंद्राकडे परतली. अत्रिमुनींनीं रघुवरासहि भरतकूपतीर्थाचा पुण्यप्रभाव निवेदन केला.

चौ०—कहत धरम इतिहास सप्रीती ।
भयउ भोर निसि सो सुख बीती
नित्य निबाहि भरत दोउ भाई ।
राम—अत्रि—गुरु—आयसु पाई ।
सहित समाज साज सब सादे ।
चले राम—बन—अटन पयादे ।

मंडळी धार्मिक आणि ऐतिहासिक गोष्टी प्रेमानें सांगत आहेत तोंच ती आनंदाची रात्र संपून पहाट झाली. नित्यकर्मे सारून, आणि राम अत्रिमुनी आणि वसिष्ठ यांची आज्ञा घेऊन भरत आणि शत्रुघ्न सर्व मंडळींसह साध्या थाटानें रामवनविहारार्थ पायींच निघाले.

कोमल चरन चलत बिनु पनहीँ ।
भइ मृदु भूमि सकुचि मन मनहीँ ।
कुस कंटक काँकरी कुराई ।
कटुक कठोर कुबस्तु दुराई ।
महि मंजुल मृदु मारग कीन्हे ।
बहत समीर त्रिबिध सुख लीन्हे ।

भरत आपल्या कोमल पायांनीं अनवाणीच चालत असतां पृथ्वी मनांतल्या मनांत संकोचून मृदु झाली. तिनें गवत, कांटे, दगड, कांटेरी झुडपें वगैरे त्रासदायक आणि कठोर अशा वाईट वस्तु दूर करून वाटा साफ आणि मऊ करून ठेविल्या. त्रिविध सुखांना घेऊन वारा वाहूं लागला.

सुमन बरषि सुर घन करि छाहीँ ।
बिटप फूलि फल तृन मृदुताहीँ ।
मृग बिलोकि खग बोलि सुबानी ।
सेवहिँ सकल रामप्रिय जानी ।

देवांनीं फुलें उधळलीं. मेघांनीं छाया केली. तृणें मृदु झालीं. वृक्ष पुष्पफळांनीं लदबदून गेले. मृग टक लावून पाहूं लागले. पक्षी मधुर आलाप काढूं लागले. (भरत हा) रामप्रिय आहे हें जाणून सर्वच सेवेला तत्पर झाले.

**दो०—सुलभ सिद्धि सब प्राकृतहु राम कहत जमुहात । राम-प्रान-प्रिय भरत कहुँ यह न होइ बडि बात ॥ ३०० ॥**

एखादा साधारण मनुष्य नुसती जांभई देतांना देखील जर रामनामोच्चार करील तर त्यास देखील सर्व सिद्धि आपोआप भेटतील. मग भरत हा तर रामाला प्राणाहूनहि प्रिय, तेव्हां त्यासंबंधानें ही म्हणजे मोठीशी गोष्ट नव्हे.

चौ०—एहि बिधि भरत फिरत बन माहीँ ।
नेम प्रेम लखि मुनि सकुचाहीँ ।

अशा रीतीनें भरत वनामध्यें फिरत असतां त्याचा निश्चय आणि प्रेम पाहून मुनींनाहि पण संकोच उत्पन्न झाला.

पुन्य जलास्रय भूमि बिभागा ।
खग मृग तरु तृन गिरि बन बागा ।
चारु बिचित्र पबित्र बिसेखी ।
बूझत भरत दिव्य सब देखी ।

चित्रपटावरील अत्यंत पावन, रमणीय, विचित्र आणि पवित्र असे जलभाग, भूभाग, पक्षी, मृग, तरु, तृण, गिरी, वनें, उपवनें वगैरे सर्वच दिव्य पाहून भरत त्यांच्यासंबंधानें विचारपूस करी.

सुनि मनमुदित कहत रिषिराऊ ।
हेतु नाम गुन पुन्य प्रभाऊ ।
कतहुँ निमज्जन कतहुँ प्रनामा ।
कतहुँ बिलोकत मन अभिरामा ।
कतहुँ बैठि मुनिआयसु पाईं ।
सुमिरत सीयसहित दोउ भाई ।

तें ऐकून ऋषिवर्य हर्षित अंतःकरणानें त्या त्या स्थलांचे हेतु, नांव, गुण, पावित्र्य आणि मांहात्म्य वर्णन करीत. भरतानें कोठें स्नान करावें तर कोठें नमस्कारच घालावा, कोठें मनास रमणीय वाटल्यामुळें बघतच रहावें, तर कोठें मुनींची आज्ञा घेऊन सीतेसहित बंधुद्वयाचें स्मरणच करीत बसावें.

देखि सुभाउ सनेहु सुसेवा ।
देहिँ असीस मुदित बनदेवा ।
फिरहिँ गये दिन पहर अढाई ।
प्रभु--पद--कमल बिलोकहिँ आई ।

भरताचा सद्भाव, भक्ति आणि उत्तम सेवा पाहून वनदेवतांनीं आनंदित होऊन त्यास आशीर्वाद द्यावे. अडीच प्रहर दिवस लोटला म्हणजे त्यानें परतावें आणि येऊन प्रभुपदकमलांचें दर्शन घ्यावें.

**दो०—देखे थलतीरथ सकल भरत पाँच दिन माँझ । कहत सुनत हरिहर सुजस गयउ दिवस भइ साँझ ॥ २०१ ॥**

भरतानें सर्व तीर्थें आणि स्थळें पांच दिवसांत पाहिलीं. हरिहरांच्या सद्यशःश्रवणकीर्तनांत तोहि दिवस गेला आणि सूर्यास्त झाला.

चौ०--भोर न्हाइ सब जुरा समाजू ।
भरत भूमिसुर तिरहुतिराजू ।
भल दिन आजु जानि मन माहीँ ।
राम कृपालु कहत सकुचाहीँ ।

प्रातःस्नानें आटोपून, भरत, विप्रवृंद व राजा जनक वगैरे सर्व मंडळी जुळली. आज दिनशुद्धि आहे असें रामाच्या मनांत आलें, परंतु त्या दयाळूस तें बोलण्यास फार संकोच वाटला.

गुरु नृप भरत सभा अवलोकी ।
सकुचि राम फिरि अवनि बिलोकी ।
सील सराहि सभा सब सोची ।
कहुँ न रामसम स्वामि सँकोची ।

वसिष्ठ, जनक, भरत आणि इतर मंडळी यांना न्याहाळून राम संकोचले आणि फिरून त्यांनीं खालीं मान घातली. त्यांच्या त्या शालीनतेचें वर्णन करीत सर्व सभा दुःखानें म्हणूं लागली कीं, रामासारखा संकोचित स्वामी अन्यत्र कोठेंहि नसेल.

भरत सुजान रामरुख देखी ।
उठि सप्रेम धरि धीर बिसेखी ।
करि दंडवत कहत कर जोरी ।
राखी नाथ सकल रुचि मोरी ।

रामाची मर्जी ओळखण्यांत चतुर असा भरत विशेष धारिष्ट करून उठला आणि हात जोडून आणि दण्डवत करून प्रेमपूर्वक म्हणूं लागला—" प्रभूंनीं माझें सर्वतोपरी कोडच पुरविलें.

मोहि लागि सबहिँ सहेउ संतापू ।
बहुत भाँति दुख पावा आपू ।
अब गोसाँइँ मोहि देउ रजाई ।
सेवउँ अवध अवधि भरि जाई ।

महाराजांनीं माझेकरितां सर्व त्रास सहन केला आणि हरतऱ्हेनें स्वतःस दुःखांत लोटून घेतलें. स्वामिन् ! आतां मला आज्ञा असावी म्हणजे मी जाऊन अवधीपर्यंत अयोध्येचीच सेवा करीन.

**दो०—जेहि उपाय पुनि पाय जन देखइ दीनदयाल । सो सिख देइय अवधि लगि कोसलपाल कृपाल ॥ २०२ ॥**

हे दीनदयाल, दयानिधान, अयोध्यानाथ ! ज्या उपायानें चवदा वर्षांनंतर फिरून ह्या दासाला हे चरण पहाण्यास मिळतील अशी कांहीं तरी आज्ञा देऊन ठेवावी.

चौ०—पुरजन परिजन प्रजा गोसाईँ ।
सब सुचि सरस सनेह सगाई ।
राउर बादि भल भव–दुख–दाहू ।
प्रभु बिनु बादि परम–पद–लाहू ।

पुरजन, परिजन, आणि प्रजा हे स्नेहसंबंध जरीं सर्वथा शुद्ध आणि सरस असले तरी तेदेखील भवदुःखदायकच होत. आपणासारख्या धन्याप्रीत्यर्थ तेहि पण पुरवतात. परंतु आपणाविरहित मोक्षप्राप्ति देखील व्यर्थच होय.

स्वामि सुजान जानि सब ही की ।
रुचि लालसा रहनि जन जी की ।
प्रनत पालु पालहिँ सब काहू ।
देव दुहूँ दिसि ओर निबाहू ।
अस मोहिं सब बिधि भूरि भरोसो ।
किये बिचारुन सोच खरो सो ।

शरणागताचें रक्षण करणारे आपण सर्वज्ञ स्वामी, दासाचें हार्द, कल, इच्छा, राहणी, जिव्हाळा वगैरे सर्व समजून सरसकट सर्वांचें पालनच करीत असतां, त्या अर्थी माझी बाजू दोहोंपक्षीं देव संभाळणारच, हा मला सर्वप्रकारें पूर्ण भरंवसा आहे आणि हाच विचार करून मी खरोखरीं निश्चित आहें.

आरति मोर नाथ कर छोहू ।
दुहूँ मिलि कीन्ह ढीठ हठि मोहू ।
यह बड दोष दूरि करि स्वामी ।
तजि सकोच सिखइय अनुगामी ।

माझी तळमळ आणि प्रभूंची मजविषयीं कळवळ ह्या दोहोंनीं मिळून मला जबरीनेंच धीट बनविलें. माझा हा भयंकर दोष दूर सारून स्वामींनीं संकोच सोडून मला सेवकाला आज्ञा दिलीच पाहिजे. ''

भरतबिनय सुनि सबहि प्रसंसी ।
खीर-नीर-बिबरन-गति हंसी ।

भरताचा विनय पाहून, ' नीरक्षीरविवरणाची ही हंसाचीच हातोटी आहे ' असें म्हणून सर्वजण त्याची वाहवा करूं लागले.

**दो०-दीनबंधु सुनि बंधु के बचन दीन छलहीन । देस-काल-अवसर-सरिस बोले राम प्रबीन ॥ ३०३ ॥**

भरताचें तें दीन आणि अकृत्रिम भाषण श्रवण करून दीनवत्सल राम, देश, काल आणि वर्तमान यांना अनुसरून अधिकारात्मक भाषण करूं लागले.

चौ०-तात तुह्मारि मोरि परिजन की ।
चिंता गुरुहिँ नृपहिँ घर बन की ।
माथे पर गुरु मुनि मिथिलेसू ।
हमहि तुह्महिँ सपनेहुँ न कलेसू ।

( राम म्हणाले, ) "हे तात ! तुझी, माझी, कुटुंबाची, घराची आणि वनाची सर्व चिंता ह्या गुरुमाउलीस आणि विदेहमहाराजांस आहेच. गुरु ( वसिष्ठ ) मुनि ( विश्वामित्र आदि ) आणि मिथिलेश ह्यांचें छत्र डोक्यावर असतां तुम्हांआम्हांला स्वप्नांतदेखील दुःखाची कल्पना येणार नाहीं.

मोर तुह्मार परमपुरुषारथ ।
स्वारथ सुजस धरम परमारथ ।
पितुआयसु पालिय दुहुँ भाई ।
लोक बेद भल भूपभलाई ।

माझा आणि तुझा परमपुरुषार्थ, स्वार्थ, सुयश, धर्म आणि परमार्थ हे सर्व दोघांहि बंधूंनीं पित्राज्ञापालन करण्यांतच आहेत. शास्त्र आणि लोक दोघांनाहि हें मान्य असून ह्यांतच आपल्या पित्याचें कल्याण आहे.

गुरु-पितु-मातु-स्वामि-सिख पाले ।
चलेहु कु-मग-पग परहिँ न खाले ।
अस बिचारि सब सोच बिहाई ।
पालहु अवध अवधि भरि जाई ।

गुरु, पिता, माता आणि स्वामी यांची जो आज्ञा पाळतो तो आड वाटेनें जरी चालला तरीहि त्याचें पाऊल घसरून तो पडणार नाहीं. असा विचार करून सर्व दुःखांचा त्याग कर आणि परत जाऊन अवधिपर्यंत अयोध्येचें राज्य कर.

देस कोस पुरजन परिवारू ।
गुरुपद रजहिँ लाग छरुभारू ।
तुह्म मुनि-मातु-सचिव-सिख मानी ।
पालेहु पुहुमि प्रजा रजधानी ।

देश, कोश, पुरजन आणि परिवार यांचा सर्व भार गुरुपदरजांकडेच सोंपीव आणि स्वतः तूं गुरु, माता आणि सचिव यांच्या आज्ञेप्रमाणें वागून पृथ्वी, प्रजा आणि राजधानी यांचें पालन कर.

**दो०-मुखिया मुख सो चाहिये खान पान कहुँ एक । पालइ पोषइ सकल अँग तुलसी सहित बिबेक ॥ ३०४ ॥**

चौ०-राज-धरम-सरबसु एतनोई ।
जिमि मन माँह मनोरथ गोई ।

मुख्यानें मुखाप्रमाणें असावयास पाहिजे. खाण्यापिण्यासाठीं तें ( तोंड ) एकटेंच असतें; परंतु त्यानें सर्वांगाचेंच पालनपोषण करावें लागतें, आणि तेंहि मन जसें आपल्या विचारांना झांकून सुरक्षित ठेवतें त्याप्रमाणें विचारपूर्वक करावयास पाहिजे. राजनीतीचें मूलतत्त्व काय तें एवढेंच आहे.''

बंधुप्रबोध कीन्ह बहु भाँती ।
बिनु अधार मन तोष न साँती ।
भरत सील गुरु साचिव समाजू ।
सकुच सनेह बिबस रघुराजू ।

रामचंद्रांनीं भरताचें परोपरीनें सांत्वन केलें, परंतु आधारावांचून त्याच्या मनास समाधान आणि शांति वाटेना. एकीकडे भरताचें शील आणि दुसरीकडे गुरुजन आणि सचिव ही मंडळी, त्यामुळें रघुराज प्रेम आणि संकोच यांमध्यें घोटाळूं लागले.

प्रभु करि कृपा पाँवरीं दीन्हीं ।
सादर भरत सीस धरि लीन्हीं ।
चरनपीठ करुनानिधान के ।
जनु जुग जामिक प्रजा प्रान के ।
संपुट भरतसनेह रतन के ।
आखर जुग जनु जीवजतन के ।
कुलकपाट कर कुसल करम के ।
बिमलनयन सेवा–सु–धरम के ।

नंतर प्रभुरायांनीं कृपा करून आपल्या पादुका दिल्या. त्या भरतानें सादर मस्तकावर घेतल्या. दयाघनाचीं तीं चरणपीठें म्हणजे जणुंकाय प्रजेच्या प्राणांचे दोन आत्मरक्षकच, किंवा भरताच्या भक्तिरत्नाच्या दोन पेट्याच, किंवा जीवाच्या मोक्षसाधनाचीं दोन बीजाक्षरेंच, किंवा सूर्यकुलाचीं कपाटेंच, किंवा कर्मकांडाचे दोन हस्तच, किंवा सेवाधर्माचे विमल नेत्रच होत.

भरत मुदित अवलंब लहे तें ।
अस सुख जस सिय राम रहे तें ।

रामचंद्रांनीं आपल्या पादुका दिल्यावर भरतास हर्ष वाटून अयोध्येंत सीतारामांनीं राहण्याचें जें सुख तेंच त्या पादुकांच्या लाभानें त्यास होऊं लागलें.

**दो०–माँगेउ बिदा प्रनामु करि राम लिये उर लाइ । लोग उचाटे अमरपति कुटिल कुअवसरु पाइ ॥ ३०५ ॥**

भरतानें आज्ञा मागितली आणि त्यानें प्रणाम करितांच रामांनीं त्यास उचलून हृदयाशीं कवटाळलें. ती नाजूक संधि साधून कुटिल इंद्रानें लोकांच्या मनाचें उच्चाटन केलें.

चौ०–सो कुचालि सब कहँ भइ नीकी ।
अवधिआस सम जीवनि जी की ।
न तरु लषन–सिय–राम–बियोगा ।
हहरि मरत सब लोग कुरोगा ।
रामकृपा अवरेब सुधारी ।
बिबुधधारि भइ गुनद गोहारी ।

इंद्राची ती कुचाळी सर्वांच्याच पथ्यावर पडली. चौदा वर्षेंपर्यंत लोकांचे प्राण जगण्याची आशा तिच्यामुळें उत्पन्न झाली. एर्‍हवीं सीतारामलक्ष्मणांच्या विरहरूप दुर्धर रोगानें सर्व लोकांनीं हळहळून प्राण सोडले असते. केवळ रामाच्याच कृपेमुळें हा अतिप्रसंग टळला आणि देवांचीं कारस्थानेंदेखील साहाय्यक आणि हितकारक झालीं.

भेंटत भुज भरि भाइ भरत सो ।
राम–प्रेम–रस कहि न परत सो ।
तन मन बचन उमग अनुरागा ।
धीर–धुरं–धर धीरज त्यागा ।
बारि–ज–लोचन मोचत बारी ।
देखि दसा सुरसभा दुखारी ।

राम भरताला आपल्या बाहूंनीं कवटाळून भेटले. त्या वेळचा रामाचा प्रेमरस वर्णन करणें शक्यच नाहीं. काया, वाचा आणि मन यांतून प्रेम उमगूं लागलें. धैर्यधुरंधरांचेंहि धारिष्ट पळालें आणि तेहि आपल्या नेत्रकमलांतून अश्रू ढाळूं लागले. तो हृदयद्रावक देखावा पाहून देवदेखील दुःखित झाले.

मुनिगन गुरु धुर धीर जनक से ।
ज्ञानअनल मन कसे कनक से ।
जे बिरंचि निरलेप उपाये ।
पदुमपत्र जिमि जग जलजाये ।

**दो०–तेउ बिलोकि रघुबर-भरत-प्रीति अनूप अपार । भये मगन मन तन बचन सहित बिराग बिचार ॥ ३०६ ॥**

ज्यांचीं मनें ज्ञानाग्नींत सुवर्णाप्रमाणें कसास लागलीं होतीं आणि ज्यांना जलांत उत्पन्न झालेल्या कमलपत्राप्रमाणें विधात्यानें जगांत निर्लेप उत्पन्न केलें होतें, असे वसिष्ठ, जनक यांच्या तोलाचे धैर्यधुरंधर मुनिगण देखील रामभरताचें अलौकिक आणि अपरंपार प्रेम पाहून आपापल्या विवेकवैराग्यानिशीं कायावाचामनेंकरून त्यांतच तल्लीन झाले.

चौ०–जहाँ जनक गुरु गति मति भोरी ।
प्राकृत प्रीति कहत बडि खोरी ।

बरनत रघुबर–भरत–बियोगू ।
सुनि कठोर कबि जानिहि लोगू ।
सो सकोच रस अकथ सुबानी ।
समउसनेह सुमिरि सकुचानी ।

जेथें जनक व वसिष्ठ यांच्या मतीची गति कुंठित झाली तें प्रेम प्राकृत मनुष्यानें वर्णन करणें ( किंवा त्या प्रेमास प्राकृत म्हणणें ) हें महन्मूर्खत्व होय. रामभरतांच्या वियोगाचें वर्णन ऐकतील तर ऐकणारे त्या कवीस कठोरच समजतील. एक तर ही लाज, आणि दुसरें तो रसच अनिर्वाच्य, म्हणून त्या वेळच्या प्रेमाचें स्मरण होतांच विलक्षण काव्यशक्ति देखील लाजूं लागते.

भेँटि भरत रघुबर समुझाये ।
पुनि रिपुदवन हरषि हिय लाये ।
सेवक सचिव–भरत–रुख पाई ।
निज निज काज लगे सब जाई ।

रघुवरांनीं भरतास भेटून त्याचें सांत्वन केलें आणि नंतर त्यांनीं आनंदानें शत्रुघ्नास हृदयाशीं कवटाळिलें. सचिव आणि भरत यांची आज्ञा घेऊन सर्व सेवकमंडळी जाऊन आपापल्या कार्यास लागली.

सुनि दारुनदुख दुहूँ समाजा ।
लगे चलन के साजन साजा ।
प्रभु–पद–पदुम बंदि दोउ भाई ।
चले सीस धरि रामरजाई ।
मुनि तापस बन देव निहोरी ।
सब सनमानि बहोरि बहोरी ।

तें ऐकून दोन्हीहि समाजांस अत्यंत दुःख झालें आणि ते जाण्याची तयारी करूं लागले. दोघेहि बंधु प्रभूंच्या चरणकमलांस वंदन करून आणि त्यांची आज्ञा शिरसावंद्य मानून मुनि, तापस व वनदेवता यांची प्रार्थना करून आणि वारंवार सर्वांचा सन्मान करून चालूं लागले.

**दो०-लषनहिँ भेँटि प्रनाम करि सिर धरि सिय-पद-धूरि । चले सप्रेम असीस सुनि सकल-सु-मंगल-मूरि ॥ ३०७ ॥**

ते लक्ष्मणास भेटले, सीतेस प्रणाम करून तिचे पदरज मस्तकावर धारण करते झाले आणि सर्व सुमंगलांचें निधान असे सीतेचे आशीर्वाद घेऊन प्रेमान्वित होत्साते चालूं लागले.

चौ०–सानुज राम नृपहि सिर नाई ।
कीन्हि बहुत बिधि बिनय बडाई ।
देव दयाबस बड दुख पायेउ ।
सहित समाज काननहिँ आयेउ ।
पुर पग धारिय देइ असीसा ।
कीन्ह धीर धरि गवन महीसा ।

लक्ष्मणासह रामांनीं राजाजनकास नमन केलें आणि अनेक प्रकारें त्यास आळवून विनंति केली कीं,—“ महाराज ! मजविषयींच्या आपल्या दयालुत्वामुळें आपण मंडळीसह अरण्यांत येऊन फारच कष्टी झालांत; आतां मला आपण आशीर्वाद देऊन आपले चरण आपल्या राजधानीला लावावे. ” तेव्हां राजाजनकहि धैर्य धरून परत फिरला.

मुनि महिदेव साधु सनमाने ।
बिदा किये हरि–हर–सम जाने ।
सासुसमीप गये दोउ भाई ।
फिरे बंदि पग आसिष पाई ।

मुनिजन, विप्रवृंद, संतसमाज यांना हरिहरतुल्य समजून आणि त्यांचा सन्मान करून रामांनीं त्यांनाहि निरोप दिला. दोघेहि बंधू सासवांकडे गेले आणि त्यांचें पदवंदन करून व त्यांचे आशीर्वाद घेऊन परतले.

कौसिक बामदेव जाबाली ।
परिजन पुरजन सचिव सुचाली ।
जथाजोग करि बिनय प्रनामा ।
बिदा किये सब सानुज रामा ।
नारि पुरुष लघु मध्य बडेरे ।
सब सनमानि कृपानिधि फेरे ।

कौशिक, वामदेव, जाबाली, परिजन, पुरजन आणि सज्जन ह्या सर्वांना रामलक्ष्मणांनीं विनयपूर्वक यथायोग्य प्रणाम करून निरोप दिला. बाल, तरुण आणि वृद्ध सर्व स्त्रीपुरुषांचा सन्मान करून कृपानिधीनें त्यांस परतविलें.

**दो०–भरत-मातु-पद-बंदि प्रभु सुचि सनेह मिलि भेँटि । बिदा कीन्हि सजि पालकी सकुच सोच सब मेँटि ॥३०८॥**

प्रभूंनीं कैकेयीचे चरणीं वंदन करून, शुद्ध प्रेमानें तीस वारंवार भेटून, तिचा सर्व संकोच आणि दुःख नाहींसें करून आणि तीस पालखींत बसवून तिची रवानगी केली.

चौ०—परिजन मातु पितहिँ मिलि सीता ।
फिरी प्रान-प्रिय-प्रेम पुनीता ।
करि प्रनाम भेँटी सब सासू ।
प्रीति कहत कबि हिय न हुलासू ।

प्राणवल्लभाच्या प्रेमानें पवित्र असलेली जानकी, माता, पिता आणि परिजन यांस आणि सर्व सासवांना प्रणामपूर्वक भेटून परतली. तिच्या प्रेमाचें वर्णन करण्यास कवीच्या मनास उल्हासच वाटत नाहीं.

सुनि सिख अभिमत आसिष पाई ।
रही सीय दुहुँ प्रीति समाई ।

( मातांचा व सासवांचा ) उपदेश ग्रहण करून आणि अभीष्ट आशीर्वचनें मिळवून सीता दोन्हीहि समाजांच्या प्रेमांत समाविष्ट होऊन राहिली.

रघुपति पटु पालकी मँगाई ।
करि प्रबोधु सब मातु चढाई ।
बार बार हिलि मिलि दुहुँ भाई ।
सम सनेह जननी पहुँचाई ।

रामचंद्रांनीं सुंदर पालख्या मागवून सर्व मातांचें समाधान करून त्यांना आंत बसविलें; आणि दोघांहि बंधूंनीं मातांशीं सारख्या प्रेमानें वारंवार मिळूनमिसळून त्यांस रवाना केलें.

साजि बाजि गज बाहन नाना ।
भूप भरतदल कीन्ह पयाना ।
हृदय राम सिय लखन समेता ।
चले जाहिँ सब लोग अचेता ।
बसह बाजि गज पसु हिय हारे ।
चले जाहिँ परबस मन मारे ।

गजाश्वादि नानाप्रकारचीं वाहनें सजवून जनक आणि भरत यांच्याकडील समाजानें तळ हालवून प्रयाण केलें. सर्व मंडळी रामलक्ष्मणान्वित हृदयानें जणुं अचेतन होऊन चालूं लागली. वृषभ, अश्व, गज हे पशूदेखील मनांत खिन्न होऊन केवळ परतंत्र म्हणून विमनस्कपणानें चालूं लागले.

**दो०—गुरु—गुरु—तिय—पद बंदि प्रभु सीता लषन समेत। फिरे हरष-बिसमय-सहित आये परननिकेत ॥ ३०९ ॥**

सीतालक्ष्मणांसह प्रभूंनीं वसिष्ठ व अरुंधती यांच्या चरणीं वंदन करून हर्षशोकान्वित होत्साते आपल्या पर्णकुटिकेप्रत परत आगमन केलें.

चौ०—बिदा कीन्ह सनमानि निषादू ।
चलेउ हृदय बड बिरह बिषादू ।
कोल किरात भिल्ल बनचारी ।
फेरे फिरे जोहारि जोहारी ।

नंतर त्यांनीं गुहासहि गौरवून रवाना केलें, तेव्हां विरहानें फारच त्रस्तचित्त होऊन तो जाऊं लागला. कोळी, पारधी, भिल्ल इत्यादि वनचरांनाहि निरोप दिला, तेव्हां ते जोहार करकरून परतले.

प्रभु सिय लषन बैठि बट छाहीँ ।
प्रिय—परिजन—बियोग बिलखाहीँ ।
भरत सनेह सुभाव सुबानी ।
प्रिया अनुज सन कहत बखानी ।
प्रीति प्रतीति बचन मन करनी ।
श्रीमुख राम प्रेमबस बरनी ।

सीता, राम आणि लक्ष्मण वटवृक्षाच्या छायेंत बसून प्रियपरिजनांच्या वियोगानें विवळूं लागले. रामचंद्र भरताच्या स्नेहस्वभावभाषणांचें सीतालक्ष्मणापाशीं वर्णन करूं लागले. भरताची प्रीति, विश्वास, भाषण, मन आणि आचरण ह्यांचें रामास फारच कौतुक वाटून तें ते श्रीमुखानें गाऊं लागले.

तेहि अवसर खग मृग जल मीना ।
चित्रकूट चर अचर मलीना ।
बिबुध बिलोकि दसा रघुबर की ।
बरषि सुमन कहि गति घर घर की ।
प्रभु प्रनाम करि दीन्ह भरोसो ।
चले मुदित मन डर न खरो सो ।

त्या वेळेस खग, मृग,जल, मीन इत्यादि चित्रकूटसंबंधीं चराचरजीव म्लान झाले. रघुवरांची ती अवस्था पाहून देवांनीं त्यांजवर फुलांचा वर्षाव केला आणि घरोघरीं असलेली संकटमय स्थिति त्यांना निवेदन केली. प्रभूंनीं देवांना प्रणाम करून आश्वासन दिलें. तेव्हां ते अगदीं निर्भय होऊन प्रसन्नचित्तानें चालते झाले.

**दो०—सानुज सीयसमेत प्रभु राजत परनकुटीर । भगति ज्ञान बैराग जनु सोहत धरे सरीर ॥ ३१० ॥**

प्रभु सस्त्रीक आणि सानुज पर्णकुटींत विराजित असतां जणुंकाय मूर्तिमंत ज्ञान, भक्ति आणि वैराग्य याप्रमाणें शोभूं लागले.

चौ०–मुनि महिसुर गुरु भरत भुआलू।
रामबिरह सब साज बिहालू।
प्रभु–गुन–ग्राम गुनत मन माहीँ।
सब चुपचाप चले मग जाहीँ।

इकडे मुनिजन, विप्र, वसिष्ठ, भरत, जनक इत्यादि मंडळी रामविरहानें व्याकुळ होऊन प्रभूंच्या गुणग्रामाचें मनांत चिंतन करीत मार्गानें मुकाट्यानें चालूं लागली.

जमुना उतरि पार सब भयऊ।
सो बासर बिनु भोजन गयऊ।
उतरि देवसरि दूसर बासू।
रामसखा सब कीन्ह सुपासू।
सई उतरि गोमती नहाये।
चौथे दिवस अवधपुर आये।

मंडळी यमुना उतरून पार गेली. तो दिवस भोजनावांचूनच गेला. त्यांनीं गंगा उतरून दुसरा मुक्काम केला. गुहानें सर्व व्यवस्था ठेवली. शरयू उतरून गोमतीचें स्नान करून मंडळी चवथे दिवशीं अयोध्येस आली.

जनक रहे पुर बासर चारी।
राज काज सब साज सँभारी।
सौँपि सचिव गुरु भरतहि राजू।
तिरहुति चले साजि सब साजू।

अयोध्येंत जनक चार दिवस राहिले आणि त्यांनीं राजकारणाची सर्व निरवानिरव केली. सचिव, वसिष्ठ आणि भरत यांचेवर कारभार सोंपवून जनक आपल्या सर्व लवाजम्यानिशीं आपल्या राजधानीला चालते झाले.

नगर–नारि–नर गुरु सिख मानी।
बसे सुखेन राम–रज–धानी।

नागरिक स्त्रीपुरुष वसिष्ठांची आज्ञा मानून रामाच्या राजधानींत राहूं लागले.

**दो०–रामदरस लगि लोग सब करत नेम उपवास। तजि तजि भूषन भोग सुख जियत अवधि की आस ॥ ३११ ॥**

रामदर्शनाप्रीत्यर्थ सर्व लोक नियम आणि उपवासादिव्रतें करून आणि भूषणें, भोग आणि विलास यांचा पूर्ण त्याग करून केवळ रामविरहावधीच्या आशेनें जीव धरून राहिले.

चौ०–सचिव सुसेवक भरत प्रबोधे।
निज निज काज पाइ सिख ओधे।
पुनि सिख दीन्हि बोलि लघु भाई।
सौँपी सकल मातुसेवकाई।

सचिव आणि स्वामिनिष्ठ सेवक यांचें भरतानें समाधान केलें. ते आपल्या कामावर रुजू होऊन भरताची आज्ञा पाळूं लागले. नंतर भरतानें शत्रुघ्नास बोलावून त्यास बोध केला आणि त्याजकडे सर्व मातांची सेवा सोंपाविली.

भूसुर बोलि भरत कर जोरे।
करि प्रनाम बरबिनय निहोरे।
ऊँच नीच कारज भल पोचू।
आयसु देब न करब सँकोचू।

भरतानें विप्रमंडळी बोलाविली आणि हात जोडून प्रणाम करून, शुद्ध विनयानें त्यांची प्रार्थना केली कीं, " उंचनीच, बरेंवाईट कांहींहि कार्य असलें तरी त्यासंबंधानें आज्ञा करण्यास आपण मात्र संकोच मानूं नये. "

परिजन पुरजन प्रजा बोलाये।
समाधान करि सुबस बसाये।

नंतर परिजन, पुरजन आणि प्रजा यांना बोलावून भरतानें त्यांचें समाधान केलें आणि त्यांची सुयंत्रित व्यवस्था केली.

सानुज गे गुरुगेह बहोरी।
करि दंडवत कहत कर जोरी।
आयसु होइ त रहउँ सनेमा।
बोले मुनि तन पुलकि सप्रेमा।
समुझब कहब करब तुम्ह जोई।
धरमसारु जग होइहि सोई।

नंतर भरत शत्रुघ्नास घेऊन गुरुगृहाप्रत गेला आणि दण्डवत घालून हात जोडून म्हणाला कीं, " आपली आज्ञा होईल तर मीहि नियमव्रतानें राहीन. " तेव्हां वसिष्ठ प्रेमपुलकितगात्र होत्सातें म्हणाले:—" जगांत जें धर्माचें सार असेल तेंच तूं मनांत आणशील, तेंच बोलशील आणि त्याचप्रमाणें करशील.[१] "

१ 'तुझ्या चित्तांत ठसेल, तूं म्हणशील आणि करशील तेंच ह्या जगांत धर्माचें सार मानलें जाईल' असाहि अर्थ होऊं शकेल. हा अर्थ विशेष जोरदार आणि प्रशस्तिपर दिसतो.

**दो०—सुनि सिख पाइ असीस बडि गनक बोलि दिन साधि। सिंहासन प्रभु-पादुका बैठारे निरुपाधि ॥ ३१२ ॥**

तें ऐकून आणि गुरूंचा उपदेश आणि महदाशीर्वाद घेऊन भरतानें ज्योतिषी बोलाविले आणि सुमुहूर्त साधून प्रभूंच्या पादुका अनन्यभावानें सिंहासनावर प्रस्थापित केल्या.

चौ०—राममातु गुरुपद सिरु नाईं।
प्रभु-पद-पीठ-रजायसु पाई।
नंदिगाँव करि परनकुटीरा।
कीन्ह निबास धरम-धुर-धीरा।

भरतानें सर्व मातांना आणि गुरुचरणांना वंदन करून आणि प्रभूंच्या चरणपादुकांची आज्ञा घेऊन, नंदिग्रामांत एक पर्णकुटी उभारली आणि तेथें तो धर्मधुरंधर राहूं लागला.

जटाजूट सिर मुनिपट धारी।
महि खनि कुससाथरी सवाँरी।
असन बसन बासन व्रत नेमा।
करत कठिन रिषिधरम सप्रेमा।
भूषन बसन भोग सुख भूरी।
मन तन बचन तजे तृन तूरी।

त्यानें मस्तकावर जटा वाढविल्या, मुनिवस्त्रांचें परिधान केलें, पृथ्वींत विवर कोरून तेथें दर्भासन घातलें, खाद्य, वस्त्र, पात्र, यांच्यासंबंधानें व्रतनियम आरंभिले, आणि अशा रीतीनें प्रेमपुरःसर तो दुर्धर मुनिव्रत पालन करूं लागला. अलंकार, वस्त्रें आणि भोगविलास ह्यांचा त्यानें कायावाचामनेंकरून तृणवत् त्याग केला.

अवधराज सुरराज सिहाई।
दसरथधन सुनि धनद लजाई।
तेहि पुर बसत भरत बिनु रागा।
चंचरीक जिमि चंपक बागा।
रमाबिलास रामअनुरागी।
तजत बमन जिमि जन बडभागी।

अयोध्येंतील राज्याचे देवेंद्रदेखील पोवाडे गाऊं लागला. दशरथाची संपत्ति ऐकून कुबेरास देखील लाज वाटली. भ्रमर जसा चंपकवनांत रहातो तद्वत भरत त्या अयोध्यानगरींत अनासक्त होत्साता राहूं लागला. रामाचें ठायीं अनुरक्त होऊन लक्ष्मीच्या विलासांचा जे वमनाप्रमाणें त्याग करितात तेच भक्त महाभाग होत.

**दो०—राम-प्रेम-भाजन भरत बडे न यहि करतूति। चातक हंस सराहियत टेक बिबेक बिभूति ॥ ३१३ ॥**

रामाच्या प्रेमाचें अधिष्ठान अशा त्या भरताची ही कृति ह्मणजे मोठेंसें आश्चर्य नव्हे. ( स्वातिबिंदुपान-विषयक ) स्थिर निश्चय आणि (नीरक्षीरविवेकात्मक) सदसद्विवेक ह्या गुणवैशिष्यामुळेंच चातक आणि हंस यांची नेहमीं प्रशंसा होत असते. ( भाव हा कीं प्रभुसत्तेनें मनोनिग्रह आणि विवेक हे जर चातकहंसा-सारख्या पक्ष्यांत आढळून येतात तर भरतासारख्या मानवी प्राण्यांत, आणखी रामाला अत्यंत प्रिय अशा व्यक्तींत, वैराग्य व विवेक जरी अमर्याद आढळले तरी त्यांत मोठेंसें नवल तें काय ? )

चौ०—देह दिनहुँ दिन दूबरि होई।
घट न तेज बल मुखछबि सोई।
नित नव राम-प्रेम-पनु पीना।
बढत धरमदल मन न मलीना।
जिमि जल निघटत सरद प्रकासे।
बिलसत बेत सवनज बिकासे।

शरत्काल प्राप्त झाला असतां ज्याप्रमाणें पाण्यास ओहटी लागते, परंतु कमळें आणि वेत हे वाढीला लागतात आणि फुलतात, तद्वत् भरताचा देह दिवसानुदिवस जरी अशक्त होऊं लागला तरी त्याची मुखश्री जशीच्या तशीच राहून त्याचें तेज आणि बळ हे वृद्धिंगत होऊं लागले. तो नित्य नवीन रामप्रेमाच्या निर्धारानें पुष्ट होऊं लागला.त्याच्या धर्मरूप दळाची वाढ होऊं लागली आणि त्याचें मन प्रसन्न होऊं लागलें.

सम दम संजम नियम उपासा।
नखत भरत हिय बिमल अकासा।
ध्रुव बिस्वासु अवधि राका सी।
स्वामिसुरति सुरबीथि बिकासी।
राम-प्रेम-बिधु अचल अदोखा।
सहित समाज सोह नित चोखा।

भरताच्या शुद्ध हृदयाकाशांत शम, दम, संयम, नियम, उपवास हीं नक्षत्रें, विश्वास हा ध्रुवाचा तारा, चतुर्दशसंवत्सरपरिमित अवधिरूप शशिकला आणि स्वामिस्मरणरूप आकाशगंगा झळकूं लागली आणि

रामप्रेमरूप अक्षय्य आणि निर्दोष चंद्रमा तारागणासह अखंड दैदीप्यमान असा शोभूं लागला.

भरत रहानि समुझनि करतूती ।
भगति बिरति गुन बिमल बिभूती ।
बरनत सकल सुकबि सकुचाहीं ।
सेस-गनेस-गिरा-गमु नाहीं ।

भरताचा आचार, विचार, व्यवहार, भक्ति, विरक्ति, गुण इत्यादि विमल ऐश्वर्याचें वर्णन करण्यास सर्व थोर कवीदेखील संकोचतात. कारण शेष, गणेश आणि सरस्वती यांना देखील त्याचें गम्य नाहीं.

**दो०–नित पूजत प्रभुपावँरी प्रीति न हृदय समाति। माँगि माँगि आयसु करत राजकाज बहु भाँति ॥ ३१४ ॥**

त्याचें हृदयांत प्रेम माईनासें होऊन नित्य प्रभूच्या पादुकांचें पूजन करावें आणि त्यांची आज्ञा मागमागून हरतऱ्हेचें राजकारण करावें.

चौ०–पुलक गात हिय सिय रघुबीरू ।
जीह नाम जप लोचन नीरू ।
लषन राम सिय कानन बसहीं ।
भरत भवन बसि तप तनु कसहीं ।
दोउ दिसि समुझि कहत सब लोगू ।
सब बिधि भरत सराहन जोगू ।
सुनि ब्रत नेम साधु सकुचाहीं ।
देखि दसा मुनिराज लजाहीं ।

देहांवर रोमांच, हृदयांत सीतारामर्मूर्ति, जिव्हाग्रीं रामनामाचा जप आणि नेत्रांत अश्रु अशी भरताची स्थिति होती. राम, लक्ष्मण आणि जानकी हे वनांत राहून तपानें देह कष्टवीत होते, परंतु भरत हा घरीं राहूनच तें करी. दोन्ही पक्षीं तुलना करून लोक म्हणत कीं, भरत हाच सर्व रीतीनें प्रशंसनीय होय. त्याचें व्रतनियमादि श्रवण करून संतमंडळीहि लाजत आणि त्याच्या अंगीं बाणलेला निर्धार पाहून मुनिराजदेखील ओशाळत असत.

परमपुनीत भरतआचरनू ।
मधुर–मंजु–मुद–मंगल–करनू ।
हरन कठिन कलि-कलुष–कलेसू ।
महा-मोह-निसि दलन दिनेसू ।
पाप–पुंज–कुंजर–मृग–राजू ।
समन सकल–संताप–समाजू ।
जनरंजन भंजन भवभारू ।
रामसनेह सुधाकरसारू ।

मधुर, सुंदर आणि परमपवित्र असें तें भरताचें आचरण, आनंद आणि मंगल यांना देणारें होय. तें दुर्धर कलिसंबंधीं पापांचा आणि दुःखांचा पूर्ण ऱ्हास करणारें असून गाढ मोहरूप रात्रीचें निर्दालन करणाऱ्या सूर्यासारखें आहे. तें पापरूप कुंजराला मृगराजाप्रमाणें असून सर्व संतापसमुच्चयाचें शमन करणारें आहे. तें जनांचें रंजन करणारें, भवभाराचें भंजन करणारें असून रामप्रेमरूप सुधाकराचें ( चंद्राचें ) सत्व ( अमृत ) आहे.

**छंद–सिय-राम-प्रेम-पियूष-पूरत होत जनम न भरत को । मुनि-मन-अगम जम नियम सम दम बिषम ब्रत आचरत को । दुखदाह दारिद दंभ दूषन सुजस मिस अपहरत को । कलिकाल तुलसी से सठन्हि हठि रामसनमुख करत को १३।**

सीतारामांच्या प्रेमामृतानें पूर्ण अशा भरताचा जन्मच जर झाला नसता तर मुनींच्या मनाला देखील अगम्य अशीं, यम, नियम, शम, दम, इत्यादि दुर्धर व्रतें कोण आचरण करिता ? दुःखाग्नि, दारिद्र्य, दंभ इत्यादि दोषांचें आपल्या सद्यशाच्या मिषानें कोणीं निवारण केलें असतें ? आणि ह्या कलिकालांत तुलसीदासासारख्या शठांना बळजबरीनें रामासमोर कोणीं नेऊन उभें केलें असतें ? [1]

**सो०–भरतचरित करि नेम तुलसी जो सादर सुनहिं । सीय–राम–पद–प्रेम अवसि होइ भव रस-बिरति ॥ १३ ॥**

तुलसीदास म्हणतातः—भरताचें चरित्र नियमपूर्वक जो कोणी आदरभावानें श्रवण करील तो भवरसापासून विरक्तच होऊन अवश्यमेव सीतारामचरणीं प्रेम करील.

१ या उक्तीवरून तर्क होऊं शकतो कीं श्रीगुसांईजींस श्रीरामाचें प्रत्यक्ष दर्शन अयोध्याकांडाची रचना संपल्यानंतर झालें असलें पाहिजे.

॥ इति श्रीरामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने विमलविज्ञानवैराग्यसम्पादनो नाम द्वितीयः सोपानः समाप्तः ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

। श्रीजानकीवल्लभो विजयते ।

# ॥ रामचरितमानस ॥

## अर्थात्

## ॥ श्रीतुलसीरामायण ॥

( मराठी भाषांतरासहित. )

# ( तृतीय सोपान )

( अरण्यकाण्ड )

श्लोकाः ।

**मूलं धर्मतरोर्विवेकजलधेः पूर्णेन्दुमानन्ददं**
**वैराग्याम्बुजभास्करं ह्यघघनध्वान्तापहं तापहम् ।**
**मोहाम्भोधरपूगपाटनविधौ श्वासं भवं शङ्करं**
**वन्दे ब्रह्मकुलं कलङ्कशमनं श्रीरामभूपप्रियम् ।१।**

धर्मरूपी तरूचें मूल, विवेकसागराला उल्लसित करणारा पूर्ण चंद्र, वैराग्यपंकजाला विकसित करणारा सूर्य, पापरूपी घोर अंधकार निरस्त करणारा, त्रिताप हरण करणारा, मोहरूपी मेघपटलास वायुवत् विच्छिन्न करणारा, परब्रह्मीं अखंड लीन असणारा, कलंकास धुणारा असा जो रामभूपप्रिय शंकर त्यास माझा नमस्कार असो.

**सान्द्रानन्दपयोदसौभगतनुं पीताम्बरं सुन्दरं**
**पाणौ बाणशरासनं कटिलसत्तूणीरभारं वरम् ।**
**राजीवायतलोचनं धृतजटाजूटेन संशोभितं**
**सीतालक्ष्मणसंयुतं पथिगतं रामाभिरामं भजे ।२।**

सुंदर खूप गहन्या नीलमेघाप्रमाणें ज्याची शरीरकांति रमणीय आहे, ज्यानें पीतांबर धारण केला आहे, जो सौंदर्यशाली असून ज्याच्या हस्ताचे ठायीं चापबाण शोभत आहेत, ज्याच्या कमरेला उत्कृष्ट भाते विलसत आहेत, ज्याचे नेत्र दीर्घ असून कमलाप्रमाणें आहेत, मस्तकीं धारण केलेल्या जटाजूटामुळें जो अत्यंत शोभत आहे, असा सीता आणि लक्ष्मण यांचेसह दरवेशी बनलेला जो सीताभिराम श्रीरामचंद्र त्यास मी शरण आहे.

**सो०–उमा रामगुन गूढ पंडित मुनि पावहिँ बिरति । पावहिँ मोह बिमूढ जे हरि-बिमुख न धरमरति ॥ १ ॥**

( शंकर सांगतात ) हे पार्वति ! रामचंद्राचे गुण गूढ आहेत. त्यांच्या समालोचनेनें पंडित आणि मुनी ह्यांना वैराग्यप्राप्ति होते, आणि ज्यांची धर्मावर श्रद्धा नाहीं आणि जे हरिविमुख आहेत अशा अत्यंत मूढांना मात्र मोह उत्पन्न होतो.

**चौ०–पुर–नर–भरत–प्रीति मैं गाई ।**
**मतिअनुरूप अनूप सुहाई ।**
**अब प्रभुचरित सुनहु अतिपावन ।**
**करत जे बन सुर–नर–मुनि–भावन ।**

पुरजन आणि भरत ह्यांचें प्रभूंविषयीं असलेलें अनुपम आणि स्पृहणीय प्रेम मीं यथामति वर्णन केलें. आतां सुर, नर आणि मुनि ह्यांच्या सुखसंतोषासाठीं प्रभूनें अरण्यांत जीं अत्यंत पावन चारित्रें केलीं तीं श्रवण कर.

**एक बार चुनि कुसुम सुहाये ।**
**निज कर भूषन राम बनाये ।**
**सीतहि पहिराये प्रभु सादर ।**
**बैठे फटिकसिला पर सुंदर ।**

एके समयीं सुंदरशीं फुलें वेंचून आणि त्यांचीं स्वहस्तानें लेणीं गुंफून तीं रामचंद्रांनीं सीतेच्या अंगावर अत्यंत प्रेमानें घातलीं. त्या वेळीं ते सुंदर अशा स्फटिकशिलेवर बसले होते.

सुर–पति–सुत धरि बायस बेखा।
सठ चाहत रघु–पति–बल देखा।
जिमि पिपीलिका सागर थाहा।
महा-मंद-मति पावन चाहा।

ज्याप्रमाणें मुंगीनें समुद्राचा ठाव घेण्याची हाव धरावी, तद्वत् महामंदमती इंद्रपुत्र जयंत कावळा बनून रामचंद्राचें सामर्थ्य अजमावण्याची इच्छा करूं लागला.

सीताचरन चोँच हति भागा।
मूढ मंदमति कारन कागा।
चला रुधिर रघुनायक जाना।
सींक–धनुष–सायक संधाना।

त्या उल्लूच्या कांद्यानें सीतेच्या चरणांस चोंच मारून तो पळून गेला तेव्हां त्यांतून रक्त वाहूं लागलें. तें पाहून रामांनीं एका तनसडीचें धनुष्य केलें, आणि त्यावर तसलाच बाण लावला.

**दो०–अतिकृपाल रघुनायक सदा दीन पर नेह। ता सनु आइ कीन्ह छल मूरख अवगुनगेह ॥ १ ॥**

रघुनायक अत्यंत कृपाळु व दीनांवर निरंतर प्रेम करणारे होत. परंतु त्यांना देखील त्या बेअक्कल काफरानें मुद्दाम सतावलें.

चौ०–प्रेरितमंत्र ब्रह्मसर धावा।
चला भाजि बायस भय पावा।
धरि निजरूप गयउ पितु पाहीँ।
रामबिमुख राखा तेहि नाहीँ।

मंत्राची प्रेरणा होतांच तो ब्रह्मशर सणसणून निघाला. लगेच वायस भयभीत होऊन उधळत सुटला, व आपलें मूलस्वरूप धारण करून इंद्राकडे गेला. परंतु तो रामद्रोही जाणून त्याचें रक्षण इंद्राच्यानें करवलें नाहीं.

भा निरास उपजी मन त्रासा।
जथा चक्रभय रिषि दुर्वासा।
ब्रह्मधाम सिवपुर सब लोका।
फिरा स्रमित ब्याकुल भय सोका।

तो निराश झाला व तेथून तो सत्यलोक, कैलास इत्यादि सर्व लोकांत भय व शोक यांनीं व्याकुळ होऊन भ्रमण करूं लागला असतां त्यास सुदर्शन चक्राच्या भयानें ग्रासलेल्या दुर्वास ऋषीप्रमाणें मनांत अतिशयच खेद उत्पन्न झाला.

काहू बैठन कहा न ओही।
राखि को सकइ राम कर द्रोही।

परंतु त्यास नुसतें 'बैस' असें देखील कोणी म्हटलें नाहीं कारण रामाच्या दुष्मनास पाठीशीं घालण्याची छाती कोणास होणार?

मातु मृत्यु पितु समनसमाना।
सुधा होइ बिष सुनु हरिजाना।
मित्र करइ सतरिपु कै करनी।
ता कहँ बिबुधनदी बैतरनी।
सब जग तेहि अनलहु तेँ ताता।
जो रघु-बीर-बिमुख सुनु भ्राता।

गरुडा ! ऐक. रामशत्रूस त्याची साक्षात् आई देखील प्रत्यक्ष मृत्यु बनते, पिता यमाप्रमाणें होतो, अमृत विष बनतें, (एक) मित्र शंभर शत्रूंची करणी करूं लागतो व गंगानदी त्यास वैतरणी बनते. एवंच हे तात ! सर्व ब्रह्मांड रामविमुखास अग्नीप्रमाणें भासतें हें, हे बंधो ! ध्यानांत ठेव.

**दो०–जिमि जिमि भाजत सक्रसुत व्याकुल अतिदुखदीन। तिमि तिमि धावत रामसर पाछे परम प्रबीन ॥ २ ॥**

दुःखानें दीन आणि अत्यंत व्याकुल होत्साता जयंत जसजसा पळत होता तसतसा रामबाण फारच चापल्यानें त्याची लागदाट करीत होता.

चौ०–नारद देखा बिकल जयंता।
लागि दया कोमलचित संता।
पठवा तुरत राम पहिँ ताही।
कहेसि पुकारि प्रनतहित पाही।
आतुर सभय गहेसि पद जाई।
त्राहि त्राहि दयाल रघुराई।

जयंताला दुःखित पाहून नारदांना त्याची करुणा आली; कारण संतांचें अंतःकरण फार कोवळें असतें. "हे शरणागतवत्सला ! माझें रक्षण करा" अशी प्रार्थना करण्याचें शिकवून नारदांनीं लागलींच त्याला रामाकडे पाठविलें. तेव्हां "दयाळो रामा ! त्राहि

त्राहि '' असें ह्मणून त्यानें आतुरतेनें पण भीत भीत रामाचे पाय धरिले.

अ-तुलित-बल अ-तुलित-प्रभुताई ।
मैँ मतिमंद जानि नहिँ पाई ।
निज कृत करमजनित फल पायउँ ।
अब प्रभु पाहि सरन तकि आयउँ ।

तो ह्मणाला, आपलें अतुलित बल आणि असाधारण प्रभाव मला मतिमंदाला जाणतां आला नाहीं. आपल्या कर्मांचें फळ मी भोगून चुकलों.प्रभो ! आतां माझें रक्षण करावें. जाणून आतां आपणांस मी शरण आलों आहे.

सुनि कृपाल अति-आरत-बानी ।
एक नयन करि तजा भवानी ।

( शंकर म्हणतात ) हे भवानी, त्याची ती अति आर्तवाणी ऐकून दयाघन रामचंद्रांनीं त्यास एकाक्ष करून सोडून दिलें.

## सो०—कीन्ह मोह बस द्रोह जद्यपि तेहि कर बध उचित । प्रभु छाडेउ करि छोह को कृपाल रघु-बीर-सम ॥ २ ॥

मोहवश होऊन द्रोह केल्यामुळें जरी तो वधार्ह होता तरी प्रभूंनीं त्यास दया करून सोडून दिलें. रघुवीरासारखा दयाळु अन्य कोण आहे बरें ?

चौ०—रघुपति चित्रकूट बसि नाना ।
चरित किये स्रुति सुधासमाना ।
बहुरि राम अस मन अनुमाना ।
होइहि भीर सबहिँ मोहि जाना ।

चित्रकूटावर राहून श्रवण करण्यास अमृततुल्य अशीं अनेक चरित्रें रामांनीं केलीं. नंतर त्यांच्या मनानें घेतलें कीं, सर्वांनीं ओळखलें असल्यामुळें यापुढें लोकांची तेथें फार गर्दी उसळणार.

सकल मुनिन्ह सन बिदा कराई ।
सीतासहित चले दोउ भाई ।
अत्रि के आस्रम जब प्रभु गयऊ ।
सुनत महामुनि हरषित भयऊ ।

म्हणून सर्व मुनींची आज्ञा घेऊन सीतेसह ते उभय बंधु जाऊं लागले. प्रभु सुरूंसच अत्रिऋषींच्या आश्रमाला गेले, तेव्हां त्यांचें आगमन ऐकून महर्षि प्रसन्न झाले.

पुलकितगात अत्रि उठि धाये ।
देखि रामु आतुर चलि आये ।
करत दंडवत मुनि उर लाये ।
प्रेमबारि दोउ जन अन्हवाये ।

पुलकितगात्र होत्सातें अत्रिऋषी लगबगीनें चालूं लागले. त्यांस पाहून राम झपाझप चालत गेले. रामलक्ष्मणांनीं त्यांस दंडवत घातलें. मुनिवर्यांनीं त्यांस आलिंगन देऊन प्रेमाश्रूनें दोघांसहि न्हाऊं घातलें.

देखि रामछबि नयन जुडाने ।
सादर निज आस्रम तब आने ।
करि पूजा कहि बचन सुहाये ।
दिये मूल फल प्रभु मन भाये ।

रामरूप पाहतांच ऋषींचे नेत्र तृप्त झाले. नंतर त्यांनीं त्यांस आदरानें आपल्या आश्रमांत आणून त्यांची पूजा केली आणि अत्यंत आर्जवानें त्यांस फलमूलादिक अर्पण केले. तेणेंकरुन प्रभूस संतोष झाला.

## सो०—प्रभु आसन आसीन भरि लोचन सोभा निरखि । मुनिबर परम प्रबीन जोरि पानि अस्तुति करत ॥ ३ ॥

आसनावर विराजमान झालेल्या प्रभूंची शोभा डोळे भरून पाहून परमप्रवीण मुनिवर्य हात जोडून स्तुति करूं लागले.

छंद—नमामि भक्तवत्सलं कृपालु-शील-कोमलम् ।
भजामि ते पदाम्बुजं अकामिनां स्वधामदम् ॥
निकाम-श्याम-सुन्दरं भवाम्बु-नाथ-मन्दरम् ।
प्रफुल्ल-कञ्ज-लोचनं मदादि-दोष-मोचनम् ॥

हे कृपालो ! ज्याचा स्वभाव व शील कोमल असून जो भक्तवत्सलहि आहे अशा तुला मी वंदन करितों. निष्कामसेवकास निजधामाची प्राप्ति करून देणारें असें जें तुझें पदकमल तेंच मी माझें दैवत मानतों. भवरूप समुद्राचें मंथन करणारा मंदर, मदादि षड्विकारांपासून सोडविणारा, अशा प्रफुल्लकमलनेत्र आणि निकामश्यामसुंदराला मी वंदन करितों.

प्रलम्ब-बाहु-विक्रमं प्रभोऽप्रमेयवैभवम् ।
निषङ्ग-चाप-सायकं धरं त्रि-लोक-नायकम् ।
दिनेश-वंश-मण्डनं महेश-चाप-खण्डनम् ।
मुनीन्द्र-सन्त-रञ्जनं सुरारि-वृन्द-भञ्जनम् ।

हे प्रभो ! तुझा बाहुपराक्रम विशाल आहे. तुझें

वैभव अप्रमेय आहे. भाते, चाप आणि बाण धारण करणारा, सर्व सृष्टीस सांभाळणारा, त्रैलोक्याचा स्वामी सूर्यकुलाचें भूषण, भवचापाचा भंग करणारा, मुनीश्वर आणि संत यांना आनंदविणारा, दैत्यकुलाचा नाश करणारा ( असा जो तूं त्याला माझें नमन असो. )

मनोज–वैरि–वन्दितं अजादि–देव–सेवितम् ।
विशुद्ध–बोध–विग्रहं समस्तदूषणापहम् ।
नमामि इन्दिरापतिं सुखाकरं सतां गतिम् ।
भजे सशक्ति–सानुजं शची–पति–प्रियानुजम् ।

मदनारी शंकर ज्याला वंदन करितात, ब्रह्मादिक देव ज्याची सेवा करितात, विशुद्धज्ञानस्वरूप, सर्व पातकांना निरस्त करणारा, इंदिरेचा पति, सुखनिधान, संतांना सद्गति देणारा, इंद्राचा प्रियकर कनिष्ठ बंधु, असा जो तूं त्या तुला तुझ्या शक्ती–( सीते ) सहित आणि लक्ष्मणासहित मी वंदन करितों.

त्वदङ्घ्रिमूल ये नरा भजन्ति हीनमत्सराः ।
पतन्ति ते भवार्णवे वितर्क–वीचि–सङ्कुले ।
विविक्तवासिनस्सदा भजन्ति मुक्तये मुदा ।
निरस्य इन्द्रियादिकं प्रयान्ति ते गतिं स्वकाम् ।

निरहंकार होऊन जे नर तुझ्या पदतलीं लीन होतात ते मोहरूप लाटांनीं संक्षुब्ध असलेल्या भवसागरांत पडत नाहींत. जे एकांतसेवन करून सदोदित आनंदानें भवमुक्तीसाठीं तुझें भजन करितात ते इंद्रियादिकांचा ( तज्जन्य जन्ममरणमूल सुखदुःखांचा ) ऱ्हास करून आत्मप्राप्ति करून घेतात.

त्वमेकमद्भुतं प्रभुं निरीहमीश्वरं विभुम् ।
जगद्गुरुं च शाश्वतं तुरीयमेव केवलम् ।
भजामि भाववल्लभं कुयोगिनां सुदुर्लभम् ।
स्व–भक्त–कल्प–पादपं समं सुसेव्यमन्वहम् ।

हे प्रभो ! तूं अद्वितीय, अद्भुत, निष्काम, ईश्वर, व्यापक, जगद्गुरु, अवस्थातीत, केवल तुरीयस्वरूप, भक्तिप्रिय, दुर्बुद्धि जनांना दुष्प्राप्य, स्वभक्तांचा कल्पवृक्ष, समदर्शी, सज्जनसेवित असा आहेस; तुला माझें वंदन असो.

अनूप–रूप–भूपतिं नतोऽहमुर्विजापतिम् ।
प्रसीद मे नमामि ते पदाब्जभक्ति देहि मे ।
पठन्ति ये स्तवं इदं नरादरेण ते पदम् ।
व्रजन्ति नात्र संशयः त्वदीयभक्तिसंयुताः ।

अनुपम रूपशाली भूपति व सीतापति त्या तुला मी शरण आहे; मजवर प्रसन्न हो. मी तुला नमन करितों. तुझ्या चरणकमलाची भक्ति मला दे. जे नर ह्या स्तोत्राचें श्रद्धापूर्वक पठन करितील ते तुझ्या भक्तीनें युक्त होऊन तुझ्या पदाप्रत निःसंशय जातील.

**दो०–विनती करि मुनि नाइ सिरु कह कर जोरि बहोरि । चरनसरोरुह नाथ जनि कबहुँ तजइ मति मोरि ॥ ३ ॥**

मुनींनी ह्याप्रमाणें स्तव करून मस्तक नमविलें व पुन्हां हात जोडून ते म्हणाले, हे नाथ ! आपल्या चरणारविंदापासून माझ्या बुद्धीनें कधींहि चळूं नये.

चौ०–अनसूया के पद गहि सीता ।
मिली बहोरि सुसील बिनीता ।
रिषि–पतिनी–मन सुख अधिकाई ।
आसिष देइ निकट बैठाई ।
दिव्य बसन भूषन पहिराये ।
जे नित नूतन अमल सुहाये ।

सुशील व नम्र सीतेनें अनसूयेचे चरण धरिले, व पुनःपुन्हां ती तिला भेटली. अनसूयेस विशेषच आनंद झाला, व तिनें आशीर्वाद देऊन सीतेस जवळ बसविलें. तिनें नित्य नवीन, विमल आणि सुंदर अशीं दिव्य वस्त्रें आणि अलंकार सीतेस लेवविले.

कह रिषिबधू सरस मृदु बानी ।
नारिधरम कछु ब्याज बखानी ।
मातु–पिता–भ्राता–हित–कारी ।
मितप्रद सब सुनु राजकुमारी ।
अमितदानि भर्ता बैदेही ।
अधम सो नारि जो सेव न तेही ।

अनसूया रसाळ आणि मृदु वाणीनें बोलूं लागली. बोलतां बोलतां कांहीं एका निमित्तानें ती स्त्रीधर्माचें प्रतिपादन करूं लागली. ती म्हणाली, हे राजकुमारी सीते ! ऐक. माता, पिता व भ्राता हे हितकर्ते तर खरेच; परंतु त्या सर्वांपासून होणाऱ्या हिताला कांहींहि

१ ह्या 'निर्मत्सर' शब्द भागवतांतल्या 'धर्मः प्रोज्झितकैतवो......निर्मत्सराणां सताम्,' ( १.१.२ ) मधल्याप्रमाणें दिसतो. त्याचा अर्थ निरहंकार घ्यावा लागतो तो असाः—मयि अहंकारे सरन्ति प्रभवन्ति क्रीडन्ति वा ते मत्सराः षड्विकाराः । निर्गताः हीनाः मत्सराः येषां ते। म्हणून हा मूलगामी अर्थ आम्ही घेतला आहे.

झालें तरी सीमा असतेच. हे जानकि ! स्त्रीस अमित सुख देणारा असा तिचा एक भर्ताच आहे. त्याची सेवा न करणारी स्त्री अधम समजावी.

धीरजु धरम मित्र अरु नारी ।
आपदकाल परखियहि चारी ।

धैर्य, धर्म, मित्र आणि भार्या या चौघांची परीक्षा आपत्कालीं होत असते.

बृद्ध रोगबस जड धनहीना ।
अंध बधिर क्रोधी अतिदीना ।
ऐसेहु पति कर किये अपमाना ।
नारि पाव जमपुर दुख नाना ।

वृद्ध, रोगग्रस्त, बुद्धिहीन, अंध, बधिर, क्रोधी, अत्यंत दीन, अशादेखील पतीचा अपमान करणारी स्त्री यमलोकीं नानाप्रकारचीं दुःखें भोगणारच.

एकइ धरम एक व्रत नेमा ।
काय बचन मन पतिपद प्रेमा ।

स्त्रीस धर्म व्रत, नियम सर्व एकच कीं तिनें कायावाचामनेंकरून पतिपदीं प्रेम करणें.

जग पतिव्रता चारि बिधि अहहीं ।
बेद पुरान संत सब कहहीं ।

जगांत चतुर्विध पतिव्रता आहेत, असें वेद, पुराण आणि संत यांचें मत आहे.

**दो०–उत्तम मध्यम नीच लघु सकल कहउँ समुझाइ । आगे सुनहिं ते भव तरहिं सुनहु सीय चितलाइ ॥ ४ ॥**

ते प्रकार असे–उत्तम, मध्यम, नीच आणि लघु; ह्या सर्वांचें मी विवरण करितें तें, सीते ! लक्ष्य लावून ऐक. ह्यापुढेंहि जे हें श्रवण करितील ते संसार तरून जातील.

चौ०–उत्तम के अस बस मन माहीं ।
सपनेहुँ आन पुरुष जग नाहीं ।
मध्यम परपति देखइ कैसे ।
भ्राता पिता पुत्र निज जैसे ।
धरम बिचारि समुझि कुल रहई ।
सो निकिष्ट तिय स्रुति अस कहई ।
बिनु अवसर भय तें रह जोई ।
जानेहु अधम नारि जग सोई ।

उत्तम स्त्रीच्या मनाची कायम भावना ही कीं, ह्या जगांत स्वप्नांत देखील आपल्या पतीखेरीज कोणी पुरुषच नाहीं. मध्यम स्त्री इतर पुरुषांकडे भ्राता, पिता व पुत्र ह्या दृष्टीनें पाहते. स्वधर्माच्या किंवा स्वकुलाच्या विचारानें जी ( परपुरुषापासून ) वांचते ती निकृष्ट स्त्री असें वेद म्हणतात. संधि न मिळाल्यामुळें किंवा इतर कोणत्या तरी भीतीनें जी ( परपुरुषावांचून ) राहते, ती स्त्री जगांत अधम जाणावी.

पतिबंचक पर–पति–रति करई ।
रौरव नरक कलपसत परई ।
छन सुख लागि जनम सत कोटी ।
दुख न समुझ तेहि सम को खोटी ।

आपल्या पतीशीं वंचना करून परपुरुषाशीं रममाण होणारी स्त्री शेंकडों कल्पपर्यंत रौरव नरकांत पचत राहते. क्षणैक सुखासाठीं कोट्यवधी जन्मपर्यंत भोगाव्या लागणाऱ्या दुःखांचीहि जिला जाणीव राहत नाहीं त्या स्त्रीसारखी आत्मवंचक स्त्री दुसरी कोण असणार ?

बिनु स्रम नारि परम गति लहई ।
पति-ब्रत–धरम छाडि छल गहई ।
पति प्रतिकूल जनम जहँ जाई ।
बिधवा होइ पाइ तरुनाई ।

निष्कपटपणें पातिव्रत्यधर्मानें वागणाऱ्या स्त्रीस अनायासें परमपद प्राप्त होतें. पतिवंचक स्त्री पुन्हां जेथें जन्म घेते तेथेंहि ती ऐन तारुण्यभरांतच विधवा होते.

**सो०–सहज अपावनि नारि पति सेवत सुभ गति लहइ । जसु गावत स्रुति चारि अजहुँ तुलसिका हरिहिप्रिय ॥४॥**

स्त्री ही स्वभावतःच अपवित्र आहे. तिला फक्त पतिसेवेनेंच उत्तम गति मिळते व चारी वेद तिचें यश गातात. म्हणून तर भगवंतास तुलसी ( पूर्वजन्मींची जालंदर राक्षसाची महापतिव्रता वृंदा नामक स्त्री ) अजूनदेखील प्रियच आहे.

**सो०–सुनु सीता तव नाम सुमिरि नारि पतिब्रत करहिं । तोहि प्रानप्रिय राम कहेउँ कथा संसारहित ॥ ५ ॥**

सीते ऐक. तुझें नामस्मरण करून स्त्रिया पातिव्रत्यधर्म आचारितात. तुला रामचंद्र प्राणाहूनहि प्रिय

१ आपत्सु मित्रं जानीयाद्युद्धे शूरं धने शुचिं ॥
भार्यां क्षीणेषु वित्तेषु व्यसनेषु च बांधवान् ॥१॥

आहेत. मीं जें सांगितलें तें ( तुजसाठीं नव्हे, ) जगाच्या कल्याणासाठीं बरें.

चौ०--सुनि जानकी परम सुख पावा ।
सादर तासु चरन सिरु नावा ।

तें ऐकून सीतेस परमानंद झाला, व तिनें आदरपूर्वक अनसूयेचे चरणीं मस्तक ठेविलें.

तब मुनि सन कह कृपानिधाना ।
आयसु होइ जाउँ बन आना ।
संतत मोपर कृपा करेहू ।
सेवक जानि तजेहु जानि नेहू ।

नंतर कृपानिधान राम ऋषीस ह्मणाले, आपली आज्ञा झाल्यास मी दुसऱ्या वनांत जाईन, मजवर सदोदित कृपा असावी, व मला सेवक समजून मजवरील प्रेम अखंड असूं द्यावें.

धरम--धुरं--धर प्रभु कै बानी ।
सुनि सप्रेम बोले मुनि ज्ञानी ।
जासु कृपा अज सिव सनकादी ।
चहत सकल परमारथबादी ।
ते तुह्म राम अ--काम--पियारे ।
दीनबंधु मृदु बचन उचारे ।

धर्मधुरंधर प्रभूची ती भाषा ऐकून ते तज्ञ मुनी प्रेमपूर्वक म्हणाले,—ब्रह्मदेव, शिवसनकादिक सकल परमार्थवक्ते ज्याच्या कृपेची वांछा धरितात तो तूं निष्काम प्रेम करणारा आणि दीनबंधु राम असेंच लीनपणें भाषण करणार!

अब जानी मैं श्रीचतुराई ।
भजिय तुह्महिँ सब देव बिहाई ।
जेहि समान अतिसय नहिँ कोई ।
ता कर सील कस न अस होई ।

आतां मीं श्रींचें चातुर्य ओळखिलें. सर्व देवांना वर्जून मी आतां तुझीच सेवा करीन. ज्याहून श्रेष्ठ तर काय पण ज्याच्या बरोबरीचाहि कोणी नाहीं, त्याचें शील असें कसें बरें असणार नाहीं ?

केहि बिधि कहउँ जाहु अब स्वामी ।
कहहु नाथ तुह्म अंतरजामी ।
अस कहि प्रभु बिलोकि मुनि धीरा ।
लोचन जल बह पुलक सरीरा ।

हे स्वामिन्, आतां आपणास 'जा' असें कसें म्हणूं तें सांगा. हे नाथ, आपण अंतःसाक्षी आहांत. असें म्हणून त्या ज्ञानवंत मुनींनीं प्रभूकडे अवलोकन केलें. तेव्हां त्यांच्या शरीरावर रोमांच उभे राहून डोळ्यांतून प्रेमाश्रू वाहूं लागले.

छंद–तन पुलकनिर्भर प्रेमपूरन नयन मुखपंकज दिये । मन-ज्ञान-गुन-गोतीत प्रभु मैं दीख जप तप का किये ॥ जप जोग धरम समूह ते नर भगति अनुपम पावहीं । रघु-बीर-चरित पुनीत निसि दिनु दास तुलसी गावहीं ॥ १ ॥

मुनींचें शरीर अत्यंत प्रेमानें रोमांचपरिपूर्ण झालें, व त्यांचे नेत्र रामाच्या मुखारविंदाचे ठायीं आसक्त झाले. ( ऋषी म्हणाले ) मन, ज्ञान, गुण आणि इंद्रियें यांना अगम्य अशा प्रभूंचें मला दर्शन होत आहे, त्या अर्थीं मीं असें जपतप तरी देवच जाणे काय केलें आहे ? तुलसीदास म्हणतात, जे नर अहर्निश पवित्र अशा रघुवीरचरित्राचें गान करितात ते जप, योग आणि धर्म इत्यादि साधनसमुदायाचें फल पावून अनुपम भक्ति प्राप्त करून घेतात.

दो०–कलि-मल-समन दमन दुख रामसुजस सुखमूल । सादर सुनहिँ जे तिन्हहिँ पर राम रहहिँ अनुकूल ॥ ५ ॥

रामाचें विमल यश कलिकिल्मिषांचें शमन करणारें व दुःखांचें निर्दलन करणारें असून सर्व सुखांचें मूल आहे. त्याचें जे कोणी श्रद्धापूर्वक श्रवण करितात त्यांवर रामचंद्र नेहमींच प्रसन्न असतात.

सो०–कठिन काल मलकोस धरम न ज्ञान न जोग जप । परिहरि सकल भरोस रामहिँ भजहिँ ते चतुर नर ॥ ६ ॥

हा कलिकाल फार कठिण आणि पापांचें आगर होय. ह्यांत धर्म, ज्ञान, योग, तप कांहींहि घडत नाहीं. म्हणून ह्या सर्व साधनांची कास सोडून जे रामभजन करितात तेच लोक वास्तविक चतुर होत.

चौ०–मुनि-पद-कमल नाइ करि सीसा ।
चले बनहिँ सुर-नर-मुनि-ईसा ।
आगे राम अनुज पुनि पाछे ।
मुनि-बर-बेष बने अति आछे ।
उभय बीच सिय सोहइ कैसी ।
ब्रह्म जीव बिच माया जैसी ।

मुनिपदकमलीं वंदन करून सुरनर इत्यादिकांचें

स्वामी श्रीरामचंद्र पुढील वनास जाऊं लागले. सर्वांच्या पुढें राम चालत, व त्यांच्या पाठीशीं लक्ष्मण असे. त्यांचे मुनिवेष अत्यंत खुलून दिसत. त्या दोघांच्या मध्यभागीं सीता, ब्रह्म आणि जीव यांच्यामध्यें जशी माया शोभते तद्वत्, शोभूं लागली.

सरिता बन गिरि अवघट घाटा ।
पति पहिचानि देहिँ बर बाटा ।
जहँ जहँ जाहिँ देव रघुराया ।
करहिँ मेघ तहँ तहँ नभछाया ।

नद्या, वनें, पर्वत, अवघड घाट आपल्या प्रभूस ओळखून उत्तम प्रकारची वाट देऊं लागले. जेथें जेथें भगवान् रामचंद्र जात तेथें तेथें मेघ आकाशांत छावून छाया करीत.

मिला असुर बिराध मृग जाता ।
आवतही रघुबीर निपाता ।
तुरतहिँ रुचिर रूप तेहि पावा ।
देखि दुखी निजधाम पठावा ।

मार्गानें जात असतां विराधनामक राक्षस भेटला. तो येताक्षणींच रामानें त्याचा निःपात केला; त्यासरशीं त्यास दिव्य स्वरूप प्राप्त झालें. तो दुःखी पाहून प्रभूंनीं त्याला स्वपदाप्रतें नेलें.

पुनि आये जहँ मुनि सरभंगा ।
सुंदर अनुज जानकी संगा ।

नंतर सुंदर अनुज आणि जानकीसहवर्तमान रामचंद्र शरभंग मुनींच्या आश्रमास आले.

**दो०—देखि राम-मुख-पंकज मुनि-बर-लोचन भृंग । सादर पान करत अति धन्य जनम सरभंग ॥ ६ ॥**

रामाचें मुखपंकज पहातांच मुनिवराचे लोचनभृंग अत्यंत लुब्ध होऊन ते त्याचें सेवन करूं लागले. ( कवि ह्मणतात, ) हे शरभंग मुने ! ! धन्य तुझा जन्म !

**चौ०—कह मुनि सुनु रघुबीर कृपाला ।**
**संकर-मानस-राज-मराला ।**

१ विराध पूर्वजन्मींचा गंधर्व होता. कुबेराची वेळेवर सेवा करण्यास एकदां तो चुकला असतां त्याच्या शापानें तो राक्षस झाला आणि त्याच्याच उःशापानें त्याला असें मरण येऊन वैकुंठप्राप्ति झाली.

जात रहेउँ बिरंचि के धामा ।
सुनेउ स्रवन बन अइहहिँ रामा ।
चितवत पंथ रहेउँ दिन राती ।
अब प्रभु देखि जुडानी छाती ।

मुनि म्हणाले—हे शंकरमानसराजहंसा ! दयालो रघुवीरा ! श्रवण करा. मी ब्रह्मलोकास जात होतों; परंतु रामा ! आपण वनांत येत आहां असें ऐकिलें. ( तेव्हांपासून ) रात्रंदिवस मी आपली मार्गप्रतीक्षा करीत आहे. प्रभो ! आपलें दर्शन घडल्यानें माझें अंतःकरण निवालें.

नाथ सकल साधन मैं हीना ।
कीन्ही कृपा जानि जन दीना ।
सो कछु देव न मोहि निहोरा ।
निजपन राखेहु जन-मन-चोरा ।
तब लगि रहहु दीनहित लागी ।
जब लगि मिलउँ तुम्हहिँ तनु त्यागी ।

हे नाथ ! मी सर्व साधनहीन आहे. आपण मला आपला दीन सेवक समजून ही कृपा केली. देवा ! हें आपण मजकडे पाहून केलें असें नाहीं. तर हे निजजनमनोहारका ! आपण आपलें ब्रीद सांभाळलें. आतां ह्या देहाचा त्याग करून मी आपल्या स्वरूपीं मिळेपर्यंत आपण मज दीनावर उपकार करण्यासाठीं येथेंच थांबावें.

जोग जग्य जप तप व्रत कीन्हा ।
प्रभु कहँ देइ भगतिबर लीन्हा
एहि बिधि सर रचि मुनि सरभंगा ।
बैठे हृदय छाडि सब संगा ।

आपण केलेलीं योग, यज्ञ, जप, तप व्रतादि सत्कर्में मुनींनीं प्रभूस अर्पण करून त्यांचेपासून भक्तीचा वर मागून घेतला. अशा रीतीनें शरभंग मुनी हृदयांतील सर्व वासनांचा परित्याग करून चिता रचून तिजवर आरूढ झाले.

**दो०—सीता-अनुज-समेत प्रभु नील जलद तनु स्याम । मम हिय बसहु निरंतर सगुनरूप श्रीराम ॥ ७ ॥**

" हे नीलमेघश्यामतनो ! प्रभो श्रीरामा ! हें तुझें सगुण रूप सीतालक्ष्मणांसमवेत माझ्या हृदयांत निरंतर वास करो."

**चौ०—अस कहि जोगअगिनि तनु जारा ।**
**रामकृपा बैकुंठ सिधारा ।**

ता तें मुनि हरिलीन न भयऊ।
प्रथमहिं भेद भगतिबर लयऊ।

असें म्हणून मुनींनीं योगाग्नीनें देह दग्ध केला, आणि रामकृपेनें ते वैकुंठाला गेले. मुनी रामस्वरूपांत लीन झाले नाहींत. कारण, त्यांनीं अगोदरच द्वैतभक्तीचें वरप्रदान मागून घेतलें होतें.

रिषिनिकाय मुनि-बर-गति देखी।
सुखी भये निज हृदय बिसेखी।
अस्तुति करहिं सकल मुनिबृंदा।
जयति प्रनतहित करुनाकंदा।

मुनिवर्यांची ती गति पाहून ऋषिसमुदाय अत्यंत हर्षित झाला. सर्व मुनिवृंद "शरणागतवत्सल करुणाकंद श्रीरामचंद्राचा जयजयकार असो" अशी स्तुति करूं लागला.

पुनि रघुनाथ चले बन आगे।
मुनि-बर-बृंद बिपुल सँग लागे
अस्थिसमूह देखि रघुराया।
पूछा मुनिन्ह लागि अतिदाया।

नंतर रामचंद्र पुढील वनांत जाऊं लागले असतां त्यांच्या समागमें अनेक मुनिगणहि निघाले. (मार्गांत) अस्थींचें खच रचलेले पाहून रघुराज अत्यंत कळवळून मुनींना विचारूं लागले.

जानतहू पूछिय कस स्वामी।
सबदरसी तुह्म अंतरजामी।
निसि-चर-निकर सकल मुनि खाये।
सुनि रघुनाथ नयन जल छाये।

(तेव्हां मुनी म्हणाले) "हे स्वामिन्! आपण सर्वदर्शी आणि अंतर्यामी आहांत. मग आपण जाणूनबुजून हें असें कसें विचारितां? राक्षससमुदायाच्या भक्ष्यस्थानीं पडलेले हे सर्व मुनी आहेत." हें ऐकतांच रामाच्या डोळ्यांतून भरभरून टिपें गळूं लागलीं.

**दो०—निसि-चर-हीन करउँ महि भुज उठाइ पन कीन्ह। सकल मुनिन्ह के आस्रमन्हि जाइ जाइ सुख दीन्ह॥ ८॥**

तेव्हां, "ही पृथ्वी मी राक्षसहीन करीन" अशी रामानें हात वर करून प्रतिज्ञा केली. सर्व ऋषींच्या आश्रमांत जाऊन रामांनीं त्यांस संतुष्ट केलें.

चौ०—मुनि अगस्त्य कर सिष्य सुजाना।
नाम सुतीच्छन रति भगवाना।
मन-क्रम-बचन राम-पद-सेवक।
सपनेहुं आन भरोस न देव क।
प्रभुआगवनु स्रवन सुनि पावा।
करत मनोरथ आतुर धावा।

अगस्ति मुनींचा एक सुतीक्ष्ण नांवाचा सुजाण शिष्य होता. तो भगवंताचे ठिकाणीं अनुरक्त असून कायावाचामनेंकरून रामचरणांची उपासना करीत असे. त्यानें स्वप्नांतहि कधीं अन्य दैवताचा आश्रय केला नाहीं. प्रभूंची आगमनवार्ता त्याचे कानावर येतांच तो आतुर होऊन अनेक मनोरथ करीत धांवत सुटला.

हे बिधि दीनबंधु रघुराया।
मो से सठ पर करिहहिं दाया।
सहित अनुज मोहि राम गोसाईं।
मिलिहहिं निज सेवक की नाईं।

हे दैवा! दीनबंधु रघुराज माझ्यासारख्या शठावर दया करतील काय? लक्ष्मणासहवर्तमान स्वामी रामचंद्र मला आपल्या सेवकाप्रमाणें समजून भेट देतील काय?

मोरे जिय भरोस दृढ नाहीं।
भगति बिरति न ज्ञान मन माहीं।
नहिं सतसंग जोग जप जागा।
नहिं दृढ चरनकमल अनुरागा।

माझ्या हृदयांत दृढ विश्वास तर नाहींच, पण माझ्या ठिकाणीं भक्ति, वैराग्य किंवा ज्ञान (ह्यांपैकीं एकहि) नाहीं. सत्संग, योग, जप किंवा याग (हेंहि मीं केले) नसून माझें त्यांच्या चरणकमलीं निश्चल प्रेमहि नाहीं.

एक बानि करुनानिधान की।
सो प्रिय जा के गति न आन की।
होइहहिं सुफल आजु मम लोचन।
देखि बदनपंकज भवमोचन।

करुणानिधान प्रभूचा अलोट बाणा असा आहे कीं जो अनन्यगतिक आहे तोच त्यास प्रिय होतो[1]; तेव्हां त्या भवभंजनाचें मुखकमल मला दिसून माझे नेत्र आज धन्य होतील काय?

---

[1] अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥
(श्रीमद्भगवद्गीता)

निर्भर प्रेम मगन मुनि ज्ञानी ।
कहि न जाइ सो दसा भवानी ।
दिसि अरु बिदिसि पंथ नहिँ सूझा ।
को मैँ चलेउँ कहाँ नहिँ बूझा ।

शंकर म्हणतात, हे पार्वति ! तो ज्ञानी मुनी प्रेमभरांत अत्यंत निमग्न झाला. त्याची ती स्थिति वर्णन करितां येत नाहीं. आपण सरळ मार्गानें जात आहों किंवा वांकड्या, हेंहि त्यास कळेनासें झालें. मी कोण आणि कोणीकडे जात आहे याचेंहि त्याला भान राहिलें नाहीं.

कबहुँक फिर पाछे पुनि जाई ।
कबहुँक नृत्य करइ गुन गाई ।
अबिरल प्रेम भगति मुनि पाई ।
प्रभु देखहिँ तरुओट लुकाई ।

तो केव्हां केव्हां पुन्हां पाठीमागें फिरून चालूं लागे, तर केव्हां केव्हां प्रभूचे गुण गाऊन तो नाचत सुटे. त्या मुनीला अखंड प्रेम आणि भक्ति प्राप्त झाली होती. श्रीरामचंद्र झाडाच्या आडोशानें त्याला पहात राहिले.

अतिसय प्रीति देखि रघुबीरा ।
प्रगटे हृदय हरन भवभीरा ।
मुनि मग माँझ अचल होइ बैसा ।
पुलकसरीर पनसफल जैसा ।

त्याचा उत्कट प्रेमा पाहून भवभयहरण रघुवीर त्याच्या हृदयांत प्रकट झाले. तेव्हां मुनी मार्गांतच अचल होऊन बसला. त्याचें शरीर फणसाप्रमाणें रोमांचित झालें.

तब रघुनाथ निकट चलि आये ।
देखि दसा निज जन मन भाये ।
मुनिहि राम बहु भाँति जगावा ।
जाग न ध्यानजनित सुख पावा ।

नंतर रामचंद्र अगदीं त्याचे जवळ आले, आणि आपल्या भक्ताची ती स्थिति पाहून मनांत प्रसन्न झाले. रामांनीं त्याला अनेकप्रकारें जागविण्याचा प्रयत्न केला; परंतु तो समाधिसुखाचा अनुभव घेत असल्यामुळें शुद्धीवर आला नाहीं.

भूपरूप तब राम दुरावा ।
हृदय चतुर्भुजरूप देखावा ।
मुनि अकुलाइ उठा पुनि कैसे ।
बिकल हीनमनि फनिबर जैसे ।

तेव्हां रामांनीं आपलें रामरूप दुरावून चतुर्भुज रूप त्याचे हृदयांत प्रकट केलें. तें पाहतांच मणिविहीन सर्पराजाप्रमाणें विकल होऊन सुतीक्ष्ण मुनी घाबरून जागा झाला.

आगे देखि रामतनु स्यामा ।
सीता-अनुज-सहित सुखधामा ।
परेउ लकुट इव चरनन्हि लागी ।
प्रेममगन मुनिबर बडभागी ।

त्या सुखनिधान श्यामलमूर्ति रामचंद्रास सीता-लक्ष्मणांसहवर्तमान समोर उभे असलेले पाहून तो महाभाग्यवान् मुनी प्रेमानिमग्न होऊन काष्ठाप्रमाणें त्यांच्या पायावर आदळला.

भुजबिसाल गहि लिये उठाई ।
परमप्रीति राखे उर लाई ।
मुनिहिँ मिलत अस सोह कृपाला ।
कनकतरुहि जनु भेँट तमाला ।

आपल्या विशाल बाहूंनीं रामांनीं त्यास धरून उचलिलें, आणि अत्यंत प्रेमानें उराशीं कवटाळून धरिलें. कृपाळु रामचंद्र मुनीस भेटत असतां तमाल-वृक्ष आणि कनकवृक्ष यांच्या संगमाची शोभा हिरावूं लागले.

रामबदन बिलोकि मुनि ठाढा ।
मानहुँ चित्र माँझ लिखि काढा ।

राममुखाचें अवलोकन करीत असतां मुनी इतका निश्चळ झाला कीं जणुंकाय चित्रांतलें बाहुलेंच तो वाटला.

**दो०--तब मुनि हृदय धीर धरि गहि पद बारहिँ बार । निज आस्रम प्रभु आनि करि पूजा बिबिध प्रकार ॥ ९ ॥**

त्यानंतर धैर्य धरून वारंवार रामाची पायधरणी करून आणि त्यांना आपल्या आश्रमीं आणून त्यानें त्यांचें अनेकप्रकारें पूजन केलें.

चौ०--कह मुनि प्रभु सुनु बिनती मोरी ।
अस्तुति करउँ कवनि बिधि तोरी ।
महिमा अमित मोरि मति थोरी ।
रबिसनमुख खद्योत अँजोरी ।

मुनी म्हणाला, प्रभो ! माझी विनंति श्रवण करावी. मीं कोणत्या प्रकारें आपलें स्तवन करावें ? आपला

महिमा अपार आणि माझी मति अत्यल्प! रवीपुढें काजव्यानें काय चमकावें !

स्याम-तामरस-दाम-सरीरँ।
जटा-मुकुट परिधन-मुनि-चीरँ।
पानि-चाप-सर-कटि-तूनीरँ।
नौमि निरँतर श्री-रघु-बीरँ।

श्यामकमलनालांप्रमाणें शरीर, मस्तकीं जटाजूट, परिधानास वल्कलें, हातांत चापबाण, कमरेला भाते, अशा हे रघुवीरा! मी तुला नमन करितों.

मोह-बिपिन-घन-दहन-कृसानुः।
सँत-सरोरुह-कानन-भानुः।
निचि-चर-करि-बरूथ-मृगराजः।
त्रातु सदा नो भव-खग-बाजः।

तूं अज्ञानरूप निबिड अरण्याला भस्म करणारा दावानल आणि संतरूपी कमलवनाला विकसित करणारा सूर्य आहेस. तूं राक्षसरूपी गजसमूहाचें कंदन करणारा मृगराज आणि संसाररूपी पक्ष्याला ग्रासणारा श्येन आहेस. तूं आमचें निरंतर रक्षण कर.

अरुन-नयन-राजीव सुवेसँ।
सीता-नयन-चकोर-निसेसँ।
हर-हृदि-मानस-राज-मरालँ।
नौमि राम-उर-बाहु-बिसालँ।

तुझे नेत्र कमलाप्रमाणें आरक्त असून तुझा वेष रमणीय आहे. तूं जानकीच्या नयनचकोरांना चंद्राप्रमाणें असून शिवहृदयरूपी मानसांतला राजहंस आहेस. तुझें वक्षःस्थल आणि बाहू विशाल आहेत. हे रामा, मी तुला वंदन करितों.

सँसय-सर्प्प-ग्रसन-उरगादः।
समन-सु-कर्कस-तर्क-बिषादः।
भव-भँजन-रँजन-सुर-जूथः।
त्रातु सदा नो कृपाबरूथः।

तूं संशयरूपी सर्पाचा ग्रास करणारा गरुड असून अत्यंत कठोर अशा तर्कजन्य विषादांचें शमन करणारा आहेस. तूं संसृतीचा भंग करणारा असून देवगणांचें रंजन करणारा दयानिधान आहेस. आमचें निरंतर रक्षण कर.

निर्गुन-सगुन-बिषम-सम-रूपँ।
ज्ञान-गिरा-गो-तीतमरूपँ।
अमलमाखिलमनवद्यमपारँ।
नाम राम भजन-माह-भारँ।

तूं सगुण, निर्गुण व समविषमरूपी (हरफंगद मौला) आहेस. ज्ञान, वाणी आणि इंद्रियें यांना तूं अगोचर आहेस. तूं अरूप, निर्मल, अखंड, निर्दोष आणि अपार असून पृथ्वीचा भार उतरविणारा आहेस. हे रामा, मी तुला वंदन करितों.

भक्त-कल्प-पादप-आरामः।
तर्जन-क्रोध-लोभ-मद-कामः।
अति नागर भव-सागर-सेतुः।
त्रातु सदा दिन-कर-कुल-केतुः।

तूं भक्तजनांना कल्पतरूंच्या उपवनाप्रमाणें असून क्रोध, लोभ, मद आणि काम यांचा नाश करणारा आहेस. तूं परमचतुर असून भवसागराचा सेतु आहेस. हे सूर्यकुलकेतो! माझें सदैव रक्षण कर.

अतुलित-भुज-प्रताप-बल-धामा।
कलि-मल-विपुल-विभँजन-नामा।
धर्मवर्म नर्मद गुनग्रामः।
संतत संतनोतु मम रामः।

तूं शक्तीचें आगर असून तुझा भुजप्रताप अतुलित आहे. तुझ्या नामाच्या योगानें कलियुगीन अनेक दोषांचा नाश होतो. तुझे गुणग्राम धर्माचें कवच असून सदैव सुखकर आहेत. असा तूं राम माझा सांभाळ कर.

जदपि बिरजव्यापक अबिनासी।
सब के हृदय निरंतर बासी।
तदपि अनुज-श्री-सहित खरारी।
बसतु मनसि मम काननचारी।

हे भगवन्! यद्यपि तूं मायारहित, व्यापक आणि अविनाशी असून नित्य सर्वांतरवासी आहेस तरीहि, हे खरशत्रो रामा! सीतालक्ष्मणांसहवर्तमान अरण्यांत संचार करीत असलेली तुझी ही मूर्तिच माझ्या हृदयांत वास करूं दे.

जे जानहिँ ते जानहु स्वामी।
सगुन अगुन उर-अंतर-जामी।
जो कोसलपति राजिवनैना।
करउ सो राम हृदय मम ऐना।

हे हृदयांतरवासी स्वामिन्! तुझें सगुण व निर्गुण स्वरूप जे कोणी जाणत असतील ते जाणोत. परंतु हें जें आपलें अयोध्याधीश कमलनयन रामरूप तेंच माझ्या हृदयांत निवास करो.

अस अभिमान जाय जनि भोरे ।
मैं सेवक रघुपति पति मोरे ।

मी सेवक आणि रघुपति माझे स्वामी, हा माझा अभिमान चुकूनदेखील मला सोडून न जावो.[1]

सुनि मुनिबचन राममन भाये ।
बहुरि हरषि मुनिबर उर लाये ।
परम प्रसन्न जानु मुनि मोही ।
जो बर माँगहु देउँ सो तोही ।

तें मुनींचें भाषण ऐकून राम मनांत प्रसन्न झाले, व त्यांनीं त्यास हर्षानें पुन्हां हृदयाशीं कवटाळून धरिलें. ते म्हणाले, हे मुने ! मी अत्यंत प्रसन्न आहे असें जाणून वाटेल तो वर मागितलास तरी तो मी तुला देतों.

मुनि कह मैं बर कबहुँ न जाँचा ।
समुझि न परइ झूठ का साँचा ।
तुह्महिं नीक लागइ रघुराई ।
सो मोहि देहु दास-सुख-दाई ।

मुनी म्हणाला, मीं कधींच वराची याचना केली नाहीं. तो खरा किंवा खोटा हेंहि मला उमजत नाहीं, अतएव हे रघुराया ! आपणांस उचित दिसेल तोच वर मला द्यावा. कारण आपण दासाचें कल्याण करणारे आहां.

अबिरल भगति बिरति बिज्ञाना ।
होहु सकल-गुन-ज्ञान-निधाना ।
प्रभु जो दीन्ह सो बर मैं पावा ।
अब सो देहु मोहिं जो भावा ।

" अखंड भक्ति, विज्ञान आणि वैराग्य तुला प्राप्त होऊन तूं सर्व सद्गुण आणि ज्ञान ह्यांचें भांडार होशील. " ( असा वर मिळतांच मुनी म्हणाला, ) प्रभो ! आपण आपल्याकडून जो वर दिला तो मला पावला. आतां माझें अभीष्ट आपण पूर्ण करावें.

**दो०-अनुज-जानकी-सहित प्रभु चाप-बान-धर राम । मम हियगगन इंदु इव बसहु सदा निःकाम[2] ॥ १० ॥**

हे प्रभो ! सीतालक्ष्मणांसहवर्तमान चापबाणधारी ह्याच रामरूपानें माझ्या हृदयरूपी आकाशांत चंद्राप्रमाणें आपण अखंड आणि निष्काम वास करावा.

चौ०-एवमस्तु कहि रमानिवासा ।
हरषि चले कुंभज रिषि पासा ।

' एमवस्तु ' असें म्हणून रामचंद्र आनंदानें अगस्तिमुनीकडे जाण्यास निघाले.

बहुत दिवस गुरुदरसन पाये ।
भये मोहिं एहि आस्रम आये ।
अब प्रभु संग जाउँ गुरु पाहीं ।
तुह्म कहँ नाथ निहोरा नाहीं ।

तेव्हां मुनी म्हणाला, ह्या आश्रमांत आल्यापासून गुरुदर्शन झाल्यास फार दिवस झाले. ह्या वेळीं प्रभूंच्या समागमें गुरूकडे मीहि येईन. हे नाथ ! आपणांस तरी कोणी वाटाड्या हवाच.

देखि कृपानिधि मुनिचतुराई ।
लिये संग बिहँसे दोउ भाई ।
पंथ कहत निज भगति अनूपा ।
मुनिआस्रम पहुँचे सुरभूपा ।

कृपानिधि रामांनीं मुनींची ती खुबी ओळखून लक्ष्मणासहवर्तमान हास्य केलें, आणि त्यास आपल्याबरोबर घेतलें. मार्गानें आपल्या अनुपम भक्तीचें निरूपण करीत देवाधिदेव रामचंद्र अगस्ति ऋषींच्या आश्रमांत पोंचले.

तुरत सुतीच्छन गुरु पहिं गयऊ ।
करि दंडवत कहत अस भयऊ ।
नाथ कोसलाधीसकुमारा ।
आये मिलन जगतआधारा ।
राम अनुज समेत बैदेही ।
निसि दिनु देव जपत हहु जेही ।

सुतीक्ष्ण मुनी लगोलग गुरूकडे गेला व त्यांना दंडवत घालून म्हणाला, हे नाथ ! अयोध्याधीश राजा दशरथाचे कुमार, ब्रह्मांडाचे आधार आणि आपण ज्यांचा अहर्निश जप करीत असतां ते श्रीरामचंद्र सीतालक्ष्मणांसहवर्तमान आपल्या दर्शनास्तव आले आहेत.

सुनत अगस्त तुरत उठि धाये ।
हरि बिलोकि लोचन जल छाये ।
मुनि-पद-कमल परे दोउ भाई ।
रिषि अतिप्रीति लिये उर लाई ।

---

१ रघुनाथ स्वामी आणि मी त्यांचा सेवक असा अभिमान मला चुकून देखील न होवो-असाहि अर्थ होऊं शकेल. ' जाय ' शब्द ' होणें ' आणि ' जाणें ' असा उभयार्थक आहे.

२ कवीनें हा 'निःकाम' शब्द 'त्वं च स्वाम्यनपाश्रयः' ( भाग. ७-१०-६ ) या अर्थानें दिलेला दिसतो.

तें ऐकतांच अगस्ति ऋषि धांवतच निघाले. श्रीहरीस पाहून त्यांचे नेत्र प्रेमजलानें भरून आले. उभय बंधूंनीं त्यांच्या चरणकमलीं लोटांगण घातलें असतां अगस्ति ऋषींनीं त्यांना अत्यंत प्रेमानें उचलून आलिंगन दिलें.

सादर कुसल पूछि मुनि ज्ञानी ।
आसन पर बैठारे आनी ।
पुनि करि बहु प्रकार प्रभुपूजा
मोहि सम भागवंत नहिँ दूजा ।
जहँ लगि रहे अपर मुनिबृंदा ।
हरषे सब बिलोकि सुखकंदा ।

चतुर अगस्ति ऋषींनीं आदरपूर्वक कुशल प्रश्न विचारून त्यांस आणून आसनावर बसविलें. नंतर विविध प्रकारें प्रभूंची पूजा करून ते म्हणाले, माझ्यासारखा भाग्यवान् इतर कोणीहि नाहीं. जेवढे ह्मणून इतर मुनिवृंद होते तेहि सर्व त्या आनंदकंदास पाहून हर्षित झाले.

**दो०–मुनिसमूह महँ बैठे सनमुख सब की ओर । सरदइंदु तन चितवत मानहुँ निकर चकोर ॥ ११ ॥**

मुनिवृंदामध्यें सर्वांचे सन्मुख विराजित असलेल्या रामचंद्राकडे, ज्याप्रमाणें शरच्चंद्राकडे चकोरसमूह पहातो तद्वत, तो मुनिसमाज पाहूं लागला.

चौ०–तब रघुबीर कहा मुनि पाहीँ ।
तुम्ह सन प्रभु दुराउ कछु नाहीँ ।
तुम्ह जानहु जेहि कारन आयऊँ ।
ता तेँ तात न कहि समुझायऊँ ।
अब सो मंत्र देहु प्रभु मोही ।
जेहि प्रकार मारउँ मुनिद्रोही ।

नंतर रामचंद्र मुनीस ह्मणाले, आपणाला अवगत नाहीं असें कांहींच नाहीं. ज्या कार्यास्तव मी आलों तें आपण जाणतच आहां, आणि म्हणूनच, हे तात! हें मीं आपणास सांगत बसत नाहीं. आतां जेणेंकरून मुनिद्रोही राक्षसांचा माझ्या हातून वध होईल अशी सल्ला, हे प्रभो! आपण मला द्यावी.[1]

मुनि मुसुकाने सुनि प्रभु बानी ।
पूछेहु नाथ मोहि का जानी ।
तुम्हरेइ भजनप्रभाव अघारी ।
जानउँ महिमा कछुक तुम्हारी ।
ऊमरितरु बिसाल तव माया ।
फल ब्रह्मांड अनेक निकाया ।
जीव चराचर जंतुसमाना ।
भीतर बसहिँ न जानहिँ आना ।

प्रभूंचें तें भाषण ऐकून अगस्ति ऋषि हास्य करून म्हणाले, आपण मला काय समजून हें विचारीत आहां? हे प्रभो! आपल्या भजनप्रभावानें आपला महिमा मी जाणतच असेन तर तो किंचित्साच. आपली माया औदुंबर वृक्षाप्रमाणें विशाल असून अनंतकोटि ब्रह्मांडें हीं त्याचीं फळें होत. सकल चराचर जीव जंतूंप्रमाणें असून ते त्या फळांच्या गर्भांत राहतात, परंतु परस्पर कोणी कोणास ओळखतहि नाहींत.

ते फलभक्षक कठिन कराला ।
तव भय डरत सदा सोउ काला ।
ते तुम्ह सकल लोकपति साईँ ।
पूछेहु मोहि मनुज की नाईँ ।

त्या फळांस भक्षण करणारा जो कठिन कराल काळ त्याची देखील तुमच्या भयानें निरंतर बेबडी वळते. ते तुह्मी सर्व देवांचेहि देव प्राकृत मनुष्याप्रमाणें मला प्रश्न करीत आहां.

यह बर माँगउँ कृपानिकेता ।
बसहु हृदय श्री–अनुज–समेता ।
अबिरल भगति बिरति सतसंगा ।
चरनसरोरुह प्रीति अभंगा ।
जद्यपि ब्रह्म अखंड अनंता ।
अनुभवगम्य भजहिँ जेहि संता ।
अस तव रूप बखानउँ जानहुँ ।
फिरि फिरि सगुन ब्रह्मरति मानउँ ।

हे दयानिधान! आतां आपण माझे हृदयांत सीतालक्ष्मणांसमवेत वास करून मला निश्चल भक्ति, वैराग्य, सत्संग आणि आपल्या चरणकमलाचे ठिकाणीं अढळ प्रीति हेंच वरप्रदान द्यावें. अखंड व अनंत असलेलें सच्चिदानंद ब्रह्म, ज्याचा अनुभव संतांना भजनद्वारा होत असतो, तें तुझें (निर्गुण) रूपहि पण मी जाणतों आणि सांगूं शकतों. परंतु

[1] कवीकडून राजकारणाचा उल्लेख फक्त अगस्तींच्याच भेटींत रामाकडून करविला आहे. यावरून कवीच्या मतें अगस्ति रामाच्या राजकारणांत शरीक होते, असें म्हणण्यास काय बाध?

उठल्यासुटल्या मन लल्चावतें तें मात्र तुझ्या या सगुण स्वरूपावरच.

संतत दासन्ह देहु बडाई ।
ता तें मोहि पूछेहु रघुराई ।

आपण आपल्या ताबेदारांना मोठेपणा देत असतां, म्हणूनच हे रघुराय ! आपण मला प्रश्न केला.

है प्रभु परम मनोहर ठाऊँ ।
पावन पंचबटी तेहि नाऊँ ।
दंडक बन पुनीत प्रभु करहू ।
उग्र साप मुनिबर कै हरहू ।
बास करहु तहँ रघु-कुल-राया ।
कीजिय सकल मुनिन्ह पर दाया ।

प्रभो ! पंचवटी नांवाचें एक परमरम्य आणि पवित्र स्थान आहे. हे नाथ ! गौतममुनींच्या उग्र शापाचें परिमार्जन करून आपण तें दंडकवन पवित्र करावें. हे रघुकुलश्रेष्ठा ! आपण तेथें वास करून सर्व मुनिजनांवर कृपा करावी.

चले राम मुनिआयसु पाई ।
तुरतहिँ पंचबटी नियराई ।

अगस्तिऋषींची आज्ञा घेऊन राम निघाले आणि लवकरच पंचवटीस आले.

**दो०-गीधराज सों भेंट भइ बहु बिधि प्रीति बढाइ । गोदावरी निकट प्रभु रहे परनगृह छाइ ॥ १२ ॥**

तेथें जटायूला भेट देऊन आणि अनेकप्रकारें त्याच्यावर प्रेम करून प्रभु गोदावरीनजीकच पर्णशाला उभारून राहिले.

चौ०-जब तें राम कीन्ह तहँ बासा ।
सुखी भये मुनि बीती त्रासा ।
गिरि बन नदी ताल छबि छाये ।
दिन दिन प्रति अति होहिँ सुहाये ।
खग-मृग-बृंद अनंदित रहहीं ।
मधुप मधुर गुंजत छबि लहहीं ।
सो बन बरनि न सक अहिराजा ।
जहाँ प्रगट रघुबीर बिराजा ।

रामांनीं तेथें वास केल्यापासून सर्व मुनी त्रासमुक्त होऊन सुखी झाले. पर्वत, वनें, नद्या, तळीं यांच्यावरहि उत्तम कळा येऊन तीं दिवसानुदिवस अधिकच रमणीय दिसूं लागलीं. पशुपक्ष्यांचे समुदाय आनंदानें राहूं लागले. भ्रमर मधुर गुंजारव करीत असतां मनोहर दिसूं लागले. जेथें प्रत्यक्ष रघुवीर विराजित झाले त्या वनाचें वर्णन शेषाच्यानेंहि होणार नाहीं.

एक बार प्रभु सुख आसीना ।
लछिमन बचन कहे छलहीना ।
सुर नर मुनि सचराचर साईं ।
मैं पूछउँ निज प्रभु की नाईं ।
मोहि समुझाइ कहहु सोइ देवा ।
सब तजि करउँ चरन-रज-सेवा ।
कहहु ग्यान बिराग अरु माया ।
कहहु सो भगति करहु जेहि दाया ।

एकदां प्रभु सहज मजेनें बसले असतां लक्ष्मणानें शुद्ध बुद्धीनें विचारिलें कीं, हे सुरनरमुनिचराचर स्वामिन् ! मी आपणांस माझा साक्षात् प्रभु समजून विचारीत आहे तें, हे देवा ! आपण मला समजावून सांगा; म्हणजे तेणेंकरून मी आपल्या चरणरजांचीच सर्वत्यागपूर्वक सेवा करीत राहीन. ज्ञान, वैराग्य आणि माया ह्यांचीं लक्षणें, व जिच्या योगानें आपण कृपा करीत असतां त्या भक्तीचेंहि लक्षण मला कथन करावें.

**दो०-ईश्वर जीवहि भेद प्रभु कहहु सकल समुझाइ । जा तें होइ चरन रति सोक मोह भ्रम जाइ ॥ १३ ॥**

प्रभो ! ईश्वर आणि जीव ह्यांच्यांतील भेद इत्यादि सर्व मला समजावून सांगावें. म्हणजे माझा शोक, मोह आणि भ्रम निवटून आपल्या चरणांचे ठायीं माझें प्रेम जडून राहील.

---

[1] एकदां दुष्काळ पडला असतां पुष्कळ मुनिवृंद गौतम ऋषींच्या आश्रयास राहिले. पुढें कालांतरानें सुकाळ झाला तेव्हां ते गौतमास सोडून जनस्थानास जाऊं लागले. तेव्हां तसें न करण्याबद्दल गौतमांनीं त्यांस सांगितलें. परंतु मुनिमंडळींस तें न आवडून त्यांनीं एक मायाधेनु निर्माण केली व ती गौतमांचे स्वाधीन केली. गौतमांनीं तिला स्पर्श करितांच ती गतप्राण झाली. तेव्हां त्यांस गोहत्येचें पातक लावून मुनिमंडळी जाण्यास निघाली, व आपल्या पूर्वस्थलीं-दंडकवनांत-जाऊन राहिली. गौतमांनीं जेव्हां हें मुनींचें कपट ओळखलें तेव्हां त्यांनीं शाप दिला कीं, दंडकवनांत राक्षसांचा सुळसुळाट होईल.

चौ०—थोरेहि महँ सब कहउँ बुझाई।
सुनहु तात मति मन चित लाई।

राम म्हणाले, हे तात ! मी तुला थोडक्यांत सर्व समजावून सांगतों; तूं तें मन, बुद्धि आणि चित्त एकवटून ऐक.

मैं अरु मोर तोर तैं माया।
जेहि बस कीन्हे जीवनिकाया।
गो गोचर जहँ लगि मन जाई।
सो सब माया जानेहु भाई।

हे बंधो ! मी व माझें आणि तूं व तुझें हीच माया होय. हिनेंच जीवमात्रावर आपला पगडा बसविला आहे. इंद्रियें आणि तद्द्वारा गम्य असणारें तसेंच त्याच्याहि पलीकडे जें जें मनाला गोचर होतें तें तें सर्व तूं मायिकच समज.

तेहि कर भेद सुनहु तुह्म सोऊ।
बिद्या अपर अबिद्या दोऊ।
एक दुष्ट अतिसय दुखरूपा।
जा बस जीव परा भवकूपा।

आतां तूं त्या मायेचे भेद ऐक. तिचे भेद एक विद्या व दुसरी अविद्या, असे दोन आहेत. पैकीं एक अविद्या ही अतिशय दुष्ट आणि दुःखरूप आहे. तिच्याच कांतूंत जाऊन जीव भवकूपांत बुडया खात राहतो.

एक रचइ जग गुनबस जा के।
प्रभुप्रेरित नहिँ निजबल ता के।

दुसरी जी विद्या तिच्या आधीन गुण असतात व ती सृष्टि निर्माण करते. तिला स्वतःचें बळ नसल्यामुळें ती केवळ आपल्या प्रभूच्या प्रेरणेनेंच वागते.

ज्ञान मान जहँ एकउ नाहीँ।
देख ब्रह्म समान सब माहीँ।
कहिय तात सो परम बिरागी।
तृनसम सिद्धि तीनि गुन त्यागी।

ज्ञान आणि अहंकार ह्यांपैकीं एकहि ज्याचे ठिकाणीं नसून जो सर्वत्र ब्रह्ममय पाहतो तोच, हे बंधो ! परमविरक्त ह्मणावा. तो त्रिगुणांचा त्याग करतो व त्याला सिद्धि तृणवत् असतात.

दो०—माया ईस न आपु कहँ जान कहिय सो जीव। बंध मोच्छप्रद सर्ब पर माया प्रेरक सीव ॥ १४ ॥

ज्याला आपण स्वतः मायेचे प्रभु आहों हें कळत नाहीं तो जीव म्हणावा. जो बंधमोक्ष यांचा दाता असून सर्वांहून पर आणि मायेचा चालक आहे तो ईश्वर होय.

धर्म तें बिरति जोग तें ज्ञाना।
ज्ञान–मोच्छ प्रद बेद बखाना।

धर्मापासून वैराग्य, योगापासून ज्ञान आणि ज्ञानापासून मोक्ष प्राप्त होतो असें वेदांत प्रतिपादन केलें आहे.

जा तें बेगि द्रवउँ मैं भाई।
सो मम भगति भगत–सुख–दाई।
सो सुतंत्र अवलंब न आना।
तेहि आधीन ज्ञान बिज्ञाना।

जेणेंकरून मी तत्काल द्रवतों अशी एक माझी भक्तीच होय. ती भक्तांना सुखी करिते. ती स्वतंत्र असून तिला इतर कशाचाहि आश्रय लागत नाहीं, व ज्ञान आणि विज्ञान हीं तिच्या अंकित असतात.

भगति तात अनुपम सुखमूला।
मिलइ जो संत होहिँ अनुकूला।
भगति के साधन कहउँ बखानी।
सुगम पंथ मोहि पावहिँ प्रानी।

हे ताता ! ही भक्ति अनुपम सुखाला प्राप्त करून देते. परंतु ती संतप्रसादानेंच प्राप्त होते. आतां जेणें-करून जीव सहजगत्या माझी प्राप्ति करून घेऊं शक-तात अशा भक्तीच्या साधनांचें मी वर्णन करतों.

प्रथमहिँ बिप्रचरन अतिप्रीती।
निज निज धरम निरत स्रुतिरीती।
एहि कर फल पुनि बिषयबिरागा।
तब मम धरम उपज अनुरागा।

प्रथमतः विप्रचरणांचे ठिकाणीं अत्यंत प्रेम ठेवून वेदविहित मार्गानें आपापल्या धर्मांचे ठिकाणीं रत असावें. नंतर याचेंच फल म्हणून विषयांचे ठिकाणीं विरक्ति बाणल्यावर माझें धर्माचे ठायीं (भागवत धर्मावर) प्रेम उत्पन्न होतें.

स्रवनादिक नव भगति दृढाहीँ।
मम लीला रति अति मन माहीँ।
संत–चरन–पंकज अति प्रेमा।
मन क्रम बचन भजन दृढ नेमा।
गुरु पितु मातु बंधु पति देवा।
सब मोहि कहँ जानइ दृढ सेवा।

अशा रीतीनें श्रवणादिक नवविधा भक्ति दृढ

झाल्यावर माझ्या लीलांचे ठिकाणीं भक्ताच्या मनाची अत्यासक्ति होते. त्याचें संतचरणीं अत्यंत प्रेम जडून तो दृढ नेमानें व कायावाचामनेंकरून माझें भजन करितो, व गुरु, पिता, माता, बंधु, स्वामी, देव इत्यादि सर्व मला समजून माझी अखंड सेवा करितो,

मम गुन गावत पुलक सरीरा ।
गदगद गिरा नयन बह नीरा ।
काम आदि मद दंभ न जा के ।
तात निरंतर बस मैं ता के ।

माझे गुण गात असतां त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहून त्याची वाणी सद्गदित होते, व त्याच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागतात. त्याचे काममददंभादि विकार नष्ट होतात. हे तात! मी निरंतर अशांनाच वश असतों.

दो०–बचन करम मन मोरि गति भजन करहिं निःकाम । तिन्ह के हृदय कमल महँ करउँ सदा बिस्राम ॥ १५ ॥

कायावाचामनेंकरून अनन्यगतिक होत्साते जे माझेंच अहेतुक भजन करितात त्यांच्याच हृदयकमलामध्यें मी निरंतर वास करितों[1].

चौ०–भगति जोग सुनि अति सुख पावा ।
लछिमन प्रभुचरनन्हि सिरु नावा ।
एहि बिधि गये कछुक दिन बीती ।
कहत बिराग ज्ञान गुन नीती ।

तो भक्तियोग श्रवण करून अत्यंत सुख पावलेल्या लक्ष्मणानें प्रभुचरणीं मस्तक नमविलें. अशा प्रकारें वैराग्य, ज्ञान, गुण आणि नीति इत्यादि विषयांच्या निरूपणांत कांहीं दिवस लोटले.

सूपनखा रावन कै बहिनी ।
दुष्टहृदय दारुन जसि अहिनी ।
पंचबटी सो गइ एक बारा ।
देखि बिकल भइ जुगल कुमारा ।

सर्पिणीप्रमाणें उलट्या काळजाची महाकडक भवानी अशी शूर्पणखा नांवाची रावणाची एक बहीण होती. ती एकदां पंचवटीस गेली असतां तेथें हे दोघे कुमार तिच्या दृष्टीस पडून ती कामविव्हल झाली.

भ्राता पिता पुत्र उरगारी ।
पुरुष मनोहर निरखत नारी ।
होइ बिकल सक मनहिं न रोकी ।
जिमि रबिमनि द्रव रबिहिं बिलोकी ।

हे गरुडा! ऐक. बंधु, पिता, पुत्र कोणी का असेना, अशी स्त्री फक्त मनोहर पुरुष आहे एवढेंच पाहते, आणि ज्याप्रमाणें सूर्यकांतमणि सूर्याला पाहतांच द्रवूं लागतो तद्वत् व्याकुळ होऊन तिला आपल्या मनाचा निरोध करितां येत नाहीं.

रुचिर रूप धरि प्रभुपहिं जाई ।
बोली बचन बहुत मुसुकाई ।
तुह्म सम पुरुष न मो सम नारी ।
यह सँजोग बिधि रचा बिचारी ।
मम अनुरूप पुरुष जग माहीं ।
देखिउँ खोजि लोक तिहुँ नाहीं ।
ता तें अब लगि रहिउँ कुमारी ।
मन माना कछु तुम्हहिं निहारी ।

तेव्हां त्या शूर्पणखेनें खूपच माधुक सोंग स्वतःचें बनविलें व ती रामाकडे येऊन खूपच नखे–ठक्के करीत म्हणाली, तुम्हांसारखा पुरुष आणि माझ्यासारखी स्त्री हा सुयोग ब्रह्मदेवानें विचारपूर्वकच घडवून आणला आहे. मला अनुरूप असा पुरुष ह्या जगांत किंबहुना त्रैलोक्यांतदेखील शोध करून मला आढळला नाहीं, व म्हणूनच आजपर्यंत मी कुमारी राहिलें. परंतु तुम्हांला पहातांच मात्र कांहींसें मन धालें.

सीतहि चितइ कही प्रभु बाता ।
अहइ कुमार मोर लघु भ्राता ।
गइ लछिमन रिपुभगिनी जानी ।
प्रभु बिलोकि बोले मृदुबानी ।

सीतेकडे पाहून ( मी विवाहित आहें असें सुचवून ) राम म्हणाले, माझा धाकटा बंधु कुमार[1] आहे. नंतर ती लक्ष्मणाकडे गेली. परंतु ती शत्रुभगिनी आहे असें जाणून प्रभूकडे पाहून तो सौम्य शब्दांत म्हणाला,—

---

[1] नाहं वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ ।
मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥

[1] येथें लक्ष्मण विवाहित असून रामचंद्र त्याला कुमार म्हणाले तें 'शठे शाठ्यं' या न्यायानें होय. कारण तिनें आपणांस 'कुमारी' म्हणवून घेतलें होतें. वास्तविक ती होती विधवाच.

सुंदरि सुनु मैं उन्ह कर दासा।
पराधीन नहिँ तोर सुपासा।
प्रभु समर्थ कोसल-पुर-राजा।
जो कछु करहिँ उन्हहिँ सब छाजा।
सेवक सुख चह मान भिखारी।
व्यसनी धन सुभगति बिभिचारी।
लोभी जसु चह चार गुमानी।
नभ दुहि दूध चहत ए प्रानी।

हे सुंदरि! ऐक. मी या रामाचा सेवक, अर्थातच पराधीन आहे; सबब येथें तुझी सोय नाहीं. प्रभु कोसलेश्वर सर्व प्रकारें समर्थ आहेत, ते जें करितील तें त्यांना शोभेल. सेवक होऊन जर सुखाची इच्छा एकादा करील, भिकारी होऊन जर मानाची अपेक्षा करील, व्यसनी असून जर धनाची, व्यभिचारी असून शुभ गतीची, लोभी असून यशाची आणि गर्विष्ठ असून लोकसंग्रहाची हाव धरील तर तो प्राणी आकाशांतून दुग्धदोहन करूं इच्छित आहे असें समजावें.

पुनि फिरि राम निकट सो आई।
प्रभु लछिमन पहिं बहुरि पठाई।
लछिमन कहा तोहि सो बरई।
जो तृन तोरि लाज परिहरई।

(हें ऐकून) ती पुन्हां रामाकडे आली. पण त्यांनीं तिला पुन्हां लक्ष्मणाकडेसच वाटेस लावली. तेव्हां लक्ष्मण म्हणाला, जो लज्जेशीं काडीमोड करील तोच तुझ्याशीं पाट जोडील.

तब खिसिआनि राम पहिँ गई।
रूप भयंकर प्रगटत भई।
सीतहि सभय देखि रघुराई।
कहा अनुज सन सैन बुझाई।

तेव्हां ती खिसाणी होऊन फिरून रामाकडे गेली आणि तिनें आपलें भयंकर स्वरूप प्रकट केलें. तेव्हां सीता भयभीत झालेली पाहून रामांनीं लक्ष्मणाला संकेतानें जाणविलें.

**दो०—लछिमन अतिलाघव सोँ नाक कान बिनु कीन्हि। ता के कर रावन कहँ मनहुँ चुनौती दीन्हि॥ १६॥**

लक्ष्मणानें अत्यंत शिताफीनें तिचें नाक व कान उडविले. जणुंकाय त्यानें त्या द्वारानें (तिला विद्रूप करून) रावणास इशारतच दिली.

चौ०—नाक कान बिनु भइ बिकरारा।
जनु स्रव सैल गेरु कैं धारा।
खर दूषन पहिँ गइ बिलपाता।
धिग धिग तव बल पौरुष भ्राता।
तेहि पूछा सब कहेसि बुझाई।
जातुधान सुनि सेन बनाई।

नाककान उडाल्यामुळें ती एक भयंकर आवाच दिसूं लागली. जणुं पर्वतापासून कावेच्या धाराच वाहत आहेत असे रक्ताचे पाट वाहूं लागले. ती बोंबलतच खरदूषणाकडे जाऊन म्हणाली, "अरे भावांनों, जळलं मेल्यानों तुमचं बळ नि आवाका" त्या उभयतांनीं तिला विचारलें असतां तिनें सर्वच उलटया बोंबा ठोकल्या; त्या राक्षसांनीं ऐकतांच आपलें सैन्य सिद्ध केलें.

धाए निसिचर बरनबरूथा।
जनु सपच्छ कज्जल-गिरि-जूथा।
नानाबाहन नानाकारा।
नानायुधधर घोर अपारा।

नानाप्रकारच्या वाहनांवर आरूढ झालेले, नानाप्रकारचीं रूपें धारण केलेले, नानाप्रकारचीं, असंख्य आणि भयंकर आयुधें धारण केलेलें, अनेक तुफान राक्षस धावूं लागले. तेव्हां पंख असलेल्या अनेक कज्जलपर्वतांची धावाधावीची ती एक शर्यतच भासली म्हणाना कां.

सूपनखा आगे करि लीन्ही।
असुभरूप स्रुति-नासा-हीनी।
असगुन अमित होहिँ भयकारी।
गनहिँ न मृत्युबिबस सब झारी।

कर्णनासाविरहित अशा त्या उजाड भवानी शूर्पणखेला त्यांनीं जरीपटक्यावर घातली. तेव्हां अगणित असे भयंकर अपशकुन होऊं लागले. परंतु झाडून सारे मृत्यूस दत्तक दिलेले ते कशाचे तिकडे ढुंकतात.

गर्जहिँ तर्जहि गगन उडाहीँ।
देखी बिकट भट अति हरषाहीँ।
कोउ कह जियत धरहु दोउ भाई।
धरि मारहु तिय लेहु छुडाई।
धूरि पूरि नभमंडल रहा।
राम बोलाइ अनुज सन कहा।

ते अनेक प्रकारची गर्जना करून व एकमेकांना इशारत देऊन आकाशांत उड्डाण करूं लागले. तें पाहून

त्यांतले कांहीं नामी सरदार ह्मणत, त्या दोन्ही बंधूंना जीवंत धरून आणूं आणि नंतर त्यांना ठार करून त्यांच्या अंतुरीस आपण बळकावूं. इकडे अस्मान धुळींनें गर्द झालेलें पाहून रामांनीं लक्ष्मणास बोलावून त्याला फरमाविलें कीं,

लेइ जानकिहि जाहु गिरिकंदर ।
आवा निसि-चर-कटकु भयंकर ।
रहेहु सजुग सुनि प्रभु कै बानी ।
चले सहित श्री सर-धनु-पानी ।
देखि राम रिपुदल चलि आवा ।
बिहँसि कठिन कोदंड चढावा ।

" जानकीस घेऊन गिरिकंदरांत जा. भयंकर राक्षससैन्य लोटत आहे. सावध ऐस. " ही रामाज्ञा होतांच धनुर्बाण हातांत घेऊन सीतेसह लक्ष्मण गेला. रामांनीं शत्रुसैन्य चाल करून येत आहे असें पाहून हास्यपूर्वक आपल्या भयंकर धनुष्यास प्रत्यंचा चढविली.

**छंद–कोदंड कठिन चढाइ सिर जटजूट बाँधत सोह क्यौं । मरकत सैल पर लरत दामिनि कोटि सों जुग भुजग ज्यौं ॥ कटि कसि निषंग बिसाल भुज गहि चाप बिसिख सुधारि कै । चितवत मनहुँ मृगराज प्रभु गज-राज-घँटा निहारि कै ॥ २ ॥**

तें कठिण कोदंड चढवून प्रभु मस्तकावरील जटाजूट (दोन्ही हातांनीं) सावरून बांधूं लागले. तेव्हां असें दिसलें कीं, जणुंकाय नीलमण्यांच्या पर्वतशिखरावर कोटिशःविजा चमकत असून दोन भुजंगांनीं त्यास वेढलें आहे. कमरेस भाते कसून आणि विशाल भुजांचे ठायीं चाप आणि बाण धारण करून प्रभु ( सैन्य येत होतें त्या दिशेकडे ) न्याहाळूं लागले. तेव्हां असें वाटलें कीं जणुं मत्त गजांच्या कळपाकडे मृगराजच न्याहाळीत आहे.

**सो०–आइ गये बग मेल धरहु धरहु धावत सुभट । जथा बिलोकि अकेल बाल-रबिहिँ घेरत दनुज ॥ ७ ॥**

इतक्यांत ती राक्षसवीरांची टोळधाड येऊन थडकलीच. बालसूर्यास एकाकी पाहून जसे दैत्य त्याजवर झडप घालतात त्याप्रमाणें सर्व राक्षस लगट करून 'धरा धरा' अशी ओरड करीत रामास गराडा घालूं लागले.

चौ०–प्रभु बिलोकि सर सकहिँ न डारी ।
थकित भई रजनी-चर-धारी ।

प्रभूस पाहतांच त्यांच्यानें बाण सोडवेना. सर्व राक्षससैन्य थक्क झालें.

सचिव बोलि बोले खरदूषन ।
यह कोउ नृपबालक नरभूषन ।
नाग असुर सुर नर मुनि जेते ।
देखे जिते हते हम केते ।
हम भरि जनम सुनहु सब भाई ।
देखी नहिँ असि सुंदरताई ।

खरदूषण सचिवांस बोलावून म्हणाले, हे कोणीतरी नररत्न राजकुमार आहेत. भाई हो ! ऐका. नाग, असुर, सुर, नर, मुनी इत्यादि जेवढे म्हणून आम्हीं पाहिले आहेत, जिंकले आहेत किंवा मारले आहेत, त्यांच्यांत असले सुरतबाज चेहरे आम्हीं आपल्या उभ्या हयातींत देखील पाहिले नाहींत.

जद्यपि भगिनी कीन्हि कुरूपा ।
बध लायक नहिँ पुरुष अनूपा ।
देहु तुरत निजनारि दुराई ।
जीवत भवन जाहु दोउ भाई ।
मोर कहा तुम्ह ताहि सुनावहु ।
तासु बचन सुनि आतुर आवहु ।

यांनीं जरी आमची अक्का आवा केली असली तरी हीं बेजोड माणसें कत्तलीस लायक नाहींत. त्यांनीं लपविलेल्या आपल्या स्त्रीवर पाणी सोडावें, आणि दोघांहि बंधूंनीं खुशाल जीवंत घरीं जावें, हा आमचा निरोप त्यांस कळवा, आणि त्यांचा जबाब लवकर घेऊन या.

दूतन्ह कहा राम सन जाई ।
सुनत राम बोले मुसुकाई ।
हम छत्री मृगया बन करहीँ ।
तुम्ह से खल मृग खोजत फिरहीँ ।
रिपु बलवंत देखि नहिँ डरहीँ ।
एक बार कालहु सन लरहीँ ।
जद्यपि मनुज दनुज कुल-घालक ।
मुनिपालक खलसालक बालक ।

दूतांनीं जाऊन रामास निरोप कळविला. तो ऐकून राम हंसून म्हणाले, आम्ही क्षत्रिय वनांत

मृगया करीत तुम्हांसारख्या बियाबान सावजांना हुडकून काढण्यासाठीं हा आम्हीं दौरा काढला आहे. शत्रु बलाढ्य पाहून भिणारे आम्ही नाहीं. एक वेळ काळाशीं देखील टक्कर घेऊं. जरी आम्हीं मानव बालक असलों तरी मुनींचे पालक, दैत्यकुलांचे निर्दालक आणि खलांचे शासक आहोंत.

जौँ न होइ बल घर फिरि जाहू ।
समरबिमुख मैँ हतऊँ न काहू ।
रन चढि करिय कपट चतुराई ।
रिपु पर कृपा परम कदराई ।

जर तुमच्यांत कुव्वत नसेल तर घरीं परत जा. रणांगणास पाठ फेरणाऱ्याला मी मारीत नसतों. समरभूमीवर चढाई करून कपट करण्यांतच तुमची हुषारी. शत्रूवर दया करणें ही निवळ नामर्दाई होय.

दूतन्ह जाइ तुरत सब कहेउ ।
सुनि खर दूपन उर अति दहेउ ।

जासुदांनीं ताबडतोब जाऊन तें सर्व वर्तमान खर-दूषणांस सांगितलें. तें ऐकतांच त्यांची छाती अगदीं भडकून गेली.

**छंद–उर दहेउ कहेउ कि धरहु धाये बिकट भट रजनीचरा । सर-चाप-तोमर-सक्ति-सूल-कृपान-परिघ-परसु-धरा ॥ प्रभु कीन्ह धनुषटँकोर प्रथम कठोर घोर भयावहा । भये बधिर ब्याकुल जातुधान न ग्यान तेहि अवसर रहा ॥ ३ ॥**

मनांत क्रोधसंतप्त होऊन ते म्हणाले, ' अहो जंगी राक्षसवीर हो ! हूँ धरा. ' इतकें ऐकतांच धनुष्य, बाण, तोमर, शक्ति, शूल, खड्ग, परिघ, परशु इत्यादि घेऊन ते राक्षसवीर धांवूं लागले. प्रभूंनीं प्रथम धनुष्याचा टणत्कार केला. तो अत्यंत भयंकर आणि कठोर ध्वनि ऐकतांच सर्व राक्षस बधिर आणि भयभीत झाले. त्या वेळीं त्यांना कांहींच भान उरलें नाहीं.

**दो०–सावधान होइ धाये जानि सबल आराति । लागे बरषन राम पर अस्त्र सस्त्र बहु भाँति ॥ १७ ॥**
**तिन्ह के आयुध तिल सम करि काटे रघुबीर । तानि सरासन स्रवन लगि पुनि छाडे निज तीर ॥ १८ ॥**

मागाहून ते सावध होऊन रामावर धांवले, आणि शत्रु कणखर जाणून अनेक शस्त्रास्त्रांचा वर्षाव करूं लागले. रामांनीं त्यांच्या आयुधांचे तिळाएवढे तुकडे पाडले, आणि धनुष्य आकर्ण ओढून पुन्हां राक्षसांवर आपले बाण सही केले.

तोमर छंद–तव चले बान कराल ।
फुंकरत जनु बहु ब्याल ।
कोपेउ समर श्रीराम ।
चले बिसिख निसित निकाम ।
अवलोकि खरतर तीर ।
मुरि चले निसिचर बीर ।
भये क्रुद्ध तीनिउ भाइ ।
जो भागि रन तेँ जाइ ।
तेहिं बधब हम निजपानि ।
फिरे मरन मन महुँ ठानि ।

तेव्हां सर्पाप्रमाणें फूत्कार करीत अनेक तीक्ष्ण बाण सुटूं लागले. रणांत रामचंद्र क्रुद्ध होतांच असंख्य प्रखर बाण वर्षूं लागले. ते खडतर बाण पाहून राक्षसवीर पाय काढण्यास सरसावले. खर, दूषण व त्रिशिरा हे तिघे बंधु क्रुद्ध होऊन म्हणाले कीं, जो रणांतून पळून जाईल त्याला आम्ही स्वहस्तानें ठार करूं. असें ऐकतांच सर्व राक्षस मरण्याचा निश्चय करून परतले.

आयुध अनेक प्रकार ।
सनमुख तेँ करहि प्रहार ।
रिपु परम कोपे जानि ।
प्रभु धनुष सर संधानि ।

ते आघाडीवर उभे राहून अनेक प्रकारच्या आयुधांची मारागिरी करूं लागले. शत्रुपक्ष अत्यंत क्रुद्ध झाला आहे असें जाणून प्रभूंनीं धनुष्यावर शरसंधान केलें.

छाडे बिपुल नाराच ।
लगे कटन बिकट पिसाच ।
उर सीस भुज कर चरन ।
जहँ तहँ लगे महि परन ।
चिक्करत लागत बान ।
धर परत कु–धर–समान ।
भट कटत तन सतखंड ।
पुनि उठत करि पाखंड ।

नभ उडत बहु भुज मुंड ।
बिनु मौलि धावत रुंड ।
खग कंक काक सृगाल ।
कटकटाहिँ कठिन कराल ।

रामांनीं असंख्य बाणांची बरसात बरसविली. तेव्हां ते भयंकर पिशाच गारद होऊं लागले. जिकडे तिकडे उर, मस्तक, भुज, कर, चरण यांचा जमिनीवर सडा सांडला. बाणांच्या बिजनबत्तीनें राक्षस चीं चीं करीत, आणि त्यांचीं पर्वतप्राय धडें गळून पडत. कांहीं वीरांचे देह शतशः खंडित होत, तथापि फिरून उठून ते आपली सैतानी करीतच. आकाशांत अनेक भुज आणि मस्तकें उडूं लागलीं. मस्तकांवांचून धडें धावूं लागलीं. कावळे, गिधाडें, कोल्हे इत्यादि पशुपक्षी तीक्ष्ण आणि भयंकर शब्द करूं लागले.

छंद–कटकटहिँ जंबुक भूत प्रेत पिसाच
खप्पर संचहीँ । बेताल बीर कपाल
ताल बजाइ जोगिनि नंचहीँ ॥
रघु–बीर–बान प्रचंड खंडहिँ भटन्ह
के उर भुज सिरा । जहँतहँ परहिँ
उठि लरहिँ धरु धरु धरु करहिँ भय-
कर गिरा ॥ ४ ॥

कोल्हे कुइकुइ करीत. भूत, प्रेत, पिशाच आपलीं खापरें रक्तानें भरीत. वीरांच्या मस्तकांच्या कवट्यांनीं वेताल ताल धरीत व योगिनी नृत्य करीत. रघुवीराच्या प्रचंड बाणांनीं वीरांचे उर, शिर व भुज खंडित होऊन चोहोंकडे पडूं लागत, तरी फिरून उठून 'धरा, धरा, पकडा' असा भयंकर शब्द करून ते लढतच.

अंतावरी गहि उडत गीध पिसाच कर
गहि धावहीँ । संग्राम-पुर बासी मनहु
बहुबाल गुडी उडावहीँ ॥ मारे पछारे
उर बिदारे बिपुल भट कहँरत परे ।
अवलोकि निज दल बिकट भट तिसि-
रादि खर दूषन फिरे ॥ ५ ॥

आंतडीं घेऊन गिधाडें उडत; हस्त घेऊन पिशाच पळत. जणुंकाय संग्रामरूपी नगरांत राहणारी बालदलें झंड्या उभारीत आहेत असें दिसे. कांहीं मेले, कांहीं पडले, कांहींचीं वक्षःस्थळें विदीर्ण झालीं, आणि अनेक योद्धे विवळत पडले. अशाप्रकारें आपल्या सैन्याची खूनखराबी झालेली पाहून खर, दूषण, त्रिशिरादिक योद्धे पुढें सरसावले.

सर सक्ति तोमर परसु सूल कृपान
एकहिँ बारहीँ। करि कोप श्री–रघु–
बीर पर अगनित निसाचर डारहीँ ॥
प्रभु निमिष महुँ रिपुसर निवारि प्रचारि
डारे सायका । दस दस बिसिख उर
माँझ मारे सकल निसि-चर-नायका ॥६॥

शर, शक्ति, तोमर, परशु, शूल, खड्ग इत्यादि असंख्य आयुधें राक्षसांनीं क्रुद्ध होऊन श्रीरघुवीरावर एकदम सोडलीं. परंतु प्रभूंनीं निमिषमात्रांत शत्रूंचीं सर्व आयुधें हाणून पाडलीं आणि गर्जना करून त्यांच्यावर उलट बाणांची सर धरली. प्रत्येक राक्षस-नायकाच्या वक्षःस्थलीं दहा दहा बाणांचा मारा सुरूं केला.

महि परत पुनि उठि भिरत मरत न
करत माया अतिघनी। सुर डरत चौदह-
सहस प्रेम बिलोकि एक अवधधनी ॥
सुर मुनि सभय प्रभु देखि मायानाथ
अतिकौतुक कर्‌यौ । देखहिँ परसपर
राम करि संग्राम रिपुदल लरि मर्‌यौ ।७।

जमीनदोस्त झालेले वीर न मरतां पुन्हां उठत आणि फिरून लढूं लागून अनेक प्रकारची आटोकाट दगाबाजी करीत. एकीकडे चौदा हजार राक्षस आणि दुसरीकडे एकटे अयोध्यापति रामचंद्र, हें पाहून देव प्रेमानें भयभीत झाले. देव आणि मुनी भयभीत झालेले पाहून मायापति प्रभूनें असा घनघोर चमत्कार केला कीं, राक्षस परस्परांस राम समजून लढूं लागले आणि अशा रीतीनें शत्रूचें सैन्य आपसांतच लढून सफाई गारद झालें.

दो०–राम राम कहि तनु तजहिँ पावहिँ
पद निर्बान । करि उपाय रिपु मारे
छन महुँ कृपानिधान ॥ १९ ॥
हरषित बरषहिँ सुमन सुर बाजहिँ
गगन निसान । अस्तुति करि करि सब
चले सोभित बिबिध बिमान ॥ २० ॥

ते राक्षसवीर राम राम म्हणत प्राण सोडीत, आणि मोक्षपदास जात. अशा युक्तीनें कृपानिधान प्रभूंनीं क्षणामध्यें शत्रूंचा फडशा पाडला. देव संतुष्ट होऊन पुष्पवृष्टि करूं लागले. आकाशांत वाद्यें वाजूं लागलीं. सर्व देव रामाची स्तुति करीत अनेक सुंदर विमानांतून परतले.

चौ०—जब रघुनाथ समर रिपु जीते।
सुर नर मुनि सब के भय बीते।
तब लछिमनु सीतहिँ लेइ आये।
प्रभु पद परत हरषि उर लाये।
सीता चितव स्याम मृदु गाता।
परम प्रेम लोचन न अघाता।

जेव्हां रामांनीं रणांत शत्रूंचें नांवनिशाण देखील उरूं दिलें नाहीं, तेव्हां देव, नर, मुनि इत्यादि सर्व निर्भय झाले. नंतर लक्ष्मण सीतेस घेऊन आला, आणि त्यानें प्रभुचरणीं लोटांगण घातलें. रामांनीं त्यास आनंदानें आलिंगन दिलें. ती श्यामसुंदर मूर्ति अत्यंत प्रेमपूर्वक अवलोकन करीत असतां सीतेच्या नेत्रांची तृप्ति होईना.

पंचबटी बसि श्री-रघु-नायक।
करत चरित सुर-मुनि-सुख-दायक।

सुर आणि मुनी ह्यांना सुखकारक अशीं चरित्रें करीत श्रीरघुनायक पंचवटीमध्यें वास करूं लागले.

धुआँ देखि खरदूषन केरा।
जाइ सुपनखा रावनु प्रेरा।
बोली बचन क्रोध करि भारी।
देस कोस कै सुरति बिसारी।
करसि पान सोवसि दिनु राती।
सुधि नहिँ तव सिर पर आराती।

खरदूषणादिकांचा धुव्वा उडालेला पहातांच शूर्पणखा ( लंकेंत जाऊन ) रावणास उठावणी देण्यासाठीं अगदीं खूपच घालून बोलूं लागली, तूं तर देशाची आणि कोशाची ( खजिन्याची ) आठवणच विसरलास. रात्रंदिवस दारू पिऊन नुसता घोरत पडतोस पण तुझ्या डोक्यावरील शत्रूंची तुला अजून खबरहि नाहीं.

राजु नीति बिनु धन बिनु धर्मा।
हरिहि समर्पे बिनु सतकर्मा।
बिद्या बिनु बिबेक उपजाये।
स्रम फल पढे किये अरु पाये।
संग तेँ जती कुमंत्र तेँ राजा।
मान तेँ ज्ञान पान तेँ लाजा।
प्रीति प्रनय बिनु मद तेँ गुनी।
नासहिँ बेगि नीति असि सुनी।

नीतीवांचून राज्य, धर्मावांचून धन, भगवदर्पणावांचून पुण्याचरण, विवेकावांचून विद्या—अर्थात् ज्ञान झालें तरच विद्येचें फल प्राप्त झालें असें ह्मणावें, नाहींतर पढण्याचे श्रम फुकटच समजावयाचे—तसेंच कुसंगतीनें संन्यासी, दुष्ट मंत्र्याच्या योगानें राजा, गर्वानें ज्ञान, मद्यपानानें लज्जा, अहंकारानें सद्गुण आणि नम्रतेवांचून प्रीति सत्वर नष्ट होतात ही नीति तुझ्या कानावर आहेना ?

सो०—रिपु रुज पावक पाप प्रभु अहि गनिय न छोट करि। अस कहि बिबिध बिलाप करि लागी रोदन करन ॥ ८ ॥

वैरी, रोग, अग्नि, पाप, स्वामी आणि सर्प यांना क्षुद्र समजून वागतां कामा नये. अशाप्रकारें बोलून आणि खूपच अगस्ताळेपणा करून ती पुनःपुन्हा टाहो फोडूं लागली.

दो०—सभा माँझ परि ब्याकुल बहु प्रकार कह रोइ। तोहि जियत दसकंधर मोरि कि असि गति होइ ॥ २१ ॥

अनेकप्रकारें रुदन करून ती भरसभेंत व्याकुल होऊन पडली आणि म्हणाली, हे दशमुखा ! तुझ्या नाकावर टिच्चून माझी ही अशी अस्मानी सुलतानी व्हावी काय रे ?

चौ०—सुनत सभासद उठे अकुलाई।
समुझाई गहि बाहँ उठाई।
कह लंकेस कहसि किन बाता।
केइ तव नासा कान निपाता।

तें ऐकतांच कांहीं खासदार मंडळी गडबडून उठली आणि तिचा हात धरून त्यांनीं तिला उठविली आणि तिची समजूत घातली. रावण म्हणाला, काय झालें तें सांगत कां नाहींस. तुझें नाक आणि कान कोणीं कापले ?

अवधनृपति दसरथ के जाये
पुरुषसिंह बन खेलन आये।
समुझि परी मोहि उन्ह कै करनी।
रहित निसाचर करिहहिँ धरनी।

जिन्ह कर भुजबल पाइ दसानन।
अभय भये बिचरत मुनि कानन।
देखत बालक कालसमाना।
परमधीर धन्वी गुन नाना।

तेव्हां ती म्हणाली, अयोध्याधीश दशरथाचे पुरुषसिंह पुत्र वनांत शिकारीसाठीं आले आहेत. मला त्यांची कारवाई पूर्णपणें कळून चुकली. ते ही सारी पृथ्वी राक्षसहीन खास करणार! हे दशानना! त्यांच्या भुजबलेंकरून मुनिलोक अरण्यामध्यें निश्चिंत होऊन संचार करीत आहेत. ते दिसण्यांत बच्चे दिसतात, परंतु वास्तविक ते काळासमान असून खूपच खंबीर आणि नानाप्रकारच्या धनुर्विद्येंत पक्के पटाईत आहेत.

अतुलित-बल-प्रताप दोउ भ्राता।
खल-बध-रत सुर-मुनि-सुख-दाता।
सोभाधाम राम अस नामा।
तिन्ह के संग नारि एक स्यामा।
रूपरासि बिधि नारि सँवारी।
रति सतकोटि तासु बलिहारी।
तासु अनुज काटे स्रुति नासा।
सुनि तव भगिनि करहिँ परिहासा।

ते उभय बंधु असामान्य बलाढ्य आणि प्रतापी असून खलांच्या बरबादीवर आणि सुर व मुनी यांच्या सुखासमाधानावर टपलेले आहेत. त्यांतून जो कमाल साजरा आहे त्याचें नांव राम आहे. बरोबर एक स्त्रीहि आहे, ती तर शुद्ध चमक बिजलीच समज. विधात्यानें केलेली ती सौंदर्याची खाणच वाटते. कोट्यवधि रती तिजवरून केवळ ओवाळून फेकाव्या. त्या रामाच्या धाकट्या भावानें माझें नाक आणि कान खच्ची केले. मी तुझी बहीण म्हणूनच त्यांनीं ही अशी माझी मसकरी केली.

खरदूषन सुनि लगे पुकारा।
छन महु सकल कटक उन्ह मारा।
खर-दूषन-तिसिरा कर घाता।
सुनि दससीस जरे सब गाता।

हें ऐकून खरदूषण त्यांस युद्धास पाचारूं लागले; परंतु त्यांनीं सर्व सैन्यासह त्यांना एका क्षणांतच गारद करून टाकलें. खर, दूषण आणि त्रिशिर नेस्तनाबूद झालेले ऐकतांच रावणाच्या सर्वांगाची लाही झाली.

दो०-सूपनखहि समुझाइ करि बल बोलेसि बहु भाँति। गयेउ भवन अति-सोच-बस नीँद परइ नहिँ राति॥ २२॥

शूर्पणखेची समजूत घालून व आपल्या पराक्रमाची अनेक प्रकारें शेखी मिरवून तो अत्यंत चिंताग्रस्त होत्साता मंदिरांत गेला. त्या रात्रीं त्यास झोंपदेखील आली नाहीं.

चौ०-सुर नर असुर नाग खग माहीँ।
मोरे अनुचर कहँ कोउ नाहीँ।
खरदूषन मोहिँ सम बलवंता।
तिन्हहिँ को मारइ बिनु भगवंता।

सुर, नर, असुर, नाग, खग ह्यांच्यामध्यें माझ्या या अनुचरांना कोणीच पाड नव्हता. खर, दूषण हे माझ्याच तोलाचे जहांबाज पट्टे, त्यांना एका भगवंताखेरीज मारण्यास कोणाची बिशाद आहे!

सुररंजन भंजन महिभारा।
जौँ भगवंत लीन्ह अवतारा।
तौ मैँ जाइ बयरु हठि करऊँ।
प्रभुसर प्रान तजे भव तरऊँ।

देवांचें रक्षण आणि पृथ्वीच्या भाराचें हरण करणारा जो जगदीश त्यानेंच जर अवतार घेतला असेल तर मी जाऊन त्याच्याशीं हट्टानें शत्रुत्व करीन आणि ह्याच प्रभूच्या बाणानें मरून संसाराचा बेडा पार करीन.

होइहि भजनु न तामस देहा।
मन क्रम बचन मंत्र दृढ एहा।
जौँ नररूप भूपसुत कोऊ।
हरिहउँ नारि जीति रन दोऊ।

ह्या तामस देहानें भगवद्भजन होत नाहीं. तेव्हां कायावाचामनेंकरून हाच निश्चय ठाम झाला. जर ते कोणी साधारण मानव राजपुत्र असतील तर त्यांना रणांत धूळ चारून त्यांची स्त्री घरांत घालीन.

चला अकेल जान चढि तहवाँ।
बस मारीच सिंधु तट जहवाँ।

( असा निश्चय करून ) रावण एकटाच रथांत बसून सिंधुतटीं मारीच राक्षसाच्या आश्रमास गेला.

इहाँ राम जसि जुगुति बनाई।
सुनहु उमा सो कथा सुहाई।

शंकर म्हणतात, हे पार्वति ! इकडे रामचंद्रांनींहि एक अजबच गुपित थाटलें तेंहि ऐकून ठेव.

**दो०—लछिमन गये बनहिँ जब लेन मूल फल कंद। जनकसुता सन बोले बिहँसि कृपा-सुख-बृंद ॥ २३ ॥**

लक्ष्मण कंदमूलादि आणण्यास वनांत गेला असतां कृपासुखानिधान रामचंद्र सीतेस हास्यपूर्वक म्हणाले,—

चौ०—सुनहु प्रिया ब्रत रुचिर सुसीला।
मैँ कछु करब ललित नरलीला।
तुम्ह पावक महँ करहु निवासा।
जौँ लगि करउँ निसा-चर-नासा।

हे रुचिरव्रतशालिनी प्रिये, ऐक ! मी कांहीं एक चमत्कारिक नरलीला करणार आहे. तेव्हां मी राक्षसांचा नाश करीपर्यंत तूं अग्नीमध्यें निवास कर.

जबहिँ राम सबु कहा बखानी।
प्रभुपद धरि हिय अनल समानी।
निज प्रतिबिंब राखि तहँ सीता।
तैसइ सील रूप सुबिनीता।
लछिमनहूँ यह मरम न जाना।
जो कछु चरित रचेउ भगवाना।

जेव्हां रामांनीं सीतेला सर्व समजावून सांगितलें तेव्हां प्रभुपद हृदयांत ठेवून सीतेनें अग्निप्रवेश केला व आपली छाया मात्र तेथें ठेविली. ती छायाहि शीलानें आणि रूपानें तशीच विनीत होती. भगवंतांनीं हें रचलेलें कोडें लक्ष्मणासहि उमगलें नाहीं.

दसमुख गयउ जहाँ मारीचा।
नाइ नाथ स्वारथरत नीचा।
नवनि निच कै अति दुखदाई।
जिमि अंकुस धनु उरग बिलाई।
भयदायक खल कै प्रिय बानी।
जिमि अकाल के कुसुम भवानी।

इकडे रावण मारीचाकडे जाऊन पोंचला. त्या स्वार्थसाधु नीचानें त्याचेपुढें मस्तक नमविलें. नीचांचा नम्रीभाव, अंकुश, धनुष्य, सर्प आणि मांजर यांच्या प्रमाणेंच अत्यंत दुःखावह होतो. हे पार्वति ! अकाळीं आलेल्या फुलाप्रमाणें खलांचे लडिवाळ बोल देखील भयदायकच असतात.

**दो०—करि पूजा मारीच तब सादर पूछी बात। कवन हेतु मन ब्यग्र अति अकसर आयहु तात ॥ २४ ॥**

नंतर रावणाचा योग्य सत्कार करून मारीचानें आदरपूर्वक विचारलें, बा रावणा ! कोणत्या मनाचा मनोरा रचून इतका चिंतातुर होत्साता तूं अचानक येथें येऊन ठेपलास ?

चौ०—दसमुख सकल कथा तेहि आगे।
कही सहित अभिमान अभागे।
होहु कपटमृग तुम्ह छलकारी।
जेहि बिधि हरि आनउँ नृपनारी।

त्या अभागी रावणानें त्याच्यासमोर मोठ्या आढ्यतेनें सर्व वर्तमान सांगितलें; नंतर तो म्हणाला, तूं चांगलाच छाट आहेस, तेव्हां तूं अशा रीतीनें कपटमृगाचा वेष घे कीं जेणेंकरून मला राजपत्नी सीतेस दग्यानें उडवितां येईल.

तेहि पुनि कहा सुनहु दससीसा।
ते नररूप चरा-चर-ईसा।
ता सोँ तात बयरु नहिँ कीजै।
मारे मरिय जिआये जीजै।

नंतर मारीच ह्मणाला, रावणा ! ऐक. ते मानवरूपधारी चराचर सृष्टीचे धनी आहेत. बाबा रे ! त्यांच्याशीं तूं खाजवूं नयेस. जगांत जगण्यामरण्याचा प्रश्न केवळ त्यांचाच ऐच्छिक आहे.

मुनिमख राखन गयउ कुमारा।
बिनु फर सर रघुपति मोहि मारा।
सत जोजन आयउँ छन माहीँ
तिन्ह सन बयरु किये भल नाहीँ।

विश्वामित्रांच्या यज्ञाचें रक्षण करण्याकरितां ते कुमार गेले होते. त्या वेळीं रघुपतींनीं मला बिन फळाचा एक साधा बाण हाणला. तसाच मी एका क्षणांत शंभर योजनांवर येथें येऊन पडलों. त्यांच्याशीं उगीचच विरोध वाढविण्यानें खराबीच समज.

भइ मम कीट भृंग की नाईँ।
जहँ तहँ मैँ देखउँ दोउ भाई।
जौँ नर तात तदपि अति सूरा।
तिन्हहिँ बिरोधि न आइहि पूरा।

तेव्हांपासून कीटभृंगन्यायानें माझी ही अवस्था झाली आहे कीं मला सदा व सर्वत्र त्या दोघां भावांच्या सारख्या काजण्या लागल्या आहेत. बाबा रे !

जरी ते मानव असले तरी अत्यंत शूर आहेत. त्यांच्याशीं खरुज काढून निभाव लागणार नाहीं.

**दो०–जेहि ताडका सुबाहु हति खंडेउ हरकोदंड । खर दूषन तिसिरा बधेउ मनुज कि अस बरिबंड ॥ २५ ॥**

ज्यांनीं ताटका, सुबाहु यांना फस्त केलें, शिवचापाचे तुकडे उडविले; आणि खरदूषणत्रिशिरांची बरबादी उडविली ते नुसते बलाढ्य मानवच समजावयाचे काय रे ?

चौ०–जाहु भवन कुलकुसल बिचारी ।
सुनत जरा दीन्हेसि बहु गारी ।

आपल्या कुळाच्या कल्याणाचा विचार करून घरीं परत. हें ऐकून रावणाचा जळफळाट होऊन त्यानें मारीचाला पुष्कळच शिव्या हसडल्या.

गुरु जिमि मूढ करासि मम बोधा ।
कहु जग मोहि समान को जोधा ।

रावण म्हणाला, मूर्खा, गुरूप्रमाणें मला शहाणपण शिकवितोस काय ? माझ्या तोडीचा योद्धा कोण आहे तें स्पष्ट सांगत कां नाहींस ? .

तब मारीच हृदय अनुमाना ।
नवहि बिरोधे नहिँ कल्याना ।
सस्त्री मर्मी प्रभु सठ धनी ।
बैद्य बंदि कबि भानसगुनी ।

नंतर मारीचानें मनांत विचार केला कीं, शस्त्रधारी, गुप्त हेर, राजा शठ, धनी, वैद्य, भाट, कवी आणि सूपशास्त्री ( स्वयंपाकी ) ह्या नऊ जणांशीं वितुष्ट पाडणें हिताचें होत नसतें.

उभय भाँति देखा निजमरना ।
तब ताकेसि रघु-नायक-सरना ।
उतरु देत मोहि बधब अभागे ।
कस न मरउँ रघु-पति-सर लागे ।

दोहींपक्षीं आपलें मरण ओढवलेलें पाहून त्यानें रघुनायकासच शरण जाण्याचा निश्चय केला. ' याला नकार भरल्यास हा दुष्ट माझा प्राण घेणार, मग रघुपतीचा बाण लागून मेलेलें तरी काय वाईट ? '—

अस जिय जानि दसाननसंगा ।
चला राम-पद-प्रेम अभंगा ।
मन अति हरष जनाव न तेही ।
आजु देखिहउँ परमसनेही ।

असा विचार करून तो रावणाबरोबर जाण्यास निघाला. त्याचें रामचरणीं अढळ प्रेम होतें. तेणेंकरून त्याच्या मनास अतिशय हर्ष वाटला. परंतु त्यानें तो रावणास कळूं दिला नाहीं. आज त्या परम दयाघनाचें दर्शन घडणार—( हाच विचार एकसारखा त्याच्या मनांत घोळत होता. )

**छंद–निज परम प्रीतम देखि लोचन सुफल करि सुख पाइहउँ । श्रीसहित अनुज-समेत कृपा–निकेत–पद मन लाइहउँ ॥ निर्बानदायक क्रोध जा कर भगति अबसहि बस करी । निजपानि सर संधानि सो मोहि बधिहि सुखसागर हरी॥८॥**

आपल्या परमप्रियतमास पाहून मी आपल्या नेत्रांचें सार्थक करीन आणि सुखी होईन. जानकीलक्ष्मणांसहित त्या दयाघनाचे चरणीं मी आपलें चित्त लावीन. भक्तीला जो अवश्य वश होतो, परंतु ज्याचा क्रोधदेखील मोक्षप्रदच असतो, तो सुखसागर श्रीहरी स्वहस्तें बाण सोडून माझे प्राण हरण करो.

**दो०–मम पाछे धर धावत धरे सरासन बान । फिरि फिरि प्रभुहिँ बिलोकिहउँ धन्य न मो सम आन ॥ २६ ॥**

चापबाण घेऊन मला धरण्यासाठीं प्रभु माझा पाठलाग करींत धांवतील तेव्हां मागें वळून मी वारंवार प्रभूस पाहीन. माझ्यासारखा धन्य आज खरा एक मीच.

चौ०–तेहि बन निकट दसानन गयऊ ।
तब मारीच कपटमृग भयऊ ।
अतिबिचित्र कछु बरनि न जाई ।
कनकदेह मनिरचित बनाई ।

नंतर त्या दंडकवनाजवळ रावण गेला, व मारीच मायामृग झाला. त्यानें अत्यंत विचित्र आणि अवर्णनीय असा रत्नखचित सुवर्णदेह धारण केला.

सीता परमरुचिर मृग देखा ।
अंग अंग सुमनोहर बेखा ।
सुनहु देव रघुबीर कृपाला ।
एहि मृग कर अतिसुंदर छाला ।
सत्यसंध प्रभु बध करि एही ।
आनहु चर्म कहति बैदेही ।

सर्वांगसुंदर आणि अत्यंत रमणीय वेषाचा तो मृग सीतेनें पाहिला व ती म्हणाली, हे दयाघन रघुवीर प्रभो ! ह्या मृगाचें चर्म अत्यंतच सुंदर वाटतें. हे सत्यप्रतिज्ञ प्रभो ! ह्याचा वध करून तेवढें चर्म आणावयाचें व्हावें.

तब रघुपति जानत सब कारन ।
उठे हरषि सुरकाज सँवारन ।
मृग बिलोकि कटि परिकर बाँधा ।
करतल चाप रुचिरसर साँधा ।
प्रभु लछिमनहिँ कहा समुझाई ।
फिरत बिपिन निसिचर बहु भाई ।
सीता केरि करेहु रखवारी ।
बुधि बिबेक बल समय बिचारी ।

तेव्हां रामचंद्रांनीं कार्याचा आढावा घेऊन देवकार्य सिद्धीस नेण्याकरितां ते उत्कंठेनें उठले. त्या हरिणास पाहून त्यांनीं कंबर कसली व हातांत सुंदर धनुष्य घेऊन त्यावर शरसंधान केलें. प्रभूंनीं लक्ष्मणास निक्षून सांगितलें कीं, वनांत राक्षससमुदाय संचार करीत आहे. अक्कलहुषारीनें काळवेळाचा विचार करून त्वां सीतेचें रक्षण करावयास हवें.

प्रभुहि बिलोकि चला मृग भाजी ।
धाये राम सरासन साजी ।
निगम नेति सिव ध्यान न पावा ।
मायामृग पाछे सो धावा ।

प्रभूस पाहून मृग पळूं लागला. तेव्हां प्रभूहि चाप सज्ज करून त्याचा पाठलाग करूं लागले. वेद ज्याचा महिमा ‘ नेति नेति ’ म्हणून गातात आणि शंकराच्याहि ध्यानास जो अगम्य, तो म्हणे त्या खोट्या सावजाच्या पाठीस पडतो !

कबहुँ निकट पुनि दूरि पराई ।
कबहुँक प्रगटइ कबहुँ छपाई ।
प्रगटत दुरत करत छल भूरी ।
एहि बिधि प्रभुहि गयउ लेइ दूरी ।
तब तकि राम कठिन सर मारा ।
धरनि परेउ करि घोर पुकारा ।

तो मृग केव्हां केव्हां आटोक्यांत येई तर फिरून लांब निसटून जाई. तो केव्हां समोर येई तर केव्हां गायब होई. अशा रीतीनें समोर आणि आड होत होत अनेक प्रकारें फसवून तो प्रभूस दूरवर घेऊन गेला. तेव्हां रामांनीं त्यावर नेमकाच एक कडा बाण टाकला. त्या योगानें तो भयंकर आक्रोश करीत पृथ्वीवर गडगडला.

लछिमन कै प्रथमहिँ लै नामा ।
पाछे सुमिरेसि मन महँ रामा ।
प्रान तजत प्रगटेसि निज देहा ।
सुमिरेसि राम समेत सनेहा ।
अंतरप्रेमु तासु पहिचाना ।
मुनि–दुर्लभ–गति दीन्हि सुजाना ।

त्यानें प्रथम लक्ष्मणाच्या नांवानें टाहो फोडला, आणि मागाहून मनांतल्या मनांत रामाचें नांव घेतलें. त्यानें प्राण सोडतेवेळीं आपला राक्षसदेह प्रकट करून प्रेमपूर्वक रामाचें स्मरण केलें. त्याचें अंतरंगप्रेम ओळखून सर्वज्ञ रामांनीं त्यास मुनींसहि दुर्लभ अशी गति दिली.

**दो०–बिपुल सुमन सुर बरषहिँ गावहिँ प्रभु-गुन-गाथ । निजपद दीन्ह असुर कहुँ दीनबंधु रघुनाथ ॥ २७ ॥**

देव विपुल पुष्पवृष्टि करून व रामाचे गुण वर्णन करून म्हणूं लागले कीं, रघुवीर खरोखरीच दयेचे सागर आहेत. त्यांनीं राक्षसास देखील निजपद दिलें.

चौ०–खल बधि तुरत फिरे रघुबीरा ।
सोह चाप कर कटि तूनीरा ।

त्या खलाचा वध करून राम लागलीच परत फिरले, त्यांच्या हातांत चाप आणि कमरेस भाते शोभत होते.

आरतगिरा सुनी जब सीता ।
कह लछिमन सन परम सभीता ।
जाहु बेगि संकट अति भ्राता ।
लछिमन बिहँसि कहा सुनु माता ।

जेव्हां सीतेनें ‘ लक्ष्मणा लक्ष्मणा ’ असा आर्त स्वर ऐकला तेव्हां ती अत्यंत घाबरून लक्ष्मणास म्हणाली, तुझा बंधु संकटांत पडला आहे; तर तूं त्वरित तिकडे जा. तें ऐकून लक्ष्मण हास्यपूर्वक म्हणाला, माते ! ऐक.

भृकुटिबिलास सृष्टिलय होई ।
सपनेहु संकट परइ कि सोई ।

ज्याच्या भृकुटिविलासानें सृष्टीचा लय होतो तो स्वप्नांत तरी संकटांत सांपडेल काय ?

मरमबचन जब सीता बोला ।
हरिप्रेरित लछिमनमन डोला ।
बन-दिसि देव सौंपि सब काहू ।
चले जहाँ रावन-ससि-राहू ।

सीता जेव्हां मर्मभेदक शब्द बोलली तेव्हां प्रभु-सत्तेनुसार लक्ष्मणाची बुद्धि आंदोलित झाली. वनदेवता आणि दिग्देवता ह्या सर्वांवर सीता सोंपवून रावणरूप चंद्राचा राहू असा जो रामचंद्र त्याच्याकडे तो चालता झाला.

सून बीच दसकंधर देखा ।
आवा निकट जती के बेखा ।
जा के डर सुर असुर डेराहीं ।
निसि न नीदँ दिन अन्न न खाहीं ।
सो दससीस स्वान की नाईं ।
इत उत चितइ चला भडिहाईं ।

मध्यंतरीं रावण ( आश्रम ) शून्य आहे असें पाहून यतिवेष धारण करून जवळ आला. ज्याच्या भीती-मुळें देवराक्षसांना रात्रीं झोंप येत नसे आणि दिवसां अन्न जात नसे असा तो रावण कुत्र्याप्रमाणें लपतझपत उतावळीनें चालूं लागला.

इमि कुपंथ पग देत खगेसा ।
रह न तेज तन बुधिलवलेसा ।

हे गरुडा ! अशाप्रकारें दगलबाजीनें पाऊल टाकणाराच्या शरीरावर तेज तर रहात नाहींच पण आंत बुद्धीचा लवलेशहि उरत नाहीं.

नाना बिधि कहि कथा सुहाई ।
राजनीति भय प्रीति देखाई ।
कह सीता सुनु जती गोसाईं ।
बोलेहु बचन दुष्ट की नाईं ।

नानाप्रकारच्या फुशारक्या मारून राजनीति ऐक-वून, आंजरून, गोंजरून आणि शेवटीं रावणानें सीतेला दटावूनहि पाहिलें. तेव्हां सीता म्हणाली, ए मेल्या गोसावड्या जोगड्या ! लक्षांत ठेव कीं पाजी हराम-खोराचें भाषण तूं केलें आहेस.

तब रावन निजरूप देखावा ।
भई सभय जब नाम सुनावा ।
कह सीता धरि धीरजु गाढा ।
आइ गयउ प्रभु खल रहु ठाढा ।
जिमि हरिबधुहि छुद्र सस चाहा ।
भयसि कालबस निसिचर नाहा ।

सुनत बचन दससीस लजाना ।
मन महुँ चरन बंदि सुख माना ।

सरतेशेवटीं रावणानें आपलें स्वरूप प्रगट करून जेव्हां आपलें नांव सांगितलें तेव्हां सीता जरा गांगरली; पण लगेंच खूप अवसान धरून ती म्हणाली, अरे गुलामा, प्रभु यायला झालेलेच आहेत. जरा दम धर तर. हे राक्षसपते ! ज्याप्रमाणें नीच जंबुकास सिंहिणीची हाव तद्वतच ही तुझी. तूं मृत्यूच्या आधीन झाला आहेस. हें सीतेचें भाषण ऐकून रावण वरमला. त्यानें मना-नेंच तिला वंदन करून सुखाचा धापा टाकला.

**दो०--क्रोधवंत तब रावन लीन्हेसि रथ बैठाइ । चला गगनपथ आतुर भय रथ हाँकि न जाइ ॥ २८ ॥**

नंतर रावणानें क्रुद्ध होऊन तीस उचलून आपल्या रथांत घातलें आणि तो आकाशमार्गानें लगबगीनें जाऊं लागला. परंतु रामाच्या भीतीनें त्याच्यानें रथ हाकवेना.

चौ०--हा जगदैकबीर रघुराया ।
केहि अपराध बिसारेहु दाया ।
आरतिहरन सरन-सुख-दायक ।
हा रघु-कुल-सरोज-दिन-नायक ।
हा लछिमन तुम्हार नहिं दोसा ।
सो फल पायेउँ कीन्हेउँ रोसा ।

सीता आक्रोश करूं लागली. हे जगदेकवीरप्रभु रघुराया ! कोणत्या अपराधास्तव मजवरील दया आपण विसरलां ! हे दुःखहरणा ! हे शरणसुख-दायका ! हे रघुकुलकमलसूर्या ! हे लक्ष्मणा ! ह्यांत तुझा कांहींच दोष नाहीं. मी तुझ्यावर रागावलें त्याचें मला हें फळ मिळालें.

बिबिध बिलाप करति बैदेही ।
भूरिकृपा प्रभु दूरि सनेही ।
बिपति मोरि को प्रभुहिं सुनावा ।
पुरोडास चह रासभ खावा ।

वैदेही अनेक प्रकारें विलाप करूं लागलीः--'प्रभूंची मजवर अत्यंत कृपा होती; परंतु त्या प्रेमाला मी आतां आंचवलें ! ही माझी विपत्ति माझ्या धन्यास कोण बरें कळविणार ? रासभानें पुरोडाश ( यज्ञभाग ) खाऊं पाहावा ना ? '

सीता कै बिलाप सुनि भारी ।
भये चराचर जीव दुखारी ।

सीतेचा तो दारुण विलाप ऐकून चराचर जीव दुःखी झाले.

गीधराज सुनि आरत बानी ।
रघु-कुल-तिलक-नारि पहिचानी ।
अधम निसाचर लीन्हे जाई ।
जिमि मलेछबस कपिला गाई ।

ती आर्त वाणी ऐकून म्लेंच्छाच्या तडाक्यांत सांपडलेल्या कपिला गायीप्रमाणें तो दुष्ट राक्षस रघुकुलतिलकाच्या पत्नीस हरण करून नेत आहे हें गृध्रराज जटायूनें तांडलें.

सीते पुत्रि करसि जानि त्रासा ।
करिहउँ जातुधान कै नासा ।

( जटायु म्हणाला, ) बाळे सीते ! घाबरूं नकोस. मी ह्या राक्षसास लोळवितों.

धावा क्रोधवंत खग कैसे ।
छूटइ पबि पर्बत कहुँ जैसे ।
रे रे दुष्ट ठाढ किन होही ।
निर्भय चलेसि न जानेसि मोही ।

पर्वतावर वज्र कोसळल्याप्रमाणें जटायु क्रोधानें तुटून पडला व म्हणाला, 'अरे ए भामट्या, थांबत कां नाहींस ? तूं निःशंक जात आहेस. पण मला ओळखलें नाहींस वाटतें ?'

आवत देखि कृतांतसमाना ।
फिरि दसकंधर कर अनुमाना ।
की मैनाक कि खगपति होई ।
मम बल जान सहित पति सोई ।

हें एक कुलंगडें कृतांतासारखें येत आहे असें पाहून रावण फिरला आणि तर्क करूं लागला कीं, हा मैनाकपर्वत असेल काय ? किंवा हा गरुड असेल ? पण तोच काय त्याचा स्वामीहि माझें बळ ओळखून आहे.

जाना जरठ जटायू एहा ।
मम करतीरथ छाडिहि देहा ।
सुनत गीध क्रोधातुर धावा ।
कह सुनु रावन मोर सिखावा ।

रावणानें हा वृद्ध जटायु आहे असें ओळखलें व तो म्हणाला, हा माझ्या हस्ततीर्थांत देहपात करून घेणार ! तें ऐकतांच जटायु चवताळून धांवला, आणि म्हणाला, रावणा ! माझा हितबोध ऐक.

तजि जानकिहि कुसल गृह जाहू ।
नाहिँ त अस होइहि बहुबाहू ।
राम-रोष-पावक अतिघोरा ।
होइहि सलभ सकलकुल तोरा ।

जानकीस येथेंच सोडून तूं जिवंतपणें घरीं जा. नाहींतर, हे बहुबाहो ! खास हेंच होणार कीं रामाच्या अत्यंत भयंकर क्रोधाग्नींत तुझ्या सर्व कुलाची पतंगाप्रमाणें आहुती पडणार.

उतरु न देत दसानन जोधा ।
तबहिँ गीध धावा करि क्रोधा ।
धरि कच बिरथ कीन्ह महि गिरा ।
सीतहिँ राखि गीध पुनि फिरा ।

रावण यावर पक्काच खप्पी बनला. तेव्हां जटायु क्रुद्ध होऊन त्याच्यावर गडगडला. त्यानें रावणाची शेंडी धरली आणि त्यास विरथ करून धरणीवर आदळलें. जटायूनें सीतेस ( रथांतून काढून ) एके बाजूस नेऊन ठेविली, आणि तो परतला.

चोचन मारि बिदारेसि देही ।
दंड एक भइ मुरुछा तेही ।

चोंचेच्या आघातानें त्यानें रावणाचा देह विदीर्ण केला, त्यामुळें त्यास एक घटकाभर मूर्च्छा आली.

तब सक्रोध निसिचर खिसियाना ।
काढेसि परमकराल कृपाना ।
काटेसि पंख परा खग धरनी ।
सुमिरि राम करि अद्भुत करनी ।

तेव्हां त्या क्रुद्ध झालेल्या रावणानें चवताळून अत्यंत तीक्ष्ण असें खड्ग उपसलें आणि त्यानें जटायूचे पंख छाटून टाकले. त्यामुळें जटायु पृथ्वीवर पडला. अशी अचाट करणी करून तो रामस्मरण करीत राहिला.

सीतहि जान चढाइ बहोरी ।
चला उताइल त्रास न थोरी ।
करति बिलाप जात नभ सीता ।
ब्याधबिबस जनु मृगी सभीता ।

अत्यंत खस्त खाऊन व फिरून सीतेस रथांत घालून उतावीळपणानें रावण चालूं लागला. आकाशमार्गानें जात असतां व्याधाच्या तडाक्यांत सांपडलेल्या भयाक्रांत मृगीप्रमाणें सीता विलाप करीत होती.

गिरि पर बैठे कपिन्ह निहारी ।
कहि हरिनामु दीन्ह पट डारी ।
एहि बिधि सीतहि सो लेइ गयऊ ।
बन असोक महुँ राखत भयऊ ।

( ऋष्यमूक ) पर्वतावर बसलेल्या कपींना पाहून सीतेनें 'राम राम' असें नांव घेऊन आपलें उत्तरीयवस्त्र त्यांचेमध्यें सोडून दिलें. अशा रीतीनें रावणानें सीतेस नेऊन अशोक वनांत ठेविलें.

दो०–हारि परा खल बहुत बिधि भय अरु प्रीति देखाइ । नव असोकपादप तर राखेसि जतनु कराइ ॥ २९ ॥

जेव्हां तो दुष्ट रावण अनेक प्रकारें भीति आणि प्रीति दाखवून दाखवून जेरीस आला तेव्हां त्यानें तिला नवीन अशोक वृक्षाचे तळीं बंदोबस्तानें ठेविलें.

दो०–जेहि बिधि कपटकुरंग सँग धाइ चले श्रीराम । सो छबि सीता राखि उर रटति रहति हरिनाम ॥ ३० ॥

कपटमृगाच्या मागें श्रीराम धांवत गेले, तेव्हांचें त्यांचें तें रूप सीतेनें हृदयांत ठेवून ती रामनामाचा जप करीत राहिली.

चौ०–रघुपति अनुजहि आवत देखी ।
बाहिज चिंता कीन्हि बिसेखी ।
जनकसुता परिहरेहु अकेली ।
आयहु तात बचन मम पेली ।
निसि–चर–निकर फिरहिँ बन माहीँ ।
मम मन सीता आस्रम नाहीँ ।

( इकडे ) लक्ष्मण येत आहे असें पाहून रामचंद्र बाह्यतः विशेषच चिंता दाखवून म्हणाले, हे तात ! माझी आज्ञा मोडून तूं सीतेस एकाकीच सोडून आलास. राक्षसांचे समुदाय वनामध्यें हिंडत आहेत. सीता आश्रमांत नाहीं असें माझें मन मला सांगतें.

गहि पदकमल अनुज कर जोरी ।
कहेउ नाथ कछु मोहि न खोरी ।

रामचंद्राचे पाय धरून लक्ष्मण हात जोडून म्हणाला, हे नाथ ! ह्यांत माझ्याकडे यत्किंचितहि खोट नाहीं.

अनुजसमेत गये प्रभु तहवाँ ।
गोदावरितट आस्रम जहवाँ ।
आस्रम देखि जानकीहीना ।
भये बिकल जस प्राकृत दीना ।

नंतर प्रभु लक्ष्मणासह गोदावरीच्या तीरीं, जेथें त्यांचा आश्रम होता तेथें गेले. आश्रमांत जानकी नाहीं असें पाहतांच प्रभु प्राकृत जनाप्रमाणें दुःखानें दीन आणि विव्हल झाले.

हा गुनखानि जानकी सीता ।
रूप–सील–ब्रत–नेम–पुनीता ।
लछिमन समुझाये बहु भाँती ।
पूछत चले लता तरु पाती ।

हा गुणखनी जानकि ! हा रूपशीलव्रतनेमपुनीते सीते ! ( अशा प्रकारें राम विलाप करूं लागले. ) लक्ष्मणानें त्यांची अनेक प्रकारें समजूत घातली, तरी ते लता, तरु, पल्लव यांना विचारीत विचारीत मार्गानें जाऊं लागले.

हे खग मृग हे मधुकरस्रेनी ।
तुम्ह देखी सीता मृगनैनी ।
खंजन सुक कपोत मृग मीना ।
मधुपनिकर कोकिला प्रबीना ।
कुंद कली दाडिम दामिनी ।
कमल सरद ससि अहिभामिनी ।
बरुनपास मनोजधनु हंसा ।
गज केहरि निज सुनत प्रसंसा ।
श्रीफल कनक कदलि हरषाहीँ ।
नेकु न संक सकुच मन माहीँ ।

हे खगमृगभ्रमरगण हो ! तुम्हीं ती मृगनयनी सीता पाहिली काय ? अहो खंजन, शुक, कपोत, मृग, मीन, मधुपगण, कलकंठ कोकिळ, कुंदकळी, दाडिम, सौदामिनी, कमल, शरच्चंद्र, नागिणी, वरुणपाश, मदन, धनुष्य, हंस, गज, केसरी हे तुम्ही सर्वजण सीतेची तारीफ ऐकत होतां. श्रीफल, कनक आणि कदलीवृक्ष हो ! तुम्ही हर्षित झाले आहां. तुमच्या मनांत यत्किंचितहि संकोच आणि भीति आतां उरली नाहीं.

सुनु जानकी तोहि बिनु आजू ।
हरषे सकल पाइ जनु राजू ।
किमि सहि जात अनख तोहि पाहीँ ।
प्रिया बेगि प्रगटसि कस नाहीँ ।

हे जानकि ! तूं नसल्यामुळें आज ह्या सर्वांना जणुं राज्यलाभाचा आनंद झाला आहे. तुझ्यानें ही

त्यांची ईर्षा कशी सहन करवते ? प्रिये ! ( त्यांच्या गर्वपरिहारास्तव तरी ) तूं एकदम प्रकट कां होत नाहींस ?

एहि बिधि खोजत बिलपत स्वामी।
मनहुँ महाबिरही अतिकामी।
पूरनकाम राम सुखरासी।
मनुजचरित कर अज अबिनासी।

ह्याप्रमाणें प्रभु विलाप करीत सीतेचा शोध करूं लागले. त्या समयीं ते अत्यंत कामी आणि महान् विरही भासत. पूर्णकाम सुखनिधान, जन्ममरणरहित, असेच श्रीराम, परंतु त्यांनीं ही मानवलीला आरंभली.

आगे परा गीधपति देखा।
सुमिरत रामचरन जिन्ह रेखा।

समोरच रामचरणचिन्हांचें ध्यान करीत पडलेला जटायु त्यास दिसला.

**दो०—करसरोज सिरु परसेउ कृपासिंधु रघुबीर। निरखि राम-छबि-धाम-मुख बिगत भई सब पीर॥ ३१॥**

कृपासागर रघुवीरांनीं आपल्या करकमलानें जटायूच्या मस्तकाला स्पर्श केला. रामाचें तें सौंदर्यनिधान मुख अवलोकन करून जटायूचे सर्व क्लेश नाहींसे झाले.

चौ०—तब कह गीध बचन धरि धीरा।
सुनहु राम भंजन भवभीरा।
नाथ दसानन यह गति कीन्ही।
तेहि खल जनकसुता हरि लीन्ही।
लेइ दच्छिन दिसि गयउ गोसाईं।
बिलपति अति कुररी की नाईं।
दरस लागि प्रभु राखेउ प्राना।
चलन चहत अब कृपानिधाना।

नंतर धैर्य धरून जटायु म्हणाला, हे भवभयभंजना रामा ! ऐक. हे नाथ ! रावणानें माझी ही अशी दुर्दशा केली, व त्याच बदमाषानें वैदेहीला हरण करून तो तिला दक्षिण दिशेकडे घेऊन गेला. हे स्वामिन् ! त्या वेळीं सीता टिटवीप्रमाणें अत्यंत आक्रोश करीत होती. हे प्रभो ! तुझ्या दर्शनासाठीं मी प्राण धरून राहिलों; परंतु हे दयानिधे ! आतां मात्र ते जाऊं पाहत आहेत.

राम कहा तनु राखहु ताता।
मुख मुसुकाइ कही तेहिं बाता।
जा कर नाम मरत मुख आवा।
अधमउँ मुकुत होइ स्रुति गावा।
सो मम लोचन गोचर आगे।
राखउँ देह नाथ केहि लागे।

राम म्हणाले हे तात ! तूं देह धरून ऐस. तेव्हां तो हास्यवदन करून म्हणाला, मरणसमयीं ज्याचें नाम मुखीं आलें असतां अधमसुद्धां मुक्त होतो असें वेद सांगतात, तो श्रीराम प्रत्यक्ष माझ्या दृष्टीसमोर उभा असतां, हे नाथ ! मीं या देहाची आस्था कशासाठीं ठेवावी ?

जल भरि नयन कहहिं रघुराई।
तात कर्म निज तें गति पाई।
परहित बस जिन्ह के मन माहीं।
तिन्ह कहुँ जग दुर्लभ कछु नाहीं।
तनु तजि तात जाहु मम धामा।
देउँ काह तुम्ह पूरनकामा।

रामचंद्रांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले व ते म्हणाले, हे तात ! तुला तुझ्या कर्माप्रमाणें गति मिळालीच आहे. जे मनानें परहिताविषयीं तत्पर असतात त्यांना ह्या जगांत दुर्लभ असें कांहींच नाहीं. हे तात ! आतां हा देह ठेवून तूं माझ्या लोकीं जा. तुला पूर्णकाम करण्यासाठीं मीं आणखी काय द्यावें ?

**दो०—सीताहरन तात जनि कहेहु पिता सन जाइ। जौं मैं राम त कुल सहित कहिहि दसानन आइ॥ ३२॥**

हे तात ! तूं जाऊन सीताहरणाची वार्ता मात्र माझ्या पित्याला सांगूं नकोस. जर मी खरा राम असेन तर रावणाला कुळासकट बरबाद केल्यावर तोच स्वतः जाऊन सर्व सांगेल.

चौ०—गीध देह तजि धरि हरिरूपा।
भूषन बहु पट पीत अनूपा।
स्याम गात बिसाल भुज चारी।
अस्तुति करत नयन भरि बारी।

जटायूनें आपला देह टाकून सुंदर पीतवस्त्रधारी, श्यामलगात्र, विशाल, चतुर्भुज आणि अलंकृत असें अनुपम हरिरूप धारण केलें. त्याचे नेत्र प्रेमाश्रुपूर्ण होऊन तो स्तुति करूं लागला.

**छंद—जय राम रूप अनूप निर्गुन सगुन गुनप्रेरक सही। दस—सीस-बाहु-प्रचंड-**

खंडन चंडसर मंडन मही ॥ पाथोद-गात सरोजमुख राजीव-आयत-लोचनं। नित नौमि राम कृपाल बाहुविसाल भव-भय-मोचनं। ॥ ९ ॥

हे रघुवीरा ! तुझ्या अनुपम रूपाचा जयजयकार असो. तूं निर्गुण आहेस, सगुण आहेस व सत्त्वरजतमादि गुणांचा प्रेरक आहेस. तूं रावणाच्या प्रचंड बाहूंचें आपल्या चंड शरांच्या योगानें खंडन करणारा असून पृथ्वीला ललामभूत आहेस. तुझें शरीर मेघाप्रमाणें असून तुझें मुख कमलाप्रमाणें आहे. नीलकमलाप्रमाणें तुझे नेत्र विशाल असून तुझे विशाल बाहू भवभयापासून मुक्त करणारे आहेत. हे दयाघन श्रीरामा ! माझें तुला निरंतर वंदन असो.

बलमप्रमेयमनादिमव्यक्तमेकमगोचरं। गोविंद गोपर द्वंद-हर विज्ञानघन धरनीधरं॥ जे राम-मंत्र जपंत संत अनंत जन-मन-रंजनं। नित नौमिराम अकामप्रिय कामादि-खल-दल-गंजनं ॥ १० ॥

हे राम ! तुझें बल अप्रमेय असून तूं अनादि, जन्मरहित, अव्यक्त, अद्वितीय, अगोचर, गोविंद, इंद्रियातीत, द्वंद्वहर, विज्ञानघन आणि धरणीधर आहेस. जे संतजन 'जय राम' या मंत्राचा निरंतर जप करितात त्यांच्या मनाचें तूं रंजन करणारा आहेस. तूं अनंत असून निष्कामप्रिय व कामादि दुष्ट मनोविकारसमूहांचा नाशक आहेस. हे राम ! तुला माझें निरंतर वंदन असो.

जहि स्रुति निरंजन ब्रह्म ब्यापक बिरज अज कहि गावहीं। करि ध्यान ज्ञान बिराग जोग अनेक मुनि जेहि पावहीं॥ सो प्रगट करुनाकंद सोभाबृंद अग,जग मोहई। मम हृदय-पंकज-भृंग अंग अनंग बहु छबि सोहई ॥ ११ ॥

जो निरंजन, परब्रह्म, व्यापक, निर्मल, जन्मरहित आहे म्हणून वेद गातात व ज्याची मुनिजन ध्यान, ज्ञान, वैराग्य, योग इत्यादि साधनांनीं प्राप्ति करून घेत, तो करुणाकंद, शोभानिधान, चराचर सृष्टीला मोहित करणारा व अनेक मदनांप्रमाणें कमनीय-कांति असलेला रामचंद्र प्रकट होऊन माझ्या, हृदय-कमलामध्यें भ्रमराप्रमाणें विराजमान होवो.

जो अगम सुगम सुभावनिर्मल असम सम सीतल सदा। पस्यंति जे जोगी जतनु करि करत मन गो बस जदा॥ सो राम रमानिवास संतत दासबस त्रि-भुवन-धनी। मम उर बसउ सो समन संसृति जासु कीरति पावनी॥१२॥

जो अगम, सुगम, निर्मलस्वभाव, वक्र, सम आणि नित्य शीतल असून, योगीजन मन आणि इंद्रियें यांना वश करून प्रयत्नपूर्वक ज्याला पहातात, तो लक्ष्मीनिवास, त्रिभुवनस्वामी, नित्य भक्तजनांना वश असणारा, ज्याचें पावित्र यश संसृतीचा नाश करितें, असा श्रीरामचंद्र माझ्या हृदयांत वास करो.

दो०—अबिरल भगति माँगि बर गीध गयउ हरिधाम। तेहि की क्रिया जथोचित निज कर कीन्ही राम ॥ ३३ ॥

अढळ भक्तीचा वर मागून घेऊन जटायु वैकुंठाप्रत गेला. त्याची और्ध्वदेहिक क्रिया स्वतः रामचंद्रांनी यथोचित केली.

चौ०—कोमलचित अति दीनदयाला।
कारन बिनु रघुनाथ कृपाला।
गीध अधमखग आमिषभोगी।
गति दीन्ही जो जाँचत जोगी।
सुनहु उमा ते लोग अभागी।
हरि तजि होहिँ बिषयअनुरागी।

रघुवीर हे अत्यंत कोमलचित्त आणि दीनदयाळ असून कारणावांचूनहि कृपा करितात. वास्तविक गृध्र म्हटला तर मांसाहारी नीचि पक्षी; परंतु ज्या गतीची योगीहि याचना करितात ती गति प्रभूंनीं त्यास (आपण होऊन) दिली. हे पार्वती, ऐक. जे अशा श्रीहरिस सोडून विषयाचे ठिकाणीं लंपट होतात ते अभागी होत.

पुनि सीतहि खोजत दोउ भाई।
चले बिलोकत बन बहुताई।
संकुल लता बिटप घन कानन।
बहु खग मृग तहँ गज पंचानन।

नंतर सीतेचा शोध करीत ते दोघे बंधु घनदाट

अरण्य पहात पहात चालले. तें अरण्य अनेक लता आणि वृक्ष यांनीं व्याप्त असून तेथें नानाप्रकारचे खग, मृग, गज, सिंह संचार करीत होते.

आवत पंथ कबंध निपाता।
तेहिं सब कही साप कै बाता।
दुर्बासा मोहि दीन्ही सापा।
प्रभुपद देखि मिटा सो पापा।

मार्गामध्यें रामचंद्रांनीं कबंध राक्षसाचा वध केला, तेव्हां त्यानें आपली शापवार्ता इत्थंभूत सांगितली. तो म्हणाला दुर्वासांनीं मला शाप दिला व तो आज प्रभूच्या चरणदर्शनानें नष्ट झाला.

सुनु गंधर्व कहहुँ मैं तोही।
मोहि न सुहाइ ब्रह्म-कुल-द्रोही।

( राम म्हणाले, ) हे गंधर्वा ! मी तुला सांगतों तें ऐकून ठेव. मला ब्रह्मद्वेष्टा मुळींच खपत नाहीं.

**दो०-मन क्रम बचन कपट तजि जो कर भू-सुर-सेव। मोहि समेत बिरंचि सिव बस ता के सब देव॥ ३४॥**

कायावाचामनानें जो कपटाचा त्याग करून ब्राह्मणाची सेवा करितो त्याच्या आधीन माझ्यासकट ब्रह्मदेवशिवप्रभृति सर्व देव होतात.

चौ०-सापत ताडत परुष कहंता।
बिप्रपूज्य अस गावहिं संता।
पूजिय बिप्र सील-गुन-हीना।
सूद्र न गुन-गन-ज्ञान-प्रवीना।

शिवीशाप देणारा, मारझोड करणारा, किंवा नुसता कुरटें बोलणारा देखील ब्राह्मण पूज्यच आहे असें संत सांगतात. शील आणि गुण ह्यांनीं हीन असलेला देखील ब्राह्मण पूज्य आहे. परंतु अनेक गुण आणि ज्ञान यांमध्यें प्रवीण असला तरी शूद्र मात्र पूज्य नव्हे.

कहि निज धर्म ताहि समुझावा।
निज-पद-प्रीति देखि मन भावा।
रघु-पति-चरन-कमल सिरु नाई।
गयउ गगन आपनि गति पाई।

रामांनीं त्यास स्वधर्माचें प्रतिपादन केलें. आपल्या चरणीं त्याचें प्रेम असलेलें पाहून त्यांस संतोष झाला. रघुपतीच्या चरणकमलांस वंदन करून तो आपली गति भोगण्यास स्वर्लोकीं गेला.

ताहि देइ गति रामु उदारा।
सबरी के आस्रम पगु धारा।
सबरी देखि रामु गृह आये।
मुनि के बचन समुझि जिय भाये।

अशाप्रकारें त्याचा उद्धार करून उदारधी रामप्रभूंनीं शबरीच्या आश्रमांत प्रवेश केला. आपल्या आश्रमांत रामचंद्र आलेले पाहून शबरीस मतंगमुनींच्या आशीर्वादाची आठवण झाली व तीस संतोष झाला.

सरसि-ज-लोचन बाहुबिसाला।
जटामुकुट सिर उर बनमाला।
स्याम गौर सुंदर दोउ भाई।
सबरी परी चरन लपटाई।

ज्यांच्या मस्तकीं जटाजूट असून वक्षःस्थलीं वनमाला शोभत आहेत अशा त्या कमलनेत्र, आजानुबाहु व सुंदर अशा श्याम आणि गौर उभय बंधूंना पाहतांच शबरीनें त्यांच्या चरणांना मिठी मारली.

प्रेममगन मुख बचन न आवा।
पुनि पुनि पदसरोज सिरु नावा।
सादर जल लेइ चरन पखारे।
पुनि सुंदर आसन बैठारे।

ती प्रेमांत निमग्न झाल्यामुळें तिची मिटकी वळली. ती वारंवार प्रभूंच्या चरणकमलांस वंदन करूं लागली. तिनें उदक आणून अत्यादरपूर्वक प्रभुचरणांचें प्रक्षालन करून त्यांना सुंदर आसनावर बसविलें.

**दो०-कंद मूल फल सुरस अति दिये राम कहुँ आनि। प्रेमसहित प्रभु खाये बारंबार बखानि॥ ३५॥**

तिनें अत्यंत मधुर कंदमूलफलें आणून रामास अर्पण केलीं, व रामांनींहि तीं वारंवार वाखाणून फार प्रेमानें भक्षण केलीं.

चौ०-पानि जोरि आगे भइ ठाढी।
प्रभुहिं बिलोकि प्रीति उर बाढी।
केहि बिधि अस्तुति करउँ तुह्मारी।
अधम जाति मैं जडमति भारी।

---

१ कबंध पूर्वजन्मीं गंधर्व होता. एके समयीं त्याच्या गायनानें दुर्वास ऋषी प्रसन्न झाले नाहींत, तेव्हां तो त्यांना हंसला. म्हणून दुर्वासांनीं तूं राक्षस होशील असा त्याला शाप दिला.

अधम ते॑ अधम अधम अति नारी।
तिन्ह महँ मैं॑ मतिमंद अघारी।

ती हात जोडून सन्मुख उभी राहिली. तेव्हां प्रभूस अवलोकन करीत असतां तिचें प्रेम अधिकाधिक वृद्धिंगत होऊं लागलें. ती म्हणाली, मीं आपली स्तुति कशी करावी ? मी नीच ( त्यांतून ) स्त्रीजात, ( शिवाय ) अति मतिमंद आहे. स्त्री ही अधमाहूनहि अत्यंत अधमाधम. त्यांतूनहि मी बुद्धिहीन आणि पातकी आहे.

कह रघुपति सुनु भामिनि बाता।
मानउँ एक भगति कर नाता।
जाति पाँति कुल धर्म बडाई।
धन बल परिजन गुन चतुराई।
भगतिहीन नर सोहइ कैसा।
बिनु जल बारिद देखिय जैसा।

राम म्हणाले, हे भामिनी ! माझी गोष्ट ऐक. मी केवळ एका भक्तीचाच पाहुणा आहे. जातपात, कुल, धर्म, ऐश्वर्य, धन, बल, परिजन, गुण, चातुर्य हे सर्व असूनहि जर एक भक्ति नसेल तर तो मनुष्य जलविरहित मेघाप्रमाणें आहे, असें समज.

नवधा भगति कहउँ तोहि पाहीं॑।
सावधान सुनु धरु मन माहीं॑।
प्रथम भगति संतन्ह कर संगा।
दूसरि रति मम कथाप्रसंगा।

मी तुला नवविधा भक्ति कथन करितों ती सावधानपणें श्रवण करून मनांत ठेव. संतजनाशीं संग करणें ही प्रथम भक्ति होय. माझ्या कथाप्रसंगीं अनुरक्ति असणें ही दुसरी भक्ति आहे.

**दो०—गुरु-पद-पंकज-सेवा तीसरि भगति अमान। चौथि भगति मम गुनगन करइ कपट तजि गान ॥ ३६ ॥**

अभिमानाचा त्याग करून गुरुचरणकमलांची सेवा करणें ही तिसरी भक्ति होय. निष्कपटपणें माझ्या गुणगणांचें गान करणें हें चतुर्थ भक्तीचें लक्षण आहे.

चौ०—मंत्र जाप मम दृढ बिस्वासा।
पंचम भजन सो बेद प्रकासा।
छट दम सील बिरति बहु कर्मा।
निरत निरंतर सज्जन धर्मा।
सातव सम मोहि मय जग देखा।
मो ते॑ संत अधिक करि लेखा।
आठव जथालाभ संतोषा।
सपनेहु नहिं॑ देखइ परदोषा।
नवम सरल सब सन छलहीना।
मम भरोस हिय हरष न दीना।

माझ्या मंत्राचा जप करणें व माझे ठिकाणीं दृढ विश्वास ठेवून माझें भजन करणें ही वेदप्रतिपादित पंचम भक्ति होय. इंद्रियांचें दमन करून व सच्छीलपूर्वक अनेक कर्मांचे ठिकाणीं विरक्त होऊन सज्जनांच्या धर्मांचे ठिकाणीं निरंतर प्रेम करणें हें भक्तीचें सहावें लक्षण आहे. सर्व जग मत्स्वरूप पाहून माझ्यापेक्षांहि संतांना अधिक मानणें हा भक्तीचा सातवा प्रकार होय. यदृच्छालाभानें संतुष्ट असणें व स्वप्नांत देखील दुसऱ्याच्या दोषाकडे न पाहणें हें भक्तीचें आठवें लक्षण समज. सर्वांशीं निष्कपट आणि सरळपणें वागणें व हृदयांत माझेविषयीं विश्वास बाळगून हर्ष किंवा विषाद न मानणें हा भक्तीचा नववा प्रकार आहे.

नव महुँ एकउ जिन्ह के होई।
नारि पुरुष सचराचर कोई।
सोइ अतिसय प्रिय भामिनि मोरे।
सकल प्रकार भगति दृढ तोरे।

ह्या नऊ प्रकारांपैकीं ज्याचे ठिकाणीं एक तरी निदान प्रकार आहे तो ह्या चराचर सृष्टीमध्यें पुरुष असो अथवा स्त्री असो तो, हे भामिनि ! मला अत्यंत प्रिय आहे. तुझे हृदयांत तर सर्वप्रकारें दृढभक्ति वसत आहे.

जोगि-बृंद-दुर्लभ गति जोई।
तो कहुँ आजु सुलभ भइ सोई।
मम दरसनफल परम अनूपा।
जीव पाव निज सहज सरूपा।

योगिवृंदांना देखील जी गति दुर्लभ ती आज तुला सुलभ झाली आहे. माझ्या दर्शनाचें परम अनुपम फल हेंच कीं त्या योगानें जीव सहज स्वस्वरूपाला मिळतो.

जनकसुता कै सुधि भामिनी।
जानहि कहु करि-बर-गामिनी।

हे शबरि ! गजगामिनी जानकीची कांहीं वार्ता तुला लागली असल्यास कथन कर.

पंपासरहि जाहु रघुराई ।
तहँ होइहि सुग्रीवमिताई ।
सो सब कहिहि देव रघुबीरा ।
जानतहू पूछहु मतिधीरा ।
बार बार प्रभुपद सिरु नाई ।
प्रेमसहित सब कथा सुनाई ।

( यावर शबरी म्हणाली ) " हे रघुराज ! आपण पंपासरोवरावर जावें म्हणजे आपली व सुग्रीवाची गांठ पडेल. हे प्रभो रघुवीरा ! तो सुग्रीव आपणांस सर्व वर्तमान निवेदन करील. हे मतिधीरा ! हें सर्व आपण जाणतच असून मला विचारीत आहां. " तिनें वारंवार प्रभुचरणीं मस्तक ठेवून सर्व वृत्तांत निवेदित केला.

छंद–कहि कथा सकल बिलोकि हरिमुख
हृदय पदपंकज धरे । तजि जोगपावक
देह हरिपद लीन भइ जहँ नहिँ फिरे ॥
नर बिबिध कर्म अधर्म बहु मत सोक-
प्रद सब त्यागहू । बिस्वास करि कह
दास तुलसी रामपद अनुरागहू ॥ १२ ॥

सर्व वृत्तांत सांगून नंतर ती प्रभुमुखाकडे पाहूं लागली. शेवटीं तिनें रामपदकमलांचे ठिकाणीं आपले नेत्र स्थिर करून योगाग्नींत देह विसर्जन केला, व जेथून पुन्हां परिवर्तन नाहीं अशा हरिपदीं ती लीन झाली. तुलसीदास म्हणतात, नर हो ! विविध कर्मे, अधर्म आणि बहुमतें हीं सर्व शोकास कारणीभूत होतात म्हणून ह्यांचा त्याग करा, आणि श्रद्धापूर्वक रामचरणीं अनुरक्त व्हा.

दो०–जातिहीन अघ जनम महि मुकुति
कीन्हि असि नारि । महा-मंद-मन सुख
चहसि ऐसे प्रभुहि बिसारि ॥ ३७ ॥

सर्व पापांची जन्मभूमि अशी जातिहीन शबरी भिल्लीण, तिदेखील ज्यानें मुक्त केली अशा प्रभूस विसरून सुखाची इच्छा करणाऱ्या, मना ! तुला महामूर्ख समजलें पाहिजे.

चौ०–चले राम त्यागा बन सोऊ ।
अ–तुलित–बल–नरकेहरि दोऊ ।
बिरही इव प्रभु करत बिषादा ।
कहत कथा अनेक संबादा ।

नंतर अतुलपराक्रमी अशा त्या दोघां पुरुषसिंह राघवांनीं तें वन सोडून दुसऱ्या वनांत प्रवेश केला. विरही जनाप्रमाणें श्रीरामचंद्र सीतेसाठीं विलाप करून अनेक कथासंवाद करीत.

लछिमन देखु बिपिन कइ सोभा ।
देखत केहि कर मन नहिँ छोभा ।
नारि सहित सब खग–मृग–बृंदा ।
मानहुं मोरि करत हहिँ निंदा ।

( राम म्हणाले, ) लक्ष्मणा ! ही या वनाची शोभा तर पहा. ही पाहून कोणाचें मन क्षुब्ध होणार नाहीं ? सर्व पशुपक्ष्यांचे समुदाय आपापल्या स्त्रियांसहवर्तमान वावरत आहेत. मला वाटतें कीं, हे माझा उपहासच करीत आहेत.

हमहिँ देखि मृगनिकर पराहीँ ।
मृगी कहहिँ तुम्ह कहँ भय नाहीँ ।
तुम्ह आनंद करहु मृगजाये ।
कंचनमृग खोजन ए आये ।

मला पाहून हरणांचे कळप पळूं लागतात. परंतु त्यांस हरिणी म्हणतात, तुम्हांला यांच्यापासून भय नाहीं. हे मृगशावक हो, तुम्ही आनंदानें असा. हे कांचनमृगाचा शोध करण्याकरितां आले आहेत.

संग लाइ करिनीं करि लेहीँ ।
मानहुँ मोहि सिखावन देहीँ ।

हत्ती हत्तिणींसमवेत संचार करीत आहेत. मला वाटतें ते मला ( जोरू साथ हा धडाच ) शिकवीत आहेत.

सास्त्र सुचिंतित पुनि पुनि देखिय ।
भूप सुसेवित बस नहिँ लेखिय ।
राखिय नारि जदपि उर माहीँ ।
जुबती सास्त्र नृपति बस नाहीँ ।

शास्त्र जरी उत्तम प्रकारें ज्ञात असलें तरी त्याची वरचेवर उजळणी करावी लागते; राजाची उत्कृष्ट प्रकारें सेवा केली तरी तो आपल्याला वश आहेच असें समजूं नये. तशीच स्त्री, मग ती उरावर बाळगलेली कां असेना. एवंच शास्त्र, राजा आणि स्त्री हीं स्वाधीन समजतांच येत नाहींत.

देखहु तात बसंत सुहावा ।
प्रियाहीन मोहि भय उपजावा ।

हे तात ! ह्या वसंतऋतूकडे पहा. हा मला प्रियाविहीनाला जणुं काय भेवडावीत आहे.

दो०—विरहविकल बलहीन मोहि जानेसि निपट अकेल। सहित विपिन मधुकर खगन्ह मदन कीन्हि बगमेल ॥ ३८ ॥

विरहव्याकुळ आणि बलहीन अशा मला अगदींच असहाय समजून ह्या अरण्यांतील भ्रमर आणि पक्षी ह्यांच्या ( सैन्या ) सह मदन मजवर स्वारीच करीत आहे.

दो०—देखि गयउ भ्राता सहित तासु दूत सुनि बात। डेरा कीन्हेउ मनहुँ तब कटक हटकि मनजात ॥ ३९ ॥

परंतु त्याच्या दूतांनीं येऊन मी बंधुसहित आहे असें पाहिलें व तें वर्तमान कळविल्यामुळें मदनानें आपल्या सैन्याला माघारें नेऊन आपला तळ इतरत्र हलविला.

चौ०—बिटप बिसाल लता अरुझानी।
बिबिध बितान दिये जनु तानी।
कदलि तालबर ध्वजा पताका।
देखि न मोह धीर मन जाका।
बिबिध भाँति फूले तरु नाना।
जनु बानैत बने बहु बाना।

ह्या विशाल वृक्षावर ज्या लता फैलावल्या आहेत, त्या जणुं मदनानें आपल्या राहुट्या ताणल्यासारख्याच दिसत आहेत. केळींचीं आणि ताडांचीं झाडें हीं त्यांजवरील ध्वज आणि पताका होत. त्यांस पाहून जे धीर असतील त्यांचींच मनें मोहित होणार नाहींत. तऱ्हेतऱ्हेच्या फुलांचे अनेक वृक्ष हेच त्याचे जणुं काय निरनिराळे वेष धारण करणारे धनुर्धारी होत.

कहुँ कहुँ सुंदर बिटप सुहाये।
जनु भट बिलग बिलग होइ छाये।
कूजत पिक मानहुँ गज माते।
ढेक महोख ऊँट बिसराते।
मोर चकोर कीर बर बाजी।
पारावत मराल सब ताजी।
तीतर लावक पद–चर–जूथा।
बरनि न जाइ मनोजबरूथा।

जागोजाग सुंदर वृक्ष दिसत आहेत तेच त्याचे निरनिराळे डेरे देऊन राहिलेले योद्धे होत. कूजन करणारे कोकिल जणुं मादवान हत्ती होत. सारस आणि महोख पक्षी जणुं उंट आणि खचरें समजावयाचीं. मोर, चकोर आणि शुक हे ( त्या सैन्यांतील) उत्तम घोडे असून, कबुतरें आणि हंस हे ताजी जातीच्या घोड्याप्रमाणें होत. तित्तिर आणि लावा पक्षी हे पायदळ होय. अशाप्रकारें हें मदनाचें सैन्य अवर्णनीय आहे.



रथ गिरिसिला दुंदुभी झरना।
चातक बंदी गुनगन बरना।
मधु–कर–मुखर भेरि सहनाई।
त्रिबिध बयारि बसीठी आई।
चतुरंगिनी सेन सँग लीन्हे।
बिचरत सबहिँ चुनौती दीन्हे।

गिरिशिला ह्या रथाप्रमाणें असून निर्झरप्रवाह हेच दुंदुभी होत. चातक पक्षी गुणगान करणारे भाट होत. भ्रमरांचा गोंगाट हाच सैन्यांतील भेरी, सनई इत्यादि वाद्यांचा गजर होय. त्रिविध वायु हाच मदनाकडून आलेला वकील आहे. अशा प्रकारचें चतुरंग सैन्य बरोबर घेऊन स्वारी करणाऱ्या मदनानें सर्वांस इषारत दिली आहे.

लछिमन देखत कामअनीका।
रहहिँ धीर तिन्ह कै जग लीका।
एहि के एक परमबल नारी।
तेहि तेँ उबर सुभट सोइ भारी।

हे लक्ष्मणा ! असें हें कामदेवाचें सैन्य पाहून जो धैर्य कायम ठेवील त्याचीच जगामध्यें प्रशंसा होईल. कामदेवाचें अत्यंत गाढेंगहरें बल म्हणजे स्त्रीच. तिच्या तडाक्यांतून जो वांचेल तोच खरा शूर म्हणावा.

दो०—तात तीनि अतिप्रबल खल काम क्रोध अरु लोभ। मुनि बिज्ञानधाम मन करहिँ निमिष महुँ छोभ ॥ ४० ॥

हे तात ! काम,क्रोध आणि लोभ हे तीन अत्यंत प्रबल खल होत. विज्ञानपूर्ण अशा मुनींच्याहि मनास ते निमिषमात्रांत क्षुब्ध करितात.

दो०—लोभ के इच्छा दंभ बल काम के केवल नारि। क्रोध के परुषबचन बल मुनिबर कहहिँ बिचारि ॥ ४१ ॥

इच्छा आणि दंभ हें लोभाचें सैन्य असून केवल स्त्री हें कामाचें सैन्य आहे. तसेंच कठोर वचन हें क्रोधाचें बल आहे; असें सर्व मुनिश्रेष्ठांनीं विचारपूर्वक कथन केलें आहे.

चौ०—गुनातीत स-चराचर-स्वामी।
राम उमा सब अंतरजामी।
कामिन्ह कै दीनता देखाई[1]।
धीरन्ह के मन बिरति दृढाई।

शंकर म्हणतात—हे पार्वति! रामचंद्र हे त्रिगुणातीत, चराचरप्रभु व सर्वांतरव्यापक असूनहि त्यांनीं कामलंपट लोकांची दीनता दाखवून धैर्यशाली भक्तांच्या मनांतल्या वैराग्याचें दृढीकरण केलें.

क्रोध मनोज लोभ मद माया।
छूटहिँ सकल राम कीं दाया।
सो नर इंद्रजाल नहिँ भूला।
जा पर होइ सो नट अनुकूला।

क्रोध, काम, लोभ, मद आणि माया हीं सर्व रामकृपेनें नष्ट होतात. ज्यावर हा नटवर रामचंद्र अनुग्रह करितो तो नर ह्या इंद्रजालाला पाहून फसत नाहीं.

उमा कहउँ मैं अनुभव अपना।
सत हरिभजन जगत सब सपना।

पार्वति! मी तुला स्वतांचा अनुभव सांगतों कीं, खरें हरिभजन घडलें असतां सर्व जग स्वप्नवत् वाटतें.

पुनि प्रभु गये सरोबरतीरा।
पंपा नाम सुभग गंभीरा।
संतहृदय जस निर्मल बारी।
बाँधे घाट मनोहर चारी।
जहँ जहँ पियहिँ बिबिधमृग नीरा।
जनु उदारगृह जाचकभीरा।

नंतर प्रभु सुंदर आणि गंभिर अशा पंपासरोवराच्या तीरीं गेले. त्याचें पाणी संतहृदयाप्रमाणें निर्मल असून त्यास चार रमणीय घाट होते. चोहों बाजूंनीं अनेक पशु त्याचें पाणी पीत असतां असें भासे कीं, दानशूर पुरुषाच्या द्वारावर जणुं याचकांची गर्दीच झाली आहे.

दो०—पुरइनि सघन ओट जल बेग न पाइय मर्म। मायाछन्न न देखिये जैसे निर्गुन ब्रह्म॥ ४२॥

ज्याप्रमाणें मायेनें आच्छादित झाल्यामुळें जीव निर्गुण ब्रह्माला जाणूं शकत नाहीं, तद्वत् तें सरोवर नीलकमलांनीं दाट आच्छादून गेल्यामुळें त्यांतलें उदक एकाएकीं दृश्य होत नसे.

दो०—सुखी मीन सब एकरस अतिअगाध जल माहिँ। जथा धर्मसीलन्ह के दिन सुखसंजुत जाहिँ॥ ४३॥

ज्याप्रमाणें धर्मपरायण मनुष्याचे दिवस सुखांत जातात त्याप्रमाणें त्या सरोवराच्या अगाध जलांत सर्व मीन प्रेमानें व सुखानें रहात.

चौ०—बिकसे सरसिज नाना रंगा।
मधुर मुखर गुंजत बहु भृंगा।
बोलत जलकुक्कुट कलहंसा।
प्रभु बिलोकि जनु करत प्रसंसा।
चक्रबाक-बक-खग-समुदाई।
देखत बनइ बरनि नहिँ जाई।
सुंदर खग-गन-गिरा सुहाई।
जात पथिक जनु लेत बोलाई।

त्यांत रंगारंगाचीं कमलें फुललीं असून त्यांवर अनेक भृंग मधुर गुंजारव करीत होते. पाणकोंबडे आणि कलहंस कलकलाट करीत. जणुंकाय ते प्रभूंस पाहून त्यांची स्तुतीच करूं लागले. चक्रवाक, बक इत्यादि पक्षिसमुदाय फारच सुंदर आणि अवर्णनीय दिसे. ते सुंदर पक्षी आपल्या मधुर स्वरानें जणुंकाय पांथस्थांस निमंत्रणच करीत होते.

तालसमीप मुनिन्ह गृह छाये।
चहुँ दिसि कानन बिटप सुहाये।
चंपक बकुल कदंब तमाला।
पाटल पनस परास रसाला।
नवपल्लव कुसुमित तरु नाना।
चंचरीकपटली कर गाना।

त्या सरोवराच्या समीप मुनींचे आश्रम होतें. त्यांच्या सभोंवतालीं अरण्य आणि वृक्ष शोभत होतें. चंपक, बकुल, कदंब, तमाल, पाटल, फणस, पळस, आम्र इत्यादि अनेक नूतनपल्लवित आणि प्रफुल्लित वृक्ष होते. त्यांवर भृंगसमुदाय मधुर गान करीत होता.

सीतल मंद सुगंध सुभाऊ।
संतत बहइ मनोहर बाऊ।
कुहू कुहू कोकिल धुनि करहीँ।
सुनि रव सरस ध्यान मुनि टरहीँ।

शीतल, मंद आणि सुगंधित असा आल्हादकारक वायु निरंतर वहात असे. कोकिल कुंहूं कुंहूं असा

[1] 'श्रीसंगिनां गतिमिति प्रथयंश्चचार'—भाग९।१०।११.

शब्द करीत असत. त्यांचा तो मनोहर स्वर ऐकून मुनींच्याहि ध्यानाचा भंग होई.

**दो०—फल भर नम्र बिटप सब रहे भूमि नियराइ । परउपकारी पुरुष जिमि नवहिँ सुसंपति पाइ ॥ ४४ ॥**

परोपकारी पुरुष पुष्कळशी संपत्ति मिळाल्यानें जसा नम्र होतो, त्याप्रमाणें फलभारानें वृक्ष नम्र होऊन जमिनीला टेकले होते.

चौ०—देखि राम अतिरुचिर तलावा ।
मज्जनु कीन्ह परमसुख पावा ।
देखी सुंदर तरु बर छाया ।
बैठे अनुजसहित रघुराया ।
तहँ पुनि सकल देव मुनि आये ।
अस्तुति करि निजधाम सिधाये ।

तें अत्यंत रम्य सरोवर पाहून रामांनीं त्यांत स्नान केलें व त्यामुळें त्यांस परम आल्हाद वाटला. एक सुंदर व विशाल वृक्ष पाहून त्याच्या छायेखालीं रघुवीर लक्ष्मणासह बसले. नंतर तेथें सर्व देव आणि मुनी आले, व त्यांची स्तुति करून स्वस्थानीं परत गेले.

बैठे परमप्रसन्न कृपाला ।
कहत अनुज सन कथा रसाला ।
बिरहवंत भगवंतहि देखी ।
नारदमन भा सोच बिसेखी ।

कृपाळु प्रभु अत्यंत प्रसन्न होत्साते लक्ष्मणाशीं रसाळ गोष्टी बोलत होते. भगवंतांना विरहदुःखित पाहून नारदाचें मन विशेषच हळहळलें.

मोर साप करि अंगीकारा ।
सहत राम नाना दुखभारा ।
ऐसे प्रभुहि बिलोकउँ जाई ।
पुनि न बनिहि अस अवसरु आई ।
यह बिचारि नारद करबीना ।
गये जहाँ प्रभु सुखआसीना ।

माझ्या शापाचा अंगीकार करून राम अनेक दुःखभार सहन करीत आहेत, अशा प्रभूंचें दर्शन अवश्य घेतलें पाहिजे, पुन्हा अशी संधि येणार नाहीं, असा विचार करून नारद हातांत वीणा घेऊन प्रभु स्वस्थ बसले होते तेथें आले.

गावत रामचरित मृदुबानी ।
प्रेमसहित बहु भाँति बखानी ।
करत दंडवत लिये उठाई ।
राखे बहुत बार उर लाई ।
स्वागत पूछि निकट बैठारे ।
लछिमन सादर चरन पखारे ।

अनेक प्रकारें प्रेमपूर्वक मधुर वाणीनें रामचरित्राचें गान करीत करीत नारदांनीं दंडवत घातलें. तेव्हां प्रभूंनीं त्यांना उठवून वारंवार हृदयाशीं कवटाळलें. नंतर नारदांस कुशल प्रश्न विचारून रामांनीं आपल्या जवळ बसाविलें. लक्ष्मणानें आदरपूर्वक त्यांचें चरण-प्रक्षालन केलें.

**दो०—नाना बिधि बिनती करि प्रभु प्रसन्न जिय जानि । नारद बोले बचन तब जोरि सरोरुहपानि ॥ ४५ ॥**

नारदांनीं अनेक प्रकारें रामाची स्तुति केली. नंतर प्रभूंचें अंतःकरण प्रसन्न जाणून ते हात जोडून म्हणाले,—

चौ०—सुनहु उदार परम रघुनायक ।
सुंदर अगम सुगम बरदायक ।
देहु एक बरु माँगउँ स्वामी ।
जद्यपि जानत अंतरजामी ।

हे परमोदारा रघुनायका ! ऐका. आपण सुंदर, अगम, सुगम आणि वरद आहां. हे स्वामिन् ! अंतर्यामी आपण जरी सर्व जाणत आहां तथापि मी आपणांजवळ एक वर मागतों.

जानहु मुनि तुम्ह मोर सुभाऊ ।
जन सन कबहुँ कि करउँ दुराऊ ।
कवन बस्तु असि प्रिय मोहि लागी ।
जो मुनिवर न सकहु तुम्ह माँगी ।
जन कहुँ कछु अदेय नहि मोरे ।
अस बिस्वास तजहु जनि भोरे ।

राम म्हणाले, मुने ! आपणांस माझा स्वभाव विदितच आहे. मी आपल्या भक्तापासून कधींहि कांहीं चोरून ठेवतो काय ? अशी कोणती वस्तु मला इतकी प्रिय आहे कीं, मुनिवरा ! ती आपणहि मागूं शकत नाहीं ? आपल्या भक्तास अदेय असें मला कांहींच नाहीं, हा विश्वास चुकूनदेखील आपण सोडूं नये.

तब नारद बोले हरषाई।
अस बर मागउँ करउँ ढिठाई।
जद्यपि प्रभु के नाम अनेका।
श्रुति कह अधिक एक तें एका।
राम सकल नामन्ह तें अधिका।
होउ नाथ अघ-खग-गन-बधिका।

नंतर नारद हर्षित होऊन म्हणाले, मी धाष्टर्य करून असा वर मागतों कीं, जरी प्रभूंचीं एकापेक्षांहि एक विशिष्ट अशीं अनेक नांवें वेदांनीं सांगितलीं आहेत, तरी, हे नाथ! तुमचें 'राम' हें नांव सर्व नांवांपेक्षांहि श्रेष्ठ होऊन पापरूपी पक्षिगणाचा नाश करणारें होवो.

**दो०—राकारजनी भगति तव रामनाम सोइ सोम। अपर नाम उडुगन बिमल बसहु भगत-उर-ब्योम॥ ४६॥**

तुझी भक्ति ही पौर्णिमेची रात्र होऊन रामनाम हें पूर्ण चंद्रमा होवो, आणि तुझीं इतर नामें निर्मल तारांगणांप्रमाणें होऊन भक्तांच्या हृदयरूपी आकाशामध्यें निवास करोत.

**दो०—एवमस्तु मुनि सन कहेउ कृपासिंधु रघुनाथ। तब नारद मन हरष अति प्रभुपद नायेउ माथ॥ ४७॥**

त्यावर कृपासागर, रघुनाथांनीं नारदांस 'तथास्तु' असा आशीर्वाद दिला. तेव्हां नारदांच्या मनाला हर्ष वाटून त्यांनीं रामचरणीं मस्तक नमविलें.

चौ०—अतिप्रसन्न रघुनाथहि जानी।
पुनि नारद बोले मृदुबानी।
राम जबहिँ प्रेरेहु निज माया।
मोहेहु मोहि सुनहु रघुराया।
तब बिबाह मैं चाहउँ कीन्हा।
प्रभु केहि कारन करइ न दीन्हा।

आपले स्वामी सुप्रसन्न आहेत असें पाहून नारद पुन्हां नम्रपणें ह्मणाले, हे रामचंद्रा! ऐका. आपण आपल्या मायेच्या प्रेरणेनें जेव्हां मला मोहित केलें तेव्हां मला विवाह करण्याची इच्छा उत्पन्न झाली होती. मग हे प्रभो रघुराया! मला कोणत्या करणास्तव आपण विवाह करूं दिला नाहीं?

सुनु मुनि तोहि कहउँ सहरोसा।
भजहिँ जे मोहि तजि सकल भरोसा।
करउँ सदा तिन्ह कै रखवारी।
जिमि बालकहिँ राख महतारी।

(राम म्हणाले,) हे मुने! ऐक. मी तुला खुल्या दिलानें सांगतों कीं, मजवरच सर्व भिस्त टाकून जे लोक मलाच भजतात त्यांचें रक्षण ज्याप्रमाणें आई बालकाचें रक्षण करते, त्याप्रमाणें मी निरंतर करीत असतों.

गह सिसु बच्छ अनल अहि धाई।
तहँ राखइ जननी अरु गाई।
प्रौढ भये तेहि सुत पर माता।
प्रीति करइ नहिँ पाछिल बाता।

गाय आणि जननी आपला वत्स आणि बालक अग्नीला किंवा सर्पाला धरण्यास धांवत असतां त्यांचें निवारण करितात. तेच प्रौढ झाल्यावर जरी तिची त्यांजवर ममता असतेच, तथापि बाळपणाच्या प्रेमाची सर मात्र तेव्हां नसते.

मोरे प्रौढ-तनय-सम ज्ञानी।
बालक सुतसम दास अमानी।
जनहिँ मोर बल निज बल ताही।
दुहुँ कहँ काम क्रोध रिपु आही।
यह बिचारि पंडित मोहि भजहीँ।
पायेहु ज्ञान भगति नहिँ तजहीँ।

ज्ञानवंत लोक मला प्रौढपुत्राप्रमाणें असून निरभिमान भक्त मला बालपुत्राप्रमाणें होत. ज्ञानी आणि भक्त उभयतांनाहि काम आणि क्रोध शत्रुस्थानीं असतातच; परंतु ज्ञान्यांना स्वतःचें बळ असतें आणि भक्त केवळ माझ्याच बळावर असतात. अविद्या घालविण्यास ज्ञानी माझें भजन करतात. (अर्थात् त्यांची निष्ठा मुख्यतः ज्ञानाची असते.) भक्त मात्र ज्ञाननिष्ठ झाले तरी आपली मूळ भक्तिनिष्ठा सोडीत नाहींत.

**दो०—काम-क्रोध-लोभादि-मद प्रबल मोह कै धारि। तिन्ह महँ अतिदारुन दुखद मायारूपी नारि॥ ४८॥**

काम, क्रोध, मद, लोभादि हे सर्व मायेचें प्रबल सैन्य होय, आणि त्यांतल्या त्यांत स्त्री प्रत्यक्ष मायारूपी असून अत्यंत दारुण आणि दुःखकारक आहे.

चौ०—सुनु मुनि कह पुरान श्रुतिसंता।
मोहबिपिन कहुँ नारि बसंता।

जप तप नेम जलास्रय झारी।
होइ ग्रीषम सोखइ सब नारी।
काम क्रोध मद मत्सर भेका।
इनहिँ हरषप्रद बरषा एका।
दुर्बासना कुमुदसमुदाई।
तिन्ह कहँ सरद सदा सुखदाई।

मुने! ऐक. वेद, पुराणें आणि संत हेदेखील असेंच सांगतात कीं, मोहरूपी अरण्यांत स्त्री हाच वसंतऋतु होय. तीच स्त्री ग्रीष्मऋतु होऊन जपतपनियमादिक सर्व जलाशयांना शुष्क करून टाकते. काम, क्रोध, मद, मत्सर ह्या बेडकांना मात्र ती वर्षाऋतूप्रमाणें सुखप्रद होते. दुर्वासनारूप कमलसमुदायास ती सदोदित शरदृतूप्रमाणें उल्लसित करिते.

धर्म सकल सरसी–रुह–बृंदा।
होइ हिम तिन्हहिँ दहइ सुख मंदा।
पुनि ममता जवासबहुताई।
पलुहइ नारि सिसिररितु पाई।

सकल धर्मरूप कमलवनास ती मूढ स्त्री हेमंतऋतूप्रमाणें सुखदाहक होते. तसेंच ममतारूपी जवासवृक्षास नारी ही शिशिरऋतूप्रमाणें पल्लवित करिते.

पाप उलूकनिकर सुखकारी।
नारि निबिडरजनी अँधियारी।
बुधि बल सील सत्य सब मीना।
बंसी सम त्रिय कहहिँ प्रबीना।

नारीरूप दाट काळोखी रात्र पापरूप उलूकसमूहास आनंदित करिते. बुद्धि, बल, शील आणि सत्य इत्यादि सर्व मीनांस स्त्री ही गळाप्रमाणें होय असें विद्वानांचें मत आहे.

**दो०–अवगुनमूल सूलप्रद प्रमदा सब दुखखानि। ता तेँ कीन्ह निवारन मुनि मैँ यह जिय जानि॥ ४९॥**

स्त्री ही दुर्गुणांचें मूल असून ती सुळावर चढविणारी आहे. अर्थात् सर्व दुःखांची ती खाण होय. असा विचार करून, हे मुने! मीं तुझी विवाहेच्छा कुंठित केली.

चौ०–सुनि रघुपति के बचन सुहाये।
मुनितन पुलक नयन भरि आये।
कहहु कवन प्रभु कै असि रीती।
सेवक पर ममता अरु प्रीती।
जे न भजहिँ अस प्रभु भ्रम त्यागी।
ज्ञानरंक नर मंद अभागी।

रघुपतीचें तें सुंदर वचन ऐकतांच नारदांच्या शरीरावर रोमांच उभे राहून त्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. (हे पार्वति!) सांग तर, कोणत्या प्रभूची अशी रीत आहे कीं तो आपल्या सेवकावर अशी ममता आणि प्रीति करितो. सर्व भ्रामक कल्पना सोडून जे अशा प्रभूची भक्ति करीत नाहींत ते नर ज्ञानशून्य आणि हतभागी होत.

पुनि सादर बोले मुनि नारद।
सुनहु राम बिज्ञानबिसारद।
संतन्ह के लच्छन रघुबीरा।
कहहु नाथ भंजन भवभीरा।

नारदमुनी पुन्हां आदरपूर्वक प्रश्न करूं लागले कीं, हे विज्ञानविशारद! भवभयभंजन! प्रभु रघुवीर! रामचंद्र! मला संतांचीं लक्षणें कथन करावीं.

सुनु मुनि संतन्ह के गुन कहऊँ।
जिन्ह तेँ मैँ उन्ह के बस रहऊँ।
षट बिकार जित अनघ अकामा।
अचल अकिंचन सुचि सुखधामा।
अमित बोध अनीह मितभोगी।
सत्यसंध कबि कोबिद जोगी।
सावधान मानद मदहीना।
धीर भगतिपथ परम प्रबीना।

(राम म्हणाले) हे मुने! ऐक. जेणेंकरून मीं संतांच्या आधीन होतों अशीं संतांचीं लक्षणें मी तुला कथन करितों. संत हे कामादि षड्रिपूंना जिंकणारे, निष्पाप निरिच्छ, स्थितप्रज्ञ, निर्धन, पवित्र, आणि सुखपुंज, असून अत्यंत ज्ञानवंत, निष्काम, मितभोगी, सत्यप्रतिज्ञ, पंडित, ज्ञाते, योगी, जागृत, विनयसंपन्न, मदहीन, धीर, आणि भक्तिमार्गांमध्यें अत्यंत प्रवीण असे असतात.

**दो०–गुनागार संसार–दुख–रहित बिगत-संदेह। तजि मम चरनसरोज प्रिय जिन्ह कहुँ देह न गेह॥ ५०॥**

ते सद्गुणांचें आगर संसारदुःखविवर्जित आणि नष्टसंदेह असून त्यांस माझ्या चरणकमलांखेरीज देह किंवा गेह कांहींच प्रिय वाटत नाहीं.

चौ०–निज गुन स्रवन सुनत सकुचाहीँ।
परगुन सुनत अधिक हरषाहीं।

सम सीतल नहिँ त्यागहिँ नीती ।
सरल सुभाव सबहिँ सन प्रीती ।
जप तप ब्रत दम संजम नेमा ।
गुरु–गोविंद–बिप्र–पद प्रेमा ।
स्रद्धा छमा मइत्री दाया ।
मुदिता मम पदप्रीति अमाया ।

ते स्वतांच्या गुणांची प्रशंसा ऐकून ओशाळतात, आणि परगुणश्रवणानें मात्र अत्यंत हर्षित होतात. ते समदर्शी, शांत, नीतीस न सोडणारे, निष्कपट स्वभावाचे, सर्वांवर प्रेम करणारे, जप, तप, व्रत, यम, नियम, आणि दम करणारे, गुरु, ईश्वर आणि ब्राह्मण ह्यांच्या चरणीं प्रेम करणारे, श्रद्धालु, क्षमावान्, सर्वांशीं मैत्री आणि दया करणारे, नित्य प्रसन्न, आणि माझ्या चरणीं निष्काम प्रेम करणारे असे असतात.

बिरति बिबेक बिनय बिग्याना ।
बोध जथारथ बेदपुराना ।
दंभ मान मद करहिँ न काऊ ।
भूलि न देहिँ कुमारग पाऊ ।
गावहिँ सुनहिँ सदा मम लीला ।
हेतुरहित पर–हित–रत–सीला ।
सुनु मुनि साधुन के गुन जेते ।
कहि न सकहिँ सारद स्रुति तेते ।

ते विरक्त, विवेकी, विनयशील, विज्ञानवंत व वेदपुराणतत्त्वज्ञ असे असतात. ते कधींच दंभ, मान किंवा अहंकार न बाळगतां चुकूनदेखील कुमार्गाकडे पाऊल टाकीत नाहींत. सदासर्वकाळ ते माझ्या लीलांचें गायन आणि श्रवण करितात. निर्हेतुकपणें दुसऱ्यावर उपकार करण्याविषयीं तत्पर असणें हेंच त्यांचें शील होय. हे मुने! ऐक, संतांचें सर्व गुण सरस्वती आणि वेद यांच्यांनीं देखील वर्णवणार नाहींत.

छंद–कहि सक न सारद सेष नारद सुनत पदपंकज गहे । अस दीनबंधु कृपाल अपने भगतगुन निज मुख कहे ॥
सिरु नाइ बारहिँ बार चरनन्हि ब्रह्मपुर नारद गये । ते धन्य तुलसीदास आस बिहाइ जे हरिरँग रये ॥ १४ ॥

शारदा आणि शेष हेदेखील त्यांच्या सद्गुणांचें वर्णन करूं शकणार नाहींत. हें नारदांनीं ऐकतांच त्यांनीं रामचंद्रांचें पदपंकज धरिलें. ह्याप्रमाणें दीनबंधु दयाघनांनीं स्वमुखानें आपल्या भक्तांचें गुणवर्णन केलें. नारदांनीं वारंवार प्रभुचरणीं मस्तक नमवून ब्रह्मलोकीं गमन केलें. तुलसीदास म्हणतात, जे आशेचा त्याग करून श्रीहरीच्या रंगांत रंगून जातात ते धन्य होत.

दो०–रावनारिजस पावन गावहिँ सुनहिँ जे लोग । रामभगति दृढ पावहिँ बिनु बिराग जप जोग ॥ ५१ ॥

रावणारि श्रीरामचंद्रांचें पावन यश जे नर श्रवण किंवा पठण करितात त्यांस वैराग्य, जप, योग, इत्यादि साधनांवांचून अढळ रामभक्ति प्राप्त होते.

दो०–दीप–सिखा–सम जुबतिजन मन जनि होसि पतंग । भजहिँ राम तजि काम मद करहिँ सदा सतसंग ॥ ५२ ॥

हे मना! स्त्रीजन हा दीपज्योतीप्रमाणें आहे, तरी तूं पतंगाप्रमाणें होऊं नकोस. तूं अभिमान आणि काम ह्यांचा त्याग करून रामचंद्रांचें भजन कर आणि निरंतर सत्संग धर.

॥ इति श्रीरामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने विमलविज्ञानवैराग्यसम्पादनो नाम तृतीयः सोपानः समाप्तः ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

। श्रीजानकीवल्लभो विजयते ।

# ॥ रामचरितमानस ॥

## अर्थात्

## ॥ श्रीतुलसीरामायण ॥

( मराठी भाषांतरासहित. )

# ( चतुर्थ सोपान )

## ( किष्किंधाकाण्ड )

श्लोकौ ।

कुन्देन्दीवरसुन्दरावतिबलौ विज्ञानधामावुभौ । शोभाढ्यौ वरधन्विनौ श्रुतिनुतौ गोविप्रवृन्दप्रियौ । मायामानुषरूपिणौ रघुवरौ सद्धर्म्मवर्म्मौ हितौ । सीतान्वेषणतत्परौ पथि गतौ भक्तिप्रदौ तौ हि नः ॥ १ ॥

कुंदपुष्प ( शुभ्र ) आणि नीलकमलाप्रमाणें सुंदर, अत्यंत बलाढ्य, विज्ञाननिधान, शोभासंपन्न, धनुर्धरश्रेष्ठ, वेदस्तुत, गोब्राह्मणकुलप्रिय, सद्धर्मपरायण, हितकर, सीताशुद्धितत्पर, व स्वमायेकरून मानवरूप धारण करणारे, असे ते दोघे मार्गस्थ रामलक्ष्मण आह्मांला भक्तिदायक होवोत.

ब्रह्माम्भोधिसमुद्भवं कलिमलप्रध्वंसनं चाव्ययं । श्रीमच्छम्भुमुखेन्दुसुन्दरवरे संशोभितं सर्वदा । संसारामयभेषजं सुखकरं श्रीजानकीजीवनं । धन्यास्ते कृतिनः पिबन्ति सततं श्रीरामनामामृतम् ॥ २ ॥

वेदरूप सागरांतून प्रकट झालेलें, कलिसंबंधीं पापाचा विध्वंस करणारें, कधींहि नाश न पावणारें, चंद्राप्रमाणें परम उज्ज्वल अशा श्रीशंकरवदनांत सर्वदा विराजित असलेलें, संसाररूपी व्याधीचें औषध अत्यंत सुखकारक, व श्रीजानकीचें जीवन असलेलें जें श्रीरामनामामृत त्याचें जे कोणी पान करितात तेच खरे कृतकृत्य आणि धन्य होत.

सो०—मुक्तिजनम महि जानि ज्ञानखानि अघहानिकर । जहँ बस संभुभवानि सो कासी सेइय कस न ॥ १ ॥

जी मुक्तीची जन्मभूमि, ज्ञानाची खाण व पापाचें हरण करणारी असून जिचे ठायीं श्रीशंकरपार्वती ह्यांचा वास असतो त्या काशीचें ( माहात्म्य जाणूनहि ) सेवन कां न करावें ?

सो०—जरत सकल सुरबृंद विषमगरल जेहि पान किय । तेहि न भजसि मन मंद को कृपाल संकरसरिस ॥ २ ॥

सर्व देवगण दग्ध होत असतां ज्यानें अत्यंत तीव्र कालकूट विषाचें प्राशन केलें त्यास, हे मूढ मना ! तूं भजत नाहींस ना ? शंकरासारखा दयाळु कोण रे आहे ?

चौ०—आगे चले बहुरि रघुराया ।
रिष्यमूक पर्वत नियराया ।
तहँ रह सचिव सहित सुग्रीवाँ ।
आवत देखि अ-तुल-बल सीवाँ ।

रघुराज तेथून ( पंपासरोवरापासून ) पुढें निघाले. ते ऋष्यमूकपर्वताजवळ येऊन पोंचले. तेथें सुग्रीव

सचिवांसह राहत होता. त्यानें अतुल पराक्रमाची सीमाच असे ते रामलक्ष्मण येत आहेत असें पाहिलें.

अति सभीत कह सुनु हनुमाना।
पुरुष-जुगल बल-रूप-निधाना।
धरि बटुरूप देखु तैं जाई।
कहेसु जानि जिय सैन बुझाई।

सुग्रीव अत्यंत भयभीत होऊन म्हणाला, हनुमाना! ऐक. हे दोघे पुरुष रूप आणि बल यांचें निधान वाटतात. तूं बटुरूप घेऊन त्यांस भेट, आणि सर्व समजून घेऊन संकेतानें मला कळीव.

पठये बालि होहिं मन मैला।
भागउँ तुरत तजउँ यह सैला।

जर वालीनें दुष्ट बुद्धीनें त्यांना पाठाविलें असेल तर आपण हा पर्वत सोडून लागलीच पलायन करूं.

बिप्ररूप धरि कपि तहँ गयऊ।
माथ नाइ पूछत अस भयऊ।
को तुह्म स्यामल-गौर-सरीरा।
छत्रीरूप फिरहु बन बीरा।
कठिनभूमि कोमल-पद-गामी।
कवन हेतु बिचरहु बन स्वामी।
मृदुल मनोहर सुंदर गाता।
सहत दुसह बन आतपबाता।
की तुह्म तीनि देव महँ कोऊ।
नरनारायन की तुह्म दोऊ।

मारुती विप्ररूप घेऊन तेथें गेला आणि मस्तक नमवून विचारूं लागला,-श्यामल आणि गौर कांतीचे असे आपण कोण आहां? रूपावरून तर आपण क्षत्रिय दिसत असून मग या वनांत कां फिरत आहां? ही वनभूमि फार कठिण, आणि आपण तर सुकुमार पायांनींच चालत आहां! हे स्वामिन्! आपला वनांत संचार करण्याचा हेतु तरी काय? आपलें शरीर अत्यंत सुकुमार, मनोहर आणि सुंदर, तरी पण या वनांतील ऊन आणि वारा आपण सहन करीतच आहां. आपण कोणी त्रैमूर्तीतील देव आहां काय? किंवा आपण दोघे नरनारायण आहांत?

**दो०-जगकारन तारन भव भंजन धरनी-भार। की तुह्म अखिल-भुवन-पति लीन्ह मनुजअवतार॥ १॥**

किंवा आपण विश्वकारण, भवतारक, पृथ्वीचा भार हरण करणारे आणि त्रिभुवनाचे स्वामी असून हा मनुष्यावतार धारण केला आहे?

चौ०-कोसलेसदसरथ के जाये।
हम पितुबचन मानि बन आये।
नाम राम लछिमन दोउ भाई।
संग नारि सुकुमारि सुहाई।
इहाँ हरी निसिचर बैदेही।
बिप्र फिरहिँ हम खोजत तेही।
आपन चरित कहा हम गाई।
कहहु बिप्र निजकथा बुझाई।

राम म्हणाले, कोशलाधिप राजा दशरथाचे आम्ही पुत्र असून त्याच्या आज्ञेचा अंगीकार करून आम्ही वनांत आलों आहों. आम्हां उभयबंधूंचीं नांवें रामलक्ष्मण आहेत. आमच्याबरोबर माझी सुकुमार स्त्री वैदेही होती, तिला राक्षसांनीं हरण करून नेली. हे बटो! आम्ही तिच्याच शोधार्थ फिरत आहों. आम्हीं आपला वृत्तांत निवेदन केला; आतां हे बटो, आपलें वर्तमान तूं आम्हांला स्पष्टपणें कळू दे.

प्रभु पहिचानि परेउ गहि चरना।
सो सुख उमा जाइ नहिँ बरना।
पुलकित तन मुख आव न बचना।
देखत रुचिरबेष कै रचना।
पुनि धीरज धरि अस्तुति कीन्ही।
हरष हृदय निजनाथहिँ चीन्ही।

प्रभूस ओळखून मारुतीनें त्यांचे पाय घट्ट धरिले. हे पार्वति! त्या सुखाचें वर्णन करितां येत नाहीं. प्रभूंची ती रम्य अंगलतिका पाहून मारुतीच्या शरीरावर रोमांच उभे राहिले, आणि त्याच्या मुखावाटें शब्द निघेना. आपल्या प्रभूला ओळखल्यामुळें त्याच्या हृदयांत हर्ष झाला व त्यानें धैर्य धरून प्रभूंची स्तुति केली.

मोर न्याउ मैं पूछा साईं।
तुह्म पूछहु कस नर की नाईं।
तव मायाबस फिरउँ भुलाना।
ता तें मैं नहिँ प्रभु पहिचाना।

हे स्वामिन्! मीं विचारिलें तें न्याय्यच होतें. परंतु आपण साधारण मानवाप्रमाणें प्रश्न करीत आहां हें कसें? आपल्या मायेच्या झपाट्यांत मी भ्रमिष्टासारखा भटकत असल्यामुळें मला प्रभूंना ओळखतां आलें नाहीं.

दो०—एक मैं मंद मोहबस कुटिलहृदय अज्ञान। पुनि प्रभु मोहि बिसारेउ दीनबंधु भगवान॥२॥

एकतर मी मंदमति, मोहवश झालेला, वाम हृदयाचा, आणि ज्ञानशून्य; त्यांतून पुन्हा आपण माझे दीनवत्सल स्वामी भगवान् मला विसरलां !

चौ०—जदपि नाथ बहु अवगुण मोरे।
सेवक प्रभुहिँ परइ जनि भोरे।
नाथ जीव तव माया मोहा।
सो निस्तरइ तुह्मारेहि छोहा।
ता पर मैं रघुबीर दोहाई।
जानउँ नहिँ कछु भजन उपाई।
सेवक—सुत पति—मातु भरोसे।
रहइ असोच बनइ प्रभु पोसे।

हे नाथ ! जरी माझ्यांत अनेक अवगुण आहेत तरी प्रभूला सेवकाची विस्मृति कधीं चुकूनहि होऊं नये. हे प्रभो ! हा पामर जीव आपल्या मायेनें मोहित झाला आहे. त्याचा निस्तार आपल्या कृपेनेंच होणार. इतक्याउप्पर, हे रघुवीर ! आपलीच शपथ घेऊन सांगतों कीं, मी भजनादिक साधन कांहीं एक जाणत नाहीं. बालक आणि सेवक हे जसे माता आणि स्वामी यांच्या भरंवशावर निश्चिंत असतात, त्याप्रमाणेंच मी प्रभूच्या छत्राखालीं निश्चिंतपणें वावरत आहे.

अस कहि परेउ चरन अकुलाई।
निजतनु प्रगटि प्रीति उर छाई।
तब रघुपति उठाइ उर लावा।
निज—लोचन—जलसीँचि जुडावा।

असें म्हणून व्याकुल होत्साता मारुतीनें रामचरणावर लोट मारला. त्यानें आपलें स्वरूप प्रगट केलें व त्याचें हृदय प्रेमानें भरून आलें. तेव्हां रघुपतीनें त्यास उचलून उराशीं धरिलें, आणि आपल्या अश्रुजलाचें सिंचन करून त्यास शांत केलें.

सुनु कपि जिय मानसि जनि ऊना।
तैं मम प्रिय लछिमन तैं दूना।
समदरसी मोहि कह सब कोऊ।
सेवकप्रिय अनन्यगति सोऊ।

(राम म्हणाले) हे मारुते ! ऐक. तूं आपल्याला कमी लेखूं नकोस. तूं मला लक्ष्मणाहूनहि प्रिय आहेस. सर्व लोक मला समदर्शी म्हणतात. परंतु अनन्यगति असा माझा सेवकच मला प्रिय होतो.

दो०—सो अनन्य जाके असि मति न टरइ हनुमंत। मैं सेवक चराचर रूप स्वामि भगवंत॥३॥

स्थावरजंगमात्मक सृष्टि ही भगवत्स्वरूप असून मी त्या स्वामीचा सेवक आहे, हा ज्याचा दृढ निर्धार ढळत नाहीं तोच अनन्य भक्त म्हणावा.

चौ०—देखि पवनसुत पति अनुकूला।
हृदय हरष बीती सब सूला।
नाथ सैल पर कपिपति रहई।
सो सुग्रीव दास तव अहई।
तेहि सन नाथ मइत्री कीजे।
दीन जानि तेहि अभय करीजे।
सो सीता कर खोज कराइहि।
जहँ तहँ मरकट कोटि पठाइहि।

स्वामीस प्रसन्न पाहून मारुतीस हर्ष झाला, आणि त्याच्या मनांतली सर्व चिंता नष्ट होऊन तो म्हणाला, हे नाथ ! ह्या शैलशृंगावर कपि पती सुग्रीव राहतो व तो आपला दास आहे. हे प्रभो, आपण त्याच्याशीं मैत्री करावी आणि त्यास दीन जाणून अभय द्यावें. तो चोहोंकडे कोटयवधि वानर पाठवून सीतेचा शोध करवील.

एहि बिधि सकलकथा समुझाई।
लिये दुअउ जन पीठि चढाई।
जब सुग्रीव राम कहुँ देखा।
अतिसय जनम धन्य करि लेखा।

ह्याप्रमाणें सर्व हकीकत सांगून त्या दोघांसहि मारुतीनें आपल्या पाठीवर बसविलें. सुग्रीवानें जेव्हां रामास पाहिलें तेव्हां त्यास आपला जन्म अत्यंत धन्य वाटला.

सादर मिलेउ नाइ पदमाथा।
भेँटेउ अनुजसहित रघुनाथा।
कपि कर मन बिचार एहि रीती।
करिहहिँ बिधि मो सन ये प्रीती।

सुग्रीव अत्यादरानें चरणीं मस्तक ठेवून उभयतांना भेटला. रामचंद्रहि लक्ष्मणासह त्यास भेटले. सुग्रीव चिंतातुर होऊन मनांत असा विचार करूं लागला कीं, हे विधात्या ! हे मजवर प्रेम करितील काय !

दो०—तब हनुमंत उभय दिसि कहि सब कथा सुनाइ। पावक साखी देइ करि जोरी प्रीति दृढाइ॥४॥

तेव्हां मारुतीनें दोन्ही बाजूंचा सर्व वृत्तांत समजावून सांगितला, आणि अग्निनारायणास साक्षी ठेवून दोघांचीहि दृढ प्रीति जोडली.

चौ०—कीन्हि प्रीति कछु बीच न राखा।
लछिमन रामचरित सब भाखा।

रामसुग्रीवांची जेव्हां मैत्री जुळली तेव्हां त्यांच्यांत कांहींच आडपडदा उरला नाहीं. लक्ष्मणानें रामाचा सर्व पूर्ववृत्तांत कथन केला.

कह सुग्रीव नयन भरि बारी।
मिलिहि नाथ मिथिलेसकुमारी।
मंत्रिन्ह सहित इहाँ एक बारा।
बैठ रहेउँ मैं करत बिचारा।
गगनपंथ देखी मैं जाता।
परबस परी बहुत बिलपाता।

सुग्रीवाचे डोळे अश्रूंनीं भरून आले व तो म्हणाला, हे नाथ! जानकी आपली आपल्याला परत मिळेल. मंत्र्यांसहवर्तमान मी येथें एकदां विचार करीत बसलों असतां ती आकाशमार्गानें जात असतांना माझ्या दृष्टीस पडली. शत्रूच्या तावडींत सांपडल्यामुळें ती फार विलाप करीत होती.

राम राम हा राम पुकारी।
हमहि देखि दीन्हेउ पट डारी।
माँगा राम तुरत तेहि दीन्हा।
पट उर लाइ सोच अति कीन्हा।

राम! राम! हा राम! असा विलाप करीत असतां आम्हांस पाहतांच तिनें एक वस्त्र खालीं टाकलें. तें वस्त्र रामांनीं मागितल्यावरून सुग्रीवानें लागलींच आणून दिलें. तें वस्त्र उराशीं धरून रामांनीं फार शोक केला.

कह सुग्रीव सुनहु रघुबीरा।
तजहु सोच मन आनहु धीरा।
सब प्रकार करिहउँ सेवकाई।
जेहि बिधि मिलिहि जानकी आई।

सुग्रीव म्हणाला, हे रघुवीर! ऐका. मनाला धीर देऊन शोकाचा त्याग करा. जेणेंकरून माता जानकी आपणांला भेटेल अशा सर्व प्रकारें मी आपली सेवा करीन.

**दो०—सखाबचन सुनि हरषे कृपासिंधु बलसींवँ। कारन कवन बसहु बन मोहि कहहु सुग्रीवँ॥ ५॥**

ही त्या मित्राची प्रतिज्ञा ऐकून दयासागर अतुलितबल रघुपति हर्षित होऊन म्हणाले, हे सुग्रीवा! कोणत्या कारणामुळें तूं या वनांत राहत आहेस तें मला कळूं दे.

चौ०—नाथ बालि अरु मैं दोउ भाई।
प्रीति रही कछु बरनि न जाई।
मयसुत मायाबी तेहि नाउँ।
आवा सो प्रभु हमरे गाऊँ।

(सुग्रिव म्हणाला,) हे प्रभो, वाली आणि मी असे उभय बंधु आहोंत. आमची बंधुप्रीति अवर्णनीय होती. मयदैत्याचा पुत्र मायावी नांवाचा होता. तो आमच्या पंपापुरांत आला.

अर्धराति पुरद्वार पुकारा।
बाली रिपुबल सहइ न पारा।
धावा बालि देखि सो भागा।
मैं पुनि गयउँ बंधु सँग लागा।

मध्यरात्रीस पुरद्वारावर त्यानें ललकार ठोकली. परंतु वालीस रिपूचा तो उद्दामपणा सहन न झाल्यामुळें तो त्याच्यामागें धावला. त्यास पाहून मायावी पळाला. नंतर मीहि भावाबरोबर त्याचा पाठलाग करूं लागलों.

गिरि—बर—गुहा पैठ सो जाई।
तब बाली मोहिँ कहा बुझाई।
परिखेसु मोहिँ एक पखवारा।
नहिँ आवउँ तब जानेसु मारा।

वालीच्या भयानें धांवतां धांवतां तो पर्वताच्या एका गुहेंत शिरला. तेव्हां वालीनें मला समजावून सांगितलें कीं एक पंधरवडाभर माझी वाट पहा. या अवधींत मी जर न आलों तर मारलों गेलों असें समज.

मास दिवस तहँ रहेउँ खरारी।
निसरी रुधिरधार तहँ भारी।
बालि हतेसि मोहि मारिहि आई।
सिला देइ तहँ चलेउँ पराई।

(सुग्रीव म्हणाला,) हे खरशत्रो! एक महिनाभर मी तेथें राहिलों. अखेरीस रक्ताची प्रचंड धार

बाहेर आली तेव्हां वालीस मारून मायावी मलाहि मारण्यास येईल अशा समजुतीनें त्या गुहेवर एक शिळा ठेवून मी पळत पंपापुराकडे आलों.

मंत्रिन्ह पुर देखा बिनु साईँ ।
दीन्हेउँ मोहि राज बरिआईँ ।
बाली ताहि मारि गृह आवा ।
देखि मोहि जिय भेद बढावा ।

मंत्र्यांनीं नगर अराजक पाहून मला बळजबरीनें राज्यावर बसविलें. नंतर वाली मायावीला मारून परत घरीं आला व त्यानें मला पाहतांच मजविषयीं आपल्या मनांत वैर वाढविलें.

रिपुसम मोहि मारेसि अति भारी ।
हरि लीन्हेसि सर्बसु अरु नारी ।
ता के भय रघुबीर कृपाला ।
सकलभुवन मैं फिरेउँ बिहाला ।
इहाँ सापबस आवत नाहीं ।
तदपि सभीत रहउँ मन माहीँ ।

त्यानें मला शत्रूप्रमाणें फार भयंकर मार मारला, आणि माझें स्त्रीसह सर्वस्व हिरावून घेतलें. हे दयाघन रघुवीरा ! त्याच्या भीतीनें मी सर्व भुवनांत व्याकुल होऊन हिंडलों, पण येथें मात्र तो शाप-भीतिस्तव येऊं शकत नाहीं. तरीदेखील मी मात्र मनांत त्याला वचकूनच असतों.

सुनि सेवकदुख दीनदयाला ।
फरकि उठीँ दोउ भुजा बिसाला ।

सेवकांचें दुःख ऐकून दीनदयाळ रामचंद्राचे दोन्हीहि प्रचंड बाहू स्फुरण पावूं लागले.

**दो०–सुनु सुग्रीवँ मारिहउँ बालिहि एकहि बान। ब्रह्म–रुद्र–सरनागत गये न उबरिहि प्रान ॥ ६ ॥**

( राम म्हणाले, ) हे सुग्रीवा ! ऐक. मी एकाच बाणानें वालीस नदारद करीन. ब्रह्मदेवास किंवा शंकरास जरी तो शरण गेला तरीहि त्याचे प्राण वांचणार नाहींत.

चौ०–जे न मित्र दुख होहिँ दुखारी ।
तिन्हहिँ बिलोकत पातक भारी ।
निज-दुख-गिरि-सम रज करि जाना ।
मित्र क दुखरज मेरुसमाना ।
जिन्ह के असि मति सहज न आई ।
ते सठ हठि कत करत मिताई ।

जे मित्राच्या दुःखानें दुःखी होत नाहींत त्यांना अवलोकन करण्यांत देखील अत्यंत पातक आहे. आपलें पर्वतप्राय दुःख रजाप्रमाणें समजून मित्राचें रजाएवढें दुःख मेरूप्रमाणें समजण्याची ज्याच्यामध्यें साहाजिक कळकळ नाहीं असले मुरब्बी सोदे मैत्री तरी कसली करितात ?

कुपथ निवारि सुपंथ चलावा ।
गुन प्रगटइ अवगुनन्हि दुरावा ।
देत लेत मन संक न धरई ।
बल अनुमान सदा हित करई ।
बिपतिकाल कर सतगुन नेहा ।
स्रुति कह संत मित्र गुन एहा ।

वाईट मार्गापासून परावृत्त करून सन्मार्गाला लावणें, अवगुण झांकून गुण प्रकट करणें, देण्याघेण्यांत मनामध्यें शंका न धरणें, यथाशक्ति सदा हितच करणें आणि संकटकालीं शतपट प्रेम करणें ही सन्मित्राचीं लक्षणें श्रुतीनें प्रतिपादिलीं आहेत.

आगे कह मृदुबचन बनाई ।
पाछे अनहित मन कुटिलाई ।
जा कर चित अहि-गति-समभाई ।
अस कुमित्र परिहरेहि भलाई ।

तोंडावर लाघवी बाता मारून मागें मात्र मनांतून धोकेबाजीनें नुकसानीचा प्रयत्न करणें अशा प्रकारें, हे बंधो ! ज्याचें चित्त सर्पगतीप्रमाणें आहे अशा कुमित्राचा त्याग करण्यांतच हित आहे.

सेवक सठ नृप कृपिन कुनारी ।
कपटी मित्र सूलसम चारी ।
सखा सोच त्यागहु बल मोरे ।
सब बिधि घरब काज मैं तोरे ।

बेइमान सेवक, चिक्कु मालक, लुच्ची स्त्री आणि लफंगा दोस्त हे चारीहि अस्तनींतले निखारे होत. हे मित्रा ! माझ्यावर भरंवसा ठेवून निश्चिंत हो. मीं सर्वस्वीं तुझ्या कामाचा विडा उचलला आहे.

कह सुग्रीवँ सुनहु रघुबीरा ।
बालि महाबल अति–रन–धीरा ।
दुंदुभिअस्थि ताल देखराये ।
बिनु प्रयास रघुनाथ ढहाये ।
देखि अमितबल बाढी प्रीती ।
बालि बधब इन्ह भइ परतीती ।

सुग्रीव म्हणाला, " हे रघुवीरा ! ऐका. वाली भयंकर कुवतदार आणि मोठाच खंदा लढवय्या आहे. " नंतर सुग्रीवानें दुंदुभी दैत्याच्या अस्थी आणि तालवृक्ष दाखविले. रघुवीरांनीं ते ठिकरीसारखे ठोकरून उडविले. रामाचें तें कल्पनातीत बल पाहून सुग्रीवाचें प्रेम अधिकच वाढलें; आणि राम वालीचा वध करणार याची त्याला प्रचीति आली.

बार बार नावइ पद सीसा।
प्रभुहि जानि मन हरष कपीसा।
उपजा ज्ञान बचन तब बोला।
नाथ कृपा मन भयउ अलोला।
सुख संपति परिवार बडाई।
सब परिहरि करिहउँ सेवकाई।
ए सब रामभगति के बाधक।
कहहिँ संत तव पद अवराधक।

सुग्रीवानें तें प्रभुत्व ओळखून हर्षित अंतःकरणानें वारंवार रामाच्या चरणीं मस्तक नमविलें. त्याला ज्ञान होऊन तो म्हणाला कीं, हे स्वामी ! आपल्या कृपेनें माझें चित्त स्थिर झालें. सुख, संपत्ति, परिवार आणि ऐश्वर्य हें सर्व सोडून मी आपली सेवाच करीन. कारण, ह्या सर्व गोष्टी रामभक्तीला बाधक आहेत, असें आपल्या चरणाची आराधना करणारे संतजन सांगतात.

सत्रु मित्र सुख दुख जग माहीँ।
मायाकृत परमारथ नाहीँ।
बालि परमहित जासु प्रसादा।
मिलेहु राम तुम्ह समन बिषादा।
सपने जेहि सन होइ लराई।
जागे समुझत मन सकुचाई।
अब प्रभु कृपा करहु येहि भाँती।
सब तजि भजन करउँ दिनु राती।

जगांत शत्रु आणि मित्र, सुख आणि दुःख, हीं सर्व मायेमुळें उत्पन्न होतात. त्यांत सार वस्तु अशी कांहींच नाहीं. रामा ! वाली हा माझा परमहितकर्ता झाला, त्याच्याच प्रसादानें आपलें दर्शन घडलें आणि चिंता नष्ट झाली. स्वप्नांत एकाद्याशीं युद्ध केल्यानंतर जाग्रतावस्था प्राप्त झाल्यावर जसा त्याला संकोच वाटतो तद्वत् माझें झालें. ( वालीशीं फुकट वैर केलें असें मला वाटत आहे ). हे प्रभो ! आतां आपण माझ्यावर अशा प्रकारें कृपा करा कीं, जेणें-करून सर्वसंगपरित्याग करून मी आपलें रात्रंदिवस भजनच करीत राहीन.

सुनि बिरागसंयुत कपिबानी।
बोले बिहँसि रामु धनुपानी।
जो कछु कहेहु सत्य सब सोई।
सखाबचन मम मृषा न होई।
नट मरकट इव सबहिँ नचावत।
राम खगेस बेद अस गावत।

सुग्रीवाची ती वैरागाची भाषा ऐकून धनुर्धर रामचंद्र हास्य करून म्हणाले, तूं जें म्हणतोस तें सर्व सत्य आहे. परंतु माझें वचन असत्य होणार नाहीं. काक भुशुंडी म्हणतात, हे गरुडा ! ज्याप्रमाणें नट ( दरवेशी ) वानरांना नाचवितात त्याप्रमाणें रामचंद्र सर्वांना नाचवितात असें वेद म्हणतो.

लेइ सुग्रीवँ संग रघुनाथा।
चले चापसायक गहि हाथा।
तब रघुपति सुग्रीवँ पठावा।
गर्जेसि जाइ निकट बल पावा।
सुनत बालि क्रोधातुर धावा।
गहि कर चरन नारि समुझावा।

नंतर रघुवीर हातांत धनुष्यबाण आणि बरोबर सुग्रीव घेऊन निघाले. नंतर रामांनीं सुग्रीवाला वालीकडे पाठविलें. त्यास पाठिंबा मिळाल्यानें त्यानें वालीजवळ जाऊन ललकार ठोकली. ती ऐकतांच वाली क्रुद्ध होऊन धांवला. तेव्हां त्याची स्त्री त्याच्या हातीं-पायीं पडून म्हणाली—

सुनु पति जिन्हहिँ मिलेउ सुग्रीवाँ।
ते दोउ बंधु तेजबलसीवाँ।
कोसलेससुत लछिमनरामा।
कालहु जीति सकहिँ संग्रामा।

( ती म्हणाली, ) हे नाथ ! ऐका. सुग्रीव ज्यांना जाऊन मिळाला आहे ते कोशलाधिपतीचे उभय पुत्र रामलक्ष्मण असून ते दोघेहि तेज आणि बल यांची केवळ सीमाच होत. ते युद्धामध्यें काळाला देखील परास्त करतील.

**दो०—कहा बालि सुनु भीरुप्रिय समदरसी रघुनाथ। जौँ कदापि मोहि मारहिँ तौ पुनि होउँ सनाथ॥ ७॥**

वाली म्हणाला, प्रिये ! तूं भीरु आहेस, ऐक.

राम समदर्शी आहेत. जरी यदाकदाचित् त्यांनीं माझा वधच केला तरीदेखील मी सनाथच होईन.

चौ०–अस कहि चला महाअभिमानी।
तृनसमान सुग्रीवँहि जानी।
भिरे उभौ बाली अति तरजा।
मुठिका मारि महाधुनि गरजा।
तब सुग्रीवँ बिकल होइ भागा।
मुष्टिप्रहार बज्रसम लागा।

असें म्हणून तो महान् अभिमानी वाली सुग्रीवास तृणवत् मानून त्यानें त्याचेवर मोर्चा फिरविला. ते दोघेहि एकमेकांस अगदीं भिडले. अखेरीस वालीनें अत्यंत चिडून एक मुष्टिप्रहार केला आणि मोठ्यानें गर्जना केली. तेव्हां सुग्रीव कासावीस होऊन पळाला. तो मुष्टिप्रहार त्यास वज्राप्रमाणें लागला.

मैं जो कहा रघुबीर कृपाला।
बंधु न होइ मोर यह काला।
एकरूप तुम्ह भ्राता दोऊ।
तेहि भ्रम तें नहिं मारेउँ सोऊ।

( सुग्रीव रामाजवळ येऊन म्हणाला, ) हे दयाघन रघुवीरा ! मी आपणांस प्रथमच सांगितलें होतें कीं, हा माझा भाऊ नसून काळ आहे. ( राम म्हणाले, ) तुम्ही दोघेहि दिसण्यांत अगदीं सारखे आहांत. तेव्हां भ्रमामुळें ( बाण चुकून तुला लागेल कीं काय अशा भीतीमुळें ) मीं त्याला मारिलें नाहीं.

कर परसा सु–ग्रीवँ–सरीरा।
तनु भा कुलिस गई सब पीरा।
मेली कंठ सुमन कै माला।
पठवा पुनि बल देइ बिसाला।
पुनि नानाबिधि भई लराई।
बिटपओट देखहिं रघुराई।

नंतर रामांनीं सुग्रीवाच्या अंगावरून हात फिरविला. तेणेंकरून त्याचे सर्व क्लेश नष्ट होऊन त्याचा देह वज्राप्रमाणें झाला. रामांनीं त्याच्या गळ्यांत पुष्पमाला घातली, आणि त्यास विशालशक्ति देऊन फिरून पाठविलें. तेव्हां त्या वालीसुग्रीवांचें अगदीं निकराचें युद्ध होत असलेलें राम वृक्षाच्या आडूनें पाहत होते.

दो०–बहु छलबल सुग्रीवँ करि हिय हारा भय मानि। मारा बाली राम तब हृदय माँझ सर तानि ॥ ८ ॥

सुग्रीवानें अनेक प्रकारें डावपेंच करून आपलें सामर्थ्य दाखविलें. तथापि अखेरीस दहशत खाऊन सुग्रीवानें मनांत कच खाली. तेव्हां रामांनीं वालीच्या उरावर संधान करून एक बाण मारला.

चौ०–परा बिकल महि सर के लागे।
पुनि उठि बैठ देखि प्रभु आगे।
स्यामगात सिर जटा बनाये।
अरुननयन सर चाप चढाये।
पुनि पुनि चितइ चरन चित दीन्हा।
सुफल जनम माना प्रभु चीन्हा।
हृदय प्रीति मुख बचन कठोरा।
बोला चितइ राम की ओरा।

बाण ठोठावतांच जमिनीवर वाली घायाळ होऊन चारी मोंढेचित निपचित पडला. फिरून तो उठून बसला तेव्हां रामचंद्रांची मूर्ति त्यास समोर दिसली. तें श्यामल शरीर, तो मस्तकावरील जटाजूट, ते आरक्त नेत्र आणि सज्ज केलेले धनुर्बाण अशा त्या प्रभूला ओळखून आणि त्यांचे चरणीं चित्त लावून तो त्यांना वारंवार निरखून पाहूं लागला, आणि आपलें जन्म सफल मानूं लागला. तो मनांत प्रेम पण भाषा तीक्ष्ण अशा रीतीनें रामाकडे पाहून म्हणाला,

धर्महेतु अवतरेहु गोसाईं।
मारेहु मोहि ब्याध की नाईं।
मैं बैरी सुग्रीवँ पियारा।
अवगुन कवन नाथ मोहि मारा।

स्वामींचा अवतार धर्मरक्षणासाठीं असून माला मात्र स्वामींनीं व्याधाप्रमाणें ( अन्यायानें ) मारलें. मी आपला वैरी आणि सुग्रीव मात्र आपला लाडका. हे प्रभो ! माझ्या कोणत्या अपराधास्तव आपण मला मारलें ?

अनुजबधू भगिनी सुतनारी।
सुनु सठ कन्या सम ए चारी।
इन्हहिं कुदिष्ट बिलोकइ जोई।
ताहि बधे कछु पाप न होई।
मूढ तोहि अतिशय अभिमाना।
नारिसिखावन करेसि न काना।

१ सत्संगजानि निधनान्यपि तारयंति–उत्तररामचरित.

२ या शब्दास आधार अध्यात्मरामायणांतल्या 'वृक्षखण्डे तिरोहितः'चा आहे. तो धरून रामावर दगाबाजीचा आळ लादण्याचा बराच प्रचार पडला आहे. त्याचा निरास आमच्या 'मानस–हंसां'तल्या काव्यसमालोचनेंत मिळेल.

ममभुज-बल-आस्रित तेहि जानी।
मारा चहसि अधम अभिमानी।

राम म्हणाले, अरे ए खवीसा! धाकटी भावजय, बहीण, सून आणि कन्या ही सर्व सारखींच होत. जो यांच्याकडे पापदृष्टीनें अवलोकन करितो त्याचा वध करण्यांत मुळींच पातक नाहीं. हे मूढा! तूं फार उन्मत्त म्हणून तर स्त्रीनें केलेला बोध देखील तूं ऐकला नाहींस. हे अधमा! गर्विष्ठा! सुग्रीवाला माझ्या बाहुबलाचा आश्रित जाणूनहि त्याला मारूं पहात होतास काय?

**दो०-सुनहु राम स्वामी सकल चलन चातुरी मोरि। प्रभु अजहूँ मैं पातकी अंतकाल गति तोरि॥ ९॥**

(वाली म्हणाला,) हे रामचंद्रा! आपण सर्वांचे स्वामी आहां. झाली ती सर्व माझी चालबाजीच झाली. पण हे प्रभो! अजूनदेखील मी पातकीच राहिलों काय? (तुला शरण आल्यावर) अंतकाळीं मला आपलीच गति मिळाली पाहिजे.

चौ०-सुनत राम अतिकोमल बानी।
बालिसीस परसेउ निजपानी।
अचल करउँ तनु राखहु प्राना।
बालि कहा सुनु कृपानिधाना।

वालीची ती अत्यंत सद्गद वाणी ऐकून रामांनीं त्याच्या मस्तकावर स्वहस्त ठेवला, आणि ते म्हणाले, मी तुझा देह अमर करितों. तूं जीवंतच ऐस. वाली म्हणाला, हे कृपानिधान! ऐका तर,

जनम जनम मुनि जतन कराहीं।
अंत राम कहि आवत नाहीं।
जासु नामबल संकर कासी।
देत सबहिं समगति अविनासी।
मम लोचनगोचर सोइ आवा।
बहुरि कि प्रभु अस बनिहि बनावा।

जन्मोजन्म मुनी यत्न करीत असतात तरीदेखील अंतकाळीं तुमचें नांवदेखील जिभेवर येत नाहीं. ज्याच्या नामबलेंकरून अविनाशी महादेव काशीमध्यें सर्वांना सरास मोक्ष देतात, ते आपण प्रत्यक्ष मला अंतकाळीं दृष्टिगोचर झालां आहांत. फिरून प्रयत्न केला असताहि अशी वेळ प्राप्त होईल काय?

**छंद-सो नयनगोचर जासु गुन नित नेति कहि स्रुति गावहीं। जिति पवन मन गो निरस करि मुनि ध्यान कबहुँक पावहीं। मोहि जानि अति-अभिमान-बस प्रभु कहेहु राखु सरीरही। अस कवन सठ हठि काटि सुरतरु बारि करिहि बबूरही॥ १॥**

ज्याचे गुण वेद 'नेति नेति' म्हणून निरंतर गात असतात; प्राणवायु आणि मन यांस जिंकून व इंद्रियांचा निरोध करून ज्याचें ध्यान करीत असतां सुद्धां मुनींना ज्याची क्वचितच प्राप्ति होते, तो माझ्या नेत्रांसमोर प्रत्यक्ष उभा आहे. अत्यंत अभिमानवश समजून प्रभु मला जीवंत राहण्यास सांगत आहेत. परंतु असा कोण दुरात्मा आहे कीं जो हट्टानें कल्पवृक्ष कापून बाभळीच्या झाडास त्याचें कुंपण करील?

**अब नाथ करि करुना बिलोकहु देहु जो बर माँगऊँ। जेहि जोनि जनमउँ कर्मबस तहँ रामपद अनुरागऊँ॥ यह तनय मम सम विनयबल कल्यानपद प्रभु लीजिये। गहि बाहँ सुर-नर-नाह आपन दास अंगद कीजिये॥ २॥**

हे प्रभो! आतां मजकडे कृपादृष्टीनें पहावें आणि मी मागतों तो वर द्यावा. कर्मानुबंधानें ज्या ज्या योनींत मी जन्म घेईन तेथें तेथें मी आपल्या चरणीं अनुरक्त असावें. हा माझ्यासारखाच विनयी आणि पराक्रमी माझा पुत्र अंगद यांस प्रभूंनीं आपल्या कल्याणप्रद चरणांचा आश्रय द्यावा; आणि हे सुर-नरनाथ! त्याचा हात धरून आपण ह्या अंगदाला दास करून घ्यावें.

**दो०-रामचरन दृढप्रीति करि बालि कीन्ह तनुत्याग। सुमनमाल जिमि कंठ तें गिरत न जानइ नाग॥ १०॥**

गळ्यांतून पुष्पहार पडला असतां ज्याप्रमाणें हत्तीला त्याची जाणीव नसते, तद्वत् वालीनें रामचरणीं दृढ प्रेम ठेवून देहत्याग केला.

चौ०-राम बालि निजधाम पठावा।
नगरलोग सब ब्याकुल धावा।

नानाविधि बिलाप कर तारा ।
छूटे केस न देह सँभारा ।

रामचंद्रांनीं वालीस स्वलोकाला पाठविलें, तेव्हां सर्व नागरिक लोक व्याकुळ होऊन धावूं लागले. वालीची स्त्री तारा अनेक प्रकारें शोक करूं लागली. तिचे केस अस्ताव्यस्त होऊन तीस देहाचेंहि भान राहिलें नाहीं.

तारा बिकल देखि रघुराया ।
दीन्ह ज्ञान हरि लीन्ही माया ।
छिति जल पावक गगन समीरा ।
पंच रचित अतिअधम सरीरा ।
प्रगट सो तनु तव आगे सोवा ।
जीव नित्य केहि लगि तुम्ह रोवा ।
उपजा ज्ञान चरन तब लागी ।
लीन्हेसि परम भगति बर माँगी ।

तारेस विव्हल झालेली पाहून रामांनीं आपली माया आवरून तीस ज्ञान दिलें. ते म्हणाले, " हें अत्यंत अधम शरीर पृथ्वी, आप, तेज वायु आणि आकाश या पंचमहाभूतांचें बनलेलें आहे. तें शरीर प्रत्यक्ष तुझ्यासमोर पडलें आहे, आणि जीव हा तर नित्य आहे. तेव्हां तूं कशासाठीं शोक करितेस ? " हें ऐकून तारेला ज्ञान झालें आणि तिनें प्रभुचरण धरून परमभक्तीचें वरदान मागून घेतलें.

उमा दारुजोषित की नाईं ।
सबहिँ नचावत रामु गोसाईँ ।

हे पार्वति ! काष्ठपुतळीप्रमाणें राम प्रभु सर्वांनाच नाचवितात.

तब सुग्रीवँहि आयसु दीन्हा ।
मृतककर्म बिधिवत सब कीन्हा ।
राम कहा अनुजहि समुझाई ।
राज देहु सुग्रीवँहि जाई ।
रघु–पति–चरन नाइ करि माथा ।
चले सकल प्रेरित रघुनाथा ।

नंतर रामांनीं सुग्रीवास आज्ञा केली. त्याप्रमाणें त्यानें वालीचें सर्व और्ध्वदेहिक कर्म यथाविधि केलें. रामांनीं लक्ष्मणास सांगितलें कीं, तूं जाऊन सुग्रीवास राज्याभिषेक कर. रघुपतीच्या प्रेरणेनुसार सर्व लोक त्यांच्या चरणीं मस्तक नमवून निघाले.

**दो०–लछिमन तुरत बोलाये पुरजन बिप्र-
समाज । राज दीन्ह सुग्रीवँ कहुँ अंगद
कहँ जुबराज ॥ ११ ॥**

लक्ष्मणानें तावडतोब पुरजन आणि ब्राह्मणमंडळीं यांना पाचारण केलें, व सुग्रीवास राज्याभिषेक करवून अंगदास युवराज केलें.

चौ०–उमा रामसम हित जग माहीँ ।
गुरु पितु मातु बंधु प्रभु नाहीँ ।
सुर नर मुनि सब कै यह रीती ।
स्वारथ लागि करहिँ सब प्रीती ।

हे पार्वति ! गुरु, माता, पिता, बंधु, प्रभु हेदेखील ह्या जगांत रामाइतके हितचिंतक नाहींत. सुर, नर, मुनी इत्यादि सर्वांची हीच रीति आहे कीं, ते सर्व स्वार्थासाठीं प्रीति करीत असतात.

बालि–त्रास–ब्याकुल दिन राती ।
तनु बहु ब्रन चिंता जर छाती ।
सोइ सुग्रीवँ कीन्ह कपिराऊ ।
अति कृपाल रघुबीरसुभाऊ ।
जानतहूँ अस प्रभु परिहरहीँ ।
काहे न बिपतिजाल नर परहीँ ।

वालीच्या त्रासानें अहोरात्र तळमळणाऱ्या व काळजीनें छाती जळत असल्यामुळें काळजाला घरे पडलेल्या अशा सुग्रीवाला अत्यंत दयाळु स्वभावाच्या रघुवीरानें कपींचा राजा केलें. जाणूनबुजून जो अशा प्रभूचा त्याग करितो तो मनुष्य विपत्तिजालामध्यें कसा बरें सांपडणार नाहीं ?

पुनि सुग्रीवँहि लीन्ह बोलाई ।
बहु प्रकार नृपनीति सिखाई ।
कह प्रभु सुनु सुग्रीवँ हरीसा ।
पुर न जाउँ दस चारि बरीसा ।
गत ग्रीषम बरषारितु आई ।
रहिहउँ निकट सैल पर छाई ।
अंगदसहित करहु तुम्ह राजू ।
संतत हृदय धरेउ मम काजू ।

नंतर रामांनीं सुग्रीवास बोलावून अनेक प्रकारें त्याला राजनीतीचा उपदेश केला, व ते म्हणाले–हे कपिपते सुग्रीवा ! ऐक. चौदा वर्षेंपर्यंत मला नगर-निवास करतां येत नाहीं. ग्रीष्म जाऊन वर्षाऋतु आला आहे. तेव्हां जवळच्याच एखाद्या पर्वतावर मी

पर्णकुटी उभारून राहीन. अंगदासहवर्तमान तूं राज्य कर, आणि माझें कार्य निरंतर हृदयांत वागवीत रहा.

जब सुग्रीवँ भवन फिरि आये।
रामु प्रबरषन गिरि पर छाये।

इकडे सुग्रीव परत घरीं गेला आणि राम प्रवर्षण-नामक पर्वतावर जाऊन राहिले.

**दो०–प्रथमहिँ देवन्ह गिरि गुहा राखी रुचिर बनाइ। राम कृपानिधि कछुक दिन बास करहिँ गे आइ॥ १२॥**

कृपानिधि रामचंद्र येऊन कांहीं दिवस राहतील म्हणून देवांनीं आधींच गिरिगुहा व्यवस्थित करून ठेविल्या होत्या.

चौ०–सुंदर बन कुसुमित अतिसोभा।
गुंजत मधुपनिकर मधुलोभा।
कंद मूल फल पत्र सुहाये।
भये बहुत जब तेँ प्रभु आये।
देखि मनोहर सैल अनूपा।
रहे तहँ अनुजसहित सुरभूपा।

त्या पर्वतावरील सुंदर वनफुलांनीं गजबजल्या-कारणानें मधाच्या लोभानें भ्रमरगण गुंजारव करीत होते. प्रभु आल्यापासून तेथें अत्यंत मधुर कंदमूलफल-पत्रादिकांची समृद्धि होऊं लागली. अनुपम मनोहर असा तो पर्वत पाहून त्यावर राम लक्ष्मणासहवर्तमान राहूं लागले.

मधुकर–खग–मृग–तनु धरि देवा।
करहिँ सिद्ध मुनि प्रभु कै सेवा।
मंगलरूप भयउ बन तब तेँ।
कीन्ह निवास रमापति जब तेँ।
फटिकसिला अतिसुभ्र सुहाई।
सुख आसीन तहाँ दोउ भाई।
कहत अनुज सन कथा अनेका।
भगति बिरति नृपनीति बिबेका।

सर्व सिद्ध, मुनी व देव भ्रमरांचे आणि पशुपक्ष्यांचे देह धारण करून प्रभूंची सेवा करूं लागले. रमापतींनीं तेथें निवास केल्यापासून तें वन मंगलरूप झालें. एकाद्या अत्यंत शुभ्र व सुंदर स्फटिकशिलेवर उभय बंधु स्वस्थपणें बसत, व रामचंद्र लक्ष्मणास भक्ति, वैराग्य, राजनीति आणि ज्ञान या विषयींच्या अनेक कथा सांगत.

बरषाकाल मेघ नभ छाये।
गर्जत लागत परम सुहाये।

त्यावेळीं आकाश वर्षाकालीन मेघांनीं व्याप्त झालें होतें, व त्यांची गर्जना फार मनोहर वाटत होती.

**दो०–लछिमन देखहु मोरगन नाचत बारिद पेखि। गृही बिरतिरत हरष जस बिष्णु-भगत कहुँ देखि॥ १३॥**

( राम म्हणाले ) लक्ष्मणा ! पहा कीं, ज्याप्रमाणें एकाद्या विष्णुभक्तास घरीं आलेला पाहून विरक्त गृहस्थ आनंदित होतो, त्याप्रमाणें हे मोर मेघास पाहून नाचत आहेत.

चौ०–घन घमंड नभ गरजत घोरा।
प्रियाहीन डरपत मन मोरा।
दामिनि दमकि रह न घन माहीँ।
खल कै प्रीति जथा थिर नाहीँ।

आकाशांतल्या भोरदाट मेघांच्या घनघोर गर्जनेनें मी प्रियाहीन असल्यामुळें माझें मन भयभीत होत आहे. खलांची प्रीति जशी चंचल असते तशी ही वीज कांहीं वेळ मेघांमध्यें चमकून अदृश्य होते.

बरषहिँ जलद भूमि नियराये।
जथा नवहिँ बुध बिद्या पाये।
बुंद अघात सहहिँ गिरि कैसे।
खल के बचन संत सह जैसे।

विद्या संपादन केलेल्या पंडिताप्रमाणें मेघ जमिनी-पर्यंत लवून वृष्टि करीत आहेत. जसे संत लोक दुष्टांच्या दुरुक्ति निमुटपणें ऐकून घेतात तसा हा पर्वत पर्जन्याचा आघात मुकाट्यानें सहन करीत आहे.

छुद्र नदी भरि चली तोराई।
जस थोरेहु धन खल इतराई।
भूमि परत भा ढाबर पानी।
जनु जीवहि माया लपटानी।

थोड्याशा संपत्तीनेंच खल जसा इतरावतो त्या-प्रमाणें हे नदीनाले तुडुंब भरून अवासवा चालले आहेत. मायेच्या आवरणानें जीव जसा मलिन होतो तसें पावसाचें पाणी जमिनीवर पडतांच गढूळ होतें.

सिमिटि सिमिटिजल भरहि तलावा।
जिमि सदगुन सज्जन पहिँ आवा।
सरिताजल जलनिधि महुँ जाई।
होइ अचल जिमि जिव हरि पाई।

सद्गुण जसे आस्ते आस्ते सज्जनांत उतरतात, त्याप्रमाणें हे तलाव हळुहळु पाण्यानें भरत आहेत. भगवत्प्राप्तीनें जीव जसा शांत होतो तसें हें नद्यांचें पाणी समुद्रास मिळून अचल होत आहे.

**दो०–हरित भूमि तृनसंकुल समुझि परहिँ नहिँ पंथ । जिमि पाखंड बाद तेँ गुप्त होहिँ सदग्रंथ ॥ १४॥**

पाखंडी लोकांच्या वादामुळें ज्याप्रमाणें सद्ग्रंथ लुप्तप्राय होतात त्याप्रमाणें गवत वाढून जमीन हिरवाळ झाल्यामुळें मार्गदेखील समजेनासे झाले आहेत.

चौ०–दादुरधुनि चहुँ दिसा सुहाई ।
बेद पढहिँ जनु बटुसमुदाई ।
नवपल्लव भये बिटप अनेका ।
साधक मन जस मिले बिबेका ।

बटुमंडळी ज्याप्रमाणें वेदघोष करितात तसे हे बेडुक चोहोंकडे सारखे रटत आहेत. साधकाच्या मनामध्यें ज्याप्रमाणें विवेक उत्पन्न होतो त्याप्रमाणें ह्या अनेक वृक्षांना नवी पालवी फुटत आहे.

अर्क जवास पात बिनु भयऊ ।
जस सुराज खल उद्यम गयऊ ।
खोजत कतहुँ मिलइ नहिँ धूरी ।
करइ क्रोध जिमि धर्महिँ दूरी ।

स्वराज्यामध्यें ज्याप्रमाणें खलांचे धंदे बुडतात त्याप्रमाणें अर्क आणि जवास हीं झाडें पर्णहीन झालीं आहेत. क्रोध जसा धर्मास नष्टप्राय करितो तशी ( पावसामुळें ) धूळ बेखोज झाली आहे.

ससिसंपन्न सोह महि कैसी ।
उपकारी कै संपति जैसी ।
निसि तम घन खद्योत बिराजा ।
जनु दंभिन कर मिला समाजा ।

परोपकाऱ्याची संपत्ति जशी शोभते त्याप्रमाणें पिकाच्या भरभराटीनें भूमि शोभूं लागली आहे. जणुं काय दांभिकांचा जमाव जमला आहे अशाप्रमाणें ह्या निबिड अंधकारमय रात्रीमध्यें काजवे लुकलुकत आहेत.

महावृष्टि चलि फूटि कियारी ।
जिमि सुतंत्र[1] भये बिगरहिँ नारी ।

कृषी निरावहिँ चतुर किसाना ।
जिमि बुध तजहिँ मोह मद माना ।

ज्याप्रमाणें स्त्री बेबंद झाली असतां बिघडते त्याप्रमाणें महावृष्टि झाल्यामुळें क्यारी ( उपळ ) फुटून सैराट वाहूं लागताहेत. ज्याप्रमाणें विवेकी पुरुष मोह, मद, मान यांचें उत्पाटन करितात त्याप्रमाणें शेतकरी आपलीं शेतें वाहात आहेत.

देखियत चक्रबाक खग नाहीँ ।
कलिहि पाइ जिमि धर्म पराहीँ ।
ऊसर बरषइ तृन नहिँ जामा ।
जिमि हरि-जन-हिय उपज न कामा ।

ज्याप्रमाणें कलीच्या प्रादुर्भावानें धर्म पळ काढतो तद्वत् चक्रवाक पक्षी खोजूनदेखील मिळत नाहींत. ज्याप्रमाणें हरिभक्ताचें मन कामाक्त होत नाहीं त्याप्रमाणें पाऊस पडून देखील उखर जमिनीवर तृण जमत नाहीं.

बिबिध जंतुसंकुल महि भ्राजा ।
प्रजा बाढ जिमि पाइ सुराजा ।
जहँ जहँ रहे पथिक थकि नाना ।
जिमि इंद्रियगन उपजे ग्याना ।

स्वराज्याच्या प्राप्तीमुळें जशी प्रजेची भरभराट होते तशी पृथ्वी अनेक जीवजंतूंनीं गजबजली आहे. ज्ञान झालें असतां ज्याप्रमाणें इंद्रियें निकाम बनतात त्याप्रमाणें अनेक प्रवासी लोक जेथल्या तेथेंच थबकून राहिले आहेत.

**दो०–कबहुँ प्रबल चल मारुत जहँ तहँ मेघ बिलाहिँ । जिमि कपूत के ऊपजे कुल सद्धर्म नसाहिँ ॥ १५ ॥**

कुपुत्र जन्मला असतां ज्याप्रमाणें कुल आणि सद्धर्म विलयाला जातात त्याप्रमाणें कधींकधीं सोसाट्याच्या वाऱ्यामुळें मेघ इतस्ततः विस्कळित होत आहेत.

**दो०–कबहुँ दिवस महुँ निबिडतम कबहुँक प्रगट पतंग । बिनसइ उपजइ ग्यान जिमि पाइ कुसंग सुसंग ॥ १६ ॥**

ज्याप्रमाणें सत्संगतीनें ज्ञान उत्पन्न होतें व कुसंगतीनें तें मावळतें त्याप्रमाणें मेघामुळें दिवसा कधीं दाट अंधार पडतो तर कधीं ( निरभ्र झालें म्हणजे ) सूर्यप्रकाश होतो.

[1] सुतंत्र=सु+तंत्र=स्व+तंत्र=स्वतंत्र. हिंदींत 'स्व' च्या ऐवजीं 'सु' चा प्रचार बराच आढळतो.

चौ०—बरषा बिगत सरदरितु आई।
लछिमन देखहु परम सुहाई।

लक्ष्मणा! वर्षाऋतु जाऊन हा पहा अत्यंत सुंदर शरदृतु प्राप्त झाला आहे.

फूले कास सकल महि छाई।
जनु बरषाकृत प्रगट बुढाई।

फुललेल्या कासपुष्पांनीं[1] सर्व भूमि भरून गेली आहे. जणुंकाय वर्षाऋतूनें आपलें वार्धक्यच प्रकट केलें आहे.

उदित अगस्त पंथजल सोखा।
जिमि लोभहि सोखइ संतोखा।
सरितासर निर्मलजल सोहा।
संतहृदय जस गत–मद–मोहा।

संतोष जसा लोभास निःशेष करितो त्याप्रमाणें अगस्तीच्या उदयानें मार्गांतील जलसंचय शुष्क झाले आहेत. संतांचें हृदय जसें मदमोहविरहित असतें तसें नद्या व तलाव ह्यांचें पाणी अत्यंत निर्मल झालें आहे.

रस रस सूख सरित–सर–पानी।
ममतात्याग करहिँ जिमि ज्ञानी।
जानि सरदरितु खंजन आये।
पाइ समय जिमि सुकृत सुहाये।
पंक न रेनु सोह असि धरनी।
नीति–निपुन–नृप कै जसि करनी।

ज्ञानी ज्याप्रमाणें ममतेचा निरास करितो त्याप्रमाणें नद्या व तळीं यांचें पाणी क्रमाक्रमानें आटत आहे. ज्याप्रमाणें संकटसमय येतांच पुण्यकर्म आड येतें त्याप्रमाणें शरदृतु प्राप्त होतांच खंजन पक्षी आले आहेत. न्यायानिपुण राजाच्या कृतीप्रमाणें पंक-रज-विरहित पृथ्वी शोभत आहे.

जससंकोच विकल भइ मीना।
अबुध कुटुंबी जिमि धनहीना।
बिनु घन निर्मल सोह अकासा।
हरिजन इव परिहरि सब आसा।
कहुँ कहुँ बृष्टि सारदी थोरी।
कोउ एक पाव भगति जसि मोरी।

त्याप्रमाणें निरक्षर कुटुंबवत्सलाची दारिद्र्यामुळें अवस्था होते त्याप्रमाणें पाणी आटत चालल्यामुळें मासे विकल होऊं लागले आहेत. सर्व आशेचा त्याग केल्यावर ज्याप्रमाणें हरिभक्त शोभतो तद्वत् आकाश निरभ्र झाल्यामुळें निर्मल दिसत आहे. जशी क्वचित् एकाद्यालाच माझी भक्ति प्राप्त होते तशी शरदृतूंत कोठें किंचित् वृष्टि होत आहे.

दो०—चले हरषि तजि नगर नृप तापस बनिक भिखारि। जिमि हरिभगति पाइ स्रम तजहिँ आस्रमी चारि ॥१७॥

ज्याप्रमाणें कष्टानें भगवद्भक्तीची प्राप्ति झाल्यावर चारीहि आश्रम सुटतात त्याप्रमाणें नृप, तापसी, आणि भिकारी आपापलीं गांवें सोडून ( आपापल्या कर्तव्यासाठीं ) बाहेर पडत आहे.

चौ०—सुखी मीन जे नीर अगाधा।
जिमि हरिसरन न एकउ बाधा।
फूले कमल सोह सर कैसा।
निर्गुण ब्रह्म सगुन भये जैसा।

ज्याप्रमाणें हरीस शरण गेल्यानें कसलीहि बाधा उरत नाहीं, त्याप्रमाणें अगाध जलामध्यें मीनगण सुखानें रहात आहेत. निर्गुण ब्रह्म सगुण स्वरूपांत जसें शोभतें तसें फुललेल्या कमलांनीं तलाव खुलून दिसूं लागले आहेत.

गुंजत मधुकर मुखर अनूपा।
सुंदर खगरव नानारूपा।
चक्रवाकमन दुख निसि पेखी।
जिमि दुरजन परसंपति देखी।

मधुकर मधुर आणि अनुपम गुंजारव करींत आहेत. नानाप्रकारचे सुंदर पक्षी शब्द करीत आहेत. दुसऱ्यांची संपत्ति पाहून दुर्जन ज्याप्रमाणें दुःखी होतात त्याप्रमाणें रात्र झालेली पाहून चक्रवाक मनांत उद्विग्न होत आहेत.

चातक रटत तृषा अति ओही।
जिमि सुख लहइ न संकरद्रोही।
सरदातप निसि ससि अपहरई।
संतदरस जिमि पातक टरई।

शिवद्रोही जसा सुखासाठीं तगमगतो तसे चातक तृषाक्रांत होऊन आक्रोश करीत आहेत. संतदर्शनानें जशी पातकांची शांति होते, त्याप्रमाणें चंद्र रात्रीं शारदातपाचा दाह शांत करीत आहे.

[1] कास या नांवाच्या गवताला लांब लांब अतिशुभ्र तुरे येत असून ते झडले म्हणजे आसपास सर्व जमीन शुभ्र होते; यावर कवीनें ही उत्प्रेक्षा केली आहे.

देखि इंदु चकोरसमुदाई ।
चितवहिँ जिमि हरिजन हरि पाई ।
मसकदंस बीते हिमत्रासा ।
जिमि द्विज द्रोह किये कुलनासा ।

हरिभक्त श्रीहरी प्रसन्न होतांच ज्याप्रमाणें त्याच्या कडे पाहतो तद्वत् चकोरसमुदाय चंद्राकडे पाहत आहे. ब्राह्मणद्वेषानें जसा कुळाचा नाश होतो त्याप्रमाणें थंडीमुळें मशकदंशाचा त्रास चुकला आहे.

**दो०–भूमि जीव संकुल रहे गये सरदरितु पाइ । सदगुरु मिले जाहिँ जिमि संसय-भ्रम-समुदाइ ॥ १८ ॥**

सद्गुरुप्राप्ति झाल्यानें संशय मोह इत्यादि जसे नष्ट होतात, तद्वत् भूमींतून जेवढे म्हणून जीवजंतु वर्षाऋतूंत बाहेर आले होते ते सर्व शरदृतु लागतांच नाहींसे झाले आहेत.

चौ०–बरषा गत निर्मल रितु आई ।
सुधि न तात सीता कै पाई ।
एकबार कैसेहुँ सुधि जानउँ ।
कालहु जीति निमिष महुँ आनउँ ।

वर्षाऋतु जाऊन शरदृतु आला तरी, लक्ष्मणा ! सीतेचा अद्याप शोध लागला नाहीं. एकदां कसेंहि करून शोध लागला म्हणजे मी काळासदेखील जिंकून एका क्षणांत तिला आणीन.

कतहुँ करउ जौँ जीवत होई ।
तात जतन करि आनउँ सोई ।
सुग्रीवहुँ सुधि मोरि बिसारी ।
पावा राज कोस पुर नारी ।
जेहि सायक मारा मैँ बाली ।
तेहि सर हतउँ मूढ कहुँ काली ।

हे तात ! सीता कोठेंहि असो; ती जर जीवंत असेल तर तिला हरप्रयत्नांनीं घेऊन येईन. सुग्रीव तर राज्य, कोष, पुर, व नारी प्राप्त झाल्यामुळें माझी आठवणच विसरून गेला आहे. ज्या बाणानें मीं वालीचा वध केला त्यानेंच उद्यां त्या बेइमानाचीहि वासलात लावितों.

जासु कृपा छूटहिँ मद मोहा ।
ता कहुँ उमा कि सपनेहु कोहा ।
जानहिँ यह चरित्र मुनि ज्ञानी ।
जिन्ह रघु-बीर-चरन-रति मानी ।

शंकर म्हणतात—हे पार्वति ! ज्याच्या कृपेनें मदमोहादिक विकार नष्ट होतात. त्यास स्वप्नांत देखील क्रोध येणें संभवतें काय ? ज्यांनीं रघुवीरचरणांचीच आवड धरली अशा ज्ञानवंत मुनींसच हें चरित्र कळणार !

लछिमन क्रोधवंत प्रभु जाना ।
धनुष चढाइ गहे कर बाना ।

प्रभु क्रुद्ध झाले आहेत असें जाणून लक्ष्मणानें धनुष्य चढविलें आणि हातांत बाण घेतला.

**दो०–तब अनुजहिँ समुझावा रघुपति करुना सीवँ । भयदेखाइ लेइ आवहु तात सखासुग्रीवँ ॥ १९ ॥**

तेव्हां निस्सीमदयाळु रघुपतींनीं लक्ष्मणाची समजूत घातली व सांगितलें कीं, सुग्रीवास फक्त भय दाखवून घेऊन ये. कारण, हे तात, तो आपला मित्र आहे.

चौ०–इहाँ पवनसुत हृदय बिचारा ।
रामकाज सुग्रीवँ बिसारा ।
निकट जाइ चरनन्हि सिरु नावा ।
चारिहु बिधि तेहि कहि समुझावा ।

इकडे मारुतीनें मनांत जाणलें कीं, सुग्रीवाला रामकार्याचा विसर पडला. त्यानें सुग्रीवाकडे जाऊन व त्याला वंदन करून सामदामदंडभेद या चारीहि प्रकारांनीं त्यास समजूत दिली.

सुनि सुग्रीव परमभय माना ।
बिषय मोर हरि लीन्हेउ ज्ञाना ।
अब मारुतसुत दूतसमूहा ।
पठवहु जहँ तहँ बानरजूहा ।
कहेहु पाख महुँ आव न जोई ।
मोरे कर ता कर बध होई ।

तें ऐकून सुग्रीव अत्यंत भयभीत झाला. तो म्हणाला, विषयानें माझें ज्ञान नष्ट झालें. हे मारुते ! आतां सर्व वानरसेनेस बोलावण्यास ठिकठिकाणीं अनेक दूत पाठीव; आणि त्यांना ताकीद दे कीं,

---

१ यांतलें खरें तात्पर्य हें कीं हृदय हें दयेचें स्थान आहे. त्यास शांत व शीतळच ठेवावयास हवें. क्रोधाच्या उष्णतेची झळ त्यास लागतां कामा नये. सारांश, दया हृदयांत पक्की मुरवावयाची आहे; आणि क्रोध कांहीं विशिष्ट कार्यापुरता नुसता वरपांगीं दाखवावयाचा आहे.

पंधरा दिवसांच्या आंत जो ( सीतेचा शोध लावून ) न येईल त्याचा मी आपल्या हातानें वध करीन.

तब हनुमंत बोलाये दूता ।
सब कर करि सनमान बहूता ।
भय अरु प्रीति नीति देखराई ।
चले सकल चरनान्हि सिरु नाई ।

नंतर मारुतीनें सर्वांचा योग्य गौरव करून आणि त्यांस नीति, भीति आणि प्रीति दाखवून रवाना केलें. ते सर्व दूत मारुतीचें पदवंदन करून निघाले.

एहि अवसर लछिमन पुर आये ।
क्रोध देखि जहँ तहँ कपि धाये ।

त्याच समयीं लक्ष्मण पंपापुरास आला. त्याचा आवेश पाहून कपी सैरावैरा पळूं लागले.

**दो०—धनुष चढाइ कहा तब जारि करउँ पुर छार । ब्याकुल नगर देखि तब आयउ बालिकुमार ।। २० ।।**

नंतर धनुष्य चढवून लक्ष्मण म्हणाला, मी या नगराची होळी करितों. तेव्हां सर्वजण त्याला पाहून घाबरले. इतक्यांत अंगद आला.

चौ०—चरन नाइ सिरु बिनती कीन्ही ।
लछिमन अभयबाँह तेहि दीन्ही ।
क्रोधवंत लछिमन सुनि काना ।
कह कपीस अतिभय अकुलाना ।

लक्ष्मणाच्या चरणीं मस्तक ठेवून अंगदानें आर्जव केला. लक्ष्मणानें त्याच्या मस्तकीं अभयहस्त ठेविला. लक्ष्मण क्रुद्ध आहे असें कानांवर येतांच भीतीनें सुग्रीव अतिशय गांगरून गेला, आणि म्हणाला—

सुनु हनुमंत संग लेइ तारा ।
करि बिनती समुझाउ कुमारा ।
तारासहित जाइ हनुमाना ।
चरन बंदि प्रभु सुजसु बखाना ।

हे हनुमंता ! तूं तारेस बरोबर ने, आणि लक्ष्मणाची खातर करून त्यास शांत कर. तेव्हां हनुमंत तारेसह निघाला, व प्रभु लक्ष्मणाचे चरणीं वंदन करून त्यानें त्याची स्तुति केली.

करि बिनती मंदिर लेइ आये ।
चरन पखारि पलँग बैठाये ।
तब कपीस चरनन्हि सिरु नावा ।
गहि भुज लछिमन कंठ लगावा ।

नंतर विनवणी करून तो लक्ष्मणास मंदिरांत घेऊन आला, आणि तेथें त्यानें त्याचे चरण प्रक्षालन करून त्यास मंचकावर बसविलें. नंतर सुग्रीवानें त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. लक्ष्मणानें सुग्रीवाचा हात धरून त्याला दृढालिंगन दिलें.

नाथ बिषयसम मद कछु नाहीँ ।
मुनिमन मोह करइ छन माहीँ ।
सुनत बिनीतबचन सुख पावा ।
लछिमन तेहि बहुबिधि समुझावा ।
पवनतनय सब कथा सुनाई ।
तेहि बिधि गये दूतसमुदाई ।

( सुग्रीव म्हणाला, ) हे प्रभो ! जें मुनिमनाला देखील क्षणांत मोहित करितें असें विषयमदासारखें दुसरें कांहींहि नाहीं. तें नम्र वचन ऐकून लक्ष्मणास आनंद झाला. त्यानें अनेक प्रकारें सुग्रीवाची समजूत घातली. दूतसमुदाय पाठविणें वगैरे जे प्रकार झाले ते सर्व मारुतीनें लक्ष्मणास निवेदन केलें.

**दो०—हरषि चले सुग्रीवँ तब अंगदादिकपि साथ । रामानुज आगे करि आये जहँ रघुनाथ ।। २१ ।।**

नंतर अंगदादि वानरांना बरोबर घेऊन आणि लक्ष्मणास पुढें करून सुग्रीव आनंदानें निघाला, तो रघुपति होते तेथें आला.

चौ०—नाइ चरन सिरु कह करजोरी ।
नाथ मोहि कछु नाहिँ न खोरी ।
अतिसयप्रबल देव तव माया ।
छूटइ राम करहु जौँ दाया ।

रामचरणीं मस्तक ठेवून आणि हात जोडून सुग्रीव म्हणाला, हे नाथ ! माझ्याकडे कांहींच दोष नाहीं. देवा ! आपली माया अत्यंत प्रबल आहे; आपण दया कराल तेव्हांच ती विरेल.

बिषयबस्य सुर नर मुनि स्वामी ।
मैँ पामर पसु कपि अतिकामी ।
नारि-नयन-सर जाहि न लागा ।
घोर-क्रोध-तम-निसि जो जागा ।
लोभपास जेहि गर न बँधाया ।
सो नर तुम्ह समान रघुराया ।

हे स्वामिन् ! सुर, नर, मुनी हेदेखील विषयांनीं आकळले आहेत. मी तर जाणूनबुजूनच कपि,

पामर, पशु, आणि म्हणूनच अत्यंत कामी. स्त्रीच्या नेत्रकटाक्षरूप शरानें ज्याला विद्ध केलें नाहीं, क्रोधरूप घोर अंधाऱ्या रात्रींत जो जागृत राहिला आणि लोभाच्या पाशांत ज्याचा गळा अडकला नाहीं असा मनुष्य, हे रघुराया ! केवळ आपल्यासमानच होय.

यह गुन साधन तें नाहिं होई ।
तुह्मरी कृपा पाव कोइ कोई ।

साधनद्वारा साध्य होणारे हे गुण नव्हत. ते आपल्याच कृपेनें कोणाकोणाला प्राप्त होतात.

तब रघुपति बोले मुसुकाई ।
तुह्म प्रिय मोहि भरत जिमि भाई ।
अब सोइ जतन करहु मन लाई ।
जेहि बिधि सीता कै सुधि पाई ।

तेव्हां राम हसून म्हणाले, हे बंधो ! ज्याप्रमाणें माझा भरत त्याप्रमाणें तूं मला प्रिय आहेस. आतां तूं मनःपूर्वक असा प्रयत्न कर कीं, जेणेंकरून सीतेचा शोध लागेल.

**दो०—एहि बिधि होत बतकही आये बानर-जूथ । नानावरन सकल दिसि देखिय कीसवरूथ ॥ २२ ॥**

याप्रमाणें गोष्टी चालल्या आहेत तों सर्व दिशांकडून नानावर्णांचे वानरसमूह येत असलेले दिसूं लागले.

चौ०—बानरकटक उमा मैं देखा ।
सो मूरख जो कर चह लेखा ।
आइ रामपद नावहिं माथा ।
निरखि बदनु सब होहिं सनाथा ।

"हे पार्वति ! तें वानरसैन्य मी स्वतः पाहिलें. त्याची मोजदाद करण्याची हाव धरणारा खुळ्यांतलाच खुळाच समज." नंतर वानरांनीं येऊन रामपदीं मस्तक नमविलें, व रामरूप पाहून सर्व सनाथ झाले.

अस कपि एक न सेना माहीं ।
राम कुसल जेहि पूछी नाहीं ।
यह कछु नहिं प्रभु कै अधिकाई ।
बिस्वरूप ब्यापक रघुराई ।

सर्व सेनेंत असा एकहि कपी उरला नव्हता कीं ज्यास रामांनीं कुशल प्रश्न विचारला नाहीं. ह्यांत प्रभूंचा विशेष असा कांहींच नाहीं. कारण, रघुराय विश्वरूप आणि व्यापक आहेत.

ठाढे जहँ तहँ आयसु पाई ।
कह सुग्रीवँ सबहिं समुझाई ।
रामकाजु अरु मोर निहोरा ।
बानरजूथ जाहु चहुँओरा ।
जनकसुता कहँ खोजहु जाई ।
मासदिवस महँ आयहु भाई ।
अवधि मेटि जो बिनु सुधि पाये ।
आवइ बनिहि सो मोहि मराये ।

आज्ञेप्रमाणें ठिकठिकाणीं कपी उभे राहिले, तेव्हां सुग्रीवानें सर्वांस निक्षून फरमाविलें कीं, हे वानरगण हो ! रामाचें कार्य आणि माझ्यावर उपकार असें समजून तुमच्या तुकड्या चारीहि दिशांकडे जाऊं द्या, आणि एक महिन्याच्या आंत सीतेचा शोध घेऊन या. ही मुदत टाळून शोध न करितां कोणतीहि परत आली तरी तिला मी आपल्या हातानें नेस्तनाबूद करीन हें अगदीं ठाम समजा.

**दो०—बचन सुनत सब बानर जहँ तहँ चले तुरंत । तब सुग्रीवँ बोलाये अंगद नल हनुमंत ॥ २३ ॥**

ती आज्ञा ऐकतांच सर्व वानर ताबडतोब चोहोंकडे निघाले. नंतर सुग्रीवानें अंगद, नल आणि हनुमंत यांना बोलाविलें.

चौ०—सुनहु नील अंगद हनुमाना ।
जामवंत मतिधीर सुजाना ।
सकल सुभट मिलि दच्छिन जाहू ।
सीतासुधि पूछेहु सब काहू ।

हे नीलअंगदमारुतजांबवंत हो ! ऐका. तुम्ही सुज्ञ आणि धैर्यशाली आहांत. तुम्ही सर्व वीर मिळून दक्षिणेकडे जा, आणि सीतेचा सर्वत्र शोध करीत चला.

मन क्रम बचन सो जतन बिचारेहु ।
रामचंद्र कर काज सँवारेहु ।
भानुपीठि सेइय उर आगी ।
स्वामिहि सर्बभाव छल त्यागी ।

कायावाचामनेंकरून विचारपूर्वक यत्न करा; आणि श्रीरामचंद्राचें कार्य तडीस न्या. पाठीकडून सूर्याचें, पोटाकडून अग्नीचें, पण सर्व अंगचोरपणा सोडून ( अर्थात् सर्वांगांनीं ) स्वामींचें सेवन केलें पाहिजे.

तजि माया सेइय परलोका ।
मिटहि सकल भवसंभव सोका ।

देह धरे कर यह फलु भाई ।
भजिय राम सब काम बिहाई ।
सोइ गुनज्ञ सोई बडभागी ।
जो रघु-बीर-चरन-अनुरागी ।

मायेला सोडून जेणेंकरून संसारांत उत्पन्न होणाऱ्या सर्व दुःखांचा नाश होईल अशा प्रकारें परलोकाचें सेवन केलें पाहिजे. भाई हो ! निष्कामपणें रामाची भक्ति करणें हेंच देह धारण करण्याचें फल आहे. जो रघुवीरचरणांचे ठायीं अनुरक्त आहे तोच खरा गुणज्ञ आणि तोच महाभाग्यवान् होय.

आयसु माँगि चरन सिरु नाई ।
चले हरषि सुमिरत रघुराई ।
पाछे पवनतनय सिरु नावा ।
जानि काजु प्रभु निकट बोलावा ।

सुग्रीवाची आज्ञा घेऊन व चरणांवर मस्तक ठेवून ते आनंदानें रघुवीराचें स्मरण करीत निघाले. सर्वांच्या मागून मारुतीनें वंदन केलें. कार्य जाणून प्रभूनें त्यास जवळ बोलाविलें.

परसा सीस सरोरुहपानी ।
करमुद्रिका दीन्हि जन जानी ।
बहुप्रकार सीतहि समुझायेहु ।
कहि बल बिरह बेगि तुम्ह आयेहु ।

रामांनीं आपल्या हस्तकमलानें मारुतीच्या मस्तकास स्पर्श केला, आणि आपला दास जाणून त्याचे जवळ आपल्या हातांतली मुद्रिका काढून दिली. राम म्हणाले, तूं जाऊन सीतेचे अनेक प्रकारें समाधान कर, आणि तिला माझा पराक्रम आणि माझी विरहावस्था कथन करून तूं त्वरित परत ये.

हनुमत जनम सुफल करि माना ।
चलेउ हृदय धरि कृपानिधाना ।
जद्यपि प्रभु जानत सब बाता ।
राजनीति राखत सुरत्राता ।

मारुतीला अंजनीची कुस सफल झाली असें वाटलें. तो हृदयांत रामाचें ध्यान करीत निघाला. जरी देवांचे रक्षण करणारे प्रभु सर्व गोष्टी जाणत होते तरी ते राजनीतिहि पाळीत होतेच.

**दो०—चले सकल बन खोजत सरिता सर गिरि खोह । राम-काज-लय-लीन मन बिसरा तन कर छोह ॥ २४ ॥**

वनें, नद्या, सरोवरें, पर्वत, दऱ्या, इत्यादि सर्व ठिकाणें शोधीत वानरगण निघाले. श्रीरामकार्यांत त्यांचें मन तल्लीन होऊन त्यांचें देहमानहि सुटलें.

चौ०—कतहुँ होइ निसिचर सों भेंटा ।
प्रान लेहिं एक एक चपेटा ।
बहुप्रकार गिरि कानन हेरहिं ।
कोउमुनि मिलइ तासि सब घेरहिं ।

कोठें कोठें एकटदुकट राक्षसाशीं गांठ पडतांच भुरटा हल्ला करून ते एका एका चपराकींतच त्यांचा मुडदा पाडीत. त्यांनीं अनेक प्रकारें पर्वत व अरण्यें शोधलीं. एखादा मुनी भेटला तर ते सर्व त्याच्या भोंवतीं जमत.

लागि तृषा अतिसय अकुलाने ।
मिलइ न जल घन गहन भुलाने ।
मन हनुमान कीन्ह अनुमाना ।
मरन चहत सब बिनु जलपाना ।

तहान लागल्यामुळें ते सर्व वानर अत्यंत व्याकुल झाले. परंतु पाणी कोठेंहि मिळेना. त्या दाट जंगलांत ते रस्ता चुकले. मारुतीनें मनांत विचार केला कीं, सर्वांचा जलपानावांचून प्राण जाऊं पाहत आहे.

चढि गिरिसिखर चहूँदिसि देखा ।
भूमिबिबर एक कौतुक पेखा ।
चक्रबाक बक हंस उडाहीं ।
बहुतेक खग प्रबिसहिं तेहिं माहीं ।

तेव्हां पर्वतशिखरावर चढून मारुतीनें चोहोंकडे दृष्टि फेंकली तों त्यास एक भूमिविवर दिसलें. तेथें विशेष चमत्कार असा कीं चक्रवाक, बक, हंस इत्यादि अनेक पक्षी उड्डाण करून त्या विवरांत प्रवेश करीत होते.

गिरि तें उतरि पवनसुत आवा ।
सब कहुँ लेइ सोइ बिबर देखावा ।
आगे करि हनुमंतहिं लीन्हा ।
पैठे बिबर बिलंबु न कीन्हा ।

मारुतीनें पर्वतावरून खालीं उतरून सर्वांना तेथें नेऊन तें विवर दाखविलें. तेव्हां सर्वांनीं मारुतीसच पुढें करून लागलींच त्या विवरांत प्रवेश केला.

**दो०—दीख जाइ उपवन बर सर बिकसित बहुकंज । मंदिर एक रुचिर तहँ बैठि नारि तपपुंज ॥ २५ ॥**

जाऊन पाहातात तों एका उपवनांत एक सुंदर सरोवर असून त्यामध्यें अनेक कमलें फुललेलीं आहेत, आणि तेथेंच एका रमणीय मंदिरांत एक अत्यंत तपस्वी स्त्री बसली आहे.

चौ०—दूरि तें ताहि सबन्हि सिरु नावा ।
पूछे निजबृत्तांत सुनावा ।
तेहि तब कहा करहु जलपाना ।
खाहु सु-रस-सुंदर-फल नाना ।

सर्वांनीं तिला दुरूनच नमन केलें. तिनें विचारल्यावरून त्यांनीं सर्व वृत्त सांगितलें. नंतर तिनें त्यांस जलपान करण्यास आणि नानाप्रकारचीं सुंदर आणि स्वादिष्ठ फळें खाण्यास आज्ञा दिली.

मज्जन कीन्ह मधुरफल खाये ।
तासु निकट पुनि सब चलि आये ।
तेहि सब आपनि कथा सुनाई ।
मैं अब जाब जहां रघुराई ।
मूँदहु नयन बिबर तजि जाहू ।
पैहहु सीतहि जनि पछिताहू ।

त्याप्रमाणें त्यांनीं स्नानें करून मधुर फळें खाल्लीं. नंतर ते सर्व तिच्याजवळ जाऊन बसले. तेव्हां त्या तपस्विनीनें आपला सर्व वृत्तांत कथन केला, व म्हणाली, आतां मी थेट रामापाशींच जाईन. तुम्ही सर्व डोळे मिटा म्हणजे या विवरांतून बाहेर पडाल. तुम्ही काळजी करूं नका; तुम्हांला सीतेचा शोध लागेल.

नयन मूँदि पुनि देखहिं बीरा ।
ठाढे सकल सिंधु के तीरा ।
सो पुनि गई जहाँ रघुनाथा ।
जाइ कमलपद नायेसि माथा ।
नानाभाँति बिनय तेहि कीन्ही ।
अनपायनी भगति प्रभु दीन्ही ।

नंतर त्या वानरवीरांनीं डोळे मिटले व पुन्हां उघडून पाहतात तों आपण समुद्रतीरावर आहों असें त्यांस कळून आलें. इकडे ती तपस्विनीहि रामाकडे गेली. तिनें त्यांच्या चरणकमलीं वंदन करून अनेक प्रकारें त्यांची स्तुति केली. प्रभूंनीं तीस 'अनपायिनी' भक्ति अर्पण केली.

---

१ मयनामक दैत्यानें तें विवर निर्माण केलें होतें. त्याचा पुत्र मायावी. तो हेमानामक अप्सरेवर आसक्त होता. त्यानें तें विवर हेमेला दिलें. वरील तपस्विनी ही हेमेचा सखी होय.

दो०—बदरीबन कहुँ सो गई प्रभुआज्ञा धरि सीस । उर धरि राम-चरन-जुग जे बंदत अज ईस ॥ २६ ॥

प्रभूंची आज्ञा मस्तकीं धारण करून आणि ब्रह्मदेव व शंकर यांनीं वंदिलेल्या रामचरणयुगुलांना हृदयांत धरून ती बदरिकाश्रमीं निघून गेली.

चौ०—इहाँ बिचारहिं कपि मन माहीं ।
बीती अवधि काज कछु नाहीं ।
सब मिलि कहहिं परसपर बाता ।
बिनु सुधि लये करब का भ्राता ।

समुद्रतीरावर बसून कपी विचार करूं लागले कीं, मुदत टळत आली तरी अद्याप कार्य कांहींच उरकलें नाहीं. ते सर्व मिळून आपापसांत बोलूं लागले कीं, भाई हो ! सीतेचा शोध लागत नाहीं. आतां काय करावें ?

कह अंगद लोचन भरि बारी ।
दुहुँ प्रकार भइ मृत्यु हमारी ।
इहाँ न सुधि सीता कै पाई ।
उहाँ गये मारिहि कपिराई ।

अंगदाचे नेत्र अश्रुपूर्ण होऊन तो म्हणाला, दुतर्फी माझें मरण ओढवलें आहे. इकडे सीतेचा शोध लागला नाहीं, व तिकडे तसाच परत गेलों तर सुग्रीव खास मारणार.

पिता बधे पर मारत मोही ।
राखा राम निहोर न ओही ।
पुनि पुनि अंगद कह सब पाहीं ।
मरन भयेउ कछु संसय नाहीं ।

पित्याचा वध झाल्यावर सुग्रीव मलाहि मारताच; परंतु राम समक्ष होते म्हणूनच केवळ मी बचावलों. सुग्रीवानें मला प्राणदान दिलें असें मुळींच नाहीं. अंगद पुनःपुनः सर्वांना म्हणे कीं, मी निःसंशय मरणारच.

अंगदबचन सुनत कपिबीरा ।
बोलि न सकहिं नयन बह नीरा ।
छन एक सोचमगन होइ गयऊ ।
पुनिं अस बचन कहत सब भयऊ ।
हम सीता कै सोध बिहीना ।
नहिं जैहहिं जुबराज प्रबीना ।
अस कहि लवन-सिंधु-तट जाई ।
बैठे कपिं सब दर्भ डसाई ।

अंगदाचें वचन ऐकतांच त्या वानरवीरांचे नेत्रांतून अश्रू वाहूं लागले व त्यांच्या मुखांतून शब्द

निधेना. क्षणमात्र ते शोकनिमग्न झाले व पुन्हां ते सर्व म्हणूं लागले कीं, हे सुबुद्धा युवराजा ! आह्मी सीतेचा शोध लावल्यावांचून परत जाणारच नाहीं. असें म्हणून क्षारसमुद्राच्या तीरीं जाऊन ते सर्व वानर दर्भ पसरून बसले.

जामवंत अंगददुख देखी ।
कही कथा उपदेसबिसेखी ।
तात राम कहुँ नर जानि मानहु ।
निर्गुनब्रह्म अजित अज जानहु ।
हम सब सेवक अति–बड–भागी ।
संतत स-गुन-ब्रह्म-अनुरागी ।

अंगदाचें तें दुःख पाहून जांबवंतानें कांहीं विशेष उपदेशपर गोष्टी सांगितल्या. तो म्हणाला, हे तात ! रामचंद्रास मानव समजूं नकोस. त्यांस निर्गुण ब्रह्म, अजिंक्य आणि जन्मरहित असें समज. आपण निरंतर सगुणब्रह्म रामचंद्रांचे ठिकाणीं अनुरक्त असून त्यांचे सेवक आहोंत हें आपलें फार थोर भाग्य आहे.

**दो०–निजइच्छा प्रभु अवतरइ सुर-महि-गो द्विजलागि । सगुनउपासक संग तहँ रहहिँ मोच्छसुख त्यागि ॥ २७ ॥**

देव, ब्राह्मण, पृथ्वी आणि गायी यांच्या उद्धारार्थ प्रभु स्वेच्छेनें अवतरले आहेत. आपल्यासारख्या सगुण उपासकांनीं मोक्षसुखाचाहि त्याग करून त्यांचेच ठिकाणीं रत असले पाहिजे.

चौ०–एहिबिधि कथा कहहिँ बहुभाँती ।
गिरिकंदरा सुनी संपाती ।
बाहेर होइ देखे बहु कीसा ।
मोहि आहारु दीन्ह जगदीसा ।

अशाप्रकारें अनेक गोष्टी चालत आहेत तों त्या गिरिगुहेंत असलेल्या संपातीनें सर्व ऐकल्या. तेव्हां त्यानें बाहेर येऊन ते सर्व वानर पाहिले. त्या वेळीं तो ह्मणाला, “ ईश्वरानें माझें खाद्यच पाठविलें आहे.—

आजु सबहि कहँ भच्छन करऊँ ।
दिन बहु चल अहार बिनु मरऊँ ।
कबहुँ न मिल भरि उदर अहारा ।
आजु दीन्ह बिधि एकहिबारा ।
डरपे गीधबचन सुनि काना ।
अब भा मरन सत्य हम जाना ।

आज मी सर्वांनाच भक्षून टाकतों ! कारण,आज बरेच दिवस आहारावांचून मी मरतों आहे. आज-पर्यंत पोटभर असें कधींच मला खावयाला मिळालें नाहीं ह्मणूनच आजमात्र ब्रह्मदेवानें तें सर्व एकदम दिलें. ” हें त्या गृध्राचें बोलणें ऐकून ते वानर भयभीत झाले व ह्मणाले कीं, आतां मात्र आमचें मरण खास ओढवलें !

कपि सब उठे गीध कहँ देखी ।
जामवंत मन सोच बिसेखी ।
कह अंगद बिचारि मन माहीँ ।
धन्य जटायू सम कोउ नाहीँ ।
राम–काज–कारन तनु त्यागी ।
हरिपुर गयउ परम–बड–भागी ।

संपातीस पाहून सर्व वानर उठले. जांबवंत मनांत अत्यंत चिंतातुर झाला. अंगद मनांत विचार करून म्हणाला, जटायूसारखा धन्य कोणीच नाहीं. रामकार्यार्थ आपला देह वेंचून तो अत्यंत महाभाग्यवान् वैकुंठाला गेला.

सुनि खग हरष–सोक–जुत बानी ।
आवा निकट कपिन्ह भय मानी ।
तेहि देखि सब चलै पराई ।
ठाढ कीन्ह तेहि सपथ देवाई ।
तिन्हहि अभय करि पूछेसि जाई ।
कथा सकल तिन्ह ताहि सुनाई ।
सुनि संपाति बंधु कै करनी ।
रघु–पति–महिमा बहुबिधि बरनी ।

हर्षशोकान्वित अशी ती वाणी ऐकून संपाती त्या वानरांचे जवळ आला. तेव्हां वानर भयभीत झाले. त्याला पाहून ते सर्व सारखे पळत सुटले. तेव्हां त्यानें आणभाक देऊन त्यांना उभे राहण्यास सांगितलें. त्यांस अभय देऊन त्यानें त्यांच्या जवळ जाऊन वृत्तांत विचारला व त्याप्रमाणें वानरांनींहि त्यास सर्व वृत्तांत निवेदन केला. बंधु जटायूची कृति ऐकून संपातीनें रामाच्या महात्म्याचें अनेक प्रकारें वर्णन केलें.

**दो०–मोहि लेइ जाहु सिंधुतट देऊँ तिलांजलि ताहि । बचनसहाय करबि मैँ पैहहु खोजहु जाहि ॥ २८ ॥**

तो ह्मणाला, मला सिंधुतटीं घेऊन चला. मी आपल्या भावास तिलांजलि देतों आणि तुह्मांलाहि वाक्सहाय करितों. नंतर तुह्मी सीताशोध करण्यास जा, म्हणजे सीता तुम्हांस सांपडेल.

चौ०–अनुजक्रिया करि सागरतीरा ।
कह निजकथा सुनहु कपिबीरा ।

हम दोउ बंधु प्रथम तरुनाई ।
गगन गये रबिनिकट उडाई ।
तेज न साहि सकसो फिरि आवा ।
मैं अभिमानी रबि नियरावा ।
जरे पंख अति तेज अपारा ।
परेउँ भूमि करि घोरचिकारा ।

सागरतीरीं भावाची क्रिया केल्यावर तो आपली कथा सांगूं लागला. हे वानरवीर हो ! ऐका. जटायु व मी दोघे बंधु, तारुण्याच्या ऐन उमेदींत सूर्याजवळ जाण्यासाठीं आम्हीं आकाशांत उड्डाण केलें. परंतु सूर्यतेज सहन न होऊन जटायु परत फिरला. मी मात्र अभिमानानें सूर्याजवळ जाऊन पोंचलों. तेव्हां सूर्याच्या अपार तेजानें माझे पंख जळून मोठमोठ्यानें आरंवळत मी भूमीवर पडलों.

मुनि एक नाम चंद्रमा ओही ।
लागी दया देखि करि मोही ।
बहुप्रकार तेहि ज्ञान सुनावा ।
देह जानित अभिमान छुडावा ।
त्रेता ब्रह्म मनुजतनु धरहीं ।
तासु नारि निसि-चर-पति हरहीं ।
तासु खोज पठइहि प्रभु दूता ।
तिन्हहिँ मिले तैं होब पुनीता ।

तेथें चंद्रमा नांवाचा एक मुनी होता. मला पडलेला पाहतांच त्याला दया आली. त्यानें मला अनेक प्रकारें ज्ञान सांगून माझा देहजनित अभिमान सोडविला. तो म्हणाला, “ त्रेतायुगांत निर्गुण ब्रह्म मानवरूपानें अवतार घेईल व राक्षसाधिपति त्याच्या स्त्रीचें हरण करील. प्रभु तिच्या शोधार्थ दूत पाठवितील व त्या दूतांची तुझी गांठ पडून तूं पुनीत होशील.

जामिहहिँ पंख करसि जनि चिंता ।
तिन्हहि देखाइ दिहेसु तैं सीता ।
मुनि कइ गिरा सत्य भइ आजू ।
सुनि मम बचन करहु प्रभुकाजू ।

तूं चिंता करूं नकोस. तुला पुन्हां पंख फुटतील. तूं त्या दूतांना सीतेचें वर्तमान सांग म्हणजे झालें. ” ती मुनीची वाणी आज प्रत्ययाला आली. आतां माझें वचन ऐकून तुम्ही प्रभुकार्यास उद्युक्त व्हा.

गिरि त्रिकूट ऊपर बस लंका ।
तहँ रह रावन सहज असंका ।
तहँ असोक उपबन जहँ रहई ।
सीता बैठि सोचरत अहई ।

त्रिकूटपर्वताच्या शिखरावर लंका वसलेली असून तेथें रावण साहजिकपणेंच निःशंक राहतो. तेथें अशोकवनांत सीता शोक करीत बसलेली आहे.

**दो०—मैं देखउँ तुम्ह नाहीं गीधहि दृष्टि अपार । बूढ भयउँ न त करतेउँ कछुक सहाय तुम्हार ॥ २९ ॥**

तुम्हांला जरी ती दिसत नाहीं तरी पण तीं येथून मला दिसत आहे. कारण गृध्रास अपार दृष्टि असते. मी वृद्ध झालों आहे. नाहीं तर तुम्हांला किंचित् सहायहि केलें असतें.

चौ०—जो नाँघइ सतजोजन सागर ।
करइ सो रामकाज मतिआगर ।
मोहि बिलोकि धरहु मन धीरा ।
रामकृपा कस भयउ सरीरा ।

जो शतयोजन समुद्र ओलांडून जाईल तोच बुद्धिनिधान रामकार्य तडीस नेईल. मजकडे पहा आणि मनांत धैर्य धरा. माझेंच शरीर रामकृपेनें कसें झालें आहे तें बघा.

पापिउ जा कर नाम सुमिरहीं ।
अतिअपार भवसागर तरहीं ।
तासु दूत तुम्ह तजि कदराई ।
राम हृदय धरि करहु उपाई ।

ज्याच्या नामस्मरणानें पापीदेखील अत्यंत अपार असा भवसागर तरून जातात त्याचे तुम्ही दूत आहां. तुम्ही भ्याडपणा सोडून द्या, व रामास हृदयांत वागवून प्रयत्न करा.

अस कहि उमा गीध जब गयऊ ।
तिन्ह के मन अतिबिसमय भयऊ ।
निज निज बल सब काहू भाखा ।
पार जाइ कर संसय राखा ।

हे पार्वति ! असें सांगून संपाति जेव्हां उड्डाण करून गेला तेव्हां सर्व वानरांच्या मनाला अत्यंत विस्मय वाटला. त्या सर्वांनीं आपापल्या बलाचा अदमास सांगितला; परंतु सिंधुपार जाण्याचा मात्र त्यांना संशय वाटे.

जरठ भयउँ अब कहइ रिछेसा ।
नहिँ तनु रहा प्रथम-बल-लेसा ।
जबहिँ त्रिबिक्रम भयउ खरारी ।
तब मैं तरुन रहेउँ बलभारी ।

जांबवंत म्हणाला, आतां मी म्हातारा झालों आहे. आतां माझ्यांत पूर्वीच्या शरीरबलाचा लवलेशदेखील उरला नाहीं. प्रभूंनीं जेव्हां वामनावतार घेतला होता तेव्हां मी अगदीं तरुण असून अत्यंत बलाढ्य होतों.

**दो०—बलि बाँधत प्रभु बाढेउ सो तनु बरनि न जाइ। उभय घरी महँ दीन्ही सात प्रदच्छिन धाइ॥ ३०॥**

बलीस बांधतांना प्रभु वाढूं लागले तेव्हांच्या प्रभूंच्या देहाचें वर्णन करितां येत नाहीं. परंतु त्यालाहि मीं धांवत जाऊन दोन घटिकांमध्यें सात प्रदक्षिणा घातल्या.

चौ०—अंगद कहइ जाउँ मैं पारा।
जिय संसय कछु फिरती बारा।
जामवंत कह तुम्ह सब लायक।
पठइय किमि सबही कर नायक।

अंगद म्हणाला, मी पार जाईन. परंतु परत येण्याची मात्र मनांत थोडी वानवा वाटते. हें ऐकून जांबवंत म्हणाला, तूं सर्वस्वी लायक आहेस. परंतु तूं सर्वांचा नायक. तुला आम्हीं कसें जाऊं द्यावें?

कहइ रिच्छपति सुनु हनुमाना।
का चुप साधि रहेउ बलबाना।
पवन–तनय–बल पवनसमाना।
बुधि--बिबेक--बिज्ञान--निधाना।
कवन सो काज कठिन जग माहीं।
जो नहिं तात होइ तुम्ह पाहीं।
रामकाज लगि तव अवतारा।
सुनतहिं भयउ पर्बताकारा।

नंतर जांबवंत म्हणाला, हे मारुते! ऐक. तूं बलवान् असून असा मौन धरून कां बसला आहेस? तुझें वायुपुत्राचें बल वायूप्रमाणेंच; तूं बुद्धि, विवेक आणि विज्ञान यांचें निधान आहेस. हे तात! जगांत तुजकडूनहि होणार नाहीं असें कोणतें कठिण काम आहे! रामकार्यासाठीं तर तुझा अवतारच आहे. इतकें ऐकतांच मारुति पर्वताकार झाले!

कनक--बरन--तन तेज बिराजा।
मानहुँ अपर गिरिन्ह कर राजा।
सिंहनाद करि बारहिं बारा।
लीलहि नाँघउँ जलधि अपारा।
सहित सहाय रावनहिं मारी।
आनउँ इहाँ त्रिकूट उपारी।
जामवंत मैं पूछउँ तोही।
उचितसिखावन दीजेहु मोही।

त्याच्या कनकवर्ण देहावर असें तेज झळकूं लागलें कीं, जणुं तो दुसरा पर्वतराज ( मेरु ) च भासूं लागला. तो वारंवार सिंहनाद करून म्हणाला, मी हा अपार समुद्र सहज ओलांडून जाईन आणि रावणाला सैन्यासह मारून त्रिकूटाचल उपटून येथें आणीन. हे जांबवंता! मी तुला विचारितों, तरी मला योग्य सल्ला दे.

एतना करहु तात तुम्ह जाई।
सीतहि देखि कहहु सुधि आई।
तब निज--भुज--बल राजिवनैना।
कौतुक लागि संग कपिसैना।

(जांबवंत म्हणाला) हे तात! तूं जाऊन इतकेंच कर कीं, सीतेला नुसती पाहून ये आणि तिची खबर आण. नंतर कमलनयन श्रीरामचंद्र आपल्या भुजबलें-करून केवळ कौतुक म्हणून कपिसैन्य बरोबर घेऊन—

**छंद—कपि-सेन-संग सँघारि निसिचर रामु सीतहिं आनिहैं। त्रै-लोक-पावन-सु-जस सुर मुनि नारदादि बखानिहैं॥ जो सुनत गावत कहत समुझत परमपद नर पावई। रघु-बीर-पद-पाथोज-मधु-कर दास तुलसी गावई॥ ३॥**

( कपिसैन्याला बरोबर घेऊन ) व राक्षसांना मारून रामचंद्र सीतेस परत आणतील. तें त्रैलोक्यास पावन करणारें सद्यश नारदादि मुनी आणि देव वर्णन करितील. ज्याचें पठन, गायन, मनन, आणि श्रवण केलें असतां परमपदाची प्राप्ति होते अशा त्या यशाचें रघुवीरचरणकमलभृंग तुलसीदास गान करीत राहील.

**दो०—भवभेषज रघुनाथजसु सुनहिं जे नर अरु नारि। तिन्ह कर सकलमनोरथ सिद्ध करहिं त्रिसिरारि॥ ३१॥**

रघुनाथयश हें भवरोगावर औषध आहे. त्याचें जे नरनारी श्रवण करितील त्यांचे सर्व मनोरथ राम परिपूर्ण करतील.

**सो०—नीलोत्पल-तन-स्याम कामकोटि सोभा अधिक। सुनिय तासु गुनग्राम जासु नाम अघ–खग–बधिक॥ २॥**

नीलकमलाप्रमाणें श्याम, कोट्यवधि मदनांहूनहि अधिक सुंदर आणि ज्याचें नांव पातकरूप पक्ष्यांचा नाश करितें त्या प्रभूचे गुणग्राम ( हे वाचकहो! उत्तर कथाभागांत ) आपण श्रवण करावेत.

॥ इति श्रीरामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने विशुद्धसंतोषसम्पादनो नाम चतुर्थः सोपानः समाप्तः॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

। श्रीजानकीवल्लभो विजयते ।

# ॥ रामचरितमानस ॥

## अर्थात्

## ॥ श्रीतुलसीरामायण ॥

(मराठी भाषांतरासहित.)

# ( पञ्चम सोपान )

( सुंदरकाण्ड )

श्लोकाः ।

शान्तं शाश्वतमप्रमेयमनघं निर्वाणशान्तिप्रदं
ब्रह्माशम्भुफणीन्द्रसेव्यमनिशं वेदान्तवेद्यं विभुम्।
रामाख्यं जगदीश्वरं सुरगुरुं मायामनुष्यं हरिं
वन्देऽहं करुणाकरं रघुवरं भूपालचूडामणिम् ।१।

शांत, शाश्वत, अप्रमेय, निष्पाप, निर्वाणशांतिप्रद, ब्रह्मदेवशंकरशेषसेवित, मोहरहित, वेदांतवेद्य, व्यापक, जगदीश्वर, देवाधिदेव, लीलेनें मनुष्यदेह धारण करणारा भूपालश्रेष्ठ रघुपंगव असा जो रामसंज्ञित श्रीहरी त्याला मीं वंदन करितों.

नान्या स्पृहा रघुपते हृदयेऽस्मदीये
सत्यं वदामि च भवानखिलान्तरात्मा ।
भक्तिं प्रयच्छ रघुपुङ्गव निर्भरां मे
कामादिदोषरहितं कुरु मानसं च ॥ २ ॥

हे रघुपते ! माझ्या हृदयांत इतर कोणताहि अभिलाष नाहीं. मी सत्य सांगत आहे. तूं सर्वांतरात्मा आहेस. हे रघुपुंगवा ! मला निर्भर भक्ति दे, आणि माझें मन कामादि दोषांपासून मुक्त कर.

अतुलितबलधामं स्वर्णशैलाभदेहं
दनुजवनकृशानुं ज्ञानिनामग्रगण्यम् ।
सकलगुणनिधानं वानराणामधीशं
रघुपतिवरदूतं वातजातं नमामि ॥ ३ ॥

अनुपमबलसंपन्न, सुवर्णपर्वताप्रमाणें कांतिमान् देहाचा, दैत्यरूप अरण्याचा अग्नि, ज्ञानवंतांचा अग्रणी, सकलगुणसंपन्न असा जो रघुपतीचा श्रेष्ठ दूत वानराधिपति वायुपुत्र त्यास मी वंदन करितों.

चौ०—जामवंत के बचन सुहाये ।
सुनि हनुमंत हृदय अति भाये ।
तब लगि मोहि परिखेहु तुह्म भाई ।
सहि दुख कंद मूल फल खाई ।
जब लगि आवउँ सीतहि देखी ।
होइ काज मोहि हरष बिसेखी ।

जांबवंताचें तें सुंदर वक्तव्य मारुतीच्या मनाला फारच आवडलें. मारुति म्हणाला, भाई हो ! कंदमूलादिकांवर गुजारा करून व क्लेश सहन करून मी सीतेचा शोध लावून येईपर्यंत माझी वाट पहा. कार्य झालें तर मलाहि विशेष आनंद वाटेल.

अस कहि नाइ सबन्हि कहुँ माथा ।
चलेउ हरषि हिय धरि रघुनाथा ।
सिंधुतीर एक भूधर सुंदर ।
कौतुक कूदि चढेउ ता ऊपर ।
बार बार रघुबीर सँभारी ।
तरकेउ पवनतनय बलभारी ।

असें सांगून त्यानें सर्वांस नमस्कार केला आणि हृदयांत रघुनाथाचें ध्यान करीत तो आनंदानें

निघाला. समुद्राच्या कांठीं एक सुंदर पर्वत होता. त्यावर त्यानें हलकीशी उडी घेतली आणि वारंवार रामस्मरण करीत महापराक्रमी वायुपुत्रानें तेथून निक्षून पहाणी केली.

जेहि गिरि चरन देइ हनुमंता।
चलेउ सो गा पाताल तुरंता।
जिमि अमोघ रघुपति कर बाना।
तेही भाँति चला हनुमाना।
जलनिधि रघु-पति-दूत बिचारी।
तैं मैनाक होहि स्रमहारी।

ज्या ज्या पर्वतावर मारुती आपला पाय रोवी तो तो तत्काल पाताळांतच जाई. ज्याप्रमाणें रामाचा बाण अमोघ जातो त्याप्रमाणें मारुतीहि निघाला. रामदूत जाणून समुद्रानें मैनाकास मारुतीचे श्रम हरण करण्यास सांगितलें.

**दो०-हनूमान तेहि परसा कर पुनि कीन्ह प्रनाम। रामकाजु कीन्हे बिनु मोहि कहाँ बिस्राम॥ १॥**

मारुतीनें मैनाकास हस्तस्पर्श केल्यानंतर प्रणाम केला, आणि तो म्हणाला, रामकार्य केल्याशिवाय मला विश्रांति ती कसची?

चौ०-जात पवनसुत देवन्ह देखा।
जानइ कहुँ बल-बुद्धि-बिसेखा।
सुरसा नाम अहिन्ह कै माता।
पठइन्हि आइ कही तेहि बाता।

मारुती जात आहे असें पाहून त्याच्या अचाट बुद्धीची आणि बलाची परीक्षा घ्यावी असें देवांना वाटलें. त्यांनीं सुरसा नांवाची सर्पमाता त्याच्याकडे पाठविली. ती येऊन मारुतीला म्हणूं लागली—

आजु सुरन्ह मोहि दीन्ह अहारा।
सुनत बचन कह पवनकुमारा।
रामकाजु करि फिरि मैं आवउँ।
सीता कै सुधि प्रभुहि सुनावउँ।
तब तव बदन पैठिहउँ आई।
सत्य कहउँ मोहि जान दे माई।
कवनेहु जतन देइ नहिँ जाना।
ग्रससि न मोहि कहेउ हनुमाना।

"आज मला देवांनीं माझें भक्ष्य दिलें आहे." हें ऐकतांच वायुपुत्र म्हणाला, "रामकार्य करून मी परत फिरून प्रभूला सीतेचा शोध कळविल्यावर हे माते! मी तुझ्या मुखांत प्रवेश करीन. मी सत्य सांगत आहे. तूं मला जाऊं दे." परंतु कोणत्याहि उपायानें ती त्याला जाऊं देईना, तेव्हां मारुति म्हणाला तूं एकदांची मला खाऊन तरी कां टाकीत नाहींस?

जोजन भरि तेहि बदनु पसारा।
कपि तनु कीन्ह दु-गुन-बिस्तारा।
सोरह जोजन मुख तेहि ठयेऊ।
तुरत पवसुत बत्तिस भयेऊ।
जस जस सुरसा बदनु बढावा।
तासु दून कपि रूप देखावा।
सत जोजन तेहि आनन कीन्हा।
अति-लघु-रूप पवनसुत लीन्हा।

तिनें एक योजनभर आपलें मुख पसरलें; तेव्हां मारुतीनें आपले शरीराचा दुप्पट विस्तार केला. नंतर तिनें आपले मुखाचा विस्तार १६ योजनें केला, हें पाहून मारुतीनें आपला विस्तार बत्तीस योजनें केला. ज्याज्याप्रमाणें सुरसा आपलें मुख वाढवी तसतसें मारुतीहि आपलें शरीर दुप्पट वाढवी. तिनें आपलें मुख शतयोजन विस्तीर्ण केलें, तेव्हां मात्र मारुतीनें अत्यंत लघुरूप धारण केलें.

बदन पइठि पुनि बाहेर आवा।
माँगा बिदा ताहि सिर नावा।
मोहि सुरन्ह जेहि लागि पठावा।
बुधि-बल-मरमु तोर मैं पावा।

मारुतीनें तिच्या मुखांत प्रवेश करून तो पुन्हां बाहेर आला आणि मस्तक नमवून आज्ञा मागूं लागला. तेव्हां ती म्हणाली, तुझी बुद्धि आणि बल यांतील मर्म मीं ताडलें. देवांनीं मला याच कार्याकरितां पाठविलें होतें—

**दो०-रामकाजु सब करिहहु तुम्ह बल-बुद्धि-निधान। आसिष देइ गई सो हरषि चलेउ हनुमान॥ २॥**

तूं बल आणि बुद्धि यांचें निधान असून रामाचें सर्व कार्य करशील, असा आशीर्वाद देऊन सुरसा परत गेली आणि मारुति हर्षभरित होऊन पुढें चालूं लागला.

चौ०-निसिचरि एक सिंधु महँ रहई।
करि माया नभ के खग गहई।

जीव जंतु जे गगन उडाहीँ ।
जल बिलोक तिन्ह कै परिछाहीँ ।
गहइ छाँह सक सो न उडाई ।
एहि बिधि सदा गगनचर खाई ।

त्या सागरांत एक राक्षसी रहात होती. ती आपल्या मायेनें आकाशांतील पक्ष्यांस आकर्षण करीत असे. आकाशामध्यें जे जीवजंतु उडत असत त्यांची छाया पाण्यावर पडलेली दिसतांच त्या छायेवर ती झडप घाली व त्यामुळें पक्ष्यांला उडतां येईना. अशाप्रकारें ती नित्य पक्ष्यांवर ताव मारीत असे.

सोइ छल हनुमान कहँ कीन्हा ।
तासु कपट कपि तुरतहिँ चीन्हा ।
ताहि मारि मारुत–सुत–बीरा
बारिधिपार गयउ मतिधीरा ।

मारुतीशींहि तेंच कपट करण्याचा तिचा डाव होता, परंतु त्या पवनात्मज वीरानें तें ताबडतोब ओळखून तिला जीवेंच मारलें आणि तो मतिधीर समुद्रपार गेला.

तहाँ जाइ देखी बनसोभा ।
गुंजत चंचरीक मधुलोभा ।
नाना तरु फल फूल सुहाये ।
खग–मृग–बृंद देखि मन भाये ।
सैल बिसाल देखि एक आगे ।
ता पर धाइ चढेउ भय त्यागे ।

पैलतीरास जाऊन त्यानें उपवनशोभा पाहिली. तेथें मधुलोभानें भ्रमर गुंजारव करीत होते. अनेक वृक्ष फलपुष्पांनीं सुशोभित होते. तेथील पशुपक्ष्यांचे कळप पाहून मन प्रसन्न होत होतें. मारुतीनें समोर एक उंच पर्वत पाहून त्यावर तो निर्भयपणें उड्या मारीत चढला.

उमा न कछु कपि कै अधिकाई ।
प्रभुप्रताप जो कालहि खाई ।

हे पार्वति ! ह्यांत मारुतीची कांहींच प्रौढी नाहीं; हा कालभक्षक भगवंताचाच प्रताप होय.

गिरि पर चढि लंका तेहि देखी ।
कहि न जाइ अति दुर्ग बिसेखी ।
अतिउतंग जलनिधि चहुँ पासा ।
कनककोट कर परमप्रकासा ।

त्या पर्वतावर चढून मारुतीनें लंका पाहिली. तेथें प्रवेश करणें इतकें दुर्घट होतें कीं तें सांगतां येत नाहीं. ती लंका अति उंच असून तिच्या चारी बाजूंनीं समुद्राचा खंदक होता. तिच्याभोंवतालचा सोन्याचा कोट अत्यंत चकाकत होता.

**छंद–कनककोट बिचित्र-मनि-कृत सुंदरायतना घना । चउहट्ट हट्ट सुबट्ट बीथी चारु पुर बहुबिधि बना ॥ गज बाजि खच्चर निकर पदचर रथ बरूथन्हि को गनइ। बहुरूप निसि-चर-जूथ अतिबल सेन बरनत नहिँ बनइ ॥ १ ॥**

चित्रविचित्र रत्नें जडविलेला असा तो सुवर्णाचा कोट सुंदर, विस्तीर्ण व लांबरुंद होता. चव्हाटे, बाजार, रस्ते आणि आडमार्ग यांच्या सौंदर्यानें ती नगरी अत्यंत प्रेक्षणीय होती. गज, अश्व, खेचर यांचे समूह, तसेंच पायदळ आणि रथांचा समुदाय ह्याची गणती कोणास होईल ? अनेक बलाढ्य आणि नानारूपांच्या राक्षसगणांच्या सेनेचाहि तोच हिशेब.

**बन बाग उपबन बाटिका सर कूप बापी सोहहीँ । नर-नाग-सुर-गंधर्व–कन्या-रूप मुनिमन मोहहीँ ॥ कहुँ माल देहबिसाल सैलसमान अतिबल गर्जहीँ । नाना अखारेन्ह भिरहिँ बहुबिधि एक एकन्ह तर्जहीँ ॥ २ ॥**

तेथें वनें, उपवनें, बाग, पुष्पवाटिका, तळीं, विहिरी आणि कूप हेहि सुंदरच होते. नर, नाग, देव, गंधर्व ह्यांच्या कन्या आपल्या रूपानें मुनींच्याहि मनाला मोहित करीत होत्या. कोठें कोठें अत्यंत बलवान् पर्वताप्रमाणें विशाल देहधारी मल्ल गर्जत होते, व अनेक आखाड्यांमध्यें परोपरीनें कुस्ती करून एकमेकांना चीत करीत होते.

**करि जतन भट कोटिन्ह बिकटतन नगर चहुँदिसि रच्छहीँ । कहुँ महिष मानुष धेनु खर अज खल निसाचर भच्छहीँ ॥ एहि लागि तुलसीदास इन्ह की कथा कछुयक है कही । रघु-बीर-सर-तीरथ सरीरन्हि त्यागि गति पइहहिँ सही ॥३॥**

विक्राळ शरीराचे कोट्यवधि योद्धे प्रयत्नपूर्वक नगराचें रक्षण करीत होते. कोठें कोठें राक्षस ह्यशी,

गाई, गाढवें, बकरीं, पक्षी आणि माणसें यांच्यावर पुरखा झोडीत होते. म्हणूनच मीं ( तुलसीदासानें ) त्यांची कथा संक्षेपानें कथन केली. परंतु हे खास ते रघुवीरशररूपी तीर्थामध्यें शरीराचा त्याग करून उत्तम गतीला जाणारे होते.

**दो०–पुररखवारे देखि बहु कपि मन कीन्ह विचार। अतिलघु रूप धरउँ निसि नगर करउँ पइसार ॥ ३ ॥**

पुररक्षकांचें तें पेव पाहून मारुतीनें विचार केला कीं, अत्यंत सूक्ष्मरूप घेऊन रात्रसमयीं नगरींत प्रवेश करावा.

चौ०–मसकसमान रूप कपि धरी।
लंकहि चलेउ सुमिरि नरहरी।
नाम लंकिनी एक निसिचरी।
सो कह चलेसि मोहि निंदरी।
जानेहि नहीं मरम सठ मोरा।
मोर अहार जहाँ लगि चोरा।
मुठिका एक महा कपि हनी।
रुधिर बमत धरनी ढनमनी।

मारुतीनें मशकासारखें लहान रूप घेऊन व श्रीहरीचें स्मरण करून तो लंकेंत जाण्यास निघाला. मध्यंतरीं लंकिनी नांवाची एक राक्षसी भेटली. ती मारुतीला म्हणाली, " माझा उपमर्द करून कोठें जात आहेस ? रे मूढा ! माझें मर्म तुला ठाऊक नाहीं वाटतें. जेवढे म्हणून चोर आहेत तेवढे मी खाऊन टाकतें. " मारुतीनें तिला एक ठसठशीत टोला हाणला. त्यासरशीं ती धरणीवर गडगडली व रक्त ओकूं लागली.

पुनि संभार उठी सो लंका।
जोरि पानि कर बिनय ससंका।
जब रावनहि ब्रह्म बर दीन्हा।
चलत बिरंचि कहा मोहि चीन्हा।
बिकल होसि तैं कपि के मारे।
तब जानेसु निसिचर संघारे।
तात मोर अति पुन्य बहूता।
देखेउँ नयन राम कर दूता।

ती लंकिनी पुन्हां सांवरून उठली आणि हात जोडून भीतभीत आर्जव करूं लागली कीं, हे हनुमन्! जेव्हां ब्रह्मदेवानें रावणाला वर दिला तेव्हां जाता जाता त्यानें मला एक खूण सांगितली कीं, जेव्हां तूं वानराच्या मारानें विकल होशील तेव्हां राक्षसांचा संहार होणार असें जाण. हे तात ! माझें पुण्य अत्यंत थोर म्हणून मला ह्या डोळ्यांनीं रामदूताचें दर्शन घडलें.

**दो०–तात स्वर्ग-अपवर्ग-सुख धरिय तुला एक अंग। तूल न ताहि सकल मिलि जो सुख लव सतसंग ॥ ४ ॥**

हे तात ! तराजूच्या एका पारड्यांत स्वर्ग आणि मोक्ष ह्यांचें सौख्य घातलें तरी तें सगळेंदेखील (दुसऱ्या पारड्यांतल्या) क्षणमात्र सत्संगानें होणाऱ्या सुखाची बरोबरी करणार नाहीं.

चौ०–प्रबिसि नगर कीजै सब काजा।
हृदय राखि कोसल-पुर-राजा।
गरल सुधा रिपु करइ मिताई।
गोपद सिंधु अनल सितलाई।
गरुअ सुमेरु रेनुसम ताही।
राम कृपा करि चितवा जाही।

आतां रामचंद्राला हृदयांत वागवून व नगरामध्यें प्रवेश करून आपला सर्व कार्यभाग उरकून घे. रामचंद्रांनीं ज्याच्यावर कृपादृष्टि केली त्याला विष अमृताप्रमाणें होऊन शत्रुदेखील मित्र होतात, समुद्र गोष्पदाप्रमाणें होऊन अग्नि शीतल होतो, व श्रेष्ठ सुमेरुपर्वतहि रजःकणाप्रमाणें होतो.

अति-लघु-रूप धरेउ हनुमाना।
पैठा नगर सुमिरि भगवाना।
मंदिर मंदिर प्रति करि सोधा।
देखे जहँ जहँ अगनित जोधा।

हनुमंतानें अत्यंत सूक्ष्मरूप घेऊन रामस्मरणपूर्वक नगरींत प्रवेश केला. त्यानें नगरींतील प्रत्येक मंदिरांत शोध केला, तेव्हां त्याला ठिकठिकाणीं असंख्य वीर आढळले.

गयउ दसाननमंदिर माहीं।
अतिबिचित्र कहि जात सो नाहीं।
सयन किये देखा कपि तेही।
मंदिर महुँ न दीख बैदेही।

तो ( फिरत फिरत ) रावणाच्या महालांत गेला. त्याची विचित्रता तर भाषातीतच होती. तेथें मारुतीस रावण निजलेला दिसला. परंतु तेथें त्याला सीता आढळली नाहीं.

भवन एक पुनि दीख सुहावा ।
हरिमंदिर तहँ भिन्न बनावा ।

नंतर त्यास एक सुरेखसा वाडा दिसला. तेथें देवघर अगदीं निराटें व निराळें होतें.

दो०–रामायुधअंकित गृह सोभा बरनि न जाइ । नव तुलसिका बृंद तहँ देखि हरष कपिराइ ॥ ५ ॥

रामाच्या ( शंख, चक्र, गदा, खड्ग आणि धनु अशा पांच )—आयुधांनीं चिन्हित अशा त्या गृहाची शोभा अवर्णनीय होती. तेथले तुळशीचे ताटवे पाहून तर मारुतीला फारच मजा आली.

चौ०–लंका निसि-चर-निकर-निवासा ।
इहाँ कहाँ सज्जन कर बासा ।
मन महुँ तरक करइ कपि लागा ।
तेहीं समय बिभीषनु जागा ।
राम राम तेहिं सुमिरन कीन्हा ।
हृदय हरष कपि सज्जन चीन्हा ।

" लंका म्हणजे राक्षसांच्या वसाहतीचें मुख्य केन्द्र. येथें संतांचा वास तो कसा ?" अशा रीतीनें मारुति आपल्या मनांत तर्क करीत आहे इतक्यांत बिभीषण जागा झाला. त्यानें ' राम राम ' असें नामस्मरण केलें. तें ऐकतांच मारुतीस आनंद तर झालाच पण हा कोणीतरी सज्जन आहे असेंहि त्यानें ओळखलें.

एहि सुनु हठि करिहउँ पहिचानी ।
साधु ते होइ न कारजहानी ।
बिप्ररूप धरि बचन सुनाये ।
सुनत बिभीषण उठि तहँ आये ।
करि प्रनाम पूछी कुसलाई ।
बिप्र कहहु निजकथा बुझाई ।

( मारुती मनांत विचार करूं लागला कीं, ) ह्याच्याशीं मुद्दामच ओळख केली पाहिजे. साधूकडून रामकार्याची हानि व्हावयाची नाहीं. लगेच ब्राह्मण-रूप घेऊन मारुतीनें यज्ञेश्वर पुकारला. तो ऐकतांच

१ मारुतीची ही बिभीषणाची भेट आणि त्यांचा येथला संवाद वाल्मीकि अथवा अध्यात्म रामायणांत नाहीं. हा येथला प्रकार कविकल्पनेंतला आहे. त्या कल्पनेंतली जबाबदारी कवीनें कोणत्या कुशलतेनें पार पाडली ते आमच्या ':मानस-हंसां 'त ( काव्यसमालोचनेंत ) पहावयास मिळेल.

बिभीषण उठून जवळ गेला आणि प्रणामपूर्वक कुशल विचारून म्हणाला—हे विप्र ! आपला वृत्तांत मला मोकळ्या मनानें सांगावा—

की तुम्ह हरिदासन्ह महुँ कोई ।
मोरे हृदय प्रीति अति होई ।
की तुम्ह राम दीन–अनुरागी ।
आयहु मोहि करन बडभागी ।

तुम्ही कोणी तरी हरीचे लालच असावयास पाहिजे हें खास, कारण तुमच्या नुसत्या दर्शनानेंच माझ्या अंतःकरणांत प्रेमाचे उमाळे दाटत आहेत. कीं तुम्ही दीनवत्सल रामच मला महाभाग्यशाली करण्यास्तव आलां आहां !

दो०–तब हनुमंत कही सब रामकथा निजनाम । सुनत जुगलतन पुलक मन मगन सुमिरि गुनग्राम ॥ ६ ॥

तेव्हां मारुतीनें सर्व रामकथा सांगून आपलें नांवहि सांगितलें. तें ऐकतांच उभयतांचीं शरीरें रोमांचित होऊन त्यांचीं मनें रामगुणगणस्मरणांत तल्लीन झालीं.

चौ०–सुनहु पवनसुत रहनि हमारी ।
जिमि दसनन्हि महुँ जीभ बिचारी ।
तात कबहुँ मोहि जानि अनाथा ।
करिहहिं कृपा भानु–कुल-नाथा ।
तामसतनु कछु साधन नाहीं ।
प्रीति न पदसरोज मन माहीं ।

बिभीषण म्हणाला, हे वायुपुत्रा ! ऐक. दांतांच्या अडसरांत सांपडलेल्या बिचाऱ्या जिव्हेप्रमाणें मी येथें राहिलों आहे. हे तात ! मी अनाथ जाणून भानुकुलनाथ मजवर कधीं तरी कृपा करतील काय रे. ह्या तामस-देहानें त्या रामाचें कांहींच साधन होत नाहीं, व त्याच्या चरणकमलाविषयीं मनांत प्रेमहि जमत नाहीं.

अब मोहि भा भरोस हनुमंता ।
बिनु हरिकृपा मिलहिं नहिं संता ।
जौं रघुबीर अनुग्रह कीन्हा ।
तौ तुम्ह मोहि दरसु हठि दीन्हा ।

हे हनुमंता ! आतां तर माझी खात्रीच झाली कीं, हरिकृपेवांचून संतदर्शन होतच नसतें. रघुवीरांनीं कृपा केली म्हणून तर तूं आपण होऊन मला दर्शन दिलेंस.

सुनहु बिभीषन प्रभु कइ रीती ।
करहिं सदा सेवक पर प्रीती ।

कहहु कवन मैं परम कुलीना।
कपि चंचल सबही बिधिहीना।
प्रात लेइ जो नाम हमारा।
तेहि दिन ताहि न मिलइ अहारा।

(मारुति ह्मणाला) बिभीषणा! ऐक. प्रभूंचें हें ब्रीद ठामच समज कीं, ते आपल्या दासांचे निरंतर लळेच पुरवितात. सांग बरें, मी असा कोण मोठा बडेबापका बेटा? बोलूनचालूनच मी कपि, चंचल आणि सर्वतोपरी निकृष्ट. प्रातःकाळीं जो आमचें नुसतें नांव घेतो त्याला त्या दिवशीं भुकाच मरण्याची पाळी ठरलेली.

**दो०—अस मैं अधम सखा सुनु मोहूँ पर रघुबीर। कीन्ही कृपा सुमिरि गुन भरे बिलोचन नीर॥ ७॥**

मित्रा ध्यानीं धर कीं मी असला अधम, तरीहि मजवर रघुवीरांनीं कृपा केलीच. रामगुणांचें स्मरण होऊन मारुतीचे डोळे प्रेमाश्रूंनीं डबडबले.

चौ०—जानतहूँ अस स्वामि बिसारी।
फिरहिं ते काहे न होहिं दुखारी।

अशाहि प्रभूस जाणूनबुजून जे विसरतात ते काय ह्मणून दुःखी राहणार नाहींत?

एहि बिधि कहत राम-गुन-ग्रामा।
पावा अनिर्बाच्य बिस्रामा।
पुनि सब कथा बिभीषन कही।
जेहि बिधि जनकसुता तहँ रही।

ह्याप्रमाणें रामगुणग्रामाचें वर्णन करीत असतां दोघांनाहि अनिर्वाच्य सुख झालें. नंतर तेथें सीता ज्या स्थितींत राहत होती ती इत्थंभूत कथा बिभीषणानें मारुतीला निवेदन केली.

तब हनुमंत कहा सुनु भ्राता।
देखा चहउँ जानकीमाता।
जुगुति बिभीषन सकल सुनाई।
चलेउ पवनसुत बिदा कराई।

तेव्हां मारुति म्हणाला, हे बंधो! ऐक. माता जानकीस पाहण्याची माझी इच्छा आहे. बिभीषणानें त्याला सर्व युक्ति सुचविली, व त्याप्रमाणें बिभीषणाचा निरोप घेऊन मारुति निघाला.

करि सोइ रूप गयउ पुनि तहवाँ।
बन असोक सीता रह जहवाँ।

देखि मनहिं महुँ कीन्ह प्रनामा।
बैठेहि बीति जात निसि जामा।

फिरून तेंच रूप घेऊन मारुति अशोकवनांत सीता होती तेथें गेला, व तिला पाहतांच मनांतल्या मनांत त्यानें प्रणाम केला. त्या अशोक वृक्षावरच बसून मारुतीनें एक प्रहर रात्र काढली.

कृसतन सीस जटा एक बेनी।
जपति हृदय रघु-पति-गुन-स्रेनी।

जिचें शरीर कृश झालें आहे, जिच्या केसांच्या जटा वळून एक वेणीच झाली आहे व रघुपतींच्या गुणगणांचेंच जी मनांत चिंतन करीत आहे—

**दो०—निजपद नयन दिये मन रामचरन महँ लीन। परमदुखी भा पवनसुत देखि जानकी दीन॥ ८॥**

व आपल्या पायांवर दृष्टि ठेवून जिनें आपलें मन रामचरणांचे ठायीं लीन केलें आहे अशी ती केविलवाणी जानकी पाहून मारुति अत्यंत दुःखित झाला

चौ०—तरुपल्लव महुँ रहा लुकाई।
करइ बिचार करउँ का भाई।
तेहि अवसर रावनु तहँ आवा।
संग नारि बहु किये बनावा।

मारुती तरुपल्लवांमध्यें लपून बसला, आणि विचार करूं लागला कीं, आतां काय करावें बरें! इतक्या अवधींत रावण नटूनथटून स्त्रीसहवर्तमान तेथें आला.

बहुबिधि खल सीतहिं समुझावा।
साम दाम भय भेद देखावा।
कह रावनु सुनु सुमुखि सयानी।
मंदोदरीआदि सब रानी।
तव अनुचरी करउँ पन मोरा।
एक बार बिलोकु मम ओरा।

सीतेस सामदामदंडभेद या उपायांनीं अनेक प्रकारें समजवून तो दुरात्मा रावण तिला ह्मणाला, हे सुमुखी! माझें ऐक. तूं सुज्ञ आहेस. मंदोदरीप्रभृति सर्व राण्यांना तुझ्या दासी करीन, ही माझी प्रतिज्ञा आहे. एकवार तरी माझ्याकडे पहा.

तृन धरि ओट कहति बैदेही।
सुमिरि अवधपति परमसनेही।
सुनु दसमुख खद्योतप्रकासा।
कबहुँ कि नलिनी करइ बिकासा।

अस मन समुझु कहति जानकी ।
खल सुधि नहिँ रघु-बीर-बान की ।
सठ सूने हरि आनेहि मोही ।
अधम निलज्ज लाज नहिँ तोही ।

वैदेही अधांतरीं तृण धरून व आपल्या प्राणपतीचें स्मरण करून बोलूं लागली, "हे रावणा ! ऐकून ठेव, काजव्याचा प्रकाश कमलिनीस कधीं तरी विकसित करील काय ? याचा जरा विचार कर." फिरून ती म्हणाली, "अरे मेल्या चांडाळा, रघुवीराच्या बाणाची तुला आठवण नाहीं काय ? मेल्या रामोश्या! आश्रमांत अगदीं शुकशुकाट असतां तूं मजवर हातपाटिलकी गाजविलीस! मांगा, तूं निर्लज्ज रे निर्लज्ज! सगळीच लाज विकून कशी खाल्लीस ?"

दो०—आपुहि सुनि खद्योतसम रामहिँ भानुसमान । परुषवचन सुनि काढि असि बोला अतिखिसियान ॥ ९ ॥

आपणास काजव्याची आणि रामास सूर्याची उपमा दिलेली ऐकून आणि (शठ, अधम इत्यादि ) गालिप्रदान श्रवण करून रावण अत्यंत क्रुद्ध झाला आणि खड्ग उपसून ह्मणाला—

चौ०—सीता तैँ मम कृत अपमाना ।
कटिहउँ तव सिर कठिनकृपाना ।
नाहिँ त सपदि मानु मम बानी ।
सुमुखि होत न त जीवनहानी ।

हे सीते ! तूं माझा अपमान केला आहेस. ह्मणून या तीक्ष्ण खड्गानें मी तुझें शिर उडविणार. नाहींतर मी म्हणतों तीं एकदम कबूली भर.ए गुलजार माशुक ! तसें न करशील तर तूं नाहक आपल्या जीवाला मुकशील बरें.

स्याम–सरोज–दाम–सम सुंदर ।
प्रभुभुज करि-कर-सम दसकंधर ।
सो भुज कंठ कि तव असि घोरा ।
सुनु सठ अस प्रमान पन मोरा ।

( सीता म्हणाली ) मेल्या गलेलठ्ठा ! एक तर नीलकमलनालाप्रमाणें सुंदर आणि गजशुंडेप्रमाणें असलेला प्रभूंचा भुज माझ्या कंठावर असेल, किंवा तुझें तीक्ष्ण खड्ग तरी बसेल असा माझा पण आहे हें पक्कें लक्षांत ठेव.

चंद्रहास हरु मम परितापं ।
रघु–पति–बिरह–अनल–संजातं ।

हे चंद्रहासा ! रघुपतीच्या विरहाग्निजन्य दुःखाचें हरण कर.

सीतल निसि तव असि–बर–धारा ।
कह सीता हरु मम दुखभारा ।

सीता म्हणाली, तुझ्या तीक्ष्ण खड्गाची शरत्पौर्णिमेच्या रात्रीप्रमाणें प्रशांत धार माझ्या दुःखभाराचें हरण करो.

सुनत बचन पुनि मारन धावा ।
मयतनया कहि नीति बुझावा ।

सीतेचें बोलणें ऐकतांच रावण तिला मारण्यास उसळला. तेव्हां मंदोदरीनें त्यास कानपिचक्यांनीं रस्त्यांवर आणलें.

कहेसि सकल निसिचरिन्ह बोलाई ।
सीतहि बहुबिधि त्रासहु जाई ।
मास दिवस महुँ कहा न माना ।
तौ मैं मारब काढि कृपाना ।

नंतर सर्व राक्षसींना बोलावून रावणानें त्यांना आज्ञा केली कीं, सीतेचा अनेक प्रकारें छळ करीत असा, व एक महिन्याच्या अवधींत जर तिनें माझें म्हणणें कबूल केलें नाहीं तर मी याच खड्गानें तिचा कण्ठनाल कापीन.

दो०—भवन गयउ दसकंधर इहाँ पिसाचिनिबृंद । सीतहिँ त्रास देखावहिँ धरहिँ रूप बहुमंद ॥ १० ॥

इतकें बोलून रावण आपल्या मंदिरांत निघून गेला. इकडे त्या सर्व भराड्या गौरींचा घोळका अनेक विक्राळ रूपें धारण करून सीतेवर आपापलें षड्यंत्र परजूं लागला.

चौ०—त्रिजटा नाम राच्छसी एका ।
राम चरन–रति निपुन बिबेका ।
सबन्हौँ बोलि सुनायेसि सपना ।
सीतहिँ सेइ करहु हित अपना ।

त्यामध्यें त्रिजटा नांवाची एक राक्षसी होती. ती रामचरणीं अनुरक्त आणि विवेकसंपन्न होती. तिनें

---

१ पतिव्रताधर्माप्रमाणें स्त्रीनें परपुरुषाशीं एकांतांत बोलूं नये, म्हणून सीतेनें गवताच्या काडीची मर्यादा मध्यें ठेविली.

१ येथें कवीनें 'चंद्रहास' या शब्दावर श्लेष केला आहे. 'चंद्रहास' हें रावणाच्या खड्गाचें नांव आणि चंद्रहास म्हणजे उत्फुल्लचंद्र.

सर्व राक्षसींना जमवून व त्यांना आपलें स्वप्न सांगून ती म्हणाली कीं, सीतेची सेवा करून आपलें हित साधून घ्या.

सपने बानर लंका जारी।
जातुधानसेना सब मारी।
खरआरूढ नगन दससीसा।
मुंडितासिर खंडित-भुज-बीसा।
एहिबिधि सो दच्छिनदिसि जाई।
लंका मनहुँ बिभीषन पाई।
नगर फिरी रघु–बीर–दोहाई।
तब प्रभु सीता बोलि पठाई।

( ती म्हणाली ) " स्वप्नांत मला असें दिसलें कीं, वानरांनीं लंका जाळून सर्व राक्षससैन्याचा विध्वंस केला, व गाढवावर बसून नग्न, पांच पाट काढलेला, सर्व भुजाहीनं असा रावण दक्षिण दिशेकडे गेला आणि बिभीषणाला लंका मिळून नगरींत रघुवीराची द्वाही फिरली. नंतर रामांनीं सीतेस बोलावणें पाठविलें.

यह सपना मैं कहउँ पुकारी।
होइहि सत्य गये दिन चारी।
तासु बचन सुन ते सब डरीं।
जनकसुता के चरनान्हिँ परीं।

मी खात्रीनें सांगतें कीं, हें स्वप्न दोनचार दिवसांतच प्रत्ययास येईल. " हें त्रिजटेचें वचन ऐकतांच सर्वजणी घाबरून त्यांनीं सीतेच्या चरणांवर लोटांगण घेतलें.

**दो०–जहँ तहँ गईं सकल तब सीता कर मन सोच। मास दिवस बीते मोहि मारिहि निसिचर पोच॥ ११॥**

नंतर त्या सर्वजणी जिकडेतिकडे फांकल्या. सीता मनांत दुःख करूं लागली कीं महिना भरतांच हा मेला दुरात्मा खवीस मला ठार करणारच.

चौ०–त्रिजटा सन बोली कर जोरी।
मातु बिपतिसंगिनि तैं मोरी।
तजउँ देह करु बेगि उपाई।
दुसह बिरह अब नहिँ सहि जाई।
आनि काठ रचु चिता बनाई।
मातु अनल पुनि देहि लगाई।
सत्य करहि मम प्रीति सयानी।
सुनइ को स्रवन सूलसम बानी।

सीता त्रिजटेस हात जोडून म्हणाली, " माते! ह्या विपत्तींत मला तुझाच आधार आहे. तूं मला ह्या देहाचा त्याग करण्याचा कांहीं तरी उपाय सांग. आतां हा दुःसह विरह मला सहन होत नाहीं. काष्ठें आणून त्यांची चिता रचून तयार कर, आणि नंतर हे माते! ह्या देहाला अग्नि दे. तूं सुज्ञ आहेस. माझें प्रेम तूंच खरें करून दाखीव. " परंतु कानाला शूलाप्रमाणें बोंचणारें तें सीतेचें भाषण त्रिजटेला कसें ऐकवेल ?

सुनत बचन पद गहि समुझायेसि।
प्रभु-प्रताप-बल-सुजस सुनायेसि।
निसि न अनल मिलु सुनु सुकुमारी।
अस कहि सो निजभवन सिधारी।

सीतेचें तें वचन ऐकून त्रिजटेनें तिचे चरण धरिले आणि प्रभूचे प्रताप, बल आणि सुयश वर्णन करून तिची समजूत घातली कीं, हे राजकन्ये! रात्र असल्यामुळें आतां विस्तव मिळायचा नाहीं; असें म्हणून तिनें आपल्या घराचा रस्ता सुधारला.

कह सीता बिधि भा प्रतिकूला।
मिलिहि न पावक मिटिहि न सूला।
देखियत प्रगट गगन अंगारा।
अवनि न आवत एकउ तारा।
पावकमय ससि स्रवत न आगी।
मानहुँ मोहि जानि हतभागी।
सुनहि बिनय मम बिटप असोका।
सत्य नाम करु हरु मम सोका।
नूतनकिसलय अनलसमाना।
देहि आगिनि जानि करहि निदाना।
देखि परमबिरहाकुल सीता।
सो छन कपिहि कलपसम बीता।

सीता ह्मणाली, " दैवच फिरलें आहे, म्हणून तर अग्नीहि मिळत नाहीं आणि माझा त्रासहि चुकत नाहीं. आकाशामध्यें अग्नीप्रमाणें इतके तारे चमकत आहेत, पण त्यांतून एकहि पृथ्वीवर पडत नाहीं. हा चंद्र अग्निमय असून देखील जणुंकाय मीं हतभागी जाणूनच अग्नीचा वर्षाव करीत नाहीं. हे अशोकवृक्षा! माझी प्रार्थना ऐक, व माझ्या शोकाचा परिहार करून आपलें नांव यथार्थ कर. तुझे नूतन पल्लव अग्नीप्रमाणें आहेत. तूं तरी मला अग्नि दे. माझा अंत पाहूं नकोस. " सीता अत्यंत विरहव्याकुल झाली. तो क्षण मारुतीस कल्पाप्रमाणें गेला.

सो०—कपि करि हृदय बिचार दीन्हि मुद्रिका डारि तब । जनु असोक अंगार दीन्ह हरषि उठि कर गहेउ ॥ १ ॥

मारुतीनें मनांत विचार करून त्या वेळीं मुद्रिका खालीं टाकली. अशोकवृक्षानेंच जणुंकाय अग्नि दिला आहे असें वाटून सीतेनें ती मुद्रिका उठून हातांत घेतली.

चौ०—तब देखी मुद्रिका मनोहर ।
राम-नाम-अंकित-अतिसुंदर ।
चकित चितव मुदरी पहिचानी ।
हरष बिषाद हृदय अकुलानी ।
जीति को सकइ अजय रघुराई ।
माया तें असि रचि नहिं जाई ।

ती मनोहर, रामनामांकित, अत्यंत सुंदर मुद्रिका सीतेनें पाहिली आणि ती ओळखून ती चकित झाली. हर्ष आणि विषाद यांनीं तिचें मन व्यग्र केलें. ती विचार करूं लागली कीं, रघुराज अजिंक्य आहेत, त्यांना कोण जिंकूं शकणार? अशी नकली मुद्रिका तयार करणें शक्य नाहीं.

सीता मन बिचार कर नाना ।
मधुरबचन बोलेउ हनुमाना ।
राम-चंद्र-गुन बरनइ लागा ।
सुनतहि सीता कर दुख भागा ।
लागी सुनइ स्रवन मन लाई ।
आदिहुँ तें सब कथा सुनाई ।

सीतेच्या मनांत नानाप्रकारचे विचार घोळत आहेत असें पाहूत मारुतीनें मधुर वाक्यें बोलण्यास सुरुवात केली. त्यानें रामचंद्रांचें गुणवर्णन केलें. तें ऐकतांच सीतेचें दुःख नाहींसें झालें. नंतर मारुतीनें पहिल्यापासून सर्व इतिहास सांगितला व सीतेनें तो मनकान एकवटून ऐकला.

स्रवनामृत जेहि कथा सुहाई ।
कहि सो प्रगट होत किन भाई ।
तब हनुमंत निकट चलि गयऊ ।
फिर बैठी मन बिसमय भयऊ ।

ती म्हणाली, ज्यांनीं श्रवणामृततुल्य कथा मला ऐकविली तो प्रत्यक्ष माझ्यासमोर कां येत नाहीं? तेव्हां मारुति तिच्याजवळ गेला. परंतु तिच्या मनांत शंका येऊन ती पाठ फिरवून बसली.

रामदूत मैं मातु जानकी ।
सत्य सपथ करुनानिधान की ।
यह मुद्रिका मातु मैं आनी ।
दीन्हि राम तुम्ह कहँ सहिदानी ।
नर बानरहि संग कहु कैसे ।
कही कथा भइ संगति जैसे ।

मारुति म्हणाला, " हे माते जानकि, मी त्या करुणानिधानाची शपथ घेऊन सांगतों कीं, मी खरोखर रामदूत आहे. ही मुद्रिका मीं आणली; रामानें ती तुला खूण दिली आहे. " यावर सीता म्हणाली, मनुष्य आणि वानर ह्यांच्यामध्यें गट्टी कशी जमली? तेव्हां मारुतीनें ती कशी जुळली ती घटना सीतेला निवेदन केली.

दो०—कपि के बचन सप्रेम सुनि उपजा मन बिस्वास । जाना मन क्रम बचन यह कृपासिंधु कर दास ॥ १२ ॥

कपीचें तें सप्रेम वचन ऐकून सीतेच्या मनांत विश्वास वाटला, आणि हा कायावाचामनेंकरून कृपासिंधु रामचंद्रांचाच दास आहे अशी तिची खात्री पटली.

चौ०—हरिजन जानि प्रीति अतिबाढी ।
सजल नयन पुलकावलि ठाढी ।
बूडत बिरहजलधि हनुमाना ।
भयहु तात मो कहँ जलजाना ।
अब कहु कुसल जाउँ बलिहारी ।
अनुजसहित सुखभवन खरारी ।

मारुति रामभक्त आहे असें जाणून तिचें प्रेम अत्यंत उचंबळूं लागलें. तिच्या डोळ्यांत प्रेमाश्रु येऊन तिच्या अंगावर दरदरून कांटे उभे राहिले. ती म्हणाली, हे हनुमंता ! मी विरहसागरांत बुडत असतां तूं मला नौकाच झालास. बा रे ! मी हा देह तुजवरून कुरवंडी करून टाकतें. प्रथम लक्ष्मणासह सुखनिधान खरारिपूचें कुशलवर्तमान सांग.

कोमलचित कृपालु रघुराई ।
कपि केहि हेतु धरी निठुराई ।

---

१ या ठिकाणीं, रामचंद्रांच्या हातांतील मुद्रिका येथें कशी आली असें वाटून सीतेला रामाच्या सुरक्षितपणाबद्दल शंका आली; परंतु तिनेंच त्या शंकेचें निवारण केलें.

सहजबानि सेवक–सुख–दायक।
कबहुँ कसुरति करत रघुनायक।

रघुराज कोमल मनाचे आणि दयाळु असून, हे मारुते! कोणत्या कारणामुळें त्यांनीं मजवर इतकी निष्ठुरता केली बरें? सेवकांना सुखदायक होणें हें ज्यांचें अलोट ब्रीद ते रघुनायक माझी कधीं तरी आठवण करितात काय?

कबहुँ नयन मम सीतल ताता।
होइहहिँ निरखि स्याम–मृदु–गाता।
बचन न आव नयन भरि बारी।
अहह नाथ हौँ निपट बिसारी।

त्या श्याम आणि कोमल मूर्तीला पाहून हे तात! माझे डोळे कधीं निवतील बरें? हाय! हाय!! माझे नाथ मला अगदींच विसरलेना! यापुढें तिला बोलवेना! तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले.

देखि परम बिरहाकुल सीता।
बोला कपि मृदुबचन बिनीता।
मातु कुसल प्रभु अनुजसमेता।
तव दुख दुखी सु–कृपा–निकेता।
जनि जननी मानहु जिय ऊना।
तुम्ह तेँ प्रेम राम के दूना।

सीता अत्यंत विरहव्याकुळ झालेली पाहून मारुति नम्रपणें मृदुवचन बोलूं लागला. हे माते! लक्ष्मणासहवर्तमान दयानिधान प्रभु कुशल असून तुझ्या दुःखामुळें दुःखित आहेत. हे जननि! मनांत कोणतीहि शंका घेऊं नकोस. तुझ्यापेक्षांहि रामचंद्रांचें तुझ्यावर द्विगुणित प्रेम आहे.

**दो०–रघुपति कर संदेस अब सुनु जननी धरि धीर। अस कहि कपि गदगद भयउ भरे बिलोचन नीर॥ १३॥**

हे जननि! आतां धीर धर आणि रघुपतींचा निरोप ऐक. असें म्हणून मारुति सद्गदित झाला आणि त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले.

कहेउ राम बियोग तव सीता।
मो कहँ सकल भये बिपरीता।
नव-तरु-किसलय मनहुँ कृसानू।
काल–निसा-सम निसि ससि भानू।
कुबलयबिपिन कुंत–बन–सरिसा।
बारिद तपततेल जनु बरिसा।
जेहि तरु रहे करत तेइ पीरा।
उरग–स्वास–सम त्रिबिध समीरा।
कहेहू ते कछु दुख घटि होई।
काहि कहउँ यह जान न कोई।

( मारुति म्हणतो ) राम म्हणाले, हे सीते! तुझ्या वियोगामुळें मला सर्व विपरीत झालें आहे. नूतन तरुपल्लव मला अग्निप्रमाणें वाटत असून रात्रहि काळरात्रिप्रमाणें वाटत आहे. चंद्र सूर्याप्रमाणें वाटत असून कमलवन भाल्यांच्या समूहाप्रमाणें भासत आहे. मेघ जणुंकाय तप्त तेलाचा वर्षावच करीत आहेत. ज्या वृक्षाखालीं वास करावा तो पीडा देत असून त्रिविधवायू सर्पाच्या फूत्काराप्रमाणें वाटत आहेत. आपलें दुःख दुसऱ्याला सांगण्यानें त्याचा किंचित् परिहार होतो, परंतु तें कोणाला सांगूं? त्याचा दर्दी तर कोणीच दिसत नाहीं.

तत्व प्रेम कर मम अरु तोरा।
जानत प्रिया एक मन मोरा।
सो मन सदा रहत तोहि पाहीँ।
जानु प्रीतिरस एतनहि माहीँ।

हे प्रिये! तुझ्या आणि माझ्या प्रेमांतलें तत्त्व ( जीवनरहस्य ) केवळ माझें मनच एकटें जाणत आहे, आणि तें मन नित्य तुझ्यापाशीं रहात आहे. एवढ्यामध्येंच माझ्या प्रेमाचें मर्म ओळखून घे.

प्रभुसंदेह सुनत बैदेही।
मगन प्रेम तन सुधि नहिँ तेही।
कह कपि हृदय धीर धरु माता।
सुमिरु राम सेवक-सुख-दाता।
उर आनहु रघु–पति–प्रभुताई।
सुनि मम बचन तजहु कदराई।

तो प्रभुसंदेश ऐकतांच जानकी प्रेमनिमग्न होऊन देहभान विसरली. तेव्हां मारुति म्हणाला, हे माते! हृदयांत धीर धर. सेवकांना सुख देणाऱ्या रामचंद्रांचें स्मरण करून रघुपतींचा प्रभाव लक्षांत आण आणि भीतीचा त्याग करून माझें वचन ऐक.

**दो०–निसि-चर-निकर पतंगसम रघु-पति बान कृसानु। जननी हृदय धीर धरु जरे निसाचर जानु॥ १४॥**

राक्षससमुदाय पतंगासारखे असून रघुपतींचे बाण

अग्निप्रमाणें होत. म्हणून हे माते ! राक्षस दग्धच झाले आहेत असें समजून मन खंबीर ठेव.

चौ०—जौं रघुबीर होति सुधि पाई।
करते नहिँ बिलंबु रघुराई।
रामबान रबि उये जानकी।
तमबरूथ कहँ जातुधान की।
अबहिँ माँतु मैँ जाउँ लेवाई।
प्रभुआयसु नहिँ रामदोहाई।
कछुक दिवस जननी धरु धीरा।
कपिनसहित अइहहिँ रघुबीरा।
निसिचर मारि तोहि लेइ जैहहिँ।
तिहुँ पुर नारदादि जस गैहहिँ।

जर रघुवीराला तुझा शोध लागला असता तर त्यांनीं विलंब लावलाच नसता. हे जानकि ! रामबाण-रूपी रवीचा उदय झाला असतां राक्षसरूपी निबिड अंधकाराचा त्यापुढें पाड काय ? मी तुला आतांच देखील घेऊन गेलों असतों; परंतु रामाचीच शपथ. मला त्यांची ती आज्ञा नाहीं. हे जननि ! थोडकेच दिवस धीर धर. रघुवीर कपींसह येतील, राक्षसांना मारतील, तुला घेऊन जातील आणि नारदादिक त्यांचें यश त्रैलोक्यांत गात राहतील.

हैं सुत कपि सब तुम्हहिँ समाना।
जातधानभट अतिबलवाना।
मोरे हृदय परम संदेहा।
सुनि कपि प्रगट कीन्ह निजदेहा।
कनक–भूधरा–कार–सरीरा।
समरभयंकर अति–बल–बीरा।
सीता मनभरोस तब भयऊ।
पुनि लघुरूप पवनसुत लयऊ।

सीता म्हणाली, "बाळा ! सर्व वानर अगदीं तुझ्यासारखेच आहेत काय रे ! राक्षसवीर पराकाष्टेचे शहाजोर म्हणून माझे मनांत मोठीच शंका उत्पन्न होत आहे." तें ऐकून मारुतीनें आपलें रूप प्रकट केलें. तेव्हां त्या सताड उंच सुवर्णपर्वताकार शरीर धारण केलेल्या, समरभयंकर व अत्यंत बलाढ्य वीराचा सीतेच्या मनांत विश्वास उत्पन्न झाला. नंतर मारुतीनें आपलें पूर्वींचें लघुरूप धारण केलें.

**दो०—सुनु माता साखामृग नहिँ बल–**
**बुद्धि-बिसाल। प्रभुप्रताप तें गरुडहिँ**
**खाइ परमलघु ब्याल ॥ १५ ॥**

मारुति म्हणाला, हे माते ! वानराजवळ बुद्धि किंवा शक्ति मोठीशी नसते; तथापि प्रभुप्रतापेंकरून अगदीं एवढेसें सापलूं देखील गरुडास गट्ट करील.

चौ०—मन संतोष सुनत कपिबानी।
भगति-प्रताप-तेज-बल-सानी।
आसिष दीन्हि रामप्रिय जाना।
होहु तात बल–सील–निधाना।
अजर अमर गुननिधि सुत होहू।
करहिँ बहुत रघुनायक छोहू।

भक्ति, पराक्रम, ओज आणि बल यांनीं परिप्लुत अशी हनुमंताची वाणी ऐकून सीता प्रसन्न झाली आणि मारुतीस रामप्रिय जाणून तिनें त्यास वर दिला कीं, हे तात ! बल आणि शील यांचें तूं निधान होऊन जरारहित अमर आणि गुणानिधि होशील. पुत्रा ! तुझ्यावर रघुनायक अत्यंतच प्रेम करितील.

करहिँ कृपा प्रभु अस सुनि काना।
निर्भर प्रेममगन हनुमाना।
बार बार नायेसि पद सीसा।
बोला बचन जोरि कर कीसा।

'प्रभु कृपा करितील' हे शब्द कानीं पडतांच हनुमंत निर्भरप्रेमांत निमग्न झाला, आणि वारंवार सीतेच्या चरणीं मस्तक ठेवून हात जोडून तो म्हणालाः—

अब कृतकृत्य भयउँ मैं माता।
आसिष तव अमोघ बिख्याता।
सुनहु मातु मोहि अतिसय भूखा।
लागि देखि सुंदरफल रूखा।
सुनु सुत करहिँ बिपिनरखवारी।
परम सुभट रजनीचर भारी।
तिन्ह कर भय माता मोहि नाहीँ।
जौं तुम्ह सुख मानहु मन माहीँ।

हे माते ! आज माझ्या अंजनीच्या कुसेचे पांग आपण पुरते फेडले. कारण तुझा आशीर्वाद अमोघ असल्या-बद्दल ख्याति आहे. हे माते ! ऐक. हीं सुंदर फळ-झाडें पाहून मला फार भूक लागली आहे. तेव्हां सीता म्हणाली—बाळा ! ऐक. मोठमोठे राक्षसवीर या वनाची राखण करीत आहेत. हें ऐकून मारुति म्हणाला माते ! तुला जर मनापासून आवडत असेल तर त्यांच्यापासून मला कांहींच भीति नाहीं.

**दो०–देखि बुद्धि-बल-निपुन कपि कहेउ जानकी जाहु। रघु-पति-चरन हृदय धरि तात मधुरफल खाहु॥ १६॥**

मारुति बुद्धिबलनिपुण आहे असें जाणून सीतेनें आज्ञा दिली कीं, बाळा! हृदयांत रघुपतिचरणांचें ध्यान करून जा आणि मधुर फळें खा.

चौ०–चलेउ नाइ सिरु पैठेउ बागा।
फल खायेसि तरु तोरइ लागा।
रहे तहाँ बहु भट रखवारे।
कछु मारेसि कछु जाइ पुकारे।

सीतेला वंदन करून मारुति निघाला तों बागेंत शिरला. तेथें त्यानें फळें खाऊन झाडें मोडण्याचा सपाटा चालविला. राखणीस असलेल्या अनेक योद्ध्यांपैकीं कांहींना त्यानें पुरतेंच कुचलून टाकलें, पण बाकीचे मात्र रावणाकडे बोंबलत गेले व ह्मणाले—

नाथ एक आवा कपि भारी।
तेहि असोकबाटिका उजारी।
खायेसि फल अरु बिटप उपारे।
रच्छक मर्दि मर्दि महि डारे।
सुनि रावन पठये भट नाना।
तिन्हहि देखि गर्जेउ हनुमाना।
सब रजनीचर कपि संघारे।
गये पुकारत कछु अधमारे।

महाराज! एक प्रचंड वानर आला असून त्यानें अशोकवाटिका उध्वस्त केली आहे. त्यानें फळें खाऊन झाडें उपटून टाकलीं, आणि रक्षकवीरांना मारून चेंचून पृथ्वीवर फेंकून दिलें. तें ऐकून रावणानें अनेक वीर पाठविले. त्यांना पहातांच मारुतीनें गर्जना केली, व त्या सर्वांचा संहार केला. त्यांपैकीं जे अर्धमेले होते ते परत बोंबा मारीत पळाले.

पुनि पठयेउ तेहि अछयकुमारा।
चला संग लेइ सुभट अपारा।
आवत देखि बिटप गहि तर्जा।
ताहि निपाति महाधुनि गर्जा।

रावणानें पुन्हां आपला पुत्र अक्ष पाठविला व तो अनेक उत्तम वीर मदतीला घेऊन निघाला. तो येत आहे असें पाहतांच मारुति एक वृक्ष घेऊन त्याचेवर घसरला व त्यास ठार करून त्यानें घोर गर्जना केली.

**दो०–कछु मारेसि कछु मर्देसि कछु मिलयेसि धरि धूरि। कछु पुनि जाइ पुकारे प्रभु मर्कट बलभूरि॥ १७॥**

त्यानें कांहीं राक्षसांना मारिलें, कांहींना चांगल्याच बिजनबस्त्या दिल्या आणि कांहींना चुसमटून धुळीला मिळविलें. कांहीं रावणाजवळ शंख करीत गेले कीं, हे प्रभो! हें माकड ताकतींत कांहीं औरच आहे.

चौ०–सुनि सुतबध लंकेस रिसाना।
पठयेसि मेघनाद बलवाना।
मारेसि जनि सुत बाँधेसु ताही।
देखिय कपिहि कहाँ कर आही।

अक्षाचा वध झालेला ऐकून रावणास क्रोध आला व त्यानें महाबलाढ्य अशा मेघनादाला पाठविलें, व त्याला सांगितलें कीं हे पुत्रा! त्या कपीस मारूं नको; बांधूनच घेऊन ये. तो कोठून आला आहे हें पाहूं तर खरें.

चला इंद्रजित अ-तुलित-जोधा।
बंधुनिधन सुनि उपजा क्रोधा।
कपि देखा दारुन भट आवा।
कटकटाइ गर्जा अरु धावा।

अतुलित योद्धा इंद्रजित बंधुमरण ऐकून खूपच चिडला होता; मारुतीनें पाहिलें कीं, हा येत असलेला जवान जरा कर्ता दिसतो. म्हणून तो दांत खाऊन आणि गर्जना करून त्याच्यावर घसरला.

अतिबिसाल तरु एक उपारा।
बिरथ कीन्ह लंकेसकुमारा।
रहे महाभट ता के संगा।
गहि गहि कपि मर्दइ निजअंगा।
तिन्हहि निपाति ताहि सन बाजा।
भिरे जुगल मानहुँ गजराजा।

त्यानें एक अत्यंत विशाल वृक्ष उपटून त्याच्या आघातानें मेघनादाला विरथ केलें. त्याच्याबरोबर जे महावीर होते, त्यांना धरधरून मारुतीनें आपल्या अंगानें रगडून टाकलें. त्यांचा निःपात केल्यावर तो मेघनादाशीं जाऊन भिडला. तेव्हां जणुंकाय दोन गजराजच झुंजत आहेत असें दिसूं लागलें.

मुठिका मारि चढा तरु जाई।
ताहि एक छन मुरुछा आई।
उठि बहोरि कीन्हेसि बहु माया।
जीति न जाय प्रभंजनजाया।

मारुतीनें मेघनादास एक मुष्टिप्रहार केला त्यामुळें त्यास क्षणमात्र मूर्च्छा आली. इतक्यांत मारुति झाडावर चढून बसला. नंतर फिरून मेघनाद उठला व त्यानें अनेक प्रकारें आपली ओडंबरी चालविली. परंतु वायुपुत्र दादच देईना.

दो०—ब्रह्म अस्त्र तेहि साधा कपि मन कीन्ह बिचार। जौं न ब्रह्मसर मानउँ महिमा मिटइ अपार ॥ १८ ॥

तेव्हां मेघनादानें ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. मारुतीनें मनांत विचार केला कीं, जर आपण ब्रह्मास्त्राची इज्जत राखली नाहीं तर त्याच्या अपार महत्त्वास बट्टा लागेल.

चौ०—ब्रह्मबान कपि कहँ तेहि मारा।
परतिहुँ बार कटकु संघारा।
तेहि देखा कपि मुरुछित भयऊ।
नागपास बाँधेसि लेइ गयऊ।

मेघनादानें मारुतीवर ब्रह्मास्त्राचा प्रयोग करून बाण सोडला. त्याबरोबर मारुतीनें पडतांपडतांच त्याच्या सैन्याचा संहार केला. कपि गष खाऊन पडलेला पाहून मेघनाद त्याला नागपाशानें कडसून घेऊन चालूं लागला.

जासु नाम जपि सुनहु भवानी।
भवबंधन काटहिं नर ज्ञानी।
तासु दूत कि बँध तर आवा।
प्रभुकारज लगि कपिहि बँधावा।

( शंकर म्हणतात—) हे भवानि! ज्याच्या नामजपेंकरून ज्ञानी नर भवबंधनें तोडून टाकितात त्याचा दूत बांधला जाणें शक्य आहे काय? परंतु प्रभूंच्या कार्यास्तव त्यानेंच आपणास बांधून घेतलें ( हें त्यांतलें खरें इंगित. )

कपिबंधन सुनि निसिचर धाये।
कौतुक लागि सभा सब आये।
दस-मुख-सभा दीखि कपि जाई।
कहि न जाइ कछु अतिप्रभुताई।

कपीला बांधून आणलें असें ऐकतांच राक्षस धांवले व तो तमाशा पाहण्यास सर्वजण रावणाच्या सभेंत आले. मारुतीनें जाऊन रावणाची सभा पाहिली. रावणाचें तें विशाल वैभव कांहीं अवर्णनीयच होतें.

कर जोरें सुर दिसिप बिनीता।
भृकुटि बिलोकत सकल सभीता।
देखि प्रताप न कपिमन संका।
जिमि अहिगन महँ गरुड असंका।

सर्व देवांसह दिक्पाल भयानें हात जोडून नम्रपणें रावणाच्या भ्रुकुटीकडे सारखे पाहात होते. त्याचा तो रुबाब व दरारा पाहूनहि गरुड जसा सर्पसमुदायांत निश्चितपणें वावरतो तद्वत् रावणसभेंत मारुति मुळींदेखील डगमगला नाहीं.

दो०—कपिहि बिलोकि दसानन बिहँसा कहि दुर्बाद। सुत-बध-सुरति कीन्ह पुनि उपजा हृदय बिषाद ॥ १९ ॥

रावण हनुमंतास पाहून हंसला आणि कुत्सा करूं लागला. इतक्यांत त्यास पुत्रवधाची आठवण होऊन त्याच्या हृदयांत विषादाची भर पडली.

चौ०—कह लंकेस कवन तैं कीसा।
केहि के बल घालेहि बन खीसा।
की धौं स्रवन सुने नहिं मोही।
देखउँ अतिअसंक सठ तोही।
मारे निसिचर केहि अपराधा।
कहु सठ तोहि न प्रान कै बाधा।

रावण म्हणाला, हे कपे! तूं कोण आहेस? कोणाच्या बळावर ही बाग तूं उध्वस्त केलीस? तूं कधीं मला कानानें ऐकलेंहि नाहींस काय? तूं अत्यंत उर्मट आणि पक्काच इब्लिस दिसतोस. कोणत्या अपराधास्तव तूं राक्षसांना मारलेंस रे. नादाना! सांग तर, तूं तुझ्या प्राणांवर इतका उदार कां?

सुनु रावन ब्रह्मांडनिकाया।
पाइ जासु बल बिरचति माया।
जा के बल बिरंचि हरि ईसा।
पालत सृजत हरत दससीसा।
जा बल सीस धरत सहसानन।
अंडकोस समेत गिरि कानन।
धरे जो बिबिध देह सुरत्राता।
तुम्ह से सठन्ह सिखावनदाता।
हरकोदंड कठिन जेहि भंजा।
तेहि समेत नृप-दल-मद गंजा।
खर दूषन त्रिसिरा अरु बाली।
बधे सकल अ-तुलित-बल-साली।

( मारुति म्हणाला ) " रावणा ! ऐक. ज्याच्या बळावर मायेची कोटिशः ब्रह्मांडांची घडामोड चालू असते, हे दशकंधरा ! ज्याच्या बळेंकरून ब्रह्मा, विष्णु व महेश सृष्टीचा उत्पत्तिस्थितिलय करितात, ज्याच्या प्रतापेंकरून गिरिकाननासह ब्रह्मांडाला सहस्रमुख शेष आपल्या मस्तकीं धारण करितो, जो सुरत्राता नानाविध देह धारण करून, तुमच्यासारख्या छचोर छिनालांना रस्त्यास लावतो, कठिण भवचापाचा भंग करून जो तुझ्यासकट सर्व नृप-समूहाची रग जिरवितो व खर, दूषण, त्रिशिर आणि वाली, ह्या सर्व बिलंदर जोरकसांची देखील घडी घालतो.

**दो०–जा के बललवलेस तें जितेहु चराचर झारि। तासु दूत मैं जा कारि हरि आनेहु प्रियनारि ॥ २० ॥**

ज्याच्या बलाच्या लवलेशानें तूं झाडून सारें विश्व जेर करून सोडलेंस आणि ज्याच्या प्रियपत्नीला तूं हातपाटिलकी करून आणलीस त्याचा मी एक ताबेदार आहे !

चौ०–जानउँ मैं तुम्हारि प्रभुताई।
सहसबाहु सन परी लराई।
समर बालि सन करि जस पावा।
सुनि कपिबचन बिहँसि बहरावा।

मी तुझा पराक्रम ओळखून आहे. सहस्रार्जुनाशीं झुंजलास नि वालीशीं भिडलास तरी फत्ते तुझीच झाली. " हें मारुतीचें भाषण ऐकून रावणानें तें हंशावारी उडवून नेलें.

खायेउँ फल प्रभु लागी भूखा।
कपिसुभाव तें तोरेउँ रूखा।
सब के देह परमप्रिय स्वामी।
मारहिं मोहि कु–मारग–गामी।
जिन्ह मोहि मारा ते मैं मारे।
तेहि पर बाँधेउ तनय तुम्हारे।

( मारुति पुन्हां म्हणाला ) " महाराज ! भुकेनें कळंजलों म्हणून मीं फळें खाल्लीं. झाडांची मोडतोड हा तर कपींचा स्वभावच आहे. अरे राक्षसराजा ! सर्वांनाच आपापला देह अत्यंत प्रिय असतो. तुझे बदचालच मजवर प्रथम तुटून पडले. अर्थातच तुटून पडणारांना मला तोडावेंच लागलें. त्यानंतर तुझ्या या बाळानें माझ्या मुसक्या वळल्या.

मोहि न कछु बाँधे कइ लाजा।
कीन्ह चहउँ निजप्रभु कर काजा।
बिनती करउँ जोरि कर रावन।
सुनहु मान तजि मोर सिखावन।

असो. माझ्या मुसक्या बांधल्याबाबद गैरत म्हणून मला मुळींच वाटत नाहीं, कारण मला माझ्या सरकारच्या सेवेवर अमादा असलेंच पाहिजे. रावणा ! माझी तुला हात जोडून विनंति एकच कीं सारी मग्रूरी सोडून तूं माझीच सल्ला ऐक.

देखहु तुम्ह निजकुलहि बिचारी।
भ्रम तजि भजहु भगत–भय–हारी।
जा के डर अति काल डेराई।
जो सुर असुर चराचर खाई।
ता सों बैरु कबहुँ नहिं कीजै।
मोरे कहे जानकी दीजै।

तूं आपल्या कुलाचाहि विचार करून पहा आणि छाटबाजीस पुरता आळा घालून भक्तभयभंजन प्रभूचें भजन कर. ज्याच्या भीतीनें काळदेखील सारखा थरारतो व सुरासुरप्रभृति चराचर विश्वालाहि जो भक्षण करितो त्याच्याशीं कधींहि शत्रुत्व करूं नकोस. माझ्या सांगण्यावरून जानकीला देऊन टाक.

**दो०–प्रनतपाल रघुनायक करुनासिंधु खरारि। गये सरन प्रभु राखिहहिं तव अपराध बिसारि ॥ २१ ॥**

प्रणतपालक, करुणासागर, खररिपु, रघुनायक अशा प्रभूला तूं शरण गेल्यास तुझे सर्व कसूर पोटांत घालून ते तुझें रक्षणच करितील.

चौ०–राम–चरन–पंकज उर धरहू।
लंका अ-चल–राज तुम्ह करहू।
रिषि-पुलस्ति-जस बिमलमयंका।
तेहि ससि महँ जानि होहु कलंका।
राम नाम बिनु गिरा न सोहा।
देखु बिचारि त्यागि मद मोहा।
बसनहीन नहिं सोह सुरारी।
सब–भूषन–भूषित बरनारी।

रामचरणकमलांना हृदयांत बाळगून तूं लंकेचें निर्वेध राज्य भोग. पुलस्त्य ऋषींच्या यशोरूप निर्मल चंद्राला तूं कलंकरूप होऊं नकोस. या गोष्टींचा सर्व गुर्मीसुर्मी सोडून जरा विचार कर. रामनामावांचून

वाणीला शोभाच नाहीं, रे रावणा ! स्त्री सुंदर आणि सर्वालंकारांनीं मढविली असली तरी ती विवस्त्रा झाल्यावर मुळींच शोभत नाहीं.

रामबिमुख संपति प्रभुताई ।
जाइ रही पाई बिनु पाई ।
सजल मूल जिन्ह सरितन्ह नाहीं ।
बरषि गये पुनि तबहिं सुखाहीं ।

रामविन्मुख असणाऱ्याची दौलत आणि दिमाख असून नसून, मिळून न मिळून सारखीच समज. ज्या नद्यांना जीवंत झरे नाहींत त्या बरसात संपली कीं पुन्हां पूर्ववत् ठणठणीतच होणार.

सुनु दसकंठ कहउँ पन रोपी ।
बिमुखराम त्राता नहिं कोपी ।
संकर सहस बिष्णु अज तोही ।
सकहिं न राखि राम कर द्रोही ।

रावणा ! रामाशीं षडाष्टक उखविणाराचा कोणीहि दोस्त होऊं शकत नाहीं. तूं रामाचा दुष्मन, तुला पाठीशीं घालण्याची ताकद विधिहरिहरांना देखील नाहीं, रे बाबा !

**दो०–मोहमूल बहु सूल प्रद त्यागहु तम अभिमान । भजहु राम रघुनायक कृपासिंधु भगवान ॥ २२ ॥**

सर्व आपत्तींची खरी जड म्हणजे बेअकली. म्हणून म्हणतों कीं ही अकड आणि हा बेछूटपणा सोडून दे आणि त्या दिलदर्या व भगवान् रामचंद्राची कास धर.

चौ०–जदपि कही कपि अतिहित बानी ।
भगति–बिबेक–बिरति–नय–सानी ।
बोला बिहँसि महाअभिमानी ।
मिला हमाहिं कपि गुरु बड ज्ञानी ।
मृत्यु निकट आई खल तोही ।
लागेसि अधम सिखावन मोही ।

हनुमंतानें जरी अत्यंत हिताचा व नीतिभक्तिज्ञानवैराग्यपरिप्लुत असा उपदेश केला तरीहि अत्यंत चढेल रावण हंसून म्हणाला, " तूं माकड मला एक अजस्र विद्वान् गुरूच भेटला आहेस रे ! अरे बदखोरा, तुझें मरण येऊन ठेपलें आहे, म्हणूनच, हा उल्लूपणा तूं शिकवीत आहेस. "

उलटा होइहि कह हनुमाना ।
मतिभ्रम तोरि प्रगट मैं जाना ।

सुनि कपिबचन बहुत खिसिआना ।
बेगि न हरहु मूढ कर प्राना ।

यावर मारुति म्हणाला, " हें मात्र उलट होणार. ( मरण तर खरोखरीच ओढवलें आहे; परंतु तें माझें नसून तुझेंच. ) कारण तुझी नाठी बुद्धि मला उघडच दिसत आहे. " कपींचें हें भाषण ऐकून रावण खूपच ताव खाऊन म्हणाला " या उल्लूची कुच्ची कोणी तरी झटकन् कां भरीत नाहीं रे ? "

सुनत निसाचर मारन धाये ।
सचिवन्ह सहित बिभीषन आये ।
नाइ सीस करि बिनय बहूता ।
नीतिबिरोध न मारिय दूता ।
आन दंड कछु करिय गोसाईं ।
सबही कहा मंत्र भल भाई ।

तें ऐकतांच राक्षस मारुतीला मारण्यास धांवले. तेव्हां सचिवांसहवर्तमान बिभीषण जवळ येऊन व मस्तक नमवून रावणास अनेक प्रकारें विनंति करूं लागला कीं, " अशानें नीतीशीं विरोध येतो; अतएव ह्या दूतास मारूं नये. हे स्वामिन् ! त्याला इतर कोणतीहि सजा करावी. " नंतर सर्वजण म्हणाले, " भय्यासाहेब, आपलाच सल्ला योग्य. "

सुनत बिहँसि बोला दसकंधर ।
अंगभंग करि पठइय बंदर ।

तें ऐकतांच रावण हास्य करून म्हणाला, ह्या माकडाला कांहीं तरी अंगतोड करून हाकलून लावा.

**दो०–कपि कै ममता पूँछि पर सबहिं कहेउ समुझाइ । तेल बोरि पट बाँधि पुनि पावक देहु लगाइ ॥ २३ ॥**

रावणानें सर्वांस सांगितलें कीं, " माकडाचें आपल्या शेपटीवर फार प्रेम असतें, म्हणून शेपटीलाच तेलांत बुचकळलेल्या चिंध्या गुंडाळा आणि मग ती पेटवून द्या. "

चौ०–पूँछहीन बानर तहँ जाइहि ।
तब सठ निजनाथहिं लेइ आइहि ।
जिन्ह कै कीन्हेसि बहुत बडाई ।
देखउँ मैं तिन्ह कै प्रभुताई ।
बचन सुनत कपि मन मुसुकाना ।
भइ सहाय सारद मैं जाना ।

हा बावळा पुच्छविहीन माकड परत जाईल व मग आपल्या प्रभूलाहि घेऊन येईल. ज्याची ह्यानें

एवढी बेताल तारीफ केली त्याचा आवाका तरी मला पाहावयाला सांपडेल." हें वचन ऐकतांच मारुति मनांत हास्य करून म्हणाला, रावणाची कड सरस्वतीनेंच ओढली म्हणावयाची !

जातुधान सुनि रावनबचना।
लागे रचइ मूढ सोइ रचना।
रहा न नगर बसन घृत तेला।
बाढी पूँछि कीन्ह कपि खेला।
कौतुक कहँ आये पुरबासी।
मारहिँ चरन करहिँ बहु हाँसी।
बाजहिँ ढोल देहिँ सब तारी।
नगर फेरि पुनि पूँछि प्रजारी।

रावणाची आज्ञा ऐकतांच ते भुक्कड राक्षस त्यानें सांगितल्याप्रमाणें व्यवस्थेस लागले. तेव्हां मारुतीची शेपटी इतकी लांबली कीं, सर्व लंकानगरींतील चिंध्या, तूप आणि तेल संपून खलास झालें. हनुमंतानें हा एक खेळच आरंभला. पुरवासीजन तो तमाशा पाहण्यासाठीं गोळा झाले आणि त्यांनीं मारुतीवर पादपूजेचा यथास्थित तोबा चालवून ते खदखद हंसूं लागले. त्यांनीं तेथें ढोल वाजविले व सर्व मंडळींनीं टाळ्या पिटून त्याची साऱ्या शहरांतून मारबदे[1] खेदली आणि मग त्याची शेपटी पेटवून दिली.

पावक जरत देखि हनुमंता।
भयउ परम लघुरूप तुरंता।
निबुकि चढेउ कपि कनकअटारी।
भईँ सभीत निसाचर-नारी।

मारुतीनें शेपटीचा चांगलाच बंबाळ झालेला पाहून लगेच तो बेसुमार लहानाळला, आणि पटकन् उडी मारून तो एका सोनेरी घराच्या माडीवर चढला. तेव्हां मात्र तेथील सर्व राक्षसस्त्रिया भेदरून गेल्या.

**दो०—हरिप्रेरित तेहि अवसर चले मरुत उनचास। अट्टहास करि गर्जा कपि बढि लाग अकास॥ २४॥**

तेव्हां भगवंताच्या प्रेरणेनुसार अनेक प्रकारें झंझावात वाहूं लागला. मारुतीनें उत्कट हास्य करून गर्जना केली व तो वाढतां वाढतां आकाशाला जाऊन भिडला.

चौ०—देह बिसाल परम हरुआई।
मंदिर तेँ मंदिर चढ धाई।
जरइ नगर भा लोग बिहाला।
झपट लपट बहुकोटि कराला।
तात मातु हा सुनिय पुकारा।
एहि अवसर को हमहिँ उवारा।

मारुतीनें आपला देह विशाल केला, आणि अत्यंत फुरताईनें घरावरून घरावर तो उडया घेत सुटला. सर्व शहरामध्यें आगीचा एकच डोंब पेटला आणि लोकांना मुष्किल मैदान वाटून अनेक प्रकारें त्यांची धांदल उडाली. "हाय बाप! अग आई!!" आतां आम्हांला ह्या आगींतून कोण वांचवील ?" अशी एकच बोंब ऐकूं येऊं लागली.

हम जो कहा यह कपि नहिँ होई।
बानररूप धरे सुर कोई।
साधुअवज्ञा कर फल ऐसा।
जरइ नगर अनाथ कर जैसा।

ते लोक म्हणत कीं, "तरी आम्ही सांगत होतोंच कीं हा कपि नसून कपीच्या रूपानें कोणी तरी देव आलेला आहे. साधुसंतांशीं केलेला खुटी उपाड्पणा हा असाच फळणार. प्रत्यक्षच पहा कीं, ही आपली लंका कशी एखाद्या बेवारीस शहराप्रमाणें खाक होत आहे !

जारा नगरु निमिष एक माहीँ।
एक बिभीषन कर गृह नाहीँ।
ता कर दूत अनल जेहिँ सिरिजा।
जरा न सो तेहि कारन गिरिजा।

एकट्या बिभीषणाचें घर खेरीजकरून मारुतीनें सर्व लंकानगरी एका निमिषांत जाळून फस्त केली. पार्वति ! ज्यानें ती आग भडकाविली त्याचाच मारुति हा दूत. म्हणूनच मारुति जळूं शकला नाहीं.

---

[1] 'मारबद' हा सण पोळ्याच्या पाडव्यास पडतो. वऱ्हाड व महाराष्ट्रीय मध्यप्रांत तो बहुतेक पाळतो. कांहीं उपष्टीव कारणामुळें या दहा वर्षांत नागपुरांत मारबदीस अवास्तव ऊत आला असला, तरीपण तो सण अथांग जुना आहे हें खास.

मारबद कागदाचा पुतळा असतो. खेदा संपतांच तो जाळला जातो.

'मारबद शब्द' 'बद मार' म्हणजे निर्घृण मार किंवा 'मारबदड' या अर्थाचा दिसतो. हनुमंतावर गुदरविलेला वरील प्रसंग त्यांतलाच होता हें निर्विवाद.

उलटि पलटि लंका सब जारी ।
कूदि परा पुनि सिंधु मँझारी ।

मारुतीनें सर्व लंकानगरी वेडीवांकडी जाळून तिचा नक्षाच उतरविला. नंतर त्यानें समुद्रांत जाऊन उडी घेतली.

दो०—पूँछि बुझाइ खोइ स्रम धरि लघुरूप बहोरि । जनकसुता के आगे ठाढ भयउ कर जोरि ॥ २५ ॥

मारुतीनें आपलें शेपूट विझवून आणि आपला शीण घालवून पुन्हां अगदीं खुजा बनला व तो सीतेच्या समोर हात जोडून उभा राहिला.

चौ०—मातु मोहि दीजे कछु चीन्हा ।
जैसे रघुनायक मोहि दीन्हा ।
चूडामनि उतारि तब दयऊ ।
हरषसमेत पवनसुत लयऊ ।

हे माते ! जशी रामानें मजजवळ खूण दिली होती तशी तूंहि कांहीं तरी दे. तेव्हां सीतेनें चूडामणि काढून दिला व तो मारुतीनें आनंदानें घेतला.

कहेउ तात अस मोर प्रनामा ।
सब प्रकार प्रभु पूरनकामा ।
दीन-दयालु—बिरुद संभारी ।
हरहु नाथ मम संकट भारी ।

( सीता म्हणाली, ) बाळा मारुते ! प्रभूंना प्रणामपूर्वक माझा असा निरोप सांग कीं, " आपण सर्वतोपरी पूर्णकाम आहां, तरीहि पण दीनदयालुत्वाचें आपलें ब्रीद आपण सांभाळण्याचें आणि या कंटाळवाण्या घोर विपत्तींतून मला मुक्त करण्याचें हे नाथ ! आपण मनावर घ्याच.

तात सक्र—सुत—कथा सुनायहु ।
बानप्रताप प्रभुहिँ समुझायहु ।
मास दिवस महुँ नाथ न आवा ।
तौ पुनि मोहि जियत नहिँ पावा ।

हे मारुते ! जयंताच्या कथेची त्यांस आठवण देऊन प्रभूंच्या बाणप्रतापाची त्यांस ओळख दे आणि असेंहि सांग कीं, जर एक महिन्याच्या मुदतींत प्रभु आले नाहींत तर सीता त्यांना जीवंत आढळणार नाहीं.

कहु कपि केहिबिधि राखउँ प्राना ।
तुम्हहूँ तात कहत अब जाना ।
तोहि देखि सीतल भइ छाती ।
पुनि मो कहुँ सोइ दिनु सोइ राती ।

माझ्या चिमण्या ! तूंच सांग बरें, मी कोणत्या रीतीनें आतां आपले प्राण जगवावे ? तूंदेखील आतां जाऊं म्हणतोस ! तुला पाहून मला मोठाच दिवसा वाटत होता रे ! आतां तूं गेलास म्हणजे मात्र मला पुन्हां तोच दिवस आणि तीच रात्र ! ( दिवसरात्र सारखेच )

दो०—जनकसुतहिँ समुझाइ करि बहुविध धीरजु दीन्ह । चरनकमल सिरु नाइ कपि गवँनु राम पहिँ कीन्ह ॥ २६ ॥

सीतेचें सांत्वन करून आणि अनेक प्रकारें तिला धीर देऊन मारुतीनें तिच्या चरणकमलांवर आपलें मस्तक ठेविलें व तो रामाकडे जाण्यास निघाला.

चौ०—चलत महाधुनि गर्जेसि भारी ।
गर्भ स्रवहिँ सुनि निसि-चर-नारी ।
नाँघि सिंधु एहि पारहिँ आवा ।
सबद किलाकिला कपिन्ह सुनावा ।

मारुतीनें जातांना अत्यंत घोर अशी गर्जना केली ती ऐकतांच राक्षसस्त्रियांचे गर्भपात झाले. नंतर मारुति समुद्र ओलांडून पार गेला. तेव्हां त्याचा ' किलकिल ' शब्द कपींनीं ऐकला.

हरषे सब बिलोकि हनुमाना ।
नूतन जनम कपिन्ह तब जाना ।
मुख प्रसन्न तन तेज बिराजा ।
कीन्हेसि रामचंद्र कर काजा ।

मारुतीस पाहून सर्व कपींना आनंद होऊन त्यांना पुनर्जन्म झाल्यासारखें वाटलें. मारुतीची चर्या गुल[illegible]जार आणि तेजस्वी पाहून त्यानें रामकार्य केल्या[illegible] सर्वांस निश्चित वाटलें.

मिले सकल अति भये सुखारी ।
तलफत मीन पाव जनु बारी ।
चले हरषि रघुनायक पासा ।
पूछत कहत नवल इतिहासा ।

पाण्यावांचून तळमळणाऱ्या माशास पाणी मि[illegible]तांच जसें सुख होतें तद्वत् अत्यंत हर्षित होऊन [illegible] कपि मारुतीला भेटले. नंतर सर्वजण रघुनायका[illegible] जाण्यास निघाले. वाटेनें कपींनीं विचारल्याव[illegible]

मारुति त्यांना घडलेल्या आश्चर्यकारक हकीकती सांगत होता.

तब मधुबन भीतर सब आये।
अंगदसंमत मधुफल खाये।
रखवारे जब बरजन लागे।
मुष्टिप्रहार हनत सब भागे।

नंतर सर्वजण मधुवनांत शिरले; आणि अंगदाच्या हुकुमानें सर्व कपिमंडळी तेथील मधुर फळांवर ताव मारूं लागली. त्या वनाचे रक्षक त्यांना मनाई करूं लागले असतां कपींनीं त्यांना मुष्टिमोदक चाखविले. अर्थातच सर्व रक्षकांना पोबारा करावा लागला.

दो०—जाइ पुकारे ते सब बन उजार जुबराज। सुनि सुग्रीवँ हरष कपि करि आये प्रभुकाज॥ २७॥

त्या रक्षकांनीं जाऊन सुग्रीवाजवळ हाकाटी केली कीं, युवराज अंगदानें वनांतील सर्व फळें साफ बुर्द केली. तें ऐकतांच कपींनीं प्रभुकार्य पार पाडलें असें जाणून सुग्रीव बालंबाल खुष झाला.

चौ०—जौँ न होति सीतासुधि पाई।
मधुबन के फल सकहिँ कि खाई।
एहि बिधि मन बिचार कर राजा।
आइ गये कपि सहितसमाजा।
आइ सबन्हि नावा पद सीसा।
मिले सबन्हि अतिप्रेम कपीसा।

कारण, जर सीतेचा शोध कपींना लागला नसता तर काय बिशाद कीं मधुवनांतलीं फळें त्यांच्या हातीं पडतीं? अशा प्रकारें सुग्रीव आपल्या मनांत विचार करीत आहे तोंच कपिसमाज येऊन धडकला. त्यांनीं आल्याबरोबर सुग्रीवाचे चरणीं वंदन केलें. सुग्रीवहि सर्वांस अत्यंत प्रेमानें भेटला.

पूछी कुसल कुसलपद देखी।
रामकृपा भा काजु बिसेखी।
नाथ काजु कीन्हेउ हनुमाना।
राखे सकल कपिन्ह् के प्राना।
सुनि सुग्रीवँ बहुरि तेहि मिलेऊ।
कपिन्हसहित रघुपति पहँ चलेऊ।

सुग्रीवानें कपींना कुशल विचारलें तेव्हां ते म्हणाले, आपले कुशल पाय दिसल्यानें आम्ही सर्व कुशल झालों. विशेष हें कीं, रामकृपेनें कार्य झालें. हे नाथ! मारुतीनें कार्य करून सर्व कपींचे प्राण वांचविले." तें ऐकतांच सुग्रीव पुन्हां मारुतीस भेटला, व सर्व कपींना बरोबर घेऊन रघुपतीकडे निघाला.

राम कपिन्ह् जब आवत देखा।
किये काजु मन हरष बिसेखा।
फटिकसिला बैठे दोउ भाई।
परे सकल कपि चरनन्हि जाई।

कपी कृतकार्य होऊन येत आहेत असें जेव्हां रामांनीं पाहिलें तेव्हां त्यांच्या मनाला फार हर्ष झाला. ते दोघे बंधू स्फटिकशिलेवर बसले होते. सर्व कपींनीं येऊन त्यांच्या चरणांवर लोटांगण घातलें.

दो०—प्रीतिसहित सब भेँटे रघुपति करुनापुंज। पूछी कुसल नाथ अब कुसल देखि पदकंज॥ २८॥

करुणानिधान रघुपति सर्वांना सप्रेम भेटून कुशल विचारूं लागले. तेव्हां सर्व म्हणाले, हे प्रभो! आपले चरणकमल पाहून आम्ही आतां कुशल झालों.

चौ०—जामवंत कह सुनु रघुराया।
जापर नाथ करहु तुम्ह दाया।
ताहि सदा सुभ कुसल निरंतर।
सुर नर मुनि प्रसन्न ता ऊपर।
सोइ बिजई बिनई गुनसागर।
तासु सुजसु त्रयलोक उजागर।

जांबवत म्हणाला, हे रघुराया! ऐका. ज्याचेवर आपण प्रभु कृपा कराल त्यास सदैव व सर्वत्र सर्व शुभच असणार. त्याचेवर देव, नर आणि मुनी प्रसन्नच रहाणार. तोच विजयी, विनयी आणि गुणसागर होऊन त्याचेंच उज्ज्वल यश त्रैलोक्यांत दुमदुमत रहाणार.

प्रभु की कृपा भयेउ सबु काजू।
जनम हमार सुफल भा आजू।
नाथ पवनसुत कीन्हि जो करनी।
सहसहुँ मुख न जाइ सो बरनी।
पवनतनय के चरित सुहाये।
जामवंत रघुपतिहि सुनाये।

प्रभूंच्या कृपेनें सर्व कार्य सिद्ध होऊन आमच्या जन्माचें आज साफल्य झालें. हे नाथ! हनुमंतानें जी करणी केली तिचें वर्णन शेषाच्यानेंहि होणार नाहीं! नंतर जांबवंतानें रामचंद्रास मारुतीचें अचाट कार्य सांगितलें.

सुनत कृपानिधि मन अति भाये ।
पुनि हनुमान हरषि हिय लाये ।
कहहु तात केहि भाँति जानकी ।
रहति करति रच्छा स्वप्रान की ।

तें ऐकून रामास फारच फार खुषी वाटून त्यांनीं मारुतीस फिरून आनंदानें कवटाळलें. ते म्हणाले, "बा मारुते ! जानकी कोणत्या प्रकारें राहते आणि आपल्या प्राणांचें रक्षण करिते तें सांग कीं रे बाळ !"

दो०—नाम पाहरू दिवस निसि ध्यान तुह्मार कपाट । लोचन निज-पद-जंत्रित जाहिँ प्रान केहि बाट ॥ २९ ॥

मारुति म्हणाला—" आपल्या नामाचा ( सीतेच्या मुखावर ) रात्रंदिवस पहारा, आपल्या ध्यानामुळें (हृदयाचेंहि) द्वार बंद, तिचे डोळे देखील आपल्याच चरणीं खिळलेले, आतां तिचे प्राण जाण्याला कोणती वाट फुटणार बरें ?

चौ०—चलत मोहि चूडामनि दीन्ही ।
रघुपति हृदय लाइ सोइ लीन्ही ।
नाथ जुगललोचन भरि बारी ।
बचन कहे कछु जनककुमारी ।

सीतेनें मला इकडे येतांना हा चूडामणि दिला." रघुपतींनीं तो चूडामणि घेऊन उराशीं धरिला. मारुति म्हणाला, हे प्रभो ! अश्रुपूर्ण जानकीनें कांहीं निरोप सांगितला आहे.

अनुजसमेत गहेहु प्रभुचरना ।
दीनबंधु प्रनतारतिहरना ।
मन क्रम बचन चरनअनुरागी ।
केहि अपराध नाथ हौँ त्यागी ।
अवगुन एक मोर मैँ जाना ।
बिछुरत प्रान न कीन्ह पयाना ।

सीता म्हणाली, " मी लक्ष्मणासह आपल्या चरणांना वंदन करितें. हे दीनबंधो ! हे शरणागतदैन्यविमोचना ! मी कायावाचामनेंकरून आपल्या चरणांची दासी आहे. नाथांनीं माझा कोणत्या अपराधास्तव त्याग केला ? आपला वियोग होतांच माझे प्राण निघून गेले नाहींत हा एक माझा मोठाच अपराध आहे हें मी जाणून आहे; परंतु—

नाथ सो नयनन्हि कर अपराधा ।
निसरत प्रान करहिँ हठि बाधा ।
बिरह अगिनि तनु तूल समीरा ।
स्वास जरइ छन माहँ सरीरा ।
नयन स्रवहिँ जल निजहित लागी ।
जरइ न पाव देह बिरहागी ।
सीता कै अति बिपति बिसाला ।
बिनहिँ कहे भलि दीनदयाला ।

हे नाथ ! तो ह्या नेत्रांचा अपराध होय. प्राण जाऊं पाहतात, परंतु हे नेत्र बळेंच त्यांना प्रतिबंध करितात. विरहाग्नीनें (दुःखोष्ण) श्वासरूपी समीराच्या सहाय्यानें देहरूपी कापसराशीला एका क्षणांत दग्ध केलें असतें. परंतु स्वार्थाच्या ( स्वामींच्या पुनदर्शनाच्या ) लोभानें नेत्र जलस्राव करितात. म्हणून विरहाग्नीच्यानें देह दग्ध होत नाहीं." मारुति म्हणाला, हे दीनदयाळ, सीतेची विपत्ति इतकी विशालतेच्या पलीकडे आहे कीं, तिचें वर्णन न करणेंच बरें.

दो०—निमिष निमिष करुनानिधि जाहिँ कलपसम बीति । बेगि चलिय प्रभु आनिय भुजबल खलदल जीति ॥३०॥

हे करुणानिधे, सीतेला एक एक निमिष कल्पाप्रमाणें जात आहे म्हणून आपण लवकर निघावें आणि बाहुबलानें खलसैन्य जिंकून सीतेला घेऊन यावें.

चौ०—सुनि सीता दुख प्रभु सुखअयना ।
भरि आये जल राजिवनयना ।
बचन काय मन मम गति जाही ।
सपनेहुँ बूझिय बिपति कि ताही ।

सुखनिधान प्रभूचे कमलाप्रमाणें असलेले नेत्र सीतेचें दुःख श्रवण करून अश्रूंनीं भरून आले. प्रभु म्हणाले, कायावाचामनेंकरून जे माझ्याच ठिकाणीं अनुरक्त आहेत त्यांना विपत्ति स्वप्नांत तरी ठाऊक असावी काय ?

कह हनुमंत बिपति प्रभु सोई ।
जब तव सुमिरन भजनु न होई ।
केतिक बात प्रभु जातुधान की ।
रिपुहि जीति आनिबी जानकी ।

हनुमंत म्हणाला, हे प्रभो, तीच खरी विपत्ति जेव्हां आपलें स्मरण व भजन घडत नाहीं. प्रभो ! राक्षसांची कथा ती काय? हे नाथ! शत्रूंच्या रक्ताचें आम्हांकडून पाट वाहवूनच जानकीस आणावयास पाहिजे.

सुनु कपि तोहि समान उपकारी।
नहिँ कोउ सुर नर मुनि तनुधारी।
प्रतिउपकार करउँ का तोरा।
सनमुख होइ न सकत मन मोरा।
सुनु सुत तोहि उरिन मैँ नाहीँ।
देखेउँ करि बिचार मन माहीँ।

(राम म्हणाले) " बा रे मारुते! तुझ्यासारखा मजवर उपकार करणारा सुरनरमुनिप्रभृति देहधारी जीवांत कोणीच नाहीं. तुझ्या उपकाराची उतराई होण्याकरितां मीं काय करावें? माझ्या मनाला तुझ्या उपकाराचें आकलनदेखील करतां येत नाहीं. हे वत्सा, ऐक, मीं मनांत घोकून घोकून पाहिलें, परंतु तुझ्या ऋणांतून मला मुक्तताच दिसत नाहीं."

पुनि पुनि कपिहि चितव सुरत्राता।
लोचन नीर पुलक अति गाता।

देवाधिपति श्रीरामचंद्र वारंवार मारुतीकडे पाहत. तेव्हां त्यांच्या शरीरावर अपार रोमांच उभे राहून त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रू वाहूं लागले.

**दो०–सुनि प्रभुबचन बिलोकि मुख गात हरषि हनुमंत। चरन परेउ प्रेमाकुल त्राहि त्राहि भगवंत॥ ३१॥**

प्रभूंचें तें भाषण ऐकल्यावर हर्षानें त्यांच्या देहाकडे आणि मुखाकडे पाहून हनुमंतानें प्रेमाकुलतेनें प्रभुचरणांवर, " हे भगवन्! त्राहि त्राहि " म्हणून लोटांगण घातलें.

चौ०–बार बार प्रभु चहहिँ उठावा।
प्रेममगन तेहि उठब न भावा।
प्रभु–कर–पंकज कपि कै सीसा।
सुमिरि सो दसा मगन गौरीसा।
सावधान मन करि पुनि संकर।
लागे कहन कथा अतिसुंदर।

प्रभु वारंवार त्याला चरणांवरून उठवूं पहात. परंतु प्रेमांत निमग्न झाल्यामुळें त्याच्यानें उठवेना. त्या वेळचा मारुतीच्या मस्तकावर प्रभूंनीं करकमल ठेवल्याचा देखावा आठवून शंकरही प्रेमनिमग्न झाले. परंतु फिरून मन स्थिर करून शंकर पुढील अत्यंत रम्य कथाभाग सांगूं लागले.

१ एवढा मोठा मारुतीचा उपकार रामास वाटण्यास कारण काय? हें कवीचें कूट फार मननीय दिसतें. म्हणूनच या संवादावर कवीनें अखेर आपला छाप मारला आहे.

कपि उठाइ प्रभु हृदय लगावा।
कर गहि परमनिकट बैठावा।
कहु कपि रावनपालित लंका।
केहि बिधि दहेहु दुर्ग अतिबंका।

प्रभूंनीं मारुतीला पायांवरून उचलून उराशीं कवटाळलें, आणि त्याचा हात धरून त्यास अगदीं आपल्याजवळ बसविलें. ते म्हणाले, हे हनुमंता! ती श्रेष्ठ आणि दुर्गम अशी रावणरक्षित लंका तूं कशी जाळलीस तें सांग पाहूं.

प्रभु प्रसन्न जाना हनुमाना।
बोला बचन बि–गत–अभिमाना।
साखामृग कै बडि मनुसाई।
साखा तेँ साखा पर जाई।
नाँघि सिंधु हाटकपुर जारा।
निसि–चर–गन–बधि बिपिन उजारा।
सो सब तब प्रताप रघुराई।
नाथ न कछु मोरी प्रभुताई।

प्रभु प्रसन्न आहेत असें जाणून मारुति निरभिमानपणें म्हणाला, " ह्या फांदीवरून त्या फांदीवर उड्या मारणें इतकाच वानरांचा काय तो मोठा पुरुषार्थ! समुद्र उल्लंघन करून, सोन्याची लंका जाळिली आणि राक्षसांस ठार मारून अशोकवन उध्वस्त केलें, हा सर्व डिंगरपणा केवळ रघुरायाच्या प्रतापाचा. नाथ! ह्यांत माझा कांहींच बडेजाव नाहीं.

**दो०–ता कहुँ प्रभु कछु अगम नहिँ जा पर तुम्ह अनुकूल। तव प्रभाव बडवानलहि जारि सकइ खलु तूल॥३२॥**

प्रभो! आपण ज्याला आपला डिंगर बनवाल त्यास न हाताळण्याजोगा असा मामलाच मुळीं नसणार. आपल्या प्रतापानें यःकश्चित् कापूसदेखील वडवाग्नीची देखील खात्रीनें होळी पेटवील."

चौ०–सुनत बचन प्रभु बहुसुख माना।
मन क्रम बचन दास निजजाना।
मांगु बचन सुत बर अनुकूला।
देउँ आज तुम कहँ सुखमूला।

तें भाषण ऐकून रामाला फार संतोष वाटला. त्यांची खात्री झाली कीं मारुति कायावाचामनानें माझा दास आहे. राम म्हणाले, 'वत्सा! तुझा इच्छित वर तूं मागून घे. प्रतिशित समज कीं तुझा तो सुखमूल वर मी आज पूर्ण करणारच.'

चौ०–नाथ भगति अति-सुख-दायनी।
देहु कृपा करि अनपायनी।
सुनि प्रभु परमसरल कपिबानी।
एवमस्तु तब कहेउ भवानी।

हे नाथ! आतां आपली अमित सुखकारक आणि अनपायिनी अशी भक्ति कृपा करून मला द्यावी. तेव्हां ही मारुतीची अत्यंत सरळ प्रार्थना ऐकून, हे भवानि! प्रभु 'एवमस्तु,' असें म्हणाले.

उमा रामसुभाव जेहि जाना।
ताहि भजनु तजि भाव न आना।
यह संवाद जासु उर आवा।
रघु-पति-चरन-भगति सोइ पावा।
सुनि प्रभुबचन कहहिँ कपिबृंदा।
जय जय जय कृपाल सुखकंदा।

हे पार्वति! रामाचा स्वभाव ज्यांनीं ओळखला त्याला भजनापरतें इतर कांहींच गोड लागत नाहीं. हा संवाद ज्यांच्या अंतःकरणास पटला त्यांची रघुपति-चरणीं भक्ति जडेल.[1] तें रामचंद्राचें वचन ऐकतांच कपिसमाजानें "जय जय कृपालु सुखकंद" असा जयघोष केला!

तब रघुपति कपिपतिहि बोलावा।
कहा चलइ कर करहु बनावा।
अब बिलंबु केहि कारन कीजै।
तुरत कपिन्ह कहुँ आयसु दीजै।

नंतर सुग्रीवास पाचारण करून राम म्हणाले, लवकर प्रस्थान ठेवा. आतां कालहरण काय म्हणून? फौजेस तावडतोब हुकूम सोडा.

कौतुक देखि सुमन बहु बरषी।
नभ तें भवन चले सुर हरषी।

तो रंग पाहून देवांनीं आकाशांतून विपुल पुष्पवृष्टि केली व नंतर ते आनंदानें स्वस्थानीं निघून गेले.

**दो०–कपिपति बेगि बोलाये आये जूथप जूथ। नानाबरन अ-तुल-बल बानर-भालु-बरूथ॥ ३३॥**

सुग्रीवाच्या फरमानावरून वानरांचे नायक आपल्या समुदायासह तांतडीनें दाखल झाले. वानरांच्या आणि ऋक्षांच्या पलटणी नाना वर्णांच्या आणि अतुलित बलाच्या होत्या.

चौ०–प्रभु-पद-पंकज नावहिँ सीसा।
गर्जहिँ भालु महाबल कीसा।
देखी राम सकल कपिसैना।
चितइ कृपा करि राजिवनैना।
राम-कृपा-बल पाइ कपिंदा।
भये पच्छजुत मनहुँ गिरिंदा।

रामपदकमलीं मस्तकें ठेवून महाबलाढ्य वानर आणि ऋक्ष गर्जना करूं लागले. रामानें सर्व कपिसैन्य पाहिलें; नंतर त्या कमलनयनानें त्यांचेकडे कृपाकटाक्ष फेंकले. रामकृपेनें बल प्राप्त झाल्याकारणानें एक एक वानर जणुंकाय सपक्ष पर्वताप्रमाणें झाला.

हरषि राम तब कीन्ह पयाना।
सगुन भये सुंदर सुभ नाना।
जासु सकल मंगलमय कीती।
तासु पयान सगुन यह नीती।
प्रभुपयान जाना बैदेही।
फरकि बामअँग जनु कहि देही।

नंतर रामांनीं आनंदानें प्रयाण केलें. तेव्हां अनेक सुंदर आणि शुभ शकुन होऊं लागले. ज्याची कीर्ति सकलमंगलमय आहे, त्याच्या प्रस्थानसमयीं शुभ-शकुन व्हावेत हें साहाजिकच आहे. तिकडे जानकीनें आपलें वामांग स्फुरण पावल्यावरून प्रभु निघाले असें ताडलें. जणुं त्या स्फुरणानेंच तीस रामांच्या प्रस्थानाची वर्दी दिली.

जोइ जोइ सगुन जानकिहि होई।
असगुन भयउ रावनहि सोई।

सीतेला जों जों शुभ शकुन व्हावयास लागले तों तों रावणाला अशुभ शकुन होऊं लागले.

चला कटकु को बरनइ पारा।
गर्जहिँ बानर भालु अपारा।
नखआयुध गिरि-पादप-धारी।
चले गगन महि इच्छाचारी।
केहरिनाद भालु कपि करहीँ।
डगमगाहिँ दिग्गज चिक्करहीँ।

तें वानरसैन्य दणाणत निघालें. त्याचें वर्णन कोणाच्यानें होणार? असंख्य वानर आणि अस्वलें

---

[1] हा संवाद अगदींच सोपा आणि सरळ आहे. मग कवीनें हा इषारा कां द्यावा? हें गहन विचार करण्यालायक कोडें आहे. मागें म्हटलेला कवीचा छाप तो हाच.

गर्जना करूं लागलीं. नखें हींच त्यांचीं आयुधें असून त्यांनीं पर्वत आणि वृक्ष धारण केले होते. ते आकाशमार्गानें किंवा जमिनीवरून स्वच्छंद चालत असत. कपी आणि भालु सिंहनाद करीत, त्या योगानें दिग्गजांचा थरकांप होऊन ते चीत्कार करूं लागले.

छंद–चिकरहिँ दिग्गज डोल महि गिरि लोल सागर खरभरे । मन हरष दिनकर सोम सुर मुनि नाग किन्नर दुख टरे ॥ कटकटहिँ मर्कट बिकट भट बहु कोटि कोटिन्ह धावहीँ । जय राम प्रबलप्रताप कोसलनाथ गुनगन गावहीँ ॥ ४ ॥

तेव्हां दिग्गजांनीं चीत्कार केला. पृथ्वी डळमळूं लागली, पर्वत हलूं लागले व समुद्र खळवळूं लागला. चंद्र, सूर्य, देव, मुनि, सर्प, किन्नर इत्यादिकांच्या मनाला आपल्या दुःखांचा अंत होत आहे म्हणून हर्ष वाटला. कोट्यवधि प्रचंड मर्कटवीर 'कटकट' शब्द करून उड्डाण करीत, आणि प्रबलप्रताप कोशलेश्वराच्या अमित गुणांचा जयघोष करीत.

सहि सक न भार उदार अहिपति बार बारहिँ मोहई । गहि दसन पुनि पुनि कमठपृष्ठ कठोर सो किमि सोहई ॥ रघु-बीर-रुचिर-पयान-प्रस्थिति जानि परम सुहावनी । जनु कमठखर्पर सर्पराज सो लिखत अबिचल पावनी ॥५॥

शेष एवढा उदार (सहिष्णु) परंतु त्याला देखील कपिसैन्याचा भार सहन होईना. त्याला वारंवार बेहोषी येऊं लागली. म्हणून (मस्तकावर पृथ्वी निश्चल ठेवण्यासाठीं) तो वारंवार कच्छपाचा कठोर पृष्ठभाग आपल्या तीक्ष्ण दांतांनीं धरूं पाही. जणुंकाय तेव्हां तो रघुवीराच्या शुभ्रप्रयाणाचा नकाशा अत्यंत शोभन जाणून कच्छपाच्या शाश्वत आणि पवित्र पृष्ठभागावर नोंदून ठेवीत आहे असेंच म्हणावयाचें.

दो०–एहि बिधि जाइ कृपानिधि उतरे सागरतीर । जहँ तहँ लागे खान फल भालु बिपुल कपिबीर ॥ ३४ ॥

अशा रीतीनें प्रयाण करून कृपानिधि समुद्रतीरीं येऊन उतरले. अनेक ऋक्ष आणि कपिवीरांनीं सर्वत्र फळांवर ताव मारण्यास सुरवात केली.

चौ०–उहाँ निसाचर रहहिँ ससंका ।
जब तेँ जारि गयउ कपि लंका ।
निज निज गृह सब करहिँ बिचारा ।
नहिँ निसि-चर-कुल केर उबारा ।
जासु दूतबल बरनि न जाई ।
तेहि आये पुर कवन भलाई ।

इकडे हनुमान् लंका जाळून गेल्यापासून राक्षस नेहमीं साशंक राहूं लागले. आतां राक्षसकुलाची धडगत नाहीं, ज्याच्या दूताचा एवढा अवर्णनीय पराक्रम तो स्वतः लंकेंत आल्यावर तिची काय दशा होणार ? हाच विचार आपापल्या ठिकाणीं सर्वांसच सुचूं लागला.

दूतिन्ह सन सुनि पुर-जन-बानी ।
मंदोदरी अधिक अकुलानी ।
रहसि जोरि कर पतिपद लागी ।
बोली बचन नीति-रस-पागी ।

दूतींकडून वरीलप्रमाणें पुरजनांचे उद्गार कानीं आल्यावर मंदोदरी मनांत विशेषच चरकली. पतीच्या पायीं पडून ती हात जोडून उभी राहिली आणि नीतिरसानें ओथंबलेलें असें भाषण करूं लागली.

कंत करष हरि सन परिहरहू ।
मोर कहा अतिहित हिय धरहू ।
समुझत जासु दूत कइ करनी ।
स्रवहिँ गर्भ रजनी-चर-घरनी ।
तासु नारि निजसचिव बोलाई ।
पठवहु कंत जौँ चहहु भलाई ।
तव कुल-कमल-बिपिन-दुख-दाई ।
सीता सीत-निसा-सम आई ।
सुनहु नाथ सीता बिनु दीन्हे ।
हित न तुम्हार संभु अज कीन्हे ।

मंदोदरी म्हणाली, "हे प्राणनाथ ! श्रीहरीशीं बखेडा माजविणें सोडून द्या. माझें सांगणें फार हितावह आहे हें ध्यानांत असूं द्या. ज्याच्या दूताची कर्तबगारी ऐकतांच राक्षसींचे गर्भपात होतात त्याच्या स्त्रीला, हे नाथ ! आपल्याला जर भलेपणाची चाड असेल तर सचिवांना बोलावून त्यांचेबरोबर पोंचती करा. आपल्या कुलरूपी कमलवनाला दुःख देणारी

ही सीता शिशिर ऋतूच्या रात्रीप्रमाणें येथें आली आहे. हे प्रभो ! माझें ऐका. सीता परत दिल्याखेरीज शंभु किंवा ब्रह्मदेव ह्यांच्याहि हातून आपली धडगत लागावयाची नाहीं.

**दो०—रामबान अहि-गन-सरिस निकर निसाचर भेक। जब लगि ग्रसत न तब लगि जतनु करहु तजि टेक ॥ ३५ ॥**

सर्पसमूहतुल्य रामबाण आपल्या भेकतुल्य राक्षससैन्याचा ग्रास करूं लागले नाहींत तोंच सीतेचा नाद सोडून आपण ( राक्षसांच्या सुरक्षिततेची ) कसोशीनें कोशीस केली पाहिजे. ''

चौ०—स्रवन सुनी सठता करि बानी।
बिहँसा जगतबिदित अभिमानी।
सभय सुभाव नारि कर साँचा।
मंगल महुँ भय मन अतिकाँचा।

मंदोदरीचें भाषण श्रवण करून जगत्प्रख्यात अहंमन्य दुरात्मा रावण म्हणाला, '' स्त्रिया खरोखर स्वभावतःच भ्याड असतात. त्या सुखांत लोळत असल्या तरी मनामध्यें भीतीनें विनाकारण कुढत बसतात.

जौं आवइ मर्कट कटकाई।
जियहिं बिचारे निसिचर खाई।
कंपहिं लोकप जा कीं त्रासा।
तासु नारि सभीत बडि हाँसा।
अस कहि बिहँसि ताहि उर लाई।
चलेउ सभा ममता अधिकाई।

जर मर्कटाची सेना आलीच तर बिचारे राक्षस त्यांना खाऊन तृप्त तरी होतील. ज्याच्या भीतीनें लोकपालकांचा देखील थरकांप होतो त्याच्या अर्धांगिनें भीति बाळगणें मोठेंच हास्यास्पद आहे. '' असें म्हणून तो हंसला आणि त्यानें तिला उराशीं धरिलें. नंतर तो अधिकच आढ्यतेनें सभागृहाकडे जाण्यास निघाला.

मंदोदरी हृदय कर चिंता।
भयउ कंत पर बिधि बिपरीता।

पतीचें दैवच फिरलें आहे म्हणून मंदोदरी फारच दिलगीर झाली.

बैठेउ सभा खबरि असि पाई।
सिंधुपार सेना सब आई।
बूझेसि सचिव उचितमत कहहू।
ते सब हँसे मष्ट करि रहहू।
जितेहु सुरासुर तब स्रम नाहीं।
नर बानर केहि लेखे माहीं।

सभेमध्यें रावण बसला असतां बातमी आली कीं, शत्रूचें सर्व सैन्य लंकेच्या समुद्रकांठीं उतरलें आहे. तेव्हां रावण सचिवांस म्हणाला कीं, या वेळीं आपण योग्य सल्ला द्या. तेव्हां सर्व सचिव हंसून मुग्ध राहिले. कांहीं वेळानें ते म्हणाले, '' सुरासुर जिंकले तेव्हां आपल्याला श्रम झाले नाहींत मग मानव आणि मर्कट यांचा काय हिशेब ! ''

**दो०—सचिव बैद गुरु तीनि जौं प्रिय बोलहिं भय आस। राज धर्म तन तीनि कर होइ बेगिहीं नास ॥ ३६ ॥**

( तुलसीदास म्हणतात, ) सचिव, वैद्य आणि गुरु हे तिघे लाळघोटेपणानें वा डरपोक बनून तोंडपुजे बनतात, तेव्हां राज्य, शरीर आणि धर्म ह्या तिन्हींचाहि लवकरच खेळखंडोबा हुकमी झालाच समजा.

चौ०—सोइ रावन कहुँ बनी सहाई।
अस्तुति करहिं सुनाइ सुनाई।

रावणाचीहि तीच स्थिति झाली. सर्व सभासदांकडून वरचेवर त्याला त्याची तारीफच ऐकूं येऊं लागली.

अवसर जानि बिभीषनु आवा।
भ्राताचरन सीसु तेहिं नावा।
पुनि सिरु नाइ बैठ निजआसन।
बोला बचन पाइ अनुसासन।

योग्य अवसर जाणून बिभीषण सभेंत आला, व रावणाचे चरणीं त्यानें मस्तक नमविलें. त्याला पुन्हां एकवार वंदन करून तो आपल्या आसनावर बसला. नंतर तो रावणाची आज्ञा घेऊन बोलूं लागला—

जौं कृपाल पूछेहु मोहि बाता।
मति-अनु-रूप कहहुँ हित ताता।
जो आपन चाहइ कल्याना।
सुजसु सुमति सुभगति सुख नाना।
सो पर-नारि-लिलारु गोसाईं।
तजइ चौथि के चंद कि नाईं।

'' हे कृपालो ! जर आपण माझा सल्ला विचारीत असाल तर हे तात ! मी यथामति हितगुज बोलेन. कल्याण, सत्कीर्ति, सद्बुद्धि, सद्गति आणि नानाविध

सुखें यांची इच्छा ज्याला असेल त्यानें परस्त्रीचें मुख, हे स्वामिन्! (गणेश--) चतुर्थीच्या चंद्राप्रमाणें वावडें समजावयास हवें.

चौदहभुवन एक पति होई।
भूतद्रोह तिष्टइ नहिँ सोई।
गुनसागर नागर नर जोऊ।
अलपलोभ भल कहइ न कोऊ।

चतुर्दश भुवनांचा सार्वभौम राजा जरी असला तरी भूतद्रोह करून त्याचा निभाव लागणार नाहीं. बहुगुणी आणि चौमुख्या अशा माणसास देखील अल्पलोभास्तव कोणीहि चांगला म्हणत नाहीं.

**दो०--काम क्रोध मद लोभ सब नाथ नरक के पंथ। सब परिहरि रघुबीरही भजहु भजहिँ जेहि संत॥ ३७॥**

हे नाथ! काम, क्रोध, मद, लोभ, हे सर्व नरकाचे मार्ग आहेत. म्हणून सर्वस्वाचा त्याग करून संत ज्याचें भजन करितात त्या रघुवीराचीच कास धरावी.

चौ०--तात रामु नहिँ नर भूपाला।
भुवनेश्वर कालहु कर काला।
ब्रह्म अनामय अज भगवंता।
व्यापक अजित अनादि अनंता।
गो-द्विज-धेनु-देव-हित-कारी।
कृपासिंधु मानुष-तनु-धारी।
जनरंजन भंजन खलब्राता।
बेद-धर्म-रच्छक सुनु भ्राता।

हे तात! राम हा केवळ नरहि नव्हे आणि भूपालहि नव्हे. तो अखिल भुवनांचा स्वामी, काळाचाहि काळ, ब्रह्मस्वरूप, निर्विकार, जन्मरहित, भगवंत, व्यापक, अजित, अनादि, अनंत, पृथ्वी, विप्र, देव आणि धेनु ह्यांचा रक्षणकर्ता, कृपासागर, स्वेच्छेनें मानवदेह धारण करणारा, भक्तजनरंजन, खलनाशक, व वेदधर्मप्रतिपालक होय. हे बंधो! ऐक.

ताहि बयरु तजि नाइय माथा।
प्र--नतारति-भंजन रघुनाथा।
देहु नाथ प्रभु कहुँ बैदेही।
भजहु राम बिनु हेतु सनेही।

त्या शरणागतदुःखविमोचन रघुनाथापुढें वैराचा निकाल लावून नम्र हो. हे नाथ! प्रभूला त्याची जानकी देऊन निरपेक्ष प्रेम करणाऱ्या त्या रामचंद्रास शरण जाणेंच ठीक.

सरन गये प्रभु ताहु न त्यागा।
बिस्व द्रोह-कृत अघ जेहि लागा।
जासु नाम त्रय-ताप-नसावन।
सोइ प्रभु प्रगट समझु जिय रावन।

जे प्रभूस शरण गेले त्यांना जरी विश्वद्रोहाचें पातक लागलें असलें तरी त्यानें झिडकारलें नाहीं. हे रावणा! ज्याचें नाम तापत्रयास शांत करितें तो प्रभूच, प्रत्यक्ष हा राम आहे हें लक्षांत धर.

**दो०--बार बार पद लागउँ बिनय करउँ दससीस। परिहरि मान मोह मद भजहु कोसलाधीस॥ ३८॥**

हे दशकंधरा! मी वारंवार तुझ्या चरणीं लागून प्रार्थना करितों कीं, अभिमान, मोह आणि मद यांचा नाद सोडून कोशलाधिपति रामास तूं शरण जा.

**दो०--मुनि पुलस्ति निज सिष्य सन कहि पठई यह बात। तुरत सो मैँ प्रभु सन कही पाइ सुअवसरु तात॥ ३९॥**

हे तात! पुलस्त्य मुनींनीं आपल्या शिष्यांकडून ही गोष्ट सांगून पाठविली आहे. तीच मीं योग्य वेळीं प्रभूला तावडतोब निवेदन केली.

चौ०--माल्यवंत अति सचिव सयाना।
तासु बचन सुनि अतिसुख माना।
तात अनुज तव नीतिबिभूषन।
सो उर धरहु जो कहत बिभीषन।

माल्यवंत नांवाचा एक सुज्ञ मंत्री होता. बिभीषणाचें भाषण ऐकून त्यास फार संतोष झाला. तो म्हणाला, हे प्रभो! तुझा हा धाकटा भाऊ केवळ नीतीचें मंडणच समज. बिभीषणानें जें सांगितलें तें हृदयांत वागीव.

रिपु-उतकरष कहत सठ दोऊ।
दूरि न करहु इहाँ हइ कोऊ।

रावण म्हणाला, हे दोघेहि दोगले शत्रूचीच तार छेडत आहेत. येथें कोणी आहांत काय रे? यांना कोणी अर्धचंद्र कां देत नाहीं?

माल्यवंत गृह गयेउ बहोरी।
कहइ बिभीषनु पुनि कर जोरी।
सुमति कुमति सब केउर रहहीँ।

नाथ पुरान निगम अस कहहीं ।
जहाँ सुमति तहँ संपति नाना ।
जहाँ कुमति तहँ बिपति निदाना ।

तेव्हां माल्यवंत आपल्या घरीं चालता झाला. नंतर बिभीषण हात जोडून रावणाला पुन्हां म्हणाला, " सुमति अगर कुमति ही प्रत्येकाच्याच हृदयांत वास करिते; परंतु जेथें सुमति तेथें संपत्ति आणि कुमति तेथें अखेरीस विपत्ति हा सिद्धांत, हे नाथ ! वेद आणि पुराणें सांगत आहेत.

तव उर कुमति बसी बिपरीता ।
हित अनहित मानहु रिपु प्रीता ।
कालराति निसि-चर-कुल केरी ।
तेहि सीता पर प्रीति घनेरी ।

आपल्या मनांत या वेळीं घातुक अशा दुर्बुद्धीनें ठाणें दिलें आहे. त्यामुळें आपणांस हित तें अनहित आणि शत्रु ते मित्र वाटत आहेत. म्हणूनच राक्षसकुलाला कालरात्रीप्रमाणें असलेली जी सीता तिचा आपला अभिलाष कळसास पोंचत आहे.

**दो०—तात चरन गहि माँगउँ राखहु मोर दुलार । सीता देहु राम कहुँ अहित न होइ तुम्हार ॥ ४० ॥**

हे तात! मी आपले चरण धरून एवढेंच मागतों कीं, आपण जानकी रामाला देऊन टाकावी. आपण माझें एवढें कोड पुरवावें. तेणेंकरून आपलें अकल्याण व्हावयाचें नाहीं.

चौ०—बुध-पुरान-स्त्रुति-संमत बानी ।
कही बिभीषन नीति बखानी ।
सुनत दसानन उठा रिसाई ।
खल तोहि निकट मृत्यु अब आई ।

बिभीषणाचें भाषण नीतिप्रचुर आणि संत, पुराणें व वेद ह्यांसहि संमत होतें. परंतु तें ऐकतांच रावण तावातावानें उठला आणि म्हणाला, ए दगलबाजा, तुझें मरण अगदीं जवळ येऊन ठेपलें आहे.

जियसि सदा सठ मोर जियावा ।
रिपु कर पच्छ मूढ तोहि भावा ।
कहसि न खल अस को जग माहीं ।
भुजबल जेहि जीता मैं नाहीं ।
मम पुर बसि तपसिन्ह पर प्रीती ।
सठ मिलु जाइ तिन्हहिं कहु नीती ।

अरे कृतघ्ना ! मीं जगविलें म्हणूनच तूं जगलास. फितुऱ्या ! आतां मात्र तूं अस्तनींतला निखारा बनला आहेस ! नष्टा, आपल्या मनगटाच्या जोरावर मी झपटला नाहीं असा जगांत कोण आहे तें सांगत कां नाहींस ? माझ्या राज्यांत राहून त्या जोगड्यावर इतका आशक ? मग त्याच्याच गळ्यांत गळा घालून शास्त्र सांगत बैस कीं रे दोगल्या !

अस कहि कीन्हेसि चरनप्रहारा ।
अनुज गहे पद बारहिं बारा ।
उमा संत कइ इहइ बड़ाई ।
मंद करत जो करइ भलाई ।

असें म्हणून रावणानें बिभीषणाला एक लाथ चाखविली. परंतु बिभीषणानें वारंवार त्याचे पाय धरिले. शंकर म्हणतात हे पार्वति ! संतांचें यांतच थोरपण आहे कीं, त्यांच्या अपकाऱ्यांवरहि ते उपकारच करितात.

तुम्ह पितुसरिस भलेहि मोहि मारा ।
राम भजे हित नाथ तुम्हारा ।
सचिव संग लेइ नभपथ गयऊ ।
सबहिं सुनाइ कहत अस भयऊ ।

बिभीषण म्हणाला, " आपण मला पित्याप्रमाणेंच आहांत. तेव्हां आपण मला मारलें हें ठीकच झालें. परंतु, हे नाथ ! रामाला शरण जाण्यांतच मात्र आपलें हित आहे. " नंतर सचिवांना बरोबर घेऊन बिभीषण आकाशमार्गानें निघाला आणि सर्वांना त्यानें सडेतोड सांगितलें—

**दो०—राम सत्यसंकल्प प्रभु सभा कालबस तोरि । मैं रघु-बीर-सरन अब जाउँ देहु जनि खोरि ॥ ४१ ॥**

" हे रावणा ! तुझा सर्व दरबार प्रेतवत् झाला आहे. मी आतां सत्यसंकल्प प्रभु रघुवीर श्रीरामाला शरण जातों. इतःपर मला दोष देऊं नकोस. "

चौ०—अस कहि चला बिभीषन जबहीं ।
आयूहीन भये सब तबहीं ।
साधुअवज्ञा तुरत भवानी ।
कर कल्यान अखिल कै हानी ।
रावन जबहिं बिभीषनु त्यागा ।
भयउ बिभव बिनु तबहिं अभागा ।

असें म्हणून जेव्हां बिभीषण निघाला तेव्हां तत्क्ष-

णींच राक्षसांवर प्रेतकळा छावली. हे पार्वति! संतांची अवज्ञा ही तत्काल अखिल कल्याणांचा ऱ्हास करिते. बिभीषणानें रावणाचा त्याग केला तेव्हांच तो अभागी वैभवशून्य झाला.

चलेउ हरषि रघुनायक पाहीँ।
करत मनोरथ बहु मन माहीँ।
देखिहउँ जाइ चरन-जल-जाता।
अरुन मृदुल सेवक-सुख-दाता।

रामचंद्राकडे आनंदानें जात असतां बिभीषण आपल्या मनांत अनेक मनोरथ करूं लागला. तो म्हणाला, मी आतां जाऊन तीं आरक्त, मृदुल आणि सेवकसुखदायक अशीं प्रभूंचीं चरणकमळें पाहीन.

जे पद परसि तरी रिषिनारी।
दंडक-कानन-पावन-कारी।
जे पद जनकसुता उर लाये।
कपट-कुरंग-संग धर धाये।
हर-उर-सर-सरो-ज पद जेई।
अहो भाग्य मैँ देखिहउँ तेई।

ज्या चरणांच्या स्पर्शानें गौतमपत्नी उद्धरिली, ज्यांनीं दंडकारण्यास पावन केलें, जे चरण जानकीनें हृदयांत वागाविले, जे कपटमृगाच्या मागें त्याला धरण्यासाठीं धांवले, असे ते शंकराच्या हृदयरूप सरोवरांतील कमलाप्रमाणें असलेले पाय आतां माझ्या दृष्टीस पडतील. धन्य माझें भाग्य!

**दो०-जिन्ह पायन्ह के पादुकन्हि भरत रहे मन लाइ। ते पद आजु बिलोकिहउँ इन्ह नयनन्हि अब जाइ ॥ ४२ ॥**

ज्या चरणपादुकांचे ठायीं आपलें मन तल्लीन करून भरत राहिला आहे ते मी आज जाऊन ह्या नेत्रांनीं अवलोकन करीन.

चौ०-एहिबिधि करत सप्रेम बिचारा।
आयउ सपदि सिंधु एहि पारा।
कपिन्ह बिभीषनु आवत देखा।
जाना कोउ रिपुदूत बिसेखा।
ताहि राखि कपीस पहिँ आये।
समाचार सब ताहि सुनाये।

ह्याप्रमाणें प्रेमपूर्वक विचार करीत आहे तोंच तो एकदम समुद्राच्या पैलतिराला पोंचला. वानरांनीं बिभीषण आलेला पाहिला तेव्हां त्यास तो रिपूचा कोणी शेलका दूत असावा असें वाटलें. त्याला तेथेंच उभा करून ते सुग्रीवाकडे आले, आणि त्यांनीं त्याला सर्व वर्तमान कथन केलें.

कह सुग्रीवँ सुनहु रघुराई।
आवा मिलन दसानन भाई।
कह प्रभु सखा बूझिये काहा।
कहइ कपीस सुनहु नरनाहा।

सुग्रीव म्हणाला, 'हे रघुराय! रावणाचा बंधु आपणांस भेटण्याकरितां आला आहे.' तेव्हां प्रभु म्हणाले, 'मित्रा! तर मग तुझा सल्ला काय? सुग्रीव म्हणाला, हे नरपते! ऐका.

जानि न जाइ निसा-चर-माया।
कामरूप केहि कारन आया।
भेद हमार लेन सठ आवा।
राखिय बाँधि मोहि अस भावा।

या राक्षसांचा इब्लिसपणा अगदीं बेमालुम असतो. त्यांना स्वेच्छेनें कोणतींहि रूपें धारण करितां येतात. बिभीषण कोणत्या कारणास्तव आला आहे कोण जाणे! तो लुच्चा आपलें गुपित काढण्यासाठींहि आला असेल. त्याला बांधून ठेवावा असें माझें मत आहे.

सखा नीति तुम्ह नीकि बिचारी।
मम पन सरनागत-भय-हारी।
सुनि प्रभुबचन हरष हनुमाना।
सरनागतबच्छल भगवाना।

राम म्हणाले, 'मित्रा! तूं नीति तर ठीक सांगितलीस. परंतु शरणागतास अभय हा माझा बाणा आहे.' तें प्रभूंचें वचन ऐकतांच मारुतीस हर्ष झाला, कारण भगवंताची शरणागतवत्सलता.

**दो०-सरनागत कहुँ जे तजहिँ निज अनहित अनुमानि। ते नर पावँर पापमय तिन्हहिँ बिलोकत हानि ॥४३॥**

(राम म्हणाले) "आपलें अनहित होईल म्हणून जे शरणागतास दूर लोटतात ते नर नीच आणि पापात्मे होत. अशांना नुसतें पाहिलें तरी देखील हानि होते.

चौ०-कोटि बिप्रबध लागहि जाहू।
आये सरन तजउँ नहिँ ताहू।

सनमुख होइ जीव मोहि जबहीँ ।
जनम कोटि अघ नासहिँ तबहीँ ।

ज्याच्या हातून कोट्यवधि ब्रह्महत्या घडल्या आहेत तोदेखील मला शरण आल्यास मी त्याचा त्याग करणार नाहीं. जीवमात्र जेव्हां मला शरण येतो तेव्हां त्याच्या कोट्यवधि जन्मांच्या पातकांचा मी सूड उगविणारच.

पापवंत कर सहज सुभाऊ ।
भजनु मोर तेहि भाव न काऊ ।
जौँ पै दुष्ट हृदय सोइ होई ।
मोरे सनमुख आव कि सोई ।

पापवंताचा मूळ स्वभावच हा कीं, त्याला माझी भक्ति कधींच रुचत नाहीं. बिभीषण जर दुरात्मा असता तर तो मला शरण आला असता काय ?

निर्मल मन जन सो मोहि पावा ।
मोहि कपट छल छिद्र न भावा ।
भेद लेन पठवा दससीसा ।
तबहुँ न कछु भय हानि कपीसा ।

ज्याचें अंतःकरण शुद्ध आहे अशा माझ्या दासाला माझी प्राप्ति होते. मला पीळपेच, छळ, छिद्र यांचा मोठाच तिटकारा वाटतो. समजा कीं, रावणानें जरी त्याला आपलीं बिंगें फोडण्यासाठीं पाठविलें असलें तरीहि, सुग्रीवा ! त्यांत भीति किंवा हानि मला कांहींच दिसत नाहीं.

जग महुँ सखा निसाचर जेते ।
लछिमनु हनइ निमिष महुँ तेते।
जौँ सभीत आवा सरनाई ।
राखिहउँ ताहि प्रान की नाईँ ।

हे मित्रा ! जेवढे म्हणून जगांत निशाचर असतील त्या सर्वांचा लक्ष्मण निमिषमात्रांत निःपात करील, आणि जर तो मला भिऊन शरण आला असेल तर त्याला मी आपल्या प्राणासारखा जपेन. ’’

**दो०–उभय भाँति तेहि आनहु हँसि कह कृपानिकेत । जय कृपालु कहि कपि चले अंगद-हनू-समेत ॥ ४४ ॥**

कृपानिधान श्रीरामचंद्र हास्य करून पुन्हां म्हणाले, ‘ तो दोहोंपैकीं, ( शरणागत किंवा हेर ) कोणीहि असो, त्याला घेऊन या. ’ अशी आज्ञा होतांच अंगद, हनुमंता यांसह सर्व वानर कृपालु श्रीरामाचा जयघोष करून निघाले.

चौ०–सादर तेहि आगे करि बानर ।
चले जहाँ रघुपति करुनाकर ।

त्यांनीं बिभीषणास आदरपूर्वक पुढें करून करुणाकर रघुपतीकडे आणलें.

दूरिहिँ ते देखे दोउ भ्राता ।
नयनानंददान के दाता ।
बहुरि राम छबिधाम बिलोकी ।
रहेउ ठठुकि एकटक पल रोकी ।

नयनांस आनंददायक असे ते उभय बंधू बिभीषणानें लांबून पाहिले. रूपनिधान रामचंद्रास पाहतांच तो एकसारखा टक लावून पापण्याहि न हालवितां पाहूं लागला.

भुज प्रलंब कंजारुनलोचन ।
स्यामल गात प्रनत-भय-मोचन ।
सिंहकंध आयतउर सोहा ।
आनन अमित-मदन-मन मोहा ।
नयन नीर पुलकित अति गाता ।
मन धरि धीर कही मृदु बाता ।

आजानुबाहु, कमलाप्रमाणें आरक्त नेत्र असलेला, श्यामगात्र, शरणागतभयहरण, सिंहस्कंध, विशालवक्ष व अमित मदनांच्याहि मनास आपल्या मुखानें मोहित करणारा, अशा त्या सुंदर प्रभूस अवलोकन करीत असतां त्याच्या सर्व शरीरावर रोमांच उभे राहून त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले, व तो मृदु शब्दांनीं म्हणालाः—

नाथ दसानन कर मैँ भ्राता ।
निसि-चर-बंस-जनम सुरत्राता ।
सहज पापप्रिय तामसदेहा ।
जथा उलूकहीँ तम पर नेहा ।

हे सुररक्षक प्रभो! राक्षसकुलसंभूत असा मी रावणाचा भ्राता आहे. ज्याप्रमाणें उलूकाचें रात्रीवर प्रेम असतें तद्वत् साहजिकपणेंच ह्या तमोगुणप्रधान राक्षसयोनीची पापाकडे प्रवृत्ति असते.

**दो०–स्रवन सुजसु सुनि आयउँ प्रभु भंजन भवभीर । त्राहि त्राहि आरति-हरन सरन सुखद रघुबीर ॥ ४५ ॥**

हे भवभयभंजन प्रभो ! आपलें सद्यश ऐकून मी आलों आहें. हे आर्तिहरणा ! शरणागतसुखदा ! रघुवीरा ! माझें रक्षण कर.

चौ०—अस कहि करत दंडवत देखा ।
तुरत उठे प्रभु हरष बिसेखा ।
दीन बचन सुनि प्रभु मन भावा ।
भुज बिसाल गहि हृदय लगावा ।
अनुजसहित मिलि ढिग बैठारी ।
बोले बचन भगत- भय--हारी ।

असें म्हणून त्यानें दंडवत घातला. प्रभूस विशेष हर्ष होऊन ते तावडतोब उठले. त्याचें दीन वचन ऐकून प्रभूचें मन संतुष्ट झालें. त्यांनीं त्याला आपल्या विशाल भुजांनीं कवटाळून हृदयाशीं धरिलें. लक्ष्मणासहित सर्वांना बिभीषण भेटला. नंतर भक्तभयहरण प्रभु त्याला आपल्याजवळ बसवून म्हणाले—

कहु लंकेस सहित परिवारा ।
कुसल कुठाहर बास तुह्मारा ।
खलमंडली बसहु दिनु राती ।
सखा धर्म निबहइ केहि भाँती ।
मैं जानउँ तुह्मारि सब रीती ।
अति नयनिपुन न भाव अनीती ।

हे लंकापते बिभीषणा ! सांग, परिवारासहवर्तमान तूं कुशल आहेसना ! तुला ओंगळ वस्तींत वास्तव्य करावें लागत आहे. मित्रा ! अहोरात्र दुष्टांची साथसंगति असल्यामुळें तुझ्या धर्माचा कसा निभाव लागत असेल ? मला तुझी सर्व चर्या माहीत आहे. तूं अत्यंत नीतिनिपुण म्हणून तुला अनीति अगदींच खपत नाहीं.

बरु भल बास नरक कर ताता ।
दुष्ट संग जनि देइ बिधाता ।

बाबा रे ! विधात्यानें दुष्टाची संगति मात्र देऊं नये. त्यापेक्षां नरकवास पुरवला.

अब पद देखि कुसल रघुराया ।
जौं तुह्म कीन्हि जानि जन दाया ।

बिभीषण म्हणाला, " हे रघुराय ! आपण मला आपला दास जाणून कृपा केली आणि हे चरण दाखविले त्यायोगेंकरून मी खरा कुशल आजच झालों.

**दो०—तब लगि कुसल न जीव कहुँ सपनेहुँ मन बिस्राम । जब लगि भजत न राम कहुँ सोकधाम तजि काम ॥४६॥**

जोंपर्यंत शोकमूल जो काम त्याचा त्याग करून जीव रामाचें भजन करीत नाहीं,तोंपर्यंत त्याच्या मनास स्वप्नांतदेखील शांति किंवा सौख्य मिळणार नाहीं.

चौ०—तब लगि हृदय बसत खल नाना ।
लोभ मोह मत्सर मद माना ।
जब लगि उर न बसत रघुनाथा ।
धरे चापसायक कटि भाथा ।

जोंपावेतों कमरेस भाता आणि हातांत धनुष्यबाण धारण केलेलें रामरूप हृदयांत वास करीत नाहीं तोंपावेतों लोभ, मोह, मत्सर, मद, मान इत्यादि अनेक दुष्ट विकार हृदयांत वास करितात.

ममता तरुनतमी अँधियारी ।
राग द्वेष उलूक सुखकारी ।
तब लगि बसत जीव मन माहीं ।
जब लगि प्रभु-प्रताप-रवि नाहीं ।

जोंपर्यंत रामप्रतापसूर्य उदयंगत होत नाहीं तोंपर्यंतच राग व द्वेष ह्या उलूकांना सुख देणारी ममतारूप घोर अंधारी रात्र जीवाच्या मनांत वास करिते.

अब मैं कुसल मिटे भय भारे ।
देखि राम पदकमल तुह्मारे ।
तुह्म कृपाल जा पर अनुकूला ।
ताहि न ब्याप त्रिबिध भवसूला ।

हे रामा ! आपलें पदकमल पाहून आज माझा भयभार नष्ट होऊन मी सुखी झालों आहे. हे दयाघन ! आपण ज्याला अनुकूल झालां त्याला त्रिविधतापापासून होणारी व्यथा बाधत नाहीं.

मैं निसिचर अति—अधम—सुभाऊ ।
सुभ आचरनु कीन्ह नहिं काऊ ।
जासु रूप मुनिध्यान न आवा ।
तेहि प्रभु हरषि हृदय मोहि लावा ।

ज्यानें कधींच सदाचरण केलें नाहीं अशा अत्यंत अधम स्वभावाच्या राक्षसाला मला, ज्याचें रूप मुनिजनांच्याहि ध्यानांत येत नाहीं, त्या प्रभूनें आनंदानें हृदयाशीं कवटाळावें !

**दो०—अहो भाग्य मम अमित अति राम कृपासुख-पुंज । देखेउँ नयन बिरंचि सिवसेव्य जुगल-पद-कंज ॥४७॥**

हे कृपासुखनिधान रामचंद्रा ! ब्रह्मदेव आणि महेश ह्यांनाहि सेव्य अशीं आपलीं पदकमलयुगुलें मला पाहण्यास मिळालीं, अहो ! हें माझें अमित थोर भाग्य आहे.

चौ०–सुनहु सखा निज कहउँ सुभाऊ ।
जान भुसुंडि संभु गिरिजाऊ ।
जौं नर होइ चराचरद्रोही ।
आवइ सभय सरन तकि मोही ।
तजि मद मोह कपट छल नाना ।
करउँ सद्य तेहि साधुसमाना ।

राम ह्मणाले, मित्रा ! ऐक. मी माझा स्वभाव तुला सांगतों. भुशुंडी, शंकर आणि पार्वती हे तो जाणतात. नर चराचर विश्वाचा द्वेष्टा असला आणि तो जर मद, मोह, कपट, छल इत्यादिकांचा त्याग करून मला भयानें शरण आला तर त्यास देखील मी तत्काल साधुसमान करितों.

जननी जनक बंधु सुत दारा ।
तनु धन भवन सुहृद परिवारा ।
सब कै ममताताग बटोरी ।
मम पद मनहिँ बाध बरि डोरी ।
समदरसी इच्छा कछु नाहीँ ।
हरष सोक भय नहिँ मन माहीँ ।
अस सज्जन मम उर बस कैसे ।
लोभीहृदय बसइ धन जैसे ।

जननी, जनक, बंधु, सुत, दारा, तनु, धन, गृह, सुहृद, परिवार इत्यादि सर्वांविषयीं असलेल्या ममतारूप तागाची मजबूत दोरी वळून व तिनें आपलें मन माझ्या चरणांशीं बांधून समदृष्टि, निष्काम, अशोक, निर्भय, निरानंद होऊन राहणारा जो सज्जन तो कृपणाच्या मनांत जसें धन वास करितें तद्वत् माझ्या हृदयांत वास करितो.

तुम्ह सारिखे संत प्रिय मोरे ।
धरउँ देह नहिँ आन निहोरे ।

तुझ्यासारखे संत हे मला प्रिय आहेत. माझा अवतारच त्यांच्याकरितां आहे. त्याला दुसरें कांहींएक कारण नाहीं.

**दो०–सगुनउपासक पर-हित-निरत-नीति-दृढ-नेम । ते नर प्रानसमान मम जिन्ह के द्विज-पद-प्रेम ॥ ४८ ॥**

सगुणोपासक, परहिताविषयीं तत्पर, नीतिनियमांमध्यें अचल आणि ज्यांचें [1]द्विजपदांचे ठायीं प्रेम आहे, असे लोक मला प्राणाप्रमाणें प्रिय होतात.

चौ०–सुनु लंकेस सकल गुन तोरे ।
ता तेँ तुम्ह अतिसय प्रिय मोरे ।
रामबचन सुनि बानरजूथा ।
सकल कहहिँ जय कृपाबरूथा ।

हे लंकापते ! ऐक. तुझ्यामध्यें हे सर्व गुण आहेत. म्हणूनच तूं मला अतिशय प्रिय आहेस." हें रामाचें भाषण ऐकून वानरसमूह "जय दयानिधान" असा एकच घोष करूं लागले.

सुनत बिभीषनु प्रभु कै बानी ।
नहिं अघात स्रवनामृत जानी ।
पदअंबुज गहि बारहिँ बारा ।
हृदय समात न प्रेमु अपारा ।

श्रवणामृतानें परिप्लुत असें प्रभूचें भाषण ऐकत असतां बिभीषणाची तृप्ति होईना. वारंवार तो प्रभूचीं पदकमलें धरूं लागला. त्याचें अपार प्रेम हृदयांत मावेनासें झालें.

सुनहु देव स–चराचर–स्वामी ।
प्रनतपाल उर–अंतर–जामी ।
उर कछु प्रथम बासना रही ।
प्रभु–पद–प्रीति–सरित सो बही ।
अब कृपाल निजभगति पावनी ।
देहु सदा सिव–मन–भावनी ।

तो म्हणाला '–हे चराचरस्वामी ! प्रणतवत्सला ! सर्वांतर्व्यापका देवा ! ऐका. प्रथम कांहींएक मनांत वासना (लंकेच्या राज्याची) होती ती प्रभुपदप्रीतिसरितेमध्यें वाहून गेली. आतां हे दयाळो ! शंकराचे मनाला आनंद देणारी जी आपली पावन भक्ति ती मला द्यावी.'

एवमस्तु कहि प्रभु रनधीरा ।
माँगा तुरत सिंधु कर नीरा ।
जदपि सखा तव इच्छा नाहीँ ।
मोर दरसु अमोघ जग माहीँ ।
अस कहि राम तिलक तेहि सारा ।
सुमनवृष्टि नभ भई अपारा ।

रणधीर प्रभूंनीं 'तथास्तु' ह्मणून तात्काळच समुद्रोदक मागविलें. ते ह्मणाले, 'मित्रा ! जरी तुझी इच्छा नाहीं तरी या जगांत माझें दर्शन हें अमोघ आहे.' असें म्हणून रामचंद्रांनीं बिभीषणाला लंकेचा राजा म्हणून अभिषेक केला. तेव्हां आकाशांतून अपार पुष्पवृष्टि झाली.

[1] लंकेंत द्विज एरव्हीं पोचणारच कसा ? म्हणून वाटतें कीं या शब्दानें मारुतीचें द्विजरूप ध्वनित होतें. हें गृहीत झाल्यास मारुति व बिभीषण यांच्यामध्यें ठरलेल्या संधीस रामानें संमति दर्शविली हेंहि निष्पन्न होतें.

**दो०—रावनक्रोध अनल निजस्वास समीर प्रचंड। जरत बिभीषन राखेउ दीन्हेउ राजु अखंड ॥ ४९ ॥**

दीर्घश्वासरूप प्रचंड वायूनें पेटलेल्या रावणाच्या क्रोधाग्नींत बिभीषण दग्ध होत असतां त्यास अखंड राज्य देऊन रामांनीं वांचविलें.

**दो०—जो संपति सिव रावनहिँ दीन्हि दिये दसमाथ। सोइ संपदा बिभीषनहिँ सकुचि दीन्हि रघुनाथ ॥ ५० ॥**

जी संपत्ति दहा शिरांसह शंकरांनीं रावणास अर्पण केली होती तीच संपत्ति बिभीषणास रघुनाथांनीं फार संकोचानें[1] अर्पण केली. '

चौ०—अस प्रभु छाडि भजहिँ जे आना।
ते नर पसु बिनु पूछ बिषाना।
निजजन जानि ताहि अपनावा।
प्रभुसुभाव कपि-कुल-मन भावा।

अशा प्रभूस विन्मुख होऊन जे अन्य देवतांचें भजन करितात ते नर पुच्छविषाणहीन पशु समजावेत. आपला दास जाणून रामांनीं बिभीषणाचा अङ्गीकार केला हा प्रभूंचा स्वभाव सर्व कपींच्या मनास आवडला.

पुनि सर्वज्ञ सर्ब-उर-बासी।
सर्बरूप सबरहित उदासी।
बोले बचन नीति-प्रति-पालक।
कारनमनुज दनुज-कुल-घालक।

नंतर सर्वज्ञ, सर्वांतर्व्यापी, सर्वरूप, सर्वातीत, उदासीन, नीतिप्रतिपालक, मायामनुष्य, दैत्यकुलघातक असे श्रीराम म्हणाले—

सुनु कपीस लंकापति बीरा।
केहि बिधि तरिय जलधि गंभीरा।
संकुल मकर उरग झष जाती।
अतिअगाध दुस्तर सब भाँती।

सुग्रीवबिभीषणवीरें हो! ऐका. मकर, सर्प, मत्स्य, इत्यादि अनेक जातींच्या जलजीवांनीं भरलेला अत्यंत अगाध आणि सर्वतोपरी दुस्तर असा हा गंभीर सागर कसा बरें तरून जातां येईल?

कह लंकेस सुनहु रघुनायक।
कोटि-सिंधु-सोषक तव सायक।
जद्यपि तदपि नीति अस गाई।
बिनय करिय सागर सन जाई।

ह्यावर लंकापति बिभीषण म्हणाला, हे रघुनायका! ऐका. जरी आपला बाण कोट्यवधि समुद्रांना शोषून टाकणारा आहे, तथापि नीतिदृष्ट्या सागराजवळ जाऊन त्याची प्रार्थना करणें उक्त होईल.

**दो०—प्रभु तुह्मार कुलगुरु जलधि कहिहि उपाय बिचारि। बिनु प्रयास सागर तरिहि सकल-भालु-कपि-धारि।५१।**

हे प्रभो! सागर आपला कुलगुरु (सगरपुत्रांनीं खोदला आहे म्हणून) आहे. तो विचारपूर्वकच उपाय सांगेल, आणि तेणेंकरून सर्व वानर आणि ऋक्षसैन्य प्रयासावांचून सागरोल्लंघन करील.

चौ०—सखा कही तुह्म नीकि उपाई।
करिय दैव जौँ होइ सहाई।

राम म्हणाले, मित्रा! तूं उपाय तर ठीक सुचविलास. आतां त्याचप्रमाणें मी करितों. पण दैवाचाहि पाठिंबा मनाच्या मनोन्यास हवाच.

मंत्र न यह लछिमन मन भावा।
रामबचन सुनि अतिदुख पावा।
नाथ दैव कर कवन भरोसा।
सोखिय सिंधु करिय मन रोसा।
कादरमन कहुँ एक अधारा।
दैव दैव आलसी पुकारा।

ही मसलत लक्ष्मणाच्या पसंतीला आली नाहीं. रामाचें (हताशपणाचें) वचन ऐकून त्याला फार दुःख झालें. (तो म्हणाला) ' एक तर भेकाडांच्या मनाचा एकमेव आधार म्हणजे दैव, किंवा दैवाची पुकार करणारे दुसरे ते आळशीगव्बू. दैवावर कसला हवाला? बस, मन खंबीर ठेवावें आणि समुद्र साफ कोरडा ठणठणीत करून सोडावा.'

सुनत बिहँसि बोले रघुबीरा।
ऐसइ करब धरहु मन धीरा।
अस कहि प्रभु अनुजहि समुझाई।
सिंधुसमीप गये रघुराई।

लक्ष्मणाचा तो कडा जबाब ऐकून रघुवीर हंसून

---

१ या संकोचाचें कारण आमच्या मानसहंसांत विस्तारपूर्वक दर्शविलेलें दिसेल.

म्हणाले, " असेंच करीन बरें; मन स्वस्थ असूं दे." असें म्हणून प्रभूनें लक्ष्मणाची समजूत घातली व रघुराज सिंधुतीरावर गेले.

प्रथम प्रनाम कीन्ह सिरु नाई।
बैठे पुनि तट दर्भ डसाई।
जबहिँ बिभीषन प्रभु पहिँ आये।
पाछे रावन दूत पठाये।

प्रभूंनीं जाऊन प्रथमतः समुद्राला प्रणाम केला व नंतर ते त्याच्या तीरावर दर्भासन घालून बसले. इकडे जेव्हां बिभीषण प्रभूकडे जाण्यास निघाला तेव्हां त्याच्या मागोमाग रावणानें हेर रवाना केले.

दो०–सकल चरित तिन्ह देखे धरे कपट कपिदेह। प्रभुगुन हृदय सराहहिँ सरनागत पर नेह ॥ ५२ ॥

त्या दूतांनीं आपल्या मायेनें कपिदेह धारण करून तो इत्थंभूत प्रकार पाहिला, व प्रभूंच्या शरणागतवत्सलत्वाची ते आपल्या मनांत वाखाणणी करूं लागले.

चौ०–प्रगट बखानहिँ रामसुभाऊ।
अतिसप्रेम गा बिसरि दुराऊ।
रिपु को दूत कपिन्ह तब जाने।
सकल बाँधि कपीस पहिँ आने।

( अखेरीस रहावेना तेव्हां ) ते उघड उघड रामचंद्राच्या स्वभावाची प्रशंसा करूं लागले, आणि अत्यंत प्रेमभरांत त्यांना त्यांच्या मायेचाहि विसर पडला. ( अर्थातच त्यांचा राक्षसदेह व्यक्त झाला. ) तेव्हां हे रावणाचे दूत आहेत असें वानरांनीं ताडलें, व त्यांनीं त्या सर्वांना जखडून सुग्रीवाकडे नेलें.

कह सुग्रीवँ सुनहु सब बानर।
अंगभंग करि पठवहु निसिचर।
सुनि सुग्रीवँबचन कपि धाये।
बाँधि कटक चहुँ पास फिराये।

सुग्रीव म्हणाला, " हे सर्व वानर हो! ऐका. ह्या राक्षसांना विद्रूप करून परत पाठवा." याप्रमाणें सुग्रीवाची आज्ञा ऐकतांच कपी धांवले आणि त्यांच्या मुसक्या बांधून आपल्या सैन्याच्या भोंवतीं त्यांनीं त्यांची धिंड काढली.

बहु प्रकार मारन कपि लागे।
दीन पुकारत तदपि न त्यागे।
जो हमार हर नासा काना।
तेहि कोसलाधीस कै आना।

कपी त्यांस अनेक प्रकारें चौदावें रत्न दाखवीत, तेव्हां ते दीनवाणें आक्रोश करीत. तथापि कपी त्यांस सोडीनात. ( अखेरीस ते म्हणाले ) जो आमचें नाककान कापील त्यास कोशलाधिपतींचीच शपथ आहे.

सुनि लछिमन सब निकट बोलाये।
दया लागि हँसि तुरत छोडाये।
रावन कर दीजेहु यह पाती।
लछिमनबचन बाँचु कुलघाती।

त्यांचा आक्रोश ऐकून लक्ष्मणानें त्या सर्वांस जवळ बोलाविलें. लक्ष्मणास त्यांची दया आली, आणि त्यानें हसून त्यांस लागलींच मुक्त केलें. लक्ष्मणानें त्यांस आज्ञा केली कीं, खुद्द रावणाचे हातांत हें पत्र द्या, आणि " हे कुलघातक्या, लक्ष्मणाची ही लकीर तर वाच !" असें त्यास सांगा.

दो०–कहेहु मुखागर मूढ सन मम संदेस उदार। सीता देइ मिलहु न त आवा काल तुम्हार ॥ ५३ ॥

आणखीहि त्या मुजोर मूर्खास त्याच्याच कल्याणाचा असा रोकडा निरोप तोंडीं सांगा कीं, सीतेस परत पाठवून शरण ये. नाहींतर तुझा काळ येऊन ठेपला समज.

चौ०–तुरत नाइ लछिमनपद माथा।
चले दूत बरनत गुनगाथा।
कहत रामजसु लंका आये।
रावनचरन सीस तिन्ह नाये।

ते दूत लक्ष्मणाच्या पायांवर डोकीं ठेवून लागलींच निघाले व रामाच्या यशाचें व गुणांचें वर्णन करीत लंकेस येऊन त्यांनीं रावणास प्रणाम केला.

बिहँसि दसानन पूछी बाता।
कहसि न सुक आपनि कुसलाता।
पुनि कहु खबरि बिभीषन केरी।
जाहि मृत्यु आई अति नेरी।
करत राजु लंका सठ त्यागी।
होइहि जव कर कीट अभागी।

तेव्हां रावण हसून त्यांना हकीकत विचारूं लागला. " हे शुका! तूं आपलें कुशल कां सांगत

नाहींस ! तसच बिभीषणाचाहि समाचार मला सांग. त्याचें मरण तर अगदींच जवळ आहे आलें.मूर्खानें राज्य करीत असतां लंका सोडली. त्या करंट्याची जवांतल्या किडयाप्रमाणें गति होणार. ( धान्याबरोबर किडाहि भरडला जाणार. )

पुनि कहु भालु कीस कटकाई ।
कठिन कालप्रेरित चलि आई ।
जिन्ह के जीवन्ह कर रखवारा ।
भयउ मृदुलचित सिंधु बेचारा ।
कहु तपसिन्ह कै बात बहोरी ।
जिन्ह के हृदय त्रास अति मोरी ।

पुन्हा दुर्धर काळाच्या प्रेरणेनें चालून आलेल्या वानरऋक्षसैन्यासंबंधाचीहि हकीकत सांग. बिचारा मोमदिल सागर तरी त्यांच्या प्राणांचा रक्षक झाला! तसेंच त्या तपस्व्यांचीहि कांहीं बातमी सांग. त्यांच्या चित्तास तर माझ्या मुळें फारच घबराट होत असेल.

दो०—की भइ भेँट कि फिरि गये स्रवन सुजहु सुनि मोर । कहसि न रिपु-दल-तेज-बल-बहुत चकित चित तोर ।५४।

त्यांची तुझी गांठ तरी पडली कीं नाहीं ? कीं ते माझा सन्नाटा ऐकून परत फिरले ? शत्रूंच व त्यांच्या सैन्यांचें तेज व बल कांहींच कसें सांगत नाहींस ? तूं तर मनांत फारच भेदरलासा दिसतोस. ”

चौ०—नाथ कृपा करि पूछेहु जैसे ।
मानहु कहा क्रोध तजि तैसे ।
मिला जाइ जब अनुज तुह्मारा ।
जातहिँ राम तिलक तेहि सारा ।

शुक म्हणाला, “हे नाथ! आपण जसें कृपा करून विचारलें तसें रुष्ट न होतां आमचें बोलणें तरी पुरतें ऐकून घ्या. आपला धाकटा भाऊ बिभीषण त्यांना जाऊन मिळाल्यानंतर रामांनीं त्यास भेटीसरशीं लंकेचा राज्याभिषेक केला.

रावनदूत हमहि सुनि काना ।
कपिन्ह बाँधि दीन्हे दुख नाना ।
स्रवन नासिका काटन लागे ।
रामसपथ दीन्हे हम त्यागे ।

आम्ही रावणाचे दूत आहों असें कानीं पडतांच वानरांचा बडगा फिरला. आम्हांस बांधून त्यांनीं नानाप्रकारें उधडले व ते आमचे नाककान कापूं लागले. परंतु आम्हीं त्यांस रामाची शपथ घातली तेव्हां काठ आमची सुटका झाली.

पूछेहु नाथ रामकटकाई ।
बदन कोटिसत बरनि न जाई ।
नानाबरन भालु–कपि–धारी ।
बिकटानन बिसाल भयकारी ।

महाराज ! रामाच्या सैन्याबद्दल आपण विचारल खरें, परंतु त्याचें वर्णन करण्यास पुरेशीं तोंडेंच आम्हांस नाहींत. त्या सैन्यांत नाना वर्णांचे, विक्राळ वदनांचे, विशाल आणि भयंकर असे ऋक्ष आणि वानर आहेत.

जेहि पुर दहेउ हतेउ सुत तोरा ।
सकल कपिन्ह महँ तेहि बल थोरा ।
अमितनाम भट कठिन कराला ।
अ-मित-नाग-बल बिपुल बिसाला ।

ज्यानें लंका जाळून आपल्या पुत्राचा वध केला तो सर्वांच्या मानानें दिमतींत अगदींच कस्पट आहे. त्या अक्राळविक्राळ, विशाल आणि शूर योद्ध्यांचा अगणित नांवें असून असंख्य हत्तींएवढें त्यांचें विपुल बल आहे.

दो०—द्विविद मयंद नील नल अगदादि विकटासि । दधिमुख केहरि कुमुद गव जामवंत बलरासि ।। ५५ ।।

द्विविद, मयंद, नील, अंगद, विकटहास्य, दधिमुख, केसरी, कुमुद, गव, जांबवंतप्रभृति वीर यांना तर बळाच्या नुसत्या वखारीच समजा.

चा०—ए कपि सब सुग्रीवँसमाना ।
इन्ह सम कोटिन्ह गनइ को नाना ।
रामकृपा अ–तुलित–बल तिन्हहीँ ।
तृनसमान त्रैलोकहिँ गनहीँ ।
अस मैँ स्रवन सुना दसकंधर ।
पदुम अठारह जूथप बंदर ।

हे सर्व कपी सुग्रीवतुल्य पराक्रमी आहेत, आणि यांच्यासारखे तेथें कोट्यवधि आहेत. त्यांची गणती तरी कोण करणार ? रामाच्या कृपेनें त्यांना अतुलित बल प्राप्त झालें आहे. त्रैलोक्यास देखील ते तृणतुल्य लेखतात. हे दशकंधरा ! मीं असें ऐकलें आहे कीं, वानरांचे नुसते सेनापतीच निव्वळ अठरा पद्म आहेत.

नाथ कटक महँ सो कपि नाहीँ ।
जो न तुम्हहिँ जीतइ रन माहीँ ।
परमक्रोध मीजहिँ सब हाथा ।
आयसु पै न देहिँ रघुनाथा ।

सरकार ! त्या सैन्यांत असा एकहि वानर नाहीं कीं जो आपणास रणांत पुरून उरणार नाहीं. ते सर्व अत्यंत भयंकर खुमखुमीनें सारखे बोटेंहात चोळीत आहेत. पण रघुनाथ त्यांना फर्मानच देत नाहींत.

सोषहिँ सिंधु सहितझषब्याला ।
पूरहिँ न त भरि कुधर बिसाला ।
मर्दि गर्द मिलवहिँ दससीसा ।
ऐसेइ बचन कहहिँ सब कीसा ।
गर्जहिँ तर्जहिँ सहज असंका ।
मानहुँ ग्रसन चहतहहिँ लंका ।

ते वानर असें बोलत आहेत कीं, मत्स्य, सर्प इत्यादि जलचरांसह सागराला शुष्क करून टाकूं; नाहींतर विशालपर्वत टाकून त्याला भरून काढूं आणि रावणाची गठडी वळून त्याचा चक्काचूर उडवूं. ते जात्याच निःशंक असल्यामुळें गर्जना करून एकमेकांना इरेस पेटवीत आहेत. पाहणारांस वाटतें कीं, जणुं काय ते लंकेला गट्ट करण्याच्याच बेतांत आहेत.

**दो०—सहज सूर कपि भालु सब पुनि सिर पर प्रभु राम । रावन काल कोटि कहुँ जीति सकहिँ संग्राम ॥ ५६ ॥**

सर्व वानर व ऋक्ष जात्याच शूर असून शिवाय त्यांच्या शिरावर श्रीराम आहेत. रावणा ! ते कोट्य-वधि काळांस देखील रणांत जिंकूं शकतील.

चौ०—राम-तेज-बल-बुधि बिपुलाई ।
सेष सहससत सकहिँ न गाई ।
सक सर एक सोखि सत सागर ।
तव भ्रातहिँ पूछेउ नय नागर ।
तासु बचन सुनि सागर पाहीँ ।
माँगत पंथ कृपा मन माहीँ ।

श्रीरामाच्या तेजबलबुद्धिवैपुल्याचें वर्णन सहस्रशत शेषहि करूं शकणार नाहींत. शेंकडों सागरांस देखील रामाचा एकच बाण शुष्क करण्यास समर्थ आहे; परंतु राम नीतिनिपुण व दयावंत असल्यामुळें त्यांनीं बिभीषणास विचारलें. त्याच्या सल्ल्याप्रमाणें ते सागराजवळ वाट मागत आहेत, याचें कारण मात्र त्यांचें ( सागरसंबंधि ) ममत्वच. ''

सुनत बचन बिहँसा दससीसा ।
जौँ असि मति सहायकृत कीसा ।
सहज भीरु कर बचनदृढाई ।
सागर सन ठानी मचलाई ।
मूढ मृषा का करसि बडाई ।
रिपु-बल-बुद्धि-थाह मैँ पाई ।
सचिव सभीत बिभीषनु जा के ।
बिजय बिभूति कहाँ लगि ता के ।

तें भाषण ऐकून रावण हसला आणि म्हणाला, '' अशी अक्कल आहे म्हणून तर वानरांचें साहाय्य घेतलें ! जो जात्याच भेषपात्र त्याची सल्ला ऐकून सागराशीं चापलुशी चालविली आहे ! अरे पागला! व्यर्थ त्यांची बडेजाव काय म्हणून चालविली आहेस ? शत्रूच्या बलाचा आणि बुद्धीचा अदमास मला कळून चुकला. तो डरपोक बिभीषण ज्याचा सचिव त्यास ऐश्वर्य आणि विजय कोठपर्यंत ?

सुनि खलबचन दूतरिस बाढी ।
समय बिचारि पत्रिका काढी ।
रामानुज दीन्ही यह पाती ।
नाथ बँचाइ जुडावहु छाती ।
बिहँसि बामकर लीन्ही रावन ।
सचिव बोलि सठ लाग बचावन ।

रावणाचें तें खवचट भाषण भाषण ऐकून शुका-चाहि संताप वाढला. त्यानें तो मौका साधून आपल्या जवळील पत्रिका पुढें केली व म्हणाला, ''हे स्वामी ! रघुनाथाच्या धाकट्या बंधूनें हा खलिता दिला आहे. तो वाचून आपला जीव निववून घ्या. '' रावणानें हसून तें पत्र डाव्या हातांत घेतलें आणि सचिवास बोलावून त्याचेकडून तो बेरड तें वाचवून घेऊं लागला. ( त्यांतील मजकूर असा )—

**दो०—बातन्ह मनहिँ रिझाइ सठ जनि घालसि कुल खीस । रामविरोध न उबरसि सरन बिष्णु अज ईस ॥ ५७ ॥**

**की तजि मान अनुज इव प्रभु-पद-पंक-ज-भृंग । होहि कि रामसरानल खल कुलसहित पतंग ॥ ५८ ॥**

अरे,तूं शेकाचिल्लीपणानें कोरडी फोकीत झाडण्यांतच

मन रिझवून आपल्या कुळाची राखरांगोळी करून घेऊं नकोस. रामाशीं बाधा पाडून ब्रह्माविष्णुमहेशांनीं जरी तुझा कैवार घेतला, तरीदेखील तुझीं धडगत होणार नाहीं. एकतर बेगुमानपणें बिभीषणाप्रमाणें प्रभुपदकमलीं भृंगाप्रमाणें रत हो, नाहींतर द्वाडा! रामशराग्नींत पतंगाप्रमाणें आपल्या कुळासहित स्वतःची होळी करून घेण्यास तयार हो.

चौ०—सुनत सभय मन मुख मुसुकाई।
कहत दसानन सबहिँ सुनाई।
भूमि परा कर गहत अकासा।
लघु तापस कर बागबिलासा।

पत्रांतल्या त्या कानपिचक्या ऐकून रावण तर मनांत वरमलाच, पण वांझोटा आव आणून त्यानें हस्तदंती दाखविली. तो सर्वांना ऐकूं जाईल अशा-रीतीनें दमदाटी करीत म्हणाला, भूमीवर गळून पड-लेल्या हातानें आकाशास गवसणी घालण्याप्रमाणें ह्या क्षुद्र तापसाची ही मुखमस्ती होय."

कह सुक नाथ सत्य सब बानी।
समुझहु छाडि प्रकृत अभिमानी।
सुनहु बचन मम परिहरि क्रोधा।
नाथ राम सन तजहु बिरोधा।
अतिकोमल रघु-बीर-सुभाऊ।
जद्यपि अखिललोक कर राऊ।
मिलत कृपा तुम्ह पर प्रभु करिहीँ।
उर अपराध न एकउ धरिहीँ।
जनकसुता रघुनाथहि दीजै।
एतना कहा मोर प्रभु कीजै।

तेव्हां शुक म्हणाला, हे स्वामी! झाली ही मखलाशी ठीकच. तरीहि पण आपण आपल्या जा-तीवर जाऊन घमेंडीच्या तावांत न येतां जरा विचार करावा. महाराज! न खवळतां मी बोलतों तें ऐका. रामाशीं दंगल माजवूं नका. श्रीरामचंद्र जरी सर्व लोकांचे राजे आहेत तरी त्यांचा स्वभाव अत्यंतच मुलाम आहे. आपण जाऊन त्यांना भेटतांच ते प्रभु आपल्यावर कृपा करतील, व मनामध्यें आपल्या एकाहि अपराधाचें स्मरण ठेवणार नाहींत. जानकी रघुनाथाला देऊन टाका. महाराज! माझी इतकी बूज आपण राखाच.

जब तेहि कहा देन बैदेही।
चरनप्रहार कीन्ह सठ तेही।
नाइ चरन सिरु चला सो तहाँ।
कृपासिंधु रघुनायक जहाँ।

शुक 'जानकी परत करा' असें म्हणतांच त्या उल्लूनें त्याची पादपूजा केली. तेव्हां शुकदूतानें रावणास(अखेरचा) रामराम ठोकला व तो जो तेथून निघाला तों थेट कृपासागर रघुनाथाकडेच चालता झाला.

करि प्रनामु निजकथा सुनाई।
रामकृपा आपनि गति पाई।
रिषि अगस्ति के साप भवानी।
राच्छस भयेउ रहा मुनि ज्ञानी।

शुकानें रामास प्रणाम करून आपला वृत्तांत कळविला व नंतर रामकृपेनें त्याला आपली पूर्वगति प्राप्त झाली. शंकर म्हणतात, हे पार्वति! हा शुक पूर्वीचा ज्ञानवंत मुनी असून अगस्ति ऋषींच्या शापामुळें राक्षस झालो होता.

बंदि रामपद बारहिँ बारा।
मुनि निजआस्रम कहुँ पगु धारा।

रामचरणीं वारंवार वंदन करून तो शुकमुनी स्वाश्रमीं जाऊन राहिला.

दो०—बिनय न मानत जलधि जड गये
तीनि दिन बीति। बोले राम सकोप
तब भय बिनु होइ न प्रीति ॥५९॥

तीन दिवस सरले तरीहि तो दिवाणा सागर रामचंद्रांचा सविनय सत्याग्रह मानीचना. तेव्हां राम वर्दळीवर येऊन म्हणाले कीं, भीतीखेरीज प्रीति

---

१ शुक हा पूर्वजन्मींचा ब्राह्मण असून त्यानें पुष्कळ राक्षसमेध केलें होते. वज्रदंत नांवाचा राक्षस त्याच्या फार पाठीस लागला होता. अगस्ति मुनी एकदां शुकाच्या आश्रमीं भोजनास आले. ते स्नानास गेले असतां वज्रदंत त्यांच्या रूपानें शुकाकडे येऊन म्हणाला कीं, अजमांस सिद्ध कर. इतकें सांगून तो बाहेर जाऊन गुप्त झाला. पुढें अगस्ति ऋषी येऊन भोजनास बसणार इतक्यांत वज्रदंत पुन्हां स्त्रीवेष घेऊन आला आणि ऋषींस नरमांस वाढून गुप्त झाला. हे पाहून अगस्ति ऋषींनीं 'तूं राक्षस होशील' असा शुकाला शाप दिला. परंतु नंतर ऋषींनीं दिलेल्या उःशापाप्रमाणें त्याचा रामदर्शनानें उद्धार झाला.

नाहीं.[1] ( अर्थात् रास आणण्यास दट्टयाच हवा. )

चौ०—लछिमन बानसरासन आनू ।
सोखऊँ बारिधि बिसिखकृसानू ।
सठ सन बिनय कुटिल सन प्रीती ।
सहज कृपिन सन सुंदर नीती ।
ममतारत सन ज्ञानकहानी ।
अतिलोभी सन बिरति बखानी ।
क्रोधिहिँ सम कामिहिँ हरिकथा ।
ऊसर बीज बये फल जथा ।

लक्ष्मणा ! चापबाण तर आण पाहूं. आपल्या बाणानें समुद्रांतला वडवानलच मी विझवून टाकतों कसा.[2] शठाशीं नम्रता, कुटिलाशीं प्रीति, अभिजात कृपणाशीं सुंदर नीति, मायाबद्धाला ज्ञानबोध, अति-लोभ्याला वैराग्योपदेश, क्रोध्याला शांतिपाठ आणि कामीजनांना हरिकथा म्हणजे खडकाळ जमिनींत बीं पेरून पीक घेण्यासारखेंच होय.

अस कहि रघुपति चाप चढावा ।
यह मत लछिमन के मन भावा ।
संधानेउ प्रभु बिसिख कराला ।
उठी उदधि उर अंतर ज्वाला ।

अस म्हणून रघुपतींनीं धनुष्य चढविलें. हा इरादा लक्ष्मणास मनापासून आवडला.प्रभूंनीं तीक्ष्ण बाणांचें संधान केल्याबरोबर समुद्राच्या अभ्यंतरांतून वडवान-लाची ज्वाला फडकली.

मकर–उरग–झष गन अकुलाने ।
जरत जंतु जलनिधि जब जाने ।
कनकथार भरि मनिगन नाना ।
बिप्ररूप आयउ तजि माना ।

मकर, साप, मत्स्य इत्यादि जलचरसमूह होरपळून व्याकुळ होऊं लागले. हें जेव्हां सागरानें जाणलें तेव्हां मारी मस्ती सोडून ब्राम्हणरूपानें सुवर्णतबकांत नानाविध रत्नें भरून तो नजराणा घेऊन आला.

दो०—काटेहि पइ कदली फरइ कोटि जतन कोउ सींच । बिनय न मान खगेस सुनु डाँटेहि पै नव नीच ॥ ६० ॥

कोट्यवधि प्रकारें जरी पाणी घातलें तरी केळ कापल्यावरच केळीं मिळतात. तसेंच हे गरुडा ! ध्यानांत ठेव कीं कंटक माणूस सुध्या बोलानें रास येत नसतो. त्यास ओवणावयाचें तर फक्कड दाटच भरावयास हवा.

चौ०–सभय सिंधु गहि पद प्रभु केरे ।
छमहु नाथ सब अवगुन मेरे ।
गगन समीर अनल जल धरनी ।
इन्ह कइ नाथ सहज जड करनी ।

तो सागर ( रूपी ब्राह्मण ) भयभीत होऊन प्रभूंचे चरण धरून म्हणाला, हे नाथ ! माझ्या सर्व दोषांची क्षमा करावी. हे प्रभो!पृथ्वी, आप,तेज वायु, आकाश यांची प्रकृति जात्याच बोजड.

तव प्रेरित माया उपजाये ।
सृष्टि हेतु सब ग्रंथन्हि गाये ।
प्रभुआयसु जेहि कहँ जस अहई ।
सो तेहि भाँति रहे सुख लहई ।

आपणच प्रेरित केलेल्या मायेनें ह्या पंचमहाभूतांस निर्माण केलें आहे.सर्व शास्त्रग्रंथ असेंच सांगतात कीं, हीं भूतेंच सृष्टीचें कारण होत. प्रभो ! आपली ज्याला जशी आज्ञा असेल त्याप्रमाणें वागणेंच त्यास सुखाचें होतें.

प्रभु भल कीन्ह मोहि सिख दीन्ही ।
मरजादा पुनि तुम्हरिय कीन्ही ।
ढोल गवाँर सूद्र पसु नारी ।
सकल ताडना के अधिकारी ।

प्रभूंनीं मला शिक्षा लावली हें ठीकच केलें. पण मर्यादाहि आपणच नेमून दिली आहे. नगारा, गवार, शूद्र, पशु आणि स्त्री हीं सर्व शिक्षापात्रच होत.

प्रभुप्रताप मैँ जाब सुखाई ।
उतरिहि कटकु न मोरि बडाई ।
प्रभु आज्ञा अपेल स्रुति गाई ।
करइ सो बेगि जो तुम्हहिँ सुहाई ।

प्रभूंच्या प्रतापानें मी शुष्क होईन आणि सैन्य पार जाईल. परंतु त्यामुळें माझ्या मानास मी आंच-

---

१ आम्हांस वाटतें कीं सत्याग्रहाचें हें मौलिक सूत्र आहे.

२ कवीची ही अजब कल्पना आहे; समुद्र शोषला तर त्यांतले जीव तडफडून मरणार आणि फिरून चिखलांत वानरसैन्य फसणार. त्यापेक्षां वडवानल शोषणें जास्त श्रेयस्कर. त्या योगानें जीव जगतील आणि समुद्राच्या पाण्याच्या वरचा थर गोठला म्हणजे वानरसैन्यास बर्फा-वरून जाण्यास आयतच फावेल.

वेन. प्रभूंची आज्ञा अनुल्लंघनीय आहे असें वेदहि म्हणतात. यावर आपणांस रुचेल तसें सत्वर करावें.

दो०–सुनत बिनीत बचन अति कह कृपाल मुसुकाइ। जेहिं बिधि उतरइ कपि-कटकु तात सो कहहु उपाइ॥ ६१॥

सागराचे ते अत्यंत दीनवाणे बोल ऐकून कृपाळू राम हसून म्हणाले, बाबा रे! ज्या योगानें कपिसैन्य पार होईल अशी एखादी युक्ति सांग.

चौ०–नाथ नील नल कपि दोउ भाई। लरिकाईं रिषि आसिष पाई॥
तिन्हके परस किये गिरि भारे। तरिहहिं जलधि प्रताप तुह्मारे॥
मैं पुनि उर धरि प्रभुप्रभुताई। करिहउँ बलअनुमान सहाई॥

सागर म्हणाला, हे नाथ! नील व नल हे दोघे वानर बंधू असून त्यांना लहानपणींच ऋषींचा आशीर्वाद मिळाला आहे. ह्यांनीं स्पर्श करतांच प्रचंड पर्वतहि आपल्या कृपेनें पाण्यावर तरतील. तसेंच मीहि प्रभुप्रतापाची आठवण ठेवून शक्त्यनुसार सहाय्य करीन.

एहि बिधि नाथ पयोधि बँधाइय। जेहि यह सुजसु लोक तिहुँ गाइय॥
एहि सर मम उत्तर–तट–बासी। हतहु नाथ खल नर अघरासी॥

हे नाथ! ह्याप्रमाणें समुद्र बांधून काढा. तेणेंकरून आपलें सुयश त्रैलोक्य गात राहील. आतां ह्या बाणानें माझ्या उत्तर किनाऱ्यावर रहाणाऱ्या पापराशी खलांचा नायनाट व्हावा.

सुनि कृपाल सागर--मन--पीरा। तुरतहि हरी राम रनधीरा॥
देखि राम--बल--पौरुष भारी। हरषि पयोनिधि भयउ सुखारी॥
सकलचरित कहि प्रभुहि सुनावा। चरन बंदि पाथोधि सिधावा॥

हें ऐकून दयाघन रणधीर रामांनीं समुद्राच्या मानसिक व्यथेचा त्वरित परिहार केला. रामाचें तें अक्षोभ बल आणि पौरुष पाहून समुद्र हर्षित होऊन सुखी झाला. त्यानें (उत्तरतटवासीयांचा) सर्व इतिहास प्रभूस निवेदन केल्यानंतर तो रामचरणीं वंदन करून निघून गेला.

छंद–निज भवन गवँनेउ सिंधु श्री-रघुपतिहि यह मत भायऊ। यह चरित कलि-मल-हर जथामति दास तुलसी गायऊ॥ सुखभवन संसयसमन दमन-विषाद रघु-पति-गुन-गना। तजि सकल आसभरोस गावहि सुनहि संतत सठ मना॥ ६॥

सागर स्वस्थानीं गेला. त्याचें मत रघुपतीस पसंत पडलें. हें कलिमलहारक चरित्र मीं तुलसीदासानें यथामति गायिलें आहे. रघुपतीचे गुणगण सुखाचें माहेरघर असून संशय आणि दुःख यांस नष्ट करणारे आहेत. अरे वेड्या ओढाळा मना! सर्व आशा आणि अवलंब सोडून त्यांचेंच निरंतर श्रवण आणि गायन कर.

दो०–सकल–सु–मंगल–दायक रघु-नायक-गुन-गान। सादर सुनहिं ते तरहि भव सिंधु बिना जलजान॥ ६२॥

रघुनायकांचें गुणगान सर्वसुमंगलदायक आहे. त्याचें जे आदरपूर्वक श्रवण करितात ते हा भवसिंधु जलयानविनादेखील तरून जातील (अशक्य-देखील शक्य होईल हा भाव.)

॥ इति श्रीरामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने ज्ञानसम्पादनो नाम पञ्चमः सोपानः समाप्तः॥

---

१ नलनीलांनीं नदीवरील ऋषींच्या स्नानाचे दगड रोज उचलून नदींत फेंकून द्यावे. यामुळें ऋषी त्रासले, परंतु हे अज्ञान आहेत असें जाणून व त्यांचें कौतुक करून ऋषींनीं त्यांस आशीर्वाद दिला कीं तुह्मीं फेंकलेले दगड पाण्यावर तसेच तरंगत रहातील.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

। श्रीजानकीवल्लभो विजयते ।

# ॥ रामचरितमानस ॥

## अर्थात्

## ॥ श्रीतुलसीरामायण ॥

( मराठी भाषांतरासहित. )

# ( षष्ठ सोपान )

( लङ्काकाण्ड )

श्लोकाः

रामं कामारिसेव्यं भवभयहरणं कालमत्तेभसिंहं । योगीन्द्रज्ञानगम्यं गुणनिधिमजितं निर्गुणं निर्विकारम् ॥ मायातीतं सुरेशं खलवधनिरतं ब्रह्मवृन्दैकदेवं । वन्दे कुन्दावदातं सरसिजनयनं देवमूर्वीशरूपम् ॥ १ ॥

कामदेवाचा शत्रु जो शंकर त्याचाहि सेव्य, भवभयाचें हरण करणारा, कालरूप मत्तगजाचें दमन करणारा सिंह, ज्ञानद्वारा योगींद्रांना प्राप्त होणारा, गुणसागर, अजित, निर्गुण, निर्विकार, मायातीत, देवाधिदेव, खलवधनिरत, ब्रह्मवृंदांचें अद्वितीय दैवत, कुंदास लाजविणारा, कमलनेत्र, नरभूपरूपी असा जो ईश्वर श्रीराम त्यास मी वंदन करितों.

शङ्खेन्द्वाभमतीवसुन्दरतनुं शार्दूलचर्म्माम्बरं । कालव्यालकरालभूषणधरं गङ्गाशशाङ्कप्रियम् । काशीशं कलिकल्मषौघशमनं कल्याणकल्पद्रुमं । नौमीड्यं गिरिजापतिं गुणनिधिं कन्दर्पहं शङ्करम् ॥ २ ॥

शंख आणि चंद्र ह्यांच्याप्रमाणें शुभकांति, लावण्यधाम, व्याघ्रचर्म परिधान करणारा, काळसर्पांचें भयंकर भूषण धारण करणारा, भागीरथी आणि चंद्रमा प्रियं असलेला, कालिसंबंधीं पापांचा ओघ खुंटविणारा, कल्याणांचा कल्पद्रुम, मदनाचें दहन करणारा असा, काशीपती पार्वतीरमण गुणनिधान सकलवंद्य जो शंकर त्यास मी वंदन करितों.

यो ददाति सतां शम्भुः कैवल्यमपि दुर्लभम् । खलानां दण्डकृद्योऽसौ शङ्करः शं तनोतु माम् ॥ ३ ॥

जो सज्जनांना दुर्लभ मोक्षाचीहि प्राप्ति करून देतो आणि दुष्टांना शासन करितो तो शंकर माझें कल्याण करो.

दो०—लव निमेष परमान जुग बरष कल्प सर चंड । भजसि न मन तेहि राम कहँ काल जासु कोदंड ॥ १ ॥

लव, निमेष, परिमाणु, युग, वर्ष, कल्प हे ज्याचे प्रखर बाण असून काल हेंच ज्याचें धनुष्य होय त्या रामचंद्रास, हे मना, तूं भजत नाहींस ना रे ?

सो०—सिंधुबचन सुनि राम सचिव बोलि प्रभु अस कहेउ । अब बिलंबु केहि काम करहु सेतु उतरइ कटक ॥ १ ॥

तें सागराचें वचन ऐकल्यानंतर सुग्रीवादि सचिवांस पाचारण करून प्रभु रामचंद्र म्हणाले, आतां उगीचच दिरंगाई ती काय काय म्हणून ? सेतु बांधा, म्हणजे सैन्य सहजच सागर पार होईल.

**सो०–सुनहु भानु–कुल–केतु जामवंत कर जोरि कह। नाथ नाम तव सेतु नर चढि भवसागर तरहिँ ॥ २ ॥**

जांबवंत हात जोडून म्हणाला, हे भानुकुलकेतो स्वामिन्! ऐका. आपलें नांवच सेतूप्रमाणें आहे. त्या सेतूवरून नर भवसागरहि तरून जातात.

चौ०–यह लघु जलधि तरत कति बारा।
अस सुनि पुनि कह पवनकुमारा।
प्रभुप्रताप बडवानल भारी।
सोखेउ प्रथम पयो–निधि--बारी।
तव रिपु--नारि--रुदन--जल--धारा।
भरेउ बहोरि भयउ तेहि खारा।

मग हा थिल्लिर समुद्र तरून जाण्यास कितीसा वेळ लागणार आहे? तें ऐकून मारुति म्हणाला, प्रभुप्रतापरूप प्रखर वडवानलानें पूर्वींच समुद्राचें पाणी आटून टाकलें होतें. परंतु आपल्या शत्रूंच्या स्त्रियांच्या दुःखाश्रुधारांनीं तो पुन्हां भरला. याची खूण त्याचाच हल्लींचा खारटपणा.

सुनि अतिउक्ति पवनसुत केरी।
हरषे कपि रघु--पाति तन हेरी।
जामवंत बोले दोउ भाई।
नल नीलहिँ सब कथा सुनाई।
रामप्रताप सुमिरि मन माहीँ।
करहु सेतु प्रयास कछु नाहीँ।

हनुमंताची ती अतिशयोक्ति ऐकून रामचंद्र हर्षित झाले व मारुतीकडे पाहूं लागले. नंतर जांबवंतानें नल आणि नील ह्या उभय बंधूंस बोलावून त्यांना सर्व वृत्तांत सांगितला. तो म्हणाला, रामप्रतापाचें मनांत स्मरण करून सेतु तयार करा. यांत तुम्हांला दिक्कतीचा प्रश्नच नाहीं.

बोलि लिये कपिनिकर बहोरी।
सकल सुनहु बिनती कछु मोरी।
राम–चरन–पंकज उर धरहू।
कौतुक एक भालु कपि करहू।
धावहु मरकट बिकटबरूथा॥
आनहु बिटप गिरिन्ह के जूथा।

नंतर त्यानें सर्व वानरमंडळींना बोलावून सांगितलें कीं, सर्वांनीं माझी एक विनंति ऐकावी. हे ऋक्षवानर हो! रामचरणकमलांना हृदयांत धरून आपण एका मोठ्याच अवटित कार्यास हात घालूं. तुम्ही सर्व समर्थ वानरमंडळी धांवत जाऊन अनेक वृक्ष आणि पर्वत उचलून आणा.

सुनि कपि भालु चले करि हू हा।
जय रघुबीर प्रतापसमूहा।

तें ऐकतांच वानर आणि ऋक्ष मंडळी ‘हू हू हा हा’ करीत व रघुवीरांच्या नानाविध प्रतापांचा जयघोष करीत निघाली.

**दो०–अतिउतंग तरुसैलगन लीलहिँ लेहिँ उठाइ। आनि देहिँ नल नीलहिँ रचहिँ ते सेतु बनाइ ॥२॥**

अत्यंत उंच असे अनेक वृक्षपर्वत लीलेनें उपटून घेऊन, ऋक्षवानरमंडळी आणीत व नलनील त्यांचा सेतु रचीत.

चौ०–सैल बिसाल आनि कपि देहीँ।
कंदुक इव नल नील ते लेहीँ।
देखि सेतु अति सुंदर–रचना।
बिहँसि कृपानिधि बोले बचना।
परम रम्य उत्तम यह धरनी।
महिमा अमित जाइ नाहि बरनी।
करिहउँ इहाँ संभुथापना।
मोरे हृदय परम कलपना।

वानरमंडळी विशाल पर्वत आणून देत; ते नल-नील चेंडूप्रमाणें झेलीत. त्या सेतूची अत्यंत सुंदर घडण पाहून कृपानिधि रामचंद्र हास्य करून म्हणाले, हा प्रदेश सर्वोत्कृष्ट असून अत्यंत रमणीय आहे. याचा अपार महिमा अवर्णनीय आहे. माझ्यां हृदयांत येथें शंकराची स्थापना करावी अशी अत्यंत उत्कट लालसा आहे.

सुनि कपीस बहु दूत पठाये।
मुनिबर सकल बोलि लेइ आये।
लिंग थापि बिधिवत करि पूजा।
सिवसमान प्रिय मोहि न दूजा।
सिवद्रोही मम भगत कहावा।
सो नर सपनेहु मोहि न पावा।
संकरबिमुख भगति चह मोरी।
सो नारकी मूढ मति थोरी।

सुग्रीवानें तें ऐकतांच अनेक दूत पाठवून सर्व मुनीश्वरांना तेथें बोलावून आणलें. प्रभूंनीं लिंग-

स्थापना करून विधियुक्त पूजा केली व म्हणाले कीं, " मला शंकराप्रमाणें इतर कोणीहि प्रिय नाहीं. जो शिवद्रोही असून माझा भक्त म्हणवीत असेल अशा नराला माझी कधींहि प्राप्ति होणार नाहीं. शंकर-विन्मुख असून जो माझ्या भक्तीची अपेक्षा करीत असेल तो मंतिमंद मूढ नरकाचाच अधिकारी होतो.

दो०–संकरप्रिय मम द्रोही सिवद्रोही मम दास । ते नर करहिँ कलप भरि घोर नरक महँ बास ॥ ३ ॥

जे शंकराप्रिय असून माझा द्रोह करितात अगर शंकराचा द्रोह करून माझी भक्ति करितात असे नर कल्पपर्यंत घोर नरकामध्यें पचत राहतात.

चौ०–जो रामेस्वरदरसन करिहहिँ ।
ते तनु तजि हरिलोक सिधरिहहिँ ।
जो गंगाजल आनि चढाइहि ।
सो सायुज्य मुक्ति नर पाइहि ।
होइ अकाम जो छल तजि सेइहि ।
भगति मोरि तेहि संकर देइहि ।
मम कृत सेतु जो दरसन करिहीं ।
सो बिनु स्रम भवसागर तरिहीं ।
रामबचन सब के जिय भाये ।
मुनिबर निज निज आस्रम आये ।

जे रामेश्वराचें दर्शन घेतील ते देहावसान झाल्यावर वैकुंठाला जातील. जे रामेश्वरावर भागीरथी आणून घालतील त्यांना सायुज्यमुक्ति प्राप्त होईल. जो निष्कामपणें व शुद्ध बुद्धीनें रामेश्वराची सेवा करील त्याला शंकर माझी भक्ति देतील. जो माझ्या या सेतूचें दर्शन घेईल तो अनायासें भवसागर तरून जाईल. " हें रामाचें वचन सर्वांच्या हृदयाला मानवलें. नंतर मुनिश्रेष्ठ आपापल्या आश्रमीं परत गेले.

गिरिजा रघुपति कै यह रीती ।
संतत करहिँ प्रनत पर प्रीती ।

शंकर म्हणतात, हे पार्वति ! भक्तजनांवर निरंतर प्रेम करणें हा रामचंद्रांचा स्वभावच आहे.

बाँधेउ सेतु नील नल नागर ।
रामकृपा जसु भयउ उजागर ।
बूडहिँ आनहिँ बोरहिँ जेई ।
भये उपल बोहित सम तेई ।
महिमा यह न जलधि कै बरनी ।
पाहन गुन न कपिन्ह कै करनी ।

नीलनलांनीं कुशलतेनें सेतु बांधला आणि रामकृपेनें त्यांचें यश सर्वत्र पसरलें. जे स्वतः पाण्यात बुडतात आणि दुसऱ्यालाहि बुडवितात ते पाषाण नावेप्रमाणें समुद्रावर तरंगूं लागले, हा कांहीं समुद्राचा महिमा नव्हे किंवा पाषाणाचाहि गुण नव्हे, अगर कपींचेंहि कर्तृत्व नव्हे.

दो०–श्री–रघु–बीर–प्रताप तेँ सिंधु तरे पाषान । ते मतिमंद जे राम तजि भजहिँ जाइ प्रभु आन ॥ ४ ॥

श्रीरघुवीराच्याच प्रतापेंकरून पाषाण समुद्रावर तरंगूं लागलें. जे अशा रामाला सोडून इतर प्रभूचें भजन करितात ते मतिमंद होत.

चौ०–बाँधि सेतु अति सुदृढ बनावा ।
देखि कृपानिधि के मन भावा ।
चली सेन कछु बरनि न जाई ।
गरजहिँ मरकट–भट–समुझाई ।
सेतुबंध ढिग चढि रघुराई ।
चितव कृपाल सिंधुबहुताई ।
देखन कहँ प्रभु करुनाकंदा ।
प्रगट भये सब जल–चर–बृंदा ।

तो अतिशय मजबूत असा सेतु बांधलेला पाहून दयानिधि रामचंद्र मनांत प्रसन्न झाले. त्याचेवरून सेना जाऊं लागली. तें दृश्य वर्णन करणें शक्य नाहीं. वानरवीरांचे समुदाय गर्जना करूं लागले. त्या सेतुबंधावर चढून कृपालु रघुराज समुद्राचा अफाटपणा पाहूं लागले. करुणाकंद प्रभूचें दर्शन घेण्यासाठीं अनेक जलचरांचे समुदाय पाण्यावर तरंगूं लागले.

मकर नक्र झख नानाब्याला ।
सत–जोजन–तन परमबिसाला ।
ऐसेउ एक तिन्हहि जे खाहीँ ।
एकन्ह के डर तेपि डेराहीँ ।
प्रभुहिँ बिलोकहिँ टरहिँ न टारे ।
मन हरषित सब भये सुखारे ।

त्यांमध्यें अत्यंत विशाल, शतयोजनविस्तीर्ण, नक्र, मगर, सर्प, मत्स्य वगैरे एक दुसऱ्यास खाणारे आणि तिसऱ्यास भिणारे असे अनेक जलचर होते. त्या सर्वांचीच दृष्टि प्रभूंवर खिळून गेली. ते सारले तरीहि सरेनात इतकी त्यांची त्या आनंदांत सुखावस्था झाली होती.

तिन्ह की ओट न देखिय बारी ।
मगन भये हरिरूप निहारी ।
चला कटक कछु बरनि न जाई ।
को कहि सक कपि–दल–बिपुलाई ।

रामदर्शनानें ते इतके तल्लीन झाले होते. त्या जलचरांच्या खालचें समुद्राचें पाणीदेखील दिसेना. वानरसैन्याच्या कुचाचें वर्णन करणें शक्य नाहीं. कारण त्या कपिसैन्याची शिरगणति कोणास होणार ?

**दो०–सेतुबंध भइ भीर अति कपि नभपंथ उडाहिँ । अपर जलचरन्हि ऊपर चढि चढि पारहिँ जाहिँ ॥ ५ ॥**

जलचरांची सेतुबंधावर फारच गर्दी झाली तेव्हां कपी आकाशमार्गानें उडून जाऊं लागले. कित्येक तर जलचरांच्या पाठीवर पाय देऊनहि पलीकडे जात.

चौ०–अस कौतुक बिलोकि दोउ भाई ।
बिहँसि चले कृपाल रघुराई ।
सेनसहित उतरे रघुबीरा ।
कहि न जाइ कपि–जूथप–भीरा ।
सिंधुपार प्रभु डेरा कीन्हा ।
सकल कपिन्ह कहँ आयसु दीन्हा ।

ते उभयबंधू तें मनोज्ञ दृश्य सारखें पहात होते. दयाघन रघुराय तर हास्य करीतच चालूं लागले. रघुवीर सैन्यासहित पलीकडे जाऊन उतरले. वानरगणांची गर्दी सांगतां पुरवत नाहीं. सागराच्या पैलतीरीं प्रभूंनीं तळ देऊन सर्व कपींना आज्ञा केली कीं—

खाहु जाइ फल मूल सुहाये ।
सुनत भालु कपि जहँ तहँ धाये ।
सब तरु फरे रामहित लागी ।
रितु अनरितु अकालगति त्यागी ।
खाहिँ मधुरफल बिटप हलावहिँ ।
लंका सनमुख सिखर चलावहिँ ।

आतां तुह्मी जा आणि यथेष्ट फलमूलादिक खा. तें ऐकताच ऋक्ष–वानर चोहोंकडे धांवत सुटले. रामचंद्रासाठीं सर्व वृक्ष, ऋतु–अऋतु–काल–अकाल, वगैरे कांहींहि न पहातां फलसमृद्ध झाले. ते वानर मधुर फळें खात व झाडें हालवीत, आणि लंकेवर पर्वतशिखरें भिरकावून देत.

जहँ कहुँ फिरत निसाचर पावहिँ ।
घेरि सकल बहु नाच नचावहिँ ।
दसनन्हि काटि नासिका काना ।
कहि प्रभुसुजस देहिँ तब जाना ।

ते फिरत असतां जेथें त्यांस राक्षस आढळत तेथें सर्वजण हुल्लड मचवून त्यांस नाचवून सोडीत, आणि दातांनीं त्यांचे नाककान चावून टाकीत. राक्षस जेव्हां रामाचें यशवर्णन करीत तेव्हां मात्र ते त्यांना सोडून देत.

जिन्ह कर नासा कान निपाता ।
तिन्ह रावनहिँ कही सब बाता ।
सुनत स्रवन बारिधि बंधाना ।
दसमुख बोलि उठा अकुलाना ।

ज्यांचे नाककान कापले गेले ते राक्षस रावणाकडे येऊन यथेच्छ कागाळ्या करीत. ‘ समुद्र बांधून काढला ’ हे शब्द मात्र कानीं पडतांच रावणाचें धाबें दणाणलें आणि तो बरळतच उठला—

**दो०–बाँधे बननिधि नीरनिधि जलधि सिंधु बारीस । सत्य तोयनिधि कंपती उदधि पयोधि नदीस ॥ ६ ॥**

( प्रत्येक तोंडानें एक एक नांव घेऊन तो रावण म्हणाला) बननिधि, नीरनिधि, जलधि, सिंधु, वारीश, तोयनिधि, सागर, उदधि, पयोधि, नदीश खरोखरीच बांधला काय ?

चौ०–व्याकुलता निज समुझि बहोरी ।
बिहँसि चला गृह करि भय भोरी ।
मंदोदरी सुनेउ प्रभु आयो ।
कौतुकहीं पाथोधि बँधायो ।
कर गहि पतिहि भवन निज आनी ।
बोली परममनोहर बानी ।

फिरून आपण अगदींच भेदरलों हें त्याच्या लक्षांत येऊन तो ( वरकरणी ) हंसला; परंतु भयानें भांबावल्यामुळें तो मंदिरांत निघून गेला. सहजलीलेनें समुद्रावर सेतु बांधून प्रभु आले हें वर्तमान मंदोदरीनेंहि ऐकिलें. तेव्हां तिनें हात धरून पतीला आपल्या मंदिरांत आणलें व अत्यंत प्रेमळ वाणीनें ती बोलूं लागली—

चरन नाइ सिरु अंचल रोपा ।
सुनहु बचन पिय परिहरि कोपा ।
नाथ बैर कीजे ताही सोँ ।
बुधि बल सकिय जीति जाही सोँ ।

तुम्हहिँ रघुपतिहिँ अंतर कैसा।
खल खद्योत दिनकरहिँ जैसा।

पतिचरणीं मस्तक ठेवून आणि पदर पसरून ती म्हणाली, हे प्राणनाथ! मजवर रुष्ट न होतां मी म्हणतें तें ऐकावें. हे प्रभो! बुद्धीनें आणि पराक्रमानें ज्याला आपण जिंकूं शकूं अशाशींच वैर करावें. क्षुद्र खद्योत आणि सूर्य यांच्यामध्यें जितकें अंतर तितकेंच तें आपणांत आणि रामचंद्रांत आहे.

अतिबल मधु कैटभ जेहिं मारे।
महाबीर दितिसुत संहारे।
जेइ बालि बाँधि सहसभुज मारा।
सोइ अवतरेउ हरन महिभारा।
तासु बिरोध न कीजिय नाथा।
काल करम जिव जा के हाथा।

ज्यानें ( हयग्रीवावतारीं ) अत्यंत बलाढ्य अशा मधु आणि कैटभ दैत्यांचा वध केला, (नृसिंहावतारीं) महाबलाढ्य हिरण्यकशिपूचा संहार केला, ज्यानें ( वामनावतारीं ) बलीस बांधून ( परशुरामावतारीं ) कार्तवीर्यअर्जुनाचा निःपात केला, तोच आतांहि भूभारहरणासाठीं अवतरला आहे. हे प्राणनाथ! काल, कर्म आणि जीव हेदेखील ज्याचे स्वाधीन असतात त्याच्याशीं आपण विरोध वाढवूं नये.

दो०—रामहिँ सौँपिय जानकी नाइ
कमलपद माथ। सुत कहँ राजु समर्पि
बन जाइ भजिय रघुनाथ ॥ ७ ॥

रामचरणकमलीं मस्तक ठेवून त्यांस जानकी परत द्यावी, आणि पुत्राला राज्य समर्पण करून आपण वनांत जाऊन रघुनाथाचें भजन करीत असावें.

चौ०—नाथ दीनदयाल रघुराई।
बाघउ सनमुख गये न खाई।
चाहिय करन सो सब करि बीते।
तुम्ह सुर असुर चराचर जीते।

वाघास शरण गेलें असतां तोदेखील खात नाहीं; मग हे नाथ! रघुराज तर गरीबांचे वालीच आहेत. आपला हावरा स्वभाव आपण मनमुराद पुरवून घेतला. आपण देवदैत्यांसकट चराचर विश्वदेखील आपल्या हुकमतींत आणून सोडलें.

संत कहहिँ असि नीति दसानन।
चौथे पन जाइहि नृप कानन।
तासु भजन कीजिय तहँ भरता।
जो करता पालक संहरता।
सोइ रघुबीर प्रनतअनुरागी।
भजहु नाथ ममता सब त्यागी।

हे दशानना! वार्धक्यावस्थेंत राजानें अरण्यांत जावें हाच परमार्थबोध संतांनीं कथन केला आहे. तेथें जाऊन ज्या उत्पत्तिस्थितिलयकर्त्या प्रभूचें भजन करावयाचें, हे पतिराज! तोच हा शरणागतवत्सल रघुवीर होय. हे नाथ, सर्व ममत्व सोडून त्याचीच भक्ति करा.

मुनिबर जतन करहिँ जेहि लागी।
भूप राज तजि होहिँ बिरागी।
सोइ कोसलाधीस रघुराया।
आयउ करन तोहि पर दाया।
जो पिय मानहु मोर सिखावन।
होइ सुजसु तिहुँपुर अतिपावन।

ज्याच्या प्राप्तीस्तव मुनीश्वर परिश्रम करितात व राजे राज्याचा त्याग करून विरक्त होतात, तोच हा कोशलेश्वर रघुराय आपणांवर कृपा करण्याकरितां आपण होऊन आला आहे. माझी प्रार्थना जर आपण मान्य कराल तर त्रैलोक्यांत आपली अत्यंत पवित्र कीर्ति गाजेल.

दो०—अस कहि लोचन बारि भरि गहि
पद कंपितगात। नाथ भजहु रघु-बीर-
पद अचल होइ अहिवात ॥ ८ ॥

असें म्हणतांच मंदोदरीचे नेत्र अश्रूंनीं भरून आले, व अंगास कंप सुटून तिनें रावणाचे चरण धरिले. ती फिरून म्हणाली, हे नाथ! आपण राघवचरणीं शरण गेल्यानें असीम सौभाग्याची मी धनीण बनेन.

चौ०—तब रावन मयसुता उठाई।
कहइ लाग खल निज प्रभुताई।
सुनु तैँ प्रिया बृथा भय माना।
जग जोधा को मोहि समाना।
बरुन कुबेर पवन जम काला।
भुजबल जितेउँ सकल दिगपाला।
देव दनुज नर सब बस मोरे।
कवन हेतु उपजा भय तोरे।

नंतर मंदोदरीला उचलून तो दुरात्मा रावण तिच्यापुढें आपला प्रभाव वर्णन करूं लागला. तो

म्हणाला, प्रिये ! ऐक. तूं उगीचच भीत आहेस. या जगांत माझ्या तोलाचा योद्धा कोण आहे ? वरुण, कुबेर, वायु, यम, काल इत्यादि सर्व दिक्पालांस देखील मीं आपल्या बाहुबलानें जेरीस आणलें आहे. सव देव, दैत्य आणि नर माझ्या पक्के मुठींत असतां तुला धडकी भरण्याचें कारणच काय ?

नाना बिधि तेहि कहेसि बुझाई ।
सभा बहोरि बैठ सो जाई ।
मंदोदरी हृदय अस जाना ।
कालबिबस उपजा अभिमाना ।

रावणानें नानाप्रकारें सांगून तिची समजूत घातली व नंतर तो सभेमध्यें जाऊन बसला. मंदोदरीनें मनांत विचार केला कीं, गर्वाचा हा वाढता पगडा म्हणजे मृत्यूची मगरमिठीच.

सभा आइ मंत्रिन्ह तेहि बूझा ।
करब कवनि बिधि रिपुसैँ जूझा ।
कहहिँ सचिव सुनु निसि-चर-नाहा ।
बार बार प्रभु पूछहु काहा ।
कहहु कवन भय करिय बिचारा ।
नर कपि भालु अहार हमारा ।

सभेमध्यें जाऊन रावण मंत्र्यांना विचारूं लागला कीं, आतां कोणत्या प्रकारें शत्रूशीं झुंझ द्यावी ? तेव्हां सचिव म्हणाले, हे राक्षसाधिपते स्वामिन् ! आपण हे पुनःपुनः कां विचारीत आहांत ? आपणच सांगा कीं, ह्यांत विचार करण्याजोगें भिण्यासारखें काय आहे ? नर, कपि, भालु हा तर आमचा साधा खुराक आहे.

**दो०—बचन सबहिँ के स्रवन सुनि कह प्रहस्त कर जोरि । नीतिबिरोध न करिय प्रभु मंत्रिन्ह मति अतिथोरि ॥९॥**

सर्वांचीं भाषणें ऐकल्यानंतर रावणपुत्र प्रहस्त हात जोडून म्हणाला, " हे प्रभो ! नीतीशीं विरोध करूं नये. ह्या मंत्र्यांची बुद्धि अगदींच नादार झाली आहे.

चौ०—कहहिँ सचिव सब ठकुर सोहाती ।
नाथ न पूर आव एहि भाँती ।
बारिधि नाँघि एक कपि आवा ।
तासु चरित मन महँ सब गावा ।
छुधा न रही तुह्महिँ तब काहू ।
जारत नगर कस न धरि खाहू ।

हे सव मंत्री रामा रे दाऽऽजी बनले आहेत. महाराज ! अशा अड खाण्यानें गुजर व्हावयाची नाहीं. केवळ एकटा एक वानर समुद्र ओलांडून आला तर त्याच्या साध्या गमजांनींच हे सर्वजण मनांतल्या मनांत दडपून गेले होते. तो सगळी नगरी जाळीत होता तेव्हां तुम्हीं कोणीं त्याला धरून कां बरें गिळला नाहीं ? कीं त्या वेळीं तुम्हा मंडळींना क्षुधाच लागली नव्हती ?

सुनत नीक आगे दुख पावा ।
सचिवन्ह अस मत प्रभुहिँ सुनावा ।
जेहि बारीस बँधायउ हेला ।
उतरेउ सेन समेत सुबेला ।
सो भनु मनुज खाब हम भाई ।
बचन कहहिँ सब गाल फुलाई ।

ऐकण्यास मधुर परंतु परिणामीं दुःखावह असा सल्ला मंत्र्यांनीं महाराजांस दिला आहे. ज्यानें लीलेनें समुद्राला बांधून काढून सैन्यासकट सुवेल पर्वतावर ज्यानें आपला तळ ठोकला त्याला तुम्ही सर्वजण जीभ लांब करून म्हणत आहां कीं तो एर्वीतेर्वी माणूसच आहे, आणि ह्मणून तो तुमची खुराक असणारच. भले फक्कड गडी !

तात बचन मम सुनु अतिआदर ।
जानि मन गुनहु मोहि करि कादर ।
प्रियबानी जे सुनहिँ जे कहहीँ ।
ऐसे नर निकाय जग अहहीँ ।
बचन परमहित सुनत कठोरे ।
सुनहिँ जे कहहिँ ते नर प्रभु थोरे ।
प्रथम बसीठ पठव सुनु नीति ।
सीता देइ करहु पुनि प्री[illegible] ।

बाबा ! माझें भाषण आ[illegible]ण अत्यंत लक्षपूर्वक श्रवण करा. मला डरपोक समजूं नका. खुषमस्करी करणाऱ्या आणि ऐकणाऱ्या लोकांचाच जगांत भरणा जास्त. अत्यंत हितावह परंतु ऐकण्यांत 'एक घाव दोन तुकडे' असें भाषण करणारे व ऐकणारे महात्मे मात्र फारच विरळ. आपण आपला वकील पाठवावा व सीतेला परत पाठवून साम करावा हीच गोष्ट आतां पहिल्या दर्जाची नीति समजा.

**दो०—नारि पाइ फिरि जाहिँ जौँ तौ न बढाइय रारि । नाहिँ त सनमुख समर महि तात करिय हठि मारि ॥१०॥**

सीतेला घेऊन जर शत्रू मुकाट्यानें परत जातील तर त्यांच्याशीं वितुष्ट वाढवूं नये, आणि इतक्यावर देखील जर ते पीळच खातील तर रणांगणांत त्यांच्या छातीस छाती भिडवून त्यांचेवर निकरानें गिल्ला करावा, आणि त्यांना यथेष्ट चोपून काढावें.

चौ०–यह मत जौं मानहु प्रभु मोरा ।
उभय प्रकार सुजस जग तोरा ।

हे प्रभो, हा माझा सल्ला जर आपण मान्य कराल तर दोन्हीहि प्रकारें आपली जगांत कीर्तिच होईल. ''

सुत सन कह दसकंठ रिसाई ।
असि मति सठ केहि तोहि सिखाई ।
अबही तें उर संसय होई ।
बेनुमूल सुत भयउ घमोई ।

एव्हांपासूनच तुझ्या मनाची ही अगरमगर होऊं लागली काय रे कारट्या ? वेळूच्या मूळांत तूं तर पक्का फूसच[1] निपजलास !' फिरून जास्त ताव खाऊन रावण म्हणाला ' अरे नामर्दा ! ही कुरटी बुद्धि शिकविणारा तुला पंतोजी तरी कोण मिळाला ?

सुनि पितुगिरा परुष अतिघोरा ।
चला भवन कहि वचन कठोरा ।
हितमत तोहि न लागत कैसे ।
कालबिबस कहुँ भेषज जैसे ।

पित्याची ती अत्यंत फटकळ आणि कुचकी भाषा ऐकून प्रहस्त म्हणाला, '' आसन्नमरणाला ज्याप्रमाणें औषधाचा वीट वाटतो तसाच माझा हितकर सल्लाहि आपणांस रुचत नाहीं. '' असें सडेतोड बोलून तो आपल्या मंदिराप्रत चालता झाला.

संध्यासमय जानि दससीसा ।
भवन चलेउ निरखत भुजबीसा ।
लंका सिखर उपर आगारा ।
अति बिचित्र तहँ होइ अखारा ।
बैठ जाइ तेहि मंदिर रावन ।
लागे किन्नर गुनगन गावन ।
बाजहिं ताल पखाउज बीना ।
नृत्य करहिँ अपछरा प्रबीना ।

[1] हा एक किडा आहे. तो कळकांचीं बेटें मूळांतच जाळतो.

संध्यासमय जाणून रावण आपल्या वीस बाहूंकडे पहातपहात रंगमहालांत पोंचला. लंकेच्या शिखरावर एक चित्रविचित्र विलासस्थान होतें. तेथें कलावंतांची मजलस भरत असे. त्या मंदिरांत रावणानें जाऊन बसावें आणि किन्नरांनीं तेथें कव्वाली करावी, आणि ताल, पखवाज, वीणा इत्यादि वाद्यांवर अप्सरांनीं तोफा नाच दाखवावा.

**दो०–सुनासीर–सत–सरिस सोइ संतत करइ बिलास । परम–प्रबल–रिपु सीस पर तदपि न कछु मन त्रास ॥ ११ ॥**

इंद्राच्या शतपट ही ऐयाशी रावणाची बेखटके चालू असे. एव्हांनादेखील एवढा अजस्र गनीम डोक्यावर असतांहि त्याच्या मनांत रेसभर देखील घम म्हणून कशी ती उबली नाहीं.

चौ०–इहाँ सुबेल सैल रघुबीरा ।
उतरे सेनसहित अतिभीरा ।
सैलसृंग एक सुंदर देखी ।
अतिउतंग सम सुभ्र बिसेखी ।
तहँ तरु–किसलय–सुमन सुहाये ।
लछिमन रचि निज हाथ डसाये ।
तां पर रुचिर मृदुल मृगछाला ।
तेहि आसन आसीन कृपाला ।

इकडे रघुवीर सेनेसहवर्तमान अत्यंत धामधुमीनें सुवेल पर्वतावर उतरले. त्याचें एक शिखर अति उंच, सपाट, आणि अगदीं स्वच्छ मोकळें असें होतें. तेथें लक्ष्मणानें स्वहस्तानें सुंदर पत्रपुष्पांची बिछायत तयार केली, आणि तिजवर सुंदर आणि मृदु असें मृगचर्म अंथरलें. त्या आसनावर दयाघन रामचंद्र विराजमान झाले.

प्रभु कृतसीस कपीसउछंगा ।
बाम दहिन दिसि चाप निषंगा ।
दुहुँ करकमल सुधारत बाना ।
कह लंकेस मंत्र लगि काना ।

प्रभूंनीं सुग्रीवाच्या मांडीवर मस्तक टेकलें. डाव्या बाजूला धनुष्य व उजव्या बाजूला भाता ठेवला. दोन्ही करकमलांनीं ते बाण सावरीत. बिभीषण त्यांच्या कानाशीं लागून कांहीं मसलत करी.

बडभागी अंगद हनुमाना ।
चरनकमल चाँपत बिधि नाना ।

प्रभुपाछे लछिमन बीरासन।
काटि निषंग कर बान सरासन।

महाभाग्यशाली अंगद आणि हनुमान प्रभूंचीं चरणकमलें कुशलतेनें चुरीत बसले. कमरेला भाते खोवून आणि हातांत धनुष्यबाण घेऊन लक्ष्मण प्रभूंच्या पाठीशीं वीरासन घालून बसला.

**दो०—एहि बिधि करुनासील गुन धाम राम आसीन। ते नर धन्य जे ध्यान एहि रहत सदा लयलीन॥ १२॥**

ह्याप्रकारें करुणासागर, शीलनिधान, गुणनिधि प्रभु रामचंद्र स्वस्थ बसले होते. जे नर ह्या ध्यानांत सदा तल्लीन असतात ते धन्य होत.[1]

**दो०—पूरब दिसा बिलोकि प्रभु देखा उदित मयंक। कहत सबहिँ देखहु ससिहि मृग-पति-सरिस असंक॥ १३॥**

प्रभु पूर्वदिशेकडे अवलोकन करूं लागले, तों चंद्र उगवलेला त्यांना दिसला. तेव्हां ते सर्वांना म्हणाले, ह्या सिंहासारख्या निर्भय चंद्रास अवलोकन करा तर.

चौ०—पूरबदिसि गिरि-गुहा-निवासी।
परमप्रताप तेज बलरासी।
मत्त-नाग-तम-कुंभ-बिदारी।
ससि केसरी गगन-बन-चारी।
बिथुरे नभ मुकुताहल तारा।
निसि सुंदरी केर सिंगारा।
कह प्रभु ससि महँ मेचकताई।
कहहु काह निज निज मति भाई।

पूर्वदिशेस गिरिगुहेंत राहणारा, परमप्रताप, तेज, बल यांची राशी, अंधःकाररूपी मदोन्मत्त गजाचें गंडस्थल विदारण करणारा, असा हा चंद्रमारूपी सिंह आकाशरूपी अरण्यांत संचार करीत आहे. आकाशांत तारागणरूपी मौक्तिकें विखुरलेलीं आहेत. जणुंकाय हा रात्रिरूपी सुंदरीचा शृंगारच समजा. प्रभु म्हणाले, गडे हो! हा चंद्रमा असा असूनहि त्याचेवर हा कलंक कसला दिसत आहे? ह्याचा उलगडा आपापल्या बुद्ध्यनुसार करा पाहूं.

कह सुग्रीँव सुनहु रघुराई।
ससि महँ प्रगट भूमि कै झाँई।

सुग्रीव म्हणाला, हे रघुराया! ऐका. ती चंद्रावर पडलेली पृथ्वीची प्रत्यक्ष छाया होय.

मारेउ राहु ससिहि कह कोई।
उर महँ परी स्यामता सोई।

कोणी म्हणाले, राहूनें त्याच्या हृदयावर जो घाव घातला त्यानेंच धरलेली ही काजळी होय.

कोउ कह जब बिधि रतिमुख कीन्हा।
सारभाग ससि कर हरि लीन्हा।
छिद्र सो प्रगट इंदुउर माहीँ।
तेहि मग देखिय नभ परिछाहीँ।

कोणी म्हणाले, जेव्हां ब्रह्मदेवानें रतीचा मुखवटा घडविला तेव्हां चंद्रांतून त्याचा असल गाभा काढून घेतला. त्यामुळें त्याच्या हृदयांत जें छिद्र पडलें त्यावरच ही आकाशाची सावली पडलेली आहे.

प्रभु कह गरलबंधु ससि केरा।
अतिप्रिय निजउर दीन्ह बसेरा।
बिषसंयुत करनिकर पसारी।
जारत बिरहवंत नरनारी।

प्रभु म्हणाले, हालाहलविष हा चंद्राचा सहोदर आहे. तो त्याचा अत्यंत प्रिय असल्यामुळें त्यानें त्यास आपल्या हृदयांत जागा दिली. म्हणूनच चंद्र आपल्या जहरील्या किरणांनीं विरही स्त्रीपुरुषांना भाजून काढीत असतो.

**दो०—कह मारुतसुत सुनहु प्रभु ससि तुम्हार निजदास। तव मूरति बिधुउर बसति सोइ स्यामताअभास॥ १४॥**

यावर मारुति म्हणाला, प्रभो! ऐका. चंद्र आपला भक्त म्हणून आपली ही श्यामल मूर्ति त्याच्या हृदयांत वास करीत असते, म्हणून ती श्यामता आपलाच आभास होय.

**दो०—पवनतनय के बचन सुनि बिहँसे राम सुजान। दच्छिन दिसि अवलोकि प्रभु बोले कृपानिधान॥ १५॥**

मारुतीचें तें भाषण ऐकून गुणज्ञ रामचंद्र हसले. नंतर दक्षिणदिशेकडे अवलोकन करून कृपानिधान प्रभु म्हणाले,—

---

१ हें एक अत्यंत रमणीय शब्दचित्र पहा. शिवाय रावण आणि राम यांच्या करमणुकींतला फरक कवीनें किती मार्मिकपणें दर्शविला तेंहि मनास आणा.

चौ०—देखु बिभीषन दच्छिन आसा।
घन घमंड दामिनी बिलासा।
मधुर मधुर गरजइ घन घोरा।
होइ बृष्टि जनु उपल कठोरा।

बिभीषणा ! दक्षिणदिशेकडे तर पहा. दाट मेघपटलांत विद्युल्लता विलास करीत आहेत; मेघांच्या मधुर मधुर व गंभीर गर्जनाहि होत आहेत. जणुंकाय भयंकर पाषाणांचीच वृष्टि होत आहे असा भास होतो.

कहइ बिभीषन सुनहु कृपाला।
तडित न होइ न बारिदमाला।
लंकासिखर रुचिर आगारा।
तहँ दसकंधर देख अखारा।
छत्र मेघडंबर सिर धारी।
सोइ जनु जलद्घटा अतिकारी।

बिभीषण म्हणाला, हे दयाघन ! ऐका. वीजहि नाहीं आणि मेघमालाहि नाहीं. तें दृश्य लंकेच्या शिखरावर रंगमहालांत चालूं असलेल्या रावणाच्या मजलिशीचें होय. मेघडंबर वाटतें तें रावणाच्या शिरावरील छत्र होय. तेंच निबिड कृष्णवर्ण मेघपटलाप्रमाणें दिसत आहे.

मंदोदरी–स्रवन–ताटंका।
सोइ प्रभु जनु दामिनी दमंका।
बाजहिँ ताल मृदंग अनूपा।
सोइ रव मधुर सुनहु सुरभूपा।

हे सुरेश्वरा ! ऐका. मंदोदरीचीं कर्णकुंडलेंच तीं, हे प्रभो ! विद्युल्लतेप्रमाणें चकाकत आहेत. मृदंगांची तालतरावट जोरांत चालली आहे. त्याचीच ही गुलजार धुनक समजा.

प्रभु मुसुकान समुझि अभिमाना।
चाप चढाइ बान संधाना।

रावणाचा तो गुलहौशीपणा पाहून प्रभु हसले व त्यांनीं धनुष्य चढवून बाण सोडला.

**दो०—छत्र मुकुट ताटंक तब हते एकहीं बान। सब के देखत महि परे मरम न कोऊ जान॥ १६॥**

तेव्हां छत्र, मुकुट, आणि कर्णकुंडलें हीं एकाच बाणासरशीं जमीनीवर पडलीं, परंतु त्यांतलें मर्म कोणाच्याच ध्यानांत आलें नाहीं.

**दो०—अस कौतुक करि रामसर प्रबिसेउ आइ निषंग। रावनसभा ससंक सब देखि महा–रस–भंग॥ १७॥**

असलें अद्भुत कृत्य करून रामाचा बाण परत येऊन रामाच्या भात्यांत प्रविष्ट झाला. त्या महान् आनंदप्रसंगाचा विरस झालेला पाहून रावणसभा निपाचित विरघळून गेली.

चौ०—कंप न भूमि न मरुत बिसेखा।
अस्त्र सस्त्र कछु नयन न देखा।
सोचहिँ सब निजहृदय मँझारी।
असगुन भयउ भयंकर भारी।
दसमुख देखि सभा भय पाई।
बिहँसि बचन कह जुगुति बनाई।

भूकंप नाहीं, वाराहि विशेष नाहीं, अस्त्र किंवा शस्त्रहि कोणास डोळ्यांनीं दिसलें नाहीं. सर्वचजण आपापल्या मनांत होरपळून निघाले. कारण तो फार भयंकर अपशकुन झालासा वाटला. मजलशीवर जबर जरब बसलीशी पाहून रावण हंसला आणि मोठ्या शिताफीनें दमदाटी करूं लागला. (तो उद्गारला)—

सिरउ गिरे संतत सुभ जाही।
मुकुट खसे कस असगुन ताही।
सयन करहु निज निज गृह जाई।
गवने भवन सकल सिर नाई।

ज्यास शिरें पडण्याचा देखील निरंतर शुभशकुनच असतो त्यास केवळ मुकुट पडण्यांत अपशकुन तो रे कसला ? जा आपापल्या घरीं आणि खुशाल झोंपा पाहूं. तेव्हां सर्व मंडळी त्यास मुजरे करून चालती झाली.

मंदोदरी सोच उर बसेऊ।
जब तेँ स्रवनपूर महि खसेऊ।
सजल नयन कह जुग कर जोरी।
सुनहु प्रानपति बिनती मोरी।
कंत रामबिरोध परिहरहू।
जानि मनुज जानि मन हठ धरहू।

कर्णकुंडलें गळून पडल्यानें मंदोदरी मनांत चरकली व ती हात जोडून आणि अश्रु ढाळीत रावणाला म्हणाली, हे प्राणपते ! माझी विनंति ऐकावी. हे नाथ ! रामाशीं फाजिल हट्ट करूं नये. त्यांना केवळ

मनुष्य समजून आपल्या मनांत वसलेले हे कोन-काट पार उडवून लावावेत.

**दो०–बिस्वरूप रघु-बंस-मनि करहु बचन-बिस्वासु। लोककल्पना बेद कर अंग अंग प्रति जासु ॥ १८ ॥**

वेद ज्याच्या प्रत्येक अंगाअंगाचे ठायीं स्वर्गादिक लोकांची कल्पना करितात तोच विराटस्वरूपी भगवान् हा श्रीरघुवंशमणी होय. ह्या माझ्या वाक्यावर विश्वास ठेवावा.

चौ०–पद पाताल सीस अजधामा।
अपर लोक अँग अँग बिस्रामा।
भृकुटि बिलास भयंकर काला।
नयन दिवाकर कच घनमाला।
जासु घ्रान अस्विनीकुमारा।
निसि अरु दिवस निमेष अपारा।
स्रवन दिसा दस बेद बखानी।
मारुत स्वास निगम निजबानी।

त्या विश्वरूपाचे सप्त पाताळ हे चरण असून ब्रह्मलोक हें शीर्ष होय. बाकीचे इतर लोक त्याच्या अंगाअंगांचे ठायीं वास्तव्य करीत आहेत. भयंकर काल हा त्याचा भृकुटिविलास असून सूर्य हे त्याचे नेत्र आहेत. मेघमाला हे त्याचे केश असून अश्विनीकुमार हे त्याचे घ्राण आहेत. दिवस आणि रात्र हे त्याचे अपार निमिषोन्मेष होत. दशदिशा हे कर्ण असून वायु त्याचा श्वास आहे, व वेद त्याची वाणी आहे असें वेद सांगत आहेत.

अधर लोभ जम दसन कराला।
माया हास बाहु दिगपाला।
आनन अनल अंबुपति जीहा।
उतपाति पालन प्रलय समीहा।
रोमराजि अष्टादस भारा।
अस्थि सैल सरिता नस जारा।
उदर उदधि अधगो जातना।
जगमय प्रभु का बहु कलपना।

लोभ हे त्याचे ओष्ठ, यम त्याच्या भयंकर दंष्ट्रा, माया हें हास्य, दिक्पाल हे बाहू, अग्नि हें मुख, समुद्र ही जिव्हा, आणि उत्पत्ति, स्थिति आणि लय ही त्याची ऐच्छिक लीला होय. अष्टादश वनस्पतिभार ही त्याची रोमावली, पर्वत हे त्याच्या अस्थि, आणि नद्या ह्या त्याच्या रक्तवाहिन्यांचें जाल होय. उदधि हें त्याचें उदर असून नरक हीं त्याचीं अधोभागाचीं इंद्रियें होत. अशा रीतीनें जगदात्म्या भगवंताच्या विराटस्वरूपाविषयीं अनेक कल्पना केल्या आहेत.

**दो०–अहंकार सिव बुद्धि अज मन ससि चित्त महान। मनुज बास चर-अचर-मय रूप राम भगवान ॥ १९ ॥**

शिव हा त्या विराटपुरुषाचा अहंकार असून ब्रह्मदेव ही त्याची बुद्धि आहे. चंद्र हें त्याचें मन असून महत्तत्त्व हें चित्त होय. असा तो चराचरमय विराटस्वरूपी भगवान् रामचंद्र मनुष्यरूपानें अवतरला आहे.

**दो०–अस बिचारि सुनु प्रानपति प्रभु सन बैर बिहाइ। प्रीति करहु रघु-बीर-पद मम अहिवात न जाइ ॥ २० ॥**

हे प्राणनाथ! ऐका. अशी भावना धरून प्रभूशीं चालू असलेल्या कटकटींना गवसणी घालून रघुवीरचरणीं प्रेम करा म्हणजे माझें सौभाग्य अखण्ड राखलें जाईल.

चौ०– बिहँसा नारिबचन सुनि काना।
अहो मोहमहिमा बलवाना।
नारिसुभाउ सत्य कबि कहहीं।
अवगुन आठ सदा उर रहहीं।
साहस अनृत चपलता माया।
भय अबिबेक असौच अदाया।

तें मंदोदरीचें भाषण ऐकून रावण हास्यपूर्वक म्हणाला; ओहो! मोहाचा महिमाच प्रबळ! कविजन सत्य सांगतात कीं, साहस, असत्य, चांचल्य, कपट, भय, अविवेक, अपवित्रता आणि निर्दयता हे आठ अवगुण स्त्रीच्या हृदयांत स्वभावतःच वास करितात.

रिपु कर रूप सकल तैं गावा।
अति बिसाल भय मोहि सुनावा।
सो सब प्रिया सहज बस मोरे।
समुझि परा प्रसाद अब तोरे।

शत्रूच्या रूपाचें हें सर्व वर्णन करून तूं मला खूपच दहशत घातलीस. परंतु, प्रिये! तें सर्व ऐश्वर्य स्वभावतःच माझ्या आधीन आहे. हो हो, आतां समजलों, ही तुझी मजवरील प्रसन्नता होय.

जानेउँ प्रिया तोरि चतुराई ।
एहि मिस कहेहु मोरि प्रभुताई ।
तव बतकही गूढ मृगलोचनि ।
समुझत सुखद सुनत भयमोचनि ।

प्रिये ! तुझी खुबी आली लक्षांत आतां. या मिषानें तूं माझाच प्रभाव वाखाणलास. मृगलोचने ! तुझे बोल फारच गूढ असतात. ते कळल्यानें आनंद तर होतोच पण ऐकल्यानें भीतिहि पण दूर होते.

मंदोदरि मन महँ अस ठयऊ ।
प्रियहि कालबस मतिभ्रम भयऊ ।

मंदोदरीनें मनामध्यें निश्चय केला कीं, कालवशतेमुळें पतीची मती चळली हेंच खास.

**दो०–एहि विधि करत विनोद बहु प्रात प्रगट दसकंध । सहज असंक सु-लंक-पति सभा गयउ मदअंध ॥ २१ ॥**

ह्याप्रमाणें अनेक प्रकारें विनोद होत आहे तो इकडे उजाडलें आणि स्वभावतःच निर्भय असा तो मदांध लंकाधिपति सभास्थानीं जाता झाला.

**सो०–फूलइ फरइ न वेत जदपि सुधा बरषहिँ जलद । मूरखहृदय न चेत जौँ गुरु मिलहिँ विरंचिसिव ॥ ३ ॥**

मेघांतून अमृताचा जरी पाऊस पडला तरी वेतास फुलें किंवा फळें यावयाचीं नाहींत. तसेंच ब्रह्मदेव किंवा शंकर हे प्रत्यक्ष जरी गुरु मिळाले तरीदेखील मूर्खांच्या हृदयांत प्रकाश पडावयाचा नाहीं तो नाहींच.

चौ०–इहाँ प्रात जागे रघुराई ।
पूछा मत सब सचिव बोलाई ।
कहहु बेगि का करिय उपाई ।
जामवंत कह पद सिरु नाई ।

इकडे प्रातःकाल होतांच रघुराज उठले आणि सर्व सचीवांस बोलावून त्यांची सल्ला विचारूं लागले कीं, आतां कोणत्या योजनेला लागावें तें त्वरित कळवा. तेव्हां जांबवंत रामास वंदन करून म्हणाला,–

सुनु सर्बज्ञ सकल–उर–बासी ।
बुधि बल तेज धर्म गुनरासी ।
मंत्र कहउँ निज--मति--अनुसारा ।
दूत पठाइय बालिकुमारा ।

हे सर्वज्ञ, सर्वव्यापक, बुद्धिबलतेजधर्मगुणनिधान प्रभो ! ऐका. मी आपला सल्ला यथामति सादर करितों. मला वाटतें कीं अंगदाला शिष्टाईस पाठवावें.

नीक मंत्र सब के मन माना ।
अंगद सन कह कृपानिधाना ।
बालितनय बुधि--बल--गुन--धामा ।
लंका जाहु तात मम कामा ।
बहुत बुझाइ तुम्हहि का कहऊँ ।
परम चतुर मैं जानत अहऊँ ।
काज हमार तासु हित होई ।
रिपु सन करेहु बतकही सोई ।

'भले शाबास' म्हणून तो जांबवंताचा सल्ला सर्वांनाच पसंत पडला. तेव्हां कृपानिधान अंगदास म्हणाले, हे वालितनया ! तूं मोठाच फक्कड चबढबवाला आहेस. हे तात ! तूं माझ्या कार्यासाठीं लंकेस जा. तुला विशेष समजवून तें काय सांगावयाचें ! तूं जात्याच फार चाणाक्ष आहेस हें मी जाणतों. माझें कार्य आणि त्याचें ( रावणाचें ) कल्याण साधेल अशा प्रकारें शत्रूशीं वकिली कर.

**सो०–प्रभुअज्ञा धरि सीस चरन बंदि अंगद उठेउ । सोइ गुनसागर ईस राम कृपा जा पर करहु ॥ ४ ॥**

प्रभूंची आज्ञा शिरसावंद्य करून आणि त्यांचे चरणीं नमन करून अंगद उठला आणि म्हणाला, हे प्रभो रामा ! ज्यावर आपली कृपा होईल तोच खरा गाढा गुणगंभीर होय.

**सो०–स्वयंसिद्ध सब काज नाथ मोहि आदर दियेउ । अस बिचारि जुबराज तनु पुलकित हरषित हिये ॥ ५ ॥**

हे नाथ ! आपलीं सर्व कार्यें स्वयंसिद्धच आहेत. आपण मला उगीचच चढवीत आहांत. असें म्हणतांच युवराज अंगद पुलकित आणि हर्षित झाला.

चौ०--बंदि चरन उर धरि प्रभुताई ।
अंगद चलेउ सबहिँ सिरु नाई ।
प्रभुप्रताप उर सहज असंका ।
रनबाँकुरा बालिसुत बंका ।

प्रभूंचें चरणवंदन करून आणि त्यांचा प्रभाव हृदयांत वागवून सर्वांस नमन केल्यावर अंगद

निघाला. प्रभूंच्या प्रतापानें तो उमदा रणगाजी अंगद मनामध्यें साहजीकच बेदरकार होता.

पुर पैठत रावन कर बेटा।
खेलत रहा सो होइ गइ भेँटा।
बातहिँ बात करष बाढि आई।
जुगल अतुल बल पुनि तरुनाई।
तेहि अंगद कहँ लात उठाई।
गहि पद पटकेउ भूमि भवाँई।

नगरींत प्रवेश करितांच खेळत असलेला रावणाचा पुत्र अंगदास भेटला. तेथें उभयतांची बाचाबाची होऊन दोघेहि वरदळीवर आले, कारण दोघांतहि जबरदस्त जोम आणि ज्वानी मुसमुसत होती. रावणपुत्रानें अंगदावर लाथ उगारली. तेव्हां अंगदानें तीच तंगडी धरून त्यास गरगर फिरवून जमिनीवर पछाडिलें.

निसि-चर-निकर देखि भट भारी।
जहँ तहँ चले न सकहिँ पुकारी।
एक एक सन मरम न कहहीँ।
समुझि तासु बध चुप करि रहहीँ।

राक्षससमुदाय तो मुसंड वीर पाहून वाट फुटेल तिकडे भिरभिर पळत सुटला. पळतांना देखील त्यास बोल फुटेना. रावणपुत्राच्या वधाची बातमी समजून देखील कोणी ब्र काढीना.

भयउ कोलाहल नगरमँझारी।
आवा कपि लंका जेहि जारी।
अब धौँ काह करिहि करतारा।
अतिसभीत सब करहिँ बिचारा।
बिनु पूछे मग देहिँ देखाई।
जेहि बिलोक सोइ जाइ सुखाई।

तरीहि पण सगळ्या शहरांत एकच बभ्रा उडाला कीं, ज्यानें पूर्वी लंका जाळली तोच कपि पुन्हां उतरला आहे. तेव्हां सर्व अत्यंत दहशत खाऊन मनांत म्हणूं लागले कीं, दैवा! आतां हा आणखी कोणती राड खचविणार कोण जाणे! ते राक्षस भीतीनें अंगदास त्यानें न पुसतांच वाट दाखवूं लागले. मात्र अंगद ज्याचेकडे पाही तो अगदीं फिक्का पडे.

**दो०—गयउ सभादरबार तब सुमिरि राम-पद-कंज। सिंहठवनि इत उत चितव धीर—बीर बल—पुंज॥ २२॥**

पुढें तो अंगद रामपदपंकजांचें स्मरण करून सभाद्वारीं जाऊन पोंचला. तो बेडर दणाकडा पठ्ठा सिंहासारख्या जरबीनें चोहोंकडे नजर फेरूं लागला.

चौ०—तुरित निसाचर एक पठावा।
समाचार रावनहिँ जनावा।
सुनत बिहँसि बोला दससीसा।
आनहु बोलि कहाँ कर कीसा।
आयसु पाइ दूत बहु धाये।
कपिकुंजरहि बोलि लेइ आये।

अंगदानें ताबडतोब एका राक्षसाला रावणाकडे पाठविलें. त्यानें जाऊन त्यास वर्दी दिली. ती ऐकून रावण खिदळतच म्हणाला, 'कोठला रे, तो वानर! पोंचीव पाहूं त्याला इकडे.' ती आज्ञा मिळतांच अनेक दूत धांवले, आणि त्या कपिकुंजरास अदबीनें रावणाकडे घेऊन गेले.

अंगद दीख दसानन बैसा।
सहित प्रान कज्जलगिरि जैसा।
भूजा बिटप सिर सृंग समाना।
रोमावली लता जनु नाना।
मुख नासिका नयन अरु काना।
गिरिकंदरा खोह अनुमाना।

अंगदाला रावण सजीव कज्जलपर्वताप्रमाणें दिसला. त्याचे हात झाडाप्रमाणें, डोकीं पर्वताच्या शिखराप्रमाणें, अंगावरील रोमावली अनेक लतांप्रमाणें व तोंडें, नाक, कान आणि डोळे हे पर्वतांतील दऱ्याखोऱ्यांप्रमाणें भासलें.

गयउ सभा मन नेकु न मुरा।
बालितनय अतिबल बाँकुरा।
उठे सभासद कपि कहँ देखी।
रावनउर भा क्रोध बिसेखी।

तो बाका कटमस्त अंगदवीर मनामध्यें यत्किंचितहि तमा न बाळगतां धूमधडाक्यानें दरबाराच्या आंत घुसला. त्यास पहातांच सभासदांनीं खडी ताजीम दिली. त्यामुळें रावणास विशेषच गुस्सा आला.

**दो०—जथा मत्तगज जूथ महँ पंचानन चलि जाइ। रामप्रताप सँभारि उर बैठ सभा सिरु नाइ॥ २३॥**

ज्याप्रमाणें मदोन्मत्त हत्तींच्या कळपावर केसरी गिल्ला चढवितो, त्याप्रमाणें अंगदानें रामप्रताप हृद-

यांत आठवून आणि सभेमध्यें मुजरा करून सामन्यावर ( रावणाच्या ) बैठक घेतली.

चौ०—कह दसकंठ कवन तैं बंदर।
मैं रघु--बीर--दूत दसकंधर।

रावण म्हणाला, अरे वानरा ! तूं कोण आहेस ? ( अंगद म्हणाला ) "हे देशकंधरा ! मी रघुवीराचा एक पाईक आहे.

मम जनकहि तोहि रही मिताई।
तव हितकारन आयउँ भाई।
उत्तम कुल पुलस्ति कर नाती।
सिव बिरंचि पूजेहु बहु भाँती।
बर पायहु कीन्हेहु सब काजा।
जीतेहु लोकपाल सबराजा।
नृपअभिमान मोहवस किंबा।
हरि आनेहु सीता जगदंबा।

माझ्या वडिलांचा व तुझा भाईचारा, म्हणून काका, ! तुझ्या हितास्तव मीं आलों आहे. तुझी खानदान उत्तम, तूं पुलस्ति ऋषींचा नातू, शिव आणि ब्रम्हदेव यांचीहि तूं खूप कसून आराधना केलेली, त्यांच्या वरप्रसादानें तूं कृतकार्य झालेला आणि लोकपालांसह सर्व राजांवर जरब खेचणारा पण राज्यमदामुळें असो किंवा बुद्धिभ्रंशानें असो, जगन्माता जानकीला तूं पुंडाईनें पळविलीस.

अब सुभ कहा सुनहु तुझ मोरा।
सब अपराध छमिहि प्रभु तोरा।
दसन गहहु तृन कंठ कुठारी।
परिजनसहित संग निजनारी।
सादर जनकसुता करि आगे।
एहि बिधि चलहु सकल भय त्यागे।

आतां माझा हितोपदेश ऐक म्हणजे प्रभू तुझ्या सर्व अपराधांवर गवसणी घालतील. दांतीं तृण धर, मानेवर कुऱ्हाड ठेव, बरोबर आपल्या स्त्रिया व परीवार घे, जानकीला सन्मानानें पुढें कर, अशा प्रकारें निर्धास्त ( रामचंद्राकडे ) चल आणि—

**दो०—प्रनतपाल रघु--बंस--मनि त्राहि त्राहि अब मोहि। आरत गिरा सुनत प्रभु अभय कराहिंगे तोहि॥ २४॥**

"हे गरीबपरवर रघुकुलश्रेष्ठा ! आतां माझें रक्षण करा, रक्षण करा" अशी विनवणी कर, म्हणजे तुझी दीन वाणी ऐकतांच प्रभु तुला अभय देतील.

चौ०—रे कपिपोत न बोल सँभारी।
मूढ न जानेहि मोहि सुरारी।
कहु निज नाम जनक कर भाई।
केहि नाते मानिये मिताई।

( तें ऐकून रावण म्हणाला, ) रे घटिंगणा मर्कटबच्च्या ! संभाळून कां बोलत नाहींस ? मी देवांचा दुष्मन हें तूं जाणत नाहींस काय? अरे छाटा, आपलें व आपल्या बापाचें नांव तर कळीव प्रथम. कोणत्या नात्यानें मी त्याला सखा मानावें ?

अंगद नाम बालि कर बेटा।
ता सौं कबहुँ भई होइ भेंटा।

( अंगद म्हणाला ) माझें नांव अंगद, आणि मी वालीचा पुत्र. वालीची तुझी कधीं गाठ तरी पडली होती कीं नाहीं ?

अंगदबचन सुनत सकुचाना।
रहा बालि बानर मैं जाना।
अंगद तुहीं बालि कर बालक।
उपजेहु बंस अनल कुलघालक।
गर्भ न गयउ ब्यर्थ तुम्ह जायहु।
निजमुख तापसदूत कहायहु।
अब कहु कुसल बालि कहँ अहई।
बिहँसि बचन तब अंगद कहई।

अंगदाचें तें वचन ऐकतांच रावण बिचकला व म्हणाला, वाली नांवाचा एक वानर होता हें मी जाणून आहे. अंगदा ! तूं त्या वालीचाच पुत्र काय रे ? कुलांगार, कुलघातक निपजलास रे ! तूं गर्भांतच कां पचला नाहींस ? व्यर्थ रे जन्माला आलास ! आपल्याच तोंडानें तूं त्या फकिरड्याचा खबीस म्हणवीत आहेस ! असो, आतां वालीचें कुशल तरी सांग. तो कोठें आहे ? तेव्हां अंगद हसून म्हणाला—

दिन दस गये बालि पहँ जाई।
बूझेहु कुसल सखा उर लाई।
रामबिरोध कुसल जसि होई।
सो सब तोहि सुनाइहि सोई।
सुनु सठ भेद होइ मन ता कें।
श्री--रघु--बीर हृदय नहिं जा के।

आणखी दहाच दिवसांनीं तूं प्रत्यक्षच वालीकडे जा, आणि आपल्या मित्राला गाढ उरभेट देऊन त्याचें कुशल विचार. रामाशीं फाजील काट केल्यानें कसें काय बरें होतें तें सर्व त्याच्याच तोंडानें उगळू दे.

अरे दिवट्या! ज्याच्या हृदयांत श्रीरामचंद्राचा वास नाहीं त्याच्याच हृदयांत भेदबुद्धि रुजते; समजलास!

**दो०—हम कुलघालक सत्य तुह्म कुलपालक दससीस। अंधउ बहिर न अस कहहिँ नयन कान तव बीस॥ २५॥**

अलबत, मी कुलघातक झालों (कारण मीं रामाचें दूतत्व पत्करिलें) आणि रावणा! तूं मात्र (रामाशीं विरुद्ध होऊन) तेवढा कुलरक्षक उरलास! परंतु ही गोष्ट आंधळेबहिरेदेखील कबूल करणार नाहींत; तुला तर वीस वीस कान आणि डोळे आहेत. (खोच हा कीं ते बेकाम झाले म्हणूनच तीं नुसतीं भगदाडेंच म्हणायचीं).

चौ०—सिव-बिरंचि-सुर-मुनि-समुदाई।
चाहत जासु चरन सेवकाई।
तासु दूत होइ हम कुल बोरा।
ऐसिहु मति उर बिहरु न तोरा।

शिवब्रह्मादि देव आणि मुनिगण ज्याच्या चरणांची सेवा करितात, त्याचा खिदमतगार झाल्यानें मीं आपल्या कुळाला बुडविलें असा विचार येतांच तुझ्या छातीच्या ठिकऱ्या कां उडाल्या नाहींत?

सुनि कठोर बानी कपि केरी।
कहत दसानन नयन तरेरी।
खल तव कठिन बचन सब सहऊँ।
नीति धर्म मैं जानत अहऊँ।

अंगदाची ती सणसणीत भाषा ऐकतांच रावण डोळे वटारून म्हणाला, भामट्या! मी सर्व धर्म आणि नीति जाणत आहे म्हणूनच तुझे हे कुचके बोल सहन करितों.

कह कपि धर्मसीलता तोरी।
हमहु सुनी कृत पर-त्रिय-चोरी।
देखी नयन दूत रखवारी।
बूडि न मरहु धर्म-ब्रत-धारी।

अंगद म्हणाला, परस्त्रीवर हातपाटिलकी करण्याचा तुझा धर्माचारपणा आम्हीं जाणतों, आणि (शत्रूच्या) दूताचें रक्षण करणारी तुझी नीति तर मीं प्रत्यक्षच पाहिली आहे. अरे, धर्माच्या वारकऱ्या, अझून तूं त्या वारींत (शास्त्रांत) बुडून कसा मरत नाहींस?

कान नाक बिनु भगनि निहारी।
छमा कीन्हि तुम्ह धर्म बिचारी।
धर्मसीलता तव जग जागी।
पावा दरस हमहुँ बडभागी।

कर्णनासाहीन भगिनीला पाहूनदेखील तूं गयच खाल्लीस आणि तीहि केवळ धर्मबुद्धीनेंच! तुझें धर्मपरत्व तर जगांत महशूरच आहे. तुझें दर्शन मला घडलें हें तरी माझें मोठें भाग्यच म्हणायचें!

**दो०—जनि जल्पसि जड जंतु कपि सठ बिलोकु मम बाहु। लोक-पाल-बल-बिपुल-ससि-ग्रसन हेतु सब राहु॥२६॥**

(हें ऐकून रावण म्हणाला) अरे पुचाट्या कीटका! उगीच बेफाम बरळूं नकोस. हे निपटाऱ्या, मला! लोकपालांच्या बलरूपी पूर्ण चंद्राचा ग्रास करणारे हे माझे सर्व बाहू तर पहा!

**दो०—पुनि नभसर मम कर-निकर-कमलन्हि पर करि बास। सोभत भयउ मराल इव संभुसहित कैलास॥ २७॥**

हा माझा बाहुसमूह आकाशरूपी सरोवरांतील कमलांप्रमाणें असून त्यावर वास केल्यामुळें शंकरासह कैलासपर्वत हंसाप्रमाणें शोभत होता.[1]

चौ०—तुम्हरे कटक माँझ सुनु अंगद।
मो सन भिरिहि कवन जोधा बद।
तव प्रभु नारिबिरह बलहीना।
अनुज तासु दुख दुखी मलीना।
तुह्म सुग्रीवँ कूलद्रुम दोऊ।
अनुज हमार भीरु अति सोऊ।

अंगदा! ऐक. तुझ्या सबंध सैन्यामध्यें माझ्याशीं भिडणारा असा कोणता योद्धा आहे हें सांग तर पाहूं? तुझा प्रभु स्त्रीविरहानें पाण्याचा पितर बनलेला आहे, आणि त्याच्याच दुःखामुळें त्याचा धाकटा बंधुहि रंजीस येऊन काळा ठिक्कर पडला आहे. तूं आणि सुग्रीव हे दोघे तर नदीकिनाऱ्यावरील वृक्षाप्रमाणें (धडाक्यासरशी उन्मळून पडणारे) आहांत. माझा बंधु (बिभीषण) तर पक्काच डरपोक.

---

१ अंगदानें ताडलें कीं रावणाची सर्व मदार त्यास राम व सुग्रीव यांच्यांतून फोडण्याची आहे. म्हणून अंगदाचें हें 'एक घाव दोन तुकडे' उत्तर.

१ रावणानें एकदां सबंध कैलासपर्वत उचलला होता त्याला अनुलक्षून हें बोलणें आहे.

जामवंत मंत्री अतिबूढा ।
सो कि होइ अब समर अरूढा ।
सिल्पकर्म जानहिँ नल नीला ।
है कपि एक महा-बल-सीला ।
आवा प्रथम नगर जेहिं जारा ।
सुनि हँसि बोलेउ बालिकुमारा ।

तुमचा मंत्री जांबवंत हाहि म्हातारा जख्ख झाला असल्यामुळें युद्धामध्यें तो बापडा काय चढाइ करणार ? नलनील हे तर नुसते गवंडीच. महान् बलाढ्य असा काय तो एकच वानर तुमच्यांत दिसतो आणि तो म्हणजे लंकेच्या होळीचा होळकर. त ऐकतांच अंगद हंसून म्हणाला—

सत्य बचन कहु निसि-चर-नाहा ।
साँचेहु कीस कीन्ह पुरदाहा ।
रावननगर अलपकपि दहई ।
सुनि अस बचन सत्य को कहइ ।
जो अति सुभट सराहेहु रावन ।
सो सुग्रीवँ केर लघुधावन ।
चलइ बहुत सो बीर न होई ।
पठवा खबरि लेन हम सोई ।

अहो राक्षसराज ! हें तरी खरें बोललांत काय ? खरोखरीच का त्या कपीनें लंका जाळली ? एवढासा क्षुद्र कपि आणि त्यानें रावणाची नगरी जाळली ही गोष्ट ऐकून ती कोणास तरी खरी वाटेल काय ? रावणा ! ज्याची तूं महान् योद्धा म्हणून तारीफ केलीस तो तर सुग्रीवाचा एक लुंगासुंगा हलकारा आहे. खूप जास्तींत जास्त पायपिटी करणारा कांहीं वीर होत नाहीं ! आम्हीं त्याला तर केवळ शोध काढण्यासाठीं म्हणून पाठविलें होतें.

दो०—सत्य नगर कपि जारेऊ बिनु प्रभु-
आयसु पाइ । फिरि न गयउ सुग्रीवँ
पहिँ तेहि भय रहा लुकाइ ॥ २८ ॥

खरोखर समजा कीं प्रभूंच्या आज्ञेवांचून लंका-नगरी जाळल्यामुळें तो पुन्हां सुग्रीवाकडे परतदेखील आला नाहीं. त्याच्या भयानें तेव्हांपासून कायमचीच त्यानें दडीच मारली.

दो०—सत्य कहेहु दसकंठ सब मोहि न
सुनि कछु कोह । कोउ न हमारे कटक
अस तो सन लरत जो सोह ॥ २९ ॥

दशकंठा ! तूं म्हणतोस तें सर्व खरें आहे. तें ऐकून मला मुळींच राग नाहीं. कारण आमच्या सैन्यांत असा कोणीच नाहीं कीं ज्याला तुझ्यासारख्याशीं झुंजणें शोभेल !

दो०—प्रीति बिरोध समान सन करिय
नीति असि आहि । जौँ मृगपति बध
मेडुकन्हि भल कि कहइ कोउ ताहि ॥ ३० ॥

कारण प्रीति अगर वैर करावें तें समकक्षाशीं, अशी नीति आहे. जर सिंह बेडकुळांचा नाश करूं लागला तर त्यांत त्याची इज्जत ती कसली ?

दो०—जद्यपि लघुता राम कहँ तोहि बधे
बड दोष । तदपि कठिन दसकंठ सुनु
छत्रिजाति कर रोष ॥ ३१ ॥

रावणा ! ऐक. जरी तुझा वध करण्यांत रामचंद्रा-कडे लघुत्व आणि मोठा दोष येत आहे तथापि क्षत्रिय जातीला क्रोध अनावर होतो.

दो०—बक्रउक्ति धनु बचन सर हृदय दहेउ
रिपु कीस । प्रति उत्तर सडसिन्ह मनहुँ
काढत भट दससीस ॥ ३२ ॥

अंगदानें वक्रोक्तिरूप धनुष्यावर वचनरूपी शर लावून ते शत्रूच्या हृदयावर मारले; तेव्हां जणुंकाय तो रावणवीर प्रत्युत्तररूपी सांडशीनें ते हृदयांतून उपटूं लागला.

दो०—हँसि बोलेउ दसमौलि तब कपि कर
बड गुन एक । जो प्रतिपालइ तासु
हित करइ उपाय अनेक ॥ ३३ ॥

त्यावर रावण हसून म्हणाला, वानरांची ही एक मोठीच लायकी आहे कीं जो त्यांस तुकडा घालतो त्याच्या बऱ्यासाठीं ते हवे तें हलालहराम करूनच सोडतात.

चौ०—धन्य कीस जो निज-प्रभु-काजा ।
जहँ तहँ नाचइ परिहरि लाजा ।
नाँचि कूदि करि लोग रिझाई ।
पतिहित करइ धर्म निपुनाई ।

वानरांची जातच धन्य ! ते आपल्या प्रभुकार्या-साठीं वाटेल तेथें निर्लज्जपणें नाचतात, आणि नाचूनबागडून व लोकांना खूष करून धन्याच्या रोजमुऱ्यासाठीं सेवाधर्म अगदीं इमानें इतबारें बजावतात.

अंगद स्वामिभक्त तव जाती ।
प्रभुगुन कस न कहसि एहि भाँती ।
मैं गुनगाहक परम-सु-जाना ।
तव कटुरटनि करउँ नहिं काना ।

अंगदा ! तुझी जातच स्वामिनिष्ठ. तेव्हां तूंहि आपल्या प्रभूची तारीफ करतोस तशी कां करणार नाहींस? मी गुणरसिक आणि खरा शहाणा, म्हणूनच मी तुझी ही जहरी बरळ मुद्दाम कानाआड करतों.

कह कपि तव गुनगाहकताई ।
सत्य पवनसुत मोहि सुनाई ।
बन बिधंसि सुत बधि पुर जारा ।
तदपि न तोहि कछु कृत अपकारा ।

तेव्हां अंगद म्हणाला, तुझी गुणग्राहकता तर खरीच, व मारुतीनें तिची साक्ष मला पटविलीहि. त्यानें तुझें वन उध्वस्त केलें, तुझ्या पुत्राला मारिलें, तुझी नगरी जाळली तरीदेखील तूं त्यास कांहींच छेडलें नाहींस; शाबास !

सोइ बिचारि तव प्रकृति सुहाई ।
दसकंधर मैं कीन्हि ढिठाई ।
देखेउँ आइ जो कछु कपि भाषा ।
तुम्हरे लाज न रोष न माषा ।

ह्याच तुझ्या दिलदारीचा विचार करून, रावणा ! मीहि धाडस करून आलों, आणि पाहतों तों खरोखरच मारुतीच्या सांगण्याप्रमाणें शरम, जाहिली, दिमाख, यांचा तुझ्यांत पत्ताहि पण नाहीं.

जौं असि मति पितु खायेहु कीसा ।
कहि अस बचन हँसा दससीसा ।

उडाणटप्पू ! तुझी अशी बुद्धि म्हणून तर तूं आपल्या बापालाहि गट्ट केलेंस. असें म्हणून रावण हंसला.

पितहि खाइ खातेउँ पुनि तोही ।
अबही समुझि परा कछु मोही ।
बालि-बिमल-जस-भाजन जानी ।
हतउँ न तोहि अधम अभिमानी ।

तेव्हां अंगद म्हणाला, पित्यास खाऊन पुन्हा तुलाहि खाल्ला असता; परंतु इतक्यांत मला एक विचार सुचला कीं, तूं वालीच्या सोज्ज्वळ यशाचें स्मारक आहेस. म्हणूनच तुला बेरडाला, उर्मटाला ! जीवदान देतों.

कहु रावन रावन जग केते ।
मैं निजस्रवन सुने सुनु जेते ।
बलिहि जितन एकु गयउ पताला ।
राखा बाँधि सिसुन्ह हयसाला ।
खेलहिं बालक मारहिं जाई ।
दया लागि बलि दीन्ह छोडाई ।

(तें असो.) पण रावणा ! जगांत रावण तरी किती आहेत तें तरी सांग पाहूं ? मीं जे आपल्या कानांनीं ऐकलें तें ऐक. एक रावण पाताळांत बळीला जिंकण्यासाठीं गेला होता व तेथें त्याला मुलांनीं घोडशाळेंत मुसक्या बांधून ठेविलें होतें. तेथें जाऊन मुलें त्याला पोरखेळ म्हणून बडवीत असत. अखेरीस बलीसच दया आली आणि त्यानें त्याची सुटका केली.

एक बहोरि सहसभुज देखा ।
धाइ धरा जिमि जंतुबिसेखा ।
कौतुक लागि भवन लेइ आवा ।
सो पुलस्ति मुनि जाइ छोडावा ।

फिरून एका रावणाला सहस्रार्जुनानें पाहतांच धांवत जाऊन एक अजब किटकुल म्हणून त्याला पकडलें व मौजेखातर आपल्या घरीं नेलें व शेवटीं त्यास पुलस्त्य मुनींनीं जाऊन सोडविलें.

**दो०—एक कहत मोहि सकुच अति रहा बाल की काँख । तिन्ह महुँ रावन तैं कवन सत्य बदहि तजि माख ॥ ३४ ॥**

तिसऱ्या रावणाचें वर्णन करण्यास मला फार संकोच वाटतो. याला वालीनें आपल्या बगलेंत मारिलें होतें. यांपैकीं तूं कोण तें जरा दिमाख दाबून खरें खरें तर सांग पाहूं.

चौ०—सुनु सठ सोइ रावन बलसीला ।
हरगिरि जान जासु भुजलीला ।
जान उमापति जासु सुराई ।
पूजेउँ जेहि सिर सुमन चढाई ।
सिरसरोज निजकरन्हि उतारी ।
पूजेउँ अमितबार त्रिपुरारी ।

हें ऐकून रावण म्हणाला, अरे टारगटा ! ज्याची भुजलीला कैलास पर्वत जाणतो, ज्याचें शौर्य शंकरास विदित आहे, ज्यानें आपलीं शिरकमलें अर्पण करून त्यांची पूजा केली, आणि अनेकदां ज्यानें आपलीं शिरकमलें स्वहस्तानें छेदून त्रिपुरारीस वाहिलीं तो मी हा असला मर्द गडी रावण आहे, समजलास.

भुजबिक्रम जानहिं दिगपाला ।
सठ अजहूँ जिन्ह के उर साला ।

जानहि दिग्गज उर कठिनाई ।
जब जब भिरेउँ जाइ बरिआई ।
जिन्ह के दसन करालन फूटे ।
उर लागत मूलक इव टूटे ।

घसमुसळ्या! अजूनदेखील ज्यांच्या हृदयांत वेदना होत आहेत असे ते दिक्पाल ह्या रावणाच्या बाहूंचा प्रभाव आठवतात. ज्या ज्या वेळीं मी जबरदस्तीनें जाऊन भिडलों त्या त्या वेळीं ज्यांची कधींहि न पडणारी अशी कट्टर दातांची कवळी माझ्या उराला लागतांच मुळ्याप्रमाणें तुटून पडली, ते दिग्गज माझ्या छातीचा कणखरपणा जाणत आहेत.

जासु चलत डोलति इमि धरनी ।
चढत मत्तगज जिमि लघुतरनी ।
सोइ रावन जगबिदित प्रतापी ।
सुनेहि न स्रवन अलीकप्रलापी ।

मदोन्मत्त गज वर चढल्यानें ज्याप्रमाणें लहान होडीची अवस्था होते तद्वत् ज्याच्या चालण्यानें पृथ्वीदेखील डळमळूं लागते तोच हा मी रावण होय. ज्याचा प्रताप सर्व दिगंत विदित आहे त्याला, हे गप्पाष्टक्या! तूं कानानें ऐकला नाहींस होय?

**दो०—तेहि रावन कहँ लघु कहसि नर कर करसि बखान । रे कपि बर्बर खर्ब खल अब जाना तव ज्ञान ॥ ३५ ॥**

त्या रावणास तूं कस्पटासमान समजून (त्याचे पुढें) मानवांचें तुणतुणें वाजवितोस काय? अरे मुजोरा! लुच्च्या! खवीसा! माकडा! आतां मात्र तुझी अक्कल मी पक्की अजमावून चुकलों.

चौ०—सुनि अंगद सकोप कह बानी ।
बोलु सँभारि अधम अभिमानी ।
सहस-बाहु-भुज-गहन अपारा ।
दहन अनलसम जासु कुठारा ।
जासु परसु-सागर-खर-धारा ।
बूडे नृप अगनित बहु बारा ।
तासु गर्ब जेहि देखत भागा ।
सो नर क्यों दससीस अभागा ।

तें ऐकून अंगदाचें पित्त खवळलें व तो म्हणाला, अरे ए अकडबाजा! अडमुठ्या, तोंड संभाळ, सहस्रार्जुनाच्या अत्यंत दुर्धर अशा भुजांस देखील अग्नीप्रमाणें दहन करणाऱ्या ज्याच्या कुठाराच्या तीक्ष्ण धारारूप सागरांत असंख्य राजे अनेक वेळां बुडून मेले अशा त्या परशुरामाचाहि गर्व ज्याला पाहतांच निमाला तो, हे करंट्या रावणा मनुष्य होय काय रे?

रामु मनुज कस रे सठ बंगा ।
धन्वी कामु नदी पुनि गंगा ।
पसु सुरधेनु कलपतरु रूखा ।
अन्न दान अरु रस पीयूखा ।
बैनतेय खग अहि सहसानन ।
चिंतामनि पुनि उपल दसानन ।
सुनु मतिमंद लोक बैकुंठ ।
लाभु कि रघु-पति-भगति-अकुंठा ।

अरे ए खुळ्या बोंग्या! राम साधारण मनुष्य कसा रे? कामदेवास सामान्य धनुर्धर, भागीरथीस साधारण नदी, कामधेनूस यःकश्चित् गाय, कल्पतरूस इंधनाचें झाड, अन्नदानास सामान्य दान, किंवा अमृतास फालतू सरबत म्हणतां येईल काय? गरुड एक सामान्य पक्षी, शेष मामुली साप, आणि रावणा! चिंतामणि एक टोळगोटाच तर मग? वैकुंठ हा सामान्य लोक आणि रघुनाथाची निरबाधित भक्ति हा क्षुल्लक लाभच काय रे बेवकूफा?

**दो०—सेनसहित तव मान मथि बन उजारि पुर जारि । कस रे सठ हनुमान कपि गयउ जो तव सुत मारि ॥ ३६ ॥**

तुझ्या वनाचें रान करणारा, लंकेची आतषबाजी उडविणारा, आणि तुझ्या पुत्राचा मुडदा पाडून तुझ्या फौजेसुद्धां तुझा कड जिरवून परत फिरणारा हनुमंत यःकश्चित् वानरच काय रे अकलकंगल्या?

चौ०—सुनु रावन परिहरि चतुराई ।
भजसि न कृपासिंधु रघुराई ।
जौं खल भयेसि राम कर द्रोही ।
ब्रह्म रुद्र सक राखि न तोही ।

रावणा, याद राख. आपली ही चालाखी व नखरे सोडून कृपासागर रघुरायास शरण न जातां, द्वाडा, जर त्याच्याशीं खाजवून खरूज काढून मिजास मारशील तर ब्रह्मदेव आणि शंकरदेखील तुझा कैवार घेण्यास धजणार नाहींत.

मूढ वृथा जनि मारसि गाला ।
रामबैर होइहि अस हाला ।
तव सिरनिकर कपिन्ह के आगे ।
परिहहिं धरनि रामसर लागे ।

ते तब सिर कंदुक इव नाना।
खेलिहहिँ भालु कीस चौगाना।

अरे बातोड्या, आतां ही अटसंट बातेरी बस झाली. रामाशीं दुष्मनी केल्यानें तुझे असे हाल होतील कीं, रामाचे बाण लागून तुझीं शिरें कपींच्या समोर धरणीवर आदळतील; व नंतर असंख्य वानर आणि ऋक्ष त्या तुझ्या शिरांचे चेंडू करून पायचेंडूचा खेळ खेळतील.

जबहिँ समर कोपिहिँ रघुनायक।
छुटिहहिँ अति कराल बहु सायक।
तब कि चलिहि अस गाल तुम्हारा।
अस बिचारि भजु राम उदारा।

राम जेव्हां रणांगणावर क्रुद्ध होतील आणि त्यांचें अनेक उग्र बाण सांसां सुटूं लागतील तेव्हां तुझ्या ह्या टुरटुरीचा निभाव लागेल काय रे? विचार कर आणि त्या उदार रामचंद्रास शरण जा.

सुनत बचन रावनु परजरा।
जरत महानल जनु घृत परा।

अंगदाचें ते रोकडे जबाब ऐकतांच धगधगीत अग्नीवर तूप ओतल्याप्रमाणें रावणाच्या अंगाचा तिळपापड झाला.

**दो०—कुंभकरन अस बंधु मम सुत प्रसिद्ध सक्रारि। मोर पराक्रम नहिँ सुनेहि जितेउँ चराचर झारि॥ ३७॥**

रावण ह्मणाला, कुंभकर्णासारखा माझा बंधु, इंद्रजितासारखा प्रख्यात पुत्र, आणि साऱ्या त्रिभुवनाला दे माय धरणी ठाय करणारा माझा पराक्रम तूं ऐकलाच नाहींस तर?

चौ०—सठ साखामृग जोरि सहाई।
बाँधा सिंधु इहइ प्रभुताई।
नाघहिँ खग अनेक बारीसा।
सूर न होहिँ ते सुनु जड कीसा।

अरे मठ्ठा, माकडांची मदत घेऊन समुद्रावर सेतु उभारला हीच काय ती तुझ्या धन्याची मर्दुमकी ना! कित्येक पक्षीसुद्धां समुद्राचें उल्लंघन करितात, पण त्यांना कोणी शूर म्हणत नाहीं. उल्लू माकडा! हें आतां तरी ऐकून ठेव.

मम भुज-सागर-बल-जल-पूरा।
जहँ बूड बहु सुर नर सूरा।
बीस पयोधि अगाध अपारा।
को अस बीर जो पाइहि पारा।
दिगपालन्ह मैं नीर भरावा।
भूप सुजसु खल मोहि सुनावा।

बलरूप जलानें तुडुंब भरलेल्या माझ्या बाहुरूप समुद्रांत अनेक शूर देव आणि मानव आजवर बुडून प्राणास मुकले. अशा ह्या माझ्या वीस बाहूंच्या अगाध आणि अमर्याद समुद्रांतून पार उतरून जाईल असा कोण मायेचा पूत आहे? मीं दिक्पालांना देखील पाणी भरावयाला लावलें. अरे लफंग्या, यःकश्चित् मानवी राजाचें भारूड माझ्या समक्ष गातोस काय रे!

जौं पै समरसुभट तव नाथा।
पुनि पुनि कहसि जासु गुनगाथा।
तौ बसीठ पठवत केहि काजा।
रिपु सन प्रीति करत नहिँ लाजा।
हर-गिरि मथन निरखु मम बाहू।
पुनि सठ कपि निज प्रभुहि सराहू।

ज्याच्या गुणांचे पोवाडे गाण्याची तुला राहून राहून उकळी येते तो तुझा धनी जर खराच रणगाजी असता तर त्यानें तुला दूत म्हणून पाठविण्याचें प्रयोजनच काय? शत्रूची खुशामत करितांना त्याला लाज कशी वाटली नाहीं? कैलासपर्वतास देखील खिळखिळा करणारे माझे बाहू पाहूनहि, माकडमठ्या! फिरून आपल्याच धन्याची एजीभला गातोस होय!

**दो०—सूर कवन रावन सरिस स्वकर काटि जेहि सीस। हुने अनल महँ बार बहु हरषि साषि गौरीस॥ ३८॥**

शंकरांची साक्ष कीं ज्यानें आपलीं दहाहि मस्तकें स्वहस्तांनीं कापून त्यांची वारंवार आनंदानें अग्नींत आहुति दिली त्या रावणाच्या तोडीचा मर्द पठ्ठा आज कोण हयात आहे?

चौ०—जरत बिलोकेउँ जबहिँ कपाला।
बिधि के लिखे अंक निजभाला।
नर के कर आपन बध बाँची।
हँसेउँ जानि बिधिगिरा असाँची।

मस्तकें जळत असतांना ब्रह्मदेवानें लिहिलेलीं माझ्या कपाळावरील अक्षरें मींच पाहिलीं, व त्यांत, मनुष्याच्या हातून असलेलें माझें मरण मींच वाचलें; तरीदेखील ब्रह्मदेवाचें तें भाकित अगदीं खोटें ठरणार असें समजून मी खदखदां हसलोंच.

सोउ मन समुझि त्रास नहिँ मोरे ।
लिखा बिरंचि जरठमति भोरे ।
आन बीरबल सठ मम आगे ।
पुनि पुनि कहसि लाज परित्यागे ।

मौत पाहून देखील माझें मन कचलें नाहीं. कारण ब्रह्मदेवाची साठी बुद्धि नाठी झाल्यामुळें त्यानें तसें लिहिलें. मजसमोर वारंवार इतर वीरांच्या बळाची निर्लज्जपणें ढोलकी पिटतोस म्हणून तर तुला बैलोबा म्हणावें लागतें.

कह अंगद सलज्ज जग माहीँ ।
रावन तोहि समान कोउ नाहीँ ।
लाजवंत तव सहज सुभाऊ ।
निजमुख निजगुन कहसि न काऊ ।

अंगद म्हणाला, रावणा ! तुझ्यासारखा शरमिंदा ह्या जगांत कोणीच नाहीं रे ! तूं जात्याच शरमवाला म्हणून तर तुझ्या तोंडांतून स्वतःची टिमकी कधींच वाजत नाहीं.

सिर अरु सैल कथा चित रही ।
ता तेँ बार बीस तैँ कही ।
सो भुजबल राखेहु उर घाली ।
जीतेहु सहसबाहु बलि बाली ।

मुंडकीं आणि कैलास एवढ्या दोनच लटपटपंच्या मात्र तुझ्या आठवणींत राहिल्या, आणि आतांपर्यंत त्यांची तूं कितीदांतरी तालीम घोटलीस. मात्र ज्या आपल्या बाहुबलानें सहस्रार्जुन, बळी आणि वाली यांना तूं जिंकलेंस ते बाहु मात्र आपल्या पोटपोतडींतच जिरवून टाकलेंस.

सुनु मतिमंद देहि अब पूरा ।
काटे सीस कि होइय सूरा ।
इन्द्रजालि कहँ कहिय न बीरा ।
काटइ निजकर सकलसरीरा ।

अरे नंदीबैला ! याद राख कीं आतां मात्र तुझे पांच भरले. मस्तकें कापल्यानें काय कोणी शूर होतो ? गारुडी आपल्या हातानें आपल्या सर्व शरीराचे लचके तोडतो, म्हणून त्याला कोणी वीर का म्हणेल ?

दो०—जरहिँ पतंग बिमोहबस भार बहहिँ खरबृंद । ते नहिँ सूर कहावहिँ समुझि देखु मतिमंद ॥ ३९ ॥

बेअकलीनें पतंग देखील ( दीपज्योतींत ) आपणास जाळून घेतात आणि गाढवें खूप लच्चून ओझें वाहतात, म्हणून त्यांना कोणी शूराची पदवी दिली आहे काय ? अरे अडेलतट्टू ! ह्या गोष्टींचा जरा विचार तर बघ.

चौ०—अब जनि बत बढाव खल करही ।
सुनु मम बचन मान परिहरही ।

अरे बेरडा ! माझी गोष्ट ऐक आणि आपला हा हीनगंड सोडून दे. आतां जास्त तंडूं नकोस.

दसमुख मैँ न बसीठी आयेउँ ।
अस बिचारि रघुबीर पठायेउ ।
बार बार असि कहइ कृपाला ।
नहिँ गजारि जस बधे सृगाला ।

रावणा ! मी तुझ्याशीं साम करायला आलों नाहीं. रघुवीरांनीं अशा विचारानें मला पाठविलें कीं शृगालाचा वध करण्यांत केसरीची प्रतिष्ठा नाहीं, आणि कृपालु रामचंद्राचें वारंवार हेंच सांगणें आहे.

मन महँ समुझि बचन प्रभु केरे ।
सहेउँ कठोरबचन सठ तेरे ।
नाहिँ त करि मुखभंजन तोरा ।
लेइ जातेउँ सीतहिँ बरजोरा ।

प्रभूंच्या या हुकुमाची बजावणी म्हणूनच कीं तुझी ठोंब्याची ही सर्व गालसादी मीं सहन केली. एरव्हीं तर तुझें थोबाडच फोडलें असतें आणि जानकीस तुझ्या नाकावर टिच्चून खुशाल घेऊन गेलों असतों.

जानेउँ तव बल अधम सुरारी ।
सूने हरि आनेहि परनारी ।
तैँ निसि-चर-पति गर्बबहूता ।
मैँ रघु-पति-सेवक कर दूता ।
जौँ न रामअपमानहिँ डरऊँ ।
तोहि देखत अस कौतुक करऊँ ।

हे देवशत्रो ! परस्त्रीवर ती एकटी असतांनाच तूं हातपाटीलकी गाजविलीस ह्यावरूनच तुझा पराक्रम मला समजून चुकला. तूं खराच अडाऊ आहेस रे. राक्षसांचा राजा एवढ्यावरच तुझी सारी अक्कड, परंतु मी रामचंद्राच्या सेवकाचा एक सेवक म्हणून जर रामाच्या ( आज्ञेचें उल्लंघन केल्यानें होणाऱ्या ) शिक्षेची मला भीति नसती तर मी तुझ्यादेखत अशी मौज केली असती कीं,—

दो०-तोहि पटकि महि सेन हति चौपट करि तव गाउँ। तव जुवतीन्ह समेत सठ जनकसुतहि लेइ जाउँ॥ ४०॥

तुझी गठडी वळून, तुझ्या सैन्याचा खुर्दा उडवून आणि तुझी नगरी वैराण करून, अरे खवीसा! तुझ्या जनान्यासकट जानकीला मी घेऊन गेलोंच असतों.

चौ०-जौं अस करउँ तदपि न बडाई।
मुयेहि बधे कछु नहिँ मनुसाई।
कौल कामबस कृपिन बिमूढा।
अतिदरिद्र अजसी अतिबूढा।
सदा रोगबस संततक्रोधी।
बिष्णुबिमुख स्रुति-संत-बिरोधी।
तनुपोषक निंदक अघखानी।
जीवत सवसम चौदह प्रानी।

परंतु असें केलें असतें तरी त्यांत मोठीशी प्रौढी नव्हती. कारण मेलेल्यास मारण्यांत मुळींच पुरुषार्थ नाहीं. मद्यपी, कामी, कृपण, पागल, अतिदरिद्री, बदनाम, जुने जख्ख, दीर्घरोगी, दीर्घद्वेषी, विष्णुद्रोही, श्रुती आणि संत यांचे द्वेष्टे, उदरंभर, निंदक व पापराशि हे चवदाजण जीवंत असून देखील प्रेतवत् होत.

अस बिचारि खल बधउँ न तोही।
अब जनि रिस उपजावसि मोही।

असें समजून, चांडाळा! मी तुझा वध करीत नाहीं. आतां मात्र मला जोष चढवूं नकोस.

सुनि सकोप कह निसि-चर-नाथा।
अधर दसन दसि मींजत हाथा।
रे कपिअधम मरन अब चहसी।
छोटे बदन बात बडि कहसी।
कटु जल्पसि जड कपि बल जाके।
बल प्रताप बुधि तेज न ता के।

( अंगदाचें तें टोमणें ) ऐकून रावण चांगलाच बावरला आणि दातओठ खाऊन हात चोळीत तो बरीवलाहि, ए माकडाची लीद! आतां मात्र तुला मरणाची इच्छा होत आहे व म्हणूनच लहान तोंडानें मोठा घास घेत आहेस. बेरडा! ज्याच्या बळावर शेंफारून तूं हा बेफाम बरळत सुटला आहेस, त्याच्यांत तर शक्ति, पराक्रम, बुद्धि किंवा तेज ह्यांपैकीं कशाचाच पत्ता नाहीं.

दो०-अगुन अमान बिचारि तेहि दीन्ह पिता बनबास। सो दुख अरु जुबतीबिरह पुनि निसिदिन मम त्रास॥ ४१॥

पक्का अजागळ आणि बेंगरूळ म्हणून तर त्याच्या बापानें त्याची वनांत वरात खेदली. तें एक दुःख त्यास आहेच. त्यांत स्त्रीविरहाच्या दुःखाची आणखी भर, शिवाय रात्रंदिवस माझी दहशत.

दो०-जिन्ह के बल कर गर्ब तोहि ऐसे मनुज अनेक। खाहिँ निसाचर दिवस निसि मूढ समुझु तजि टेक॥ ४२॥

फिरून ज्याच्या बळावर तुझा हा एवढा चढेल-पणा चालू आहे त्याच्यासारखीं माणसें तर माझ्या जातभाईंचा अहोरात्र खराक ठरलेला. या गोष्टींचा विचार कर, आणि हा मस्तवालपणा सोडून दे रे गाढवा!

चौ०-जब तेहि कीन्ह राम कै निंदा।
क्रोधवंत अति भयउ कपिंदा।

जेव्हां रावणानें रामाची बेअब्रू मांडली तेव्हां मात्र त्या वानरश्रेष्ठाची तबियत बिलकुलच अंगार बनून गेली.

हरि-हर-निंदा सुनइ जो काना।
होइ पाप गो-घात-समाना।

हरिहरांची निंदा जे कानांनीं ऐकतील त्यांना गोवधासमान पातक लागतें.

कटकटान कपिकुंजर भारी।
दुहुँ भुज दंड तमकि महि मारी।
डोलत धरनि सभासद खसे।
चले भागि भय मारुत ग्रसे।

त्या कपिकुंजरानें भयंकर जोरानें दांत खाऊन दंड थोपटले व आपले दोन्ही हात जमिनीवर आपटले. त्यासरशीं धरणीकंप होऊन सभेंतील मंडळी तोंडघशीं पडली, आणि भीतीनें वावटळींत सांपडल्या-प्रमाणें सैराट पळत सुटली.

गिरत सँभारि उठा दसकंधर।
भुतल परे मुकुट अतिसुंदर।
कछु तेहि लेइ निजसिरन्हि सँवारे।
कछु अंगद प्रभुपास पबारे।

रावणहि पडतां पडतां सांवरून उठला. त्याचे कमालसूरत मुकुट सारे जमिनीवर खचून पडले. पैकीं

कांहीं रावणानें उचलून आपल्या मस्तकीं ठेविले व कांहीं अंगदानें रामाकडे भिरकावून दिले!

आवत मुकुट देखि कपि भागे।
दिनहीं लूक परन बिधि लागे।
की रावन करि कोप चलाये।
कुलिस चारि आवत अतिधाये।
कह प्रभु हँसि जानि हृदय डेराहू।
लूक न असनि केतु नहिँ राहू।
ए किरीट दसकंधर केरे।
आवत बालितनय के प्रेरे।

इकडे ते मुकुट येत आहेत असें पाहून वानर पळूं लागले. ते म्हणत कीं, दैवा! काय हे दिवसाच उल्कापात होऊं लागले? कां रावणानें क्रुद्ध होऊन हीं चार अत्यंत वेगानें फेंकलेलीं वज्रेंच झपटून येत आहेत? तेव्हां प्रभु हंसून म्हणाले, बोर्दिलींचें मुळींच कारण नाहीं. हे उल्कापात नव्हत, अगर वज्र, राहू किंवा केतूहि नव्हत. हे रावणाचे किरीट होत. ते अंगदाच्या प्रेरणेनें इकडे येत आहेत.

**दो०—तरकि पवनसुत कर गहेउ आनि धरे प्रभुपास। कौतुक देखहिँ भालु कपि दिन-कर-सरिस प्रकास॥ ४३॥**

तेव्हां मारुतीनें उडी मारून ते किरीट हातांवर झेलले व प्रभूकडे आणले. त्या किरीटांचा तो सूर्यासारखा प्रकाश पाहून वानर आणि ऋक्ष त्यांचेकडे पाहून थक्कच झाले.

**दो०—उहाँ सकोप दसानन सब सन कहत रिसाइ। धरहु कपिहि धरि मारहु सुनि अंगद मुसुकाइ॥ ४४॥**

तिकडे रावण चवताळून त्वेषानें सर्व समासदांना म्हणाला, या माकडाचा मुडदा पाडा रे. हें ऐकतांच अंगद हसूं लागला.

चौ०—एहि बधि बेगि सुभट सब धावहु।
खाहु भालु कपि जहँ तहँ पावहु।
मरकटहीन करहु महि जाई।
जिअत धरहु तापस दोउ भाई।

रावण पुढें म्हणाला, हे वीरहो! तुह्मी अशाच रीतीनें ( वावटळीसारखें ) सपाटून धावत सुटा आणि वानर व ऋक्ष कोठेंहि आढळोत त्यांच्या खुर्मा करीत सुटा आणि अख्ख्या दुनियेंतील माकड गारद करून त्या दोघां बोवाभाईना जीवंत धरून आणा.

पुनि सकोप बोलेउ जुबराजा।
गाल बजावत तोहि न लाजा।
मरु गर काटि निलज कुलघाती।
बल बिलोकि बिहरति नहिँ छाती।
रे त्रियचोर कु-मारग-गामी।
खल मलरासि मंदमति कामी।
सन्निपात जल्पसि दुर्बादा।
भयेसि कालबस खल मनुजादा।

तेव्हां अंगद खूप खवळून म्हणाला, तुला अद्याप तोंड वाजविण्याची लाज रे कशी वाटत नाहीं? हे निर्लज्जा कुलघातक्या! गळे कापून घेऊन मर तरी एकदांचा. माझी कुव्वत पाहून तुझी छाती अजून दडपूं नये रे? तूं बदफैली, बदमाष, हरामखोर, रेम्याडोक्या आणि खरा कण्याचा जनाकार आहेस. थिलंदर बदकाऱ्या! तुला सन्निपातानें धेरलें आहे म्हणूनच तुझी जिभली इतकी बेताल लपलपते! आदमखोरा! तूं काळाच्या जबड्यांत पक्का गठलास!

या को फल पावहुगे आगे।
बानर-भालु-चपेटन्हि लागे।
राम मनुज बोलत असि बानी।
गिरहिँ न तव रसना अभिमानी।
गिरिहहिँ रसना संसय नाहीँ।
सिरन्हि समेत समरमहि माहीँ।

जेव्हां वानर आणि ऋक्ष ह्यांचे तडाखे बसूं लागतील तेव्हां तुला याचें फळ कळून येईल. आग्या वेताळा! 'राम मनुष्य आहेत' हे शब्द तोंडांतून काढतांना एव्हांना जरी तुझी जिभली गळून पडली नाहीं, तरी ती रणांगणांत मात्र तुझ्या मस्तकांसकट निःसंशय गळून पडेल.

**सो०—सो नर क्योँ दसकंध बालि बधेउ जेहि एक सर। बीसहु लोचन अंध धिग तव जनम कुजाति जड॥ ६॥**

अरे दसमुंड्या! ज्यानें फक्त एकाच बाणेंकरून वाली सपशेल जिरविला तो मनुष्य होय काय रे? वीस डोळे असून देखील तूं गडद आंधळा रे आंधळा. अरे बज्जाता, बोहाऱ्या! थुः तुझ्या जिनगानीवर.

**सो०—तव सोनित की प्यास तृषित राम-सायक-निकर। तजउँ तोहि तेहि त्रास कटुजल्पक निसिचर अधम ॥ ७॥**

रामाच्या बाणांना तुझ्या रक्ताची तहान लागली आहे. हे नीचा, निंदका, राक्षसा! (मीं तुझे प्राण घेतल्यास) त्या बाणांना दुःख होईल म्हणून मी तुला आज जीवदान देत आहे.

चौ०—मैं तव दसन तोरिबे लायक।
आयसु मोहि न दीन्हि रघुनायक।
अस रिसि होति दसउ मुख तोरउँ।
लंका गहि समुद्र महँ बोरउँ।
गूलर-फल-समान तव लंका।
बसहु मध्य तुम्ह जंतु असंका।
मैं बानर फल खात न बारा।
आयसु दीन्हि न राम उदारा।

आतांच्या आतांच तुझे दांत तुझ्या घशांत कोंबून मीं दाखविले असते, पण धन्याच्या हुकुमासमोर मी लाचार आहे. वास्तविक मला संताप तर इतका आला आहे कीं तुझीं हीं दहाहि मुंडकीं तोडून ठेवावीं आणि ही तुझी अख्खी लंका '‘समुद्रास्तृप्यन्तु’ करावी. (यांत कठीण तें काय?) मला ही तुझी लंका उंबराच्या फळासारखी वाटते, आणि तुम्हीं सर्व त्यांतलीं किटकुलें वाटतां, हें बेलाशक समज. अरे, मी जाणूनबुजून वानर, उंबर माझ्या 'प्राणाय स्वाहा'सहि पुरणार नाहीं. बस, माझी सारी नड ही कीं माझ्या या दिलदार धन्याचा तसा हुकुम नाहीं.

जुगुति सुनत रावन मुसुकाई।
मूढ सीख कहँ बहुत झुठाई।
बालि न कबहुँ गाल अस मारा।
मिलि तपसिन्ह तैं भयसि लबारा।

अंगदाचा तो वाक्या ऐकून रावण हंसला आणि म्हणाला—झोटिंगा, या गटारगप्पांची इतकी फेर झाडण्यास तूं शिकलास तरी कोठें? वालीनें अशी कधींच फुशारकी मारली नाहीं. तूंच मात्र या फटिंगाच्या तालमींत खूपच मिसकिल निवडलास.

साँचेहु मैं लबार भुजबीहा।
जौं न उपारउँ तव दस जीहा।
समुझि रामप्रताप कपि कोपा।
सभा माँझ पन करि पद रोपा।
जौं मम चरन सकसि सठ टारी।
फिरहिं राम सीता मैं हारी।

(अंगद म्हणाला,) हे रावणा! मी खरोखरीच काफर आहे. कारण मीं अजून तुझ्या दहा जिभा उपटल्या नाहींत. इतकें बोलून अंगद आवेशांत आला, आणि रामप्रतापाचें स्मरण करून त्यानें आपला पाय भरसभेंत पुढें रोवून प्रतिज्ञा केली कीं, जर हा माझा पाय तूं गलेलठ्ठ नुसता हटवूं शकशील तरीहि मी जानकीला हारीन आणि रामहि आल्या वाटेनें परत जातील.

सुनहु सुभट सब कह दससीसा।
पद गहि धरनि पछारहु कीसा।

तेव्हां रावण सभेस म्हणाला, माझ्या पठ्ठयांनो! ऐका. ह्या माकडाची टांग खेंचून यास चारीहि मांढे चीत करा पाहूं.

इंद्र--जीत--आदिक बलवाना।
हरषि उठे जहँ तहँ भट नाना।
झपटहिं करि बल बिपुल उपाई।
पद न टरइ बैठहिं सिरु नाई।

इंद्रजितप्रभृति अनेक बलाढ्य वीर मोठ्या हुरुपानें उठले आणि पुष्कळ पाचपेचानें (जिकडूनतिकडून) पायाशीं झोंबून जोर करूं लागले, तरीहि पाय हालेना. तेव्हां ते खालमाने बनून आपापल्या जागीं जाऊन आदळले.

पुनि उठि झपटहिं सुरआराती।
टरइ न कीसचरन एहि भाँती।
पुरुष कुजोगी जिमि उरगारी।
मोहबिटप नहिं सकहिं उपारी।

फिरूनहि ते गलेलठ्ठ शौकानें जोर करूं लागले; तथापि कांहींहि केल्या अंगदाचा पाय चकचकेना. (काकभुशुंडी म्हणतात) हे गरुडा! योगभ्रष्ट ज्याप्रमाणें अज्ञानरूपी वृक्षाचें उन्मूलन करण्यास असमर्थ असतो तशीच राक्षसांचीहि गति झाली.

**दो०—कोटिन्ह मेघ-नाद-सम सुभट उठे हरखाइ। झपटहिं टरइ न कपिचरन पुनि बैठहिं सिर नाइ॥ ४५॥**

मेघनादाच्या दर्जाचे कैक मोहरे मोठ्या हिरीरीनें उठले व अंगदाच्या पायाशीं झोंबूं लागले. परंतु त्याचा पाय मुळींच चकचकेना. तेव्हां अखेर सन्न बनून त्यांनीं आपापली बैठक गांठली.

दो०—भूमि न छाडत कपिचरन देखत रिपुमद भाग। कोटिबिघ्न तेँ संत कर मन जिमि नीति न त्याग ॥ ४६ ॥

कोट्यवधि संकटें आलीं असतांहि जसें संतांचें मन नीतीपासून चळत नाहीं, तद्वत् अंगदाचा पाय भूमीवरून हालेना. तें पाहून शत्रूचा कंडू चांगलाच जिरला.

चौ०—कपिबल देखि सकल हिय हारे।
उठा आपु कपि के परचारे।

अंगदाची शक्ति पाहून सर्वचजण मनांत थिजून गेले, तेव्हां अंगदाच्या हाकेवर रावण खुद्द उठला.

गहत चरन कह बालिकुमारा।
मम पद गहे न तोर उबारा।
गहसि न रामचरन सठ जाई।
सुनत फिरा मन अतिसकुचाई।

रावण येऊन आतां पाय धरणार तोंच अंगद म्हणाला, माझे समोर नाकदुरे काढून तुझा बचाव होणार नाहीं. अरे ए एलची! जाऊन रामाच्या चरणासमोर तसें कां करीत नाहींस? तें ऐकतांच रावण अगदीं शरमिंदा होऊन परत फिरला.

भयउ तेजहत श्री सब गई।
मध्यदिवस जिमि ससि सोहई।
सिंहासन बैठेउ सिर नाई।
मानहुँ संपाति सकल गवाँई।

मध्याह्नकालीं ज्याप्रमाणें चंद्र कांतिहीन होतो. त्याप्रमाणें रावण काळवंडला व त्याचा नूरच उतरला. जणुकाय सर्व इज्जत व कमाई गमावल्याप्रमाणें खालीं मान घालून तो सिंहासनावर बसला.

जगदातमा प्रानपति रामा।
तासु बिमुख किमि लह बिस्रामा।
उमा राम की भृकुटि बिलासा।
होइ बिस्व पुनि पावइ नासा।
तृन तेँ कुलिस कुलिस तृन करई।
तासु दूतपन कहु किमि टरई।

जगदात्मा प्राणपति रामचंद्रांशीं विरोधून सुख कसें मिळणार? शंकर म्हणतात, हे पार्वति! रामाच्या भृकुटिविलासेंकरून विश्वाची उत्पत्ति होते आणि पुनरपि नाशहि होतो; तो तृणाचें वज्र करितो आणि वज्राचें तृण करितो. त्याच्या दूताची प्रतिज्ञा कशी भ्रष्ट होईल?

पुनि कपि कही नीति बिधि नाना।
मान न तासु काल नियराना।
रिपुमद मथि प्रभु-सु-जस सुनायो।
यह कहि चलेउ बालि-नृप-जायो।
हतउँ न खेत खेलाइ खेलाई।
तोहि अबहिँ का करउँ बडाई।

अंगदानें पुन्हां रावणाला अनेक प्रकारें बोध केला परंतु त्याची घडी भरत आल्याकारणानें त्यानें तिकडे लक्षच दिलें नाहीं. तथापि फिरून एकदां अंगदानें रामचंद्राच्या सद्यशाचें वर्णन करून रावणाची कंबख्ती उतरविली व पुढीलप्रमाणें बोलून तो चालता झाला. 'आतां मीं आपली मोतबरी तुझ्याजवळ काय सांगावी? रणांगणावर जरी मी तुला न मारलें तरी तुझी कणीक मात्र खूप तिंबीन हें खास.'

प्रथमहिँ तासु तनय कपि मारा।
सो सुनि रावन भयउ दुखारा।
जातुधान अंगदपन देखी।
भय ब्याकुल सब भये बिसेखी।

आरंभींच अंगदानें त्याच्या पुत्राचा भग घेतला होता त्यामुळें रावण मनांत खोचला होता. आतां पाय रोवणाची अंगदाची प्रतिज्ञा तर त्यानें प्रत्यक्षच अनुभविली.या एकंदर प्रकारामुळें रावणासुद्धां सर्वच राक्षसांची खुपच खुप घाबरगुंडी उडाली.

दो०—रिपुबल धरषि हरषि कपि बालितनय बलपुंज। पुलक सरीर नयनजल गहे राम-पद-कंज ॥ ४७ ॥

अशा प्रकारें रिपुबलावर दुगाण्या झाडून तो महावीर्यशाली वालीपुत्र अंगद प्रेमभरानें सजलनेत्र आणि पुलकगात्र होत्साता श्रीरामचंद्राकडे येऊन त्यांच्या चरणांस मिठी मारता झाला.[1]

दो०—साँझ जानि दसमौलि तब भवन गयउ बिलखाइ। मंदोदरी निसाचरहि बहुरि कहा समुझाइ ॥ ४८ ॥

---

१ हा अंगदशिष्टाईचा भाग दिसण्यांत शिव्यागाळीचा आणि उखाळ्यापाखाळ्यांचा दिसतो खरा. परंतु कवीनें तो तसा मुद्दाम कां रंगविला तें या दोह्यावरून ध्वनित होऊं शकेल. दोह्याचा पहिला चरण लक्षांत घ्या म्हणजे रावण अंगदानें अर्धा मारला हें स्पष्ट दिसून येईल.

संध्याकाळ झालेला पाहून रावण दुःखित अंतःकरणानें खास महालांत गेला. तेथें फिरून मंदोदरीनें त्यास चांगलाच फैलावर घेतला.

चौ०–कंत समुझि मन तजहु कुमतिही।
सोह न समर तुह्महिँ रघुपतिही।
रामानुज लघुरेख खँचाई।
सोउ नहिँ नाँघहु असि मनुसाई।

हे प्राणनाथ! मनांत विचार करून ह्या वांझोट्या बुद्धीचा त्याग करा. रघुपतीशीं युद्ध घेणें आपल्याला शोभत नाहीं. लक्ष्मणानें इवलीशी रेघच ओढली होती ना? पण तेवढी सांघण्याची आपल्यांत मगदुर उरली नाहीं, असला तर आपला पराक्रम.

पिय तुह्म ताहि जितब संग्रामा।
जा के दूत केर अस कामा।
कौतुक सिंधु नाँघि तव लंका।
आयउ कपिकेहरी असंका।
रखवारे हति बिपिन उजारा।
देखत तोहि अच्छ तेहि मारा।
जारि नगर सबु कीन्हेसि छारा।
कहाँ रहा बल गर्व तुह्मारा।

धनीसाहेब! एक कपिकेसरी सहज खेळत खेळत समुद्र उलंघून बिनदिक्कत आपल्या लंकेंत शिरला. त्यानें एकट्यानेंच सगळे रखवालदार बरबाद करून अशोकवनाची तसनस उडवून दिली. त्यानेंच तुमच्या डोळ्यांसमोर अक्षाचें भक्ष्य केलें. आणि सर्व नगरीची आतषबाजी उडविली. त्यावेळीं आपलें हें बल आणि हा दिमाख कोठें गुंतला होता? ज्याच्या दूताचा देखील एवढा पराक्रम त्याला तुम्ही संग्रामांत जिंकूं पहातां होय?

अब पति मृषा गाल जनि मारहु।
मोर कहा कछु हृदय बिचारहु।
पति रघुपतिहि नृपति जनि मानहु।
अग जगनाथ अ–तुल–बल जानहु।
बानप्रताप जान मारीचा।
तासु कहा नहिँ मानेहु नीचा।

यजमानसाहेब! आतां विनाकारण तोंडाचे फवारे उडवूं नयेत. मी म्हणतें त्याचा किंचित् तरी मनांत विचार आणा. प्राणपते! रघुपतीला केवळच नृपति न समजतां चराचरपति आणि अपार शक्ति समजा. त्यांच्या बाणाचा प्रताप मारीच जाणत होता, परंतु त्याचेंहि म्हणणें आपण तुच्छतेनें झिडकारिलेंच.

जनकसभा अगनित महिपाला।
रहे तुम्हहुँ बल बिपुल बिसाला।
भंजि धनुष जानकी बिआही।
तब संग्राम जितेहु किन ताही।
सुर-पति-सुत जानइ बल थोरा।
राखा जियत आँखि गहि फोरा।
सूपनखा कै गति तुह्म देखी।
तदपि हृदय नहिँ लाज बिसेखी।

राजा जनकाच्या सभेंत असंख्य राजे जमले होते. तेथें आपणहि आपलें विपुल आणि विशाल बलाचें भारूड बाळगून गेला होतांच. त्या वेळीं देखील शिवचापाचा भंग करून रामानींच जानकी तावडली. तेव्हां युद्ध करून आपण त्यांस कां बरें मसकलें नाहीं? इंद्रसुत जयंतालाहि त्यांचें बल अल्पच वाटलें होतें. रामांनीं नुसता डोळाच धरून फोडला, आणि जयंताला जीवंत ठेविलें. शूर्पणखेचा नक्षा उतरविलेलाहि तुम्हीं पाहिलाच. इतका बोजवारा उडूनदेखील अद्याप तुमच्या मनाला मुळींच क्षति कशी ती शिवत नाहीं!

**दो०–बधि बिराध खरदूखनहिँ लीला हतेउ कबंध। बालि एक सर मारेउ तेहि जानहु दसकंध ॥ ४९ ॥**

ज्यानें सहज लीलेनें विराधखरदूषणकबंधादिकांचा सारा खेळखंडोबा करून सोडला आणि फक्त एकाच बाणानें वालीस नेस्तनाबूद करून सोडलें त्याला, महाराज! अजून तरी ओळखा हो!

चौ०–जेहि जल नाथ बँधायेउ हेला।
उतरे सेन समेत सुबेला।
कारुनीक दिन–कर–कुल–केतू।
दूत पठायउ तव हित हेतू।

ज्यानें केवळ खेळ म्हणून समुद्र बांधून काढला आणि आपलें लावलष्कर आणून सुवेलपर्वतावर आपला तळ उठविला त्या दयाघन दिनकरकुलकेतूनें केवळ आपल्या कल्याणाच्या इच्छेनें आपणाकडे आपला जासूद पाठविला होता.

सभा माँझ जेहि तव बल मथा।
करिबरूथ महँ मृगपति जथा।

अंगद हनुमत अनुचर जा के।
रनबाँकुरे बीर अतिबाँके।
तोहि कहँ पिय पुनि पुनि नर कहहू।
मुधा मान ममता मद बहहू।

खुद आपण हजर असलेल्या आपल्या दरबारांत हत्तींच्या कळपामध्यें जसा सिंह तसाच प्रत्यक्ष घुसून ज्याच्या एकएकल्या हलकाऱ्यानें आपलें धुमसून तेल काढलें त्या हनुमान अंगदासारखे असल बांके रणनवरे ज्याच्या हुकुमतींत त्यास, सरकार! आपण एक यथातथा मनुष्यप्राणी म्हणून एकसारखे टरेंबाजी लावीत आहांत. या आपल्या मनस्वीपणाचें कारण एकच कीं, तीन 'म'—मान ( अधिकार ), ममता ( स्वार्थ ) आणि मद ( गर्व )—आपल्या मागें हात धुऊन लागले आहेत.

अहह कंत कृत राम बिरोधा।
कालबिबस मन उपज न बोधा।
कालु दंड गहि काहु न मारा।
हरइ धर्म बल बुद्धि बिचारा।
निकट काल जेहि आवइ साईं।
तेहि भ्रम होइ तुह्मारिहि नाईं।

हर हर! प्राणनाथ! रामाशीं आपण हकनहाकच हा दुष्मनदावा वाढविला आहे. आपणांवर मृत्यूचा पूर्ण शह बसला आहे. म्हणूनच आपल्या बुद्धींत नेक सल्ला रुजत नाहीं. मृत्यु प्रत्यक्ष हातांत लाठी घेऊन कोणासच झोडीत नसतो. तो धर्म, बल, बुद्धि आणि विचार यांच्यावरच सपशेल धाड खचावितो. कंबख्तीनें घेरलेल्यांची आणि या वेळची ही आपली अकड बिलकुल हुबेहुब एकसहा समजा.

दो०—दुइ सुत मारेउ दहेउ पुर अजहूँ परितय देहु। कृपासिंधु रघुनाथ भजि नाथ बिमल जस लेहु॥ ५०॥

आपणच दोन पुत्र घालविले आणि नगरीचीहि होळी करविली. अजून तरी परस्त्री देऊन टाका, आणि त्या दयार्णव रघुनाथास शरण जा. धनीसाहेब! विमल यशाची प्राप्ति करून घेण्यास आतां हा एकच मार्ग उरला आहे.

चौ०—नारिबचन सुनि बिसिखसमाना।
सभा गयउ उठि होत बिहाना।
बैठ जाइ सिंहासन फूली।
अति अभिमान त्रास सब भूली।

मंदोदरीचें तें फैलावर घेणें रावणाच्या कानास बाणाप्रमाणें झोंबलें. उजाडतांच तो तडक उठून सभेंत जाण्यास निघाला. तेथें जाऊन सिंहासनावर तो मोठ्या तोऱ्यानें बसला व अत्यंत अहंमन्यतेमुळें सर्व ददात विसरून गेला.

इहाँ राम अंगदहिँ बोलावा।
आइ चरन-पंक-ज सिर नावा।
अतिआदर समीप बैठारी।
बोले बिहँसि कृपाल खरारी।

इकडे श्रीरामांनीं अंगदास बोलाविलें व त्यानें येऊन त्यांच्या चरणारविंदीं मस्तक नमविलें. त्यास मोठ्या आदरानें जवळ बसवून दयाघन खरशत्रु श्रीरामचंद्र हास्य करून म्हणाले,—

बालितनय अतिकौतुक मोही।
तात सत्य कहु पूछउँ तोही।
रावन जातु-धान-कुल-टीका।
भुजबल अतुल जासु जग लीका।
तासु मुकुट तुह्म चारि चलाये।
कहहु तात कवनी बिधि पाये।

अंगदा! मला मोठेंच आश्चर्य वाटत आहे म्हणून तुला विचारतों. बाळा! खरें सांग. रावण म्हणजे राक्षसकुळाचा मुकुटमणी. त्याचें बाहुबल जगांत अव्वल म्हणून गणलें जातें. अशा त्या रावणाचे चार मुकुट तूं इकडे फेकलेस. हे तात! ते तुला कसे मिळाले तें सांग पाहूं.

सुनु—सर्वज्ञ प्र-नत-सुख-कारी।
मुकुट न होहिँ भूपगुन चारी।
साम दाम अरु दंड बिभेदा।
नृपउर बसहिँ नाथ कह बेदा।
नीतिधर्म के चरन सुहाये।
अस जिय जानि नाथ पहिँ आये।

( तेव्हां अंगद म्हणाला,) हे सर्वज्ञ, शरणागतसुखदायका! ऐका. ते मुकुट नसून ते चार भूपगुण होत. हे नाथ! तज्ञ सांगतात कीं, साम, दाम, दंड, आणि भेद हे चार गुण राजाच्या हृदयामध्यें वास करितात. हें जाणून ते मुकुट प्रभूंच्या नीतिधर्मपरायण सुंदर चरणांजवळ येऊन पडले ( भाव हा कीं नकली राजा सोडून ते खऱ्या राजाकडेस आले ).

दो०–धर्महीन प्रभु–पद–बिमुख काल-
बिबस दससीस। तेहि परिहरी गुन
आए सुनहु कोसलाधीस ॥ ५१ ॥

रावण स्वधर्मच्युत होऊन प्रभुपदाला विन्मुख झाल्यामुळें आतां तो मृत्यूच्या आधीन झाला आहे. ह्यास्तव वरील चारीहि गुण त्याचा त्याग करून कोशलाधीश्वरांच्या आश्रयाला आले आहेत असें समजा.

दो०–परमचतुरता स्रवन सुनि बिहँसे रामु
उदार। समाचार पुनि सब कहे गढ
के बालिकुमार ॥ ५२ ॥

अंगदाचें तें उत्कृष्ट ललितवाङ्मय ऐकून रामचंद्र पोटभर हंसले. नंतर त्या बालिकुमारानें लंकेंतला सर्व वृत्तांत निवेदन केला.

चौ०–रिपु के समाचार जब पाये।
राम सचिव सब निकट बोलाये।
लंका बाँके चारि दुआरा।
केहि बिधि लागिय करहु बिचारा।

शत्रूकडील समाचार ऐकल्यानंतर रामांनीं सर्व युद्धसचिवांना बोलाविलें. ते म्हणाले, लंकेच्या चारीहि वेशी सज्ज आहेत. आतां मात्र विचार केलाच पाहिजे कीं लढाईस तोंड कसें व कोठें फोडावयाचें ?

तब कपीस रिच्छेस बिभीषन।
सुमिरि हृदय दिन–कर–कुल–भूषन।
करि बिचार तिन्ह मंत्र दृढावा।
चारि अनी कपिकटक बनावा।
जथायोग सेनापति कीन्हे।
जूथप सकल बोलि तब लीन्हे।
प्रभुप्रताप कहिं सब समुझाये।
सुनि कपि सिंहनाद करि धाये।

तेव्हां त्या दिनकरकुलभूषणाचें हृदयांत स्मरण करून सुग्रीव, जांबवंत आणि बिभीषण ह्यांनीं विचार करून सल्ला ठरविला, त्यांनीं कपिसैन्याचें चार विभाग केले व त्यांवर यथायोग्य अधिकारी नेमले. नंतर सर्व यूथपतींना बोलावून त्यांना प्रभूचा प्रताप सर्व समजावून सांगितला. तो ऐकतांच वानर सिंहनाद करून सरसावले.

हरषित रामचरन सिर नावहिँ।
गहि गिरिसिखर बीर सब धावहिँ।
गर्जहिँ तर्जहिँ भालु कपीसा।
जय रघुबीर कोसलाधीसा।
जानत परमदुर्ग अति लंका।
प्रभुप्रताप कपि चले असंका।
घटाटोप करि चहुँदिसि घेरी।
मुखहि निसान बजावहिँ भेरी।

ते सर्व वीर हर्षित होऊन प्रभुपदचरणीं मस्तक नमवून पर्वतशिखरें घेऊन धावूं लागले. 'जयरघुवीर कोशलाधीश्वर' असा घोष करून ते उड्डाण करीत. लंका अत्यंत अभेद्य जाणूनदेखील ते वानर प्रभुप्रतापें करून तिच्यावर निर्धास्त चालून गेले. त्यांनीं जय्यत तयारीनें लंकेला वेढा दिला. ते आपल्या मुखांनींच निशाण-भेरीसारखे आवाज करीत.

दो०–जयति राम जय लछिमन जय
कपीस सुग्रीवँ। गर्जहिँ केहरिनाद
कपि भालु महा–बल–सीवँ ॥ ५३ ॥

जहामर्द असे ते ऋक्षवानर श्रीरामचंद्र, लक्ष्मण आणि कपिराज सुग्रीव यांच्या नांवांचा जयजयकार करून सिंहनाद करूं लागले.

चौ०–लंका भयउ कोलाहल भारी।
सुना दसानन अतिअहँकारी।
देखहु बनरन्ह केरि ढिठाई।
बिहँसि निसा–चर–सेन बोलाई।
आये कीस काल के प्रेरे।
छुधावंत सब निसिचर मेरे।
अस कहि अट्टहास सठ कीन्हा।
गृह बैठे अहार बिधि दीन्हा।
सुभट सकल चारिहु दिसि जाहू।
धरि धरि भालु कीस सब खाहू।

लंकेंत भयंकर हाहाकार माजला. तो ऐकून 'पहा तर काय हा ह्या वानरांचा उर्मटपणा' असें म्हणून रावण मोठ्या दिमाखानें हंसला व त्यानें राक्षससैन्यास इषारत दिली. तो म्हणाला, काळाच्या प्रेरणेनें हीं माकडें येऊन खेटलीं आहेत, व तुम्ही माझे सर्व राक्षस बुभुक्षित आहांत, घरबसल्याच ब्रह्मदेवानें ह्या डाल्या पोचविल्या आहेत. असें म्हणून त्या धटिंगणानें विकट हास्य केलें ( नंतर तो पुन्हां म्हणाला )

हे वीर हो ! तुम्हीं सर्व चारीहि बाजूंनीं जा, आणि सर्व वानर आणि ऋक्ष यांना धरधरून गट्ट करीत सुटा.

उमा रावनहि अस अभिमाना ।
जिमि टिट्टिभ खग सूत उताना ।

शंकर म्हणतात हे पार्वति ! ज्याप्रमाणें टिट्टिभ-पक्षी आकाश कदाचित् कोसळलेंच तर तें आपण ( पायानें ) सावरून धरूं अशा ऐटीनें पाय वर करून उताणा निजतो त्याचप्रमाणें रावणाची ही आढ्यता होती.

चले निसाचर आयसु माँगी ।
गहि कर भिंडिपाल बर साँगी ।
तोमर मुद्गर परिघ प्रचंडा ।
सूल कृपान परसु गिरिखंडा ।

रावणाची आज्ञा घेऊन ते राक्षस भिंदिपाल, बरची, शक्ति, तोमर, मुद्गल, परशु शूल, कृपाण, परिघ, पर्वतखंड इत्यादि प्रचंड आयुधें घेऊन निघाले.

जिमि अरुनोपलनिकर निहारी ।
धावहिँ सठ खग मांसअहारी ।
चोँच-भंग-दुख तिन्हहिँ न सूझा ।
तिमि धाये मनुजाद अबूझा ।

ज्याप्रमाणें आरक्त पाषाणांचा ढीग पाहून निर्बुद्ध हिंस्रपक्षी त्यावर झडप घालतात, परंतु चोंच ठेंचण्याच्या दुःखाची त्यांना कल्पनाहि नसते, त्याप्रमाणें ते उल्लू राक्षस वानरसैन्यावर हिरीरीनें कोसळले.

**दो०—नानायुध सर—चाप—धर जातुधान बलबीर । कोटकँगूरनि चढि गये कोटि कोटि रनधीर ॥ ५४ ॥**

धनुष्यबाण इत्यादि अनेक आयुधें घेतलेले कोट्यवधि जहांबाज आणि शहाजोर राक्षसवीर कोटाच्या बुरुजावर चढून बसले.

चौ०—कोटकँगूरन्हि सोहहिँ कैसे ।
मेरु के सृंगनि जनु घन बैसे ।
बाजहिँ ढोल निसान जुझाऊ ।
सुनि धुनि होइ भटन्ह मन चाऊ ।
बाजहिँ भेरि नफीरि अपारा ।
सुनि कादरउर जाहिँ दरारा ।

ते राक्षस कोटाच्या बुरुजावर, मेरुपर्वताच्या शृंगावरील मेघाप्रमाणें शोभूं लागले. ढोल, निषाण, इत्यादि रणवाद्यें वाजूं लागलीं. त्यांचा तो गजर ऐकून वीरांना वीरश्री चढली. भेरी, नफीरी इत्यादि अपार वाद्यें वाजूं लागलीं. तीं ऐकतांच भ्याडांच्या मनांत धडकी भरत होती.

देखि न जाइ कपिन्ह के ठट्टा ।
अति बिसाल तनु भालु सुभट्टा ।
धावहिँ गनहिँ न अवघट घाटा ।
पर्बत फोरि करहिँ गहि बाटा ।
कटकटाहिँ कोटिन्ह भट गर्जहिँ ।
दसन ओठ काटहिँ अतितर्जहिँ ।

इकडे त्या भ्यासुर कदीच्या ऋक्षवानरवीरांच्या चेष्टा मात्र पाहवत नव्हत्या. अवघड घाटांचा तर त्यांना कांहीं हिशेबच नव्हता. ते धांवत धांवत घाट चढून जात, आणि ( जेथें वाट नसे तेथें ) ते पहाड फोडून वाट करून घेत. कोट्यवधि वीर ' कटकट ' असा शब्द करून गर्जना करीत दांत-ओठ चाऊन टणाटण उड्या मारीत.

उत रावन इत राम दोहाई ।
जयति जयति जय परी लराई ।
निसिचर सिखरसमूह ढहावहिँ ।
कूदि धरहिँ कपि फेरि चलावहिँ ।

तिकडे रावणाची दुहाई आणि फत्ते यांचा पुकार मचून आणि इकडे श्रीरामचंद्राची शपथ आणि जयजयकार होऊन दुतर्फा बिजन झुंपलें. राक्षस पर्वतांचीं असंख्य शिखरें वरून लोटूं लागले. वानर उडी मारून तीं पर्वतशिखरें वरचेवरच झेलीत आणि तींच परत राक्षसांकडे भिरकावून देत.

**छंद—धरि कु—धर—खंड प्रचंड मर्कट भालु गढ पर डारहीँ । झपटहिँ चरन गहि पटकि महि भजि चलत बहुरि प्रचारहीँ । अतितरल तरुन प्रताप तर्जहिँ तमकि गढ चढि चढि गये । कपि भालु चढि मंदिरन्हि जहँ तहँ रामजसु गावत भये ॥ १ ॥**

ते प्रचंड ऋक्षवानर पर्वतशिला घेऊन कोटावर त्यांचा भडिमार करीत, राक्षसांवर तुटून पडून त्यांस तंगड्या धरून जमिनीवर आपटीत, आणि पळून जाऊन फिरून छातीठोक त्यांना नांवानें ललकारीत. तरुण आणि अत्यंत चपल ऋक्षवानर मोठ्या शिताफीनें उड्या मारीत कोटावर चढून जात आणि चोहोंकडे घराघरावर चढून ते रामयश गाऊं लागत.

दो०—एक एक गहि निसिचर पुनि कपि चले पराइ। ऊपर आपुनु हेठ भट गिरहिँ धरनि पर आइ॥ ५५॥

एक एक कपी एक एक राक्षस घेऊन पळून जाई, आणि आपण वर व त्याला खालीं घेत ते जमिनीवर उडी मारीत.

चौ०—राम-प्रताप-प्रबल कपिजूथा।
मर्दहिँ निसिचर-निकर-बरूथा।
चढ़े दुर्ग पुनि जहँ तहँ बानर।
जय रघु-बीर-प्रताप दिवाकर।

रामप्रतापानें प्रबल झालेल्या कपिसैन्यानें राक्षस सैन्यांत खंदळ माजवून सोडलें. पुन्हां जिकडून-तिकडून ते किल्ल्यावर चढून रघुवीराच्या प्रताप-सूर्याचा जयजयकार करीत सुटले.

चले निसा–चर–निकर पराई।
प्रबलपवन जिमि घनसमुदाई।
हाहाकार भयउ पुर भारी।
रोवहिँ बालक आतुर नारी।
सब मिलि देहिँ रावनहि गारी।
राज करत एहि मृत्यु हँकारी।

सोसाट्याच्या वाऱ्यानें जशी मेघमंडळाची वाताहत होते तद्वत् राक्षससैन्य सैरावैरा पळत सुटलें. लंका-नगरींत भयंकर हाहाःकार उडाला. बायकामुलें घाबरून बोंबा ठोकूं लागलीं. सर्व लोक रावणाला शिव्याशाप देऊन म्हणत कीं ह्या रावणानें (सुखानें) राज्य करीत असतां स्वतःच मृत्यूला बोलावून आणलें.

निजदल बिचल सुना तेहि काना।
फेरि सुभट लंकेस रिसाना।
जो रन बिमुख फिरा मैं जाना।
सो मैं हतब करालकृपाना।
सरबसु खाइ भोग करि नाना।
समरभूमि भये दुर्लभ प्राना।

आपलें सैन्य नामोहरम झालेलें रावणानें ऐकिलें, तेव्हां वीरांना परतवून तो आवेशानें म्हणाला, जो युद्धाला पाठ देऊन पळून जाईल असें मला आढळेल त्याचें मी या माझ्या तीक्ष्ण खड्गानें डोकेंच मारीन. नाकबुडेंतोंवर मलीदा गिळायला आणि खूप मजा मारायला तुम्ही व्हावयाचें, आणि आतां लढायला हवें तर निमकहरामी करावयालाहि तुम्हीच सवकायचें!

उग्र बचन सुनि सकल डेराने।
फिरे क्रोध करि बीर लजाने।
सनमुख मरन बीर कै सोभा।
तब तिन्ह तजा प्रान कर लोभा।

रावणाच्या त्या दणकेबाज बडग्यानें सर्वांचीच पांचावर धारण बसली. शूर वीर होते ते मात्र ओशाळून सर्व मिळून आवेशानें चालूं लागले. युद्धांत समोरासमोर मरणें हेंच वीरांचें भूषण असा निर्धार करून त्यांनीं प्राणांची तमा सोडली.

दो०—बहु-आयुध-धर सुभट सब भिरहिँ प्रचारि प्रचारि। कीन्हे ब्याकुल भालु कपि परिघ त्रिसूलन्ह मारि॥ ५६॥

सर्व खंदे योद्धे अनेक आयुधें घेऊन व शत्रूस आव्हानून जंग माजवूं लागले. त्यांनीं परिघ, त्रिशूल, इत्यादिकांचा भडिमार करून ऋक्षकपींना रगड बत्ती दिली व बेजार केलें.

चौ०—भयआतुर कपि भागन लागे।
जद्यपि उमा जीतिहहिँ आगे।
कोउ कह कहँ अंगद हनुमंता।
कहँ नल नील दुबिद बलवंता।

तेव्हां कपी जेरीस येऊन भिरभिर पळत सुटले. शंकर म्हणतात, पार्वति! तथापि पुढें मात्र त्यांचीच फत्ते होणार हें खास. कांहीं कपी, अंगदहनुमान्, कोठें आहेत, बलवान् नलनील द्विविद हे कोठें आहेत असेंहि आरंबळूं लागले.

निजदल बिचल सुना हनुमाना।
पच्छिमद्वार रहा बलवाना।
मेघनाद तहँ करइ लराई।
टूट न द्वार परम कठिनाई।

आपल्या सैन्याची खडी उडत आहे हें हनुमंताला कळलें. परंतु तो पश्चिमेच्या बुरजावर होता. तेथें मेघनादाशीं व त्याच्याशीं जंग मचलें होतें. ती वेस अत्यंत मजबूत असल्यामुळें सर होईना.

पवन–तनय–मन भा अतिक्रोधा।
गर्जेउ प्रबल-काल-सम जोधा।
कूदि लंकगढ़ ऊपर आवा।
गहि गिरि मेघनाद कहँ धावा।

अखेर हनुमंतास फार चीड आली व तो प्रलय-कालीन मेघाप्रमाणें गर्जना करून लंकेच्या किल्ल्यावर

उडी मारून गेला आणि आणि हातांत पर्वत घेऊन मेघनादावर तुटून पडला.

भंजेउ रथ सारथी निपाता।
ताहि हृदय महँ मारेसि लाता।
दुसरे सूत बिकल तेहि जाना।
स्यंदन घालि तुरत गृह आना।

मारुतीनें मेघनादाचा रथ बेकाम करून त्याच्या सारथ्याला ठार केलें आणि त्याच्या छातीवर लत्ता-प्रहार केला. त्यामुळें तो बेशुद्ध झालेला पाहून त्यास दुसऱ्या सारथ्यांनीं रथांत घालून त्वरेनें छावणींत नेलें.

**दो०—अंगद सुनेउ कि पवनसुत गढ पर गयउ अकेल। समरबाँकुरा बालिसुत तरकि चढेउ कपिखेल॥ ५७॥**

हनुमान् किल्ल्यावर एकटाच चढून गेला आहे असें जेव्हां अंगदानें ऐकलें तेव्हां त्याच्या दिमतीस तोहि समरवीर सहज उडी मारून किल्ल्यावर एकदम लपकला.

चौ०—जुद्धविरुद्ध क्रुद्ध दोउ बानर।
रामप्रताप सुमिरि उरअंतर।
रावनभवन चढे दोउ धाई।
करहिँ कोसलाधीसदोहाई।

रावणाविरुद्ध चवताळून युद्धावर लपकलेले ते उभयतां बानर हृदयांत रामप्रतापाचें स्मरण करून रावणाच्या महालावरच चढून गेले, आणि तेथून कोशलाधीश रामाची द्वाही फिरवूं लागले.

कलससहित गहि भवन ढहावा।
देखि निसा—चर—पति भय पावा।
नारिबृंद कर पीटहिँ छाती।
अब दुइ कपि आये उतपाती।

तें मंदिर कळसासकट त्यांनीं ढासळून पाडलें. तें पाहतांच रावणाला धडकी भरली. आतां तर पिसाळलेलीं हीं दोन्हींहि माकडें एकदम उलटलीं आहेत असें म्हणून रावणाचा सर्व जनाना हातांनीं ऊर बडवून घेऊं लागल्या.

कपिलीला करि तिन्हहिँ डेरावहिँ।
रामचंद्र कर सुजस सुनावहिँ।
पुनि कर गहि कंचन के खंभा।
कहेन्हि करिय उतपातअरंभा।

ते दोघेहि वानर आपल्या चेष्टांनीं त्या रावण-स्त्रियांना चमकवीत आणि रामचंद्राचें सुयश त्यांचे-पुढें गात, आणि त्यांना बजावीत कीं तुम्हीहि राम-भजनच करा. नंतर त्यांनीं तेथील सुवर्णाचे खांब हातांत घेऊन खूपच तसनस करून सोडली.

गर्जि परे रिपुकटक मँझारी।
लागे मर्दइ भुजबल भारी।
काहुहि लात चपेटान्हि केहू।
भजहु न रामहिँ सो फल लेहू।

पुन्हा गर्जना करून त्यांनीं तेथून शत्रुसैन्यांत उडी घेतली, आणि आपल्या भयंकर बाहुबलानें ते शत्रूंची कुच्ची भरीत सुटले. ते कांहींना लाथांनीं तर कांहींना हातांनीं ठोंसेचपेटे लगावीत, व म्हणत कीं, राम-चंद्रास शरण न येण्याचें हें बक्षीस घ्या!

**दो०—एक एक सों मर्दहिँ तोरि चला-वहिँ मुंड। रावन आगे परहिँ ते जनु फूटहिँ दधिकुंड॥ ५८॥**

एकट्यादुकट्या राक्षसाला घोळसून व त्याचें शिरकाण करून तें शिर ते रावणाकडे भिरकावून देत. तेव्हां तीं मुंडकीं रावणाच्या समोर दहींहंडी-प्रमाणें येऊन फुटत.

चौ०—महा-महा मुखिया जे पावहिँ।
ते पद गहि प्रभुपास चलावहिँ।
कहहिँ बिभीषन तिन्ह के नामा।
देहिँ रामु तिन्हहूँ निजधामा।
खल मनुजाद द्विजामिषभोगी।
पावहिँ गति जो जाँचत जोगी।

त्यांना जे मोठमोठे शेलके, चुनिंदे राक्षस मध्यंतरीं आढळत त्यांची तंगडी धरून ते त्यांना प्रभूकडे भिरकावून देत. तेथें बिभीषण त्यांचीं नांवें सांगे आणि रामचंद्र त्यांना वैकुंठाला पाठवीत. अशा रीतीनें ते नरभक्षक, द्विजमांसभोजी, दुष्ट देखील योग्यांस अभीष्ट अशी गति मिळवूं लागले.

उमा राम मृदुचित करुनाकर।
बैरभाव सुमिरत मोहि निसिचर।
देहिँ परम गति सो जिय जानी।
अस कृपालु को कहहु भवानी।
अस प्रभु सुनि न भजहिँ भ्रम त्यागी।
नर मतिमंद ते परम अभागी।

( शंकर म्हणतात ) हे पार्वति ! राक्षस वैरभावाचे, तरी पण माझें स्मरण त्यांना घडतेंच असें मनांत आणून कोमलहृदय दयाघन श्रीरामचंद्र त्यांना उत्तम गति देत असत. हे भवानि ! असा दयाळु कोण आहे सांग बरें ! अशा प्रभूस भ्रमाचा त्याग करून जे लोक शरण जात नाहींत ते मूढांचे आणि करंट्यांचे सरदार होत.

अंगद अरु हनुमंत प्रबेसा ।
कीन्ह दुर्ग अस कह अवधेसा ।
लंका दोउ कपि सोहहिँ कैसे ।
मथहिँ सिंधु दुइ मंदर जैसे ।

( मुख्य मुख्य धेंडें फेंकलेलीं पाहून ) रामचंद्र म्हणाले कीं, अंगद आणि हनुमान यांनीं दुर्गम लंकेंत प्रवेश केला आहे. खरोखरच दोन मंदराचलांनीं जसें सागराचें मंथन करावें तसें ते दोघे कपी लंकेमध्यें आपली शोभा दाखवीत होते.

**दो०—भुजबल रिपुदल दलमलि देखि दिवस कर अंत । कूदे जुगल बिगत स्रम आये जहँ भगवंत ॥ ५९ ॥**

बाहुबलानें शत्रूच्या सैन्याची खीमा उडवून सूर्यास्त पहातांच ते दोघेहि वीर सहजगत्या उड्या मारीत श्रीरामचंद्राकडे परत आले.

चौ०—प्रभु-पद-कमल सीस तिन्ह नाये ।
देखि सुभट रघु-पति-मन भाये ।
राम कृपा करि जुगल निहारे ।
भये बिगतस्रम परम सुखारे ।

त्यांनीं प्रभुपदकमलीं मस्तकें नमाविलीं. त्या खंबीर वीरांना पाहून रघुपति मनांत प्रसन्न झाले व त्यांनीं प्रेमपूर्वक त्यांचेकडे अवलोकन केलें. त्यामुळें त्या उभयतांची हरारी उतरून तेहि फिरून दमचाख बनले.

गये जानि अंगद हनुमाना ।
फिरे भालु मर्कट भट नाना ।
जातुधान प्रदोषबल पाई ।
धाये करि दस-सीस–दोहाई ।

अंगद आणि हनुमान परत गेले असें समजतांच सर्व ऋक्षवानरवीरहि परतले. संध्यासमयीं राक्षसांना जोर चढतांच ते रावणाच्या नांवाची गर्जना करीत उलटले.

निसि-चर-अनी देखि कपि फिरे ।
जहँ तहँ कटकटाइ भट भिरे ।
दोउ दल प्रबल प्रचारि प्रचारी ।
लरत सुभट नहिँ मानत हारी ।

राक्षसांच्या सैन्याची परत उठावणी पहातांच वानरांनींहि मोर्चा फिरविला. चोहोंकडे 'कटकट' शब्द करून वानरवीर झुंजूं लागले. उभय सैन्यांतील जोरकस झुंजार हिरीरीनें माघार न घेतां परस्परांना प्रचारून लढूं लागले.

महाबीर निसिचर सब कारे ।
नानाबरन बलीमुख भारे ।
सबल जुगलदल समबल जोधा ।
कौतुक करत लरत करि क्रोधा ।
प्राबिट–सरद–पयोद घनेरे ।
लरत मनहुँ मारुत के प्रेरे ।

ते सर्व पटाईत राक्षसवीर काळेकभिन्न होते आणि वानर अनेक रंगांचे व धिप्पाड होते. तीं दोन्हींहि सैन्यें समबल आणि समकक्ष होतीं. तीं हिरीरीनें रान उठवीत असतां नानाप्रकारें युद्धलाघव करून दाखवीत. जणुंकाय वाऱ्याच्या जोरानें वर्षा आणि शरत्कालीन अनेक मेघच परस्परांवर आदळत आहेत असें भासूं लागलें.

अनिप अकंपन अरु अतिकाया ।
बिचलत सेन कीन्हिं इन्ह माया ।
भयउ निमिषमहँ अति अँधियारा ।
बृष्टि होइ रुधिरोपलछारा ।

सैन्यांत धुव्वा उडालेला पाहतांच अनिप, अकंपन, अतिकाय वगैरेंनीं आपली डोंबारी ( वोडंबरी ) विद्या परजली. तेव्हां एका क्षणांत गडद अंधकार पडून रक्तपाषाण आणि धूळ यांची वृष्टि होऊं लागली.

**दो०—देखि निबिड तम दसहुँ दिसि कपि-दल भयउ खभार । एकहिँ एक न देखहिँ जहँ तहँ करहि पुकार ॥ ६० ॥**

दाही दिशांमध्यें अटोकाट अंधार भरलेला पाहून वानरसैन्याचा सारखा कोंडमारा होऊं लागला. कोणास कोणी दिसेनासें होऊन चोहोंकडे एकसहा बोंब मचली.

चौ०—सकल मरम रघुनायक जाना ।
लिये बोलि अंगद हनुमाना ।
समाचार सब कहि समुझाये ।
सुनत कोपि कपिकुंजर धाये ।

रघुनायकांनीं सर्व मर्म जाणलें, व त्यांनीं अंगद आणि हनुमंत यांना बोलावून त्यांना राक्षसमायेची सर्व करामात समजावून सांगितली. ती ऐकतांच ते दोघेहि कपिकुंजर सणसणून उसळले.

पुनि कृपाल हँसि चाप चढावा ।
पावकसायक सपदि चलावा ।
भयउ प्रकास कतहुँ तम नाहीँ ।
ज्ञानउदय जिमि संसय जाहीँ

नंतर दयाळु श्रीरामचंद्रांनीं हास्यपूर्वक धनुष्य चढवून तावडतोब आग्नेयास्त्राचें शरसंधान केलें; तेव्हां ज्ञानाचा उदय झाला असतां जसा संशय नष्ट होतो तसा सर्वत्र लख्ख प्रकाश पडून अंधकाराचा कोठेंहि मागमूसदेखील उरला नाहीं.

भालु बलीमुख पाइ प्रकासा ।
धाये हरषि बि-गत-स्रम-त्रासा ।
हनूमान अंगद रन गाजे ।
हाँक सुनत रजनीचर भाजे ।
भागत भट पटकहिँ धरि धरनी ।
करहिँ भालु कपि अद्भुत करनी ।
गहि पद डारहिँ सागर माहीँ ।
मकर उरग झष धरि धरि खाहीँ ।

आग्नेयास्त्राच्या योगानें प्रकाश पडतांच श्रम आणि त्रास नाहींसा होऊन ते ऋक्षवानर जोषांत येऊन एकदम उसळले. हनुमान् आणि अंगद यांनीं आपल्या आरोळ्यांनीं रण गर्जून सोडलें. त्यांचा दणदणाट ऐकतांच राक्षसांनीं पळ काढला. ते पळपुट्या वीरांस धरून धरणीवर आदळीत व त्यांची तंगडी धरून त्यांना समुद्रांत फेंकून देत. तेथें त्यांना मगर, साप, मासे, वगैरे जलचर धरधरून त्यांचा काला करीत. ह्याप्रमाणें ऋक्षवानर अचाट करामत करीत असत.

**दो०—कछु मारे कछु घायल कछु गढ चले पराइ । गर्जहिँ मर्कट भालु भट रिपु-दल-बल बिचलाइ ॥ ६१ ॥**

त्यावेळीं कित्येक राक्षस मेले, कित्येक घायाळ होऊन पडले, व कित्येक किल्ल्यांत पळून गेले. अशा प्रकारें राक्षससैन्याची दाणादाण उडवून ऋक्षवानरवीर गर्जना करूं लागले.

चौ०—निसा जानि कपि-चारिउ-अनी ।
आये जहाँ कोसलाधनी ।
राम कृपा करि चितवा जबहीँ ।
भये बिगतस्रम बानर तबहीँ ।

रात्र अजून आहे असें पाहून चारीहि पथकें श्रीमचंद्राकडे परत आलीं. रामांनीं त्यांचेकडे कृपादृष्टीनें पाहतांच त्या सर्व ऋक्षवानरांचा अगदीं ताजा दम झाला.

उहाँ दसानन सचिव हँकारे ।
सब सन कहेसि सुभट जे मारे ।
आधा कटक कपिन्ह संहारा ।
कहहु बेगि का करिय बिचारा ।

तिकडे रावणानें मंत्रिमंडळाला बोलावून कामास आलेल्या वीरांची यादी सर्वांना कळविली. तो म्हणाला, कपींनीं एव्हांना अर्ध्या सैन्याचा स्वाहाकार केला. आतां पुढें काय विचार करावयाचा तो लवकर कळवा पाहूं.

माल्यवंत अतिजरठ निसाचर ।
रावनु-मातु-पिता मंत्री-बर ।
बोला बचन नीति अतिपावन ।
सुनहु तात कछु मोरे सिखावन ।

तेथें माल्यवंत नांवाचा अत्यंत वृद्ध मंत्रिश्रेष्ठ रावणाचा मातामह होता. तो अतिनिर्दोष आणि नीतिप्रचुर असें भाषण करूं लागला. तो म्हणाला, बाळा ! माझे तरी चार शब्द ऐक.

जब तेँ तुम्ह सीता हरि आनी ।
असगुन होहिँ न जाहिँ बखानी ।
बेद पुरान जासु जस गावा ।
रामबिमुख काहु न सुख पावा ।

तूं सीतेला चोरून आणल्यापासून असे कांहीं अपशकून होत आहेत कीं, सांगतां पुरवत नाहींत. वेद व पुराणें ज्याचें यश गातात त्या रामाशीं त्रांगडीं माजवून कोणीहि कांहींहि कमाई आजवर केलेली नाहीं.

**दो०—हिरण्याक्ष भ्रातासहित मधुकैटभ बलवान । जेहि मारे सोइ अवतरेउ कृपासिंधु भगवान ॥ ६२ ॥**

बंधुसहित हिरण्याक्ष व महाबलाढ्य मधुकैटभ ह्यांचेहि ज्यानें पिंड घोळले तोच कृपासागर भगवंत रामरूपानें अवतरला आहे.

**दो०–कालरूप खल–बन–दहन गुनागार घनबोध । सिव बिरंचि जेहि सेवहिँ तासोँ कवन बिरोध ॥ ६३ ॥**

कालरूपी तो, खलरूपी वनाचा दाह करणारा आहे. गुणनिधान व विज्ञानघन तो त्याची श्रीशंकर आणि ब्रह्मदेव देखील सेवाच करितात. त्याच्याशीं काय विरोधावयाचें ?

चौ०–परिहरि बैर देहु बैदेही ।
भजहु कृपानिधि परमसनेही ।

यासाठीं वैदेहीला परत पाठीव आणि वैराचा शेवट करून त्या परमप्रेमळ दयानिधीस शरण जा.

ता के बचन बानसम लागे ।
करियामुख करि जाहि अभागे ।
बूढ भयासि न त मरतेउँ तोही ।
अब जानि नयन देखवासि मोही ।

त्याचे ते शब्द रावणास बाणाप्रमाणें झोंबले व तो म्हणाला, अरे करंट्या ! तोंड काळें कर. येथून चालता हो. तूं वृद्ध आहेस म्हणून; नाहींतर तुला ठारच केला असता. अतःपर माझ्या डोळ्यांना तूं हें आपलें मुसकाड खबरदार दाखविशील तर.

तेहिँ अपने मन अस अनुमाना ।
बध्यौ चहत एहि कृपानिधाना ।
सो उठि गयउ कहत दुर्बादा ।
तब सकोप बोलेउ घननादा ।
कौतुक प्रात देखियहु मोरा ।
करिहउँ बहुत कहउँ का थोरा ।
सुनि सुतबचन भरोसा आवा ।
प्रीतिसमेत अंक बैठावा ।

कृपासागर रामचंद्रांचीच इच्छा यास जमीनदोस्त करण्याची दिसते असें त्यास हमखास वाटलें. लगेच माल्यवंत रावणावर हमरीतुमरीची तोंडभर सरबत्ती झाडत उठून चालता झाला. तेव्हां मेघनाद मोठ्या आवेशानें म्हणाला, " उद्यां प्रातःकाळीं आपणाला माझें युद्धलाघव दिसेल. थोडें, तरी तें बोलण्यांत काय हशील? पुष्कळसें करूनच दाखवीन. " हें पुत्राचें वचन ऐकून रावणास धीर आला, व त्यानें त्यास अत्यंत प्रीतिपूर्वक कुरवाळलें.

करत बिचार भयउ भिनुसारा ।
लागे कपि पुनि चहूँदुआरा ।
कोपि कपिन्ह दुरघट गढ घेरा ।
नगर कोलाहल भयउ घनेरा ।

ह्याप्रमाणें वाटाघाट चालली आहे इतक्यांत उजाडलें. ऋक्षवानर चारीहि वेशींवर येऊन धडकले. कपींनीं संतप्त होऊन किल्ल्यास वेढा दिला. तेव्हां शहरांत एकच आकांत उडाला.

बिबिधायुधधर निसिचर धाये ।
गढ तेँ पर्बत सिखर ढहाये ।

तेव्हां नानाप्रकारचीं शस्त्रें धारण करून राक्षस धांवले व किल्ल्यावरून पर्वतशिखरांचीं फैर झाडूं लागले.

**छंद–ढाहे मही-धर-सिखर कोटिन्ह बिबिध-बिधि गोला चले । घहरात जिमि पबि-पात गर्जत जनु प्रलय के बादले । मर्कट बिकट भट जुटत कटक न लटत तन जर्जर भये ॥ गहि सैल तेइ गढ पर चलावहिँ जहँ सो तहँ निसिचर हये ॥ २ ॥**

ते राक्षस कोट्यवधि पर्वतशिखरें लोटून देऊं लागले. बेसुमार गोळीबार झडला. तेव्हां जणुंकाय प्रलयकालच्या मेघाप्रमाणें त्यांचा धडधडाट होऊन वज्रपाताप्रमाणें त्यांचा कडकडाट होऊं लागला. भलेभले धिप्पाड वानरवीर एकवटून सामना देऊं लागले. ते जरी कच खात नसत तरी त्यांचीं शरीरें मात्र जर्जर होत. तरीदेखील ते पर्वत घेऊन किल्ल्यावर अशा वेगानें चाल करीत कीं जेथल्यातेथेंच राक्षस मरून पडत.

**दो०–मेघनाद सुनि स्रवन अस गढ पुनि छेँका आइ । उतरि दुर्ग तेँ बीरबर सनमुख चलेउ बजाइ ॥ ६४ ॥**

शत्रूंनीं लंका घेरली हें वर्तमान मेघनादानें ऐकतांच तो वीरश्रेष्ठ किल्ल्यावरून खालीं उतरला आणि रणवाद्यें वाजवीत त्यानें शत्रूकडे मोर्चा फिरविला.

चौ०–कहँ कोसलाधीस दोउ भ्राता ।
धन्वी सकल–लोक–बिख्याता ।
कहँ नल नील द्विबिद सुग्रीवा ।
अंगद हनूमंत बलसींवाँ ।
कहाँ बिभीषनु भ्राताद्रोही ।
आजु सठहि हठि मारउँ ओही ।

अस कहि कठिन बान संधाने ।
अतिसयक्रोध स्रवन लगि ताने ।
सरसमूह सो छाडइ लागा ।
जनु सपच्छ धावहिँ बहु नागा ।

" सकल लोकांत धनुर्धर म्हणून गाजत असलेले असे ते कोशलाधीश बंधुद्वय कोठें आहेत रे ? कोठें आहेत ते नल,नील सुग्रीव आणि बलाढ्य अंगदहनुमान्? तो भावाशीं निमकहराम बनलेला बिभीषण आहे तरी कोठें ? आज मी त्या बेइमानाला प्रतिज्ञेनें नदारद करणार. " असें म्हणून तो मेघनाद खूपच इरेस पेटून मोठ्या त्वेषानें धनुष्यावर प्रखर बाण चढवून ते आकर्ण ओढूं लागला. तो बाणांची सर पाडूं लागला तेव्हां असें दिसलें कीं जणुंकाय अनेक सपक्ष सर्पच सळसळून धांवत आहेत.

जहँ तहँ परत देखियहि बानर ।
सनमुख होइ न सके तेहि अवसर ।
जहँ तहँ भागि चले कपि रिच्छा ।
बिसरी सबहिँ युद्ध कै इच्छा ।
सो कपि भालु न रन महँ देखा ।
कीन्हेसि जेहि न प्रान अवसेखा ।

जिकडेतिकडे वानरांचा सडा पडलेला दिसत होता. त्या वेळीं मेघनादासमोर कोणीच दम धरीना. ऋक्षवानर चोहोंकडून धूम ठोकून पळूं लागले. कोणालाच युद्धाचा सोस उरला नाहीं. रणांगणावर मेघनादानें अर्धा मेला करून सोडला नाहीं असा एकहि ऋक्ष किंवा कपि दिसेना.

**दो०–दस दस सर सब मारेसि परे भूमि कपि बीर । सिंहनाद करि गर्जा मेघनाद बलधीर ॥ ६५ ॥**

त्यानें प्रत्येकाच्या उरांत दहा दहा बाण खोंचले. त्यामुळें वानरवीर पृथ्वीवर घायाळ होऊन पडले. तेव्हां तो बलाढ्य आणि धैर्यशाली मेघनाद सिंहासारखी गर्जना करूं लागला.

चौ०–देखि पवनसुत कटकु बिहाला ।
क्रोधवंत जनु धायउ काला ।
महासैल एक तुरत उपारा ।
अतिरिसि मेघनाद पर डारा ।

सैन्याची ती कुचंबणा पाहून मारुति ईरेस पेटून काळाप्रमाणें धांवला. त्यानें ताबडतोब एक विशाल पर्वत उपटला आणि तो मोठ्या त्वेषानें मेघनादावर खचविला.

आवत देखि गयउ नभ सोई ।
रथ सारथी तुरग सब खोई ।
बार बार प्रचार हनुमाना ।
निकट न आव मरम सो जाना ।

तो पर्वत येतोसा पाहतांच मेघनाद रथ, सारथी, घोडे वगैरे सर्व सोडून आकाशांत उडाला. मारुति त्यास वारंवार पाचारूं लागला, परंतु तो सामना घेईना. कारण त्यानें त्यांतली मख्खी ओळखली होती.

रघु-पति-निकट गयउ घननादा ।
नानाभाँति कहेसि दुर्बादा ।
अस्त्र सस्त्र आयुध सब डारे ।
कौतुकहीँ प्रभु काटि निवारे ।

नंतर मेघनाद रघुपतींच्या जवळ गेला आणि कावरल्यासारखा अनेक प्रकारें भकूं लागला. त्यानें प्रभूंवर पुष्कळ अस्त्रें, शस्त्रें आणि आयुधें टाकलीं; परंतु रामचंद्रांनीं सहज लीलेनें तीं तोडून उडविलीं.

देखि प्रताप मूढ खिसियाना ।
करै लाग माया बिधि नाना ।
जिमि कोउ करइ गरुड से खेला ।
डरपावइ गहि स्वल्प सपेला ।

प्रभूंचा तो प्रभाव पाहून तो मूढ चिडला आणि जसें एकाद्यानें गरुडाशीं खेळत असतां लहानसा साप धरून त्याला भिवविण्याचा प्रयत्न करावा त्याप्रमाणें तो प्रभूशीं अनेकप्रकारें माया पाघळण्यास प्रवृत्त झाला.

**दो०–जासु प्रबल-माया-बिबस सिव बिरंचि बड छोट । ताहि देखावइ निसिचर निज माया मतिखोट ॥ ६६ ॥**

शिवब्रह्मदेवप्रभृति लहानथोर ज्याच्या बलवत्तर मायेच्या अंकित असतात त्या प्रभु रामचंद्रापुढें तो हलकट मेघनाद आपल्या जादुगारीचें प्रदर्शन करूं लागला.

चौ०–नभ चढि बरषइ बिपुल अँगारा ।
महि तेँ प्रगट होहिँ जलधारा ।
नाना भाँति पिसाच पिसाची ।
मारु काटु धुनि बोलहिँ नाँची ।
बिष्टा पूय रुधिर कच हाडा ।
बरषइ कबहुँ उपल बहु छाडा ।

बरषि धूरि कीन्हेसि अँधियारा।
सूझ न आपन हाथ पसारा।

तो मेघनाद आकाशांत जाऊन अग्नीचा विपुल वर्षाव करी, जमीनींतून पाणी धो धो वाहवी, नानाप्रकारचे पिशाच, पिशाचिनी 'मारा, कापा' अशा आरोळ्या ठोकून नाचवी, विष्ठा, पू, रक्त, केस, अस्थि आणि मधून मधून अनेक दगड आणि राख यांचीहि वृष्टि करी. धुळीच्या वर्षावानें तर इतका अंधकार माजवी कीं, पसरलेला हात देखील स्वतःस दिसेनासा होई.

कपि अकुलाने माया देखे।
सब कर मरन बना एहि लेखे।
कौतुक देखि रामु मुसुकाने।
भये सभीत सकल कपि जाने।

ती माया पाहून वानरांची पांचावर धारण बसली आणि आतां आपली मौत खास ओढवली असें सर्वांना वाटलें. ती मौज पाहून रामचंद्र मात्र हसले. त्यांनीं ओळखलें कीं सर्व वानर अगदीं गटांगळीस आले आहेत.

एक बान काटी सब माया।
जिमि दिनकर हर तिमिरनिकाया।
कृपादृष्टि कपि भालु बिलोके।
भये प्रबल रन रहहिँ न रोके।

सूर्य ज्याप्रमाणें गाढ अंधकाराचा नाश करितो त्याप्रमाणें प्रभूंनीं एकाच बाणानें सर्व इंद्रजालाचा धुव्वा उडविला. नंतर त्यांनीं ऋक्षवानरांकडे कृपादृष्टीनें अवलोकन केलें. तेव्हां त्यांस अधिकच जोष चढला. तो इतका कीं रणांतून ते फिरवितां फिरेनात.

**दो०—आयसु माँगि राम पहिँ अंगदादि कपि साथ। लछिमन चले सकोप अति बान सरासन हाथ॥ ६७॥**

अखेरीस श्रीरामचंद्रापाशीं आज्ञा मागून व हातांत धनुष्यबाण धारण करून लक्ष्मण अंगदादि वानरांसहित हर्षेंस चढून पुढें सरसावला.

चौ०—छत-ज-नयन उर बाहु बिसाला।
हिम-गिरि-निभ तनु कछुएकलाला।

तेव्हां रुधिराप्रमाणें आरक्त नेत्र, विशाल वक्षःस्थल आणि प्रलंब बाहु असलेली ती लक्ष्मणाची देहयष्टि किंचित् आरक्त अशा हिमगिरीच्या कांतिप्रमाणें दिसूं लागली.

इहाँ दसानन सुभट पठाये।
नाना सस्त्र अस्त्र गहि धाये।
भू-धर-नख-बिटपायुध धारी।
धाये कपि जय राम पुकारी।

तिकडून रावणानें दिमतीस पाठविलेले पटाईत वीर अनेक शस्त्रास्त्रें घेऊन धांवले. त्यांचेवर पर्वत, नखें, वृक्ष इत्यादि आयुधें धारण केलेले वानर रामाचा जयजयकार करीत जाऊन आदळले.

भिरे सकल जोरिहि सन जोरी।
इत उत जय इच्छा नहिँ थोरी।
मुठिकन्ह लातन्ह दाँतन्ह काटहिँ।
कपि जयसील मारि पुनि डाटहिँ।

त्यांचें द्वंद्वयुद्ध जुंपलें. उभय पक्षीं जयाची इच्छा अनावर होती. विजयी वानर दातांनीं राक्षसांना चावीत व लाथाबुक्यांनीं दणकून त्यांना चेपीत.

मारु मारु धरु धरु धरु मारू।
सीस तोरि गहि भुजा उपारू।
असि रव पूरि रही नव खंडा।
धावहिँ जहँ तहँ रुंड प्रचंडा।

मारा, मारा, धरा, धरा, धरा, मारा, डोकें तोडा, हात उपटा, असेच शब्द सर्व नवखंडांत[1] दुमदुमून राहिले. जिकडे तिकडे प्रचंड धडांचा धिंगाणा चालू झाला.

देखहिँ कौतुक नभ सुरबृंदा।
कबहुँ क बिसमय कबहुँ अनंदा।

आकाशांतून देवगण तो चमत्कार पहात असतां त्यांना आलटूनपालटून उदासी आणि आनंद होत असे.

**दो०—रुधिर गाड भरि भरि जमेउ ऊपर धूरि उड़ाइ। जिमि अँगाररासीन्ह पर मृतकधूम रह छाइ॥ ६८॥**

रक्तानें खड्डे भरून निघाले, आणि त्यांवर उडालेली धूळ सांचली. तेव्हां जणुंकाय निखाऱ्याचे थरच निर्जीव राखेनें झांकले आहेत असें भासलें.

चौ०—घायल बीर बिराजहिँ कैसे।
कुसुमित किंसुक के तरु जैसे।

घायाळ वीर फुललेल्या पळसाच्या वृक्षाप्रमाणें शोभूं लागले.

---

१ नवीन म्हणजे अपरिचित असा खंड म्हणजे भूभाग, अर्थात् लंका, असा या 'नव'—चा आमचा अर्थ आहे.

लछिमन मेघनाद दोउ जोधा।
भिरहिँ परसपर करि अति क्रोधा।
एकहिँ एक सकहिँ नहिँ जीती।
निसिचर छल बल करइ अनीती।

लक्ष्मण व मेघनाद हे दोघे वीर परस्परांशीं खूपच त्वेषानें झुंजूं लागले. कोणीच कोणास हार जाईना. तेव्हां मेघनादानें गनीमी कावा सुरूं केला.

क्रोधवंत तब भयउ अनंता।
भंजेउ रथ सारथी तुरंता।
नाना बिधि प्रहार कर सेषा।
राच्छस भयउ प्रानअवसेषा।

तेव्हां शेषावतार लक्ष्मणानें खूपच खवळून मेघनादाच्या रथाचे व सारथ्याचे पुरजे पुरजे उडविले, आणि अनेक प्रकारें शस्त्रास्त्रांचा भडिमार करून राक्षससैन्य बिलकुलच लस्त करून सोडलें.

रावनसुत निजमन अनुमाना।
संकठ भयहु हरिहि मम प्राना।
बीरघातिनी छाडेसि साँगी।
तेजपुंज लछिमनउर लागी।
मुरछा भई सक्ति के लागे।
तब चलि गयउ निकट भय त्यागे।

तेव्हां मेघनादानें मनांत विचार केला कीं, हें मोठेंच सांकडें ओढविलें आहे. आतां हा माझे प्राण खास जिरविणार. शेवटीं त्यानें आपली तडफदार शत्रुघातिनी शक्ति टाकली. ती लक्ष्मणाचे वक्षःस्थलावर जाऊन आदळली. त्या शक्तीच्या मारानें लक्ष्मण घेरी येऊन पडला. तेव्हां मेघनाद निर्धास्त लक्ष्मणाजवळ गेला.

**दो०—मेघ-नाद-सम कोटिसत जोधा रहे उठाइ। जगदाधार अनंत किमि उठइ चले खिसिआइ॥ ६९॥**

मेघनादासारख्या कोट्यवधि योद्ध्यांनीं लक्ष्मणाला उचलण्यास जंग जंग पछाडले. जगदाधार अनंतच तो, त्याच्यानें तो कसा उचलवणार ? तेव्हां मेघनाद हिरमसून चालता झाला.

चौ०—सुनु गिरिजा क्रोधानल जासू।
जारइ भुवन चारि दस आसू।
एक सँग्राम जीति को ताही।
सेवहिँ सुर नर अग जग जाही।

यह कौतूहल जानइ सोई।
जा पर कृपा राम कै होई।

(शंकर म्हणतात,) हे पार्वति ! ऐक. ज्याचा क्रोधाग्नि चतुर्दश भुवनांस देखील तत्काल दग्ध करितो, आणि सुर, नर, इत्यादि चराचर विश्व ज्याची सेवा करितें, त्यास युद्धांत जिंकण्यास कोण समर्थ आहे बरें ? ज्याचेवर श्रीरामचंद्राची कृपा होईल तोच हा चमत्कार जाणील.

संध्या भई फिरि दोउ बाहिनी।
लगे सँभारन निज निज अनी।

संध्यासमय होतांच दोन्हीं दळें परतलीं. सेनापति आपापल्या तुकड्यांची हालहवाल पाहूं लागले.

व्यापक ब्रह्म अजित भुवनेस्वर।
लछिमनु कहाँ बूझ करुनाकर।
तब लगि लेइ आयउ हनुमाना।
अनुज देखि प्रभु अतिदुख माना।

व्यापक, ब्रह्म, अजित, भुवनेश्वर, करुणानिधान श्रीरामचंद्र 'लक्ष्मण कोठें आहे' असें विचारीत आहेत तोंच हनुमंत लक्ष्मणास घेऊन आला. त्याला (मूर्च्छित) पाहून रामचंद्रांना दुःखाचा कडेलोट झाला.

जामवंत कह बैद सुषेना।
लंका रहइ को पठइय लेना।
धरि रघुरूप गयउ हनुमंता।
आनेउ भवनसमेत तुरंता।

जांबवंत म्हणाला कीं सुषेण नांवाचा वैद्य लंकेंत रहातो.त्याला आणण्याकरितां कोणास तरी पाठवावें. तेव्हां अगदींच चिमुकला देह धारण करून मारुति गेला व सुषेणास त्याच्या घरादारासकट ताबडतोब घेऊन आला.

**दो०—रघु-पति-चरन-सरो-ज सिरु नायउ आइ सुषेन। कहा नाम गिरि औषधी जाहु पवनसुत लेन॥ ७०॥**

सुषेणानें तेथें येतांच रघुपतींच्या चरणकमलांवर आपलें शिर नमाविलें, आणि पर्वताचें व त्यावरील औषधींचें नांव सांगून तो म्हणाला, हे वायुपुत्रा, तूंच जाऊन ती औषधी घेऊन ये.

चौ०—राम-चरन-सरसि-ज उर राखी।
चलेउ प्रभंजनसुत बल भाखी।

श्रीरामाचीं चरणकमलें हृदयांत धारण करून व स्वतःच्या बळाविषयीं विश्वास ठेवून तो वायुपुत्र निघाला.

उहाँ दूत एक मरम जनावा।
रावन काल–नेमि–गृह आवा।
दसमुख कहा मरम तेहि सुना।
पुनि पुनि कालनेमि सिरु धुना।

तिकडे एका दूतानें रावणास ही गुप्त बातमी दिली. तेव्हां तो कालनेमीच्या घरीं गेला, व त्यानें त्यास ती चोरखबर सांगितली. तें ऐकून कालनेमी वारंवार डोकें थोपटूं लागला.

देखत तुह्महि नगर जेहि जारा।
तासु पंथ को रोकनिहारा।
भजि रघुपति करु हित आपना।
छाडहु नाथ वृथा जलपना।

तो म्हणाला, तुमच्यासमक्ष ज्यानें तुमची नगरी जाळली, त्याच्या मार्गांत आडकाठी घालण्याची कोणाची अवकाद आहे? रामास शरण जाऊन आपलें बरें करून घ्या, व हे स्वामिन्! ह्या वांझोट्या वल्गना सोडून द्या.

नलि–कंज–तनु सुंदर स्यामा।
हृदय राखु लोचन अभिरामा।
अहंकार ममता मद त्यागू।
महा मोहनिसि सूतत जागू।
कालव्याल कर भच्छक जोई।
सपनेहु समर कि जीतिय सोई।

नीलकमलाप्रमाणें श्यामसुंदर ज्याचा देह त्या नयनाभिराम श्रीरामाचें हृदयांत ध्यान धरा. अहंकार, ममता आणि मद यांचा त्याग करून घोर मोहरूप रात्रींत घोरत पडलेले तुम्ही जागे व्हा. जो कालरूपी सर्पालाहि गिळतो त्याचा युद्धांत आपण स्वप्नांत तरी पाडाव करूं शकाल काय?

**दो०–सुनि दसकंध रिसान अति तेहि मन कीन्ह बिचार। राम-दूत-कर मरउँ बरु यह खल रत मलभार॥ ७१॥**

तें ऐकून रावण अगदीं कावरलेला आहे असें पाहून कालनेमीनें मनांत विचार केला कीं, हा दुष्ट नुसता पापाचा कोथळा आहे. ( तेव्हां याच्या हातून मरण्यापेक्षां ) रामदूताच्या हातून मेलेलें बरें.

चौ०–अस कहि चला रचेसि मग माया।
सर मंदिर बर बाग बनाया।
मारुतसुत देखा सुभ आस्रम।
मुनिहि बूझि जलु पियउँ जाइ स्रम।
राच्छस–कपट–बेष तहँ सोहा।
माया–पति–दूतहि चह मोहा।

असा विचार करून कालनेमी निघाला, व त्यानें आपल्या गारुडाच्या प्रभावानें हनुमंताच्या मार्गांत एक सरोवर, त्याच्या कांठीं एक मंदिर आणि एक गुलजार बगिया निर्माण केली. मारुतीस तो आश्रम दिलतर वाटला. तेव्हां त्यास इच्छा झाली का, ह्या आश्रमांतल्या मुनीस विचारावें आणि जलपान करून जरा दमछाक व्हावें. तेथें तो कालनेमी राक्षस मायापति रामचंद्राच्या दूतास भुरळ घालण्याच्या (वेळ मोडण्याच्या) हेतूनें मुनीचा कपटवेष घेऊन बसला होता.

जाइ पवनसुत नायेउ माथा।
लाग सो कहइ राम–गुन–गाथा।
होत महारन रावनरामहि।
जितिहहि राम न संसय या महि।
इहाँ भये मैं देखउँ भाई।
ज्ञान–दृष्टि–बलु मोहि अधिकाई।

पवनसुत तेथें जाऊन त्या मुनीला नमस्कार करून बसला. कालनेमी त्याचेजवळ रामचंद्राच्या गुणांचें वर्णन करून म्हणाला, रामरावणाचा ह्या प्रसंगीं घोर संग्राम चालू आहे. त्यांत अखेर रामाचाच निःसंदेह जय होणार. बाबा रे! मी येथें बसूनहि तो संग्राम पहात आहे. कारण मला दिव्यदृष्टीचें सामर्थ्य विशेष आहे.

माँगा जल तेहि दीन्ह कमंडल।
कह कपि नहि अघाउँ थोरे जल।
सर मज्जनु करि आतुर आवहु।
दीछा देउँ ज्ञान जेहि पावहु।

हें ऐकून मारुतीनें पिण्यास पाणी मागितलें असतां त्यानें आपला कमंडलु पुढें केला. तेव्हां मारुति म्हणाला, ह्या एवढ्याशा पाण्यानें माझी तहान भागणार नाहीं. त्यावर राक्षस म्हणाला सरोवरांत स्नान करून झटपट ये. मग मी तुला दीक्षा देतों म्हणजे तुलाहि माझ्यासारखीच दिव्यदृष्टि प्राप्त होईल.

**दो०–सर पैठत कपि-पद-गहा मकरी तब अकुलान। मारी सो धरि दिव्यतनु चली गगन चढि जान ॥ ७२ ॥**

सरोवरांत शिरतांच मगरीनें हनुमंताचा पाय पकडला. तेव्हां तो मनांत चमकला आणि ( पायाच्या फटकाऱ्यानेंच ) त्यानें तिला मारून टाकिलें. दिव्य देह मिळून विमानांत बसून स्वर्गास जाऊं लागली असतां

चौ०–कपि तव दरस भइउँ निःपापा।
मिटा तात मुनिवर कर सापा।

ती मगरी म्हणाली, हे कपे ! तुझ्या दर्शनानें मी निष्पाप झालें. बाबा रे ! मुनिवराच्या शापांतून मी आज मुक्त झालें.

मुनि न होइ यह निसिचर घोरा।
मानहु सत्य बचन प्रभु मोरा।
अस कहि गई अपछरा जबहीँ।
निसि–चर–निकट गयउ सो तबहीँ।

( ती पुढें म्हणाली, ) हा मुनि नसून दगाबाज निशाचर आहे. समर्था ! माझें म्हणणें सत्य मान. असें म्हणून जेव्हां ती अप्सरा गेली तेव्हां मारुति इकडे राक्षसांपाशीं आला.

कह कपि मुनि गुरुदछिना लेहू।
पाछे हमहिँ मंत्र तुम्ह देहू।
सिर लंगूर लपेटि पछारा।
निज तनु प्रगटेसि मरती बारा।
राम राम कहि छाडेसि प्राना।
सुनि मन हरषि चलेउ हनुमाना।

" अगोदर आपली गुरुदक्षिणा तर घ्या, मंत्र वगैरे मागाहून पहातां येईल " असें म्हणून मारुतीनें त्याच्या मस्तकाभोंवतीं आपलें शेंपुट गुंडाळून त्यास आपटलें. मरतेवेळीं त्या राक्षसानें आपला देह प्रगट करून ' राम राम ' म्हणत प्राण सोडला. ते शब्द ऐकतांच खुष होऊन हनुमंत पुढें निघाला.

देखा सैल न औषध चीन्हा।
सहसा कपि उपारि गिरि लीन्हा।
गहि गिरि निसि नभ धावत भयऊ।
अवध–पुरी–ऊपर कपि गयऊ।

मारुतीला अखेरीस तो पर्वत आढळला, परंतु औषधीची ओळख पटेना, तेव्हां त्यानें तो पर्वतच सहज उपटून घेतला व तो घेऊन रात्रीं आकाशांतून तो झपाझप अयोध्येवरून चालला.

**दो०–देखा भरत बिसाल अति निसिचर मन अनुमान। बिनु फर सायक मारेउ चाप स्रवन लगि तानि ॥ ७३ ॥**

( अशा रीतीनें जातांना मारुतीस पाहून ) तो कोणी प्रचंड राक्षस असावा अशी भरताच्या मनांत शंका आली. तेव्हां त्यानें एक बिनफळाचा बाण धनुष्य आकर्ण ओढून त्याचेवर सोडला.

चौ०–परेउ मुरुछि महि लागत सायक।
सुमिरत राम राम रघुनायक।
सुनि प्रियबचन भरत उठि धाये।
कपि समीप अतिआतुर आये।

तो बाण लागतांच मारुती गिरगिरी खाऊन जमिनीवर कोसळला व ' राम राम ! रघुनायक ! ' असा नामघोष करूं लागला. तें प्रियकर नामस्मरण ऐकतांच भरत त्याचेकडे फार कावराबावरा धांवत आला.

बिकल बिलोकि कीस उर लावा।
जागत नहिँ बहु भाँति जगावा।
मुख मलीन मन भये दुखारी।
कहत बचन लोचन भरि बारी।

कपीची ती दुर्दशा पाहून भरतानें त्यास उराशीं धरिलें. शुद्धीवर आणण्याचा पुष्कळ प्रयत्न झाला तरी तो शुद्धीवर येईना. भरताचें मुख म्लान झालें व चित्तास उद्विग्नता आली. डोळे पाण्यानें भरून तो म्हणाला—

जेहि बिधि रामबिमुख मोहि कीन्हा।
तेहिँ पुनि यह दारुन दुख दीन्हा।
जौँ मोरे मन बच अरु काया।
प्रीति राम–पद–कमल अमाया।
तौ कपि होउ बिगत–स्रम–सूला।
जौँ मो पर रघुपति अनुकूला।

ज्या दैवानें माझी रामाशीं ताटातूट केली त्यानेंच

---

[1] एकदां दुर्वास मुनि इंद्रसभेंत गेले असतां तेथें गंधर्व आणि अप्सरा नृत्यगायन करीत होत्या. मुनीस पाहून त्यांनीं हास्य केलें. तेव्हां दुर्वासांनीं रागानें त्यांना शाप दिला. तेच हे कालनेमी आणि मगरी. पुढें दुर्वासांनींच दिलेल्या उःशापाप्रमाणें त्यांचा अशा प्रसंगानें उद्धार झाला.

पुन्हां हें महत्‌दुःख मला दिलें आहे. तथापि जर माझें रामपदारविंदीं कायावाचामनेंकरून निष्कपट प्रेम असेल आणि रघुपतींचाहि मजवर अनुग्रह असेल तर हा कपि श्रमरहित आणि विगतक्लेश होवो.

सुनत बचन उठि बैठ कपीसा ।
कहि जय जयति कोसलाधीसा ।

भरताचें वरील वचन कानीं पडतांच मारुति कोशालाधीशाचा जयजयकार करीत उठून बसला.

**सो०—लीन्ह कपिहि उर लाइ पुलकित तन लोचन सजल । प्रीति न हृदय समाइ सुमिरि राम रघु-कुल-तिलक ॥ ८ ॥**

हें पाहून भरतानें कपीस दृढ आलिंगन दिलें.त्याचा देह रोमांचित होऊन नेत्र सजल झाले. त्याच्या हृदयांत प्रेम मावेना. तो रघुकुलातिलक रामचंद्राचें स्मरण करून ( म्हणाला )—

चौ०—तात कुसल कहु सुखनिधानकी ।
सहित अनुज अरु मातु जानकी ।
कपि सब चरित समास बखाने ।
भये दुखी मन महँ पछिताने ।

हे तात! लक्ष्मण आणि माता जानकीसहित सुखनिधान रामचंद्राचें कुशल सांग. त्याप्रमाणें मारुतीनें संक्षेपतः सर्व वृत्तांत निवेदन केला. तो ऐकून भरत मनांत दुःखित होऊन पश्चात्ताप करूं लागला.

अहह दैव मैं कत जग जायऊँ ।
प्रभु के एकहु काज न आयऊँ ।

हर हर दैवा ! मी या जगांत जन्मास तरी कशाला आलों ? प्रभूंना एकाहि कामीं मी उपयोगी पडलों नाहीं.

जानि कुअवसरु मन धरि धीरा ।
पुनि कपि सन बोले बलबीरा ।
तात गहरु होइहि तोहि जाता ।
काज नसाइहि होत प्रभाता ।
चढु मम सायक सैलसमेता ।
पठवउँ तोहि जहँ कृपानिकेता ।

तो बिकट प्रसंग जाणून त्या प्रबलवीरानें आपल्या मनास धीर दिला व तो पुन्हां मारुतीस म्हणाला, हे तात ! तुला जातां जातां उशीर होईल, आणि उजाडलें तर कार्याचा विघात होईल. म्हणून पर्वतासकट तूं माझ्या बाणावर जमून बैस. म्हणजे मी तुला कृपानिधान रामचंद्राकडे (एकदम) पोंचता करितों.

सुनि कपिमन उपजा अभिमाना ।
मोरे भार चलिहि किमि बाना ।
रामप्रभाव बिचारि बहोरी ।
बंदि चरन कपि कह कर जोरी ।

तें ऐकतांच मारुतीलाहि गुमान वाटला कीं, माझा भार वाहण्याची बाणाची बिशाद ती काय ? पुनः रामप्रभावाचा विचार करून आणि भरताच्या चरणीं दंडवत घालून तो हात जोडून म्हणाला,—

**दो०—तव प्रताप उर राखि प्रभु जैहउँ नाथ तुरंत । अस कहि आयसु पाइ पद बंदि चलेउ हनुमंत ॥ ७४ ॥**

हे नाथ ! तुझा नुसता प्रतापच हृदयांत ठेवूनहि मी बाणगतीनेंच त्वरित जाईन असें म्हणून व भरताची आज्ञा घेऊन त्याच्या चरणीं पुन्हा वंदन केल्यानंतर मारुति निघाला.

**दो०—भरत—बाहु—बल—सील—गुन प्रभु—पद—प्रीति अपार । मन महँ जात सराहत पुनि पुनि पवनकुमार ॥ ७५ ॥**

मार्गक्रमण करीत असतां भरताचें बाहुबल, त्याचें शील, त्याचे गुण, आणि त्याची प्रभुपदावरील अपार प्रीति यांची मारुति आपल्या मनांत वारंवार वाहवाई गाऊं लागला.

चौ०—उहाँ राम लछिमनहिँ निहारी ।
बोले बचन मनुजअनुहारी ।
अर्धराति गइ कपि नहि आयउ ।
राम उठाइ अनुज उर लायउ ।

तिकडे मध्यरात्र उलटली तरी मारुति परतला नाहीं असें पाहून रामांनीं लक्ष्मणास उचलून उराशीं धरिलें, आणि मानवी स्वभावाचें अनुकरण करून ते लक्ष्मणाकडे न्याहाळीत उद्गारले—

सकहु न दुखित देखि मोहि काऊ ।
बंधु सदा तव मृदुल सुभाऊ ।
मम हित लागि तजेहु पितु माता ।
सहेउ बिपिन हिम आतप बाता ।

भाऊराया ! माझें दुःख तुला कधींहि सहन झालें नाहीं; मजविषयीं तुझा स्वभाव नेहमींचाच कोमळ. केवळ माझ्याच सुखासाठीं तूं आईबापं देखील सोडून अरण्यांत थंडी, वारा आणि ऊन सहन करीत राहिलास.

सो अनुराग कहाँ अब भाई ।
उठहु न सुनि मम बचबिकलाई ।
जौं जनतेउँ बन बंधुबिछोहू ।
पिताबचन मनतेउँ नहिँ ओहू ।

बंधो ! तुझा तो जिव्हाळा आतांच कोठें हरपला रे ? माझी दीन वाणी श्रवण करूनदेखील तुला अजून कसा जाग येत नाहीं ? जर मला वनांत भावाची ताटातूट होणार म्हणून सुगावा जरी असता तरी मीं पित्याच्या वचनाला मुळीं मानच दिला नसता.

सुत बित नारि भवन परिवारा ।
होहिँ जाहिँ जग बारहिँ बारा ।
अस बिचारि जिय जागहु ताता ।
मिलइ न जगत सहोदर भ्राता ।

पुत्र, वित्त, स्त्री, गृह, परिवार ह्या जगांत वारंवार प्राप्त होतात आणि नष्टहि होतात. परंतु बाळ ! जगामध्यें एकदिलाचा भाऊ मिळतच नाहीं, हा विचार मनांत आणून तरी जागा हो रे.

जथा पंख बिनु खग अति दीना ।
मनि बिनु फनि करिबर करहीना ।
अस मम जिवन बंधु बिनु तोहीं ।
जौं जड दैव जियावइ मोहीं ।
जैहउँ अवध कवन मुँह लाई ।
नारिहेतु प्रियभाइ गवाँई ।

जर मला हें माझें खडतर नशीब जीवंत ठेवणारच असेल तर, माझ्यासारख्या ! तुझ्याशिवाय माझें जीवित म्हणजे पंखाशिवाय पक्षी, मण्याशिवाय सर्प, आणि सोंडेशिवाय हत्ती यांच्याप्रमाणेंच पराकाष्ठेचें हीनदीन होणार. मी स्त्रीसाठीं आपला लाडका भाऊ गमावून आतां अयोध्येंत कोणच्या तोंडानें जाऊं रे ?

बरु अपजसु सहतेउँ जग माहीँ ।
नारि हानि बिसेष छाति नाहीँ ।
अब अपलोक सोक सुत तोरा ।
सहिहि निठुर कठोर उर मोरा ।

आतांपर्यंत जगांत एक स्त्री घालविल्याबद्दलच अपयशाचा धनी झालों होतों. परंतु त्याची मला मोठीशी क्षिति वाटत नव्हती. आतां मात्र, ती निंदा आणि तुझा हा शोक हे दोन्हीहि माझें निष्ठुर आणि निर्दय अंतःकरण सहन करीत बसणार काय,रे बच्चू !

निजजननी के एक कुमारा ।
तात तासु तुम्ह प्रानअधारा ।
सौंपेसि मोहि तुम्हहिँ गहि पानी ।
सब बिधि सुखद परम हित जानी ।
उतरु काह दैहउँ तेहि जाई ।
उठि किन मोहि सिखावहु भाई ।

माझ्या चिमण्या ! तुझ्या आईनें तिच्या प्राणाला केवळ आधार असा एक पुत्र तिनें, सर्व प्रकारें सुखदायक आणि परमहितचिंतक असा मला समजून तुझा हात धरून तुला माझ्या स्वाधीन केलें. बाळ ! आतां जाऊन तिला मी काय उत्तर द्यावें बरें ? ऊठ आणि मला इतकें तरी सांग कीं रे !

बहु बिधि सोचत सोचबिमोचन ।
स्रवत सलिल राजिव-दल-लोचन ।
उमा एक अखंड रघुराई ।
नरगति भगतकृपालु देखाई ।

अशा रीतीनें अनेक प्रकारें शोकविमोचन श्रीराम शोक करून आपल्या कमलनेत्रांतून अश्रु ढाळूं लागले. शंकर म्हणतात, पार्वति ! रामचंद्र तर अखंड सच्चिदानंदकैरस आहेत. त्या भक्तदयाघनानें मानवाचें मानव्य ( शोकरूपानें ) निदर्शनास आणलें.

**सो०—प्रभुबिलाप सुनि कान बिकल भये बानरनिकर । आइ गयउ हनुमान जिमि करुना महँ बीर रस ॥ ९ ॥**

प्रभूंचा विलाप श्रवण करून वानरगणहि विव्हल झाला. इतक्यांत जणुं करुणरसांत वीररसाचा आविर्भाव व्हावा तसा मारुति तेथें येऊन पोहोंचला.

चौ०—हरषि राम भेँटेउ हनुमाना ।
अति कृतज्ञ प्रभु परम सुजाना ।
तुरत बैद तब कीन्हि उपाई ।
उठि बैठे लछिमन हरषाई ।
हृदय लाइ भेँटेऊ प्रभु भ्राता ।
हरषे सकल भालु-कपि-व्राता ।

अत्यंत कृतज्ञ आणि परमसुजाण प्रभु रामचंद्र

१ या ' कृतज्ञ ' पदानें कवीनें ईश्वराचें ईश्वरत्व आणि मानवाचें मानव्य कशांत आहे तें दाखविलें.आशय हा कीं ईश्वर असो कीं मानव असो जर कृतज्ञता आहे तरच ते ईश्वर किंवा मानव, आणि ती गेली कीं दोघेहि आपापल्या परी पटावरून खारीज झालेले समजावयाचे.

मारुतीस आनंदानें भेटले. नंतर सुषेणानें तावडतोब उपचार केला, तोंच लक्ष्मण पुरता हुषार होऊन उठून बसला! प्रभु रामचंद्रांनीं त्यास उराशीं धरून आलिंगन दिलें. सर्व ऋक्षवानर मंडळी आनंदनिर्भर झाली.

पुनि कपि बैद तहाँ पहुँचावा।
जेहि बिधि तबहिँ ताहि लेइ आवा।

नंतर मारुतीनें सुषेणाला ज्याप्रकारें व जेथून आणलें होतें तेथें पूर्ववत् पोचतें केलें.

यह बृत्तांत दसानन सुनेऊ।
अति बिषाद पुनि पुनि सिर धुनेऊ।
ब्याकुल कुंभकरन पहिँ आवा।
बिबिध जतन करि ताहि जगावा।
जागा निसिचर देखिय कैसा।
मानहुँ काल देह धरि बैसा।

हा वृत्तांत रावणास कळतांच त्याला अत्यंत खेद वाटून तो वारंवार आपलें कपाळ बडवून घेऊं लागला. शेवटीं तो शोकग्रस्त होऊन कुंभकर्णाकडे आला आणि त्यास नानाप्रकारें प्रयत्नपूर्वक जागें करूं लागला. अखेरीस कुंभकर्ण जागा होऊन उठून बसला. तेव्हां तो काळाची अपर प्रतिमाच भासला.

कुंभकरन बूझा सुनु भाई।
काहे तब मुख रहे सुखाई।

कुंभकर्णानें विचारलें कीं, दादा! तुझीं तोंडें अशीं रे कां सुकलीं?

कथा कही सब तेहिँ अभिमानी।
जेहि प्रकार सीता हरि आनी।
तात कपिन्ह सब निसिचर मारे।
महा-महा-जोधा संहारे।

सीता हरण करून आणण्याचा जो कांहीं प्रकार घडला तो सर्व वृत्तांत त्या गर्विष्ठानें कुंभकर्णास कथन केला. रावण म्हणाला, हे तात! वानरांनीं राक्षसांच्या खास रिसाल्यांतले अस्सल उमदे मोहरे अवघेच खलास केले.

दुर्मुख सुररिपु मनुजअहारी।
भट अतिकाय अकंपन भारी।
अपर महोदरआदिक बीरा।
परे समरमहि सब रनधीरा।

सुरशत्रु व मनुष्यभक्षक असे दुर्मुख, अतिकाय, अकंपन, महोदर, आदिकरून सर्व जंगीबेडा रणांगणांवर कपींनीं साफ गारद केला.

**दो०-सुनि दस-कंधर-बचन तब कुंभकरन बिलखान। जगदंबा हरि आनि अब सठ चाहत कल्यान॥ ७६॥**

रावणाचें तें भाषण ऐकतांच कुंभकर्ण दुःखानें विवळून म्हणाला, अरे वारगळलेल्या! तूं जगदंबेवर हात टाकून देखील फिरून कल्याणाची इच्छाहि करितोसच?

चौ०-भल न कीन्ह तैँ निसि-चर-नाहा।
अब मोहि आइ जगायेहि काहा।
अजहूँ तात त्यागि अभिमाना।
भजहु राम होइहि कल्याना।

अखेर तूं मूर्ख राक्षसांचाच सरदार ठरून अवघाच मामला साफ बिघडवून टाकलास. इतक्या विचक्यानंतर मला येऊन जागविण्यांत काय हंशील? दादा! अजूनदेखील आपला मस्तवालपणा सोडून रामास शरण जाशील तर नुकसानीपासून खास बचावशील.

हैँ दससीस मनुज रघुनायक।
जा के हनूमान से पायक।
अहह बंधु तैँ कीन्हि खोटाई।
प्रथमहिँ मोहि न सुनायेहि आई।
कीन्हेहु प्रभुबिरोध तेहि देवक।
सिव बिरंचि सुर जा के सेवक।
नारद मुनि मोहि ज्ञान जो कहा।
कहतेउँ तोहि समय निरवहा।

रावणा! हनुमंतासारखे ज्याचे सेवक तो रघुनायक मामुली मनुष्यच काय रे? हरहर! दादा! तूं मोठेंच मुष्किलीचें मैदान करून ठेवलेंस. मला प्रथमच कळवायला कां आला नाहींस? शिवब्रह्मादि देव ज्याचे सेवक त्या देवाधिदेव प्रभूशीं हा खुटी उपाडपणा तूं केला आहेस. नारदमुनींनीं मला जें कांहीं भाकित सांगून ठेविलें होतें तें तुला सांगितलें असतें, परंतु ती वेळच निसटली.

अब भरि अंक भेँटु मोहि भाई।
लोचन सुफल करउँ मैँ जाई।
स्यामगात सरसी-रुह-लोचन।
देखउँ जाइ ताप-त्रय-मोचन।

असो. आतां, दादा ! मला एकवार अखेरचें कडकडून भेटून घे. मी जाऊन तो श्यामलगात्र, कमलनयन, त्रितापमोचन प्रभु पाहणार आणि आपल्या नेत्राचें चीज करणार.

**दो०–राम–रूप–गुन सुमिर मन मगन भयउ छन एक । रावन माँगेउ कोटि घट मद अरु महिष अनेक ॥ ७७ ॥**

श्रीरामचंद्राचे गुण आणि रूप आठवून कुंभकर्णाचें मन क्षणमात्र रंगून गेलें. रावणानें मद्याचे कोटयवधी पिंप आणि रेडयांची दावण मागविली.

चौ०–महिष खाइ करि मदिरापाना ।
गर्जा बज्राघातसमाना ।
कुंभकरन दुर्मद रनरंगा ।
चला दुर्ग तजि सेन न संगा ।

कुंभकर्णानें ते रेडे खाऊन आणि मद्य पिऊन वज्रपाताप्रमाणें गर्जना केली. तो मदोन्मत्त कुंभकर्ण रणमदानें धुंद झाला व लंकादुर्ग सोडून एकटाच लावलष्कर कांहींहि न घेतां पुढें सरसावला.

देखि बिभीषन आगे आयउ ।
परेउ चरन निज नाम सुनायउ ।
अनुज उठाइ हृदय तेहिँ लावा ।
रघु–पति–भगत जानि मनभावा ।

त्यास पाहून बिभीषण सामोरा गेला आणि आपलें नांव सांगून त्याच्या पायीं पडला. कुंभकर्णानें त्याला उठवून हृदयाशीं कवटाळलें आणि तो रघुपति भक्त जाणून त्यास मनांत प्रसन्नता वाटली.

तात लात रावन मोहि मारा ।
कहत परमहित मंत्रबिचारा ।
तेहि गलानि रघुपति पहिँ आयउँ ।
देखि दीन प्रभु के मन भायउँ ।

बिभीषण म्हणाला, छोटे दादा ! मी रावणाला अत्यंत हितकर असा सल्ला देत असतां मला त्यानें लत्ताप्रहार केला. त्याच उद्वेगानें मी रघुपतींच्या आश्रयास आलों, व मला दीन समजून प्रभूंनींहि माझा अंगीकार केला.

सुनु सुत भयऊ कालबस रावन ।
सो कि मान अब परमसिखावन ।
धन्य धन्य तैँ धन्य बिभीखन ।
भयउ तात निसि–चर–कुल–भूषन ।
बंधुबंस तैँ कीन्ह उजागर ।
भजेहु राम सोभा–सुख–सागर ।

( हें ऐकून कुंभकर्ण म्हणाला, ) वत्सा ! ऐक. रावण कालवश झाला असल्यामुळें तो आतां अत्यंत हिताचाहि बोध कसचा ऐकतो ? बिभीषणा ! तूं खरोखरच धन्य आहेस. बाळा ! तूं एकंदर राक्षसकुलाला भूषण झाला आहेस. सौंदर्यसुखसागर रामचंद्राची भक्ति करून तूं आपला वंश खराच उजागर करून घेतलास.

**दो०–बचन कर्म मन कपट तजि भजेहु राम रनधीर । जाहु न निज पर सूझ मोहि भयउँ कालबस बीर ॥ ७८ ॥**

कायावाचामनेंकरून निष्कपटपणें त्या रणधुरंधर श्रीरामाचीच भक्ति कर. हे वीरा ! तूं आतां जा. मला आपपर कांहीं एक सुचत नाहीं. मीहि कालवश झालों आहे.

चौ०–बंधुबचन सुनि फिरा बिभीषन ।
आयऊ जहँ त्रै–लोक–बिभूषन ।
नाथ भूधरा–कार–सरीरा ।
कुंभकरन आवत रनधीरा ।

बंधूचें तें भाषण ऐकून बिभीषण परतला आणि त्रैलोक्यविभूषण श्रीरामाकडे येऊन म्हणाला, हे प्रभो ! हा धडाडीनें चाल करणारा गनीम पर्वतप्राय देहधारी कुंभकर्ण होय.

एतना कपिन्ह सुना जब काना ।
किलिकिलाइ धाये बलवाना ।
लिये उपारि बिटप अरु भूधर ।
कटकटाइ डारहिँ ता ऊपर ।
कोटि कोटि गिरि-सिखर-प्रहारा ।
करहिँ भालु कपि एकहिँ बारा ।
मुरेउ न मन तन टरेउ न टारे ।
जिमि गज अर्कफलन्हि के मारे ।

हें त्या बलाढ्य वानरांनीं ऐकताच किलकिल करीत त्यांनीं एकदमच त्याच्या कोंडमाऱ्यासाठीं गिल्ला चढविला. वृक्ष आणि पर्वत उपटून कुंभकर्णावर ते करकर दांत खाऊन फेर करूं लागले. ऋक्षवानर एकसमयावच्छिन्नेंकरून कुंभकर्णावर कोटयवधि गिरिशिखरांची फैर झाडीत. तथापि रुईच्या फलमारानें जसा हत्ती डगत नाहीं तसा तो त्या गिल्ल्यान मनांत न बुजाडतां कितीहि हटविला तरी मागें हटेना.

तब मारुतसुत मुठिका हनेऊ।
परेउ धरनि ब्याकुल सिर धुनेऊ।
पुनि उठि तेहि मारेउ हनुमंता।
घुर्मित भूतल परेउ तुरंता।

तेव्हां मारुतीनें त्यास एक मुष्टिप्रहार केला, त्यामुळें तो कासावीस होऊन त्यास शिरकंप सुटला व तो जमीनीवर कोसळला. त्यानें फिरून उठून हनुमंतावर उलट मारा केला. त्या योगानें हनुमंत तात्काल घेरी येऊन पृथ्वीवर पडला.

पुनि नल नीलहि अवनि पछारेसि।
जहँ तहँ पटकि भटकि भट डारेसि।
चली बली-मुख-सेन पराई।
अति-भय-त्रासित न कोउ समुहाई।

पुन्हां तो नलनीलांना पृथ्वीवर आपटून जेथेंतेथें सारखा हैदोस घालीत वीरांना भूमीवर पटकून लोळवूं लागला. त्याच्या त्या दबडक्यामुळें वानर सैन्यानें सारखा सूंबाल्या आरंभला. भयंकर रान-उठविल्यामुळें भीतीनें त्या दुष्मनाचा सामना घेण्याची कोणासच हिंमत होईना.

**दो०-अंगदादि कपि मूर्च्छित करि समेत सुग्रीवँ। काँख दाबि कपिराज कहँ चला अमित-बल-सीवँ॥ ७९॥**

सुग्रीवासहित अंगदादि कपींना मूर्च्छित करून आणि सुग्रीवास कांखेंत दाबून त्या अतुलबलीनें आपली कुतरओढ सारखी चालूंच ठेवली.

चौ०-उमा करत रघुपति नरलीला।
खेल गरुड जिमि अहिगन मीला।
भृकुटि भंग कालहि जो खाई।
ताहि कि सोहइ ऐसि लराई।
जगपावनि कीरति बिस्तरिहहिँ।
गाइ गाइ भवनिधि नर तरिहहिँ।

( शंकर म्हणतात ) पार्वति! ज्याप्रमाणें गरुड सर्पसमूहामध्यें अडकून देखील लीला करितो तद्वत्च ती रघुपतीची नरलीला चालली होती. ज्याच्या नुसत्या तेढ्या नजरेसरशीं कालाचा देखील कलेवा होतो त्याला अशी लढाई शोभते काय? परंतु ज्याचें एकसारखें गान करून नर भवसागर तरून जातील अशा प्रकारच्या आपल्या जगत्पावन यशाचा तो प्रभु ( या लढाईच्या मिषानें ) विस्तार करीत होता.

मुरछा गइ मारुतसुत जागा।
सुग्रीवहिँ तब खोजन लागा।
सुग्रीवहुँ कै मुरुछा बीती।
निबुकि गयउ तेहि मृतकप्रतीती।

मूर्च्छा जाऊन मारुती सावरला व तो सुग्रीवास शोधूं लागला. इकडे सुग्रीवाचीहि मूर्च्छा गेली आणि तो आपण मेलों असें कुंभकर्णाला भासवून त्याच्या काखेंतून शिताफीनें निसटून गेला.

काटेसि दसन नासिका काना।
गरजि अकास चलेउ तेहि जाना।
गहेउ चरन धरि धरनि पछारा।
अतिलाघव उठि पुनि तेहि मारा।

सुग्रीवानें त्याचें नाककान चावून तोडले आणि तो गर्जना करीत आकाशांत उडाला, तेव्हां तो निसटल्याचें कुंभकर्णास समजलें. कुंभकर्णानें सुग्रीवास तंगडी धरून फिरून जमिनीवर आदळलें. परंतु सुग्रीव मोठ्या चलाखीनें उठला व त्यास मारूं लागला.

पुनि आयउ प्रभु पहिँ बलवाना।
जयति जयति जय कृपानिधाना।
नाक कान काटे जिय जानी।
फिरा क्रोध करि भइ मन ग्लानी।
सहज भीम पुनि बिनु स्रुति नासा।
देखत कपिदल उपजी त्रासा।

नंतर तो बलाढ्य सुग्रीव कृपानिधान प्रभूचा जयजयकार करीत त्यांचेकडे परतला. कुंभकर्ण आपले नाककान कापून टाकले आहेत असें समजतांच जरा बावरला, पण लगेंच चवताळून परत फिरला. तेव्हां आधींच भयंकर, त्यांतून कर्णनासाहीन, अशा त्या कुंभकर्णाला पाहून कपिसैन्यास सळो कीं पळो झालें.

**दो०-जय जय जय रघु-बंस-मनि धाये कपि देइ हूह। एकहि बार तासु पर छाडेन्हि गिरि-तरु-जूह॥ ८०॥**

तरीही पण श्रीरामचंद्राचा जयजयकार करून वानर गर्जना करून धांवलेच व त्या सर्वांनीं कुंभकर्णावर एकदम वृक्षपाषाणांची धार धरली.

चौ०-कुंभकरन रनरंग बिरुद्धा।
सनमुख चला काल जनु क्रुद्धा।

कोटि कोटि कपि धरि धरि खाई ।
जनु टीडि गिरिगुहा समाई ।
कोटिन्ह गहि सरीर सन मर्दा ।
कोटिन्ह मीँजि मिलव महि गर्दा ।
मुख नासा स्रवनन्हि कीं बाटा ।
निसरि पराहिँ भालु—कपि ठाटा ।

तरीहि कोपलेल्या काळाप्रमाणें वीरश्री चढलेला तो कुंभकर्ण अगदीं शत्रूंच्या तोंडावर येऊन ठेपला. पर्वताच्या खोऱ्यांत जणुंकाय टोळच शिरताहेत अशाप्रमाणें तो कोट्यवधि वानरांना धरधरून तोंडांत टाकूं लागला. त्यानें कोट्यवधि वानरांना अंगानें चिरडून धूळ चारली, आणि कोट्यवधींना मस्कन धुळीस मिळविलें. गिळलेल्या ऋक्षवानरांचे समुदाय मात्र तोंड, नाक व कान ह्या वाटांनीं फिरून बाहेर पडून सैराट धूम ठोकूं लागले.

रन—मद—मत्त निसाचर दर्पा ।
बिस्व ग्रसिहि जनु एहि बिधि अर्पा ।
मुरे सुभट सब फिरहिँ न फेरे ।
सूझ न नयन सुनहिँ नहिँ टेरे ।
कुंभकरन कपिफौज बिडारी ।
सुनि धाई रजनी—चर—धारी ।

त्याचा तो नागडा हैदोस पाहणारास अशीच कल्पना होई कीं, या राक्षसानें सर्व विश्वाचा जणुं ग्रासच करण्याचा इरादा बांधला आहे. त्याच्या सामन्यांतून सर्व अस्सल मुरब्बी मोहरे देखील पाठ दाखऊं लागले. त्यांना रेटलें तरीहि ते नेट धरीतना. त्यांच्या डोळ्यावर अंधेरी येऊन त्यांना हाकदेखील ऐकूं येईना. कुंभकर्णानें वानरसैन्याचा खीमा उतरविला ती बातमी ऐकतांच लंकेंतून राक्षसांचा ताजा काफला त्याच्या दिमतीस येऊन उतरला.

देखी राम बिकल कटकाई ।
रिपुअनीक नानाबिधि आई ।

श्रीरामचंद्रांनीं आपल्या सैन्याची होत असलेली ती लांडगेतोड आणि शत्रूची ती लोटलेली भरभक्कम कुमक लक्षांत आणली.

**दो०—सुनु सुग्रीवँ बिभीषन अनुज सँभारेहु सैन । मैँ देखउँ खल-बल-दलहि बोले राजिवनैन ॥ ८१ ॥**

तेव्हां कमलनयन श्रीराम म्हणाले, अहो सुग्रीव, बिभीषण, लक्ष्मण हो ! ऐका. तुम्हीं आपापल्या तुकडया सांभाळून असा; मी एकटाच ह्या अडमाप धेंडाचा व त्याच्या सैन्याचा समाचार घेतों.

चौ०—कर सारंग साजि कटि भाथा ।
अरि-दल-दलनि चले रघुनाथा ।
प्रथम कीन्हि प्रभु धनुषटकोरा ।
रिपुदल बधिर भयउ सुनि सोरा ।

हातांत धनुष्य आणि कमरेला भाते खोवून रघुवीर प्रथम शत्रुसैन्याची फळी फोडण्यास निघाले. प्रभूंच्या धनुष्याच्या पहिल्याच टणत्काराचा दणदणाट ऐकतांच शत्रुसैन्याची कानठळीच बसली.

सत्यसंध छाडे सर लच्छा ।
कालसर्प जनु चले सपच्छा ।
जहँ तहँ चले बिपुल नाराचा ।
लगे कटन भट बिकट पिसाचा ।

सत्यप्रतिज्ञ श्रीरामचंद्र लक्षावधि बाण सोडीत. ते सपक्ष कालसर्पाप्रमाणें फूत्कार करीत जात. सर्व दिशांनीं असंख्य बाण सुटूं लागल्यामुळें पिसाळलेले विक्राळ राक्षसवीर मरून पडूं लागले.

कटहिँ चरन उर सिर भुजदंडा ।
बहुतक बीर होहिँ सत खंडा ।
घुर्मि घुर्मि घायल महि परहीँ ।
उठि संभारि सुभट पुनि लरहीँ ।

कित्येकांचे पाय, शिरें, उर व भुजदंड तुटून पडूं लागले; कित्येक वीरांचे शतशः तुकडे होऊं लागले; कित्येक घायाळ झाल्यानें मूर्च्छित होऊन धरणीवर पडूं लागले. कांहीं कट्टर वीर सावरून पुन्हां उठत व पुन्हां लढूं लागत.

लागत बान जलद जिमि गाजहिँ ।
बहुतक देखि कठिन सर भाजहिँ ।
रुंड प्रचंड मुंड बिनु धावहिँ ।
धरु धरु मारु मारु धुनि गावहिँ ।

त्यांपैकीं कित्येक बाण लागतांच मेघाप्रमाणें आरोळ्या फोडीत आणि बहुतेक तर ते तीक्ष्ण बाण पाहूनच पळ काढीत. बिनशिरांचीं प्रचंड धडें धावत सुटत, आणि धरा, धरा, मारा, मारा, अशी एकच बोंब उठवीत.

**दो०—छन महँ प्रभु के सायकन्हि काटे बिकट पिसाच । पुनि रघुबीर निषंग महँ प्रबिसे सब नाराच ॥ ८२ ॥**

एका क्षणांत त्या पिसाळलेल्या अक्राळविक्राळ राक्षसांची खूनखराबी उडवून प्रभु रघुवीराचे सर्व बाण पुन्हां परत येऊन त्यांच्या भात्यांत प्रविष्ट होत.

चौ०–कुंभकरन मन दीख बिचारी।
हति छन माँझ निसा–चर–धारी।
भयउ क्रुद्ध दारुन बल बीरा
करि मृग–नायक–नाद गँभीरा।
कोपि महीधर लेइ उपारी।
डारइ जहँ मर्कटभट भारी।

कुंभकर्णानें मनांत विचार करून पाहिलें कीं एका क्षणांत झाडून सर्व राक्षसांच्या प्रेतांचा खच पाडला गेला. तेव्हां त्या बेरडास भयंकर क्रोध चढला व त्यानें गंभीर सिंहनाद करून मोठ्या आवेशानें एक पर्वत उपटून जेथें मोठमोठे वानरवीर होते तेथें तो फेंकला.

आवत देखि सैल प्रभु भारे।
सरन्हि काटि रजसम करि डारे।
पुनि धनु तानि कोपि रघुनायक।
छाडे अति कराल बहु सायक।

तो विशाल पर्वत येतोसा पाहून प्रभूंनीं बाण मारून त्याचें चूर्ण करून टाकलें. नंतर रघुनायकांनीं आवेशानें चाप ओढून अत्यंत तीव्र असे असंख्य बाण सोडले.

तन महँ प्रबिसि निसरि सर जाहीं।
जनु दामिनि घन माँझ समाहीं।
सोनित स्रवत सोह तन कारे।
जनु कज्जलगिरी गेरुपनारे।

ते बाण ज्याप्रमाणें वीज चमकून पुन्हां परत मेघमंडलांत प्रविष्ट होते त्याप्रमाणें, कुंभकर्णाच्या अंगाची चाळणी करून परत भात्यांत प्रविष्ट होत. रक्तस्राव होत असतां कुंभकर्णाचें तें काळेंकभिन्न शरीर जणुं काय कज्जल पर्वतांतून कावेचे पाटच वाहत आहेत असें दिसत होतें.

बिकल बिलोकि भालु कपि धाये।
बिहँसा जबहिं निकट कपि आये।

कुंभकर्णाची ती दुर्दशा पाहून ऋक्षवानर वीर धावत धावत त्याचेजवळ गेले, तेव्हां कुंभकर्ण हसूं लागला आणि–

दो०–महानाद करि गर्जा कोटि कोटि गहि कीस। महि पटकइ गजराज इव सपथ करइ दससीस॥ ८३॥

भयंकर गर्जना करून आणि रावणाची शपथ घेऊन कोट्यवधि वानरांना धरून तो गजराजाप्रमाणें जमीनीवर पछाडूं लागला.

चौ०–भागे भालु-बलीमुख-जूथा।
बृक बिलोकि जिमि मेषबरूथा।
चले भागि कपि भालु भवानी।
बिकल पुकारत आरतबानी।
यह निसिचर दु–काल-सम अहई।
कपिकुल देस परन अब चहई।
कृपा-बारि-धर राम खरारी।
पाहि पाहि प्रनतारतिहारी।

लांडगा पाहतांच ज्याप्रमाणें मेंढ्यांचे कळप पळूं लागतात, तद्वत् (कुंभकर्णाला पाहतांच) ऋक्षवानरांचे समुदाय पळ काढूं लागले. (शंकर ह्मणतात), हे पार्वति! तेव्हां ते ऋक्षवानर पळत असतां अगदीं डबघाईस आले. त्यांच्या सर्व काफल्यांत एकच बोंब उठली कीं, "हा राक्षस दुष्काळाप्रमाणें वानरकुलरूप देशावर धाड खचविण्याच्या फिकिरींत आहे. अहो! खरशत्रो रामचंद्रा! आपण दयाघन असून शरणागताचें दुःखविमोचन करणारे आहांत. आतां आपणच आमचे वाली होऊन आमचे प्राण वांचवावे.

स-करुन-बचन सुनत भगवाना।
चले सुधारि सरासनबाना।
राम सेन निज पाछे घाली।
चले सकोप महा-बल-साली।
खैंचि धनुष सरसत संधाने।
छूटे तीर सरीर समाने।

ऋक्षवानरांनीं भाककेला तो त्राहि भगवान् ऐकून प्रभु धनुष्यबाण सज्ज करून पुढें निघाले व आपलें सैन्य पाठीशीं घालून ते महाबलवान् रामचंद्र मोठ्या तडफेनें सरसावले. त्यांनीं धनुष्य ओढून शंभर बाण सोडले. ते बाण निघाले ते थेट कुंभकर्णाच्या शरीरांत जाऊन रुतले.

लागत सर धावा रिसभरा।
कुधर डगमगत डोलति धरा।
लीन्ह एक तेहि सैल उपाटी।
रघु-कुल-तिलक भुजा सोइ काटी।

धावा बामबाहु गिरि धारी। ।
प्रभु सोउ भुजा काटि महि पारी।
काटे भुजा सोह खल कैसा ।
पच्छहीन मंदरगिरि जैसा ।
उग्र बिलोकनि प्रभुहि बिलोका ।
ग्रसन चहत मानहुँ त्रयलोका ।

ते बाण लागतांच संतापानें कुंभकर्ण धाऊं लागला असतां पृथ्वी कंपित होऊन पर्वत डळमळूं लागले. कुंभकर्णानें एक पर्वत उपटून (उजव्या हातांत) घेतला. तेव्हां रघुकुलतिलकांनीं त्याचा तोच हात तोडला. नंतर तो डाव्या हातावर पर्वत घेऊन धावला. प्रभूंनीं त्याचा तोहि हात कापून भूमीवर पाडला. दोन्ही बाहू तुटले असतां तो दुष्ट पक्षहीन मंदराचलाप्रमाणें दिसूं लागला. तो कुंभकर्ण प्रभूकडे उग्र मुद्रेनें पहात असतां, जणुंकाय त्रैलोक्याचा ग्रास करूं पाहत आहे असें वाटे.

**दो०–करि चिकार घोर अति धावा बदन पसारि । गगन सिद्ध सुर त्रासित हा हा होति पुकारि ॥ ८४ ॥**

नंतर अत्यंत घोर असा चीत्कार करून व जबडा फाडून कुंभकर्ण धांवला असतां आकाशांतील सिद्ध आणि देव त्रस्त होऊन हाहाःकार करूं लागले.

चौ०–सभय देव करुनानिधि जानेउ ।
स्रवन प्रजंत सरासन तानेउ ।
बिसिखनिकर निसि-चर-मुख भरेऊ ।
तदपि महाबल भूमि न परेऊ ।

देव भयभीत झालेले जाणून करुणासागर प्रभूंनीं धनुष्य आकर्ण ओढून कुंभकर्णाचें मुख अनेक बाणांनीं भरून काढलें. तथापि तो महाबली भूमीवर पडेना.

सरन्हि भरा मुख सनमुख धावा ।
कालत्रोन सजीव जनु आवा ।
तब प्रभु कोपि तीव्र सर लीन्हा ।
धर तें भिन्न तासु सिर कीन्हा ।

जणुंकाय भात्याचें रूप धारण करून जीवंत काळच येत आहे अशा रीतीनें तोंड बाणांनीं भरून गेलेला तो कुंभकर्ण समोरून धावत आला. हें पाहून प्रभूंनीं एक तीव्र शर सोडून त्याचें शिर धडापासून अलग केलें.

सो सिरु परेउ दसानन आगे ।
बिकल भयउ जिमि फनि मनि त्यागे ।
धरनि धसइ धर धाव प्रचंडा ।
तब प्रभु काटि कीन्ह दुइ खंडा ।
परे भूमि जिमि नभ तें भूधर ।
हेठ दाबि कपि भालु निसाचर ।

तें कुंभकर्णाचें शिर एकदम रावणापुढें जाऊन आदळलें, तेव्हां मणिहीन सर्पाप्रमाणें तो विव्हल झाला. त्याचें तें धिप्पाड धड धांवूं लागलें असतां पृथ्वी आंत धसूं लागली. तेव्हां प्रभूंनीं त्याचे कापून दोन तुकडे केले. ते तुकडे आकाशांतून पृथ्वीवर पर्वत पडावेत तसे पडले. त्यामुळें त्यांचेखालीं कित्येक ऋक्षवानर चिरडले गेले.

तासु तेज प्रभुबदन समाना ।
सुर मुनि सबहिं अचंभौ माना ।
सुर दुंदुभी बजावहिं हरषहिं ।
अस्तुति करहिं सुमन बहु बरषहिं ।

कुंभकर्णाचें तेज (प्राणज्योती) प्रभूंच्या मुखांत प्रविष्ट झालें. हें पाहतांच देव, मुनि इत्यादि सर्वांस महदाश्चर्य वाटलें. देवांनीं आनंदभरानें दुंदुभी वाजविल्या आणि प्रभूंची स्तुति करून विपुल पुष्पवृष्टि केली.

करि बिनती सुर सकल सिधाये ।
तेहीं समय देवरिषि आये ।
गगनोपरि हरि-गुन-गन गाये ।
रुचिर बीररस प्रभुमन भाये ।
बेगि हतहु खल कहि मुनि गये ।
राम समर महि सोहत भये ।

सर्व देव प्रार्थना करून निघून गेल्यानंतर त्याच समयाला देवर्षि नारद आले व आकाशांत हरिगुणगणांचें गान करीत असतां मूर्तिमंत वीररसच अशा त्या प्रभूस पाहून मनाच्या सुप्रसन्नतेनें 'राक्षसांना लवकर मुरवून टाका' असें म्हणून चालते झाले. इकडे रामचंद्र समरभूमीवर असे शोभूं लागले—

**छंद–संग्रामभूमि बिराज रघुपति अतुलबल कोसलधनी । स्रमबिंदु मुख राजीव-लोचन अरुन तन सोनितकनी ॥ भुज-जुगल फेरत सरसरासन भालु कपि चहुँ दिसि बने । कह दास तुलसी**

**कहि न सक छवि सेष जेहि आनन घने ॥ ३ ॥**

मुखावर श्रमबिंदु झळकत आहेत, रुधिरतुषारांनीं देह आरक्त झाला आहे, दोन्ही हातांनीं धनुष्यबाण चोखाळीत आहेत, चोहोंकडे ऋक्षवानर उभे आहेत, असे ते अतुल बलवान् कोसलेश्वर रामचंद्र संग्रामभूमीवर शोभूं लागले. तुलसीदास म्हणतात, अनंतमुखाच्या शेषाच्यानेंहि त्या सौंदर्याचें वर्णन करवणार नाहीं.

**दो०–निसिचर अधम मलाकर ताहि दीन्ह निज धाम । गिरिजा ते नर मंदमति जे न भजहिँ श्रीराम ॥ ८५ ॥**

कुंभकर्ण हा अधम व पापाचें केवळ पेवच होता; परंतु त्यासहि प्रभूंनीं निजपद दिलें. (शंकर म्हणतात) पार्वति ! अशा श्रीरामास जे नर भजत नाहींत ते महामूढ होत.

चौ०–दिन के अंत फिरी दोउ अनी ।
समर भई सुभटन्ह स्रम घनी ।
रामकृपा कपिदल बल बाढा ।
जिमि तृन पाइ लाग अतिडाढा ।
छीजहिँ निसिचर दिन अरु राती ।
निज मुख कहे सुकृत जेहि भाँती ।

अस्तमान होतांच दोन्हीं दळें परत फिरलीं. युद्धामुळें वीरांना खूपच थकावट आली होती. ज्याप्रमाणें तृण मिळालें असतां अग्नि अत्यंत प्रज्वलित होतो त्याप्रमाणें रामाची कृपादृष्टि फिरतांच कपिसैन्याचें सामर्थ्य वाढूं लागलें, आणि ज्याप्रमाणें आपल्या मुखानें आपले पुण्याचें वर्णन केलें असतां तें क्षीण होतें. त्याप्रमाणें अहर्निश राक्षससैन्याची उतरती कळा वाढीस लागली.

बहु बिलाप दसकंधर करई ।
बंधुसीस पुनि पुनि उर धरई ।
रोवहिँ नारि हृदय हति पानी ।
तासु तेज बल बिपुल बखानी ।

कुंभकर्णाचें मस्तक वारंवार उराशीं धरून रावण अनेक प्रकारें विलाप करूं लागला. त्याचप्रमाणें त्याच्या विपुल तेजाची आणि पराक्रमाची वाखाणणी करीत हातांनीं छाती बडवून स्त्रियाहि आकांत करूं लागल्या.

मेघनाद तेहि अवसर आवा ।
कहि बहु कथा पिता समुझावा ।
देखेहु कालि मोरि मनुसाई ।
अबहिँ बहुत का करउँ बडाई ।
इष्टदेव सोँ बल रथ पायउँ ।
सो बल तात न तोहि देखायउँ ।

त्याच समयास मेघनादहि तेथें आला व त्यानें अनेक प्रकारें गोष्टी सांगून पित्याचें सांत्वन केलें. ( तो म्हणाला ) मीं आपली आतांच काय प्रौढी मिरवावी ? माझ्या इष्टदेवतेपासून मला जें बल आणि जो रथ प्राप्त झाला आहे त्याच्या जोरावर, हे तात ! माझा पराक्रम उद्यांच आपल्या नजरेस पडेल. रथ व बल तूर्त तुम्हाला दाखविण्यांतहि अर्थ नाहीं.

एहि बिधि जलपत भयउ बिहाना ।
चहुँ दुआर लागे कपि नाना ।
इत कपि भालु कालसम बीरा ।
उत रजनीचर अति–रन–धीरा ।
लरहिँ सुभट निज निज जय हेतू ।
बरनि न जाइ समर खगकेतू ।

ह्याप्रमाणें वल्गना चालू आहेत इतक्यांत उजाडलें व चारीहि वेशींवर असंख्य वानरांनीं हल्ला केला. एकीकडे कर्दनकाळाप्रमाणें भालु कपिवीर आणि दुसरीकडे जबर रणगाजी राक्षस आपापल्या पक्षाला जय मिळावा म्हणून झुंजूं लागले. काकभुशुंडी म्हणतात, हे गरुडा ! त्यांच्या त्या खडाजंगीचा तपशील देण्याची सोयच नाहीं.

**दो०–मेघनाद मायामय रथ चढि गयउ अकास । गर्जेउ अट्टहास करि भइ कपिकटकहि त्रास ॥ ८६ ॥**

इकडे मेघनादानें मायामय रथांत बसून आकाशांत उड्डाण केलें, व तो अट्टहासपूर्वक गर्जना करूं लागला. त्यामुळें कपिसैन्य त्रस्त झालें.

चौ०–सक्ति सूल तरवारि कृपाना ।
अस्त्र सस्त्र कुलिसायुध नाना ।
डारइ परसु परिघ पाषाना ।
लागेउ बृष्टि करइ बहु बाना ।
दस दिसि रहे बान नभ छाई ।
मानहुँ मघा मेघ झरि लाई ।

शक्ति, शूल, तरवार, कृपाण, अस्त्र, शस्त्र, नानाप्रकारचीं वज्रायुधें, परशु, परिघ, पाषाण, तसेंच असंख्य बाण यांची तो वृष्टि करूं लागला. दाही दिशांनीं आकाश बाणांनीं इतकें व्याप्त झालें कीं जणुंकाय मघानक्षत्रांतील मेघांनीच तुफान उठविलें आहे.

धरु धरु मारु सुनिअ धुनि काना।
जो मारइ तेहि कोउ न जाना।
गहिगिरितरु अकासकपिधावहिँ।
देखहिँ तेहि न दुखित फिरि आवहिँ।
अवघट घाट बाट गिरि कंदर।
मायाबल कीन्हेसि सरपंजर।
जाहिँ कहाँ भये ब्याकुल बंदर।
सुरपति बंदि परे जनु मंदर।

'धरा, धरा, मारा' असा एकच ध्वनि कानांवर येत असे. परंतु कोण कोणास मारीत आहे हें कोणीच जाणत नव्हतें. वानरगण वृक्ष आणि पर्वत घेऊन आकाशांत उड्डाण करीत, परंतु तो (मायावी) मेघनाद दिसेनासा होई. त्यामुळें त्यांना निराश होऊन परत फिरावें लागे. त्या राक्षसानें मायाबलें-करून अवघड घाट, मार्ग, गिरी, कंदर इत्यादि ठिकाणीं बाणांचीं केवळ जाळींच पसरून ठेविलीं. जेथें जेथें वानर जात तेथें तेथें जणुंकाय इंद्राच्या बंदिवासांत पडलेल्या मंदरसानुप्रमाणें ते व्याकुळ होत.

मारुतसुत अंगद नल नीला।
कीन्हेसि बिकल सकल बलसीला।
पुनि लछिमन सुग्रीवँ बिभीषन।
सरन्हि मारि कीन्हेसि जर्जरतन।
पुनि रघुपति सन जूझइ लागा।
सर छाडइ होइ लागहिँ नागा।

मारुति, अंगद, नलनील इत्यादि बलाढ्य वीर मेघनादानें मूर्च्छित केले, व पुन्हा लक्ष्मण, सुग्रीव, आणि बिभीषण यांचेवर बाण टाकून त्यांना जर्जर करून सोडलें. तसेंच तो रघुपतीशींहि झुंजूं लागला. तो जे बाण सोडी ते सर्प होऊन त्यांना लागत.

ब्याल--पास--बस भयउ खरारी।
स्वबस अनंत एक अबिकारी।
नट इव कपटचरित कर नाना।
सदा स्वतंत्र एक भगवाना।
रनसोभा लगि प्रभुहिँ बँधावा।
देखि दसा देवन्ह भय पावा।

स्वतंत्र, अनंत, अद्वितीय आणि निर्विकार अशा खरशत्रूनीं स्वतःला नागपाशांनीं बद्ध करून घेतलें. भगवान् रामचंद्र हे सदास्वतंत्र आणि अद्वितीय असूनहि नटाप्रमाणें अनेक प्रकारें मायालाघव करूं लागले. रणशोभेसाठीं त्यांनीं स्वतःला बांधून घेतलें. ती त्यांची दशा पाहून देव भयभीत झाले.

**दो०—गिरिजा जासु नाम जपि मुनि काटहिँ भवपास। सो कि बंध तर आवइ ब्यापक बिस्वनिवास॥ ८७॥**

(शंकर ह्मणतात) हे पार्वति! ज्याच्या नाम-जपेंकरून नर भवपाशाचें निकृंतन करितो तो व्यापक विश्वनिवास प्रभु खरोखर बद्ध होणें शक्य आहे काय?

चौ०—चरित राम के सगुन भवानी।
तरकि न जाहिँ बुद्धि बल बानी।
अस बिचारि जे तज्ञ बिरागी।
रामहिँ भजहिँ तर्क सब त्यागी।

हे पार्वति! रामचंद्राचें हें सगुणचरित्र बुद्धि, बल, आणि वाणी यांना अतर्क्य आहे, असा विचार करून जे विरक्त आणि तज्ज्ञ आहेत ते सर्व कुतर्कांचा त्याग करून रामाचीच भक्ति करितात.

ब्याकुल कटक कीन्ह घननादा।
पुनि भा प्रगट कहइ दुर्बादा।
जामवंत कह खल रहु ठाढा।
सुनि करि ताहि क्रोध अति बाढा।

मेघनादानें सर्व वानरसैन्य मूर्च्छित केल्यावर तो पृथ्वीवर प्रगट होऊन पुन्हां अद्वातद्वा बरळत सुटला तेव्हां जांबवंत ह्मणाला, "अरे चोरा! उभा रहा." हें ऐकतांच मेघनाद अधिकच कडकला.

बूढ जानि सठ छाडेउँ तोही।
लागेसि अधम प्रचारइ मोही।
अस कहि तीव्र त्रिसूल चलावा।
जामवंत सो कर गहि धावा।

(मेघनाद म्हणाला.) रे शठा! तूं बुड्ढा म्हणून तुझी मी गय केली. परंतु कृतघ्ना! तूंदेखील मला पाचारूं लागलास काय? असें ह्मणून त्यानें जांबवंतावर एक तीक्ष्ण त्रिशूल भिरकाविला; परंतु तोच त्रिशूल हातानें झेलून जांबवंत उलट त्याजवर तुटून पडला.

मारेसि मेघनाद कै छाती।
परा धरनि घुर्मित सुरघाती।
पुनि रिसान गहि चरन फिरावा।
महि पछारि निज बल देखरावा।
बरप्रसाद सो मरइ न मारा।
तब गहि पद लंका पर डारा।

जांबवंतानें तो त्रिशूल मेघनादाच्या छातीवर हाणतांच तो देवशत्रु पृथ्वीवर घेरी येऊन पडला. नंतर पुन्हां जांबवंतानें क्रुद्ध होऊन त्यास तंगडी धरून गरगर फिरवून जमिनीवर आदळलें, अशा रीतीनें मेघनादाला आपल्या (ज्ञातारपणाच्या) बलाची चुणुक दाखविली. तथापि तो मेदनाद वरप्रसादामुळें मारतां मरेना. तेव्हां त्याची तंगडी धरून जांबवंतानें त्यास लंकेच्या किल्ल्यावर भिरकावून दिला.

इहाँ देवरिषि गरुड पठावा।
रामसमीप सपदि सो आवा।

इकडे देवर्षि नारदांनीं गरुडास पाठविलें व त्याप्रमाणें तो तत्काल रामचंद्राजवळ आला.

**दो०—खगपति सब धरि खाये माया-नाग-बरूथ। माया बिगत भये सब हरषे बानरजूथ॥ ८८॥**

गरुडानें मायानिर्मित सर्पांचें सर्व भेंडोळें उकलून न्याहारी केली. राम मायेपासून मुक्त झाले व सर्व वानरमंडळींना हर्ष झाला.

**दो०—गहि गिरि पादप उपल नख धाये कीस रिसाइ। चले तमीचर बिकलतर गढ पर चढे पराइ॥ ८९॥**

वानरगण आपापलीं नखें व वृक्ष, पर्वत, शिला घेऊन आवेशानें धांवले. सर्व राक्षस अधिकच भयभीत होऊन धांवत धांवत जाऊन किल्ल्यांत लपले.

चौ०—मेघनाद कै मुरछा जागी।
पितहि बिलोकि लाज अतिलागी।
तुरत गयेउ गिरि-बर-कंदरा।
करउँ अजय मख अस मन धरा।

मेघनादाची मूर्च्छा जाऊन तो सावध झाला, आणि आपल्या पित्यास पाहून फारच ओशाळला. नंतर 'विजययज्ञ' करावा असें मनांत योजून त्यानें तत्काल गिरिकंदराची वाट धरिली.

इहाँ बिभीषन मंत्र बिचारा।
सुनहु नाथ बल अतुल उदारा।
मेघनाद मख करइ अपावन।
खल मायाबी देवसतावन।
जौँ प्रभु सिद्ध होइ सो पाइहि।
नाथ बेगि पुनि जीति न जाइहि।

इकडे बिभीषण विचार करून रामचंद्राला म्हणाला, हे अतुलबलवान् उदारचरित प्रभो! हा दुष्ट, मायावी, देवपीडक मेघनाद अभिचार यज्ञाचें अनुष्ठान करीत आहे. तेव्हां हे प्रभो! जर तो यज्ञ सिद्धीस जाईल तर, हे स्वामिन्! तो अजिंक्य होईल.

सुनि रघुपति अतिसयसुख माना।
बोले अंगदादि कपि नाना।
लछिमन संग जाहु सब भाई।
करहु बिधंस जज्ञ कर जाई।
तुम्ह लछिमन मारेहु रन ओही।
देखि सभय सुर दुख अति मोही।
मारेहु तेहि बल बुद्धि उपाई।
जेहि छीजइ निसिचर सुनु भाई।
जामवंत सुग्रीवँ बिभीषन।
सेन समेत रहेहु तीनिउँ जन।

तें ऐकतांच रामास फार समाधान वाटलें. त्यांनीं फरमाविलें—अंगदप्रभृति वीरांनो! तुम्ही सर्व लक्ष्मणाच्या तैनात राहून यज्ञाचा सत्यानास करा. बा लक्ष्मणा! या भिडाईत मात्र मेघनादाचा मुडदा पाडल्याखेरीज राहूं नकोस. देव दुःखानें कुडकुडलेले पाहून मी फारच बेचैन आहे समज. भय्या रे! जेणें-करून हे बेटे राक्षस मुरून जातील अशाच तऱ्हेनें शक्ति आणि युक्ति खर्चून त्या मेंध्यास माती चार. जांबवंत—सुग्रीव—बिभीषण हो! तुम्हां तिघांना देखील आपापल्या फौजेनिशीं बिलकुल तयारींत असलें पाहिजे, समजलांत.

जब रघुबीर दीन्हि अनुसासन।
कटि निषंग कसि साजि सरासन।
प्रभुप्रताप उर धरि रनधीरा।
बोले घन इव गिरा गँभीरा।
जौँ तेहि आजु बधे बिनु आवउँ।
तौ रघु-पति-सेवक न कहावउँ।
जौँ सत संकर करहिँ सहाई।
तदपि हतउँ रघु-बीर-दोहाई।

ह्याप्रमाणें रघुवीरांनीं आज्ञा देतांच कमरेस भाते खोवून, धनुष्य सज्ज करून आणि प्रभुप्रतापाचें हृदयांत स्मरण करून तो रणरंगधीर लक्ष्मण मेघासारख्या गंभीर वाणीनें म्हणाला, जर मी आज इंद्रजिताची इतिश्री केल्याखेरीज रणांगणांतून परत फिरेन तर मी स्वतःला रघुपतींचा पाईकच म्हणविणार नाहीं. मी माझ्या धन्याचीच आण वाहून सांगतों कीं जरी शेंकडो शंकर त्याच्या दिमतीस आले तरी मी आज त्याची गडदखास भरणार.

**दो०—रघु-पति-चरन नाइ सिर चलेउ तुरंत अनंत । अंगद नील मयंद नल संग सुभट हनुमंत ॥ ९० ॥**

असा बेलभंडार केल्यावर श्रीरामचंद्राच्या चरणीं मस्तक नमवून तो शेषावतार लक्ष्मण तत्काळ निघाला व त्याचेबरोबर अंगद, नील, मयंद, हनुमंत इत्यादि वेचके वीरहि निघाले.

चौ०—जाइ कपिन्ह सो देखा बैसा ।
आहुति देत रुधिर अरु भैंसा ।
कीन्ह कपिन्ह सब जग्य बिधंसा ।
जब न उठइ तब करहिं प्रसंसा ।
तदपि न उठइ धरेन्हि कच जाई ।
लातन्हि हति हति चले पराई ।

कपी जाऊन पाहतात तों मेघनाद रक्तमांसांची आहुति देत बसलेला होता. तें पाहून कपींनीं सर्व यज्ञाचा चुथडा उडविला तरीदेखील मेघनाद उठला नाहीं. तेव्हां त्यांनीं त्याची तारीफ आरंभिली. परंतु इतकेंहि करून तो उठेचना. तेव्हां कपींनीं जाऊन त्याची शेंडी हिसडली आणि लाथाबुक्यांनीं त्याची कणिक तिंबली. इतकें करून ते पळून गेले आहेत तों—

लेइ त्रिसूल धावा कपि भागे ।
आये जहँ रामानुज आगे ।
आवा परम क्रोध कर मारा ।
गर्ज घोररव बारहिं बारा ।
कोपि मरुतसुत अंगद धाये ।
हति त्रिसूल उर धरनि गिराये ।
प्रभु कहँ छाडेसि सूल प्रचंडा ।
सर हति कृत अनंत जुग खंडा ।

मेघनाद त्रिशूल घेऊन धांवला. वानर पळत पळत लक्ष्मणाजवळ आले. मेघनादानें येऊन अतिशय क्रोधानें त्रिशूल भिरकावला आणि तो सारख्या भयंकर गर्जना करूं लागला. हनुमान् व अंगद हेहि सणसणून धावले; परंतु इंद्रजितानें त्यांचे उरांत त्रिशूल हाणून त्यांना मूर्च्छित पाडलें. नंतर त्यानें प्रभु लक्ष्मणावरहि प्रचंड शूल फेकला. लक्ष्मणानें आपल्या बाणानें त्याचे दोन तुकडे केले.

उठि बहोरि मारुति जुबराजा ।
हतहिं कोपि तेहि घाउ न बाजा ।
फिरे बीर रिपु मरइ न मारा ।
तब धावा करि घोर चिकारा ।

अंगद आणि मारुति मूर्च्छा सावरून पुन्हां उठले व इंद्रजितास त्वेषानें झोडूं लागले. परंतु तो त्यांच्या झोंडगिरीस बाज आला नाहीं. शेवटीं इंद्रजित मारतां मरेनासा पाहून वानरवीर परत फिरले. तेव्हां मेघनाद घोर गर्जना करीत त्यांचेवर उलटला.

आवत देखि क्रुद्ध जनु काला ।
लछिमन छाडे बिसिख कराला ।
देखेसि आवत पविसम बाना ।
तुरत भयउ खल अंतरधाना ।
बिबिध बेष धरि करइ लराई ।
कबहुँ क प्रगट कबहुँ दुरि जाई ।

मेघनाद जणुंकाय काळाप्रमाणें तावातावानें येत आहे असें पाहतांच लक्ष्मणानें त्याजवर प्रखर बाण सोडले. ते वज्रासारखे येणारे बाण पाहतांच तो द्वाड ( मेघनाद ) तत्काळ अदृश्य होऊन व बदलत्या रूपांनीं चोरटा लढा लढूं लागला. केव्हां केव्हां तो प्रगट होई व केव्हां केव्हां गुप्त होई.

देखि अजय रिपु डरपे कीसा ।
परम क्रुद्ध तब भयउ अहीसा ।
एहि पापिहिं मैं बहुत खेलावा ।
लछिमन मन अस मंत्र दृढावा ।
सुमिरि कोसला-धीस-प्रतापा ।
सरसंधान कीन्हि करि दापा ।
छांडउ बान माँझ उर लागा ।
मरती बार कपट सब त्यागा ।

गनीम भारीच निब्बर वाटून वानर घाईस आले तेव्हां लक्ष्मण अत्यंत क्रोधाविष्ट झाला. त्यानें मनांत असा पक्का निश्चय केला कीं, आतांपर्यंत या पाप्याला आपण खेळविलें इतकेंच पुरें ( आतां मात्र याचा वध लवकर करणेंच उचित ). नंतर लक्ष्मणानें श्रीरामचंद्राच्या प्रतापाचें स्मरण करून त्वेषानें

अनुसंधान करून बाण सोडतांच तो मेघनादाच्या छातींत जाऊन घुसला. शेवटीं मरतेवेळीं मात्र मेघनादानें सर्व कपटांचा त्याग केला.

**दो०–रामानुज कहँ राम कहँ अस-कहि छाडेसि प्रान। धन्य धन्य तव जननी कह अंगद हनुमान॥ ९१॥**

' रामचंद्र कोठें आहेत, लक्ष्मण कोठें आहेत ' असें म्हणत म्हणतच इंद्रजितानें प्राण सोडला. तेव्हां, "इंद्रजिता! धन्य धन्य तुझी माता "! असें अंगद आणि हनुमान् यांनीं उद्गार काढले.

चौ०–बिनु प्रयास हनुमंत उठावा।
लंकाद्वार राखि तेहि आवा।

हनुमंतानें त्यास सहज लीलेनें उचलून लंकेच्या द्वारीं नेऊन ठेविलें, व तो परत आला.

तासु मरन सुनि सुर गंधर्बा।
चढि बिमान आये नभ सर्बा।
बरषि सुमन दुंदुभी बजावहिँ।
श्री–रघु–बीर–बिमल–जस गावहिँ।
जय अनंत जय जगदाधारा।
तुम्ह प्रभु सब देवन्ह निस्तारा।

इंद्रजिताची मृत्युवार्ता ऐकून देवगंधर्वादिक सर्व विमानांत बसून आकाशांत गोळा झाले, आणि दुंदुभी वाजवून पुष्पवृष्टि करीत होत्साते रघुवीराचें विमल यश गाऊं लागले. ( ते लक्ष्मणाला उद्देशून म्हणाले, ) हे जगदाधारा अनंता! तुझा जयजयकार असो. समर्था! तूंच सर्व देवांची इज्जत बचावलीस.

अस्तुति करि सुर सिद्ध सिधाये।
लछिमन कृपासिंधु पहिँ आये।

अशाप्रकारें प्रशस्ति करून देव आणि सिद्ध चालते झाले. इकडे लक्ष्मण कृपासिंधु रामचंद्राकडे आला.

सुतबध सुना दसासन जबहीँ।
मुरछित भयउ परेउ महि तबहीँ।
मंदोदरी रुदन करि भारी।
उर ताडत बहु भाँति पुकारी।
नगर लोग सब ब्याकुल सोचा।
सकल कहहिँ दसकंधर पोचा।

पुत्रवधाची वार्ता ऐकतांच रावण मूर्च्छित होऊन धरणिवर गडबडला. मंदोदरी अनेकप्रकारें पुत्राचे गुण आठवून व छाती पिटून कळवळून रडूं लागली. लंकेंतील सर्व प्रजा शोकाविव्हल होऊन रावणाला हलकट, नीच वगैरे शिव्या देऊं लागल्या.

**दो०–तब दसकंठ बिबिध बिधि समुझाइ सब नारि। नस्वररूप जगत सब देखहु हृदय बिचारि॥ ९२॥**

तेव्हां सर्व स्त्रियांचें अनेकप्रकारें सांत्वन करून रावण म्हणाला, मनांत विचार करून पाहिलें असतां हें सर्व दृश्यच नश्वर आहे.

चौ०–तिन्हहिँ ग्यान उपदेसा रावन।
आपुन मंद कथा सुभ भावन।
परउपदेस कुसल बहुतेरे।
जे आचरहिँ ते नर न घनेरे।

रावण आपल्या स्त्रियांना ब्रह्मज्ञान सांगूं लागला. त्याच्या गोष्टी खऱ्याच चांगल्या होत्या, परंतु तो स्वतः मात्र कोरा होता. प्रायः सर्वच लोक परोपदेशाच्या कामीं पंडित असतात, परंतु कृती करून दाखविणारा अगदींच विरळ आढळतो.

निसा सिरानि भयउ बिनुसारा।
लगे भालु कपि चारिहुँ द्वारा।
सुभट बोलाइ दसानन बोला।
रनसनमुख जा कर मन डोला।
सो अबहीँ बरु जाउ पराई।
संजुगबिमुख भये न भलाई।
निज-भुज-बल मैं बैर बढावा।
देइहउँ उतरु जो रिपु चढि आवा।

रात्र संपून प्रभातकाल होतांच ऋक्षवानर चारीहि वेशींवर येऊन भडकले. तेव्हां रावण आपल्या निवडक योद्ध्यांस बोलावून म्हणाला कीं, रणांगणांत शत्रूच्या समोर ज्यांचें मन कच खात असेल त्यानें आतांच खुशाल आपला मार्ग सुधरावा. रणांगणांवर जाऊन मग परत फिरण्यांत कांहींच शोभा नाहीं. स्वतःच्या बाहुबलावरच मीं शत्रूशीं वैर वाढाविलें ज्याअर्थी शत्रु चाल करून आलाच आहे, त्याअर्थीं मलाच त्याला तोंड देणें भाग आहे.

अस कहि मरुतबेग रथ साजा।
बाजे सकल जुझाऊ बाजा।
चले बीर सब अतुलित बली।
जनु कज्जल कै आँधी चली।
असगुन अमित होहिँ तेहि काला।
गनइ न भुजबल गर्ब बिसाला।

असें म्हणून त्यानें आपला वायूप्रमाणें वेगवान् रथ सिद्ध केला. सर्वत्र रणवाद्यांचा घडघडाट झाला, काजळाचें वावटळ सुटल्याप्रमाणें सर्व तुफान राक्षस-वीर त्याच्यामागून निघाले. त्या वेळीं त्यास खंडोगणती अपशकुन होऊं लागले. परंतु आपल्या बाहुबलाच्या अतोनात दर्पामुळें तो बिलकूल बेतमा राहिला.

छंद—अतिगर्व गनइ न सगुन असगुन स्रवहिँ आयुध हाथ तेँ । भट गिरत रथ तेँ बाजि गज चिक्करत भागहिँ साथ तेँ । गोमायु गीध कराल खर-रव स्वान रोवहिँ अति घने । जनु कालदूत उलूक बोलहिँ बचन परम-भयावने ॥ ४ ॥

राक्षसांच्या हातांतून आयुधें गळूं लागलीं. ते राक्षसवीर रथांतून घसरूं लागले. हत्ती, घोडे, चीत्कार करीत महात व स्वार ह्यांच्यासकट बेफाम उधळूं लागले. लांडगे, गृध्र आणि गर्दभ कर्कशस्वरानें ओरडूं लागले. श्वान मुक्तकंठ रडूं लागले. उलूक दिवसां शब्द करूं लागले. जणुं काय ते मृत्यूचे दूतच रावणास भयंकर रीतीनें पाचारीत होते. तरीदेखील रावण आपल्या गर्वपणांत चूर असल्यामुळें शकुन-अपशकुनांना भीकच घालीना.

दो०—ताहि कि संपति सगुन सुभ सपनेहुँ मन बिस्राम । भूत-द्रोह-रत मोहबस रामबिमुख रतकाम ॥ ९३ ॥

हिंसापरायण, कामलंपट मोहग्रस्त आणि राम-विद्रोही यांच्या वांट्याला शुभशकुनांचें वैभव येईल काय ? स्वप्नांत तरी त्यांच्या चित्तास शांति वरेल काय ?

चौ०—चलेउ निसा-चर-कटक अपारा ।
चतुरंगिनी अनी बहुधारा ।
बिबिध भाँति बाहन रथ जाना ।
बिपुल बरन पताक ध्वज नाना ।

अपार राक्षससैन्य चालूं लागलें. तें चतुरंग असून त्यांत अनेक पथकें होतीं. त्यांत तऱ्हेतऱ्हेचीं वाहनें, रथ आणि यानें असून रंगारंगाच्या पताका व ध्वज विपुल होते.

चले मत्त गजजूथ घनेरे ।
प्राबिट–जल–द मरुत जनु प्रेरे ।
बरन बरन बिरदैत निकाया ।
समरसूर जानहिँ बहु माया ।
अति बिचित्र बाहनी बिराजी ।
बीर बसंत सेन जनु साजी ।

वायुप्रेरित वर्षाकालीन मेघाप्रमाणें मत्तगजांचे थवेचे थवे चालूं लागले. समरशूर आणि गनीमी काव्यांत तरबेज, असे नानावर्णांचे दैत्यवीरांचे समुदाय निघाले. अशा प्रकारें अत्यंत विचित्र अशी ती सेना सज्ज झाली. जणुंकाय वसंतवीरानेंच तीं सज्ज केली आहे असें वाटे.

चलत कटकु दिगसिंधुर डगहीँ ।
छुभित पयोधि कुधर डगमगहीँ ।
उठी रेनु रबि गयउ छपाई ।
पवन थाकित बसुधा अकुलाई ।
पनव निसान घोररव बाजहिँ ।
प्रलयसमय के घन जनु गाजहिँ ।
भेरि नफीर बाज सहनाई ।
मारू राग सुभट सुखदाई ।
केहरिनाद बीर सब करहीँ ।
निज निज बल पौरुष उच्चरहीँ ।

सैन्य चालूं लागलें असतां त्याच्या भारानें दिग्गज डोलूं लागले, सागर क्षुब्ध झाला आणि पर्वत डळमळूं लागले. धुळीनें सूर्य आच्छादित झाला. वायु स्तंभित होऊन पृथ्वी व्याकुळ झाली. प्रलयकालच्या मेघा-प्रमाणें पणवनिषाणादि रणवाद्यांचा कडकडाट होऊं लागला. भेरी, नफेरी, सनई इत्यादि वाद्यांतून वीरांना प्रोत्साहन देणाऱ्या सुंदर रागरागिण्या निनादूं लागल्या. सर्व वीर सिंहनाद करून आपापल्या बलाची आणि पौरुषाची तारीफ करूं लागले.

कहइ दसानन सुनहु सुभट्टा ।
मर्दहु भालु कपिन्ह के ठट्टा ।
हौँ मारिहउँ भूप दोउ भाई ।
अस कहि सनमुख फौज रेँगाई ।

रावण म्हणाला, हे शूर वीर हो ! ऐका. ऋक्षवा-नरांच्या समुदायांचा तुम्ही फन्ना उडवा, आणि मी ह्या उभय राजकुमारांचा निकाल लावितों. असें म्हणून रावणानें आपली तुकडी आघाडीवर घातली.

यह सुधि सकल कपिन्ह जब पाई ।
धाये करि रघु-बीर-दोहाई ।

ही बातमी कपींस समजतांच ते सर्व रघुवीराचा जयघोष करून धांवत सुटले.

छंद०–धाये बिसाल कराल मरकट भालु कालसमान ते। मानहुँ सपच्छ उडाहिँ भूधरबृंद नाना बान ते॥ नख–दसन-सैल-महाद्रुमायुध सबल संक न मानहीँ। जय राम रावन-मत्त-गज-मृग-राज सुजस बखानहीँ॥ ५॥

काळाप्रमाण धिप्पाड आणि भयंकर असे ऋक्ष-वानर रामचंद्राचा जयजयकार करीत धांवत सुटले. तेव्हां नानावर्णांचे ते जणुंकाय सपक्ष पर्वतांचे समुदायच लोटत आहेत असें भासूं लागलें. नखें, दंत, पर्वत आणि विशाल वृक्ष हींच त्यांचीं आयुधें होतीं. ते कट्टर असून बेडरहि होते. रावणरूप मत्तगजाला सिंहरूप असणाऱ्या रामचंद्राच्या पुण्यपावन यशाचें वर्णन करून त्यांच्या नामाचा ते जयघोष करीत असत.

दो०–दुहुँ दिसि जय जय कार करि निज निज जोरी जानि। भिरे बीर इत रघुपतिहिँ उत रावनहिँ बखानि॥ ९४॥

आपापल्या जोडीचा प्रतिपक्षी पाहून दोहोंतर्फेचे वीर एकीकडे रामाची व दुसरीकडे रावणाची प्रशंसा व जयजयकार करीत एकमेकांवर चालून गेले.

चौ०–रावन रथी बिरथ रघुबीरा।
देखि बिभीखन भयउ अधीरा।
अधिकप्रीति मन भा संदेहा।
बंदि चरन कह सहित सनेहा।
नाथ न रथ नहिँ पद पदत्राना।
केहि बिधि जितब बीर बलवाना।

रावण रथारूढ आणि रघुवीर रथहीन पाहून बिभीषणास फार फिकिर वाटली. श्रीरामावर असलेल्या प्रेमाधिक्यामुळें बिभीषणाच्या हृदयांत संदेह उत्पन्न झाला. तो प्रेमानें त्यांचें चरणवंदन करून म्हणाला, हे नाथ! आपणाला बसण्याला रथ नाहीं, व पायांत पदत्राणहि नाहीं, तेव्हां या बलाढ्य वीराला आपण कसें जिंकणार?

सुनहु सखा कह कृपानिधाना।
जेहि जय होइ सो स्यंदन आना।

हें ऐकून कृपासागर रघुवीर म्हणाले, मित्रा! ऐक. ज्याच्या योगानें जयप्राप्ति होते तो रथ एक निराळाच आहे.

सौरज धीरज तेहि रथ चाका।
सत्य सील दृढ ध्वजा पताका।
बल बिबेक दम परहित घोरे।
छमा कृपा समता रजु जोरे।
ईसभजन सारथी सुजाना।
बिरति चर्म संतोष कृपाना।
दान परसु बुधि सक्ति प्रचंडा।
बर बिज्ञान कठिन कोदंडा।
अमल अचल मन त्रोनसमाना।
सम जम नियम सिलीमुख नाना।
कवच अभेद बिप्र-गुरु-पूजा।
एहि सम बिजयउपाय न दूजा।
सखा धर्ममय अस रथ जा के।
जीतन कहँ न कतहुँ रिपु ता के।

शौर्य व धैर्य हीं त्या रथाचीं चक्रें असून सत्य व शील ह्या त्यावरील अभेद्य ध्वजपताका होत. बल, विवेक, दम आणि परोपकार हे चार अश्व, क्षमा, दया आणि समता ह्या रज्जूंनीं त्यास जोडले जातात. परमेश्वरभक्ति हा त्यावरील कुशल सारथि असून वैराग्य ही ढाल असते. संतोष हेंच खड्ग, दान हाच परशु, बुद्धि हीच प्रचंड शक्ति, श्रेष्ठ विज्ञान हेंच कठिण धनुष्य, निर्मल आणि निश्चल मन हाच भाता, संयम आणि नियम हेच नानाप्रकारचे बाण, आणि विप्रगुरुपूजा हें अभेद्य कवच असतें. या रथासारखा विजयोपाय दुसरा नाहींच. मित्रा! ज्याचा असा धर्मरूप रथ आहे त्याला जिंकणारा शत्रु कोठेंच नाहीं.

दो०–महा अजय संसाररिपु जीति सकइ सो बीर। जा के अस रथ होइ दृढ सुनहु सखा मति धीर॥ ९५॥

ज्याचा रथ अशाप्रकारें सुसज्ज आहे तोच खरा गाजी होय, आणि तोच महादुर्धर्ष अशा या संसाररूप शत्रूस जिंकूं शकतो. मित्रा! हें लक्षांत ठेवून चित्त स्वस्थ असूं दे.

दो०–सुनत प्रभुबचन बिभीषन हरषि गहे पदकंज। एहि मिस मोहि उपदेसेहु रामकृपा सुखपुंज॥ ९६॥

१ 'उपदेसेहु' शब्दावरून तुलसीदासांच्या मतानें बिभीषणाचें अध्यात्मगुरु राम ठरूं पाहतात असें वाटतें.

प्रभूंचें तें भाषण ऐकून बिभीषणानें हर्षित होऊन रामचंद्राच्या पदकमलांवर लोटांगण घातलें. तो म्हणाला, सुखनिधान रामचंद्रांनीं कृपा करून ह्या मिषानें मला ज्ञानोपदेशच केला.

दो०–उत प्रचार दसकंधर इत अंगद हनुमान। लरत निसाचर भालु कपि करि निज निज प्रभुआन ॥ ९७ ॥

तिकडे रावण आणि इकडे हनुमंत व अंगद आपापल्या वीरांना प्रोत्साहन देऊं लागले. उभय पक्षींचे वीर आपापल्या प्रभूची शपथ घेऊन रण माजवूं लागले.

चौ०–सुर ब्रह्मादि सिद्ध मुनि नाना।
देखत रन नभ चढे बिमाना।
हमहूँ उमा रहे तेहि संगा।
देखत राम-चरित-रन-रंगा।

ब्रह्मादि देव, सिद्ध, मुनी इत्यादि मंडळी विमानांत बसून आकाशांत तो युद्धप्रसंग पाहूं लागली. शंकर म्हणतात, हे पार्वति! त्या गर्दींत मीहि रामाची रणरंगलीला पाहण्यास होतों.

सुभट समर रस दुहुँ दिसि माँते।
कपि जयसील रामबल ताते।
एक एक सन भिरहिँ प्रचारहिँ।
एकन्ह एक मर्दि महि पारहिँ।
मारहिँ काटहिँ धरहिँ पछारहिँ।
सीस तोरि सीसन्ह सन मारहिँ।
उदर बिदारहिँ भुजा उपारहिँ।
गहि पद अवनि पटकि भट डारहिँ।

दोन्ही बाजूंकडील मोठमोठाले वीर वीरश्रीनें धुंद झाले. परंतु वानरांना श्रीरामचंद्राचा आश्रय असल्यामुळें ते यशस्वी होत. वीर एकमेकांना आव्हान करून युद्ध करीत व एकमेकांना झोडून भूमीवर आदळीत. चावणें, धरणें, आपटणें, मारणें, डोकें तोडणें व पुन्हां त्याच डोक्यानें मारणें, पोट फाडणें, हात उपटणें, तंगडी धरून जमिनीवर आदळणें वगैरे प्रकारचा तोबा वीर उडवूं लागले.

निसिचर भट महि गाडहिँ भालू।
ऊपर डारि देहिँ बहु बालू।
बीर बलीमुख जुद्ध बिरुद्धे।
देखिअत बिपुल काल जनु क्रुद्धे।

ऋक्ष राक्षसवीरांना जामिनींत पुरून वर पुष्कळशी वाळू टाकीत. वानरवीर युद्धांत इतके चवताळलेले दिसत कीं जणुंकाय ते क्रुद्ध झालेले काळच भासत.

छंद–क्रुद्धे कृतांत समान कपितनु स्रवत सोनित राजहीँ। मर्दहिँ निसाचर कटक भट बलवंत घन जिमि गाजहीँ॥ मारहिँ चपेटन्हि डाँटि दातन्ह काटि लातन्ह मीँजहीँ। चिक्करहिँ मरकट भालु छल बल करहिँ जेहि खल छीजहीँ॥ ६ ॥

अंगांतून रक्ताचे पाट चालले असतां ते चवताळलेले वानरवीर कर्दनकाळाप्रमाणें भासूं लागले. ते बलाढ्य वीर राक्षससैन्यास घोळसून मेघाप्रमाणें गर्जना करीत. चपेटे मारणें, दातांनीं चावणें, लाथांनीं तुडाविणें, चिक्कार करणें इत्यादि चेष्टा ऋक्ष-वानर सिताफीनें आणि चालाखीनें करीत असत. त्यामुळें राक्षससैन्य अगदीं थिजत चाललें.

धरि गाल फारहिँ उर विदारहिँ गल अँतावरि मेलहीँ। प्रहलादपति जनु विविध तनु धरि समरअंगन खेलहीँ। धरु मारु काटु पछारु घोर गिरा गगन महि भरि रही। जय राम जो तृन तेँ कुलिस कर कुलिस तेँ तृन कर सही॥७॥

ते राक्षसांना धरून त्यांचे गाल फाडीत, व त्यांचें पोट फाडून त्यांच्या आंतड्यांच्या माळा आपल्या गळ्यांत घालीत. तेव्हां असें वाटे कीं जणुंकाय प्रल्हादपति भगवान् नृसिंहच इतके देह धारण करून समरांगणांत क्रीडा करीत आहेत. धरा, मारा, कापा, आपटा, हेच शब्द अधोर्ध्व वातावरणांत दुमदुमून गेले. जो तृणाचें वज्र आणि वज्राचें तृण सहज करूं शकतो त्या श्रीरामाचा जयजयकार असो.

दो०–निज दल बिचलत देखेसि बीस भुजा दस चाप। रथ चढि चलेउ दसानन फिरहु फिरहु करि दाप ॥ ९८ ॥

आपली नामोहरम झालेली पलटण पाहून आपल्या वीस हातांत दहा धनुष्यें घेऊन रावण रथांत बसून निघाला व मोठ्या आढ्यतेनें 'परत

फिरा, वापस व्हा' म्हणून आपल्या सेनेस फरमावूं लागला.

चौ०—धायेउ परम क्रुद्ध दशकंधर।
सनमुख चले हूह देइ बंदर।
गाहि कर पादप उपल पहारा।
डारेन्हि ता पर एकहिँ बारा।

रावण भयंकर त्वेषानें धावला. तेव्हां वानरवीर हू हा करीत त्याच्या तोंडावर गेले. त्यांनीं हातांत वृक्ष, शिला, पर्वत घेऊन रावणावर त्यांचा एकसमयावच्छेदेंकरून वर्षाव केला.

लागहिँ सैल बज्रतनु तासू।
खंड खंड होइ फूटहिँ आसू।
चला न अचल रहा रथ रोपी।
रनदुर्मद रावन अतिकोपी।
इत उत झपटि दपटि कपिजोधा।
मर्दइ लाग भयेउ अतिक्रोधा।

ते पर्वत रावणाच्या वज्रदेहाला लागत आणि तत्काळ त्यांचे फुटून तुकडे होत. रावण आपला महारथ स्थिर करून स्वतःहि निश्चळ राहिला. नंतर तो रणमदोन्मत्त रावण अत्यंत क्रुद्ध होऊन कपिवीरांना ठिकठिकाणीं चेपून चिरडून टाकूं लागला. त्याचा क्रोध अनावर होऊन त्यानें धुमश्चक्री आरंभिली.

चले पराइ भालु कपि नाना।
त्राहि त्राहि अंगद हनुमाना।
पाहि पाहि रघुबीर गोसाईँ।
यह खल खाइ काल की नाईं।

तेव्हां असंख्य ऋक्षवानर पळत सुटले व बोंबलूं लागले कीं, हे अंगदहनुमंत हो! आतां आमचे तुम्हीच कैवारी. हे रघुवीर स्वामिन्! आम्हांस ह्यापासून सोडवा. हा दुरात्मा आमची काळाप्रमाणें काकडी करणार.

तेहि देखे कपि सकल पराने।
दसहुँ चाप सायक संधाने।

सर्व कपींची दाणादाण पाहून रावणानें हातांतील दहाहि चापांवर शरसंधान केलें.

छंद०—संधानि धनु सरनिकर छाडेसि उरग जिमि उडि लागहीँ। रहे पूरि सर धरनी गगन दिसि बिदिसि कहँ कपि भागहीँ। भयो अति कोलाहल बिकल कपि दल भालु बोलहिँ आतुरे। रघुबीर करुनासिंधु आरतबंधु जनरच्छक हरे॥ ८॥

धनुष्यावर शरसंधान करून तो रावण बाणांच्या सरीवर सरी सोडूं लागला. ते बाण सर्पाप्रमाणें आकाशांत उड्या घेऊं लागले. पृथ्वी, आकाश, दिशा आणि विदिशा बाणांनीं व्याप्त झाल्या. अशा स्थितींत वानरांस पळण्यास जागाच कोणती? तेव्हां, या भयंकर दंगलीमुळें ऋक्षवानरसैन्य दहशत खाऊन दीनपणें मरगळीस आल्यामुळें बोंबा मारूं लागलें कीं, हे दयासिंधो! आर्तबंधो! भक्तपालका! रघुनायका! या संकटांत आमचा खरा वाली एक तूंच.

दो०—निजदल बिकल देखि कटि कसि निषंग धनु हाथ। लछिमनु चले सक्रुद्ध होइ नाइ रामपद माथ॥ ९९॥

स्वतःची फौज बेहाळ पाहतांच तडक कमरेस भाते कसून आणि हातांत धनुष्य घेऊन लक्ष्मण क्रोधयुक्त होत्साता रामचरणीं मस्तक ठेवून निघाला.

चौ०—रे खल का मारसि कपि भालू।
मोहि बिलोकु तोर मैँ कालू।
खोजत रहेउँ तोहि सुतघाती।
आजु निपाति जुडावउँ छाती।

(लक्ष्मण म्हणाला) रे दुष्टा! बिचाऱ्या ऋक्षवानरांच्या कां पाठीस पडतोस? इकडे मजकडे पहा! मी तुझा काळ तुझ्यासमोर उभा आहे. (हें ऐकून रावण म्हणाला) हे मत्पुत्रघातक्या! मी तुलाच तर शोधीत होतों. आज तुला रणांगणावर लोळवून मी आपलें अंतःकरण निववणार.

अस कहि छाडेसि बान प्रचंडा।
लछिमन किये सकल सतखंडा।
कोटिन्ह आयुध रावन डारे।
तिल प्रवान करि काटि निवारे।

असें म्हणत रावणानें लक्ष्मणावर प्रचंड बाणांचा धुवाधार पाऊस पाडला, परंतु लक्ष्मणानें त्या सर्व बाणांचे शतशः तुकडे केले. रावणानें त्याचेवर कोट्यवधी आयुधें टाकलीं, तथापि लक्ष्मणानें त्या सर्वांचेहि तिळाएवढे तुकडे करून पाडले.

पुनि निज बानन्ह कीन्ह प्रहारा।
स्यंदन भंजि सारथी मारा।

सत सत सर मारे दस भाला ।
गिरि स्रिंगन्ह जनु प्रबिसहिँ व्याला ।

नंतर लक्ष्मणानें आपल्या बाणांचा प्रहार करून रावणाचा रथ चूर करून त्याचा सारथी मारला व त्याच्या प्रत्येक कपाळावर शंभरशंभर बाण टाकले. ते पर्वतशृंगांत ज्याप्रमाणें सर्प शिरावे त्याप्रमाणें रावणाच्या कपाळांत शिरले.

सत सर पुनि मारा उर माहीँ ।
परेउ अवनितल सुधि कछु नाहीँ ।
उठा प्रबल पुनि मुरछा जागी ।
छाडेसि ब्रह्म दीन्हि जो साँगी ।

लक्ष्मणानें फिरून त्याच्या उरांत शंभर बाण खोवले. तेव्हां मात्र तो निश्चेष्ट होऊन पृथ्वीवर पडला. रावण फिरून शुद्धीवर येऊन उठला, व त्यानें अचाट ब्रह्मदत्त शक्ति लक्ष्मणावर उगारली.

**छंद०—सो ब्रह्मदत्त प्रचंडसक्ति अनंतउर लागी सही । पर्‍यौ बीर बिकल उठाव दसमुख अतुलबल महिमा रही ॥ ब्रह्मांड भुवन बिराज जा के एक सिर जिमि रजकनी । तेहि चह उठावन मूढ रावन जान नहिँ त्रि-भुवन-धनी ॥ ९ ॥**

ती तुफान ब्रह्मदत्त शक्ति वक्ष:स्थलीं लागतांच लक्ष्मण मूर्च्छित होऊन पडला. रावण त्या लक्ष्मणास उचलूं लागला, परंतु त्याचें अप्रतिम बल आणि पराक्रम जेथल्या तेथेंच जिरलें. ज्याच्या केवळ एकाच मस्तकावर ब्रह्मांडगोल एखाद्या रज:कणाप्रमाणें विराजित होत असतो त्या त्रिभुवनधन्याला न ओळखतां त्या उल्लू रावणानें उचलण्याची हाव धरावी ना !

**दो०—देखि पवनसुत धायउ बोलत बचन कठोर । आवत कपिहि हनेउ तेहि मुष्टिप्रहार प्रघोर ॥ १०० ॥**

तें पाहतांच हनुमंत धावला आणि रावणास निर्भर्त्सूं लागला. तो येतांच रावणानें त्याच्या उरांत खूपच जोराचा तडाखा मुष्टीनें हाणला.

चौ०—जानु टेकि कपि भूमि न गिरा ।
उठा सँभारि बहुत रिसभरा ।
मुठिका एक ताहि कपि मारा ।
परेउ सैल जनु बज्रप्रहारा ।
मुरछा गइ बहोरि सो जागा ।
कपिबल बिपुल सराहन लागा ।

हनुमंत जमिनीवर न पडतां गुडघे टेकून तसाच सावरून उठला; व त्यानेंहि अत्यंत क्रुद्ध होऊन रावणास उलट मुष्टिघात केला. त्यासरशीं रावण वज्रप्रहारानें पर्वत जसा उलथून पडावा तसा पडला. होषहवास आल्यावर रावण पुन्हां उठला व मारुतीच्या शक्तीची मुक्तकंठ तारीफ करूं लागला.

धिग धिग मम पौरुष धिग मोही ।
जौँ तैँ जियत उठेसि सुरद्रोही ।
अस कहि लछिमन कहँ कपिल्यायो ।
देखि दसानन बिस्मय पायो ।

ज्याअर्थी हे सुरद्वेष्ट्या ! तूं जीवंत उठलास त्याअर्थी माझ्या पौरुषाला धिक्कार असो ! असें म्हणून मारुतीनें लक्ष्मणास उचलून ( रामाकडे ) नेलें. तें पाहून रावण थक्कच झाला.

कह रघुबीर समुझु जिय भ्राता ।
तुम्ह कृतांतभच्छक सुरत्राता ।
सुनत बचन उठि बैठ कृपाला ।
गई गगन सो सक्ति कराला ।
पुनि कोदंडबान गहि धाये ।
रिपुसनमुख अतिआतुर आये ।

रघुवीर म्हणाले, " हे बंधो ! तूं कालभक्षक आणि सुररक्षक आहेस हें लक्षांत असूं दे. " दयाघनाचें तें वचन ऐकतांच लक्ष्मण उठून बसला व त्या दारुण शक्तीनें ब्रह्मलोकीं गमन केलें. फिरून तो हातांत चापबाण घेऊन धांवला, आणि अत्यंत आतुरतेनें शत्रूच्या समोर आला.

**छंद—आतुर बहोरि बिभंजि स्यंदन सूत हति ब्याकुल कियो । गिर्‍यौ धरनि दसकंधर बिकलतर बानसत बेध्यौ हियो । सारथी दूसर घालि रथ तेहि तुरत लंका लेइ गयो । रघु-बीर-बंधु प्रतापपुंज बहोरि प्रभुचरनन्हि नयो ॥१०॥**

त्यानें चपलतेनें रावणाच्या रथाचा पुन्हां चूर उडविला, व त्याच्या सारथ्यास प्रहार करून बेहोष पाडलें. त्यानें रावणाचें हृदय शंभर बाणांनीं वेधलें. त्यामुळें रावण गश खाऊन धरणीवर रिचवला. तेव्हां दुसऱ्या सारथ्यानें त्यास रथांत घालून तडक लंकेंत

नेलें. नंतर तो महापराक्रमी रघुवीरबंधु परतून रामचरणीं नम्र झाला.

**दो०—उहाँ दसानन जागि करि करइ लाग कछु जग्य । राम बिरोध बिजय चहत सठ हठबस अतिअग्य ॥ १०१ ॥**

तिकडे रावणानें मूर्च्छा सावरल्यानंतर विजयेच्छेनें एक यज्ञ आरंभिला. अत्यंत मूढ, दुरात्मा, दुराग्रही तो रावण रामाचा द्रोह करून म्हणे विजय चाहणार!

**चौ०—इहाँ बिभीषन सब सुधि पाई ।**
**सपदि जाइ रघुपतिहिँ सुनाई ।**
**नाथ करइ रावनु एक जागा ।**
**सिद्ध भये नहिँ मरिहि अभागा ।**
**पठवहु देव बेगि भट बंदर ।**
**करहिँ बिधंस आव दसकंधर ।**

इकडे बिभीषणास ती सर्व बातमी लागतांच त्यानें रघुपतीकडे जाऊन त्यांना ती वर्दी दिली. ( तो म्हणाला ) हे नाथ ! रावण एक यज्ञ करीत आहे. तो निर्विघ्न वार पडल्यास तो करंटा मरणार नाहीं. हे प्रभो ! वानरवीरांना सत्वर पाठवावें. त्यांनी यज्ञाचा विध्वंस केला म्हणजे रावण ( रणांत ) आपोआपच उतरेल.

**प्रात होत प्रभु सुभट पठाये ।**
**हनुमदादि अंगद सब धाये ।**
**कौतुक कूदि चढे कपि लंका ।**
**पैठे रावनभवन असंका ।**

प्रातःकाळ होतांच प्रभूंनीं निवडक वीरांना पाठविलें. अंगद हनुमंतादि सर्व आज्ञा होतांच धावले. ते वानरवीर लीलेनें लंकेवर उड्या मारून चढले आणि निर्धास्तपणें रावणाच्या यज्ञशालेंत शिरले.

**जग्य करत जबहीँ सो देखा ।**
**सकल कपिन्ह भा क्रोध बिसेखा ।**
**रन तेँ निलज भाजि गृह आवा ।**
**इहाँ आइ बकध्यानु लगावा ।**
**अस कहि अंगद मारेउ लाता ।**
**चितव न सठ स्वारथ मन राता ।**

रावण यज्ञ करीत आहे असें पाहतांच सर्व कपींना अधिकच क्रोध चढला. " रे निर्लज्जा ! रणांतून पळ काढून घरांत घुसलास आणि येथें येऊन बकध्यान लावून बसलास काय ? " असें म्हणून अंगद त्याला लाथा हाणीत सुटला. परंतु स्वार्थधुंद तो दुरात्मा त्याच्याकडे ढुंकूनहि पाहीना.

**छंद—नहि चितव जब कपि कोप तब गहि दसन लातन्ह मारहीँ । धरि केस नारि निकारि बाहेर तेऽतिदीन पुकारहीँ । तब उठेउ क्रुद्ध कृतांतसम गहि चरन बानर डारई । एहि बीच कपिन्ह बिधंसकृत मख देखि मन महँ हारई ॥ ११ ॥**

रावण मुळींच पाहीना तेव्हां चवताळून कपी त्यास दांतांनीं चावूं लागले आणि लाथांनीं मारूं लागले. त्यांनीं त्याच्या स्त्रीचा झोटा धरून तिला फरफटत बाहेर आणली. ती दीनवाणीनें हंबरडा फोडूं लागली, तेव्हां मात्र तो रावण कृतांताप्रमाणें क्रुद्ध होऊन उठला, आणि तंगड्या धरधरून वानरास बाहेर फेकूं लागला. वानरांनीं मध्येंच यज्ञ उध्वस्त केला हें पाहून रावणाचा अगदींच हिरमोड झाला.

**दो०—मख बिधंसि कपि कुसल सब आये रघुपति पास । चलेउ लंकपति क्रुद्ध होइ त्यागि जिवन कै आस ॥ १०२ ॥**

यज्ञाचा विध्वंस करून सर्व वानर रघुपतिसन्निध सुखरूप पोंचले. नंतर जीवाची आशा सोडून रावण संतापानें निघाला.

**चौ०—चलत होहिँ अति असुभ भयंकर ।**
**बैठहिँ गीध उडाहिँ सिरन्हपर ।**
**भयउ कालबस काहु न माना ।**
**कहेसि बजावहु जुद्धनिसाना ।**

तो जाऊं लागला तेव्हां त्याला अतिशय भयंकर दुश्चिन्हें जाणवलीं. गृध्र उडून त्याच्या मस्तकावर बसत, परंतु कालवश झाल्यामुळें तो कशाचीहि पर्वा करीना. उलट रणवाद्यें छेडण्यास त्यानें हुकूम सोडला.

**चली तमी-चर-अनी अपारा ।**
**बहु गज रथ पदाति असवारा ।**
**प्रभु सनमुख धाये खल कैसें ।**
**सलभसमूह अनल कहँ जैसे ।**

अपरिमित गजाश्वरथपदातीमिश्रित राक्षससैन्य चालूं लागलें. शलभसमूह जसा अग्नीवर झडप घेतो तद्वत् ते दुरात्मे प्रभूंच्या सन्मुख धांवून येऊं लागले.

**इहाँ देवतन्ह अस्तुति कीन्ही ।**
**दारुनबिपति हमहिँ एहि दीन्ही ।**

अब जनि राम खेलावहु एही ।
अतिसय दुखित होति बैदेही ।

इकडे देवांनीं प्रार्थना आरंभिली कीं, ह्या रावणानें आमचे भयंकर हाल करून सतावून सोडलें आहे. हे रामा ! आतां ह्यास खेळवीत बसूं नये. वैदेहीहि अत्यंत रोमांचकारी स्थितींत आहे.

देवबचन सुनि प्रभु मुसुकाना ।
उठि रघुबीर सुधारे बाना ।
जटाजूट दृढ बाँधे माथे ।
सोहहिँ सुमन बीच बिच गाँथे ।
अरुननयन बारिद-तनु-स्यामा ।
अखिल-लोक-लोचन-अभिरामा ।
कटितट परिकर कसेउ निषंगा ।
कर कोदंड कठिन सारंगा ।

देवांचें तें भाषण श्रवण करून प्रभूंनीं हास्य केलें व उठून बाण सज्ज केला. मस्तकावर जटाजूट घट्ट बांधला असून त्यामध्यें मधून मधून सुंदर पुष्पें गुंफलीं आहेत, नेत्र आरक्त झाले असून शरीर मेघाप्रमाणें शामल आहे, अशा त्या सकल लोकांच्या नेत्रांना आनंद देणाऱ्या रघुवीरांनीं कमरेला भाते कसले, व हातांत कठिण शारङ्गचाप धारण केलें.

**छंद–सारंग कर सुंदर निषंग सिलीमुखा-कर कटि कस्यौ । भुजदंड पीन मनो-हरायत उर धरा सुर–पद लस्यौ ॥ कह दास तुलसी जबहिँ प्रभु सरचाप कर फेरन लगे । ब्रह्मांड दिग्गज कमठ अहि महि सिंधु भूधर डगमगे ॥ १२ ॥**

करकमलाचे ठायीं सुंदर शारङ्गधनुष्य धारण केलें आहे, कटिप्रदेशास भाते कसले आहेत, पुष्ट भुजदंड आहेत, रमणीय आणि विशाल अशा वक्षःस्थलीं भृगुपद शोभत आहे, असे प्रभु रामचंद्र जेव्हां धनुष्य-बाण हातांनीं परजूं लागले त्या वेळीं तुलसीदास म्हणतात कीं, ब्रह्मांड, दिग्गज, कूर्म, शेष, पृथ्वी, सागर, पर्वत हे सर्व दणाणून डिगडिगूं लागले.

**दो०–हरषे देव बिलोकि छबि बरषहिँ सुमन अपार । जय जय प्रभु गुन-ज्ञान-बल-धाम हरन महिभार ॥ १०३ ॥**

रामाची ती छबी पाहून देव प्रसन्न झाले, आणि गुण, ज्ञान व बल यांचें निधान व भूभार हरण करणारे प्रभु श्रीरामचंद्र यांचा जयजयकार करून अतोनात पुष्पवर्षाव करूं लागले.

चौ०–एही बीच निसा-चर-अनी ।
कसमसाति आई अतिघनी ।
देखि चले सनमुख कपि भट्टा ।
प्रलय काल के जनु घनघट्टा ।

इतक्या अवकाशांत गनीमी फौज अत्यंत गर्दीनें रों रों करीत येऊन दाखल झाली. त्या सैन्यास पाहून वानरवीर मोहरा गांठून सज्ज झाले. तो देखावा प्रळयकाळाच्या सान्द्र मेघांप्रमाणें होता.

शक्ति शूल तरवारि चमंकहिँ ।
जनु दस दिसि दामिनी दमंकहिँ ।
गज रथ तुरग चिकार कठोरा ।
गर्जहिँ मनहुँ बलाहक घोरा ।

शक्ति, शूल, तरवारी वगैरे विद्युल्लतांच्या लखलखाटाप्रमाणें सभोंवार तळपूं लागल्या. गज, रथ आणि अश्व यांचा कठोर ध्वनि ऐकतांच जणुंकाय मेघांची घोर गर्जना चालली आहे असें वाटे.

कपिलंगूर बिपुल नभ छाये ।
मनहुँ इंद्रधनु उये सुहाये ।
उठइ धूरि मानहुँ जलधारा ।
बान बुंद भइ बृष्टि अपारा ।

वानरांच्या असंख्य पुच्छांनीं आकाश व्याप्त झालें तेव्हां जणुंकाय आकाशांत मजेदारीचीं धनुष्येंच उगवलीं आहेत असें वाटे. धूळ उडाली ती जलधारेप्रमाणें भासली व बाणरूपी जलबिंदूंची मुसळधार वृष्टि होऊं लागली.

दुहुँ दिसि पर्बत करहिं प्रहारा ।
बज्रपात जनु बारहिँ बारा ।
रघुपति कोपि बानझरि लाई ।
घायल भे निसि–चर–समुदाई ।
लागत बान बीर चिक्करहीँ ।
घुर्मि घुर्मि जहँ तहँ महि परहीँ ।
स्रवहिँ सैल जनु निर्झरबारी ।
सोनित सरि कादर भयकारी ।

उभय पक्षांकडून पर्वतप्रहार होऊं लागले, तेव्हां जणुकाय वारंवार वज्रपातच होत आहेत असें वाटे रघुवीरांनीं क्रुद्ध होऊन बाणांचा वर्षाव सुरू केला. तेणेंकरून राक्षससमुदाय घायाळ झाले. त्यांचें ते बाण लागतांच अगणित वीर चीत्कार करीत कोलमडून

धरणीवर पडत. तेव्हांचा रक्तस्राव पाहून असें वाटे कीं, जणुं पर्वताला पाझरच फुटले आहेत. भीरूंना भिवविणारी शोणितनदी फोंफावत वाहूं लागली.

छंद–कादर भयंकर रुधिरसरिता चली परम अपावनी। दोउ कूल दल रथ रेत चक्र अबर्त्त बहति भयावनी॥ जलजंतु गज पदचर तुरग खर विविध बाहन को गने। सर सक्ति तोमर सर्प चाप तरंग चर्म कमठ घने॥ १३॥

भीतांस भयोत्पादक अशी ती अत्यंत अपवित्र रक्तनदी वाहूं लागली. दोन्हीं दळें हेच तिचे तट असून (चूर्ण झालेले) रथ हीच तिची रेती होती. रथचक्रें हे तिजमधील भोंवरे असून तिचा प्रवाह फार भयंकर होता. गज, पदाति, अश्व, खर इत्यादि अनेक वाहनें हेच तिच्यांतील जलजंतु होत. त्यांची गणना कोण करणार? शर, शक्ति, तोमर हे तिच्यांतील सर्प असून, धनुष्यें हे तिचे तरंग होत व ढाली हीं तिच्यांतील विपुल कासवें होत.

दो०–बीर परहिँ जनु तीरतरु मज्जा बहु बह फेन। कादर देखि डराहिँ तेहि सुभटन के मन चेन॥ १०४॥

पतन पावणारे वीर हेच तिच्या तीरावरील वृक्ष होत. त्यांची विपुल मज्जा हाच तीजवरील फेंसाचा तरंग होय. अशा त्या नदीस पहातांच नेभळटास कांपरें भरे, परंतु शूर वीरांचे मनांत गुदगुल्या होत.

चौ०–मज्जहिँ भूत पिसाच बेताला।
प्रमथ महा झोटिंग कराला।
काक कंक लेइ भुजा उडाहीँ।
एक ते छीनि एक लेइ खाहीँ।
एक कहहिँ ऐसिउ सौँघाई।
सठहु तुह्मार दरिद्र न जाई।

त्या नदीच्या प्रवाहांत मोठमोठाले भयंकर प्रमथ, झोटिंग, भूत, पिशाच, वेताळ वगैरे स्नानें करूं लागले. काक व कंक पक्षी छिन्नभुजांना घेऊन उडत आणि एकमेकांजवळून हिसकावून ते खात. तेव्हां एक म्हणे कीं, मचाडांनो! अशा सुबत्तेंत देखील तुमचें दारिद्र्य जात नाहींच ना?

कहँरत भट घायल तट गिरे।
जहँ तहँ मनहुँ अर्धजल परे।
खैंचहिँ गीध आँत तट भये।
जनु बनसी खेलहिँ चित दये।
बहु भट बहहिँ चढे खग जाहीँ।
जनु नावरि खेलहिँ सरि माहीँ।

उभय पक्षीं ठिकठिकाणीं जे योद्धे घायाळ होऊन कण्हत पडत, जणुंकाय मुख्य धारेंत पडल्याप्रमाणें ते दिसत. तटावर बसून कोळी लोक ज्याप्रमाणें लक्ष लावून गळानें मासे धरण्याचा खेळ खेळतात त्याप्रमाणें गृध्र (वीरांच्या प्रेतांतील) आंतडीं ओढून काढीत असत. ज्याप्रमाणें नदींत नावाडी खेळतात तद्वत् अनेक पक्षी प्रेतावर बसून चैन करीत.

जोगिनि भरि भरि खप्पर संचहिँ।
भूत–पिसाच–बधू नभ नंचहिँ।
भट कपाल करताल बजावहिँ।
चामुंडा नानाविधि गावहिँ।
जंबुकनिकर कटकट कट्टहिँ।
खाहिँ हुआहिँ अघाहिँ दपट्टहिँ।
कोटिन्ह रुंड मुंड बिनु डोल्लहिँ।
सीस परे महिँ जय जय जय बोल्लहिँ।

योगिनी वीरांच्या कवट्या भरभरून रक्त सांचवून घेत. भूतपिशाचांच्या स्त्रिया आकाशांत नाचूं लागत. चामुंडा वीरकपालांचे डफ करून अनेक प्रकारें गात. जंबुकांचे समुदाय करकरां (दांत खाऊन) प्रेतें फाडून तृप्त होईपर्यंत गोपालकाला करीत व डुरकण्या देऊन आपापसांत झगडाहि करीत. कोट्यवधि विनाशिरांचीं धडें नाचत आणि धरणीवर पतन पावलेलीं शिरें जयजय म्हणत.

छंद०–बोल्लहिँ जो जय जय मुंड रुंड प्रचंड सिर बिनु धावहीँ। संग्राम भूमि अगुह्य जुज्झहिँ सुभट सुरपुर पावहीँ॥ निसि–चर–बरूथ बिमर्दि गरजहिँ भालु कपि दर्पित भये। संग्रामअंगन सुभट सोवहिँ राम–सर–निकरन्हि हये॥ १४॥

शिरें जयजयकार करीत व प्रचंड मस्तकविरहित धडें धांवत. समरभूमींत जे शूरवीर पाठ न फेरतां झुंजत (आणि मरत) ते देवलोकाला जात. भालू आणि कपि राक्षससैन्य झोडून मोठ्या दर्पानें गर्जना

करीत. श्रीरामचंद्राच्या बाणसमूहानें मेलेले अजस्र योद्धे रणशय्येवर झोपा घेत.

दो०—रावन हृदय बिचारा भा निसि-चर संहार। मैं अकेल कपि भालु बहु माया करउँ अपार ॥ १०५ ॥

रावणानें मनांत विचार केला कीं राक्षस तर बहुतेक सारे आटलेच. आतां मी एकटा आणि कपि व भालू मात्र अफाट; तेव्हां या समयीं अपार औडंबरीच गाजविण्यास हवी.

चौ०—देवन्ह प्रभुहिँ पयादे देखा।
उपजा उर अतिछोभ बिसेखा।
सुरपति निजरथ तुरत पठावा।
हरषसहित मातलि लेइ आवा।
तेजपुंज रथ दिव्य अनूपा।
हरषि चढे कोसल-पुर-भूपा।

प्रभु पायींच युद्ध करीत आहेत असें पाहून देवांच्या मनांत विशेषच खेद वाटला. त्या वेळीं इंद्रानें लागलींच आपल्या सारथ्यास आज्ञा केली, तेव्हां मातली मोठ्या हर्षानें रथ घेऊन आला. त्या अप्रतिम तेजःपुंज व दिव्य अशा रथांत अयोध्याधीश आनंदानें आरूढ झाले.

चंचल तुरग मनोहर चारी।
अजर अमर-मन-सम-गति-कारी।
रथारूढ रघुनाथहिँ देखी।
धाये कपि बल पाइ बिसेखी।
सही न जाइ कपिन्ह कै मारी।
तब रावन माया बिस्तारी।

त्या रथाचे चारीहि अश्व फार देखणे, चपळ, मजबूत, जानदार आणि असे तर्राट कीं मनाच्या फुर्तीवर ते लपकत असत. रघुवीरास रथारूढ पाहतांच कपींना फारच उमेद चढली व ते एकदम लपकले. त्यांचा मारा सहन होईना तेव्हां घाबरून रावणानें आपला डोंबारी पसारा फैलविला.

सो माया रघुबीरहि बाँची।
सब काहू मानी करि साँची।
देखी कपिन्ह निसा-चर-अनी।
अनुजसहित बहु कोसलधनी।

ती माया रघुवीराव्यतिरिक्त सर्वांनाच खरी अशी वाटली. कपींना राक्षससैन्यांत कितीकच लक्ष्मणासहित कितीकच राम दिसूं लागले.

छंद—बहु राम लछिमन देखि मर्कट भालु मन अति अपडरे। जनु चित्रलिखित समेत लछिमन जहँसो तहँ चितवहिँ खरे ॥ निजसेन चकित बिलोक हँसि सर चाप सजि कोसलधनी। माया हरी हरि निमिष महँ हरषी सकल मरकटअनी ॥ १५ ॥

असंख्य रामलक्ष्ण पाहून ऋक्षवानरांच्या मनाची फारच तारांबळ उडाली. लक्ष्मणासुद्धां ते जणुं चित्रांत काढल्याप्रमाणें जेथल्यातेथेंच थक्क पहात उभे राहिले. मायेच्या योगानें आपलें सैन्य चौकन्ना झालेले पाहून कोसलेश्वर श्रीहरींनीं स्मित केलें, आणि धनुष्यावर बाण लावून निमिषमात्रांत माया पिटाळून लावली. तेव्हां सर्व वानरसैन्यास आनंद झाला.

दो०—बहुरि राम सब तन चितइ बोले बचन गँभीर। द्वंदजुद्ध देखहु सकल स्रमित भये अति बीर ॥ १०६ ॥

नंतर श्रीरामचंद्र सर्वांकडे पाहून गंभीर वाणीनें म्हणाले—'वीर हो! तुह्मी फार दमलांत; आतां सर्वजण आमचें द्वंद्वयुद्ध पहात रहा कसे.'

चौ०—अस कहि रथ रघुनाथ चलावा।
बिप्र-चरन-पंक-ज सिरु नावा।
तब लंकेस क्रोध उर छावा।
गर्जत तर्जत सनमुख धावा।

असें सांगून रघुवीरांनीं विप्रांच्या चरणकमलांस वंदन करून रथ हांकारिला. तेव्हां रावण क्रोधाविष्ट होऊन गर्जना करीत बिनदिक्कत सन्मुख आला (आणि म्हणाला)—

जीतहु जे भट संजुग माहीँ।
सुनु तापस मैं तिन्ह सम नाहीँ।
रावन नाम जगत जस जाना।
लोकप जा के बंदीखाना।
खर-दूषन-कबंध तुह्म मारा।
बधेहु ब्याध इव बालि बिचारा।
निसि-चर-निकर सुभट संहारेहु।
कुंभकरन घननादहिँ मारेहु।
आजु बैरु सब लेउँ निबाही।
जौं रन भूप भाजि नहिँ जाही।
आजु करउँ खलु कालहवाले।
परेहु कठिन रावन के पाले।

'अरे फटिंगा! जे वीर आजपर्यंत तूं युद्धांत मारिलेस त्यांच्यांतला मी नव्हे हें समजून ऐस. सर्व लोकपाल ज्याचे बंदिवासांत आहेत तो मी नांवाचा रावण असून माझी कीर्ति सर्व जग जाणीत आहे. तूं खरदूषणकबंधांना रसातळ दाखविलेंस व बिचाऱ्या वालीचा तर व्याधाप्रमाणें जीव घेतलास. राक्षससैन्य व त्यांतील वेंचीव योद्धे यांचाहि तूं खच पाडलास. कुंभकर्ण व मेघनाद यांनाहि तूं कंठस्नान घातलेंस. अरे रणगाजी म्हणविणाऱ्या! आज जर तूं आपलें ठाण पक्कें धरून राहिलास तर आज मी त्या सर्व दुष्मन दाव्याचा पक्का सूड उगवून घेणार आहे. आज खरोखर मी तुला काळाच्या स्वाधीन करणार! रावणाच्या तावडींत आज तूं पक्काच गवसलास समज.

सुनि दुर्बचन कालबस जाना।
बिहँसि बचन कह कृपानिधाना।
सत्य सत्य सब तव प्रभुताई।
जलपसि जनि देखाउ मनुसाई।

त्याची ती कटीली भाषा ऐकून व तो कालवश समजून कृपानिधान प्रभु हंसले व उद्गारलेः--" रास्त! तुझा सर्व पराक्रम अगदीं रास्त आहे. परंतु तोंडाचे फुके फोवारे न उडवितां तुझा पुरुषार्थ एकदांचा दाखीव तर पाहूं.

**छंद—जनि जलपना करि सुजसु नासहि नीति सुनहि करहि छमा। संसार महँ पूरुष त्रिबिध पाटल-रसाल-पनस-समा॥ एक सुमनप्रद एक सुमनफल एक फलइ केवल लागहीं। इक कहहिं करहिं न कहहिं करहिं इक अपर करहिं न बागहीं॥ १६॥**

फुकाची तोंडपाटिलकी करून कमविलेलें नांव बोळवूं नकोस. (मी सांगतों ती) नीति ऐक आणि शांत हो. या जगांत तीन प्रकारचे पुरुष असतात. गुलाबासारखे, आम्रवृक्षासारखे आणि फणसासारखे. एकास नुसतीं फुलेंच येतात, तर दुसऱ्यास फळें व फुलें येतात, व तिसऱ्यास केवळ फळेंच लागतात. तोच प्रकार पुरुषांत देखील. एखादा नुसतें एलावतोच, करणें धरणें सर्व शून्य; दुसरा मनानें आखलेलें प्रत्यक्ष बजावतो आणि करूनहि दाखावितो; आणि तिसरा बिलकुलदेखील बकवा न करतां सुधी करणीच करून पार होतो.

**दो०—रामबचन सुनि बिहँसि कह मोहि सिखावत ज्ञान। बैरु करत नहिँ तब डरेहु अब लागे प्रिय प्रान॥ १०७॥**

प्रभूचें तें वर्मी वाक्य ऐकून रावण हसून म्हणाला, 'माझा पंतोजी बनतोस होय? आधीं काड्या कुचकव्यास मात्र डरला नाहींस आणि आतां मात्र स्वतःच्या प्राणांची लालुच सुटली होय?'

चौ०—कहि दुर्बचन क्रुद्ध दसकंधर।
कुलिससमान लाग छाडहि सर।
नानाकार सिलीमुख धाये।
दिसि अरु बिदिसि गगन महि छाये।
अनलबान छाडेउ रघुबीरा।
छन महँ जरे निसा–चर–तीरा।

याप्रमाणें चोराच्या उलट्या बोंबा मारून रावण तडफडत वज्राप्रमाणें बाण सोडूं लागला. निरनिराळ्या आकारांच्या बाणांचें त्यानें सर्वत्र छत करून दिलें. दिशा, उपदिशा, आकाश, पृथ्वी सर्वच बाणमय झालें. रघुवीरांनीं (एकच) अग्निशर सोडून क्षणांत रावणाचे बाण दग्ध करून टाकले.

छाडेसि तीव्र सक्ति खिसिआई।
बानसंग प्रभु फेरि पठाई।
कोटिन्ह चक्र त्रिसूल पबारइ।
त्रिनु प्रयास प्रभु काटि निवारइ।
निफल होहिँ रावनसर कैसे।
खल के सकल मनोरथ जैसे।

तेव्हां रावणानें चवताळून तीव्र शक्ति सोडली; परंतु प्रभूंनीं ती तडकाफडकी आपल्या बाणाबरोबर रावणाकडे परत पाठविली. रावणानें कोट्यावधि चक्र आणि त्रिशूल फेकले. प्रभूंनीं तेहि हां हां म्हणतां तोडून पाडले. दुष्टांच्या मनाचे सर्व मनोरे जसे जेथच्या तेथेंच ढासळतात, त्याप्रमाणें रावणाचे बाण सारेचे सारे फुकट गेले.

तब सतबान सारथी मारेसि।
परेउ भूमि जय राम पुकारेसि।
राम कृपा करि सूत उठावा।
तब प्रभु परमक्रोध कहँ पावा।

नंतर रावणानें शंभर बाण मातलीस मारले. तो 'जयराम!' म्हणून पृथ्वीवर पडला. रामांनीं कृपा करून त्यास उठविलें. मग मात्र प्रभूस फारच क्रोध चढला.

छंद—भये क्रुद्ध जुद्धविरुद्ध रघुपति त्रोन सायक कसमसे। कोदंडधुनि अतिचंड सुनि मनुजाद सब मारुत ग्रसे॥ मंदोदरी उर कंप कंपति कमठ भू भूधर त्रसे। चिक्करहिँ दिग्गज दसन गहि महि देखि कौतुक सुर हँसे॥ १७॥

युद्धांत विरुद्धपक्षीं रघुपति क्रुद्ध झाले असतां त्यांच्या भात्यामध्यें बाण सळसळूं लागले. त्यांच्या कोदंडाचा प्रचण्ड टणत्कार ऐकून सर्व राक्षसांना झंझावातानें उडाल्याप्रमाणें वाटलें. मंदोदरीच्या हृदयांत कांपरें भरलें. आदिकच्छ, भूमि आणि पर्वत त्रस्त झाले. दिग्गज पृथ्वींत दांत खुपसून चीत्कार करूं लागले. ती मौज पाहून देव मात्र हंसूं लागले.

दो०—तानेउ चाँप स्रवन लगि छाडे बिसिख कराल। राम-मारगन-गन चले लह-लहात जनु ब्याल॥ १०८॥

प्रभूंनीं आकर्णचाप ओढून रावणावर उग्र बाण टाकले. तो प्रभूंचा बाणसमुदाय सर्पाप्रमाणें फूत्कार करीत निघाला.

चौ०— चले बान सपच्छ जनु उरगा।
प्रथमहिँ हतेउ सारथी तुरगा।
रथ बिभंजि हति केतु पताका।
गर्जा अतिअंतर बल थाका।

सपक्ष सर्पांप्रमाणें सूं सूं करीत निघालेल्या त्या बाणांनीं तत्काळ रावणाच्या सारथ्याचा आणि घोड्यांचा निःपात केला, आणि रथाचा चुराडा करून त्याजवरील ध्वजपताका मोडून पाडल्या. रावण (वरून जरी) गर्जना करीत होता तरी अंतर्यामीं त्याचा धीर सुटून गेला होता.

तुरत आन रथ चढि खिसिआना।
अस्त्र सस्त्र छाडेसि बिधि नाना।
बिफल होहिँ सब उद्यम ता के।
जिमि पर-द्रोह-निरत-मनसा के।

तेव्हां रावण दुसऱ्या रथावर आरूढ झाला आणि मोठ्याच खुमखुमीनें अगदीं तुफान शस्त्रास्त्रें सोडूं लागला. ज्याप्रमाणें परद्रोहाचे ठिकाणीं नित्य चित्त लंपट असणाऱ्याचे मनोरथ निष्फळ होतात तद्वत् रावणाचा वरील सर्व खटाटोप फुकट गेला.

तब रावन दस सूल चलावा।
बाजि चारि महि मारि गिरावा।
तुरग उठाइ कोपि रघुनायक।
खैँचि सरासन छाडे सायक।

नंतर रावणानें दहा शूल भिरकावले. तेणेंकरून रामरथाचे चारीहि घोडे मरून पडले. घोडे सजीव करून रघुवीरांनीं क्रोधपूर्वक धनुष्य खेंचून बाण सोडले.

रावन-सिर-सरोज-बन-चारी।
चलि रघुबीर सिलीमुख धारी।
दस दस बान भाल दस मारे।
निसरि गये चले रुधिरपनारे।
स्रवत रुधिर धायउ बलवाना।
प्रभु पुनि कृत धनु-सर-संधाना।
तीस तीर रघुबीर पबारे।
भुजन्ह समेत सीस महि पारे।

रावणाच्या मस्तकरूप कमलवनावर रघुवीरांच्या बाणांची संततधार सुरूं झाली. लगेच प्रभूंनीं रावणाचे दहा शिरांवर प्रत्येकीं दहा दहा बाण मारिले. ते त्यांतून पार निघतांच रक्ताचे पाट सुरूं झाले. तो रक्तस्राव सुरूं असतांच तो गाढा वीर रामांवर धांवून आला. तेव्हां प्रभूंनीं पुन्हां धनुष्यबाण सज्ज केले व तीस बाण सोडून रावणाचीं शिरें हातासकट धरणीवर पाडलीं.

काटतही पुनि भये नबीने।
राम बहोरि भुजासिर छीने।
कटत झटिति पुनि नूतन भये।
प्रभु बहु बार बाहु सिर हये।
पुनि पुनि प्रभु काटक भुज सीसा।
अतिकौतुकी कोसलाधीसा।
रहे छाइ नभ सिर अरु बाहू।
मानहुँ अमित केतु अरु राहू।

तीं हस्तशिरें तुटून पडतांच तेथें नवीन हात व डोकीं उगविलीं. प्रभूंनीं तींहि तोडलीं. प्रभूंनीं शिरकाण कितीदांच केलें, परंतु तितकेहि वेळां तीं तत्काळ उत्पन्न झालीं; तरीहि पण प्रभु शिरकाण करीतच राहिले. अशाप्रकारें कोसलाधीश्वर गंमत करीत राहिले. बाहु व मस्तकें यांचें आकाशांत छत बनून गेलें. जणुंकाय असंख्य राहुकेतु उगवले आहेत असें भासलें.

**छंद–जनु राहु केतु अनेक नभपथ स्रवत-सोनित धावहीं । रघु-वीर-तीर प्रचंड लागहिँ भूमि गिरन न पावहीं ॥ एक एक सिर सरनिकर छेदे नभ उडत इमि सोहहीं ॥ जनु कोपि दिन-कर-कर-निकर जहँतहँ बिधुंतुद पोहहीं १८**

तेव्हां जणूं असंख्य राहू व केतूच आकाशमार्गानें रक्तस्राव करीत धांवत आहेत असें भासे. इकडे रघुवीरांच्या तीव्र बाणांचा मारा सुरू असल्यामुळें ते धरणीवर पडूं शकतना. प्रत्येक शिरास असंख्य बाण वेधत होते. ते आकाशांत उडत असतां असे दिसत कीं जणुंकाय सूर्यानें संतापून आपल्या किरणसमूहांत जिकडे तिकडे राहूच राहू ओवले आहेत.

**दो०–जिमि जिमि प्रभु हर तासु सिर तिमि तिमि होहिँ अपार । सेवत विषय विवर्ध जिमि नित नित नूतन मार ॥ १०९ ॥**

जों जों विषयसेवन करावें तों तों काम नित्य प्रक्षुब्ध होऊन वृद्धिंगत होत असतो, तद्वत् जसजसे प्रभु त्याचीं शिरें उडवीत तसतशीं तीं अधिकाधिकच उत्पन्न होत असत.

चौ०–दसमुख देखि सिरन्ह कै बाढी ।
बिसरा मरन भई रिस गाढी ।
गर्जेउ मूढ महा अभिमानी ।
धायउ दसउ सरासन तानी ।

रावण आपल्या शिरांची वाढ पाहून मरणाला विसरला व त्यास बेसुमार आवेश चढला. तो महा-मदांध मूढ गर्जना करीत दहाहि धनुष्यें ओढीत धांवत सुटला.

समरभूमि दसकंधर कोपेउ ।
बराषि बान रघु-पति-रथ तोपेउ ।
दंड एक रथ देखि न परा ।
जनु निहार महँ दिनमनि दुरा ।
हाहाकार सुरन्ह जब कीन्हा ।
तब प्रभु कोपि कार्मुकहि लीन्हा ।

रणाङ्गणावर रावण पिसाळला. त्यानें बाणवृष्टि करून प्रभूंचा रथ जागच्याजागींच थोपून टाकला. जणुंकाय धुक्यानें सूर्य लोपावा तसा तो रथ एक घटकापर्यंत बिलकुल बेपता होता. देवांनीं जेव्हां हाहाःकार मांडला तेव्हां प्रभूंनीं क्रुद्ध होऊन फिरून धनुष्य उचलिलें.

सर निवारि रिपु के सिर काटे ।
ते दिसि बिदिसि गगन महि पाटे ।
काटे सिर नभमारग धावहिँ ।
जय जय धुनि करि भय उपजावहिँ ।
कहँ लछिमन हनुमान कपीसा ।
कहँ रघुबीर कोसलाधीसा ।

प्रभूंनीं रावणबाण उडवून लावून त्याचीं शिरेंहि तोडलीं. तीं पृथ्वी, अंतरिक्ष, दिशा आणि उपदिशां-मध्यें सर्वत्र छाऊन राहिलीं. तीं भग्न झालेलीं शिरें आकाशमार्गानें धांवत आणि जयघोष करून 'लक्ष्मण, सुग्रीव, हनुमान्, कोठें आहेत ? कोसलाधीश रघुवीर कोठें आहे ?' म्हणून (वानरांना) भीति उत्पन्न करीत.

**छंद०–कहँ राम कहि सिरनिकर धाये देखि मर्कट भजि चले । संधानि धनु रघु-बंस-मनि हँसि सरन्ह सिर भेदे भले ॥ सिरमालिका गहि कालिका कर बृंद बृंदन्हि बहु मिलीं । करि रुधिरसरि मज्जन मनहुँ संग्रामबट पूजन चलीं ॥ १९ ॥**

तो रावणाचा मस्तकसमुदाय 'राम कोठें आहे' असें म्हणत सैराट धांवत होता, तें पाहून वानर उधळत सुटले. तेव्हां रघुवंशमणींनीं हास्यपूर्वक धनुष्य सज्ज केलें आणि बाणांनीं त्या मस्तकांचा अशा कर्तबगारीनें वेध केला कीं त्या शिरांच्या माळा झाल्या. कालिकांचे पुष्कळ थवेच्याथवे जमा-वानें त्या रक्तनदींचें स्नान करीत आणि त्या माळा हातांत घेत, तेव्हां असें वाटे कीं त्या संग्रामरूपी वट-वृक्षाच्या पूजेसच जात आहेत.

**दो०–पुनि दसकंठ क्रुद्ध है छाँडी सक्ति प्रचंड । चली बिभीषन सनमुख मनहुँ काल कर दंड ॥ ११० ॥**

फिरून रावणानें क्रुद्ध होऊन एक प्रचंड शक्ति सोडली. काळाच्या दंडाप्रमाणें भासणारी ती शक्ति बिभीषणाकडेस जाऊं लागली.

चौ०—आवत देखि सक्ति खरधारा।
प्रनतारतिहर बिरद सँभारा।
तुरत बिभीषन पाछे मेला।
सनमुख राम सहेउ सो सेला।
लागि सक्ति मुरछा कछु भई।
प्रभु कृत खेल सुरन्ह बिकलई।

ती तीक्ष्ण धारदार शक्ति आलेली पाहतांच दीनवत्सल प्रभूंनीं आपलें ब्रीद सांभाळिलें. त्यांनीं लागलींच बिभीषणाला आपल्या पाठीशीं घालून आपण स्वतः समोर होऊन ती शक्ति अंगावर घेतली. त्या शक्तिप्रहारानें त्यांना किंचित् तिरमिरीहि आली. प्रभूंचा तो खेळ झाला, परंतु देवांना मात्र फार काळजी वाटली.

देखि बिभीषन प्रभु स्रम पायउ।
गहि कर गदा क्रुद्ध होइ धायउ।
रे कुभाग्य सठ मंद कुबुद्धे।
तैं सुर नर मुनि नाग बिरुद्धे।
सादर सिव कहँ सीस चढाये।
एक एक के कोटिन्ह पाये।
तेहि कारन खल अब लगि बाँचा।
अब तब काल सीस पर नाँचा।
रामबिमुख सठ चह संपदा।
अस कहि हनेसि माँझ उर गदा।

प्रभूंना सतावलेलें पाहून बिभीषण गदा हातांत घेऊन खूपच चवताळून रावणावर धांवला आणि म्हणाला—हे हतभाग्या, शठा, मंदा, दुर्बुद्धे ! तूं तर सुर, नर, मुनि, नाग इत्यादि सर्वांचेंच वैर संपादन केलें आहेस ! तूं आदरपूर्वक शंकरास आपलीं मस्तकें वाहिलींस, त्या एकेका मस्तकाबद्दल कोटि कोटि मस्तकें तूं पावलास आणि त्याच कारणानें आतांपर्यंत तूं तग धरून राहिलास. आतां मात्र तुझा काळ तुझ्या मढ्यावर नाचत आहे. शठा ! रामाशीं षडाष्टक पाळून ऐश्वर्य इच्छितोस काय ? असें म्हणून त्यानें तीच गदा रावणाचे उराड्यांत हाणली.

**छंद०—उर माँझ गदाप्रहर घोर कठोर लागत महि पर्‍यौ। दसबदन सोनित स्रवत पुनि संभारि धायउ रिस भर्‍यौ। दोउ भिरे अतिबल मल्ल जुद्ध बिरुद्ध एक एकहि हने। रघु-बीर-बल-गर्बित बिभीषन घालि नहिं ता कहँ गने॥२०॥**

त्या गदेचा जबर खवखवीत ठोसा उरांत बसतांच रावण धरणीवर बेहोष चीत पडला. त्याच्या दहाहि मुखांतून रक्त वाहूं लागलें. फिरून तो सावरून चिडचिडून धांवला. त्या महाबलाढ्य उभय वीरांचें मल्लयुद्ध जुंपलें व ते एकमेकांस अटीतटीनें प्रहार करूं लागले. रघुवीराच्या बळावर गर्वित झालेल्या त्या बिभीषणानें रावणाच्या घाल्याची मुळींच तमा बाळगली नाहीं.

**दो०—उमा बिभीषन रावनहिं सनमुख चितव कि काउ। भिरत सो कालसमान अब श्री-रघु-बीर-प्रभाउ॥१११॥**

(शंकर म्हणतात)—हे पार्वति ! रावणास डोळा वर करून त्याचेकडे डोकावण्याची तरी बिभीषणाची अवकाद होती काय ? परंतु या वेळीं तोच श्रीरघुवीरांच्या प्रतापानें काळासारखा रावणाशीं झगडूं लागला.

चौ०—देखा स्रमित बिभीषन भारी।
धायउ हनूमान गिरिधारी।
रथ तुरंग सारथी निपाता।
हृदय माँझ तेहि मारेसि लाता।
ठाढ रहा अतिकंपित गाता।
गयउ बिभीषनु जहँ जनत्राता।

बिभीषणाला अतिशय जर्जर पाहून हनुमान् पर्वत घेऊन धांवला. त्यानें रावणाचे रथ, अश्व आणि सारथि मारून त्याच्या वक्षःस्थळावर लातेनें तडाखा झाडला. तेव्हां रावणास थरकांप सुटला व तसाच स्तब्ध राहिला. नंतर बिभीषण लोककल्याणकारी श्रीरामचंद्राकडे परत जाता झाला.

पुनि रावन तेहि हतेउ प्रचारी।
चला गगन कपि पूछ पसारी।
गहेसि पूछ कपिसहित उडाना।
पुनि फिरि भिरेउ प्रबल हनुमाना।
लरत अकास जुगल सम जोधा।
हनत एक एकहि करि क्रोधा।

फिरून रावण मारुतीस आवाज देऊन बदकाडत सुटला. तेव्हां मारुति पुच्छ पसरून आकाशांत उडाला. रावणहि पुच्छ धरून हनुमंतासह उडाला. फिरून आकाशांत हनुमंत त्याशीं धडाडीनें झुंजूं लागला. आकाशांत ते दोघेहि समकक्ष योद्धे लढत असतां परस्परांस सणसणून मारहाण करूं लागले.

सोहहिँ नभ छल बल बहु करहीँ ।
कज्जलगिरि सुमेरु जनु लरहीँ
बुधिबल निसिचर परइ न पारा ।
तब मारुतसुत प्रभु संभारा ।

आकाशांत अनेक प्रकारें युद्धलाघव करीत असतां ते जणुंकाय कज्जल पर्वत व सुमेरु पर्वतच लढत आहेत असें दिसलें. आपल्या मगदुरामाफक युक्ति व शक्ति सारी लढवून देखील रावण बिलकुल बेघमच, तेव्हां मात्र मारुतीस देव (राम) आठवला.

छंद—संभारि श्री-रघु-बीर धीर प्रचारि कपि रावन हन्यौ । महि परत पुनि उठि लरत देवन जुगल कहँ जय जय भन्यौ । हनुमंत संकट देखि मर्कट भालु क्रोधा-तुर चले । रनमत्त रावन सकल सुभट प्रचंड भुजबल दलमले ॥ २१ ॥

श्रीरघुवीरांचें स्मरण होतांच तो दमछाक झालेला मारुतिराय रावणास हांक देऊन फिरून हडसूंखडसूं लागला. तेव्हां ते दोघेहि जमिनीवर पडत आणि फिरून उठून लढत. देव त्या दोघांचाहि जयघोष करीत. हनुमंतावरील तें संकट पाहून वानर व ऋक्ष त्वेषानें रावणावर चालून गेले. तेव्हां रणमदानें धुंद झालेल्या रावणानें सर्व वानरवीरांचा आपल्या प्रचंड बाहुबलानें धुव्वा उडविला.

दो०—तब रघुबीर प्रचारे धाये कीस प्रचंड। कपिदल प्रबल देखि तेहि कीन्ह प्रगट पाखंड ॥ ११२ ॥

तेव्हां रघुवीरांच्या प्रेरणेनें तेच प्रचंड वानर फिरून धांवून आले. ते घणघोर वानरसैन्य पाहतांच रावणानें आपलें गारुड फैलाविलें.

चौ०—अंतरधान भयउ छन एका ।
पुनि प्रगटे खल रूप अनेका ।
रघु-पति-कटक भालु कपि जेते ।
जहँ तहँ प्रगट दसानन तेते ।
देखे कपिन्ह अमित दससीसा ।
भागे भालु बिकट भट कीसा ।
चले बलीमुख धरहिँ न धीरा ।
त्राहि त्राहि लछिमन रघुबीरा ।

तो दुष्ट रावण एका क्षणांत गुप्त होत होता आणि फिरून अनेक रूपांनीं प्रगट होत होता. रामसैन्यांत जेवढे ह्मणून भालू आणि कपि होते तितकेच रावण चौगर्दा दिसूं लागले. कपींना असंख्य रावण दिसूं लागतांच वानरऋक्षांपैकीं उमदे उमदे वीर देखील पोबारा करूं लागले. त्यांचा मुळींच धीर सुटला. ते पळतां पळतां रामलक्ष्मणांना स्वसंरक्षणार्थ आळवीत.

दहदिसि कोटिन्ह धावहिँ रावन ।
गर्जहिँ घोर कठोर भयावन ।
डरे सकल सुर चले पराई ।
जय कै आस तजहु अब भाई ।
सब सुर जिते एक दसकंधर ।
अब बहु भये तकहु गिरिकंदर ।

दहाहि दिशांनीं कोट्यवधि रावण धावत सुटले, आणि ते घोर, कर्कश आणि भयंकर गर्जना करूं लागले. तेव्हा सर्व देव भयानें पळत सुटले. ते म्हणत— बाबांनो ! आतां तर विजयाची आशाच नको. एकट्या रावणानें सगळे देव पायातळीं दडपले होते. आतां तर रावणच रावण आहेत. तेव्हां आतां आपणांस गिरिकंदरांचाच आश्रय शोधला पाहिजे.

रहे बिरंचि संभु मुनि ज्ञानीं ।
जिन्ह जिन्ह प्रभुमहिमा कछु जानी ।

ज्यांनीं ज्यांनीं प्रभूंचा महिमा यत्किंचित् तरी जाणला होता असे ब्रह्मदेव, शंकर, मुनिवर्य इत्यादि ज्ञानीच कायते स्वस्थ उभे होते.

छंद—जाना प्रताप ते रहे निर्भय कपिन्ह रिपु माने फुरे । चले बिचलि मर्कट भालु सकल कृपाल पाहि भयातुरे ॥ हनुमंत अंगद नील नल अतिबल लरत रनबाँकुरे । मर्दहिँ दसानन कोटि कोटिन्ह कपटभू भट अंकुरे ॥ २२ ॥

ज्यांनीं प्रभुप्रताप जाणला ते मात्र निडर उभे राहिले. कपींना ते सर्व रावण खरे वाटले. सर्व कपि व ऋक्ष भीतीनें गांगरून गेले व 'व हे कृपालो ! आमचें परित्राण करा !' असें म्हणत धूम ठोकूं लागले. हनुमंत, अंगद, नल, नील, असले बलाढ्य रणपट्टु मात्र लढत राहिले, आणि कोट्यवधि नकली रावण वीरांची त्यांनीं लांडगेतोड सुरूं ठेवली.

दो०—सुर बानर देखे बिकल हँसे कोसलाधीस । सजि सारंग एक सर हते सकल दससीस ॥ ११३ ॥

देव आणि वानर यांनीं खस्ता खाल्लेली पाहून कोसलाधीशांनीं हास्य केलें व धनुष्य सज्ज करून एकाच बाणानें सर्व नकली रावणांचा फडशा पाडला.

चौ०—प्रभु छन महुँ माया सब काटी ।
जिमि रबि उयें जाहिँ तम फाटी ।
रावन एक देखि सुर हरषे ।
फिरे सुमन बहु प्रभु पर बरषे ।

प्रभूंनीं क्षणमात्रांत, सूर्योदय होतांच अंधःकार जसा नष्ट होतो तद्वत्, सर्व मोहिनी विद्या निरस्त केली. तेव्हां एकच रावण पाहतांच देव आनंदानें परतले आणि प्रभूंवर विपुल पुष्पवर्षाव करूं लागले.

भुज उठाइ रघुपति कपि फेरे ।
फिरे एक एकन्ह तब टेरे ।
प्रभुबल पाइ भालु कपि धाये ।
तरल तमकि संजुगमहि आये ।

रघुपतींनीं भुजा वर करून वानरांना परत फिरविलें. तेव्हां तेहि इतरांना हांका मारून परतवूं लागले. प्रभूंचा आधार मिळतांच ऋक्ष व कपि धांवतच अत्यंत चपळतेनें व आवेशानें समरभूमीवर आले.

अस्तुति करत देव तेहि देखे ।
भयउँ एक मैं इन्ह के लेखे ।
सठहु सदा तुम्ह मोर मरायल ।
कहि अस कोपि गगनपथ धायल ।
हाहाकार करत सुर भागे ।
खलहु जाहु कहँ मोरे आगे ।

देव रामचंद्राची स्तुति करूं लागले हें पाहून रावण म्हणाला—तुमच्या समजुतीनें मी एकच उरलों काय ? रे षंढांनों ! तुम्ही तर सदैव माझे मारले कुटले. असें म्हणून तो आकाशमार्गानें धावला. तेव्हां देव हाहाःकार करीत पळून सुटले. ( तेव्हां तो म्हणाला ) माझ्या पुढें आतां तुम्ही लुच्चे पळून जाल तरी कोठें ?

बिकल देखि सुर अंगद धावा ।
कूदि चरन गहि भूमि गिरावा ।

देवांची ती त्रेधा मचलेली पाहून अंगद धांवला, आणि उड्डाण करून त्यानें रावणाला टांग धरून धरणीवर आदळलें.

छंद—गहि भूमि पार्‍यौ लात मार्‍यौ बालिसुत प्रभु पहिँ गयो । संभारि उठि दसकंठ घोर कठोर रव गर्जत भयो ॥ करि दाप चाप चढाइ दस संधान सर बहु बरषई । किये सकल भट घायल भयाकुल देखि निजबल हरषई ॥ २३ ॥

अंगदानें रावणास धरून जमिनीवर आदळलें आणि त्याची पादपूजा आरंभली. नंतर तो प्रभूकडे गेला. रावण फिरून सांवरून उठला आणि भयंकर कर्णकर्कश गर्जना करूं लागला. मोठ्या अविर्भावानें दहाही धनुष्यें चढवून तो अपार शरवृष्टि करूं लागला. त्यानें सर्व वीर घायाळ केले. कपिसैन्य त्रस्त बनलेलें पाहून त्यास आपल्या बाहुबलाबद्दल फार खुषी झाली.

दो०—तब रघुपति रावन के सीस भुजा सर चाप । काटे भये बहुत बढे जिमि तीरथ कर पाप ॥ ११४ ॥

तेव्हां रघुपतींनीं रावणाचे वीस हात धनुष्यबाणासकट तोडून पाडले. परंतु ते क्षेत्रांत आचरलेल्या पापाप्रमाणें फिरून उद्भवले.

चौ०—सिर भुज बाढि देखि रिपु केरी ।
भालुकपिन्ह रिस भई घनेरी ।
मरत न मूढ न कटेहु भुज सीसा ।
धाये कोपि भालु भट कीसा ।
बालितनय मारुति नल नीला ।
द्विबिद कपीस पनस बलसीला ।
बिटप महीधर करहिँ प्रहारा ।
सोइ गिरि तरु गहि कपिन्ह सो मारा ।

रावणाच्या शिरांची आणि हातांची वाढ पाहून ऋक्ष व कपी फारच चिडले. भुजा आणि शिरें तुटलीं तरीदेखील हा मठ्या अद्याप मरत नाहीं म्हणून भालु आणि कपिवीर संतापून धावले. महाबलाढ्य अंगद, मारुति, नल, द्विविद, पनस इत्यादि कपिश्रेष्ठांनीं वृक्ष आणि पाषाणांचा भडिमार केला. रावण तेच वृक्ष आणि पाषाण झेलून तसेंच ते कपींवर उलटवीत सुटला.

एक नखन्ह रिपुबपुष बिदारी ।
भागि चलहिँ एक लातन्ह भारी ।
तब नल नील सिरन्ह चढि गये ।
नखन्ह लिलार बिदारत भये ।

रुधिर बिलोकि सकोप सुरारी ।
तिन्हहिँ धरन कहँ भुजा पसारी ।
गहे न जाहिँ करन्ह पर फिरहीँ ।
जनु जुग मधुप कमलबन चरहीँ ।
कोपि कूदि दोउ धरेसि बहोरी ।
महि पटकत भजे भुजा मरोरी ।

एकानें रावणाचें वक्षःस्थल विदारण करून पलायन करावें तर दुसऱ्यानें त्याला लत्ताप्रहार करावा. नल, नील यांनीं तर त्याच्या मस्तकावर चढून नखांनीं त्याच्या मस्तकाची चिरफाड केली. मस्तकांतून रक्त वहातांना पाहतांच रावणानें क्रुद्ध होऊन त्यांना धरण्याकरितां आपले बाहू पसरिले. तथापि ते न सांपडतां कमलवनांत संचार करणाऱ्या दोन भृंगांप्रमाणें रावणाच्या हातांवरच फिरूं लागले. अखेर रावणानें चवताळून व उड्डाण करून त्या दोघांना धरिलें व त्यांचे मोंढे मुरडून व त्यांना धरणीवर आदळून एकदांचा तो कसाबसा तेथून निसटला.

पुनि सकोप दस धनु कर लीन्हे ।
सरन्ह मारि घायल कपि कीन्हे ।
हनुमदादि मुरछित करि बंदर ।
पाइ प्रदोष हरष दसकंधर ।
मुरछित देखि सकल कपिबीरा ।
जामबंत धायउ रनधीरा ।
संग भालु भूधर तरु धारी ।
मारन लगे प्रचारि प्रचारी ।

( त्या नंग्या नाचानें अगदीं घाईस आलेल्या ) रावणानें अखेरीस अति त्वेषानें दहाही धनुष्यें हातांत घेतलीं आणि बाणप्रहारानें कपींना त्रस्त बनविलें. त्यानें हनुमंतादिक वानरांना मूर्च्छित केलें. तितक्यांत प्रदोषसमय झाला. मग मात्र तो आनंदला. सर्व मौतबर कपि मूर्च्छित झालेले पाहून रणशूर जांबवंत धावून आला. त्याचेबरोबरचे वृक्षपर्वत धारण केलेले ऋक्षवीर हांक मारमारून रावणास झोडूं लागले.

भयउ क्रुद्ध रावन बलवाना ।
गहि पद महि पटकइ भट नाना ।
देखि भालुपति निज-दल-घाता ।
कोपि माँझ उर मारेसि लाता ।

तेव्हां बलाढ्य रावण क्रुद्ध झाला आणि असंख्य वीरांना तंगड्या धरधरून जमिनीवर आपटूं लागला. आपल्या सैन्याचा संहार चाललेला पाहतांच ऋक्षराज सणसणून गेला, आणि त्यानें रावणाच्या उरावर लाथ सन्नाटली.

छंद–उर लात घात प्रचंड लागत बिकल रथ तेँ महि परा । गहि भालु बीसहु कर मनहुँ कमलन्ह बसे निसि मधुकरा ॥ मुरछित बिलोकि बहोरि पद हति भालुपति प्रभु पहिँ गयो । निसि जानि स्यंदन घालि तेहि तब सूत जतनु करत भयो ॥ २४ ॥

ती अशा तडाख्यानें खटांत बसली कीं रावण एकदम चक्कर खाऊनच रथांतून खालीं उलथला. त्यानें वीसहि हातांत भालु धरलेले होते. ते निशासमयीं आंत भ्रमरांनीं निवास केलेल्या कमलाप्रमाणें भासत होते. फिरून त्यास जांबवंतानें आणखी दुसरा तसाच तडाखा दिला, परंतु त्यास बेशुद्ध पाहून तो रामचंद्राकडे चालता झाला. नंतर रात्र झालीशी पाहून रावणाच्या सारथ्यानें त्याला काळजीपूर्वक रथांतून लांबाविलें.

दो०–मुरछा बिगत भालु कपि सब आये प्रभु पास । निसिचर सकल रावनहिँ घेरि रहे अतित्रास ॥ ११५ ॥

इकडे शुद्धीवर आलेले सर्व ऋक्षकपि प्रभूंच्या आश्रयाला आले. तिकडे लंकेंत सर्व राक्षस अतींच त्रस्त झाल्यामुळें ( मूर्च्छित ) रावणास घेरून बसले.

चौ०–तेही निसि सीता पहिँ जाई ।
त्रिजटा कहि सब कथा सुनाई ।
सिर भुज बाढि सुनत रिपु केरी ।
सीता उर भइ त्रास घनेरी ।
मुख मलीन उपजी मन चिंता ।
त्रिजटा सन बोली तब सीता ।

त्याच रात्रीं सीतेकडे जाऊन त्रिजटेनें तिला सर्व वृत्तांत निवेदन केला. शत्रूच्या हस्तमस्तकांची वाढ ऐकून सीतेच्या मनाची भयंकर कालवाकालव झाली. तिचें मुख म्लान होऊन व तिचें मन सचिंत होऊन ती त्रिजटेला म्हणाली:—

होइहि काह कहसि किन माता ।
केहि बिधि मरिहि बिस्व-दुख-दाता ।
रघु-पति-सर सिर कटेहु न मरई ।
बिधि बिपरीत चरित सब करई ।
मोर अभाग्य जिआवत ओही ।
जेहि हौं हरि-पद-कमल बिछोही ।
जेहि कृत् कपट कनकमृग झूठा ।
अजहुँ सो दैव मोहि पर रूठा ।
जेहि बिधि मोहि दुख दुसह सहाये ।
लछिमन कहँ कटु बचन कहाये ।
रघु-पति-बिरह सबिष सर भारी ।
तकि तकि मार बार बहु मारी ।
ऐसेहु दुख जो राखु मम प्राना ।
सोइ बिधि ताहि जिआव न आना ।

माते ! काय होणार तें एकदां सांगत कां नाहींस ? या मेल्या दुनियेच्या मौतीचें आतां कोणत्या इलाजानें मढें शेकणार ? रघुवीरांच्या शरांनीं इतकें शिरकाण केलें तरीहि तो मेला मरतां मरत नाहीं ! दैवाचे हे सारे उलटे डाव पडत आहेत. ज्यानें मला प्रभुपदकमलांपासून दुरावलें तेंच माझें हें विक्षिप्त नशीब त्या मन्यास मरूं देत नाहीं. ज्यानें सुवर्णाचा खोटाच मायामृग घडविला तेंच माझें दैव मजवर अझूनदेखील रुष्टच आहे. ज्या दैवानें दुःसह ससेमिरा माझ्या मागें लावला, लक्ष्मणभावोजींना तीक्ष्ण वचन माझे मुखांतून वदविलें, ज्यानें रघुपतींच्या विरहरूपी कठोर आणि विषदिग्ध बाणांचा मजवर सतत सारखा मारा चालविला, आणि अशा या यातनेंतहि जें माझे प्राण जीवंत ठेवीत आहे तेंच हें माझें दुर्दैव. त्या शत्रूचेंदेखील प्राणरक्षण करीत आहे. त्याला जीवंत ठेवणारा इतर कोणीहि नाहीं.

बहु बिधि करति बिलाप जानकी ।
करि करि सुरति कृपानिधान की ।
कह त्रिजटा सुनु राजकुमारी ।
उर सर लागत मरइ सुरारी ।
प्रभु ता तें उर हतइ न तेही ।
एहि के हृदय बसति बैदेही ।

कृपानिधान प्रभूंचें वारंवार स्मरण करून जानकी अनेकप्रकारें विलाप करूं लागली, तेव्हां त्रिजटा म्हणाली—हे राजकुमारी, रावणाच्या हृदयांत बाणांचा प्रहार होईल तरच तो मरेल. परंतु प्रभु त्याचें हृदय विद्ध करीत नाहींत, कारण त्याच्या हृदयांत तुझा वास आहे.

**छंद–एहि के हृदय बस जानकी जानकी उर मम बास है । मम उदर भुवन अनेक लागत बान सब कर नास है । सुनि बचन हरष बिषाद मन अति देखि पुनि त्रिजटा कहा । अब मरिहि रिपु एहि बिधि सुनहि सुंदरि तजहि संसय महा ॥ २५ ॥**

( प्रभूंचा विचार असा कीं, ) त्याच्या ( रावणाच्या ) हृदयांत जानकीचा वास आहे, आणि तिच्या हृदयांत माझा वास आहे. पण माझ्या हृदयांत अनेक ब्रह्माण्डें वास करीत आहेत. ( तेव्हां रावणाच्या हृदयास ) बाण लागला असतां या सर्वांचाच नाश होणार. तें भाषण ऐकून सतीच्या मनास थोडासा धारापालट वाटला, परंतु विषाद मात्र जास्तच वाढला; तें पाहून त्रिजटा फिरून म्हणाली:—हे सुंदरि ! आतां शत्रू या रीतीनें खास मरणार हें ऐकून ठेव आणि तुला जी चुटपूट लागली आहे ती दूर सारः—

**दो०–काटत सिर होइहि बिकल छुटि जाइहि तव ध्यान । तब रावनकर कर हृदय शर मारिहिँ राम सुजान ॥११६॥**

शिरें तुटलीं असतां रावण जेव्हां विव्हल होईल आणि त्याचें तुजविषयींचें ध्यान सुटेल तेव्हां सुजाण श्रीरामचंद्र त्याच्या हृदयावर शरप्रहार करतील.

चौ०–अस कहि बहुत भाँति समुझाई ।
पुनि त्रिजटा निजभवन सिधाई ।
रामसुभाउ सुमिरि बैदेही ।
उपजी बिरहव्यथा अति तेही ।
निसिहि ससिहि निंदति बहु भाँती ।
जुग सम भई न राति सिराती ।
करति बिलाप मनहिँ मन भारी ।
रामबिरह जानकी दुखारी ।
जब अति भयउ बिरह उर दाहू ।
फरकेउ बाम नयन अरु बाहू ।
सगुन बिचारि धरी मन धीरा ।
अब मिलिहहिँ कृपाल रघुबीरा ।

असें सांगून व सीतेची अनेकप्रकारें समजूत घालून त्रिजटा आपल्या घरीं गेली. प्रभु रामचंद्रांच्या शीलाचें स्मरण होऊन जानकीची विरहव्यथा प्रबळ होऊं लागली. ती रात्रीस आणि चंद्रास खुपच निर्भर्त्सू लागली. ती रात्र तिला युगाप्रमाणें वाटून ती संपतां संपेना. रामविरहामुळें कालवाकालव होऊन जानकी मनांतल्यामनांत अत्यंत चडफडूं लागली. जेव्हां विरहामुळें तिच्या उराचा मनस्वी दाह होऊं लागला तेव्हां तिचा वामनेत्र आणि वामहस्त स्फुरण पावूं लागले. त्या शकुनाचा विचार करून तिच्या मनाला धीर आला आणि आतां दयाघन रघुवीरांचें दर्शन होणार असें तिला वाटलें.

इहाँ अर्धनिसि रावन जागा ।
निजसारथि सन खीझन लागा ।
सठ रनभूमि छडायसि मोही ।
धिग धिग अधम मंदमति तोही ।
तेहिँ पद गहि बहु बिधि समुझावा ।
भोर भये रथ चढि पुनि धावा ।

इकडे मध्यरात्रीं रावण शुद्धीवर आला आणि आपल्या सारथ्याची निर्भर्त्सना करून म्हणालाः— शठा ! मला रणभूमींतून माघारा आणलेंस !रे अधमा, मूढा, तुला धिक्कार असो ! नंतर सारथ्यानें त्याचे पाय धरिले आणि अनेक प्रकारें त्याची समजूत घातली. प्रातःकाळ होतांच फिरून तो रथांत बसून भराऱ्या मारीत सुटला.

सुनि आगमन दसानन केरा ।
कपिदल खरभर भयउ घनेरा ।
जहँ तहँ भूधर बिटप उपारी ।
धाये कटकटाइ भट भारी ।

दशानन आला हें ऐकतांच कपिसैन्यांत खुपच खळबळ उडाली. ठिकठिकाणचे पर्वत आणि वृक्ष उपटून ते फाकडे कपियोद्धे दांत खात निघाले.

छंद—धाये जो मर्कट बिकट भालु कराल कर भूधर धरा । अति कोपि करहिँ प्रहार मारत भजि चले रजनीचरा ॥ बिचलाइ दल बलवंत कीसन्ह घेरि पुनि रावन लियो । चहुँ दिसि चपेटन्हि मारि नखन्हि बिदारि तनु ब्याकुल कियो ॥ २६ ॥

ते पराक्रमी ऋक्ष आणि मर्कट भयंकर पर्वत घेऊन जे धांवले ते अत्यंत त्वेषानें राक्षसांना कुटतच सुटले. तेव्हां राक्षसांनीं सारखा सूंबाल्या आरंभिला. राक्षससैन्याची दाणादाण उडविल्यानंतर त्या बलाढ्य वानरांनीं रावणाला घेरलें आणि त्यास चोहोंकडून चप्राका मारून व नखांनीं ओरबडून नकोनकोसें करून सोडिलें.

दो०—देखि महा मर्कट प्रबल रावन कीन्ह बिचार । अंतरहित होइ निमिष महँ कृत माया बिस्तार ॥ ११७ ॥

माकडांचा तो नंगा नाच पाहून रावणानें विचार केला आणि एका क्षणांत गुप्त होऊन त्यानें आपलें मायाजाळ फैलाविलें.

तोमरछंद—जब कीन्ह तेहि पाखंड ।
भये प्रगट जंतु प्रचंड ॥
बेताल भूत पिसाच । कर धरे धनु नाराच ॥
जोगिनि गहे करवाल । एक हाथ मनुजकपाल ॥
करि सद्य सोनित पान । नाचहिँ करहिँ बहु गान ॥
धरु मारु बोलहिँ घोर । रहि पूरि धुनि चहुँ ओर ॥
मुख बाइ धावहिँ स्वान । तब लगे कीस परान ॥

रावणानें माया पाघळल्यामुळें प्रचंड प्राणी निर्माण झाले. वेताळ, भूत, पिशाच वगैरेंनींदेखील हातांत धनुर्बाण धारण केले. एका हातांत तरवार आणि दुसऱ्यांत नरकपाल अशा योगिनी ताज्या रक्ताचें प्राशन करीत आणि यथेच्छ धिंगाणा घालून उडाणटप्पूसारख्या गाणीं गात. धरा आणि मारा या भयानक आरोळ्यांच्याच निदानानें वातावरण दणाणून गेलें. श्वान भोंकत धांवू लागले तेव्हां मात्र वानरांनीं पळ काढला.

जहँ जाहिँ मर्कट भागि । तहँ बरत देखहिँ आगि ॥
भये बिकल बानर भालु । पुनि लाग बरषइ बालु ॥
जहँ तहँ थकित करि कीस । गर्जेउ बहुरि दससीस ॥
लछिमन कपीससमेत । भये सकल बीर अचेत ॥

जेथें म्हणून मर्कट पळून जात तेथें त्यांस आगीचाच जळफळाट दिसे. त्या घनचक्रामुळें ऋक्षवानर घाबरून जात, त्यांतच आणखी त्यांचेवर वाळूचाहि पाऊस पडूं लागे. ह्याप्रमाणें रावणानें कपी जेथल्या तेथेंच थोपून टाकले. दशाननाच्या, गर्जनाहि सुरूच होत्याः— लक्ष्मणसुग्रीवांसहित सर्व वीर नामोहरम झाले.

हा राम हा रघुनाथ। काहि सुभट मींजहिँ हाथ ॥
एहि बिधि सकल बल तोरि। तेहि कीन्ह कपट बहोरि
प्रगटेसि बिपुल हनुमान। धाये गहे पाषान ॥
तिन्ह राम घेरे जाइ। चहुँ दिसि बरूथ बनाइ ॥
मारहु धरहु जनि जाइ। कटकटहिँ पूछ उठाइ ॥
दह दिसि लँगूर बिराज। तेहि मध्य कोसलराज ॥

'हा राम! हा रघुनाथ!' याप्रमाणें उसासे टाकीत निधडे वीर देखील हात चोळीत जागच्या जागींच थबकले. ह्याप्रमाणें रावणानें सर्वांची घुमसचक्री उडवून फिरून दुसराच एक मायाप्रकार आरंभिला. अनेक हनुमान् प्रकट होऊन ते पाषाण घेऊन धांवले. त्यांनीं आपापल्या टोळ्या बनवून व रामावर चाल करून त्यांची चोहोंबाजूंनीं कोंडी केली. मारा, धरा, सोडूं नका, असे शब्द ते कपि शेपट्या वर करून व दांत खाऊन उच्चारीत. त्या उंच शेपट्यांच्या गराड्यांत देखील रघुवीर फार छान शोभूं लागले.

छंद–तेहि मध्य कोसलराज सुंदर स्याम-
तन सोभा लही। जनु इंद्रधनुष
अनेक की बर बारि तुंग तमालही ॥
प्रभु देखि हरष बिषाद उर सुर बदत
जय जयजय करी। रघुबीर एकहि तीर
कोपि निमेष महँ माया हरी ॥ २७ ॥

गराड्याच्या मध्यभागीं श्रीकोसलाधीशांच्या सुंदर श्यामतनूचें दृश्य असें मनोज्ञ वाटलें कीं, जणुंकाय तमालवृक्षाच्या सभोंवार अनेक इंद्रधनुष्यांचा जाड व सुंदर असा वर्तुळच उभारला आहे. त्या वेळीं प्रभूस पाहून देवांच्या अंतःकरणांत हर्ष आणि विषाद दोन्हीहि उपस्थित झाले. ते प्रभूंचा जयजयकार करूं लागले, रघुवीरांनीं क्रुद्ध होऊन एकाच बाणानें क्षणमात्रांत त्या राक्षसी मायेची कोंडी पार फोडून टाकली.

छंद–माया बिगत कपि भालु हरषे बिटप
गिरि गहि सब फिरे। सरनिकर छाडे
राम रावन-बाहु-सिर-पुनि महि गिरे ॥
श्री-राम-रावन समरचरित अनेक कल्प
जो गावहीँ। सत सेष सारद निगम
कवि तेउ तदपि पार न पावहीँ ॥ २८ ॥

मायाध्वंस झाल्यामुळें कपि आणि ऋक्ष हर्षित झाले व वृक्षपाषाण घेऊन सर्वजण परत फिरले. श्रीरामचंद्रांनीं शरवृष्टि आरंभिली. तेणेंकरून रावणाचीं शिरें आणि हात वारंवार धरणीवर तुटून पडूं लागले. श्रीरामरावणांची युद्धकथा अनेक कल्पपर्यंत शतावधि शेष, शारदा, वेद आणि कवी गात राहतील तरीदेखील ती संपणार नाहीं.

दो०–ता के गुनगन कछु कहे जडमति
तुलसीदास। निज-पौरुष-अनुसार
जिमि मसक उडाहिँ अकास ॥ ११८ ॥

ज्याप्रमाणें मशक आकाशांत उड्डाण करतो तद्वत् म्यां मन्द तुलसीदासानें त्या प्रभूंचें हें कसेंबसें तरी गुणगण वर्णन केलें आहे.

दो०–काटे सिरभुज बार बहु मरत न भट
लंकेस। प्रभु क्रीडत मुनि सिद्ध सुर
ब्याकुल देखि कलेस ॥ ११९ ॥

अनेकवार हस्तमस्तकें तोडलीं तरी रावणवीर मरेना. प्रभूंचा तो खेळ होत होता, पण देव, मुनि, सिद्ध यांना मात्र त्यांचे ते क्लेश पाहून तळमळ सुटे.

चौ०–काटत बढहिँ सीससमुदाई।
जिमि प्रतिलाभ लोभ अधिकाई।
मरइ न रिपु स्रम भयउ बिसेखा।
राम बिभीषिनतन तब देखा।

ज्याप्रमाणें प्रत्येक लाभागणिक लोभ अधिकाधिक वाढत जातो, तद्वत् शिरांचा समुदाय तोडला तरी तो सारखा वाढत जाई व शत्रू मरेनासा होई. श्रीराम विशेष कष्टी झाले. तेव्हां रामांनीं बिभीषणाकडे नजर फेरली.

उमा काल मरु जा कीं ईछा।
सोइ प्रभु जन कर प्रीतिपरीछा।

( शंकर म्हणाले )—हे पार्वति! ज्या प्रभूंची नुसती इच्छामात्र कालदेखील खतम करूं शकते ते भगवान् भक्तांच्या भक्तीची परीक्षा पाहूं लागले.

सुनु सर्बज्ञ चराचरनायक।
प्रनतपाल सुर-मुनि-सुख-दायक।
नाभीकुंड सुधा बस या के।
नाथ जियत रावन बल ता के।
सुनत बिभीषनबचन कृपाला।
हरषि गहे कर बान कराला।

( बिभीषण म्हणाला )—हे सर्वज्ञ, चराचरनायक, भक्तपालक, सुरमुनिसुखदायक प्रभो! ध्यानांत असावें

कीं, ह्याच्या नाभिस्थानीं अमृत आहे म्हणून, हे नाथ! हा रावण त्याचेच बळावर शिरसलामत अजूनहि आहेच. बिभीषणाचें तें वचन श्रवण करून दयाघन प्रसन्न झाले व त्यांनीं हस्ताचे ठायीं एक प्रखर बाण घेतला.

असगुन होन लगे तब नाना।
रोवहिँ बहु सृगाल खर स्वाना।
बोलहिँ खग जग-आरति-हेतू।
प्रगट भये नभ जहँ तहँ केतू।
दस दिसि दाह होन अति लागा।
भयउ परब बिनु रविउपरागा।
मंदोदरि उर कंपति भारी।
प्रतिमा स्रवहिँ नयनमग बारी।

तेव्हां अनेक दुश्चिन्हें जाणवूं लागलीं. अनेक खर, शृगाल आणि श्वान हंबरडा फोडूं लागले. (उलूकादि) पक्षी जगत्पीडासूचक शब्द करूं लागले. अंतरिक्षांत चोहोंकडे धूमकेतू उदय पावले. सर्व वातावरण असह्य तापून गेलें. पर्वकाल नसतांहि सूर्यास ग्रहण लागलें. मंदोदरीच्या हृदयांत भारीच कापरें भरलें. (पाषाणांच्या) मूर्तींचे नयन अश्रुपात करूं लागले.

छंद–प्रतिमा स्रवहिँ पबि पात नभ अति-बात बहु डोलति मही। बरषहिँ बलाहक रुधिरु कच रज असुभ अति सक को कही। उतपात अमित बिलोकि नभ सुर बिकल बोलहिँ जय जये। सुर सभय जानि कृपाल रघुपति चाप सर जोरत भये॥ २९॥

प्रतिमा अश्रू गाळूं लागल्या. आकाशांतून वज्रपात होऊं लागला. सोसाट्याचा वारा वाहूं लागला. धरणीकंप होऊं लागले. मेघ रक्त, केस, धूळ इत्यादींचा वर्षाव करूं लागले. दुश्चिन्हें इतकीं होऊं लागलीं कीं, सांगतां पुरवत नाहींत. ते असंख्य उत्पात पाहून आकाशांत देव भयभीत होऊन (प्रभूंचा) नामघोष करूं लागले. देव भयाकुल जाणून दयाघन रघुपतींनीं धनुष्यावर बाण चढविले.

दो०–खैँचि सरासन स्रवन लगि छाडे सर एकतीस। रघु-नायक-सायक चले मानहुँ काल फनीस॥ १२०॥

आकर्ण धनुष्य ओढून रघुवीरानीं एकतीस बाण सोडले. ते जातांना कालसर्पाप्रमाणें भासले.

चौ०–सायक एक नाभिसर सोखा।
अपर लगे सिर भुज करि रोखा।
लेइ सिर बाहु चले नाराचा।
सिर-भुज-हीन रुंड महि नाचा।
धरनि धसइ धर धाव प्रचंडा।
तब प्रभु सर हति कृत जुग खंडा।

एका बाणानें नाभीतलें अमृतकुंड शोषिलें, आणि बाकीच्या बाणांनीं वेगानें मस्तकें आणि भुजा यांचा वेध केला व परत तोडून ते घेऊन निघाले. शिरभुजाहीन रावणाचें एकटें धडच धरणीवर धिंगाणा घालूं लागलें. त्या धिप्पाड धडाच्या धिंगाण्यानें पृथ्वी ढासळूं लागली. तेव्हां प्रभूंनीं बाण मारून त्याचे दोन तुकडे केले.

गर्जेउ मरत घोररव भारी।
कहाँ राम रन हतउँ प्रचारी।
डोली भूमि गिरत दसकंधर।
छुभित सिंधु सरि दिग्गज भूधर।
धरनि परेउ दोउ खंड बढाई।
चापि भालु–मर्कट–समुदाई।
मंदोदरि आगे भुज सीसा।
धरि सर चले जहाँ जगदीसा।
प्रबिसे सब निषंग महुँ जाई।
देखि सुरन्ह दुंदुभी बजाई।

मरतांना रावणानें खूपच ताणून 'राम कोठें आहे? त्याला मी आव्हानून मारीन, अशी गर्जना केली.' दशाननाची इतिश्री झाली तेव्हां धरणी कांपूं लागली व समुद्र, नद्या, दिग्गज आणि पर्वत क्षुब्ध झाले. त्याचीं दोन शकलें होऊन तो मरून पडला असतां त्यानें कित्येक ऋक्षवानरांच्या समुदायांना आपल्या अंगाखालीं चेंगरून टाकलें. रावणाचीं हस्तमस्तकें मंदोदरीच्या समोर ठेवून ते बाण जगदीश श्रीरामचंद्राकडे आले व त्यांच्या भात्यामध्यें सर्व प्रविष्ट झाले. तें पाहून देवांनीं दुंदुभी वाजविल्या.

तासु तेज समान प्रभुआनन।
हरषे देखि संभु चतुरानन।
जय जय धुनि पूरी ब्रह्मंडा।
जय रघुबीर प्रबल-भुज-दंडा।

बरषहिँ सुमन देव-मुनि-बृंदा।
जय कृपाल जय जयति मुकुंदा।

रावणाचें तेज (प्राणज्योति) प्रभूंच्या मुखांत प्रविष्ट झालें. तें पाहून शिवब्रह्मादिकांस हर्ष झाला. हे प्रबलभुजदण्डा श्रीरघुवीरा! तुझा जयजयकार असो! हे दयाघन मुकुंदा, तुझा जयजयकार असो! असा जयध्वनि ब्रह्माण्डांत भरून गेला. देवमुनिगणांनीं पुष्पवृष्टि केली.

छंद-जय कृपाकंद मुकुंद द्वंदहरन सरन-
सुख-प्रद प्रभो। खल-दल-बिदारन
परमकारन कारुनीक सदा बिभो॥
सुर सुमन बरषहिँ हरष संकुल बाज
दुंदुभि गहगही। संग्राम अंगन रामअंग
अनंग बहु सोभा लही॥ ३०॥

हे कृपासागरा, मुकुंदा, द्वंद्वहरणा, शरणसुखप्रदा, खलदलध्वंसका, आदिकारणा, दयाघना, शाश्वता, अखिलजनका! तुझा विजय असो. देवांनीं पुष्पवृष्टि करून हर्षानें दुंदुभि त्राहाटिल्या. रणांगणावर विराजमान असलेल्या प्रभु रामचंद्राच्या मूर्तीमध्यें असंख्य मदनांचें लावण्य मुसमुसूं लागलें.

छंद-सिर जटामुकुट प्रसून बिच बिच अति
मनोहर राजहीँ। जनु नीलगिरि पर
तड़ित पटल समेत उडुगन भ्राजहीँ॥
भुजदंड सर कोदंड फेरत रुधिरकन तन
अति बने। जनु रायमुनी तमाल पर
बैठीँ बिपुल सुख आपने॥ ३१॥

प्रभूंच्या मस्तकावरील जटामुकुटांस इतस्ततः खोवलेलीं फुलें अत्यंत मनोहर रीतीनें शोभूं लागलीं तेव्हां असें वाटे कीं जणूं नीलपर्वतावर विद्युत्पटलासमवेत तारांगणच शोभत आहे. तसेंच धनुष्यबाण हातानें फिरवीत असतां त्यांच्या शरीरावरील रक्ताचे बिंदु असे शोभत कीं जणूंकाय तमालवृक्षावर अत्यंत सुखानें रायमुनि[1] यांचे थवेच बसले आहेत.

दो०-कृपा दृष्टि करि बृष्टि प्रभु अभय किये
सुरबृंद। भालु कीस सब हरषे जय
सुखधाम मुकुंद॥ १२१॥

कृपादृष्टीची वृष्टि करून प्रभूंनीं देववृंदांना निर्भय केलें. सर्व ऋक्षवानर आनंदानें 'जयसुखधाम मुकुंद' अशी गर्जना करूं लागले.

चौ०-पतिसिर देखत मंदोदरी।
मुरछित बिकल धरनि खसि परी।
जुबतिबृंद रोवत उठि धाईँ।
तेहि उठाइ रावन पहिँ आईँ।
पतिगति देखि ते करहिँ पुकारा।
छूटे कच नहिँ बपुष संभारा।
उरताडना करहिँ बिधि नाना।
रोवत करहिँ प्रताप बखाना।

पतीचीं शिरें पाहून मंदोदरी दुःखानें विव्हल होत्साती धरणीवर मूर्च्छा येऊन धाडकन् पडली. इतर स्त्रिया रुदन करीत होत्या, त्या उठल्या आणि त्यांनीं धांवत जाऊन मंदोदरीला उचलून रावणाच्या प्रेताजवळ नेलें. पतीची ती अवस्था पाहून तिनें हंबरडा फोडला. तिचे केस सुटून तिला देहाचीहि शुद्ध उरली नाहीं. ती नानाप्रकारें वक्षःस्थळ बडवून धाय मोकलून रावणाचे पराक्रम आठवूं लागली:—

तव बल नाथ डोल नित धरनी।
तेजहीन पावक ससि तरनी।
सेष कमठ सहि सकहिँ न भारा।
सो तनु भूमि परेउ भरि छारा।
बरुन कुबेर सुरेस समीरा।
रनसनमुख धर काहु न धीरा।
भुजबल जितेहु काल जम साईँ।
आजु परेहु अनाथ की नाईँ।
जगतबिदित तुम्हारि प्रभुताई।
सुत परिजन बल बरनि न जाई।

नाथा! आपल्या प्रतापभयानें पृथ्वी नित्य कांपत असे आणि अग्नि, चंद्र आणि सूर्य हे देखील निस्तेज पडत असत. जिचा भार शेष आणि कच्छदेखील सहन करूं शकत नसत ती ही आपली तनु आतां धुळीनें माखलेली या धरणीवर लोळत आहे. वरुण, कुबेर, इंद्र आणि वायु यांना देखील रणांगणावर आपण देमायधरणीठाय करून सोडलें. महाराज! आपण आपल्या बाहुबलानें काल व यम यांना देखील टेकीस आणले तेच आपण आज बेवारसासारखे लोळत पडले आहां! आपला प्रभाव सर्व जगांत महशूर होता.

[1] हे पक्षी चिमणीपेक्षांहि चिमणे असतात. त्यांचा गहरा लाल रंग फारच खुलून दिसतो-

आपल्या लेकावळ्याची आणि गोतावळ्याचीदेखील तशीच अवाढव्य शक्ति.

रामबिमुख अस हाल तुह्मारा।
रहा न कोउ कुल रोवनिहारा।
तव बस बिधिप्रपंच सब नाथा।
सभय दिसिप नितनावहिँ माथा।
अब तव सिर भुज जंबुक खाहीँ।
रामबिमुख यह अनुचित नाहीँ।
कालबिबस पति कहा न माना।
अग-जग-नाथु मनुज करि जाना।

परंतु आपण रामाशीं खाजवून खरूज काढल्यामुळें आपणावर हा असा कायमचा काळा पडदा पडला आहे कीं आपल्यासाठीं टिपें गळण्यास देखील आपल्या साऱ्या कुळांत एक देखील कोणी आज शिल्लक नाहीं. सरकार विधात्याची अखिलसृष्टि आपल्या काबूंत. अवघे दिक्पालदेखील दरदरून आपल्या समोर झुकते मुजरे करीत असत. पण आजची घडी अशी कीं त्याच आपल्या हातामुंडक्यांवर कोल्हयाकुत्र्यांच्या मेजवान्या सपाटून चालू आहेत. रामाच्या नाकांत काड्या कुचकणारांना लायक बक्षीस तें हें, हें ठरलेलेंच. आपला काळ सोकावला म्हणूनच आपणा मालकास माझी अर्जी पटली नाहीं. अख्ख्या विश्वाच्या धन्यास एक असातसा मामुली माणूस आपण समजलांत !

**छंद—जानेउ मनुज करि दनुज-कानन-दहन-पावक हरि स्वयं। जेहि नमत सिव ब्रह्मादि सुर पिय भजेहु नहिँ करुनामयं। आजनम तेँ पर-द्रोह-रत पापौघमय तव तनु अयं। तुह्महूँ दियो निजधाम राम नमामि ब्रह्म निरामयं॥ ३२॥**

जो राक्षसरूप काननास दहन करणारा अग्नि, ज्यास शिव, ब्रह्मा, इंद्रादि वंदन करितात व जो साक्षात् श्रीहरि आहे, अशा त्या दयाघन प्रभूस आपण शरण न जातां त्यास नुसता माणसाची जात समजलांत. केवळ आपली अख्खी हयात आपण लोकांवर सुलतानी गाजविण्यांत घालविली. ही आपली कुडीदेखील केवळ पापांची कर्मनाशा नदीचं म्हणवेल. असें असूनहि आपणांस देखील ज्यानें स्वपद अर्पण केलें त्या अक्षर परब्रह्मास माझा हा नमस्कार असो.

**दो०—अहह नाथ रघुनाथ सम कृपासिंधु नहिँ आन। मुनिदुर्लभ जो परमगति तोहि दीन्हि भगवान॥ १२२॥**

अहाहा ! हे नाथ ! ज्या भगवंतानें मुनींनाहि दुर्लभ अशी परमगति आपणांस ओपली; त्या रघुनाथासारखा दयेचा दर्याव अन्य कोणीहि नाहीं.

चौ०—मंदोदरीबचन सुनि काना।
सुर मुनि सिद्ध सबन्हि सुखमाना।

मंदोदरीचें तें भाषण ऐकून सुर, मुनि, सिद्ध इत्यादि सर्वांना संतोष झाला.

अज महेस नारद सनकादी।
जे मुनिवर परमारथबादी।
भरि लोचन रघुपतिहिँ निहारी।
प्रेममगन सब भये सुखारी।

ब्रह्मदेव, शंकर आणि नारदसनकादिक वेदांततत्त्ववादी मुनीश्वर हेदेखील रघुपतीस डोळे भरून पहात असतां प्रेममग्न होत्साते सुखी झाले.

रुदन करत बिलोकि सब नारी।
गयउ बिभीषन मन दुख भारी।
बंधुदसा देखत दुख कीन्हा।
राम अनुज कहँ आयसु दीन्हा।
लछिमन जाइ ताहि समुझायउ।
बहुरि बिभीषन प्रभु पहिँ आयउ।

रावणाच्या सर्व स्त्रिया आकांत करतांना पाहून मनांत अत्यंत दुःखित होत्साता बिभीषण त्यांचेकडे गेला. बंधूची ती दशा पाहून त्यालाहि दुःख झालें. तेव्हां प्रभूंनीं लक्ष्मणास आज्ञा केली, त्याप्रमाणें लक्ष्मणानें बिभीषणाकडे जाऊन त्याचें सांत्वन केलें. तेव्हां बिभीषण फिरून श्रीरामचंद्राकडे परत आला.

कृपादृष्टि प्रभु ताहि बिलोका।
करहु क्रिया परिहरि सब सोका।
कीन्हि क्रिया प्रभुआयसु मानी।
बिधिवत देस काल जिय जानी।

प्रभूंनीं कृपादृष्टीनें त्याचेकडे अवलोकन केलें आणि सांगितलें कीं, आतां सर्व दुःख गिळून रावणाची क्रिया कर. तेव्हां प्रभूंच्या आज्ञेनें बिभीषणानें देशकालवर्तमानानुसार यथाविधि क्रिया केली.

दो०—मंदोदरी आदि सब देइ तिलांजलि
ताहि । भवन गईं रघुपति गुन गन
बरनत मन माहिं ॥ १२३ ॥

मंदोदरी आदिकरून सर्व स्त्रियांनीं रावणास तिलांजलि अर्पण केली. नंतर रघुवीरांच्या गुणगणांचें मनःपूर्वक वर्णन करीत त्या स्वगृहीं गेल्या.

चौ०—आइ बिभीषन पुनि सिर नायउ ।
कृपासिंधु तब अनुज बोलायउ ।
तुम्ह कपीस अंगद नल नीला ।
जामवंत मारुति नयसीला ।
सब मिलि जाहु बिभीषन साथा ।
सारेहु तिलक कहेउ रघुनाथा ।
पितावचन मैं नगर न आवउँ ।
आपु सरिस कपि अनुज पठावउँ ।

फिरून बिभीषणानें येऊन प्रभूस वंदन केलें. तेव्हां कृपासिंधु रघुनाथांनीं लक्ष्मणास बजाविलें कीं—तूं, सुग्रीव, अंगद, नल, नील, जांबवंत आणि हनुमंत नीतिकुशल आहांत; तुम्ही सर्वजण मिळून बिभीषणास न्या आणि राज्याभिषेक करा. नंतर ते ( बिभीषणास उद्देशून ) म्हणाले कीं, पित्याच्या आज्ञेस्तव मला नगरांत जातां येत नाहीं म्हणून मत्तुल्य माझे कपि आणि अनुज यांस मी पाठवीत आहे.

तुरत चले कपि सुनि प्रभुबचना ।
कीन्ही जाइ तिलक कै रचना ।
सादर सिंहासन बैठारी ।
तिलक सारि अस्तुति अनुसारी ।
जोरि पानि सबहीं सिर नाये ।
सहित बिभीषन प्रभु पहिं आये ।

प्रभूंची आज्ञा श्रवण करून ते सर्वजण लागलींच निघाले व त्यांनीं जाऊन राज्याभिषेकोत्सवाची तयारी केली. नंतर त्यांनीं बिभीषणास आदरपूर्वक सिंहासनावर बसवून अभिषेक केला आणि त्यास योग्य ताजीमतवाजा व सलामी दिली आणि बिभीषणाला घेऊन नंतर ते प्रभूकडे परत आले.

तब रघुबीर बोलि कपि लीन्हे ।
कहि प्रियबचन सुखी सब कीन्हे ।

नंतर रघुवीरांनीं वानरांना बोलावून घेतलें आणि त्यांच्याशीं प्रेमानें बोलून सर्वांस खुष केलें.

छंद—किये सुखी कहि बानी सुधासम बल
तुम्हारे रिपु हयो । पायो बिभीषन राजु
तिहुँ पुर जस तुम्हारो नित नयो ॥
मोहि सहित सुभ कीरति तुम्हारी परम
प्रीति जे गाइ हैं । संसारसिंधु अपार
पार प्रयास बिनु नर पाइहैं ॥ ३ ॥

‘ केवळ तुमच्याच बळावर मी शत्रुवध केला आणि बिभीषणाला राज्यपद मिळवून दिलें, ही तुमची कीर्ति त्रैलोक्यांत नित्य अभिनव अशी गाजत राहील. माझ्यासहवर्तमान तुमचें पावन यश जे नर परमप्रीतीनें गातील ते आयासावांचून हा अपार भवसागर पार करतील.’ अशा प्रकारें अमृततुल्य भाषण करून प्रभूंनीं सर्वांस सुखी केलें.

दो०—प्रभु के बचन स्रवन सुनि नहिं
अघाहिं कपिपुंज । बार बार सिर
नावहीं गहहिं सकल पदकंज ॥ १२४ ॥

प्रभूंचें भाषण ऐकून ऋक्षवानरसमुदायाची तृप्ति होईना. ते सर्वजण रामचरणारविंदास कुरवाळून वारंवार वंदन करूं लागले.

चौ०—पुनि प्रभु बोलि लियउ हनुमाना ।
लंका जाहु कहेउ भगवाना ।
समाचार जानकिहिं सुनावहु ।
तासु कुसल लेइ तुम्ह चलि आवहु ।

नंतर प्रभूंनीं हनुमंतास पाचारिलें आणि सांगितलें कीं लंकेंत जाऊन जानकीस सर्व हकीकत कळीव आणि तिचें कुशलवृत्त घेऊन ये.

तब हनुमंत नगर महँ आये ।
सुनि निसिचरी निसाचर धाये ।
बहु प्रकार तिन्ह पूजा कीन्ही ।
जनकसुता दिखाइ पुनि दीन्ही ।

नंतर मारुतिराय नगरांत आले. त्यांचें आगमन ऐकतांच राक्षस आणि राक्षसी यांनीं लगबगीनें येऊन अनेक रीतीनें त्यांचा सत्कार केला व नंतर त्यांस जानकी दाखविली.

दूरिहिं तें प्रनाम कपि कीन्हा ।
रघु-पति-दूत जानकी चीन्हा ।
कहहु तात प्रभु कृपानिकेता ।
कुसल अनुज-कपि-सेन-समेता ।

हनुमंतांनीं दुरूनच जानकीला प्रणाम केला. तिनें त्यास रघुपतींचा दूत म्हणून ओळखिलें व ती म्हणाली:—वत्सा! सांग, अनुज आणि कपिसैन्य यांच्या सहवर्तमान कृपानिधान कुशल आहेत ना रे?

सब बिधि कुसल कोसलाधीसा।
मातु समर जीतेउं दससीसा।
अबिचल राज बिभीषन पावा।
सुनि कपिबचन हरष उर छावा।

(हनुमंत म्हणाले—) माते! कोसलाधीशांचें सर्वतोपरी कुशल आहे. रणांगणांत त्यांनीं रावणाला पादाक्रांत केलें व बिभीषणास अढळ राज्यपदीं बसविलें. मारुतीचें तें वचन श्रवण करून सीतेच्या हृदयांत आनंदाचा कडेलोट झाला.

**छंद—अतिहरष मन तन पुलक लोचन सजल कह पुनि पुनि रमा। का देउँ तोहि त्रैलोक महँ कपि किमपि नहिँ बानी समा॥ सुनु मातु मैँ पायउँ अखिल जग-राज आजु न संसयं। रन जीति रिपुदल-बंधुयुत पस्यामि राममनामयं॥ ३४॥**

चित्ताला पराकाष्ठेचा आनंद झाल्यामुळें सीतेच्या शरीरावर रोमांच उभे राहून नेत्र अश्रूंनीं व्याप्त झाले. ती वारंवार म्हणूं लागली—हे हनुमन्! तुला मीं आतां काय द्यावें? तूं जी वार्ता आणलीस तिला शोभेसें त्रैलोक्यांत देण्याजोगें कांहींच आढळत नाहीं रे! तेव्हां मारुति म्हणाले, माते! ऐकून घे. शत्रूस रणांत जिंकून सैन्य आणि बंधु यांचेसहवर्तमान मी जो हा माझ्या रामप्रभूस सुरक्षित पहात आहे त्या योगानें निःसंशय आज मी त्रैलोक्याचें राज्य पावलों आहे.

**दो०—सुनु सुत सदगुन सकल तव हृदय बसहु हनुमंत। सानुकूल कोसलपति रहहु समेत अनंत॥ १२५॥**

(सीता म्हणाली—) वत्सा! सर्व सद्गुण तुझे हृदयांत वास्तव्य करोत आणि लक्ष्मणासहवर्तमान कोसलाधीश्वर प्रसन्नतापूर्वक तेथेंच राहोत.

**चौ०—अब सोइ जतन करहु तुम्ह ताता। देखउँ नयन स्याम मृदुगाता।**

आतां जेणेंकरून हे तात! माझ्या नेत्रांचें त्या मृदुलगात्र श्याममूर्तीच्या दर्शनानें पारणें फेड.

तब हनुमान राम पहिँ जाई।
जनकसुता कै कुसल सुनाई।
सुनि संदेस भानु-कुल-भूषन।
बोलि लिये जुबराज बिभीषन।
मारुतसुत के संग सिधावहु।
सादर जनकसुतहिँ लेइ आवहु।

तेथून हनुमंत प्रभूकडे आले व त्यांनीं जानकीचें कुशल निवेदन केलें. तें वर्तमान ऐकून रविकुलभूषणांनीं बिभीषणास आणि अंगदास बोलावून सांगितलें कीं,—मारुतीला बरोबर घेऊन तुम्ही त्वरेनें जा आणि जानकीस इतमामानें घेऊन या.

तुरतहिँ सकल गये जहँ सीता।
सेवहिँ सब निसिचरी बिनीता।
बेगि बिभीषन तिन्हहिँ सिखावा।
सादर तिन्ह सीतहिँ अन्हवावा।
बहु प्रकार भूषन पहिराये।
सिबिका रुचिर साजि पुनि लाये।
ता पर हरषि चढी बैदेही।
सुमिरि राम सुखधाम सनेही।

तत्काळ ते सर्वजण सीता जेथें होती तेथें गेले. तेथें सर्व राक्षसी अदबीनें तिची सेवा करीत होत्या. लागलींच बिभीषणानें त्यांना फरमाविलें त्याप्रमाणें त्यांनीं सीतेस मोठ्या अदबीनें न्हाऊं घातलें व तीस अनेक प्रकारच्या अलंकारांनीं सजविलें. नंतर एक नखरेदार पालखी शृंगारून आणली. जानकी प्रेमसागर सुखनिधान श्रीरामाचें स्मरण करून तींत आनंदानें बसली.

बेतपानि रच्छक चहुँ पासा।
चले सकल मन परम हुलासा।
देखन भालु कीस सब आये।
रच्छक कोपि निवारन धाये।
कह रघुबीर कहा मम मानहु।
सीतहिँ सखा पयादे आनहु।
देखहिँ कपि जननी की नाईँ।
बिहँसि कहा रघुनाथ गुसाईँ।
सुनि प्रभुबचन भालु कपि हरषे।
नभ तेँ सुरन्ह सुमन बहु बरषे

सीता प्रथम अनल महुँ राखी ।
प्रगट कीन्हि चह अंतर साखी ।

तिच्या सभोंवतीं वेत्रधर, रक्षक वगैरे सर्वजण अत्यंत उल्लासित अंतःकरणानें चालत होते. सीतेचे दर्शनानिमित्त अनेक वानर जमूं लागले, पण रक्षक जरबीनें त्यांना अडसर करीत. तेव्हां प्रभु म्हणाले:– गड्यांनों ! सांगतों तें ऐका आणि सीतेला अनवाणीच घेऊन या. नंतर रघुवीर प्रभु हास्य करून म्हणाले, पाहूं द्या कीं त्या कपींना त्यांच्या आईसाहेबांना. प्रभूंचें तें वचन ऐकून ऋक्षवानर प्रसन्न झाले आणि देवांनीं आकाशांतून विपुल पुष्पवृष्टि केली. आधींच अग्नींत ठेवलेल्या सीतेस अंतःसाक्ष रामचंद्रांनीं प्रगट करण्याचें योजिलें.

दो०–तेहि कारन करुनानिधि कहे कछुक दुर्बाद । सुनत जातुधानी सब लागीँ करइ बिषाद ॥ १२६ ॥

ह्या उद्देशानें करुणार्णव प्रभु कांहीं औपरोधिक बोलले. ते ऐकतांच सर्व राक्षसी विवळूं लागल्या.

चौ०–प्रभु के बचन सीस धरि सीता ।
बोली मन–क्रम–बचन–पुनीता ।
लछिमन होहु धरम के नेगी ।
पावक प्रगट करहु तुम्ह बेगी ।

प्रभूंची आज्ञा शिरसावंद्य मानून कायावाचामनानें पवित्र अशी ती सीता म्हणाली–भावोजी ! तुम्हीच ही माझ्या धर्माची बाब स्वीकारा आणि विलंब न करितां अग्नि प्रदीप्त करा.

सुनि लछिमन सीता कै बानी ।
बिरह–बिबेक–धरम–जुति–सानी ।
लोचन सजल जोरि कर दोऊ ।
प्रभु सन कछु कहि सकत न ओऊ ।
देखि रामरुख लछिमन धाये ।
पावक प्रगटि काठ बहु लाये ।

विरह, विवेक, धर्म आणि नीति यांनीं युक्त अशी ती सीतेची वाणी ऐकून लक्ष्मणाच्या नेत्रांत अश्रू आले. ( कांहीं बोलावें म्हणून ) त्यानें दोन्ही हात जोडले. परंतु प्रभूशीं तो कांहींच बोलूं शकेना. रामाची मर्जी ओळखून अखेरीस लक्ष्मण धांवत गेला आणि त्यानें काष्ठभार आणून अग्नि प्रदीप्त केला.

पावक प्रबल देखि बैदेही ।
हृदय हरष कछु भय नहिँ तेही ।
जौँ मन बच क्रम मम उर माहीँ ।
तजि रघुबीर आन गति नाहीँ ।
तौ कृसानु सब कैं गति जाना ।
मो कहँ होहु श्रिखंड समाना ।

अग्नि प्रदीप्त झालेला पाहून जानकीस हर्ष वाटला. भीतीची छायाहि तिजवर नव्हती. (ती म्हणाली–) कायावाचामनेंकरून जर रघुनाथाव्यतिरिक्त मी कांहींहि जाणत नसेन तर सर्वांचें रहस्य जाणणाऱ्या, हे कृशानो ! तूं मला चंदनाप्रमाणें शीतल हो.

छंद–श्री-खंड-सम पावक प्रबेस कियो सुमिरि प्रभु मैथिली । जय कोसलेस महेस-बंदित-चरन रति अतिनिर्मली ॥ प्रतिबिंब अरु लौकिककलंक प्रचंड पावक महँ जरे । प्रभुचरित काहु न लखे सुर नभ सिद्ध मुनि देखहिँ खरे ॥ ३५ ॥

( सीता म्हणाली– )श्रीशंकर परम निष्कलंक प्रेमानें ज्याचें चरणवंदन करतात त्या कोसलेश्वराचा जयजयकार असो ! ह्याप्रमाणें प्रभूंचें स्मरण करून वैदेहीनें अग्नींत प्रवेश करतांच तो चंदनाप्रमाणें शीतल झाला. तिचें प्रतिबिंब आणि लोकापवाद दोन्हींहि प्रचण्ड पावकामध्यें भस्म झाले. प्रभूंचा हेतु मात्र कोणाच्याहि लक्षांत आला नाहीं. देव, सिद्ध व मुनि तें पाहून अंतरिक्षांत चक्कच झाले.

छंद–धरि रूप पावक पानि गहि श्री सत्य स्रुति जग बिदित जो । जिमि छीर-सागर इंदिरा रामहिँ समर्पी आनि सो ॥ सो राम बामबिभाग राजति रुचिर अतिसोभा भली । नव-नील-नीर-ज निकट मानहुँ कनक-पंक-ज की कली ॥ ३६ ॥

वेदस्तुत आणि जगद्विख्यात अशी जी खरोखरीची श्रीमन्महालक्ष्मी सीता तिला हस्तांत धारण करून अग्निनारायण प्रत्यक्ष आविर्भूत झाले व क्षीरसागरानें जशी विष्णूला इंदिरा, तशी त्यांनीं श्रीरामचंद्रास सीता अर्पण केली. ती अत्यंत लावण्यवती श्रीरामाच्या वामभागीं विराजमान होत्साती, टवटवीत

नीलकमलाच्या सांनिध्यांत सुवर्णकमलाची कोमल कलिकाच अशी शोभती झाली.

**दो०—बरषहिँ सुमन हरषि सुर बाजहिँ गगन निसान। गावहिँ किन्नर सुर-बधू नाचहिँ चढी बिमान॥ १२७॥**

देव आनंदानें विमानांत बसून वाद्यगजर करून आकाशांतून पुष्पवर्षाव करूं लागले. किन्नर गाऊं लागून अप्सरा नृत्य करूं लागल्या.

**दो०—श्री-जानकी-समेत प्रभु सोभा अमित अपार। देखत हरषे भालु कपि जय रघुपति सुखसार॥ १२८॥**

श्रीजानकीसमवेत प्रभूंची अति रमणीय शोभा पाहून ऋक्षवानर आनंदानें सुखसागर रघुपतींचा जयघोष करूं लागले.

चौ०—तब रघु-पति-अनुसासन पाई।
मातलि चलेउ चरन सिरु नाई।

नंतर रघुपतींची आज्ञा घेऊन मातली चरणवंदन करून चालता झाला.

आये देव सदा स्वारथी।
बचन कहहिँ जनु परमारथी।
दीनबंधु दयाल रघुराया।
देव कीन्ह देवन्ह पर दाया।
बिस्व-द्रोह-रत यह खल कामी।
निज अघ गयउ कु-मारग-गामी।

नंतर सदास्वार्थपर असलेले देव आले आणि जणुं परमार्थपर भाषण करूं लागले—हे दीनबंधो, दयालो, देवा रघुवीरा! आपण आम्हांवर दया केलीत. विश्वद्रोहरत, खल, कामी आणि कुमार्गगामी असा हा रावण आपल्या पापांनींच मेला.

तुम्ह सम रूप ब्रह्म अबिनासी।
सदा एक रस सहज उदासी।
अकल अगुन अज अनघ अनामय।
अजित अमोघसक्ति करुनामय।
मीन कमठ सूकर नरहरी।
बामन परसुराम बपु धरी।
जब जब नाथ सुरन्ह दुख पावा।
नाना तनु धरि तुम्हहिँ नसावा।
रावन पापमूल सुरद्रोही।
काम—लोभ—मद—रत—अतिकोही।
सोउ कृपाल तव धाम सिधावा।
यह हमरे मन बिसमय आवा।

आपण समदर्शी साक्षात् अविनाशी ब्रह्मच आहांत. आपण शाश्वत, आनंदैकरस, नित्य, उदासीन, कल्पनातीत, निर्गुण, जन्मरहित, निष्पाप, रोगरहित, अजिंक्य, अमोघशक्ति आणि करुणार्णव आहांत. जेव्हां जेव्हां देवांना पीडा झाली तेव्हां तेव्हां आपण नानाप्रकारें मत्स्य, कच्छ, वराह, नृसिंह, वामन, परशुराम इत्यादि देह धारण करून तिची बोळवण केली. तथापि रावणासारख्या कामलोभमदानिरत, अतिक्रोधी, सुरद्रोही पापाच्या गड्ड्याला देखील आपण दयाघनांनीं आपल्या पदाप्रत नेलें या गोष्टींचें मात्र आमच्या मनाला मोठेंच नवल वाटत आहे.

हम देवता परम अधिकारी।
स्वारथरत तव भगति बिसारी।
भवप्रवाह संतत हम परे।
अब प्रभु पाहि सरन अनुसरे।

आम्ही देव जरी मोठमोठ्या अधिकारावर असलों तरी स्वार्थैकपरायणतेमुळें आपली भक्ति विसरलों. आणि म्हणूनच भवनदींत एकसारखें गटंगळत आहोंत. आतां आपण आमचा उद्धार करावा.

**दो०—करि बिनती सुर सिद्ध सब रहे जहँ तहँ कर जोरि। अतिसय प्रेम सरो-ज-भव अस्तुति करत बहोरि॥ १२९॥**

अशी विनंति करून सिद्धादिक देव सर्वजण ठिकठिकाणीं हात जोडून उभे राहिले. नंतर ब्रह्मदेव अत्यंत प्रेमान्वित होऊन पुनःपुनः स्तुति करूं लागले.

छंद तोटक—जय राम सदा सुखधाम हरे।
रघुनायक सायक चाप—धरे॥
भव-बारन-दारन सिंह प्रभो।
गुनसागर नागर नाथ बिभो॥
तन काम अनेक अनूप छबी।
गुन गावत सिद्ध मुनींद्र कबी॥
जसु पावन रावन नाग महा।
खगनाथ जथा करि कोप गहा॥
जनरंजन भंजन सोक भयं।
गतक्रोध सदा प्रभु बोधमयं॥
अवतार उदार अपारगुनं।
महि—भार—बिभंजन ज्ञानघनं॥

हे चित्सुखधाम, हे राम, हे धनुर्बाणधर, हे रघुनायक, हे हरे, हे भवगजविदारणकेसरि, हे प्रभो, हे गुणसागर, हे चतुर, हे नाथ, हे विभो, आपला विजय असो ! हे अनेककामतुल्यलावण्यधारी ! सिद्ध, मुनींद्र आणि कवि आपल्या गुणांचें गान करीत असतात. महासर्पतुल्य रावणास आपण कोपेंकरून गरुडाप्रमाणें धरिलें हें आपलें यश ( जगाला ) पावन करणारें आहे. आपण जनांचे रंजन करणारे असून शोकभयांचें भंजन करणारे आहांत. आपण क्रोधरहित असून (विश्वाचे) शाश्वत अधिपति आणि विज्ञानघन आहांत. आपला अवतार लोकोपकाराकरितां असून आपले गुण अपार आहेत. आपण पृथ्वीचा भार दूर केलात. आपण सर्वज्ञ आहांत.

अज व्यापकमेकमनादि सदा ।
करुनाकर राम नमामि मुदा ॥
रघु–बंस–विभूषन दूषनहा ।
कृत भूप विभीषन दीन रहा ॥
गुन–ज्ञान–निधान अमान अजं ।
नित राम नमामि बिभुं बिरजं ॥
भुज–दंड–प्रचंड–प्रताप–बलं ।
खल-बृंद-निकंद-महा-कुसलं ॥
बिनु कारन दीनदयाल हितं ।
छबिधाम नमामि रमासहितं ॥
भवतारन कारन काजपरं ।
मन-संभव-दारुन-दोष-हरं ॥

आपण जन्मरहित, सर्वव्यापक, एकरूप, नित्य, आदिरहित असून करुणानिधि आहांत. हे रामचंद्रा, आम्ही आनंदानें आपणाला वंदन करीत आहों! आपण रघुवंशाचे भूषण असून पापांचा नाश करणारे आहां. आपण बिभीषणासारख्या अनाथाला राज्यपद दिलेंत. आपण गुणनिधान असून मानरहित, जन्मरहित, वैभवशाली आणि अज्ञानरहित आहांत ! हे रामा ! मी आपणांस नित्य वंदन करितों.आपल्या भुजदंडाचा बलप्रताप अति उदंड आहे. आपण दुष्टांच्या पेवांचे तळ उखडाविण्यांत परमनिष्णात आहांत. आपण स्वार्थरहित असून दीनांविषयीं दयाळ आणि हिंतचिंतक आहांत. सीतेसहित आपणां सौंदर्यनिधानास मी प्रणाम करतों. आपण संसारापासून मुक्त करणारे असून कार्यकारणांहून पर असे आहांत. आपण मनःकल्पित दारुण दोषांचें निवारण करणारे आहांत.

सर चाप मनोहर त्रोनधरं ।
जल–जारुन–लोचन भूपबरं ॥
सुखमंदिर सुंदर श्रीरमनं ।
मद मार मुधा–ममता–समनं ॥
अनवद्य अखंड न गोचर गो ।
सब रूप सदा सब होइ न सो ॥
इति बेद बदंति न दंतकथा ।
रवि आतपभिन्न न भिन्न जथा ॥
कृतकृत्य बिभो सब बानर ए ।
निरखंत तवानन सादर जे ।
धिग जीवन देव सरीर हरे ।
तव भक्ति बिना भव भूलि परे ॥

धनुर्बाण आणि भाते धारण केल्यानें आपण मनोहर दिसतां. आपले नेत्र रक्तकमलाप्रमाणें असून आपण राजमंडळांत श्रेष्ठ आहां. आपण सुखनिधान, सुंदर, लक्ष्मीरमण असून मद, काम, मोह आणि ममता यांस शमविणारे आहांत. आपण निंदारहित, अखंड आणि वाणीला अगोचर आहांत. आपण नित्य सर्व रूपांत व्याप्त असून रूपातीत आहांत. ज्याप्रमाणें सूर्य हा सूर्यप्रकाशाशीं एकरूप असून पुन्हां भिन्न आहे तद्वत् आपण आहांत. हें आपलें वेदांनींच वर्णन केलें आहे. ही कांहीं दंतकथा नाहीं. हे प्रभो ! हे सर्व वानर कृतकृत्य होत. कारण आपलें वदन त्यांस मुबलक प्रेमानें अवलोकन करण्यास मिळत आहे. हे हरे ! माझ्या ह्या जीवितास, देवत्वास आणि देवशरीरास धिक्कार असो. कारण मी आपल्या भक्तिविरहित संसारांतच फसून राहिलों आहे.

अब दीनदयाल दया करिये ।
मति मोरि बिभेदकरी हरिये ॥
जेहि तें बिपरीतक्रिया करिये ।
दुख सो सुख मानि सुखी चरिये ॥
खलखंडन मंडन रम्य छमा ।
पद–पंक–ज सेवित संभु उमा ॥
नृपनायक दे बरदानमिदं ।
चरनांबुज प्रेम सदा सुभदं ।

आतां हे दीनदयालो ! एक अशी दया करा कीं, जिच्यामुळें क्रियांचा विपर्यास मजकडून घडत आहे, ती माझी द्वंद्वबुद्धि निरसून टाका, आणि दुसरी अशी कृपा करा कीं, दुःख हेंच सुख मानून मी जीवनचर्या सुखाची करीन. आपण खलनाशन असून पृथ्वीचें मनोहर मंडन आहांत. शिवपार्वती-

देखील आपल्या चरणकमलांची सेवा करितात. हे नृपनायका ! आपण इतकेंच मला वरदान द्यावें कीं, आपल्या पदकमलांचे ठिकाणीं माझें शुभदायक प्रेम अखंड राहील.

**दो०–बिनय कीन्हि चतुरानन प्रेम पुलक अति गात । सोभा सिंधु बिलोकत लोचन नहीं अघात ॥ १३० ॥**

ब्रह्मदेवानें प्रेमपुलकितगात्र होऊन स्तवन केलें. त्या सौंदर्यसिंधूस न्याहाळीत असतां त्याच्या नेत्रांस तृप्ति वाटेना.

चौ०–तेहि अवसर दसरथ तहँ आये ।
तनय बिलोकि नयन जल छाये ।

त्याच सुमारास राजा दशरथ तेथें आला. पुत्रांस अवलोकन करून त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं डवडवले.

अनुजसहित प्रभु बंदन कीन्हा ।
आसिर्बाद पिता तब दीन्हा ।
तात सकल तव पुन्यप्रभाऊ ।
जीतेउँ अजय निसा–चर–राऊ ।

लक्ष्मणासहवर्तमान प्रभूंनीं त्यास वंदन केलें व दशरथानें त्यांस आशीर्वाद दिला. राम म्हणाले– हे तात ! अजिंक्य राक्षसाधिपति जिंकला गेला हा सर्व आपल्याच पुण्याईचा प्रभाव होय.

सुनि सुतबचन प्रीति अति बाढी ।
नयन सलिल रोमावलि ठाढी ।
रघुपति प्रथम प्रेम अनुमाना ।
चितइ पितहिँ दीन्हेउ दृढ ज्ञाना ।

पुत्राचें तें वचन ऐकून दशरथाचें प्रेम अतिशयच वृद्धिंगत झालें. त्याचे नेत्र सजल होऊन अंग रोमांचित झालें. रघुपतींनीं पित्यास प्रेमवश जाणून त्याचेकडे ( कृपापूर्वक ) पाहिलें आणि त्याचे हृदयांत अविचल ज्ञान भरून दिलें.

ता तें उमा मोच्छ नहिँ पावा ।
दसरथ भेदभगति मन लावा ।
सगुनोपासक मोच्छ न लेहीँ ।
तिन्ह कहँ रामु भगति निज देहीँ ।

(शंकर म्हणतात) हे पार्वति ! दशरथानें रामचंद्राचे ठिकाणीं आपलें मन भेदभक्तिपूर्वक ( पुत्रप्रेमानें ) संलग्न केलें होतें म्हणून त्याला मोक्ष मिळाला नव्हता. सगुण उपासक मोक्ष ( दिला तरी ) घेत नाहींत म्हणून श्रीरामचंद्र त्यास आपली भक्ति अर्पण करितात.

बार बार करि प्रभुहिँ प्रनामा ।
दसरथ हरषि गये सुरधामा ।

प्रभूंस वारंवार प्रणाम करून दशरथ हर्षित होत्साता देवलोकास गेला.

**दो०–अनुज जानकी–सहित प्रभु कुसल–कोसलाधीस । सोभा देखि हरषि मन अस्तुति कर सुरईस ॥ १३१ ॥**

जानकीलक्ष्मणांसहवर्तमान कोशलाधीश प्रभूंचें तें सौंदर्य पाहून देवेन्द्र प्रसन्नांतःकरणानें प्रसंगोचित स्तुति करूं लागला.

छंद तोमर–जय राम सोभाधाम ।
दायक प्रनत बिस्राम ॥
धृत त्रोन बर सर चाप ।
भुज दंड प्रबल प्रताप ॥
जय दूषनारि खरारि ।
मर्दन-निसा-चर-धारि ॥
यह दुष्ट मारेउ नाथ ।
भये देव सकल सनाथ ॥
जय हरन धरनीभार ।
महिमा उदार अपार ॥
जय रावनारि कृपाल ।
किये जातुधान बिहाल ॥
लंकेस अति बल गर्ब ।
किये बस्य सुरगंधर्ब ॥
मुनि सिद्ध खग नर नाग ।
हठि पंथ सब के लाग ॥
पर--द्रोह--रत अतिदुष्ट
पायो सो फल पापिष्ट ॥

हे शोभानिधान, शरणागत, विश्रामधाम रामचंद्रा! आपला विजय असो. आपण उत्कृष्ट धनुर्बाण आणि भाते धारण केले असून आपल्या भुजदंडाचा पराक्रम उदंड आहे. हे खरदूषणादि सकलराक्षसकुलमर्दन प्रभो ! आपण या कुलंगडेखोर रावणाची वासलात लावल्यामुळें सर्व देव आज सनाथ झाले आहेत. आपण पृथ्वीचा भार हरण करणारे आहां. आपला महिमा अपार आहे. हे उदार दयाघन रावणशत्रो ! आपण राक्षसांची दाणादाण उडविली, आपला

विजय असो. हा रावण अत्यंत बलाढ्य आणि उन्मत्त असल्यानें यानें सर्व देवगंधर्वांना गुलाम बनवून ठेविलें होतें. तो बेटा खटनटांचा सरदार. सिद्ध, मुनि, नर, खग, नाग इत्यादिकांशीं देखील केवळ अपकार करण्यासाठीं विकतश्राद्ध घेऊन हवें तसें सव्यापसव्य करी; आपण त्याचें माप आज त्याच्या पदरांत भरपूर घातलें.

अब सुनहु दीनदयाल ।
राजीव--नयन--बिसाल ॥
मोहि रहा अति अभिमान ।
नाहिँ कोउ मोहि समान ।
अब देखि प्रभु--पद--कंज ।
गत मानप्रद--दुखपुंज ॥
कोउ ब्रह्म निर्गुन ध्याव ।
अव्यक्त जेहि स्रुति गाव ।
मोहि भाव कोसलभूप ।
श्रीराम सगुनसरूप ॥
बैदेहि--अनुज--समेत ॥
मम हृदय करहु निकेत ॥
मोहि जानिये निजदास ।
दे भगति रमानिवास ॥

आतां हे दीनदयाळा राजीवविशालाक्षा ! माझ्यासमान कोणीहि नाहीं, असा मलाभयंकर गुमान माझ्यांत वसत होता. परंतु प्रभूंचीं चरणकमलें पाहातांच दुःखसमूहाला उत्पन्न करणारा तो माझा गुमान अगदीं विरघळून गेला. वेदांनीं अव्यक्त म्हणून वर्णन केलेल्या निर्गुण ब्रह्माचें ध्यान कोणीहि करोत, परंतु मला मात्र हें आपलें कोसलेश्वर श्रीरामचंद्राचें सगुण स्वरूपच आवडतें. जानकीलक्ष्मणांसहवर्तमान प्रभूंचें तेंच स्वरूप माझ्या हृदयांत निवास करो ! हे रमानिवास भगवन् ! आपण मला आपला दास समजून मला आपली भक्ति अर्पण करावी.

**छंद--दे भक्ति रमानिवास त्रास हरन सरन-सुख-दायकं । सुखधाम राम नमामि काम अनेक छबि रघुनायकं ॥ सुर-बृंद-रंजन द्वंदभंजन मनुजतनु अतुलितबलं । ब्रह्मादि-संकर-सेव्य राम नमामि करुनाकोमलं ॥ ३७ ॥**

हे त्रासहरण, शरणागतसुखदायक, सुखनिधान, अनेकमदनसुंदर रघुनायक रामचंद्रा ! मी तुम्हांला वंदन करतों. हे सुरगणरंजन, द्वैतभंजन, नरदेहधारी, अतुलितपराक्रम, शंकरब्रह्मादिसेव्य, कारुण्यकोमल रामचंद्रा ! तुम्हांला माझा प्रणाम असो. हे लक्ष्मीरमणा ! मला आपली भक्ति मिळावी.

**दो०--अब करि कृपा बिलोकि मोहि आयसु देहु कृपाल । काह करउँ सुनि प्रिय बचन बोले दीनदयाल ॥ १३२ ॥**

हे कृपालो ! आतां मजकडे कृपादृष्टीनें अवलोकन करावें आणि मला कांहीं तरी सेवेची आज्ञा व्हावी. तें इंद्राचें प्रियवचन ऐकून दीनदयाळ प्रभु म्हणाले--

चौ०--सुनु सुरपति कपि भालु हमारे ।
परे भूमि निसिचरन्ह जे मारे ।
मम हित लागि तजे इन्ह प्राना ।
सकल जियाउ सुरेस सुजाना ।

इंद्रा, ऐक. हे माझे ऋक्षकपि युद्धांत राक्षसांच्या हातून मरून पडले आहेत. यांनीं माझ्या हितास्तव आपले प्राण वेंचले आहेत; तेव्हां, हे सुज्ञ देवेन्द्रा ! त्या सर्वांना जीवव.

सुनु खगेस प्रभु कै यह बानी ।
अतिअगाध जानहिँ मुनि ज्ञानी ।
प्रभु सक त्रिभुवन मारि जियाई ।
केवल सक्रहि दीन्हि बडाई ।

गरुडा ! प्रभूंची ती वाणी अति गूढ होती हें ध्यानांत ठेव. ती ज्ञानी मुनीच जाणतात. प्रभु त्रिभुवनास मारूंहि शकतात आणि तारूंहि शकतात; परंतु याप्रसंगीं नुस्तीच इंद्राची इज्जत राखण्याची ती भाषा होती.

सुधा बरषि कपि भालु जियाये ।
हरषि उठे सब प्रभु पाहिँ आये ।
सुधा बृष्टि भइ दुहुँ दल ऊपर ।
जिये भालु कपि नहिँ रजनीचर ।
रामाकार भये तिन्ह के मन ।
मुक्त भये छूटे भवबंधन ।
सुरअंसक सब कपि अरु रीछा ।
जिये सकल रघुपति की ईछा ।

इंद्रानें अमृतवृष्टि केली. सर्व ऋक्षवानर जीवंत झाले. ते सर्व उठून आनंदानें प्रभूकडे आले. अमृत-

वृष्टि तर उभय सैन्यांवर झाली, परंतु वानरच तेवढे जीवंत झाले व राक्षस झाले नाहींत, याचें कारण त्या राक्षसांचें चित्त राममय झाल्याकारणानें ते भवबंधनाचा बेडा पार करून मुक्त झाले होते. सर्व ऋक्षकपि देवांचे अंश असल्यामुळें ते सर्व जीवंत झाले.ही सारी रघुपतींचीच इच्छा समज.

रामसरिस को दीन--हित--कारी।
कीन्हे मुक्त निसा--चर--झारी।
खल मलधाम कामरत रावन।
गति पाई जो मुनिबर पाव न।

श्रीरामासारखा दीनांचा हितकर्ता कोण आहे कीं, ज्यांनीं सरसकट सर्व राक्षसांना मुक्त करून सोडिलें, आणि जी गति मुनिवरांना देखील प्राप्त होत नाहीं ती दुष्ट, पापात्म्या, कामलंपट अशा रावणालाहि दिली.

दो०—सुमन बरषि सब सुर चले चढि चढि रुचिर बिमान। देखि सुअवसर राम पहिँ आये संभु सुजान ॥ १३३॥

पुष्पवृष्टि करीत सर्व देव आपापल्या दिव्य विमानांत बसून चालते झाले. योग्य प्रसंग जाणून समयज्ञ श्रीशंकर रामचंद्राकडे आले.

दो०—परमप्रीति कर जोरि जुग नलिन- नयन भरि बारि।पुलकित तन गदगद गिरा बिनय करत त्रिपुरारि ॥१३४॥

त्यांचे कमलनेत्र अश्रुपूर्ण झाले व त्यांचें शरीर पुलकित होऊन वाणी सद्गदित झाली. त्रिपुरारी अत्यंत प्रीतीनें करद्वय जोडून स्तवन करूं लागले.

छंद--मामभिरक्षय रघु-कुल-नायक।
धृत-बर-चाप रुचिर-कर-सायक॥
मोह महा घनपटल प्रभंजन।
संसय-बिपिन-अनल सुररंजन॥
सगुन अगुन गुनमंदिर सुंदर।
भ्रम-तम-प्रबल-प्रताप-दिवाकर॥

हे रघुकुलनायका! आपण माझें रक्षण करा. आपण सुंदर हस्ताचे ठायीं उत्कृष्ट चाप धारण करणारे असून मोहरूप निबिड घनपटलाचा विध्वंस करणारे प्रभंजन आहांत. आपण सुररंजन असून, संशयरूप काननास दग्ध करणारे अग्नि आहांत. आपण निर्गुण व सगुण या दोहोंचेंहि सुंदर गुणभाण्डार असून भ्रमरूप अंधकाराचा नाश करणारे प्रबल प्रतापवंत सूर्य आहांत.

काम-क्रोध-मद-गज-पंचानन।
बसहु निरंतर जन-मन-कानन॥
बिषय-मनोरथ-पुंज-कंज-बन।
प्रबलतुषार उदार पार मन॥
भव-बारिधि-मंदर परमंदिर।
बारय तारय संसृति दुस्तर॥

आपण कामक्रोधमदरूप गजाचें दमन करणारे सिंह असून आपल्या भक्तांच्या मनोरूप काननांत निरंतर वास करणारे आहांत. आपण विषयमनोरथसमूहरूपी कमलवनाला प्रबल तुषाराप्रमाणें असून उदारचित्त आणि मनाच्याहि अतीत आहांत. आपण संसारसागराचें मंथन करणारे मंदराचल असून परंधाम आहांत. आपण माझ्या दुस्तर भवसागराचें निवारण करून मला तारा.

स्यामगात राजीवबिलोचन।
दीनबंधु प्रनतारतिमोचन॥
अनुज-जानकी-सहित निरंतर।
बसहु राम नृप मम उरअंतर॥
मुनिरंजन महि-मंडल मंडन।
तुलसि-दास प्रभु त्रास बिखंडन।

आपण श्यामलगात्र, राजीवाक्ष, दीनबंधु असून शरणागताचें दुःखविमोचक आहांत. हे मुनिरंजन, त्रैलोक्यभूषण, तुलसीदासदुःखनिवारण प्रभो रामचंद्रा! आपला माझ्या हृदयमंदिरांत जानकीलक्ष्मणांसहवर्तमान निरंतर वास असावा.

दो०—नाथ जबहिँ कोसलपुरी होइहि तिलकु तुम्हार। कृपासिंधु मैँ आउब देखन चरित उदार॥ १३५॥

हे नाथ! अयोध्येंत जेव्हां आपला अभिषेकसमारंभ होईल तेव्हां हे दयासागरा! तो बहारीचा प्रसंग पहाण्यास मला मुभा असावी.

चौ०—करि बिनती जब संभु सिधाये।
तब प्रभु निकट बिभीषन आये।
नाइ चरन सिर कह मृदु बानी।
बिनय सुनहु प्रभु सारँगपानी।

याप्रमाणें विनंति करून शंकर जेव्हां चालते झाले तेव्हां बिभीषण प्रभूकडे आला आणि त्यांचे चरणांवर

मस्तक ठेवून तो मृदु वाणीनें म्हणाला—हे शारंगपाणे प्रभो ! आपण माझी विनंति श्रवण करावी.

सकुल सदल प्रभु रावन मारा ।
पावन जसु त्रिभुवन बिस्तारा ।
दीन मलीन हीनमति जाती ।
मो पर कृपा कीन्हि बहु भाँती ।

प्रभूंनीं सैन्य व कुल यांसकट रावणाची बोळवण केली आणि आपलें पवित्र यश त्रैलोक्यांत विस्तारिलें. मी दीन, पातकी, मतिहीन आणि जातिहीन असून मजवर आपण अतोनात कृपा केलीत.

अब जनगृह पुनीत प्रभु कीजै ।
मज्जन करिय समरस्रम छीजै ।
देखि कोस मंदिर संपदा ।
देहु कृपाल कपिन्ह कहँ मुदा ।
सब बिधि नाथ मोहि अपनाइय ।
पुनि मोहि सहित अवधपुर जाइय ।
सुनत बचन मृदु दीनदयाला ।
सजल भये दोउ नयन बिसाला ।

आतां ह्या दासाचें गृह प्रभूंनीं पवित्र करावें आणि स्नान करून युद्धश्रमाचा परिहार करावा. तसेंच खजिना, मंदिरें आणि संपत्ति अवलोकन करून दयाघनांनीं ती आनंदानें कपींना वांटून टाकावी. हे नाथ ! सर्वतोपरी मला पदरांत घ्यावें आणि अयोध्येस घेऊन चलावें. तें वचन ऐकून दीनदयाल प्रभूंचे दोन्हीहि नेत्र पाण्यानें डबडबून आले.

**दो०—तोर कोस गृह मोर सब सत्य बचन सुनु भ्रात। दसा भरत सुमिरित मोहि निमिष कल्पसम जात ॥ १३६ ॥**

प्रभु म्हणाले, तुझा कोश आणि मंदिरें हीं सर्व माझींच आहेत, हें वचन सत्य समज. हे बंधो ! ध्यानांत ठेव कीं, भरताच्या स्थितीची आठवण होऊन मला प्रत्येक क्षण कल्पाप्रमाणें जात आहे.

**दो०—तापस बेष गात कृस जपत निरंतर मोहि । देखउँ बेगि सो जतन करु सखा निहोरउँ तोहि ॥ १३७ ॥**

तो तापसवेषानें कृशगात्र होत्साता निरंतर माझाच ध्यास करीत आहे. तो माझ्या लवकर दृष्टीस पडेल असाच यत्न कर, म्हणजे मित्रा ! तुझे मी उपकार समजेन.

**दो०—बीते अवधि जाउँ जौं जियत न पावउँ बीर । सुमिर अनुज प्रीति प्रभु पुनि पुनि पुलक सरीर ॥१३८॥**

( चतुर्दशवर्षात्मक ) मुदतीनंतर जर मी पोंचेन तर तो वीर मला जीवंत आढळणार नाहीं. " भरताच्या प्रेमाची आठवण होऊन प्रभूंचें शरीर वारंवार रोमांचित होऊं लागलें.

**दो०—करेहु कल्प भरि राज तुम्ह मोहि सुमिरेहु मन माहिँ । पुनि मम धाम पाइहहु जहाँ संत सब जाहिँ ॥१३९॥**

" तूं कल्पपर्यंत राज्य कर, मनांत माझें स्मरण असूं दे, व अखेरीस जेथें सर्व संत जातात त्या माझ्या धामाला तूंहि प्राप्त हो."

चौ०—सुनत बिभीषन बचनराम के ।
हरषि गहे पद कृपाधाम के ।
बानर भालु सकल हरषाने ।
गहि प्रभुपद गुन बिमल बखाने ।

रामचंद्राचें तें भाषण ऐकून बिभीषणास आनंद झाला आणि त्यानें कृपानिधानाचे पाय धरिले. सर्व ऋक्षवानरांनीं हर्षानें प्रभुपदीं नमन करून ते त्यांच्या विमल यशाचें वर्णन करूं लागले.

बहुरि बिभीषन भवन सिधावा ।
मनि—गन—बसन बिमान भरावा ।
लेइ पुष्पक प्रभु आगे राखा ।
हँसि करि कृपासिंधु तब भाखा ।

नंतर बिभीषण मंदिरांत गेला आणि त्यानें वस्त्रालंकारांनीं भरून पुष्पकविमान आणलें व प्रभूंस नजर केलें. तेव्हां हास्य करून कृपासागर राम म्हणाले—

चढि बिमान सुनु सखा बिभीषन ।
गगन जाइ बरषहु पट भूषन ।
नभ पर जाइ बिभीषन तबहीँ ।
बरषि दिये मनि अंबर सबहीँ ।

मित्रा बिभीषणा ! तूं विमानांत बसून आकाशांत जा आणि तेथून या वस्त्रालंकारांचा वर्षाव कर.

---

१ रावणाच्या शंकरदत्त संपत्तीचा रामाकडून हा असा अनादर कां व्हावा असा प्रश्न घेऊन आम्ही आपल्या 'मानसहंसांत' त विचार केला आहे तो काव्य—समालोचनेंत पहावयास मिळेल.

तेव्हां आकाशांत जाऊन तेथून बिभीषणानें सर्व वस्त्रालंकारांचा वर्षाव केला.

जोइ जोइ मन भावइ सोइ लेहीं ।
मनि मुख मेलि डारि कपि देहीं ।
हँसे राम श्री–अनुज–समेता ।
परमकौतुकी कृपानिकेता ।

तेव्हां ज्याच्या मनास जें आवडलें तें तो उचलूं लागला. वानर रत्नें तोंडांत टाकीत आणि ( बेचव म्हणून ) फेंकून देत. तें पाहून लक्ष्मणासह राम हंसत. कृपानिधान राम भक्तांचें कोडकौतुक करणारेच होत !

**दो०–मुनि जेहि ध्यान न पावहिं नेति नेति कह बेद। कृपासिंधु सोइ कपिन्ह सन करत अनेक बिनोद ॥ १४० ॥**

जो मुनींच्या ध्यानालादेखील दुर्लभ आणि वेद ज्याची ' नेति नेति ' म्हणून स्तुति करितात, तोच कृपार्णव कपींशीं अनेक प्रकारें विनोददेखील करीत आहे ना !

**दो०–उमा जोग जप दान तप नाना व्रत मख नेम। रामकृपा नहिं करहिं तसि जसि निस्केवल प्रेम ॥ १४१ ॥**

( शंकर म्हणतात—) हे पार्वति ! योग, जप, तप, दान, व्रत, यज्ञ, नियम इत्यादि अनेक साधनांवर देखील श्रीराम जशी निरुपाधिक प्रेमावर कृपा करतात, तशी करीत नाहींत.

चौ०–भालु कपिन्ह पट भूषन पाये ।
पहिरि पहिरि रघुपति पहिं आये ।
नाना जिनिस देखि प्रभु कीसा ।
पुनि पुनि हँसत कोसलाधीसा ।
चितइ सबन्ह पर कीन्ही दाया ।
बोले मृदुल बचन रघुराया ।

सर्व भालुकपि वस्त्रालंकार परिधान करून प्रभूकडे आले. प्रभू कोसलाधीश त्या नानारंगांच्या वानरांना पाहून पुनःपुनः हास्य करूं लागले व सर्वांकडे कृपार्द्र दृष्टीनें पाहून रघुराय आंजरूनगोंजरून म्हणाले—

तुह्मरे बल मैं रावन मारा ।
तिलक बिभीषन कहँ पुनि सारा ।
निज-निज-गृह अब तुह्म सब जाहू ।
सुमिरेहु मोहि डरपेहु जनि काहू ।

केवळ तुमच्या बळावरच मी रावणाचा वध करून बिभीषणास राज्याभिषेक केला. आतां तुम्ही सर्वजण आपापल्या घरीं जा. आणि माझें सरण ठेवून माझेच किंगर बनून असा.

बचन सुनत प्रेमाकुल बानर ।
जोरि पानि बोले सब सादर ।
प्रभु जोइ कहहु तुह्महिं सब सोहा ।
हमरे होत बचन सुनि मोहा ।
दीन जानि कपि किये सनाथा ।
तुह्म त्रैलोक ईस रघुनाथा ।

तें प्रभूंचें भाषण ऐकून सर्व वानर प्रेमविव्हल झाले आणि नम्रतापूर्वक हात जोडून म्हणाले—हे प्रभो ! आपली ही भाषा आपणांलाच शोभते. ती ऐकून आम्हांला मात्र मोठें कोडें पडतें. रघुनाथा ! आपण त्रैलोक्याच्या स्वामीनें केवळ अनाथ जाणून आम्हां कपींना सनाथ केलें आहे.

सुनि प्रभुबचन लाज हम मरहीं ।
मसक कतहुँ खग-पति-हित करहीं ।
देखि रामरुख बानर रीछा ।
प्रेममगन नहिं गृह कै ईछा ।

प्रभूंचें वचन ऐकून आम्ही लाजेनें मरतों मात्र. मशकांकडून कधीं तरी खगपति गरुडाचें हित होणें शक्य आहे काय ? रामाची ती प्रसन्न मुद्रा पाहून ऋक्षकपि प्रेमांत मग्न झाले आणि त्यांस घरादारांची इच्छाहि होईना.

**दो०–प्रभुप्रेरित कपि भालु सब रामरूप उर राखि। हरष विषाद सहित चले विनय विबिध विधि भाषि ॥ १४२ ॥**

प्रभूंच्या आज्ञेनुसार सर्व ऋक्षवानर रामरूप अंतःकरणांत ठेवून हर्षविषादयुक्त होत्साते नानाप्रकारें स्तवन करीत चालूं लागले.

**दो०–कपिपति नील रीछपति अंगद नल हनुमान। सहित बिभीषन अपर जे जूथप कपि बलवान ॥ १४३ ॥**
**कहि न सकहिं कछु प्रेमबस भरि भरि लोचन बारि। सनमुख चितवहिं रामतन नयननिमेष निवारि ॥ १४४ ॥**

सुग्रीव, नील, जांबवंत, अंगद, नील, हनुमान् आणि इतर जे जे आगळे सेनापति होते ते बिभीषणासकट प्रेमानें इतके विव्हल झाले कीं त्यांना कांहींच बोलवेना. त्यांचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. त्यांचे डोळे रामचंद्राच्या मूर्तीवर एकसारखे अनिमिष चिकटून राहिले.

चौ०—अतिसय प्रीति देखि रघुराई ।
लीन्हे सकल बिमान चढाई ।
मन महँ बिप्रचरन सिर नावा ।
उत्तर दिसिहि बिमान चलावा ।
चलत बिमान कोलाहल होई ।
जय रघुबीर कहहिँ सब कोई ।

रामांनीं त्यांचा प्रेमातिशय पाहून त्या सर्वांना विमानांत घेतलें व मनांत विप्रचरणांस वंदन करून विमान उत्तरेकडे हाकारिलें. विमान चालू असतां सर्वांनीं 'जय रघुवीर' असा एकच गजर उठाविला.

सिंहासनु अतिउच्च मनोहर ।
श्रीसमेत प्रभु बैठे ता पर ।
राजत रामसहित भामिनी ।
मेरुसृंग जन घनु दामिनी ।

त्या विमानांत एक अत्यंत मौल्यवान् आणि नखरेदार सिंहासन होतें. प्रभु जानकीसहवर्तमान त्यावर विराजमान झाले. जणूं काय मेरुशृंगावर मेघ आणि विद्युल्लताच शोभत आहेत असे ते सीतारामचंद्र उभयतां त्या वेळीं शोभूं लागले.

रुचिर बिमान चलेउ अतिआतुर ।
कीन्ही सुमनवृष्टि हरषे सुर ।
परम-सुख-द चलि त्रिबिध बयारी ।
सागर सर सरि निर्मल बारी ।
सगुन होहिँ सुंदर चहुँ पासा ।
मन प्रसन्न निर्मल सुभ आसा ।

तें रुचिर विमान अत्यंत वेगानें चालूं लागलें असतां देवांनीं आनंदानें पुष्पवृष्टि केली. अत्यंत सुखकारक असा मंद, सुगंधित आणि शीतल वायु वाहूं लागला. समुद्र, नद्या आणि सरोवर यांचें जल निर्मळ झालें. चोहींकडे शुभशकुन होऊं लागले. सर्वांचीं मनें प्रसन्न होऊन दिशा स्वच्छ झाल्या.

कह रघुबीर देखु रन सीता ।
लछिमन इहाँ हतेउ इँद्रजीता ।
हनूमान अंगद के मारे ।
रन महि परे निसाचर भारे ।
कुंभकरन रावन दोउ भाई ।
इहाँ हते सुर-मुनि-दुख-दाई ।

रघुवीर सीतेस म्हणाले—अग, हें आमचें समराङ्गण तर पाहून घे. आपल्या लखू भाऊनें त्या बेटया इंद्रजिताची कुंदी केली तें हें ठिकाण बरें. आपल्या हनुमान आणि अंगदांनीं लोळविलेली राक्षसांचीं अजस्र धेंडें तर, हीं पहा, खच खात अवघ्या रणभरच विखुरलेलीं आहेत. सुरमुनिजनांना पीडा करणारे कुंभकर्ण आणि रावण हे बंधुद्वय मारले गेले ते मात्र या ठिकाणीं.

दो०—इहाँ सेतु जहँ बाँधेउ अरु थापेउँ सिव सुखधाम । सीतासहित कृपानिधि संभुहि कीन्ह प्रनाम ॥ १४५ ॥

हा पहा या ठिकाणीं सेतु बांधला गेला आणि सुखनिधान शंकराची स्थापना केली गेली. नंतर दयाघनांनीं सीतेसह शंकराला प्रणाम केला.

दो०—जहँ जहँ करुनासिंधु बन कीन्ह बास बिस्राम। सकल देखाये जानकिहि कहे सबन्हि के नाम ॥ १४६ ॥

वनांत ज्या ज्या ठिकाणीं कृपासिंधूंनीं वास केला अगर विश्रांति घेतली, तीं तीं सर्व स्थानें त्यांनीं जानकीस दाखविलीं आणि त्यांचीं नांवेंहि सांगितलीं.

चौ०—सपदि बिमान तहाँ चलि आवा ।
दंडकबन जहँ परम सुहावा ।
कुंभजादि मुनिनायक नाना ।
गये राम सब के अस्थाना ।
सकल रिषिन्ह सन पाइ असीसा ।
चित्रकूट आयउ जगदीसा ।

लौकरच विमान अत्यंत रमणीय अशा दंडकारण्यांत उतरलें. अगस्तिप्रभृति अनेक मुनिश्रेष्ठ तेथें होते. त्या सर्वांच्या आश्रमांस प्रभू गेले. नंतर त्या सर्व ऋषींचे आशीर्वाद घेऊन जगदीश चित्रकूटास आले.

तहँ करि मुनिन्ह केर संतोषा ।
चला बिमान तहाँ ते चोखा ।
बहुरि राम जानकिहि देखाई ।
जमुना कलि-मल-हरनि सुहाई ।

तेथें मुनींना संतुष्ट केल्यानंतर विमान तेथून पुढें मोठ्या मजेंत चालूं लागलें. नंतर रामांनीं सीतेला कलिमलहरणी रमणीय यमुना नदी दाखविली.

पुनि देखी सुरसरी पुनीता ।
राम कहा प्रनाम करु सीता ।
तीरथपति पुनि देखु प्रयागा ।
देखत जनम–कोटि–अघ भागा ।
देखु परमपावनि पुनि बेनी ।
हरनि सोक हरि-लोक-निसेनी ।
पुनि देखु अवधपुरी अतिपावनि ।
त्रि--बिध–ताप भवरोग नसावनि ।

नंतर पवित्र गंगानदी दिसली. तेव्हां राम म्हणाले—हे सीते, ईस प्रणाम कर[१]. ज्याच्या दर्शनानें कोट्यवधि जन्मांचीं पापें दूर होतात तो, हा पहा, तीर्थराज प्रयाग. हा पहा परमपुण्यकारक, शोकनाशन, आणि वैकुंठप्राप्तीला शिडीप्रमाणें असणारा हा त्रिवेणीसंगम, आणि ही पहा त्रिविधताप आणि भवरोग यांचा नाश करणारी अत्यंत पावन अशी आपली अयोध्यानगरी:—

**दो०–सीतासहित अवध कहँ कीन्ह कृपाल प्रनाम । सजल नयन तन पुलकित पुनि पुनि हरषत राम ॥ १४७ ॥**

दयाघन प्रभूंनीं सीतेसहित अयोध्येला प्रणाम केला. त्यांचे नेत्र सजल होऊन तनु रोमांचित झाली. रामचंद्रांना वारंवार आनंदाचे उमाळे येत.

**दो०–बहुरि त्रिबेनी आइ प्रभु हरषित मज्जनु कीन्ह । कपिन्ह समेत बिप्रन्ह कहँ दान बिबिधबिधि दीन्ह ॥ १४८ ॥**

नंतर त्रिवेणीसंगमावर येऊन प्रभूंनीं आनंदानें स्नान केलें व स्वतः आणि कपींकडून ब्राह्मणांना अनेक प्रकारचीं दानें वांटलीं.

चौ०–प्रभु हनुमंतहि कहा बुझाई ।
धरि बटुरूप अवधपुर जाई ।
भरतहि कुसल हमारि सुनायहु ।
समाचार लेइ तुम्ह चलि आयउ ।
तुरत पवनसुत गवनत भयऊ ।
तब प्रभु भरद्वाज पहिं गयऊ ।

नंतर प्रभूंनीं हनुमंतास समजावून सांगितलें कीं, तूं बट्वाचार्य बनून अयोध्येस जा आणि भरतास आमचें कुशल सांगून त्याचा समाचार घेऊन परत ये. तेव्हां हनुमंत लागलींच जाता झाला. नंतर प्रभु भरद्वाजमुनींकडे गेले.

नाना विधि मुनिपूजा कीन्ही ।
अस्तुति करि पुनि आसिष दीन्हीं ।
मुनिपद बंदि जुगल कर जोरी ।
चढि बिमान प्रभु चले बहोरी ।

प्रभूंनीं मुनींची नानाप्रकारें पूजा करून स्तुति केली. मुनींनीं नंतर प्रभूंना आशीर्वाद दिले. हस्तद्वय जोडून व मुनिपदांस वंदन करून प्रभू विमानांत आरूढ झाले आणि चालूं लागले.

इहाँ निषाद सुना हरि आये ।
नाव नाव कहँ लोक बोलाये ।
सुरसरि नाँघि जान जब आवा ।
उतरेउ तट प्रभुआयसु पावा ।

इकडे निषाद गुहकानें प्रभूंचें आगमन श्रवण करतांच 'नावा आणा, नावा आणा' असें म्हणून सर्व लोकांना बोलावून सांगितलें. भागीरथी ओलांडून जेव्हां विमान आलें तेव्हां तें प्रभूंच्या आज्ञेनें (गंगेच्या) उत्तरतटावर उतरलें.

तब सीता पूजी सुरसरी ।
बहु प्रकार पुनि चरनन्हि परी ।
दीन्हि असीस हरषि मन गंगा ।
सुंदरि तब अहिवात अभंगा ।

तेव्हां सीतेनें अनेक प्रकारें गंगेचें पूजन आणि पुनःपुनः पदवंदन केलें. गंगा प्रसन्नचित्त होऊन तिनें आशीर्वाद दिला कीं 'अये सुंदरी ! अखंडसौभाग्यवती भव.'

---

१ हा सीतेशीं रामाचा विनोद फारच फार सरस आहे. तसें पाहतां सीता काय गंगेस प्रणाम केल्याखेरीजच राहती ? परंतु रामानें मुद्दाम जाणविण्यांत खोंच हा कीं रावण मारला जाऊन आपण शिरसलामत परतलों तें केवळ गंगेस नवसलेल्या महापूजेचें फळ होय. ('आइ करउं जेहि पूजा तोरी'). एरवीं काय रावण मजकडून न मरता ?आणि तूं रावणाच्या तावडींतून सुटतीस ?वगैरे. हाच तो विनोद आणि तो इतका झांकून करण्याचें कारण म्हणजे जवळ असलेल्या लक्ष्मणअंगद या पोरांची, सुग्रीवादि मित्रांची आणि हनुमदादि सेवकांची मर्यादा व भीड.

सुनत गुहा धायेउ प्रेमाकुल ।
आयउ निकट परम-सुख-संकुल ।
प्रभुहि सहित बिलोकि बैदेही ।
परेउ अवनि तन सुधि नहिँ तेही ।
प्रीति परम बिलोकि रघुराई ।
हरषि उठाइ लियो उर लाई ।

राम आले असें ऐकतांच गुह प्रेमविव्हल होऊन धांवत सुटला आणि अत्यानंदभरानें प्रभुनिकट येऊन जानकीसहवर्तमान त्यांना पाहतांच देहभान विसरून तो भूमीवर पडला. त्याचें उत्कट प्रेम पाहून रघुनाथांनीं त्यास आनंदानें उचलिलें आणि उराशीं कवटाळिलें.

छंद—लियो हृदय लाइ कृपानिधान सुजान राय रमापती । बैठारि परमसमीप बूझी कुसल सो कर बीनती ॥ अब कुसल पदपंकज बिलोकि बिरंचि-संकर-सेव्य जे । सुखधाम पूरनकाम राम नमामि राम नमामि ते ॥ ३८ ॥

त्याला कवटाळिल्यानंतर दयानिधान सर्वज्ञ रमापति रामचंद्रांनीं त्यास अत्यंत निकट बसवून कुशल विचारलें. तेव्हां तो नम्रपणें म्हणाला—शिवब्रह्मादिकांनीं संसेवित अशा आपल्या चरणकमलांचें दर्शन झाल्यानें आतां मी खरा कुशल झालों. हे सुखनिधान पूर्णकाम प्रभु रामचंद्रा ! मी आपला आहे, हे माझे नमस्कार घ्या.

छंद—सब भाँति अधम निषाद सो हरि भरत ज्योँ उर लाइयो । मतिमंद तुलसीदास सो प्रभु मोहबस बिसराइयो ॥ यह रावनारिचरित्र पावन राम-पद-रति-प्रद सदा । कामादिहर बिज्ञानकर सुर सिद्ध मुनि गावहिँ मुदा ॥ ३९ ॥

ज्या प्रभूंनीं सर्वथैव नीच अशा निषादास देखिल भरताप्रमाणें कवटाळिलें त्या प्रभूस, मतिमंदा तुलसीदासा ! मोहवश होऊन विसरलास कीं रे ! हे रावणारीचें चरित्र पवित्र असून, रामपदांचे ठायीं प्रेम उत्पन्न करणारें, कामादिषड्रिपूंचें दमन करणारें व विज्ञान देणारें आहे. सिद्ध आणि मुनीदेखील याचें गायन करीत असतात.

दो०—समर बिजय रघुबीर के चरित जे सुनहिँ सुजान । बिजय बिबेक बिभूति नित तिन्हहिँ देहिँ भगवान ॥ १४९ ॥

रघुवीरांचें हें युद्धविजय-विषयक चरित्र जे सुज्ञ जन श्रवण करतील त्यांना भगवान् श्रीरामचंद्र जय, ज्ञान आणि ऐश्वर्य निरंतर अर्पण करतील.

दो०—यह कलिकाल मलायतन मन करि देखु बिचार । श्री-रघु-नाथ नाम तजि नाहिनँ आन अधार ॥ १५० ॥

हा कलिकाल म्हणजे पापांचें केवळ माहेरघर. हे मना ! विचार करून पहा कीं, श्रीरामचंद्रांचे नांवाखेरीज तुला आतां इतर आधारच नाहीं.

॥ इति श्रीरामचरितमानसे सकलकलिकलुषविध्वंसने विमलविज्ञानसम्पादनो नाम षष्ठः सोपानः समाप्तः ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥

। श्रीजानकीवल्लभो विजयते ।

# ॥ रामचरितमानस ॥

## अर्थात्

## ॥ श्रीतुलसीरामायण ॥

( मराठी भाषांतरासहित. )

# ( सप्तम सोपान )

( उत्तरकाण्ड )

श्लोकाः

केकीकण्ठाभनीलं सुरवरविलसद्विप्रपादाब्जचिन्हं । शोभाढ्यं पीतवस्त्रं सरसिजनयनं सर्वदा सुप्रसन्नम् ॥ पाणौ नाराचचापं कपिनिकरयुतं बन्धुना सेव्यमानं नौमीड्यं जानकीशं रघुवरमनिशं पुष्पकारूढरामम् ॥ १ ॥

मयूरकंठाप्रमाणें नीलवर्ण, सर्व देवांत श्रेष्ठ, भृगुऋषींच्या पदकमलाच्या चिन्हानें सुशोभित, सर्वश्रेष्ठ, सौंदर्यवान्, पीतपटधारी, कमलनयन, सर्वकाल सुप्रसन्न, धनुर्बाणभूषित, वानरगणपरिवेष्टित, लक्ष्मणसंसेवित, पुष्पकविमानारूढ अशा त्या जानकीरमण, सुपूज्य रघुकुलश्रेष्ठ, श्रीरामचंद्रास, मी अहर्निश वंदन करितों.

कोशलेन्द्रपदकञ्जमञ्जुलौ कोमलावजमहेशवन्दितौ । जानकीकरसरोजलालितौ चिन्तकस्य मनभृङ्गसङ्गिनौ ॥ २ ॥

त्या अयोध्याधीशाचे चरण कमलाप्रमाणें कमनीय आहेत. ते अत्यंत सुकुमार असून ब्रह्मदेव आणि शंकर त्यांस वंदन करीत असतात. जानकी आपल्या करकमलांनीं त्यांचें संवाहन करीत असते, आणि त्यांचे जे कोणी उपासक असतात त्यांच्या मनोरूप भ्रमरास त्या चरणकमलाचें नित्य सान्निध्य घडत असतें.

कुन्दइन्दुदरगौरसुन्दरं अम्बिकापतिमभीष्टसिद्धिदम् । कारुणीककलकञ्जलोचनं नौमि शङ्करमनङ्गमोचनम् ॥ ३ ॥

कुंदकलिका, चंद्र आणि शंख यांचेप्रमाणें ज्याचें शरीर गौर आणि रमणीय, जे अभीष्ट पुरविणारे, आणि अत्यंत दयार्द्र, ज्यांचे नेत्र कमलाप्रमाणें सुंदर, जे कामास देखील अकाम करणारे, त्या जगन्माता-पार्वतीरमण श्रीशंकरप्रभूंस मी वंदन करितों.

दो०—रहा एक दिन अवधि कर अति-आरत पुरलोग । जहँ तहँ सोचहिं नारि नर कृसतन रामबियोग ॥ १ ॥

चतुर्दशवर्षात्मक अवधीला एकच दिवस शिल्लक राहिला. आतां मात्र अयोध्यावासी पुरजन अत्यंतच उतावीळ झाले. श्रीरामचंद्राच्या वियोगानें आधींच कृशतनु झालेल्या यच्चयावत् स्त्रीपुरुषांस दुःखाचा पीळ जास्त जाणवूं लागला.

दो०—सगुन होहिं सुंदर सकल मन प्रसन्न सब केर । प्रभु आगमन जनाव जनु नगर रम्य चहुँ फेर ॥ २ ॥

अशा स्थितींत प्रभूंच्या आगमनाच्या शुभ वार्तेचें जणुंकाय सूचकच अशा सर्वांच्याच मनोवृत्ति

एकाएकीं प्रसन्न होऊं लागल्या, आणि अयोध्या चोहोंबाजूंनीं रमणीय दिसूं लागली.

**दो०–कौसल्यादि मातु सब मन अनन्द अस होइ। आयउ प्रभु सिय-अनुज-युत कहन चहत अब कोइ॥ ३॥**

कौसल्यादि सर्व मातांच्या चित्तवृत्ति इतक्या उल्हसित झाल्या कीं आतांच्या आतांच सिता-लक्ष्मणांसहवर्तमान प्रभु आले आहेत, असेंच जणुं काय कोणी कळवूं इच्छित आहे.

**दो०–भरत-नयन-भुज दच्छिन फरकत बारहिँ बार। जानि सगुन मन हरष अति लागे करन बिचार॥ ४॥**

भरताचे दक्षिण नेत्र आणि बाहू वरच्चेवर स्फुरण पावूं लागले. तो शुभशकुन जाणून त्याच्या अंतः-करणांत आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या आणि त्याचे विचारतरंग वाहूं लागले.

चौ०–रहेउ एक दिन अवधि अधारा।
समुझत मन दुख भयउ अपारा।
कारन कवन नाथ नहिँ आये।
जानि कुटिल किधौँ मोहि बिसराये।

चतुर्दशवर्षात्मक अवधींतून माझ्या प्राणांचा आशातंतु कायतो एकच एक दिवस आतां अव-शिष्ट राहिला आहे, या विचारानें त्याच्या हृदयांत काहूर उठवून दिलें. (स्वगत) प्रभु अद्याप आले नाहींत यांतलें इंगित काय असेल बरें? मी कुटिल समजून तर ते मला विसरले नसतील ना?

अहह धन्य लछिमन बड भागी।
राम-पदारबिंदु-अनुरागी।
कपटी कुटिल मोहि प्रभु चीन्हा।
ता तेँ नाथ संग नहिँ लीन्हा।

वाहवा रे चिमण्या लक्ष्मणा! खरा धन्यहि तूंच आणि खरा भाग्याचा आगळाहि पण तूंच. रामचर-णारविंदांशीं खरें खरें एकजीव असणें हें तुझ्याचसाठीं आहे. (नाहींतर हा मी.) मी कपटी व कुटिल ही प्रभूंची खात्री झाली असलीच पाहिजे, म्हणून तर प्रभूंनीं मला आपल्या साथास घेतला नाहीं.

जौँ करनी समुझहिँ प्रभु मोरी।
नहिँ निस्तार कलपसत कोरी।
जनअवगुन प्रभु मान न काऊ।
दीनबंधु अतिमृदुल सुभाऊ।

माझ्या कृतीसंबंधानें जर प्रभूंचें हेंच मत झालें असेल तर मात्र मग कोटिकल्पांतीं देखील माझा मुक्तता होणें शक्य नाहीं; परंतु छेः; सेवकांचे दोष माझे धनी कधींहि मनावर येऊं द्यावयाचे नाहींत. कारण ते दीनांचे कैवारी आणि मनाचे अत्यंत मिळाऊ आहेत.

मोरे जिय भरोस दृढ सोई।
मिलिहहिँ राम सगुन सुभ होई।
बीते अवधि रहहिँ जौँ प्राना।
अधम कवन जग मोहि समाना।

ह्यावरून माझ्या जीवाची पूर्ण खात्री आहे कीं, प्रभु अवश्य मला दर्शन देतील आणि मला होत असलेले हे शकुन शुभ ठरतील. इतक्या उपर देखील त्यांच्या येण्याची मर्यादा चुकलीच आणि हे माझे प्राण जगलेच, तर ह्या जगांत माझ्यासारखा निपटारा तरी कोण असूं शकेल?

**दो०–राम-बिरह-सागर महँ भरत मगन मन होत। बिप्ररूप धरि पवनसुत आइ गयउ जनु पोत॥ ५॥**

रामचंद्राच्या विरहरूप समुद्रांत भरताचें मन गटंगळ्या खात आहे तोंच बटुरूप धारण करून मारुतिराय नौकेप्रमाणें तेथें येऊन पोंचले.

**दो०–बैठे देखि कुसासन जटामुकुट कृस-गात। राम राम रघुपति जपत स्रवत नयन जलजात॥ ६॥**

जटाधारी, हाडांचा सापळा, साध्या चटईची बैठक, रामाकडे सारखे डोळे लागलेले, 'राम, राम, रघुपते' हाच एकमात्र घोष, डोळे पाण्यानें तिंबलेले असा तो भरत.'

चौ०–देखत हनूमान अति हरषेउ।
पुलकगात लोचनजल बरषेउ।
मन महँ बहुत भाँति सुख मानी।
बोलेउ स्रवन-सुधा-सम बानी।

मारुतीनें अवलोकन करतांच त्याला फार आनंद झाला आणि त्याच्या शरीरावर रोमांच उभे राहून त्याच्याहि नेत्रांतून टिपें वाहूं लागलीं. मनांत अत्यंत सुख मानून तो मारुति कर्णामृततुल्य अशा वाणीनें बोलूं लागला.

जासु बिरह सोचहु दिन राती ।
रटहु निरंतर गुन-गन-पाँती ।
रघु-कुल-तिलक सु-जन-सुख-दाता ।
आयउ कुसल देव-मुनि-त्राता ।
रिपु रन जीति सुजस सुर गावत ।
सीता अनुज सहित पुर आवत ।

ज्याच्या विरहामुळें तूं अहोरात्र पिळवटून निघत आहेस आणि ज्याच्या गुणपंक्तीची तूं हरदम घोकणी घेऊन आहेस, तो सज्जनसुखदाता देवमुनिपालक रघुकुलतिलक क्षेमरूप परत आला आहे बरें. शत्रूस रणांत जिंकल्यामुळें ज्याचा पुण्यप्रताप देव देखील गात आहेत तो प्रभु सीतालक्ष्मणांसहित नगराप्रत हा आलाच समज.

सुनत बचन बिसरे सब दूखा ।
तृषावंत जिमि पाव पियूखा ।
को तुम्ह तात कहाँ तें आये ।
मोहि परम प्रिय बचन सुनाये ।

तृषार्तास अमृतलाभासारखी ती उक्ति श्रवण करतांच भरतास सर्व दुःखांचा विसर पडला. तो म्हणाला, 'महाराज ! आपण कोण हो ? आणि कोठून आलांत ? आपण माझ्या कानांत खरेच प्रेमबिंदु ओतले.

मारुतसुत मैं कपि हनुमाना ।
नाम मोर सुनु कृपानिधाना ।
दीनबंधु रघुपति कर किंकर ।
सुनत भरत भेंटेउ उठि सादर ।
मिलत प्रेम नहिँ हृदय समाता ।
नयन स्रवत जल पुलकित गाता ।

(मारुति म्हणाले) हे दयाधना ! ऐक. मी वायुपुत्र हनुमान् नांवाचा वानर आणि गरीब परवर रघुवीराचा एक पाईक आहे. इतकें ऐकतांच भरत उठला आणि त्यास सन्मानपूर्वक भेटला. त्या भेटींत भरताच्या अंतःकरणांत प्रेम माईनासें होऊन तें अश्रुरूपानें नेत्रांतून आणि रोमांचरूपानें देहांतून बाहेर वाहूं लागलें.

कपि तव दरस सकल दुख बीते ।
मिले आजु मोहि राम पिरीते ।
बार बार बूझी कुसलाता ।
तो कहँ देउँ काह सुनु भ्राता ।

एहि संदेससरिस जग माहीं ।
करि बिचार देखेउ कछु नाहीं ।
नाहिँ न तात उरिन मैं तोही ।
अब प्रभुचरित सुनावहु मोही ।

(भरत म्हणाला—) हे कपे ! तुझ्या दर्शनानेंच माझीं सर्व दुःखें खलास झालीं. आज मला माझा लडिवाळ रामच भेटला. श्रीरामाचें वारंवार कुशल विचारून (तो म्हणाला)—हे बंधो, ऐक. मी तुला काय देऊं बरें ? मीं शिकस्तीचा विचार केला परंतु या वार्तेला तुलण्यासारखें असें जगांत कोठेंच कांहीं मला आढळत नाहीं. हे तात ! मी तुझा उतराईच होऊं शकत नाहीं. आतां मला प्रभूचें वृत्त ऐकूं दे.

तब हनुमंत नाइ पद माथा ।
कहे सकल रघु-पति-गुन-गाथा ।
कहु कपि कबहुँ कृपाल गुसाईं ।
सुमिरहिँ मोहि दास की नाईं ।

तेव्हां हनुमंतानें भरतपदीं वंदन करून रघुपतींचीं लीलाचरित्रें कथन केलीं. (नंतर भरत म्हणाला—) "हे कपे ! हें तर सांग कीं त्या दयाघन प्रभूस मी त्यांचा गुलाम म्हणून कधीं तरी माझी आठवण होत होती काय रे ?"

छंद—निज दास ज्यौं रघु-बंस-भूषण कबहुँ मम सुमिरन कर्‍यो । सुनि भरत बचन बिनीत अति कपि पुलकि तन चरनन्हि पर्‍यो । रघुबीर निजमुख जासु गुनगन कहत अग-जग-नाथ जो । काहे न होइ बिनीत परम पुनीत सद्-गुन-सिंधु सो ॥ १ ॥

"त्या रघुकुलभूषणानें आपला गुलाम म्हणून माझें कधीं काळीं तरी स्मरण केलें होतें काय रे ?" भरताचा तो खऱ्या कळवळ्याचा प्रश्न ऐकतांच मारुतीच्या शरीरावर रोमांच थरारले, व तो भरताच्या चरणांवर लोटांगण घेऊन म्हणाला—स्थावरजंगमाचा मालक असा जो रघुनानायक तो आपल्या मुखानें ज्याच्या गुणगणाचा गौरव करतो तो तूं परमपवित्र सद्गुण सागर इतका विनयशील कसा बरें असणार नाहींस ?

दो०–राम-प्रान-प्रिय नाथ तुम्ह सत्य बचन मम तात। पुनि पुनि मिलत भरत सुनि हरष न हृदय समात ॥ ७ ॥

हे तात ! तूं रामाचा केवळ प्राणप्रियच नव्हे, प्राणनाथ आहेस हें मी शपथेवर तुला सांगतों. हें ऐकून भरत त्यास वारंवार भेटूं लागला. त्याच्या अंतःकरणांत आनंद माईनासा झाला.

सो०–भरतचरन सिरु नाइ तुरित गयउ कपि राम पहिँ। कही कुसल सब जाइ हरषि चलेउ प्रभु जान चढि ॥ १ ॥

भरताच्या चरणांस वंदन करून हनुमान् त्वरित रामचंद्राकडे जाण्यास निघाले. प्रभूकडे जाऊन त्यांनीं सर्व क्षेम कळविलें. तेव्हां प्रभूस आनंद झाला व ते विमानांत बसून चालूं लागले.

चौ०–हरषि भरत कोसलपुर आये।
समाचार सब गुरुहिँ सुनाये।
पुनि मंदिर महँ बात जनाई।
आवत नगर कुसल रघुराई।
सुनत सकल जननीं उठि धाईँ।
कहि प्रभुकुसल भरत समुझाईं।

इकडे भरत मोठ्या प्रेमानें अयोध्येस आला. आणि त्यानें सर्व वृत्तांत वसिष्ठांस निवेदन केला. नंतर त्यानें अंतपुरांतहि कळविलें कीं, रघुराय नगरांत सुखरूप येण्याच्या बेतांत आहेत. तें ऐकतांच सर्व माता उठून लगबगीनें भरताकडे आल्या. भरतानें त्यांस प्रभूचें कुशलवृत्त समजावून सांगितलें.

समाचार पुरबासिन्ह पाये।
नर अरु नारि हरषि सब धाये।
दधि दुर्बा रोचन फलफूला।
नव तुलसीदल मंगलमूला।
भरि भरि हेमथार भामिनी।
गावत चलीँ सिंधुरगामिनी।

ती बातमी नगरवासीयांना कळली मात्र तोंच सर्व स्त्रीपुरुष हर्षानें उठले व ( स्वागताच्या तयारीसाठीं ) धांवपळ करूं लागले. दहीं, दूर्वा, गोरोचन, फल, पुष्प, नूतन तुलसीदल इत्यादि मंगलप्रद साहित्य सुवर्णपात्रांत भरभरून स्त्रिया गीतें गात गात गजगतीनें गमन करीत चालल्या !

जो जैसेहिँ तैसेहिँ उठि धावहिँ।
बाल बृद्ध कहँ संग न लावहिँ।
एक एकन्ह कहँ बूझहिँ भाई।
तुम्ह देखे दयाल रघुराई।

सर्वजण जसेचे तसेंच उठून धांवत सुटले. मुलें आणि वृद्ध ह्यांना तर कोणीच बरोबर घेईनात. लोक एकमेकांस विचारीत, काय हो ! तुम्हीं तो आपला दयाळ रघुराज पाहिलात कीं हो ?

अवधपुरी प्रभु आवत जानी।
भई सकल सोभा कै खानी।
भइ सरजू अति-निर्मल-नीरा।
बहइ सुहावन त्रिबिध समीरा।

प्रभूंच्या आगमनाची वार्ता येतांच अयोध्या नगरी अमर्याद रमणीय दिसूं लागली. शरयूचें पाणी स्फटिकनिर्मल होऊन त्रिविध वायु सुखसंचार करूं लागला.

दो०–हरषित गुरु परिजन अनुज भू-सुर-बृंद-समेत। चले भरत अतिप्रेम मन सनमुख कृपानिकेत ॥ ८ ॥

सुप्रसन्न असलेल्या गुरु, परिजन, अनुज आणि ब्राह्मणवृंद। यांच्यासहवर्तमान भरत प्रेममग्न होत्साता कृपानिधान श्रीरामचंद्रास सामोरा जाण्यास निघाला.

दो०–बहुतक चढीँ अटारिन्ह निरखहिँ गगन बिमान। देखि मधुर सुर हरषित करहिँ सुमंगल गान ॥ ९ ॥

बहुतेक स्त्रिया सज्जावर चढून आकाशांत विमान ( केव्हां येतें म्हणून ) शोधूं लागल्या, व तें दृष्टीस पडतांच त्यांनीं मधुर मंगल गाण्यांनीं स्वागत सुरूं केलें.

दो०–राकाससि रघुपति पुर सिंधु देखि हरषान। बढेउ कोलाहल करत जनु नारि-तरंग-समान ॥ १० ॥

रघुपतिरूप पौर्णिमेच्या चंद्रास अवलोकन करून अयोध्यारूप सागरास जणुंकाय आनंदाची भरतीच येऊन तो खवळला, आणि स्त्रियांनीं प्रचंड लाटांप्रमाणें स्वागतरवांनीं वातावरण मुखरित करून सोडलें.

चौ०—इहाँ भानु-कुल-कमल-दिवा-कर ।
कपिन्ह देखावत नगर मनोहर ।
सुनु कपीस अंगद लंकेसा ।
पावन पुरी रुचिर यह देसा ।
जद्यपि सब बैकुंठ बखाना ।
बेद-पुरान-बिदित जग जाना ।
अवध सरिस प्रिय मोहि न सोऊ ।
यह प्रसंग जानइ कोउ कोऊ ।

इकडे सूर्यकुलरूपी कमलास विकसविणारे सूर्य श्रीरामचंद्र वानरमंडळीस ती रमणीय नगरी दाखवूं लागले. ते म्हणाले—हे सुग्रीवअंगदबिभीषण हो, ध्यानांत घ्या. एक तर हा प्रदेशच फार रमणीय—त्यांतून अयोध्यानगरी तर अत्यंतच पवित्र. जरी सर्वत्र वैकुंठाची महती गाइली जाते—आणि ही गोष्ट वेद, पुराण आणि जग यांनाहि संमतच आहे—तरीदेखील तो लोक अयोध्येप्रमाणें मला प्रिय नाहीं. ह्या गोष्टीचें खरें रहस्य जाणणारे मात्र अवचटच.

जनमभूमि मम पुरी सुहावनि ।
उत्तर दिसि बह सरजू पावनि ।
जा मज्जन तें बिनहिँ प्रयासा ।
मम समीप पावहिँ नर बासा ।
अतिप्रिय मोहि इहाँ के बासी ।
मम धामदा पुरी सुखरासी ।
हरषे सब कपि सुनि प्रभुबानी ।
धन्य अवध जो राम बखानी । [१]

ही सुंदर अयोध्या म्हणजे माझी जन्मभूमि. इच्या उत्तरेस ही पवित्र शरयू वहात आहे. हिच्या स्नानानें मनुष्यमात्रास माझी समीपता मुक्ति अनायासें प्राप्त होत असते. हिच्यांत वास करणारे मला अत्यंत प्रिय वाटतात. ही पुरी सुखाची राशी आणि माझ्या पदाची दात्री होय. प्रभूंचें तें भाषण ऐकून सर्व कपीस महदानंद लोटला. ( कवि म्हणतात ) हे अयोध्ये ! ज्या अर्थी प्रत्यक्ष श्रीरामचंद्र स्वमुखानें तुझें वर्णन करितात त्या अर्थी तूं धन्य आहेस.

**दो०—आवत देखि लोग सब कृपासिंधु भगवान । नगर निकट प्रभु प्रेरेउ उतरेउ भूमि बिमान ॥ ११ ॥**

प्रभु कृपासागर भगवंतांनीं सर्व मंडळी सामोरा येतेशी पाहून नगराजवळ येतांच विमानास आज्ञा केली, आणि तें पृथ्वीवर उतरलें.

**दो०—उतरि कहेउ प्रभु पुष्पकहिँ तुम्ह कुबेर पहिँ जाहु । प्रेरित राम चलेउ सो हरष बिरहु अति ताहु ॥ १२ ॥**

प्रभूहि उतरले आणि त्यांनीं पुष्पकविमानास, ‘ तूं कुबेराकडे जा ’ म्हणून आज्ञा केली, तेव्हां तें रामाज्ञेनें चालतें झालें. त्याला जाते वेळीं हर्ष तर झालाच पण विरह मात्र अत्यंत जाणवला.

चौ०—आये भरत संग सब लोगा ।
कृसतन श्री-रघु-बीर-बियोगा ।
बामदेव बसिष्ठ मुनिनायक ।
देखे प्रभु महि धरि धनु सायक ।
धाइ धरे गुरु-चरन—सरोरुह ।
अनुजसहित अति-पुलक-तनोरुह ।
भेँटि कुसल बूझी मुनिराया ।
हमरे कुसल तुह्मारिहि दाया ।

सर्व मंडळीस घेऊन भरतहि येऊन पोहोंचला. श्रीरघुवीरांच्या वियोगामुळें सर्वच क्षीण झाले होते. वसिष्ठवामदेवादि मुनीश्वरांना समोर पाहून प्रभूंनीं धनुर्बाण खालीं टाकले आणि अत्यंत पुलकित देहानें लक्ष्मणासह धांवत जाऊन गुरुचरणकमलांस मिठी मारली. मुनिवरांनीं भेटून कुशल विचारलें असतां प्रभु म्हणाले—आपली कृपा आहे तर आमचें कुशलच असणार.

सकल द्विजन्ह मिलि नायउ माथा ।
धरम-धुरं-धर रघु-कुल-नाथा ।
गहे भरत पुनि प्रभु-पद-पंक-ज ।
नमत जिन्हहिँ सुर मुनि संकर अज ।
परे भूमि नहिँ उठत उठाये ।
बर करि कृपासिंधु उर लाये ।
स्यामलगात रोम भये ठाढे ।
नव-राजीव-नयन जल बाढे ।

नंतर धर्मधुरंधर रघुश्रेष्ठानें सर्व ब्रह्मकुलास वंदन केलें. नंतर देव, मुनि, शंकर, ब्रह्मदेव हे देखील ज्यांना वंदन करतात तीं प्रभूंचीं चरणकमलें भरतानें घट्ट धरिलीं. त्यानें जमिनीवर लोट मारला. राम उठवीत तरी तो उठेना. दयासागरांनीं अखेरीस

[१] ‘ जननी जन्मभूमी च स्वर्गादपि गरीयसी ’ हें सुभाषित कवींनें किती मजेदारीनें रामुखांतून वदविलें आहे !

त्यास बळजबरीनें उचलून हृदयाशीं कवटाळिलें. भरतभेटीनें प्रभूंच्या त्या श्यामल शरीरावरील रोम तट्ट उभे राहिले आणि नवकमलनयनांतून अश्रुधारा सारखी वाहूं लागली.

छंद–राजीवलोचन स्रवत जल तन ललित पुलकावलि बनी । अतिप्रेम हृदय लगाइ अनुजहिँ मिले प्रभु त्रि-भुवन-धनी । प्रभु मिलत अनुजहिँ सोह मो पहिँ जाति नहिँ उपमा कही । जनु प्रेम अरु सिंगार तनु धरि मिले बर सुखमा लही ॥ २ ॥

( कवि म्हणतात ) प्रभूंच्या कमलनेत्रांतून अश्रुधारा चाललेल्या आहेत, त्यांच्या सुंदर शरीरावर रोमांच-पंक्ति थरारली आहे, त्रिभुवनस्वामी श्रीरामचंद्र भरतास अत्यंत प्रेमानें उराशीं धरून कवटाळीत आहेत, अशा त्या रामभरतभेटीस समर्पक अशी उपमा निदान मला तरी, सुचत नाहीं. जणुंकाय प्रेम आणि शृंगार हे दोन रसच मूर्तिमान भेटत आहेत अशी अलौकिक शोभा त्या प्रसंगीं प्रकट झाली.

छंद–बूझत कृपानिधि कुसल भरतहिँ बचन बेगि न आवई । सुनु सिवा सो सुख बचनमन तेँ भिन्न जान जो पावई ॥ अब कुसल कोसलनाथ आरत जानि जन दरसन दियो । बूडत बिरह-बारीस कृपानिधान मोहि कर गहि लियो ॥ ३ ॥

कृपार्णवांच्या कुशल प्रश्नास भरताकडून लवकर उत्तर येईना. ( शंकर म्हणतात—) हे पार्वति ! तें सुख वाणीस आणि मनासहि अगोचर आहे. तें एक अनुभवीच जाणे. ( भरतानें बऱ्याच वेळानें उत्तर दिलें कीं ) मला आर्त जाणून कोसलेश्वरांनीं दर्शन दिलें. विरहसागरांत मीं अगदीं बुडण्याच्या बेतांत असतांच दयानिधींनीं मला हात देऊन वर ओढलें. आतां मी खरा कुशल झालों.

दो०–पुनि प्रभु हरषित सत्रुहन भेँटे हृदय लगाइ । लछिमनु भरत मिले तब परम प्रेम दोउ भाइ ॥ १२ ॥

नंतर प्रभु शत्रुघ्नास आनंदानें हृदयाशीं कवटाळून भेटले. नंतर भरत आणि लक्ष्मण हे दोघे बंधु अत्यंत प्रेमानें भेटूं लागले.

चौ०–भरतानुज लछिमन पुनि भेँटे ।
दुसह बिरहसंभव दुख मेटे ।
सीताचरन भरत सिरु नावा ।
अनुजसमेत परमसुख पावा ।

नंतर लक्ष्मणशत्रुघ्न भेटले आणि त्यांनीं आपलें विरहदुःख खणून काढलें. भरतशत्रुघ्न जानकीच्या चरणांस वंदन करून अत्यंत सुखी झाले.

प्रभु बिलोकि हरषे पुरबासी ।
जनित बियोग बिपति सब नासी ।
प्रेमातुर सब लोग निहारी ।
कौतुक कीन्ह कृपाल खरारी ।

प्रभूंच्या दर्शनानें पुरजनांस हर्ष झाला व त्यांच्या वियोगजन्य विपत्तींचा अंत झाला. सर्व प्रजा प्रेमातुर पाहून दयाघन खरारियूंनीं एक सहज चमत्कार करून दाखविला.

अमित रूप प्रगटे तेहि काला ।
जथाजोग मिले सबहिँ कृपाला ।
कृपादृष्टि रघुबीर बिलोकी ।
किये सकल नर नारि बिसोकी ।
छन महँ सबहिँ मिले भगवाना ।
उमा मरम यह काहु न जाना ।

त्या समयास दयाघन असंख्य रूपांनीं प्रकट झाले आणि सर्वांशींच यथोचित रीतीनें भेटले. रघुवीरांनीं कृपादृष्टीनें अवलोकन करून सर्व नरनारींना शोक-मुक्त केलें. भगवंतांनीं सर्वांना एकाच क्षणांत भेटी दिल्या. ( शंकर म्हणतात ) पार्वति ! तें मर्म मात्र कोणाच्याहि ध्यानांत आलें नाहीं.

एहि बिधि सबहिँ सुखी करि रामा ।
आगे चले सील-गुन-धामा ।
कौसल्यादि मातु सब धाईँ ।
निरखि बच्छ जनु धेनु लवाईं ।

ह्याप्रमाणें सर्वांचा संतोष करून शीलगुणनिधान श्रीरामचंद्र पुढें चालूं लागले. सवत्स धेनू वत्सास पाहून जशा धांव घेतात तशा कौसल्यादि सर्व माता लगबगीनें आल्या.

१ या शब्दचित्रांतलें कवींचें लाघव फार प्रेक्षणीय आहे.

छंद–जनु धेनु बालक बच्छ तजि गृह चरन बन परबस गईं। दिनअंत पुर रुख स्रवत थन हुंकार करि धावत भईं॥ अतिप्रेम प्रभु सब मातु भेंटी बचन मृदु बहु बिधि कहे। गइ बिषम बिपति बियोगभव तिन्ह हरष सुख अगिनित लहे॥ ४॥

तेव्हां तान्ह्या पाडसास गोठ्यांत सोडून गुराख्याच्या तावडींत रानांत चरण्यासाठीं गेलेल्या गाई, दिवस मावळतांच गांवाकडे तोंड करून पान्हा फुटून हंबरडा फोडीत धांवत आहेत असें वाटलें. सर्व माता प्रभूस अत्यंत प्रेमानें भेटल्या. त्यांचीं लडिवाळ भाषणें झालीं. वियोगजनित दारुण दुःखाचा अंत झाला आणि हर्ष व सुख यांनाहि अंत राहिला नाहीं.

दो०–भेंटेउ तनय सुमित्रा राम-चरन-रति जानि[1]। रामहिँ मिलत कैकई हृदय बहुत सकुचानि॥ १४॥

लक्ष्मणास रामचरणांचा भक्त जाणून सुमित्रा भेटली. रामास भेटतांना कैकेयी मात्र मनांत फारच ओशाळली.

दो०–लछिमन सब मातन्ह मिलि हरषे आसिष पाइ। कैकइ कहँ पुनि पुनि मिले मन कर छोभ न जाइ॥ १५॥

सर्व मातांस भेटून व त्यांचे आशीर्वाद घेऊन लक्ष्मण हर्षित झाला. तो कैकेयीस अनेकवार भेटला तरीदेखील त्याच्या मनांतली अढी साफ निघेना.

चौ०–सासुन्ह सबन्ह मिली बैदेही।
चरनन्हि लागि हरष अति तेही।
देहिँ असीस बूझि कुसलाता।
होहु अचल तुह्मार अहिवाता।

जानकीनें सर्व सास्वांस भेटून वंदन केलें. त्यांनीं अत्यानंदानें तीस 'अखंड सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद देऊन कुशल विचारिलें.

सब रघु-पति-मुख-कमल बिलोकहिँ।
मंगल जानि नयन जल रोकहिँ।
कनकथार आरती उतारहिँ।
बार बार प्रभुगात निहारहिँ।
नाना भाँति निछावरि करहीँ।
परमानंद हरष उर भरहीँ।

सर्व राजमाता रामचंद्राच्या मुखकमलाकडे न्याहाळूं लागल्या. तो मंगलप्रसंग जाणून त्यांनीं आपले अश्रू डोळ्यांतच थोपून धरिले. त्या सुवर्णपात्रांतून आरती ओवाळीत आणि वरचेवर प्रभूंचा देह न्याहाळीत. त्या अति उल्हासानें अनेक वस्तू रामावरून ओवाळून टाकीत. परमानंदानें त्यांचीं हृदयें शिगोतार भरलीं.

कौसल्या पुनि पुनि रघुबीरहिँ।
चितवति कृपासिंधु रनधीरहिँ
हृदय बिचारति बारहिँ बारा।
कवन भाँति लंकापति मारा।
अतिसुकुमार जुगल मेरे बारे।
निसिचर सुभट महाबल भारे।

कौसल्या दयार्णव रणधीर रघुवीराकडे वरचेवर न्याहाळून पाही आणि फिरफिरून तिच्या मनांत हाच विचार घोळूं लागे कीं, ह्यांनीं लंकापतीला कसें मारलें असावें? कोठें हीं चिमणीं गोजिरीं माझीं दोन बाळें, आणि कोठें मेली ती त्या टोळभैरव आग्या वेताळांची धाड!

दो०–लछिमन अरु सीतासहित प्रभुहिँ बिलोकति मात। परमानंद-मगन-मन पुनि पुनि पुलकितगात॥ १६॥

राजमाता सीतालक्ष्मणांसह प्रभूंस अवलोकन करीत असतां अत्यानंदांत निमग्न होऊन गेल्या आणि त्यांचे शरीरावर वारंवार रोमांच गर्दी करूं लागले.

चौ०–लंकापति कपीस नल नीला।
जामवंत अंगद सुभसीला।
हनुमदादि सब बानरबीरा।
धरे मनोहर मनुजसरीरा।

बिभीषण, सुग्रीव, नल, नील, जांबवंत, अंगद, हनुमंत इत्यादि सर्व सच्छील वानरवीरांनीं मनोहर मनुष्यदेह धारण केले.

भरत–सनेह–सील–व्रत–नेमा।
सादर सब बरनहिँ अतिप्रेमा।

---

१ या 'जानि' शब्दांत चमत्कारिक रहस्य कवीनें भरलें आहे. तें आमच्या 'मानसहंसां'तून पाहून घ्यावें. (भूमिका–परिचय–सुमित्रा).

देखि नगरबासिन्ह कै रीती।
सकल सराहहिँ प्रभु-पद-प्रीती।

सर्व मंडळी भरताचें प्रेम, शील, व्रत, नियम, इत्यादिकांचें अत्यंत प्रेमादरानें वर्णन करूं लागली. नगरवासी जनांची रीति आणि त्यांचे रामचरणीं असलेली प्रीति पाहून सर्वजण त्यांची तारीफ करूं लागले.

पुनि रघुपति सब सखा बोलाये।
मुनिपद लागहु सकल सिखाये।
गुरु बसिष्ठ कुलपूज्य हमारे।
इन्ह की कृपा दनुज रन मारे।

नंतर रघुपतींनीं सर्व मित्रांना बोलाविलें आणि त्या सर्वांस मुनिपदीं वंदन करण्यास सांगितलें. (त्यांस राम म्हणाले— ) हेच आमचे परमपूज्य कुलगुरु वसिष्ठ. ह्यांच्याच कृपेनें युद्धांत राक्षसांचा निःपातः होऊं शकला.

ए सब सखा सुनहु मुनि मेरे।
भये समरसागर कहँ बेरे।
मम हित लागि जनम इन्ह हारे।
भरतहुँ तेँ मोहि अधिक पियारे।
सुनि प्रभुबचन मगन सब भये।
निमिष निमिष उपजत सुख नये।

( राम वसिष्ठांना म्हणाले– ) हे मुने ! ऐका. हे सर्व माझे मित्र होत. युद्धरूपी समुद्रांत हेच मला जहाजाप्रमाणें उपयोगीं पडले. केवळ माझ्या हितासाठीं म्हणून हे आपल्या जीवांवर देखील उदार झाले. मला हे भरतापेक्षां देखील जास्त प्रिय वाटतात. प्रभूंचें तें भाषण ऐकून सर्वजण आनंदांत डूब झाले. त्यांस क्षणोक्षणीं प्रेमाच्या लाटांवर लाटा उचंबळून येत.

**दो०–कौसल्या के चरनन्हि पुनि तिन्ह नायेउ माथ। आसिश दीन्ही हरषि तुम्ह प्रिय मम जिमि रघुनाथ ॥ १७ ॥**

नंतर त्यांनीं कौसल्येच्या चरणांस वंदन केलें. तेव्हां ती त्यांस आनंदानें आशीर्वाद देऊन म्हणाली, मला माझा राम आणि तुम्ही अगदीं एक आहांत.

**दो०–सुमनबृष्टि नभ संकुल भवन चले सुखकंद। चढ़ी अटारिन्ह देखहिँ नगर नारि-बर-बृंद ॥ १८ ॥**

सुखकंद श्रीरामचंद्र राजवाड्याकडे जाण्यास निघाले असतां आकाशांतून विपुल पुष्पवृष्टि होऊं लागली. स्त्रियांचे थवेच्या थवे उंच माड्यांवरून रामास पाहूं लागले.

चौ०–कंचनकलस बिचित्र सँवारे।
सबहिँ धरे सजि निज निज द्वारे।
बंदनवार पताका केतू।
सबन्हि बनाये मंगलहेतू।
बीथी सकल सुगंध सिँचाई।
गजमनि रचि बहु चौक पुराई।
नाना भाँति सुमंगल साजे।
हरषि नगर निसान बहु बाजे।

चित्रविचित्र सुवर्णकलश सिद्ध करून सर्वांनीं आपापल्या द्वारभागीं खबसूरतीनें ठेवले. मंगलद्योतक पताका, तोरणें व निशाणें सर्वांनीं उभारलीं. सर्व रस्त्यांतून सुगंधित सडे शिंपडण्यांत आले. मोत्यांचीं अनेक ग्रहदेवतापीठें तयार करण्यांत आलीं. तो मंगल समारंभ शहरांत सुशोभित करण्यांत आला. शहर आनंदगजरानें गजबजून गेलें.

जहँ तहँ नारि निछावरि करहीँ।
देहिँ असीस हरष उर भरहीँ।
कंचनथार आरती नाना।
जुवती सजे करहिँ सुभ गाना।
करहिँ आरती आरतिहर कै।
रघु-कुल-कमल-बिपिन-दिन-कर कै।

ठिकठिकाणीं स्त्रिया अनेक वस्तू प्रभूंवरून ओवाळून टाकीत आणि हर्षभरित अंतःकरणानें आशीर्वाद देत. सुवर्णतबकांतून पुष्कळच आरत्या फिरल्या. स्त्रीसमाजांत मंगलगीतें सुरू झालीं. रघुकुलकमलवनाला सूर्याप्रमाणें असलेल्या त्या दुःखविमोचक श्रीरामचंद्रास नीराजनें झालीं.

पुरसोभा संपति कल्याना।
निगम सेष सारदा बखाना।
तेउ यह चरित देखि ठगि रहहीँ।
उमा तासु गुन नर किमि कहहीँ।

( शिव सांगतात ) अयोध्येची शोभा, संपत्ति आणि सुख यांचें वर्णन वेदांनीं, शेषानें, व सरस्वतीनेंहि केलेलें आहे. परंतु, हे पार्वति ! त्या वेळच्या अयोध्येच्या देखाव्यानें त्यांनाहि भुरळ पाडली. मग मनुष्याकडून त्याचें वर्णन व्हायचेंच कसें !

दो०—नारि कुमुदिनी अवध सर रघु-पति-
विरह दिनेस । अस्त भये बिगसत
भई निरखि राम राकेस ॥ १९ ॥

अयोध्यारूप सरोवरांतील स्त्रीरूप कमलिनी राम-विरहरूप सूर्य अस्तंगत झाल्यानंतर रामरूप चंद्रास पाहून प्रफुल्लित झाल्या.

दो०—होहिँ सगुन सुभ बिबिध बिधि
बाजहिँ गगन निसान । पुर-नर-नारि
सनाथ करि भवन चले भगवान ॥२०॥

अनेक प्रकारचे शुभशकुन होत आहेत, स्वर्गांत वाद्य—घोष चालला आहे, सुखसोहळे सुरूं आहेत, अशा थाटांत पुरवासी स्त्रीपुरुषांस सनाथ करीत भगवान् मंदिरप्रवेश करिते झाले.

चौ०—प्रभु जानी कैकई लजानी ।
प्रथम तासु गृह गये भवानी ।
ताहि प्रबोध बहुत सुख दीन्हा ।
पुनि निज भवन गवँन हरि कीन्हा ।
कृपासिंधु जब मंदिर गये ।
पुर-नरनारि सुखी सब भये ।

( शंकर म्हणतात—) पार्वति, कैकेयी लज्जेनें माखली होती. म्हणून प्रभू प्रथम तिच्याच मंदिरांत गेले, व तिचें अनेक प्रकारें सांत्वन करून त्यांनीं तीस प्रसन्न केलें. नंतर प्रभू आपल्या महालांत आले. कृपासागर मंदिरांत पोंचतांच सर्व प्रजा सुखी झाली.

गुरु बसिष्ठ द्विज लिये बोलाई ।
आज सुघरी सुदिन सुभदाई ।
सब द्विज देहु हरषि अनुसासन ।
रामचंद्र बैठहिँ सिंहासन ।

इकडे ब्राह्मणांस बोलावून गुरु वसिष्ठ त्यांना म्हणाले—आजचाच शुभदायक सुदिन आणि सुमुहूर्त आहे. आपण सर्व ब्राह्मणांनीं आनंदानें आज्ञा द्यावी म्हणजे राम सिंहासनारूढ होतील.

मुनि बसिष्ठ के बचन सुहाये ।
सुनत सकल बिप्रन्ह अति भाये ।
कहहिँ बचन मृदु बिप्र अनेका ।
जगअभिराम रामअभिषेका ।
अब मुनिबर बिलंबु नहिँ कीजै ।
महाराज कहुँ तिलक करीजै ।

मुनि वसिष्ठांचें तें समयोचित भाषण सर्व ब्राह्मणांस पूर्ण मान्य झालें. अनेक विप्र जिव्हाळ्यानें म्हणाले कीं, श्रीरामचंद्राचा राज्याभिषेक हेंच जगताचें इष्ट होय. आतां मात्र, मुनिश्रेष्ठ ! विलंब न करतां महाराजांना अभिषेक करण्यांत यावा.

दो०—तब मुनि कहेउ सुमंत्र सन सुनत
चलेउ हरषाइ । रथ अनेक बहु बाजि
गज तुरत सँवारेउ जाइ ॥ २१ ॥
जहँ तहँ धावन पठइ पुनि मंगल द्रब्य
मँगाइ । हरष समेत बसिष्ठपद पुनि
सिरु नायेउ आइ ॥ २२ ॥

तेव्हां वसिष्ठांनीं सुमंताला आज्ञा केली. ती ऐकतांच तो मोठ्या हर्षानें निघाला व त्यानें लागलींच अनेक अश्व, गज, रथ, सज्ज, केले, आणि चोहींकडे जासूद रवाना करून मंगलद्रव्यें मागविलीं. नंतर परत येऊन त्यानें गुरुजींस आनंदानें प्रणाम केला.

चौ०—अवधपुरी अतिरुचिर बनाई ।
देवन्ह सुमनबृष्टि झरि लाई ।

अयोध्येचा थाट अत्यंत अपूर्व होता. देवांनीं तर पुष्पांची संततधारच धरली.

राम कहा सेवकन्ह बोलाई ।
प्रथम सखन्ह अन्हवावहु जाई ।
सुनत बचन जहँ तहँ जन धाये ।
सुग्रीवादि तुरत अन्हवाये ।

रामचंद्रांनीं सेवकास बोलावून आज्ञा केली कीं, ' तुम्ही जा, आणि आधीं आमच्या मित्र पाहुण्यांना अभ्यंग घाला '. ती आज्ञा होतांच सेवकजनांनीं लागलींच धांवपळ करून सुग्रीवादिकांना स्नानें घातलीं.

पुनि करुनानिधि भरत हँकारे ।
निज कर राम जटा निरुवारे ।
अन्हवाये प्रभु तीनिउँ भाई ।
भगतबछल कृपाल रघुराई ।
भरतभाग्य प्रभु—कोमल—ताई ।
सेष कोटि सत सकहिँ न गाई ।

नंतर करुणानिधींनीं भरतास बोलावून त्याचा जटाभार स्वहातानें उगविला. भक्तवत्सल दयाळ रघुनाथ प्रभूंनीं तिघाहि बंधूंना न्हाऊं घातलें. भरताचें भाग्य आणि प्रभूचें सौहार्द कोटिशत शेषांच्याहि वाचेच्या पार आहे.

पुनि निज जटा राम बिबराये ।
गुरु अनुसासन माँगि नहाये ।
करि मज्जन प्रभु भूषन साजे ।
अंग अनंग कोटि छबि लाजे ।

नंतर गुरुमहाराजांची आज्ञा घेऊन श्रीरामचंद्रांनीं आपला जटाभार उगवून घेतला, आणि स्नान करून त्यांनीं अलंकार लेइले. तेव्हां त्यांच्या अंगकांतीसमोर कोटिशः मदन लज्जित होत.

**दो०—सासुन्ह सादर जानकिहि मज्जन तुरत कराइ । दिब्य बसन बर भूषण अँग अँग सजे बनाइ ॥ २३ ॥**

इकडे जानकीस तिच्या सास्वांनीं लागलीच मोठ्या लडिवाळानें न्हाऊं घातलें आणि तीस दिव्य वस्त्रें लेववून, तिच्या सर्वांगांवर भूषणें घालून, तिचा उत्तम प्रकारें शृंगार केला.

**दो०—राम-वाम-दिसि सोभित रमारूप गुनखानि । देखि मातु सब हरषीं जनम सुफल निज जानि ॥ २४ ॥**

गुणखनी साक्षात् लक्ष्मी अशी ती जानकी श्रीरामचंद्राच्या वामभागीं विराजित झालेली अवलोकन करून सर्व माता हर्षित होत्सात्या आपलें जीवितसाफल्य मानूं लागल्या.

**दो०—सुनु खगेस तेहि अवसर ब्रह्मा सिव मुनि बृंद । चढ़ि बिमान आये सब सुर देखन सुखकंद ॥ २५ ॥**

हे गरुडा ! ऐक. त्या प्रसंगीं ब्रह्मदेव, शिव, मुनिवृंद आणि सर्व देव विमानांत बसून त्या सुखकंदाच्या दर्शनासाठीं जमले.

चौ०—प्रभु बिलोक मुनिमन अनुरागा ।
तुरत दिव्य सिंहासन माँगा ।
रबिसम तेज सो बरनि न जाई ।
बैठे राम द्विजन्ह सिरु नाई ।

प्रभूंचें दर्शन होतांच वसिष्ठांचें मन प्रेमपूर्ण झालें. तत्काल त्यांनीं दिव्य सिंहासन मागविलें. त्याचें सूर्याप्रमाणें दैदीप्यमान तेज अवर्णनीय होतें. ब्रह्मवृंदांस वंदन करून श्रीसीतारामचंद्र त्यावर आरूढ झाले.

जनक-सुता-समेत रघुराई ।
पेखि प्रहरषे मुनिसमुदाई ।
बेदमंत्र तब द्विजन्ह उचारे ।
नभ सुर मुनि जय जयति पुकारे ।

जानकीसहित रघुपतीस अवलोकन करून मुनिमंडळीस परमसंतोष झाला. नंतर द्विजांनीं वेदमंत्रोच्चार आरंभला आणि स्वर्गस्थ देव आणि मुनि जयध्वनि करूं लागले.

प्रथम तिलक बसिष्ठ मुनि कीन्हा ।
पुनि सब बिप्रन्ह आयसु दीन्हा ।
सुत बिलोकि हरषीं महतारी ।
बार बार आरती उतारी ।

वसिष्ठ मुनींनीं अभिषेकास प्रारंभ केला व नंतर सर्व ब्रह्मवृंदांना आज्ञा दिली. पुत्रांस अवलोकन करून वृद्ध कौसल्येस आनंदाचें भरतें आलें आणि ती वरचेवर त्यास ओवाळूं लागली.

बिप्रन्ह दान बिबिध बिधि दीन्हे ।
जाचक सकल अजाचक कीन्हे ।
सिंहासन पर त्रि-भुवन-साईं ।
देखि सुरन्ह दुंदभी बजाईं ।

ब्राह्मणांस नानाप्रकारचीं दानें वाटण्यांत आलीं. सर्व याचकवर्ग दारिद्यमुक्त झाला. त्रैलोक्यस्वामी सिंहासनारूढ झालेले पाहून देवांनीं दुंदुभी छेडले.

**छंद—नभ दुंदुभीं बाजहिं बिपुल गंधर्व किन्नर गावहीं । नाचहिं अपछराबृंद परमानंद सुर मुनि पावहीं । भरतादि अनुज बिभीषनांगद हनुमदादि समेत ते । गहे छत्र चामर ब्यजन धनु असि चर्म सक्ति बिराजते ॥ ५ ॥**

स्वर्गांत दुंदुभी इत्यादि अनेक वाद्यांचा गजर होऊं लागला. गंधर्व-किन्नर गाऊं लागले. अप्सरागण नृत्य करूं लागला. देव आणि मुनी परमानंदनिमग्न झाले. भरतादि बंधु, बिभीषणअंगदहनुमंतादिकांसहित छत्र, चामर, व्यजन, धनुष्य, खड्ग, ढाल, शक्ति इत्यादि राजचिन्हें हातांत घेऊन उभे राहिले.

**छंद—श्रीसहित दिन-कर-बंस-भूषन काम बहु छबि सोहई । नव-अंबु-धर-बर-गात अंबर पीत मुनिमन मोहई ॥ मुकुटांगदादि बिचित्र भूषन अंग अंगन्हि प्रति सजे । अंभोजनयन बिसाल उर भुज धन्य नर निरखंत जे ॥ ६ ॥**

श्रीजानकीसहित सूर्यकुलभूषण प्रभूंची कांति अनेक मदनांच्या कांतीप्रमाणें तळपूं लागली. त्यांचा नवमेघाप्रमाणें रमणीय देह आणि पीत वस्त्र मुनींच्याहि मनाला भुरळ घालूं लागले. मुकुट--अंगदादि नानातऱ्हांचीं भूषणें अंगोअंगीं शोभत होतीं. अशा त्या कमलनेत्र, विशालवक्ष, आजानुबाहूस पाहणारेच खरे नेकनशीब होत!

**दो०–वह सोभा समाज सुख कहत न बनइ खगेस। बरनइ सारद सेष स्रुति सो रस जान महेस ॥ २६ ॥**

गरुडा! नाहीं रे बाबा ती शोभा, तो समाज, आणि तें सुख सांगणें शक्य. वेद, शेष आणि शारदा भलेहि तें वानोत, परंतु तो रस खराखुरा जाणणारा तो एक मात्र महेशच.

**दो०–भिन्न भिन्न अस्तुति करि गये सुर निज निज धाम। बंदिबेष धरि बेद तब आये जहँ श्रीराम ॥ २७ ॥**

आपापल्या परींनीं स्तुति करून देव स्वस्थानीं चालते झाले. नंतर वेद बंदिवानांचें रूप घेऊन श्रीरामचंद्राकडे आले.

**दो०–प्रभु सर्बज्ञ कीन्ह अति आदर कृपानिधान। लखेउ न काहू मरम कछु लगे करन गुनगान ॥ २८ ॥**

कृपानिधान सर्वज्ञ प्रभूंनीं त्यांचें योग्य आदरातिथ्य केलें तरीहि पण खरें वर्म कोणाच्याही लक्षांत आलें नाहीं. त्यांनीं प्रभूंचे गुणानुवाद आरंभिले.

**छंद–जय सगुन निर्गुनरूप रूपअनूप भूपसिरोमने। दसकंधरादि प्रचंड निसिचर प्रबल खल भुजबल हने ॥ अवतार नर संसारभार बिभंजि दारुनदुख दहे। जय प्रनतपाल दयाल प्रभु संजुक्तसक्ति नमामहे ॥ ७ ॥**

हे सगुणा, निर्गुणरूपा, अद्वितीयसुंदरा, सामंतचक्रचूडामणे, आपला विजय असो. रावणप्रभृति प्रचंड, प्रबल व दुष्ट राक्षस आपण भुजबलेंकरून संहारलेत. आपल्या ह्या मनुष्यावतारामुळें संसारभार भग्न होऊन दारुण दुःखाचें निर्दाळण झालें आहे. हे प्रणतवत्सल दयाळो, आपला विजय असो. शक्तिसहवर्तमान प्रभूंस आम्ही वंदन करतों.

**छंद–तव बिषम मायाबस सुरासर नाग नर अग जग हरे। भवपंथ भ्रमत अमित दिवस निसि काल कर्म गुनन्हि भरे ॥ जे नाथ करि करुना बिलोके त्रिविध दुख ते निर्बहे। भव-खेद-छेदन-दच्छ हम कहँ रच्छ राम नमामहे ॥ ८ ॥**

हे श्रीहरे! आपल्या दुर्ज्ञेय मायेनें बद्ध केल्याकारणानें सुर, असुर, देव, नाग, नर प्रभृति स्थावरजंगमात्मक विश्वाचें संसारयात्रेंत अपरंपार भ्रमण चाललें आहे. अहर्निश काल, कर्म आणि गुण यांतच तें गुरफटलें आहे. ज्यांचेकडे आपण कृपापूर्वक अवलोकन करतां त्यांचेच त्रिविध ताप निरस्त होतात. हे भवभयविभंजनदक्ष रामा! आमचें रक्षण करावें. आम्ही शरणागत आहोंत.

**छंद–जे ज्ञान-मान-बिमत्त तव भवहरनि भगति न आदरी। ते पाइ सुर-दुर्लभ-पदादपि परत हम देखत हरी ॥ बिस्वास करि सब आस परिहरि दास तव जे होइ रहे। जपि नाम तव बिनु स्रम तरहिं भवनाथ सोइ स्मरामहे ॥ ९ ॥**

हे हरे! ज्ञानाच्या अहंकारानें उन्मत्त होऊन ज्यांनीं संसाराचें उन्मलून करणाऱ्या अशा आपल्या भक्तीचा आदर केला नाहीं ते देवांसहि दुर्लभ अशी गति पावून तेथून देखील भ्रष्ट होताहेत हें आम्हीच पहात आलों आहोंत; आणि केवळ आपणांवरच भरंवसा टाकून आणि सर्व आशेचा त्याग करून जे आपलेच दास बनून आपल्या नामाचा जप करीत राहतात ते, हे नाथ! कष्टावांचून संसारापासून मुक्त होतात हेंहि आम्ही जाणीतच आहोंत.

**छंद–जे चरन सिव अज पूज्य रज सुभ परसि मुनिपतिनी तरी। नखनिर्गता मुनिबंदिता त्रै-लोक्य-पावनि सुरसरी ॥ ध्वज-कुलिस-अंकुस-कंज-युत बन फिरत कंटककिन लहे। पद-कंज-द्वंद मुकुंद राम रमेस नित्य भजामहे ॥ १० ॥**

ज्यांच्या शंकरब्रह्मदेववंदित अशा शुभ पदरजःस्पर्शानें अहिला उद्धरली, ज्यांच्या पदनखापासून मुनिवंदित त्रैलोक्यपावनी अशी भागीरथी निर्माण झाली, जे चरण ध्वज, वज्र, अंकुश, कमल यांनीं चिन्हित आहेत व ज्यांवर वनांत संचार करीत असतांना कांट्यांचे वण वठले आहेत, अशा त्या चरणकमलयुगुलांचें, हे मुकुंदा रामा लक्ष्मीपते ! आम्हांस नित्य भजन घडो.

**छंद–अ-व्यक्त-मूल-मनादि तरु त्वच चारि निगमागम भने । पट कंध साखा पंचबीस अनेक पर्न सुमन घने ॥ फल जुगल बिधि कटु मधुर बेलि अकेलि जेहि आस्रित रहे । पल्लवत फूलत नव ललित संसारबिटप नमामहे ॥ ११ ॥**

हे प्रभो, मनोहर संसारवृक्षरूपी तुला मी वंदन करतों. ह्या विश्ववृक्षाचें मूल अव्यक्त आहे. ( यालाच सांख्यशास्त्रांत पुरुष ही संज्ञा आहे. ) ह्या वृक्षाचा विस्तार अनादि आहे. ( हिलाच प्रधान अगर प्रकृति म्हणतात. ) ह्या वृक्षाच्या त्वचा (महत्तत्व व सात्विक, राजस, तामस, असे तीन अहंकार मिळून ) चार आहेत. त्यास ( तीन गुण, काल, जीव आणि कर्म मिळून ) सहा प्रधान शाखा आहेत. ( मन, बुद्धि, चित्त, अहंकार हें अंतःकरणचतुष्टय; पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें; शब्द, रूप, रस, गंध स्पर्श हीं ज्ञानेंद्रियें; कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा आणि घ्राण, हीं पंच कर्मेंद्रियें; आणि हात, पाय, शिस्न, गुद, आणि वाणी, व एक जीव मिळून ) पंचवीस उपशाखा त्यास आहेत. त्या वृक्षास (स्वेदज, अंडज, जारज आणि उद्भिज्ज असे अनेक जीवरूपी ) अनेक पर्णें असून ( वासनारूप ) अनेक पुष्पेंहि ( उच्च लोक ) आहेत. त्यास दोन प्रकारचीं ( पापपुण्यानुसार ) एक मधुर आणि एक कटु अशीं फळें येतात. त्या वृक्षाच्या आश्रयानें ( अहंममत्वात्मक अविद्यारूप ) एकच वेली राहते व तीस नित्य नवीन पानें व फुलें ( जीवांचें पुनरुज्जीवन आणि वासनापरंपरा ह्यांची घडामोड या रूपानें ) येतच असतात, असें वेदशास्त्रें म्हणतात.

**छंद–जे ब्रह्म अजमद्वैत-मनु-भव-गम्य मन पर ध्यावहीं । ते कहहु जानहु नाथ हम तव सगुन जस नित गावहीं ॥ करुनायतन प्रभु सदगुनाकर देव यह बर माँगहीं । मन बचन कर्म बिकार तजि तव चरन हम अनुरागहीं ॥१२॥**

अज, अद्वैत, अनुभवगम्य, मनाहून पर, अशा ब्रह्माचें जे ध्यान करीत असतील ते हे नाथ, तें ब्रह्म जाणोत आणि गावोत. आम्ही तर निरंतर तुझ्या सगुण रूपाचीच कीर्ति गात राहणार. हे सद्गुणाकरा, करुणायतना ! कायावाचामनेंकरून आम्ही विकाररहित होऊन तुझ्या चरणांचे ठायीं अनुरक्त असावें एवढाच वर तुजजवळ मागत आहों. तूं आम्हांस तो तेवढा अर्पण कर.

**दो०–सब के देखत बेदन्ह बिनती कीन्हि उदार । अंतरधान भये पुनि गये ब्रह्मआगार ॥ २९ ॥**

सर्वसमाजासमक्ष वेदांनीं लोकोपकारक अशी स्तुति केली आणि ते अंतर्धान पावून ब्रह्मलोकास गेले.

**दो०–बैनतेय सुनु संभु तब आये जहँ रघुबीर । बिनय करत गदगद गिरा पूरित पुलक सरीर ॥ ३० ॥**

हे गरुडा ! नंतर श्रीशंभु रघुवीराजवळ आले. तेव्हां त्यांचें शरीर रोमांचित होऊन ते गद्गद वाणीनें स्तवन करूं लागले.

तोमर छंद–जय राम रमारमनं समनं ।
भव-ताप-भयाकुल पाहि जनं ॥
अवधेस सुरेस रमेस बिभो ।
सरनागत माँगत पाहि प्रभो ॥
दस-सीस-बिनासन बीस भुजा ।
कृत दूरि महा-महि-भूरि-रुजा ॥
रजनी-चर-बृंद-पतंग रहे ।
सर–पावक–तेज प्रचंड दहे ।

हे रमारमण तापत्रयशमन रामा ! आपला विजय असो. ह्या भवदुःखभयग्रस्त दासाचें रक्षण करा. हे अयोध्येश सुरेश लक्ष्मीपते विभो ! हा मी आपणास शरणागत असून माझें पालन करा हीच याचना प्रभूजवळ मी करीत आहे. रावणाच्या दशशिरांचें आणि वीस भुजांचें निकृंतन करून आपण ह्या विश्वाचें अवाढव्य दुःख निवारण केलें आहे. राक्षसवृंदरूप जेवढे म्हणून पतंग होते ते सर्व आपण आपल्या

बाणाग्नीच्या प्रखर तेजानें भस्मसात् करून टाकले आहेत.

महि-मंडल-मंडन चारुतरं ।
धृत-सायक-चाप-निषंग-बरं ॥
मद मोह महा ममता रजनी ।
तमपुंज दिवाकर-तेज-अनी ॥
मनजात किरात निपात किये ।
मृग लोग कुभोग सरेन हिये ॥
हति नाथ अनाथन्हि पाहि हरे ।
विषयाबन पाँवर भूलि परे ॥

हे महिमंडलभूषणा ! सौंदर्याग्रणे, धृतधनुर्बाण-निषंगवरा ! महामदमोहममतारूप रजनीच्या निविडांधकारावर आपण तेजःपुंज दिवाकर आहांत. ह्या मदनरूपी किरातानें जीवरूप मृगाचें हृदय कुभोगरूप शरानें विद्ध केलें आहे, त्याचा निःपात करून हे नाथ ! ह्या अनाथ जीवाचें रक्षण करा. हे हरे ! ह्या पामर जीव विषयाटवींत भ्रांत होऊन पडला आहे.

बहु रोग बियोगन्हि लोग हये ।
भवदंघ्रिनिरादर के फल ये ॥
भवसिंधु अगाध परे नर ते ।
पद-पंकज-प्रेम न जे करते ॥
अतिदीन मलीन दुखी नितहीँ ।
जिन्ह के पदपंकज प्रीति नहीँ ॥
अवलंब भवंत कथा जिन्ह के ।
प्रिय संत अनंत सदा तिन्ह के ॥

विपुलचिंतारूप रोगांनीं जो नाश होत आहे तें केवळ आपल्या पदकमलांचा निरादर करण्याचेंच फळ होय. आपल्या पदपंकजाचे ठायीं जे अनुरक्त होत नाहींत ते ह्या अगाध संसारसागरांत बुडूं लागतात. जे आपल्या पदांबुजांवर प्रेम करीत नाहींत ते सर्वदाच अत्यंत दरिद्री, मलीन व दुःखी राहणार. ज्यांना आपल्या लीलाचरित्रांचा अवलंब असतो त्यांनाच अनंत आणि संत निरंतर प्रिय वाटतात.

नहिँ राग न लोभ न मान मदा ।
तिन्ह के सम बैभव बा बिपदा ॥
एहि तेँ तव सेवक होत मुदा ।
मुनि त्यागत जोग भरोस सदा ॥
करि प्रेम निरंतर नेम लिये ।
पदपंकज सेवित सुद्ध हिये ॥
सम मानि निरादर आदरहीँ ।
सब संत सुखी बिचरंति मही ॥

ज्यांना राग, लोभ, मान, आणि मद यांचा संपर्क उरत नाहीं त्यांना वैभव आणि विपत्ति समान भासतात. ह्याच कारणास्त मुनिजन योगयागादिकांचा संबंध न ठेवतां निरंतर आनंदानें आपले सेवकच बनून राहतात व नियमपूर्वक निरंतर प्रेम करून आपल्या पदपंकजांचेंच शुद्धांतःकरणानें सेवा करतात. असे ते सर्व संतजन मान आणि अपमान सारखा समजून सर्व पृथ्वीवर स्वतंत्र संचार करीत राहतात.

मुनि-मानस-पंकज-भृंग भजे ।
रघुबीर महा-रन-धीर अजे ॥
तव नाम जपामि नमामि हरी ।
भवरोग महा मद मान अरी ।
गुणसील कृपापरमायतनं ।
प्रनमामि निरंतर श्रीरमनं ॥
रघुनंद निकंदय द्वंदघनं ।
महिपाल बिलोकय दीनजनं ॥

अशा त्या मुनींच्या मनोरूप कमलांमध्यें आपला वास भृंगवत् होत असतो. म्हणून, हे महारणधीरा, जन्मरहिता, रघुवीरा ! मलाहि आपलें भजन घडो. हे भवरोगनिकृंतना ! हे महामदमानारिपो ! मी आपणांस वंदन करितों. मला आपलें नामस्मरण घडो. गुण, शील व कृपा यांचें आपण भरपूर भांडार आहांत. हे लक्ष्मीरमणा ! मी आपणांस निरंतर प्रणाम करितों. हे जगत्पालका रघुनंदना ! मज दीनजनांकडे अवलोकन करा आणि माझी भेदबुद्धि निस्तरून टाका.

**दो०—बार बार बर माँगउँ हरषि देहु श्रीरंग । पद-सरो-ज अनपायनी भगति सदा सतसंग ॥ ३१ ॥**

हे श्रीरंगा ! मी वारंवार ह्याच वराची प्रार्थना करतों कीं आपल्या पदकमलांचे ठायीं माझी अनन्यभक्ति जडावी आणि मला निरंतर सत्संग घडावा. हें एवढें दान आपण संतुष्ट होऊन मला द्या.

**दो०—बरनि उमापति रामगुन हरषि गये कैलास । तब प्रभु कपिन्ह दिवाये सब बिधि सुखप्रद बास ॥ ३२ ॥**

रामचंद्राचें गुणवर्णन करून संतुष्ट होत्साते उमापति कैलासाप्रत गमन करिते झाले. नंतर प्रभूंनीं कपींस सर्वप्रकारच्या सुखोपभोगांनीं समृद्ध अशीं निवासस्थानें देवविलीं.

चौ०—सुनु खगपति यह कथा पावनी ।
त्रिबिध ताप भव-भय-दावनी ।
महाराज कर सुभ अभिषेका ।
सुनत लहहिँ नर बिरति बिबेका ।

हे गरुडा ! ऐक. ही कथा परमपवित्र असून त्रिविधताप व संसारभय यांचा नाश करणारी आहे. महाराज ! रामचंद्रांचा शुभ अभिषेकप्रसंग श्रवण केल्यानें जीवास वैराग्य आणि ज्ञान प्राप्त होतात.

जे सकाम नर सुनहिँ जे गावहिँ ।
सुख-संपति नाना बिधि पावहिँ ।
सुरदुर्लभ सुख करि जग माहीँ ।
अंतकाल रघु पति-पुर जाहीँ ।
सुनहिँ बिमुक्त बिरत अरु बिषई ।
लहहिँ भगति गति संपति नई ।

जे जीव ह्या कथेचें सकाम श्रवण आणि पठन करतील त्यांना नानाप्रकारचीं सुखें व संपत्ति प्राप्त होतील. ते ह्या लोकीं देवांनाहि दुर्लभ अशीं सुखें भोगून अंतीं वैकुंठास जातील. जे मुक्त, मुमुक्षु अगर विषयनिरत ही कथा श्रवण करतील त्यांना अभिनव भक्ति, गति आणि ऐश्वर्य यांची प्राप्ति होईल.

खगपति रामकथा मैँ बरनी ।
स्व-मति-बिलास-त्रास-दुख-हरनी ।
बिरति बिबेक भगति दृढकरनी ।
मोह नदी कहँ सुंदर तरनी ।

हे गरुडा ! ही त्रास आणि दुःख यांचें हरण करणारी रामकथा मीं तुला यथामतिगति वर्णन केली. ही कथा वैराग्य, विवेक आणि भक्ति यांस दृढ करणारी असून मोहरूप नदींतून पार नेणारी अशी सुंदर नावच आहे.

नित नव मंगल कोसलपुरी ।
हरषित रहहिँ लोग सब कुरी ।
नित नइ प्रीति राम-पद-पंक-ज ।
सब के जिन्हहिँ नमत सिव मुनि अज ।
मंगन बहु प्रकार पहिराये ।
द्विजन्ह दान नाना बिधि पाये ।

अयोध्येंत नित्य नवीन मंगलोत्सव होऊं लागले. सर्व वर्णांची प्रजा आनंदानें नांदूं लागली. शिव, मुनि, अज इत्यादि ज्यांचें सेवन करतात त्या रामपदपंकजांचे ठायीं सर्वांचें नित्य नवीन प्रेम वाढूं लागलें. याचकांस अनेक प्रकारचीं दानें व भूषणें आणि ब्राह्मणांनाहि नानाविध दानें मिळत असत.

**दो०—ब्रह्मानंदमगन कपि सब के प्रभुपद प्रीति । जात न जाने दिवस तिन्ह गये मास षट बीति ॥ २२ ॥**

सर्व कपि प्रभुपदीं प्रेम करीत होत्साते ब्रह्मानंदांत निमग्न होते. दिवस कसे जात हें त्यांना समजेना. ह्याप्रमाणें तब्बल सहा महिने उलटले.

चौ०—बिसरे गृह सपनेहुँ सुधि नाहीँ ।
जिमि परद्रोह संत मन माहीँ ।
तब रघुपति सब सखा बोलाये ।
आइ सबन्हि सादर सिर नाये ।
परमप्रीति समीप बैठारे ।
भरतसुखद मृदु बचन उचारे ।

संताच्या मनाला परद्रोहाचा जसा स्वप्नांतहि विटाळ होत नाहीं त्याप्रमाणें मंडळी घरदार विसरून स्वप्नांतहि त्यांना कधीं त्यांची आठवण होत नसे. नंतर रामांनीं सर्व मंडळींना बोलाविलें व त्यांनीं येऊन फार आदरपूर्वक वंदन केलें. भक्तसुखद रामांनीं त्यांस अत्यंत प्रेमानें जवळ बसविलें आणि ते त्यांस प्रेमळ वाणीनें म्हणूं लागलेः—

तुम्ह अति कीन्हि मोरि सेवकाई ।
मुख पर केहि बिधि करउँ बडाई ।
ता तेँ मोहि तुम्ह अतिप्रिय लागे ।
मम हित लागि भवन सुख त्यागे ।

तुम्हीं माझी खूपच सेवा केलीत. तुमच्या तोंडावर तुमची तारीफ मीं कशी करावी ? माझ्या कार्यास्तव तुम्ही आपल्या गृहसौख्याचा देखील त्याग केलात. म्हणून तुम्ही मला अतिशयच आवडतां.

अनुज राज संपति बैदेही ।
देह गेह परिवार सनेही ।
सब मम प्रिय नहिँ तुम्हहिँ समाना ।
मृषा न कहउँ मोर यह बाना ।
सब के प्रिय सेवक ये नीती ।
मोरे अधिक दास पर प्रीती ।

बंधु, राज्य, ऐश्वर्य, वैदेही, देह, गेह, परिवार, स्नेही हे सर्वदेखील मला तुमच्या इतके प्रिय नाहींत. हा माझा केवळ मिथ्या प्रलाप नव्हे. आपले सेवक प्रिय वाटणें हा सर्वसाधारण नियम आहे. तथापि सर्वांत अधिक प्रेम आपल्या सेवकावर करणें हें माझें खास ब्रीद आहे.

**दो०–अब गृह जाहु सखा सब भजेहु मोहि दृढ नेम। सदा सर्वगत सर्वहित जानि करेहु अतिप्रेम ॥ ३४ ॥**

मित्रहो! आतां तुम्ही सर्वजण स्वगृहीं जा आणि दृढ नेमानें माझें भजन करीत चला. मी अविनाशी, सर्वव्यापक आणि सर्वजनहितकर्ता आहे, हा विश्वास ठेवून मजवर अत्यंत प्रेम करीत रहा.

चौ०–सुनि प्रभुबचन मगन सब भये।
को हम कहाँ बिसारि तन गये।
एकटक रहे जोरि कर आगे।
सकहिँ न कछु कहि अतिअनुरागे।

प्रभूंचें तें भाषण ऐकून सर्वजण तल्लीन झाले. देहाबरोबर आपण कोण आणि आहोंत कोठें हेंहि भान ते विसरले. ते केवळ हात जोडून एकसारखे टक लावून पाहात राहिले. अत्यंत प्रेमामुळें त्यांना कांहींच बोलवेना.

परमप्रेम तिन्ह कर प्रभु देखा।
कहा बिबिधबिधि ज्ञान बिसेखा।
प्रभु सनमुख कछु कहइ न पारहिँ।
पुनि पुनि चरनसरोज निहारहिँ।

प्रभूंनीं त्यांचा प्रेमातिरेक पाहून त्यांनीं त्यांची अनेकप्रकारें समजूत घालून विशिष्ट ज्ञानोपदेश केला तरीहि ते प्रभूंच्या समक्ष कांहीं बोलूं न शकतां वरचेवर त्यांच्या चरणकमलांकडेच पहात राहिले.

तब प्रभु भूषन बसन मँगाये।
नाना रंग अनूप सुहाये।
सुग्रीवहिँ प्रथमहिँ पहिराये।
बसन भरत निज हाथ बनाये।
प्रभुप्रेरित लछिमन पहिराये।
लंकापति रघुपति मन भाये।
अंगद बैठि रहा नहिँ डोला।
प्रीति देखि प्रभु ताहि न बोला।

तेव्हां प्रभूंनीं नाना रंगांचे सुंदर आणि अनुपम असे वस्त्रालंकार आणविले. भरतानें स्वतः अहेर सिद्ध करून प्रथम सुग्रीवास सादर अर्पण केला. नंतर प्रभूंच्या आवडीचा त्यांच्याच आज्ञेवरून लक्ष्मणानें बिभीषणास अहेर केला. अंगद अगदीं स्तब्ध बसला होता. तो हाललादेखील नाहीं. त्याचें प्रेम ओळखून प्रभूंच्यानें त्याच्याशीं बोलवलें नाहीं.

**दो०–जामवंत नीलादि सब पहिराये रघुनाथ। हिय धरि रामरूप सब चले नाइ पद माथ ॥ ३५ ॥**

रघुनाथांनीं जांबवंतनीलादि सर्व मंडळींना अहेर लेवाविले. नंतर मंडळी रामपदीं वंदन करून आणि रामरूप हृदयांत सांठवून जाऊं लागली.

**दो०–तब अंगद उठि नाइ सिरु सजल नयन कर जोरि। अतिबिनीत बोलेउ बचन मनहुँ प्रेमरस बोरि ॥ ३६ ॥**

तेव्हां अंगद उठला आणि वंदन करून व हात जोडून सजलनेत्र होत्साता जणूंकाय प्रेमरसाचीं पुटेंच दिलीं आहेत असे अत्यंत काकुळतीचे बोल बोलूं लागला—

चौ०–सुनु सर्बज्ञ कृपा-सुख-सिंधो।
दीन-दया-कर आरतबंधो।
मरती बार नाथ मोहि बाली।
गयेउ तुह्मारेहिँ कोछे घाली।

हे दीनदयाळ कृपासुखसागर आर्तबंधो! बघा, आपण सर्वज्ञ आहांत. माझी विनंति श्रवण करावी. हे नाथ! मरतेवेळीं वालीनें मला आपल्याच ओटींत घातलें.

अ-सरन-सरन बिरद संभारी।
मोहि जनि तजहु भगत-हित-कारी।
मोरे तुह्म प्रभु गुरु पितु माता।
जाउँ कहाँ तजि पद-जल-जाता।

अनाथरक्षक हें आपलें ब्रीद आपण सांभाळलेंच पाहिजे. हे भक्तहितकरा! मला अव्हेरूं नका. माझे स्वामी, गुरु, माता, पिता एक आपणच! तेव्हां मी ह्या पदपंकजांस सोडून जावें तरी कोठें?

तुह्मइँ बिचारि कहहु नरनाहा।
प्रभु तजि भवन काजु मम काहा।
बालक ज्ञान-बुद्धि-बल-हीना।
राखहु सरन जानि जन दीना।

हे नरनाथ ! आपणच विचार करून बघा कीं, प्रभूस सोडून घरीं माझें काम काय अडलें आहे ? मी आपलें लेंकरूं आहे. मला ज्ञान, बुद्धि, बल, कांहीं एक नाहीं. हे नाथ ! आपला हलक्यांत हलका हुजऱ्या जाणून मज शरणागतावर आपली निगा असावी.

नीचि टहल गृह कै सब करिहउँ ।
पद-पंक-ज बिलोकि भव तरिहउँ ।
अस कहि चरन परेउ प्रभु पाही ।
अब जनि नाथ कहहु गृह जाही ।

सर्व भुयार घरधंदा देखील करण्यास मी तयार आहे. आपलीं हीं पदकमलें पाहूनच मी संसार तरून जाईन. असें बोलून त्यानें प्रभूंच्या चरणांस घट्ट मिठी मारली आणि म्हणाला—हे नाथ ! अतःपर मात्र घरीं जाण्याविषयीं मला म्हणूं नका हो !

**दो०–अंगदबचन बिनीत सुनि रघुपति करुनासीवँ । प्रभु उठाइ उर लायेउ सजल नयनराजीव ॥ ३७ ॥**

अंगदाचें तें नम्र भाषण ऐकून करुणापारावार रघुपतींनीं त्याला उचलून पोटाशीं धरिलें. तेव्हां प्रभूंचेहि नेत्र प्रेमाश्रूंनीं डबडबले.

**दो०– निज उरमाल बसन मनि बालितनय पहिराइ । बिदा कीन्हि भगवान तब बहु प्रकार समुझाइ ॥ ३८ ॥**

भगवंतांनीं स्वतः आपल्या गळ्यांतला हार, वस्त्रें आणि भूषणें अंगदाला लेवविलीं आणि त्याची बहुतप्रकारें समजूत घालून बोळवण केली.

चौ०–भरत-अनुज-सौमित्रि-समेता ।
पठवन चले भगत कृतचेता ।
अंगदहृदय प्रेम नहिँ थोरा ।
फिरि फिरि चितब राम की ओरा ।
बार बार कर दंडप्रनामा ।
मन अस रहन कहहिँ मोहि रामा ।

भरत, लक्ष्मण आणि शत्रुघ्न यांच्यासहवर्तमान भक्तांचें मनोगत संभाळणारे श्रीराम मंडळीस निरोप देण्यास गेले. अंगदाचें हृदय अत्यंत प्रेममग्न होऊन तो पुनःपुनः रामांकडे पाही, आणि मला राहण्यास सांगतील ह्या आशेनें त्यांस वरचेवर दंडप्रणाम करी.

राम बिलोकनि बोलनि चलनी ।
सुमिरि सुमिरि सोचत हँसि मिलनी ।
प्रभुरुख देखि बिनय बहु भाखी ।
चलेउ हृदय पद-पंक-ज राखी ।

प्रभूंचें पाहणें, बोलणें, चालणें, हंसणें, भेटणें इत्यादिकांची वारंवार आठवण होऊन अंगदाला भडभडून येई. त्यानें अनेकवार विनंतिहि केली, परंतु प्रभूंची मर्जी ओळखून व त्यांचीं पदकमलें हृदयांत सांठवूनच त्याला जावें लागलें.

अति सादर सब कपि पहुँचाये ।
भाइन्ह सहित भरत पुनि आये ।
तब सुग्रीवँ चरन गहि नाना ।
भाँति बिनय कीन्ही हनुमाना ।
दिन दस करि रघु–पति–पद–सेवा ।
पुनि तव चरन देखिहउँ देवा ।

अत्यंत सन्मानानें सर्व कपींची बोळवण केल्यानंतर रामचंद्र भरतादिबंधुसहवर्तमान परत फिरले. नंतर सुग्रीवाच्या चरणीं नमन करून हनुमंत फार विनयपूर्वक म्हणाला—महाराज ! चार दिवस प्रभुचरणांची सेवा करून मी फिरून आपल्या चरणांच्या दर्शनास येतों.

पुन्यपुंज तुम्ह पवनकुमारा ।
सेवहु जाइ कृपाआगारा ।
अस कहि कपिपति चले तुरंता ।
अंगद कहइ सुनहु हनुमंता ।

( सुग्रीवानें उत्तर दिलें—) हे वायुकुमारा ! तूं पुण्यराशी आहेस. जा आणि त्या दयाघनाची सेवा करीत रहा. असें म्हणून कपिपति सुग्रीव तसेच जाण्यास निघाले, तेव्हां अंगद म्हणाला, हे मारुते ! हें बघ.

**दो०–कहेहु दंडवत प्रभु सन तुम्हहिँ कहउँ कर जोरि । बार बार रघुनायकहिँ सुरति करायेहु मोरि ॥ ३९ ॥**

तूंच हात जोडून माझा प्रभूस साष्टांग नमस्कार सांगत जा आणि रघुनायकांस माझें वारंवार स्मरणहि देत रहा.

**दो०–अस कहि चलेउ बालिसुत फिरि आयेउ हनुमंत । तासु प्रीति प्रभु सन कही मगन भये भगवंत ॥ ४० ॥**

असें म्हणून अंगद पुढें चालूं लागला. इकडे हनुमंत परतले. त्यानें अंगदाचें प्रेम जेव्हां भगवंताला निवेदन केलें तेव्हां प्रभूहि सद्गद झाले.

**दो०—कुलिसहु चाहि कठोर अति कोमल कुसुमहु चाहि । चित खगेस अस राम कर समुझि परइ कहु काहि ॥ ४१ ॥**

बा गरुडा ! श्रीरामचंद्रांचें मन त्यांच्या इच्छेनुसार वज्राहूनहि कठोर होतें आणि पुष्पाहूनहि अत्यंत कोमल होतें. अशा त्यांच्या अंतःकरणाचा ठाव घेणारा असेलच कोणी तर तोदेखील अवचटच समज.

चौ०—पुनि कृपाल लियो बोलि निषादा ।
दीन्हे भूषन बसन प्रसादा ।
जाहु भवन मम सुमिरन करेहू ।
मन क्रम बचन धर्म अनुसरेहू ।
तुम्ह मम सखा भरतसम भ्राता ।
सदा रहेहु पुर आवत जाता ।

नंतर दयाघनांनीं गुहास बोलाविलें आणि वस्त्रालंकाराचा त्याला प्रसाद देऊन ते म्हणाले, तूं आतां जा आणि घरींच राहून माझें स्मरण कर, आणि कायावाचामनेंकरून स्वधर्मानें वागत जा. तूं माझा सखा माझ्या बंधु भरतासारखा आहेस. नेहमीं अयोध्येस जाऊन येऊन रहा.

बचन सुनत उपजा सुख भारी ।
परेउ चरन भरि लोचन बारी ।
चरननलिन उर धरि गृह आवा ।
प्रभुसुभाउ परिजनन्हि सुनावा ।

तें वचन ऐकून गुहास फार संतोष वाटला. त्याचे डोळे पाण्यानें भरून येऊन त्यानें रामचरणीं मिठी मारली, आणि तींच चरणकमलें हृदयांत ठेवून तो घरीं जाता झाला. प्रभूंच्या सौजन्याची आपल्या मंडळींत तो प्रशंसा गाऊं लागला.

रघुपतिचरित देखि पुरबासी ।
पुनि पुनि कहहिँ धन्य सुखरासी ।
राम राज बैठे त्रैलोका ।
हरषित भये गये सब सोका ।
बयरु न कर काहू सन कोई ।
रामप्रताप बिषमता खोई ।

रामचंद्रांचीं चरित्रें पाहून नगरवासी लोक त्या सुखनिधानास वारंवार धन्यवाद देऊं लागले. श्रीराम राज्यारूढ होतांच त्रैलोक्य हर्षित झालें. सर्व दुःखें नष्ट झालीं. निर्द्वंद्वतेचें साम्राज्य छावलें. श्रीरामाच्या प्रतापानें वैरास खो बसला.

**दो०—बरनास्रम निज निज धरम निरत बेदपथ लोग । चलहिँ सदा पावहिँ सुख नहिँ भय सोक न रोग ॥ ४२ ॥**

प्रजाजन आपापल्या वर्णाश्रमाचे वेदविहित धर्म आस्थेनें आचरूं लागले. ह्याप्रमाणें त्यांची दिनचर्या चालूं असतां ते सदैव सुखी राहून, भय, शोक व रोग ह्यांपासून मुक्त असत.

चौ०—दैहिक दैविक भौतिक तापा ।
रामराज नहिँ काहुहि ब्यापा ।
सब नर करहिँ परसपर प्रीती ।
चलहिँ स्वधर्म निरत स्रुतिरीती ।

आधिदैविक, आध्यात्मिक व आधिभौतिक कोणच्याच प्रकारचा ताप रामाच्या राजवटींत कोणालाहि बाधला नाहीं. सर्व प्रजा एकमेकांवर प्रेम करीत आणि वैदिक रीतीनें स्वधर्मनिरत असत.

चारिहु चरन धरम जग माहीँ ।
पूरि रहा सपनेहुँ अघ नाहीँ ।
राम–भगति–रत सब नर नारी ।
सकल परम गति के अधिकारी ।
अल्प मृत्यु नहिँ कवनिउँ पीरा ।
सब सुंदर सब बिरुज सरीरा ।

रामराज्यांत धर्म परिपूर्ण चारीहि चरणांनीं जगांत वावरत होता. पाप म्हणून कधीं स्वप्नांत देखील आढळेना. सर्व नरनारी रामभजनांत निमग्न राहून सर्वजण परमपदाचे अधिकारी होत. अल्पमृत्यु अगर इतर कोणतीहि पीडा राहिली नाहीं. सर्वांचेच देह सुंदर व निरोगी असत.

नहिँ दरिद्र कोउ दुखी न दीना ।
नहिँ कोउ अबुध न लच्छनहीना ।
सब निर्दंभ धर्मरत पुनी ।
नर अरु नारि चतुर सब गुनी ।
सब गुणज्ञ पंडित सब ज्ञानी ।
सब कृतज्ञ नहिँ कपट सयानी ।

कोणीहि दारिद्री, दुःखी अगर दीन उरला नाहीं. अशिक्षित वा गुणहीन असाहि कोणी मिळेना. सर्व

नरनारी निरभिमान, धर्मनिरत,पुण्यात्मे, चतुर आणि सर्वगुणसंपन्न असत. सर्वच गुणज्ञ,पंडित,ज्ञानी, कृतज्ञ असत. कपटाचें कसब कोणालाहि अवगत नव्हतें.

**दो०—रामराज नभगेस सुनु सचराचर जग माहिँ । काल कर्म सुभाव गुन कृत दुख काहुहि नाहिँ ॥ ४३ ॥**

हे गरुडा ! ऐक. रामराज्यांत चराचर विश्वामध्यें काल, कर्म, स्वभाव आणि गुण, ह्यांच्यापासून होणारे क्लेश अस्तंगत झाले.

चौ०—भूमि सप्त सागर मेखला ।
एक भूप रघुपति कोसला ।
भुवन अनेक रोम प्रति जासू ।
यह प्रभुता कछु बहुत न तासू ।

सप्तसमुद्रवलयांकित पृथ्वीचें चक्रवर्तित्व एकट्या कोसलेश्वर रघुपतीकडेच होतें. ज्याच्या प्रत्येक रोमांत अनेक ब्रह्मांण्डें वास करतात, त्यास हें सार्वभौमत्व म्हणजे मोठीशी गोष्ट मुळींच नव्हे.

सो महिमा समुझत प्रभु केरी ।
यह बरनत हीनता घनेरी ।
सो महिमा खगेस जिन्ह जानी ।
फिरि एहि चरित तिन्हहुँ रति मानी ।
सोउ जाने कर फल यह लीला ।
कहहिँ महा मुनिबर दमसीला ।

प्रभूंच्या असली महिम्याचा विचार केला असतां त्यांस ह्या पृथ्वीचे चक्रवर्ती म्हणणें म्हणजे उलट त्यांची भक्कम निंदा करणेंच होय. परंतु, गरुडा ! प्रभूचा तो महिमा ज्यांनीं जाणला तेदेखील फिरून ह्या त्याच्या चरित्रावर प्रेमच करतात.ह्या लीलांवर प्रेम बसणें हेंच तो महिमा जाणण्याचें फल होय असें योगनिष्ठ मुनीश्वरांचें देखील मत आहे.

रामराज कर सुख संपदा ।
बरनि न सकइ फनीस सारदा ।
सब उदार सब परउपकारी ।
बिप्र–चरन–सेवक नरनारी ।
एक–नारि–ब्रत–रत सब झारी ।
ते मन बच क्रम पति-हित-कारी ।

रामाच्या आमदानींतल्या हरतऱ्हेच्या आबदानीचें वर्णन करण्यास शेष आणि शारदा यांची देखील बोबडीच वळेल. सर्व नरनारी,उदार,परोपकारी आणि विप्रचरणसेवक असे असत.सर्वच पुरुष एकपत्नीव्रताचें आचरण करणारे, आणि स्त्रिया कायावाचामनेंकरून पतिहिताला जागणाऱ्या.

**दो०—दंड जतिन्ह कर भेद जहँ नर्त्तक नृत्यसमाज । जितहु मनहिँ अस सुनिय जग रामचंद्र के राज ॥ ४४ ॥**

रामाच्या कारकीर्दींत दंड फक्त यतीजवळच आणि भेद फक्त नाचण्याऱ्याच्या कलाकुसरींतच उरला होता आणि जिंकणें हा शब्द फक्त मनासंबंधानेंच ऐकूं येई.

चौ०—फूलहिँ फरहिँ सदा तरु कानन ।
रहहिँ एक सँग गज पंचानन ।
खग मृग सहज बयरु बिसराई ।
सबन्हि परसपर प्रीति बढाई ।
कूजहिँ खग मृग नाना बृंदा ।
अभय चरहिँ बन करहिँ अनंदा ।
सीतल सुरभि पवन बह मंदा ।
गुंजत अलि लेइ चलि मकरंदा ।
लता बिटप माँगे मधु चवहीँ ।
मनभावतो धेनु पय स्रवहीँ ।
ससंपन्न सदा रह धरनी ।
त्रेता भइ कृतजुग कै करनी ।

वृक्ष आणि वनें निरंतर फलपुष्पांनीं गजबजलेलीं असत. हत्ती आणि सिंह देखील हेळीमेळीनें रहात. सर्व पशुपक्षी परस्परांतील स्वभावसिद्ध वैर विसरून एकमेकांवर अधिकच प्रेम करीत. त्यांचे अनेक समुदाय नानाप्रकाचे शब्द करीत, निर्भय होत्साते वनांत संचार आणि विहार करीत असत. शीतल, सुगंध मंद, असा वायु सदैव वहात राहून भ्रमर गुंजारव करीत पुष्पांतील मकरंद वाहून नेत असत. लतावृक्ष गरज लागतांच मधुस्राव करीत. गाई मनमुराद दूध देत. पृथ्वी सर्वकालीं विपुल धान्य पिकवी. अशा ह्या कृतयुगाच्या गोष्टी त्रेतायुगांत होऊं लागल्या.

प्रगटीं गिरिन्ह बिबिध मनिखानी ।
जगदातमा भूप जग जानी ।
सरिता सकल बहहिँ बर बारी ।
सीतल अमल स्वादु सुखकारी ।
सागर निज मरजादा रहहीँ ।
डारहिँ रतन तटन्हि नर लहहीँ ।

सरसि-ज-संकुल सकल तडागा ।
अतिप्रसन्न दस-दिसा-बिभागा ।

पर्वतांत निरनिराळ्या रत्नांच्या खाणी गवसत, कारण जगदात्मा प्रभु जगावर राज्य करीत आहे हें त्यांनीं ओळखिलें होतें. सर्व नद्या शीतल, स्वच्छ, स्वादिष्ट आणि निरोगी अशा उत्कृष्ट जलांनीं भरून वाहत. समुद्र आपल्या मर्यादेंतच राहून किनाऱ्यावर रत्नें फेंकून देई व लोक तीं उचलून घेत. सर्व तळीं कमलांनीं व्याप्त आणि दहाहि दिशा अत्यंत प्रसन्न असत.

**दो०-बिधु महि पूर मयूखन्हि रबि तप जेतनेहिँ काज। माँगे बारिद देहिँ जल रामचंद्र के राज ॥ ४५ ॥**

रामचंद्राचे राज्यांत मेघ जरूर तेव्हांच वृष्टि करीत आणि चंद्रसूर्य आपल्या किरणद्वारा पृथ्वीवर अवश्य तितकाच गारठा आणि गरमी यांचा पुरवठा करीत.

चौ०-कोटिन्ह बाजिमेघ प्रभु कीन्हे ।
दान अनेक द्विजन्ह कहँ दीन्हे ।
स्रुति-रथ-पालक धरम-धुरं-धर ।
गुनातीत अरु भोगपुरंदर ।

प्रभूंनीं कोटीचे अश्वमेघ केले आणि ब्राह्मणांस अनेक दानें दिलीं. वेदमार्गप्रतिपालक धर्मधुरंधर श्रीरामचंद्र त्रिगुणातीत असूनहि इंद्रासारखे भोग भोगीत असत.

पतिअनुकूल सदा रह सीता ।
सोभाखानि सुसील बिनीता ।
जानति कृपा-सिंधु-प्रभुताई ।
सेवति चरनकमल मन लाई ।

शोभाखनी, सुशील आणि विनीत अशा जानकीची राहणी सदैव पतीस अनुकूल अशी असे. तिला कृपासिंधूंच्या प्रभुत्वाची ओळख असल्यामुळे ती त्यांच्या चरणकमलांची मनोभावानें सेवा करी.

जद्यपि गृह सेवक सेवकिनी ।
बिपुल सकल सेवाबिधि गुनी ।
निज कर गृहपरिचरजा करई ।
राम-चंद्र-आयसु अनुसरई ।

घरांत जरी नजरबाज असे अनेक खिदमदगार असत तरीदेखील ती सर्व घरधंदे स्वतःच पहात असे आणि रामचंद्रांच्या एका वचनांत वागत असे.

जेहि बिधि कृपासिंधु सुख मानइ ।
सोइ कर श्री सेवाबिधि जानइ ।
कौसल्यादि सासु गृह माहीँ ।
सेवइ सबन्हि मान मद नाहीँ ।
उमा-रमा-ब्रह्मादि-बंदिता ।
जगदंबा संततमनिंदिता ।

जेणेंकरून कृपासागर प्रसन्न राहतील तेंच आपलें कर्तव्य, हें सेवातत्त्व एक सतीसच गठलें होतें. कौसल्यादिक सर्व सास्वांच्या त्यांच्या महालांतल्या कामावर देखील ती निग्राणी ठेवी. तरीपण तोरा अगर ताठा तिला माहीत नव्हता. उमा-रमा-ब्रह्मादिकांस पूज्य अशी ती जगन्माता निरंतर अनिंदितचरिताच असणार!

**दो०-जासु कृपाकटाच्छ सुर चाहत चितवन सोइ । राम-पदारबिंद-रति करति सुभावहिँ खोइ ॥ ४६ ॥**

जिच्या कृपाकटाक्षपूर्वक अवलोकनाची देवदेखील वांछा करितात ती आपल्या स्वभावास ( आदिशक्तित्वास ) विसरून रामपदारविंदीं रममाण होत होती.

चौ०-सेवहिँ सानुकूल सब भाई ।
राम-चरन-रति अति अधिकाई ।
प्रभु-मुख-कमल बिलोकत रहहीँ ।
कबहुँ कृपाल हमहिँ कछु कहहीँ ।
राम करहिँ भ्रातन्ह पर प्रीती ।
नानाभाँति सिखावहिँ नीती ।

सर्व बंधु रामचंद्रांच्या मनोगताप्रमाणें त्यांची सेवा करीत असत. रामचरणांचे ठिकाणीं त्यांचें प्रेम उत्तरोत्तर वृद्धिंगतच होत होतें. केव्हां दयावंत आम्हांला कांहींतरी आज्ञा करतील या हेतूनें तें प्रभूंच्या मुखकमलाकडेच सारखी निगा ठेवीत. रामचंद्रहि बंधूंचे सर्व लाड पुरवीत आणि त्यांस अनेक प्रकारें नीति शिकवीत.

हरषित रहहिँ नगर के लोगा ।
करहिँ सकल सुरदुर्लभ भोगा ।
अहनिसि बिधिहिँ मनावत रहहीँ ।
श्री-रघु-बीर-चरन रति चहहीँ ।

सर्व देवांनाहि दुर्लभ असे भोग भोगीत नागरिकजन आनंदानें नांदत. श्रीराघवचरणीं त्यांचें एकनिष्ठ प्रेम जडावें हींच त्यांची इच्छा असल्यामुळें रात्रंदिवस ते परमेश्वराजवळ तीच प्रार्थना करीत.

दुइ सुत सुंदर सीता जाये ।
लव कुस बेद पुरानन्हि गाये ।
दोउ बिजई बिनई गुनमंदिर ।
हरि-प्रति-बिंब मनहुँ अतिसुंदर ।
दुइ दुइ सुत सब भ्रातन्ह केरे ।
भये रूप गुन सील घनेरे ।

वेदपुराणप्रसिद्ध लव आणि कुश असे दोन पुत्र जानकीस झाले. ते दोघेहि विजयी, विनयी आणि सद्गुणभांडार इतके सुंदर असत कीं श्रीरामाच्याच हुबेहुब प्रतिमा वाटत. इतरहि बंधूंना अत्यंत रूपशीलगुणान्वित असे दोन दोन पुत्र झाले.

दो०—ज्ञान-गिरा-गो-ऽतीत अज माया-मन-गुन-पार । सोइ सच्चिदानंदघन कर नरचरित उदार ॥ ४७ ॥

जो बुद्धि, वाणी आणि इंद्रियें यांना अगोचर असून जन्मरहित आणि माया, मन व गुण यांहूनहि पर, असे सच्चिदानंदघन श्रीराम अत्यंत दिलदार आणि नमुनेदार मानव्याची वागणूक ठेवीत.

चौ०—प्रातकाल सरजू करि मज्जन ।
बैठहि सभा संग द्विज सज्जन ।
बेद पुरान बासिष्ठ बखानहिँ ।
सुनहि राम जद्यपि सब जानहिँ ।
अनुजन्ह संजुत भोजन करहीँ ।
देखि सकल जननी सुख भरहीँ ।

प्रातःकालीं शरयूचें स्नान करून सभेमध्यें बंधु आणि द्विज यांचेसहवर्तमान राम बसत असत. वसिष्ठ वेदपुराणांचें व्याख्यान करीत असत, आणि तें राम सर्वज्ञ असून हि श्रवण करीत असत. बंधूंबरोबर ते भोजन करीत तें पाहून सर्व मातांना प्रेमाचे उमाळे उसळत.

भरत सत्रुहन दूनउ भाई ।
सहित पवनसुत उपवन जाई ।
बूझहिँ बैठि राम-गुन-गाहा ।
कह हनुमान सुमति अवगाहा ।
सुनत बिमल गुन अतिसुखपावहिँ ।
बहुरि बहुरि करि बिनयकहावहिं ।

भरतशत्रुघ्न हे दोघे बंधू हनुमंतास घेऊन बागेंत जात, आणि तेथें बसून त्यास रामाच्या गुणगाथा विचारीत. सद्बुद्धीचा सागर असा तो हनुमान त्यांस त्या कथा सांगे. प्रभूंचे ते विमलगुण ऐकून भरतशत्रुघ्नांस फार संतोष होई व ते पुनःपुनः विनयपूर्वक त्याला त्याच कथा सांगावयाला लावीत.

सब के गृह गृह होहिँ पुराना ।
रामचरित पावन बिधि नाना ।
नर अरु नारी राम-गुन-गानहिँ ।
करहिँ दिवस निसि जात न जानहिँ ।

सर्वांच्या घरोघर पावन अशा अनेकविध रामचरित्राचीं पुराणें होत असत. स्त्रीपुरुष रामगुणगान करीत असतां त्यांस दिवसरात्रीचें भानदेखील रहात नसे.

दो०—अवध—पुरी—बासिन्ह कर सुख संपदा समाज । सहस सेष नहिँ कहि सकहिँ जहँ नृप राम बिराज ॥ ४८ ॥

जेथल्या राज्यासनीं रामचंद्र विराजमान त्या अयोध्येंत वास करणाऱ्यांच्या सुखाचें आणि ऐश्वर्याचें वर्णन सहस्रावधि शेषास देखील करतां येणें शक्य नाहीं.

चौ०—नारदादि सनकादि मुनीसा ।
दरसन लागि कोसलाधीसा ।
दिन प्रति सकल अजोध्या आवहिँ ।
देखि नगर बिराग बिसरावहिँ ।

नारदसनकादिक मुनीश्वर कोसलाधीशांच्या दर्शनासाठीं रोज अयोध्येस येत. त्यांसदेखील अयोध्या शहर पाहून वैराग्याचें विस्मरण होई.

जातरूप-मनि-रचित अटारी ।
नाना रंग रुचिर गच ढारी ।
पुर चहुँ पास कोटि अतिसुंदर ।
रचे कँगूरा रंग रंग बर ।

तेथें सोन्याच्या रत्नखचित माड्या होत्या आणि त्यांचेवर रंगारंगांच्या सुंदर गच्च्या होत्या. शहराचे सभोंवतीं अत्यंत सुंदर कोट असून त्यांस रंगारंगांचे कठडे होते.

नवग्रह निकर अनीक बनाई ।
जनु घेरी अमरावति आई ।

माहिं बहु रंग रचित गच काँचा।
जो बिलोकि मुनिवर मन राँचा।

तेथील नवग्रहांच्या खड्यांनीं खचित अशी मंदिरांची रांग पाहून जणूंकाय ही इंद्रनगरीच येथें उतरली आहे असें वाटे. नानारंगांच्या लकाकणाऱ्या खड्यांनीं पच्ची केलेली फरसबंदी सर्वत्र होती ती पाहून श्रेष्ठ मुनींचींहि मनें दंग होत.

धवल धाम ऊपर नभ चुंबत।
कलस मनहुँ रवि-ससि-दुति निंदत।
बहु मनिरचित झरोखा भ्राजहिँ।
गृह गृह प्रति मनिदीप बिराजहिँ।

तेथील वाड्यांवरील शुभ्र घुमट गगनचुंबित होते. त्यांजवरील सुवर्णकलश तर चंद्रसूर्यांच्या प्रभेशीं स्पर्धा करीत आहेत असें वाटे. प्रत्येक वाड्याच्या झरोक्यास झकास रत्नें लावलेलीं होतीं. घरोघरीं रत्नदीप झळकत होते.

छंद–मनिदीप राजहिँ भवन भ्राजहिँ देहरी बिद्रुम रची। मनिखंभ भीति बिरंचि बिरची कनकमनि मरकत खची॥ सुदर मनोहर मंदिरायत अजिर रुचिर फटिकन्हि रचे। प्रतिद्वार द्वार कपाट पुरट बनाइ बहु बज्रन्हि खचे॥ १३॥

रत्नदीपांच्या तेजानें त्या मंदिरांना अलौकिक शोभा आलेली होती. त्यांच्या मुख्य दरवाज्यांवर पोवळ्यांचें नक्षीकाम केलेलें होतें. आंतलें खांब रत्नजडित असून भिंती सुवर्णाच्या होत्या आणि त्यांना रत्नें आणि नील जडवलेले होते. ती सर्व ब्रह्मदेवाचीच कुसरी वाटे. त्या सुंदर आणि रमणीय मंदिरांना उज्ज्वळ स्फटिकशिलांचीं विस्तीर्ण चिरेबंदी प्रांगणें होतीं. प्रत्येक दारास सोन्याचीं कपाटें आणि वर पोलादी अणकुचीदार खिळे माठलेले होते.

दो०–चारु चित्रशाला गृह गृह प्रति लिखे बनाइ। रामचरित जे निरख मुनि ते मन लेहिँ चोराइ॥ ४९॥

घरोघरीं अजब नक्षीदार, रंगीत आणि सुंदर दिवाणखाने होते. त्यांतील रामलीलांचीं चित्रें पाहून मुनींच्या देखील चित्तवृत्ति अगदीं गुंगून जात.

चौ०–सुमनबाटिका सबहिँ लगाई।
बिबिधभाँति करि जतन बनाई।
लता ललित बहु जाति सुहाईँ।
फूलहिँ सदा बसंत कि नाईँ।

घरोघरीं सर्वांनीं अत्यंत हौशीनें निरनिराळ्या धर्तीवर फुलबागा लावल्या होत्या व त्यांमधून अनेक जातींच्या सुंदर वेली वसंताप्रमाणें सर्वकाल फुलणाऱ्या होत्या.

गुंजत मधुकर मुखर मनोहर।
मारुत त्रिबिध सदा बह सुंदर।
नाना खग बालकन्हि जिआये।
बोलत मधुर उडात सुहाये।

तेथें भृंग मनोहर आणि मधुर गुंजारव करीत. सदैव मंद, शीतल आणि सुगंधित असा वायूनें संचार करावा. मुलांनीं पाळलेले तऱ्हेतऱ्हेचे पक्षी मंजुळ शब्द करीत आणि गमतीनें बागडत.

मोर हंस सारस पारावत।
भवनन्हि पर सोभा अतिपावत।
जहँ तहँ देखहिँ निज परिछाहीँ।
बहु बिधि कूजहिँ नृत्य कराहीँ।

मोर, हंस, सारस आणि पारावत हे मंदिरावर फारच खुलून दिसत. ते जिकडे तिकडे आपली छाया पाहून निरनिराळ्या प्रकारें कूजन आणि नृत्य करीत असत.

सुक सारिका पढावहिँ बालक।
कहहु राम रघुपति जनपालक।
राजदुआर सकल बिधि चारू।
बीथीं चौहट रुचिर बजारू।

मुलें शुकसारिकांना राम, रघुपति, राजाराम, हीं नांवें पाठ करवीत. राजद्वारें तर सर्वतोपरी मनोहर असून सडका, चौरस्ते आणि बाजार हेहि फार मजेदार व रेखीव असत.

छंद–बाजार चारु न बनइ बरनत बस्तु बिनु गथ पाइये। जहँ भूप रमानिवास तहँ की संपदा किमि गाइये॥ बैठे बजाज सराफ बनिक अनेक मनहु कुबेर ते। सब सुखी सब सच्चरित सुंदर नारि नर सिसु जरठ जे॥१४॥

तेथील सुंदर बाजारांच्या खुपसुरतीचें वर्णन करण्याची तर सोयच नाहीं. तेथें वस्तु विनामूल्य खुशाल मिळत.

जेथें प्रत्यक्ष लक्ष्मीकांतच राजा तेथल्या संपत्तीचें काय वर्णन करावें ! व्यापारी, सराफ, वाणी यांची रेलचेल होती. ते जणुंकाय कुबेरच भासत. आबाल-वृद्ध नारी-नर सर्वच सुंदर, सच्चरित आणि सुखवस्तु असत.

**दो०–उत्तर दिसि सरजू बह निर्मलजल गंभीर । बाँधे घाट मनोहर स्वल्प पंक नहिँ तीर ॥ ५० ॥**

शहराच्या उत्तरेस शरयूचें निर्मल आणि गंभीर जल वहात असे. तिच्या घाटांची बांधणी खूपच दिलप्रसन्न होती. तीरावर चिखलाचा दुष्काळच असावयाचा.

**चौ०–दूरि फराक रुचिर सो घाटा ।**
**जहँ जल पिअहिँ बाजि-गज-ठाटा ।**
**पनिघट परम मनोहर नाना ।**
**तहाँ न पुरुष करहिँ अस्नाना ।**

अश्वगजसमुदायांचा पाणी पिण्याचा घाट अगदीं स्वतंत्र आणि अफाट असून मनोहर होता. इतर पाणघाट देखील फारच हृदयंगम होते. तेथें पुरुषांना स्नानाचा प्रतिबंध असे.

**राजघाट सब बिधि सुंदर बर ।**
**मज्जहिँ तहाँ बरन चारिउ नर ।**
**तीर तीर देवन्ह के मंदिर ।**
**चहुँ दिसि जिन्ह के उपबन सुंदर ।**

राजघाट तर सर्वतोपरी सुंदर व अफाट होता. तेथेंच चारीहि वर्णांच्या पुरुषांचीं स्नानें होत असत. नदीच्या तीरातीरांला देवालयें होतीं आणि त्यांच्या सभोंवार सुंदर बागा होत्या.

**कहुँ कहुँ सरितातीर उदासी ।**
**बसहिँ ज्ञानरत मुनि संन्यासी ।**
**तीर तीर तुलसिका सुहाई ।**
**बृंद बृंद बहु मुनिन्ह लगाई ।**

नदीतीरावर कोठें कोठें उदासी, मुनि, संन्यासी आपल्या ज्ञानसत्रांतच निमग्न होऊन बसलेले असत. तीरातीरांवर मुनिमंडळांनीं सुंदर तुळशीचे अनेक ताटवे लावले होते.

**पुरसोभा कछु बरनि न जाई ।**
**बाहिर नगर परम रुचिराई ।**
**देखत पुरी अखिल अघ भागा ।**
**बन उपबन बापिका तडागा ।**

नगरशोभा तर अवर्णनीयच होती. नगराच्या बाहेरील देखावा देखील फार चित्तवेधक होता. अशा त्या अयोध्यानगरीचें तसेंच तिच्यांतील वनें, उपवनें, वापी, तडाग इत्यादिकांचें दर्शन होतांच सर्व पापें पळून जात. ( अर्थात् कुविचार मनांत कधींच येत नसत. )

**छंद–बापी तडाग अनूप कूप मनोहरायत सोहहीँ । सोपान सुंदर नीर निर्मल देखि सुर मुनि मोहहीँ ॥ बहु रंग कंज अनेक खग कूजहिँ मधुप गुंजारहीँ । आराम रम्य पिकादि-खग-रव-जनु पथिक हंकारहीँ ॥१५॥**

विहिरी, तळीं, पुष्करणी, अनुपम, आकर्षक आणि भव्य असत. त्यांच्या सुंदर पायऱ्या आणि निर्मळ पाणी पाहून देव आणि मुनी यांचेंहि मन ललचावत असे. त्यांत नानारंगांचीं कमळें असून अनेक पक्षी किलकिलाट करीत व भृंग गुंजारव करीत. रमणीय उपवनांत मयूरादि पक्षी मधुर ध्वनि करीत, तेव्हां जणुंकाय ते पांथस्थांना बोलावीतच आहेत असें वाटे.

**दो०–रमानाथ जहँ राजा सो पुर बरनि कि जाइ । अनिमादिक-सुखसंपदा रही अवध सब छाइ ॥ ५१ ॥**

लक्ष्मीरमणच जेथें राजा त्या नगरीचें वर्णन तरी काय करावें ! ( थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ) अणिमादिक अष्टसिद्धींनीं आपल्या सर्व सुखसंपत्ती-निशीं तेथें तळच दिला होता.

**चौ०–जहँ तहँ नर रघु-पति-गुन-गावहिँ ।**
**बैठि परसपर इहइ सिखावहिँ ।**
**भजहु प्रनत–प्रति–पालक रामहि ।**
**सोभा–सील–रूप–गुन–धामहि ।**
**जल-ज-बिलोचन स्यामलगातहिँ ।**
**पलक नयन इव सेवकत्रातहिँ ।**
**धृत–सर–रुचिर-चाँप-तूनीरहिँ ।**
**संत-कंज-बन–रबि रन-धीरहिँ ।**
**काल कराल ब्याल खग राजहिँ ।**
**नमत राम अकाम ममता जहिँ ।**

जिकडे तिकडे लोक रघुपतीचे गुण गात असत, आणि एकत्र जमून परस्परांस हेंच शिकवीत असत

कीं शरणागतवत्सल, शोभाशील, रूपगुणनिधान श्रीरामचंद्राचें भजन करा, आणि कमलनेत्र, श्यामलगात्र, पापण्या डोळ्यांचें ज्याप्रमाणें रक्षण करितात त्याप्रमाणें सेवकांचें रक्षण करणारा, रुचिर-धनुर्बाण-तूणीरधर, संतरूप कमलवनास सूर्याप्रमाणें असणारा, रणधीर, कालरूप दुष्ट सर्पास गरुडाप्रमाणें असणारा, असा जो श्रीराम त्यास ममतेचा त्याग करून निष्काम-भक्तीनें नमन करीत असा.

लोभ-मोह-मृग-जूथ-किरातहिँ।
मनसिज-करि-हरि जन-सुख-दातहि।
संसय-सोक-निबिड-तम-भानुहिँ।
दनुज-गहन-वन-दहन-कृसानुहिँ।
जनक-सुता-समेत रघुबीरहिँ।
कस न भजहु भंजन भवभीरहिँ।

लोभमोहरूप मृगसमूहाचा किरात, मदनरूप गजाचा सिंह भक्तसुखदायक, संशयशोकरूप निबिड अंधकाराचा सूर्य, राक्षसरूप घोर अरण्याचा दावाग्नि, भवभयभंजक, असा जो आपला रघुवीर त्याला जानकीसहवर्तमान कां भजत नाहीं?

बहु-बासना-मसक-हिम-रासिहि।
सदा एकरस अज अबिनासिहि।
मुनिरंजन भंजन महिभारहि।
तुलसिदास के प्रभुहि उदारहि।

अनेक वासनारूपी मशकांची हिमराशी, नित्य, आनंदकरस, जन्मरहित, विनाशरहित, मुनिरंजन, भूभारभंजन, उदार अशा त्या तुलसीदासाच्या प्रभूंस (कां भजत नाहीं?)

**दो०—एहि बिधि नगर-नारि-नर करहिँ राम-गुन-गान। सानुकूल सब पर रहहिँ संतत कृपानिधान॥५२॥**

अशा रीतीनें अयोध्येंतील नरनारी रामगुणांचें गान करीत असतां कृपानिधान राम निरंतर सर्वांनाच दिलोजान चाहत असत.

चौ०—जब तेँ रामप्रताप खगेसा।
उदित भयेउ अतिप्रबल दिनेसा।
पूरि प्रकास रहेउ तिहुँ लोका।
बहुतेन्ह सुख बहुतेन्ह मन सोका।

हे गरुडा! जेव्हां रामप्रतापरूप अतिप्रखर सूर्य उदय पावला आणि त्रैलोक्यांत त्याचें तेज भरून राहिलें तेव्हां पुष्कळांना सुख तर झालेंच, पण अनेकांना दुःखहि झालें.

जिन्हहिँ सोक ते कहहुँ बखानी।
प्रथम अबिद्यानिसा नसानी।
अघ उलूक जहँ तहाँ लुकाने।
काम-क्रोध-कैरव सकुचाने।
बिबिध-कर्म-गुन-काल-सुभाऊ।
ए चकोर सुख लहहिँ न काऊ।
मत्सर मान मोह मद चोरा।
इन्ह कर हुनर न कवनिहुँ ओरा।
धरम तडाग ज्ञान बिज्ञाना।
ए पंकज बिकसे बिधि नाना।
सुख संतोष बिराग बिबेका।
बिगत सोक ए कोक अनेका।

आतां तबियत खाक होणारे तुला सांगतों. प्रथमचे अविद्यारूप रात्रीची इतिश्री झाली. पापरूप उलूक जेथें तेथें दडले. कामक्रोधरूप कमळें कोमेजून गेलीं. अनेक कर्में, काल, गुण आणि स्वभाव या चकोरांना सुख कोठेंहि मिळेनासें झालें. मत्सर, लोभ, मोह आणि मद ह्या चोरांच्या वाटमारीला कोठेंच वाव मिळेना. (कारण) धर्मरूप तडागांत ज्ञान–विज्ञानरूप अनेक प्रकारचीं कमळें प्रफुल्लित झालीं होतीं. सुख, संतोष, वैराग्य आणि ज्ञानरूप अनेक कोकपक्षी शोकमुक्त झाले होते.

**दो०—यह प्रतापरबि जा के उर जब करइ प्रकास। पछिले बाढहिँ प्रथम जे कहे ते पावहिँ नास॥५३॥**

हे गरुडा! हा रामप्रतापरूपी सूर्य ज्याचे हृदयांत तळपूं लागतो त्याचे हृदयांत मागाहून सांगितलेले (ज्ञान विज्ञान इत्यादि) गुण वाढीला लागतात आणि आधीं सांगितलेले (अविद्या–पापादि) दुर्गुण मरायला टेकतात.

चौ०—भ्रातन्ह सहित राम एक बारा।
संग परमप्रिय पवनकुमारा।

१ सांस्कृतिक स्वराज्यापुरतेच हे कवीचे विचार घ्यावयाचे. बाकीचे नुसत्या स्वराज्यासंबंधी विचार इतस्ततः विखुरले आहेत. आमच्या मानसहंसांत ते एकत्र केलेले मिळतील.

सुंदर उपबन देखन गये ।
सब तरु कुसुमित पल्लव नये ।

एकेसमयीं बंधूंसहवर्तमान परमप्रिय हनुमंतास बरोबर घेऊन श्रीरामचंद्र हवाखोरीसाठीं चमनबागेंत गेले. तेथील सर्व वृक्ष नूतन फलपुष्पांनीं गजबजून गेले होते.

जानि समय सनकादिक आये ।
तेजपुंज गुनसील सुहाये ।
ब्रह्मानंद सदा लयलीना ।
देखत बालक बहुकालीना ।
रूप धरे जनु चारिउ बेदा ।
समदरसी मुनि बिगतबिभेदा ।
आसा बसन व्यसन यह तिन्हहीँ ।
रघु-पति-चरित होइ तहँ सुनहीँ ।

ती वेळ साधून तेथें गुणशीलसंपन्न तेजोनिधि सनकादिक मुनीश्वर आले. ते सर्वकाल ब्रह्मानंदांतच निमग्न असत. ते जरी वस्तुतः वयोवृद्ध, तरी दिसण्यांत मात्र बालकाप्रमाणें होते.[1] जणूंकाय चारी वेदांनींच देह धारण केले आहेत असे ते दिसत. समदर्शी अर्थातच द्वंद्वातीत होते. दिशा हेंच त्याचें वस्त्र. जेथें जेथें रघुपतिचरित्राचें गान होई तेथें तेथें जाऊन तें श्रवण करणें हाच त्यांचा दिलीशौक होता.

तहाँ रहे सनकादि भवानी ।
जहँ घटसंभव मुनिबर ज्ञानी ।
रामकथा मुनि बहु बिधि बरनी ।
ज्ञान–जोनि–पावक जिमि अरनी ।

( शंकर म्हणतात– ) हे पार्वति ! हे सनकादिक मुनि, महात्म्या मुनिश्रेष्ठ अगस्तिऋषींच्या आश्रमीं गेले होते. तेथें अगस्तिऋषींनीं ज्ञानजन्य अग्नीला उत्पन्न करणाऱ्या अरणीप्रमाणें असलेली जी रामकथा तिचें सविस्तर व्याख्यान केलें होतें.

**दो०–देखि राम मुनि आवत हरषि दंडवत कीन्ह । स्वागत पूछि पीतपट प्रभु बैठन कहँ दीन्ह ॥ ५४ ॥**

मुनि येत आहेत असें पाहातांच श्रीरामांनीं त्यांना आनंदानें दण्डवत घातला आणि कुशल प्रश्न विचारून आपलें पीत उपवस्त्र त्यांना बसण्यासाठीं दिलें.

चौ०–कीन्ह दंडवत तीनिउँ भाई ।
सहित पवनसुत सुख अधिकाई ।
मुनि रघु–पति-छबि अतुल बिलोकी ।
भये मगन मन सके न रोकी ।

हनुमंतासकट तिघांहि बंधूंनीं अत्यंत हर्षित होऊन त्यांना वंदन केलें. रघुपतींचें अप्रतिम लावण्य पाहतांच मुनींचीं मनें तल्लीन होऊन तीं आवरतां आवरेनात.

स्यामलगात सरो–रुह–लोचन ।
सुंदरतामंदिर भवमोचन ।
एक टक रहे निमेष न लावहिँ ।
प्रभु कर जोरे सीस नवावहिँ ।

श्यामलगात्र, कमलनयन, सौंदर्यनिधान, भवमोचन अशा त्या प्रभूकडे ते सारखे अनिमिष पाहूं लागले. प्रभु मात्र त्यांस हात जोडून खालीं मान घालूनच उभे होते.

तिन्ह कै दसा देखि रघुबीरा ।
स्रवत नयन जल पुलक सरीरा ।
कर गहि प्रभु मुनिबर बैठारे ।
परम मनोहर बचन उचारे ।

त्यांची ती स्थिति पाहून रामचंद्रांच्या नेत्रांतून प्रेमाश्रु वाहूं लागून त्यांच्या अंगावर रोमोद्गम झाला. प्रभूंनीं मुनिवरांस हात धरून खालीं बसविलें, आणि ते परम हृदयंगम भाषण करूं लागले.

आजु धन्य मैँ सुनहु मुनीसा ।
तुम्हरे दरस जाहिँ अघ खीसा ।
बडे भाग पाइय सतसंगा ।
बिनहिँ प्रयास होइ भवभंगा ।

अहो मुनीश्वर हो ! आज मी धन्य झालों ! तुमच्या दर्शनानें माझीं पापें खास विलयास गेलीं. सत्संग प्राप्त होण्यास महत्–भाग्य लागतें. तो मिळाल्यास भवाचा भंग अनायासें ठेवलेलाच.

**दो०–संतसंग अपवर्ग कर कामी भव कर पंथ । कहहिँ संत कबि कोबिद स्रुति पुरान सदग्रंथ ॥ ५५ ॥**

संत, कवि, पंडित, श्रुति, पुराणें आणि सद्ग्रंथ असेंच प्रतिपादन करितात कीं सत्संग हा मोक्षाला नेणारा आहे आणि कामीजनांचा संसर्ग हा संसाराकडे ओढणारा आहे.

[1] 'पंचषड्ढायनार्भाभाः पूर्वेषामपि पूर्वजाः । (भाग.)

चौ०—सुनि प्रभुबचन हरषि मुनि चारी।
पुलकित तनु अस्तुति अनुसारी।

प्रभूचें तें भाषण ऐकून ते, (सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार असे) चौघेहि मुनि हर्षानें पुलकितगात्र होत्साते स्तवन करूं लागले—

जय भगवंत अनंत अनामय।
अनघ अनेक एक करुनामय।
जय निर्गुन जय जय गुनसागर।
सुखमंदिर सुंदर अति आगर।
जय इंदिरारमन जय भूधर।
अनुपम अज अनादि सोभाकर।
ज्ञाननिधान अमान मानप्रद।
पावन सुजस पुरान बेद बद।
तज्ञ कृतज्ञ अज्ञताभंजन।
नाम अनेक अनाम निरंजन।
सर्ब सर्बगत सर्बउरालय।
बससि सदा हम कहँ परिपालय।
द्वंद बिपति भवफंद बिभंजय।
हृदि बसि राम काममद गंजय।

हे भगवंता! तुझा विजय असो. तूं अनंत, अनामय, अनघ, अनेक, एकमेवाद्वितीय, करुणामय, निर्गुण, गुणसागर, सुखमंदिर, पूर्ण सौंदर्यनिधान, इंदिरारमण, भूपालक, अनुपम, अजन्म, अनादि, शोभाकर, ज्ञाननिधान, निरहंकार, मानप्रद, पावन, सुयश, वेदपुराणवेद्य, कृतज्ञ, अज्ञानभंजन, सर्वनाम, अनाम, निरंजन, सर्व, सर्वव्यापक, सर्वहृदयांतर्यामी असा आहेस. तूं आमचें निरंतर पालन कर, व द्वंद्व, विपत्ति आणि भवपाश यांचें निकृंतन कर. हे श्रीरामा! तूं आमच्या हृदयांत वास करून काम व मद यांचें निर्दालन कर. तुझा जयजयकार असो!

दो०—परमानंद कृपायतन मन-परि-पूरन काम। प्रेम भगति अनपायनी देहु हमहिँ श्रीराम॥ ५६॥

हे परमानंद, कृपासागर, पूर्णकामा श्रीरामा! आतां तरी आम्हाला तुझ्या अनपायिनी प्रेम-भक्तीची भिक्षा घाल.

चौ०—देहु भगति रघुपति अतिपावनि।
त्रि-बिधि-ताप-भव-ताप नसावनि।
प्रनत काम सुर धेनु कलपतरु।
होइ प्रसन्न दीजइ प्रभु यह बरु।
भव-बारिधि-कुंभ-ज-रघुनायक।
सेवकसुलभ सकल-सुख-दायक।
मन-संभव-दारुन-दुख दारय।
दीनबंधु समता बिस्तारय।

हे रघुपते! त्रिविधतापाचा आणि संसारदुःखाचा नाश करणारी अशी तुझी परमपावनी भक्ति आम्हांला आतां तरी दे कीं रे. तूं शरणागतांचे मनोरथ कामधेनू आणि कल्पतरूप्रमाणें पुरविणारा आहेस. तेव्हां आम्हांवर प्रसन्न होऊन एवढा वर देऊनच दे. हे रघुनायका! तूं भवसागरास शोषून टाकणारा अगस्ति असून सेवकांस सुलभ व सर्वसुखदायक असा आहेस. आमच्या मानसिक दारुण दुःखांचा परिहार कर. हे दीनबंधो! आम्हांस समत्वबुद्धि अर्पण कर.

आस-त्रास-इरिषादि-निवारक।
बिनय-बिबेक-बिरति-बिस्तारक।
भूप-मौलि-मनि मंडन धरनी।
देहि भगति संसृति-सरि-तरनी।
मुनि-मन-मानस-हंस निरंतर।
चरनकमल बंदित अज संकर।
रघु-कुल-केतु सेतु स्रुतिरच्छक।
काल-कर्म-सुभाव-गुन-भच्छक।
तारन तरन हरन सब दूषन।
तुलसिदास प्रभु त्रि-भुवन-भूषन।

तूं आशा, दुःख, ईर्षा यांचा निस्तार करणारा असून विनय, विवेक आणि वैराग्य यांचा विस्तार करणारा आहेस. हे भूपशिरोमणे! धराभूषणा! तूं संसारनदींतून तारून नेणारी अशी भक्ति आतां तरी आमच्या पदरांत घाल. हे मुनिमानसहंसा! शंकर, ब्रह्मदेव तुझ्याच चरणकमलांचें निरंतर वंदन करीत असतात. हे रघुकुलकेतो, श्रुतिसेतुरक्षका, कालकर्मगुणस्वभावभक्षका, तुलसीदासप्रभो! मुमुक्षूंचा तारक, सर्वदोषभंजक आणि त्रिभुवनभूषण एक तूंच आहेस.

दो०—बार बार अस्तुति करि प्रेमसहित सिर नाइ। ब्रह्मभवन सनकादि गे अतिअभीष्ट बर पाइ॥ ५७॥

प्रेमपूर्वक वारंवार स्तुति करून आणि अत्यंत अभीष्ट असे वर प्राप्त करून घेऊन सनकादिकमुनि श्रीरामचंद्रांस वंदन करून ब्रह्मलोकाप्रत जाते झाले.

चौ०—सनकादिक बिधिलोक सिधाये।
भ्रातन्ह रामचरन सिर नाये।

पूछत प्रभुहिँ सकल सकुचाहीँ ।
चितवहिँ सब मारुतसुत पाहीँ ।
सुनी चहहिँ प्रभुमुख कै बानी ।
जो सुनि होइ सकल-भ्रम हानी ।

सनकादिकमुनि ब्रह्मलोकास गेल्यानंतर सर्व बंधूंनीं रामचरणांवर मस्तकें ठेवलीं. प्रभूंस प्रश्न करण्यास त्या सर्वांना संकोच वाटला म्हणून ते सर्वजण हनुमंताकडे पाहूं लागले. त्यांची इच्छा ही कीं, जें ऐकतांच सर्व संशयाची निवृत्ति होईल असें प्रभूंचें भाषण ऐकण्यास मिळावें.

अंतरजामी प्रभु सब जाना ।
बूझत कहहु काह हनुमाना ।
जोरि पानि कह तब हनुमंता ।
सुनहु दीनदयाल भगवंता ।
नाथ भरत कछु पूछन चहहीँ ।
प्रस्न करत मन सकुचत अहहीँ ।

अंतर्यामीं प्रभूंनीं सर्व जाणलें व ते म्हणाले—हनुमंता, काय विचारावयाचें असेल तें खुशाल विचार. तेव्हां हनुमंत हात जोडून म्हणाला, हे दयाळो भगवान् ! ऐकावें. हे नाथ ! भरताची इच्छा ही कीं कांहीं प्रश्न आपल्याला विचारावा परंतु विचारण्यास त्याचें मन संकोचतें.

तुम्ह जानहु कपि मोर सुभाऊ ।
भरतहिँ मोहि कछु अंतर काऊ ।
सुनि प्रभुबचन भरत गहे चरना ।
सुनहु नाथ प्रनतारतिहरना ।

( प्रभु म्हणाले )—कपे ! तूं माझा स्वभाव जाणीतच आहेस. भरतांत व माझ्यांत कांहीं आडपडदा का आहे ? हें प्रभूंचें भाषण ऐकतांच भरत प्रभुचरणीं मिठी मारून म्हणाला, हे प्रणतार्तिहरणा नाथा ! ऐकावें.

**दो०—नाथ न मोहि सँदेह कछु सपनेहुँ सोक न मोह । केवल कृपा तुम्हारिही चिदानंद-संदोह ॥ ५८ ॥**

हे नाथ ! मला कोणताच संशय नसून स्वप्नांत देखील शोक अगर मोह नाहीं. ही केवळ, हे चिदानंदसंदोहा ( चिदानंदरूप रसाचें दोहन करणारा ) ! आपलीच कृपा होय.

चौ०—करउँ कृपानिधि एक ढिठाई ।
मैं सेवक तुम्ह जन-सुख-दाई ।
संतन कै महिमा रघुराई ।
बहुबिधि बेद पुरानन्हि गाई ।
श्रीमुख तुम्ह पुनि कीन्हि बडाई ।
तिन्ह पर प्रभुहिँ प्रीति अधिकाई ।
सुना चहउँ प्रभु तिन्ह कर लच्छन ।
कृपासिंधु गुन-ज्ञान-बिचच्छन ।
संत असंत भेद बिलगाई ।
प्रनतपाल मोहि कहहु बुझाई ।

हे दयानिधे ! तथापि मी कांहीं बोलण्याचें धाडस करीत आहे, कारण मी आपला सेवक असून आपण सेवकास सुख देणारे आहांत. हे रघुराय ! वेदपुराणादिकांनीं नानाप्रकारें संतांचा महिमा वर्णन केला आहे. तसेंच आपणहि स्वमुखानें संतांची प्रशंसा केली असून आपलें त्यांचेवर अधिकच प्रेम असतें. हे गुणज्ञानविचक्षण दयासागर प्रभो ! अशा त्या संतांचीं लक्षणें श्रवण करण्याची मला लालसा होते. प्रणतपाल प्रभूंनीं संत आणि असंत यांच्यांतील भेद स्पष्ट करून मला समजावून सांगावेत.

संतन्ह के लच्छन सुनु भ्राता ।
अगिनित श्रुति पुरान बिख्याता ।
संत असंतन्ह कै असि करनी ।
जिमि कुठार चंदन आचरनी ।
काटइ परसु मलय सुनु भाई ।
निजगुन देइ सुगंध बसाई ।

( प्रभु म्हणाले )—हे बंधो, संतांचीं लक्षणें ऐक. तीं अगणित असून श्रुतिपुराणादिकांनीं त्यांचें व्याख्यान केलें आहे. ज्याप्रमाणें कुठार आणि चंदनतरु यांची कृति, तद्वतच संत आणि दुर्जन यांचाहि आचार असतो. हे बंधो, ऐक. कुठार चंदनास कापतो तरीदेखील तो चंदन आपल्या आंगच्या सुगंधाला कुठाराच्या तोंडांत यथास्थित भरतोच.

**दो०—ता तेँ सुरसीसह्नु चढत जगबल्लभ श्रीखंड । अनल दाहि पीटत घनहिँ परसुबदन यह दंड ॥ ५९ ॥**

ह्याच कारणामुळें चंदन जगतास प्रियकर होऊन देवांच्याहि मस्तकावर जाऊन बसतें. उलट कुऱ्हाडीच्या फळाच्या नशीबीं मात्र आगींत जळणें आणि वरून घणाचे घाव खाणें असल्या विटंबना येतात.

चौ०—विषय अलंपट सीलगुनाकर ।
परदुख दुख सुख सुख देखे पर ।

सम अभूतरिपु बिमद बिरागी ।
लोभामरष हरष भय त्यागी ।
कोमलचित दीनन्ह पर दाया ।
मन बच क्रम मम भगति अमाया ।
सबहि मानप्रद आपु अमानी ।
भरत प्रानसम मम ते प्रानी ।

विषयापासून अलिप्त, शील आणि सद्‌गुण यांचें केवळ भांडार, दुसऱ्याचें दुःख पाहून स्वतः दुःखित होणारे आणि सुख पाहून सुखी होणारे समदर्शी, अजातशत्रु, उन्मादरहित, विरक्त, लोभ-क्रोध, हर्ष-भय यांचा त्याग करणारे, कोमलचित्त, दीनवत्सल कायावाचामनेंकरून माझी भक्ति करणारे, अहंकार-विहीन, सर्वांचाच आदर व सन्मान करणारे व स्वतः मुळींच मानाची चाड न बाळगणारे असे संतजन, हे भरता, मला ! प्राणासारखे प्रिय असतात.

बिगतकाम मम नामपरायन ।
सांति बिरति बिनती मुदितायन ।
सीतलता सरलता मइत्री ।
द्विज-पद-प्रीति धरमजनयित्री ।
ये सब लच्छन बसहिं जासु उर ।
जानहु तात संत संतत फुर ।
सम दम नियम नीति नहिं डोलहिं ।
परुष बचन कबहूँ नहि बोलहिं ।

समस्तकामनारहित व मन्नामपरायण असून शांति, वैराग्य, विनय आणि प्रसन्नता यांचें ते केवळ वस-तिस्थान असतात. क्षमा, सरलता, मैत्री, द्विजपद प्रेम आणि धर्म यांची ते जननी समज. त्यांचे शम, दम, नियम आणि नीति हीं कधींच चंचल होत नाहींत, ते कधींच कटुवचन मुखावाटें काढीत नाहींत. हीं लक्षणें ज्यांच्या हृदयांत निरंतर वास करीत अस-तात तेच खरे आणि कायमचे संत समजावेत.

**दो०—निंदा अस्तुति उभय सम ममता मम पदकंज । ते सज्जन मम प्रानप्रिय गुन-मंदिर सुखपुंज ॥ ६० ॥**

ज्यांना निंदा आणि स्तुति दोन्हीहि समसमान असून ज्यांचें प्रेम केवळ माझ्याच चरणकमलांचे ठिकाणीं जडलें असतें ते गुणमंदिर आणि सुखनिधान संत मला प्राणाप्रमाणें प्रिय होतात.

चौ०—सुनहु असंतन्ह केर सुभाऊ ।
भूलेहु संगति करिय न काऊ ।
तिन्ह कर संग सदा दुखदाई ।
जिमि कपिलहि घालइ हरहाई ।

आतां दुष्टांचीं लक्षणें ऐक. चुकूनदेखील कोणी त्यांच्या संगतीस लागूं नये. ज्याप्रमाणें मोकाट गाय कपिला ( घरगुती ) गायीस मारते तसा त्यांचा समागम नेहमींच दुःखपर्यवसायी होतो.

खलन्ह हृदय अतिताप बिसेखी ।
जरहिं सदा परसंपति देखी ।
जहँ कहुँ निंदा सुनहिं पराई ।
हरषहिं मनहुँ परी निधि पाई ।

खल नेहमींच मनांत जळफळत असतात. परोत्कर्ष पाहिला कीं त्यांच्या अंगाची सारखी लाही होते. परनिंदा किंचित् कोठें कानांवर आली तर द्रव्यनिधि हातीं लागल्याप्रमाणें त्यांना हर्ष होतो.

काम—क्रोध—मद—लोभ—परायन ।
निर्दय कपटी कुटिल मलायन ।
बयरु अकारन सब काहू सों ।
जो कर हित अनहित ताहू सों ।
झूठइ लेना झूठइ देना ।
झूठइ भोजन झूठ चबेना ।
बोलहिं मधुरबचन जिमि मोरा ।
खाहिं महाअहि हृदय कठोरा ।

ते नेहमीं काम, क्रोध, मद आणि लोभ ह्यांतच चूर असल्यामुळें निर्दय, कपटी, कुटिल आणि पापांचें आगर असेच असतात. त्यांचें सर्वांशीं निष्कारण वैर असतें. त्यांचें जे हित करितात त्यांच्याच नुक-सानीवर ते येतात. त्यांचें देणें घेणें, जेवणखाण वगैरे व्यवहार देखील सर्व सोदेशाईचेच समज. ते मोरा-प्रमाणें मधुर बोलतील पण मोठाले अजगरदेखील पचवून टाकतील इतके ते हृदयाचे सह्याद्रि असतात.

**दो०—परद्रोही पर-दार-रत परधन परअप-वाद । ते नर पावँर पापमय देह धरे मनुजाद ॥ ६१ ॥**

परद्रोही, जार, चोर आणि निंदक असले हे लोक महानीच, आणि केवळ मूर्तिमान् पापात्मे राक्षस होत.

चौ०—लोभइ ओढन लोभइ डासन ।
सिस्नोदरपर जम-पुर-त्रासन ।
काहू कै जौं सुनहिं बडाई ।
स्वास लेहिं जनु जूडी आई ।

जब काहू के देखहिँ बिपती।
सुखी भये मानहुँ जगनृपती।

त्यांचें आंथरूणहि लोभ आणि पांघरूणहि लोभच. ते केवळ शिस्नोदरपरायण असतात. नरकदेखील त्यास कंटाळतात. जर त्यांनीं एकाद्याची स्तुति ऐकली तर ते शीतज्वर झाल्याप्रमाणें (दीर्घ व उष्ण) श्वास टाकूं लागतात. कोणीहि आपत्तींत सांपडला आहे असें पहातांच त्यांना सार्वभौमपद मिळाल्याप्रमाणें चैन वाटते.

स्वारथरत परिवारबिरोधी।
लंपट काम लोभ अतिक्रोधी।
मातु पिता गुरु बिप्र न मानहिँ।
आपु गये अरु घालहिँ आनहिँ।
करहिँ मोहबस द्रोह परावा।
संत संग हरिकथा न भावा।

ते स्वार्थपरायण स्वतःच्या परिवाराचेदेखील हाडवैरी बनतात. ते काम आणि लोभ यांचे ठिकाणीं लंपट आणि अत्यंत क्रोधी असतात. आई, बाप, गुरु अगर विप्र यांची ते मुळींच प्रतिष्ठा मानीत नाहींत. स्वतः ते बुडाले तर दुसऱ्याला देखील आपल्याबरोबर बुडवितील. मोहानें उल्लू बनून ते दुसऱ्यांशीं द्रोहच करीत रहातात. सत्संग आणि हरिकीर्तन हे शब्द देखील त्यांना खपत नाहींत.

अव-गुन-सिंधु मंदमति कामी।
बेदबिदूषक पर-धन-स्वामी।
बिप्रद्रोह सुरद्रोह बिसेषा।
दंभ कपट जिय धरे सुबेषा।

ते दुर्गुणांचे समुद्र, मंदमति, कामलंपट, वेदनिंदक, परधनावर गबर होणारे, विशेषतः ब्रह्मद्वेष्टे आणि देवद्वेष्टे असतात. कपट आणि दंभ आंतून पण वरून मात्र त्यांचा बुवाबाजीचाच सारा पसारा.

**दो०—ऐसे अधम मनुज खल कृतजुग त्रेता नाहिँ। द्वापर कछुक बृंद बहु होइहहिँ कलिजुग माहिँ॥ ६२॥**

असले अधम व दुष्ट लोक कृत व त्रेतायुगांत मुळींच नसतात. द्वापारांत ते थोडथोडे, पण कलियुगांत मात्र यांचाच सुळसुळाट असतो.

चौ०—परहित सरिस धर्म नहिँ भाई।
परपीडा सम नहिँ अधमाई।
निरनय सकल पुरान बेद कर।
कहेउँ तात जानहिँ कोबिद नर।

(राम म्हणतात—) हे बंधो! परोपकारासारखें[1] पुण्य नाहीं आणि परपीडेसारखें पाप नाहीं. हेंच सर्व वेदपुराणांचें सार आहे. माझेंदेखील तेंच म्हणणें असून पंडितांचें मत तरी असेंच आहे.

नर सरीर धरि जे परपीरा।
करहिँ ते सहहिँ महा-भव-भीरा।
करहिँ मोहबस नर अघ नाना।
स्वारथरत परलोक नसाना।
कालरूप तिन्ह कहँ मैं भ्राता।
सुभ अरु असुभ करम-फल-दाता।

मानवयोनींत येऊन जे परपीडा करतात त्यांना घोर संसारयातना भोगाव्याच लागतात. मोहाच्या फशीं पडून जे स्वार्थांध होऊन अनेक पातकें करितात त्यांचा परलोक नष्ट होतो. बंधो! मी कालात्मा त्यांस त्यांच्या शुभाशुभ कर्मांचीं फळें भोगण्यास लावीत असतों.

अस बिचारि जे परमसयाने।
भजहिँ मोहि संसृति दुख जाने।
त्यागहिँ कर्म सुभा-सुभ-दायक।
भजहिँ मोहि सुर-नर-मुनि-नायक।
संत असंतन के गुन भाखे।
ते न परहिँ भव जिन्ह लखि राखे।

म्हणूनच परमसुज्ञ ह्याच गोष्टींचा विचार करून जन्ममरणाचीं दुःखें आपल्यासमोर ठेवतात आणि माझेंच भजन करितात. ते शुभाशुभफलदायक कर्मांचा त्याग करून सुरनरमुनिनायक अशा माझेच ठिकाणीं प्रेम करितात. संत आणि दुष्ट ह्यांचीं लक्षणें हीं मी सांगितलीं. हें विवेचन जे लक्षांत ठेवतील ते संसारांत पतन पावणार नाहींत.

**दो०—सुनहु तात मायाकृत गुन अरु दोष अनेक। गुन यह उभय न देखियहिँ देखिय सो अबिबेक[2]॥ ६३॥**

---

१ अष्टादशपुराणेषु व्यासस्य वचनद्वयम्। परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम्॥

२ 'गुणदोषदृशिर्दोषो गुणस्तूभयवर्जितः'। भाग. ११-१९-४५.

बा भरता ! मात्र विशेष हें समज कीं मायेचे गुण आणि दोष अनेक आहेत. तेव्हां गुण अगर दोष ह्या दोहींवरहि दृष्टि न ठेवणें हाच खरा गुण होय, आणि ती ठेवणें हाच खरा दोष होय.

चौ०–श्री–मुख–वचन सुनत सब भाई।
हरषे प्रेमु न हृदय समाई।
करहिँ बिनय अति बारहिँ बारा।
हनूमान हिय हरष अपारा।
पुनि रघुपति निज मंदिर गये।
एहि बिधि चरित करत नित नये।

प्रभुमुखांतील तीं वचनें ऐकून सर्व बंधु हर्षित झाले. त्यांचें प्रेम त्यांचे हृदयांत मावेना. हनुमंताचे हृदयांत आनंद माईनासा झाला व तो वारंवार प्रभूंची स्तुति करूं लागला. नंतर कृपानिधान आपल्या मंदिरांत परत आले. ह्याप्रकारें त्यांच्या नित्य अभिनव लीला चालत.

बार बार नारदमुनि आवहिँ।
चरित पुनीत राम के गावहिँ।
नित नव चरित देखि मुनि जाहीँ।
ब्रह्मलोक सब कथा कहाहीँ।
सुनि बिरंचि अतिसय सुख मानहिँ।
पुनि पुनि तात करहु गुनगानहिँ।

नारदमुनि वरचेवर अयोध्येंत येत आणि श्रीरामचंद्रांचीं पावन चरित्रें गात. मुनि यांच्या नित्य अभिनव लीला पाहून जात आणि सत्यलोकांत त्या कथन करीत. त्यांचें श्रवण करून ब्रह्मदेव अत्यानंद मानी आणि वारंवार म्हणे–वत्सा नारदा ! प्रभूंचीं चरित्रें कथन करीतच जा रे !

सनकादिक नारदहिँ सराहहिँ।
जद्यपि ब्रह्मनिरत मुनि आहहिँ।
सुनि गुनगान समाधि बिसारी।
सादर सुनहिँ परमअधिकारी।

सनकादिमुनी जरी एवढे ब्रम्हनिष्ठ तरीदेखील ते नारदास धन्यवाद देत. नारदमुखानें प्रभुगुणगान श्रवण करीत असतां, ही परम अधिकारी मंडळी देखील समाधि विसरून कथाश्रवणाचीच लालसा बाळगीत.

**दो०–जीवनमुक्त ब्रह्मपर चरित सुनहिँ तजि ध्यान। जे हरिकथा न करहिँ रति तिन्ह के हिय पाषान॥ ६४॥**

जीवन्मुक्त ब्रम्हनिष्ठ देखील समाधि सोडून भगवच्चरित्रच ऐकत राहतात. असें असतां ज्यांना हरिकथेंत गोडी वाटत नाहीं ते अभिजात पाषाणच समजावयाचे.

चौ०–एक बार रघुनाथ बोलाये।
गुरु द्विज पुरबासी सब आये।
बैठे सदसि अनुज मुनि सज्जन।
बोले बचन भगत-भय-भंजन।

एके समयीं रघुवीरांच्या बोलावण्यावरून गुरु वसिष्ठ, ब्राम्हण, पौरजन इत्यादि सर्व मंडळी जमली. लक्ष्मणादि बंधु, मुनि, संत इत्यादि मंडळी सभेंत उपस्थित असतां भक्तभयभंजन श्रीराम भाषण करूं लागले.

सुनहु सकल पुरजन मम बानी।
कहउँ न कछु ममता उर आनी।
नहिँ अनीति नहिँ कछु प्रभुताई।
सुनहु करहु जौ तुम्हहिँ सुहाई।

हे सर्व प्रजाजन हो ! माझें भाषण आपण सर्वांनीं ऐकून घ्यावें. मी मनांत कोणत्याहि प्रकारचा स्वार्थ धरून बोलत नाहीं. माझ्या भाषणांत अनीतिहि नसेल व आत्मश्लाघाहि नसेल. तुम्ही तें ऐकून घ्या आणि रुचल्यास त्याप्रमाणें वर्तन करा.

सोइ सेवक प्रियतम मम सोई।
मम अनुसासन मानइ जोई।
जौँ अनीति कछु भाषउँ भाई।
तौ मोहि बरजहु भय बिसराई।

जो माझी आज्ञा पाळतो तो सेवक मला अत्यंत प्रिय होतो. बाबांनो ! मी जर तुम्हांला अन्यायाचें कांहीं सांगेन तर तुम्ही अगदीं निःशंकपणें मजवर बहिष्कार घाला[१].

बडे भाग मानुषतनु पावा।
सुरदुर्लभ सब ग्रंथन्हि गावा।
साधनधाम मोच्छ कर द्वारा।
पाइ न जेहिँ परलोक सँवारा।

महत्भाग्यानें ही मनुष्ययोनि प्राप्त होते. ती देवांस देखील दुर्लभ म्हणून सर्व ग्रंथांतरीं वर्णन आलेलें

१ 'स्वदेश, स्वराज्य, स्वातंत्र्य आणि राजबहिष्कार' ही तुलसीदासांची चतुःसूत्री आमच्या 'मानस-हंसांत' निदर्शिली आहे. (लोकशिक्षण भागांतलें समाजशिक्षण पहा.)

आहे. सर्व साधनांचें केंद्र, मोक्षाचें द्वार, असा हा नरदेह मिळूनहि ज्यांनीं आपला परलोक साधला नाहीं—

दो०–सो परत्र दुख पावइ सिरु धुनि धुनि पछिताइ । कालहि कर्महि ईस्वरहि मिथ्या दोष लगाइ ॥ ६५ ॥

त्यांच्या पदरीं परलोकीं विटंबनाच येणार, ते कपाळ बडवून नंतर पश्चात्तापच करीत राहणार, आणि विनाकारण कालगतीस, कर्मगतीस आणि ईश्वरास बोल ठेवीत बसणार.

चौ०–एहि तन कर फल बिषय न भाई ।
स्वरगउ स्वल्प अंत दुखदाई ।
नरतनु पाइ बिषय मन देहीँ ।
पलटि सुधा ते सठ बिष लेहीँ ।
ताहि कबहुँ भल कहइ न कोई ।
गुंजा ग्रहइ परसमनि खोई ।

बाबांनों ! ह्या नरदेहाचें साध्य विषयोपभोग नव्हेच. ह्या नरदेहाला जरी स्वर्ग मिळाला तरी तो क्षुद्र आणि अंतीं दुःखदायकच होणार. नरदेह प्राप्त होऊन विषयांत मन घालणें म्हणजे अमृताऐवजीं मूर्खपणानें विष घेणेंच होय. तें कधींसुद्धां बरें म्हणवणार नाहीं. परीस गमावून गुंजांचा स्वीकार करणें यांतलेंच तें.

आकर चारि लच्छ चौरासी ।
जोनि भ्रमत यह जिव अबिनासी ।
फिरत सदा माया कर प्रेरा ।
काल कर्म सुभाव गुन घेरा ।
कबहुँक करि करुना नरदेही ।
देत ईस बिनु हेतु सनेही ।

चतुःकोशात्मक चौऱ्यांयशीं लक्ष योनींत हा अविनाशी जीव भ्रममाण होत असतो, आणि त्याच्या त्या नित्य भ्रमणांत मायेच्या प्रेरणेनें काल, कर्म, स्वभाव आणि गुण हे त्यास बाधा करीतच असतात. तथापिहि तो निरपेक्ष दयाघन भगवान् केव्हांनाकेव्हां तरी कृपा करून एकदां मानवदेह देतोच.

नरतन भवबारिधि कहुँ बेरो ।
सनमुख मरुत अनुग्रह मेरो ।
करनधार सदगुरु दृढ नावा ।
दुर्लभ साज सुलभ करि पावा ।



ही नरतनु भवसागर तरून जाणारी नौका असून माझा अनुग्रह हा तीस अनुकूल वायु होय. ह्या नावेचे कुशल कर्णधार श्रीसद्गुरु होत. ही सर्व सामुग्री अत्यंत दुर्मिळ तर खरीच परंतु ती अवचट अनायासहि जुळून येते.

दो०–जो न तरइ भवसागर नर समाज अस पाइ । सो कृत-निंदक मंदमति आतम-हन-गति जाइ ॥ ६६ ॥

अशी सामुग्री जुळूनहि जो नर भवसागर तरून जात नाहीं, तो कृतघ्न मंदमति आत्मघातक्याच्या गतीस जातो.

चौ०–जौँ परलोक इहाँ सुख चहहू ।
सुनि ममबचन हृदय दृढ गहहू ।
सुलभ सुखद मारग यह भाई ।
भगति मोरि पुरान स्रुति गाई ।

जर इहपरलोकीं सुखप्राप्तीची इच्छा असेल तर माझें वचन ऐकून त्याची हृदयांत पक्की खूणगांठ मारून ठेवा. बाबांनों ! माझी भक्ति करणें हाच याला सरळ आणि सुखाचा मार्ग आहे. वेद व पुराणें तरी तोच सांगतात.

ज्ञान अगम प्रत्यूह अनेका ।
साधन कठिन न मन कहँ टेका ।
करत कष्ट बहु पावइ कोऊ ।
भगतिहीन मोहि प्रिय नहिँ सोऊ ।

ज्ञानमार्ग हा मूळचाच कठिण, त्यांत विघ्नें अपार, म्हणून तो साधणें मुष्किल जातें. शिवाय त्यांत मनास आधारहि नसतो. अतिशय कष्ट करून देखील तो एखाद्यालाच साध्य होतो. तरीदेखील त्यांत जर भक्ति नसेल तर तो मला अलोणीच वाटतो.

भगति सुतंत्र सकल–सुख–खानी ।
बिनु सतसंग न पावहिँ प्रानी ।
पुन्यपुंज बिनु मिलहिँ न संता ।
सतसंगति संसृति कर अंता ।

भक्ति ही स्वतंत्र असून सर्व सुखांची केवळ खाण आहे. परंतु ती सत्संगावांचून मनुष्याचे हातीं लागत नाहीं, आणि पुण्यसंचय गांठीं असल्याखेरीज संतांची गांठ पडत नाहीं. परंतु एकदां संतांची गांठ पडली कीं संसाराचा अंत झालाच समजा.

पुन्य एक जग महँ नहिँ दूजा ।
मन क्रम बचन बिप्र–पद–पूजा ।

सानुकूल तेहि पर मुनि देवा ।
जो तजि कपट करइ द्विजसेवा ।

जगांत पुण्य कायतें एकच, दुसरें नाहींच. तें म्हणजे कायावाचामनेंकरून ब्राह्मणांच्या चरणांची सेवा करणें हें होय. जो निष्कपटपणें द्विजसेवा करतो त्याचे मुनि आणि देव साह्यकारी होतात.

**दो०—आउरउ एक गुपुत मत सबहि कहउँ कर जोरि । संकरभजन बिना नर भगति न पावइ मोरि ॥ ६७ ॥**

आणखीहि एक रहस्य मी तुम्हां सर्वांना हात जोडून निवेदन करतों. तें हें कीं श्रीशंकराच्या आराधनेवांचून माझी भक्ति कोणासहि प्राप्त होत नाहीं.

चौ०—कहहु भगति पथ कवन प्रयासा ।
जोग न मख जप तप उपवासा ।
सरल सुभाव न मन कुटिलाई ।
जथालाभ संतोष सदाई ।

मग तुम्हीच सांगा पाहूं कीं भक्तिमार्गांत कोणते कष्ट आहेत ? योग, यज्ञ, जप, तप, उपवास हे तर नाहींतच, सरल स्वभाव, निष्कपट मन, यदृच्छालाभ-संतोष हीं निरंतर असलीं म्हणजे झालें.

मोर दास कहाइ नर आसा ।
करइ त कहहु कहा बिस्वासा ।
बहुत कहउँ का कथा बढाई ।
एहि आचरन बस्य मैं भाई ।

माझा दास म्हणावयाचें आणि मनुष्याची आशा करीत बसावयाचें, तेव्हां सांगा पाहूं कीं यांत विश्वासास मला जागाच कोणती ? अधिक बोलून गोष्टी लांबवण्यांत अर्थ नाहीं. बाबांनों ! ज्या आचरणाचे योगानें मी वश होतों तें हें—

बयरु न बिग्रह आस न त्रासा ।
सुखमय ताहि सदा सब आसा ।
अनारंभ अनिकेत अमानी ।
अनघ अरोष दच्छ बिज्ञानी ।
प्रीति सदा सज्जन संसर्गा ।
तृनसम बिषय स्वर्ग अपबर्गा ।
भगति पच्छ हठ नहिं सठताई ।
दुष्ट तर्क सब दूरि बहाई ।

वैर अगर विग्रह न करणें आणि आशा अगर त्रास न मानणें हेंच सदा सर्वत्र सुखी होणें होय. संकल्पवर्जित असून गृहादिकांचे ठायीं अनासक्त रहाणें, मानरहित, निष्पाप, क्रोधवर्जित कर्तव्यदक्ष, अनुभवज्ञानसंपन्न आणि संतसमागमासंबंधानें सदैव लोलुपता, तसेंच विषय, स्वर्ग आणि मोक्ष यांना देखील कःपदार्थ मानणें, तर्कवितर्क झुगारून देऊन मूर्खपणाच्या भरीस न पडतां पूर्ण निग्रहानें भक्तीचीच कांस धरणें—

**दो०—मम गुनग्राम नाम रत गत-ममता-मद-मोह । ता कर सुख सोइ जानइ परानंदसंदोह ॥ ६८ ॥**

आणि ममता, मद, मोह इत्यादि झुगारून माझ्या गुणग्रामांत व नामस्मरणांत रंगून जाणें, ह्यांत जें सुख आहे तें माझ्या भक्तांनाच फक्त माहीत असतें. परम आनंदाचें दोहन त्यांनाच साधतें.

चौ०—सुनत सुधासम बचन राम के ।
गये सबन्हि पद कृपाधाम के ।
जननि जनक गुरु बंधु हमारे ।
कृपानिधान प्रान तें प्यारे ।
तनु धनु धाम राम हितकारी ।
सब बिधि तुम्ह प्रनतारतिहारी ।

श्रीरामचंद्राचीं तीं अमृततुल्य वचनें ऐकून सर्वजण दयाघनाच्या चरणीं मिठी मारून म्हणाले,—हे कृपानिधान ! आपणच आमचे माता, पिता, गुरु आणि बंधु आहांत. आपण आम्हांला प्राणाहूनहि प्रिय आहांत. आमचे देह, गेह आणि वित्त आपणच. आमचे हितकर्तेहि आपणच. हे रामा ! सर्वतोपरी आम्हां शरणागतांचे क्लेश हरण करणारे आपणच आहांत.

अस सिख तुम्ह बिनु देइ न कोऊ ।
मातु पिता स्वारथरत ओऊ ।
हेतुरहित जग जुग उपकारी ।
तुम्ह तुम्हार सेवक असुरारी ।
स्वारथमीत सकल जग माहीं ।
सपनेहुँ प्रभु परमारथ नाहीं ।

आपणावांचून असा उपदेश कोणीच करणार नाहीं. मातापितर हे तर केवळ स्वार्थपरायण होत. प्रभो ! ह्या जगांत स्वार्थशून्य असे उपकारकर्ते केवळ दोघेच आहेत. एक, हे असुररिपो ! आपण, आणि दुसरे आपले भक्त. प्रभो ! संसारांतला मित्र स्वार्थी;

म्हणूनच संसारांत स्वप्नांतदेखील परमार्थ घडणें शक्य नाहीं.

सब के बचन प्रेमरससाने ।
सुनि रघुनाथ हृदय हरषाने ।
निज गृह गये सुआयसु पाई ।
बरनत प्रभु बतकही सुहाई ।

सर्वांचें तें प्रेमरसपरिप्लुत भाषण श्रवण करून रघुनाथ मनांत हर्षित झाले. नंतर आज्ञा घेऊन सर्व मंडळी प्रभूंच्या उपदेशाची प्रशंसा करीत स्वस्थानीं गेली.

**दो०—उमा अवधबासी नर नारि कृतारथ रूप । ब्रह्म सच्चिदानंद घन रघुनायक जहँ भूप ॥ ६९ ॥**

( शंकर म्हणतात )—हे पार्वति ! सच्चिदानंदघन परब्रह्म रघुनाथ जेथें राज्य करीत होते त्या अयोध्येंतील नरनारी खरे कृतार्थ होत.

चौ०—एक बार बसिष्ठ मुनि आये ।
जहाँ राम सुखधाम सुहाये ।
अतिआदर रघुनायक कीन्हा ।
पद पखारि चरनोदक लीन्हा ।

एके प्रसंगीं मंदिरांत जेथें श्रीराम आनंदानें बसले होते तेथें वसिष्ठ पोंचले. राघवांनीं त्यांचा उत्तमसत्कार केला आणि प्रादप्रक्षालन करून त्यांचें चरणतीर्थ घेतलें.

राम सुनहु मुनि कह कर जोरी ।
कृपासिंधु बिनती कछु मोरी ।
देखि देखि आचरन तुह्मारा ।
होत मोह मम हृदय अपारा ।
महिमा अमित बेद नहिँ जाना ।
मैँ केहि भाँति कहउँ भगवाना ।

मुनिवर्य हात जोडून म्हणाले, हे दयासागरा ! माझी एक प्रार्थना ऐकावी. आपलें आचरण पाहून माझ्या मनास पराकाष्ठेचें आश्चर्य होत आहे. हे भगवन् ! आपल्या माहिम्यास सीमाच नाहीं. तो वेदांसहि अगम्य आहे. तेव्हां मजकडून त्याचें वर्णन कसें होणार ?

उपरोहिती कर्म अतिमंदा ।
बेद पुरान सुमृति कर निंदा ।
जब न लेउँ मैँ तब बिधि मोही ।
कहा लाभ आगे सुत तोही ।
परमातमा ब्रह्म नररूपा ।
होइहि रघु-कुल-भूषन भूपा ।

पुरोहितवृत्ति अति नीच. वेद, पुराण आणि स्मृति देखील तिची निंदाच करतात. मी ती स्वीकारीत नव्हतों, परंतु मला ब्रह्मदेव म्हणाले—वत्सा ! ईत तुला भावी लाभ आहे. परब्रह्म परमात्मा नररूपानें रघुकुलभूषण भूपति होऊन अवतरणार आहे.

**दो०—तब मैँ हृदय बिचारा जोग जज्ञ ब्रत दान । जा कहँ करिय सो पइहउँ धर्म न एहि सम आन ॥ ७० ॥**

तेव्हां मीं मनांत विचार केला कीं योग, यज्ञ व्रत व दान ज्याच्या प्राप्तीसाठीं म्हणून कर्तव्य, तोच जर मला प्राप्त होणार तर ह्या वृत्तीसारखा अन्य सद्धर्मच नाहीं.

चौ०—जप तप नियम जोग निज धर्मा ।
स्रुतिसंभव नाना सुभ कर्मा ।
ज्ञान दया दम तीरथ मज्जन ।
जहँ लगि धरम कहत स्रुति सज्जन ।
आगम निगम पुरान अनेका ।
पढे सुने कर फल प्रभु एका ।
तव पद-पंक-ज प्रीति निरंतर ।
सब साधन कर यह फल सुंदर ।

जप, तप, नियम, योग, वर्णाश्रमधर्म, वेदप्रतिपादित नाना शुभकर्में, ज्ञान, दया, दम, तीर्थावगाहन, इत्यादि जे जे म्हणून श्रुति आणि संत यांनीं उपदिष्ट असे यच्चयावत् धर्म, तसेंच वेद, श्रुति आणि अनेक पुराणें यांचें श्रवण आणि पठण, या सर्व साधनाचें हेंच एक साध्य आहे कीं, हे प्रभो ! तुझ्या पदकमलांचे ठिकाणीं निरंतर प्रेम जडणें आणि खरोखर स्पृहणीय असें फलहि पण तेंच.

छूटइ मल कि मलहि के धोये ।
घृत कि पाव कोउ बारि बिलोये ।
प्रेम भगति जल बिनु रघुराई ।
अभि-अंतर-मल कबहुँ न जाई ।

ओशट ओशटानें धुतल्यास कसें निघणार ? पाणी घुसळून कधीं कोणास घृतप्राप्ति झाली आहे काय ? हे रघुनाथ ! भक्ति-प्रेम-जलावांचून मानसिक मलांचें कधींहि क्षालन व्हावयाचें नाहीं.

सोइ सर्बज्ञ तज्ञ सोइ पंडित ।
सोइ गुनगृह बिज्ञान अखंडित ।

दच्छ सकल-लच्छन-जुत सोई।
जा के पद-सरो-ज रति होई।

तोच सर्वज्ञ, तोच पंडित, तोच तज्ञ, तोच गुणागर, तोच अखंडविज्ञानी, तोच दक्ष, तोच सर्वलक्षणयुक्त, कीं जो आपल्या पदकमलांचे ठायीं अनुरक्त होतो.

**दो०—नाथ एक बर मागउँ राम कृपा करि देहु। जनम जनम प्रभु पद-कमल कबहुँ घटइ जनि नेहु॥ ७१॥**

हे नाथ! मी एका वराची याचना करतों. रामा, मला तो कृपा करून द्या. माझें प्रभुपदकमलांचे ठिकाणीं जन्मजन्मांतरीं देखील कधींहि प्रेम घटोना.

चौ०—अस कहि मुनि बसिष्ठ गृह आये।
कृपासिंधु के मन अति भाये।
हनूमान भरतादिकभ्राता।
संग लिये सेवक-सुख-दाता।
पुनि कृपाल पुर बाहर गये।
गज रथ तुरग मँगाबत भये।

असें म्हणून वसिष्ठ मुनि स्वाश्रमीं परतले. कृपासिंधूच्याहि मनास महदानंद वाटला. नंतर सेवकसुखदायक दयाळु प्रभु मारुति व भरतादिबंधू यांना बरोबर घेऊन नगराबाहेर गेले, व त्यांनीं तिकडेच गज, रथ व अश्व मागविले.

देखि कृपा करि सकल सराहे।
दिये उचित जिन्ह जिन्ह जेइ चाहे।
हरन सकलस्रम प्रभु स्रम पाई।
गये जहाँ सीतल अँबराई।

प्रभूंनीं ती कवायत अवलोकन करून सर्वांस शाबासकी दिली आणि यथेष्ट इनामें वाटलीं. प्रभूंना श्रम झाले होते. तेव्हां श्रमपरिहार्थ ते एका शीतल आंबराईंत शिरले.

भरत दीन्ह निजबसन डसाई।
बैठे प्रभु सेवहिँ सब भाई।
मारुतसुत तब मारुत करई।
पुलक बपुष लोचन जल भरई।
हनूमान समान बड भागी।
नहिँ कोउ राम-चरन-अनुरागी।
गिरिजा जासु प्रीति सेवकाई।
बार बार प्रभु निज मुख गाई।

भरतानें आपलें उपवस्त्र आंथरलें व प्रभु त्यावर बसले. सर्व बंधु चरणसंवाहनादि सेवा करूं लागले. हनुमंत वारा घालूं लागला तेव्हां त्यांचें शरीर सपुलक आणि नेत्र सजल झाले. (शंकर म्हणतात)—हे पार्वति! ज्याच्या प्रेमाची आणि सेवेची प्रभूंनीं स्वमुखानें वारंवार प्रशंसा केली त्या मारुतीसारखा रामसेवकांत थोर भाग्यशाली कोणीहि नाहीं.

**दो०—तेहि अवसर मुनि नारद आये करतल बीन। गावन लागे राम-कल-कीरति सदानबीन॥ ७२॥**

त्याच सुमारास हातांत वीणा घेऊन रामाचें नित्य नवीन यश गात गात नारदमुनि तेथें आले व स्तुति करूं लागले—

चौ०—मामवलोकय पंक-ज-लोचन।
कृपा बिलोकनि सोकबिमोचन।
नील-तामरस-स्याम कामअरि-।
हृदय-कंज-मकरंद-मधुप हरि।
जातुधान-बरूथ बल-भंजन।
मुनि-सज्जन-रंजन अघगंजन।
भूसुर-ससि-नव-बृंद-बलाहक।
अ-सरन-सरन दीन-जन-गाहक।
भुजबल-बिपुल भार महि खंडित।
खर-दूषन-बिराध-बध पंडित।
रावनारि सुखरूप भूपबर।
जय दसरथ-कुल-कुमुद-सुधाकर।
सुजसु पुरानबिदित निगमागम।
गावत सुर-मुनि-संत-समागम।
कारुनीक ब्यलीक-मद-खंडन।
सब बिधि कुसल कोसलामंडन।
कलि-मल-मथन-नाम ममताहन।
तुलसि-दास-प्रभु पाहि प्रनतजन।

हे राजीवलोचन, कृपाविलोकन, शोकविमोचन, नीलकमलश्यामवर्ण, श्रीशंकरहृत्कमलमकरंदमधुप, श्रीहरी, राक्षसगणवलभंजन, मुनिसज्जनरंजन, अघनाशन, भूसुरधान्यवर्धकनवमेघ, अशरणशरण, दीनजनपालक, विपुलभुजबल, भूभारहरण, खरदूषणविराधवधकुशल, रावणारि, सुखरूप, भूपश्रेष्ठ, दशरथकुलकमलचंद्र सद्यशोमंडित, पुराणविदित, निगमागमगीत, सुरनरमुनिसंतसंगत, कारुणिक, अविद्यामदखंडन, नितांतकुशल, कोशलभूषण, कलिमलमथननाम,

ममताभंजन तुलसीदासप्रभो ! मजकडे पहा ह्या शरणागत दासाचें रक्षण कर.

**दो०—प्रेमसहित मुनि नारद बरनि राम-गुन-ग्राम । सोभासिंधु हृदय धरि गये जहाँ बिधिधाम ॥ ७३ ॥**

रामगुणग्रामाचें सप्रेम गायन करून आणि त्या सौंदर्यसागराचें ध्यान हृदयांत सांठवून नारदमुनि सत्यलोकाप्रत गमन करते झाले.

चौ०—गिरिजा सुनहु बिसद यह कथा ।
मैं सब कही मोरि मति जथा ।
रामचरित सत कोटि अपारा ।
स्रुति सारदा न बरनइ पारा ।

( शंकर म्हणतात )—हे पार्वति ! ही सर्व रामकथा मीं यथामति तुला निवेदन केली. रामकथा अनंत आणि अपार आहे. वेद आणि श्रुती ह्यांनाहि तिचें साथेति ज्ञान नाहीं.

राम अनंत अनंतगुनानी ।
जनम कर्म अनंत नामानी ।
जलसीकर महिरज गनि जाहीं ।
रघु-पति-चरित न बरनि सिराहीं ।

राम अनंत असून त्यांचे गुणहि अनंतच आहेत आणि त्यांचे जन्म, कर्म, आणि नांवें हींहि पण अनंतच. जलाचे बिंदु आणि पृथ्वीचे रजःकण देखील मोजले जातील, परंतु रघुपतींचीं चरित्रें सांगून सरणार नाहींत.

बिमल कथा हरि—पद—दायनी ।
भगति होइ सुनि अनपायनी ।
उमा कहेउँ सब कथा सुहाई ।
जो भुसुंडि खगपतिहि सुनाई ।
कछुक रामगुन कहेउँ बखानी ।
अब का कहउँ सो कहहु भवानी ।

जी पवित्र कथा हरिपददायिनी आहे, जिच्या श्रवणानें अढळ भक्ति प्राप्त होते व जी गरुडास भुशुंडीनें कथन केली ती रमणीय कथा( शंकर म्हणतात )—हे पार्वति ! मीं तुला कथन केली. रामलीलेचा हा थोडासा भाग झाला. भवानि ! आतां तुला काय सांगूं तें सांग.

सुनि सुभकथा उमा हरषानी ।
बोली अतिबिनीत मृदुबानी ।
धन्य धन्य मैं धन्य पुरारी ।
सुनेउँ रामगुन भव—भय—हारी ।

ती शुभकथा श्रवण करून उमा हर्षित झाली आणि अत्यंत नम्र आणि मृदु वाणीनें म्हणाली—हे पुरारे ! त्या भवभयशमन रामाचे गुण श्रवण केल्यानें मला धन्यता वाटते.

**दो०—तुम्हरी कृपा कृपायतन अब कृतकृत्य न मोह । जानेउँ रामप्रताप प्रभु चिदानंदसंदोह ॥ ७४ ॥**

हे कृपानिधान ! चिदानंदसंदोह ! मला आपल्या अनुग्रहामुळें श्रीरामचंद्राचा प्रभाव विदित झाल्यानें आज मी कृतकृत्य झालें व माझा मोह नष्ट झाला.

**दो०—नाथ तवानन ससि स्रवत कथा सुधा रघुबीर । स्रवनपुटन्हि मन पान करि नहिं अघात मतिधीर ॥ ७५ ॥**

हे मतिधीर प्रभो ! आपल्या मुखचंद्रापासून स्रवणारें हें रघुवीरकथामृत श्रवणपुटानें प्राशन करून देखील या माझ्या मनाला अलंप्रत्यय होत नाहीं.

चौ०—रामचरित जे सुनत अघाहीं ।
रस बिसेष जाना तिन्ह नाहीं ।
जीवनमुक्त महामुनि जेऊ ।
हरिगुन सुनहिं निरंतर तेऊ ।

रामचरित्र ऐकून जे तृप्त होत असतील त्यांना त्याचें खरें खरें सारस्यच कळलें नाहीं असेंच मी तरी खास म्हणेन. जीवन्मुक्त महामुनी देखील हरिगुणांचें नित्यशः श्रवण करीत असतात.

भवसागर चह पार जो पावा ।
रामकथा ता कह दृढ नावा ।
बिषइन्ह कहँ पुनि हरि-गुन-ग्रामा ।
स्रवनसुखद अरु मनअभिरामा ।

ज्यांस भवसागर तरून जाण्याची इच्छा असेल, त्यांस रामकथा हेंच सुदृढ जहाज आहे. विषयी जनांस देखील ही हरिकथा कर्णमधुर आणि मनोवेधक वाटते.

स्रवनवंत अस को जग माहीं ।
जाहि न रघु-पति-चरित सुहाहीं ।
ते जड जीव निजा-त्मक-घाती ।
जिन्हहिं न रघु-पति-कथा सुहाती ।

ज्याला रामचरित्र गोड लागत नाहीं असा ऐकूं येत असलेला मनुष्य जगांत कोण आहे ? ज्यांना रामकथा रुचत नसेल ते जडजीव आत्मघातकी ( कर्णपिशाच्च ) होत.

हरि-चरित्र-मानस तुह्म गावा ।
सुनि मैं नाथ अमित सुख पावा ।
तुह्म जो कही यह कथा सुहाई ।
कागभुसुंडि गरुड प्रति गाई ।

रामचरितमानस आपण कथन केलें, तें ऐकून, हे नाथ ! मला अपार आनंद झाला आहे, आपण ही जी सुंदर हरिकथा मला निवेदन केली तीच काकभुसुंडीनें गरुडाप्रत सांगितली.

**दो०—बिरति ज्ञान बिज्ञान दृढ रामचरित अतिनेह । बायसतन रघु-पति-भगति मोहि परम संदेह ॥ ७६ ॥**

तिकडे वैराग्य, ज्ञान आणि विज्ञान रामचरित्राचे ठिकाणीं अत्यंत प्रेम, रघुपतींची भाक्ति आणि इकडे वायसाचा जन्म हें मात्र मला मोठेंच कोडें वाटतें.

चौ०—नरसहस्र महँ सुनहु पुरारी ।
कोउ एक होइ धर्म-ब्रत-धारी ।
धर्मसील कोटिक महँ कोई ।
बिषयबिमुख बिरागरत होई ।
कोटि-बिरक्त-मध्य स्रुति कहई ।
सम्यक ज्ञान सकृत कोउ लहई ।

हे त्रिपुरारे ! हजारों माणसांतून धर्मात्मा असा एखादाच कोणी असणार, अशा कोट्यवधि धर्मशीलांपैकीं विषयपराङ्मुख आणि वैराग्यसंपन्न असा एकादाच आणि कोट्यवधि विरक्तांमधूनाहि उत्तम ज्ञानवंत क्वचित्च एकादा आढळणार असें वेद सांगतात.

ज्ञानवंत कोटिक महँ कोऊ ।
जीवनमुक्त सकृत जग सोऊ ।
तिन्ह सहस्र महँ सब सुखखानी ।
दुर्लभ ब्रह्मलीन बिज्ञानी ।

कोट्यवधि ज्ञानवंतांपैकीं कोणी जीवन्मुक्त असलाच तर तो एखादा अवचटच असणार, आणि अशा जीवनमुक्तांतून सर्व सुखांचें आगर अशा ब्रह्मपदाशीं तादात्म्य पावलेला विज्ञानी तर दुर्लभच.

धर्मसील बिरक्त अरु ज्ञानी ।
जीवनमुक्त ब्रह्मपर प्रानी ।
सब तें सो दुर्लभ सुरराया ।
राम-भगति-रत गत-मद-माया ।
सो हरिभगति काग किमि पाई ।
बिस्वनाथ मोहि कहहु बुझाई ।

धर्मशील, विरक्त, ज्ञानी, जीवन्मुक्त आणि ब्रह्मपरायण ह्या सर्व व्यक्तींहूनाहि, हे देवाधिदेवा ! मदमोहविमुक्त श्रीरामभक्तिरत असा नर दुर्लभाहूनहि दुर्लभ. हे विश्वनाथ ! अशा प्रकारची हरिभक्ति काकभुशुंडीला कशी प्राप्त झाली तें मला आपण सविस्तर कथन करावें.

**दो०—रामपरायन ज्ञानरत गुनागार मतिधीर । नाथ कहहु केहिं कारन पायेउ कागसरीर ॥ ७७ ॥**

हे नाथ ! तो रामपरायण, ज्ञानरत, गुणागर, मतिधीर, काकदेह कां पावला तेंहि मला सांगा.

चौ०—यह प्रभु चरित पवित्र सुहावा ।
कहहु कृपाल काग कहँ पावा ।
तुह्म केहि भाँति सुना मदनारी ।
कहहु मोहि अतिकौतुक भारी ।

हें शोभन आणि पवित्र प्रभुचरित्र काकभुशुंडीस कोठें प्राप्त झालें आणि तें आपण कोणत्या प्रकारें श्रवण केलें तें हे मन्मथदहन दयाघना ! मला सांगावें. मला त्याचें फारच मोठें आश्चर्य वाटत आहे.

गरुड महाज्ञानी गुनरासी ।
हरिसेवक अतिनिकट निवासी ।
तेहि केहि हेतु काग सन जाई ।
सुनी कथा मुनिनिकर बिहाई ।
कहहु कवन बिधि भा संबादा ।
दोउ हरिभगत काग उरगादा ।

गरुड हा महाज्ञानी, गुणराशी, आणि हरिसेवक म्हणून त्यांचे अगदीं जवळ वास करणारा त्यानें मुनिसमाज वगळून काकापाशीं जाऊन काय म्हणून ही कथा ऐकावी? प्रभो! काक आणि गरुड ह्या दोघां हरिभक्तांचा कोणत्या प्रकारें संवाद झाला तेंहि कळलें पाहिजे.

गौरिगिरा सुनि सरल सुहाई ।
बोले सिव सादर सुख पाई ।

धन्य सती पावनि मतिं तोरी ।
रघु-पति-चरन प्रीति नहिँ थोरी ।
सुनहु परम पुनीत इतिहासा ।
जो सुनि सकल सोक भ्रम नासा ।
उपजइ रामचरन बिस्वासा ।
भवनिधि तर नर बिनहिँ प्रयासा ।

पार्वतीचें तें सरळ भाषण ऐकून शंकर प्रसन्न झाले आणि म्हणाले, वाहवा ! हे पतिव्रते ! तूं धन्य आहेस व तुझी बुद्धि पवित्र आहे. रघुपतींचे चरणीं हें तुझें प्रेम थोडेंथोडकें नव्हे. ज्याच्या श्रवणानें शोक व मोह नष्ट होतात आणि रामचरणांचेठायीं विश्वास उत्पन्न होऊन अनायासेंकरून मनुष्य भवसागरांतून उत्तीर्ण होतो तो परमपवित्र इतिहास तूं श्रवण कर.

**दो०—ऐसइ प्रस्न बिहंगपति कीन्ह काग सन जाइ । सो सब सादर कहिहउँ सुनहु उमा मन लाइ ॥ ७८ ॥**

असाच प्रश्न गरुडानें काकाप्रत जाऊन केला होता. तें सर्व, हे पार्वति, मी तुला प्रेमपूर्वक सांगतों, तें तूं मन लावून ऐक.

चौ०—मैँ जिमि कथा सुनी भवमोचनि ।
सोप्रसंग सुनु सुमुखि सुलोचनि ।
प्रथम दच्छगृह तव अवतारा ।
सती नाम तब रहा तुह्मारा ।
दच्छजज्ञ जब भा अपमाना ।
तुह्म अतिक्रोध तजे तब प्राना ।
मम अनुचरन्ह कीन्ह मखभंगा ।
जानहु तुह्म सो सकल प्रसंगा ।
तब अतिसोच भयउ मन मोरे ।
दुखी भयउँ बियोग प्रिय तोरे ।
सुंदर बन गिरि सरित तडागा ।
कौतुक देखत फिरेउँ बिरागा ।

हे सुमुखि सुलोचनि ! ती भवमोचनी रामकथा मला ज्या योगानें ऐकण्यास सांपडली तो प्रसंग ऐक. प्रथम तूं दक्षाच्या घरीं जन्म घेतला होतास व त्या वेळचें तुझें नांव सती होतें. दक्षयज्ञांत जेव्हां तुझा अपमान झाला तेव्हां तूं अत्यंत क्रुद्ध होऊन देहत्याग केलास. नंतर माझ्या गणांनीं यज्ञाचा भंग केला. तो सर्व प्रसंग तुला विदितच आहे. त्या वेळेस माझेंहि मन फारच उद्विग्न झालें होतें आणि प्रिये, तुझ्या वियोगानें मी दुःखी झालों होतों. म्हणून मी उदास होऊन सुंदर वनें, पर्वत, नद्या, सरोवरें इत्यादि सृष्टि-चमत्कार पहात फिरत राहीं.

गिरि सुमेरु उत्तर दिसि दूरी ।
नील सैल एक सुंदर भूरी ।
तासु कनकमय सिखर सुहाये ।
चारि चारु मोरे मन भाये ।
तिन्ह पर एक एक बिटप बिसाला ।
बट पीपर पाकरी रसाला ।
सैलोपरि सर सुंदर सोहा
मनिसोपन देखि मन मोहा ।

सुमेरु पर्वताच्या उत्तरेस लांबच लांब असा एक अत्यंत रमणीय नीलपर्वत आहे. त्यास चार सुंदर सुवर्णशिखरें आहेत. तीं मला फारच आवडलीं. त्यांच्यावर वड, पिंपळ, पांकळ आणि आम्र असे शिखरागणिक विशाल वृक्ष आहेत. त्या पर्वतावरच एक रम्य सरोवर आहे. त्याच्या रत्नासारख्या झकास पायऱ्या पाहून माझेंही मन वेधलें गेलें.

**दो०—सीतल अमल मधुर जल जलज बिपुल बहुरंग । कूजत कलरव हंसगन गुंजत मंजुल भृंग ॥ ७९ ॥**

त्या सरोवराचें पाणी थंड, निर्मळ, मधुर, आणि त्यांत अनेक रंगांचीं कमळेंहि विपुल. त्यावर हंसांचे थवे मधुर कूजन, आणि भृंग मंजुल गुंजारव करित असतात.

चौ०—तेहि गिरि रुचिर बसइ खग सोई ।
तासु नास कलपांत न होई ।
मायाकृत गुन दोष अनेका ।
मोह मनोज आदि अबिबेका ।
रहे ब्यापि समस्त जग माहीँ ।
तेहि गिरि निकट कबहुँ नहिँ जाहीँ

त्याच पर्वतावर तो काक रहात असतो. त्याला कल्पांतींहि मृत्यु नाहीं. मोह, काम इत्यादि विकार, अविवेक, आणि मायाजन्य गुणदोष—ज्यांनीं सर्व जग भारून टाकलें आहे ते—त्या पर्वताच्या वाऱ्यास देखील कधीं जाऊं शकत नाहींत.

तहँ बसि हरिहि भजइ जिमि कागा ।
सो सुनु उमा सहित अनुरागा ।
पीपर तरु तर ध्यान जो धरई ।
जाप जज्ञ पाकरि तर करई ।

आमछाहँ कर मानस पूजा।
तजि हरिभजन काज नहिँ दूजा।
बर तर कह हरि-कथा-प्रसंगा।
आवहिँ सुनहिँ अनेक बिहंगा।

तेथें वास करून काक ज्या रीतीनें हरिभजन करीत असतो तो प्रकार, हे पार्वति! प्रेमपूर्वक ऐक. पिंपळाच्या वृक्षातळीं तो ध्यानयोग करीत असतो, पाकळवृक्षाखालीं त्याचा जप चाललेला असतो व आम्रवृक्षाच्या छायेंत तो मानसपूजा करीत असतो. हरिभक्तिखेरीज त्यास इतर कामच नाहीं. वटवृक्षाखालीं तो पुराण सांगत असतो आणि अनेक पक्षी तेथें तें ऐकत असतात.

रामचरित बिचित्र बिधाना।
प्रेमसहित कर सादर गाना।
सुनहिँ सकल मति बिमल मराला।
बसहि निरंतर जो तेहि ताला।
जब मैँ जाइ सो कौतुक देखा।
उर उपजा आनंद बिसेखा।

रामकथेचें तें पुराण अत्यंत प्रेमादरानें आणि विचित्र प्रकारानें होत असतें. त्या सरोवरावर जेवढे म्हणून हंस वास करतात ते सर्व शुद्धबुद्धिपूर्वक तें पुराण ऐकत असतात. मीं जाऊन जेव्हां तो चमत्कार पाहिला तेव्हां तर माझ्याहि मनास विशेषच आनंद झाला.

**दो०—तब कछु काल मरालतनु धरि तहँ कीन्ह निवास। सादर सुनि रघु-पति-गुन पुनि आयउँ कैलास॥ ८०॥**

नंतर हंसदेह धारण करून कांहीं कालपर्यंत मीही तेथेंच वास केला, आणि आदरपूर्वक रघुपतींचे गुणश्रवण करून फिरून कैलासाप्रत आलों.

चौ०—गिरिजा कहेउँ सो सब इतिहासा।
मैँ जेहि समय गयउँ खग पासा।
अब सो कथा सुनहु जेहि हेतू।
गयउ काग पहिँ खग-कुल-केतू।

हे पार्वति! मीं काकापाशीं कसा काय गेलों तो सर्व वृत्तांत तुला निवेदन केला. आतां पक्षिराज गरुड काकाकडे ज्या कारणास्तव आला तें वर्तमान ऐक.

जब रघुनाथ कीन्ह रनक्रीडा।
समुझत चरित होत मोहि ब्रीडा।
इंद्रजीत कर आपु बँधायो।
तब नारद मुनि गरुड पठायो।

रघुपतींनीं जेव्हां रणक्रीडा केली, तेव्हांच्या त्यांच्या चरित्रांची कल्पना आली म्हणजे मलादेखील लज्जा उत्पन्न होते. त्यांनीं इंद्राजिताकडून आपणांस नागपाशांनीं बांधवून घेतलें होतें, त्या वेळीं नारदमुनींनीं गरुडास त्यांचेकडे पाठवलें होतें.

बंधन काटि गयउ उरगादा।
उपजा हृदय प्रचंड बिषादा।
प्रभुबंधन समुझत बहु भाँती।
करत बिचार उरगआराती।

त्यांचे ते पाश तोडून गरुड परत गेला. परंतु त्याच्या मनास अत्यंत चुटपुट लागली. प्रभूंचें बंधन झालें; या गोष्टीचा गरुडानें अनेकप्रकारें विचार केला.

ब्यापक ब्रह्म बिरज बागीसा।
माया–मोह–पार परमीसा।
सो अवतार सुनेउँ जग माहीँ।
देखेउँ सो प्रभाव कछु नाहीँ।

व्यापक, ब्रह्म, रजोहीन, वागीश, मायामोहातीत असा जो परमात्मा तोच जगांत अवतरला आहे असें ऐकिलें, परंतु पहावें तों त्यांच्यांत तथ्य मात्र जेमतेमच.

**दो०—भवबंधन तेँ छूटहिँ नर जप जा कर नाम। खर्ब निसाचर बाँधेउ नाग-पास सोइ राम॥ ८१॥**

ज्याच्या नामस्मरणानेंच मनुष्यांचीं भवबंधनें पार तुटून जातात अशा त्या रामास एका क्षुद्र राक्षसानें नागपाशांनीं बांधावें!

चौ०—नाना भाँति मनहिँ समुझावा।
प्रगट न ज्ञान हृदय भ्रम छावा।
खेदखिन्न मन तर्क बढाई।
भयउ मोहबस तुम्हरिहि नाईँ।

आपल्या मनाची तो नानाप्रकारें समजूत घालून पाही परंतु त्यास पत्ता लागेना. त्याच्या अंतःकरणावर भ्रमाचें पटल अखेर जमलें तें जमलेंच. त्याच्या मनास हुरहूर लागून तो नाना तर्कवितर्क करूं लागला. तुझ्याच सारखा तो भ्रमिष्ट बनून गेला.

ब्याकुल गयउ देवरिषि पाहीँ।
कहेसि जो संसय निजमन माहीँ।

सुनि नारदहिँ लागि अतिदाया।
सुनु खग प्रबल राम कै माया।
जो ज्ञानिन्ह कर चित अपहरई।
बरिआईँ बिमोह मन करई।
जेहिँ बहु बार नचावा मोही।
सोइ व्यापी बिहंगपति तोही।

असा व्याकुल होऊन नंतर तो नारदांकडे गेला आणि त्यानें आपल्या मनांतली शंका त्यांस निवेदन केली. ती ऐकून नारदास फार दया आली. ते म्हणाले— गरुडा! ऐक. रामचंद्रांची माया दुरत्यय आहे. ती ज्ञानी जनांचीहि बुद्धि हिरावून बळेंच त्यांच्याहि मनाला मोह पाडते. तिनें मलादेखील कित्येकदां नाचवून सोडिलें आहे. आणि सांप्रत तिनेंच तुलाहि विळखा घातला आहे.

महामोह उपजा उर तोरे।
मिटि हिन न बेगि कहे खग मोरे।
चतुरानन पहिँ जाहु खगेसा।
सोइ करेहु जो देहिँ निदेसा।

गरुडा! तुझ्या मनांत उत्पन्न झालेला हा मोह अजस्र आहे. माझ्या उपदेशानें तो चटदिशीं निसरणार नाहीं. ह्मणून, हे खगपते! तूं ब्रह्मदेवांकडे जा आणि ते ज्याप्रमाणें आज्ञा करतील त्याप्रमाणें वाग.

**दो०—अस कहि चले देवरिषि करत राम-गुन-गान। हरि-माया-बल बरनत पुनि पुनि परम सुजान ॥ ८२ ॥**

असें सांगून तो मोठाच खुबीदार देवर्षि नारद रामचंद्रांचे गुण गात गात आणि वारंवार ईशमायेचें प्राबल्य वर्णन करीत निघून गेला.

चौ०—तब खगपति बिरंचि पहिं गयऊ।
निज संदेह सुनावत भयऊ।
सुनि बिरंचि रामहिँ सिरु नावा।
समुझि प्रताप प्रेम उर छावा।

नंतर गरुड ब्रह्मदेवाकडे गेला आणि त्यानें त्यांना आपला संशय कथन केला. तो ऐकून ब्रह्मदेवांनीं रामास नमस्कार केला. रामप्रतापाचा मनांत विचार येऊन त्यांचें हृदय प्रेमांत रंगून गेलें.

मन महँ करइ बिचार बिधाता।
मायाबस कबि कोबिद ज्ञाता।
हरिमाया कर अमित प्रभावा।
बिपुल बार जेहि मोहि नचावा।
अग-जग-मय सब मम उपराजा।
नहिँ आचरज मोह खगराजा।

ब्रह्मदेव मनांत विचार करूं लागले कीं, कवि, पंडित, ज्ञानी हेदेखील मायेच्या तडाक्यांत सांपडले आहेत. श्रीहरीच्या मायेचा प्रभाव अपरंपार आहे. हें चराचर विश्व मीं घडविलें असलें तरी तिनें मला देखील अनेकवार नाचवून सोडलें. तेव्हां तिनें गरुडास बेहोष केलें ह्यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

तब बोले बिधि गिरा सुहाई।
जान महेस रामप्रभुताई।
बैनतेय संकर पहिँ जाहू।
तात अनत पूछहु जनि काहू।
तहँ होइहि तव संसयहानी।
चलेउ बिहंग सुनत बिधिबानी।

नंतर ब्रह्मदेव समयोचित भाषण करून म्हणाले— हे गरुडा! श्रीरामाचा प्रताप एकटे शंकरच जाणतात तेव्हां तूं त्यांचेकडे जा. पण हे तात! मात्र नमनाखेरीज विचारपूस करूं नकोस. तथेंच तुझ्या संशयाची निवृत्ति होईल. ती विधि—आज्ञा ऐकून गरुड निघाला.

**दो०—परमातुर बिहंगपति आयउ तब मो पास। जात रहेउँ कुबेरगृह रहिहु उमा कैलास ॥ ८३ ॥**

तो अत्यंत उतावीळ झालेला गरुड नंतर मजकडे आला. त्या वेळीं तूं कैलासावरच होतीस, पण मी मात्र कुबेरमंदिराला चाललों होतों.

चौ०—तेहि मम पद सादर सिरु नावा।
पुनि आपन संदेह सुनावा।
सुनि ता करि बिनीत मृदुबानी।
प्रेमसहित मैं कहेउँ भवानी।

गरुडानें माझ्या पायांवर आदरानें मस्तक ठेविलें आणि आपल्या संशयाचा पाढा वाचला. त्याचें तें नम्र आणि मृदु भाषण ऐकून, हे पार्वति! मीं त्यास फार प्रेमानें म्हणालों—

मिलेहु गरुड मारग महँ मोही।
कवन भाँति समुझावउँ तोही।
तबहिँ होइ सब संसय भंगा।
जब बहु काल करिय सतसंगा।

गरुडा! तुझी माझी येथें रस्त्यांतच गांठ पडली तेव्हां उभ्या उभ्या तुझें समाधान तरी मी कोणत्या प्रकारें

करावें बरें! जेव्हां बराच कालपर्यंत तूं सत्संग करशील तेव्हांच तुझे सर्व संशय मावळतील.

सुनिय तहाँ हरिकथा सुहाई।
नाना भाँति मुनिन्ह जो गाई।
जेहि महँ आदि मध्य अवसाना।
प्रभु प्रतिपाद्य राम भगवाना।
नित हरिकथा होति जहँ भाई।
पठवउँ तहाँ सुनहु तुम्ह जाई।
जाइहि सुनत सकल संदेहा।
रामचरन होइहि अतिनेहा।

मुनीश्वरांनीं अनेक प्रकारें गायलेली आणि आदि-मध्यावसानांत भगवान् प्रभु रामचंद्रांचेंच प्रतिपादन असलेली अशी ती शोभन हरिकथा तूं तेथेंच ऐकिली पाहिजे. जेथें बाबा रे, हरिकथा नित्य होत असते. अशा ठिकाणीं मी तुला पाठवितों. तेथें जाऊन ती तूं ऐक. तिचें श्रवण होतांच तुझें शंकाकाहूर मावळून रामचरणांचे ठायीं तुझें गाढ प्रेम जडेल.

**दो०–बिनु सतसंग न हरिकथा तेहि बिनु मोह न भाग। मोह गये बिनु रामपद होइन दृढ अनुराग॥ ८४॥**

सत्संगाखेरीज हरिकथा नाहीं, हरिकथेखेरीज मोह जात नाहीं व मोह गेल्याखेरीज रामपदीं अतुट भक्ति उपजत नाहीं.

चौ०–मिलहिँ न रघुपति बिनु अनुरागा।
किये जोग जप ज्ञान बिरागा।

भक्तिवांचून योग, जप, ज्ञान आणि वैराग्य इत्यादि करूनहि रामाची प्राप्ति घडत नाहीं.

उत्तर दिसि सुंदर गिरि नीला।
तहँ रह कागभुसुंडि सुसीला।
राम–भगति–पथ परमप्रबीना।
ज्ञानी गुनगृह बहुकालीना।

उत्तरदिशेला एक सुंदर नीलपर्वत आहे, तेथें महाशीलवान् काकभुशुंडी रहात असतो. तो ज्ञानी, गुणनिधान आणि फारफार जुनाट असून रामभक्ति-मार्गांत अत्यंत निष्णात आहे.

रामकथा सो कहइ निरंतर।
सादर सुनहिँ बिबिध बिहंगबर।
जाइ सुनहु तहँ हरिगुन भूरी।
होइहि मोहजनित दुख दूरी।

तो निरंतर रामकथाच सांगत असतो. हे पक्षि-श्रेष्ठा! ती तूं आदरपूर्वक ऐक. जा, आणि तेथें हरिगुण श्रवण कर म्हणजे संशयकल्लोळांतून मुक्त होशील.

मैँ जब तेहि सब कहा बुझाई।
चलेउ हरषि मम पद सिरु नाई।
ता तेँ उमा न मैँ समुझावा।
रघुपति कृपा मरम मैँ पावा।
होइहि कीन्ह कबहुँ अभिमाना।
सो खोवइ चह कृपानिधाना।
कछु तेहि तेँ पुनि मैँ नहिँ राखा।
समुझइ खग खग ही कै भाखा।
प्रभुमाया बलवंत भवानी।
जाहि न मोह कवन अस ज्ञानी।

मीं जेव्हां त्यांस सर्व समजावून सांगितलें तेव्हां तो माझ्या पायांवर डोकें ठेवून आनंदानें निघाला. हे पार्वति! रघुपतीच्या कृपेनें त्यांतलें सर्व इंगित मी हेरलें होतें म्हणूनच मी त्याची समजूत घालण्याच्या भरीस पडलों नाहीं. केव्हांतरी त्याला अहंकार उत्पन्न झाला असला पाहिजे आणि त्याचें उच्चाटण करण्याची दयाघनांची इच्छा असली पाहिजे. शिवाय पक्षी पक्ष्यांची भाषा चांगली समजतात ह्याहि कारणास्तव मीं त्यांस ठेवून घेतलें नाहीं. हे भवानि! प्रभुमाया बलवत्तर आहे. ज्यास मोह नाहीं असा ज्ञानी उभ्या जगांत देखील कोण आहे?

**दो०–ज्ञानी भगत सिरोमनि त्रिभुवन-पति कर जान। ताहि मोह माया नर पाँवर करहिँ गुमान॥ ८५॥**

ज्ञानी, भक्तांत अग्रगण्य, व त्रिभुवनपतीचें वाहन अशा गरुडासदेखील मायेनें भुरळ घातली. असें असूनदेखील हा बेटा पामर जीव अभिमान सोडीतच नाहीं.

**दो०–सिव बिरंचि कहँ मोहइ को हइ बपुरा आन। अस जिय जानि भजहिँ मुनि मायापति भगवान॥ ८६॥**

१ स्वभाषेच्या माध्यमाची थोरवी कवीनें कितीतरी खुबीनें येथें सांगितली आहे. Smith's Akbar वरून कवीच्या या खोचाचें कारण उत्कृष्ट रीतीनें समजतें. त्याचा तुलसीदासासंबंधानें उल्लेख पहा. तो आमच्या मानसहंसांत (उपसंहारांत) उद्धृत झालेला आहे.

ब्रह्मदेव-शंकर यांना देखील मायेनें मोहित केलें; मग इतर बापड्यांची कथा ती काय ! असें मनांत समजून मुनिजन मायापति जो भगवान् त्याचें भजनच करीत राहतात.

चौ०-गयउ गरुड जहँ बसइ भुसुंडी।
मति अकुंठ हरिभगति अखंडी।
देखि सयल प्रसन्न मन भयऊ।
माया मोह सोच सब गयऊ।

गरुड जेथें अकुंठबुद्धि आणि अखंड हरिभक्त भुशुंडि रहात होता तेथें पोंचला. नीलपर्वताच्या दर्शनानेंच माया, मोह आणि शोक सर्व नष्ट होऊन त्याचें मनहि प्रसन्न झालें.

करि तडाग मज्जन जलपाना।
बट तर गयउ हृदय हरषाना।
बृद्ध बृद्ध बिहंग तहँ आये।
सुनइ राम के चरित सुहाये।

तेथील सरोवराचें स्नान आणि पान करून तो प्रसन्नांतःकरणानें वटवृक्षाखालीं गेला. तेथें पावन रामचरित्राच्या श्रवणासाठीं जुने जख्ख पक्षी आलेले होते.

कथाअरंभ करइ सोइ चाहा।
तेही समय गयउ खगनाहा।
आवत देखि सकल खगराजा।
हरषेउ बायस सहित समाजा।

भुशुंडीच्या कथेला प्रारंभ करण्याच्या वेळेतच गरुडहि तेथें जाऊन पोहोंचला. खगराज आलेला पाहून सर्व पक्ष्यांसहवर्तमान भुशुंडीस आनंद झाला.

अतिआदर खगपति कर कीन्हा।
स्वागत पूछि सुआसन दीन्हा।
करि पूजा समेत अनुरागा।
मधुर बचन तब बोलेउ कागा।

त्यानें खगपतीचा फार सत्कार केला आणि कुशल प्रश्न विचारून बसण्यास आसन दिलें. नंतर प्रेमानें त्याची पूजा करून भुशुंडी प्रेमानें म्हणाला—

**दो०-नाथ कृतारथ भयउँ मैं तव दरसन खगराज। आयसु देहु सो करउँ अब प्रभु आयहु केहि काज ॥ ८७ ॥**

हे प्रभो खगपते ! आपल्या दर्शनानें मी कृतार्थ झालों. मला आज्ञा द्याल त्याप्रमाणें मी आतां करीन. हे स्वामिन् ! किन्निमित्त आपलें हें आगमन ?

**दो०-सदा कृतारथ रूप तुम्ह कह मृदुबचन खगेस। जेहि कै अस्तुति सादर निज मुख कीन्हि महेस ॥ ८८ ॥**

तेव्हां गरुड मृदु वाणीनें म्हणाला—ज्यांची स्तुति महेश्वरांनीं स्वमुखानें सन्मानपूर्वक केली ते तुम्ही सर्वकाल कृतकृत्यच आहांत.

चौ०-सुनहु तात जेहि कारन आयउँ।
सो सब भयउ दरस तव पायउँ।
देखि परम पावन तव आस्रम।
गयउ मोह संसय नाना भ्रम।
अब श्री-राम-कथा अतिपावनि।
सदा सुखद दुख-पुंज-नसावनि।
सादर तात सुनावहु मोही।
बार बार बिनवउँ प्रभु तोही।

बा भुशुंडे ! ऐक. मी ज्या हेतूनें आलों तो सर्व तुझ्या दर्शनानेंच पूर्ण झाला. तुझा परमपावन आश्रम हेरतांच माझे मोह, संशय आणि भ्रम सर्व पार पळाले. आतां हे तात, अत्यंत पावन, सदासुखदायक व दुःखपुंजनाशक अशी श्रीरामकथा मला प्रेमानें ऐकीव. प्रभो ! माझी तुला वारंवार हीच प्रार्थना आहे.

सुनत गरुड कै गिरा बिनीता।
सरल सुप्रेम सुखद सुपुनीता।
भयउ तासु मन परमउछाहा।
लाग कहइ रघु-पति-गुन-गाहा।
प्रथमहिं अति अनुराग भवानी।
राम-चरित-सर कहेसि बखानी।
पुनि नारद कर मोह अपारा।
कहेसि बहुरि रावनअवतारा।
प्रभु-अवतार-कथा पुनि गाई।
तब सिसुचरित कहेसि मन लाई।

गरुडाची ती नम्र, सरल, सप्रेम, सुखद आणि अत्यंत पवित्र अशी वाणी ऐकून भुशुंडीच्या मनास फार उल्हास वाटला, आणि तो रघुपतीची गुणगाथा गाऊं लागला. (शंकर म्हणतात) हे पार्वति ! प्रथमच त्यानें अत्यंत प्रेमानें रामचरितमानस वर्णन केलें. नंतर नारदाच्या अपार मोहाचें वर्णन करून रावणजन्माचा इतिहास सांगितला. नंतर प्रभुजन्म-

महोत्सवकथा सांगून त्यांच्या बाललीला मनःपूर्वक वर्णन केल्या.

**दो०—बालचरित कहि बिबिधबिधि मन महँ परमउछाह । रिषिआगमन कहेसि पुनि श्रीरघुबीर बिबाह ॥ ८९ ॥**

त्यानें परम उल्हासित अंतःकरणानें प्रभूंचें बालचरित नानाप्रकारें कथन केल्यानंतर विश्वामित्र ऋषींचें अयोध्येंत आगमन आणि सीतास्वयंवर हे भाग कथन केले.

चौ०—बहुरि राम—अभिषेक—प्रसंगा ।
पुनि नृपबचन राज-रस—भंगा ।
पुरबासिन्ह कर बिरह बिषादा ।
कहेसि राम—लछिमन—संबादा ।
बिपिनगवन केवटअनुरागा ।
सुरसरि उतरि निवास प्रयागा ।
बालमीकि-प्रभु-मिलन बखाना ।
चित्रकूट जिमि बस भगवाना ।

तसेंच रामराज्याभिषेक, दशरथवचन, रामराज्यविरोधी मंथराकैकेयीचें षड्यंत्र, पुरजनविरहदुःख, रामलक्ष्मणसंवाद, रामवनवासगमन, गुहप्रेम, गंगोत्तरण, प्रयागवास, वाल्मीकिदर्शन, चित्रकूटनिवास इत्यादि सर्व प्रसंगांचें त्यानें वर्णन केलें.

सचिवागवँन नगर नृपमरना ।
भरतागवँन प्रेम बहु बरना ।
करि नृपक्रिया संग पुरबासी ।
भरत गये जहँ प्रभु सुखरासी ।
पुनि रघुपति बहु बिधि समुझाये ।
लेइ पादुका अवधपुर आये ।
भरतरहानि सुर-पति—सुत—करनी ।
प्रभु अरु अत्रि भेंट पुनि बरनी ।

नंतर सचिवागमन, दशरथदेहावसान, भरतागमन, भरत प्रेम, दशरथ-उत्तराक्रिया व कल्याणधाम श्रीरामाची भरत—भेट यांचें त्यानें वर्णन केलें. नंतर रामचंद्रांनीं अनेकप्रकारें केलेलें भरताचें सांत्वन, भरताचें श्रीरामपादुका ग्रहण करून अयोध्येस प्रत्यागमन, भरताची राहणी, जयंताची करणी, प्रभूंची अत्रिऋषींशीं मिळणी, ह्या कथा त्यानें अनुक्रमानें सांगितल्या.

**दो०—कहि बिराध बध जेहि बिधि देह तजी सरभंग । बरनि सुतीछन प्रीति पुनि प्रभु अगस्ति सतसंग ॥ ९० ॥**

तसेंच विराधवध, शरभंगाचा प्रायोपवेश, सुतीक्ष्ण प्रेम, अगस्तिसत्समागम, ह्या कथा त्यानें यथाक्रम सांगितल्या.

चौ०—कहि दंडक बन पावनताई ।
गीधमइत्री पुनि तेहि गाई ।
पुनि प्रभु पंचबटी कृत बासा ।
भंजी सकल मुनिन्ह कै त्रासा ।
पुनि लछिमन उपदेस अनूपा ।
सूपनखा जिमि कीन्ह कुरूपा ।
खर-दूषन-बध बहुरि बखाना ।
जिमि सब मरम दसानन जाना ।
दस-कंधर-मारीच-बतकही ।
जेहि बिधि भई सो सब तेहि कही ।
पुनि मायासीता कर हरना ।
श्री-रघु-बीर-बिरह कछु बरना ।

नंतर दंडकवनपापविमोचन, जटायुमैत्री, पंचवटीनिवास, सकलमुनि-दुःखविमोचन, अपूर्व लक्ष्मणोपदेश, शूर्पणखाविरूपीकरण, खरदूषणवध, शूर्पणखेचीं रावणाजवळ गाऱ्हाणीं व रावणमारीचसंवाद जसा घडला तसा वर्णन करून त्यानें कपटानें केलेलें सीताहरण सांगून श्रीरामविरहाचें किंचित् कथन केलें.

पुनि प्रभु गीधक्रिया जिमि कीन्ही ।
बधि कबंध सबरिहि गति दीन्ही ।
बहुरि बिरह बरनत रघुबीरा ।
जेहि बिधि गये सरोबरतीरा ।

नंतर प्रभूंनीं केलेला जटायूचा प्रेतसंस्कार, कबंधवध, शबऱ्युद्धार रामविरह, पंपासरोवरगमन, इत्यादि प्रसंग त्यानें वर्णन केले.

**दो०—प्रभु-नारद-संबाद कहि मारुति-मिलन-प्रसंग । पुनि सुग्रीवँमिताई बालिप्रान कर भंग ॥ ९१ ॥**

**कपिहि तिलक करि प्रभुकृत सैल प्रबरपन बास । बरनइ बरषा सरद कर रामरोष कपित्रास ॥ ९२ ॥**

तसेंच प्रभुनारदसंवाद, मारुतिभेट, सुग्रीवसख्य, वालीवध, सुग्रीवराज्यदान, प्रभूंचा प्रहर्षणगिरिनिवास वर्षा व शरदृतुवर्णन, रामावेश आणि सुग्रीवभय यांचेंहि त्यानें वर्णन केलें.

चौ०–जेहि बिधि कपिपति कीस पठाये।
सीताखोजन सकल सिधाये।
बिबरप्रबेस कीन्ह जेहि भाँती।
कपिन्ह बहोरि मिला संपाती।
सुनि सब कथा समीरकुमारा।
नाँघत भयउ पयोधि अपारा।
लंका कपि प्रबेस जिमि कीन्हा।
पुनि सीतहि धीरजु जिमि दीन्हा।
बन उजारि रावनहिँ प्रबोधी।
पुर दहि नाँघेउ बहुरि पयोधी।
आये कपि सब जहँ रघुराई।
बैदेही कै कुसल सुनाई।
सेनसमेत जथा रघुबीरा।
उतरे जाइ बारि–निधि–तीरा।
मिला बिभीषन जेहि बिधि आई।
सागरनिग्रह कथा सुनाई।

नंतर सुग्रीवकृत वानरप्रेषण, सीताशुद्ध्यर्थ सर्व वानरांचें गमन, त्यांचा विवरप्रदेश, संपातिदर्शन, तदुत्तरीय मारुतीचें अपार समुद्रोल्लंघन, त्याचा लंकाप्रवेश, सीतासांत्वन, वनविध्वंस, रावणोपदेश, लंकादहन, पुनः समुद्रोल्लंघन रघुपतींकडे सर्व वानरांचें पुनरागमन, जानकीकुशलकथन, रामाचें ससैन्य प्रस्थान आणि समुद्रतीरावर आगमन, बिभीषणसख्य आणि सागरनिग्रह हीं सर्व प्रकरणें त्यानें कथन केलीं.

**दो०–सेतु बाँधि कपिसेन जिमि उतरी सागरपार। गयउ बसीठी बीरबर जेहि बिधि बालिकुमार॥ ९३॥**
**निसि-चर कीस लराई बरनेसि बिबिध प्रकार। कुंभकरन घननाद कर बल-पौरुष संहार॥ ९४॥**

तसेंच सेतुबंधन, ससैन्य सागरोल्लंघन, अंगदशिष्टाई, कपिराक्षससंग्राम आणि कुंभकर्ण व मेघनाद यांचा पराक्रम आणि वध हीं कथानकें त्यानें सविस्तर सांगितलीं.

चौ०–निसि-चर-निकर-मरन बिधि नाना।
रघु-पति-रावन-समरबखाना।
रावणबध मंदोदरि सोका।
राज बिभीषन देव असोका।
सीता-रघु-पति-मिलन बहोरी।
सुरन्ह कीन्हि अस्तुति कर जोरी।
पुनि पुष्पक चढि कपिन्ह समेता।
अवध चले प्रभु कृपानिकेता।
जेहि बिधि राम नगर निज आये।
बायस बिसद चरित सब गाये।
कहेसि बहोरि रामअभिषेका।
पुर बरनन नृपनीति अनेका।

नंतर अनेक प्रकारांनीं झालेला राक्षससंहार व राम–रावण–युद्ध त्यानें वर्णिलीं. त्यानंतर रावणवध, मंदोदरीविलाप, बिभीषणराज्याभिषेक, देवभयनाशन, सीतारघुपतिमीलन, देवस्तुति आणि पुष्पकारूढ कृपानिधान श्रीरामाचें कपिसमवेत अयोध्यागमन ह्या सर्व कथा त्यानें सविस्तर वर्णिल्या. नंतर त्यानें रामराज्याभिषेक वर्णन करून अयोध्येचें वर्णन केलें व अनेक प्रकारची राजनीति सांगितली.

कथा समस्त भुसुंडि बखानी।
जो मैं तुम्ह सन कही भवानी।
सुनि सब रामकथा खगनाहा।
कहत बचन मन परमउछाहा।

( शंकर म्हणतात, ) हे पार्वति ! मीं ज्या कथा तुला सांगितल्या त्याच भुशुंडीनें गरुडाला सर्व निवेदन केल्या.त्या सर्व कथा ऐकून गरुड परमप्रसन्नांतःकरणानें म्हणाला—

**सो०–गयउ मोर संदेह सुनेउँ सकल रघुपति चरित। भयउ राम-पद-नेह तव प्रसाद बायसतिलक॥ २॥**

हे वायसश्रेष्ठा ! तुझ्या कृपेनें माझा संदेह दूर झाला, सर्व साद्यंत रघुपतिचरित्र ऐकण्यास मिळालें आणि रामचरणीं प्रेम उत्पन्न झालें.

**सो०–मोहि भयउ अति मोह प्रभुबंधन रन महँ निरखी। चिदानंद संदोह राम बिकल कारन कवन॥ ३॥**

रणांत ( सर्पांच्या खचानें ) प्रभूंचें बंधन झालेलें पाहून मी फार साशंक झालों होतों. कारण मला वाटे, चिदानंदसंदोह असे रामचंद्र विकल होण्याचें प्रयोजनच काय ?

चौ०–देखि चरित अति नर अनुसारी।
भयउ हृदय मम संसय भारी।
सोइ भ्रम अब हित करि मैं जाना।
कीन्ह अनुग्रह कृपानिधाना।

त्यांचें तें अगदीं हुबेहुब मनुष्याप्रमाणें वर्तन पाहून माझ्या मनांत संशयाचें काहूर उठलें होतें. परंतु तो संशय आतां माझ्या हितावर पडला. कृपासागरांनीं तो मजवर अनुग्रहच केला म्हणावयाचा.

जो अतिआतप ब्याकुल होई ।
तरुछाया सुख जानइ सोई ।
जौं नहिं होत मोह अति मोही ।
मिलतेउँ तात कवन बिधि तोही ।
सुनतेउँ किमि हरिकथा सुहाई ।
अतिबिचित्र बहु बिधि तुम्ह गाई ।

कडक सूर्यतापानें व्याकुल झालेल्यालाच वृक्षछायेचें सुख खरें खरें समजतें. जर मला हा प्रदीर्घ मोहच झाला नसता तर, हे तात! तुझें दर्शन तरी कसें घडलें असतें बरें? आणि त्वां परोपरींनीं वर्णन केलेली परमकुतूहलजनक अशी सुंदर रामकथाहि तरी कशी ऐकण्यास सांपडली असती?

निगमागम पुरानमत एहा ।
कहहिं सिद्ध मुनि नहिं संदेहा ।
संत बिसुद्ध मिलहिं परि तेही ।
चितवहिं राम कृपा करि जेही ।
रामकृपा तव दरसन भयऊ ।
तव प्रसाद सब संसय गयऊ ।

वेद, श्रुति आणि पुराणें यांचेंहि मत असेंच आणि सिद्ध आणि मुनीदेखील हेंच निःसंशयपणें सांगतात कीं ज्याचेकडे रामचंद्र कृपादृष्टीनें अवलोकन करतात त्यांनाच पवित्र संतांचें दर्शन होतें. रामकृपेनेंच मला तुझें दर्शन घडलें आणि तुझ्या प्रसादानें सर्व संशय मावळले.

**दो०—सुनि बिहंगपति बानी सहित बिनय अनुराग । पुलक गात लोचन सजल मन हरषेउ अति काग ॥ ९५ ॥**

गरुडाची ती नम्र आणि प्रेमळ वाणी श्रवण करून काकभुशुंडी पुलकितगात्र आणि सजलनयन होऊन अत्यंत प्रसन्नचित्त झाला.

**दो०—स्रोता सुमति सुसील सुचि कथा रसिक हरिदास । पाइ उमा अतिगोप्य अपि सज्जन करहिं प्रकास ॥ ९६ ॥**

(शंकर म्हणतात)—पार्वति! बुद्धिमान्, सुशील, पवित्र, कथेचा रसिक, आणि हरिभक्त असा श्रोता मिळाल्यास संत आपलें परम रहस्यदेखील प्रकट करतात.

चौ०—बोलेउ कागभुसुंडि बहोरी ।
नभगनाथ पर प्रीति न थोरी ।
सब बिधि नाथ पूज्य तुम्ह मेरे ।
कृपापात्र रघुनायक केरे ।
तुम्हहिं न संसय मोह न माया ।
मो पर नाथ कीन्हि तुम्ह दाया ।

नंतर काकभुशुंडी गरुडावर अत्यंत प्रेम करून म्हणाला—हे खगराज! तूं मला सर्वतोपरी पूज्य असून, रघुपतीचा कृपापात्र आहेस. तुला संशय नाहीं, मोह नाहीं अगर मायाहि नाहीं. हे नाथ! मजवरही तूं केवळ कृपाच केलीस.

पठइ मोहमिस खगपति तोही ।
रघुपति दीन्हि बडाई मोही ।
तुम्ह निज मोह कहा खगसाईं ।
सो नहि कछु आचरज गोसाईं ।
नारद भव बिरंचि सनकादी ।
जे मुनिनायक आतमवादी ।
मोहन अंध कीन्ह केहि केही ।
को जग काम नचाव न जेही ।
तृष्णा केहि न कीन्ह बौरहा ।
केहि कर हृदय क्रोध नहिं दहा ।

हे गरुडा! मोहाच्या मिषानें तुला पाठवून श्रीरामानें मला थोरवी दिली. हे खगेश्वरा! तूं मला आपला मोह सांगितलास त्यांत, हे स्वामिन्! कांहींच आश्चर्य नाहीं. नारद, शिव, ब्रह्मदेव, सनकादिक मुनिश्रेष्ठ, इत्यादिदेखील आत्मानुभवी तर खरेच, परंतु त्यांच्यांत देखील असा कोण आहे कीं, मोहानें जो धृतराष्ट्र बनला नाहीं? जगांत असा कोण आहे कीं ज्याला मदनानें आपलें माकड करून सोडलें नाहीं? तृष्णेनें कोणाला उल्लू केलें नाहीं आणि क्रोधानें कोणाचें मन भाजून काढलें नाहीं?

**दो०—ज्ञानी तापस सूर कबि कोबिद गुन-आगार । केहि कै लोभ बिडंबना कीन्हि न एहि संसार ॥ ९७ ॥**

ह्या जगांत ज्ञानी, तपस्वी, शूर, कवि, पंडित आणि सद्गुणसंपन्न ह्यांपैकीं लोभानें कोणाच्या विटंबना केल्या नाहींत?

दो०–श्रीमद बक्र न कीन्ह केहि प्रभुता बधिर न काहि। मृग–लोचनि–लोचन-सर को अस लाग न जाहि ॥ ९८ ॥

श्रीमंतीचा पित्ता मारून दुर्योधन न बनणारे, प्रभुत्वाच्या पाचरीनें उच्चैःश्रवा न बनणारे आणि कामाक्षीच्या कटील्या नजरानजरीनें देखील शुकच राहणारे असे लाल अपवादच कीं !

चौ०–गुन कृत सन्यपात नहिँ केही।
कोउ न मान मद तजेउ निबेही।
जोबनज्वर केहि नहिँ बलकावा।
ममता केहि कर जसु न नसावा।
मच्छर काहि कलंक न लावा।
काहि न सोकसमीर डोलावा।
चिंतासाँपिन को नहिँ खाया।
को जग जाहि न ब्यापी माया।

अविद्यामूलक सन्निपातानें कोणास पछाडलें नाहीं? मान आणि मद यांची साथ लाथाडून निकोप निभावलेला असा कोण आहे ? यौवनज्वरानें कोणास झपटलें नाहीं ? ममत्वबुद्धीनें कोणाचें यश डागळलें नाहीं ? मत्सरानें कोणास कलंक लाविला नाहीं ? शोकवायूनें कोणास कांपरें भरलें नाहीं ? चिंतारूप अजगरानें कोणास गट्ट केलें नाहीं ? जगांत असा कोण आहे कीं, ज्याला मायेनें काबूंत आणलेलें नाहीं ?

कीट मनोरथ दारु सरीरा।
जेहि न लाग घुन को अस धीरा।
सुत बित लोक ईषना तीनी।
केहि कै मति इन्ह कृत न मलीनी।
यह सब माया कर परिवारा।
प्रबल अमित को बरनइ पारा।
सिव चतुरानन जाहि डेराहीँ।
अपर जीव केहि लेखे माहीँ।

वासनारूप वाळवीनें ज्याच्या शरीररूपी काष्ठास पोखरलें नाहीं असा निधड्या छातीचा कोण आहे ? पुत्र, वित्त आणि कलत्र ह्या तीन ईषणांनीं कोणाची बुद्धि बद्दू करून सोडली नाहीं ? ही सर्व मायेची प्रभावळ अत्यंत प्रबळ आहे. तिचें वर्णन पुरतेपणीं कोण करूं शकणार ? शिव, ब्रह्मदेव यांची देखील त्या मायेला पाहून बेबडी वळते मग इतर जीवांची कथाच काय ?

दो०–ब्यापि रहेउ संसार महँ मायाकटक प्रचंड। सेनापति कामादि भट दंभ कपट पाखंड ॥ ९९ ॥

मायेच्याच तुफान सैन्यानें ही सृष्टि चीत झालेली आहे. कामादिक हे तिचे सेनापति असून दंभ, कपट व पाखंड हे तिचे सरदार होत.

दो०–सो दासी रघुबीर कै समुझे मिथ्या सोपि। छूट न राम कृपा बिनु नाथ कहउँ पद रोपि ॥ १०० ॥

ती माया रघुपतींची दासी आहे. ती मिथ्या आहे असें समजलें तरीदेखील हे नाथ ! मीं प्रतिज्ञेनें सांगतों कीं रामाच्या कृपेशिवाय तिचा विळखा सुटत नाहीं.

चौ०–जो माया सब जगहि नचावा।
जासु चरित लखि काहु न पावा।
सोइ प्रभु भ्रूबिलास खगराजा।
नाच नटी इव सहित समाजा।

जिनें सर्व जगास नाचवून सोडलें आहे आणि जिचे खेळ कोणासहि समजत नाहींत, ती माया, हे गरुडा ! या प्रभूच्या केवळ भ्रूसंकेतानें आपल्या परिवारासह नर्तकीप्रमाणें नृत्य करीत असते.

सोइ सच्चिदानंदघन रामा।
अज बिज्ञानरूप बलधामा।
ब्यापक ब्याप्य अखंड अनंता।
अखिल अमोघसक्ति भगवंता।
अगुन अदभ्र गिरागोतीता।
सबदरसी अनवद्य अजीता।
निर्मल निराकार निर्मोहा।
नित्य निरंजन सुखसंदोहा।
प्रकृतिपार प्रभु सब उर बासी।
ब्रह्म निरीह बिरज अबिनासी।

तोच तो सच्चिदानंदघन, अज, विज्ञानरूप, बलनिधान, व्यापक, व्याप्य, अखंड, अनंत, अखिल, अमोघशक्ति, भगवंत, निर्गुण, संपूर्ण, वाण्यादि इंद्रियातीत, सर्वदर्शी, अनिंद्य, अजिंक्य, निर्मल, निराकार, निर्मोह, नित्य, निरंजन, सुखसंदोह, प्रकृतिपर प्रभु, सर्वांतर्यामी, निरीह, अज्ञानरहित, अविनाशी, परब्रह्म, हा श्रीरामचंद्र होय.

इहाँ मोह कर कारन नाहीँ।
रबिसनमुख तम कबहुँ कि जाही।

ह्या बाबतींत संशयाचें कारणच नाहीं. सूर्यापाशीं अंधकार कधीं तरी जाऊं शकेल काय?

**दो०—भगत हेतु भगवान प्रभु राम धरेउ तनु भूप। किये चरित पावन परम प्राकृत नर अनुरूप ॥ १०१ ॥**

भक्तांच्या हेतूस्तव भगवान् प्रभु रामचंद्रानीं भूपदेह धारण केला, आणि प्राकृत नराप्रमाणें परमपवित्र लीला केल्या.

**दो०—जथा अनेक बेष धरि नृत्य करइ नट कोइ। सोइ भाव देखावइ आपुन होइ न सोत्र ॥ १०२ ॥**

जसा एखादा नट अनेक भूमिका धारण करून नटतो आणि त्या त्या भूमिकांचा आविर्भाव दाखवून आपण मात्र त्यांपासून अलिप्त असतो,

चौ०—असिरघु-पति-लीला उरगारी।
दनुजबिमोहनि जन-सुख-कारी।
जे मतिमलिन बिषयबस कामी।
प्रभु पर मोह धरहि इमि स्वामी।

तद्वतच, हे गरुडा! रघुपतींची (नागपाशबंध) ही एक राक्षसविमोहिनी आणि जनसुखकारिणी लीला आहे. जे विषयरत आणि कामुक असल्यामुळें मलिनचित्त असतात तेच, हे स्वामिन्! प्रभुवर अशा प्रकारचा आपल्या अज्ञानामुळें आरोप करितात.

नयनदोष जा कहँ जब होई।
पीतबरन ससि कहँ कह सोई।
जब जेहि दिसिभ्रम होइ खगेसा।
सो कह पच्छिम उयउ दिनेसा।
नौकारूढ चलत जग देखा।
अचल मोहबस आपुहि लेखा।
बालक भ्रमहिँ न भ्रमहिँ गृहादी।
कहहिँ परसपर मिथ्याबादी।

जेव्हां एखाद्याला कावीळ रोग होतो तेव्हां तो चंद्रावर पिवळेपणाचा आरोप करतो. हे गरुडा! जेव्हां एखाद्यास दिशाभूल होते तेव्हां तो पश्चिमेस सूर्य उगवला असें म्हणतो. नौकेंतून प्रवास करणारा पृथ्वी फिरते आणि आपण स्थिर आहोंत असेंच स्वतःच्या अज्ञानामुळें लेखतो. मुलें गरगर फिरतात, घरें कांहीं फिरत नसतात, तरीहि मुलें परस्परांस लबाडांत काढीत असतातच.

हरि बिषैक अस मोह बिहंगा।
सपनेहुँ नाहिँ अ-ज्ञान-प्रसंगा।
मायाबस मतिमंद अभागी।
हृदय जवनिका बहु बिधि लागी।
ते सठ हठबस संसय करहीँ।
निज अज्ञान राम पर धरहीँ।

हे गरुडा! स्वप्नांतदेखील ज्यास अज्ञानाचा संभव नाहीं त्या परमेश्वरावर मोहाचा आरोप म्हणजे अज्ञांतलेंच होय. मायावश, मतिमंद, अभागी, ज्यांच्या हृदयावर मायेचे अनेक पडदे पडले आहेत असे विक्षिप्तच मुद्दाम हेक्यानें संशयांत पडून आपल्या अज्ञानाचें रामचंद्रावर कुलंगडें फेकतात.

**दो०—काम-क्रोध-मद-लोभ-रत गृहासक्त दुखरूप। ते किमि जानहिँ रघुपतिहि मूढ परे तमकूप ॥ १०३ ॥**

काम, क्रोध, मद, लोभ, इत्यादिकांत आणि दुःखरूप गृहपुत्रादिकांत गुरफटलेले, आणि भवकूपांत मुरलेले ते वेडपे रघुवीरास कसें जाणणार?

**दो०—निर्गुनरूप सुलभ अति सगुन न जानहिँ कोइ। सुगम अगम नाना चरित सुनि मुनिमन भ्रम होइ ॥ १०४ ॥**

परमेश्वराचें निर्गुणरूप अत्यंत सुलभ असून त्याचें सगुणरूपच मात्र कोणीहि जाणूं शकत नाहीं. म्हणूनच त्याचीं अनेक सगुण चरित्रें अशीं अगम्य असतात कीं तीं ऐकतांच मुनींचींहि मनें चाकाटल्याखेरीज रहात नाहींत.

चौ०—सुनु खगेस रघु-पति-प्रभुताई।
कहउँ जथामति कथा सुहाई।
जेहि बिधि मोह भयउ प्रभु मोही।
सो सब कथा सुनावउँ तोही।

हे गरुडा! रघुपतींच्या प्रभुत्वासंबंधानें मी तुला यथामति सुंदर कथा सांगतों ती ऐक. हे स्वामिन्! ज्या रीतीनें मलाहि मोह उत्पन्न झाला होता तो सर्व प्रकार मी तुला ऐकवितों.

राम-कृपा-भाजन तुम्ह ताता।
हरि-गुन-प्रीति मोहि सुखदाता।

ता तें नहिँ कछु तुम्हहिँ दुरावउँ ।
परम रहस्य मनोहर गावउँ ।

हे तात ! तूं रामकृपापात्र आहेस. तुझी हरिगुण-प्रीति पाहून मी संतुष्ट झालों म्हणून तुजजवळून कांहीं एक चोरून न ठेवतां मी, एक अत्यंत मनोहर आणि गुप्त चरित्र सांगतों—

सुनहु राम कर सहज सुभाऊ ।
जन अभिमान न राखहिँ काऊ ।
संसृतमूल सूलप्रद नाना ।
सकल-सोक-दायक अभिमाना ।

ऐक. रामाचा हा सहजस्वभाव आहे कीं, ते आपल्या दासाचा अहंकार मुळींच टिकूं देत नाहींत. हा अहंकारच संसारमूलक, दुःखप्रद आणि सर्व शोकांचें कारण होय.

ता तें करहिँ कृपानिधि दूरी ।
सेवक पर ममता अतिभूरी ।
जिमि सिसुतन ब्रन होइ गुसाईँ ।
मातु चिराव कठिन की नाईँ ।

म्हणूनच कृपानिधि त्याचें निर्मूलन करतात. कारण, सेवकांवर त्यांची ममता अत्यंत थोर असते. हे स्वामिन् ! ज्याप्रमाणें मुलाच्या शरीरास व्रण झाले असतां त्याची माता अगदीं निर्दयाप्रमाणें तें चिरून काढते—

**दो०—जदपि प्रथम दुख पावइ रोवइ बाल अधीर । ब्याधि-नास-हित जननी गनत न सो सिसुपीर ॥ १०५ ॥**

जरी प्रथमतः मुलाला दुःख होतें आणि तें अधीर होऊन रडूं लागतें, तरी त्या मुलाची व्याधि नष्ट व्हावी म्हणून माता त्या मुलाला होत असलेल्या यातनांकडे दुर्लक्ष करिते—

**दो०-तिमि रघुपति निजदास कर हरहिँ मान हित लागि । तुलसिदास ऐसे प्रभुहिँ कस न भजसि भ्रम त्यागि ॥ १०६ ॥**

त्याचप्रमाणें रघुपति आपल्या दासाचा अभिमान केवळ त्याच्याच हितासाठीं झाडून टाकतात. अरे तुलसीदासा, भ्रमाचा त्याग करून अशा प्रभूंचें भजन तूं कां करीत नाहींस ?

चौ०—रामकृपा आपनि जडताई ।
कहउँ खगेस सुनहु मन लाई ।

हे गरुडा, लक्ष्यपूर्वक ऐक. रामाचें दयालुत्व आणि मी आपलें मौर्ख्य तुला निवेदन करितों.

जब जब राम मनुजतनु धरहीँ ।
भक्त हेतु लीला बहु करहीँ ।
तब तब अवधपुरी मैँ जाऊँ ।
बालचरित बिलोकि हरषाऊँ ।
जनममहोत्सव देखउँ जाई ।
बरष पाँच तहँ रहउँ लोभाई ।

जेव्हां जेव्हां श्रीराम मनुष्यावतार घेतात आणि भक्तांच्या अभिरुचीस्तव अनेक लीला करितात, तेव्हां तेव्हां मी अयोध्येस जातों आणि त्यांचा बाललीला पाहून आनंदानें असतों. मी त्यांचा जन्ममहोत्सव पाहण्यास गेलों म्हणजे तेथेंच लुब्ध होऊन पांच वर्षें-पर्यंत रहात असतों.

इष्टदेव मम बालक रामा ।
सोभा बपुष कोटि-सत-कामा ।
निज—प्रभु—बदन निहारि निहारी ।
लोचन सुफल करउँ उरगारी ।
लघु बायसबपु धरि हरि संगा ।
देखउँ बालचरित बहुरंगा ।

श्रीरामाचें बालरूप माझें उपास्यदैवत आहे. शत-कोटिमदनासारखी ज्याची अंगकांति त्या माझ्या प्रभूचें मुख वारंवार निरखून हे गरुडा ! मी आपल्या नेत्रांचें सार्थक करीत असतों. लहानशा वायसाचें रूप घेऊन श्रीहरींच्या अगदीं जवळपास राहून त्यांच्या नानाप्रकारच्या बाललीला पाहणें हा माझा क्रम.

**दो०—लरिकाईँ जहँ जहँ फिरहिँ तहँ तहँ संग उडाउँ । जूठनि परइ अजिर महँ सोइ उठाइ करि खाउँ ॥ १०७ ॥**

बाळपणीं श्रीरामांनीं जिकडे जिकडे फिरावें तिकडे तिकडे मींहि उड्या मारीत फिरावें आणि अंगणांत पडलेलें त्यांचेंच उच्छिष्ट वेंचून खात असावें हाच माझा शौक.

**दो०—एक बार अतिसय सब चरित किये रघुबीर । सुमिरत प्रभुलीला सोइ पुलकित भयउ सरीर ॥ १०८ ॥**

एके प्रसंगीं रघुवीरांनीं सर्वांत मोठा चमत्कार केला.

( तुलसीदास म्हणतात—) प्रभूंच्या त्या लीलेचें स्मरण होतांच भुशुंडीचें शरीर पुलकारूढ झालें.

चौ०—कहइ भुसुंडि सुनहु खगनायक ।
रामचरित सेवक-सुख-दायक ।

भुशुंडी ह्मणाला—हे गरुडा, श्रवण कर. श्रीरामचंद्रांचीं चरित्रें सेवकांना सुख देणारीं अशींच आहेत.

नृपमंदिर सुंदर सब भाँती ।
खचित कनक मनि नाना जाती ।
बरनि न जाइ रुचिर अँगनाई ।
जहँ खेलहिँ नित चारिउ भाई ।
बालबिनोद करत रघुराई ।
बिचरत अजिर जननि-सुख-दाई ।

राजमंदिर सर्वप्रकारें सुंदर होतें. त्यांत सुवर्णामध्यें अनेक जातींचीं रत्नें जडविलीं होतीं. ज्या अंगणांत चौघेहि बंधु नित्य खेळत असत, तेथली शोभा तर अगदीं अवर्णनीय होती. रघुराय बाळविनोद करीत आणि आंगणांत खेळत, तेव्हां तर मातांना आनंदाची दंगल माजावयाची.

मरकतमृदुल कलेवर स्यामा ।
अंग अंग प्रति छबि बहु कामा ।
नव-राजीव-अरुन मृदु रचना ।
पदज रुचिर नख ससि-दुति-हरना ।
ललित अंक कुलिसादिक चारी ।
नुपुर चारु मधुर-रव-कारी ।
चारु पुरट-मनि-रचित बनाई ।
कटि किंकिनि खल मुखर सुहाई ।

त्यांचें नीलमण्याप्रमाणें मृदुल आणि श्यामल शरीर असून प्रत्येक अवयवांत अनेक मदनांचें लावण्य रेखलेलें होतें. त्यांचे चरण नूतनकमलाप्रमाणें आरक्त आणि मृदु असून त्यांचीं नखें अशीं सुंदर होतीं कीं चंद्राच्याहि कांतीस तीं बाजूस सारीत. त्यांच्या पदतलांवर वज्र, अंकुश, कमल आणि ध्वज हीं चार चिन्हें असून त्यांच्या पायांत मधुर आवाजदार सुंदर पैंजण होते. कमरेला सोन्याच्या रत्नजडित आणि मंजुळ शब्द करणाऱ्या घागऱ्या लावलेला करदोडा होता.

**दो०—रेखा त्रय सुंदर उदर नाभि रुचिर गंभीर । उर आयत भ्राजत बिबिध बालबिभूषन बीर ॥ १०९ ॥**

त्यांच्या उदरावर रम्य त्रिवली असून नाभिप्रदेश रुचिर व गंभीर होता. त्या वीराचें वक्षःस्थल विशाल असून त्यावर अनेक बाळलेणीं शोभत होतीं.

चौ०—अरुन पानि नखकरज मनोहर ।
बाहु बिसाल बिभूषन सुंदर ।
कंध बालकेहरि दर ग्रीवाँ ।
चारु चिबुक आनन छबि सीवाँ ।
कलबल बचन अधर अरुनारे ।
दुइ दुइ दसन बिसद बर बारे ।
ललित कपोल मनोहर नासा ।
सकल सुखद ससि-कर-सम हाँसा ॥
नील-कंज-लोचन-भवमोचन ।
भ्राजत भाल तिलक गोरोचन ।
बिकट भृकुटि सम स्रवन सुहाये ।
कुंचित कच मेचक छबि छाये ।
पीति झीनि झिगुली तन सोही ।
किलकनि चितवनि भावति मोही ।

त्यांचे ते आरक्त हस्त, मनोहर नखें, विशाल बाहु, सुंदर अलंकार, सिंहशावकाप्रमाणें स्कंध, शंखासारखी मान, लज्जतदार हनुवटी, सौंदर्यसीम वदन, बोबडे बोल, आरक्त ओठ, शुभ्र सुंदर आणि कोमल असे दोन दोन दांत, गुलगुले गाल, चोंचदार नाक, चंद्रकिरणांप्रमाणें सर्वांना सुखविणारें हास्य, भवसागरापासून सोडविणारे नीलकमलाप्रमाणें नेत्र, कपाळीं असलेला शोभिवंत गोरोचनतिलक, टपोऱ्या भुंवया, रेखीव कान, काळेभोर व तुकतुकीत कुरळ केस, घेरदार सुंदर पिवळा झगा, खोचदार नजर आणि कचित किंकाळणें वगैरे माझ्या मनाला अगदीं वेड लावून सोडीत.

रूपरासि नृप-अजिर-बिहारी ।
नाचहिँ निजप्रतिबिंब निहारी ।
मोहि सन करहिँ बिबिध बिधि क्रीडा ।
बरनत चरित होत मोहि ब्रीडा ।
किलकत मोहि धरन जब धावहिँ ।
चलउँ भागि तब पूप देखावहिँ ।

असा तो रूपराशी दशरथाच्या अंगणांत क्रीडा करीत असतां आपलीच सावली पाहून नाचत सुटे. रामचंद्र माझ्याशीं ज्या अनेक प्रकारच्या क्रीडा करीत त्या सांगण्यास देखील मला लाज वाटते. आसेल्या

ठोकीत जेव्हां मला ते पकडण्यास धांवत व मी पळून जाई तेव्हां मला ते बतासा दाखवीत.

दो०–आवत निकट हसहिँ प्रभु भाजत रुदन कराहिँ। जाउँ समीप गहन पद फिरि फिरि चितइ पराहिँ ॥११०॥

मी जवळ आलों म्हणजे प्रभूंनीं हसावें, आणि मी पळून गेलों म्हणजे त्यांनीं रडत बसावें. मी त्यांचीं चरणकमलें धरण्यास पुनः पुनः जवळ जावें तों त्यांनीं वळून वळून पहात पळत सुटावें.

दो०–प्राकृत सिसु इव लीला देखि भयउ मोहि मोह। कवन चरित्र करत प्रभु चिदानंदसंदोह ॥ १११ ॥

ती अगदींच प्राकृत बालकासारखी लीला पाहून मलादेखील भ्रम झाला कीं, प्रभु तर चिदानंद-संदोह, मग त्यांनीं ह्या कसल्या चेष्टा आरंभल्या आहेत ?

चौ०–एतना मन आनत खगराया।
रघु-पति-प्रेरित ब्यापी माया।
सो माया न दुखद मोहि काहीँ।
आन जीव इव संसृति नाहीँ।
नाथ इहाँ कछु कारन आना।
सुनहु सो सावधान हरिजाना।

हे गरुडा ! बस, इतकें माझ्या मनांत आलें मात्र, तोंच रघुपतींच्या प्रेरणेनें त्यांच्या मायेनें मला झडपलें. परंतु त्या मायेनें मला दुःख मात्र अगदीं दिलें नाहीं. इतर जीवाप्रमाणें मी संसारांत गुरफटलों गेलों नाहीं. हे नाथ ! ह्याचें कारण कांहीं वेगळेंच आहे. हे विष्णुवाहना ! तें तूं सावधपणें ऐक.

ज्ञान अखंड एक सीताबर।
मायाबस्य जीव सचराचर।
जौँ सबके रह ज्ञान एक रस।
ईस्वर जीवहिँ भेद कहहु कस।

अखंड ज्ञान असें एक जानकीरमणासच आहे. इतर चराचर जीव अखवे सारे मायावशच. जर सरसकट सर्वांनाच अखंड ज्ञान असतें तर मग ईश्वरांत आणि जीवांत भेद तो काय आणि कसला उरला ?

मायाबस्य जीव अभिमानी।
ईसबस्य माया गुनखानी।
परबस जीव स्वबस भगवंता।
जीव अनेक एक श्रीकंता।
मुधा भेद जद्यपि कृत माया।
बिनु हरि जाइ न कोटि उपाया।

जीव हा अहंकारविशिष्ट, अतएव मायेनें व्याप्त असा असतो. सर्व गुणांची खाण अशी जी माया ती ईश्वराच्या आधीन असते. म्हणूनच तर जीव परतंत्र, आणि परमेश्वर कायतो स्वतंत्र आहे. जीवास अनेकत्व असतें. परमेश्वरच फक्त एकमेवाद्वितीय असा आहे. ( जीवांचें अनेकत्व ) हा भेद जरी मायाकृत, अतएव अज्ञानमूलक आहे तरी एका परमेश्वराखेरीज कोट्यवधि साधनांनीं देखील त्याचा लय होत नसतो.

दो०–रामचंद्र के भजन बिनु जो चह पद निर्बान। ज्ञानवंत अपि सो नर पसु बिनु पूछ बिखान ॥ ११२ ॥

रामभजनाव्यतिरिक्त जो मोक्षाची हांव धरील तो ज्ञानी असला तरीदेखील पुच्छविषाणहीन पशूच समजावा.

दो०–राकापति षोडस उअहिँ तारा-गन-समुदाइ। सकल गिरिन्ह दव लाइय बिनु रबि राति न जाइ ॥११३॥

सर्व चांदण्या षोडशकलायुक्त चंद्रासह जरी उगवल्या आणि यच्चयावत् पर्वतास वणवा पेटवला तरी सूर्याखेरीज रात्रीचा नाश व्हावयाचा नाहीं.

चौ०–ऐसेहि बिनु हरिभजन खगेसा।
मिटइ न जीवन्ह केर कलेसा।
हरि सेवकहिँ न ब्याप अबिद्या।
प्रभुप्रेरित ब्यापइ तेहि बिद्या।
ता तेँ नास न होइ दास कर।
भेद भगति बाढइ बिहंगबर।

गरुडा ! अशाप्रमाणें हरिभक्तीखेरीज जीवाचे क्लेश मिटावयाचे नाहींत. हरिभक्तास अविद्या मोहूं शकत नाहीं. त्यास एकटी विद्याच बाधूं शकते, आणि तीहि प्रभूंच्या आज्ञेनुसार. म्हणून तर, गरुडा ! हरीच्या दासाचा नाश होत नाहीं. त्यांच्यांत कायती भेदभक्तीच वाढू शकते.

भ्रम तेँ चकित राम मोहि देखा।
बिहँसे सो सुनु चरित बिसेखा।

तेहि कौतुक कर मरम न काहू ।
जाना अनुज न मातुपिता हू ।

मी संशयग्रस्त झालेला पाहून रामचंद्र हसले. पुढें त्यांनीं जो विशेष चमत्कार केला तो ऐक. त्या आश्चर्यकारक कृतीचें मर्म त्यांच्या बंधूंस अगर मातापितरांस देखील उमगलें नाहीं.

जानुपानि धाये मोहि धरना ।
स्यामलगात अरुन-कर-चरना ।
तब मैं भागि चलेउँ उरगारी ।
राम गहन कहँ भुजा पसारी ।
जिमि जिमि दूरि उडाउँ अकासा ।
तहँ हरिभुज देखउँ निजपासा ।

श्यामलगात्र, आरक्तचरण असे श्रीराम गुडघ्यावर हात टेंकून मला धरण्याकरितां धांवले. तेव्हां गरुडा! मीहि पळत सुटलों—रामांनीं मला धरण्यासाठीं हात लांबवला. जसजसा मी आकाशांत उंच उडे आणि पाही तसतसा प्रभूंचा हात माझ्या पाठीशीं आहेच असें मला दिसून येई.

**दो०—ब्रह्मलोक लगि गयउ मैं चितयउँ पाछ उडात । जुग अंगुल कर बीच सब रामभुजहिं मोहि तात ॥ ११४ ॥**

मागें वळून पहात पहात मी ब्रह्मलोकापर्यंत भराऱ्या घेतल्या तरीदेखील, गरुडा! माझें रामांच्या भुजाचें अंतर सारें दोनच बोटें उरे.

**दो०—सप्तावरन भेद करि जहाँ लगे गति मोरि । गयउ तहाँ प्रभु भुज निरखि ब्याकुल भयउँ बहोरि ॥ ११५ ॥**

सप्तावरणांचा भेद करून जेथवर माझी गति होती तेथवर मी गेलों. आणि फिरून तेथेंहि प्रभूंचा बाहु पाहतांच मी अत्यंत घाबरा झालों.

चौ०—मूदेउँ नयन त्रसित जब भयऊँ ।
पुनि चितवत कोसलपुर गयऊँ ।
मोहि बिलोक राम मुसुकाहीं ।
बिहँसत तुरत गयउँ मुख माहीं ।

तेव्हां मी अगदीं त्रासून जाऊन डोळेच मिटले. फिरून डोळे उघडून पाहतों तों मी अयोध्येंत गेलों असून राम मजकडे पाहून हसत आहेत असें दिसलें. ते हसत असतां मी ताबडतोब त्यांच्या मुखांतच जाऊन पडलों.

उदर माँझ सुनु अंड-ज-राया ।
देखेउँ बहु ब्रह्मांडनिकाया ।
अति बिचित्र तहँ लोक अनेका ।
रचना अधिक एक ते एका ।

हे पक्षिराया! ऐक. त्यांच्या उदरांत मी अनेक ब्रह्मांडें पाहूं लागलों. तीं फारच विचित्र, तेथें (स्वर्गादि) लोकहि अनेक, आणि त्यांची रचनाहि एकापेक्षां एक वरचढ.

कोटिन्ह चतुरानन गौरीसा ।
अगनित उडुगन रबि रजनीसा ।
अगनित लोकपाल जम काला ।
अगनित भूधर भूमि बिसाला ।
सागर सरि सर बिपिन अपारा ।
नाना भाँति सृष्टिबिस्तारा ।
सुर मुनि सिद्ध नाग नर किन्नर ।
चारि प्रकार जीव सचराचर ।

तेथें गणेश, पार्वती आणि शंकर कोट्यवधि होते. पक्षिगण व सूर्यचंद्र ह्यांची गणतीच नव्हती. इंद्रादि लोकपाल, यम, काल हेहि अगणित असून पर्वत आणि भूगोल अवाढव्य आणि असंख्य होते. समुद्र, नद्या, सरोवरें, अरण्यें देखील अपार असून तेथें नानाप्रकारची सृष्टिरचनाहि दिसली. तसेंच सुर, मुनि, सिद्ध, नाग, नर, किन्नर इत्यादि चराचरात्मक चारी प्रकारचे जीव तेथें होतेच.

**दो०—जो नहिं देखा नहिं सुना जो मनहूँ न समाइ । सो सब अद्भुत देखेउँ बरनि कवनि बिधि जाइ ॥ ११६ ॥**

अदृष्टपूर्व, अश्रुतपूर्व आणि अकल्पितपूर्व सर्व अद्‌भुत असेंच तेथें पाहण्यांत आलें. त्याचें वर्णन तरी कसें होणार ?

**दो०—एक एक ब्रह्मांड महँ रहेउँ बरष सत एक । एहि बिधि देखत फिरेउँ मैं अंडकटाह अनेक ॥ ११७ ॥**

त्या प्रत्येक ब्रह्मांडांत मीं शंभर शंभर वर्षें काढलीं. ह्याप्रमाणें अनेक ब्रह्माण्डें पहातच मी भटकत राहिलों.

चौ०—लोक लोक प्रति भिन्न बिधाता ।
भिन्न बिष्णु सिव मनु दिसित्राता ।
नर गंधर्ब भूत बेताला ।
किन्नर निसिचर पसु खग ब्याला ।

देव-दनुज-गन नाना जाती ।
सकल जीव तहँ आनहि भाँती ।
महि सरि सागर सर गिरि नाना ।
सब प्रपंच तहँ आनहि आना ।
अंडकोस प्रति प्रति निज रूपा ।
देखेउँ जिनिस अनेक अनूपा ।

प्रत्येक लोकांत ब्रह्मदेव, विष्णु, शंकर, मनु, दिक्पाल हे सर्वच निरनिराळे होते. नर, गंधर्व, भूत, वेताळ, किन्नर, राक्षस, पशु, पक्षी, सर्प, देवदैत्यांचे समुदाव, हे सर्व निरनिराळ्या तऱ्हांचे असून तेथील सर्वच जीव कांहीं वेगळ्याच प्रकारचे दिसले. तसेंच पृथ्वी, नद्या, सागर, सरोवर, पर्वत इत्यादि सर्व सृष्टि तेथें अगदींच भिन्न असून प्रत्येक ब्रह्माण्डांतील प्रत्येक त्या त्या जातीच्या वस्तु अपार आणि अप्रतिम अशा माझ्या पाहण्यांत आल्या.

अवधपुरी प्रतिभुवन निहारी ।
सरजू भिन्न भिन्न नर नारी ।
दसरथ कौसल्या सुनु ताता ।
बिबिधरूप भरतादिकभ्राता ।
प्रतिब्रह्मांड रामअवतारा ।
देखेउँ बालबिनोद उदारा ।

प्रत्येक भुवनांत अयोध्यानगरी, शरयू आणि स्त्रीपुरुष भिन्नभिन्न दिसले. हे तात ! ऐक. दशरथ, कौसल्यादि माता आणि भरतादि बंधू हे देखील निरनिराळ्या रूपाचे होते. मात्र प्रत्येक ब्रह्माण्डांत रामावतारांचें उदार बालचरित्र मी एकजिनसीच अवलोकीत होतों.

**दो०—भिन्न भिन्न मैं दीख सब अति-बिचित्र हरिजान । अगनित भुवन फिरेउँ प्रभु रामु न देखेउँ आन ॥११८॥**

हे विष्णुवाहना ! मला भिन्नभिन्न आणि अत्यंत विचित्र अशीच सर्वत्र रचना आढळली. परंतु मी असंख्य भुवनें जरी हिंडून आलों तरी रामप्रभु मात्र मला कोठेंहि निराळे दिसले नाहींत.

**दो०—सोइ सिसुपन सोइ सोभा सोई कृपाल रघुबीर । भुवन भुवन देखत फिरेउँ प्रेरित मोह सरीर ॥ ११९ ॥**

त्यांचें तेंच बाळपण, तीच शोभा आणि तीच कृपाळु रघुवीराची मूर्ति मी मोहप्रेरित होऊन फिरत असतां प्रत्येक भुवनांत पाहिली.

चौ०—भ्रमत मोहि ब्रह्मांड अनेका ।
बीते मनहुँ कलपसत एका ।
फिरत फिरत निज आस्रम आयउँ ।
तहँ पुनि रहि कछु काल गवाँयउँ ।

अनेक ब्रह्माण्डांत चक्कर खात असतां मला असा भास झाला कीं, शंभर कल्प संपले. फिरतां फिरतां मी पुनः आपल्या आश्रमांत येऊन दाखल झालों आणि तेथेंच राहून कांहीं दिवस घालविले.

निज-प्रभु-जनम अवध सुनि पायउँ ।
निर्भर प्रेम हरषि उठि धायउँ ।
देखेउ जनममहोत्सव जाई ।
जेहि बिधि प्रथम कहा मैं गाई ।

नंतर अयोध्येंत माझ्या प्रभूंचा जन्म झाल्याचें ऐकतांच मी अगदीं प्रेमनिर्भर होऊन आनंदानें तडक धांवत सुटलों आणि पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें अयोध्येंत येऊन तो जन्ममहोत्सव पाहूं लागलों.

रामउदर देखेउँ जग नाना ।
देखत बनइ न जाइ बखाना ।
तहँ पुनि देखेउँ राम सुजाना ।
मायापति कृपाल भगवाना ।
करउँ बिचार बहोरि बहोरी ।
मोह कलिल ब्यापित मति मोरी ।
उभय घरी महँ मैं सब देखा ।
भयउ भ्रमित मन मोह बिसेखा ।

गरुडा ! रामाच्या उदरांत जीं अनेक ब्रह्मांडें माझ्या दृष्टीस पडलीं तीं जरी मी पाहूं शकलों तरी त्यांचें वर्णन मात्र मला करवत नाहीं. पुनः तेथें मीं सर्वज्ञ, मायापति, दयाघन, भगवान् रामचंद्रास पाहिलें आणि वारंवार विचार करूं लागलों. परंतु मोहानें माझी मति गढूळ झाली होती. मीं तें सर्व दोन घटिकांत पाहिलें, परंतु अत्यंत मोहामुळें माझ्या मनाला शीण खूपच जाणवला.

**दो०—देखि कृपाल बिकल मोहि बिहँसे तब रघुबीर । बिहँसतहीं मुख बाहेर आयउँ सुनु मतिधीर ॥ १२० ॥**

तेव्हां दयाळु रामचंद्रांनीं मला त्रस्त झालेला पाहून हास्य केलें. त्यांनीं हास्य करतांच, हे मतिधीर गरुडा ! ऐक, मी त्यांच्या मुखांतून बाहेर पडलों.

**दो०–सोइ लरिकाई मो सन करन लगे पुनि राम । कोटि भाँति समुझावउँ मन न लहइ बिस्राम ॥ १२१ ॥**

पहिलेचेच पोरचाळे माझ्याशीं रामचंद्र फिरून करूं लागले. मीं आपल्या मनाची नाहीं नाहीं त्या रीतीनें समजूत घालून पाहिली, परंतु मनाला पत्ता लागेना व चैन पडेना.

चौ०–देखि चरित यह सो प्रभुताई ।
समुझत देहदसा बिसराई ।
धरनि परेउ मुख आव न बाता ।
त्राहि त्राहि आरत–जन–त्राता ।

प्रभूंच्या त्या लीला पाहून आणि त्यांचा प्रभाव मनांत येऊन मी देहभान विसरलों आणि निपचित पडलों. माझ्या मुखावाटे शब्द निघेना. तेव्हां अखेरीस मीं " हे शरणागतपालका त्राहि त्राहि " असें म्हणूं लागलों.

प्रेमाकुल प्रभु मोहि बिलोकी ।
निज–माया–प्रभुता तब रोकी ।
कर सरोज प्रभु मम सिर धरेऊ ।
दीनदयाल सकल दुख हरेऊ ।
कीन्ह राम मोहि बिगत-बिमोहा ।
सेवकसुखद कृपासंदोहा ।

प्रभूंनीं मला प्रेमाकुल झालेला पाहून आपल्या मायेचा प्रभाव आखुडला. त्या दीनदयाळ प्रभूंनीं आपला कमलहस्त माझ्या मस्तकावर ठेवून माझ्या सर्व दुःखाचा परिहार केला. अशा रीतीनें भक्तसुखद आणि कृपानिवास श्रीरामांनीं मला मोहमुक्त केलें.

प्रभुता प्रथम बिचारि बिचारी ।
मन महँ होइ हरष अतिभारी ।
भक्तवछलता प्रभु कै देखी ।
उपजी मम उर प्रीति बिसेखी ।
सजल नयन पुलकित कर जोरी ।
कीन्हेउँ बहु बिधि बिनय बहोरी।

प्रथम तर मी प्रभूंच्या प्रभावाचाच पुनः पुन: विचार करूं लागलों. तेव्हां माझ्या मनास अतिशयच हर्ष होत गेला. प्रभूंचें भक्तवात्सल्य पाहून तर माझ्या अंतःकरणांत विशेषच प्रेम उसळलें. मी सजलनेत्र आणि पुलकित होऊन व हात जोडून अनेकप्रकारें स्तुति करूं लागलों.

**दो०–सुनि सप्रेम मम बानी देखि दीन निजदास । बचन सुखद गंभीर मृदु बोले रमानिवास ॥ १२२ ॥**

माझी ती प्रेमळ वाणी ऐकून आणि मला आपला किंकर समजून रमानिवास रामचंद्र सौम्य, मृदु आणि सुखकारक असें भाषण करूं लागले.

**दो०–काग भुसुंडी माँगु बर अति प्रसन्न मोहि जानि । अनिमादिक सिधि अपर रिधि मोच्छ सकल सुखखानि।१२३**

( ते म्हणाले– ) काकभुशुंडे ! मी अतिप्रसन्न आहें हें जाणून वर माग. अणिमादिक सिद्धि, अवांतर ऋद्धि, आणि सर्व सुखाची समृद्धि असा मोक्ष देखील वाटेल तर मागून घे.

चौ०–ज्ञान बिबेक बिरति बिज्ञाना ।
सुरदुर्लभ गुन जे जग जाना ।
आजु देउँ तव संसय नाहीँ ।
माँगु जो तोहि भाव मन माहीँ ।

ज्ञान, विवेक, वैराग्य, विज्ञान, आणि इतर सुरदुर्लभ गुण जे जगांत प्रसिद्ध आहेत त्यांतून जे तुझ्या मनास प्रशस्त वाटतील ते मागून घे. आज मी ते तुला निःसंशय देणार.

सुनि प्रभुबचन अधिक अनुरागेउँ
मन अनुमान करन तब लागेउँ ।
प्रभु कह देन सकलसुख सही ।
भगति आपनी देन न कही ।

प्रभूंचें तें वचन ऐकून मला अधिकच प्रेम दाटलें. तेव्हां मी आपल्या मनांत विचार करूं लागलों कीं, प्रभु सर्व सुखें खात्रीनें देतों म्हणाले, परंतु आपली भक्ति देतों हें मात्र बोलले नाहींत.

भगतिहीन गुन सब सुख कैसे ।
लवन बिना बहु ब्यंजन जैसे ।
भजनहीन सुख कवने काजा ।
अस बिचारि बोलेउँ खगराजा ।

एका भक्तीवांचून सर्व सद्गुण आणि सुखें पुष्कळशा आळणी चटण्याप्रमाणें होत. भक्तिविरहित सुखें काय उपयोगी ? असा विचार करून, गरुडा ! मी म्हणालों—

जौं प्रभु होइ प्रसन्न बर देहू ।
मो पर करहु कृपा अरु नेहू ।

मन भावत बर माँगउँ स्वामी ।
तुम्ह उदार उर-अंतर-जामी ।

प्रभो ! आपण प्रसन्न होऊन जर वरदान करीत असाल आणि मजवर जर आपली ममता आणि आपला अनुग्रह असेल तर मी ईप्सित वरदान मागतों. हे स्वामिन् ! आपण उदार आणि सर्वांतर्यामी आहांत.

**दो०—अबिरल भगति बिशुद्ध तव स्रुति पुरान जो गाव । जेहि खोजत जोगीस मुनि प्रभुप्रसाद कोउ पाव ॥ १२४ ॥**
**भगत-कलप-तरु प्रनतहित कृपासिंधु सुखधाम । सोइ निजभगति मोहि प्रभु देहु दया करि राम ॥ १२५ ॥**

हे भक्तकल्पतरो, प्रणतहिता, कृपासिंधो, सुखधामा, प्रभो, श्रीरामा ! श्रुतिपुराणांनीं गाइलेली, योगींद्र आणि मुनि यांनीं प्रयत्नपूर्वक अर्थिलेली आणि प्रभूंच्या प्रसादानेंच क्वचित् एखाद्यासच मिळणारी अशी जी आपली परमोज्ज्वल अखंड भक्ति तीच मला कृपा करून द्यावी.

चौ०--एवमस्तु कहि रघु-कुल-नायक ।
बोले बचन परम सुख-दायक ।
सुनु बायस तैं सहज सयाना ।
काहे न माँगसि अस बरदाना ।
सबसुखखानि भगति तैं माँगी ।
नाहिं जग कोउ तोहि सम बडभागी ।
जो मुनि कोटिजतन नहिं लहहीं ।
जे जप-जोग-अनल तन दहहीं ।

'एवमस्तु' म्हणून रघुकुलनायकांनीं परम सुखकारक असें भाषण केलें. ते म्हणाले—वायसा ! तूं जातीचाच सुज्ञ आहेस, तेव्हां असा वर कां मागणार नाहींस ? जप, योग, पंचाग्निसाधन इत्यादि कोटिशः यत्नांनीं देहाची आहुति देणाऱ्या मुनींनाहि जी अप्राप्य व सर्व सुखांचें सार अशी ती माझी भक्तीच तूं मागितलीस. अर्थातच तुझ्यासारखा महान् भाग्यवंत या जगांत इतर कोणीहि नाहीं.

रीझेउँ देखि तोरि चतुराई ।
माँगेहु भगति मोहि अति भाई ।
सुनु बिहंग प्रसाद अब मोरे ।
सब सुभ गुन बसिहहिं उर तोरे ।

भगति ज्ञान बिज्ञान बिरागा ।
जोग चरित्र रहस्य-बि-भागा ।
जानब तैं सबही कर भेदा ।
मम प्रसाद नहिं साधन खेदा ।

तुझें चातुर्य पाहून मी खराच रिझलों. तूं भक्ति मागितलीस हें मला फारच आवडलें. भुशुंडे ! ऐक. आतां माझ्या कृपेनें सर्व शुभ लक्षणें तुझ्या हृदयांत वास करतील. भक्ति, ज्ञान, विज्ञान, वैराग्य, योग, सर्व सगुणलीलांचीं रहस्यें विभाग आणि भेद तुला अवगत होतील. माझ्या अनुग्रहानें त्यांच्या साधनासाठीं तुला निराळे परिश्रम करणें नलगे.

**दो०—मायासंभव भ्रम सकल अब न ब्यापिहहिं तोहि । जानेसु ब्रह्म अनादि अज अगुन गुनाकर मोहि ॥ १२६ ॥**

अतःपर तुला मायाजनित कोणताहि भ्रम बाधणार नाहीं, आणि तुला अनादि, अज, अगुण, गुणाकर, परब्रह्म अशा माझें ज्ञान होईल.

**दो०—मोहि भगतप्रिय संतत अस बिचारि सुनु काग । काय बचन मन मम पद करेसु अचल अनुराग ॥ १२७ ॥**

माझे भक्तच मला निरंतर प्रिय असतात, असा विचार करून ऐक, आणि भुशुंडे ! तूंहि कायावाचामनेंकरून माझ्या चरणीं अखण्ड प्रेमच करीत रहा.

चौ०—अब सुनु परमबिमल मम बानी ।
सत्य सुगम निगमादि बखानी ।
निजसिद्धांत सुनावउँ तोही ।
सुनि मन धरु सब तजि भजु मोही ।

आतां सत्य, सुगम, वेदादिकांनीं स्तुत आणि परम उज्वळ अशी माझी वाणी ऐक. मी तुला आत्मसिद्धांत सांगतों तो तूं ऐकून ध्यानांत ठेव आणि एकंदर अवघाच त्याग करून माझेंच भजन करीत जा.

मम मायासंभव परिवारा ।
जीव चराचर बिबिधप्रकारा ।
सब मम प्रिय सब मम उपजाये ।
सब ते अधिक मनुज मोहि भाये ।

विविधप्रकारचे चराचरजीव हा माझ्याच मायेचा पसारा आहे. ते सर्वच मला प्रिय आहेत, कारण

सर्वांचाच मी जनक आहे. परंतु त्यामध्यें मला मनुष्य सर्वांपेक्षांहि अधिक आवडतो.

तिन्ह महँ द्विज द्विज महँ स्रुतिधारी।
तिन्ह महँ निगम धर्म-अनुसारी।
तिन्ह महँ प्रिय बिरक्त पुनि ग्यानी।
ग्यानिहुँ तेँ अतिप्रिय बिग्यानी।
तिन्ह तेँ पुनि मोहि प्रिय निजदासा।
जेहि गति मोरि न दूसरि आसा।

मानवांतहि द्विज, द्विजांतहि वेदपाठक, वेदपाठकामध्येंहि वैदिकधर्मानुसारी, त्यांमध्येंहि विरक्त, त्यांतहि ज्ञानी आणि ज्ञान्याहूनहि विज्ञानी (ज्ञानानुभवी) मला उत्तरोत्तर प्रिय असतात. परंतु ह्या सर्वांहूनहि मला माझा अनन्यगतिक, ज्याला इतरत्र आशाच नाहीं, असा भक्त अधिक प्रिय वाटतो.

पुनि पुनि सत्य कहउँ तोहि पाहीँ।
मोहि सेवकसम प्रिय कोउ नाहीँ।
भगतिहीन बिरंचि किन होई।
सब जीवहु सम प्रिय मोहि सोई।
भगतिवंत अतिनीचउ प्रानी।
मोहि प्रानप्रिय अस मम बानी।

मी तुला निक्षून सांगतों कीं मला माझ्या सेवकासारखा जिवलग कोणीहि नाहीं. भक्तिहीन, मग तो ब्रह्मदेव कां होईना, मला तो इतर सर्व जीवांप्रमाणेंच (सामान्यतः) प्रिय आहे; परंतु भक्तिमान् असा एखादा अत्यंत नीच प्राणी देखील मला प्राणाहूनहि प्रिय असणें हें माझें ब्रीद आहे.

**दो०—सुचि सुसील सेवक सुमति प्रिय कहु काहि न लाग। स्रुति पुरान कह नीति असि सावधान सुनु काग॥ १२८॥**

पवित्र, सुशील, बुद्धिमान् असा सेवक कोणास प्रिय वाटणार नाहीं, सांग बरें ? हाच सिद्धांत श्रुतिपुराणांनींहि प्रतिपादन केला आहे. भुशुंडे! तूं लक्ष देऊन ऐक.

चौ०— एक पिता के बिपुल कुमारा।
होहिँ पृथक गुन सील अचारा।
कोउ पंडित कोउ तापस ग्याता।
कोउ धनवंत सूर कोउ दाता।
कोउ सर्बग्य धर्मरत कोई।
सब पर प्रीति पितहि सम होई।

एकाच पित्याचे अनेक पुत्र असतात, परंतु त्यांचे गुण व शील अगदीं भिन्न असतात. कोणी पंडित, कोणी तपस्वी, कोणी ज्ञानी, कोणी धनाढ्य, कोणी शूर, कोणी दाता, कोणी सर्वज्ञ, कोणी धर्मनिष्ठ असे ते असतात व त्या सर्वांवर पित्याचें प्रेम सर्वसाधारण असतें.

कोउ पितुभगत बचन मन कर्मा।
सपनेहु जान न दूसर धर्मा।
सो सुत प्रिय पितु प्रानसमाना।
जद्यपि सो सब भाँति अयाना।

परंतु कोणी एखादा कायावाचामनानें पितृभक्त असतो. तो स्वप्नांतहि इतर धर्म जाणत नाहीं. तसा पुत्र इतर सर्व बाबतींत जरी अगदींच अडाणी असला तरी देखील तो पित्यास केवळ जीव कीं प्राण वाटतो.

एहि बिधि जीव चराचर जेते।
त्रिजग देव नर असुर समेते।
अखिल बिस्व यह मम उपजाया।
सब पर मोहि बराबरि दाया।
तिन्ह महँ जो परिहरि मद माया।
भजइ मोहि मन बच अरु काया।

ह्याचप्रमाणें त्रैलोक्यांत, देव, नर, असुर यांच्यासकट जेवढे म्हणून चराचर जीव आहेत त्या सर्वांवरच मी अखिल जगाचा जनक असल्यामुळें माझें प्रेम सर्वसाधारण असतें. परंतु त्यांच्यांतूनहि जो मद आणि माया यांचा त्याग करून कायावाचामनेंकरून केवळ माझ्याच भक्तीचा अवलंबन करून रहातो—

**दो०—पुरुष नपुंसक नारि नर जीव चराचर कोइ। भगति भाव भजि कपट तजि मोहि परम प्रिय सोइ॥ १२९॥**

मग तो चराचर जीवमात्रांतून नपुंसक, स्त्री अगर पुरुष कोणीहि कां असेना, तो जर निष्कपटपणें भक्तिभावानें माझें भजन करीत असला तर मात्र तो मला सर्वांत अत्यंत प्रिय होतो.

**सो०—सत्य कहउँ खग तोहि सुचि सेवक मम प्रानप्रिय। अस बिचारि भजु मोहि परिहरि आस भरोस सब॥ ४॥**

भुशुंडे ! मी तुला प्रतिज्ञेनें सांगतों कीं, शुद्ध भावानें भक्ति करणारा मला माझ्या प्राणाहूनहि आवडतो. असा विचार मनांत ठाम बाळगून इतर

सर्व आशा आणि विश्वास टाकून माझेंच भजन करीत जा.

चौ०--कबहूँ काल न ब्यापिहि तोही।
सुमिरि स्वरूप निरंतर मोही।

नित्य माझ्या स्वरूपाचें चिंतन असूं दे म्हणजे काळ देखील तुझ्या वाऱ्यास उभा राहूं शकणार नाहीं.

प्रभुबचनामृत सुनि न अघाऊँ।
तन पुलकित मन अति हरषाऊँ।
सो सुख जानइ मन अरु काना।
नहिँ रसना पहिँ जाइ बखाना।
प्रभु सोभासुख–जानहिँ नयना।
कहि किमि सकहिं तिन्हहिं नहिं बयना।

तें प्रभुवचनामृत श्रवण करूनहि माझी तृप्ति होईना. मन प्रसन्न होऊन माझ्या अंगावर रोमांच दाटून आले. तें सुख मन आणि कान ह्या दोहोंनाच माहीत. जीभ बोलकी खरी, पण तें सुख तिजकडे जात नाहीं, म्हणून तिला त्याचें वर्णन शक्य नाहीं. प्रभूंचें सौंदर्यसुख डोळे जाणतात, परंतु त्यांना वाचा नाहीं. तेव्हां त्याचें वर्णन ते कसें करणार !

बहु बिधि मोहि प्रबोधि सुख देई।
लगे करन सिसुकौतुक तेई।
सजल नयन कछु मुख करि रूखा।
चितइ मातु लागी अति भूखा।

अशा रीतीनें अनेकविध उपदेशानें मला सुखी करून व ज्ञान देऊन प्रभूंनीं आपला तोच पोरसवदा मिसकिलपणा करण्यास सुरवात केली. त्यांनीं डोळ्यास पाणी आणलें,अमळ तोंडहि वेंगाडलें,आणि ते आईकडे भुकेनें कळंजल्याप्रमाणें पाहूं लागले.

देखि मातु आतुर उठि धाई।
कहि मृदु बचन लिये उर लाई।
गोद राखि कराव पयपाना।
रघु–बर–चरित ललित कर गाना।

त्यांस पाहतांच माता अगदीं लगबगीनें उठली आणि कोमल शब्दांनीं संबोखून त्यांस तिनें उराशीं धरलें, व ती रघुपतींना अंकावर घेऊन स्तनपान करवीत असतां त्यांच्या रसाळलीलांचीं गाणीं गाऊं लागली.

**सो०–जेहि सुख लागि पुरारि असुभ बेष-कृत सिव सुखद। अवधपुरी नर-नारि तेहि सुख महँ संतत मगन ॥ ५ ॥**

ज्या सुखाच्या प्राप्तीसाठीं स्वयंसुखप्रद अशा श्रीशंकरांनीं ( प्रभूंच्या बाललीला पाहण्यास मिळाव्या म्हणून कापालिक ) अमंगल वेष धारण केला त्या सुखांत अयोध्येंतील स्त्रीपुरुष सदासर्वकाळच निमग्न असत.

**सो०–सोई सुख लव लेस जिन्ह बारक सपनेहु लहेउ। तेहि नहिँ गनहिँ खगेस ब्रह्मसुखहिँ सज्जन सुमति ॥६॥**

हे गरुडा ! त्या सुखाचा लवलेश देखील ज्यांना एकवार तरी स्वप्नांत देखील अनुभविण्यास मिळाला असेल ते सुबुद्ध संत ब्रह्मानंदाची देखील प्रतिष्ठा मानीत नाहींत.

चौ०–मैँ पुनि अवध रहेउँ कछु काला।
देखेउँ बालबिनोद रसाला।
रामप्रसाद भगति बर पायउँ।
प्रभुपद बंदि निजास्रम आयउँ।
तब तेँ मोहि न ब्यापी माया।
जब तेँ रघुनायक अपनाया।

नंतर अयोध्येंत मीहि कांहींकालपर्यंत प्रभूंच्या त्या मनोहर बाललीला पाहात राहिलों, आणि रामकृपेनें भक्तीचा वर प्राप्त करून घेऊन व प्रभुचरणांस वंदन करून ह्या आपल्या आश्रमीं परत आलों. रघुपतींनीं मला पदरांत घेतल्यापासून मात्र मला मायेची पाचर बसली नाहीं.

यह सब गुप्तचरित मैँ गावा।
हरिमाया जिमि मोहि नचावा।
निजअनुभव अब कहउँ खगेसा।
बिनु हरिभजन न जाहिँ कलेसा।

येणेंप्रकारें हरिमायेनें मला कसें भंडावून सोडलें तें गुह्य मीं तुला सर्व कथन केलें. गरुडा ! आतां मी स्वतःचा अनुभव तुला सांगतों कीं हरिभक्तीवांचून क्लेश मिटत नाहींत.

रामकृपा बिनु सुनु खगराई।
जानि न जाइ रामप्रभुताई।
जाने बिनु न होइ परतीती।
बिनु परतीति होइ नहिँ प्रीती।
प्रीति बिना नहिँ भगति दृढाई।
जिमि खगपति जल कै चिकनाई।

हे गरुडा ! ऐक. रामकृपेखेरीज त्यांच्या प्रभावाचें ज्ञान होत नाहीं, प्रभावाचें ज्ञान झाल्याखेरीज

प्रचीति येत नाहीं, व प्रचीतीवांचून भक्ति दृढावत नाहीं. हे गरुडा ! यास प्रत्यंतर म्हणजे पाण्यामुळें ( जमिनीची ) चिकणाई.

**सो०–बिनु गुरु होइ कि ज्ञान ज्ञान कि होइ बिराग बिनु । गावहिँ बेद पुरान सुख कि लहहिँ हरिभगति बिनु ॥ ७ ॥**

गुरूवांचून ज्ञान कसें होणार ? आणि वैराग्याखेरीज ज्ञान तरी कसें टिकणार ? हरिभक्तीवांचून सुखप्राप्ति कधीं होईल काय? वेद व पुराणें तरी हाच घोष करीत आहेत.

**सो०–को बिस्राम कि पाव तात सहज संतोष बिनु । चलइ कि जल बिनु नाव कोटि जतन पचि पचि मरिय ॥ ८ ॥**

आंतरिक संतोषाखेरीज शांतिसुख, हे तात ! कोणास तरी मिळालें आहे काय ? अगदीं जीवापाड उरस्फोड करून मरेपर्यंत कष्ट केले तरी पाण्याखेरीज नाव ( जमिनीवर ) तरंगणार काय ?

चौ०–बिनु संतोष न काम नसाहीँ ।
काम अछत सुख सपनेहु नाहीँ ।
रामभजन बिनु मिटहि कि कामा ।
थलबिहीन तरु कबहुँ कि जामा ।
बिनु बिज्ञान कि समता आवइ ।
को अवकास कि नभ बिनु पावइ ।

संतोषाखेरीज काम नष्ट होत नाहीं आणि काम आहे तोंपर्यंत स्वप्नांतहि सुख मिळणार नाहीं. रामभजनावांचून काम काय नष्ट होईल ? जमिनीशिवाय झाड कधीं रुजेल काय ? विज्ञानाखेरीज समत्व कसें येणार ? आकाशतत्वाविरहित स्थळ कोणास तरी आढळेल काय ?

स्रद्धा बिना धरम नहिँ होई ।
बिनु महि गंध कि पावइ कोई ।
बिनु तप तेज कि कर बिस्तारा ।
जल बिनु रस कि होइ संसारा ।
सील कि मिल बिनु बुधसेवकाई ।
जिमि बिनु तेज न रूप गुसाईँ ।

श्रद्धेखेरिज धर्म नाहीं. पृथ्वीतत्वाखेरीज कोणास तरी गंध मिळाला आहे काय ? तपाखेरिज तेज कसें पडणार ? जलतत्वाखेरीज जगांत रसोत्पत्ति होईल काय ? संतसेवेखेरीज शील प्राप्त होईल काय ? हे स्वामिन् ! तेजस्तत्वाखेरीज रूप नाहींच नाहीं.

निजसुख बिनु मन होइ कि थीरा ।
परस कि होइ बिहीन समीरा ।
कवनिउ सिद्धि कि बिनु बिस्वासा ।
बिनु हरिभजन न भव–भय–नासा ।

आत्मसुखाखेरीज मनाचा सैलानी स्वभाव सुटेल काय ? वायुतत्वाव्यतिरिक्त स्पर्श संभवतो कसा ? विश्वासाखेरीज कोणती तरी सिद्धि होईल काय ? हरिभक्तीखेरीज संसारभय नष्टच होणार नाहीं.

**दो०–बिनु बिस्वास भगति नहिँ तेहि बिनु द्रवहिँ न राम । रामकृपा बिनु सपनेहुँ जीव न लह बिस्राम ॥ १२० ॥**

श्रद्धेखेरीज भक्ति नाहीं, भक्तीखेरीज रामचंद्र द्रवत नाहींत आणि रामकृपेखेरीज स्वप्नांतदेखील जीवाला शांति मिळणार नाहीं.

**सो०-अस बिचारि मतिधीर तजि कुतर्क संसय सकल । भजहु राम रघुबीर करुनाकर सुंदर सुखद ॥ ९ ॥**

ह्याप्रमाणें विचार करून दृढनिश्चयानें सर्व तर्क-कुतर्क सोडून करुणानिधान सुंदर व सुखद अशा रघुवीराचें भजन कर.

चौ०–निज–मति–सरिस नाथ मैँ गाया ।
प्रभु–प्रताप–महिमा खगराया ।
कहेउँ न कछु करि जुगुति बिसेखी ।
यह सब मैँ निज नयनन्हि देखी ।
महिमा नाम रूप गुनगाथा ।
सकल अमित अनंत रघुनाथा ।
निज–निज–मति मुनि हरिगुन गावहिँ ।
निगम सेष सिव पार न पावहिँ ।

हे नाथा खगराया ! मीं प्रभुप्रतापाचा महिमा यथामति वर्णन केला. माझ्या सांगण्यांत अतिशयोक्ति मुळींहि नाहीं. हें सर्व चक्षुर्वै सत्यं समज. रघुनाथ जसे अनंत तसा त्यांचा महिमा, नाम, रूप, गुण आणि लीला हींहि अनंतच. वेद, शेष, शंकर आणि मुनिजन, हरिगुणांचें गायन आपापल्या बुद्ध्यनुसार करीत असतात, तथापि त्यांना देखील त्यांचा थांग लागलेला नाहीं.

तुम्हहिँ आदि खग मसकप्रजंता ।
नभ उडाहिँ नहिँ पावहिँ अंता ।
तिमि रघु-पति महिमा अवगाहा ।
तात कबहुँ कोउ पाव कि थाहा ।

तुझ्यापासून तों तहत अगदीं मशकापर्यंत सर्व आकाशगामी प्राणी आकाशांत उडतच असतात, परंतु त्या कोणास तरी आकाशाचा अंत लागला आहे काय ? तद्वतच, हे तात ! रघुपतींच्या महिमा-सागराच्या तळाला आजपर्यंत कोणी कधींतरी जाऊन पोंचला आहे काय ?

राम काम-सत-कोटि–सुभग–तन ।
दुर्गा-कोटि–अमित अरिमर्दन ।
सक्र–कोटि–सत–सरिस बिलासा ।
नभ–सत–कोटि–अमित अवकासा ।

राम हे शतकोटिमदनांप्रमाणें सुंदर असून अमित-कोटि दुर्गांप्रमाणें शत्रुसंहारक आहेत. त्यांचे ऐश्वर्य-भोग शतकोटि इंद्राप्रमाणें असून शतकोटि आकाशाइतका त्यांचा देहविस्तार समज.

**दो०–मरुत-कोटि-सत-बिपुल बल रबि-सत-कोटि प्रकास । ससि-सत-कोटि सो सीतल समन सकल-भव-त्रास॥१३१॥**

शतकोटि वायूंसारखें त्यांचें विपुल बल असून, शतकोटिसूर्यांप्रमाणें त्यांचें तेज आहे, आणि शत-कोटिचंद्रांप्रमाणें सर्व भवदुःखांस शमन करणारी त्यांची शीतलता आहे.

**दो०–काल-कोटि-सत-सरिस अति दुस्तर दुर्ग दुरंत । धूम-केतु-सत-कोटि-सम दुराधरष भगवंत ॥ १३२ ॥**

भगवान् प्रभु शतकोटि काळांप्रमाणें अति दुस्तर, दुर्गम आणि दुर्ज्ञेय असून शतकोटि अग्नींप्रमाणें ते दुर्धर्ष आहेत.

चौ०–प्रभु अगाध सत-कोटि-पताला ।
समन-कोटि-सत सारिस कराला ।
तीरथ-अमित-कोटि-सम पावन ।
नाम अखिल-अघ-पुंज-नसावन ।
हिम-गिरि-कोटि अचल रघुबीरा ।
सिंधु-कोटि-सत-सम गंभीरा ।
काम-धेनु-सत-कोटि-समाना ।
सकल-काम-दायक भगवाना ।

प्रभु शतकोटि पाताळांप्रमाणें अगाध असून शत-कोटि यमराजांप्रमाणें विक्राळ आहेत. अमित कोटि तीर्थांप्रमाणें ते पवित्र असून त्यांचा सकृत नामोच्चार देखील अखिल पापपुंजाचा नाश करणारा आहे. कोट्यवधि हिमालयांप्रमाणें अचळ, कोट्यवधि समुद्रा-सारखे गंभीर व कोट्यवधि कामधेनूंप्रमाणें सर्व मनोरथ पुरविणारे असे भगवान् रघुवीर होत.

सारद-कोटि अमित चतुराई ।
बिधि-सत-कोटि सृष्टिनिपुनाई ।
बिष्णु-कोटि-सत-पालन करता ।
रुद्र-कोटि-सत-सम संहरता ।
धनद–कोटि–सत–सम धनवाना ।
माया कोटि प्रपंचनिधाना ।
भार धरन सत–कोटि–अहीसा ।
निरवधि निरुपम प्रभु जगदीसा ।

कोटिशारदातुल्य ज्यांचें अमित चातुर्य, शतकोटि विधिनिभ ज्यांचें सृष्टिनैपुण्य, कोटिशत विष्णुसदृश ज्यांचें जगत्पालकत्व, शतकोटि रुद्रसम ज्यांचें विश्व-संहारकत्व, शतकोटि कुबेरप्रतिम ज्यांचें सांपत्तिमत्व, कोटिशः मायोपम ज्यांचें भवविस्तारकत्व, कोटिशत शेषवत् ज्यांचें ब्रह्माण्डभारधारणक्षमत्व असे अखंड अनुपम जगदीश्वर प्रभु रामचंद्र होत.

**छंद–निरुपम न उपमा आन रामसमान निगमागम कहे । जिमि कोटि-सत-खद्योत-सम रबि कहत अतिलघुता लहे ॥ एहि भाँति निजनिजमति बिलास मुनीस हरिहि बखानहीँ । प्रभु भावगाहक अतिकृपाल सप्रेम सुनि सुख मानहीँ ॥१६॥**

कोटिशत काजव्यांप्रमाणें दैदीप्यमान् सूर्य आहे असें म्हणण्यानें ज्याप्रमाणें सूर्यास अत्यंत गौणत्व येतें तद्वतच रामचंद्रहि निरुपम आहेत. वेद-श्रुति हेहि हेंच सांगतात कीं उपमाक्षेत्रांत रामोपम इतर कोणीहि नाहीं. असें असून देखील आपापल्या बुद्धि-बलानुसार मुनींद्र श्रीहरीचें वर्णन करीतच असतात. कारण प्रभु राम भावाचे भुकाळु आणि अत्यंतच दया-याळु असल्यामुळें खऱ्या कळवळ्यावर ते बालंबाल लुब्ध असतात.

**दो०–राम अमित-गुन-सागर थाह कि पावइ कोइ । संतन्ह सन जस कछु सुनेउँ तुम्हहिँ सुनायउँ सोइ ॥ १३३ ॥**

श्रीरामचंद्रांचे गुण म्हणजे अगाध समुद्रच आहे. त्याचा थांग कोणास तरी लागेल काय? तथापि संतजनांपासून मीं जें कांहीं थोडेंसें जसें ऐकलें तें तसें तुला कथन केलें.

**सो०–भाववस्य भगवान सुखनिधान करुना-भवन। तजि ममता मद मान भजिय सदा सीतारमन ॥ १० ॥**

सुखनिधान, करुणामंदिर, भगवान् रामचंद्र केवळ भावाच्या आधीन असतात. म्हणून ममता, मद आणि अहंकार यांचा त्याग करून निरंतर त्या जानकीरमणाचेंच भजन करावें.

> चौ०–सुनि भुसुंडि के बचन सुहाये ।
> हरषित खगपति पंख फुलाये ।
> नयन नीर मन अति हरषाना ।
> श्री–रघु–बर–प्रताप उर आना ।
> पाछिल मोह समुझि पछिताना ।
> ब्रह्म अनादि मनुज करि माना ।

भुशुंडीचें तें प्रासादिक भाषण ऐकून गरुडास आनंद झाला आणि त्यानें पंख फुलविले. मनास अत्यानंद झाल्यामुळें त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. श्रीरघुवीरांच्या प्रतापाचें ज्ञान झाल्यामुळें पूर्वीच्या मोहाचा विचार करून तो पश्चात्ताप करूं लागला कीं, त्या अनादि परब्रह्मास मी मनुष्यच समजलों ना!

> पुनि पुनि कागचरन सिर नावा ।
> जानि रामसम प्रेम बढावा ।
> गुरु बिनु भवनिधि तरइ न कोई ।
> जौं बिरंचि–संकर–सम होई ।

तो वारंवार भुशुंडीच्या चरणांस नमस्कार घालूं लागला आणि त्यास रामाप्रमाणें समजून त्याजवर त्याचा अधिकच प्रेम वाढला. तो म्हणाला–शिवब्रम्हदेवासारख्यांनादेखील गुरूखेरीज भवसागर पार होववणार नाहीं.

> संसय सर्प ग्रसेउ मोहि ताता ।
> दुखद लहरी कुतर्क बहु ब्राता ।
> तव सरूप गारुडि रघुनायक ।
> मोहि जिआयेउ जन-सुख-दायक ।
> तव प्रसाद मम मोह नसाना ।
> रामरहस्य अनूपम जाना ।

हे तात! संशयरूप भुजंगानें मला गिळलें होतें. त्याच्या विषाच्या दुःखदायक कुतर्करूप लहरी मला फारच पीडा देत होत्या. परंतु त्या भक्तसुखदायक रघुनायक मांत्रिकानें तुझ्या द्वारानें मला वांचविलें. तुझ्या अनुग्रहानें माझा मोह नष्ट झाला आणि अनुपम रामतत्त्व मला कळूं लागलें.

**दो०–ताहि प्रसंसि बिबिधबिधि सीस नाइ कर जोरि। बचन बिनीत सप्रेम मृदु बोलेउ गरुड बहोरि ॥ १३४ ॥**

भुशुंडीची अनेकप्रकारें प्रशंसा करून, त्यास नमस्कार घालून व हात जोडून तो गरुड, नम्र व मृदु आणि प्रेमपूर्ण अशा वाणीनें फिरून त्यास म्हणूं लागला—

**दो०–प्रभु अपने अबिबेक तें बूझउँ स्वामी तोहि। कृपासिंधु सादर कहहु जानि दास निज मोहि ॥ १३५ ॥**

हे प्रभो! स्वामिन्! दयासिंधो! मी आपल्या अज्ञानामुळें तुला प्रश्न करीत आहे त्याचें उत्तर मला तूं आपला दास समजून दे.

> चौ०–तुम्ह सर्वज्ञ तज्ञ तमपारा ।
> सुमति सुसील सरलआचारा ।
> ज्ञान--बिरत बिज्ञान--निवासा ।
> रघुनायक के तुम्ह प्रिय दासा ।
> कारन कवन देह यह पाई ।
> तात सकल मोहि कहउ बुझाई ।
> राम--चरित -सर सुंदर स्वामी ।
> पायउ कहाँ कहहु नभगामी ।

तूं सर्वज्ञ, तत्त्वज्ञ, तमोगुणातीत, सुमति, सुशील, सरलाचारवान्, ज्ञान, वैराग्य व विज्ञान यांचें माहेर, आणि राघवांचा प्रियदास असून तूं हा वायसदेह काय कारणास्तव पावलास, तें सर्व मला समजावून सांग. हे तात स्वामिन् नभगामिन्! हें सुंदर रामचरितमानस तुला कोठें मिळालें हें देखील मला कळलें पाहिजे.

> नाथ सुना मैं अस सिव पाहीं ।
> महा प्रलयहु नास तव नाहीं ।
> मृषा बचन नहिं ईस्वर कहई ।
> सो मोरे मन संसय अहई ।
> अग जग जीव नाग नर देवा ।
> नाथ सकलजग कालकलेवा ।

अंडकटाह अमित लयकारी ।
काल सदा दुरतिक्रम भारी ।

हे नाथ ! शंकराकडून मला असें कळलें कीं महाप्रळयांत देखील तुला मृति नाहीं. महादेव मिथ्याभाषण करावयाचेच नाहींत. म्हणून माझ्या मनांत तोहि एक संशयच आहे. पाताल, मृत्यु आणि स्वर्ग या तिन्ही लोकांतील चराचर जीव, हे प्रभो! कालाची काकडी आहेत. अमित ब्रह्माण्डांचा संहार करणारा जो काल तो सदाचाच अत्यंत दुरतिक्रम आहे.

**सो०–तुम्हहि न ब्यापत काल अति कराल कारन कवन । मोहि सो कहहु कृपाल ज्ञानप्रभाउ कि जोगबल ॥ ११ ॥**

अशा त्या अतिकराल कालाचाहि शह तुजवर बसत नाहीं ह्याचें कारण काय ? हें सारें ज्ञानाच्या प्रभावामुळें आहे किंवा योगबलामुळें आहे हें, कृपालो! मला कथन कर.

**दो०–प्रभु तव आस्रम आयउँ मोर मोह भ्रम भाग । कारन कवन सो नाथ सब कहहु सहित अनुराग ॥ १३६ ॥**

प्रभो ! तुझ्या आश्रमास येतांच माझे मोह आणि भ्रम तत्काळ नाहींसे झाले. हे नाथ ! ह्याचेंहि काय कारण तें सर्व कृपा करून सांगावें.

चौ०–गरुडागिरा सुनि हरषेउ कागा ।
बोलेउ उमा सहित अनुरागा ।
धन्य धन्य तव मति उरगारी ।
प्रस्न तुम्हार मोहि अतिप्यारी ।
सुनि तव प्रस्न सप्रेम सुहाई ।
बहुत जनम की सुधि मोहि आई ।
अब निजकथा कहउँ मैं गाई ।
तात सुनहु सादर मन लाई ।

( शंकर म्हणतात– ) हे पार्वति ! गरुडाचे ते प्रश्न ऐकून भुशुंडीस आनंद झाला व तो प्रेमपूर्वक म्हणाला—हे गरुडा ! धन्य धन्य तुझी मति ! तुझे प्रश्न मला फारच आवडले. तुझे प्रेमळ व योग्य प्रश्न ऐकून मला माझ्या अनेक जन्मांतरांचें स्मरण झालें. बाबा रे ! आतां मी आपला इतिहास तुला सांगतों तो तूं नीट लक्ष लावून ऐक.

जप तप ब्रत मख सम दम दाना ।
बिरति बिबेक जोग बिज्ञाना ।
सब कर फल रघु-पति पद प्रेमा ।
तेहि बिनु कोउ न पावइ षेमा ।

जप, तप, व्रत, यज्ञ, शम, दम, दान, वैराग्य, विवेक, योग, विज्ञान इत्यादिकांचें फल म्हणजे रघुपतिचरणीं प्रेम उत्पन्न होणें हें होय, व त्या प्रेमाखेरीज कोणासहि क्षेमप्राप्ति होणें शक्य नाहीं.

एहि तन रामभगति मैं पाई ।
ता तें मोहि ममता अधिकाई ।
जेहि तें कछु निजस्वारथ होई ।
तेहि पर ममता कर सब कोई ।

ह्याच काकदेहांत मला रामभक्ति मिळाली म्हणून मला तो अत्यंत प्रिय वाटतो. ज्यापासून स्वतःचा कांहीं स्वार्थ साधतो त्यावर सर्वच लोक प्रेम करीत असतात.

**सो०–पन्नगारि असि नीति स्रुतिसंमत सज्जन कहहिं । अतिनीचहु सन प्रीति करिय जानि निज-परम-हित ॥ १२ ॥**

हे पन्नगारे ! श्रुतिसंमत आणि सज्जनप्रतिपादित नीति देखील अशीच आहे. आपल्या परमकल्याणावर नजर ठेवून अत्यंत नीचाशीं देखील प्रेम जोडलें पाहिजे.

**सो०–पाट कीट तें होइ तेहि तें पाटंबर रुचिर । कृमि पालइ सब कोइ परम अपावन प्रानसम ॥ १३ ॥**

रेशीम किड्यापासून उत्पन्न होतें आणि त्याचीं उत्तम रेशमी वस्त्रें बनतात. ते किडे अत्यंत अपवित्र, तरी पण सर्व लोक त्यांची आपल्या प्राणासारखी जोपासना करतात.

चौ०–स्वारथ साँच जीव कहुँ एहा ।
मन-क्रम-बचन रामपद नेहा ।
सोइ पावन सोइ सुभग सरीरा ।
जो तनु पाइ भजिय रघुबीरा ।
रामबिमुख लहि बिधिसम देही ।
कबि कोबिद न प्रसंसहिं तेही ।

कायावाचामनेंकरून रामपदीं प्रेम करणें हाच प्राणिमात्रांचा खरा खरा स्वार्थ होय. तोच देह

पवित्र आणि सुंदर कीं जो प्राप्त झाला असतां रघुवीराची भक्ति घडेल ! ब्रह्मदेवासारखा जरी देह मिळाला आणि तो रामाशीं धट्टपणा चाळीत राहिला तर कवि आणि पंडित त्याची प्रतिष्ठा मानीत नाहींत.

रामभगति एहि तन उर जामी ।
ता तेँ मोहि परमप्रिय स्वामी ।
तजउँ न तनु निज इच्छा मरना ।
तनु बिनु बेद भजन नहिँ बरना ।

हे गरुडा ! रामभक्ति ह्याच देहांत माझ्या हृदयांत ठसली म्हणूनच तो मला ह्यावर फार गोड वाटतो. मी स्वेच्छामरणी आहे, परंतु हा देह सोडीत नाहीं, कारण वेद देखील देहावांचून भक्ति साध्य नाहीं हेंच सांगतात.

प्रथम मोह मोहि बहुत बिगोवा ।
रामबिमुख सुख कबहुँ न सोवा ।
नाना जनम करम पुनि नाना ।
किये जोग जप मख तप दाना ।
कवन जोनि जनमेउँ जहँ नाहीँ ।
मैँ खगेस भ्रमि भ्रमि जग माहीँ ।

प्रथमतः मलाहि मोहानें फार छळलें. रामविमुख मी सुखानें कधीं झोंप देखील घेतली नाहीं. मी अनेक जन्म घेतले आणि योग, जप, यज्ञ, तप, दान इत्यादि नाना साधनेंहि केलीं. हे गरुडा ! संसारांत भ्रमण करीत असतां अशी कोणती योनि आहे कीं जींत मीं जन्म घेतला नाहीं ?

देखेउँ सब करि करम गुसाईँ ।
सुखी न भयउँ अबहिँ की नाईं ।
सुधि मोहि नाथ जनम बहु केरी ।
सिवप्रसाद मति मोह न घेरी ।

हे स्वामिन् ! मीं सर्व कर्में आचरून पाहिलीं, परंतु आतांप्रमाणें सुखी कधींच झालों नव्हतों. हे नाथ ! मला माझ्या बहुतेक जन्मांची आठवण आहे, कारण श्रीशंकराच्या कृपेनें माझी बुद्धि मोहाच्या चक्रांत सांपडूं शकली नाहीं.

**दो०—प्रथम जनम के चरित अब कहउँ सुनहु बिहँगेस । सुनि प्रभु-पद-रति उपजइ जा तेँ मिटहिँ कलेस ॥१३७॥**

गरुडा ! मी आतां आपलें प्रथम जन्मचरित्र सांगतों तें तूं ऐकून घे. तें श्रवण केल्यानें प्रभूच्या पदीं प्रेम उत्पन्न होऊन क्लेशाचा परिहार होईल.

**दो०—पूरब कल्प एक प्रभु जुग कलिजुग मलमूल । नर अरु नारि अ-धर्म-रत सकलनिगम प्रतिकूल ॥ १३८ ॥**

स्वामिन् ! पूर्वीं एका कल्पांतल्या युगांतरांत पापमूलक असें एक कलियुग झालें. कलियुगांत प्रायः सर्वच स्त्रीपुरुष वेदबाह्य आणि अधर्मनिरत असतातच.

चौ०—तेहि कलिजुग कोसलपुर जाई ।
जनमत भयउँ सूद्रतनु पाई ।
सिवसेवक मन क्रम अरु बानी ।
आन देव निंदक अभिमानी ।
धन-मदमत्त परम बाचाला ।
उग्रबुद्धि उर दंभ बिसाला ।

त्या कलियुगांत अयोध्येंत मी शूद्रयोनींत जन्मास आलों. मी कायावाचामनानें शिवभक्त, पण मताभिमानामुळें मी इतर देवतांचा निंदक असे. मी धनमदानें उन्मत्त, अत्यंत वावदूक, तामसी आणि अंतर्यामीं महा दांभिक असा होतों.

जदपि रहेउँ रघु-पति रजधानी ।
तदपि न कछु महिमा तब जानी ।
अब जाना मैँ अवधप्रभावा ।
निगमागम पुरान अस गावा ।
कवनेहु जनम अवध बस जोई ।
रामपरायन सो पर होई ।

जरी मी रघुपतीच्या राजधानींत राहत होतों, तथापि मी तिचा महिमा मुळींच जाणीत नव्हतों. आतां मात्र मी अयोध्येचा प्रभाव समजून आहे. वेद, श्रुति आणि पुराणें हेंच प्रतिपादन करितात कीं, कोठेंहि जन्मलेला असो, जो कोणी अयोध्येंत वास करील, तो ततःपर रामभक्तिपरायणच होईल.

अवधप्रभाव जानि तब प्रानी ।
जब उर बसहिँ राम धनुपानी ।
सो कलिकाल कठिन उरगारी ।
पापपरायन सब नरनारी ।

अयोध्येचें माहात्म्य प्राण्यास जेव्हां कळतें तेव्हां त्याच्या हृदयांत धनुर्धर श्रीरामचंद्र वास करूं लागतात. असो. गरुडा ! कलिकाल म्हटला कीं फारच कठिण. सर्व स्त्रीपुरुषांची प्रायः पापाकडेच ओढ.

**दो०—कलिमल ग्रसे धर्म सब गुप्त भये सदग्रंथ । दंभिन्ह निज मति कलिप करि प्रगट किये बहु पंथ ॥ १३९ ॥**

कलिमलानें धर्माचा अवघाच पुसट होऊन, वेदादि सद्ग्रंथ लुप्त होतात आणि बुवाबाजीच्या स्वकपोलकल्पित अनेक सांप्रदायांचा बुजबुजाट होतो.

**दो०—भये लोग सब मोहबस लोभ ग्रसे सुभ कर्म। सुनु हरिजान ग्याननिधि कहउँ कछुक कलि धर्म ॥ १४० ॥**

सर्व लोक मोहग्रस्त होऊन लोभानें सर्व सत्कर्मांचा लोप व्हावयाचा. हे ज्ञाननिधे गरुडा ! कलीचीं लक्षणें त्रोटकच सांगतों तीं ऐक.

चौ०—बरन धरम नहिँ आस्रम चारी।
स्रुति-बिरोध-रत सब नरनारी।
द्विज स्रुतिबेचक भूप प्रजासन।
कोउ नहिँ मान निगम-अनु-सासन।
मारग सोइ जा कहँ जोइ भावा।
पंडित सोइ जो गाल बजावा।
मिथ्यारंभ दंभरत जोई।
ता कहँ संत कहहिँ सब कोई।

कलियुगांत चातुर्वर्ण्याश्रमधर्म नष्ट होऊन सर्व स्त्रीपुरुष वेदबाह्य आचरणांतच धन्यता मानतात. ब्राह्मण वेदविक्रय करणारे निपजून राजे झोटिंगशाहा बनतात. वेदाज्ञेस खुंटीवर बसविण्यांत येतें. ज्यास जो आवडेल तोच धर्ममार्ग, जो शेकचिल्ली तोच पंडित आणि जो लबाड आणि बुवाबाजी माजविणारा त्याचीच संत म्हणून महात्माई बोकाळते.

सोई सयान जो पर-धन-हारी।
जो कर दंभ सो बड आचारी।
जो कह झूठ मसखरी जाना।
कलिजुग सोइ गुनवंत बखाना।
निराचार जो स्रुतिपथ त्यागी।
कलिजुग सोइ ग्यानी बैरागी।
जा के नख अरु जटा बिसाला।
सोइ तापस प्रसिद्ध कलिकाला।

जो दुसऱ्याची तत्त्वमसि लुबाडील तोच मुत्सद्दी, जो दांभिक तोच आचार्य, आणि जो बकवाखोर आणि महामिसकील तोच कलींत गुणी आगाजला जातो. जो वेदमार्गाचा त्याग करून आचारशून्य होऊन वागेल,तोच कलींत ज्ञानी आणि विरक्त म्हणून महशूर होतो. ज्याचीं नखें आणि जटा लांबलचक, त्याचाच कलींत तपस्वी म्हणून गाजावाजा होतो.

**दो०—असुभ बेष भूषन धरें भच्छाभच्छ जे खाहिँ। तेइ जोगी तेइ सिद्ध नर पूज्य ते कलि-जुग माहिँ ॥ १४१ ॥**

अमंगल वेष आणि विकट भूषणें अंगावर घालून भक्ष्याभक्ष्य सर्व कांहीं फस्त करणारे जे लोक तेच कलींत योगी, तेच सिद्ध आणि तेच पूजनीय होतात.

**सो०—जे अपकारी चार तिन्ह कर गौरव मान्य तेइ। मन क्रम बचन लबार ते बकता कलिकाल महुँ ॥ १४२ ॥**

कलिकालांत दुसऱ्याचें [illegible] हिसकणारे गुप्त हेर त्यांचाच खूप बोलबाला होऊन तेच मोठे प्रतिष्ठित बनतात, आणि कायावाचामनानें जे लुच्चेलफंगे तेच वाचस्पति बनतात.

चौ०—नारिबिबस नर सकल गोसाईँ।
नाचहिँ नटमरकट की नाईँ।
सूद्र द्विजन्ह उपदेसहिँ ग्याना।
मेलि जनेऊ लेहिँ कुदाना।
सब नर काम-लोभ-रत क्रोधी।
बेद-बिप्र-गुरु-संत-बिरोधी।
गुनमंदिर सुंदर पति त्यागी।
भजहिँ नारि परपुरुष अभागी।

हे स्वामिन् ! सर्व पुरुष बाइलवेडे होऊन नट—मर्कटाप्रमाणें तिच्याभोंवतीं नाचत राहतात. शूद्र द्विजांना ज्ञानोपदेश करतात आणि गळ्यांत जानव्याचा लच्छा अडकवून कुश्चळ दानें घेतात. सर्व लोक कांचन व कंचनींत दंग होऊन क्रोधी, व वेद, विप्र, गुरु आणि संत यांचे हुकमी हाडवैरी बनतात. स्त्रिया अशा बदफैली निपजतात कीं, त्या परपुरुषाच्या नादीं लागून आपल्या सुस्वरूप व सुलक्षण पतीसहि उभा आंगठा दाखवितात.

सौभागिनी बिभूषनहीना।
बिधवन्ह के सिंगार नबीना।
गुरुसिष बधिर अंध कर लेखा।
एक न सुनहिँ एक नहिँ देखा।
हरइ सिष्यधन सोक न हरई।
सो गुरु घोर नरक महुँ परई।
मातु पिता बालकन्ह बोलावहिँ।
उदर भरइ सोइ धर्म सिखावहिँ।

सवाष्णी बायका ओकसल्याबोकसल्या असावयाच्या आणि विधवा मात्र सदा आलबेल्या आणि छान-छबील्या, गुरु व शिष्य परस्परांशीं बहिरे व आंधळे, एक ऐकत नाहीं तर दुसरा ढुंकत नाहीं, असा प्रकार असतो. गुरु शिष्याचें दुःख न आखुडतां द्रव्य मात्र लांबवितात. असल्या गुरूंस घोर नरकांत पचावें लागतें. जेणेंकरून हमेषा पोळी पिकत राहील तोच धर्म. त्यांतच आईबाप आपल्या मुलांना तरबेज करतात.

**दो०—ब्रह्मज्ञान बिनु नारि नर कहहिँ न दूसरि बात। कौडी लागि लोभबस करहिँ बिप्र-गुरु-घात ॥ १४२ ॥**

स्त्रीपुरुष ब्रह्मज्ञानाव्यतिरिक्त इतर गोष्टच करीत नाहींत आणि कवडीकवडीच्या लालचीनें गुरु व विप्र यांची गर्दन मारतात.

**दो०—बादहिँ सूद्र द्विजन्ह सन हम तुम्ह तेँ कछु घाटि। जानइ ब्रह्म सो बिप्रबर आँखि देखावहिँ डाँटि ॥१४३॥**

आम्ही तुम्हांपेक्षा काय कमी आहोंत? असा शूद्र ब्राह्मणांशीं वितंडवाद घालतात आणि ब्रह्म जाणील तोच ब्राह्मण असें म्हणून डोळे वटारून दर्डावतात देखील!

चौ०—परतिय लंपट कपट सयाने।
मोह द्रोह ममता लपटाने।
तेइ अभेदबादी ज्ञानी नर।
देखेउँ मैँ चरित्र कलिजुग कर।

परस्त्रीलंपट, कपटपटु, मोहद्रोहममताग्रस्त असे लोकच ज्ञानी आणि अद्वैत सिद्धांतवक्ते म्हणून मिरवतात कलियुगाचे हे खेळ मीं प्रत्यक्ष पाहून चुकलों आहे.

आप गये अरु औरनि घालहिँ।
जो कहुँ सतमारग प्रतिपालहिँ।
कल्प कल्प भरि एक एक नरका।
परहिँ जे दूखहिँ स्रुति करि तरका।
जे बरनाधम तेलि कुम्हारा।
स्वपच किरात कोल कलवारा।
नारि मुई घर संपति नासी।
मूँड मुडाइ होहिँ सन्यासी।
ते बिप्रन्ह सन पाँव पुजावहिँ।
उभय लोक निज हाथ नसावहिँ।

स्वतःतर बरबाद होतातच पण जर कोणी सन्मार्गानें पाऊल टाकीत असला तर त्यालाहि ते बरबाद करतात. हे वेदांची टवाळी करणारे एकेका नरकांत कल्पकल्पपर्यंत पचत रहातात. तेली, कुंभार, मांग, किरात, कोळी, कलार वगैरे हीन जातींचे लोक कुटुंब निवर्तल्यानंतर अगर घराची आणि घरांतल्या मायेची वाताहात झाल्यावर टाळकें तासवून संन्यासी बनतात आणि ब्राह्मणांकडून पाय पूजवून आपल्या हातानें आपण होऊन उभय लोकांला पारखे होतात.

बिप्र निरच्छर लोलुप कामी।
निराचार सठ बृषलीस्वामी।
सूद्र करहिँ जप तप ब्रत दाना।
बैठि बरासन कहहिँ पुराना।
सब नर कल्पित करहिँ अचारा।
जाइ न बरनि अनीति अपारा।

ब्राह्मण अक्षरशत्रु, लोचट, कामकरंड, आचारभ्रष्ट, नीच, आणि रखेलीचे प्राणनाथ बनतात. कलींतील शूद्र अनेक जप, तप, व्रतें व दानें करून व्यासपीठावरून पुराणें झोडतात. सर्व लोक बेदरकार वागतात आणि त्यांची बदानियत इतकी बेसुमार वाढते कीं बोलायची सोयच नसते.

**दो०—भये बरनसंकर सकल भिन्न सेतु सब लोग। करहिँ पाप पावहिँ दुख भय रुज सोक बियोग ॥ १४४ ॥**

कलींत सर्वच लोक जातपाततोडक आणि धर्मविच्छेदक असतात. म्हणूनच त्यांच्या पापांचा नतीजा भय, रोग, शोक आणि वियोग इत्यादि दुःखें भोगण्यांतच जिनगी टेर करतात.

**दो०—स्रुतिसंमत हरि-भक्ति-पथ संजुत बिरति बिबेक। तेहि न चलहिँ नर मोहबस कल्पहिँ पंथ अनेक ॥१४५॥**

वेदप्रणीत वैराग्यज्ञानयुक्त अशा भागवतमार्गानें न चालतां लोक लुच्चाईचे बारबंड धर्मसमाजमंडळें स्थापतात.

तोमर छंद—बहु दाम सँवारहिँ धाम जती।
बिषया हरि लीन गई बिरती।
तपसी धनवंत दरिद्र गृही।
कलिकौतुक तात न जात कही।

कलीची मौजच कांहीं और आहे. ती सांगतां कोठवर पुरवेल. कलींतले संन्यासी मंत्र जपणार ती

'ढवुर्ब्रह्मा ढवुर्विष्णु: ' इ. ते मठ बांधतील पण त्यांचा उपयोग करतील कुंटणखान्याचा, ते दास्यवितील तपाचार पण जोडतील गब्बर खजाना. अखेर वैराग्याशीं आणि त्यांच्याशीं अगदीं कायमचा वांधा पडलेला. म्हणूनच अखेर सारा कफल्लकपणा राहणार, तो मात्र बिचाऱ्या घरबारी माणसाकडेच.

कुलवंत निकारहिँ नारि सती ।
गृह आनहिँ चेरि निबेरि गती ।
सुत मानहिँ मातु पिता तब लोँ ।
अबला नहिँ डीठ परी जब लोँ ।
ससुरारि पियारि लगी जब तेँ ।
रिपुरूप कुटुंब भये तब तेँ ।
नृप पापपरायन धर्म नहीँ ।
करि दंड बिडंब प्रजा नितहीँ ।
धनवंत कुलीन मलीन अपी ।
द्विजचिन्ह जनेउ उघार तपी ।

कुलीन लोक आपल्या साध्वी स्त्रियांस गचांडी देऊन आणि लौकिक व परलोक यांस धाब्यावर बसवून दासी घरांत घालतील. मुलें जोंपर्यंत उजवून स्त्री त्यांच्या दृष्टीस पडली नाहीं तोंपर्यंतच आईबापांना विचारतील. एकदां कीं, त्यांना सासुरवाडीची चट लागली कीं, घरचीं माणसें दुष्मन वाटूं लागतील. राजे पापपरायण आणि हरफंदमौला असतील. ते नित्य झोटिंगशाही करून प्रजेची वारंवार पिळवणूक करतील. धनिक पापी असला तरी कुलीन समजला जाईल. ब्राह्मणाची खूण म्हणजे फक्त जानवें, आणि तपस्व्याची खूण ती नागडेपण.

नहिँ मान पुरानन्ह बेदहिँ जो ।
हरिसेवक संत सही कलि सो ।
कबिबृंद उदार दुनी न सुनी ।
गुन-दूषन-ब्रात न कोपि गुनी ।
कलि बारहिँ बार दुकाल परे ।
बिनु अन्न दुखी सब लोग मरे ।

कलींत जो वेदपुराणांस मान देणार नाहीं तोच खराखुरा संत आणि भगवद्भक्त. कविकुलांचा उपकारक ध्वनि कानांवरहि येणार नाहीं. नाहीं नाहीं तीं कोलिष्टकें चिटकविणाऱ्या व्रात्य मनुष्यांखेरीज कोणीच सद्गुणी म्हणून गणला जाणार नाहीं. कलींत वरचेवर दुष्काळ पडून सर्व लोक अन्नावांचून हायबाप करीत मरतील.

दो०–सुनु खगेस कलि कपट हठ दंभ द्वेष पाखंड । मान मोह मारादि मद ब्यापि रहे ब्रह्मंड ॥ १४६ ॥

हे गरुडा ! ऐक. कलीमध्यें कपट, हट्ट, दंभ, द्वेष, पाखंड, मान, मोह, मद, काम इत्यादि सर्व ब्रह्माण्डभर धुडगुस घालतील.

दो०–तामस धर्म करहिँ सब जप तप मख ब्रत दान । देव न बरषहिँ धरनि पर बये न जामहिँ धान ॥ १४७ ॥

सर्व दुनियेंत जप, तप, यज्ञ, व्रत व दान इत्यादि धर्म तामसीपणाचेच जारी राहतील. देव पृथ्वीवर पर्जन्यवृष्टि करणार नाहींत, आणि त्यामुळें लागवड करून देखील पिकाची हाकाटीच होत राहील.

तोटक–अबला कच भूषन भूरि छुधा ।
धनहीन दुखी ममता बहुधा ।
सुख चाहहिँ मूढ न धर्मरता ।
मति थोरि कठोरि न कोमलता ।
नर पीडित रोग न भोग कहीँ ।
अभिमान बिरोध अकारनहीँ ।
लघु जीवन संबत पंचदसा ।
कलपांत न नास गुमान असा ।
कलिकाल बिहाल किये मनुजा ।
नहिँ मानत कोउ अनुजा तनुजा ।

स्त्रियांची अख्खी बनबनावट फक्त केसांत; त्या अष्टौप्रहर भुकेनें वखवखलेल्या, बहुतेक पैपैशास मौताज, दुःखानें कुचंबलेल्या, तरीहि पण त्यांची मी–मी–ची कुतरओढ एकसारखी चालूंच. त्या सुखासाठीं तळमळतील मात्र, परंतु अकलेच्या खंक इतक्या कीं पाऊल टाकतील तें केव्हांहि आडवाटेनेंच. शिवाय अकलेच्या इतक्या मुर्दाड तरीहि पण खाष्टच जास्त, मनाच्या मुलाम त्या नसतीलच. पुरुष तरी रोगीच आणि म्हणून भोगास सर्वथा आंचवलेले, तरीहि पण त्यांची अकड मात्र इतकी बेसुमार कीं दुसऱ्याशीं खुटीउपाडपणा करण्यास अमुक एक कारण म्हणून त्यांस मुळीं नकोच. त्यांचें आयुर्मान पाहूं गेल्यास संकुचित इतकें कीं फार तर पन्नाशी म्हणजे अगदीं बस, पण त्यांचा गुमान मात्र एवढा चढवढीचा कीं एकपरी सारें जग नासेल पण ते मात्र आहेत तसेच कायम टिकतील. पाठची वा पोटची

हा विचार देखील त्यांस उरणें दुरापास्त. असे असे बुरे बुरे हाल हा कलीचा काल माणसांचे करील.

नहिँ तोष बिचार न सीतलता।
सब जाति कुजाति भये मँगता॥
इरषा परुखाच्छर लोलुपता।
भरि पूरि रहा समता बिगता।
सब लोग बियोग बिसोक हये।
बरनास्रम धर्म बिचार गये॥
दम दान दया नहिँ जानपनी।
जडता पर-बंचनताति-घनी।
तनपोषक नारि नरा सगरे।
परनिंदक ते जग मोँ बगरे।

कलींतल्या समाजांत संतोष, विचार आणि शांति यांच्या नांवानें सर्वत्र नन्नाचाच पाढा वाचलेला मिळणार. जात, बेजात, कुजात सर्वांनाच झोळीचे डोहाळे होत राहतील. हेवादावा, आगस्ताळेपणा, चोंबडेपणा वगैरे याचीच छाप समाजांच्या घडीवर बसलेली, आणि शिष्टाचारास खो मिळत असलेला आढळेल. सर्व समाज दरिद्र व दुःखानें प्रेतवत् वावरतील. वर्णाश्रमधर्म (आचारांतूनच काय, पण) विचारांतून देखील मावळतील. दम, दान आणि दया यांना पोथ्यांतून देखील हरताळ मिळेल. उडाणटप्पूपणा आणि ठगविद्या यांचाच बाजार गरम राहील. सरसकट पुरुष-बायका सरांस पोटपुजारी बनतील. अख्ख्या दुनियेंत एकच एक धंदा बोकळेल—आणि तो म्हणजे आगलावेपणाचा.

**दो०-सुनु ब्यालारि कराल कलि मल अवगुन आगार। गुनउँ बहुत कलिजुग कर बिनु प्रयास निस्तार॥ १४८॥**

हे गरुडा! ध्यानांत ठेव. कलिकाल हा भयंकर पापांचें आणि दुर्गुणांचें माहेरघर तर आहेच, परंतु त्या युगांत बरेच सद्गुणहि अजबच आहेत, आणि तेहि असे कीं त्यांत उद्धार होण्यास प्रयासच पडत नाहींत.

**दो०-कृतजुग त्रेता द्वापर पूजा मख अरु जोग। जो गति होइ सो कलि हरि नाम तेँ पावहिँ लोग॥ १४९॥**

कृतयुगांत अष्टांगयोगानें, त्रेतायुगांत यज्ञानुष्ठानानें आणि द्वापारांत देवतार्चनानें जी गति प्राप्त व्हावयाची ती गति कलियुगांत हरिनामानेंच लोकांस प्राप्त होते.

चौ०-कृतजुग सब जोगी बिज्ञानी।
करि हरिध्यान तरहिँ भव प्रानी।
त्रेता बिबिधजज्ञ नर करहीँ।
प्रभुहिँ समर्पि करम भव तरहीँ।
द्वापर करि रघु-पति-पद-पूजा।
नर भव तरहिँ उपाउ न दूजा।
कलिजुग केवल हरि-गुन-गाहा।
गावत नर पावहिँ भवथाहा।

कृतयुगांत सर्वच योगी आणि विज्ञानी असतात. त्यांत लोक भगवंताचें ध्यान करूनच भवांतून मुक्त होतात. त्रेतायुगांत मनुष्यें अनेक यज्ञ करतात आणि तीं भगवदर्पण करून भवांतून पार पडतात. द्वापारांत श्रीरामपदांचें पूजन करूनच नर भवांतून तरून जातो. त्यांत त्यापरतें इतर साधनच नसतें. कलियुगांत केवळ भगवद्गुणानुवादानेंच नर भवसागराचा ठाव घेतात.

कलिजुग जोग न जज्ञ न ज्ञाना।
एक अधार राम-गुन-गाना।
सब भरोस तजि जो भज रामहिँ।
प्रेमसमेत गाव गुनग्रामहिँ।
सोइ भव तर कछु संसय नाहीँ।
नामप्रताप प्रगट कलि माहीँ।
कलि कर एक पुनीत प्रतापा।
मानस पुन्य होइ नहिँ पापा।

कलियुगांत, योग, यज्ञ किंवा ज्ञान यांची गरजच नाहीं. एक रामगुणानुवाद हा आधार असला कीं बस. सर्व साधनें टाकून जे प्रेमसहित रामास शरण जाऊन त्यांचे गुणानुवाद गात राहतात तेच भव तरतात, ह्यांत किंचिन्मात्र देखील संशय नाहीं. कलींत नामाचा प्रभाव प्रत्यक्ष दिसतो. कलीचा एक आणखी पावन प्रभाव असाहि आहे कीं त्यांत मानसिक पाप तर लागत नाहींच पण मानसिक पुण्य मात्र घडल्याखेरीज रहात नाहीं.

**दो०-कलि-जुग-सम जुग आन नहिँ जो नर कर बिस्वास। गाइ राम-गुन-गन बिमल भव तर बिनहिँ प्रयास॥ १५०॥**

जर मनुष्य श्रद्धा ठेवील तर कलियुगासारखें श्रेष्ठ इतर युगच नाहीं. कारण केवळ विमल अशा

श्रीरामगुणांच्या गायनानेंच त्या युगांत तो अनायासें-करून संसारपार होऊं शकतो.

**दो०—प्रगट चारि पद धर्म के कलि महँ एक प्रधान । जेन केन बिधि दीन्हे दान करइ कल्यान ॥ १५१ ॥**

(सत्य, शौच, क्षमा, आणि दया) हे धर्माचे चार पाद प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं कलींत एकच (दया) हा मुख्य आहे. कोणत्याहि रीतीनें केलें तरी दान कल्याणच करील.

चौ०—नित जुग होहिँ धर्म सब केरे ।
हृदय राम–माया के प्रेरे ।
सुद्ध सत्व समता बिज्ञाना ।
कृत प्रभाव प्रसन्न मन जाना ।

रामाच्या मायेचा सनातन नियम आहे कीं, त्या त्या युगांत धर्म आणि अंत:करण यांच्या प्रवृत्त्या निरनिराळ्या असावयाच्या. शौच, सत्यप्रवृत्ति, समता आणि विज्ञान हा कृतयुगाचा प्रभाव म्हणून त्यांत चित्त प्रसन्न असतें.

सत्व बहुत रज कछु रति कर्मा ।
सब बिधि सुख त्रेता कर धर्मा ।
बहु रज सत्व स्वल्प कछु तामस ।
द्वापर धर्म हरष भव मानस ।
तामस बहुत रजोगुन थोरा ।
कलिप्रभाव बिरोध चहुँ ओरा ।

पुष्कळ सत्त्वगुण आणि किंचित् रजोगण ह्मणून कर्माचे ठायीं आसक्ति आणि सर्वप्रकारें सुखस्थिति हें त्रेतायुगाचें लक्षण होय. पुष्कळ रजोगुणांश, स्वल्प सत्त्वांश आणि किंचित् तमोगुणांश हें द्वापाराचें लक्षण, म्हणून त्यांत मनोवृत्ति सुखदुःखात्मक असतात. पुष्कळ तमोगुण आणि थोडासा रजोगुण हा कलि-धर्म, सर्वत्र विरोधप्रवृत्ति जी दिसून येते ती कलीच्या या प्रभावामुळेंच.

बुध जुगधर्म जानि मन माहीँ ।
तजि अधर्म रति धर्म कराहीँ ।
काल धर्म नहिँ ब्यापहिँ तेही ।
रघु–पति–चरन–प्रीति रति जेही ।
नटकृत कपट बिकट खगराया ।
नटसेवकहिँ न ब्यापइ माया ।

असा हा कलिधर्म मनांत समजूनच सुज्ञ लोक अधर्माचा त्याग करून धर्माचेठायीं अत्यासक्ति ठेव-तात. ज्याची रघुपतिचरणीं प्रीति आणि अनुरक्ति असते त्यास हे कलिकालाचे धर्मदेखील बाधक होऊं शकत नाहींत. गरुडा! उदाहरणार्थ बहुरूप्याचें सोंग त्यानें कितीहि तें बेमालुम बनविलें असलें, तरी त्या-च्या शागिर्दाला त्यानें भूल पडत नसतें.

**दो०—हरि–माया कृत दोष गुन बिनु हरिभजन न जाहिँ । भजिय राम सब काम तजि अस बिचारि मन माहिँ ॥१५२**

गुणदोष सर्व प्रभुमायानिर्मित होत. त्यांचा परमे-श्वराच्या भक्तीखेरीज ऱ्हास होणार नाहीं. असा विचार करून व सर्व वासनांचा त्याग करून रामाचेंच भजन करीत रहावें.

**दो०—तेहि कलिकाल बरष बहु बसेउँ अवध बिहगेस । परेउ दुकाल बिपतिबस तब मैं गयउ बिदेस ॥ १५३ ॥**

गरुडा! अशा त्या कलिकालांत पुष्कळ वर्षें मीं अयोध्येंतच घालविलीं. परंतु दुष्काळ पडला तेव्हां विप्रद्ग्रस्त होऊन मी देशोधडीस लागलों.

चौ०—गयेउँ उजेनी सुनु उरगारी ।
दीन मलीन दरिद्र दुखारी ।
गये काल कछु संपति पाई ।
तहँ पुनि करउँ संभुसेवकाई ।

गरुडा! ऐक. मी उज्जनीस गेलों तेव्हां मी दीन, मलिन, दरिद्री आणि दुःखी असा होतों. परंतु कालां-तरानें मी तेथेंच थोडीशी माया जोडली आणि फिरून शंकराची आराधना आरंभिली.

बिप्र एक बैदिक सिवपूजा ।
करइ सदा तेहि काज न दूजा ।
परमसाधु परमारथबिंदक ।
संभुउपासक नहिँ हरिनिंदक ।

तेथें एक वैदिक ब्राह्मण असे. तो नेहमीं शिवा-र्चन करी. त्यास इतर व्यापच नव्हता. तो महात्मा आत्मानुभवी असे. तो शिवोपासक असून देखील विष्णुद्वेष्टा नव्हता.

तेहि सेवउँ मैं कपटसमेता ।
द्विज दयाल अतिनीतिनिकेता ।

बाहिज नम्र देखि मोहि साईं।
बिप्र पढाव पुत्र की नाईं।

त्याची मीं सेवा करावी पण कपटानें. तो ब्राह्मण मात्र अतिच प्रेमळ आणि नीतीचें केवळ आगरच समज. गरुडा! माझी ती नकली नम्रता पाहून देखील तो मला पोटच्या पोराप्रमाणें पढवीत असे.

संभुमंत्र मोहि द्विजबर दीन्हा।
सुभउपदेस बिबिधबिधि कीन्हा।
जपउँ मंत्र सिवमंदिर जाई।
हृदय दंभ अहमिति अधिकाई।

त्या द्विजश्रेष्ठानें मला शिवदीक्षा दिली. अनेक प्रकारचा उत्तम उपदेशहि तो मला करी. त्या मंत्राचा जप मी शिवालयांत जाऊन करीत असे परंतु माझ्या मनात दंभ आणि अहंकार यांचाच जोर जास्त होत चालला.

**दो०—मैं खल मलसंकुल मति नीच जाति बस मोह। हरिजन द्विज देखे जरउँ करउँ बिष्णु कर द्रोह ॥ १५४ ॥**

आधींच दुष्ट, पापबुद्धि आणि हीनजाति असल्यामुळें अर्थातच मी उन्मत्त झालों. एखादा वैष्णव ब्राह्मण पाहतांच मी आग्यावेताळ बनत असे, कारण काय तर मी विष्णुद्वेष्टा म्हणून.

**सो०—गुरु नित मोहि प्रबोध दुखित देखि आचरन मम। मोहि उपजइ अतिक्रोध दंभिहि नीति कि भावई ॥ १५५ ॥**

माझी वृत्ति पाहून माझे गुरु कळवळत आणि मला वारंवार उपदेश करीत. पण मला त्याचा फारच संताप येई. दांभिकांस नीति रुचणारच कशी?

चौ०—एक बार गुरु लीन्ह बोलाई।
मोहि नीति बहु भाँति सिखाई।
सिवसेवा कै सुत फल सोई।
अ—बिरल—भगति रामपद होई।
रामहिँ भजहिँ तात सिव धाता।
नर पावँर कै केतिक बाता।
जासु चरन अज सिव अनुरागी।
तासु द्रोह सुख चहसि अभागी।

एके वेळीं मला गुरुजींनीं बोलावून उदंड बोध केला कीं—मुला! श्रीरामपदीं अविरत प्रेम उपजणें हेंच श्रीशंकराच्या उपासनेचें खरें सार्थक होय. बाळा! शिवब्रह्मादिक देखील रामाचीच भक्ति करितात. तेव्हां पामर मनुष्याचा पाड तो काय? ज्यांच्या चरणीं शिवब्रह्मादिक अनुरक्त त्या श्रीरामाचा द्वेष करून, तूं सुखाची इच्छा तरी करतोस कशी? छः छः! हें तर करंट लक्षण रे!

हर कहँ हरिसेवक गुरु कहेऊ।
सुनि खगनाथ हृदय मम दहेऊ।
अधम जाति मैं बिद्या पाये।
भयउँ जथा अहि दूध पिआये।

गुरुजी शंकरास विष्णुसेवक म्हणाले तें ऐकूनच, हे गरुडा! माझ्या मनाची अगदीं आग होऊन गेली. मी जातीचाच नीच, चार शब्द शिकल्यानें सर्पास दूध पाजल्याप्रमाणें माझें झालें.

मानी कुटिल कुभाग्य कुजाती।
गुरु कर द्रोह करउँ दिन राती।
अतिदयाल गुरु स्वल्प न क्रोधा।
पुनि पुनि मोहि सिखाव सुबोधा।

मानी, कुटिल, कुजाति, हतभागी असा मी रात्रंदिवस गुरूंशींच आटकाट पैदा करूं लागलों. परंतु गुरुजी मात्र अत्यंत लडिवाळ. ते मुळींदेखील न रागावतां मला वरचेवर बोधच करीत.

जेहि तें नीच बडाई पावा।
सो प्रथमहिँ हठि ताहि नसावा।
धूम अनलसंभव सुनु भाई।
तेहि बुझाव घनपदबी पाई।

ज्याच्या बळावर नीच प्रतिष्ठेस चढतो त्याचेंच तो प्रथम इरेस पेटून निःसंतान करतो. बाबा रे! धूम विस्तवापासूनच उत्पन्न होतो, परंतु तोच मेघाच्या स्थितीस पोंचल्यावर त्याच अग्नीला विझवितो.

रज मग परी निरादर रहई।
सब कर पगप्रहार नित सहई।
मरुत उडाइ प्रथम तेहि भरई।
नृपकिरीट पुनि नयनन्ह परई।

धूळ रस्त्यावर लोळत असते तेव्हां तिला किंमत नसते आणि ती सर्वांचेच पायांखालीं तुडविली जाते. परंतु ती वाऱ्यानें उंच गेली कीं आधीं राजाच्या मुकुटावर जाऊन बसते आणि नंतर त्याच्या डोळ्यांत भरून खुपूं लागते.

सुनु खग खगपति समुझि प्रसंगा।
बुध नहिँ करहिँ अधम कर संगा।
कवि कोविद गावहिँ असि नीती।
खल सन कलह न भल नहिँ प्रीती।
उदासीन नित रहिय गोसाईँ।
खल परिहरिय स्वान की नाईँ।

गरुडा ! ऐक. हींच प्रत्यंतरें लक्षांत आणून शहाणे लोक अधमाच्या वाऱ्यास उभे रहात नाहींत.कवि,पंडित इत्यादि अशीच नीति सांगतात कीं दुष्टाशीं वितुष्टहि चांगलें नाहीं व त्याची लगटहि बरी नाहीं. हे स्वामिन् ! कुत्र्याप्रमाणें खळास झिडकारीत असावें व त्याच्याशीं नेहमीं फटकूनच वागावें.

मैँ खल हृदय कपट कुटिलाई।
गुरु हित कहहिँ न मोहि सुहाई।

मी मनांतून दुष्ट, नष्ट आणि खाष्ट, म्हणून तर गुरूंचा हितोपदेश मला नुसती पिरपिर वाटे.

**दो०–एक बार हरमंदिर जपत रहेउँ सिव-नाम। गुरु आयउ अभिमान तेँ उठि नहिँ कीन्ह प्रनाम ॥ १५५ ॥**

एकदां मी शिवालयात शिवमंत्राचा जप करीत असतां गुरुजी आले, पण मी उर्मटपणानें उठलों तर नाहींच, पण त्यांस नमस्कारहि केला नाहीं.

**दो०–गुरु दयाल नहिँ कछु कहेउ उर न रोष लवलेस। अतिअघ गुरुअपमानता सहि नहिँ सके महेस ॥ १५६ ॥**

दयाळूच ते, गुरुजी कांहींएक बोलले नाहींत व त्यांच्या मनास मुळींदेखील राग शिवला नाहीं. परंतु गुरूंच्या अपमानामुळें घोर पातक मला घडलें. तें महादेवासच सहन झालें नाहीं.

चौ०–मंदिर माँझ भई नभबानी।
रे हतभाग्य अज्ञ अभिमानी।
जद्यपि तव गुरु के नहिँ क्रोधा।
अतिकृपाल उर सम्यक बोधा।
तदपि साप सठ देइहउँ तोही।
नीतिविरोध सुहाइ न मोही।

तेव्हां देवळाच्या गाभाऱ्यांतून आकाशवाणी झाली कीं–रे हतभाग्या, विक्षिप्ता, उन्मत्ता ! जरी तुझे गुरुजी कोपले नाहींत, कारण ते अतिद्रयार्द्र अंतःकरणाचे आणि पूर्ण ज्ञानी आहेत-तरी रे शठा ! मी तुला शाप देणार. कारण नीति विरोधलेली मला खपत नाहीं.

जौँ नहिँ दंड करउँ खल तोरा।
भ्रष्ट होइ स्रुतिमारग मोरा।
जे सठ गुरु सन इरषा करहीँ।
रौरव नरक कोटिजुग परहीँ।
त्रिजग जोनि पुनि धरहिँ सरीरा।
अयुत जनम भरि पावहिँ पीरा।

रे खळा ! जर मी तुला शासन करणार नाहीं तर माझा श्रुतिमार्गच भ्रष्ट होणार. शठा ! जे प्रत्यक्ष गुरूशींच आट खातात ते कोट्यवधि युगें रौरव नरकांत पचत रहातात आणि पुनः तिन्हींहि लोकांत अनेक योनींत जन्म घेऊन अयुत जन्मपर्यंत दुःखाचेच भोगवटे भोगत राहतात.

बैठि रहेसि अजगर इव पापी।
सर्प होहि खल मल मति ब्यापी।
महा–बिटप–कोटर महँ जाई।
रहु अधमाधम अधगति पाई।

हे पाप्या ! तूं अजगराप्रमाणें स्वस्थ बसून राहिलास ह्मणून तूं अजगरच होशील. दुष्टा ! तुझ्या बुद्धीवर मलाचे लेप चढले आहेत. तूं अतःपर महावृक्षाच्या ढोलींत जाऊन रहाशील, आणि रे अधमाधमा ! अधोगतिहि पावशील !

**दो०–हाहाकार कीन्ह गुरु दारुन सुनि सिवस्राप। कंपित मोहि बिलोकि अति उर उपजा परिताप ॥ १५७ ॥**

तो अत्युग्र शिवशाप ऐकतांच गुरुजी हाहाःकार करूं लागले, व मला भयकंप झालेला पाहून त्यांचें मन अतिशयच हळहळलें.

**दो०–करि दंडवत सप्रेम द्विज सिव सनमुख कर जोरि। बिनय करत गदगद गिरा समुझि घोरगति मोरि ॥ १५८ ॥**

गुरुजींनीं साष्टांग दंडवत घातलें आणि माझी भयंकर अधोगति लक्षांत आणून ते काकुळतीनें शंकरासमोर हात जोडून गदगद वाणीनें प्रार्थना करूं लागले:—

नमामीशमीशाननिर्वाणरूपम् ।
विभुं व्यापकं ब्रह्म वेदस्वरूपम् ॥
निजं निर्गुणं निर्विकल्पं निरीहम् ।
चिदाकाशमाकाशवासं भजेऽहम् ॥
निराकारमोङ्कारमूलं तुरीयम् ।
गिराज्ञानगोतीतमीशं गिरीशम् ॥
करालं महाकालकालं कृपालम् ।
गुणागारसंसारपारं नतोऽहम् ॥
तुषाराद्रिसंकाशगौरं गभीरम् ।
मनोभूतकोटिप्रभाश्रीशरीरम् ॥
स्फुरन्मौलिकल्लोलिनी चारुगङ्गा ।
लसद्भालबालेन्दु कण्ठे भुजङ्गा ॥
चलत्कुण्डलं शुभ्रनेत्रं विशालम् ।
प्रसन्नाननं नीलकण्ठं दयालम् ॥
मृगाधीशचर्म्माम्बरं मुण्डमालम् ।
प्रियं शङ्करं सर्वनाथं भजामि ॥
प्रचण्डं प्रकृष्टं प्रगल्भं परेशम् ।
अखण्डं अजं भानुकोटिप्रकाशम् ॥
त्रयःशूलनिर्मूलनं शूलपाणिम् ।
भजेऽहं भवानीपतिं भावगम्यम् ॥
कलातीतकल्याणकल्पान्तकारी ।
सदा सज्जनानन्ददाता पुरारी ॥
चिदानन्दसन्दोहमोहापकारी ।
प्रसीद प्रसीद प्रभो मन्मथारी ॥
न यावद् उमानाथपादारविन्दम् ।
भजन्तीह लोके परे वा नराणाम् ॥
न तावत्सुखं शान्तिसन्तापनाशम् ।
प्रसीद प्रभो सर्वभूताधिवासम् ॥
न जानामि योगं जपं नैव पूजाम् ।
नतोऽहं सदा सर्वदा शम्भु तुभ्यम् ॥
जराजन्मदुःखौघतातप्यमानम् ।
प्रभो पाहि आपन्नमामीश शम्भो ॥

हे ईश! ईशान, आनंदस्वरूप, विभु, व्यापक, परब्रह्म, वेदस्वरूप, स्वयंभू, निर्गुण, निर्विकल्प, निरीह, चिदाकाश, आकाशवासी अशा तुला मी शरण येऊन वंदन करतों. हे निराकार! ओंकाररूप, तुरीयस्वरूप, गिरा, ज्ञान, आणि इंद्रिय यांच्या अतीत, ईश्वर, कैलासनाथ, रुद्रस्वरूप, कराल, महाकालान्तक, कृपाल, गुणनिधान, संसारपार अशा तुला मी नमन करतों. हिमाद्रीप्रमाणें गौर, गंभीर, ज्याचें शरीर कोटिमदनांप्रमाणें सुंदर, ज्याच्या दैदीप्यमान मस्तकाचे ठायीं रमणीय जान्हवी खळखळते, ज्याच्या भालप्रदेशीं बालचंद्रमा प्रकाशित होतो, ज्याच्या कंठभागीं भुजंगहार, ज्याचीं कुंडलें आंदोलित होत आहेत, असा शुभ्रनयन, विशाल, प्रसन्नवदन, नीलकंठ, दयाळ, शार्दूलचर्मांबर, मुंडमाल, प्रियकर, शंकर, विश्वनाथ असा जो तूं, त्या तुला मी शरण आहे. प्रचंड, प्रकृष्ट, प्रगल्भ, परावाणीचा अधिपति, अखंड, अज, सूर्यकोटिसमप्रभ, त्रिविधतापनाशन, शूलपाणि, भवानीरमण, सद्भावगम्य, अशा तुला मी शरण आहे. कल्याणकारी, कल्पांतक, सज्जनानंददाता, त्रिपुरारी, चिदानंदात्मक, मोहविभंजक, मन्मथशत्रु अशा तुला मी शरण आहे. प्रभो ! मजवर प्रसन्न होऊन प्रसाद करावा. हे उमारमणा ! जोंपर्यंत लोक आपल्या चरणारविंदीं शरण आले नाहींत तोंपर्यंत त्यांना सुख, शांति आणि क्लेशनाश इहलोकीं अगर परलोकीं प्राप्त होतच नाहींत. हे सर्वभूतांतर्यामी प्रभो ! मजवर अनुग्रह व्हावा. हे शंभो ! मी योग, जप, पूजा इत्यादि जाणीत नाहीं. सदासर्वदा मी आपणांसच शरण आहे. जरा, जन्म इत्यादि दुःखांच्या ओघानें तप्त झालेला आणि विपद्ग्रस्त असा जो मी त्या माझें, हे प्रभो! शंभो! ईश्वरा! रक्षण करावें.

श्लोक—रुद्राष्टकमिदं प्रोक्तं विप्रेण हरतोषये ।
ये पठन्ति नरा भक्त्या तेषां शम्भुः प्रसीदति ॥

श्रीशंकराच्या संतोषार्थ विप्रानें उदीरित असें हें रुद्राष्टक जे जन भक्तीनें पठण करतील त्यांजवर श्रीशंकर कृपा करतील.

**दो०–सुनि बिनती सर्बज्ञ सिव देखि बिप्र-अनुरागु । मंदिर नभबानी भई द्विजबर अब बर माँगु ॥ १५९ ॥**

सर्वज्ञ श्रीशंकरांनीं विप्राचा विनय आणि त्याची ती भक्ति पाहिली, आणि देवळांत आकाशवाणी झाली कीं, हे द्विजवरा ! वर माग.

**दो०–जौं प्रसन्न प्रभु मो पर नाथ दीन पर नेहु । निजपद-पद्म-भगति दृढ पुनि दूसर बर देहु ॥ १६० ॥**
**तव मायाबस जीव जड संतत फिरहिँ भुलान । तेहि पर क्रोध न करिय प्रभु कृपासिंधु भगवान ॥ १६१ ॥**

( तेव्हां विप्र म्हणाला )—' प्रभु जर मजवर प्रसन्न आहेत आणि नाथांचें जर मज दीनावर प्रेम आहे तर मला आपल्या पदकमलांची अढळ भक्तीच द्यावी. आणि प्रभुवरा ! हे कृपासिंधो, भगवन् प्रभो ! आपल्या मायेनें बद्ध झालेला हा अज्ञानी जीव विक्षिप्त बनून निरंतर भ्रमण करीत असतो. त्याजवर आपण क्रोध न करावा हेंहि आणखी एक माझें चोज पुरवावें.

दो०-संकर दीनदयाल अब एहि पर होहु कृपाल। सापअनुग्रह होइ जेहि नाथ थोरही काल ॥१६२॥

हे दीनदयाळ, नाथ, श्रीशंकरप्रभो ! अल्पावकाशांतच जेणेंकरून शापानुग्रह होईल अशी ह्याचेवर कृपा करावी.

चौ०-एहि कर होइ परमकल्याना।
सोइ करहु अब कृपानिधाना।
बिप्रगिरा सुनि पर-हित-सानी।
एवमस्तु इति भइ नभबानी।
जदपि कीन्ह यह दारुन पापा।
मैँ पुनि दीन्ह कोप करि सापा।
तदपि तुम्हार साधुता देखी।
करिहउँ एहि पर कृपा बिसेखी।

जेणेंकरून ह्याचें परमकल्याण होईल असेंच आपण कृपाघनांनीं आतां केलें पाहिजे.' परोपकारपूर्ण अशी ती विप्रवाणी ऐकून फिरून आकाशवाणी झाली— " तथास्तु. ह्यानें जरी घोर पातक केलें आहे आणि जरी मी त्यास कोपून शाप दिला आहे तरी तुझें सौजन्य पाहून मी त्याचेवर विशेष अनुग्रह करितों.

छमासील जे परउपकारी।
ते द्विज मोहि प्रिय जथा खरारी।
मोर साप द्विज व्यर्थ न जाइहि।
जनम सहस्र अवसि यह पाइहि।
जनमत मरत दुसह दुख होई।
एहि स्वल्पउ नहिँ ब्यापिहि सोई।
कवनेहु जनम मिटिहि नहिँ ग्याना।
सुनहि सूद्र मम बचन प्रमाना।

हे ब्राह्मणा ! क्षमाशील आणि परोपकारी मला श्रीरामतुल्य प्रिय असतात. हे ब्रह्मन्, माझा शाप वृथा जाणार नाहीं. ह्यास हजार जन्म अलबत होतीलच. मात्र जन्ममरणाचें दुःख असह्य असतें, तें ह्याला अल्पहि भोगावें लागणार नाहीं. याचें पूर्वजन्मज्ञान कोणत्याहि देहांत नष्ट होणार नाहीं. हे शूद्रा ! माझें हें वज्रलेप वाक्य ऐकून ठेव.

रघु-पति-पुरी जनम तव भयऊ।
पुनि तैँ मम सेवा मन दयऊ।
पुरीप्रभाव अनुग्रह मोरे।
रामभगति उपजिहि उर तोरे।

तुझा जन्म अयोध्येंत झाला. फिरून तूं माझ्या सेवेंत मन घातलेंस. अयोध्येच्या प्रभावानें व माझ्या प्रसादानें तुझ्या अंतःकरणांत रामभक्ति उपजेल.

सुनु मम बचन सत्य अति भाई।
हरितोषक ब्रत द्विजसेवकाई।
अब जनि करहि बिप्रअपमाना।
जानेसु संत अनंतसमाना।
इंद्रकुलिस मम सूल बिसाला।
कालदंड हरिचक्र कराला।
जो इन्ह कर मारा नहिँ मरई।
बिप्र-द्रोह-पावक सो जरई।

बाबा रे ! आतां तरी माझें वचन ऐक आणि त्याजवर विश्वास ठेव. परमेश्वरास संतुष्ट करण्यास ब्राह्मणसेवा हेंच काय तें एक व्रत आहे. अतःपर ब्राह्मणांचा अवमान करूं नकोस. त्यांना संत आणि परमेश्वरासमान लेखीत जा. इंद्राचें वज्र, माझा विशाल त्रिशूल, यमाचा दंड, महाविष्णूचें तीव्रतर सुदर्शन, ह्यांच्याहि मारानें जो कोणी मरत नसेल, तो ब्रह्मद्वेषरूप अग्नीनें भस्मसात् झालाच समज.

अस बिबेक राखेहु मन माहीँ।
तुम्ह कहँ जग दुर्लभ कछु नाहीँ।
अउरउ एक आसिषा मोरी।
अ-प्रति-हत गति होइहि तोरी।

असा निश्चय मनांत ठेव म्हणजे तुला जगांत दुर्लभ म्हणून कांहींच उरणार नाहीं. आणखीहि एक माझा तुला आशीर्वाद आहे कीं, तुझी गति अकुंठित राहील."

दो०-सुनि सिवबचन हरषि गुरु एवमस्तु इति भाखि। मोहि प्रबोधि गयउ गृह संभुचरन उर राखि ॥ १६३ ॥

ती शिववाणी ऐकून गुरुजींस आनंद झाला आणि ते 'एवमस्तु' म्हणाले. नंतर मला बोध करून ते शंभुचरणांचें हृदयांत ध्यान करीत गृहाप्रत गेले.

**दो०—प्रेरित काल बिंधिगिरि जाइ भयउँ मैं ब्याल। पुनि प्रयास बिनु सो तनु तजेउँ गये कछु काल ॥ १६४ ॥**

कालगतीनें मी विंध्यपर्वतावर अजगर होऊन पडलों. नंतर थोड्याच काळानें तोहि देह अनायासेंच सुटला.

**दो०—जोइ तन धरउँ तजउँ पुनि अनायास हरिजान। जिमि नूतन पट पहिरइ नर परिहरइ पुरान॥ १६५ ॥**

हे गरुडा! मनुष्य ज्याप्रमाणें जुनें वस्त्र टाकून नवें वस्त्र परिधान करतो तद्वत् मी एक देह घ्यावा आणि तो अनायासें टाकावा.

**दो०—सिव राखी स्रुतिनीति अरु मैं नहिं पाव कलेस। एहि बिधि धरेउँ बिबिध तनु ग्यान न गयउ खगेस ॥ १६६ ॥**

श्रीशंकरांनीं वेदमार्गाचें रक्षण केलें आणि मीहि क्लेशमुक्त झालों. हे गरुडा! ह्याप्रमाणें मीं अनेक देह घेतले तरी माझी स्मृति कायमच होती.

चौ०—त्रिजग देव नर जो तनु धरऊँ।
तहँ तहँ रामभजन अनुसरऊँ।
एक सूल मोहि बिसर न काऊ।
गुरु कर कोमल सील सुभाऊ।

देव, नर इत्यादि जेवढे म्हणून त्रैलोक्यांत माझे जन्म झाले त्या सर्व जन्मांत मीं रामभजनच करीत असावें. माझ्या हृदयांत एक शल्य मात्र सदैव डाचत होतें. तें मात्र मीं कधींच विसरलों नाहीं. तें म्हणजे गुरुजींचा कोमल आणि सौम्य स्वभाव.

धरमदेह मैं द्विज कै पाई।
सुरदुर्लभ पुरान स्रुति गाई।
खेलउँ तहाँ बालकन्ह मीला।
करउँ सकल रघुनायक लीला।

शेवटीं मला देवांसहि दुर्लभ आणि श्रुतिपुराणस्तुत असा ब्राह्मणाचा धर्मदेह मिळाला. त्यांतहि मीं मुलांबरोबर खेळ खेळतांना रघुपतीच्याच सर्व लीला कराव्या.

प्रौढ भये मोहि पिता पढावा।
समुझउँ सुनउँ गुनउँ नहिं भावा।
मन तें सकल बासना भागी।
केवल रामचरन लय लागी।

प्रौढ झाल्यावर मला पित्यानें पढवावें. मी तें समजत असे 'ऐकून घेत असे व त्याचें मननहि करीत असे. परंतु तें मला रुचत नसे. (कारण) माझ्या मनांतून सर्व वासना नष्ट झाल्या होत्या आणि मला फक्त रामचरणांचाच ध्यास लागला होता.

कहु खगेस अस कवन अभागी।
खरी सेव सुरधेनुहि त्यागी।
प्रेममगन मोहि कछु न सुहाई।
हारेउ पिता पढाइ पढाई।

हे गरुडा! सांग बरें, असा कोण करंटा असेल कीं जो कामधेनूचा अव्हेर करून गाढवीची शुश्रूषा करील! प्रेममग्नतेमुळें मला कांहींच बरें वाटेना. मला शिकवून शिकवून अखेरीस माझे बाबा अगदीं टेकीस आले.

भये कालबस जब पितु माता।
मैं बन गयउँ भजन जनत्राता।
जहँ जहँ बिपिन मुनीस्वर पावउँ।
आस्रम जाइ जाइ सिरु नावउँ।
बूझउँ तिन्हहिं राम-गुन-गाहा।
कहहिं सुनउँ हरषित खगनाहा।

कालांतरानें आईबाप निवर्तल्यानंतर मीं जनपालक प्रभूंचें भजन करण्यासाठीं वनांतर केलें. ज्या ज्या ठिकाणीं मला मुनीश्वर भेटत तेथें तेथें त्यांच्या आश्रमांत जाऊन मीं त्यांस वंदन करावें आणि रामगुणगाथा त्यांना विचाराव्या. हे गरुडा! त्या त्यांनीं मला सांगाव्या आणि मीं आनंदानें ऐकाव्या.

सुनत फिरउँ हरिगुन अनुबादा।
अ-ब्याहत-गति संभुप्रसादा।
छूटी त्रिबिधि ईषना गाढी।
एक लालसा उर अति बाढी।
राम-चरन बारिज जब देखउँ।
तब निजजनम सुफल करि लेखउँ।

मीं श्रीहरीचे गुणानुवाद ऐकत फिरत रहावें. कारण श्रीशिवप्रसादेंकरून माझी गति अकुंठित होती. पुत्र, कलत्र आणि वित्त ह्या तिन्हींहि बलवत्तर ईषणा माझ्या गळाल्या होत्या, परंतु मनांत एक इच्छा मात्र फारच प्रबळ होती. ती ही कीं जेव्हां मला श्रीराम-

चरणकमलांचें दर्शन घडेल तेंव्हांच मी आपल्या जन्माचें सार्थक समजेन.

जेहि पूछहुँ सोइ मुनि अस कहई ।
ईस्वर सर्ब-भूत-मय अहई ।
निर्गुन मत नहिँ मोहि सुहाई ।
सगुन ब्रह्मरति उर अधिकाई ।

ज्या मुनीस विचारावें तो हेंच सांगे कीं ईश्वर सर्वभूतात्मक आहे. निर्गुण सिद्धांत मला रुचेना. माझ्या मनाची ओढ सगुणब्रह्माकडेच अधिक असे.

**दो०-गुरु के बचन सुरति करि रामचरन मन लाग । रघु-पति जस गावत फिरउँ छन छन नव अनुराग ॥ १६७ ॥**

गुरुजींचें वचन स्मरत असल्यामुळें माझें मन फक्त रामचरणींच लागे. म्हणून मीं राघवाचेंच यश गात फिरावें व तेणेंकरून मला प्रतिक्षणीं नवीन नवीन प्रेम व्हावें.

**दो०-मेरुशिखर बटछाया मुनि लोमस आसीन। देखि चरन सिरु नायउँ बचन कहेउँ अतिदीन ॥ १६८ ॥**

मेरुशिखरावर वटवृक्षाच्या छायेखालीं बसलेले लोमशऋषि माझ्या दृष्टीस पडले. त्यांचे चरण वंदन करून अत्यंत दीनवाणीनें मीं त्यांच्याशीं संभाषण केलें.

**दो०-सुनि मम बचन बिनीत मृदु मुनि कृपाल खगराज । मोहि सादर पूछत भये द्विज आयउ केहि काज ॥ १६९ ॥**

माझें विनीत व मृदु भाषण ऐकून, हे गरुडा ! ते कृपालु मुनि मला आदरानें विचारूं लागले कीं—हे द्विजा ! तूं काय उद्देशानें येथें आलास ?

**दो०-तब मैँ कहा कृपानिधि तुम्ह सर्बज्ञ सुजान । सगुन ब्रह्म आराधना मोहि कहहु भगवान ॥ १७० ॥**

तेंव्हां मी म्हणालों—हे कृपानिधान ! आपण सुज्ञ आणि सर्वज्ञ आहांत. हे भगवन् ! सगुण ब्रह्माची उपासना मला कथन करावी.

चौ०-तब मुनीस रघु-पति-गुन-नाथा ।
कहे कछुक सादर खगनाथा ।
ब्रह्म-ज्ञान-रति मुनि बिज्ञानी ।
मोहि परम अधिकारी जानी ।

तेंव्हां, हे गरुडा ! मुनिवरांनीं मोठ्या आदरानें रघुपतिगुणलीला किंचित् वर्णन केल्या. ते मुनींद्र ब्रह्मज्ञानरत आणि अनुभवी असत. पण ते मलाहि मोठाच अधिकारी समजूं लागले.

लागे करन ब्रह्मउपदेसा ।
अज अद्वैत अगुन हृदयेसा ।
अकल अनीह अनाम अरूपा ।
अनु-भव-गम्य अखंड अनूपा ।
मनगोतीत अमल अबिनासी ।
निर्बिकार निरवधि सुखरासी ।
सो तैँ ताहि तोहि नहिँ भेदा।
बारि बीच इव गावहिँ बेदा ।

ते मला ब्रह्माचें निरूपण करीत म्हणाले—अज, अद्वैत, निर्गुण, हृदयाधीश, अनाकलनीय, निरिच्छ, नामरूपरहित, अनुभवगम्य, अखंड, अनुपमेय, मनादिइंद्रियांहून पर, मलरहित, अविनाशी, निर्विकार, अनंत, सुखनिधान असें जें ब्रह्म तेंच तूं आहेस. जल व तरंग यांप्रमाणें त्यांत व तुझ्यांत मुळींच भेद नाहीं- असें वेद सांगतात.

बिबिध भाँति मुनि मोहि समुझावा ।
निर्गुनमत मम हृदय न आवा ।
पुनि मैँ कहेउँ नाइ पद सीसा ।
सगुनउपासन कहहु मुनीसा ।

मुनींनीं माझी परोपरीनें समजूत घातली, परंतु तो अद्वैतसिद्धांत माझ्या मनांत ठसेना. तेव्हां मी त्यांस वंदन करून म्हणालों—हे मुनीश्वरा ! मला आपण सगुण उपासनाच सांगावी.

राम-भगति-जल मम मन मीना ।
किमि बिलगाइ मुनीस प्रबीना ।
सो उपदेस करहु करि दाया ।
निज नयनन देखउँ रघुराया ।
भरि लोचन बिलोकि अवधेसा ।
तब सुनिहउँ निर्गुनउपदेसा ।

माझा मनोरूप मासा रामभक्तिरूप जलापासून, हे ज्ञानवंत मुनीश्वरा ! कसा अलग पडेल ? कृपा करून आपण मला उपदेश तोच करा कीं जेणेंकरून मला माझ्या डोळ्यांनीं रघुवीरांना पाहतां येईल. त्या

अयोध्याधीशास मी डोळाभर पाहीन. मग आपला अद्वैतबोध कानावर घेईन.

मुनि पुनि कहि हरिकथा अनूपा ।
खंडि सगुनमत निर्गुनरूपा ।
तब मैं निर्गुनमति करि दूरी ।
सगुन निरूपउँ करि हठ भूरी ।

मुनींनीं पुनः अप्रतिम हरिकथा वर्णन केल्या. पण सगुणमताचें खंडन करून त्यांनीं निर्गुणाचेंच मंडन केलें. तेव्हां मीहि अगदीं एकरुखेपणानें सगुणनिरूपण करून निर्गुणमताचा उच्छेद करूं लागलों.

उत्तर प्रतिउत्तर मैं कीन्हा ।
मुनितन भये क्रोध के चीन्हा ।
सुनु प्रभु बहुत अवज्ञा किये ।
उपज क्रोध ज्ञानिहु के हिये ।
अति संघरषन जौं कर कोई ।
अनल प्रगट चंदन तें होई ।

मीं उत्तरांस प्रत्युत्तरें दिलीं त्यामुळें मुनींच्या चेहऱ्यावर रागाचीं चिन्हें उमटलीं. हे स्वामिन्! ऐक. फार उद्दामपणा झाला म्हणजे ज्ञानी जनांच्याहि मनांत क्रोध संचरतोच. घर्षणच जर कोणी करीत राहील तर चंदनाच्या लांकडांतून देखील अग्नि प्रकट व्हावयाचाच.

**दो०—बारंबार सकोप मुनि करइ निरूपन ज्ञान। मैं अपने मन बैठि तब करउँ बिबिध अनुमान ॥ १७१ ॥**

मुनि वारंवार क्रुद्ध होऊन अद्वैतसिद्धांतच प्रस्थापूं लागले. तेव्हां मी स्तब्ध होऊन मनांत निरनिराळे तर्क करूं लागलोंः—

**दो०—द्वैत बुद्धि बिनु क्रोध किमि द्वैत कि बिनु अज्ञान। मायाबस परिछिन्न जड जीव कि ईससमान ॥ १७२ ॥**

द्वैत भावनेखेरीज क्रोध कसा शक्य आहे? अज्ञानाखेरीज द्वैत कसें असूं शकेल? मायेच्या अंकित असणारा आणि तिनें व्यास झालेला हा अज्ञानी जीव ईश्वराच्या साम्यतेला कसा जाऊन पोंचणार?

चौ०—कबहुँ कि दुख सब कर हित ता के ।
तेहि कि दरिद्र परसमनि जाके ।
परद्रोही कि होइ निःसंका ।
कामी पुनि कि रहहि अकलंका ।
बंस कि रह द्विज अनहित कीन्हे ।
कर्म कि होहिँ स्वरूपहिँ चीन्हे ।
काहू सुमति कि खल सँग जामी ।
सुभगति पाव कि पर-त्रिय-गामी ।
भव कि परहिँ परमातमबिंदक ।
सुखी कि होहिँ कबहुँ परनिंदक ।

सर्वांचेंच हित करणारा कधींतरी दुःखी होईल काय? ज्याचे जवळ परीस तो दरिद्री असूं शकेल काय? परद्रोही कधीं तरी निर्धास्त असेल? तसेंच कामलंपट निष्पाप राहूं शकेल काय? ब्रह्मच्छल करून वंश टिकावा कसा? स्वरूपाची ओळख पटल्यानंतर कर्म उरेल काय? दुष्टसंगतींत कोणास तरी सुबुद्धि उपजेल काय? परस्त्रीगामी सद्गति पावेल काय? ब्रह्मवेत्ता संसारांत फसेल काय? भकाद्या करणारा कधींतरी सुखी असेल काय?

राज कि रहइ नीति बिनु जाने ।
अघ कि रहइ हरिचरित बखाने ।
पावन जस कि पुन्य बिनु होई ।
बिनु अघ अजस कि पावइ कोई ।
लाभ कि कछु हरि–भगति–समाना ।
जेहि गावहिँ स्रुति संत पुराना ।
हानि कि जग एहि सम कछु भाई ।
भाजिय न रामहिँ नरतनु पाई ।
अघ कि पिसुन तामस कछु आना ।
धर्म कि दयासरिस हरिजाना ।

नीतीस न जुमानतां राजसत्ता टिकाव धरील काय? हरिगुणानुवादानें पातकें उरतील काय? पुण्याखेरीज सद्यश मिळेल काय? पातकांखेरीज कोणास तरी अपयश येईल काय? संत, श्रुति व पुराणें प्रतिपादन करतात त्या भक्तीसारखा कोणता तरी लाभ आहे काय? नरदेह प्राप्त झाल्यावरहि रामचंद्राचें भजन न घडणें ह्यासारखी, बाबा रे! जगांत कोणती तरी हानि आहे काय? द्वाडपणा आणि दंडेली ह्यांसारखें पातक इतर कोणतें तरी आहे काय? हे गरुडा! परोपकारतुल्य धर्म तरी आहे काय?

एहि बिधि अमित जुगुति मन गुनऊँ ।
मुनिउपदेस न सादर सुनऊँ ।
पुनि पुनि स-गुन-पच्छ-मैं रोपा ।
तब मुनि बोले बचन सकोपा ।

ह्याप्रमाणें माझ्या मनाचीं अनेक तर्कटें चाललीं. मुनींचा उपदेश मीं ऐकला, पण तो मला पटेना. मी

पुनःपुनः सगुणाचाच पक्ष उचलून धरूं लागलों तेव्हां मुनि चिडीस येऊन म्हणाले:—

मूढ परम सिख देउँ न मानसि ।
उत्तर प्रतिउत्तर बहु आनसि ।
सत्यबचन बिस्वास न करही ।
वायस इव सबही तेँ डरही ।
सठ स्वपच्छ तव हृदय बिसाला ।
सपदि होहु पच्छी चंडाला ।

विक्षिप्ता! मी तथ्यबोध करीत आहे आणि तूं तो उच्छेदीत आहेस, आणि नुसत्या सारख्या वाह्यात कोट्या मात्र करतोंस. सत्य सिद्धांतावर विश्वासहि ठेवीत नाहींस आणि काकाप्रमाणें सर्वांवरच कोकावतोस मात्र.'मेरे मुर्गीको एक हि टांग' म्हणणाऱ्या दुष्टा, तूं आताच्या आतांच चांडालपक्षी (कावळा) हो.

लीन्ह साप मैँ सीस चढाई।
नहिँ कछु भय न दीनता आई।

तो शाप मीं शिरसावंद्य केला. त्याची मला भीति किंवा खंत बिलकुल वाटली नाहीं.

दो०—तुरत भयउ मैँ काग तब पुनि मुनि-
पद सिरु नाइ । सुमिरि राम रघु-बंस-
मनि हरषित चलेउ उडाइ ॥ १७३ ॥

तेव्हां मी तत्काळ कावळा झालों आणि मुनींच्या पायांवर मस्तक नमवून रामस्मरण करीतच आनंदानें भराऱ्या मारीत निघालों.

दो०—उमा जे राम-चरन-रत बि-गत-काम-
मद-क्रोध । निज प्रभुमय देखहिँ जगत
केहि सन करहिँ बिरोध ॥ १७४ ॥

(शंकर म्हणतात) हे पार्वति! जे रामचरणींच रममाण झाले आहेत, व ज्यांचे काम, क्रोध, मद, सुटून जे सर्व जग निजप्रभुमय पाहतात ते वैर कोणाशी करणार!

चौ०—सुनु खगेस नहिँ कछु रिषिदूषन ।
उरप्रेरक रघु-बंस-बि-भूषन ।
कृपासिंधु मुनिमति करि भोरी ।
लीन्ही प्रेमपरीछा मोरी ।
मन बच क्रम मोहि निजजन जाना ।
मुनिमति पुनि फेरी भगवाना ।

हे गरुडा! ऐक. ह्यांत ऋषींचा दोष मुळींच नाहीं. अंतःकरणाचा चालक रघुवंशभूषणच आहे. कृपासिंधूंनीं मुनींच्या मतीस भुरळ घालून माझी प्रेमपरीक्षा घेतली, आणि कायावाचामनानें मी त्यांचा दास आहे अशी खात्री होतांच फिरून भगवंतानींच मुनींची बुद्धि ताळ्यावर आणली.

रिषि मम सहनसीलता देखी ।
राम-चरन बिस्वास बिसेखी ।
अतिबिसमय पुनि पुनि पछिताई ।
सादर मुनि मोहि लीन्ह बोलाई ।

मुनींना, माझी सहनशीलता आणि रामचरणीं असलेली अचल श्रद्धा पाहून अत्यंत विस्मय वाटला, आणि ते वरचेवर पश्चात्ताप करूं लागले. त्यांनीं फिरून मला आदरपूर्वक बोलावून घेतलें.

मम परितोष बिबिधबिधि कीन्हा ।
हरषित राममंत्र तब दीन्हा ।
बालकरूप राम कर ध्याना ।
कहेउ मोहि मुनि कृपानिधाना ।
सुंदर सुखद मोहि अति भावा ।
सो प्रथमहिँ मैँ तुम्हहिँ सुनावा ।
मुनि मोहि कछुक काल तहँ राखा ।
राम-चरित-मानस तब भाखा ।
सादर मोहि यह कथा सुनाई ।
पुनि बोले मुनि गिरा सुहाई ।

त्यांनीं माझें परोपरींनीं सांत्वन केलें आणि नंतर प्रसन्न होऊन मला राममंत्र दिला. रामाच्या बालस्वरूपाचें ध्यान मला त्या कृपानिधान मुनींनींच सांगितलें. तें सुंदर व सुखकारक ध्यान मला फारच आवडलें. तें मीं तुला प्रथमच सांगितलें आहे. नंतरहि मुनींनीं मला कांहींवेळ तेथेंच राहवून घेतलें आणि रामचरितमानस कथन केलें. हीच ती कथा त्यांनीं मला प्रेमादरानें ऐकविली. नंतर मुनि लडिवाळानें म्हणाले:—

रामचरित सर गुप्त सुहावा ।
संभुप्रसाद तात मैँ पावा ।
तोहि निजभगत राम कर जानी ।
ता तेँ मैँ सब कहेउँ बखानी ।
रामभगति जिन्ह के उर नाहीँ ।
कबहुँ न तात कहिय तिन्ह पाहीँ ।

बाबा रे! हें उज्ज्वल रामचरितमानस गुप्त असून मला तें श्रीशंकरांच्या कृपेनें प्राप्त झालें.तूं रामचंद्रांचा लाडका आहेस म्हणूनच मीं हें तुला साद्यंत सांगितलें.

रामभक्ति ज्यांच्या हृदयांत नसेल त्यांना, बाबा रे! हे कधींहि सांगूं नये.

मुनि मोहि बिबिधभाँति समुझावा।
मैं सप्रेम मुनिपद सिरु नावा।
निज-कर-कमल परसि मम सीसा।
हरषित आसिष दीन्हि मुनीसा।
रामभगति अबिरल उर तोरे।
बसहु सदा प्रसाद अब मोरे।

मुनींनीं माझी पुष्कळ रीतीनें समजूत घातली. मींहि त्यांस प्रेमानें वंदन केलें. मुनिश्रेष्ठांनीं आपल्या हस्तकमलानें माझ्या मस्तकास स्पर्श केला आणि आनंदानें आशीर्वाद दिला कीं, अतःपर माझ्या प्रसादानें तुझ्या हृदयांत अखंड रामभक्तीचा जिव्हाळा वास करील.

**दो०—सदा रामप्रिय होहु तुम्ह सुभ-गुन-भवन अमान। कामरूप इच्छामरन ज्ञान-बिराग-निधान॥ १७५॥**

**जेहि आस्रम तुम्ह बसब पुनि सुमिरत श्रीभगवंत। ब्यापिहि तह न अबिद्या जोजन एक प्रजंत॥ १७६॥**

तूं शुभगुणांचें अधिष्ठान, निरभिमान, इच्छारूपी, इच्छामरणी, ज्ञानवैराग्यनिधान आणि सतत रामप्रिय असा होशील. तसेंच तूं ज्या आश्रमांत भगवत्स्मरण करीत वास करशील त्याच्या आसमंतात् एक योजन-पर्यंत अविद्येचा वास देखील येणार नाहीं.

चौ०—काल कर्म गुन दोष सुभाऊ।
कछु दुख तुम्हहिँ न ब्यापिहि काऊ।
रामरहस्य ललित बिधि नाना।
गुप्त प्रगट इतिहास पुराना।
बिनु स्रम तुम्ह जानब सब सोऊ।
नित नवनेह रामपद होऊ।
जो इच्छा करिहहु मन माहीँ।
हरिप्रसाद कछु दुर्लभ नाहीँ।

काल, कर्म, गुण, दोष, स्वभाव यांपासून होणारी कोणतीच पीडा तुला कधींच बाधणार नाहीं. पुराणेतिहासांतून प्रकट अगर गुप्त असलेलीं सर्व मनोरम रामरहस्यें तुला आपोआप सुचूं लागतील. रामपदीं तुझी नित्य नवीन भक्ति जडत जाईल व तूं मनांत जी जी कामना धरशील ती ती प्रभुकृपेनें तुला मुळींच दुर्लभ असणार नाहीं.

सुनि मुनिआसिष सुनु मतिधीरा।
ब्रह्मगिरा भइ गगन गँभीरा।
एवमस्तु तव बच मुनि ज्ञानी।
यह मम भगत करम मन बानी।

हे मतिधीर गरुडा! ऐक. मुनींचा तो आशीर्वाद श्रवण केल्यानंतर आकाशांत गंभीर देववाणी झाली कीं—हे ज्ञानवंत मुने! आपण बोलल्याप्रमाणेंच सर्व होईल. हा कायावाचामनानें माझा भक्त आहे.

सुनि नभगिरा हरष मोहि भयऊ।
प्रेममगन सब संसय गयऊ।
करि बिनती मुनिआयसु पाई।
पदसरोज पुनि पुनि सिरु नाई।

ती आकाशवाणी ऐकून मीहि हर्षित व प्रेममग्न झालों व माझा सर्व संशय नष्ट झाला. मीं मुनींस विनंति करून त्यांची आज्ञा घेतली आणि त्यांच्या चरणकमलांवर वारंवार मस्तक नमविलें.

हरषसहित एहि आस्रम आयउँ।
प्रभुप्रसाद दुर्लभ बर पायउँ।
इहाँ बसत मोहिँ सुनु खगईसा।
बीते कलप सात अरु बीसा।
करउँ सदा रघु-पति-गुन-गाना।
सादर सुनहिँ बिहंग सुजाना।

प्रभूंच्या कृपेनें दुर्मिळ असा वर मिळवून हर्षचित्त होत्साता मी ह्याच आश्रमास आलों. हे गरुडा! येथें मी सत्तावीस कल्प झाले, वास करीत आहे. हे सुज्ञा, रघुपतींच्या गुणांचें मी येथें सतत गायन करीत असतों आणि हे पक्षी तें आदरपूर्वक श्रवण करीत असतात.

जब जब अवधपुरी रघुबीरा।
धरहिँ भगतहित मनुजसरीरा।
तब तब जाइ रामपुर रहउँ।
सिसुलीला बिलोकि सुख लहऊँ।
पुनि उर राखि राम सिसुरूपा।
निजआस्रम आवउँ खगभूपा।

ज्या ज्या काळीं अयोध्येंत रघुवीर आपल्या भक्तांच्या हिताशठीं मनुष्यावतार धारण करितात, तेव्हां तेव्हां मी अयोध्येस जाऊन त्यांची बाललीला

अवलोकून सुखी होत असतों; आणि फिरून रामाचें बालरूप हृदयांत सांठवून, हे गरुडा ! निजाश्रमीं परत येतों.

कथा सकल मैं तुम्हहिं सुनाई ।
कागदेह जेहि कारन पाई ।
कहेउँ तात सब प्रस्न तुम्हारी ।
राम-भगति-महिमा अतिभारी ।

काकदेह मला ज्या योगानें प्राप्त झाला तो सर्व वृत्तांत मी तुला निवेदन केला. हे तात ! मीं तुझ्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें दिलीं आणि रामभक्तीचा अत्यंत थोर महिमाहि निवेदन केला.

दो०-ता तें यह तन मोहि प्रियभयउ
राम-पद-नेह । निज-प्रभु-दरसन
पायउँ गयउँ सकल संदेह ॥ १७७ ॥

ह्याच देहांत माझें रामपदीं प्रेम जडलें, मला माझ्या प्रभूंचें दर्शन घडलें व माझा सर्व संशय नष्ट झाला म्हणून तोच मला प्रेमास्पद वाटतो.

दो०-भगतिपच्छ हठ करि रहेउँ दीन्हि
महा-रिषि-साप । मुनिदुर्लभ बर पायउँ
देखहु भजनप्रताप ॥ १७८ ॥

मुनींनीं घोर शाप दिला तरीहि मी भक्तिपक्षालाच हट्टानें चिकटून राहिलों आणि मुनींनाहि दुर्लभ असा वर मिळविला; ह्यांतच तुला भक्तीचा प्रताप केवढा आहे, याची साक्ष पटेल.

चौ०-जे असि भगति जानि परिहरहीं ।
केवल ज्ञानहेतु स्रम करहीं ।
ते जड कामधेनु गृह त्यागी ।
खोजत आक फिरहिं पय लागी ।

हें जाणून देखील जे भक्तिपक्षास झुगारून केवळ ज्ञानासाठींच धडपडतात,ते मूर्ख घरीं चालत आलेल्या कामधेनूस हांकून लावून दुधासाठीं रुईचा शोध करीत भटकत फिरणारे होत.

सुनु खगेस हरिभगति बिहाई ।
जे सुख चाहहिं आन उपाई ।
ते सठ महासिंधु बिनु तरनी ।
पैरि पार चाहहिं जडकरनी ।

हे गरुडा ! ऐक, हरिभक्तीचा अव्हेर करून जे इतर साधनांनीं सुखप्राप्तीची हांव धरितात ते मूढ होत. नौकेविरहित महासागराच्या पैलतीराला जाण्याची इच्छा करण्याप्रमाणें त्यांची ती वांझोटी कृति होय.

सुनि भुसुंडि के बचन भवानी ।
बोलेउ गरुड हरषि मृदुबानी ।
तव प्रसाद प्रभु मम उर माहीं ।
संसय-सोक-मोह-भ्रम नाहीं ।
सुनेउँ पुनीत राम-गुन-ग्रामा ।
तुम्हरी कृपा लहेउँ बिस्रामा ।

( शंकर म्हणतात )-हे पार्वति ! भुशुंडीचें तें भाषण ऐकून गरुडास हर्ष झाला आणि तो विनयानें म्हणाला-हे प्रभो ! तुझ्या कृपेनें माझ्या हृदयांत संशय, शोक, मोह अगर भ्रम उरला नाहीं. तुझ्याच कृपेमुळें पवित्र रामचरित्रें ऐकण्यास मिळून मी शांत झालों.

एक बात प्रभु पूछउँ तोही ।
कहहु बुझाइ कृपानिधि मोही ।
कहहिं संत मुनि बेद पुराना ।
नहिं कछु दुर्लभ ज्ञानसमाना ।
सोइ मुनि तुम्ह सन कहेउ गोसाईं ।
नहिं आदरेहु भगति की नाईं ।
ज्ञानहिं भगतिहिं अंतर केता ।
सकल कहहु प्रभु कृपानिकेता ।

प्रभो ! मी एक गोष्ट विचारतों, ती कृपानिधीनें मला समजावून सांगावी. संत, मुनि, वेद, पुराणें हे सर्व तर असें प्रतिपादन करितात कीं, ज्ञानासारखें दुर्लभ कांहींहि नाहीं. हे स्वामिन् ! तेंच ज्ञान तुला मुनींनीं कथन केलें असतांहि तूं त्याचा भक्तीप्रमाणें आदर केला नाहींस. ज्ञानांत आणि भक्तींत अंतर काय तें, हे कृपानिधान प्रभो ! मला सर्व कथन कर.

सुनि उरगारिबचन सुख माना ।
सादर बोलेउ काग सुजाना ।
भगतिहिं ज्ञानहिं नहिं कछु भेदा ।
उभय हरहिं भवसंभव खेदा ।
नाथ मुनीस कहहिं कछु अंतर ।
सावधान सोउ सुनु बिहंगबर ।

गरुडाचें तें भाषण ऐकून परमज्ञानी भुशुंडीला आनंद झाला व तो प्रश्नाचा आदर करून म्हणाला-भक्तींत आणि ज्ञानांत तसा कांहींच भेद नाहीं. दोन्हीहि संसारजन्य पीडेचें हरण करितात. हे पक्षि-

श्रेष्ठा नाथा ! मुनीश्वर त्यांच्यांत किंचित् भिन्नत्व प्रतिपादन करतात तें तूं सावधपणें श्रवण कर.

ज्ञान बिराग जोग बिज्ञाना ।
ए सब पुरुष सुनहु हरिजाना ।
पुरुष प्रताप प्रबल सब भाँती ।
अबला अबल सहज जडजाती ।

हे गरुडा ! ज्ञान, वैराग्य, योग, विज्ञान हे सर्व पुरुष जातीचे आहेत असें समज. सर्वच प्रकारें पौरुषकारीपुरुषच असतात. आणि अबला त्या अबलाच असतात. स्वाभाविकच त्यांचा वर्ग जड आहे.

दो०—पुरुष त्यागि सक नारिहिँ जो बिरक्त मतिधीर । न तु कामी जो बिषयबस बिमुख जो पद रघुबीर ॥१७९

विरक्त व स्थितप्रज्ञ असेच पुरुष स्त्रीचा त्याग करूं शकतील. कामुक, विषयलंपट आणि रामपद-विमुख हे त्या कर्मास असमर्थ होत.

सो०—सो मुनि ज्ञाननिधान मृगनयनी बिधुमुख निरखि । बिकल होहिँ हरि-जान नारि बिस्व माया प्रगट ॥ १६ ॥

गरुडा ! ज्ञानानिधान मुनीदेखील हरिणाक्षीचें चंद्रवदन पाहून बेजार होतात. जगांत स्त्री हीच प्रत्यक्ष माया समज.

चौ०—इहाँ न पच्छपात कछु राखउँ ।
बेद-पुरान-संत-मत भाखऊँ ।
मोह न नारि नारि के रूपा ।
पन्नगारि यह रीति अनूपा ।

ह्यासंबंधीं मी पक्षपात वगैरे कांहींएक न करतां वेद, पुराणें व संत यांचा जो सिद्धांत आहे, तोच. कथन करतों. स्त्री स्त्रीच्या रूपाला भाळत नसते. गरुडा ! हा प्रकार कांहीं अजब आहे.

माया भगति सुनहु तुम्ह दोऊ ।
नारिबर्ग जानहिँ सब कोऊ ।
पुनि रघुबीरहिँ भगति पियारी ।
माया खलु नर्त्तकी बिचारी ।
भगतिहिँ सानुकूल रघुराया ।
ता तेँ तेहि डरपति अति माया ।

तूं असें समज कीं माया आणि भक्ति ह्या स्त्री-वर्गांतील आहेत,हें सर्वांनाच विदितहि आहे. फिरून रघुवीरास चोज वाटतें तें एका भक्तीचेंच. माया तर बोलून चालून बिचारी कोल्हाटीण ! रघुवीर भक्तीस अनुकूल असतात, म्हणून माया तिला फारच वचकून असते.

रामभगति निरुपम निरुपाधी ।
बसइ जासु उर सदा अबाधी ।
तेहि बिलोकि माया सकुचाई ।
करि न सकइ कछु निज प्रभुताई ।
अस बिचारि जे मुनि बिज्ञानी ।
जाचहिँ भगति सकल-सुख-खानी ।

निरुपम आणि निरुपाधिक अशी रामभक्ति ज्याच्या हृदयांत निर्वेध आणि निरंतर वसत असेल, त्याला पाहून मायेलाहि संकोच उत्पन्न होतो, आणि त्याजवर ती आपली छाया देखील पाडूं शकत नाहीं. असा विचार करून विज्ञानी मुनी देखील सर्वगुणांची खाण अशा भक्तीचीच आकांक्षा धरितात.

दो०—यह रहस्य रघुनाथ कर बेगि न जानइ कोइ । जो जानइ रघु-पति-कृपा सपनेहुँ मोह न होइ ॥ १८० ॥

हें श्रीरघुनाथाचें रहस्य लवकर कोणाच्या लक्षांत येत नाहीं, आणि रघुपतिकृपेनें ज्यांना तें कळतें त्यांना स्वप्नांतहि मोह घेरत नाहीं.

दो०—अउरउ ज्ञान भगति कर भेद सुनहु सुप्रबीन । जो सुनि होइ रामपद प्रीति सदा अबिछीन ॥ १८१ ॥

बा सुज्ञा गरुडा ! भक्ति आणि ज्ञान यांतला आणखीहि भेद ऐक. तो ऐकल्यानें रामपदीं तुझें निरंतर अविच्छिन्न प्रेम राहील.

चौ०—सुनहु तात यह अकथ कहानी ।
समुझत बनइ न जाइ बखानी ।
ईस्वरअंस जीव अबिनासी ।
चेतन अमल सहज सुखरासी ।
सो मायाबस भयउ गोसाईँ ।
बँधेउ कीर मरकट की नाईँ ।

हे तात ! हें प्रकरण बोलण्यासारखें मुळीं नाहींच. तें फक्त जाणतां येतें, सांगतां येत नाहीं. जीव ईश्वराचा अंश असल्यामुळें तोहि अविनाशी, चैतन्ययुक्त, निर्मल आणि नित्य आनंदघन असा आहे. परंतु, हे

स्वामिन् ! तो मायावश झाल्याकारणानें पोपट, मर्कट यांप्रमाणें बद्ध झाला आहे.

जड चेतनहिँ ग्रंथि परि गई ।
जदपि मृषा छूटत कठिनई ।
तब तेँ जीव भयउ संसारी ।
छूट न ग्रंथि न होइ सुखारी ।
स्रुति पुरान बहु कहेउ उपाई ।
छुट न अधिक अधिक अरुझाई ।

जडाची व चेतनाची मिरगांठ पडली. जरी ती मिथ्या असली तरी ती उलगडण्यास अवघड आहे. तेव्हांपासूनच हा जीव संसारी बनला. ती गांठ सुटत नाहीं आणि हा सुखी होत नाहीं. श्रुतिपुराणादिकांनीं अनेक उपाय सांगितले आहेत, परंतु ती न उकलतां अधिकाधिकच घट्ट होत जाते.

जीवहृदय तम मोह बिसेखी ।
ग्रंथि छूटि किमि परइ न देखी ।
अस संजोग ईस जब करई ।
तबहुँ कदाचित सो निरुबरई ।

जीवाच्या हृदयांत मोहरूप अंधार विशेष असतो. त्यांस ती गांठच दिसत नाहीं. मग ती उकलणार कशी ? परमेश्वर जेव्हां योगायोग आणील तेव्हांच कदाचित् ती उकलली जाणार. तो योगायोग असाः-

सात्विक स्रद्धा धेनु लवाई ।
जो हरिकृपा हृदय बसि आई ।
जप तप ब्रत जम नियम अपारा ।
जे स्रुति कह सुभ धर्म अचारा ।
तेइ तृन हरित चरइ जब गाई ।
भाव बच्छ सिसु धेनु पेन्हाई ।
नोइ निबृत्ति पात्र बिस्वासा ।
निर्मल मन अहीर निजदासा ।
परम–धरम–मय पय दुहि भाई ।
अवटइ अनल अकाम बनाई ।
तोष मरुत तब छमा जुडावइ ।
धृतिसम जावन देइ जमावइ ।
मुदिता मथइ बिचार मथानी ।
दम अधार रजु सत्य सुबानी ।
तब मथि काढि लेइ नवनीता ।
बिमल बिराग सुपरम पुनीता ।

जर हरिकृपेनें जीवाच्या हृदयांत सात्विक श्रद्धारूप सवत्स धेनू येऊन वास करील व जप, तप, व्रत, यम, नियम इत्यादि जीं अपार श्रुतिप्रणीत शुभ धर्मसाधनें आहेत. त्या साधनरूपी हिरव्यागार चाऱ्यावर जर ती चरत राहील आणि भावरूप लहान पाडसास पाहून तीस जर पान्हा फुटेल, निवृत्तिरूप दोरीनें ( तिला भाला घालून ) विश्वासरूपी भांड्यांत जर निर्मल मनोरूप आपला गवळी इमानदार ( अर्थात् जीव ) तिचें परमधर्मरूप दूध काढील, व बाबा रे ! तें दूध निष्कामरूप अग्नि पेटवून त्यावर तापवील, नंतर क्षमेकडून त्या दुधास संतोषरूप वारा घालून तें थंड करील, धृतीकडून शमरूपी विरजण घालून प्रसन्नतेकडून दमरूप घुसळखांबाशीं सत्य आणि सुवाणी रूप दोऱ्या लावून विचाररूप रवीनें तें मंथन करील तर अखेरीस निर्मळ व अत्यंत पवित्र असें वैराग्यरूप लोणी त्याला प्राप्त होईल.

**दो०–जोग आगिनि करि प्रगट तब कर्म सुभासुभ लाइ । बुद्धि सिरावइ ज्ञान घृत ममता मल जरि जाइ ॥१८२ ॥**
**तब बिज्ञानरूपिनी बुद्धि बिसद घृत पाइ । चित्त दिया भरि धरइ दृढ समता दियटि बनाइ ॥ १८३ ॥**
**तीनि अवस्था तीनि गुन तेहि कपास तें काढि । तूल तुरीय सँवारि पुनि बाती करइ सुगाढि ॥ १८४ ॥**

नंतर जर तो शुभाशुभ कर्णरूप पेटवण आणून योगरूप अग्नि प्रदीप्त करील आणि त्या वैराग्यरूप लोण्याचा ममतारूप मळ जळून राहिलेलें ज्ञानरूप घृत बुद्धीकडून थंड करवील आणि नंतर विज्ञानरूपी बुद्धि, समतेची दिवटी पाजळून तींत चित्तरूप दिवेलाण मजबूत ठेवून, त्यांत तें स्वच्छ तूप घेऊन भरील, व नंतर ( जाग्रति, स्वप्न व सुषुप्ति ह्या) तीन अवस्थारूप आणि (सत्व, रज व तम ह्या ) तीन गुणरूप कापसाचें तुरीयावस्थारूप सूत काढून; त्याची चांगली ठणठणीत वात तयार करील,

**सो०–एहि बिधि लेसइ दीप तेजरासि बिज्ञानमय । जातहिँ जासु समीप जरहिँ मदादिक सलभ सब ॥ १७ ॥**

आणि अशा रीतीनें तेजःपुंज विज्ञानमय दीप जर पाजळील तर मदादिक सर्व शलभ त्या दिव्याजवळ जातांच जळून जातील.

चौ०—सोहमस्मि इति ब्रृत्ति अखंडा ।
दीपसिखा सोइ परमप्रचंडा ।
आतम–अनु–भव–सुख सुप्रकासा ।
तब भवमूल भेदभ्रम नासा ।
प्रबल अबिद्या कर परिवारा ।
मोहआदि तम मिटइ अपारा ।
तब सोइ बुद्धि पाइ उँजियारा ।
उरगृह बैठि ग्रंथि निरुवारा ।

सोहमस्मि ( तो मीच आहे ) ही जी अखंडवृत्ति त्तचि त्या दिव्याची परम तेजस्वी ज्योत असून ती ब्रह्मानुभवसुखाचा लख्ख प्रकाश पाडील, तेव्हां कोठें संसारास कारणीभूत जो अहंममतात्मक भेदभ्रम त्याचा नाश होऊन प्रबल अविद्येचा परिवार जो मोहादिक अपार अंधकार तो नष्ट होईल. असें झाल्यावर मग बुद्धीस प्रकाश मिळेल आणि ती हृदयरूप गृहांत बसून ती मिरगांठ सोडूं लागेल.

छोरन ग्रंथि पाव जौं कोई ।
तौ यह जीव कृतारथ होई ।
छोरत ग्रंथि जानि खगराया ।
बिघन अनेक करइ तब माया ।

जर ती गांठ उकललीच तर मात्र हा जीव कृतकृत्य होईल. पण गरुडा ! गांठ सुटत आहे असें कळतांच अविद्यारूप माया अनेक विघ्नें उपस्थित करीत असते.

रिद्धि सिद्धि प्रेरइ बहु भाई ।
बुद्धिहि लोभ देखावहिँ आई ।
कल बल छल करि जाइ समीपा ।
अंचल बात बुझावहिँ दीपा ।

बाबा रे ! ती ऋद्धिसिद्धींना अनेकवार पाठवून देते. त्या येऊन बुद्धीस लालूच दाखवितात,आणि लघळपणा, बळ आणि छळ इत्यादि उपायांनीं बुद्धिसमीप जाऊन आपल्या पदराच्या वाऱ्यानें तो दिवा मालवण्यास सरसावतात.

होइ बुद्धि जो परम सयाने ।
तिन्ह तनु चितव न अनहित जाने ।
जौं तेहि बिघन बुद्धि नहिँ बाधी ।
तौ बहोरि सुर करहिँ उपाधी ।

ती बुद्धि जर फार विचक्षण असेल तर ती त्यांचा विघ्नसंतोषीपणा मनांत ओळखून त्यांचेकडे पहाणार नाहीं. त्यांचीं तीं विघ्नें जर बुद्धीपुढें कुंठित झालींच तर फिरून देवता विघ्नें करतात.

इंद्रि द्वार झरोखा नाना ।
तहँ तहँ सुर बैठे करि थाना ।
आवत देखहिँ बिषय बयारी ।
ते हठि देहिँ कपाट उघारी ।

इंद्रियद्वारें ही अनेक झरोके आहेत व त्या सर्वांत देवता धरणें धरून बसलेल्याच असतात. विषयवायु वहात आहे, असें पहातांच इंद्रियद्वारांचीं कपाटें त्या मुद्दाम उघडून ठेवतात.

जब सो प्रभंजन उरगृह जाई ।
तबहिँ दीप बिज्ञान बुझाई ।
ग्रंथि न छूटि मिटा सो प्रकासा ।
बुद्धि बिकल भइ बिषयबतासा ।

तो वारा हृदयरूप घरांत शिरला कीं तेव्हांच तो विज्ञानरूप दीप मालवून टाकतो.गांठहि सुटली नाहीं, उजेड देखील गेला आणि विषयरूप वारा मात्र चालूच म्हणून बुद्धि अगदीं मट्ट्यास येते.

इंद्रिन्ह सुरन्ह न ज्ञान सुहाई ।
बिषयभोग पर प्रीति सदाई ।
बिषय समीर बुद्धि कृत भोरी ।
तेहि बिधि दीप को बार बहोरी ।

इंद्रियांच्या देवतांस ज्ञान आवडत नाहीं. त्या सदोदित विषयभोगावरच सोकावलेल्या असतात. विषयवायूनें बुद्धीची गाळण झाली म्हणजे फिरून पहिल्यासारखा दीप कोण पाजळणार ?

**दो०—तब फिरि जीव बिबिधबिधि पावइ संसृति क्लेस । हरिमाया अति दुस्तर तरि न जाइ बिहँगेस ॥ १८५ ॥**

नंतर फिरून हा जीव संसाराचीं अनेकविध दुःखें भोगीत रहातो. हे पक्षिश्रेष्ठा गरुडा ! परमेश्वराची माया दुरत्यय आहे. ती तरून जाणें जीवास कठिण आहे.

**दो०—कहत कठिन समुझत कठिन साधन कठिन बिबेक । होइ घुनाच्छर न्याय जौं पुनि प्रत्यूह अनेक ॥ १८६ ॥**

ज्ञान हें सांगण्यास कठिण, समजण्यासहि कठीण आणि आचरण्यास तर कठिणच कठिण आहे. इतक्यावर देखील घुणाक्षरन्यायानें जर तें साध्य झालेंच तर फिरून अनेक त्रांगडीं उपस्थित होतात.

चौ०—ज्ञानपंथ कृपान कै धारा।
परत खगेस होइ नहिँ बारा।
जौं निरबिघन पंथ निरबहई।
सो कैवल्य परमपद लहई।

ज्ञानमार्ग म्हणजे केवळ तरवारीची धारच समज. गरुडा! तिजवरून निसरण्यास अवकाशच लागत नाहीं. हा मार्ग जर सुरळीतपणें निभावला तर मग मात्र कैवल्यरूपी परमपद ठेवलेलेंच.

अतिदुर्लभ कैवल्य परमपद।
संत पुरान निगम आगम बद।
राम भजत सोइ मुक्ति गोसाईं।
अनइच्छित आवइ बरिआईं।

कैवल्यरूप श्रेष्ठपद महद्दुलर्भ आहे असें संत, पुराणें, वेद व श्रुति सांगत असतात. हे स्वामिन्! रामभजनानें तोच मोक्ष, जीवास इच्छा नसतांना देखील त्यास, आग्रहानें वरतो.

जिमि थल बिनु जल रहि न सकाई।
कोटि भाँति कोउ करइ उपाई।
तथा मोच्छसुख सुनु खगराई।
रहि न सकइ हरिभगति बिहाई।
अस बिचारि हरिभगत सयाने।
मुक्ति निरादर भगति लोभाने।

कोणी कितीहि युक्त्या योजल्या तरी स्थळावांचून पाणी राहूं शकत नाहीं. हें जसें खरें, तसेंच गरुडा! मोक्षसुख देखील हरिभक्तीपासून अलग फुटून निघत नाहीं. ह्या विचारानेंच सुज्ञ हरिभक्त मुक्तीचा अव्हेर करून भक्तीवरच लुब्ध होऊन राहतात.

भगति करत बिनु जतन प्रयासा।
संसृतिमूल अबिद्या नासा।
भोजन करिय तृप्ति हित लागी।
जिमि सो असन पचवइ जठरागी।
असि हरिभगति सुगम सुखदाई।
को अस मूढ न जाहि सुहाई।

भक्ति केली असतां, प्रयत्न आणि त्रास न पडतां, संसारास कारणीभूत असलेल्या अविद्येचा नाश होतो. तृप्तीसाठीं भोजन करावयाचें असतें, परंतु सारेंच अन्न जठराग्नीच पचवून टाकतो. तद्वतच हा प्रकार आहे. अशी ती हरिभक्ति सुलभ आणि सुखदायक आहे. मग असा कोण मूढ आहे कीं ज्याला ती रुचणार नाहीं?

**दो०—सेवक सेव्य भाव बिनु भव न तरिय उरगारि। भजहु राम-पद-पंक-ज अस सिद्धांत बिचारि॥ १८७॥**

सेव्यसेवकभावाखेरीज, हे गरुडा! हा भव तरला जात नाहीं हा सिद्धांत आहे. त्याचा विचार करून रामपदकमलांची भक्तीच करीत असावें.

**दो०—जो चेतन कहँ जड करइ जडहि करइ चैतन्य। अस समरथ रघुनायकहिँ भजहिँ जीव ते धन्य ॥१८८॥**

जो सचेतनास अचेतन करतो आणि अचेतनास चैतन्य देतो अशा त्या समर्थ श्रीराघवाची भक्ति करणारे जे जीव तेच धन्य होत.

चौ०—कहेउँ ज्ञान सिद्धांत बुझाई।
सुनहु भगतिमनि कै प्रभुताई।
रामभगति चिंतामनि सुंदर।
बसइ गरुड जा के उरअंतर।
परमप्रकास रूप दिन राती।
नहिँ कछु चहिय दिया घृत बाती।

हा ज्ञानमार्गाचा सिद्धांत तुला विशद करून सांगितला. आतां भक्तिरूप रत्नाचें सामर्थ्य श्रवण कर. रामभक्ति हा दैदीप्यमान चिंतामणि होय. गरुडा! हा ज्याचे हृदयांत वास करील तेथें तो अहोरात्र अत्यंत प्रकाशरूपच राहील. तेथें दीप, घृत अगर वाती यांची मुळींच गरज नाहीं.

मोह दरिद्र निकट नहिँ आवा।
लोभ बात नहिँ ताहि बुझावा।
अचल अबिद्या तम मिटि जाई।
हारहिँ सकल सलभसमुदाई।
खल कामादि निकट नहिँ जाहीँ।
बसइ भगति जा के उर माहीँ।
गरल सुधा सम अरि हित होई।
तेहि मनि बिनु सुख पाव न कोई।
ब्यापहिँ मानस रोग न भारी।
जिन्ह के बस सब जीव दुखारी।

मोहरूपी दारिद्र्य त्याच्या वाऱ्यास देखील उभें राहत नाहीं. लोभरूप वायु त्यास मालवूं शकत नाहीं व अविद्यारूप गाढ अंधकार त्याच्या समोर येत नाहीं; ज्याच्या हृदयांत भक्ति वास करते, त्याच्याजवळ कामादि दुष्ट शलभसमुदाय येऊंच शकत नाहीं.

त्याला विष अमृताप्रमाणें ( गुणकारी ) होऊन त्याचे शत्रूदेखील मित्र होतात. अशा त्या चिंतामणीखेरीज कोणालाहि सुख मिळत नाहीं. ज्यांच्या स्वाधीन असल्यामुळें जीव त्रस्त होतो ते दुर्धर मानसिक रोग देखील त्यास छेडूं शकत नाहींत.

राम–भगति–मनि उर बस जाकें।
दुख-लव-लेस न सपनेहुँ ता कें।
चतुर सिरोमनि तेइ जग माहीँ।
जे मनि लागि सुजतन कराहीँ।

तो रामभक्तिरूप मणि ज्याच्या हृदयांत वास करतो त्यास स्वप्नांत देखील दुःखाचा लवलेश पाहण्याची पाळी येत नाहीं. जे ह्या मण्याकरतां कसून प्रयत्न करतात तेच जगांत चतुर शिरोमणि होत.

सो मनि जदपि प्रगट जग अहई।
रामकृपा बिनु नहिँ कोउ लहई।
सुगम उपाइ पाइबे केरे।
नर हतभाग्य देहिँ भटभेरे।

तो मणि जगांत जरी सर्वांच्याच दृष्टीस पडतो तरी श्रीरामकृपेवांचून तो कोणाच्याहि हातीं लागत नाहीं. तो मिळण्याचा उपाय सोपा आहे. परंतु लोकांचें दुर्दैव त्यांस भारीच नडतें.

पावन पर्बत बेद पुराना।
रामकथा रुचिराकर नाना।
मर्मी सज्जन सुमति कुदारी।
ज्ञान बिराग नयन उरगारी।
भावसहित खोजइ जो प्रानी।
पाव भगतिमनि सब सुखखानी।

वेदपुराणें हे पावनपर्वत होत. रामकथा ह्या त्यांच्यांतल्या समृद्ध खाणी आहेत. सज्जन हेच त्यांतील तज्ज्ञ होत. हे गरुडा! सुमतिरूप खणतें घेऊन ज्ञान व वैराग्य ह्या दोन डोळ्यांनीं जो प्राणी सर्व सुखांचें आगर असा तो भक्तिमणि भावबळानें खोदखोदून शोधीत असतो त्यालाच तो गवसतो.

मोरे मन प्रभु अस बिस्वासा।
राम तेँ अधिक राम कर दासा।
राम सिंधु घन सज्जन धीरा।
चंदन तरु हरि संत समीरा।
सब कर फल हरिभगति सुहाई।
सो बिनु संत न काहू पाई।

अस बिचारि जोइ कर सतसंगा।
रामभगति तेहि सुलभ बिहंगा।

हे स्वामिन्! माझ्या मनाचा तर असाच निर्धार आहे कीं, रामापेक्षां रामाचे भक्तच थोर होत. राम हे समुद्र असले तर धृतिशील संतजन रामतत्त्वरूप जलाची वृष्टि करणारे मेघ होत. राम हे चंदनवृक्ष असले तर संत त्याचा सुगंध वाहून नेणारे वायु होत. सर्वसाधनांचें सार हरिभक्ति हेंच आहे व तें संतांवांचून कोणासहि हस्तगत होत नाहीं. असा विचार करून जो सत्संग करतो त्यासच, हे गरुडा! रामभक्ति सुलभ होते.

**दो०–ब्रह्म पयोनिधि मंदर ज्ञान संत सुर आहि। कथा सुधा मथि काढइ भगति मधुरता जाहि ॥ १८९ ॥**

परब्रह्म परमात्मा क्षीरसागर आहे. ज्ञानरूपी मंदरपर्वतानें संतरूपी देव त्याचें मथन करून कथारूपी अमृत काढतात. त्या अमृताचें माधुर्य म्हणजेच भक्ति.

**दो०–बिरति चर्म असि ज्ञान मद लोभ मोह रिपु मारि। जय पाइय सो हरिभगति देखु खगेस बिचारि ॥ १९० ॥**

वैराग्याची ढाल घेऊन ज्ञानरूपी खड्गानें मद, लोभ, मोहादिक शत्रूंचा निःपात करून जेव्हां विजय मिळतो ( जितेन्द्रियता अंगीं बाणते ) त्याउपर कोठें खऱ्या हरिभक्तीचा उपक्रम सुरू होतो. बा गरुडा! ही गोष्ट अगदीं खूप मन घालून पहाण्यास हवी.

चौ०–पुनि सप्रेम बोलेउ खगराऊ।
जो कृपाल मोहि ऊपर भाऊ।
नाथ मोहि निज सेवक जानी।
सप्त प्रश्न मम कहहु बखानी।
प्रथमहिँ कहहु नाथ मतिधीरा।
सब तेँ दुर्लभ कवन सरीरा।
बड दुख कवन कवन सुख भारी।
सोउ संछेपहि कहहु बिचारी।
संत असंत मरम तुम्ह जानहु।
तिन्ह कर सहज सुभाव बखानहु।
कवन पुन्य स्रुतिबिदित बिसाला।
कहहु कवन अघ परम कृपाला।

मानसरोग कहहु समुझाई ।
तुम्ह सर्बज्ञ कृपा अधिकाई ।

पुन्हां गरुड प्रेमपूर्वक म्हणालाः—हे कृपालो,—मजवर जर आपलें प्रेम आहे, तर हे नाथ! मला आपला दास समजून माझ्या सात प्रश्नांचीं उत्तरें द्यावींत. हे मतिधीर प्रभो! मला सांगावें कीं, (१) सर्वांत दुर्लभ देह कोणता? (२) महद्दुःख कोणतें आणि (३) महत्सुख कोणतें? हे विवेकिन्! हें आपण संक्षेपतः कथन करावें. (४) संत आणि असंत यांचा यथार्थ बोध आपणास विदित आहे, त्यांचा सहज स्वभाव मला विस्तरानें सांगावा. (५) वेदविहित असें महत्पुण्य कोणतें? (६) हे कृपालो! अति घोर असें पातक कोणतें? तें मला सांगावें. (७) मानसिक रोग कोणते ते मला समजावून द्यावेत. आपण सर्वज्ञ असून विशेष दयाळहि आहांत.

तात सुनहु सादर अतिप्रीती ।
मैं संछेप कहउँ यह नीती ।
नर–तन–सम नहिँ कवनिउ देही ।
जीव चराचर जाचत जेही ।
नरक–सर्ग–अपवर्ग–निसेनी ।
ज्ञान–बिराग–भगति–सुख–देनी ।
सो तनु धरि हरि भजहिँ न जे नर ।
होहिँ विषयरत मंद मंदतर ।
काँच किरिच बदले जिमि लेहीँ ।
कर तेँ डारि परसमनि देहीँ ।

(भुशुंडी म्हणाला)—हे तात! अत्यंत प्रीतीनें आणि आदरपूर्वक ऐक. ही नीति मी संक्षेपानें सांगत आहे. मनुष्ययोनीसारखी योनीच नाहीं. चराचर जीव तिचीच इच्छा धरतात. ती नरक, स्वर्ग आणि मोक्ष यांची शिडी असून ज्ञान, वैराग्य, भक्ति आणि सुख यांना देणारी आहे. असा मनुष्यदेह धारण करूनहि जे लोक भगवद्भजन करीत नाहींत आणि विषयलंपट होऊन राहतात ते मूर्खांचे राजे होत. ते कांचेचा तुकडा बदल घेऊन हातांतील परीस झुगारून देतात.

नहिँ दारिद्रसम दुख जग माहीँ ।
संत-मिलन-सम सुख कहुँ नाहीँ ।
परउपकार बचन मन काया ।
संत सहज सुभाव खगराया ।
संत सहहिँ दुख परहित लागी ।
पर–दुख–हेतु असंत अभागी ।
भूरज–तरु–सम संत कृपाला ।
परहित नित सह बिपति बिसाला ।

जगांत दारिद्र्यासारखें दुःखच नसून संतसमागमासारखें सुख कोठेंच नाहीं. कायावाचामनेंकरून परोपकार करणें हाच, गरुडा! संतांचा स्थविर स्वभाव होय. संत परहितासाठीं आणि दुर्दैवी दुर्जन परपीडेसाठीं स्वतः दुःखें सहन करीत असतात. कृपाळु संत भूर्जपत्राच्या वृक्षाप्रमाणें केवळ परहितासाठींच नित्य भयंकर संकटें देखील अंगावर घेतात.

सन इव खल परबंधन करई ।
खाल कढाइ बिपति सहि मरई ।
खल बिनु स्वारथ परअपकारी ।
अहि मूषक इव सुनु उरगारी ।
परसंपदा बिनासि नसाहीँ ।
जिमि ससि हति हिम उपल बिलाहीँ ।
दुष्टहृदय जग आरत हेतू ।
जथा प्रसिद्ध अधम ग्रह केतू ।
संतउदय संतत सुखकारी ।
बिस्वसुखद जिमि इंदु तमारी ।

दुर्जन हे तागाप्रमाणें दुसऱ्याची गठडी वळण्यास टपलेले असतात. ते इतके कीं स्वतःची साल निघेपर्यंत देखील हालअपेष्टा सोसून ते मरण्यास तयार होतात. हे गरुडा! दुर्जन लोक सर्पमूषकवत् उगीचच्या उगीचच दुसऱ्याचा घात करीत असतात. गारा जशा पिकांची नासाडी करून मग स्वतःहि विरघळून जातात, तद्वतच दुर्जन दुसऱ्याच्या जीविकेचा चुथडा करून स्वतःसहि नेस्तनाबूद करून घेतात. सुप्रसिद्ध पापग्रह केतूप्रमाणें दुष्टांचें हृदय जगाच्या पीडेसच कारणीभूत होतें. चंद्रसूर्य जसे विश्वाला सुखप्रद असतात तसाच संतांचा उदय नित्य सुखकारकच असतो.

परमधरम स्रुतिबिदित अहीँसा ।
पर-निंदा–सम अघ न गिरीसा ।
हरि–गुरु–निंदक दादुर होई ।
जनम सहस्र पाव तन सोई ।
द्विजनिंदक बहु नरक भोग करि ।
जग जनमइ बायससरीर धरि ।
सुर–स्रुति–निंदक जे अभिमानी ।
रौरव नरक परहिँ ते प्रानी ।

होहिँ उलूक संत-निंदा-रत।
मोहनिसा प्रिय ज्ञान भानु मत।
सब कै निंदा जे जड करहीँ।
ते चमगादुर होइ अवतरहीँ।

वेदप्रतिपाद्य असा परमधर्म अहिंसा होय. परनिंदेसारखें घोर पातकच नाहीं. देव आणि गुरु यांची निंदा करणारा बेडूक होत असतो आणि त्याच योनींत तो हजारों जन्म घेतो. ब्राह्मणनिंदक अनेक नरकांच्या वाऱ्या करकरून अखेर काकयोनीस जातो. जे उन्मत्त, देवांची आणि वेदांची निंदा करतात, ते रौरव नरकांत पचतात. संतनिंदा करण्यास सोकावलेले उलूक होतात.मोहरूपी रात्रच त्यांना प्रिय असून ज्ञानरूप सूर्य त्यांना प्रिय वाटत नाहीं. जे मूर्ख लोक सर्वांचीच निर्भर्त्सना करतात ते वडवाघुळीच्या जन्मास जातात.

सुनहु तात अब मानसरोगा।
जेहि तेँ दुख पावहिँ सब लोगा।
मोह सकल व्याधिन कर मूला।
तेहि तेँ पुनि उपजइ बहु सूला।

बा गरुडा! आतां सर्व लोक ज्या कारणामुळें व्यथित होतात त्या मानसिक व्याधि ऐक. सर्व व्याधींचें मूळ मोहांत आहे. त्यांतूनच बहुतेक इतर रोग उत्पन्न होतात.

काम बात कफ लोभ अपारा।
क्रोध पित्त नित छाती जारा।
प्रीति करहिँ जौँ तीनिउ भाई।
उपजइ सन्निपात दुखदाई।
बिषय मनोरथ दुर्गम नाना।
ते सब सूल नाम को जाना।
ममता दादु कंडु इरषाई।
हरष बिषाद गरह बहुताई।
परसुख देखि जरनि सोइ छई।
कुष्ट दुष्टता मन कुटिलई।
अहंकार अतिदुखद डवँरुआ।
दंभ कपट मद मान नहरुआ।
तृस्ना उदरबृद्धि अतिभारी।
त्रिबिध ईषना तरुन तिजारी।
जुगबिधि ज्वर मत्सर अबिबेका।
कहँ लगि कहउँ कुरोग अनेका।

कामरूपी वात, लोभरूपी कफ आणि क्रोधरूपी पित्त ह्यांच्यामुळें छातीचा निरंतर विलक्षण भडका होत असतो. बाबा रे! ह्या तिघांची जर एकजूट झाली तर मात्र शोकपरिणामी सन्निपात झालाच पाहिजे. विषयवासना अनेक असून दुर्धरहि असतात. त्यादेखील सर्व रोगच समज. त्यांचीं नांवें तरी कोणास माहीत? ममता हा गजकर्ण रोग असून ईर्षा ही कण्डु आहे व हर्ष आणि विषाद हे अनेक प्रकारचे उपदंश होत. दुसऱ्यांचें ऐश्वर्य पाहून जळूं लागणें (मत्सर) हाच क्षयरोग असून मनाची कुटिलता आणि दुष्टपणा हे कुष्ठ रोग होत. अहंकार हा अतिदुःखदायक डबा (कृमिरोग) असून दंभ, कपट, मद, मान हे नारू होत. तृष्णा हा महाभयंकर जलोदर असून त्रिविध ईषणा हें खडतर तिजारें होय. अविवेक आणि मत्सर हे दोन प्रकारचे (शीत आणि उष्ण) ज्वर आहेत. असे अनेक दुष्ट रोग आहेत ते कोठवर सांगत बसूं?

**दो०—एक व्याधिवस नर मरहिँ ए असाध्य बहु व्याधि। पीडहिँ संतत जीव कहँ सो किमि लहइ समाधि।१९१।**

एकाच व्याधीच्या तावडींत सांपडल्यास मनुष्य मरतो, मग हे तर अनेक असाध्य रोग जीवास निरंतर काढण्या लावीत असतात; तेव्हां जीवाला आत्मसुख कसचें मिळणार बरें?

**दो०—नेम धर्म आचार तप ज्ञान जज्ञ जप दान। भेषज पुनि कोटिक नहीँ रोग जाहिँ हरिजान॥ १९२॥**

नेम, धर्म, आचार तप, ज्ञान, यज्ञ, जप, दान इत्यादि कोट्यवधि वैद्य आहेत, तथापि गरुडा! हे रोग मात्र जात नाहींत.

चौ०—एहि बिधि सकल जीव जड रोगी।
सोक हरष भय प्रीति बियोगी।
मानसरोग कछुक मैँ गाये।
होहिँ सब के लखि बिरलइ पाये।

ह्याप्रमाणें सर्व जड जीव शोक, हर्ष, भय, प्रीति, वियोग इत्यादि व्याधींनीं ग्रस्त झालेले आहेत. मानसिक रोग मीं थोडेसे सांगितले. ते सर्वांनाच जडले आहेत. परंतु क्वचितांच्याच ते लक्षांत येतात.

जाने तेँ छीजहिँ कछु पापी।
नास न पावहिँ जनपरितापी।
बिषय कुपथ्य पाइ अंकुरे।
मुनिहु हृदय का नर बापुरे।

त्यांची चिकित्सा झाल्यास असे ते लोकांना ताप देणारे पापमूलक रोग थोडेसे खालीं पडतात, परंतु ते जडींतून सुटत नाहींत. विषयांचें कुपथ्य घडतांच मुनींच्या हृदयांत, देखील फिरून त्यांस अंकुर फुटतात,मग इतर बापडया माणसांचा पाड तो काय !

रामकृपा नासहिँ सब रोगा ।
जो एहि भाँति बनइ संजोगा ।
सद्गुरु बेदबचन बिस्वासा ।
संजम यह न बिषय कै आसा ।
रघु-पाति-भगाति सजीवनमूरी ।
अनूपान स्रद्धा मति पूरी ।

फक्त रामकृपेनें मात्र या सर्व रोगांचा बीमोड होतो. परंतु सद्गुरु वैद्य, त्याच्या वचनावर विश्वास विषयेच्छेच्या बाबद मनाचा पूर्ण निग्रह, रघुपति-भक्तिरूप संजीवनौषधि आणि पूर्ण श्रद्धा व बुद्धि यांचें अनुपान, ह्याप्रमाणें एकंदर योग जुळून आला पाहिजे.

एहिं बिधि भलेहि सो रोग नसाहीँ ।
नाहि त जतनकोटि नहिँ जाहीं ।
जानिय तब मन बिरुज गोसाईँ ।
जब उर बल बिराग अधिकाई ।
सुमति छुधा बाढइ नित नई ।
बिषय आस दुर्बलता गई ।
बिमल ज्ञानजल जब सो नहाई ।
तब रह रामभगति उर छाई ।

ह्या एकाच रीतीनें ते दुर्धर रोग नष्ट होतील, एरवीं इतर कोटयवधि उपायांनीं तें शक्य नाहीं. हे स्वामिन् ! जेव्हां हृदयांत वैराग्यबळ वाढेल, सद्बुद्धि-क्षुधा नित्य अधिकाधिक फोंपावेल, विषयासक्तिरूप अशक्तता नष्ट होईल आणि निर्मल अशा ज्ञानजलाचें जेव्हां अभ्यंग घडेल तेव्हांच मन निरोगी झालें असें समजावें आणि मगच रामभक्ति हृदयांत छावणी करील.

सिव अज सुक सनकादिक नारद ।
जे मुनि ब्रह्म-बिचार-बिसारद ।
सब कर मत खगनायक एहा ।
करिय राम-पद-पंक-ज नेहा ।
स्रुति पुरान सब ग्रंथ कहाहीँ ।
रघु-पाति-भगाति बिना सुख नाहीँ ।

शंकर, ब्रह्मदेव, शुक, सनकादिकऋषि, आणि इतर ब्रह्मज्ञानपारंगत सर्व मुनींचा, हे गरुडा ! हाच सिद्धांत आहे कीं, स्नेह जोडावयाचा असेल तर तो रामपदपंकजाशींच जोडावा. श्रुति, पुराण इत्यादि सर्व ग्रंथ देखील हीच घोषणा करतात कीं, रघुपति-भक्तिवांचून सुख मिळणें शक्य नाहीं.

कमठपीठि जामहिँ बरु बारा ।
बंध्यासुत बरु काहुहि मारा ।
फूलहिँ नभ बरु बहुबिधि फूला ।
जीव न लह सुख हरि-प्रति-कूला ।

कासवाच्या पाठीवरहि एक वेळ केस फुटतील, वंध्यापुत्र देखील कोणाचा वध करील, आकाशाला देखील तऱ्हेतऱ्हेचीं फुलें लागणें संभवेल, परंतु हरिविन्मुख जीवास मात्र सुख म्हणून मिळणार नाहीं.

तृषा जाइ बरु मृग-जल--पाना ।
बरु जामहिँ सससीस बिखाना ।
अंधकार बरु ससिहिँ नसावइ ।
रामबिमुख न जीव सुख पावइ ।
हिम तेँ अनल प्रगट बरु होई ।
बिमुख राम सुख पाव न कोई ।

मृगजलाचें पान करून कदाचित् तहान भागेल, सशाच्या मस्तकावर न जाणों शिंग फुटेल, अंधकार चंद्राचा कदाचित् नाश करील, परंतु रामविमुख जीव सुखी होणें शक्यच नाहीं. बर्फांतून कदाचित् अग्नि प्रकट होईल, परंतु रामविमुख असा कोणीहि सुखी होणें सुतराम् अशक्य.

**दो०—बारि मथे घृत होइ बरु सिकता तेँ**
**बरु तेल । बिनु हरिभजन न भव**
**तरहिँ यहसिद्धांत अपेल ॥ १९३ ॥**

पाणी घुसळून कदाचित् घृतहि निघेल, कदाचित् वाळूंतून तेलहि सुटेल, परंतु हरिभजनावीण संसारा-पासून उत्तीर्णता व्हावयाची नाहीं, हा मात्र वज्रलेप सिद्धांत समज.

**दो०—मसकहि करइ बिरंचि प्रभु अजहि**
**मसक तेँ हीन । अस बिचारि तजि**
**संसय रामहिँ भजहिँ प्रबीन ॥१९४॥**

प्रभु मशकास ब्रह्मदेव बनवून ब्रह्मदेवास मशका-पेक्षां देखील हीन करतील, असा विचार मनांत

आणून सुज्ञ लोक संशयाचा त्याग करून रामचंद्रांच्याच भजनीं लागतात.

नगस्वरूपिणी—विनिश्चितं वदामि ते
न अन्यथा वचांसि मे ॥
हरिं नरा भजन्ति येऽतिदुस्तरं तरन्ति ते ॥

मी तुला पक्की पत्थरची लकीर म्हणून सांगतों—आणि हें माझें वचन रसभराहि इकडे तिकडे होणारें नव्हें कीं, जे जन हरिभक्ति करितात तेच अत्यंत दुस्तर ( अशा भवसागराला ) देखील तरून जातात.

चौ०—कहेउँ नाथ हरिचरित अनूपा ।
व्यास समास स्व-मति-अनुरूपा ।
श्रुतिसिद्धांत इहइ उरगारी ।
राम भजिय सब काम बिसारी ।
प्रभु रघुपति तजि सेइअ काही ।
मो से सठ पर ममता जाही ।

हे नाथ ! अनुपमेय अशा हरिचरित्राचें मीं विस्तरशः व संक्षेपानें यथामति निरूपण केलें. हे गरुडा ! सर्व वासना जिरवून श्रीरामास शरण जावें हाच वेदांचा सिद्धांत आहे. ज्याचा माझ्यासारख्या ठोंब्यावर देखील जिव्हाळा त्या राघवास सोडून कोणाची सेवा करावयाची ?

तुम्ह बिज्ञानरूप नहिँ मोहा ।
नाथ कीन्हि मो पर अति छोहा ।
पूछेहु रामकथा अतिपावनि ।
सुक--सनकादि-संभु-मन--भावनि ।
सतसंगति दुर्लभ संसारा ।
निमिष दंड भरि एकउ बारा ।

हे नाथ ! तूं विज्ञानरूप असून तुला खरा मोहच नाहीं. शंकरप्रभृति शुकसनकादि मंडळींसहि अत्यंत स्पृहणीय अशी रामकथा विचारून मजवर तूं फार थोर उपकार केला आहेस. या जगांत सत्समागमाची घटका तर असोच पण पळदेखील पळमात्र-आणि तींहि एकवेळसुद्धां-दुर्मिळ असते.

देखु गरुड निजहृदय विचारी ।
मैं रघु--बीर--भजन--अधिकारी ।
सकुनाधम सब भाँति अपावन ।
प्रभु मोहि कीन्ह बिदित जगपावन ।

हे गरुडा ! रघुवीरभक्ति, आणि तिचा मी अधिकारी ! ह्याचा तूंच आपल्याच हृदयांत विचार करून पहा. सर्वतोपरीनें अधम आणि अपवित्र अशा ह्या मला देखील प्रभूनें जगजाहीर पावन केलें.

दो०—आजु धन्य मैं धन्य अति जद्यपि सबबिधि हीन । निजजन जानि राम मोहि संतसमागम दीन्ह ॥ १९५ ॥

जरी मी सर्व प्रकारें हीन असलों तरी आज मी धन्य धन्य झालों ! श्रीरामचंद्रांनीं मला आपला किंकर जाणून संतसमागम घडविला.

दो०—नाथ जथामति भाषेउँ राखेउँ नहिं कछु गोइ । चरितसिंधु रघुबीर के थाह कि पावइ कोइ ॥ १९६ ॥

हे नाथ ! हें रामचरितमानस मी यथामति कथन केलें व त्यांत गुप्त असें मुळींहि ठेवलें नाहीं. रघुनाथ हा लीलासागर आहे. त्याचा ठाव कोणास तरी लागेल काय ?

चौ०--सुमिरि राम के गुनगन नाना ।
पुनि पुनि हरष भुसुंडि सुजाना ।
महिमा निगम नेति करि गाई ।
अतुलित बल प्रताप प्रभुताई ।
सिव--अज--पूज्य--चरन रघुराई ।
मो पर कृपा परम मृदुलाई ।

रामचंद्रांचे अनेक गुणगण आठवून तत्त्वज्ञ भुशुंडी पुनःपुनः हर्षित होऊन म्हणाला—बल, प्रताप आणि प्रभुत्व अपरिमेय म्हणून ज्याचा महिमा निगमांनीं देखील ' नेति नेति ' म्हणून गाइला आहे; शिव-ब्रह्मादिकांनाहि ज्याचें चरण पूज्य, त्या रघुराजानें अत्यंत कनवाळूपणानें ही कृपा (तुझ्या समागमाची) करावी आणि तीहि मजवर !

अस सुभाव कहुँ सुनउँ न देखउँ ।
केहि खगेस रघुपति सम लेखउँ ।
साधक सिद्ध बिमुक्त उदासी ।
कबि कोबिद कृतज्ञ संन्यासी ।
जोगी सूर सुतापस ज्ञानी ।
धर्मनिरत पंडित बिज्ञानी ।
तरहिं न बिनु सेये मम स्वामी ।
राम नमामि नमामि नमामि ।
सरन गये मो से अघरासी ।
होहिं सुद्ध नमामि अबिनासी ।

हे गरुडा ! मीं असा स्वभाव कोठें पाहिला तर नाहींच, परंतु ऐकला देखील नाहीं. तर मग रघुपतींची कोणाशीं तुलना करावी ? साधक, सिद्ध, विरक्त, उदासी, कवि, कोविद, कृतज्ञ, संन्यासी, योगी, शूर, तपस्वी, ज्ञानी, धर्मनिष्ठ, पंडित, विज्ञानी हेदेखील माझ्या स्वामींची सेवा केल्याखेरीज तरले नाहींत. अशा त्या श्रीरामास मी वारंवार नमन करितों. ज्यास शरण गेलें असतां मजसारखे अत्यंत पापी देखील शुचिर्भूत होतात त्या अविनाशी श्रीरामचंद्रास मी वंदन करितों.

दो०–जासु नाम भवभेषज हरन ताप-त्रय-सूल । सो कृपालु मोहि तोहि पर सदा रहउ अनुकूल ॥ १९७ ॥

ज्याचें नांव तापत्रयरूप व्याधींचें पारिपत्य करणारी भवौषधि होय, तो दयाघन मजवर आणि तुजवर सदा प्रसन्न असो.

दो०–सुनि भुसुंडि के बचन सुभ देखि रामपद नेह । बोलेउ प्रेमसहित गिरा गरुड बि-गत संदेह ॥ १९८ ॥

भुशुंडींचें तें शुभ व्याख्यान श्रवण करून आणि त्याचें रामपदीं असलेलें प्रेम पाहून गरुड गलितसंदेश होत्साता प्रेमपूर्वक भाषण करूं लागला:—

चौ०–मैं कृतकृत्य भयउँ तव बानी ।
सुनि रघु-बीर-भगति-रस-सानी ।
रामचरन नूतन रति भई ।
मायाजनित बिपति सब गई ।
मोहजलधि बोहित तुम्ह भयऊ ।
मो कहँ नाथ बिबिध सुख दयऊ ।

हे नाथ ! रघुवीरभक्तिरसानें परिप्लुत असें हें तुझें भाषण ऐकून मी कृतकृत्य झालों. रामचरणीं माझें अभिनव प्रेम जडून माझे मायाजनित सर्व क्लेश नष्ट झाले. ह्या मोहरूप सागरांत तूंच नौकारूप झालास आणि मला परोपरीनें सुखी केलेंस.

मो सन होइ न प्रतिउपकारा ।
बंदउँ तव पद बारहिं बारा ।
पूरनकाम रामअनुरागी ।
तुम्ह सम तात न कोउ बडभागी ।

माझ्याकडून तुझ्या ह्या उपकाराची फेड होणेंच शक्य नाहीं, म्हणून मी तुझ्या चरणीं अनेकवार नमस्कारच करतों. तूं पूर्णकाम रामभक्त आहेस. हे तात ! तुजसारखा महान् भाग्यशाली इतर कोणीहि नाहीं.

संत बिटप सरिता गिरि धरनी ।
परहित हेतु सबन्हि कै करनी ।
संतहृदय नव-नीत-समाना ।
कहा कबिन्ह पै कहइ न जाना ।
निजपरिताप द्रवइ नवनीता ।
परदुख द्रवहिं सुसंत पुनीता ।

संत, वृक्ष, नद्या, पर्वत आणि पृथ्वी ह्या सर्वांचीं कर्में केवळ परोपकारार्थच असतात. संतांचें हृदय लोण्यासारखें असतें असें कवींनीं वर्णन केलें आहे. त्यांनीं तसें वर्णन केलें खरें, परंतु त्याचा अर्थ त्यांनाच कळला नाहीं. कारण लोणी स्वतःस उष्णतेचा ताप झाल्यानें तेंच विरघळतें, परंतु जे खरोखरीचे पावन संत आहेत ते केवळ दुसऱ्याच्याच दुःखानें द्रवत असतात.

जीवन जनम सुफल मम भयऊ ।
तव प्रसाद संसय सब गयऊ ।
जानेहु सदा मोहि निज किंकर ।
पुनि पुनि उमा कहइ बिहंगबर ।

माझा सर्व संशय तुझ्या कृपेनें नष्ट होऊन माझ्या जन्माचें आणि जीविताचें साफल्य झालें. अतःपर नित्य मला आपला दास म्हणून तूं समजावेंस. (शंकर म्हणतात )—हे पार्वति ! तो गरुड ह्याप्रमाणें वारंवार प्रार्थना करूं लागला.

दो०–तासु चरन सिर नाइ करि प्रेमसहित मतिधीर । गयउ गरुड बैकुंठ तब हृदय राखि रघुबीर ॥ १९९ ॥

नंतर तो स्थिरबुद्धि गरुड भुशुंडीच्या चरणांवर प्रेमानें मस्तक ठेवून रघुवीरांचें हृदयांत चिंतन करीत वैकुंठास परत गेला.

दो०–गिरिजा संत–समागम सम न लाभ कछु आन । बिनु हरि कृपा न होइ सो गावहिं बेद पुरान ॥ २०० ॥

हे पार्वति ! सत्समागमासारखा लाभ इतर कोणताहि नाहीं. परंतु तो हरिकृपेवांचून घडत नसतो, असा वेदपुराणांचा मथितार्थ आहे.

चौ०–कहेउँ परमपुनीत इतिहासा।
सुनत स्रवन छूटहिँ भवपासा।
प्रनत–कलप–तरु करुनापुंजा।
उपजइ प्रीति राम–पद–कं–जा।

हा तुला मीं परमपवित्र इतिहास कथन केला. ह्याच्या श्रवणमात्रेंकरूनच भवबंध तुटून जातात व शरणागतकल्पतरु असा जो दयासागर श्रीरामचंद्र त्याच्या चरणारविंदीं प्रेम जडतें.

मन बच कर्म जनित अघ जाई।
सुनहिँ जे कथा स्रवन मन लाई।
तीर्थाटन साधनसमुदाई।
जोग बिराग ज्ञाननिपुनाई।
नाना कर्म धर्म ब्रत दाना।
संजम दम जप तप मख नाना।
भूतदया द्विज–गुरु–सेवकाई।
बिद्या बिनय बिबेक बडाई।
जहँ लगि साधन बेद बखानी।
सब कर फल हरिभगति भवानी।
सो रघु–नाथ–भगति स्रुति गाई।
रामकृपा काहू एक पाई।

ज्यास रामकथेचें श्रवण मनःपूर्वक घडतें त्याचीं कायिक, वाचिक, आणि मानसिक पापेंहि दग्ध होतात. तीर्थाटनादि सर्व साधनें, योग, वैराग्य, ज्ञान, नैपुण्य, अनेक कर्में, धर्म, व्रतें, दानें, नानाप्रकारचे संयम, दम, जप, तप व यज्ञ, भूतदया, ब्राह्मणसेवा, गुरुसेवा, विद्या, विनय, विवेक आणि स्तवन इत्यादि जेवढीं म्हणून साधनें वेदांनीं कथन केलीं आहेत त्या सर्वांचें ध्येय, हे पार्वति! श्रीहरीची भक्ति हेंच होय. ती वेदप्रतिपाद्य राघवभक्ति एखाद्यासच रामकृपेनें प्राप्त होते.

**दो०–मुनिदुर्लभ हरिभगति नर पावहिँ बिनहि प्रयास। जे यह कथा निरंतर सुनहिँ मानि बिस्वास॥ २०१॥**

जे नर ही कथा श्रद्धापूर्वक निरंतर श्रवण करतील त्यांस मुनींसहि दुर्लभ अशी हरिभक्ति अनायासेंच प्राप्त होईल.

चौ०–सोइ सर्बज्ञ सोई गुनज्ञाता।
सोइ महिमंडित पंडित दाता।
धर्मपरायन सोइ कुलत्राता।
रामचरन जा कर मन राता।
नीतिनिपुन सोइ परमसयाना।
स्रुतिसिद्धांत नीक तेहि जाना।
सो कबि कोबिद सो रनधीरा।
जो छल छाडि भजइ रघुबीरा।

तोच सर्वज्ञ, तोच गुणज्ञ, जगाचें भूषण, पंडित आणि दाताहि तोच, व धर्मात्मा आणि कुलोद्धारकहि तोच कीं ज्याचें मन रामचरणीं अनुरक्त आहे. नीतिनिपुण व परममुज्ञ असा तोच, वेदांततत्त्व तरी यथार्थ त्यानेंच जाणलें, कवि व कुशल असाहि तोच आणि रणधुरंधरहि तोच कीं जो रघुवीरास निष्कपट शरण जातो.

धन्य सुदेस जहँ सुरसरी।
धन्य नारि पतिब्रत अनुसरी।
धन्य सो भूप नीति जो करई।
धन्य सो द्विज निजधर्म न टरई।
सो धन धन्य प्रथम गति जा की।
धन्य पुन्यरत मति सोई पाकी।
धन्य घरी सोइ जब सतसंगा।
धन्य जनम द्विज भगति अभंगा।

धन्य तो प्रदेश कीं जेथें भागीरथी वाहते. धन्य ती स्त्री कीं जी पातिव्रताधर्माचें आचरण करते. धन्य तो राजा जो नीतीनें राज्य करतो. धन्य तो ब्राह्मण जो स्वधर्मापासून यत्किंचित्‌हि च्युत होत नाहीं. धन्य ती संपत्ति जिचा धर्मकृत्यांत विनियोग होतो. धन्य व पवित्र अशी बुद्धि तीच कीं जी पुण्यकर्मांतच विलीन असते. धन्य ती वेळ कीं जेव्हां सत्संग घडतो व धन्य तें आयुष्य कीं ज्यांत ब्राह्मणांची अखंड भक्ति घडते.

**दो०–सो कुल धन्य उमा सुनु जगतपूज्य सुपुनीत। श्री रघु बीर परायन जेहि नर उपज बिनीत॥ २०२॥**

हे पार्वति! ऐक. जगत्पूज्य, अत्यंत पवित्र आणि धन्य असें तेंच कुळ, कीं ज्यांत विनयसंपन्न वैष्णववीर निर्माण होतात[1].

चौ०–मति–अनु-रूप कथा मैँ भाखी।
जद्यपि प्रथम गुप्त करि राखी।

---

[1] पवित्र तें कुळ पावन तो देश। जेथें हरिचे दास जन्मा येती॥ कर्म धर्म त्यांचा झाला नारायण। तयांनीं पावन तिन्ही लोक॥ तुकाराम.

